# महाराष्ट्रीय ज्ञानकोश.





## ( शरीरखंड. )

हा ग्रंथ

श्रीधर व्यंकटेश केतकर; एम्. ए. पीएच्. डी.

यानीं

मंडळांतील अनेक साहाय्यकांच्या मदतीनें तयार केला.

## विभाग सहावा.

---

## अ—अर्थशास्त्र

---

ज्ञानं राष्ट्रधनं महत्तममिदं ब्राह्मण्यसंरक्षकम् ।
लोके क्षत्रियवैश्यकार्यघटनासौकर्यसंस्थापकम् ॥
कर्तृत्वागमबोधको ननु भवेज्ज्ञानार्थयत्नोऽधुना ।
ज्ञात्वा नागपुरे सुपण्डितजनैः संघः शुभो निर्मितः ॥

---

१९२४

मुद्रक—पृष्ठ १ ते २३२ कर्नाटक छापखाना मुंबई येथें छापली असून इतर भाग ज्ञानकोश छापखाना ८४१ सदाशिव पेठ पुणें येथें श्रीधर व्यंकटेश केतकर यांनीं छापला.

प्रकाशकः—महाराष्ट्रीय ज्ञानकोशमंडळ लिमिटेड नागपूर, तर्फे श्रीधर व्यंकटेश केतकर, ८४१ सदाशिव पेठ, पुणें.

# संपादकमंडळ

## मुख्य संपादक

डॉ. श्रीधर व्यंकटेश केतकर, एम्. ए. पीएच्. डी.

## संपादकीय कार्यव्यवस्थापक

रा. रा. यशवंत रामकृष्ण दाते, बी. ए. एल्एल्. बी.

## उपसंपादक

रा. रा. सर्वोत्तम वासुदेव देशपांडे, बी. ए.

रा. रा. चिंतामण गणेश कर्वे, बी. ए.

रा. रा. लक्ष्मण केशव भावे, बी. ए. एलएल्. बी.

हौत्रवेत्ते वेदशास्त्रसंपन्न चिंतामणभट्ट शंकर दातार.

डॉ. भालचंद्र गणेश नेने एल्. एम्. एस्.

मिस्. एच्. कोहन बी. ए. ( लंडन )

## शाखासंपादक

| | |
|---|---|
| रा. सा. विनायक त्र्यंबक आगाशे. एल्. सी. इ. | स्थापत्यशास्त्र |
| रा. ब. गणेश केशव केळकर. | कृषिकर्म |
| प्रो. विनायक नानाभाई हाटे बी. एस्सी. | प्राणिशास्त्र |
| प्रो. रघुनाथ विष्णु दामले. बी. ए. | वनस्पतिशास्त्र |
| प्रो. त्र्यंबक विष्णु मोने एम्. ए. | गणितशास्त्र |
| प्रो. दत्तात्रय लक्ष्मण सहस्रबुद्धे. एम्. एजी. | भूस्तरशास्त्र |
| वैद्यभूषण गणेशशास्त्री जोशी. | आर्यवैद्यक |
| कै. विनायक शास्त्री खानापूरकर | आर्यज्योतिषशास्त्र |

ज्या विषयावर शाखासंपादक नाहींत त्या विषयाची जबाबदारी संपादकमंडळावर आहे असें समजावें.

या विभागांतील विशिष्ट लेख व लेखक.— अण्णाजी दत्तो– रा. रा. वा. सी. बेंद्रे; अपुष्प वनस्पति–रा. रा. रं. वि. देव;

—:*S*:—




## र च ना प रि च य

रचनापरिचय करून देण्यासाठीं ज्या गोष्टी आवश्यक आहेत त्यांमध्यें शरीरखंड आणि प्रस्तावनाखंड यांचा परस्पर संबंध, अनुक्रमपद्धति, यांस प्रामुख्य येतें.

याशिवाय जे लेख त्यांतील नवीन शास्त्रीय संज्ञांशीं एकदम संबंध आल्यामुळें दुर्बोध होतात त्यांच्या संज्ञापद्धतीशीं कांहीं तरी परिचायक मजकूर देणें अवश्य होतें. नाहीं तर, ते वगळले असते तरी हरकत नाहीं असें वाचकांस वाटावयास लागेल. शास्त्रीय विषयावरील लेखांच्या ध्येयांत भाषाविकासास प्राधान्य देतां न सहजावगमनास दिलें पाहिजे. या विभागांत जे शास्त्रीय लेख आहेत, त्यांपैकीं रसायनशास्त्र खेरीज करून इतर लेखांतील देश्य संज्ञा सहज समजण्यास आडव्या येणार नाहींत. म्हणून रसायन शास्त्राच्या संज्ञांविषयीं अधिक सविस्तर स्पष्टीकरण पाहिजे व तें पुढें येईल.

**शरीरखंड**—ज्ञानकोशाचीं दोन खंडें आहेत, तीं प्रस्तावनाखंड व शरीरखंड हीं होत. प्रस्तावनाखंडांत जगांतील प्रमुख लोकसमाजांची सांस्कृतिक दृष्ट्या स्थूल माहिती देण्याचा, भारतीयांची सांस्कृतिक माहिती बरीच सविस्तर देण्याचा व त्याशिवाय शास्त्रीय ज्ञानाच्या वाढीचा अल्पशानें पण अनेक अंगांनीं इतिहास देण्याचा प्रयत्न केला आहे. पहिल्या "हिंदुस्थान व जग" या विभागांत राजकीय, धार्मिक व सामाजिक वगैरे बाबतींत कशा प्रकारची स्पर्धा व कितपत सहकार्य आणि अन्योन्याश्रय आहे, हें व हिंदु संस्कृतीचा प्रसार व हिंदुसमाजाची घटना व तिचें व ती बरोबर समाजाचें भवितव्य हीं दाखविलीं आहेत. दुसऱ्या "वेदविद्या" विभागांत प्राचीन वैदिक ग्रंथांची व यज्ञसंस्थेची माहिती देऊन तो विभाग सामाजिक आणि वैज्ञानिक इतिहासाला म्हणजे तिसऱ्या आणि पांचव्या भागाला उपोद्घातरूपी केला आहे. तिसऱ्या म्हणजे "बुद्धपूर्व जग" या विभागांत विश्वोत्पत्तीपासून बुद्धजन्मापर्यंतच्या काळांतील पृथ्वीवरील प्रमुख प्राचीन राष्ट्रांची माहिती दिली आहे, आणि चवथ्या "बुद्धोत्तर जग" या विभागांत ख्रिस्तपूर्व ५०० पासून चालू काळापर्यंतच्या राजकीय व वैचारिक व पारमार्थिक घडामोडींचा इतिहास दिला आहे. पांचव्या "विज्ञानेतिहास" या विभागांत अनेक प्राचीन व अर्वाचीन शास्त्रांच्या वाढीचा थोडक्यांत इतिहास दिला आहे.

शरीरखंडांत म्हणजे मुख्य कोशामध्यें केवळ शब्दांचे अर्थ दिले नाहींत. तर जे शब्द लेखविषय होऊं शकतील असे महत्त्वाचे शब्द व विषय घेऊन त्यांची माहिती सविस्तर देण्याचा प्रयत्न केला आहे. मोठाले शास्त्रीय विषय एका सदराखालीं न देतां त्यांतील मुख्य मुख्य पोटविभाग व त्यांतील महत्त्वाच्या प्रश्नांवर निरनिराळे स्वतंत्र लेख दिले आहेत. उदाहरणार्थ वैद्यकाची माहिती शारीरशास्त्र, इंद्रियविज्ञान यांसारखीं शास्त्रें व मुख्य मुख्य रोग वगैरेंच्या नांवाखालीं, दिली आहे. अर्थशास्त्राची मांडणी "अर्थशास्त्र" म्हणून सर्व सामान्य लेख देऊन "आंकडेशास्त्र" "उत्पादन" "राष्ट्रीयकर्ज" "संरक्षक पद्धति व खुला व्यापार", "चलनपद्धति" "करव्यवस्था" "राष्ट्रीय जमाखर्च", वगैरे निरनिराळ्या सदरांखालीं दिली आहे. शरीरखंडांत येणाऱ्या एकंदर विषयांसंबधान सामान्य कल्पना प्रस्तुत विभागावरून आणि विशेषतः, सोबत जोडलेल्या, प्रस्तुत विभागांत आलेल्या एकंदर विषयांच्या वर्गीकरणावरून येईल. प्रस्तावनाखंड जगाचा व्यापक सांस्कृतिक इतिहास देण्याच्या दृष्टीनें तयार केला आहे, तर शरीरखंड विशिष्ट विषयांचें थोडक्यांत सोपपत्तिक ज्ञान संकलित करून देण्याच्या दृष्टीनें तयार केला आहे. तथापि द्विरुक्ति टाळण्याकरितां शरीरखंडांतील विवेचनांत प्रस्तावनाखंडांत येऊन गेलेला मजकूर पुन्हा न देतां त्या खंडांतील स्थल दाखवून सूचित केला आहे.

**अनुक्रमविषयक पद्धति**—ही आम्हीं अलीकडील संस्कृत शब्दकोशकारांपेक्षां निराळी ठेविली आहे. प्राचीन शब्दकोशकार हे अक्षरानुक्रमानें ग्रंथरचना करीत नसत. अक्षरक्रम कसा असावा याविषयीं शास्त्रसिद्ध नियम कोणतेच नाहींत त्यामुळें वाचकांस संवय कशी आहे, आणि त्यांस सोयीचें काय जाईल हेंच मुख्य: रचनातत्त्व होय. या दृष्टीनें आम्हीं उपयोगांत आणलेलीं रचनातत्त्वें येणेंप्रमाणें:—

**अक्षरानुक्रम**—अ, : आ, ,इ, ई, उ ऊ, ऋ, ॠ, ऌ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः; क, ख, ग, घ, ङ; च, छ, ज, झ, ञ; ट, ठ, ड, ढ, ण; त, थ, द, ध,

न; प, फ, ब, भ, म; य, र ल, व, श; ष, स. ह, ळ क्ष, ज्ञ; असा ठेवला आहे. म्हणजे अं, क्ष, ज्ञ, यांस मराठी वाचकांस सोईस्कर जाईल असेंच स्थान ठेविलें आहे.

अनुस्वारांपुढें कोणतेंहि व्यंजन आलें व अगोदर व्यंजन विरहित अ नसला तर ते शब्द अनुस्वाराच्या पुढील अक्षराप्रमाणें लावणें. म्हणजे अनुस्वार नाहीं अशी कल्पना करून त्या शब्दास स्थान दिलें आहे. आणि निरनुनासिक व सानुनासिक असे दोन शब्द जवळ येतील तेव्हां निरनुनासिक प्रथम घेतला आहे. व्यंजनविरहित अं आला म्हणजे मात्र तो औच्या पुढें घातला आहे "क्ष" आणि "ज्ञ" हीं अक्षरें स्वतंत्र धरलीं आहेत व ह आणि ळ यांच्या नंतर घेतलीं आहेत.

अर्धानुस्वार, पूर्णानुनासिकाच्या अगोदर घेतला आहे. विसर्गाविषयीं नियम हाच कीं तो नाहीं असें धरून रचना केली आहे व विसर्गयुक्त शब्दाचें स्थान तशाच विसर्ग विरहित शब्दांनंतर ठरविलें आहे. अनुस्वार आणि विसर्ग यांत अनुस्वारास अग्रगामित्व दिलें आहे. "अॅ" "ऑ" हीं "अ" व "आ" सारखीं धरलीं आहेत मात्र त्यांचें स्थान अनुस्वार व विसर्ग यांच्या नंतर ठरविलें आहे.

---

## विभागांतर्गत ग्रंथनामसंक्षेपाचें स्पष्टीकरण.

| | |
|---|---|
| अ. ओ. सो. नि. का. पु. | अमेरिकन ओरिएंटल सोसायटीचें नियतकालिक पुस्तक. |
| अ. को. | अर्वाचीन कोश. |
| इं. अँ. | इंडियन अँटिक्वरि. |
| इं. गॅ. किंवा ग्या. | इंपीरियल गॅझेटियर. |
| इं. गाइड | इंडियन गाइड. |
| ए. इं. | एपिग्राफिआ इंडिका. |
| एन. जी. जी. डब्ल्यू. | नाख्रिख्टन फॉन डेर कनिखलिखेन गेझेलशाफ्ट डेर विसनशाफ्टेन त्सु गटिंगेन. |
| ए. ब्रि. | एनसायक्लोपीडिया ब्रिटानिका. |
| ए. रि. ए. | एनसायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स. |
| एस. डब्ल्यू. ए. | झिटंझुंग्स्बेरिख्टे डेर वीनेर ॲकाडेमी डेर विसनशाफ्टेन. |
| एस. बी. ए. | झित्झुंगबेरिख्टे डेर बर्लीना अकाडेमीडेर विसनशाफ्टेन. |
| ऐ. ब्रा. | ऐतरेय ब्राह्मण. |
| ऐ. ले. सं. | ऐतिहासिक लेख संग्रह. |
| कॅट. कॅट. | कॅटलोगस कॅटलोगोरम. |
| कविच. | कविचरित्र. |
| कात्या. | कात्यायन श्रौतसूत्र. |
| कौशि. किंवा कौ. सू. | कौशिकसूत्र. |
| गो. ब्रा. | गोपथ ब्राह्मण. |
| गॅ. किंवा ग्या | गॅझेटियर. |
| ज. अ. ओ. सो. ग्रं. | जर्नल ऑफ दि अमेरिकन ओरिएंटल सोसायटी, ग्रंथ. |
| जी. जी. ए. | गटिंग गेलेर्टे अन्त्सायगन. |
| जे. आर. एस. | जर्नल ऑफ दि रॉयल एशिआटिक सोसायटी ऑफ ग्रेट ब्रिटन अँड आयर्लंड. |
| जे. ए. एस. बी. | जर्नल ऑफ दि रॉयल एशिआटिक सोसायटी ऑफ बंगाल. |
| जे. पी. टी. एस. | जर्नल ऑफ दि पाली टेक्स्ट सोसायटी. |
| जै. अश्वमेध | जैमिनीय अश्वमेध. |
| झेड. डी. एम. जी. | त्साइट्श्रिफ्ट डेर डॉएट्श्चेन मॉर्गनलेंडिशेन गेझेलशाफ्ट. |
| टॉ. | टॉड. |
| डब्ल्यू. झेड.के. एम. | वीना त्साइट्श्रिफ्ट फ्यूर डी कुंड डेस मॉर्गन लांडेस. |
| डि. गॅ. | डिस्ट्रिक्ट गॅझेटियर. |
| तै. सं. | तैत्तिरीय संहिता. |
| प्रा. को. | प्राचीन कोश. |
| बॉं. गॅ. किंवा ग्या. | बॉंबे गॅझेटियर. |
| बॉ. ब्रँ. रॉ. ए. सो. ज. | बॉंबे ब्रँच रॉयल एशिआटिक सोसायटीज जर्नल. |
| बे. गॅ. | बेळगांव गॅझेटियर. |
| भ. | भरत नाट्यशास्त्र, |
| भा. | भावप्रकाश. |
| भा. इ. सं. मं. | भारत इतिहास संशोधक मंडळ. |
| भाग. दश. | भागवत दशमस्कंध, |
| भार. | भारत = महाभारत. |
| म. प्रां. ग्या. | मध्यप्रांत गॅझेटियर. |
| म. भा. किंवा महा. | महाभारत. |
| मा. | माधवनिदान. |
| मुं. गॅ. | मुंबई ( बॉंबे ) गॅझेटियर. |
| मु. रि. | मुसलमानी रियासत. |
| रा. खं. | राजवाडे खंड. |
| वनौ. | वनौषधिगुणादर्श. |
| वा. | वाग्भट. |
| वा. रा. | वाल्मीकि रामायण. |
| विनय. | विनयपिटक. |
| वि. विस्तार | विविधज्ञानविस्तार. |
| वै. सू. | वैतानसूत्र. |
| श. ब्रा. | शतपथब्राह्मण. |
| श्रौ. सू. | श्रौतसूत्र. |
| सं. क. का. सू. | संतकविकाव्यसूचि. |
| सा. द. | साहित्यदर्पण. |
| सु. | सुश्रुत. |
| सेंद्रि. र. पू. भा. | सेंद्रिय रसायनशास्त्र पूर्वभाग. |
| हिं. वै. को, | हिंदी वैज्ञानिक कोश. |

कित्येक प्रसंगीं संक्षेपांतील विरामचिन्हें गाळलीं आहेत.

## अंतरंगपरिचय

**लेखांचें वर्गीकरण**—शरीरखंडांतील अनेक विषयां पैकीं सुमारें पांचशें विषय या विभागांत प्रसिद्ध होत आहेत. त्यांचें शास्त्रवार वर्गीकरण केल्यास असें दिसून येईल कीं, हा भाग बऱ्याच शास्त्रांचें व अनेक भागांचें आणि त्यांच्या सांस्कृतिक व राजकीय इतिहासाचें विवेचन करणारा आहे.

प्रथमतः हिंदुस्थानांचा इतिहास विचारांत घेतां असें दिसून येईल कीं त्याचा बराचसा भाग या विभागांत आला आहे. हिंदुस्थानच्या इतिहासाचे भाग म्हणजे वैदिक संस्कृति, सूतसंस्कृति, बौद्धजैनप्रामुख्य काल, प्राचीन ऐतिहासिक काल, म्हणजे. शैशुनागांपासून मुसुलमानी स्वारीपर्यंतचा काल, मुसुलमानी अमदानी, मराठ्यांचें वर्चस्व, असे अनेक काल पडतील. यांपैकीं बहुतेक काळांवर या विभागांत लेख आहेत.

यांतील वैदिक संस्कृतिकालाविषयीं पाहातां, वैदिक वाङ्मयांपैकीं अथर्ववेदावरील लेख एकदम नजरेपुढें येईल. वैदिकधर्माविषयीचे म्हणजे, प्राचीन श्रौतस्मार्तधर्मावरील, लेख म्हणजे अग्निष्टोम, अघमर्षण अत्यग्निष्टोम हे होत. हे सर्व लेख " वेदविद्या " विभागाचे पूरक म्हणतां येतील.

सूतसंस्कृतिविषयक माहिती घावयाची म्हणजे पुराणें हें साहित्य समजून त्याचा अभ्यास घावयाचा. पौराणिक विषयाच्या अभ्यासासाठीं अग्निपुराण या संग्रहात्मक ग्रंथावरील मोठा व पृथक्करणात्मक लेख या भागांत आलाच आहे, आणि पौराणिक व्यक्तींपैकीं अनेक व्यक्ती आल्या आहेत. यांपैकीं मंत्रसंस्कृतीच्या पूर्वीच्या कोणत्या व नंतरच्या कोणच्या हें विवेचन यांत प्रत्येक प्रसंगीं केलेलें नाहीं. कुरुयुद्धकालीन आणि त्यापूर्वीच्या व्यक्ति कोणत्या, आणि निव्वळ काल्पनिक कोणत्या, हें चरित्रस्वरूपावरून उघड होत असल्यामुळें तद्विषयक विवेचनहि दिलेलें नाहीं. अक्रूर, अघासुर, अनिरुद्ध या कृष्णचरित्राची आठवण देणाऱ्या व्यक्ती, अत्रि, अनसूया, अगस्त्य, अरुंधती हे ऋषी व ऋषिपत्नी, देवजननी अदिति, व महाभारतांतील प्रसिद्ध वीर अर्जुन व त्याचा पुत्र अभिमन्यु यांची माहिती या विभागांत मिळेल. ज्या किरकोळ पौराणिक व्यक्तींनां यांत स्थान मिळालें आहे, त्या—अकंपन, अकृतव्रण, अग्निमित्र, अग्निवेश्य, अघमर्षण, अचल, अज, अजामिळ, अजीगर्त, आणिमांडव्य, अतिकाय, अद्रिका, अधिरथ अनरण्य, अनल, अनु, अनुमति, अनुविंद, अनुशाल्व, अमर्षण, अमावसू, अरणीसुत व अरुण, या होत. आपल्याकडील"अप्सरां" विषयीं विवेचन करतांना इतरत्र आढळणाऱ्या तत्सदृश कल्पनाहि मांडल्या आहेत.

बौद्धजैनप्रामुख्यकाल हा राजकीय इतिहासांतील नसून सांस्कृतिक इतिहासांतील काल आहे. याचें विवेचन घावयाचें म्हणजे मुख्यत्वेंकरून ग्रंथकार आणि विचारसंप्रदाय आणि त्यांच्या शाखा व उपशाखा हीं घावयाचीं असें असल्यामुळें या कालाविषयींचे लेख पुढें वाङ्मयात्मक लेखांचें वर्गीकरण करतांनां बौद्ध जैन ग्रंथकार देऊन व्यक्त केले आहेत.

बुद्धकालीन अजातशत्रु हा शैशुनाग घराण्यांतील मगधराजा यांत दिसेल. प्राचीन हिंदु घराण्यांपैकीं चालुक्य वंशांतील अक्कादेवी व अजयपाल यांचीं चरित्रें, कलिंग देशचा अनंगभीम, पंजावांतील मुसुलमानांच्या स्वारीस प्रथमच तोंड देणारा प्रसिद्ध अनंगपाल, यांच्या आणि कोंकणच्या इतिहासांतील पहिला व दुसरा अपरादित्य यांच्या कारकीर्दी यांत आलेल्या आहेत. राष्ट्रकूट घराण्याशीं परिचय राजा अमोघवर्ष याचें चरित्र करून देईल. दक्षिणेकडील पांड्यचेरचोलांविषयीं या विभागांत कांहीं स्थानविषयक लेखांतील तुरळक उल्लेखांशिवाय दुसरें कांहीं आलें नाहीं.

रजपूत राजांपैकीं कांहीं राजे या विभागांत चरित्राचे विषय झालेले आहेत ते अजयसिंग, अनंगपाल, अभयसिंह, अमरसिंह व अरसीसिंह हे होत. स्वातंत्र्यप्रिय रजपुतांचे मुसुलमानांशीं झालेले झगडे त्यांच्या चरित्रांवरून ज्ञात होतात.

सूर्य, चंद्र, यदु, नाग व अग्नि या क्षत्रिय वंशांपैकीं अग्निकुलांच्या उत्पत्तीसंबंधाचा वादविवाद अग्निकुल या लेखांत पहावयास मिळेल.

मुसलमानी इतिहासाकडे दृष्टि फेंकल्यास, मोंगल घराण्यापूर्वीचा इतिहास यांत आलेला नाहीं असें दिसेल. मोंगल घराण्यांतील महापराक्रमी बादशहा अकबर, व त्याचे सहकारी अबुल फजल व फैजी, त्याचा एक मुख्य प्रधान अबदुल रहिमखान, तसेंच जिचें अकबराशीं नातें काय होतें हें निश्चित झालें नाहीं पण जिचा शेवट वाईट झाला अशी सुंदरी अनार्कली, जहांगिराविरुद्ध खुश्रूला साहाय्य करणारा सरदार अबदुल रहिमखान या सर्वांस या विभागांत स्थान मिळालें आहे. या घराण्याच्या उत्तरकालीन इतिहासांत चमकलेल्या पुरुषांपैकीं सय्यद बंधूंचा बाप अबदल्लाखान याचें चरित्र आलेलें आहे. या राज्याचीं जीं शकलें पुढें पडलीं त्यांच्या इतिहासांपैकीं अयोध्येचा सरदार अबुतालिब खान. आणि कर्नाटकचा नबाब अनवरुद्दिनखान हे या विभागांत विषयीभूत झालेले दिसतील. बहामनी राज्याचा इतिहास यांत दृष्ट नाहीं. तथापि आदिलशाहीचा सरदार शिवशत्रु अफजलखान यांत आला आहे, व कुतुबशाहीचे म्हणजे गोवळ-

कोंडा राज्याचे अवदुल्ला कुतुबशहा, अबुहसन कुतुबशहा आणि शिवकालीन दिवाण अक्कण्णा यांचीं चरित्रें यांत आहेत. टोंक संस्थानाचा संस्थापक अमीरखान पठाण याचेंहि चरित्र यांत आहे.

मराठ्यांच्या इतिहासाची वांटणी.—ज्ञानकोशांत मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं माहिती पहावयाची झाली तर महाराष्ट्र किंवा मराठेशाही असा एखादा लेख काढून पाहिला म्हणजे झालें असें नाहीं. ज्ञानकोशांत मराठ्यांचा इतिहास एका लेखांत एकत्र पहावयास मिळेल हें खरें; तथापि मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं ज्ञानकोशांत भरपूर व सर्वांगी माहिती आली आहे व ती अनेक ठिकाणीं पहावी लागेल. एकंदर मराठ्यांच्या इतिहासाची वांटणी जवळ जवळ सर्व ज्ञानकोशभर सारखी झाली आहे. या विस्ताराची कांहीं अंशीं कल्पना एका सहाव्या विभागांत विखुरलेल्या माहितीचें पर्यालोचन केलें तरी येण्यासारखी आहे.

प्रथमतः हें उघड आहे कीं, शिंदे, होळकर, गायकवाड वगैरे मराठे सरदारांचीं जीं लहानमोठीं संस्थानें आज अस्तित्वांत आहेत त्यांच्या इतिहासाबद्दलची जिज्ञासा मराठ्यांच्या सामान्य इतिहासांत त्यांचे जे प्रसंगोपात्त उल्लेख येतील ते कितीहि विस्तृत असले तरी त्यांयोगें तृप्त होणें शक्य नाहीं म्हणून त्या संस्थानांवर स्वतंत्र लेख येतील. ( गायकवाड, धार वगैरे पहा ). अशा संस्थानांपैकीं एका अक्कलकोट संस्थानचा इतिहास या विभागांत आला आहे.

याशिवाय मराठ्यांच्या इतिहासाला अंगभूत होऊन बसलेला जवळ जवळ तितक्याच महत्त्वाचा परंतु त्याहून कित्येक पटीनें मोठा असा दुसरा वर्ग म्हटला म्हणजे महाराष्ट्रीय ऐतिहासिक पुरुषांचा होय. या वर्गापैकीं अण्णाजी दत्तो, अनूबाई घोरपडे, अमृतराव, अय्याशास्त्री, अक्कण्णा इतक्या व्यक्ती या विभागांत आलेल्या आहेत. त्यांतील अनूबाईसारख्या व्यक्तींनीं स्वतःस आपल्या संस्थानाशीं इतकें एकजीव करून घेतलेलें दिसतें कीं, त्यांचें चरित्र म्हणजे कांहीं काळपुरता त्यांच्या संस्थानाचा इतिहासच होतो. तथापि त्यांच्या संबंधीं बरीच माहिती व त्यांचे वरेच व्यवहार असे असतात कीं, ते त्यांच्या संस्थानाच्या इतिहासांत घातले असतां विषयांतरासारखे भासतात; परंतु त्यांच्या शिवाय त्या व्यक्तींच्या स्वभावाचा नीट परिचय वाचकांस होऊं शकत नाहीं, इतकेंच नाहीं तर ते त्यांच्या संस्थानांच्या इतिहासावरहि बोधप्रद प्रकाश पाडतात. यामुळें ते वैयक्तिक वृत्तांतहि महत्त्वाचे आहेत.

महाराष्ट्रीय पुरुषांइतकाच नसला तरी कित्येक वेळां बऱ्याच मोठ्या प्रमाणांत महाराष्ट्रीयेतर व्यक्तींचाहि मराठ्यांच्या इतिहासाशीं संबंध येतो. या सदरांत प्रस्तुत विभागांतील अफजलखान, अबूहसन कुतुबशहा, अमीरखान या मुसुलमान, व अमरसिंह दुर्रारा व अरसीसिंह या रजपूत, व्यक्तींवरील लेख सांपडतील. या लेखांत त्या व्यक्तींचा जेथें जेथें मराठ्यांच्या इतिहासाशीं संबंध येतो तेथील माहिती शक्य तितकी विस्तारपूर्वक दिलेली आढळेल. अफजलखान लेखांतील त्याच्या वधासंबंधी माहिती शिवाजी या लेखांत, किंवा अरसीसिंह या लेखांतील उदेपूरच्या वेढ्यासंबंधीं माहिती महादजी शिंदे या लेखांत दिली असती तर सध्याच्यापेक्षां फारच थोड्या जागेंत घालावी लागली असती.

अजाहुत सरदेशमुख, अमात्य व अमीन हे या विभागांतील लेख मराठ्यांच्या राज्ययंत्रांतील अधिकारीवर्गासंबंधाच्या माहितीच्या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत. वर सांगितलेल्या तीन वर्गांतील लेखांत त्यांच्याविषयीं माहिती केवळ उल्लेखमात्रच आली तर येऊं शकेल. पण या विषयांतील स्वतंत्र लेख त्यांच्या अधिकारक्षेत्राची वास्तविक कल्पना करून देऊन मराठ्यांच्या राज्ययंत्रांतील लहानमोठ्या चक्रांचें स्वरूप त्यांचा परस्परांशीं संबंध व त्यांची बलाबलता स्पष्ट करण्यास उपयोगी पडतील.

मराठ्यांच्या राजकीय इतिहासाइतकाच त्यांच्या संस्कृतीचा इतिहासहि महत्त्वाचा आहे व दुसऱ्याची माहिती झाल्याशिवाय पहिल्यांतील कित्येक गोष्टींचा नीट उलगडाहि होणार नाहीं. अठरा कारखाने, अठरा टोपकर, अबकारी व अबदागिरी हे मराठ्यांच्या संस्कृतीवर प्रकाश पाडणाऱ्या लेखांपैकीं आहेत. यांपैकीं अबकारी लेखांतील माहिती संक्षिप्तरूपानें दुसरीकडे कोठें देतां आली असती, परंतु बाकीच्या लेखांतील माहिती नुसत्या उल्लेखमात्रानेंहि इतर ठिकाणीं घालणें जड गेलें असतें. उदाहरणार्थ अठरा टोपकरांसंबंधीं माहिती इतरत्र कोठें व कशी घालणार ? तथापि तिजवरून तो शब्दसमुच्चय जेव्हां प्रचारांत होता तेव्हां मराठे लोकांस यूरोपांतील राष्ट्रांविषयीं आपणांस वाटते त्याहून किती तरी अधिक माहिती होती असें दिसून येतें.

उदयानंतर एक शतकाच्या आंतच मराठ्यांनां साम्राज्यसत्तेची महत्त्वाकांक्षा उत्पन्न झाल्यामुळें सत्ता नष्ट होण्यापूर्वीच्या शंभर वर्षांत त्यांचे महाराष्ट्रांत जितके झाले तितकेच महाराष्ट्राबाहेरहि व्यवहार झाले. या व्यवहारांच्या स्थानिक महत्त्वामुळें त सविस्तर देण्याचें योग्य स्थान ज्या जिल्ह्यांत किंवा संस्थानांत ते घडून आले ते जिल्हे किंवा तीं संस्थानेंच होत. असे व्यवहार हिंदुस्थानच्या बऱ्याच विस्तृत भागांत झाले असल्यामुळें कित्येक जिल्ह्यांच्या इतिहासांत मराठ्यांचा संबंध आलेला आढळून येईल. केवळ याच विभागासंबंधीं पाहिलें तरी महाराष्ट्राच्या उत्तरेकडील प्रदेशांपैकीं गुजराथेंतील अठ्ठाविशी, काठेवाडांतील अमरेळी, राजपुतान्यांतील अजमीर मेरवाड, बुंदेलखंडांतील अजयगड संस्थान, संयुक्त प्रांतांतील अकबराबाद व अयोध्या भाग आणि दक्षिणेकडील प्रदेशांपैकीं मद्रास इलाख्यांतील दक्षिण अर्काट,

व अनंतपूर जिल्हा; या लेखांत मराठ्यासंबंधीं माहिती कमी अधिक प्रमाणांत अंतर्भूत झालेली आहे.

प्रदेशाप्रमाणेंच स्थलविशेषांखालीं गेलेली मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं माहितीहि हिंदुस्थानच्या विविध भागांत पसरलेली आहे. उदाहरणार्थ या विभागांतील खास महाराष्ट्रांतील अचला, अडावद, अनेवाडी व अकलुज आणि वऱ्हाडांतील अडगांव, अमडापूर, अमनेर, अकोला या गावांचा तर मराठ्यांच्या इतिहासाशीं संबंध आलेला आढळतोच पण उत्तरेकडील प्रदेशापैकीं गुजराथेंतील अर्जुनगड, माळव्यांतील अगर, राजपुन्यांतील अजमीर, बुंदेलखंडांतील अजयगड आणि दक्षिणेकडील अनूप शहर व अकबरपूर, पूर्वेकडील प्रदेशापैकीं निजामशाहींतील अमराबाद आणि दक्षिणेकडील प्रदेशापैकीं बेळगांव धारवाड जिल्ह्यांतील अक्किवट, अथणी अण्णिगेरि, व मद्रास इलाख्यांतील अर्काट, अनंतपूर व अदवानी या सर्व गावांच्या इतिहासांत मराठ्यांनी भाग घेतलेला आहे. या वर्गांतील माहिती दिसावयास पुष्कळ वेळां क्षुल्लक असली तरी इतिहासाच्या अभ्यासकास ती महत्त्वाची वाटल्याशिवाय राहणार नाहीं. उदाहरणार्थ अर्जुनगड या पहिल्याच गावाखालीं ' १७२४ कार्तिक वद्य ८. अर्जुनगडवाल्यांनीं खंडोमुकुंद कल्याणहून तेथें आल्यावर त्यास माडवीस पोंचवावें, असा उल्लेख अवतरिला आहे. ही खंडोमुकुंद सरकारातून बडोद्यास जात होते त्याच्या मागीच्या विभागणीसंबंधीं माहिती आहे हिच्यापैकीं कालविषयक भाग पेशवे व गायकवाड यांच्यामधील तत्कालीन संबंधाविषयीं इतर कागदपत्रांवरुन मिळणाऱ्या माहितीस पुष्टि देणारा आहे; व दुसरा स्थलविषयक भाग पुण्याहून बडोद्यास जावयाचा तत्कालीन मार्ग व त्यावरील टप्पे दाखवितो म्हणून महत्त्वाचा आहे.

मराठ्यांच्या इतिहासासंबंधीं माहिती किती विविध लेखांत गेली आहे याची या विभागांतील अरबस्तान व अटक नदी हीं कदाचित् सर्वांत चमत्कारिक उदाहरणें वाटतील. अरबस्तानाचा मराठ्यांच्या इतिहासाशीं संबंध येतो तो मराठे अरबस्तानांत गेले म्हणून नव्हे तर अरब महाराष्ट्रीय संस्थानांत येऊन कित्येक वेळां राज्यक्रांत्या घडवून आणण्यास कारणीभूत झाले म्हणून.

एकच ऐतिहासिक प्रसंगाचा कधीं कधीं दोन लेखांशीं निकट संबंध येतो. तेथें कांहीं माहिती संक्षिप्तरूपानें पुनरुक्त होणें अपरिहार्य असलें तरी शक्य तोंपर्यंत प्रत्येक लेखांत नवीन माहिती आढळल्याशिवाय राहणार नाहीं. या विविध पण विखुरलेल्या माहितीची संगति लावण्याचें काम सूचिविभागाचें आहे हें सांगावयास नकोच.

पारमार्थिक विषयांवरील मुख्य लेख वाङ्मयविषयक लेखांचें कथन करतांना दिले आहेत, त्याशिवाय आणखी कांहीं लेख या भागांत आले आहेत. धर्मप्रचारक व साधुसंत या विभागांत कोणकोणते लेख आले आहेत हें पाहूं लागल्यास अतीश दीपंकर हा बौद्ध धर्मप्रचारक, अजित, अभयदेवसूरि, अमितगति व अमृतचंद्रसूरि यासारखे जैनर्षी, शीखांचा तिसरा गुरु अमरदास आणि एकदां जैनदीक्षा घेऊन पुन्हां शैवपंथांत परत आलेला तामिळ कवि अप्पर हे दिसतील. अकाली शीखांचा संप्रदाय, तसेंच अघोरी बैराग्यांची माहिती यांत सांपडेल. गोसाव्यांचे अठरा अखाडे कोणते ते समजेल. धार्मिक विधींत अनंतव्रत व अनवलोभनसंस्कार केव्हां व कसा करितात तें यांत आहे. अन्नाचें धार्मिक स्वरूप यांत वर्णिलेलें आहे तें किंत्येकांस मोठें महत्त्वाचें वाटेल, अमृताची कल्पना कशी आली हें त्या शब्दावरील लेखावरून कळेल. पारमार्थिक विषयांचा संबंध वैचारिक इतिहासाशींहि येतो. प्रस्तुत विभागांत आलेला वैचारिक इतिहास पुढें सविस्तर मांडला आहे.

यूरोपीयांचा हिंदुस्थानांतील इतिहासांतील कांहीं भाग आपणास ॲमहर्स्ट या गव्हर्नर जनरलच्या चरित्रांत आढळेल,

इंग्रजींतील अर्वाचीन थोर पुरुषांत सर शेषाद्रिअय्यर, व सर तिरुवरूर मुथुस्वामी अय्यर या मुत्सद्दी पुरुषांचीं चरित्रें व नुकतेच दिवंगत झालेले वस्तुरीरंग अय्यंगार यांचें चरित्र पहावयास सांपडेल. अगाखान उर्फ अगाखान या घराण्याचेंहि चरित्र यांत सांपडेल.

हिंदुस्थानीय भूगोल अभ्यासण्यासारखे या विभागांत बरेच लेख आहेत. हिंदुस्थानच्या प्रत्येक इलाख्यांतील कोणकोणती स्थळें समाविष्ट होतात हें पुढील मांडणीवरून कळेल.

मुंबई इलाख्यांत चार विभाग आहेत ते महाराष्ट्र, कर्नाटक गुजराथ व सिंध हे होत. अक्राणि–जिल्हा व परगणा, अकलुज, अकोला ( तालु. ), अक्कलकोट ( सं ), अक्कलकोप, अचला, अडावद, अतीत, अनेवाडी, अमळनेर व अर्जुनगड हीं महाराष्ट्रांतील स्थळें; अक्किवट, अगरखेड, अझूर, अण्णिगिरी, अथणी, अनवळ. अव्विगेरा, अद्दूर, अमरगोल, अमीनगड व अमीनभावी हीं कर्नाटकांतील; व अकलडिया. अगर, अजमेर, अट्ठाविशीं, अडेसर, अडोई, अतरसुंबा, अथोर, अधेवाड, अनमदेश, अमरापुर, अमरेली, आमाल, अमृतवेल, अरदोई, अरराई, अरसूर व अर्जुन सुख हीं गुजराथेंतील स्थळें या विभागांत आलेली आहेत अरोरा हें सिंधमधील मोडकळीस आलेलें गांव यांत वर्णिलें आहे.

मद्रास इलाख्यांतील पुढील स्थळें या विभागांत आलीं आहेत. अतूर, मराठ्यांचें राजकारण १८ वे शतकाच्या अखेरीस ज्यांत गुंतून राहिलें होतें तो अदवानी तालुका व शहर, अदिचनलुर, अद्दनकी, अनकापल्ली, अनंतपूर ( जि. विभा. तालु. व गांव ), अनयमलय, अनयमुडी, विजयानगरच्या साम्राज्याची आठवण देणारें अनागोंदी गांव अबिरामम्, अमरावती, अमलापूर, अम्मपत्तम, अय्याकोंडा अरंतांगी, अरवंत घांट, उत्तर–दक्षिण अर्काट व अर्काट शहर या इलाख्याच्या आसमंतांत असणारीं हैदराबाद म्हैसूर व त्रावणकोर

हीं जीं संस्थानें, आहेत त्यांतल्याहि कांहीं स्थळांवर यांत लेख आहेत. अजंठा, आत्राफ–इ–बाल्डा अदिलाबाद (जिल्हा, तालु. व गांव) अमरचिंत व अमराबाद हीं हैद्राबाद संस्थानांतील स्थळें येथें वर्णिलीं आहेत. अनंतपुर, अनेकुल, अरग, व अर्कावती नदी यांच्या वर्णनामुळें म्हैसुर संस्थानांसहि या भागाविरुद्ध तक्रारीस जागा नाहीं. गिरिशृंग अगस्त्यमले आणि अनंतशयन हें विष्णूचें स्थान हीं त्रावणकोर हद्दींतील स्थळें वर्णिलीं आहेत.

वऱ्हाड मध्यप्रांत या इलाख्यांत वऱ्हाड, मध्यप्रांत मराठी, व मध्यप्रांत–हिंदी, असे तीन भाग पडतात. खुद्द वऱ्हाडांतलीं स्थळें म्हणजे अकोट, अकोला (जि. तालु. व गाव) अडगांव, अडाण, अनसिंग, अमडापुर व अमनेर हीं होत. अडस, अध्याळ, अरपल्ली, अरहर–नवरगांव व अर्जुनी जमीनदारी हीं मराठी मध्यप्रांतातील व अन्दोनी अमदुल व अरंग हीं हिंदी मध्यप्रांतातील स्थळें या विभागांत आलीं आहेत.

संयुक्त प्रांतांतील पुरातनकालापासून आपल्या अतिपरिचयाचें यांत आलेलें स्थान म्हणजे अयोध्या होय. अकबरपुर दोन अकबराबाद, अछनेरा, अझमगड (जि. गांव) अत्रावळी, अनूपशहर (तह. गां.), अफझलगड, अमरोहा, अमवाखास व अमेथी हीं या इलाख्यातील दुसरीं स्थळें यात आढळतील.

अगर, अजमीर–मेरवाड, अजमीर अजयगड संस्थान व शहर, अनूपगड, अबूरोड, अमझेर, अमरकंटक, अमेट, अरवली, व अरा या मध्यहिंदुस्थानांतील स्थळांपैकीं अजमीर अबु व अरवली पर्वत हींच कायतीं आपल्या विशेष परिचयाचीं वाटतात.

पंजाबांतील स्थळांत अकालगड, अक्का, अग्रोर, अग्रोहा. राघोभराऱ्यानें जेथपर्यंत आपलें घोडे नेले तो अटक जिल्हा व नदी, अतारी, अनाहगड दोन, ॲबट या इंग्रज अधिकाऱ्याच्या नांवावरून ज्याचें नांव पडलें तो अबटाबाद तहशील व शहर, अबाझई, अमरगड, अमलोह व पंजाबप्रकरणापासून ज्यानें आजच्या हिंदुस्थानाचें लक्ष ओढलें आहे असें शीखांचें मुख्य स्थान अमृतसर हीं दिसून येतील.

बंगाल प्रांतांतील 'अने' आरंभ होणारीं यांत आलेलीं गांवें म्हणजे अका, अगरतला, अझीमगंज, अथमालिक अफसर, अमानी गंज, अमृतबझारपत्रिकेवरून प्रसिद्धीस आलेलें अमृत बाजार, अरराज, अरा किंवा आरा आणि अरारिया.

अथगड हें एकच बिहार मधील गांव यांत दिसेल.

आसाम व ब्रह्मदेश या हिंदुस्थानच्या पूर्वेकडील टोंकाशीं असणाऱ्या प्रांतांतील, अइ नदी, अइजल, अकियाब, अजमीरीगंज, अन, अमरपुर व १८२६ त इंग्रज सरकारकडे आलेला ॲमहर्स्ट जिल्हा हीं स्थळें येथें वर्णिलीं आहेत.

हिंदुस्थानासमीप असलेल्या सिंहलद्वीपांतील अनुराधपुर प्राचीन बौद्धसंस्कृतीच्या अवशेषांसंबंधीं प्रख्यात आहे, तें आणि दक्षिण कानडास जोडलेली अमिनदीविबेटें या विभागांत आढळतील.

आशियाखंडावरचे लेख पाहूं जातां आपला शेजारी देश जो अफगाणिस्तान त्यावर एक अत्यंत व्यापक आणि आजतागाईत लेख आपणास दिसेल. याशिवाय अफगाणिस्तान व तुर्कस्तान या मोठाल्या देशाचा कांहींसा इतिहास तेथील बादशहाच्या चरित्रातून आढळणार आहे. इंग्रजाचा दोस्त अफगाणचा अमीर अबदुल रहमानखान, व त्याचा चुलतभाऊ पण शत्रु अयुबखान यांचीं चरित्रें या विभागात येऊन गेलीं आहेत.

तुर्कस्तानचे सुलतान अबदुल अझीझ, अबदुल मजिद, व अबदुल हमीद यानाहि स्थळ मिळालें आहे. अरबस्तानावरील लेख सविस्तर आहे आणि महायुद्धानंतरच्या घडामोडी त्यात वर्णिलेल्या आढळतील. प्राचीन अरबस्तानचा इतिहास आणि महंमद पैगंबराचा कौटुंबिक इतिहास त्याचें आईबाप अमीना अबदुल्ला, व सासरा अबूबकर सिद्दिक याच्या या विभागांत आलेल्या चरित्रावरून थोडाबहुत परिचित होईल. या खंडातील कांहीं इराणी व अरबी ग्रंथकार वाङ्मयाच्या मोठ्या सदरात आढळतीलच

अकिमिनियन हें प्राचीन इराणी राजघराणें व अनाहित आणि अमेशस्पेंत या झरथुष्ट्री देवता याच्या माहितीवरून प्राचीन इराणी संस्कृतीची कांहीं कल्पना येईल.

इस्रायलांचा पूर्वज अब्राहाम यावर निराळा लेख सांपडेल.

आशियातील लहान राष्ट्रांवर, प्रांतांवर आणि शहरांवर लेख बरेच आले आहेत. १९१७ मध्यें अस्तित्वांत आलेलें अझरबैजनचें लोकराज्य यांत समाविष्ट केलेलें दिसेल. अक्चा, अडोवा, अदाना, अदाबझार, अपामिया, अफगाणतुर्कस्तान, अब–इ–इस्ताद, अब्बासिबंदर, अमॉय, अमूदर्या नदी, अयुथिया, अरबीसमुद्र, अरबोला, अझेरूम विलायत, व आर्झिजन या पश्चिम आशियामधील महत्वाच्या स्थानांवरहि लेख आहेत. अनाटोलियावर लेख आशियामायनरवरील लेखांत अंतर्भूत केला आहे.

यूरोपखंड—आशिया व यूरोप यांचा संबंध जोडणारे स्पेनमधील उमईद घराण्याचे "अबदुल रहमान" नांवाचे खलिफ यांची माहिती त्या लेखांत दिलेली आहे. यूरोपीय भौगोलिक लेखांत अटलांटिक महासागर अझोव्हचा समुद्र; स्कॉटलंडमधील प्रसिद्ध अबरडीन शहर व हॉलंडची राजधानी ॲम्स्टरडॅम; यूरोपमधील तुर्कस्थानांतील प्रख्यात ॲड्रियानोपल व किरकोळ स्थळें म्हणजे ॲक्टन, अग्रिजेंटम, अझारा, अझोव्ह, अटीना, अड्रा अड्रिया, अपेना, अबिंग्डन, अबेव्हील, अरेटियम व अर्डिया हीं सांपडतील.

यूरोपच्या प्राचीन संस्कृतीशीं परिचय करून घेतांना पौराणिक ग्रीक व्यक्ती, वैचारिक पंथ आणि प्राचीन अवशेष

ही माहिती पाहिजे. या विभागांतले अकिलिस व अडोनिस हे पुरुष, अमेझॉन हा वीरस्त्रियांचा वर्ग, अकाडमी पंथ व अकालारेन्शिया, आकियन, अक्रियम,अथेन्स, अपोलोनिया, आणि अर्गास हीं स्थळें त्या इतिहासाचा एक भाग डोळ्यांसमोर आणतील.

ख्रिस्ती संप्रदायाचा प्रसार यूरोपांत होऊन त्यास तेथें निराळें वळण लागलें त्या वाढीचा इतिहास बराच मनोरंजक आहे. त्यापैकीं फारच थोडा भाग येथें आला आहे.

अॅबट, अॅबेस, व अॅब्राहामाईट या ख्रिस्ती संप्रदायांतील धार्मिक संस्था यांत वर्णिलेल्या आहेत.

आफ्रिका—आफ्रिकेची माहिती या भागांत थोडीच आहे. मुसलमानी, प्राचीन ख्रिस्ती आणि, अर्वाचीन युरोपियन या तीन संस्कृति आफ्रिकेंत आहेत. तिहींकडेहि लक्ष ओढणारे लेख या भागांत आहेत. अल्जीरियाचा अमीर अबदुल कादिर व प्रसिद्ध इजिप्शियन देशभक्त अरबीपाशा यांचीं त्रोटक चरित्रें दिलेलीं दिसतील. अबिसिनिया या प्रांतांचा इतिहास व भूगोल व आज तागाईत सर्व माहिती, तसेंच त्यांची राजधानी अडीस अबाबा,हीं येथें वर्णिली आहेत. अबिसीनिया हें प्राचीन ख्रिस्त संस्कृतीचा परिणाम झालेलें आफ्रिकन राष्ट्र होय. अक्रा, अझोर्स, अडोवा, अट्बार, अबोबान, अबूकीर, अबेअकूटा, अबोमे व अम्हास यांचीं वर्णनें या विभागांत आहेत.

अमेरिकेच्या म्हणजे खंडाच्या सर्वसामान्य स्वरूपावर एक लेख लिहिलेला आहे. संयुक्त संस्थानाचे दुसरे व सहावे अध्यक्ष अडाम्स आणि अडाम्स जॉन क्विनी यांचीं चरित्रें, अमेरिकेची व हिंदु रहिवाश्यांची सामान्य माहिती, संयुक्तसंस्थानांतील अटलांटिक सिटी, अडीरानडॅक्स व अड्रियन हीं स्थळें वर्णिलीं आहेत. अर्जेंटिना या लोकसत्ताक राज्याचा सविस्तर इतिहास यांत येऊन गेला आहे. अमेरिकेंतील इतर भागांतील मजकूर फार थोडा आहे तो म्हटला म्हणजे चिली देशांतील प्रांत अकाकांग्वा, कानडांतील अकाडी, व मेक्सिकोंतील बंदर अकापुलको, या स्थळांचीं वर्णनें हा होय.

आस्ट्रेलेशियासंबंधीं बहुतेक माहिती आस्ट्रेलिया आणि आस्ट्रेलेशिया यांमध्यें येईल. या विभागांत फक्त दक्षिण आस्ट्रेलियाची राजधानी अडीलेड, अडेल्सबर्ग व अॅडमिरॅलिटी बेटें यांवर लेख आलेले आहेत.

प्राचीन जगः—प्राचीन स्थळांच्या आधुनिक अवशेषांवरून प्राचीन इतिहास व संस्कृति यांचें चांगलें साधार ज्ञान होतें, म्हणून अशा स्थळांची माहिती या विभागांत परिश्रमपूर्वक गोंविलेली आहे. प्राचीन ग्रीक स्थळांपैकीं कोणकोणतीं यांत आलीं आहेत हें यूरोपखंडाविषयीं लिहितांना दिलेंच आहे. अक्कड, अक्षोटस व अना हीं स्थळें असुरीबाबिलोनी संस्कृतिकालांतील, तर अबिडॉस व अबूसेबेल हीं मिसरी देशांतील, तसेंच अटालिया, अनाझरबस अबिडॉस व अबिला हीं तुर्कस्थानांतील आणि अरेटियम हें इटलीमधील प्राचीन शहर आहे. ख्रिस्ती व यहुदी संप्रदायांचें उगमस्थान जें पॅलेस्टाईन, त्याचा अत्यंत प्राचीन इतिहास अॅडॅलम, अबाना—फारपर व, इस्तारच्या संप्रदायाचे मुख्य ठिकाण अरबेला, या लेखांवरून कळेल.

भारतात प्राचीन काळीं अभिशिर, अनूपदेश, अपरांतक व अभिसार हे देश असल्याचा इतिहासपुराणांतरीं उल्लेख आढळतो. अनुराधपुर, अभयगिरी व अमरावती या ठिकाणीं बौद्धसंस्कृतीचे अवशेष आढळतात. या उपयुक्त सर्व स्थलांवर यांत लेख आहेत. प्राचीन गुजराथच्या इतिहासांत अनहिलवाड प्रामुख्यानें आलेलें आहे. तें स्थळ देखील या विभागांत वर्णिलें आहे.

आतां वाङ्मयक्षेत्राकडे अवलोकन करूं. संस्कृत वाङ्मयांतील वैदिक, आणि पौराणिक वाङ्मयांपैकीं अथर्ववेद आणि आणि अग्निपुराण हीं यांत वर्णिलेली आहेत हे मागेंच सांगितलें आहे. अत्यंत महत्त्वाचा कोश ग्रंथ जो अमरकोश त्याला या विभागांत स्थान मिळालें आहे, तसेंच अमरुशतक हें शृंगारिक काव्यहि लेखविषय झालें आहे. तसेंच अतिरात्रयज्विन्, अनंगहर्ष, अनंत, अनंतदेव, अनंतराम, प्रसिद्ध वैय्याकरण अप्पय्या दीक्षित, नाटककार अप्पाशास्त्री, अभिनंद, अभिनवकालिदास, अभिनवगुप्त, शंकराचार्यांचा प्रतिस्पर्धी अभिनवगुप्ताचार्य, अभिनवबाण, अमरसिंह, दोन अमलानंद, अम्माल आचार्य व अरुण गिरिनाथ डिंडिभ या संस्कृत ग्रंथकारांचीं चरित्रें या विभागांत आलीं आहेत.

संस्कृत शास्त्रीय वाङ्मयापैकीं अर्कप्रकाशाचा येथें फार थोडक्यांत उल्लेख केला आहे.

जैनग्रंथकारांपैकीं अमरचंद्र, अमरकोशकार अमरसिंह, अमरप्रभसूरी, अमितगति अमृतचंद्रसूरी व अरिसिंह यांस या विभागांत स्थान मिळालें आहे.

बौद्धवाङ्मयापैकीं अपदान व अभिधम्म या वाङ्मयशाखा व अनागतवंश, अभिधम्मत्थसंग्रह व अभिधर्मकोश हे पाली ग्रंथ या विभागांत येऊन गेले आहेत.

मराठी वाङ्मयापैकीं अभंग या महत्त्वाच्या पद्यशाखेवर एक विस्तृत लेख या विभागांत आला आहे, व अनंतफंदी हा प्रसिद्ध लावण्या व फटके रचणारा पेशवाईंतील कवि व प्रसिद्ध कटावकार अमृतराय, तसेच अच्युताश्रम, अच्युताश्रमशिष्य, अतीतानंद, अद्वैतानंद, पांच अनंत, तीन अनंतसुत व अनंत वढवे या संतकवींचीं चरित्रें तत्कालीन काव्यांची ओळख करून देतील.

अनाथ व अमरसिंह या हिंदी, अप्पर या तामिळ व अथर्वणाचार्य व अय्यल राजूराम या तेलगु कवींचीं चरित्रें वाचकांना त्या वाङ्मयक्षेत्रांशीं परिचय करून देतील.

फारसी व अरबी कवींनांहि या विभागांत बरीच जागा मिळाली आहे. भारतीय फारसी कवींत आदणांस चार कब-

दुल अझीझ, दोन अबदुल करीम, तीन अबदुल गफूर, अबदुल जलिज, अबदुल हक्क, अबदि, आपल्या परिचयाचे अकबराचे मित्र अबुल फजल व फैझी, अयीन उद्दिन व अयीन उल-मुल्क हें आढळतात. अबदुल लतीफ, अबदुल कादिर जिलानी, अबदुल्ला बिन अली, अबदुल आला, अबुल फराज व अबुलफिदा हे अरबीवाङ्मयाचे प्रतिनिधी यांत आले आहेत इराणांतील फारसी कवींपैकीं अत्तार, अनवरी व अबू तालिब कलिम या कवींस या विभागांत स्थान मिळालें आहे; इंग्रजी ग्रंथकारांपैकीं ॲडिसन व अमेरिकन ग्रंथकारांपैकीं ॲबट लायमन व ॲडलर या ग्रंथकारांचीं चरित्रें या विभागांत अंतर्भूत झालीं आहेत

शास्त्रीय.—या दुसऱ्या मोठ्या वर्गांत सर्व भौतिक शास्त्रें त्या शास्त्रांतील संशोधक, व महत्त्वाच्या सिद्धान्तावरील लेख अन्तर्भूत होतात. त्यापैकीं रसायनशास्त्रांतील औपपत्तिक, विशिष्टपदार्थबोधक व व्यावहारिक या अंगांपैकीं अणु, अम्लशास्त्र उर्फ ॲसिडांचें शास्त्र, हे औपपत्तिक लेख या विभागांत आले असून अजीवसंयुक्त-पदार्थ, अमिनें, (अमाइन्स), व अमिदिनें (अमेडाइन्स) हे विशिष्ट शाखांतील लेख आहेत, तसेंच अचंड, (अर्गान) अनूप (मार्श वायू) हे विशिष्ट वायू, व अमिल नत्रायत, अमिल अल्कहल, अरंतुद (अक्रिडाइन) हे विशिष्ट पदार्थ लेखविषय झाले आहेत. अजमोदल (थायमॉल), अर्क, अभ्रक हे व्यावहारिक रसायनशास्त्राच्या क्षेत्रांतील लेखहि या भागांत आले आहेत.

पदार्थविज्ञानशास्त्रांतील उष्णता, प्रकाश, ध्वनि विद्युत चुंबकत्व, इत्यादि सर्व विषयबोधक शब्द अच्या बाहेर पडत असल्यामुळें हें शास्त्र येथें फारसें आलें नाहीं. तथापि औपपत्तिक भागापैकीं व अलीकडे प्रस्थापित झालेल्या इलेक्ट्रॉन अथवा अतिपरमाणुविद्युत्कण सिद्धान्तावरील लेख या भागांत आला आहे. याखेरीज अभिसरण या क्रियेवर व अभिमापक या यंत्रावरहि लेख या विभागांत आले आहेत. त्याप्रमाणेंच आम्पियर व अरागो हे प्रसिद्ध पदार्थविज्ञानशास्त्री यांत चरित्रविषय झाले आहेत.

वैद्यकशास्त्रीय लेखांसंबंधीं मुख्य गोष्ट प्रथम ही सांगितली पाहिजे कीं या शास्त्राची या भागांत स्थिति पदार्थ विज्ञानासारखीच आहे. शारीरशास्त्र, इंद्रियविज्ञान यासारखीं सहायक शास्त्रें, किंवा तदंतर्गत कान, डोळा, हात पाय, त्वचा, रक्त, जननपद्धति यांसारखे विषय हे सर्व या अक्षरांत येत नसल्यामुळें वैद्यक शास्त्रज्ञांस आपले लेख यांत नाहींत असें वाटेल. तथापि त्यांसहि यांत कांहीं नवीनपणा दिसून आल्याखेरीज राहणार नाहीं. पाश्चात्य व आयुर्वेदीय या दोन्ही पद्धतींनींहि रोगांचें निदान व चिकित्सा कशी करतात त्याचें सान्निध्यानें पण पृथक्पणें विवेचन केलें आहे. वैद्यकशास्त्राच्या शाखेपैकीं आहारशास्त्राचा 'अन्न' या लेखांत या भागांत अंतर्भाव झाला आहे. तसेंच अरुचि व अपचन हे लक्षणात्मक रोग व अग्निमांद्य, अतिसार, अम्लपित्त, अपस्मार, अपीनस हे दोन्हीहि वैद्यकपद्धतींस परिचित असे रोग व ॲडिसनचा हा पाश्चात्य पद्धतीस विशेष परिचित रोग, यांस स्थान मिळालें आहे. प्रसिद्ध वैद्यांपैकीं अबदल लतीफ, अबदुल मलीक या अरब वैद्यांचीं व अबानो पिट्रो या इटालियन तत्वज्ञानी वैद्याचें चरित्र आपणांस या विभागांत आढळेल.

जीवशास्त्रापैकीं महत्त्वाची शाखा जें वनस्पतिशास्त्र त्यापैकीं अपुष्पवनस्पति हा महत्त्वाचा शास्त्रीय लेख या भागांत आला असून लौकिक लेखामध्यें अक्कलकारा, अजमोदा, अजशृंगी, अडुळसा, अतिविष, अनंतमूळ, अपराजिता, अर्जुन सादडा, या विशेषतः औषधी वनस्पति व अक्रोड हा वृक्ष व अननस, हे फळांकरितां प्रसिद्ध असलेलें झाड व अगरु व अफू हे वनस्पतिज पदार्थ यावर लेख या विभागांत आले आहेत. यातील अफू हा व्यापाराचा व अंमली पदार्थ म्हणून विशेष महत्त्वाचा विषय आर्थिकदृष्टीनें व शासनदृष्ट्याच्या दृष्टीनें सविस्तर विवेचिला आहे.

त्याप्रमाणें जीवशास्त्राची महत्त्वाची शाखा असलेल्या प्राणिशास्त्रापैकीं अनंतपद हा शास्त्रीय विषय व अजगर ह्या प्राण्यावरील लेख या विभागांत अन्तर्भूत झाले आहेत.

ज्योतिषशास्त्रापैकीं अयन, अयनांश, अधिकमास हे कालगणनेच्या दृष्टीनें महत्त्वाचे लेख, अभिजित् हें महत्त्वाचें असें अठ्ठाविसावें नक्षत्र व अमृतसिद्धियोग हा फलज्योतिषांतील एक योग हे या विभागांत लेखविषय झाले आहेत. तसेंच अनंत व अनंतदेव या भारतीय ज्योतिष्यांचीं चरित्रेंहि या भागांत आपणांस दिसतील.

उद्योगधंद्याकडे पहातां रासायनिक उद्योगधंद्यांतील, अत्तरें व सुगंधीपदार्थ, अर्क, अग्निक्रीडा हे लेख या विभागांत आले आहेत. अभ्रक हा खनिजपदार्थ, अबीर हा सुगंधी पदार्थ व अफू हा अमली पदार्थ यांचें क्षेत्र, तयार करण्याची कृति व व्यापार हीं या विभागांत विवेचिलीं आहेत. अबकारी हें अफू मद्य वगैरेच्या व्यापाराशीं संबद्ध खातें हें शासनशास्त्रीय दृष्टीनें विवेचिलें आहे व अडत्या हा देवघेवीतील महत्त्वाचा मध्यस्थ हे विषय या विभागांतच येऊन गेले आहेत.

समाजशास्त्र व मानववंशशास्त्र—या शास्त्राचें औपपत्तिक अगर शास्त्रीय विवेचन देणारा विशेष महत्त्वाचा लेख या विभागांत आलेला नाहीं. तसेंच या शास्त्राची एखादी शाखा बोधणाराहि लेख या विभागात येऊं शकला नाहीं तथापि समाजशास्त्राच्या शासनशास्त्र भाषाशास्त्र समाजनियमनशास्त्र वैचारिक इतिहास, आणि तदंतर्गत दर्शनें, मतें, व संप्रदाय, इत्यादि अनेक अंगांस या भागांत स्थान दिलेलें आढळेल. समाजव्यंगनिवारणशास्त्र उर्फ दानमीमांसा हें अधर्मसंतति या लेखामुळें सूचित होईल.

या विभागांत ज्या अनेक जातींची माहिती आली आहे त्यांनीं बरेंच विस्तृत क्षेत्र व्यापिलें आहे. आणि विवेचन ऐतिहासिक, वर्णनात्मक, स्थलांतरेतिहासात्मक असें केलें आहे. जातिविषयक लेख लिहितांनां त्याचें आंकडेशास्त्रहि विस्तृतपणें विवेचिलेलें सांपडेल. तसेंच जेव्हां जातिविशिष्ट भाषा असेल तेव्हां भाषाशास्त्रांतहि बुड्या मारलेल्या आढळतील. व्यापकपणें विवेचनास महाराष्ट्रीय जातीच घेतल्यामुळें, आणि महाराष्ट्रीय जातींचें विवेचन या भागांत फारसें नसल्यामुळें, या भागांतील जातिवर्णनात्मक लेख हा ज्ञानकोशांतील उत्तम जातिविषयक लेखांचा निदर्शक भाग नाहीं. भरतखंडातील महाराष्ट्रीय जातींपैकीं फक्त अकरमाशे या मिश्र जातीस किंवा वर्गास या विभागांत स्थान मिळालं आहे. पंजाबांतील अगीर, अरैन अरोरा व अर्घुन या हिंदू, व अब्दलही मुसलमानी जात यांस या विभागांत स्थान मिळालें आहे. संयुक्तप्रांतांतील अग्रहारी, अघारिया व अरख या जाती, व बंगालविहार मधील अगार्या ही गोंड जात या प्रस्तुत विभागांत आढळतील. अग्रहारा व अरख या वर आलेल्या जाती आपणांस मध्यप्रांतांतहि आढळतात; व अरे या एका त्रावणकोरी व मध्यप्रांतांतील जातीची माहितीहि याच विभागांत येते. आसाम व ब्रह्मदेशांतील जातीपैकीहि अका, अखा, अग्रदानी व ब्रिटिशांच्या अलीकडील स्वारीमुळें ज्यांच्याकडे लक्ष ओढलें गेलं असे अबोर लोक यांची माहिती याच भागांत आली आहे. तामिळ तेलगु वगैरे द्राविड जातींपैकीं अगमुदैय्यन, अदिकल, अरे, अगस, अरसुपल्ली या जातींस या विभागांत स्थान मिळालें आहे. गुजरायेंतील अनावळ या प्रसिद्ध ब्राह्मण जातीसहि या भागांत जागा मिळाली आहे.

शासनशास्त्रांपैकीं प्राचीन शासनशास्त्रांतर्गत होणारा अभिषेक यांत आला आहे. हा राजांनां अवश्यक असलेला लौकिक व धार्मिक विधि किती पुरातन आहे, व वैदिक संस्कार कशा प्रकारचा होता, हें सविस्तर लिहिलेलें आढळेल.

अराजकता हा राजनीतिविषयक तत्त्वज्ञानशाखेंतील विषयहि याच विभागांत आपणास पहावयास सांपडेल.

समाजशास्त्राचें दुसरें एक महत्त्वाचें अंग अर्थशास्त्र होय. त्या विषयाला या विभागांत आरंभ केला असून तो विषय पुढील विभागांत पुरा होईल. अर्थशास्त्रावर दुसरा लेख म्हटला म्हणजे हेनरी अडाय्म्स अर्थशास्त्रज्ञाची मतें त्याच्या चरित्रांत आपणांस याच विभागांत पहावयास मिळतील.

मानवेतिहासांतर्गत दैवतशास्त्रांपैकीं फक्त अग्नि या देवतेस या विभागांत स्थान मिळालें आहे.

मानवेतिहासाची एक महत्त्वाची शाखा जें भाषाशास्त्र त्या क्षेत्रांत अगस्त्य हा व्याकरणकार हा एकच लेख आला आहे.

अरुंधतीदर्शन्याय या लेखामुळें प्राचीन न्यायशास्त्राचा प्रवेश झाला आहे. अ या आद्याक्षरा मुळें लिपिशास्त्रहि वगळलें गेलें नाहीं.

दर्शनें मतें व संप्रदाय या मानवेतिहासाच्या अंगभूत विषयांपैकीं भारतीय शाखेंतील महत्त्वाचा अद्वैतवाद या विभागांत येऊन गेला आहे. व पाश्चात्य तत्त्वज्ञानपंथांपैकीं अकॅडमी, अनुभवजन्यज्ञानवाद या दोन पंथांस या विभागांत स्थान मिळालें आहे. अनंतत्व हा तत्त्वज्ञानात्मक सिद्धान्तही याच विभागांत लेखविषय झाला आहे. अनॅक्सगोरस अॅनक्सिमँडर यांचीं मतेंहि त्यांच्या चरित्रासह आपणांस येथें आढळतील.

समाजनियमन उर्फ कायदे या शास्त्रांपैकीं अपकृत्यशास्त्र हा औपपत्तिक लेख, व त्याचीच एक शाखा म्हणतां येईल असा अब्रूनुकसानी हा विषय, व अन्नवस्त्र हा एका दृष्टीनें कौटुंबिक मनुष्यास ज्याचें ज्ञान असणें अवश्य आहे असा लेख, या सर्वांस यांत स्थान मिळालें आहे. बाबिलोनी, मिसरी, ग्रीक, रोमन, हिंदु या प्राचीन कायदेपद्धति आणि इंग्लिश व रोमोत्पन्न अर्वाचीन यूरोपीयन व अर्वाचीन हिंदु व मुसुलमानी यांपैकीं फक्त अर्वाचीन आंग्लो इंडियन कायदेपद्धतीप्रमाणेंच कांहीं विषयावर कायदा यांत आला आहे. तथापि इतर कायदेपद्धतींचा स्पर्श या भागास झाला नाहीं असें नाहीं. अबू हानिफ या अरबी कायदे पंडिताचें चरित्र आपणांस या भागांत आढळेल.

व्यावहारीक समाजशास्त्राचा एक भाग म्हटला म्हणजे संसारमंडनशास्त्र हा होय. गृहसंस्कार, चालीरीती, गृहव्यवस्था चित्रनृत्यादिकला हीं यांत येतात. भारतीयांचें संसारमंडनशास्त्र या भागांत थोडेंसें आलें आहे. प्राचीन वैभवाचा अंश तत्कालीन कलेच्या अवशेषांनीं परिचित होतो. प्राचीन भारतीय शिल्पशास्त्राची कल्पना देण्यासारखे दोन तीन लेख आपणांस या विभागांत आढळतील. अजंठ अमरावती चित्रसंप्रदायाची ओळख अजंठा व अमरावती या लेखांवरून होईल. तसेंच सीलोनच्या भारतीय कलेचें ज्ञान अनुराधपुर हा लेख करून देईल जैन शिल्पाची कल्पना येण्यास अबूवरील लेख उपयुक्त होईल, तर अमृतसरचें सुवर्णमंदिर शीखांच्या स्वराज्यांतील वैभवाची कल्पना करून देईल. अनुनयावरील लेख संसारमंडनशास्त्राचा एक निराळा विषय येथें आला आहे. या भारतीय संसारमंडनशास्त्राचा एक भाग अन्न या लेखांत व्यक्त होतो.

मानवेतिहास आणि वैचारिक इतिहास यांमध्यें अत्यंत निकट संबंध ज्या इतिहासांचा आहे अशांत पारमार्थिक इतिहास हें एक अंग आहे. या इतिहासाचा वाङ्मयेतिहासाशीं अत्यंत निकट संबंध आहे. अत्यंत प्राचीन अशा वैदिक कालापासून आजपर्यंत पारमा-

र्थिक विचारांत व उपासना संप्रदायांत जी प्रगति होत गेली व अनेक चळवळी होऊन जे भिन्न भिन्न संप्रदाय स्थापन झाले त्या घडामोडीचा कोणता अंश या विभागांत वाचकांच्या पुढें मांडला गेला आहे याचें थोडक्यांत पर्यालोचन करूं. संहिता वाङ्मयापैकीं अथर्ववेदावरील सामान्य विवेचन वेदविद्या या विभागांत आलें आहे व या विभागांत जो लेख आला आहे त्यांत मुख्यतः कौशिक व वैतान या विधिविषयक सूत्राच्या अनुरोधानें विवेचन केलें आहे. यामुळें अथर्ववेदाचा व्यवहारांत काय उपयोग होत असे व त्यास अनुसरून सूत्र वाङ्मयाची रचना कसकशी होत गेली हें सांगितलें आहे. वेदविद्या आणि गृह्य यांचा संबंध जो वेदविद्या परिशिष्टांत दाखविला आहे, त्याला पुरावा या लेखांत पुष्कळ सांपडेल. प्राचीन श्रौतधर्माच्या आठवणी ब्राह्मणवाङ्मयांतहि आहेत. यांत आलेल्या अजीगर्ताच्या चरित्रावरून ब्राह्मणकालीन हरिश्चंद्र राजाची कथा, व नरमेध यांची आठवण होईल. अग्नि, अग्निष्टोम, अत्यग्निष्टोम हे लेख आपणांस अग्निपूजेचें व यज्ञसंस्थांचें स्वरूप समजून घेण्यास मदत करतील. स्मार्त धर्मांपैकीं अघमर्षण या लेखावरून संध्या करणाऱ्यांच्या रोजच्या परिचयाच्या एका कृतीचें स्वरूप लक्षांत येईल व अनवलोभन या सूत्रोक्त संस्काराचे ज्ञानहि या विभागात होईल.

अदिति या श्रुत्युक्त व पौराणिक देवतेची, अप्सरा या देवयोनीची व अथर्वण या वेदशाखीय पुरोहित वर्गाची माहिती आपणांस उपयुक्त होईल. तसेंच अभिषेक या राजकीयदृष्ट्या अत्यंत महत्त्वाच्या अथर्व वेदांत दृष्ट झालेल्या व ब्राह्मणकालापासून चालत आलेल्या विधीचें ऐतिहासिक ज्ञानहि आपणांस या विभागांत होईल. षड्दर्शनांपैकीं उत्तरमीमांसा अथवा वेदांत यांचें बरेंचसें ज्ञान आपणास अद्वैत या लेखावरून होईल.

स्मृति अथवा धर्मशास्त्र यांचा संबंध या विभागांतील अन्नवस्त्र, अन्नूनुकसानी अपकृत्य व अर्कविवाह या सारख्या लेखांत आला आहे. पौराणिक धर्म यांत आला आहेच. तथापि अग्निपुराणावरील लेख पुराणधर्माचें विषदीकरण करावें या हेतूनें मांडला नाहीं. पौराणिक धर्माची तळी उचलून धरणारे हें पुराण प्रामुख्यानें नव्हे. तथापि पौराणिक वाङ्मयाचा अगदीं निराळ्या प्रकारचा मासला आपणांस अग्निपुराण या सविस्तर लेखांत पहावयास सांपडेल. व पुराण या नांवाखालीं सर्व उपलब्ध ज्ञानाचा संग्रह करून ठेवण्याची त्यावेळीं भारतखंडांत कशी पद्धति होती हें विशेषतः या लेखावरून व्यक्त होईल. तसेंच तत्कालीन सामाजीक जीवनक्रमाचें चित्रहि आपणांस यामध्यें पहावयास सांपडेल. पद्मपुराणांतर्गत अधिकमास महात्म हा लेख व अनंतव्रत हे उत्तरकालीन पुराणोक्त धर्माचा बोध करतील. अकृतव्रण, अजमीढ, अज, अनिरुद्ध, अभिमन्यु, अनु इत्यादि क्षत्रियांची, अगस्त्य, अत्रि, अणिमांडव्य इत्यादि ऋषींचीं व अघासुर, अतिकाय, अनुविंद इत्यादि दैत्यांचीं चरित्रें आपणांस कांहीं पौराणिक कथांच्या स्वरूपाचा व व्यक्तींचा परिचय करून देतील.

श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्मांशिवाय या परंपरेच्या दृष्टीनें पाखंडी संप्रदाय म्हणजे जैन व बौद्ध त्यांनाहि या भागानें उपेक्षिलें नाहीं,

अभयदेवसूरि, अमरप्रभसूरि, अमितगति, अमोघवर्ष यांसारख्या चरित्रलेखांवरून जैनसंप्रदायाकडे आपलें लक्ष वेधेल, तर अभिधम्मत्थसंगह इत्यादि ग्रंथांच्या माहितीवरून व अनुराधपूर व अमरावती यांसारख्या स्थलांच्या वर्णनावरून हीनयानी बौद्धग्रंथांची व अभिदान, अभिधर्मकोश, अमितायु यांसारख्या लेखांवरून महायानी बौद्ध पंथाची कांहींशी कल्पना येईल. अतीश याच्या चरित्रावरून एका बौद्ध धर्मप्रसारकाचा परिचय होईल.

भारताबाहेरचे प्राचीन उपासना संप्रदाय म्हणजे असुरीबाबीलोनी आणि इराणी होत. असुर हा एक शब्द बाबीलोनी, इराणी आणि वैदिक या तीनहि संस्कृतींत पवित्र झाला होता. तसेंच नागभीति, नागपूजा आणि नागशत्रुत्व याचें क्षेत्र प्राचीनं जगांत आयर्लंडपासून चीनपर्यंत म्हणजे बरेंच विस्तृत होतें. वरील गोष्टींची जाणीव हा वाचतांना येईल. अक्कड या गांवावरील लेख प्रसिद्ध असुर राजा सार्गन याची स्मृति जागृत करील. व अॅना या गांवावरून आपणांस बाबिलोनी साम्राज्याची आठवण होईल तर अॅक्रोटस हें गांव आपला ड्रेगन पूजकांशीं परिचय करून देईल.

अॅकिमिनियन घराणें, अनाहित देवता, व अमेशस्पेंत या लेखांवरून अवेस्ता धर्माचेंहि आपणांस बरेंच ज्ञान होईल. अॅकिलिस, अॅडोनीस, अॅमेझॉन वगैरे लेख ग्रीक पुराणकथांशीं व प्राचीन ग्रीक संप्रदायांशीं परिचय करून देतील; तर अॅकॅडमिक पंथ, अॅनॅक्सीगोरस, अॅनॅक्सीमँडर या लेखांवरून कांहीं ग्रीक तत्त्वज्ञान पंथांची आपणांस माहिती होईल.

असुरी बाबीलोनी संप्रदायांपासून सेमेटिक इतिहास कल्पना व विचारपद्धति विकसित झाली. सेमेटिक पद्धतीस येथें स्थान मिळालेंच आहे. अब्राहाम व अब्राहामाईट, अॅबट व अॅबेस हे लेख यहुदी व ख्रिस्ती मतांची चुणुक दाखवितील. अरबस्तान या लेखांत महंमदी संप्रदायाच्या स्थापनेसंबंधीं व प्राथमिक स्वरूपाविषयीं व अरबी तत्त्वज्ञानासंबंधीं माहिती पहावयास सांपडेल. तसेंच अफगाणिस्तान या लेखांत कांहीं मुसुलमान जातींचें वर्णन आढळेल. निराळ्या परिस्थितीचा परिणाम सुशिक्षित मुसुलमानावर कसा होतो यांवर विचार करणारांस अकबर व अबुल फजल यांच्या चरित्रांतील धर्मसुधारणेच्या चळवळीची हकीकत मनोरंजक वाटेल तर अगाखान या लेखांत महंमदाच्या अनुयायांत फूट पडून निरनिराळे पंथ कसे स्थापन झाले याचें एक उदाहरण दृष्टीस पडेल. अकाली या लेखांवरून हिंदुमुसुलमानांचें ऐक्य करूं पाहणाऱ्या नानकाच्या अनुयायांतील

एका प्रगत पंथाची माहिती होईल. अमृतसर या शहरावरील आणि अमरदास या शीख गुरूच्या चरित्रावरील लेखांनीं आपल्या शीखाविषयीच्या ज्ञानांत बरीच भर पडेल.

महाराष्ट्राचें हिंदुस्थानच्या राजकीय इतिहासामध्यें जसें महत्त्वाचें स्थान आहे तसेंच धार्मिक इतिहासांतहि आहे शीख पंथाचा संस्थापक नानक आणि कबीर हे रामानंदाचे शिष्य होते आणि त्या रामानंदाचा संस्कार येथील भक्तिमार्गावर ही झाला होता. शीखांच्या एका पंथाची माहिती आली आहे तशी महाराष्ट्रीयांच्या भक्तिसंप्रदायाचीहि आहे. आणि मागें उल्लेखिलेले मराठी ग्रंथकार बरेचसे या संप्रदायांतील आहेत या भागवत संप्रदायाबाहेरहि महाराष्ट्रांत कांहीं पुरुष दिसतात अशांपैकीं अक्कलकोटचे स्वामी होत त्यांचा अल्पचरित्रलेख येथें आला आहे.

येणेंप्रमाणें अनेक दृष्टींनीं पहातां अक्षरानुक्रमाच्या मांडणीचा हा पहिला विभाग बराच अनेकांगी आहे असें वाटल्याशिवाय रहात नाहीं.

हें पृथक्करण वाचणारांना अनेक ज्ञानक्षेत्रांचा अन्योन्याश्रय वाचकांच्या सहज लक्षांत येईल. केवळ ज्ञानाची दृष्टि बाजूस ठेऊन मनोरंजकतेच्या दृष्टीनेंच या विभागाकडे लक्ष दिल्यास हा भाग उपेक्षणीय नाहीं हेंहि वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून रहाणार नाहीं.

**रसायनशास्त्रीय संज्ञांचा परिचय**—येथें रसायनशास्त्रीय लेखांत येणाऱ्या सर्व संज्ञा दिल्या नाहींत. ज्या वस्तूंचा किंवा क्रियांचा वापरलेल्या शब्दांनीं सहज बोध होतो त्या शब्दांचें स्पष्टीकरण येथें केलें नाहीं. तसेंच अन्यशास्त्रांत ज्या संज्ञांचा विषय प्राधान्यें करून अंतर्भूत होतो त्या संज्ञांचेंहि स्पष्टीकरण येथें केलें नाहीं.

रासायनिक संज्ञांच्या पृथक्करणासाठीं त्यांचें एक सोपेसें वर्गीकरण करूं. पहिला वर्ग रासायनिक मूलद्रव्यांच्या वाचक शब्दांचा. दुसरा एक वर्ग रासायनिक आणि पादार्थिक क्रियांच्या बोधक शब्दांचा, तिसरा एक वर्ग महत्त्वाच्या रासायनिक द्रव्यांचा, चवथा एक महत्त्वाचा वर्ग म्हणजे प्रायोगिक यंत्रोपकरणांचा. या निरनिराळ्या वर्गांतील संज्ञा स्पष्ट केल्या म्हणजे रासायनिक लेख समजण्यास अडचण मुळींच पडणार नाहीं. रासायनिक मूलद्रव्यांसाठीं जीं निरनिराळीं नांवें निरनिराळ्या संज्ञाकारांनीं वापरलीं आहेत, त्यांचें एक तौलनिक कोष्टक पुढें दिलें आहे आणि त्यांत आम्ही ठरविलेल्या संज्ञाहि दिल्या आहेत. या संज्ञा करतांनां होतां होईतों नवी संज्ञा पाडावयाची नाहीं, तर जुन्या प्रयत्नांतूनच उचल करावयाची व एका वस्तुस एकच संज्ञा हें तत्त्व पाळावयाचें योजून संज्ञारचना केली आहे, हें त्या कोष्टकावरून दिसून येईल.

रासायनिक लेखांतील दुसऱ्या महत्त्वाच्या संज्ञा म्हणजे क्रियासूचक व क्रियादर्शक होत. त्या कोणत्या पाश्चात्य शब्दासाठीं वापरल्या आहेत तें शेजारीं पाश्चात्य शब्द कंसांत मांडून स्पष्ट केलें आहे. अभिसरण (डिफ्यूजन) उत्पातन किंवा ऊर्ध्वपातन ( डेस्टिलेशन ); उज्जिदीकरण ( रिडक्शन ), उदकप्रक्रिया ( हायड्रोलिटिक डिससोसिएशन ); सोज्जीकारक ( रिड्यूसिंग एजंट ) केशाकर्षण ( कॅपिलरी ॲक्शन ); घनीकरण ( कन्डेन्सेशन ); ध्रुवीभवन ( पोलरायझेशन ) प्रापण ( कन्व्हेक्शन ), वक्रीभवनत्व ( रिफ्रॅक्टिव्हिटि ), विद्रावण ( सोल्यूशन ), विपाकक्रिया ( फर्मेंटेशन ) विद्युत्विश्लेषण ( इलेक्ट्रोलिसिस् ), वैद्युदण्वीभवन ( अयानिझेशन ); शुष्कपातन ( ड्राय डेस्टिलेशन ); संसक्ति ( कोहिजन ); हे शब्द रसायनशास्त्र व पदार्थविज्ञानशास्त्र यांतील स्थित्यंतरसूचक होत.

तशाच प्रकारचे म्हणजे पदार्थांव्यतिरिक्त, पण स्थितिसूचक किंवा स्थित्यंतरसूचक शब्द पण चालू क्रिया न दर्शविणारे शब्द म्हटले म्हणजे उत्क्वथनांक ( बॉयलिंग पाईंट; ) गुणक ( इंडेक्स उदा. वक्रीभवनाचा ); द्विपाशबद्ध ( डबली लिंक्ड ); प्रमाण ( नॉर्मल ); बीजगर्भ ( न्यूक्लिअस ); रसांक (मेलटिंग पाईंट ); शेष ( रिसिड्यू ); संपृक्त ( सॅच्युरेटेड ); स्थित्यंतरक उष्णमान ( क्रिटिकल टेंपरेचर ); स्थित्यंतरक भार ( क्रिटिकल प्रेशर ); स्फटिक ( क्रिस्टल ); हे होत.

रासायनिक संज्ञापरिचयासाठीं उपसर्गप्रत्ययपद्धति मांडणें अवश्य आहे. पुष्कळदां प्रत्यय शब्दसंक्षेपमूलक असतात हें भाषाशास्त्रांतील तत्त्व रासायनिक परिभाषाघटनेंत वापरावें लागतें असें दिसेल. जेव्हां इंग्रजींतील प्रत्ययसदृश संस्कृत प्रत्यय सांपडेल तेव्हां तो पसंत करून त्याच अर्थानें वापरला आहे. असिडांच्या दर्शक शब्दांत जे प्रत्यय व उपसर्ग इंग्रजींत येतात त्यांनां मराठींत सदृशप्रत्यय व उपसर्ग कोणते वापरले आहेत हें अम्लशास्त्र या लेखांत सकारण दिलें आहे व येथेंहि शेवटीं ते उद्धृत केले आहेत.

मूलद्रव्यांच्या संज्ञा स्पष्ट करण्यासाठीं जें पुढें कोष्टक दिलें आहे, त्यांत असें दिसून येईल कीं हिंदी वैज्ञानिक कोष, प्रो. साठे, व रानडे व सयाजी वैज्ञानिक कोश या चौघांच्या संज्ञा पद्धतींत बरेंच सादृश्य आहे. यासाठीं होतां होईतों या चौघांच्या संज्ञापद्धतीशीं सदृश अशी संज्ञापद्धति निश्चित केली आहे. संज्ञापद्धति ठरवितांनां पद्धतीच्या आंतील सुसंगति हें एकच ध्येय बाळगावयाचें नसतें. तर पद्धतीच्या सार्वत्रिक होण्याच्या शक्यतेकडेहि पहावें लागतें. शास्त्राच्या विकासासाठीं आणि त्याचें ज्ञान सार्वत्रिक होण्यासाठीं भारतीय निरनिराळ्या भाषांत जर एकच शास्त्रीय संज्ञापद्धति वापरली जाईल तर तें चांगलें. हें ध्येय नेहमीच साध्य होतें असें नाहीं कारण वैयक्तिक शास्त्रलेखन प्रयत्नांत भारतांतील इतर भाषांच्या शब्दसंग्रहाशीं सुसंगति पहाण्यास अवकाश नसतो, पण यासाठीं प्रयत्न मात्र पाहिजे.

पणें करावे असें त्यानें प्रसिद्ध केलें. तथापि त्या धर्माची दीक्षा त्यानें घेतली नाहीं.

सर्व धर्मांतून चांगल्या गोष्टी निवडून घेऊन अकबरानें एक नवीन धर्म स्थापिला. त्याचें नांव त्यानें 'दीने इलाही' असें ठेविलें; व तो स्वतः त्या धर्माचा पैगंबर झाला. सृष्टींतील चमत्कार पाहून जें सृष्टिकर्त्या परमेश्वराचें ज्ञान होतें त्याजवर या धर्माचा पाया असून, सर्व प्रसिद्ध धर्मांतील चांगल्या चांगल्या तत्त्वांचा यांत समावेश केलेला होता. अशा प्रकारें अकबरानें मुसलमानी धर्म सोडून दिला. दरबारांतील मुसलमानी सण त्यानें बंद केले. त्यानें अनेक मशिदी मोडून तेथें घोड्याचे तबेले बांधिले, आणि जातिभेद व धर्मभेद मोडून टाकण्याचा प्रयत्न केला. आपण ईश्वरी अंश आहोंत असें समजून लोकांनीं आपणांस भजावें अशी त्याची इच्छा होती. त्यानें सौर वर्ष सुरू केलें. हिंदूंच्या धर्मसमजुतीस मान देण्याकरितां त्यानें गोमांस खाण्याची बंदी केली. हिंदूलोकांप्रमाणें तो आपल्या वाढदिवशीं आपली तुळा करूं लागला, तर उलट पारशी लोकांप्रमाणें तो सूर्याची उपासना करी, व नवीन अग्नि तयार करून तो त्याची पूजा करी. लोकांस चमत्कार दाखविण्याची त्याला आवड होती; रोग बरे होण्यासाठीं तो रोग्यांस आपल्या पायांचें तीर्थ देई. मुलें होण्यासाठीं कित्येक बायका त्यास नवस करीत. त्याचें दर्शन घेण्यासाठीं सकाळीं अनेक लोक येत.

सर्व जातींच्या लोकांस एकछत्री अंमलाखालीं आणावयाचें हा त्याचा मुख्य उद्देश होता. राज्यांत एकी राहण्यास मुसलमानी धर्म त्यास सोइस्कर वाटला नाहीं. राजा हा ईश्वरी अंश आहे ही अबुल फज्लची कल्पना अकबरानें घेतली. अकबर स्वतः या नवीन धर्माची दीक्षा देत असे. जो कोणी दीक्षा घेण्यास येई त्यास बादशहा कांहीं खूण देई. तींत 'अल्ला हो अकबर' हीं अक्षरें लिहिलेलीं असत. अकबर या शब्दाचे दोन अर्थ (अकबर म्हणजे थोर व अकबर हें बादशहाचें नांव) असल्यामुळें वरील वाक्याचे ईश्वर हा थोर आहे व अकबर हाच ईश्वर आहे असे दोनहि अर्थ होऊं शकतात.

तथापि, या नवीन धर्माबद्दल त्यानें हेकेखोरपणा धरिला नाहीं. राज्याचा उत्कर्ष व्हावा हाच त्याचा मुख्य हेतु असल्यामुळें, स्वसंस्थापित धर्माच्या अभिमानाचें विवेकबुद्धीस गुंग करणारें प्रखर वारें त्याच्या अंगांत शिरलें नाहीं; शिवाय, अकबरानें स्वधर्म प्रस्थापनार्थ खऱ्या धर्मसंस्थापकासारखा निष्ठापूर्ण उद्योग मुळींच केलेला दिसत नाहीं. खरी धर्मस्थापना करण्यास तो लायकच नव्हता असें म्हटलें तरी चालेल. तो मुत्सद्दी होता, व इहलोकचे व्यवहार सुरळीत चालावे म्हणून त्यानें ही सर्व खटपट चालविली होती. त्याच्या धर्मसुधारणा कितीहि योग्यतेच्या असल्या, तरी त्या जर कोठें सुरळीत राज्यकारभाराच्या आड येण्यासारख्या दिसल्या, तर त्यांचा तो स्वीकार करीत नसे. धर्माच्या नांवाखालीं त्यानें कोणावरहि जुलूम केला नाहीं. प्रत्येक धर्मात कांहीं तथ्य आहे अशी त्याची खात्री होती. त्याची बुद्धि कोणत्याहि विषयाचा स्वतंत्र विचार करण्यास समर्थ असून आग्रही नव्हती. आरंभीं इस्लामावर त्याची दृढ निष्ठा होती परंतु त्याचें ज्ञान वाढत गेलें तशी सर्व धर्मांबद्दल त्याच्या मनांत समता उत्पन्न झाली. दुसऱ्या धर्मानें हजारों लोक पवित्रपणें व नीतीनें वागणारे त्यास आढळल्यामुळें, धर्माचा व नीतीचा कांहींएक संबंध नाहीं असें त्यास वाटूं लागलें. वास्तविक धर्माच्या बाबतींत अकबरानें कांहींएक न करतां, पहिलें असलेलें मात्र मोडिलें. मुसलमानी धर्म बरा नाहीं म्हणून तो मोडण्याची त्यानें खटपट केली, पण नवीन धर्म स्थापण्याचें काम त्यानें साधलें नाहीं. त्याचा नवीन धर्म एकानेंहि मनापासून न स्वीकारिल्यामुळें तो त्याच्याबरोबरच समाप्त झाला. राज्यव्यवस्थेच्या बाबतींत आपल्या नवीन धर्माचा अडथळा येतो, असें दिसतांच त्याचा वेग स्वतः त्यानें देखील कमी केला होता. (लेन पूल, व सरदेसाई यांच्या ग्रंथाधारें.)

**अकबरपुर**—तहशील. संयुक्त प्रांत. कानपुर जिल्ह्यांतील एक तहशील. उ. अ. २६° १५' ते २६° ३३' पू. रे. ७९° ५१' ते ८०° ११' क्षेत्रफळ २४५ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें एक लक्ष आठ हजार. या तहशिलींत १९९ खेडीं, व अकबरपुर हा एक सुमारें पांच हजार लोकवस्तीचा गांव आहे. एकंदर उत्पन्न इ. स. १९०३–४ सालीं २५१००० रुपये होते. या तहशिलांत क्षार आल्यामुळें लागवडीस निकामी झालेली जमीन बरीच आहे. लोअर गँजेस कनालच्या एका फाट्याचें पाणी या तहशिलीस मिळतें. [इं. गॅ. ५. १९०८].

**अकबरपुर**—तहशिल. संयुक्त प्रांत. फैझाबाद जिल्ह्यांतील तहशील. उ. अ. २६° १५' ते २६° ३५' पू. रे. ८२° १३' ते ८२° ५४ क्षेत्रफळ ५३७ चौरस मैल. लोक संख्या सुमारें तीन लक्ष पंचेचाळीस हजार. हींत अकबरपुर, मझारा आणि सुरहुरपुर असे तीन परगणे आहेत. हींत तीन मोठीं गांवें व ८५४ खेडीं आहेत.

एकंदर उत्पन्न ५२४०००, जमिनीचें उत्पन्न ४५१०००, कराचें उत्पन्न ७३०००. हींत दलदली व क्षार आलेली जमीन पुष्कळ आहे. या तालुक्याचें मुख्य ठिकाण अकबरपुर हें आहे.

**अकबरपूर गांव**—उ. अ. २६. २६ पू. रे. ८२. ३२ फैझाबाद जिल्ह्यांतील तालुक्याचें गांव हें औध रोहिलखंड रेलवेचें स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें साडेसात हजार. गांवांत एका किल्ल्याचे अवशेष असून आंत एक प्रेक्षणीय मशिद आहे. नदीवर एक मोठा पूल बांधलेला आहे. दोन्ही कामें अकबराच्या कारकीर्दींत कोणी मोहसीन खान यानें केलीं आहेत. धान्याचा व कातड्याचा व्यापार येथें बराच चालतो. [इं. गॅ. ५.] या गांवाचा मराठ्यांच्या इतिहासाशीं संबंध राघोबादादा यांच्या उत्तरेकडील मोहिमेंत व तीपूर्वीच्या राजकारणांत येतो. अकबरपूर वगैरे ठिकाणचे जमीनदार गडबड बळकावून बसले, व नबाबास सामील झाले. त्यांनीं पुन्हा गडबड खालीं करून मराठे सरकारकडे रुजू व्हावें म्हणून प्रयत्न मल्हारजी

होळकरामार्फत करण्यांत आला. ( राजवाडे खं० ६. पृ. १६६, २७२ ). या प्रयत्नाचा परिणाम निश्चितपणें ठाऊक नाहीं. १७५७ सालीं आक्टोबर महिन्यांत राघोबादादास दिल्लीहून कूच करून अकबरपुरापर्यंत ससैन्य जावें लागलें होतें हें खरें ( राजवाडे खं. १. पृ. १००, १७५ ).

**अकबराबाद**—अंतर्वेदींतील एक महाल. पूर्वी हा एक सुभा म्हणून समजला जात असे. अकबराबादेची सुभेदारी मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे यांच्यामार्फत दिल्लीचा पातशहा आणि मराठे यांमध्यें झालेल्या करारनाम्यांत मराठ्यांस मिळाली. ( रा. खं. १.१-४ ).

१६७१ शकांत अकबराबाद वगैरे प्रांतांची सुभेदारी व फौजदारी शिंदेहोळकर यांकडे दिल्याचा बाळाजी बाजीरावाबरोबर करार झाला. ( रा. खं. ६. २००.३०० ). व पुढें शिंदे होळकरांनीं तेथील कमावीसदार नेमले. १६७३ ज्येष्ठ.-शिंदेहोळकरांनीं अकबराबाद वगैरे अंतरवेदींतील दहा महाल दामोदर महादेव व पुरुषोत्तम महादेव यांस कमाविशीस दिले. ( रा. खं. ६-२२६-३२३ ).

यानंतर मराठी दप्तरांतील या स्थलविषयींचे उल्लेख येणें प्रमाणेः—महाराजा चेतसिंहानें फा॥ व॥ ६ शके १७१८ रोजीं दौलतराव शिंद्याला धाडलेल्या पत्रांत "इन दिनौंमो फौज सरकारकी दतीआसें अकबराबादको गई." असा मजकुर आहे. ( रा. खं. १०.४४२.३५६ ). किल्ले अकबराबाद राजश्री जगन्नाथराम याचे स्वाधीन केला आहे असा मजकूर शके १७१८ च्या एका पत्रांत सांपडतो. ( रा. खं. १०, ४६४,३७० ).

**अकंपन**—१., कोणी एक राजर्षि, हा कोणत्या कालीं, व कोणत्या कुलांत जन्मला, तें कांहीं आढळत नाहीं. याला, परम पराक्रमी हरि हा नामेंकरून एकच पुत्र होता, तो एका युद्धांत मरण पावला असतां, यास परम दुःख होऊन, हा शोक करीत आहे तों, तेथें नारद ऋषि प्राप्त झाले, व त्यांनीं, मृत्यु अनिवार्य आहे, या विषयींची मूळ कथा सांगून, याचें समाधान केलें. ( भार० द्रोण० अ० ५२-५४. )

२. रावणदूत एक राक्षस. जनस्थानीं, खरादिक राक्षसांचा वध रामचंद्रानें केला, तें वृत्त प्रथमतः रावणास यानें कळविलें होतें. शूर्पणखेनें मागून कळविलें. ( वा० रा० अर० स० ३१. ) रामरावणयुद्धांत हा असून, पुढें मारुतीच्या हातून मरण पावला. ( वा० रा० युद्ध० स. ५६ ).

**अकरमासे**—( महाराष्ट्रीय ) अकरमासे म्हणजे जे पूर्ण बारामासे नाहींत ते, म्हणजे ज्यांत कांहीं तरी कमीपणा असलेले. आज हा शब्द कोणच्याही तऱ्हेच्या ब्राह्मणेतरांपासून झालेल्या अधर्मसंततीस लावतात. पूर्वी श्रीमान मराठे लोक आपल्या जावयांना लग्नप्रसंगीं, एकादी सुंदर स्त्री नजर करीत असत. अशा स्त्रीपासून झालेल्या संततीला 'अकरमासे' असें म्हणतात. ही जात ठाणें जिल्ह्यांत व कांहींशी पश्चिम खानदेशांत आढळते. इतर जिल्ह्यांत यांची वेगळी जात आढळत नाहीं. यांना "कडू" व औरससंततीला "गोड" अशी संज्ञा आहे. शिंदळे, लेकावळे वगैरेहि म्हणतात. पूर्वी यांचा दर्जा अगदीं कनिष्ठ प्रतीचा असल्यामुळें यांना गुलामांप्रमाणें राबावें लागे. यांच्यांतहि दोन वर्ग आहेत. एक अस्सल व दुसरा कमअस्सल. मराठा स्त्रीला ब्राह्मण किंवा मराठा पुरुषापासून झालेली संतति अस्सल; व खालच्या दर्जाच्या यजमानापासून झालेली कम अस्सल. [मुं. गॅ. ठाणें १३ पृ. १४२] सध्या यांचा व्यवसाय दुकानदारी, शेतकी, सुतारकी, लोहारी वगैरे असतो. हे मराठी बोलतात. रहाणी स्वच्छ असते परन्तु स्वभावतःआळशी असून डामडौली असतात.हे मद्य व मांस सेवितात. पेहेराव बहुतेक मराठीथाटणीचा असतो. हे स्मार्त किंवा भागवतपंथी असून ब्राह्मण उपाध्यायांना पूज्य मानतात. व्रतें उपोषणें पाळतात. जातिसभा तंट्यांचा निवाडा करते. सांपत्तिकदृष्ट्या यांची स्थिति खालावलेली आहे. मुलांना शिक्षण देत नाहींत. विधवाविवाह संमत आहे. मृतांना जाळतात किंवा पुरतात. ( "अधर्म संतति" पहा )

**अकराणि (किल्ला)**—मुंबई इलाखा पश्चिम खानदेश तळोदे तालुक्यांतील अकराणि परगण्यामध्यें एक किल्ला आहे. हा निसर्गतःच मजबुत आहे पण भिंती वगैरे सर्व पडून गेल्या आहेत. ( मुं. गॅ. १२. गव्हर्नमेंट लिस्ट ऑफ सिव्हिल फोर्ट्स १८६२ ).

**अकराणि**—( परगणा )— हा परगणा म्हणजे पश्चिम खानदेशांत तापी व नर्मदा या नद्यांमधील सातपुडा पर्वताचा पठार प्रदेश होय. याच्या उत्तरेस नर्मदानदी, पूर्वेस बारवानी संस्थान व तुरणमाल, दक्षिणेस सुलतानपूर व कुकरमुंड तालुके, व पश्चिमेस काठी संस्थान आहे. १८७२ मध्यें येथील लोकसंख्या सुमारें १५ हजार होती व सुपीक जमीन सुमारें पंधरा हजार एकर आहे. या प्रदेशांत १७२ गांवें असून त्यांपैकीं सतरा ओसाड आहेत. या परगण्याचा सर्व प्रदेश डोंगराळ असून १६०० ते २५०० फूट उंचीवर आहे. यांतील कांहीं गांव चांगले श्रीमंत असून जीवंत झऱ्यांच्या पाण्याचा पुरवठा पुष्कळ आहे. मका व इतर धान्यांचीं पिकें चांगलीं होतात. विशेष उंच असलेल्या प्रदेशांत दाट जंगल असून त्यांतून जळाऊ लांकडाचा पुरवठा पुष्कळ होतो व शिवाय त्या जंगलांत अनेक प्रकारच्या औषधी व तसेंच रंग तयार करण्यास उपयोगी अशा वनस्पती सांपडतात. येथील सृष्टिसौंदर्यहि विविध व उठावदार आहे. बहुतेक गांवांभोंवतीं आंब्याच्या व मोहाच्या झाडांची दाट झाडी आहे. नदोकांठचा प्रदेश नेहमी हिरवाळ असतो व मधूनमधून शिंदीचीं वगैरे झाडें आहेत.

या डोंगराळ प्रदेशांतला तुरणमाळ हा सर्वांत महत्त्वाचा डोंगर आहे. तो पूर्वेच्या बाजूला ४०० फुट उंच आहे. त्याशिवाय कोमल, उदद, अष्टंभ वगैरे डोंगर आहेत. या प्रदेशांतील दगडांत रुपें, तांबें व लोखंड या धातूंचे रज आढळतात.

या प्रदेशांत पाण्याचा पुरवठा भरपूर आहे. विहीरी, नद्या व जिवंत ओढे यांनां उन्हाळ्यांतहि पाणी असतें. पण कांहीं ठिकाणचें पाणी दोषी हिंवताप उत्पन्न करणारें आहे. येथील जमीन बरीच खडकाळ असल्यामुळें गहुं, हरभरा वगैरे धान्यें होत नाहींत. हा प्रदेश उंच असल्यामुळें येथील हवा सौम्य असते हिवाळ्यांत मात्र थंडी कडक पडून कधींकधीं विहिरीओढ्यांचे पाणी गोठतें. पावसाळ्यांत पाऊसहि खूप पडतो. येथील लोक मेहनती व उद्योगी असून लोकसंख्या वाढती आहे. येथें मुख्यतः वारली व पावरा जातीचे लोक असून त्यांपैकीं पावरा ही जात रजपूतवंशीय असावी. ह्या जातीचे लोक शेतकीच्या कामांत वारली वगैरे भिल्ल जातींपेक्षां अधिक कुशल आहेत. ते जरा बुजरे असले तरी थोड्या परिचयानेंच मोठ्या बोलक्या व आनंदी वृत्तीनें वागूं लागतात. तसेंच ते मोठे प्रामाणिक असतात. सर्व लोक शेती करतात व पुष्कळसे गायम्हशींचे कळपहि पाळतात; बकरीं कोंबडीं व बदकेंहि पाळतात. मेंढ्या व डुकरें कोणी पाळीत नाहीं. बाजरी, ज्वारी व नागली हीं मुख्य पीकें होतात.

खानदेशांतून अकराणी परगण्यांत जाण्यास पांच घाटमार्ग आहेत. त्यांपैकीं शाहाद्याकडून गेल्यावर लागणारा नवागांव घाटरस्ता बैल घोडे वगैरे जाण्यासारखा सोपा आहे. बाकीचे केवळ पायरस्ते आहेत, व एक दोन फारच अवघड मार्ग आहेत. अकराणी परगण्यांतून धान्य, मोहाचीं फुलें, मध, मधमाशांचें मेण, लाख, डीक व राळ या पदार्थांची निर्गत पुष्कळ होते.

या परगण्याचा इतिहास फारसा उपलब्ध नाहीं. धडगांवपर्यंतचा मुलूख खानदेश येथील मुसलमानी राजांच्या ताब्यांत होता. त्याच्या उत्तरेकडील नर्मदा नदीपर्यंतचा प्रदेश या डोंगराळ मुलुखांतल्या स्थानिक अधिपतींच्याच ताब्यांत असे. १७०० नंतर हा प्रदेश धुशवई येथील राण्यांचा ताब्यांत गेला. त्यापैकीं राणा गुमानसिंग यानें अकराणी किल्ला बांधला. चार कारकिर्दीनंतर या घराण्याचा निर्वंश होऊन या मुलुखांत बेबंदशाही माजली. नंतर मतवारचा राणा भाऊसिंग यानें या परगण्यावर राज्य स्थापलें व रोशमल किल्ला ( हल्लीं पडला आहे ) बांधला. या घराण्यानें १८१८ पर्यंत राज्य केल्यानंतर ब्रिटिश सरकारनें त्या घराण्याला रु. २८६८ पेनशन ठरवून सर्व मुलुख खालसा केला. तथापि या राजघराण्याचा मान मोठा असून त्याचा बडोद्याचे गायकवाड व छोटा उदेपूरचे राणे यांच्याशीं शरीर संबंध झालेले आहेत.

**अकलुज**—हें मुंबई इलाख्यांत सोलापूर जिल्ह्यांत माळशिरसच्या ईशान्येस ६ मैलांवर नीरा नदीच्या कांठीं एक मोठें बाजाराचें गांव आहे. लोकसंख्या सुमारें पांच हजार. पूर्वी येथें कापसाचा फार मोठा व्यापार चालत असल्यामुळें हें गांव फार भरभराटींत होतें. येथें एक पडका किल्ला आहे. येथें पोष्ट आफिस आहे. सोमवारीं बाजार भरतो. इ. स. १६८९ सालीं औरंगजेबानें विजापुरास प्लेगाचा उपद्रव झाल्यामुळें या ठिकाणीं आपला तळ दिला होता व येथें रोगाची सांथ हटली होती. ( ग्रांट डफ. ) कॅप्टन मूर यानें १७९२ मध्यें येथील बाजार मोठा असून येथें एक किल्ला व कांहीं सुंदर इमारती व विहिरी आहेत असें वर्णन केलें आहे. इ. स. १८०३ मध्यें जनरल वेलस्ली हा श्रीरंगपट्टणाहून पुण्याकडे दुसऱ्या बाजीरावास पुन्हा गादीवर बसवून देण्याकरितां जात असतां येथें तीन दिवस मुक्काम करून राहिला होता.

**अका ( टेंकड्या )**—पूर्व बंगाल आणि आसाम. दरंग जिल्ह्याच्या उत्तरेकडील हिमालय पर्वताचा एक भाग. या भागांत जंगल फार आहे. येथें रानटी लोकांची वस्ती असल्यामुळें या भागाचा फारसा शोध लागला नाहीं. अका नांवाच्या जातीचे दोन भाग आहेत. १ हजारी खोआ व २ कपास चोर. आसामच्या राजांच्या कारकीर्दीत हे रयतेला फार त्रास देत असत. अजून देखील ते रयतेस थोडा फार त्रास देतातच. हे तिबेटोब्रम्ही रक्ताचे असून लढवय्ये व स्वतंत्र वृत्तीचे आहेत. त्यांच्या राहण्याची जागा अति सुरक्षित असल्यामुळें त्यांस ब्रिटिश रयतेस त्रास देण्यास फावतें. यांच्यावर स्वारी करण्याचा जो खर्च येईल व त्यामुळें जो रयतेचा फायदा होईल त्यांत फार अंतर असल्यामुळें त्यांच्यावर ब्रिटिश सरकार स्वारी करीत नाहीं.

**अका जात** या जातीचे लोक तेझपूरचे उत्तरेकडील डोंगराळ प्रदेशांत राहत असून त्यांची एक लहान पण स्वतंत्र राष्ट्र जाति बनली आहे. ह्या लोकांचा डाफ्ला मिरिस व अबोर लोकांशीं फार जवळचा व निकट संबंध असावा असें कर्नल डाल्टन यांचें मत आहे; परंतु त्या लोकांपेक्षां अका जातीचे लोक दिसण्यांत फार भिन्न दिसतात. ( इं. गॅ. ५ खानेसुमारी )

**अका कांग्वा**—दक्षिण अमेरिकेंतील चिली देशांत एक प्रांत आहे. हा फार डोंगराळ आहे. येथील हवा फार उष्ण व कोरडी आहे. येथें द्राक्षें फार चांगलीं होतात. याच नांवाचा ज्वालामुखी पर्वत व नदीहि येथें आहेत. या प्रांताची लोकसंख्या सुमारें बाराहजार आहे.

**अकाडीया**--मुंबई इलाखा काठेवाडांतील बाब्र ठाण्यांतील एक स्वतंत्र खंडणी देणारें संस्थान. बाब्राच्या ईशान्येस सुमारें २० मैलांवर व भाडली पासून उत्तरेस चार मैल, केरी नदीच्या उत्तरतीराला हें वसलेलें आहे. येथील गरासिया जमीनदार बावड रजपुत वंशाचे असून या द्वीपकल्पांत हेंच एक त्यांचें स्वतंत्र ठिकाण आहे. (इं. गॅ. ५; मुं. गॅ. ८ ) बां. गॅ. ८,३५६. )

**अकाडी**—उत्तर अमेरिकेंतील ४० ते ४६ अक्षांसांत असलेल्या फ्रेंच वसाहतीचें नांव. या वसाहतीस १६०३ मध्यें मिळालें. यासच नोव्हा स्कॉशिया असें म्हणतात.

**अकापुलको**—अकापुलको हें शहर मेक्झिको देशांत ग्युटो संस्थानांत पॅसिफिक महासागराचे किनाऱ्यावर आहे. हें

एका अर्धवर्तुलाकृति उपसागरावर आहे. हें या महासागराचें किनाऱ्यावरचें सर्वांत उत्तम बंदर होय. याच्या भोंवतींचें सृष्टिसौंदर्यही फार प्रेक्षणीय आहे. समुद्रावरील थंड हवा आंत येण्याकरतां याच्या जवळच्या पर्वतांत एक बोगदा खोदला आहे.

**अकालगड**—पंजाब. गुजराणवाला जिल्हा. वझिराबाद तहशिल. नॉर्थ-वेस्टर्न रेलवेच्या वझिराबाद-लायलपूर लाईनवर हें सुमारें पांच हजार लोकवस्तीचें एक गांव आहे. उ. अ. ३२. १६ पू. रे. ७३. ५०. इ. स. १८६७ सालापासून येथें म्युनिसिपालिटी असून तिचें उत्पन्न सरासरी सहा सात हजार असतें. या गांवास व्यापारी महत्त्व मुळींच नाहीं. शीख अमलाच्या अखेरीस सावनमल आणि त्याचा पुत्र मूळराज हे मुलतानचे सुभेदार होते. त्यांच्या घराण्यांतील लोक येथें अद्यापि राहतात. ( इं. गॅ. ५. )

**अकालॅरेन्शिआ**—हिच्या संबंधी रोमन लोकांत अशी एक दंतकथा आहे कीं, ही फास्ट्युलस या धनगराची बायको होती. या धनगरानें, रोमशहराचे आद्यसंस्थापक रोम्युलस व रीमस हे टायबर नदींत वहात जात असतांना त्यांस वर काढून त्यांचा जीव वांचविला. त्यानें ह्या मुलांस आपल्या बायकोच्या स्वाधीन केलें व तिनें त्यांचें आपल्या मुलांबरोबर संगोपन केलें. ही बाई वाईट चालीची होती म्हणून तीस "लांडगी" असें म्हणत असत, व तिनें रोम्युलस व रीमस यांचें संगोपन केलें यावरूनच या दोघा मुलांस लांडगीनें वाढविलें अशी दंतकथा लोकांत प्रसिद्ध आहे. दुसऱ्या एका दंतकथेप्रमाणें हें एका सुंदर मुलीचें नांव आहे. ही मुलगी हर्क्युलीसनें द्यूतांत जिंकून मिळविली. ह्या मुलीनें आपल्या जवळची सर्व संपत्ति रोमन लोकांस दिली म्हणून त्या लोकांनीं हिच्या नांवानें वार्षिक उत्सव करण्याचा क्रम सुरू केला. कांहींच्या मतें ही भूदेवीची माता होती.

**अकाली**—हा पंथ इतर शीखपंथांहून वेगळा आहे. नाग किंवा गोसावी लोकांप्रमाणें अकाली संग्रामोत्सुक असतात. शीखांचा दहावा व शेवटचा गुरु गुरुगोविंद ( १६७५-१७०८ ) यानें हा पंथ स्थापिला असें सांगतात. " अकाली-पुरुष " ( अनंताचे उपासक ) या नांवापासून " अकाली " ( अमर ) या संज्ञेची कोणी उत्पत्ति लावितात; दुसरे कोणी " अकाल "=अमर, देव, या अर्थापासून अकाली म्हणजे ईश्वरोपासक असें समजतात. " सत श्री अकाल " हा अकाल्यांचा रणगर्जनेचा शब्द होय. अकाली निळा पोशाख वापरतात. ( कृष्णाचा वडील भाऊ बळराम निळा पोशाख वापरी म्हणून त्याला नीलांबर असें नांव आहे ). हातांत पोलादी कांकणें घालतात व बारीक खंजीर चाकू, एक लोखंडी साखळी आणि पोलादी चक्रें आपल्या उंच निमुळत्या निळ्या रंगाच्या पागोट्यांत खोवितात. कांहीं थोडे अकाली जटा वाढवितात. जे जटा वाढवीत नाहींत ते फक्त 'दूर' आणि ' लोटा ' पाणी वापरतात; ते धूम्रपान करितात. पण जटाधारी तसें करीत नाहींत. कांहींजण निळ्या फेट्याखालीं पिवळा फेटा बांधितात.

संग्रामसामर्थ्यावरून अकाल्यांना 'निहंग' म्हणजे बेफिकीर असें म्हणतात. शीख इतिहासांत यांनीं बरीच कामगिरी बजावली आहे. इ. स. १८१८ तील मुलतानच्या वेढ्यांत त्यांनीं अचानक रीतीनें बाह्य तट घेऊन किल्ला सर करण्याच्या बेतांत आणिला होता. फुलासिंगच्या चरित्रावरून यांचे गुणदोष चांगले समजतील. १८०९ मध्यें जेव्हां अमृतसर येथें मेटकाफवर छापा पडला त्यावेळीं हा फुलासिंग प्रथम त्या छाप्याचा पुढारी म्हणून प्रसिद्धीस आला. नंतर रणजितसिंगानें त्याला सिंधखोऱ्यांस मुख्य अधिकारी नेमिलें. त्या ठिकाणीं मुसलमानी प्रजेचा त्यानें अतोनात छळ केला. पुढें त्याला काश्मीरांत धाडिलें. रणजितसिंग फुलाला वचकून असे. १८२३ मध्यें तेरीच्या लढाईंत फुलासिंग व त्याचे अकाली अनुयायी यांनीं रणजितसिंगाच्या बाजूनें लढून यूसफझाईंचा चांगला पराभव केला. पण या लढाईंत शौर्य गाजवीत असतां फुलाला मरण आलें. नौशहरांतील त्याची समाधी हिंदुमुसलमानांचें हल्लीं तीर्थाचें ठिकाण बनलें आहे.

फुलासिंगाच्या नेतृत्वाखालीं किंवा त्याच्याहि आधीं अकाली आपल्या शत्रूंना व मित्रांनाहि सारखेच भीतिप्रद झाले होते. शीख राजांना त्यांची फार भीति वाटे. कारण पुष्कळ वेळां अकाल्यांनीं त्यांच्याकडून बळजबरीनें धन मिळविलें होतें. १८२३ नंतर खुद्द रणजितसिंगानें त्यांची सत्ता कमी करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला व त्यामुळें या पंथाचें महत्त्व बुडालें.

अकाल्यांची गादी अमृतसर येथें अकालबूंग नांवानें प्रसिद्ध होती. त्या ठिकाणी अकाली धार्मिक विधींची संथा घेत व गुरुमातेला आव्हान करीत. खालशाचा सामान्य पुढारीपणा आपल्याकडे आहे असें ते समजत. रणजितसिंगाच्या कालापासून त्यांची खरी गादी आनंदपूरला आली आहे, पण त्यांचें वजन बरेंचसें कमी झालें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.

या पंथांत ब्रह्मचर्य पाळावें म्हणून आज्ञा आहे. गुरूचें उष्टें चेला खातो. इतर शीखांप्रमाणें हे मांस किंवा दारू सेवन करीत नाहींत पण भांग मात्र बेसुमार पितात.

शीखांच्या प्रार्थना मंदिरांना " गुरुद्वार " म्हणतात. या मंदिराच्या देखरेखी करितां एक महंत असे. पुढें हे महंत दुराचारी निघून शीखभक्तांना त्रास पोहोंचूं लागल्यावर १९१९-२० सालीं गुरुद्वारप्रबंधक कमीटीची स्थापना झाली. हिचे जे स्वयंसेवक त्यांची गणना " अकाली " पंथांत करितात. हल्लीं अकाल्यांची संख्या लाखांनीं मोजतां येण्या इतकी आहे. गुरुद्वारप्रबंधक कमीटीनें गुरुद्वारें आपल्या ताब्यांत घेतलीं आहेत व तीं महंतांकडून घेतांना रक्तपात सुद्धां झाले. हल्लीं

सरकार या कमीटीवर आपली देखरेख असावी अशी गुरुद्वार बिलानें व्यवस्था करण्याच्या खटपटींत आहे; अकाली शीखांचा या कामीं सरकाराशीं पूर्ण विरोध आहे. नाभाचा संस्थानिक रिपुदमनसिंग यानें गादीचा राजिनामा दिला.(१९२३) त्या कामीं ब्रिटिश सरकारचा कांहीं हात असावा व त्यांनीं या कामांत अन्याय केला अशा समजुतीनें अकाली लोकांनीं नाभामध्यें जाऊन सत्याग्रह करण्याचा विचार चालविला आहे.

**अकिमिनियन**—अकिमेनिड किंवा हखामनी ह्या नांवांचें एक प्राचीन इराणी राजघराणें असून याचा इराणवर ख्रिस्त पूर्वी ५५८ ते इ. स. ३३० पर्यंत अंमल चालू होता. या घराण्याचा राजकीय इतिहास पूर्वी प्रस्तावना खंडांत व पुढें इराण या सदराखालीं दिलेला आहे. तथापि या राजघराण्याच्या उपासनामार्गाचें महत्त्व झरतुष्ट संप्रदायाच्या विकासाच्या अभ्यासास विशेष असल्यामुळें त्याच्या धार्मिक अंगांचें येथें विस्तारशः विवेचन करूं.

या राजांच्या धार्मिक कल्पनांसंबंधीं थोडी बहुत माहिती, ग्रीक अभिजात वाङ्मयामध्यें, त्याचप्रमाणें बाबिलोनी, मिसरी व ग्रीक जुन्या अंकित लेखांमध्यें, व या राजांनीं जुन्या इराणी भाषेंत बाबिलोनी व नूतन एलामी भाषांतरासहित लिहून ठेविलेल्या त्यांच्या स्वतःच्याच अंकित लेखामध्यें सांपडते. या घराण्यांतील ज्या राजाविषयीं या ठिकाणीं विचार करावयाचा आहे, ते राजे म्हणजे सायरस, कंबायसिस, पहिला दरायस, पहिला क्सर्क्सीझ आणि दुसरा व तिसरा आर्टाक्सर्क्सीस हे होत.

(१) सायरस दि ग्रेट.—या राजाच्या धार्मिक कल्पनांचें ज्ञान होण्यास, झनोफन याची सायरो पीडिआ ही ऐतिहासिक अद्भुतकथा, जुना करार व बाबिलोन मधील शिलालेख इतकी सामुग्री आहे. सायरोपीडिआ ही कल्पित कथा असल्यामुळें तींतील माहितीचा उपयोग सारासार विचारानेंच केला पाहिजे. या कथेमध्यें सायरस राजा हा, झूस, हीलिऑस, जीआ, हेस्टिआ वगैरे अनेक ग्रीक देवतांप्रीत्यर्थ यज्ञ करीत असल्याचें वारंवार दाखविलें आहे. हिरोडोटस व स्ट्रेबो यांनीं आपल्या ग्रंथांत असे उल्लेख केले आहेत कीं, इराणी लोक सूर्य, व चंद्र, पृथ्वी, अग्नि, जल, वायु, अॅफ्रोडायटि नामक विवाहदेवता, झूस नामक आकाशदेवता इत्यादिकांची उपासना करतात. या दोन्ही विधानांचा मेळ घातला असतां असें दिसून येतें कीं, झेनोफन यानें उल्लेखिलेली सायरसची उपासना ही ज्याला धाकटा अवेस्ता म्हणून म्हणतात त्यांत दृग्गोचर होणाऱ्या इराणी संस्कृतीशीं जुळणारी एक प्रकारची शक्तींची उपासनाच होती. त्याच्याच या उपास्य देवता अहुरमझ्द, मिथ्र, अतर्ष (अग्नि) व अनहित याहून निःसंशय भिन्न नव्हत्या. या खेरीज ज्या दुसऱ्या कुलदेवतांची उपासना सायरस करीत असल्याचें दाखविलें आहे, त्या देवता मूलतः मृतलोकांचीं पिशाचें असून मागाहून त्याच नांवाच्या फ़रवषी नांवांच्या रक्षणकर्त्या देवता बनल्या. उलटपक्षीं सायरोपीडिआ या कथेमध्यें मरणोन्मुख सायरसनें मृत्यूनंतर आपल्या शरीराचें दफन करण्याविषयीं सांगितल्याचें म्हटलें आहे. तें झरथुश्ट्री चालीच्या अगदीं विरुद्ध आहे. स्ट्रेबोनें केलेल्या सायरसच्या थडग्याचें वर्णन वरील म्हणण्याची खात्रीच पटवीत असून पासार्गाडी येथें सांपडलेलें सायरसचें थडगें त्या वर्णनाबरहुकूम आहे. परंतु हिरोडोटसनें असें म्हटलें आहे कीं, इराणी लोक मृतशरीरें गिधाडें, कुत्रीं इत्यादि प्राण्यांपुढें टाकून, नंतर त्यांजवर मेणाचा लेप करून तीं जमिनींत ठेवितात.

यानंतर बाबिलोनी अंकित लेखांविषयीं विचार करतां तेथील सायरसच्या उपासना संप्रदायासंबंधानें दोन शिलालेखांमध्यें उल्लेख आलेला आढळतो. या दोन्ही उल्लेखांत सायरसनें म्हटलें आहे कीं, बाबिलोनमधील शेवटचा तद्देशीय राजा नबुनाइद यानें सुमेर व अक्कड काढून या नगरांतील देवता त्यांच्या देवालयांतून काढून आपल्या राजधानींत आणिल्या होत्या त्या मार्डुक देवतेचा प्रिय भक्त जो सायरस त्यानें परत स्वस्थळीं नेल्या. या लेखांत उल्लेखिलेल्या मार्डुक व त्याचा पुत्र नबु या देवता म्हणजे अहुर्मझ्द व त्याचा पुत्र अतर्ष (अग्नि) यांचींच दुसरीं नांवें आहेत असें सायरस मानीत असे, अशी कल्पना कित्येकांनीं काढिली आहे. परंतु या उपपत्तीमध्यें तथ्यांश नाहीं असें दुसऱ्या कांहींचें मत आहे. या तिन्ही प्रकारच्या साधनसामुग्रीमध्यें ग्रीक लेख जास्त विश्वसनीय आहेत. व त्यांवरून सायरसची उपासनापद्धति उत्तर अवेस्तामध्यें आढळून येणाऱ्या धर्माशीं पुष्कळ जुळती आहे, असें कळतें. तथापि, सायरस हा झरथुष्ट्राच्या नवीन संप्रदायाचा अनुयायी होता, असें म्हणण्यास थोडा देखील आधार नाहीं. सायरस या शब्दाचा खरा उच्चार कुरुस् असा असावा.

(२) कंबायसिस.—या राजाच्या धर्मसमजुतींचे उल्लेख असलेली सामुग्री अत्यंत थोडी आहे. हिरोडोटस यानें आमेसिस याचें प्रेत अग्नीमध्यें दहन करण्यानें अग्नीचा पवित्रपणा कमी होतो, अशा कंबायसिस राजाच्या मताचा उल्लेख केला आहे. इराणामध्यें व अवेस्ताच्या मूलग्रहामध्यें मृत शरीराच्या योगानें अग्नीला दूषित करणें हा एक अक्षम्य गुन्हा समजला जातो. जरी सामान्यपणें कंबायसिस हा वेडा मनुष्य होता असें समजण्यांत येतें, तरी सेइस येथील सुप्रसिद्ध देव, नेइत याच्या देवालयाच्या बाबतींत कंबायसिसनें स्वीकारलेलें धोरण अत्यंत उदारपणाचें व पूर्वीच्या सायरस राजासारखेंच होतें. परंतु एपिस देवतेप्रीत्यर्थ सोडलेल्या बैलास मारण्याचें कंबायसिसनें केलेलें कृत्य ही एक वेडाची लहर असून त्यामध्यें उपासना पद्धतीचा कांहीं एक संबंध नव्हता.

(३) पहिला दरायस—या राजाच्या धार्मिक मतांचें ज्ञान होण्यास मुख्य साधन म्हणजे बाबिलोनी व नूतन मीलाए भाषांतरांसहित असलेले या राजाचे जुन्या इराणी

भार्षेतील शिलालेख व या शिलालेखांमध्यें अहुर्मझ्द या सर्वोत्तम देवाच्या कृपेनें आपणास राज्य मिळालें असें दरायसनें म्हटलें आहे. राज्यांतील सर्व वाईट गोष्टी अनृत (द्रौग) जन्य असून दरायसला त्याचें सामर्थ्य, त्याच्या मतें तो असत्यवादी नव्हता या गोष्टीमुळें, आलेलें होतें. सदरहू द्रौगाचें अवेस्तांतील द्रुजशीं साम्य आहे. सत्वशील मनुष्यानें अनुसरावयाच्या मार्गास सत्यपथ ( त्याम रास्ताम ) असें म्हटलें असून व अशा प्रकारची कल्पना जुना करार, वेद व बौद्ध ग्रंथ यामध्येंहि आढळून येते. 'अर्शता' नामक उपकारक देवता व 'दुशियारा' नामक दुष्ट देवता या दरायसच्या लेखांत जशा आढळतात तशाच उत्तर आवेस्तांतहि आढळून येतात. या राजाचें परकीय संप्रदायाबद्दलचें धोरण सायरसप्रमाणेंच अत्यंत उदार स्वरूपाचें होतें. राज्यारूढ झाल्यावर पुनर्घटना केली तेव्हां त्यानें गौमत यानें जमीनदोस्त केलेल्या अग्निगृहांचा पुनरुद्धार केला. तथापि दरायस हा जरी अहुर्मझ्द देवतेचा एकनिष्ठ भक्त होता तरी त्यावरून तो कट्टा एकेश्वरवादी होता असें मात्र म्हणतां येणार नाहीं.

( ४ ) प हि ला क्स र्क्सी झ—क्सर्क्सीझच्या धार्मिक मतांविषयींच्या ज्ञानाचें मुख्य साधन म्हटलें म्हणजे हिरोडोटस याचा ग्रंथ होय. त्यानें क्सर्क्सीझबद्दल असें म्हटलें आहे कीं ग्रीसवर स्वारी करीत असतांना तो जेव्हां हेलेस्पाँट या ठिकाणीं आला, तेव्हां त्यानें इलिअम येथील अँथीनि देवतेस हजार बैल बळी दिले, व सूर्य आणि समुद्र या देवतांप्रीत्यर्थ हविर्दान केलें. त्याचप्रमाणें तो असेंहि म्हणतो कीं 'नउ वाटा', याठिकाणीं क्सर्क्सीझ राजानें नऊ ग्रीक मुलें व नऊ मुली बळी दिल्या, व इराणी लोकांमध्यें मनुष्य जिवंत पुरून बळी देण्याची चाल होती. परंतु वरील ग्रीक इतिहासकाराच्या या म्हणण्यास दुसऱ्या कोणत्याच ठिकाणीं आधार मिळत नाहीं हें एक, व दुसरें मनुष्य जमिनींत पुरल्यानें पूज्य भूदेवतेस भ्रष्ट केल्यासारखें होत असल्यामुळें ही चाल इराणी धर्मसमजुतीच्या विरुद्ध दिसते. यामुळें हिरोडोटसच्या उपर्युक्त माहितीवर भरंवसा ठेवतां येत नाहीं. एके ठिकाणीं क्सर्क्सीझच्या स्वारीबरोबर असलेल्या नऊ शुभ्र अश्वांकडून ओढिल्या जाणाऱ्या झूस देवतेच्या रथाचा उल्लेख हिरोडोटस यानें केला असून व या रथाचा सारथी त्याबरोबर पायीं चालत असें असे तो म्हणतो. हा रथ म्हणजे स्वारीबरोबर येऊन राजास विजय मिळवून देणाऱ्या अहुर्मझ्द या इराणी राष्ट्रीय देवतेचेंच देऊळ होय.

(५,६) दु स रा आ र्टो क्स र्क्सी झ ति स रा आ र्टो क्स र्क्सी झ या दोन्ही राजांविषयींच्या माहितीचीं साधनें, एकाच दृष्टीनें फक्त महत्त्वाचीं आहेत. ही गोष्ट म्हणजे अहुर्मझ्द या देवतेखेरीज मिथ्र व अनहित या दोन नवीन देवांचीं नांवें या लेखांत दिसून येतात. या संबंधानें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, प्लुटार्क हा इतिहासज्ञ जरी खऱ्या झरथुष्ट्र धर्माशीं अपरिचित नव्हता तरी त्यानें आर्टोक्सर्क्सीझ राजांच्या उपासनेसंबंधीं शिला लेखांत आलेल्या माहितीस पुष्टि दिली आहे.

या प्राचीन राजघराण्यासंबंधीची माहिती मध्यकालीन इराणी वाङ्मयामध्यें बिलकुल आढळूं नये ही मोठी चमत्कारिक गोष्ट आहे. पहिला आर्टोक्सर्क्सीझ याचा उल्लेख पेहलवी ग्रंथांमध्यें आर्देशिर या नांवानें आला असून त्यालाच ते स्पेंददादचा पुत्र बोहुमन म्हणतात. अशी उपपत्ति कांहीं विद्वानांनीं बसविली आहे. परंतु तिला बिलकुल आधार सांपडत नाहीं. झरथुष्ट्री आर्टोक्सर्क्सीझ हा स्पेंददादचा पुत्र होता, तर अकिमिनिअन आर्टोक्सर्क्सीझ हा क्सर्क्सीझपुत्र होता; अलबेरुणी यानें या दोन्ही व्यक्ती भिन्न होत असें सांगितलें आहे व तें बरोबरही आहे. शहानामा वगैरे ग्रंथांत या दोन्ही व्यक्ती एकच मानण्यांत आल्या आहेत, तें त्या दोहोंच्याहि आज्याचें नांव दरायस हेंच होतें त्यामुळें असलें पाहिजे. परंतु अवेस्ता व झंद या धर्मग्रंथांच्या दोन दोन हस्तलिखित प्रती राखून ठेवण्यास सांगणारा झरथुष्ट्राचा अनुयायी दरायसपुत्र दरायस हा, व अकिमिनिअन घराण्यांतील आर्सेसीझपुत्र तिसरा दरायस या दोन्ही व्यक्ती भिन्न होत.

वर दिलेल्या माहितीवरून अकिमिनिअन राजे सूर्य, चंद्र इत्यादि इराणी देवतांना मानीत होते व ग्रीस वगैरे परकीय देशांतील देवतांविषयींहि पूज्यभाव बाळगीत होते, तरी ते मुख्यतः अहुर्मझ्द या देवाचेच उपासक होते असें दिसून येतें. त्यांच्या दृष्टीनें अहुर्मझ्द हें त्यांचें मुख्य राष्ट्रीय दैवत असून इतर सूर्यचंद्रादि देवता त्याच्या खालोखाल होत. यास विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट झटली म्हणजे जुन्या इराणी अंकितलेखांचें गाथांपेक्षां ज्यांत झरथुष्ट्रपूर्व निसर्गोपासना पुन्हां डोकाऊं लागते त्या उत्तर अवेस्ताशींच अधिक आहे. त्याचप्रमाणें त्यांत व असुरी बाबिलोनी ग्रंथामध्यें पुष्कळ साम्यें आढळून येतात. या सर्व गोष्टींचा विचार करतां अकिमिनिअन राजे हे झरथुष्ट्रपंथी नसून मझ्दयस्नपंथी होते असें अनुमान निघतें.

**अकियन लोक व संघ**—ग्रीक लोकांच्या ४ शाखांपैकीं ही एक आहे. या शाखेचा मूल पुरुष अकियस हा होता, अशी दंतकथा आहे. होमरकवीच्या मतें या लोकांची सत्ता सबंध ग्रीस देशावर होती. यांचें एओलियन शाखेशीं बरेंच साम्य दिसतें.

यांचा बांधा उंच व डोळे घारे होते. हे आपल्या मतें ग्रीक लोकांचा वरिष्ठ देव जो झ्युस याचे वंशज होते. यांचे पुढारी "वेलायूस" होते. हे लोखंडाच्या हत्याराचा व चौकोनी ढालीचा उपयोग करीत.

यांचा ३० गांवांचा एक संघ अथवा जूट होती. ही जूट यांनीं आपल्यावरील स्वाऱ्यांचा प्रतिकार करण्या करतां केली होती, असें दिसतें. यांच्या एकीचें दुसरें कारण झ्यूसची पूजा हें होय. ख्रिस्तपूर्व २८० च्या सुमारास यांचें महत्व फारच वाढलें होतें. यांचा मुत्सद्दी आरेटस हा होता. आरेटसच्या वेळीं या संघाचीं गांवें पुष्कळच होतीं.

यांच्या मध्यवर्तीय शासनसंस्थेंत लोकमताचें प्राबल्य होतें. या संस्थेच्या वर्षांतून तीन बैठकी होत असत. यांतच कायदे "पास" होत असत. या सभेचें एक १२० सभासदांचें पोट मंडल होतें. याच्या हातीं मुख्य संस्थेचा कार्यक्रम तयार करणें, परदेशच्या वकीलांशीं ठराव करणें, शहरांमधील तंट्यांचा निकाल करणें, वगैरे कामें होतीं. मुख्य अधिकाऱ्याचे पदाला स्ट्रेटेजिया असें नांव होतें. या अधिकाऱ्यास कोणत्याही योजनेस खो घालण्याचा हक्क होता.

ह्या त्रुटींत एक मोठें व्यंग असें होतें कीं तीस लष्कराची व्यवस्था चांगली ठेवितां येत नव्हती. व गुन्हेगारांस योग्य शासन करण्याची सोय केली नव्हती. रोमन लोकांनीं हा संघ विध्वंसिला

**अकियाव**—जिल्हा—खालचा ब्रह्मदेश अराकान विभागांतील एक जिल्हा. उ. अ. १९°.४७'. ते २१°. २७' व पू. रे. ९२°. ११' ते ९३°, ५८,' क्षेत्रफळ ५१३७ चौरस मैल. उत्तरेस चितागांग जिल्हा आणि उत्तर आराकान. पूर्वेस उत्तर आराकान आणि आराकान योमा. दक्षिणेस आणि पश्चिमेस बंगालचा उपसागर.

बंगालचा उपसागर आणि आराकान योमा यांमधील प्रदेश सपाट असून लेम्रो नदीच्या पूर्वेंकडील प्रदेश डोंगराळ आहे. वरचा किंवा उत्तर ब्रह्मदेश आणि हा जिल्हा यामध्यें या डोंगरांतून वाट आहे. परंतु ती अति बिकट असल्यामुळें तिचा कोणी उपयोग करीत नाहीं. उत्तरेकडचा प्रदेश देखील डोंगराळ आहे. या भागांतील नद्या मुख्यत्वेंकरून तीन आहेत. मयूकलहून आणि लेम्रो या उत्तरेकडून दक्षिणेकडे वहातात. शेल्स (Shales) सँडस्टोन्स नांवाच्या वाळूच्या दगडाच्या खडकांनीं हा प्रदेश व्यापलेला आहे. येथें हत्ती, गवा, वाघ, सांबर, रानटी डुकर इ. रानटी पशू आढळतात. समुद्राजवळ असल्या कारणानें हवा समशीतोष्ण आहे. येथील हिंवाळा फार आल्हाददायक असतो. पाऊस सुमारें १८० इंच पडतो. वावटळी पासून या भागास वारंवार फार त्रास होतो. इ. स. १८६८, १८८४, १८९५ सालीं मोठें वादळ झालें होतें. त्यावेळीं मालमत्तेची बरीच खराबी होते.

इ ति हा स—पूर्वी आराकानच्या राज्यांत हा भाग मोडत असल्यामुळें या भागाचा इतिहास आराकानच्या इतिहासांत दिला आहे. ( आराकान पहा ). इ. स. १८२६ सालीं पहिलें ब्रह्मी युद्ध संपल्यावर आराकानबरोबर हा जिल्हा ब्रिटिशांकडे आला. म्योहंग येथें पंधराव्या सोळाव्या शतकांतील कांहीं अवशेष अद्यापि सांपडतात. महामुनी येथें एक देऊळ आहे त्यांत गौतमाची मूर्ति होती. परंतु १७८४ सालीं ब्रह्मी लोकांनीं ज्या वेळीं हा भाग जिंकला त्यावेळीं ही मूर्ति त्या देवळांतून अमरपुर येथें नेण्यांत येऊन तेथें तिची स्थापना करण्यांत आली. हल्लीं ती मंडाले येथील आराकान देवालयांत आहे.

जिल्ह्याची लोकसंख्या सुमारें पांच लक्ष तीस हजार आहे. १९०३–४ मध्यें या जिल्ह्याची विभागणी खालील प्रमाणें होती.

| टाउनशीप अथवा पोट विभाग | क्षेत्रफळ | लागवडी खालीं क्षेत्रफळ | संख्या | | लोकसंख्या | दर चौरस मैलीं लोकवस्तीचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | गांव | खेडीं | | |
| अकियाव | ६२ | ३० | १ | ६० | ४७४२५ | ७६५ |
| राठेडाँग | १२६९ | २३७ | ० | ५४५ | ११३०९८ | ८८ |
| पोन्नाजियन | ७०४ | १०६ | ० | २९० | ४९५५५ | ७० |
| पॉक्टॉ | ४९६ | १२७ | ० | १९० | ४३३९५ | ८७ |
| मिन्बिया | ४८० | १०४ | ० | २९५ | ४१६६१ | ८७ |
| कियाक्टाव | ३७० | ११६ | ० | ३१२ | ५३३०६ | १४४ |
| मीओहंग | १३२९ | १५२ | ० | २८२ | ४९९७८ | ३७ |
| मांगडा | ४२६ | १२८ | ० | ३७७ | ८३२४७ | १९५ |

बरेच भाग डोंगराळ असून तेथें वसती विरळ आहे. जिल्ह्याचें मुख्य ठिकाण अकियाव गांव आहे. वस्ती पुष्कळशी बौद्ध ( २८०००० ) व मुसलमान ( १५५२०० ) लोकांची आहे. या प्रांतांतील मुसलमान वस्तीच्या निम्मे वस्ती या एका जिल्ह्यांत आहे.

निम्मेपेक्षां अधिक लोक आराकानी भाषा बोलतात व सुमारें $\frac{1}{3}$ लोक बंगाली बोलतात.

शे त की—जमीन वाळुमिश्रित लापण असून तींत उत्पन्न चांगलें येतें. पाऊसहि पुष्कळ पडतो. सपाट असलेल्या भागांत भात व इतर ठिकाणीं इतर बागाइती पिकें होतात. गुरचरणाकडेहि पुष्कळ जमिनीचा उपयोग होतो. डोंगरावर उचली ( शिफ्टिंग ) लागवड होते. ज्या जमिनीवर उथवाचें पाणी येतें त्या नांगरण्याची देखील जरूरी नसते. पाऊस पुष्कळ पडत असल्यामुळें पाटाच्या पाण्याची मुळींच जरूर नसते. इकडे भात लावण्याची पद्धत नाहीं. फक्त मळी आलेल्या चिखलांत इतस्ततः भाताचें बीं पेरतात म्हणजे झालें. येथील शेतकरी वर्ग आळशी आहे. तसेंच येथील गुरांत फार रोग होतात. या दोन कारणांमुळें शेतीची वाढ योग्य होत नाहीं. मजुरीनें काम करण्याची पद्धति येथें फार आहे. उचली लागवड करण्याच्या पद्धतीमुळें मोठमोठीं जंगलें नाहींशीं झालीं आहेत. इ. स. १९०३-४ सालीं एकंदर एक हजार एकर जमीन लागवडीखालीं होती पैकीं ९३१ एकर जमिनींत भाताचें पीक होतें.

इतर पिकें—तंबाखु, ऊंस, मिरची, मोहरी इत्यादि. हल्लीं १९०३–४ सालापासून लागवडीचें क्षेत्र दिवसेंदिवस वाढत चाललें आहे. चितागांग जिल्ह्यांतील लोक इकडे फार त्वरेनें वसाहत करूं लागले असून त्यांपैकीं पुष्कळ जमिनीचे मालकहि बनले आहेत. म्हशींची पैदास येथें होत असते. मेंढ्या कोणी पाळीत नाहीं.

जं ग ल—सागवान फार थोडें आहे. सन १९०३–४ सालीं जंगलचें उत्पन्न रु. ८८०० होतें.

खनिज पदार्थ—अद्यापि फारसा याविषयीं शोध झालेला नाहीं. दगडी कोळसा खालच्या दर्जाचा असल्यामुळें कोणी तो काढीत नाहीं. सोनें व चांदी या धातूंच्या खाणी येथें असाव्यात असें म्हणतात. पण त्या अद्याप सांपडल्या नाहींत. राकेल तेलाच्या विहिरी येथें आज तीस वर्षें अस्तित्वांत आहेत. दरसाल ५०००० ग्यालन तेल यांतून बाहेर काढतात. हें तेल आसपासच विकलें जातें. विहिरींची खोली सुमारें ३०० फूट पासून ७०० फूटपर्यंत खोल असते.

व्यापार—हातमागावरील सुती व रेशमी कापड, सोन्या चांदीचें काम, सुतार काम, कुंभार काम, घिसाड काम येथें होतें. अराकानी स्त्रिया विणकाम करतात.

भात व तांदुळ हेच फक्त व्यापारी जिन्नस येथें आहेत. रस्ते अकियाब गांवाबाहेर मुळींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. मुख्य रहदारी पाण्यावरून होते. अकियाब बंदरास पुष्कळ ठिकाणच्या बोटी लागतात. इ. स. १८४२ सालीं बंदरांत दीपगृह बांधलें आहे.

या जिल्ह्याचे चार विभाग व आठ पोटविभाग ( टाऊन शिप्स ) आहेत.

विभाग—अकियाब, मिन्बिया, कियाक्ता, बुथिडाँग. टाऊन शिप्सचीं नांवें वरील कोष्टकांत दिलींच आहेत. प्रत्येक विभागावर एक्स्ट्रा असिस्टंट कमिशनर मुख्य असतो. आराकानचा कमिशनर सेशन्स जज्ज असतो.

जमीनमहसूल—इ. स. १८३२ सालीं हा वसूल २.५ लाख होता. इ. स. १८३७ सालीं जंगलांतील माल, झोंपड्या, होड्या, कारागीर ( हातांनीं काम करणारे ) यांजवरील सर्व कर उठविण्यांत आले. इ. स. १८६४-६५ सालीं मासे धरणाऱ्या कोळ्यांवर कर बसविण्यांत आला. इ. स. १८६६-६७ सालीं उत्पन्न पांच लाखांचें होतें. इ. स. १८७९-८० सालीं नवीन धारापद्धति अमलांत आल्यावर उत्पन्न ७.७ लाखांचें झालें. पुन्हा १८८५-८८ सालीं पाहणी झाल्यावर उत्पन्न ८.३ लाखांचें झालें. इ. स. १९०२-३ सालीं उत्पन्न १२ लाख होतें.

इ. स. १८८५-८८ सालीं झालेल्या पाहणींत दर एकरीं आकार १-४-० ते ३-०-० रुपये पर्यंत होता.

उत्पन्न दाखविणारें कोष्टक

( आंकडे हजाराचे आहेत. )

| | १८८०–८१ | १८९०–१ | १९००–१ | १९०३–४ |
|---|---|---|---|---|
| जमिनीपासून | ७०२ | ९८६ | ११८५ | १४२० |
| एकंदर उत्पन्न | २३३६ | २६०२ | २६९७ | ३०९७ |

जिल्ह्यांत लोकसंख्येशीं स्त्रियांचें प्रमाण कमी आहे. फक्त अकियाब गांवांत देवी टोंचणें कायद्यानें सक्तीचें केलें आहे.

( इं. ग्या. भाग ५ )

**अकियाब विभाग** लोअर बर्मा. अकियाब जिल्ह्याचा एक विभाग.

**अकियाब पोटविभाग.**—उ. अ. २०°६' ते २०°१६' २०°६' आणि २०°१६' उत्तर अक्षांश. ९२° ४५' आणि ९२°५६' पूर्व रेखांश. व पू. रे. ९२° ४५ ते ९२°५६' या पोटविभागांत एक गांव असून ६० खेडीं आहेत. लोकसंख्या सुमारें अठेचाळीस हजार, इ. स. १९०३-४ जमीन महसूल ५०००० रुपये होता, लागवडीखालीं क्षेत्र ३० चौ. मैल होतें.

**अकियाब गांव**—अकियाब शहर. उ. अ. २०° ८' व पू. रे. ९२° ५५' हें गांव कलदन नदीच्या मुखाशीं आहे. लोकसंख्या सुमारें अडतीस हजार. यांत बंगाली लोक सुमारें अर्धे असून बाकीचे आराकानी, चिनी व ब्रम्ही लोक आहेत.

अकियाब नांवाची पूर्वपीठिका अद्यापि अज्ञात आहे. अक्यात् नांवाचा अपभ्रंश हा असावा असें कांहींचें म्हणणें आहे. अक्यात् हें बुद्धाच्या जवड्याच्या मंदिराचें नांव आहे. या गांवास सित्त्वे हें आराकानी नांव असून त्याचा अर्थ ( जेथें लढाई सुरू झाली ) असा आहे. याहि नांवाविषयीं कांहीं दंतकथा मिळत नाहीं. ब्रिटिश अमल सुरू होण्यापूर्वी हें गांव मासे मारणारांचें एक खेडें असून त्यावेळीं म्योहंग ही आराकानची राजधानी होती. परंतु ब्रिटिशांचा अमल सुरू झाल्यापासून हा गांव आराकानची राजधानी आहे. बंदरांत भरतीवर मोठमोठीं गलबतें येऊं शकतात. येथील हवा अति रोगी असल्याकारणें कॉलरा वगैरे रोग नेहमीं उद्भवतात. येथें भाताचा व्यापार पुष्कळ चालतो. व तो बहुतेक हिंदी लोकांच्या ताब्यांत आहे. इ. स. १८७४ सालापासून येथें म्युनिसिपालिटी आहे. येथें तुरुंग, सरकारी कचेऱ्या सरकारी दवाखाने वगैरे सोयी आहेत.

**अकिलीस**—पौराणिक काळीं ग्रीक लोकांत हा एक मोठा प्रसिद्ध वीर होऊन गेला. होमरच्या इलियड महाकाव्यांत तर याला फार श्रेष्ठ स्थान मिळालें आहे. हा तत्कालीन सर्व ग्रीकांत शूर होता. त्याच्या बापाचें नांव मेलियस व आईचें नांव थीटिस. त्याचा आजा एकस (Aeacus) असून तो खुद्द झूस (Zeus)चा पुत्र होय. अकिलीसच्या बालपणासंबंधानें होमर व तदुत्तर लेखक यांनीं निरनिराळ्या हकीकती दिल्या आहेत. बालवयांत त्याला त्याच्या आईनें फ्थिआ ( Phthia ) येथें वाढविलें व त्याला युद्धकलावक्तृत्त्व तसेंच संगीत व वैद्यक यांचें शिक्षण दिलें असें होमरनें वर्णिलें आहे. अकिलीस बद्दलच्या होमरोत्तरकालीन एका कथेंत असें सांगितलें आहे कीं, त्याची आई त्याला अमरत्त्व प्राप्त व्हावें म्हणून त्याच्या अंगाला रोज दिवसा अमृत ( ॲंब्राझिया ) लावीत असे व रात्रीं पेटलेल्या कोळशाखालीं ठेवीत असे. हें एके दिवशीं पेलियसला दिसतांच त्यानें मुलाला आगी खालून काढून घेतलें. तेव्हां थिटिस रागावून घरांतून निघून गेली. दुसऱ्या एका गोष्टींत असें आहे कीं, त्याला मातेनें बालपणीं पादतलानें धरून स्तिक्सनदीच्या जलांत बुडविलें; तेव्हां पादतलाशिवाय त्याचें सर्व शरीर अभेद्य झालें. पुढें त्याचें शरीरसामर्थ्य उत्तम व्हावें

म्हणून त्याला सिंहाचीं आंतडीं आणि अस्वल व रानडुकरें यांचें मांस खावूं घालण्यांत येत असे. तुझा मुलगा दीर्घायु व्हावा अशी इच्छा असेल तर तो घरीं बसून आपला जन्म प्रसिद्धीस न येतां घालवील, पण तोच जर अल्पायु चालत असेल तर तो ट्रॉयचे समरभूमीवर मोठी कीर्ति संपादन करील, असे वैकल्पिक वर त्याच्या मातेला प्राप्त झाले होते. तिनें अर्थात् शेवटला पत्करिला होता. पण पुढें जेव्हां ट्रॉय शहराला वेढा पडला तेव्हां त्याचें मरण ट्रॉयचे समरभूमीवर आहे हें जाणून त्याच्या मातेनें त्याला लैकोमेडीस राजाच्या दरवारीं स्त्रीवेषानें पाठवून दिलें. राजकन्येशीं त्याची मैत्री झाली. एकीपासून त्याला नीआटोलमस नांवाचा पुत्रहि झाला. अकिलीसाशिवाय ट्रॉय घेणें शक्य नाहीं हें जाणून त्याच्या शोधार्थ ओडेसीस ( युलिसीस ) सौदागराच्या वेषानें तेथें गेला व त्याच्यापुढें रत्नें व शस्त्रें मांडून वसला. त्यानें शस्त्रें उचलतांच तो पुरुष आहे हें निदर्शनास आलें. मग अकिलीस रणांत गेला. तेथें त्यानें मोठाले पराक्रम करून शत्रूचीं वारा शहरें घेतलीं. पण पुढें एके प्रसंगीं अगमेम्नन यानें त्याची दासी ब्रायसीस हिला जबरदस्तीनें त्याच्याजवळून काढून आणून आपल्याकडे ठेविली. यामुळें रागावून युद्धांतून त्यानें आपलें अंग काढून घेतलें. त्यानें युद्धांत परत सामील व्हावें म्हणून पुष्कळ प्रयत्न करण्यांत आला पण यश आलें नाहीं. पण पुढें एकदां त्याचा प्रिय मित्र पॅटेक्लस समरभूमीवर मारला गेला. ती वार्ता कळतांच सूड उगविण्याकरितां अकिलीस पुन्हा रणांगणावर गेला व त्यानें शत्रूपक्षाचा पुढारी हेक्टर याचा वध केला. हेक्टराचा अंत्यविधि वर्णिल्यावर तेथेंच इलियड काव्य समाप्त होतें. अकिलीसच्या मृत्यूसंबंधीं हकिगत या काव्यांत नाहीं. परंतु दुसऱ्या एका ठिकाणीं अशी हकिगत आहे कीं, मिनर्वेच्या देवळांत प्रायमची कन्या पोलीझेना हिला मागणी घालीत असतां पारिसानें पादतलावर बाण मारून त्याचा वध केला. त्याच्या मृत्यूसंबंधानें याशिवाय दुसऱ्याहि कित्येक कथा आहेत. मरणोत्तर देवाप्रमाणें त्याची पूजाअर्चा पुष्कळ ठिकाणीं विशेषतः ल्यूक, स्पार्टामधील एलिस, व हेलेस्पांटवरील सिर्गी येथें करण्यांत येत असे. अकिलीस हा शौर्याचा नमुनेदार वीर असून अत्यंत कोपिष्ठ पण कांहींसा उदासीन वृत्तीचा व क्वचित् प्रसंगीं वीराला उचित अशा हृदयाच्या कोमलतेनें शोभत आहे असें होमरनें दाखविलें आहे.

**अकृतव्रण**—परशुरामाच्या अत्यंत कृपेंतला मित्र व वेदवेत्ता ऋषि असून परशुरामाचें अंबेप्रीत्यर्थ भीष्माशीं युद्ध झालें त्यांत ऋषीनें त्याचें सारथ्य स्वीकारलें. ( वनपर्व, अध्याय. ११५, उद्योगपर्व अ. १७९. )

**अकोट तालुका**—जिल्हा अकोला. उ. अ. २०° ५१' ते २१° १६' व पू. रे. ७६° ४६' ते ७७° १२' या तालुक्यांत एकंदर २६४ खालसा आणि २ जहागिरीचीं गांवें आहेत. उत्तर दक्षिण लांबी सरासरी २६ मैल; आणि रुंदी २० मैल. उत्तरेस उमरावती जिल्ह्यांतील मेळघाट तालुका; दक्षिणेस पूर्णा नदी व पलीकडे बाळापुर आणि आकोला तालुका; पूर्वेस उमरावती जिल्ह्यांतील दर्यापूर तालुका; पश्चिमेस बुलढाणें जिल्ह्यांतील जळगांव तालुका. तालुक्यांतील प्रदेश बहुतेक सपाट असून जमीन खोल, काळी व सुपीक आहे. परंतु उत्तरेकडील सुमारें ६.८ मैल रुंदीचा प्रदेश दगडाळ आहे. तालुक्यांत पाण्याची टंचाई आहे. विहिरींतील पाणी बहुधा खारट असतें. कांहीं ठिकाणीं झऱ्याचें पाणी दोन मैलांवरून आणावें लागतें. तालुक्यांतील रस्ते चांगले आहेत. तालुक्यांतील आठवड्याचें बाजार एकंदर १४ असून अकोट, मुंडगांव आणि मालेगांव येथील बाजार महत्वाचे आहेत. या तालुक्यांत देवळें वगैरे फार असून बहुतेक ठिकाणीं वार्षिक यात्रा भरतात. ( अकोला डिस्ट्रीक्ट ग्याझेटीयर )

**अकोट**—गांव—हें तालुक्याचें मुख्य ठिकाण असून अकोल्याच्या उत्तरेस २८ मैलांवर आहे. अकोला आणि अकोट यांचें मध्ये एक पहिले वर्गाचा रस्ता आहे. लोकसंख्या सुमारें एकोणीस हजार. येथें तालुक्याच्या ठिकाणी असणाऱ्या सर्व इमारती असून एक दवाखाना, इंग्रजी मराठी शाळा वगैरे आहेत. येथें आठवड्यांतून दर बुधवारीं आणि रविवारीं बाजार भरतो. इ. स. १८८४ सालीं म्युनिसिपालिटीची स्थापना झाली. येथें कापसाचा बाजार, दहा सरकी काढण्याचे कारखाने आणि चार रुई दावण्याचे कारखाने आहेत. येथून सुमारें ५००००० रुपयांचा कापूस बाहेर जातो. येथें सावकारी धंदा बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालत असून मेळघाट कडील इमारती लांकडांचा व्यापारही बराच आहे. साध्या सत्रंज्या येथें होतात. वऱ्हाडांत एका काळीं अकोटची सत्रंजी प्रसिद्ध असे. व हा गांव जोगवन, चिंचखेड, आणि कमळापूर हीं तीन खेडेगावें मिळून झालेला असून वस्ती साधारण दाट आहे. साधारण प्रत्येक घराला एक विहीर आहे. गांवाभोंवतीं एक मातीची भिंत व तिला सहा दरवाजे होते; परंतु हल्लीं त्याचा मागमूस राहिला नाहीं. ज्या ठिकाणीं हल्लीं तहशिली आहे तिला पूर्वीं किल्ला म्हणत. मुसलमानांची वस्ती बरीच आहे. येथील पाहण्यासारख्या इमारती पूर्वीचे मोठमोठे कामगार यांच्या असून त्यांवरील लाकडाचें खोदकाम प्रेक्षणीय आहे. दिवाकरभाऊंचा दिवाणखाना, पहाण्यालायख आहे. सरदारसिंग आणि फडणविस यांच्या हवेल्या चांगल्या आहेत. फडणविसांच्या हवेलीमध्यें मजबूत तळघरें आहेत. येथील सरदेशमुखांच्या घरांतून दूरच्या बागेपर्यंत एक भुयार आहे असें त्यांचें म्हणणे आहे. पीरशहा दर्यासाहेब नांवाच्या टेकडीवर त्यांचें थडगें व एक मशीद आहे. याच ठिकाणीं येथील स्थाईक रजपूत आणि मुसलमान यांमध्यें मारामारी झाली. या टेकडीवरील एका मुसलमानानें एका रजपूत स्त्रीची चेष्टा केली; हें रजपूतांस सहन न होऊन त्याच रात्रीं कित्येक रजपूत या टेकडीवर गेले. त्यावेळीं झालेल्या झटापटींत कित्येक मुसलमान प्राणास

मुकले. या ठेंकडीवर एक विहीर आहे. त्या विहिरींतून नरनाळ्यास जाण्याकरितां ११ मैल लांबीचें एक भुयार आहे असें म्हणतात. हल्लीं ती विहीर पडलेली आहे. गांवाजवळच अकोला रस्त्यावर एका बाजूला एकगाडानारायणची समाधि असून तीस हिंदू आणि मुसलमान पूज्य मानतात. दुसऱ्या बाजूस मीरजाफर करोडा याचें थडगें आहे. दोन्ही इमारतीवर फारसी शिलालेख आहेत. मीरजाफर करोडा याच्या वंशजास इनामी जमीन असून त्याचा उरुस दरवर्षी भरतो. जवळच गैबी पीर असून येथें हिंवताप बरा होतो अशी लोकांची समजूत आहे. हिंदूंचीं येथें पुष्कळ देवालयें आहेत परंतु देवळाचें काम फारसें वाखाणण्यालायक नाहीं. नंदीबाग, बालाजी आणि केशवराजा यांचीं देवळें साधारण बरीं आहेत. तरी सर्वांत महत्त्वाचें देऊळ नरसिंहबोवाचें आहे. हा एका मुसलमान फकीराचा शिष्य असून इ. स. १८८७ सालीं मरण पावला. दरवर्षी कार्तिक महिन्यांत मोठा उत्सव असून २००००।२५००० माणसांची गर्दी असते. सुमारें १२० एकर जमीन देवळास दिली आहे. नरसिंगबोवाचें चरित्र पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालें आहे. ( अकोला डिस्ट्रिक्ट ग्या. )

**अकोला जिल्हा.**—वऱ्हाडांतील एक जिल्हा. उ. अ. २०° १७' ते २१° १६' व पू. रे. ७६° २४' ते ७७° २७'. उत्तरेस मेलघाट डोंगर, पूर्वेस दर्यापूर आणि मूर्तिजापूर तालुके. दक्षिणेस मंगरूळ, बाशीम आणि मेहकर तालुके; पश्चिमेस चिखली आणि मलकापूर तालुके. प्रदेश बहुतेक सपाट आहे. यांतून पूर्णा नदी वहात असून जमीन काळी व सुपीक आहे. पाइनघाट खोऱ्याच्या मध्यभागीं हा जिल्हा वसलेला आहे. काळवीट, रानडुकरें, नीलगाई, चित्ते हीं रानटीं जनावरें सांपडतात.

येथें उन्हाळा अति भासतो. त्यावेळीं मेलघाटांतील नर्नाळा किल्ल्यावर जरा उष्णता कमी असते.

सरासरी ३४ इंच पाऊस असतो. अवर्षणाच्या वेळीं येथें गुरांची फार वाईट स्थिति असते व असंख्य मृत्युमुखीं पडतात.

अकोला पूर्वी कधींहि स्वतंत्र असें राज्य नसल्यानें त्यास स्वतंत्र इतिहास नाहीं. या भागांत अडगांव आणि बाळापुर येथील लढाया व नर्नाळा किल्याचे दोन वेढे प्रसिद्ध आहेत. अकबराच्या कारकीर्दीत हा जिल्हा नर्नाळा सरकाराच्या ताब्यांतील एक परगणा होता.

इ. स. १८५३ सालापर्यंत ( त्या सालीं ब्रिटिशांकडें निजामानीं वऱ्हाड लावून दिला ) निजामच्या जमीन वसूली पद्धतीमुळे तंटे बखेडे फार होत असत. इ. स. १८४१ सालीं जामोदच्या तटावर मोंगलरावनें भोंसल्याचें निशाण रोवलें होतें. इ. स. १८४४ सालीं अकोल्यास कांहीं धार्मिक प्रकरणावरून बराच बखेडा माजला होता. परंतु इलिचपूरच्या ब्रिटिश कामगारानें तो मोडला. स. १८४९ सालीं अप्पासाहेबानें उभारलेलें बंड ब्रिटिश सरकारनें लष्करी उपायानें मोडून टाकलें. मोगलाईंत किंवा त्याच्या पूर्वी या जिल्ह्याची किंवा परगण्याची व्याप्ती किती असावी हें सांगतां येत नाहीं. शके १६८५ च्या एका पत्रांत मौजे धामणगांव परगणे अकोलें येथून १५० बैल पंधरा खंडी गल्ला भरून पुण्यास रवाना केल्याचा व त्यावर जकातीचा तगादा करूं नये असा उल्लेख आहे. ( राजवाडे खं. १०–१६–८ ) वऱ्हाड ब्रिटिशांकडे आल्यावर त्याचे पूर्व व पश्चिम वऱ्हाड असे दोन भाग केले गेले. इ. स. १८६७ पासून १८७२ पर्यंत अकोला हें पश्चिम वऱ्हाडाचें मुख्य ठिकाण होतें.

प्राचीन प्रेक्षणीय स्थळें—नर्नाळा आणि बाळापूर येथील किल्ले; बाळापूर येथील छत्री; पातूर डोंगरांतील दोन विहार; आणि या भागांत सांपडणारी हेमाडपंती देवळें. त्यांपैकीं बार्शी टाकळी येथील देऊळ प्रेक्षणीय आहे.

या जिल्ह्यांत एकंदर गांवें व खेडीं यांची संख्या ९७६ आहे. एकंदर लोकसंख्या सुमारें सातलक्ष अठ्याण्णव हजार आहे. या जिल्ह्यांत पांच तालुके होते. त्यांचीं नांवें—अकोला, अकोट, बाळापूर, खामगांव, जळगांव. मुख्य गांवें—अकोला, खामगांव, अकोट आणि शेगांव. या जिल्ह्यांतील जमीनकाळी लापण जातीची असून सुपीक आहे. ४२ जहागीरीचीं गांवें सोडून दिलीं तर सर्व जिल्हा रयतवारी आहे. मुख्य पिकें—ज्वारी, कापूस. वऱ्हाडी गुरांची खामगांव व उमर्दा या अवलाद या जिल्ह्यांत आहेत. घोडी, मेंढरें चांगल्या जातीचीं नाहींत. इ. स. १९०३–४ सालीं फक्त २१ चौरस मैल बागाईतीखालीं होती. जमीन सुपीक असल्यामुळें या जिल्ह्यांत जंगल महत्वाचें नाहीं. जंगलांत सालई, खैर, साग, बाभूळ वगैरे झाडें सांपडतात.

मुख्य व्यापार म्हटला म्हणजे कापसाचे गठ्ठे करून बाहेर पाठविणें.

जी. आय. पी. व सी. पी. रेलवे या जिल्ह्यांतून आहे.

दुष्काळ—पाटबंधाऱ्याची सोय नसल्यामुळें लोकांस पावसाच्या पाण्यावरच सर्वस्वीं अवलंबून राहणें भाग पडतें. पावसानें टाळा दिल्यास दुष्काळ पडण्याचा बराच संभव असतो. इ. स. १८६२, १८९६–९७ व १८९९–१९०० चे दुष्काळ लोकांस बरेच भोंवले. इ. स. १९०० सालीं ८९८८० माणसें दुष्काळाप्रीत्यर्थ काढलेल्या कामावर होतीं व २२६४२ लोकांस तगाई देण्यांत आली होती. या जिल्ह्यांतील त्या सालीं अर्धी गुरें प्राणास मुकलीं असावीं असें म्हणतात.

राज्यव्यवस्था—इतर जिल्ह्यांप्रमाणें.

इ. स. १९०३–४ सालीं जमीनमहसुलीचें उत्पन्न २२५४००० व एकंदर उत्पन्न ३१३९००० रुपये होते.

शिक्षणाचें प्रमाण शेकडा ५·२ आहे.

इ. स. १९०५ सालीं वऱ्हाडच्या सहा जिल्ह्याच्या क्षेत्रांत फेरबदल करण्यांत आला. त्यावेळीं उमरावती जिल्ह्यांतील मूर्तिजापूर तालुका व बाशिम आणि मंगरूळ हे पूर्वीच्या बाशिम जिल्ह्यांतील तालुके यांचा समावेश अकोला जिल्ह्यांत करण्यांत आला. बाशिम जिल्हा नाहींसा केला व अकोला

जिल्ह्यांत मोडणारे खामगांव व जळगांव तालुके बुलढाण्यास जोडण्यांत आले. अकोला जिल्ह्यांचें हल्लींचें क्षेत्रफळ ४१११ चौ. मैल व लोकसंख्या सात लक्ष अठ्याण्णव हजार पांचशे चवेचाळीस ( १९२१ ची खानेसुमारी, आहे.

**अकोला तालुका** जिल्हा अकोला. उ. अ. २०° ५३' ते २०° २३' व पू. रे. ७७° २५' ते ७६° ५४'. उत्तर दक्षिण लांबी सुमारें ३० मैल. पूर्व पश्चिम रुंदी सुमारें २५ मैल. क्षेत्रफळ ७३९ चौरस मैल. यांत ३३९ खालसा आणि १९ जहागिरीचीं गांवें मिळून एकंदर ३५८ गांवें आहेत. पश्चिमेस बाळापूर तालुका, उत्तरेस पूर्णा नदी व पलीकडे अकोट आणि दर्यापूर तालुके; पूर्वेस मूर्तिजापूर तालुका; दक्षिणेस मंगरूळ आणि वाशिम तालुके. या प्रमाणे चतुःसीमा असून हा तालुका जिल्ह्याच्या मध्यभागीं आहे. तालुक्यांतील जमीन सुपीक सपाट प्रदेश आहे. फक्त दक्षिणेकडे थोडीशी डोंगराळ आहे. यां तालुक्यांतील नद्यानाले दक्षिणेकडून उत्तरेकडे वाहतात. यां तालुक्यांत सरासरी दर गांवास ११ या प्रमाणें विहिरींचें प्रमाण आहे. तरी देखील या तालुक्यांत, मुख्यत्वेंकरून ज्या भागांत खारें पाणी लागतें त्या भागांत, पाण्याची टंचाई भासते. जो. आय. पो. रेलवेची भुसावळ नागपूर लाइन या तालुक्यांतून जात असून, तिची या तालुक्यांत अकोला, या वलखेड, बोरगांव, आणि काटेपूर्णा हीं स्टेशनें आहेत. या तालुक्यांत आठवड्याचे बाजार १४ ठिकाणीं भरतात.

**अकोला शहर**—हें अकोला जिल्याचें मुख्य ठिकाण आहे. उ. अ. २०° ४३' आणि पू रे. ७७' ०४.' समुद्रसपाटीपासून उंची ९२५ फूट. पूर्णा नदीस मिळणारीं मोर्णा नदी या गांवांतून वाहते. पश्चिम तीरावर असलेल्या भागास शहर म्हणतात. शहराभोंवती भिंत आहे. पूर्वतीरावरील भागास ताजनापेठ म्हणत असून सरकारी इमारती, सरकारी ठाणें व इतर बहुतेक चांगली वस्ती याच भागांत आहे. पूर्वी नदीस पूर येत असे म्हणून मुसलमानांनी दोन्ही तीरावर जुम्मामशीदी बांधलेल्या आहेत. परंतु हल्लीं चांगला दगडी पूल नदीवर इ.स. १८७३ सालीं बांधलेला आहे. पूर्वी नदीवर तरता पूल असावा अशाबद्दल कांहीं खुणा अजून दृष्टीस पडतात. हें जी. आय. पी. रेलवेचें भुसावळ-नागपूर रेलवे लाइनवरील स्टेशन असून येथें सर्व गाड्या उभ्या राहतात. म्युनसीपालिटीचें क्षेत्रफळ १६७४ एकर. लोकसंख्या १८६७ मध्यें १२ हजार होती ती हल्लीं सुमारें तीस हजार झाली आहे हल्लीं वऱ्हाडांत हें दुसऱ्या प्रतीचें गांव आहे. गांवाला पाणी विहीरींचे असून मोर्णा नदीस गांवाजवळ दोन ठिकाणीं बांध घातला आहे. पाण्याची टंचाई असल्यामुळें गांवांत बागा फार थोड्या आहेत. हल्लीं कापशी येथें तलाव बांधून नळ आणले आहेत. एक सरकारी बाग आहे. येथें जिल्ह्यांतील सर्व कचेऱ्या, वाचनालयें, ख्रिस्ती मंदिरें, सराई वगैरे आहेत. येथें श्रीरामाचें देऊळ व नाटक गृहें आहेत. शहरांतील इमारती कांहीं पहाण्यासारख्या नाहींत. कापसाचा व्यापार येथें बराच चालत असून पूर्वी येथें सट्टे फार होत होते. पण हल्लीं सट्याचा व्यापार कमी झाला आहे. येथें सरकी काढण्याचे कारखानें ३० वर आणि कापूस दाबण्याचे कारखानेहि पुष्कळ आहेत. तेलाच्या दोन गिरण्या आहेत. एका गिरणींत सर्कीचें तेलहि काहीं दिवस काढीत असत. एक कापडाची गिरण आहे. येथे महूची दारू तयार करण्याचा कारखाना आहे. येथें मजूरी फार महाग आहे. येथील उन्हाळा अतिशय कडक असतो. परंतु रात्रीं थंडी पडते. येथें जानू नांवाच्या श्रीमंत महारानें महार विद्यार्थ्यांकरतां एक वसतिगृह बांधलें आहे. दहिदांडा दरवाज्यावरील शिलालेख हिजरी सन, १११४ ( इ. स. १६९७ ) असून अवरंगजेब बादशहा होता; आणि ख्वाजा अबदूल लतीफ याच्या वेळीं नबाब असदखान हा जहागीरदार होता असें लिहिलें आहे. ' इदगयावर देखील एक शिलालेख आहे. हिजरी सन १११६ सालीं ख्वाजा अबदूल लतीफ यानें ही इमारत पुरी केली असें लिहिलें श . निजामचें सैन्य आणि मराठे यांच्यांत येथें एक लढाई ली. वेळ नक्की कळत नाहीं. इ. स. १७९० सालीं गाझीखान पेंढारी याचा भोसल्यांच्या सेनापतीनें या गांवासमोर पराजय केला. येथें एक किल्ला होता परंतु इ. स. १८७० च्या सुमारास पाडून टाकला. येथें ७५ वर्षांपूर्वी मुसुलमान आणि रजपूत यांच्या मध्यें भांडणे होत असत. निरनिराळ्या मोहल्यांतील मुसलमान देखील परस्परांत भांडत असत. इ. स. १८१७ सालीं जनरल डोव्हटन हा नागपूर सर करण्यापूवा कांहीं महिने येथें राहिला होता. हल्लीं जेथें डेप्युटी कमिशनरची कचेरी व तुरुंग आहे तेथें त्याच्या सैन्याची छावणी पडली होती. इ. स. १८३३ सालीं नदींस मोठा पूर आला होता. या गांवापासून ६ मैलांवर कान्हेरी म्हणून एक खेडें आहे. तेथील अकोलसिंग नांवाच्या एका रजपुतानें हें गांव वसविले व त्याच्याच नांवावरून अकोला हें नांव पडलें अशी एक येथें दंतकथा आहे. पूर्वी येथें एक दाट जंगल होतें. महादेवाच्या देवळाशिवाय दुसरी इमारत नव्हती. अकोलसिंगाची पत्नी दर्शनास एकटी येत असे. त्यास आपल्या बायकोचा संशय येऊन तो नागवी तरवार घेऊन तिचा पाठलाग करण्यास निघाला. हें जेव्हां तिनें पाहिलें तेव्हां तिनें आपलें रक्षण करण्याविषयीं परमेश्वराची प्रार्थना केली. इतक्यांत मूर्ति दुभंग झाली व तिला आंत घेतलें. तिचा नवरा तेथें आला. परंतु फक्त तिच्या साडीच्या पदराशिवाय त्यास कांहीं सांपडले नाहीं. मूर्तिच्या बाहेर ती साडी पुष्कळ वर्षें दिसत होती. अकोलसिंगानें आपल्या बायकोविषयीं फार शोक केला व ज्याठिकाणीं त्यास तिचें शेवटचें दर्शन झालें होतें त्याठिकाणीं त्यानें वस्ती केली. त्यानें एक मातीची गढी बांधली. त्याच जागेवर हल्लींचा किल्ला बांधलेला आहे अशी आख्यायिका आहे.

**अकोला तालुका**—मुंबई इलाखा. अहमदनगर जिल्ह्यांतील एक तालुका. उ. अ. १९° १६' ते १९° ४५' व. पू. रे. ७३° ३७' ते ७४°

क्षेत्रफळ ५७२ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें पाऊण लाख.

| सन | जमीन उत्पन्न | इतरकर |
| --- | --- | --- |
| १९०३–४ | १ लाख रुपये | ७०००. |

प्रवरा मुळा नद्यांभोंवतालचा प्रदेश या तालुक्यांत येतो. जमीन रुक्ष व उंचसखल आहे. पश्चिमेकडच्या भागांत सह्याद्रि पर्वत आल्यामुळें २००–२५० इंच पर्यंत पाऊस पडतो. परंतु पूर्वेकडच्या भागांत २२ इंच पाऊस पडतो.

१९१८ सालीं या तालुक्याच्या मुसलमान मामलेदाराला त्यानें सैन्यभरतीच्या कामीं लोकांवर जुलुम केल्यामुळें जिवंत जाळण्यांत आलें. या दंग्यामुळें हा तालुका थोडा प्रसिद्धीस आला. एरवीं त्याचें नांवहि स्थानिकपत्रांत फारसें ऐकूं येत नसे.

मराठी रियासतींत या परगण्यांतील ढोकरी नांवाचा गांव चिंतो विठ्ठल यास इनाम दिल्याचा उल्लेख कागदपत्रांत आढळून येतो. ( राजवाडे १२,३३० व २०८ ).

**अक्कड.**—अक्कड हें बाबिलोनियामधील निमरुड राज्याच्या केंद्रस्थानीं जीं चार शहरें होतीं त्यांपैकीं एकाचें हिब्रु नांव आहे. या शहराचा उल्लेख जुन्या करारांत एक वेळ आला आहे. पूर्वींचा बाबिलोनियन राजा पहिला सारगन याच्या राजधानीचें जें अगडे नांवानें प्रसिद्ध शहर तें व अक्कड हें एकच असावें असा अंदाज आहे. बॅबिलोनियाचा शेवटचा सेमिटिक राजा, नबोनिडस ( ५५५—५३७ इ. स. पूर्वी ) यानें सारगन राजाचा काळ इ. स. पूर्वी ३८०० वर्षें दिला आहे. कदाचित् हा राजा खि. पू.७०० किंवा त्या अगोदर १०० वर्षें झाला असावा. असाहि संशोधकांचा तर्क आहे. अगडे हें नांव पुष्कळ शिलालेखांत आढळतें. अगडे पासून अक्कड हा असुरी बाबिलोनियन सेमेटिक अपभ्रंश असावा.

अगडे शब्दाचा अर्थ ‘ अग्निमुकुट ’ ( अग=अग्नि वदे=मुकुट ) असा होतो. याचा संबंध इश्तर ( Ishtar ) च्या पूजेकडे असावा. कारण नबोनिडसच्या अधारावरून असें दिसतें कीं इश्तरच्या नंतर अनुनित देवतेची उपासना अगडे येथें सुरु झाली. या अनुनित देवतेचें देवालय सिप्पुर येथें होतें अगडे—अक्कड हें सिप्पुरच्या समोर, युफ्रेटिस नदीच्या डाव्या तीरावर असून सिप्पुर शहरचा अतिशय जुना भाग असावा असा तर्क आहे.

असुरी बाबिलोनियन वाङ्मयांत अक्कड हें नांव सुमेरुचे बरोबर राजांच्या बिरुदावलींत सांपडतें. याचा अर्थ प्रोफेसर मेक्कर्डी यांच्या मतांप्रमाणें, एवढाच निघतो कीं, आक्कड शहर व अक्कडचा प्रांत यावर राजाचा हक्क आहे.

[प्रस्तावना खंड विभाग ३ सुमेरु, आणि असुर, बाबिलोनिया हे शब्द पहा.]

**अक्कण्णाः**—कुतुबशाहींतील एक सुप्रसिद्ध ब्राह्मण मुत्सद्दी. याचें मूळनांव अकरस असून. याच्या बापाचें नांव भानजी व उपनांव पिंगळी होतें. रियासतकार याचें मूळनांव एकनाथपंथ असें देतात. याचा जन्म विपन्नावस्थेंत असलेल्या अशा एका आश्वलायन शाखेच्या देशस्थ, ऋग्वदी, भारद्वाजगोत्री ब्राह्मण कुलांत झाला होता. इ. स. १६६६ मध्यें हा व याचा भाऊ मादण्णा उर्फ मदनपंत यांनीं सय्यद मुस्तफा नामक एका गोवळकोंड्याच्या सरदाराच्या पदरीं शराफ म्हणून नोकरी धरली. पुढें इ. स. १६७३ च्या सुमारास मदनपंत उर्फ मादण्णा कुतुबशहाचा कारभारी झाला तेव्हां महंमद इब्राहिम यास सर–इ–लष्कराच्या जागेवरून काढून त्याच्या जागीं अक्कणाची नेमणूक करण्यांत आली. इ. स. १६७६ त शिवाजीनें मोंगल व विजापुरकर यांच्या विरुद्ध गोवळकोंड्याच्या दरबाराशीं जो तह केला त्यांत अक्कण्णास विजापुरच्या कारभाऱ्याची जागा मिळवून देण्याची लालूच दाखविलेली होती असें ग्रांट डफ म्हणतो. इ. स. १६८६ च्या मार्च महिन्यांत याचा व त्याचा भाऊ मदनपंत याचा गोवळकोंड्याच्या चिडलेल्या मुसलमान सरदारांकडून खून होऊन याचें मस्तक हत्तीच्या पायीं देण्यांत आलें [ मादण्णा पहा. ]. हा मोठा धूर्त व काविबाज होता पण याच्या अंगीं याचा भाऊ मदनपंत याच्याप्रमाणें बुद्धिमत्ता नव्हती असें याचें डी. हावर्ट नामक एका समकालीन डच लेखकानें वर्णन केलें आहे. अक्कण्णा व मादण्णा हे बंधू वैष्णव सांप्रदायी असून त्यांचे वंशज वारंगळनजीक हनमकोंडा येथें व आसपास देशमुखी वृत्तीवर उपजिविका करतात. निजामसरकारच्या हद्दींत भानजीपेठ म्हणून गांव आहे त्याचा या बंधुद्वयाच्या वडिलांच्या नांवांशीं संबंध दिसतो.

[ संदर्भ ग्रंथः—जदुनाथ सरकारचा अवरंगजेबाचा इतिहास, पुस्तक ४ थें; ग्रांट डफ, पुस्तक १ लें; भारत इतिहास संशोधक मंडळ, वार्षिक इतिवृत्त शके १८३८. ]

**अक्कलकारा**—यास संस्कृतमध्यें अकल्लक गुजराथींत अक्कलकरो, इंग्रजींत Pallitary Root इत्यादि नांवें आहेत. अकलकाऱ्याचीं झाडें लहान असतात. त्यांची उंची सुमारें हातभर असते. बंगाल, अरबस्थान व ईजिप्त देशांत तीं सापडतात. त्या देशांतून अकलकाऱ्याचें मूळ हिंदुस्थानात येतें. या झाडास पिंवळ्या रंगाचीं झेंडूसारखीं फुलें येतात. त्यांची चव मुळांप्रमाणेंच असते. ही फुलें खोकल्यावर विड्यांत घेतात (१) दांत दुखत असल्यास अक्कलकारा आणि कोरांटोचा पाला एकत्र कुटून दांताखालीं धरतात (२) जिव्हा शुद्ध व्हावयास—अक्कलकारा दाढेखालीं धरून रस गिळतात. (३) शेंदुर पोटांत घेल्यास त्याविषावर. अक्कलकारा-व वेखंड पाण्यांत उगाळून घेतात. अपस्मारावर अक्कलकाऱ्याचें चूर्ण मधांत घ्यावें व नस्यही द्यावें, असें म्हणतात. जिव्हारोग जिव्हेसंबंधीं कांहीं व्यंग म्हणजे अस्पष्ट वर्णोच्चार, बोबडेपणा वगैरे विकार असल्यास अक्कलकारा तोंडात धरून लाळ गळूं द्यावी म्हणजे हे विकार बंद होतील. संधिवातावर याचा काढा गुणकारी आहे.

[ पदे–वनस्पति गुणादर्श, गुप्त. वैद्यक शब्द सिंधु, सेन–आयुर्वेदिक सिस्टिम ऑफ मेडिसिन ]

**अक्कलकोट.** मुंबई इलाख्यांतील अक्कलकोट संस्थानचें मुख्य गांव. उ. अ. १७° ३१' व पू रे. ७६° १५' वर आहे. लोकसंख्या ( इ. स. १९११९, ३०३. हा गांव जी. आय. पी. रेलवेच्या अक्कलकोट रोड ( जुनें नांव कडब गांव ) स्टेशनपासून सात मैलांवर आहे. याच्या भोंवतीं पूर्वी तट असून पलीकडे खंदक होता. हल्लीं तट कांहीं कांहीं ठिकाणीं पडला असून खंदकही अर्धवट भरून गेला आहे. येथील नांव घेण्यासारख्या इमारती म्हटल्या म्हणजे जुना राजवाडा, नवीन राजवाडा, छत्र्या व हायस्कूल या होत. राजवाड्याच्या शस्त्रागारांतील शस्त्रांचा संग्रह प्रेक्षणीय आहे. ( इं. ग्या. ५ )

**अक्कलकोट** मुंबई इलाख्यांतील एक संस्थान मु. सोलापूर हें संस्थान सोलापूरच्या आग्नेयीस असून संस्थानचा पोलिटिकल एजंट सोलापूर जिल्ह्याचा कलेक्टर असतो. खुद्द अक्कलकोट शिवाय या संस्थानाकडे माळशिरस तालुक्यांतील सहा गांवें व खटाव तालुक्यांतील कुळें हें गांव आहे. या संस्थानांत एकंदर १०३ गांवें ( १ गांव व १०२ खेडीं असून एकंदर क्षेत्रफळ ४९८ चौरस मैल आहे. त्यापैकीं एकंदर १३ चौरस मैल जंगल आहे. ३९ चौरस मैल जमीन लागवडी योग्य नाहीं लोकसंख्या १८८१ मध्यें ५८०४० होती; ( १८९१ ) ७५७७४ ( १९११ ) ८९०८२. ( १९०१ ) ८२०४७ एकंदर उत्पन्न १८८१ मध्यें रु. २३५००० होतें. १९०३-०४ सालीं ४५०००० रु. झालें. हल्लीं तें पावणेसहा लाख असून लवकरच जें सेटलमेंट होणार आहे त्यांत आणखी एक लाखानें वाढण्याचा संभव आहे.

मर्यादाः—माळशिरस व खटाव तालुक्यांतील सात गांवें सोडून याच्या उत्तरेस निझामचें राज्य; पूर्वेस पटवर्धन जहागिरी व निझामचें राज्य; दक्षिणेस इंदी तालुका व निजामचें राज्य; आणि पश्चिमेस सोलापुर तालुका.

अक्कलकोटचा प्रदेश समुद्रसपाटी पासून १२०० फूट उंचीवर असलेलें सपाट मैदान असून बहुतेक वृक्षरहित आहे. गांवाभोंवतीं कायतीं आंब्यांचीं वगैरे झाडें दिसतात. या संस्थानाच्या सरहद्दीच्या कांहीं भागावर भीमा व सीमा या नद्या असून या संस्थानांतून बोरी ही नदी वहात जाऊन भीमेस मिळते. हिची एक हरणी ही शाखा आहे. या संस्थानांत विहिरी पुष्कळ असून पाणी जवळ व विपुल आहे. नदी कांठची जमीन काळी असून बाकीची काळवट मध्यम प्रतीची आहे. कांहीं ठिकाणीं चुनखडी आढळते. बाकी चांगल्या विटा करण्यासारखीहि माती आढळत नाहीं. हवा पावसाळ्याचा अखेरीस रोगी असते. बाकी हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत उत्तम असते. उष्णमान उन्हाळ्यांत १०८° पर्यंत जातें, व हिंवाळ्यांत तें ६२° पर्यंत खालीं उरतें. पाऊस सरासरी ३० इंच पडतो. इ. स. १८८२ मध्यें २०००० एकर जमीन राखी व जंगल म्हणून राखून ठेवण्यांत आली आहे. बाकी बाभळीशिवाय झाडें नाहींत. कुरल्यास मात्र साग व चंदनाचीं झाडें आहेत. वाघ, चित्ते वगैरे क्रूर पशु आढळत नाहींत. कोल्हे, लांडगे कांहीं आढळतात. शिकारीची इतरांनां बंदी असल्यामुळें हरणें व काळवीट पुष्कळ आढळतात. खाण्यासारखे पक्षीहि फारसे आढळत नाहीं.

लोकवस्ती हिंदु मुसलमान ख्रिस्ती वगैरे असून हिंदूंमध्यें ब्राम्हण, वाणी, लिंगायत, मराठे, कोळी, धनगर, पांचाळ, म्हार, मांग वगैरे जाती आहेत ९००० विणकऱ्यांची संख्या आहे. यापैकीं बहुतेक कोष्टी, लिंगायत, पंचम साळी, मुसलमान वगैरे आहेत.

पाणी पुरवठा बहुतेक विहिरींपासून होतो, व पाण्याखालची जमीन दोन पिकें देते. खरीप पिकांमध्यें बाजरी, तूर, अंबाडी, कापूस हीं मुख्य आहेत व रबीमध्यें बहुतेक ज्वारी पिकते. याशिवाय भात, आळशी, हरवरा, गहूं व ऊंस यांचीहि कांहीं लागवड होते. पूर्वीं संस्थानिकाच्या बागेंत नारळीचीं व पोफळीचीं झाडें पुष्कळ होतीं परंतु पर्जन्याच्या अभावीं हल्लीं ती राहिली नाहींत.

कांहीं गुजराथी व मारवाडी वाणी आणि कांहीं ब्राम्हण सावकारीचा धंदा करतात.

या संस्थानांतून पेनिनशुला रेलवेचा १८ मैलांचा रस्ता गेला आहे. त्यावर अक्कलकोट रोड हें स्टेशन आहे. हें अक्कलकोटपासून ७ मैल असून दरम्यान उत्तम सडक आहे. येथून ज्वारी व कापड, विड्याचीं पानें, मिरच्या बाहेर जातात व गहूं, डाळी, मीठ, वगैरे जिन्नस बाहेरून येतात. अक्कलकोट संस्थानास लागून असलेल्या मोंगलाई मुलुखांत उत्पन्न होणारा माल अक्कलकोट शहरामार्फत बाहेर पाठविला जातो.

येथें लुगडीं, खण, पागोटीं व खादी इत्यादि प्रकारचें कापड तयार होतें. या संस्थानांत सुमारें १२०० माग असून वर्षास पांच लाख रुपयांचा माल तयार होतो. असें सोलापूर गॅझेटियर मध्यें म्हटलें आहे.

इ. स. १८६६ ते १८७१ यांच्या दरम्यान संस्थानची मोजणी व पैमाश केली होती. त्या वेळीं दर एकरीं सारा सरासरी १२ आणे होता. त्यानंतर पुन्हां १८९४ सालीं जमिनीची नवी पाहणी करण्यांत येऊन तेव्हां जमिनीचा धारा ठरला त्यांत ३० वर्षेंपर्यंत बदल करावयाचा नाहीं असें ठरलें. प्रथम कांहीं जमीन ओसाड होती परंतु आतां सर्व जमीन लागवडीखालीं आली आहे.

ब्रिटिश हद्दींतील कायदे योग्य फेरफारानिशीं संस्थानांत लागू करण्यांत आलेले आहेत. संस्थानचा एक दिवाण एक मुख्य न्यायाधीश, एक मामलेदार व दोन महालकरी 'चीफ मेडिकल ऑफिसर' स्टेट ओव्हरसियर पोलीस इन्स्पेक्टर, वॉटर वर्क्स एंजीनियर हायस्कूलचा हेडमास्तर व एज्युकेशनल इन्स्पेक्टर, असे अम्मलदार आहेत. हल्लींच्या राजेसाहेबांच्या बाल्यावस्थेंत गव्हर्नरमेंट कारभारी अशी नवीन जागा करून दिवाणाकडून त्यास चार्ज देवविण्यांत

आला आहे. खुद्द राजेसाहेबास दिवाणी, फौजदारी, मुलकी वगैरेचे पूर्ण अधिकार आहेत. दिवाण हा डिस्ट्रिक्ट आणि सेशनजज्ज व डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट असतो व सर्व खातीं त्याच्या हाताखालीं असतात. न्यायखात्याच्या मुख्य अंमलदारास असिस्टंट सेशनजज्जाचे अधिकार असून शिवाय अपिलाचेहि कांहीं अधिकार आहेत. न्यायाधीश हा पहिल्या वर्गाचा मॅजिस्ट्रेट असून दिवाणी दाव्याचें प्राथमिक कोर्ट त्याचेंच आहे. मामलेदार हा दुसऱ्या वर्गाचा मॅजिस्ट्रेट असून शिवाय तो वर्ग केलेले दिवाणी दावे चालवितो. महालकऱ्यासहि स्थानिक लहान दिवाणी दावे चालविण्याचा अधिकार असून तिसऱ्या वर्गाच्या मॅजिस्ट्रेटाचेहि अधिकार त्यास असतात. दिवाणी व फौजदारी कामाचें सर्वांत वरिष्ठ कोर्ट राजेसाहेबांचें असतें. परंतु त्यांच्या हल्लींच्या अज्ञानावस्थेंत त्यांचे अधिकार पोलिटिकल एजंट व मुंबई सरकार वापरतात; व सेशनजज्जानें दिलेली फांशीची शिक्षा अमलांत यावयास खुद्द मुंबई सरकारची मंजुरी लागते.

या संस्थानांत ४१ शिबंदीचे शिपाई ( अलीगोल ) असून ७१ नक्त पगारी पोलीस व कांहीं गांव पोलीस ( गांव पाटील व शेतसनदी ) असून त्यांस कांहीं पगार नक्त व कांहीं बिनसाऱ्याच्या जमीनीच्या रूपानें मिळतो.

संस्थानचे १८८२–८३ सालचें एकंदर उत्पन्न २३५००० रुपये होतें व त्यापैकीं साऱ्याचें उत्पन्न १४८००० रु. असून लोकलफंड पट्टी ११३०० रु. वसूल झाली होती. १९०३–४ सालीं साऱ्याचें उत्पन्न ३,६००० व एकंदर उत्पन्न ४, ५०,००० झालें.

१८८२–८२ सालीं संस्थानांत एकंदर १९ शाळा होत्या. हल्लीं थोड्याशा वाढल्या आहेत.

१८७१ सालीं पहिला दवाखाना अक्कलकोट येथें स्थापण्यांत आला असून आतां करजगी येतें आणखीहि एक दवाखाना झाला आहे. यांपैकीं करजगीस स. अ. सर्जन व अक्कलकोट येथें असिस्टंट सर्जन असतो. अक्कलकोटचा असिस्टंट सर्जन तोच चीफ मेडिकल आफिसर असतो. या संस्थानांत अक्कलकोट हेंच काय तें मोठें गांव असून अक्कलकोट शिवाय या संस्थानांत चांफळगांव, जेऊर, करजगी, मंगरूळ, नागनसूर, तोलनूर, वागदरि इत्यादि १० गांवें दोन हजारांच्या वर परंतु पांच हजारांच्या आंत लोकवस्ती असलेलीं आहेत.

इ ति हा सः—अक्कलकोट संस्थानच्या स्वतंत्र इतिहासास १८ व्या शतकामध्यें आरंभ होतो. १६ व्या शतकामध्यें या प्रदेशाबद्दल विजापूर व अहमदनगर यांच्यामध्यें एकसारखे तंटे चाललेले असत. १७ व्या शतकाच्या आरंभीं या प्रदेशांत मलिकंबराची जमाबंदी पद्धति सुरू होती यावरून त्यावेळीं हा प्रदेश अहमदनगरच्या राज्यांत असावा.

इ. स. १७१२ मध्यें शाहूनें, १७०७ सालीं पारद गांवीं तेथील पाटलाच्या बायकोनें त्याच्या पायावर घातलेल्या राणोजी लोखंडे या नांवाच्या मुलास आपल्या घरीं आणून त्याचें कुटुंबांतल्या मुलाप्रमाणें पालन पोषण केलें. त्यावर शाहूची इतकी मर्जी होती कीं त्याच्या राहण्याची साताऱ्याच्या वाड्यांत स्वतंत्र व्यवस्था करण्यांत आली व त्याला एक मोठी मनसब देण्यांत येऊन तिच्या खर्चासाठीं ३५ लाखांचा मुलूख तोडून दिला गेला. शाहूची विरुबाई नांवाची एक आवडती राख होती तिचें फत्तेसिंगावर पुत्रवत् प्रेम होतें असें दिसतें. कारण ती मरण पावली तेव्हां तिचें उत्तरकार्य फत्तेसिंगाकडूनच करविण्यांत आलें होतें व यामुळें तिची सर्व जिंदगी व तिच्या हयातींत खर्चासाठीं तोडून दिलेली अक्कलकोट परगण्याचीं जहागिरी कायदेशीर रीतीनें फत्तेसिंगाच्या ताब्यांत आली. अशा रीतीनें फत्तेसिंग हा शाहूचा मानसपुत्र समजला जात असल्यामुळें तो आपल्यास राजा असें म्हणवून घेऊं लागला, व साताऱ्याच्या घराण्याप्रमाणें आपणही अष्टप्रधानाच्या नेमणुका करून त्यानें आपल्या मोठ्या जहागिरींतून या अष्टप्रधानांस जीं इनामें तोडून दिलीं होतीं तीं साताऱ्याचें राज्य बुडाल्यावरहि त्यांच्याकडे थोड्या बहुत प्रमाणांत चालूच होतीं. उदा. त्यानें पेशव्यास अजमासें ५०,००० रुपये उत्पन्नाचा मैंदर्गी परगणा सबंधच्या सबंध इनाम दिलेला होता.

फत्तेसिंग हा कोल्हापुर( १७१८ ) बुंदेलखंड ( १७३० ) भागानगर, कर्नाटक वगैरे ठिकाणच्या स्वाऱ्यांत स्वतः हजर होता. १७४९ त शाहू निवर्तल्यावर तो अक्कलकोट येथें जाऊन राहिला, व तेथें तो १७६० सालीं मरण पावला ( फत्तेसिंग भोंसले पहा ). फत्तेसिंगांच्या मागून त्याचा भाऊ पारद येथील पाटील बावाजी लोखंडे याचा पुत्र शहाजी हा गादीवर बसला. याला फत्तेसिंगानें पांच वर्षांपूर्वी पेशव्यांच्या मंजुरीनें दत्तक घेतलें होतें. फत्तेसिंग वारल्यावर त्रिंबक हरी पटवर्धन शहाजीस बरोबर घेऊन पेशव्याकडे आला. अक्कलकोटच्या जहागिरीची ही भानगड पुढें दोन तीन वर्षें चालू होती. अक्कलकोटकरांकडे बाबूजी नायकाचें कर्ज येणें होतें, त्यासाठीं जहागिरीची वहिवाट आपल्या हातीं असावी अशी नायकाची खटपट होती. ती मान्य न करतां पेशव्यानें त्रिंबक हरीच्या सल्ल्यानें जहागिरीचा सर्व अधिकार शहाजीस दिला. यामुळें नायकानें शहाजीच्या मुलखांत दंगा उसळून त्रास देण्यास आरंभ केला. शहाजी अधिकारारूढ झाला तेव्हां फत्तेसिंगाच्या मोठ्या जहागिरीपैकीं फक्त अक्कलकोटचीच जहागीर त्याच्याकडे राहिली होती. थोरल्या माधवराव पेशव्यांनीं हैदरावर ज्या स्वाऱ्या केल्या त्यांत शहाजी भोंसल्याचें पथक जात असे. तथापि अक्कलकोटकर भोंसले हे पेशव्याच्या बरोबरीचे सरदार असल्यामुळें ज्या स्वारींत पेशवे स्वतः जात नसत त्या स्वारींत हजर राहण्याची त्यांच्यावर जबाबदारी नसे. शहाजी १७८९ त मरण पावला व त्याच्या मागून त्याचा पुत्र फत्तेसिंग ऊर्फ आबासाहेब हा गादीवर बसला. शहाजीस तुळजाजी नांवाचा आणखी एक मुलगा होता. त्याचें

सयाजी लोखंडे

- १ राणोजी उर्फ फत्तेसिंह भोसले ज. सु. १६९८, मृ १७६०
- बाबाजी
  - २ शहाजी ( फत्तेसिंहास दत्तक )१७६०.१७८९
    - ३ फत्तेसिंह आबासाहेब १७८९. १८२३ ( १८२२ ? )
      - ४ मालोजी ज. सु. १८१३ ( १८२२ ? ) १८२३–१८२८
        - ५ शहाजी ( ज. १८२२ ) १८२८–१८५७
          - ६ मालोजी ( मृ. १८७० ) १८५७–१८६६
            - ७ शहाजी ( ज. १८६६ ) १८९१–१८९६
              - फत्तेसिंह ऊ. बापूसाहेब १९१६–१९२३
                - विजयसिंह ( ज. १८१६ )
                - जयसिंह ( ज. १८२३ )
        - फत्तेसिंह ज. १८२६
          - सुभानजी ( संभाजी )
          - तुळाजी
    - तुळजाजी
      - शहाजी ऊ. नानासाहेब
      - शिवाजी ऊ. राजासाहेब
      - संभाजी ऊ. भूम्या साहेब

संदर्भ ग्रंथ—सिलेक्शन फ्रॉम स्टेट पेपर्स; इंपीरियल गॅझेटियर; मराठी रियासत; बाँबे गॅझेटियर; सोलापूर जिल्हा, ग्रँट डफ;

फत्तेसिंह I

- शहाजी I
  - ( अक्कलकोट घराणें ) फत्तेसिंह II
    - मालोजी I
      - शहाजी II
        - मालोजी II
          - शहाजी III ( मृ. १८९६ )
            - * फत्तेसिंह III ( दत्तक )
              - विजयसिंह
              - जयसिंह
      - फत्तेसिंह
        - तुळाजी
        - संभाजी
  - ( कुर्लें घराणें ) तुळजाजी
    - शिवाजी
      - मालोजी
        - शिवाजी (दत्तक)
          - तुळजाजी
    - शहाजी
      - भवानजी
        - गणपतजी
          - * सयाजी ( अक्कलकोट घराण्यांत शहाजी III यानां दत्तक )
      - शिवाजी
        - शहाजी
      - फत्तेसिंह
      - यशवंतजी
        - तुळजाजी
        - संभाजी
        - प्रतापसिंह
    - संभाजी
      - तुळजाजी
        - शिवाजी (मालोजीसदत्तक)
          - भवानजी
          - मालोजी
        - संभाजी

व फत्तेसिंगाचें भांडण होऊन तुळजाजीस फत्तेसिंगानें अटकेंत ठेविलें पण लवकरच तुळाजाजी पेशव्याकडे पळून गेला व त्यानें आपल्या भावाविरुद्ध पुण्याच्या दरबारीं तक्रार केली. थोड्याच दिवसांनीं सदाशिवराव भाऊ माणकेश्वर यांच्या मध्यस्थीनें भावाभावांत सलोखा होऊन तुळजाजीनें सातारा जिल्ह्याच्या खटाव तालुक्यांतील कुळा वगैरे ८१०० रुपये उत्पन्नाचीं गांवें घेऊन १८०७ सालीं स्वस्थ बसण्याचें कबूल केलें. सातारचें राज्य इंग्रजांनीं घेतल्यावर ३ जुलै १८२० रोजीं फत्तेसिंगाबरोबर ब्रिटिश सरकारनें तह करून त्याचा मुलूख त्यास दिला. १८२२ मध्यें ( एप्रील १८२३ ? ) फत्तेसिंग मरण पावला व त्याचा पुत्र मालोजी हा गादीवर बसला. १८२७ सालीं इंग्रजांनीं मराठे संस्थानिकांची यादी केली तेव्हां अक्कलकोटचें उत्पन्न पुढें दिल्याप्रमाणें होतें.

| | |
|---|---|
| अक्कलकोट परगणा | २,००,००० |
| सोलापूरचा मोकासा | ४,००० |
| पुणें शहराच्या जकातीवर मोकसाबाब | १०,००० |
| सातार प्रांतींच्या ८ जिल्ह्यांची मोकासबाब | ११,००० |
| | २२५००० |

अक्कलकोटच्या भोंसल्यास पूर्वी निजामाच्या मुलुखांत सुमारें २५००० रुपये मोकासबाब वसूल करण्याचा एक हक्क होता. पुढें अक्कलकोटकरांचा ब्रिटिशांशीं तह झाला तेव्हां इंग्रजांनीं भोंसल्याकडून तो हक्क काढून घेतला. निजामाकडून भोंसल्यास ही मोकासबाबीची रक्कम क्वचितच मिळत असे, पण त्यामुळें भोंसल्यास निजामाजवळ त्याची रक्कम मागण्यास व प्रसंगविशेषीं निजामाच्या मुलुखांत स्वारी करण्यास सबब मात्र सांपडत नसे.

इ. स. १८२८ मध्यें मालोजी निवर्तल्यावर त्याचा ८ वर्षांचा मुलगा शहाजी हा गादीवर बसला. तो अज्ञान असल्यामुळें सातारचा राजा संस्थानचें काम पाहूं लागला. परंतु १८२९ सालीं त्यानें कांहीं बाबतींत फरक केल्यामुळें बोरगांव येथील सरदेशमुख शंकरराव यांच्या नेतृत्वाखालीं रयतेनें बंड केलें तेव्हां सोलापूर व अक्कलकोट येथून कांहीं ब्रिटिश फौज पाठविण्यांत आली. परंतु बंडखोरांनीं दाद दिली नाहीं. नंतर तपास केल्यावर रयतेचें म्हणणें बरोबर दिसून आल्यामुळें सातार्‍याच्या राजाकडून कारभार काढण्यांत येऊन तो कॅप्टन जेमसन नांवाचा रीजंट ( प्रतिनिधि ) नेमण्यांत येऊन त्याच्याकडे सोंपविला. इ. स. १८४९ त सातारा खालसा झाल्यावर अक्कलकोटकर हे ब्रिटिशांचे मांडलिक झाले. इ. स. १८५७ मध्यें शहाजी निवर्तल्यावर त्याचा पुत्र मालोजी हा गादीवर बसला. १८६६ मध्यें मालोजीस गैरकारभाराबद्दल पदच्युत केलें व तो १८७० त मरण पावला. मालोजी मेला तेव्हां त्यास १८६७ सालीं झालेला लहान मुलगा असून त्याचें नांव शहाजी असें होतें. हा त्या वेळीं अल्पवयी असल्यामुळें इ. स. १८८१ पर्यंत ब्रिटिश सरकारच संस्थानची सर्व व्यवस्था पहात होतें. त्या वर्षीं शहाजीस सर्व अधिकार देण्यांत आले, परंतु तेंहि पुढें १८९८ सालीं तो निपुत्रिकच मरण पावला, तेव्हां त्याच्या स्त्रीनें ब्रिटिश सरकारच्या संमतीनें पहिल्या शहाजीचे वंशज कुर्ल्याचे जहागीरदार गणपतजी भोंसले यांचे पुत्र फत्तेसिंगराज यास दत्तक घेतलें. हे वयांत येईपर्यंत पुन्हा पूर्ववत् व्यवस्था करण्यांत आली. पुढें हे वयांत आल्यावर १९१६ सालीं त्यांच्या हातीं अधिकारसूत्रें देण्यांत आलीं, या राजाच्या कर्तृत्वाविषयीं लोकांची अपेक्षा बरीच होती परंतु १९२३ सालीं पुणें येथील ससून इस्पितळांत उपचारासाठीं व शस्त्रक्रियेसाठीं गेले असतां औषधाच्या ( बेरियमसलफेट ) ऐवजीं विषारी द्रव्य ( बेरियम सलफाईड ) पोटांत जाऊन त्यांना अपमृत्यु आला.

अक्कलकोटकर संस्थानिक हे पहिल्या प्रतीचे सरदार असून त्यांस दत्तक घेण्याचा अधिकार आहे. त्यांना सलामीचा मान नाहीं. त्यांना खंडणी द्यावी लागत नाहीं. परंतु १८२० च्या तहांत संस्थानिकांनीं ब्रिटिश सरकारांत घोडेस्वारांचें पथक आपल्या खर्चानें ठेवावयाचें अशी एक अट होती ती १८६८ सालीं बदलून तिच्याबद्दल फक्त रुपये द्यावयाचें ठरल्यामुळें ते ब्रिटिश सरकारास दरसाल १४५९२ रुपये देत असतात. सध्यां फत्तेसिंग राज यांच्या मागून त्यांचे पुत्र विजयसिंह हे अक्कलकोट संस्थानचे वारस आहेत. पण यांचें वय हल्लीं अवघें ८ वर्षांचें असल्यामुळें ते वयांत येईपर्यंत इंग्रजांनीं त्या संस्थानाचा कारभार चालविण्याकरितां आपल्याकडून कारभारी नेमला आहे.

**अक्कलकोटचे स्वामीमहाराज**—हे गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत होऊन गेलेले महाराष्ट्रीय साधुपुरुष कधीं व कोठें जन्मले याविषयीं माहिती मिळत नाहीं. अक्कलकोटास स्थायीक होण्यापूर्वी ते मंगळवेढ्यास कांहीं वर्षें होते. तेथें दिगंबरबावा या नांवानें लोकांस स्वामी अवगत होते पण शिष्यसंप्रदाय किंवा दैवी अंश असल्याविषयीं प्रसिद्धी मुळींच नव्हती म्हटलें असतां चालेल. उलट पुष्कळ जण त्यांना वेडा म्हणत. स. १८५७ मध्यें स्वामी अक्कलकोटास आले. तेथेंहि बरीच वर्षें, आपल्या गांवांत कोणी महान् साधु आहे अशी फार थोड्या अक्कलकोटकरांस कल्पना होती. हैदराबाद संस्थानांतील माणिकनगर ( हुमणाबाद ) चे माणिकप्रभु समाधिस्थ झाल्यावर हे स्वामीमहाराज प्रकट झाले म्हणतात.

स्वामी अक्कलकोटास देहावसान होई पावेतों होते. त्यांची कीर्ति जिकडेतिकडे पसरल्यावर राजेरजवाडे धरून सर्व भाविक लोक अक्कलकोटची यात्रा करूं लागले. त्यांच्या भक्तांत सर्व जातींचे व दर्जाचे लोक आहेत. स्वामींची राहाणी व वागणूक पुष्कळांस चमत्कारिक वाटे पण त्यांत पूर्ण विरक्तता भरलेली असे. ते कधींच कोणाच्या तंत्रानें वागले नाहींत व कोणाला कधीं त्यांनीं धड उत्तर दिलें नाहीं. मात्र ते जें कांहीं बोलता



नं. १९ वें लेणें–दर्शनीभाग,

तें त्यांच्या दर्शनास येणाऱ्यांच्या मूक प्रश्नाला उत्तर म्हणून तंतोतंत जुळे असें सांगतात. त्यांची वरदास्त राजाला शोभेशीच असे, तरी राजविलासांत ते कधींच गुरफटलेले दिसत नसत.

स्वामींनीं दाखविलेल्या चमत्कारांच्या गोष्टी पुष्कळ सांगतात. अक्कलकोट येथील एका कडुलिंबाच्या झाडाचीं पानें त्यांनीं जीं गोड करून टाकिलीं तीं अद्यापि तशींच लागतात असें भाविक लोक सांगतात.

शके १८०० चैत्र वद्य १२ स स्वामी 'निजानंदीं निमग्न' झाले. समाधीच्या जागीं त्यांचें स्मारक बांधलें आहे.

**अक्कादेवी**—कल्याणीच्या पश्चिम चालुक्य राजघराण्यांतील दुसऱ्या जयसिंहाची वडील वहीण. हिचा उल्लेख बऱ्याच कागदपत्रांतून व अंकित लेखांतून सांपडतो, त्यावरून ही सुप्रसिद्ध व्यक्ति असावी असें साहजिक अनुमान निघतें. तिला "गुणद—वेडंगी" (सद्गुणांची नवलाई) व "एकवाक्ये" (एकवचनी) अशीं विशेषणें लावलेलीं आहेत व "लढाईंत आणि शत्रुपक्षीय राजांना मारण्यांत प्रतिभैरवी" असें तिचें वर्णन केलें आहे. इ. स. १०२१ किंवा १०२२ मध्यें दुसऱ्या जयसिंहाच्या सार्वभौमत्वाखालीं किसुकाड (सप्तती) वर ती राज्य करीत होती (इं. अँ. पु. १८. पा. २७५), पुढें पहिल्या सोमेश्वराच्या अमदानींत सुद्धां ती अधिकारारूढ असलेली दिसते. कारण इ. स. १०४७ च्या एका लेखांत बेळगांव जिल्ह्यांतील गोकागे (गोकाक) च्या किल्ल्याला वेढा देऊन बसलेली आपण तिला पाहतों (विजापुर जिल्ह्यांतील अरसीबीडी येथील शिलालेख). इ. स. १०५० किसुकाड (सप्तति), तोरगरे (पद) आणि मासवाडि (एकशतचत्वारिंशत्) या मुलुखांवर तिचें राज्य होतें (धारवड जिल्ह्यांतील सूडि गांवचा शिलालेख). पुन्हां इ. स. १०५३ किसुकाड (सप्तति) वर तिच्या वर्चस्वाचा उल्लेख आढळतो (अरसीबीडी येथील दुसरा एक शिलालेख) व त्याच लेखांत विक्रमपुर (हल्लींचें अरसीबीडी गांव, हुनगुंद तालुका, विजापुर जिल्हा) ही तिची राजधानी असल्याचें ध्वनित होतें. इ. स. १०६६ तली जी एक नोंद आहे तींत बनवासी (द्वादश-सहस्र) आणि पानुंगल (पंचशत) यांचा अधिपति, कादंब महामंडलेश्वर तोयिमदेव याची मातोश्री म्हणून अक्कादेवीचें नांव आहे (धारवाड जिल्ह्यांतील होत्तुर गांवचा शिलालेख). त्यावरून तिचा नवरा हानगलच्या कादंबांपैकीं असावा असें दिसतें; पण त्याचें नांव मात्र सांपडत नाहीं.

[बाम्बे ग्या.—दि डिनॅस्टीज ऑफ दि कॅनॅरीज् डिस्ट्रिक्स ऑफ बॉंबे—पु. १ भा. २ पा. ४९५]

**अक्काबाईचा फेरा**—वडील बहिणीला "अक्का" म्हणण्याची चाल आहे. लक्ष्मीची वडील वहीण (अक्का) ग्रहदशा ही आहे. यावरून अक्काबाईचा फेरा म्हणजे वाईट ग्रह येणें, दारिद्र्य प्राप्त होणें, असा अर्थ आपटे कृत "मराठी भाषेचे संप्रदाय आणि म्हणी" यांत दिला आहे. पण यास आधार उपलब्ध नाहीं. याचप्रमाणें अकाबाईचा पाया; अक्काबाईची दया (दारिद्र्य); अक्काबाईचें बाळ (कुलक्षणी बाळ) इत्यादि म्हणी अक्काबाई शब्दावरून आल्या आहेत.

**अक्किवट**—मुंबई इलाखा, बेळगांव जिल्हा. चिकोडीच्या नैऋत्येस सुमारें १२ मैलांवर हें खेडें आहे. यास इ. स. १७७७ सालीं तासगांवचा परशुरामभाऊ यानेंवेढा दिला होता. त्यावेळीं गांव लढविणारे दोघे भाऊ हल्ल्यांत कामास आल्यामुळें व दुष्काळाची तीव्र आंच लागूं लागल्यामुळें गांव शरण आला. इ. स. १८२७ सालीं कोल्हापुर सरकारास हा गांव ब्रिटिशांच्या स्वाधीन करणें भाग पडलें; कारण या गांवांत दरोडेखोरांची टोळी रहात असून आसपासच्या ब्रिटिश हद्दींतील खेड्यांस ती सतत त्रास देत असे. येथील किल्ला लष्करी दृष्टीनें चांगला नव्हता. [बेळगांव ग्या.]

**अक्चा**—'अफगाण तुर्कस्तान'मधील याच नांवाच्या जिल्ह्याचें मुख्य गांव. उ. अ. ३६°५५' व पू. रे. ६६°१०' समुद्रसपाटीपासून उंची १०८८. या गांवास तटबंदी असून किल्लाही आहे. येथें अफगाण शिबंदी असते. उन्हाळ्यांत येथील हवा रोगट असते. येथें बराच मोठा व्यापार चालतो. बुखाऱ्याचे कारवान येथें व्यापाराकरतां येत असतात. [इं. ग्या.५]

**ॲक्टन**—ॲक्टन, हा इंग्लंडांत मिडलेक्सेच्या ईलींग पार्लमेंटरी विभागांतील शहरी भाग (Urban district) असून लंडनच्या जवळ, सेंट् पॉल कॅथेड्रलच्या पश्चिमेस ९ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें चाळीस हजार आहे. सध्यां याचें स्वरूप निव्वळ अर्वाचीन लंडनच्या नगरोपान्त भागासारखें आहे. याच्या नांवाची व्युत्पत्ति 'ओकटाऊन' अशी देतात, कारण पूर्वी या भागांत विस्तीर्ण ओकांचें जंगल होतें. पुरातन काळापासून ही जमीन लंडनच्या बिशपच्या अधिकारांतील होती. तिसऱ्या हेन्रीचें येथें निवासस्थान होतें. कॉमनवेल्थच्या वेळीं ॲक्टन येथें प्युरिटन लोकांचें ठाणें होतें. फिलिप नाय (मृत्यु १६७२) रेक्टर होता; रिचर्ड बॅक्स्टर, सर मॅथ्यु हेल, (लॉर्ड चीफ जस्टिस्), कादंबरीकार हेन्री फिल्डींग, व वनस्पतीशास्त्रज्ञ जॉन लिंडले, हीं येथील प्रमुख रहिवाशांचीं नांवें आहेत. ॲक्टन येथील क्षारयुक्त पाण्याच्या विहिरीची १८ व्या शतकांत बरीच ख्याति होती.

**ॲक्टिअम**—अकरनेनिया (ग्रीस) चे उत्तरेस, आर्टा आखाताचे मुखाजवळ असलेल्या भूशिराचें जुनें नांव आहे. या भूशिरावर अपोलो ॲक्टिअसचें प्राचीन देवालय होतें. तें ऑगस्टस यानें वाढवून त्या ठिकाणीं ॲक्टिअमचे येथील लढाईचे स्मरणार्थ पंचवार्षिक खेळ सुरू केले. ॲक्टिअम हें प्रथमतः कॉरिन्थ येथील वसाहतवाल्यांकडे होतें; अपोलो ॲक्टिअसची पूजा त्यांनींच सुरू केली असावी असा तर्क आहे. इ. स. पूर्वी तिसरें शतकांत तें अकरनेनिया

येथील लोकांचे ताब्यांत गेलें. आगस्टस या पहिल्या रोमन बादशाहानें मार्क अन्टनीवर मिळविलेल्या विजयाबद्दल (ख्रि. पू. ३१ ) हें ठिकाण प्रसिद्ध आहे.

**अक्रा**—वायव्येकडील प्रांत बन्नु जिल्ह्यांतील एक प्राचीन ठिकाण, उ. अ. ३३° व पू. रे. ७०° ३६'. बन्नु गांवाजवळच हें ठिकाण असून काबूलशहाच्या मुलीचा मुलगा रुस्तुम याचें मुख्य ठिकाण होतें. रुस्तुमची बहीण बन्नु हीस स्त्रीधन म्हणून हा भाग मिळाला होता. तिच्यावरूनच या भागास बन्नु हें नांव मिळालें आहे. ग्रीक आणि पश्चिम आशियांतील तऱ्हेनें जडावाचें काम केलेलीं माणकें येथें सांपडलीं आहेत.

**अक्रा**—(आफ्रिकन) आफ्रिकेच्या पश्चिम किनाऱ्यावर गिनी आखाताजवळ "गोल्ड कोस्ट" नांवाची ब्रिटिश वसाहत आहे. त्यांत अक्रा हें मुख्य शहर व बंदर आहे. त्यांतील लोकसंख्या १० हजार त्यांपैकीं १५० यूरोपियन आहे. हें गांव सेंटजेम्स, केव्हेकुर व खिश्चवर्ग या तीन किल्ल्यांभोंवतीं बसलेलें आहे. ह्या किल्ल्यांपैकीं दुसरा व तिसरा अनुक्रमें डच व ड्यानिश लोकांच्या ताब्यांत होता. पण ते किल्ले इंग्रजांस मिळाले. येथें कोकोचे मळे आहेत.

**अक्रूर**—आयुपुत्र नहुषराजा याच्या यदुनामक पौत्राच्या कुलांतील सात्वत वंशांतील, ( हरिवंश पुराणाप्रमाणें १.३४ ) क्रोष्टूचा वंशज जो वृष्णि त्याचा पौत्र अक्रूर होय. याच्या बापाचें नांव श्वफल्क असें असल्यामुळें याला श्वफल्कि असेंहि म्हटलें आहे. याच्या रत्ना, उग्रसेना, अश्विनी इत्यादि स्त्रिया होत्या. याला उग्रसेनेपासून सुदेव व उपदेव असे दोन पुत्र झाले. हा वसुदेव व कृष्ण यांच्या समकालीन होता. यानें आपली एक कुमारी या नांवाची बहीण वसुदेवास दिली होती. कंसानें रामकृष्णांना मथुरेस आणण्यासाठीं यालाच गोकुलांत पाठविलें होतें. याचा स्यमंतक मण्याशीं फार संबंध येतो.

सूर्योपासना करणाऱ्या सत्राजिताला हा स्यमंतक मणि सूर्यानें बक्षिस दिला होता. सत्राजितानें तो आपल्या भावास दिला. त्याजवळ स्यमंतकाबद्दल कृष्णानें याचना केली होती. परंतु तो त्याला ( कृष्णाला ) मिळाला नाहीं. अक्रूरासहि तो मणि पाहिजे होता. त्यानें भोजाधिपतिशतधन्व्याकडून सत्राजितास मारिलें व स्यमंतक मणि मिळविला. शतधन्व्यानें सत्राजितास मारल्याची हकीकत कृष्णास समजतांच तो शतधन्व्यावर चालून गेला. शतधन्व्यानें मदतीसाठीं अक्रूराची वाट पाहिली. परंतु कृष्णाशीं प्रत्यक्ष विरोध होईल म्हणून अक्रूर शतधन्व्याच्या मदतीस आला नाहीं. शेवटीं कृष्णानें शतधन्व्याला मारिलें. परंतु स्यमंतक मणि यानें अक्रूरास दिला असून अक्रूरानेंच शतधन्व्याकडून सत्राजिताचा वध करविला ही गोष्ट कृष्णाला समजली व अक्रूर द्वारकेंतून निघून गेल्याचेंहि समजलें. परंतु आपल्या ज्ञातीमध्यें भेद वाढेल म्हणून कृष्णानें त्याची उपेक्षा करून त्याला परत द्वारकेंत बोलावून आणिलें.

**अक्रोड**.—संस्कृत अक्षोट इतर नांवें आखरोट, आखोर कोल, दून इत्यादि.

हें झाड ग्रीस, आर्मिनिया व अफगाणिस्तानदेशांतील पर्वतांवर, अफगाणिस्तानपासून भूतानपर्यंतच्या भागांत विशेषतः हिमालयाच्या वायव्य भागांत त्याचप्रमाणें उत्तर ब्रह्मदेशांतील टेंकड्यांवर, आणि खासिया टेकड्यांवर सांपडतें. क्वचित् समशीतोष्ण प्रदेशांतील उद्यानांतही हें झाड येऊं शकतें.

कित्येक ठिकाणच्या तृतीयकोत्तरकालीन थरामध्यें या झाडाचे किंवा अगदीं याच्या सारख्याच थरांचे अवशेष आढळून येतात. त्यावरून हें झाड पूर्वीं व हल्लीं बऱ्याच विस्तृत भूभागांत वाढत होतें असें दिसतें. हिंदुस्थानांत या झाडाची लागवड अति पुरातन कालापासून होत असून येथील प्राक्कालीन लोकांना या झाडाचे उपयोगही माहित होते.

उ प यो ग—या झाडाचा महत्वाचा भाग म्हटला म्हणजे याचें लांकूड होय. तें दिसण्यांत सुरेख व मवूजत; असतें त्यामुळें नकशीदार खणाच्या पेट्या, बंदुकीचे दस्ते करण्याच्या कामीं या लांकडाचा अत्यन्त उपयोग होतो. काश्मीरमध्यें आणि पंजाबांत, या लांकडावर कांतकाम व खोदकाम करून, निरनिराळ्या शोभेच्या वस्तू तयार करतात. या झाडाच्या बुंध्यावरील मोठ्या गांठी अत्यंत मौल्यवान असतात. नकशीदार खणांच्या पेट्या करण्याच्या कामीं या गांठींच्या लांकडाचाच उपयोग होतो. कांहीं वर्षांमागें या गांठींची फ्रान्समध्यें अत्यंत मोठा निर्यात होत असे. या झाडाचीं पानें व फळाचें टरफल स्तंभक असतात, व त्यांचा औषधाकडे व रंगविण्याकडे थोडा थोडा उपयोग होतो. या झाडाच्या कच्च्या फळांचा लोणचें करण्याकडे उपयोग होतो. या फळझाडावर त्याच्या बिया फार स्वादिष्ट लागतात. फ्रान्समध्यें या बियांपासून उत्तम प्रकारचें तेल बऱ्याच मोठ्या प्रमाणांत काढण्यांत येतें. अक्रोडाची एक मोठ्या फळाची जात असते तिचा मगज उपयोगी पडत नाहीं. पण तिच्या कवचाच्या, फ्रेंच लोक, दागिन्यासाठीं पेट्या करितात. या झाडाच्या सालीचा हिंदुस्थानांत औषधाच्या कामीं व दांत स्वच्छ करण्याकडे उपयोग करितात. याचें फळ पौष्टिक आहे यामुळें काश्मीर वगैरे प्रांतांतून याची फार मोठी निर्यात होते. फळांतील मगजापासून चांगलें तेल निघतें व साल कातडी कमावण्याच्या व रंगविण्याच्या उपयोगीं पडते. याच्या शाखांचा व पानांचा जनावरांस वैरणाच्या जागीं उपयोग करतात. अक्रोडाचें लांकूड दर घनफूटास ४० पौंड प्रमाणें वजनांत भरतें.

हें झाड मोठ्या आकाराचें असून यास एकआडएक देंठ असलेलीं व चिंच, गुलाब, कढीनिंब इत्यादि झाडांच्याप्रमाणें पिच्छवत् विभागलेलीं संयुक्तपणें येतात. या झाडांतून विपुल

व सुवासिक चीक निघतो. गळून पडलेल्या पानांमुळें फांद्यास पडलेले खांचखळगे इतर झाडांच्या मानानें बरेच मोठे असतात. पर्णाच्या कांखेंत म्हणजे पान व फांदी यांच्यामधील कोणांत बहुधा एकाच्या ऐवजीं अनेक कोंब फुटतात; व पहिल्या कोंबापासून तयार झालेला फणगडा थंडीनें जळून गेला, तर बाकीच्या कोंबांपैकीं एखादा वाढीस लागून तो मेलेल्या फणगड्याची जागा भरून काढतो. अक्रोडाचें फूल पोपया, भोपळा इत्यादींच्या फुलांप्रमाणें एकलिंगी व एकोकसीभूत आहे. म्हणजे त्याचें फूल स्त्रीकेसर किंवा पुंकेसर यांपैकीं कोणता तरी एक धारण करतें, व एरंडाप्रमाणें स्त्रीपुष्पें आणि नरपुष्पें हीं एकाच झाडावर पण निरनिराळीं येतात. आधल्या वर्षाच्या फणगड्यावरील मांजराच्या शेंपटीसारख्या जाड पुष्पसंनिवेशांतून शेंकडों पुंकेसर बाहेर पडून ते नूतन वर्षाच्या वाढींतील लहान लहान अग्रस्थ मंजिऱ्यांतून असलेल्या तुरळक स्त्रीपुष्पांत गर्भाधान करतात. नरपुष्पांत पुष्पासन हें ज्याच्या कक्षेंतून तें उद्भवतें त्या पुष्पोपांगणालगतच असतें. यामुळें पुष्पासन हें क्षितिजसमांतर राहून फुलें क्षितिजसमांतर वाढणाऱ्या देंठांच्या वरील भागीं ठेवल्याप्रमाणें दिसतात. परिकोश हा पांच सहा हिरवसर रंगाच्या पालिकांचा बनलेला असून त्यांत बऱ्याचशा पुंकेसराचा झुबका असतो. हा पुंकेसर म्हणजे ज्याच्या बाजूवर दोन लांबोळ्या ग्रंथींचा परागकोश व शेंड्यास आणखी एक लांबोळी ग्रंथि असते असा एक आंखूड तंतु असतो. नरपुष्पांत सामान्यतः अंडाशयाचा मागमूस दिसत नाहीं; तथापि क्वचित् प्रसंगीं अपवादादाखल एखादा तयार झालेला आढळून येत नाहीं असें नाहीं.

स्त्रीपुष्पांतील पुष्पासन पेल्याच्या आकाराचें असून अंडाशय त्यासच जोडून असतो व त्याच्या वरच्या भागास एक उपपर्ण व दोन अल्पोपपर्णें असतात. परिकोश प्रांतभागांतून फुटतो व त्याला चार पालिका असतात. अंडाशय एकपेशीय असून तो पुष्पासनीय नलिकेंत असतो व त्यावर एक आंखूड परागवाहिनी व दोन लहान लहान पुष्पयोनीच्या शाखा असतात. अंडाशयाच्या तळापासून एकटें बीजांड ताठ वर आलेलें असतें. अक्रोडाचें फळ हें एक प्रकारें अष्टिवर्गांतील म्ह० आंत कोय व बाहेरून गीर असलेल्यांपैकीं फळ असून त्याचें भरींव टरफल म्हणजे प्रसृत पुष्पासनीय नलिका द्विदल अठळी म्हणजे दोन शिंवें होत. बियेंत मगज नसतो, पण कांहीं विलक्षण रीतीनें कुसमडलेल्या दोन मोठमोठ्या दाळिंब्या असून त्यांमध्यें कोंब झांकलेला असतो. ह्या कोंबाच्या पानांत या पूर्वावस्थेंत देखील संयुक्तपर्णाच्या खाणाखुणा दृष्टीस पडतात.

अक्रोडाच्या झाडाला खोल रेताड चिकणमातीची जमीन किंवा चुनखडीचा गादा लागतो. अथवा जिच्या खालीं रेंवडा आहे अशा कठीण चिकणमातीच्या जमिनीवरहि तें वाढूं शकतें. यास हवा आणि प्रकाश मुबलक लागतो. या झाडाचा प्रसार बियांच्या साहाय्यानें होतो; परंतु जेव्हां विशिष्ट जातींची वाढ करावयाची असते तेव्हां कलम लावण्याची पद्धति स्वीकारतात. पहिल्या हिंवाळ्यांत रोपास थंडीची भीति असते. झाडांचे माथे निसर्गतःच बनत असल्यामुळें त्यांस कलम करण्याची आवश्यकता नसते; केवळ गुंतागुंतीनें एकमेकींच्या वाढीस अडथळा करणाऱ्या फांद्या तोडल्या म्हणजे झालें. बियांपासून तयार झालेल्या झाडांपासून तीं वीस वर्षांचीं झाल्याशिवाय उत्पन्न येत नाहीं. फळें येतात तीं आधल्या वर्षाच्या फांद्यांच्या शेंड्यांस येतात व म्हणून झाडांवरील फळें काढतांना कोवळ्या फांद्यांस इजा न होऊं देण्याची खबरदारी घेतली पाहिजे.

[ संदर्भ ग्रंथ—वॅट—कमर्शिअल प्रॉडक्ट्स; व ब्रिटानिका. ]

**अखलकोप**—हें सुमारें तीन हजार लोकवस्तीचें गांव अष्ट्याच्या ईशान्येस ४ मैल व तासगांवच्या पश्चिमेस ११ मैल आहे. हें गांव कृष्णानदी ज्या ठिकाणीं पश्चिमेकडून दक्षिणेकडे वळसा घेते त्या ठिकाणीं उजव्या तीरावर आहे. यांतून दुसऱ्या तीरावर असलेल्या भिलवडीखेड्यास कृष्णानदीच्या पुलावरून जातात व तासगांव आणि अष्ट्याकडे जाण्यास कच्चा रस्ता आहे. कृष्णानदीची काळी माती यांत असल्यामुळें हें खेडें फार सुपीक आहे व यांत शेतकीची जमीन फार आहे. यांत दत्तात्रेय आणि म्हसोबा यांचीं दोन देवळें आहेत. दत्तात्रेयाच्या देवळांत तीन वेळां, मार्गशीर्ष पौर्णिमेस, माघांत कृष्णपक्षांतील पंचमीस, व आश्विनांत द्वादशीस यात्रा भरते. दत्तात्रेयाचें देऊळ अखलकोपच्या देशपांड्यांनीं पहिल्यानें बांधिलें व रा. कृष्णराव त्रिंबक बापट यांनीं ( हे त्या वेळेस वळव्याचे मामलेदार होते ) सन १८६० त पुन्हां बांधिलें. देवळांत दत्ताच्या पादुकांची स्थापना केलेली आहे. देवस्थानाकडे ११ रु० १२ आणे साऱ्याची जमीन लावून दिली आहे. अखलकोपांतील व जिल्ह्याच्या दुसऱ्या भागांतील व्यापारी आणि शेटसावकार या देवस्थानास द्रव्यद्वारा किंवा अन्य तऱ्हेनें मदत करितात. यांत म्हसोबाचें जें देऊळ आहे, तें मूळ गणपतीचें होतें, असें कृष्णामाहात्म्यांत सांगितलें आहे. त्यांत एप्रिल महिन्यांत यात्रा भरते, व यात्रेकरूंत मांग, रामोशी व मराठे यांचीच संख्या फार असते. म्हसोबाच्या देवळाकडे ज्या इनाम जमीनी लाविल्या आहेत, त्यावर सरकारपट्टी १३० रु. आहे व त्यांत सुमारें ५०० रु० चें उत्पन्न होतें. [ बांबे ग्या. ]

**अखा**—ब्रह्मदेशाच्या अगदीं पूर्वेकडील भागांत शान नांवाचीं संस्थानें आहेत त्यांच्या पठारावर राहणारी ही एक रानटी जात आहे. या संस्थानांत यांची लोकवस्ती सुमारें सवीस सत्तावीस हजार आहे. त्यांच्या भाषेवरून ते तिबेटी ब्रह्मी असावेत असें दिसतें. यांचा चिनी लोकांशीं संबंध पुष्कळ दिवसांपासून असून कधीं कधीं त्यांचा यांचा लग्नव्यवहारहि होतो. चिनी लोकांपेक्षां हे थोडें उंच असून वर्णानें देखील काळे आहेत. हे कापूस व अफूचीं बोंडें यांची लागवड करतात. हे कुत्रे खाण्यांत प्रसिद्ध आहेत. यांचा धर्म भुतांची व पूर्व-

जांची पूजा करणें हा असून ते मृतांचीं श्राद्धें करतात. मृतांस पुरण्यांत येतें, व त्यावेळीं टोणगा कापतात. ( इं. गॅ. ५ )

**अगमुदैयन्**—सर्व तामिळ प्रदेशांतून ही जात दिसते. मरवन् आणि कल्लन् या जाती अगमुदैयनांच्या वर्गांत मोडतात. अगमुदैयनांचा वरील दुसऱ्या दोन्हीपेक्षां ब्राह्मणांशीं विशेष संबंध येऊन त्यायोगानें त्यांच्यावर बराच परिणाम झालेला दिसतो. ते ब्राह्मणास भिक्षुक करितात व वेल्लाळांप्रमाणें जन्म-लग्न-और्ध्वदेहिक संस्कार पाळतात. यांच्यांत मरवनांप्रमाणें गोत्रांतरविवाह्य वर्ग नाहींत. साधारणपणें मरवन आणि अगमुदैयन आईबापांची संतति अगमुदैयन समजतात; पण जर बाप मोठ्या योग्यतेचा मनुष्य असेल तर मुलगे मरवन् म्हणून धरतात. यांच्यांत सामान्यतः प्रौढविवाह होतात. लग्न जमविण्याच्या वेळीं कुंडली बघतात. लग्नांतील बऱ्याचशा चाली आपल्याप्रमाणेंच असतात. मृतांना जाळतात, व किंवा पुरतात त्यांचे और्ध्वदैहिक संस्कार करितात.

अगमुदैयन् शैवपंथाचे आहेत. ऐयनर, पिडारी, करुपन्नस्वामी यासारख्या अनेक लहान देवांनाहि ते भजतात. मध्यप्रांतांत जबलपूर व रायपूर जिल्ह्यांत यांची थोडी वस्ती झाली आहे. या भागांत पूर्वी मद्रासी पलटणी रहात त्यांपैकीं पेन्शन घेऊन येथें राहूं लागलेल्या लोकांचे हे वंशज आहेत. हे पिल्ले हा थोर लोकांस संबोधण्याचा शब्द हे स्वतःला लावून घेतात; याचा अर्थ राजाचा पुत्र असा आहे. यांची कोचीन संस्थानांत चितूर तालुक्याच्या पूर्वभागांत कांहीं वस्ती आढळते. [ थर्स्टन—कास्ट अॅण्ड ट्राइब्स ऑफ सदर्न इंडिआ रसेल व हिरालाल—कास्ट अॅंड ट्राइब्स ऑफ सेन्ट्रल प्राविन्सेस—सेन्सस १९११ रिपोर्ट ].

**अगर**—रेवाकांठा एजन्सींत सांखेड मेहवा म्हणून एक संस्थान आहे, त्यांत २७ लहान पोटविभाग आहेत. त्यांत अगर हा एक आहे. सांखेड मेहवाच्या चोहाण संस्थानसंघांत जे आठ तुकडे आहेत त्यांत अगर हा एक तुकडा आहे. १८७९ सालची अगर संस्थानासंबंधीं बॉंबे गॅझीटियरमध्यें खालील माहिती सांपडतेः—

| संघ. | संस्थान. | गांवें. | चौरस मैल. | उत्पन्न पौं. | खंडणी पौं. शि. | गायकवाडांस |
|---|---|---|---|---|---|---|
| चोहाण | अगर | २८ | १७ | १००० | १८ | १२ |

अगरच्या उत्तरेस, व पूर्वेस वनमाल, दक्षिणेस कामसोली आणि पश्चिमेस वजिरिया आहे. अगर सांखेड मेहवाच्या मध्यांत आहे. येथील जमीन कांहीं चिकण मातीची व कांहीं रेताड आहे. कापूस, ज्वार, तीळ, तांदुळ व हरभरे येथें पिकतात. बहुतेक वस्ती भिल्लांची आहे. येथील शेतकी सुधारलेली नसून उलट अव्यवस्थित दिसते. अगर आणि वजिरिया यांच्या मध्यभागीं मोठ्या सडकेवर कुकेज किल्ल्याचा अवशेष दृष्टीस पडतो. हा किल्ला बराच प्राचीन आहे असें म्हणतात. [ बांबे गॅ. भाग ६ ]

**अगर**–(शिंदेशाही) मध्यहिंदुस्थानच्या ग्वाल्हेर संस्थानांतील शाजापुर जिल्ह्यांत असलेलें शहर व सैन्याचें राहण्याचें ठिकाण. हें समुद्रसपाटीपासून १७६५ फूट उंचीवर असून उज्जनी पासून सडकेनें ४१ मैल दूर आहे. उ. अ. २३° ४३' पू. रे. ७६° १ लोकसंख्या सुमारें अकरा हजार. हें शहर दोन तलावांच्या मध्यें वसलेलें आहे व त्याच्या सभोंवार तटबंदी आहे. १० व्या शतकांत अग्राभिल्लानें ह्या ठिकाणीं वसाहत केली. व त्याच्यावरून या शहरास अगर हें नांव पडलें. लवकरच तें झाल रजपुतांच्या हातीं गेलें. अठराव्या शतकांत धारच्या यशवंतराव पवारानें तें जिंकून घेतलें. इ. स. १८०१ मध्यें बापूजी शिंदे यानें स्वारी केली व शहर उध्वस्त केलें पण दौलतराव शिंद्यानें तें पुन्हां बांधलें. इ. स. १९०४ मध्यें तें त्याच नांवाच्या जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. येथें धान्य व कापूस यांचा व्यापार मोठा चालतो. येथें एक कमाविसदारची न्यायकचेरी, एक शाळा, टपाल कचेरी आणि दवाखाना आहे. रटरिया तलावाच्या पलीकडे सैन्याची वस्ती आहे. इ. स. १८५७ मध्यें येथें शिंद्याची मदत फौज होती. [ इंपी. ग्या. १९०८ ]

**अगरखेड**—हें भीमेच्या तीरावर एक गांव आहे. हें इंदीच्या ईशान्येस सुमारें १५ मैलांवर आहे. गांवाच्या दक्षिणेस एक जुनें शंकरलिंग देवाचें देऊळ आहे. धैरापना गुडी नांवाचें दुसरें एक हेमाडपंती देऊळ गांवांत आहे. ह्या देवळांत शके ११७२ चा एक शिलालेख आहे. लोकसंख्या सुमारें चार हजार आहे.

**अगरतला**—टिपरासंस्थानचें मुख्य शहर. उ. अ. २३° ५१', पू. रे. ९१° २१'. इ. स. १९०१ मध्यें येथील लोकसंख्या ९५१३ होती. होरा नदीच्या पश्चिम तीरावर जुनें शहर आहे व नवी वस्ती पूर्वतीरावर झाली आहे. इ.स. १८७४-७५ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-०४ मध्यें येथील उत्पन्न ६७०० रु० होतें व खर्च ७४०० होता. येथें एक कॉलेज, एक कारागिरीची शाळा, संस्कृत पाठशाला, दवाखाना व तुरुंग आहे. [ इं. ग्या. ]

**अगरु** ( ऊद ):—ह्याला आंग्ल भाषेंत ईगलवुड, व कालंबक, व एतद्देशीय भाषेंत आगर, उगर, उगल, ऊद, सासी, आक्याऊ, कायु, गारु इत्यादि नांवें आहेत. इकडील सगळीं नांवें अगरु या संस्कृत शब्दापासून पडलेलीं आहेत. ॲग्लोवुड किंवा ईगलवुड हें नांव पाली भाषेंतील लाघु किंवा लोहा या शब्दावरून पडलें असावें असा तर्क आहे.

**वस्तुक्षेत्रः**—भूतान, हिमालय, आसाम खाशीच्या टेंकड्या, पूर्वबंगाल मार्ताबानमधील टेंकड्या यामध्यें हीं झाडें होतात. व तीं सर्व ऋतूंत हिरवीं राहतात. या झाडाची उंची ६० ते १०० फुटांपर्यंत असून यांचा घेर ५ ते ८ फुटापर्यंत असतो. या झाडापासून "अगरु" हें द्रव्य निघतें. झाडें २० वर्षांची झाल्यावर तीं अगरु गोळा करण्यास योग्य होतात. परंतु ५०-६० वर्षांचीं होईतों तीं पक्क होत नाहींत असें कांहीं

लोकांचें मत आहे. या झाडाचें साधें लांकूड, फार किमतीचें नसतें. कारण तें रंगानें फिकें, वजनांत हलकें व गंधहीन असतें. परंतु विशिष्ट परिस्थितींत या झाडाच्या कांहीं भागांस अगरु (ऊद) नांवाचें द्रव्य भरपूर येतें व त्यामुळें लांकडाचें विशिष्टगुरुत्व वाढतें, व झाडाची किंमतही वाढते. अगरु द्रव्याची किंमत त्यांमध्यें असलेल्या राळेच्या प्रमाणावर अवलंबून असते. पूर्ण वाढ झालेल्या झाडांत ६ तें ८ पौंडपर्यंत ऊद आढळतो. झाड विशेष चांगलें असल्यास त्यांतील अगरूची किंमत ३०० रु. पर्यंतहि येते. अगरु असलेले झाडाचे भाग अतिशय वेडेवांकडे असतात. या झाडाचें हलकें लाकूड (अगरु नसलेलें ) दर शेरास १-३ रुपये दरानें विकतें. अगरु असलेलें लांकुड काळसर असून त्याचा भाव १६ ते २० रु शेर असतो. ह्या झाडापासून "चूवा" नांवाचें सुगंधी द्रव्य काढण्याची कृति ऐने अकबरीमध्यें दिलेली आहे.

पूर्वींपासून सर्व प्राच्यदेशांत अगरु द्रव्याचा त्याच्या सुवासाकरितां उपयोग करीत असत. यांमध्यें औषधी गुणधर्महि आहेत असा समज आहे. पांचव्या शतकांतील वैद्यक ग्रंथांत या द्रव्याचा उल्लेख आहे. हल्लीं चीनदेशांत या द्रव्याचा उपयोग फार करितात. उदवत्या करितांना याचा उपयोग फार होतो. सिलहटमध्यें यापासून 'अगर-अत्तर' काढितात. हें अत्तर गुलाबाच्या अत्तराइतकेंच चांगलें असून त्याची किंमतहि त्याबरोबर असते. मार्कोपोलो, गार्सिया डी ओर्टा, वारथेमा, वारबोसा, लिन्स्कोटेन हर्बर्ट इत्यादि पाश्चात्य प्रवाश्यांनीं अगरु ( Eagle, or colambac-wood ) झाडाचा उल्लेख केलेला आहे. बँकॉक मधून मुंबईस उत्तम अगरु येतो असें प्रेबल लिहितो. त्यानें गागली व मवर्दी अशा दोन अगरूंचा उल्लेख केला आहे. ऐने अकबरीमध्येंहि याचे पुष्कळ प्रकार दिलेले आहेत. प्राचीन आर्यन् लोक ज्याप्रमाणें वर्च झाडाच्या सालीचा कागदासारखा उपयोग करीत त्याप्रमाणें आसामी रहिवासी अगरु झाडाच्या सालीचा लेखनसाहित्य म्हणून उपयोग करीत असत. अगरु झाडाच्या सालीपासून वाकहि करतात परंतु तो मजबूत नसतो. स्त्रियांनीं न्हाल्यानंतर त्यांच्या केसांनां उदाचा धूप देण्याची चाल अजून कांहीं ठिकाणीं दृष्टीस पडते. त्या चालीचा उल्लेख विल्हणानें आपल्या विक्रमांकदेवचरिताच्या प्रास्ताविक भागांत "कुर्यादनाद्रेषु किमंगनानाम् केशेषु कृष्णागरुधूपवासः' अशा श्लोकार्धानें केला आहे. जुन्या गांवठी वैद्यकांत ऊद हा वराच औषधी उपयोगाचा जिन्नस म्हणून समजला जातो. आमांशाच्या औषधांत उदाची योजना करतात. खोकल्याच्या वगैरे विकारांत उत्तेजक औषध देण्यास ऊद फार चांगला उपयोगी पडतो अशीहि कांहींची समजूत आहे. या झाडाची साल कडू असते ती अग्निमांद्यावर देतात. [ वॅट. ]

**अगस**—( किंवा अगासा )—ही कानडी धोव्यांची जात विशेषतः म्हैसूर संस्थानांत आढळते. मद्रास इलाख्याच्या दक्षिण कानडा जिल्ह्यांत व मुंबई इलाख्याच्या दक्षिणेकडेहि या जातीचे लोक दिसतात. १९११ च्या खानेसुमारींत सबंध हिंदुस्थानांत ११६०४७ अगस लोक दिले आहेत, त्यांपैकीं ९७७७२ म्हैसूर संस्थानांत आहेत; बाकीचे मद्रास, कुर्ग इत्यादि प्रांतांतून आहेत. ही जात द्राविडवंशसंभव दिसते. अगस हे शूद्र वर्णाचे समजण्यांत येत असून, यांचे धार्मिक संस्कार चालविण्यास ब्राह्मण पुरोहित बहुधा जात नाहींत.

यापैकीं इतर काम करणारे एकंदर ३०१४१ असून यांत १३९४८ आपला वडिलोपार्जित धंदा करतात. या जातीच्या लोकांचा दुसरा धंदा म्हटला म्हणजे शेतकी होय. या जातीच्या निरनिराळ्या भाषांवरून तिचे दोन प्रमुख विभाग पडले आहेत ते कानडी अगस व तेलंगी अगस हे होत. हे लोक महाराष्ट्रांत अलीकडेच आलेले असून त्यांचा मराठी अगर हिंदुस्थानी धोव्यांशीं कांहींच संबंध नाहीं. तेलंगी व कानडी जातींत रोटी अगर बेटी व्यवहार प्रचलित नाहीं. तेलंगी अगस लोकांत आणखी पोटविभाग आहेत. त्यांच्यांत बहुपत्नीत्वाची परवानगी आहे. याशिवाय या जातींत बालविवाह व त्याचप्रमाणें प्रौढ विवाहही रूढ आहे. एखाद्या स्त्रीस जन्मभर अविवाहित रहाण्यास हरकत नाहीं. वरास अगर वरपक्षाकडील मंडळीस वधूची किंमत म्हणून पैसे द्यावे लागतात. त्याचें प्रमाण निरनिराळ्या भागांत कमी जास्त असून साधारणपणें तें १२ पासून १४ रुपयांपर्यंत असतें. विधवाविवाह रूढ आहे. पण वर विधुर असला पाहिजे. स्त्री जातिभ्रष्ट झाल्यास तिचे पतीस घटस्फोट करण्याचा अधिकार आहे. त्याचप्रमाणें स्त्रीसहि तिचा पती जातिभ्रष्ट झाल्यास त्याचा संबंध सोडतां येतो. या जातींत श्राद्ध करण्याची चाल रूढ नाहीं. बहुतकरून त्यांचीं धार्मिक कृत्यें जंगम म्हणून त्यांचे पुढारी असतात ते करतात. कित्येक लोक ब्राह्मणांसहि बोलावितात. त्यांना ते पुरोहित म्हणतात. त्यांचा गुरु लिंगायत जातीचा असतो; व त्याला ते मधून मधून देणग्या देतात. निरनिराळ्या उत्सवप्रसंगीं त्यांना मशाली धरण्याकरितां बोलावितात व वरिष्ठ प्रतीच्या लोकांस उजेड दाखविण्याचें त्यांचें काम असतें. मुलीला नहाण आल्याची बातमी तिच्या नवऱ्याला कळविण्याचें काम धोव्याचें असतें.

अगस जातीचे लोक शैव व वैष्णवहि आहेत. त्यांची देवता 'लक्ष्मीदेवी' आहे. त्याचप्रमाणें त्यांचा जातीचा देव 'भूमी देवरु' (पृथ्वीचा ईश्वर) म्हणून आहे त्याचा उत्सव ते गौरी उत्सवाचे वेळीं ( म्हणजे ऑगष्ट-सप्टेंबरचे सुमारास ) करतात. भट्टींत कपडे जळूं नयेत म्हणून, भट्टीच्या भांड्याची पूजा करितात व त्याला प्राणी बली देतात. वक्कालिग व कुरुब या सारख्या वरिष्ठ जातींतून त्यांचे जातींत लोकांस घेण्याचे त्यांचे कांहीं विधी आहेत. दक्षिण कानडा जिल्ह्यांत धोव्यांच्या तीन स्वतंत्र जाती आहेत, ( १ ) कोंकणी ख्रिस्ती; ( २ ) कानडी बोलणारे धोबी ( म्हैसूरच्या अगसांशीं यांचा

संबंध दिसतो ); आणि ( ३ ) तुळु बोलणारे धोबी. या तिसऱ्या जातींत वारसा मातेच्या वंशाकडे असतो. अगसांनाच "मडिवाल" ( मडी=स्वच्छ कपडा, सोंवळें ) असें दुसरें नांव आहे. अगस हा शब्द अगसि=पागोटें यापासून बनला आहे. तुळु मडिवालांत सगोत्रविवाही वर्ग आहेत. विल्लवा जातीहून श्रेष्ठ जातींचे व ख्रिस्ती मुसलमान यांचे कपडे हे धुतात; लग्नमंडपांकरितां व प्रेतगाड्यांकरितां कपडे पुरवितात व मशाली फिरवितात. ते भूतपिशाच्चांची पूजा करितात. भूतांपुढें वधार्थ आणिलेल्या प्राण्याचें डोकें उडविण्याचा हक्क यांचा ( मडिवालांचा ) असतो. मूल जन्मल्याच्या सातव्या दिवशीं परटीण त्याच्या कमरेला करगोटा बांधिते. या मडिवालांच्या संस्कारांतील चाली भटांप्रमाणें असतात. गुरिकर किंवा गुट्टिनय म्हणून कांहीं गांवीं यांचा एक नायक असतो. लग्नांत वधुवरांच्या संयुक्त हातांवर पाण्याची धार धरण्याचें काम यांच्यांत गुरिकराचें नसून मुलीचा बाप किंवा मामा यांचें असतें. अगस लोकांना असग असेंहि नांव आहे. म्हैसूरमधील अगस लोकांप्रमाणेंच, ह्या अगस लोकांचा एकच मूळपुरुष आहे. त्याचें नांव "विराघेट मडिवाल एश्वरम्." ह्या लोकांत गोत्रें अथवा बेदगू नांवाचे विभाग आहेत. मामेबहिणीशीं व आतेबहिणीशी विवाह लाविता येतो; मुलींचीं लग्नें दहा वर्षांनंतर व मुलांचीं १८ वर्षांनंतर होतात. या लोकांत पुनर्विवाहाची चाल आहे; पंचांची व आप्तांची संमति असल्यास काडीमोडहि करितां येतो. हे लोक मांसाहारी आहेत व ह्यांचा दर्जा शेतकऱ्यांहून खालीं पण अस्पृश्य जातीहून वर असा आहे. हे लोक शिव, केदारलिंग, भवानी, मारुती इत्यादि देवतांचे भक्त आहेत. त्यांचे पुनर्विवाहाचे व मृत्यूचे संस्कार लिंगायत अगसप्रमाणेंच असतात. पूर्वजांच्या तर्पणार्थ हे महालय नांवाचा विधि करितात.

त्या लोकांची प्रत्येक खेड्यांत एक पंचायत असते व तींत एक मुख्यपंच व इतर १० सभासद असतात. मुख्यपंच लोकमतानुसार निवडला जातो. मुख्यपंच "कोलकर" नांवाच्या अधिकाऱ्याची नेमणूक करितो व सभा भरण्याचे वेळीं सभासदांना बोलावण्याचें काम ह्याचेकडे असतें. गुन्ह्याबद्दल दंड केला जातो. दंडाचा $\frac{1}{3}$ भाग जातीच्या देवाला देतात व बाकीचा भाग पंचांच्या सभासदांना जेवण देण्यांत खर्च करितात. [ सेन्सस रिपोर्ट १९०१-११ व, ग्याझे. ]

**अगस्ता**—या झाडास संस्कृतांत अगस्त्य व मराठींत हदगा हीं नांवें आहेत. हें झाड बरेंच मोठें होतें. हें बागेंत लावतात. यांत पांढरा व तांबडा अशा फुलांच्या रंगावरून दोन जाती आहेत. याचीं पानें आंवळीच्या पानासारखीं असतात. यास फुलें व शेंगा येतात त्यांचा भाजी करण्याकडे उपयोग करतात. हें झाड ७।८ वर्षांवर टिकत नाहीं. ह्या झाडाचा पाला फुलें व शेंगा यांचा औषधी कामाकडेही उपयोग होतो व भाजीही करितात. सर्दी, मस्तकशूळ व चातुर्थिक ज्वरावर अगस्त्याच्या पानाचा रस नाकांत पिळीत असत. अधशिशीवरही उपयोग करीत. ज्या बाजूचें कपाळ दुखत असेल त्याच्या विषमबाजूच्या नाकपुडींत अगस्त्यांच्या पानांचा अगर फुलांचा रस पिळीत. अपस्मारावर अगस्त्याचे पानांचा रस गोमूत्र व मिरपूड घालून देत. अगस्ता रुक्ष, शीतल, मधुर, वातल, व त्रिदोषनाशक असें समजलें जातें. याचीं झाडें पावसाळ्याचे आरंभास बीं पेरून ती मुद्दाम करितांच लावित नाहींत; परंतु तीं लवकर वाढतात म्हणून पानमळ्यांत छायेकरितां लावितात; क्वचित् बागेंत फुलाचे शोभेकरितां लावितात. लांकूड ठिसूळ असतें. ( संदर्भ ग्रंथ-पदे वनस्पति गुणादर्श ).

**अगस्त्य**—वैदिक माहिती ३ ऱ्या विभागांत आली आहे. येथें फक्त पौराणिक माहितीच देतों. स्वायंभू मन्वंतरांतील ब्रह्ममानस पुत्र जो पुलस्त्य ऋषि, त्यापासून कर्दम प्रजापतीची कन्या हविर्भुवा, तिच्या ठायीं झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ, याच्या दुसऱ्या सहोदराचें नांव विश्रवा ऋषि असें होतें. ( पुलस्त्य शब्द पहा )

२ पूर्वी कित्येक असुर समुद्रामध्यें लपून राहून, इंद्रादिक देवांस, ऋषींस, व इतर प्रजेस अतिशय पीडा देत. समुद्र शोषल्यानें नाहींसा होऊन, सकल प्रजेसहित आपण सुखी होऊं, असें मनांत आणून इंद्रानें, अग्नि आणि वायू यांस समुद्र शोषण्याची आज्ञा केली. तिचा त्यांनीं अनादर केल्यामुळें त्यानें सक्रोध होऊन, दोघांसही असा शाप दिला होता कीं, तुम्हांस मृत्युलोकीं जन्म घडेल. त्याप्रमाणें या चालू वैवस्वत मन्वंतरांत त्या उभयतांस मित्रवरुणांपासून एकाच देहानें जन्म घडले, त्यासच अगस्त्य असें नांव होतें. येथें त्यास भ्राता कनिष्ठ वसिष्ठ ऋषि होता. मित्रवरुणांनीं आपलें तेज कुंभांत सोडलें होतें त्यापासून अगस्त्य आणि वसिष्ठ उत्पन्न झाले होते म्हणून, त्यांस मैत्रावरुणि, कुंभयोनि अशीं नांवें पडलीं होतीं. (मत्स्यपुराण अध्याय २०१ )

हा अगस्त्य महातपस्वी व विरक्त असल्यामुळें विवाह करणार नव्हता. परंतु पितरांच्या आज्ञेमुळें निरुपाय होऊन विदर्भ देशाधिपतीची कन्या लोपामुद्रा ही यानें आपणास स्त्री केली होती. ( लोपामुद्रा शब्द पहा ). पुढें अगस्त्य तिजपासून पुत्रोत्पत्तीची इच्छा करूं लागला असतां, ऐश्वर्ययुक्त होऊन आपणाशीं संभोग करावा असा तिचा हेतु आहे असें जाणून हा द्रव्ययाचनेसाठीं श्रुतर्वा राजाकडे गेला ( श्रुतर्वा शब्द पहा ). ( अ ) महाभारत वनपर्व अध्याय ९७,९८. )

श्रुतर्वा राजाकडून याची द्रव्यकामना तृप्त न झाल्यामुळें त्याच्या सांगण्यावरून, व त्यास बरोबर घेऊन हा ब्रदनश्व राजाकडे गेला. ( ब्रदनश्व शब्द पहा) तेथेंही तसेंच झाल्यामुळें हा त्या उभयांसहित त्रसद्दस्यु राजाकडे गेला. (त्रसद्दस्यु श. पहा). तेथें तीच स्थिति अवलोकन करून हा पुढें काय करावें म्हणून चिंतन करीत आहे तों त्रसद्दस्यूनें विनंति केली कीं इल्वल असुर मोठा संपत्तिमान आहे. त्यास जिंकल्यास अपार द्रव्य

मिळेल. त्यावरून हा तिघाही राजांस समागमें घेऊन, इल्वलाकडे गेला; आणि त्यास जिंकून लागत होतें तितकें द्रव्य आपण घेऊन, व त्या राजांसही देऊन त्यांस मार्गस्थ केल्यादर आपण आपल्या आश्रमास आला, आणि आणलेलें द्रव्य लोपामुद्रेस देऊन तिचें चित्त यानें संतुष्ट केलें. (इल्वल श. पहा).

पुढें लोपामुद्रेस अगस्त्यापासून गर्भधारण झालें. व ती, दृढस्यु आणि दृढास्य या दोन पुत्रांस क्रमेंकरून प्रसवली. या दोन पुत्रांत दृढास्यु हा इध्मवाह या नांवानें अतिप्रसिद्ध होता.

अगस्त्यऋषि स्त्री व पुत्र यांसहीत आश्रमधर्म चालवीत असतां, कालकेय नामक असुरांनीं जनांस अत्यंत पीडा दिली. तेव्हां यानें महान ऋषींच्या प्रार्थनेवरून समुद्रोदकाचें शोषण करून कालकेयांचा नाश केला, व सकल जनांस स्वस्थ केलें, तेणेंकरून इंद्राचाही संतोष झाला. ( कालकेय शब्द पहा ).

अगस्त्य ऋषि उत्तम तत्त्ववेत्ता होता. याशिवाय त्याच्या अंगीं परोपकार बुद्धि असून, धनुर्वेदामध्यें तर, त्याची गणना उत्तम कोटींत असे. यानें देवांच्या प्रार्थनेवरून प्राणिमात्रांस, विंध्यपर्वतापासून झालेलें विघ्न निवारण करण्यासाठीं काशीवासही सोडून देणें पतकरलें. ( विंध्य शब्द पहा ). तसाच दाशरथिराम दंडकारण्यांत चालला असतां तोही याच्या दर्शनास येऊन याचा प्रसाद संपादन करून नंतर पुढें गेला.

**अगस्त्य**–( शूद्र वैय्याकरण ) सुमारें हजार वर्षांमागें हा एक कवि शूद्र जातींत जन्मला होता. पुराणप्रसिद्ध जो अगस्त्य ऋषि त्याचाच हा अवतार होय असें यास लोक समजतात. तामिल भाषेचें व्याकरण प्रथमतः यानें रचिलें, म्हणून त्यास अगस्त्यव्याकरण असें नांव प्रसिद्ध आहे. यांत एलक्कनम् याचे पांच प्रकार आहेत. याचीं नांवें एलट्ट, चोल्ल, परल्ल, आप्प, आणि आलंकारू न्याय, वैद्यक, रसायनशास्त्र धर्मशास्त्र, पूजापद्धति इत्यादिकांवरही याचे ग्रंथ पुष्कळ आहेत, असें म्हणतात. वर जो आम्ही याचा काळ दाखविला, तो डॉक्टर कॉल्डवेल यांच्या मताप्रमाणें आहे. [ कविचरित्र ]

**अगस्त्यमले** अथवा **अगस्त्यकूटम्**—मद्रास इलाख्यांत त्रावणकोर संस्थानांत नेय्या तिनकर तालुक्यांतील पश्चिम घाटांत हें एक कोनाकृती गिरिशृंग. उत्तर अक्षांश ८° ३७', व पूर्व रेखांश ७७° १५' यावर आहे. त्या प्रांतांत त्याला सह्य पर्वत म्हणतात. त्याची उंची ६२०० फूट आहे. त्रावणकोर व तिनेवेली जिल्हा यांच्या सीमेवर हा पर्वत आहे. तार्‍यांचे वेध घेण्यास हें ठिकाण फार सोयीचें आहे. ताम्रपर्णी व नैयार नद्यांचें हें उगमस्थान आहे. दक्षिण हिंदुस्थानांत आर्य संस्कृतीचा फैलाव करणारे महान अगस्त्य ऋषि या पर्वतावर योगनिद्रेंत अजून राहतात, असा लोकांचा समज आहे.

**अगाखान.** अ गा खा न प हि ला:—(१८००-१८८१) हसनअल्ली शहा ( जन्म इराणांत १८०० त ) याला जेव्हां तो मुंबईस ब्रिटिशराज्याच्या आश्रयाला प्रथम येऊन राहिला त्यावेळीं "हिज हायनेस अगाखान" ही पदवी देण्यांत आली. त्याचा पूर्वज अल्ली—महंमद पैगंबराचा जामात—होता असें मानितात. अल्लीचा मुलगा हुसेन यानें इराणच्या एका राजकन्येशीं लग्न लाविलें होतें. तेव्हां अर्थातच अगाखाननें आपला संबंध इतिहास पूर्वकालांतील इराणच्या राजघराण्यांशीं जोडला. शिवाय त्याच्या पूर्वजांनीं, ख्रिस्ती धर्मयुद्ध चालू असतां बेनिफतिमी लोकांचे खलिफ म्हणून अनेक वर्षे इजिप्तमध्यें राज्य केलें होतें. इराण सोडण्यापूर्वी बादशहा फत्तेअल्लीशहानें अगाखानला कर्मान या मोठ्या व महत्त्वाच्या प्रांताचा सुभेदार नेमिलें होतें. त्याची तेथील कारकीर्द, चिकाटी, नियमितपणा, आणि उच्च राजकीय धोरण या दृष्टीनें वाखाणण्याजोगी म्हणतां येईल. त्याच्या प्रतिस्पर्ध्यांनीं व शहाच्या मर्जीतल्या दरबारी लोकांनीं आंतून कारस्थानें चालवून देशांत अंतःक्षोभ उत्पन्न केला होता, तरी पुष्कळ दिवसपर्यंत त्यानें शहाचा स्नेह व प्रीति संपादन केली होती. सरतेशेवटीं त्याच्यावरची शहाची मर्जी अजीबात खप्पा होऊन, स्वसंरक्षणासाठीं ब्रिटिश हद्दींत त्याला पळून यावें लागलें. रहावयास हिंदुस्थान पसंत करून, त्यानें मुंबईला आपलें ठाणें दिलें. त्यावेळीं पहिलें अफगाण युद्ध जोरांत होतें. तेव्हां इराणहून अफगाणिस्थानांतून इकडे येतांना, ब्रिटिश सैन्याला उत्तम प्रकारची मदत करण्यास त्याला आयतीच संधि मिळाली; व अशा रीतीनें आपलें दैव त्यानें ब्रिटिशांच्या हातीं दिलें. नंतर कांहीं वर्षांनीं सिंधच्या मोहिमेंत तो असाच ब्रिटिशांच्या चांगला उपयोगी पडला. त्यावेळीं सरहद्दीवरच्या जातींतील अनेकांचा तो गुरु असल्यानें नेपियरनें या जातींचा बंदोबस्त करण्याच्या कामीं अगाची मदत घेतली होती. या आपल्या मुसलमान स्नेह्याची नेपियर फार चहा करी व शौर्य आणि मुत्सद्दीगिरी या गुणांविषयीं तो त्याला फार मान देई. उलट आगाखानानेंहि ब्रिटिश सरकारशीं एकनिष्ठ राहून नेपियरच्या स्नेहास व विश्वासास आपली पात्रता दर्शविली. तो जेव्हां हिंदुस्थानांत कायम राहूं लागला तेव्हां सरकारनें ब्रिटिशांच्या मुसलमानी प्रजेच्या मोठ्या इस्मायली संप्रदायाचा तो वरिष्ठ पुढारी असें कबूल करून, "हिज हायनेस" ही पदवी व मोठें पेनशन त्याला बहाल केलें. त्या वेळेपासून तो मरेपर्यंत ( १८८१ ) अगाखानानें ब्रिटिशांच्या छत्राखालीं मोठ्या शांततेनें काळ कंठिला व त्याचप्रमाणें आपल्या अनुयायांचीं धर्मकृत्यें पार पाडिलीं. त्याची धार्मिक सत्ता मानणारे लोक केवळ हिंदुस्थानांतच होते असें नव्हे तर, अफगाणिस्तान, खोरासान, इराण, अरबस्तान, मध्य आशिया आणि दूरचे सीरिया, मोरोक्को देश, येथें देखील त्याचे पुष्कळ अनुयायी होते. तो शेवटपर्यंत ब्रिटिश राज्याशीं पूर्णपणें एकनिष्ठ राहिला व सरहद्दीवरील जातींवर त्याचा मोठा वचक असल्यानें, वायव्यसरहद्दीवरच्या

ब्रिटिशांच्या मोहिमांना त्याचें अमोल्य सहाय्य मिळालें. हिंदुस्थानांत देखील मुसलमान लोक जेव्हां धार्मिक किंवा राजकीय स्वरूपाचे दंगे करीत तेव्हां त्यांना शांत करण्याचे कामीं आगाखानाचा उपयोग होत असे.

याच्या मृत्यूनंतर याचा वडील मुलगा **अगाखान दुसरा** याच्या अधिकारावर आला. त्यानें आपल्या वडिलांचा कित्ता इतका चांगला गिरविला कीं स्थानिक सरकारची त्याच्यावर मर्जी बसली व त्याला Knighthood of the Order of the Indian Empire ही मोठी पदवी मिळून मुंबईच्या कायदेकौन्सिलांत स्थान मिळालें.

**अगाखान तिसरा** (सुलतान महंमदशहा)—हा दुसऱ्या अगाखानाचा एकुलता एक मुलगा, १८८५ मध्यें बापाच्या मरणानंतर आपल्या कुळाचा व त्याच्या उपासकांचा मुख्य झाला. याचा जन्म १८७७ त झाला व इराणच्या राजघराण्यांतल्या त्याच्या आईनें इस्माइलांच्या धर्मगुरूला अवश्य असें धार्मिक व पौरस्त्य शिक्षण त्याला दिलें. इतकेंच नव्हे तर त्याच्या बापाला व आजाला न मिळालेलें उत्तम युरोपीयन शिक्षणहि दिलें. या दुहेरी शिक्षणानें अगाखानाला आपल्या अनुयायांच्या धार्मिक व सामाजिक हितांकडे उत्तम प्रकारें लक्ष पुरविण्याची अंगीं पात्रता झाली. आपल्या अनुयायांना आशीर्वाद देण्याकरितां व त्यांच्यांतलीं भांडणें मिटवून त्यांना उपदेशानें व पैशानें मदत करण्याकरितां त्यानें दूरवर प्रवास केला. १८९७ सालीं व्हिक्टोरिया महाराणीकडून Knight Commander of the Indian Empire ही पदवी त्याला मिळाली, व त्याचप्रमाणें जर्मनीचा बादशहा, तुर्कस्थानचा सुलतान, इराणचा शहा इत्यादिकांकडून त्याच्या लोकहितार्थ कामगिरीबद्दल अशीच मान्यता मिळाली. पुन्हां ब्रिटिश सरकारकडून १९०२ मध्यें G. C. I. E. व १९११ मध्यें G. C. S. I. अशा पदव्या मिळून, यूरोपीय महायुद्धांतील त्याच्या कामगिरीबद्दल पहिल्या प्रतीच्या राजाचा दर्जा व ११ तोफांच्या सलामीचा मान त्याला मिळाला ( अद्यापि हयात ).

**अगार्या**—गोंडांची पोटजात त्यांचा धंदा लोखंडी काम. सन १९११ सालीं त्यांची संख्या ९५०० मंडला, रायपूर, विलासपूर जिल्ह्यांत सांपडते. मिरझापूर बंगालमध्येंहि कांहीं लोक सांपडतात. उडिया मुलखांत जे अगारिया सांपडतात ते यांपासून भिन्न आहेत. ही जात जगाच्या आरंभापासून आहे अशी या लोकांची समजूत आहे. जगाच्या आरंभीं बैलांनीं जमीन नांगरिली तो नांगर यांच्याच पूर्वजांनीं केला होता असें समजतात. यांच्या दोन पोटजाति आहेत त्या (१) पथारिया अगारिया आणि (२) खुंटिया अगारिया हे होत. भट्टी पेटवितांना भात्याच्या तोटीवर जे लोक दगड ठेवतात ते पथारिया आणि जे खुंटी ठोकतात ते खुंटिया. यांच्या गोत्रांचीं नावें गोंडा सारखींच आहेत. सोनबाई पोटभेदाचे लोकांकडून वाळींत घातलेल्यांचा प्रायश्चित्त विधि करविण्यांत येतो. एका भांड्यांत सोन्याचा तुकडा ठेऊन त्यांत पाणी टाकून तें पतिताच्या आंगावर शिंपडून त्याला शुद्ध करतात. सगोत्रविवाह निषिद्ध आहे. मामेभाऊ आतेबहीण, मावस भाऊ व बहिणी यांचा विवाह होतो. लग्न, प्रौढपणीं होतें. मुलाचा बाप मुलीच्या बापाकडे निरोप पाठवितो कीं अमूक अमूक तुझी " बासी " ( शिळा भाताचें खाद) खाण्यास आला आहे; जर मुलीच्या बापास तो संबंध मान्य असला तर तो म्हणतो " तो पाई आला असेल तर मी शिरसावंदन करून त्याचें स्वागत करतों. " नंतर वराचा बाप वधूच्या घरीं जातो. तेथें त्याचे पाय धुतात व त्याला पाणी पिण्यास देतात. वधूला देण्याच्या देणग्या वरपक्षीय वाजत गाजत आणतात. पावसाळ्यांत लग्नाचा दिवस ठरवितात. लोखंड वितळण्याचे दिवस नव्हेत म्हणून तेच लग्नास त्यांना सोइस्कर पडत असतील. मुलीबद्दलचें शुल्क लग्नापूर्वी कांहीं दिवस चुकतें करावें लागतें. तें बहुधा ५ शेर उडीद किंवा तीळ आणि ४ ते १२ रुपयांपर्यंत नगदी रक्कम असें असतें. सोमवार, मंगळवार, शुक्रवार यांतून कोणत्या तरी दिवशीं लग्न होतें. वैगा ( पुरोहित ) जमीनींतून भट्टी तयार करण्याकरितां एक ढेंकूळ खोदतो तें ढेंकूळ वधूच्या आईनें ओटींत घेतलें पाहिजे. वर आल्यानंतर काडीनें त्याचे दांत घांसतात आणि मेहुणी "सांज"पानें त्याच्या तोंडांत घालते. तीं तो हातांतील पंख्यानें दूर करतो. याबद्दल मेहुणीला बिदागी द्यावी लागते. उडीद फार पवित्र धान्य समजलें जातें. या विवाहविधीपैकीं बराच भाग पुन्हां वराच्या घरीं करावा लागतो. ताडाच्या पानाचे मुगुट करून वधूवरांस तळ्यांत जाऊन ते टाकावे लागतात; आणि पाळीपाळीनें गडवा पाण्यांत एकानें लपवावा व दुसऱ्यानें काढावा असें खेळतात. मग वधूवर कपडे बदलून घरीं जातात. वधूला पाण्यानें भरलेली एक घागर डोकीवरून न्यावी लागते. वरानें गवत भरलेल्या हरिणाला मारण्यासाठीं बायकोच्या खांद्यावरून तीर सोडले पाहिजेत. प्रत्येक तीर सोडल्यानंतर वधू त्याला साखर खाण्यास देते. तीन तीरांपैकीं एकही न लागला तर नवरा मुलगा चार आणे दंड देतो. लग्न झाल्यावर वधुवरांचा महिनाभर संयोग होतां कामा नये, असा नियम आहे. लग्नाचा खर्च वरास १५, वधूच्या बापास ४० रुपये लागतो. वराला कधीं कधीं भावी सासऱ्याकडे नोकरी करावी लागते. नोकरीचा सर्वांत जास्त काल म्हणजे तीन वर्षें आहे. नौकरींत असतां लग्नाचा विचार ठरल्यावर वधूवरांनीं घरांतून निघून जावें. मग त्यांना वधूच्या बापानें बोलावून आणून प्रायश्चित्ताकरितां एक जातीला भोजन दिलें म्हणजे झालें. जर ते बोलावण्यानें आले नाहींत तर विवाहितांशीं संबंध तोडून टाकावा. विधवांच्या विवाहास पूर्ण मोकळीक आहे, आणि विधवेनें नवऱ्याच्या भावाबरोबर लग्न केलें तर फारच चांगलें. व्यभिचार, किंवा दुष्टपणाच्या वर्तनाकरितां घटस्फोटही होतो. घटस्फोट केलेली स्त्री पुन्हां लग्न करते. परंतु

जर ती घटस्फोटाखेरीज दुसऱ्या वरोबर पळाली तर त्या माणसास १२ रुपये दंड नवऱ्यास द्यावा लागतो.

गर्भारपणीं वधूची आई मुलीला लुगडें आणि पक्वान्नें देते. बाळंत झाल्यावर ५ दिवस सोयर असतें. प्रेताचें दहन करतात. देवीनें व महामारीनें मेले त्यांस पुरतात. मेलेल्याच्या वारसाच्या डोक्याभोंवतीं एक काळें फडकें गुंडाळून तो वारस आहे असें कबूल करतात. आश्विनांत पितृतर्पण करतात.

दैवत—दूल्हा देव त्यांचा देव आहे. कोंबड्या बकरें त्याला बळी देतात. पोळ्या, नारळ त्याला अर्पण करतात. लोहासुर हा त्यांच्या धंद्याचा देव आहे. औषधांवर भरंवसा नाहीं. जादूनें रोग बरे करण्यावर भरंवसा आहे. देवाला आंगांत आणून आजारी माणसानें काय अपराध केला हें वदवितात आणि प्रायश्चित्त ठरवितात. तें दिलें म्हणजे रोगमुक्त होतो. गोंड, कवार ( गवार ? ) आणि अहीर या तीन जातींच्या लोकांस आपल्या जातींत घेतात. हे लोक माकडें, कोल्हे, मगर, पाली, गोमांस आणि उष्टें खात नाहींत. डुकराचें मांस, कोंबड्या आणि मद्य यांची पूर्ण मोकळीक आहे. गोंड आणि बंगा यांच्या हातचेंच जेवतात. यांच्या खेरीज स्वतःपेक्षां नीच जातींच्या हातचें जेवीत नाहींत.

यांचे अंगावर कपडे फार कमी असतात. बायका गोंडासारख्या पोशाक करतात. अंगावर फार गोंदवितात.

आसाममध्येंहि यांची वस्ती आहे. हे लोक मूळचे छोटानागपूरमधील शेतीचा धंदा करणारे आहेत परंतु खानेसुमारीचे वेळेला ह्या जातीचे अर्ध्यापेक्षां जास्त लोक आसाममधील काचार, सिलहट् व सिवसागर येथील चहाचे मळ्यांत मजुरी करीत होते.

**अगीर**—पंजाबांतील एक जात. लो. सं. ३०२७ अगीर हे सर्व हिंदु आहेत. ते मुख्यत्वेंकरून रोहटक, गुरगांव, दिल्ली व मुलतान जिल्हे यांत आढळतात. ते मीठ तयार करण्याचा धंदा करितात. गुरगांव जिल्ह्यांतील अगीर आपणांस चिठोरच्या रजपूत लोकांचे वंशज म्हणवितात. त्यांचा सामाजिक दर्जा बऱ्यांतला आहे; म्हणजे ते लोहाराहून श्रेष्ठ आहेत आणि जाट लोकांच्या खालोखाल आहेत.

**अग्नि**—(देवता) मानववंशाच्या प्रगतींतील अगदीं पहिली महत्त्वाची पायरी म्हटली म्हणजे अग्नीची उत्पत्ति करण्याचा शोध ही होय. हा शोध अत्यंत प्राचीन कालीं म्हणजे ४००००० वर्षांपूर्वीच्या दुसऱ्या हिमांतर युगांत ( Second Inter Glacial Epoch ) लागला असावा असें तज्ज्ञांनीं निर्णीत केलें आहे. ह्या अग्नीभोंवतीं जमलेल्या अनेक मानववंशांतील दंतकथात्मक वाङ्मयावरूनही ह्या शोधाची प्राचीनता दिसून येते. जगांतील अत्यंत प्राचीन वाङ्मय जे वेदग्रंथ त्यामधील अग्नीच्या संबंधीं अनेक कल्पना, व दंतकथा ह्यांचा विचार विभाग २ दैवतेतिहास या प्रकरणांत झालाच आहे.

एकंदर सर्व संस्कृतीमध्यें अग्निदेवतेची उत्पत्ति इतर सर्व देवतांपेक्षां कांहीं विशेष तऱ्हेनें झालेली दिसते. वास्तविक दृष्टीनें एकंदर जगातील धर्मांचा इतिहास पाहतां खरी अग्निदेवता अशी वैदिक हिंदुधर्म व झरदुष्ट्राचा धर्म ह्या दोन धर्मांमध्येंच दिसून येते. मानवी कल्पना, अग्नीची उत्पत्ति, सूर्य, कांगरुसारखा एखादा प्राणि, ओक वृक्ष किंवा असल्याच दुसऱ्या कांहीं निसर्गांतील वस्तु, यांजपासून झाल्याचें मान्य करते. त्याचप्रमाणें अग्न्युत्पत्तीची युक्ति मानवजातीस उकलून देणारी व्यक्ति ही अग्निदेवता नसून ती अथर्व्यासारखा संस्कृतीचा प्रणेता असतो. तो दैवी गुणांनीं नंतर युक्त होतो, प्रॉमिथिअसची गोष्ट अशीच आहे.

अ ग्नि ( भारतीय )—अग्नि हा शब्द इंडोयूरोपीय असला तरी त्याची अग्नि या नांवानें ख्याति व उपासना फक्त भारतीयांतच आहे. अग्नीचें वैदिक स्वरूप "वेदविद्या" (ज्ञानकोश –प्रस्तावना खंड, पा. २९०–३०१ ) विभागांत सविस्तर वर्णिलें आहे. पौराणिक काळीं अग्नीभोंवतीं इतर देवतांप्रमाणेंच बऱ्याचशा कथा उपकथा गुंडाळल्या जाऊन त्याला पूर्ण सगुणस्वरूप प्राप्त झालें. वन्हि, अनल, पावक, वैश्वानर, अब्जहस्त, धूमकेतु, हुतभुज, कृचि, रोहिताश्व, च्छागरथ, जातवेद, सप्तजिव्हा, तोमरधर वगैरे नांवें अग्नीचीं वैशिष्ट्यें सांगतात. अंगिरसपुत्र, पितरांचा राजा, मरुत्, शंडिलाचा नातू, तामसमन्वंतरांतल्या सप्तऋर्षींपैकीं एक तारा अशा भूमिका अग्नीला पुराणांत दिलेल्या आढळतात. त्याचें ध्यान निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें दिसून येतें. सात हात, चार शिंगें, सात जिभा, दोन डोकीं, तीन पाय, इत्यादि वैश्वदेव मंत्रांतील अग्नीचें ध्यान हरिवंशांत नाहीं तर त्या ठिकाणीं चार हात असलेला, मेषावर बसलेला किंवा सात वाऱ्यांचीं चाकें असणाऱ्या रथांत बसलेला, डोक्यावर धुराचा किरीट धारण केलेला अग्नि दाखविला आहे. असो. अग्नीचा पौराणिक इतिहास थोडक्यांत येणेंप्रमाणें:—

स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्ममानसपुत्र दक्षप्रजापति होता त्याच्या सोळा कन्यांतील जी स्वाहा नांवाची होती ती याची स्त्री होती, आणि तिजपासून यास 'स्वारोचिष' नांवाचा पुत्र व सुच्छाया नांवाची कन्या झाली होती.

त्यांतून कन्या उत्तानपादपुत्र जो ध्रुव त्याच्या शिष्ट नांवाच्या पुत्रास दिली असून त्याचा पुत्र 'स्वारोचिष' हा दुसरा मनु झाला.

याशिवाय पावक पवमान् व शुचि असे याचे तीन पुत्र असून, त्यांपासून ४५ अग्निदेवता कार्यांच्या भिन्नतेमुळें भिन्न नामांनीं प्रसिद्ध आहेत.

चालू ( वैवस्वत ) मन्वंतरांत वरुणानें ब्रह्मदेवास ऋत्विज करून यज्ञ केला असतां त्यांत तीन ऋषि निर्माण झाले. त्यांतून भृगुऋषीस वरुणानें, कविऋषीस ब्रह्मदेवानें पुत्रत्वें करून ग्रहण केलें त्याचप्रमाणें अग्नीनें गिराऋषीस पुत्रत्वानें ग्रहण केलें होतें. अग्नीस ब्रह्मदेवानें कल्पारंभीं, पूर्व आणि दक्षिण

या दोन दिशांमधील दिशेचें स्वामित्व दिलें होतें. म्हणून याच्यासंबंधानें त्या दिशेस आग्नेयी हें नांव मिळालें.

पूर्वी श्वेतकी राजानें अपरिमित यज्ञ केले, त्यांतील हविभक्षणामुळें यास जाड्य होऊन त्याचा निराशोपाय विचारण्यास हा ब्रह्मदेवाकडे गेला. त्या काळीं द्वापारयुग संपत आलें होतें. तें जाणून ब्रह्मदेवानें त्यास सांगितलें कीं, प्रस्तुत भूमीवर कृष्णार्जुन अवतरले आहेत. त्यांकडे तूं जाऊन खांडव नांवाचें वन भक्षणार्थ माग, तें तूं भक्षिल्यानें झालेल्या व्याधीपासून त्वरित मुक्त होशील. त्यावरून ब्राह्मणवेषानें कृष्णार्जुनाकडे तें वन भक्षणार्थ मागितलें. त्या कालीं उभयतांनीं 'तथास्तु' म्हणून सांगितलें कीं, आम्हांपाशीं रथादि साहित्याची न्यूनता आहे, त्यावरून अग्नीनें वरुणाजवळून कपिलध्वजयुक्त एक दिव्य रथ, व 'गांडीव' या नांवाचें धनुष्य मागून आणून अर्जुनास, आणि वज्रनाथ नांवाचें चक्र व 'कौमोदकि' नांवाची गदा कृष्णास दिली. तेणेंकरून उभयतांहि संतुष्ट होऊन त्यांनीं यास वनांत प्रवेश करून तें भक्षिण्यास आज्ञा केली. तें वन अग्नि यथेच्छ भक्षण करूं लागला आहे हें इंद्रास कळतांच इंद्र निवारण करण्यास धांवून आला; तथापि कृष्णार्जुनांनीं त्याचा पराभव करून त्यास परत लावलें. पंधरा दिवस खांडव यथेच्छ भक्षून अग्नि जाड्यापासून मुक्त झाला.

२ हि ब्रु ध र्मा ती ल अ ग्नि पू जाः—अग्नि किंवा यज्ञकर्म यांचे उल्लेख 'हिब्रु' धर्मग्रंथांत फारच कमी प्रमाणांत आढळून येतात. या ग्रंथांत अग्न्युत्पत्तीची अशी आख्याइका आहे कीं जेहोवानें आदम् व ईव्ह ह्या मानवजातीच्या मूळ स्त्रीपुरुषास अग्न्युत्पत्तीची पद्धति विवरण केली. ज्या वेळीं आदम हा पहिल्या अंधःकारांत गुरफटून गेला, त्यावेळीं ईश्वराच्या पवित्रमूर्तीनें त्याला अग्नि उत्पन्न करण्याकरितां दोन विटा दिल्या. अशा रीतीनें हिब्रु ग्रंथांत अग्नीची उत्पत्ति ईश्वरापासून झाल्याचें सांगितलें आहे.

३. झोरोआस्ट्रियन धर्मांतील अग्निपूजाः—इराणी व भारतीय धर्मांतील अग्निपूजेमध्यें मुख्य दोन भेद दिसून येतात तेः–(१) इराणी धर्मांत प्रेतसंस्कारास पवित्र अग्नीचा निरुपयोग; व (२) भारतीय 'अग्नि' देवतेच्या मानानें इराणी 'आतर' देवतेचें अपूर्ण काल्पनिक स्वरूप; कांहीं तज्ज्ञ लोकांचें तर असें मत आहे कीं, 'अग्नी'ला इराणी धर्मांत देवतास्वरूप मुळींच आलें नाहीं. याशिवाय दुसरी एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं भारतीयांतील अग्निपूजेचा ऱ्हास होतां होतां ती एका विशिष्ट ब्राह्मण वर्गाच्याच हातीं आली, परंतु सांप्रतचा प्रत्येक पारशी मनुष्य अत्यंत प्राचीन पद्धत्यनुसार अग्निपूजा करतो.

आतरो (अग्नि) हें दिव्य प्रकाशाचें पार्थिव स्वरूप आहे. अग्नि हा 'अहुरमज्द' याचा पुत्र असून त्याच्यापासून झरदुष्ट्र जन्मला. अग्नि पांच प्रकारचा आहे. अहिर्मन् यानें अंधःकार व धूर अग्नीशीं मिश्रित केला. 'आतर' यानें 'आंग्र मैन्यू' याशीं युद्ध करण्यांत 'आहुर' यास सहाय्य केलें. ह्या किंवा अशाच प्रकारच्या अनेक आख्याइका अवेस्ता व पल्हवी ग्रंथांत सांगितल्या आहेत. अग्नीचे संरक्षक यासच ह्या पंथांत धर्मगुरु समजतात. हे संरक्षक अग्नीस कधींही विझूं देत नाहींत. अग्नीमध्यें प्रेत जाळणें, शेण वगैरेसारखे वाईट पदार्थ टाकणें यासारख्या कृत्यास देहांत शासन सांगितलें आहे. पारशी धर्मांतील उपासना व प्रातःकालीन प्रार्थनापद्धति, प्राचीन वैदिक पद्धतीशीं सदृश आहे, परंतु या प्रार्थनेचें सर्व साधारण स्वरूप अव्यक्तोपासनापर आहे. पारशांत मोठे यज्ञ करण्याची पद्धती आहेच. तिचें वर्णन इतरत्र दिलें आहे.

**अग्निकुलेंः**—यांत चौहान, चालुक्य, परमार आणि पडिहार या चार रजपूत कुलांचा समावेश होतो. रा. चिंतामणराव वैद्य यांनीं भा. इ. सं. मंडळाच्या नवम संमेलनांत वाचलेल्या "अग्निकुलकल्पनेची निर्मूलता" या निबंधांत, हीं चार रजपुत कुलें आपणांस अग्निकुलें मानतात तें चुकीचें आहे असें मांडलें आहे. इ. स. १००० च्या सुमारास हीं आपणांस सूर्यचंद्रवंशी समजत. चंदभाटानें पृथ्वीराजरासांत वसिष्ठऋषींनीं राक्षससंहारार्थ चार रजपूत अग्निकुंडांतून उत्पन्न केले असें जें अलंकारिक वर्णन लिहून ठेविलें त्यामुळें या कल्पनेला ऐतिहासिक स्वरूप येऊन, सूर्यचंद्रवंशीय कुलें आपल्याला बहुमानानें अग्निवंशज समजूं लागलीं. पुढील भाटांनींहि अग्नीशीं संबंध जोडणाऱ्या त्यांच्या वंशावळी तयार केल्या. पण याचा दुष्परिणाम असा झाला कीं पाश्चात्त्य संशोधक या कुलांना, हूणादि अनार्य जातीचे व वसिष्ठांनीं अग्निसंस्कार करून क्षत्रिय बनविलेले लोक असें मानूं लागले व त्यामुळें यांची सूर्यचंद्रापासून चालत आलेली शुद्ध परंपरा बुडूं लागली. तेव्हां अग्निकुलांत जन्मलेले असें खोटें म्हणवून घेण्यांत या रजपुतांनां कांहींच फायदा नाहीं. अग्निकुलाची कल्पनाच अगोदर मिथ्या आहे व म्हणून कोणते राजे अग्निकुलांतले हें संशोधण्याचेंच कारण नाहीं. वगैरे. रा. वैद्य यांचा अग्निकुलाच्या कल्पनेचा चंदभाटापूर्वी अभाव होता असा निर्णय आहे तोच आम्हांस मान्य करतां येत नाहीं.

चंदभाटापूर्वी स्वतःस अग्निकुलोत्पन्न मानणारे असे परमार राजे होते व इ. स. च्या ११ व्या शतकापूर्वी तेहि आपणास अग्निकुलोत्पन्न म्हणत असल्याचें आढळत नाहीं. तथापि अग्निकुलाची कल्पना याहून बरीच जुनी असली पाहिजे अशी शंका घेण्यास जागा आहे. होर्नले यानें प्राचीन तामीळ वाङ्मयावरून असें दाखविलें आहे कीं त्या भागांत एक राजवंश यज्ञाच्या अग्नींतून उत्पन्न झाला असल्याची समजूत रूढ होती. यासंबंधाचा पुरावा पुढें दिल्याप्रमाणें आहे.

तामिळदेशांत, विद्येचे शेवटचे सात आश्रयदाते म्हणून प्रसिद्ध असलेले कांहीं राजे होते. यांपैकीं मुख्य परम्बुनाड्चा पारि राजा हा होता. या पारि राजाचा चेर, चोल व पांड्यराजांनीं पाडाव केल्यामुळें त्याच्या मुलींचीं लग्नें करण्याचें काम

त्याच्या मित्र कपिलर नामक ब्राह्मणकवीवर येऊन पडलें. तेव्हां तो त्या मुलींना ज्या दोघां राजांकडे घेऊन गेला त्यांपैकीं एकास त्यानें अग्निकुलोत्पन्न असें संबोधिलें होतें. हा राजा म्हैसूरच्या दक्षिणेस असलेल्या पश्चिम घांटांतील एका लहानशा डोंगराळ अरयम नांवाच्या संस्थानचा अधिपति होता. याचें नांव पुलिकडी माल इरुन्गोव्हेल असें होतें.

"तिरुविलैयाडल पुराणं"प्रमाणें कपिलर कवि तिरुवादवूर येथें जन्मला असून त्यानें तामिल भाषेंत बरेच ग्रंथ लिहिले होते. कपिलर परणरचा समकालीन होता. या पुराणांत विवेचे दाते म्हणून तीन राजे होते त्यांचीं नांवें दिलीं नाहींत; परंतु सात आश्रयदात्यांचीं नांवें येणेंप्रमाणें दिलीं आहेतः—पळनिसजवळ पेहन; उत्तरेस पश्चिम घांटावर पारि; दक्षिण अर्काटमध्यें तिरुक्कोवलूरजवळ कारि, तिनेवेल्लीच्या पश्चिमेस पडियिल टेकडीजवळ आइ; धर्मपुरी अथवा म्हैसूरमधील तगडूर येथील अदिदमन; मलनाडूचा नल्लि; सालेममधील कोल्लि; मलैजवळचा ओरि; उरैयूरचा चोल व वंजीचा चेर.

कपिलर गजबाहुराजाच्या वेळीं होता. यावरून, कपिलरचा काल इ. स. चें दुसरें शतक असावें असें डॉ. होर्नलेनें अनुमान काढून इतक्या पुरातन काळींसुद्धां ऋषीच्या यज्ञकुंडांतील अग्नीपासून उत्पन्न झालेल्या राजवंशाची कल्पना रूढ होती असें दाखविलें आहे. [ इं. अँ. पु. ३४ ].

**अग्निक्रीडा**—मनुष्यानें आपली देहयात्रा चालविण्याकरितां व आपली करमणूक व मनोरंजन होण्याकरितां नानाप्रकारच्या कल्पना शोधून काढल्या आहेत. त्यांपैकींच अग्निक्रीडा किंवा आतषबाजी ही होय. अग्नि, ज्वालाग्राही पदार्थ, स्फोटक द्रव्याच्या संयोगानें दृष्टीस आनंददायक व मनाची कांहीं वेळ करमणूक करणारी अशी ही कल्पना आहे. हिंदु लोकांच्या चौसष्ट कलांचे यादींत अग्निक्रीडेचा निर्देश नसल्यानें दारूकाम तयार करण्याची कला आपले देशांत केव्हां व कोणी सुरू केली हें निश्चयात्मक सांगतां येणें शक्य नाहीं. बंदुकीची दारू तयार करण्यास जीं द्रव्यें लागतात, त्याच द्रव्यांत फेरफार करून आतषबाजीचे प्रकार तयार करितात. महाभारतांत शतघ्नी, युद्धयंत्रें वगैरे शब्द योजलेले आढळतात. परंतु शतघ्नी म्हणजे आधुनिक काळीं जीस तोफ किंवा machine gun म्हणतात, त्याच तत्वावर तयार केलेलें यंत्र होतें किंवा कसें ह्याचा खात्रीलायक निर्णय होणें कठीण आहे. कारण आपले देशांत सुसंगत व विश्वसनीय इतिहास किंवा बखरी लिहून ठेवायचा प्रघात नसल्यामुळें कल्पनाशक्तीवरच पुष्कळदां अवलंबून रहावें लागतें. बंदुकीची दारू, फटाके वगैरे करण्याची कला चिनी लोकांनीं प्रथम शोधून काढली व त्यांचेपासून इतर देशांत पसरली असा साधारण समज आहे. रोमनलोकांचे सर्कशींत—दारूकाम उडवीत. ग्रीकलोक शत्रूशीं दर्यांतील युद्धाचे वेळीं ज्वालाग्राही पदार्थांनें भरलेलीं जहाजें पेटवून शत्रूच्या जहाजांना जाळण्याकरितां व या रीतीनें शत्रूस घावरवून जेरीस आणण्याकरितां सोडीत असत. क्यारिनस व डायोक्लीशन या दोन रोमन बादशाहांच्या सन्मानार्थ दारुकाम उडविण्यांत आलें होतें अशीं वर्णनें आहेत. तसेंच क्लाडिअयन याचे ग्रंथावरून असेंही दिसतें कीं, चक्राप्रमाणें फिरणारें, व पावसाप्रमाणें देखावा दाखविणारें दारुकाम इ. सनाच्या चौथ्या शतकांत तयार होत असे. तसेंच दर्यावरील व जमिनीवरील युद्धप्रसंगीं अग्नीचे गोळे शत्रुसैन्यांत फेंकण्याची युक्तीही त्या काळीं निघाली होती.

ग्रीस, रोम आदिकरून मुख्य राष्ट्रांचा ऱ्हास झाल्यानंतर कांहीं कालपर्यंत ही कला बहुतेक युरोपखंडांत नामशेष झाली होती. परंतु क्रूसेडर्स ( ख्रिस्ती धर्मयुद्धांतील वीर ) यांनीं पूर्वेकडील लोकांपासून बंदुकीची दारु व इतर स्फोटक द्रव्यें करण्याची कला शिकून आपले देशांत त्याची माहिती नेल्यावर पुन्हां युरोपमध्यें त्या कलेचा प्रसार झाला. हिंदुस्थानांत जसें कांहीं ठिकाणीं विजयादशमीचे दिवशीं रावणाचीं मोठालीं बांबूचीं कागदानें मढविलेलीं चित्रें करून त्याचे आंत दारु घालून त्यास पेटवून देतात, त्याचप्रमाणें फ्लारेन्स वगैरे शहरीं सन १५४० पर्यंत बायबलांतले कांहीं प्रसंगांस साजेल अशा तऱ्हेचीं लांकडीं किंवा कागदी मोठीं चित्रें करून त्या चित्रांत दारू घालून पेटवून देत.

याच धर्तीवर इंग्लंड, फ्रान्स वगैरे देशांतही (Festivals) होळ्या किंवा अभ्युत्सव करीत असत. व हा प्रघात अद्यापिही कांहीं ठिकाणीं चालू आहे.

सोरा, गंधक व लाकडी कोळसा हे जिन्नस मुख्यत्वेंकरून बंदुकी दारूचे घटकावयव आहेत. त्यांतच मनशील, पोलादाचा कीस वगैरे पदार्थ मिसळले म्हणजे उडविण्याची दारू तयार होते. निरनिराळ्या रंगांचीं फुलें व गोळे दारू उडविते वेळेस निघण्याकरितां मिश्रणांत अनेक रासायनिक द्रव्यें घालावीं लागतात. त्यांची संपूर्ण माहिती या स्थळीं देणें अशक्य आहे. नमुन्याकरितां एक दोन कृति खालीं दिल्या आहेत.

**फिरतें चक्र करण्याची कृति.**

| | |
|---|---|
| बंदुकीची दारू | २४ भाग |
| सोरा | १० |
| गंधक | ७ |
| कोळसा | ५ |
| पोलादाचा कीस | ८ |

**हिरवे तारे करण्याची कृति.**

| | |
|---|---|
| पोटाशम क्लोरेट | १० |
| बेरिअम नायट्रेट | ४८ |
| गंधक | १२ |
| कोळसा | १ |
| लाख | ५ |
| रसकापूर | ८ |
| तांब्याचा कीस (कापर सल्फाईड) | २ |

खुद्द पेशवाईन आतषबाजीस बरेंच उत्तेजन मिळत होतें असें पेशव्यांच्या बखरींवरून व त्या वेळच्या दरबारांचीं वर्णनें इंग्रजी ग्रंथकारांनीं लिहून ठेवलीं आहेत आहेत त्यांवरून सिद्ध होतें. दरबार, लग्नसमारंभ किंवा इतर महत्वाचे प्रसंगीं दारू काम होऊन तो समारंभ पुरा व्हावयाचा अशी पूर्वीची वहिवाट होती. ह्या वेळीं पेशवे सरकार व इतर खाशी मंडळी पर्वतीचे टेंकडीवरून आतषबाजी पाहत असत. व दारुकाम पर्वतीचे तळ्याभोवतीं होत असे. अलीकडे नवीन शास्त्रीय शोध निघाल्यामुळें आतषबाजी (Pyrotechny) या कलेमध्यें पुष्कळ सुधारणा झाली आहे. व नवीन नवीन तऱ्हेच्या कामाची भर पडली आहे. पेशव्याचे वेळ' दारुकाम ह त असे त्याची यादी मिळाली आहे ती खालीं दिली आहे. त्या माहितीवरून पेशव्याचे कारकिर्दींत सुद्धां या कलेंत महाराष्ट्र पाठीमागें नव्हता असें सिद्ध होतें. सवाई माधवरावाच्या लग्नाच्या वेळच्या अग्निक्रीडेचें वर्णन पेशवाईच्या बखरींत आहे.

तावदाणी रोषणी—यांत कांचेच्या कमानीस भिंगें लावून त्यांत दारुकाम करण्याची व्यवस्था होती.

आकाशमंडळ—तारागण—हें दारुकाम बाणाप्रमाणें असून तें आकाशांत उंच फेंकल्यानंतर चित्रविचित्र रंगाचे तारे दिसत असत.

नारळी झाडें—ह्यांस अग्नि लावल्याबरोबर तोफेसारखा मोठा आवाज होऊन त्यांतून रंगीबेरंगी सर्पाकृति देखावे वगैरे निघत असत.

प्रभा चमक—ह्यांत फिरतीं चित्रें असून सोनेरी व रुपेरी रंगांमुळें हें काम फार शोभिवत दिसत असे.

ह्यांखेरीज पुष्कळ प्रकारचे बाण, पंखरें, फुलें, झाडें इत्यादि प्रकारची रंगीबेरंगी रोषणाई दिसत असे.

स्वदेशी अग्निक्रीडेमध्यें खालीं दिलेले प्रकार आढळून येतात.

घडेबाजी, भुईनळ, नळा, चद्रजोत, तारा, चांपा, चिचुंदरी, जातीण, पंठी, फुलझाडी, फुरझाड, फुलबाजी, मेहताब, बाजा, चक्र, शिंगर, सुरसुरी, हातनळा, लंका, दारूचा डल्ला वगैरे.

नवीन शास्त्रीय शोध युरोपीयन देशांत झाल्यामुळें पुष्कळसें स्वदेशी दारुकाम मागें पडून विलायती माल त्याऐवजीं मोठ्या प्रमाणावर हिंदुस्थानांत येऊं लागला आहे. व इतर धंद्यांप्रमाणें हा धंदाही हलके हलके परकीयांच्या हातीं जाण्याचे पंथास लागला आहे. इकडे सुशिक्षित लोक व रसायनशास्त्रवेत्ते यांचें लक्ष गेल्यास ह्या धंद्याचें पुनरुज्जीवन होईल असें वाटतें.

**अग्निपुराण**—नांवावरून हें पुराण अग्निमाहात्म्य वर्णन करणारें असावें असा साहजिक तर्क धांवतो; पण तसें नसून अग्नीनें वसिष्ठाला पाठविलेलें विद्यासार यांत ग्रथित केलें आहे. सर्ग, प्रतिसर्ग, वंश, मन्वंतर आणि वंशानुचरित हीं पांच लक्षणें सामान्यतः पुराणांत प्रामुख्यानें आढळतात; यांशिवाय इतर अनेक विषय पुराणांत असतात. अग्निपुराणांत याच्या उलट प्रकार आहे. वरील पंचलक्षणांना यांत विशेष महत्त्व दिलें नसून, परा व अपरा या दोन विद्या यांत जास्त विवेचिल्या आहेत. यांखेरीज मनुष्याला उपयुक्त अशा पुष्कळ गोष्टी यांत घुसडून दिल्या आहेत, हें सहज चाळणारालाहि समजून येतें. थोडक्यांत याचें स्वरूप सांगावयाचें म्हणजे हा एक स्वतंत्र प्राचीन ज्ञानकोशच आहे. अवतारचरित्रें, भारतरामायणादि इतिहास ग्रंथ, पुराणें, वंशावळी जगदुत्पत्तिविवेचन, ज्योतिःशास्त्र वास्तुशास्त्र, वैद्यकशास्त्र, नाट्यशास्त्र, छंदःशास्त्र, काव्य—व्याकरणशास्त्र, तत्त्वज्ञान, व्यवहारनीति, यांसारिखे विविध विषय यांत आहेत. पुराणामध्यें हा ग्रंथ तामस कोटींत घालण्यांत येतो याचें कारणच हें कीं यांत परमार्थासंबंधीं फार थोडा उहापोह केला आहे.

कोणत्याहि एका विशिष्ट पंथाचा यांत पुरस्कार केलेला दिसत नसला तरी, शैवधर्माचें प्राबल्य या पुराणरचनेच्या काळीं असावें व मंत्रतंत्राकडे लोकांचा ओढा असावा असें वाटतें.

आनंदाश्रम संस्कृत ग्रंथावलींत प्रसिद्ध झालेल्या अग्निपुराणाच्या प्रतींत ३८३ अध्याय व ११४५७ श्लोक आहेत. नारदपुराणांत अग्निपुराणांतील श्लोकसंख्या १५ हजार व मत्स्यपुराणांत ही संख्या १६ हजार म्हणून म्हटली आहे. शिवाय या पुराणाची विषयानुक्रमणिका जी नारदपुराणांत दिली आहे त्यांत ईशानकल्पवृत्तांताचा उल्लेख केलेला आहे पण तो वृत्तांत उपलब्ध असणाऱ्या अग्निपुराणांत नाहीं. तसेंच बल्लाळसेनानें दानसागरांत अग्निपुराणांतील म्हणून जे उतारे घेतले आहेत त्यांतील कांहीं यांत नाहींत. तेव्हां या पुराणाचा कांहीं भाग लुप्त झाला असला पाहिजे हें सिद्ध होतें.

याचा काल कोणता हें सांगणें फार कठीण आहे तथापि ख्रि. शकाच्या ५ व्या शतकानंतर व मुसलमानी स्वाऱ्या हिंदुस्थानावर होण्याच्या आधीं याचें संकलन झालें असावें असें वाटतें.

संदर्भ ग्रंथ—दत्त—अग्निपुराण (वेल्थ ऑफ इंडिया सीरीज). काळे—पुराण निरीक्षण. विंटरनिझ—हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर (जर्मन ग्रंथ). असन—हिंदु क्लसिकल डिक्शनरी. अग्निपुराण आनंदाश्रम आवृत्ति

ह्यापुराणांत अनेक विषय आल्यामुळें या पुराणाचें सविस्तर वर्णन दिल्यास प्राचीन हिंदूंच्या सामाजिक व राजकीय आयुष्यक्रमाची साकल्यानें कल्पना येईल म्हणून या ग्रंथाचें सविस्तर वर्णन दिलें आहे. व प्रसंगीं ज्या अनेक विषयांविषयीं सामान्य वाचकास जिज्ञासा असेल अशा विषयांचें तर अधिक विस्तारशः वर्णन केलें आहे. अग्निपुराणांत अनेक शास्त्रांचें विवेचन आहे. निरनिराळ्या शास्त्रांवरील लेखांच्या प्रसंगीं अग्निपुराणांचा उल्लेख करावा लागतो किंवा त्यांतील शास्त्रविवेचनाचें स्वरूप

द्यावें लागतें. यासाठीं अग्निपुराणाचें यथार्थ स्वरूप येथेंच दिलेलें बरें.

अं त रं ग नि री क्ष ण

दशावतार वर्णन अ. १-१६

पहिल्या अध्यायांत प्रथम श्लोकामध्यें लक्ष्मी, सरस्वती, गौरी, गणेश, स्कंद, ईश्वर ब्रह्मा, वन्हि, इन्द्रादिक, व वासुदेव यांचें मंगल केलें आहे. इतक्यांचें मंगल अथवा त्यांना केलेला नमस्कार इतरत्र आपणांस फारसा आढळत नाहीं.

ऋषींनीं सूतांस आम्हांस सारांत सार काय आहे तें सांग असा प्रश्न केला. तेव्हां झालेला अग्निवसिष्ठसंवाद सूतानें ऋषींस सांगितला. हा अग्निवसिष्ठसंवाद म्हणजेच अग्निपुराण होय. परा व अपरा या दोन विद्येला धरून हें पुराण सांगण्यांत आलें आहे. अर्थात् ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्व वेद व त्यांचीं सहा अंगें शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, ज्योतिष व छंद; मीमांसा, धर्मशास्त्र, पुराण, न्याय, वैद्यक, गांधर्व, धनुर्वेद, अर्थशास्त्र, हीं अपरा व परा म्हणजे ब्रह्मप्राप्त्यर्थ सांगितलेलीं ज्ञानविषयक वचनें, ह्या परापरा विद्या होत. अशा तऱ्हेनें या पुराणाचा आरंभ झाला आहे.

दुसरी गोष्ट म्हटली म्हणजे ब्रह्मदेव, सृष्टी वगैरे विषयांपासून या पुराणाला आरंभ न होतां अवतारचरित्रापासून आरंभ झाला आहे.

अ. २. मत्स्यावतारचरित्र अ. ३. कूर्मावतार. पद्मपुराण व मत्स्यपुराण यांमध्यें हे विषय आले आहेत. विषयांच्या प्रतिपादनांत फरक नाहीं. श्लोकरचना मात्र निराळी आहे. मत्स्यपुराणांत कूर्मावतारचरित्र आढळत नाहीं. अवतार चरित्रें बहुतेक पुराणांत आहेतच. अ. ४ वराह, नारसिंह, वामन व परशुराम यांचीं संक्षिप्त चरित्रें, अ. ५ श्रीरामावतार. यांत वाल्मीकिरामायणांतील जन्मकांडाचा संक्षिप्त विचार आला आहे. अ. ६ रामायण, अयोध्याकांड. अ. ७ रामायण, अरण्यकांड अ. ८ रामायण, किष्किन्धाकांड. अ. ९ रामायण, सुंदरकांड. अ. १० रामायण, युद्धकांड. अ. ११ रामायण, उत्तरकांड. "रामरावणयोर्युद्धं रामरावणयोरीव" हा सुप्रसिद्ध श्लोकार्ध येथें आहे. हें रामायण संक्षिप्त असून त्यांत महत्त्वाचा कोणताही कथाविषय सुटलेला नाहीं. या एकंदर रामायणाच्या श्लोकांची संख्या १८९ आहे.

अ. १२ कृष्णावतार ( यांत आलेल्या गोमंताचा निर्णय कसा करावयाचा. कारण गोमंत हा आपण जर गोवा प्रांत घेतला तर जरासंधाच्या स्वारीला भिऊन मथुरा सोडून कृष्ण इतक्या दूर पळून गेला असेल हें संभवनीय नाहीं. गोमंत हें पर्वताचें नांव आहे. भागवतांत त्या पर्वताचें नांव निराळें आहे. )

भारताख्यान अ. १३।१४।१५ यांत आहे. तीन अध्याय मिळून अवघे ७२ श्लोक आहेत.

अ. १६ वा. बुद्धावतार व कल्क्यवतार. बुद्धावताराची कथा सर्वत्र आहेच. बुद्धावताराची पौराणिक समजूत अथवा कथा अशी आहे कीं, पूर्वी देव दैत्यांच्या युद्धांत देवांचा पराभव झाला. तेव्हां देवांनीं विष्णूची प्रार्थना केली. विष्णूनें बुद्धाचा अवतार घेतला. तो काल असा होता कीं सगळे दैत्य वैदिक कर्म करणारे होते व त्यांस त्या धर्मापासून भ्रष्ट करून त्यांचा नाश करावयाचा होता म्हणून बुद्धाचा अवतार विष्णूनें घेतला. म्हणून बुद्धांच्या मताचें अनुकरण करणारे बौद्ध होत. त्यापुढें जैनमताचा उद्भव झाला अशी समजूत व्यक्त केली आहे. जैनमताचा पुरस्कर्ता विष्णूचाच अवतार असें समजतात.

आर्हतः सोऽभवत्पश्चादार्हतानकरोत्परान् ॥

सृष्टीची उत्पत्ति अ. १७-२०

अ. १७. जगत्सर्गवर्णन; सर्ग म्हणजे ब्रह्मापासून हिरण्यगर्भ ब्रह्मापर्यंतची उत्पत्ति. हें वर्णन सर्वांच्या परिचयाचें आहे. "अप एव ससर्जादौ" हा श्लोक इतर पुराणाप्रमाणें येथेंहि आहे (१७।७). अव्यक्त ब्रह्म, प्रकृति-पुरुष, महत्व, अहंकार, तो तीन प्रकारचा, वैकारिक, तैजस, व तामस अहंकार.– आकाश वायु, तेज पाणी व पृथ्वी ही तामस अहंकाराची संतती. तैजस अहंकारापासून इन्द्रियें व वैकारिक अहंकारापासून इन्द्रियांच्या अधिष्ठातृ देवता व मन हीं उत्पन्न झालीं. "ततःस्वयंभूर्भगवान्" या श्लोकार्धापासून अध्याय संपेपर्यंत सगळे श्लोक भारतांतून घेतले असावेत. कारण दोन्ही ग्रंथांत श्लोकरचनेचें साम्य आहे असें टीपाकारानें म्हटलें आहे. हेच श्लोक हरिवंश अ. २ यामध्यें आहे असें टीपाकार म्हणतो. अ. १८ वा स्वायंभुवमनुवंशवर्णन, हा अध्याय थोड्या फार फरकानें पूर्वीच्याच अध्यायाप्रमाणें हरिवंशांत आहे. अ. १९ कश्यपवर्णन अ. २० जगत्सर्गवर्णन ( पुढें चालू ) अ. १७ यांत सांगितलेल्या प्राकृतादि तीन सर्गांच्या पुढचें हें वर्णन आहे प्राकृतसर्गामध्यें महत्सर्ग ( महत्तापासून अहंकारापर्यंत ), भूतसर्ग ( आकाशापासून पृथ्वीपर्यंत ), वैकारिक सर्ग ( भूतांच्या सूक्ष्मत्वानें बनलेला इंद्रियवर्ग ), हे तीन सर्ग मोडतात. विकृत सर्गामध्यें स्थावर, तिर्यक् स्रोतस, अधःस्रोतस, ऊर्ध्वस्रोतस व अनुग्रहसर्ग असे ५ भाग कल्पितात. तिर्यक्स्रोतस् म्हणजेच तिर्यक् योनीमध्यें जन्मलेले प्राणी, उर्ध्वस्रोतस् म्हणजेच देवसर्ग, अर्वाक्स्रोतस् म्हणजे मनुष्य सर्ग, हे वैकृत पांच व तामस तीन मिळून ८ सर्ग, व नववा सात्विककुमारसर्ग होय. म्हणून ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेले जगाचे मूळभूत नऊ सर्ग होत.

देवोपासना व मंत्र अ. २१-३८

अ. २१ विष्ण्वादि देवतांची सामान्यपूजा. यांत देवतांच्या मंत्रबीजांचें विधान आहे. अ. २२ पूजाधिकारार्थ सामान्य स्नानविधि. अ० २३ आदिमूर्त्यादिपूजाविधि अ० २४ कुंडनिर्माणादि अग्निकार्यादिकथन. षोडशसंस्कार. अ. २५ वासुदेवादि मंत्रलक्षण. अ. २६ मुद्रालक्षण. अ. २७ शिष्यांना दीक्षा देण्याचा प्रकार. अ. २८ आचार्याभिषेक

वर्णन. अ. २९।२९ मंत्रसाधनविधि, सर्वतोभद्रादि लक्षण व विधान. अ. ३०;३१ अपामार्जनविधान. अ. ३२ निर्वाण-दीक्षासिध्यर्थसंस्कारवर्णन. अ. ३३।३६ पवित्रकारोपण विधि, पूजा व होम, [ अधिवासन व इतर देवतासंबंधीं पवित्रारोपण विधि-उत्तर खंड अ. ८९ पद्म पुराण त्यांत व ह्यांत फरक आहे. हा पवित्रारोपण विधि श्रावण महिन्यांत सांगितला आहे. ] अ. ३८ देवालयनिर्माणफल, निर्माणारंभ. देवालय निर्माण करण्यासाठीं जमीनीची परीक्षा. ही परीक्षा पंचरात्र, अथवा सहा रात्र यांमध्यें दिली आहे. प्राण-प्रतिष्ठा करण्याला लायक ब्राह्मण कोण याचा ग्रंथोक्त विचार येणेंप्रमाणें. मध्यदेशांतील ब्राह्मण प्राणप्रतिष्ठेला योग्य आहे. कच्छ, कावेरी, कोंकण, कलिंग, कांची, काश्मीरक या देशांतील ब्राह्मण प्रतिष्ठेला अयोग्य आहेत. जमीनीचा उंच-वटा काढून टाकून ती सारखी करावी व मापावी. नंतर अष्टदिशेकडे सातु, उडीद, हळद वगैरे द्रव्यें टाकावींत. त्या-योगानें राक्षस पिशाच वगैरेंचा नाश होतो. ही जमीन देव स्थापनेला योग्य होते. ही जमीन सारखी करण्याचें यंत्र म्हटलें म्हणजे बैलांकडून नांगर ओढणें हा होय. हा विषय कमी ज्यास्त प्रमाणानें मत्स्यपुराण अ. २५२ पासून आला आहे.

उ पा स ना मि श्र वा स्तु शा स्त्र ३९.१०६

अध्याय ३९ पासून ४५ पर्यंतचा विचार वास्तुशास्त्रविषयक विचार आहे. यांतील बराचसा भाग दुर्बोध आहे.

अ. ४६।४७ शालग्राम लक्षण. व पूजन अ. ४८ केशवादि चोवीस नांवांच्या मूर्तींचें स्तोत्र. अ. ४९ दशावतारप्रतिमा-लक्षण. अ. ५० चंडी आदि देवींच्या प्रतिमेचीं लक्षणें; अ. ५१ सूर्यादिग्रहदेवताप्रतिमालक्षणें. अ. ५२ चौसष्टयोगिनीप्रतिमा-लक्षणें. अ. ५३ लिंगादिलक्षण. अ. ५४ लिंगाच्या प्रमाणाचें व्यक्ताव्यक्तस्वरूप. अ. ५५ पिंडिकालक्षण. अ. ५६ दश-दिक्पालयागवर्णन. अ. ५७ कलशाधिवासविधि. अ. ५८ स्नपन विधि. अ. ५९ अधिवासनविधि. अ. ६० वासुदेवादि देवतांची सामान्य प्रतिष्ठा. अ. ६१ अवभृतस्नान, द्वारप्रतिष्ठा. ध्वजारोपण विधि. अ. ६२ लक्ष्यादिदेवताप्रतिष्ठासामान्यविधि. अ. ६३ विष्णवादिदेवताप्रतिष्ठासामान्यविधि. पु स्त क ले ख न-वि धि.—हें कसें लिहावें याचा विचार नसून फक्त वर सांगि-तलेले नारसिंह मंत्र रूपेरी अथवा सोनेरी शाईनें नागर भाषे-मध्यें लिहावेत येवढाच उल्लेख आहे.

स्था प ना क र्म—अ. ६४ कूपवापीतडागप्रतिष्ठाविधि. अ. ६५ सभादिस्थापनविधि. अ. ६६ जमीनीची परीक्षा करून तेथें वास्तुयाग करावा. ही सभा चौक अथवा गांवाच्या आरंभीं करावी, शून्य ठिकाणीं करूं नये. या सभेमध्यें चार, तीन, दोन अथवा एक शाल किंवा कोपरे हे सोडावेत.

अ. ६६ देवतासामान्यप्रतिष्ठा. अ. ६७ जीर्णोद्धारविधि. अ. ६८ वा उत्सवविधि. अ. ६९ मूर्तींनां स्नान घालण्याचा विधि. अ. ७० पादपप्रतिष्ठा. वृक्षांना अलंकृत करून सोन्याच्या सुईनें टोंचे मारावेत व नंतर पूजा करावी. अ. ७१ गणपतिपूजा. अ. ७२ स्नानविधि. अ. ७३ सूर्यपूजाकथनं सूर्याच्या अंगाला रक्षावगुंठन करून पूजा करावी. अ. ७४।७५ शिवपूजाहोमविधि. जप करतांना चर्मानें वेष्टिलेलें खड्ग चें गंध, फूल, अक्षता, दर्भ इत्यादिकांनीं पूजावें. हातांत अर्घ्याचें पात्र घेऊन अग्निगृहांत जावें. यागाला लागणाऱ्या सर्व द्रव्यांची तरतूद ठेवावी. उत्तरेकडे तोंड करून कुंडांवर प्रोक्षण करावें. हें प्रोक्षण अस्त्रमंत्रानें करावें, वर्मानें अभ्युक्षण, खड्गानें जमीन उकरणें, वर्मानें सारखी करून पाणी शिंपडणें, बाणाच्या टोकानें मातीचें ढेंकूळ फोडणें, त्रिसूत्री परिधान, वर्मानें पूजन अशाच तऱ्हेनें ही सर्व तांत्रिक पूजा आहे असें समजावें.

अ. ७६ चंडपूजा अ. ७७ कपिलापूजा अ. ७८ पवित्रा-धिवासनविधि. कुलधर्म अजून प्रसिद्ध आहे अ. ७९ पवित्रा-रोहण विधि. अ. ८० दमनका रोहणविधि. अ. ८१ समय-दीक्षा अ. ८२ वा. संस्कारदीक्षा.

हे सर्व विषय मंत्रशास्त्रांतले आहेत.

अ. ८३ निर्वाणदीक्षाविधि. अ. ८४ निवृत्तिकलाशोधन. अ. ८५ प्रतिष्ठाकलासंशोधन. अ. ८६ विद्यासंशोधनविधि. अ. ८७ शांतिशोधनविधि. अ. ८८ निर्वाणदीक्षाशेषविधि वर्णन. अ. ८९ एकतत्वदीक्षाविधि. अ. ९० अभिषेकादि. अ. ९१।९२ प्रतिष्ठाविधि, अभिषेकानें देवतापूजन संक्षेपानें. अ. ९३ वास्तुपूजा. अ. ९४ शिलाविन्यास. अ. ९५ प्रतिष्ठा कालसामग्र्यादिविधि. अ. ९६ प्रतिष्ठाविधींतील अधिवासनविधि. अ. ९७ शिवप्रतिष्ठाविधि. अ. ९८ गौरीप्रतिष्ठाविधि. अ. ९९ सूर्यप्रतिष्ठा. अ. १०० द्वारप्रतिष्ठाविधि. अ. १०१ प्रासाद-प्रतिष्ठा. अ. १०२ ध्वजारोपणविधि.

अ. १०३ जीर्णोद्धारविधि. अ. १०४ प्रासादलक्षण. अ. १०५ गृहादिवास्तुविचार. अ. १०६ नगरादिकवास्तुकथन.

भू गो ल ज्ञा न—अ. १०७ प्राचीनभूगोलज्ञानबोधक आहे स्वायंभुवसर्ग. स्वयंभुमनूच्या वंशाचा थोडक्यांत उल्लेख. अ. १०८ भुवनकोश. या भुवनामध्यें सात द्वीपें असून त्यांच्या भोंवतीं सहा सागराचा वेढा आहे. त्या सप्तद्वीपांचीं नांवें:— जंबु, प्लक्ष, शाल्मलि, कुश, क्रौंच, शाक व पुष्कर, हीं होत. सहा समुद्रांचीं नांवें—खारा समुद्र, उंसांचा समुद्र, दारुचा समुद्र, तुपाचा समुद्र, दह्याचा समुद्र, दुधाचा समुद्र, गोड्या-पाण्याचा समुद्र. अ. १०९ तीर्थमाहात्म्य. अ. ११० गंगामहा-त्म्य. अ. १११ प्रयागमाहात्म्य. अ. ११२ वाराणसी-माहात्म्य. अ. ११३ नर्मदामाहात्म्य. अध्याय ११४ ते ११६ गयामाहात्म्य. पुराणांतील " एको मुनिः कुंभकुशाग्र हस्त " हा रूढ श्लोक या ठिकाणीं आहे. अ. ११७ श्राद्धकल्प. ११८ भारतवर्ष या भरतवर्षांत इन्द्रद्वीप, कसेरु, ताम्रवर्ण, गभस्ति, नागद्वीप, सौम्य, गांधर्व, वारुण, अशीं आठ वर्षें आहेत. ११९ महाद्वीपादिवर्णन. १२० भुवनकोशवर्णन.

फलज्योतिषमिश्रित ज्योतिःशास्त्र व वैद्यक अ. १२१-१४१ अ. १२१ ज्योतिःशास्त्र. अ. १२२ कालगणना. १२३ युद्ध जयार्णवीय. नानायोगांचीं नांवें. युद्धजयार्णव हा ग्रन्थ दिसतो. स्वरोदय, शनिचक्र, कूर्मचक्र, व राहुचक्र, हे यांत विषय आहेत. अ.१२४ युद्धजयार्णवीय ज्योतिःसारवर्णन. अ.१२५ युद्धजयार्णवीय नानाचक्रवणन. हा व या पुढील वर्णनभाग मंत्रशास्त्राचा आहे. अ. १२६ नक्षत्रनिर्णय. अ. १२७ नानावल.

अ. १२८ कोटचक्र. अ. १२९ अर्घकाणु. अ. १३० मंडलादिकथन. १३१ घातचक्र. १३२ सेवाचक्र. १३३ नानावलवर्णन. गर्भामध्यें असलेल्या जीवाचें ग्रहबलावरून स्वरूपवर्णन; उदहरणार्थ. सूर्याच्या घरांत पडलेला फार ऊंच स्थूल, कृश, ठेंगणा असा नसून मनुष्य मध्यम असतो, गोरा व पित्त प्रकृतीचा असून रक्ताक्ष, गुणी व शूर उपजतो. याप्रमाणें पुढील ग्रहांचें बलाबल जाणणें. याचप्रमाणें ग्रहांच्या दशांचें बलाबल वार्णिलें आहे. याशिवाय मंत्रविद्या वार्णिली आहे. अ. १३४ त्रैलोक्यविजयविद्यामंत्रशास्त्र. अ. १३५ संग्रामविजयविद्या. अ. १३६ नक्षत्रचक्र. अ. १३७ महामारीविद्याकथन ( मंत्र ). अ. १३८ मंत्रशास्त्रांतील सहा कर्में. अ. १३९ साठ संवत्सरांचीं नांवें अ. १४० वश्यादि योग. यांत कांहीं वनस्पतींचीं नांवें आहेत.

अ. १४१ छत्तीस पदकांचें ज्ञान. वनस्पतींचा व इतर द्रव्यांचा उल्लेख आहे. येथें ज्योतिषमिश्र वैद्यक आहे. हिरडा (हरीतकी), ब्याहडा (अक्ष), अवळकाठी (आमलकी), मिरें (मरीच), पिंपळी (पिप्पली), वाळंतशेप (शिफा), चित्रक (वन्हि), सुंठ (शुंठी), गुडुची (गुळवेल), वेखंड (वचा), निंब (निंबक), अडळसा (वासक), शतावरी (शतमूली), सैंधव (सैंधंव), सिंधु वारक, निर्गुंडी (कंटकारी), गोखरू (गोक्षुरक), बेल ( बिल्व ), पुनर्नवा किंवा घेटोळी (पौनर्नवा), एरंड, मुंडी, शेंदेलोण (रुचक ), माका ( भृंग ), क्षार, पित्तपापडा ( पर्पट ), धणे ( धन्याक ), जिरें ( जीरक ), वडीशेप ( शतपुष्पी ), ओंवा (जवानिका), वावडींग (विडंग), खैर (खदिर), बाहवा (कृतमाल), सिद्धार्थ, दारुहळद, मोहरी.

अ. १४२ मंत्रौषधिप्रकरण. प्रश्न कसा पाहवायाचा विचार अ.१४३।१४४ कुब्जिका पूजा, अ. १४५ मालिनी मंत्र. अ. १४६ अष्टाष्टकदेव्य. अ. १४७ त्वरितापूजा. अ. १४८ संग्रामविजयपूजा. अ, १४९ लक्षकोटिहोम.

व र्णा श्र म ध र्म अ. १५० मन्वंतरें. अ. १५१ वर्णेतर धर्मकथन. सर्व धर्मांचें श्रवण करावें, राजांवर प्रेम ठेवावें. याशिवाय अहिंसा सत्यवदन वगैरे धर्म सार्ववर्णिक आहेतच. वध्यांचा वध करणें हें चांडाळाचें काम होय स्त्रियांवर उपजीविका करणें व त्यांचें रक्षण करणें हें वैदेहकाचें काम होय. अश्वसारथ्य करणें हें सूताचें काम होय. व्याधाचें काम करणें हें पुल्कसाचें काम होय. राजाची वंशावळी गाणें अथवा स्तुति करणें हें मागधाचें काम होय. रंगावतरण व शिल्पावर जीवन करणें हें आयोगवाचें काम होय. गांवाच्या बाहेर राहणें व मृतांचीं वस्त्रें धारण करणें हें चांडाळाचें काम होय. चांडाल अस्पृश्य होय.

गाईसाठीं अथवा ब्राह्मणासाठीं अथवा स्त्रिया मुलें वगैरे आपत्ती मध्यें पडल्यास त्यांच्यासाठीं ज्यानें आपला देह खर्ची पाडला तो ह्या बाह्य वर्गांतून वर येतो. किंवा त्या बाह्याची सिद्धि होते.

गृ ह स्थ वृ त्ति. अ. १५२ गृहस्थवृत्ति. मरेपर्यंत ब्राह्मणानें आपली वृत्ति सोडूं नये. तथापि आपत्कालीं त्यानें क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र वृत्तीचा आश्रय करावा. या पुढच्या म्हणजे बाह्यांच्या वृत्तीचा आश्रय करूं नये. कृषि, वाणिज्य, गोरक्षा, व व्याजबट्टा हें ब्राह्मणाच्या वृत्तीचें साधन आहे. गोरस, गूळ, मीठ, लाख, व मांस हीं विकूं नये. भूमी खणून, औषधी तोडून, पिपीलिकादिकांचा नाश केल्यानें घडणाऱ्या पातकांचा नाश यज्ञानें होतो. पण हें यज्ञाचें फल देवपूजेनेंच शेतकऱ्यास प्राप्त होतें. नांगरास आठ बैल जुंपणें उत्तम, ६ जोडणें मध्यम, चार जोडणें अधम व २ जोडणें अधमाधम. याला धर्म्य, जीवितार्थ, नृशंस व धर्मघातक अशीं नांवें आहेत.

अ. १५३ ब्रह्मचर्याश्रम धर्म. अ. १५४ विवाह. विवाहाच्या वेळेस क्षत्रिय स्त्रीनें बाण, वैश्यस्त्रीनें चाबूक, शूद्रस्त्रीनें फडकें हातांत धरावें. अपत्यविक्रयास प्रायश्चित्त नाहीं. "नष्टे मृते प्रव्रजिते." हा पाराशर स्मृत्युक्त श्लोक येथें आहे. अ. १५५ आचार. अ. १५६ द्रव्यशुद्धि अ. १५७ प्रेतासंबंधीं अशौचनिर्णय अ. १५८ गर्भस्रावाचा अशौचनिर्णय. अस्थिसंचयनास. ४। ५।७।९ हे दिवस अनुक्रमानें घ्यावे असें हा ग्रंथकार म्हणतो. परंतु पराशरमाधवामध्यें ३।५।७।९ हे दिवस घेतले आहेत व अस्थिसंचयन गोत्रजांसह करावें असें मत दिलें आहे व चतुर्थाबद्दलचा उल्लेख विष्णुस्मृतीचा केला आहे. अ. १५९ अ. संस्कृतादिशौचनिर्णय. अ. १६० वानप्रस्थाश्रमवर्णन अ. १६१ यतिधर्म. अ. १६२ धर्मशास्त्रकथन अ. १६३ श्राद्धकल्पवर्णन.

१६४ नवग्रहहोम १६५ नानाधर्मवर्णन; "न स्त्री दुष्यति जारेण ...बलात्कारोप भुक्ता चेत्" बलात्कारानें उपभुक्त स्त्री अथवा शत्रु हस्तगत स्त्री टाकावी; ती ऋतुकालीं शुद्ध होते. कित्येकांच्या मतें योगाची व्याख्या 'मन व इन्द्रियें यांच्या संयोगास योग म्हणतात ' ( विषयेन्द्रियसंयोगेकाचिद्योगंवदंतिवै ) अशी आहे; परंतु ग्रंथकारास हें म्हणणें पसंत नाहीं. असवर्णानें स्त्रीचे ठायीं राहिलेला गर्भ तो असेपर्यंत ती स्त्री अशुद्ध आहे. शल नाहिसें झाल्यावर रजानंतर ती स्त्री शुद्ध होते. (अशुद्धातुभवेत्नारी यावच्छल्यंनमुंचति) अ. १६६ वर्णधर्मादिकथन अ. १६७, ग्रहयज्ञ अयुतलक्षकोटिहोम अ. १६८।१७४ महापातकादिकथन व प्रायश्चित्त.

व्र तें. अध्याय १७५ पासून २०८ पर्यंत अध्याय व्रताकडेसच दिले आहेत. अ. १७५ व्रतपरिभाषा अ. १७६ प्रतिपदा-

व्रतें. अग्निव्रत अ. १७७ द्वितीयाव्रतें. अ. १७८ तृतीयाव्रतें. अ. १७९ चतुर्थीव्रत. अ. १८० पंचमीव्रतें अ. १८१ षष्ठीव्रतें. अ. १८२ सप्तमीव्रतें. अ. १८३।१८४ अष्टमीव्रतें अ. १८५ नवमीव्रतें. अ. १८६ दशमीव्रतें. अ. १८७ एकादशीव्रतें. १८८ द्वादशीव्रतें. अ. १८९ श्रवणद्वादशीव्रत. अ. १९० अखंडद्वादशीव्रत. अ. १९१ त्रयोदशीव्रतें. अ. १९२ चतुर्दशी व्रतें. अ. १९३ शिवरात्रिव्रत. अ. १९४ अशोकपौर्णिमाव्रत. अ. १९५ वारव्रतें. अ. १९६ नक्षत्रव्रतें. नक्षत्र पुरुष कल्पून त्याची पूजा करावयाची. अ. १९७ दिवसव्रतें. अ. १९८ मासव्रतें. अ. १९९ अनेक व्रतें. अ. २०० दीपदानव्रत. तुलनेसाठीं या एकंदर व्रतांचा व त्यासंबंधीच्या कथांचा संग्रह आपणांस व्रतराज, व्रतार्क किंवा व्रतकौमुदी वगैरे धार्मिक ग्रंथांमध्यें सांपडेल. या अध्यायांत देविका नदीचें नांव आहे. ही कोठें आहे, हें कळत नाहीं.

अ. २०१ नवव्यूहार्चन. अ. २०२ पुष्पवर्गकथन, देवांच्या पूजेला लागणारीं निरनिराळ्या तऱ्हेचीं फुलें. अ. २०३ नरकवर्णन. अ. २०४ मासोपमासव्रत. अ. २०५ भीष्मपंचकव्रत अ. २०६ अगस्त्यार्घ्यदानकथन अ. २०७ कौमुदव्रत अ. २०८ व्रतदानादिसमुच्चय.

दा न मी मां सा—अ. २०९ दानपरिभाषाकथन. अ. २१० महादानविधि. अ. २११ अनेक प्रकारचीं दानें. ज्यांच्यापाशीं दहा गाई आहेत त्यांनीं १ द्यावी. याप्रमाणें दशांशाचें प्रमाण आहे. येथें उल्लेखिलेलें महिषदान हें आम्हांस अपरिचित वाटतें तसेंच रुप्याचा चंद्र करून मस्तकीं धरावा; व तो ब्राह्मणाला द्यावा. आपला लोखंडाचा पुतळा करून देणें किंवा निरनिराळ्या द्रव्यांचा पुतळा करणें, तो असा. पुरुष काळ्या तिळाचा बनवावा. दांत रुप्याचे बनवावे, डोळे सोन्याचे, हातांतील तरवार उगारलेली दाखवावी, तांबडें वस्त्र नेसलेला, शंखाच्या माळा घातलेला, पायांत पादत्राण घातलेला, काळी कांबळ पांघरलेला, डाव्या हातांत मांस दिलेला, सोन्याच्या अश्वावर बसलेला असा हा काल पुरुष करावा.

ब्राह्मणाला दासी अर्पण करावी. ( दासीं दत्वा द्विजेन्द्राय ) बसवपुराणांत बसव हा जंगमांस पुष्कळ वेश्या देत असे असें वर्णन आहे, त्यास हंमावयास नको अ. २१२ मेरुदान अ. २१३ पृथ्वीदान अ. २१४ नाडीचक्र. अ. २१५ संध्याविधि. गायत्री जप व हवन यांसंबंधीं विचार सांगितला आहे. अ. २१६।२१७ गायत्रीनिर्वाण. अ. २१८ राजधर्माचें वर्णन. पूर्वी राज्याभिषेक कालीं राजाला सर्व तऱ्हेच्या धार्मिक लोकांचें पालन करीन अशी प्रतिज्ञा करावी लागत असे. निरनिराळ्या ठिकाणांची माती राजाच्या प्रत्येक अवयवाला लावावी असा आचार दिसतो. पर्वतशिखरावरची माती राजाच्या मस्तकीं लावावी, वारुळाची माती कानांवर लावावी, मुखीं विष्णुच्या देवालयाची लावावी. याप्रमाणें जाणावें. ठिकठिकाणच्या मातीचें वर्णन करतांना वेश्येच्या दाराची माती घेऊन राजाच्या कंबरेला लावावी लावावी असा आचार सांगितला आहे. सर्व वर्णांकडून राजाला अभिषेक झाल्यावर त्यानें आरशांत व तुपांत पहावें. विष्णुदिकांचें पूजन करावें. शय्येवर व्याघ्रचर्म टाकलेलें असावें. व त्यांवर पुरोहितानें बसून राजास मधुपर्क देऊन वस्त्र बांधावें ( पट्टबंध ). राजानें मुगुट बांधावा. या मुगुटामध्यें पंचचर्म असावें, म्हणजे मुगुट घालतांना, ज्याप्रमाणें आज शिपायांच्या पटक्यांत टोपी आपणांस आढळते तसें मुकुटामध्यें चर्म बांधावें (पंचचर्मोजरंददेत्). नंतर बैलाच्या, सिंहाच्या, वाघाच्या किंवा चित्त्याच्या कातड्यांवर राजानें बसावें. प्रतिहारीनें प्रधान, सचिव वगैरे लोक दाखवावे; म्हणजे त्यांची माहिती करून घ्यावी. नंतर दानें वगैरे ब्राह्मणांस देऊन घोडा व हत्तीची पूजा करून राजाची मिरवणूक राजमार्गानें काढावी.

अ. २१९ अभिषेकमंत्र, या मंत्रांत कांहीं देव, ऋर्षी, पर्वत, देश, नद्या यांचीं नांवें आलीं आहेत. त्यांत नद्यांचीं बरींच अपरिचित नांवें आहेत. अच्छोदा, देविका, वरुणा, निश्चिरा, पारा, रूपा, गौरी, वैतरणी, अरणी वगैरे. अ. २२० साहाय्यसंपत्ती म्हणजे अधिकारीमंडळ अथवा राज्यव्यवस्थेस लागणारीं खातीं व त्यांवर अधिकाऱ्यांची योजना. राजाला राज्याभिषेक झाल्यावर त्यानें शत्रूंना जिंकावें. सेनापती ब्राह्मण किंवा क्षत्रिय असावा. धनाध्यक्षास म्हणजे खजिनदाराला रत्नाची व हिशेबाची माहिती असावी. हस्त्याध्यक्ष हा जितश्रम असावा; त्याला हत्तीची परीक्षा असावी. तसाच घोडदळाचा मुख्य अश्वशास्त्रांत पारंगत असावा; ( दुर्गाचा )किल्लेदार फार हुषार असावा; तसाच वास्तुचा अधिकारी ( स्थपती ) हा शिल्पशास्त्रांत निष्णात असावा. मंत्री हुषार असावा. सभासद धर्म जाणणारे असावेत. यंत्रमुक्त, पाणिमुक्त, अमुक्त, व मुक्तधारित, हे चार प्रकार बाण व शस्त्र सोडण्याचे आहेत. आचार्य वरील चारी प्रकारांत तद्ज्ञ असावा व युद्ध करण्यांत कुशल असून राजाचें हित साधणारा असावा. प्रतिहारी नीतिशास्त्रामध्यें तद्ज्ञ असावा. दूत गोड बोलणारा, अक्षीण, व अतिबलाढ्य असावा. किंवा प्रतिहेदाखल राजास विडा देण्यासाठीं ज्याची योजना करीत तो तृतीयप्रकृती असे; सारथ्याकडे कामाची बरीच जबाबदारी असे. तो पूर्ण राजनिष्ठ असून संधिविग्रह, षाड्गुण्य, सैन्यादि सर्व जाणारा राजाचें रक्षण करण्यासाठीं नेहमीं हातांत तलवार धारण करणारा असावा. ( सूदाध्यक्ष ) आचारी किंवा पाकशास्त्रज्ञ हा त्या पाकशास्त्रांत पूर्ण असावा.

लेखक वळणदार अक्षराचा ( अक्षरवित् ) असावा. (दौवारिक ) देवडीवाला चतुर असावा म्हणजे बोलण्याची कला जाणणारा असावा. वैद्य आयुर्वेद जाणणारा असावा. अंतःपुरांतील कारभारी वृद्ध असावा. अंतःपुरांत काम करणाऱ्या स्त्रिया पन्नास वर्षांच्या पुढें व पुरुष सत्तर वर्षांच्या पुढें असावेत. आयुधागारामध्यें असणारा पुरुष नेहमीं सावध ( जागृत ) असावा.

राजानें नोकरांची योजना परीक्षा करून करावी. म्हणजे धर्मिष्ठांस धर्मकार्यांत, शूरांस युद्धकर्मांत, निपुणांस अर्थकृत्यांत नेमावेत. मंत्र्यानें वनगजांना धरण्याचा प्रयत्न करण्यासाठीं तद्‌ज्ञांची योजना करावी. पिढीजाद नोकर काढूं नयेत. पिढिजाद नोकर दायादप्रकरणीं योजूं नयेत. कारण "तत्र ते हि समा मताः (?) असें दिलें आहे. शत्रूच्या घरून निघून आपल्या आश्रयास आलेल्या लोकांस (ते दुष्ट असोत वा सुष्ट असोत) आश्रयास ठेवावेत. दुष्टांवर विश्वास ठेऊं नये. देशांतराला गेलेल्या गुप्तदूताकडून माहिती घेतल्यानंतर त्याचा सत्कार करावा. नोकरांचे विभाग दोन करावेत. शत्रू, अग्नि, विष, सर्प, व अयुधें यांकडे विशिष्ट नोकर असावेत व वाईट नोकर एका बाजूला असावेत. राजाच्या सर्व खात्यांतून गुप्तदूतांची योजना असावी. हे गुप्तदूत सौम्य, लोकांना न समजणारे, किंवा त्या खात्यांतील लोकांस सुद्धां परस्पर न जाणणारे, असे असावेत. व्यापारी, मांत्रिक, जोशी, वैद्य, सन्यस्तांसारखे दिसणारे, बलाबल जाणणारे, असावेत. यांवर राजानें पूर्ण विश्वास टाकूं नये. एकाच्या वाक्यांवर विश्वास ठेऊं नये. राजानें सेवकांचा किंवा लोकांचा रागापराग (प्रेम अथवा क्रोध) गुणागुण जाणून तसें वर्तावें. राजानें चालू एक तत्त्व लक्षांत ठेवावें लागत असे तें हें कीं आपण लोकांच्या रंजनासाठीं अथवा जनतेच्या हितासाठीं आहोंत.

अ. २२१ अनुजीविवृत्त. नोकरानें राजापाशीं कसें वागावें यावद्दलचे नियम. नोकरानें राजाज्ञा शिष्यासारखी पाळावी, राजाचें त्यानें प्रिय बोलावें, अप्रिय तथापि हितकर असें बोलणें एकांतीं करावें, द्रव्याचा अपहार करूं नये, अथवा राजाची मानहानि करूं नये. राजाचे वेष, भाषा अथवा चेष्टा याचें अनुकरण करूं नये. राजाचा रोष ज्या माणसावर आहे अशाशीं अंतःपुरचराध्यक्षानें (कंचुकीनें) संगत करूं नये. राजाच्या गुप्त गोष्टी त्यानें गुप्तच ठेवाव्यात. आपलें कौशल्य दाखवून राजाला आपलेंसें करावें. राजानें हांक मारतांच आज्ञा केली असो, अथवा नसो, त्यानें मी काय करूं असें विचारावें. राजानें वस्त्र, अलंकार, किंवा रत्नें वहाल केलेलीं धारण करावीं. ज्या दरवाजानें परवानगी नाहीं, अशा दरवाजानें कधीं जाऊं नये. जांभई देणें, थुंकणें, खोकणें, रागावणें, पलंगावर बसणें, कपाळाला आंठ्या घालणें, मोठ्यानें वातासरण करणें, ढेंकर देणें, या गोष्टी राजाच्या समीप करूं नये. आपल्या गुणांची स्तुती राजाच्या कानांवर नेहमीं जाईल अशा बेतानें माणसाची त्यानें योजना करावी, शाठ्य, लौल्य, पैशुन्य, नास्तिक्य, क्षुद्रता, चापल्य, इत्यादि दोष त्यामध्यें नसावेत. बहुश्रुतपणा, विद्या, शिल्प या कामीं त्यानें तत्पर असावें. तो कला जाणणारा असावा. राजाचे पुत्रस्नेही, मंत्री वगैरे लोकांनां नेहमीं नमस्कार करावा. प्रधानांवर विश्वास ठेऊं नये. राजाच्या मनांतील गोष्टी जाणून प्रसंगवशात् त्यानें वागावें. राजानें विचारल्यावांचून कांहीं बोलूं नये. आपत्तींतहि राजाचें काम करावें; प्रसन्न, वाक्यसंग्राही, असें असावें. थोड्या देणगीवर संतुष्ट असावें, राजाची स्तुति ऐकतांच संतुष्ट असावें, प्रसंगवशात् राजाच्या देणगीचा नेहमीं उल्लेख लोकांपाशीं करीत असावा.

अ २२२. दुर्ग संपत्ति—राजानें दुर्गांचा आश्रय करावा. या दुर्गप्रदेशीं वैश्यशूद्रांची बहुधा वस्ती असावी. ही दुर्गभूमी बहुधा शत्रूच्या आहाराबाहेरची असावी. या जागेंत ब्राह्मणवस्ती क्वचितच असावी. मोलमजुरी करणारांचा भरणा तींत अधिक असावा. ती जागा देवमातृक नसावी (देवमातृक म्हणजे नदीचें पाणी अथवा पावसाचें पाणी, व्रीही, वगैरेचा पुरवठा असतो त्यास देवमातृक म्हणतात. ) अर्थात् हा प्रदेश खडकाळ अथवा डोंगराळ असावा. व मुद्दाम तेथें पाण्याची सोय करावी, पुष्पफलधान्याची समृद्धि असावी. तेथें परचक्राला येतां येऊं नये. सर्प, तस्कर यांची भीति त्या प्रदेशाला नसावी. दुर्गांचे प्रकार सहा आहेत. ते असे. धनुर्दुर्ग, महीदुर्ग, नरदुर्ग, वार्क्षदुर्ग, अंबुदुर्ग, व गिरिदुर्ग. यांत गिरिदुर्ग हा अत्यंत महत्वाचा आहे कारण हा अभेद्य असून इतर सर्व दुर्ग शत्रूला लवकर भेदतां येतात व सर करतां येतात. (सर्वोत्तमं शैलदुर्गमभेद्यंचान्यभेदनम्) पूर्वीं सांगितलेल्या प्रदेशीं राजानें शहराची, बाजाराची, देऊळ बांधण्याची तरतुद करावी.

अ. २२३।२५ राजधर्म. राजानें महसूल व कामकाजाची बजावणी व्यवस्थित व्हावी म्हणून अधिकारी नेमावा. व्यवस्था पुढीलप्रमाणें करावी. गांवाचा एक मुख्य अधिकारी कोणी तरी असावा, त्याच्यावर नजर दहागांवाच्या अधिकाऱ्यानें करावी. दशग्रामाधिकाऱ्यावर तावा शंभर गांवाच्या अधिकाऱ्यानें करावा. नंतर प्रांताधिकारी व त्यांपुढील अधिकाऱ्यांची योजना पूर्वींप्रमाणें वाढती करावी.

त्यांच्या पगाराची व्यवस्था त्यांच्या कामानुरूप करावी. अधिकारी वर्गाची व्यवस्था बरोबर चालली आहे किंवा नाहीं याची बातमी रोज राजाला गुप्तदूतांकडून कळावी. ग्राम याचा अर्थ खेडें असा समजावा. गांवामध्यें उपस्थित झालेल्या तंट्याबखेड्यांची व्यवस्था गांवाधिकाऱ्यानें करावी. परंतु तेवढयानें न भागल्यास त्याची व्यवस्था दशग्रामाधिकाऱ्यानें करावी. याप्रमाणें राजापर्यंतची व्यवस्था असावी. या व्यवस्थेचें मूलतत्व म्हणजे देशाची सुरक्षता होय. सुरक्षता हीच राजाची आर्थिक संपत्ति होय, व आर्थिक संपत्तीनेंच पुरुषार्थत्रयाची प्राप्ति होते. राष्ट्राला पीडा करणारा राजा नरकाला जाईल.

व्यवस्था.—राजानें उत्पन्नाच्या मानानें सहावा हिस्सा वसूल घ्यावा. ( राजा षड्भागमादत्ते सुकृताद्दुष्कृतादपि ) ही वसुली सरसकट असावी. म्हणजे चांगला अथवा वाईट हा भेद नसावा.

कराची आकारणी शास्त्रोक्त पद्धतीनें करावी. कर अथवा वसूल झालेलें द्रव्य याचे राजानें दोन विभाग करावे. एक भाग अथवा अर्धा वसूल कोशांत टाकावा. ( कोशेप्रवेशये-

दर्धं नित्यंचार्धद्विजेददेत् ॥ निधिं द्विजोत्तमः प्राप्य गृण्हीयात्‌सकलं तथा) राहिलेला एक भाग ब्राह्मणास द्यावा.

ब्राह्मणानें त्या द्रव्याचे अनुक्रमें ४,८ व १६ असे भाग करून योग्यायोग्यतेप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, अथवा वैश्य यांमध्यें वांटून द्यावे. ( चतुर्थमष्टमं भागं तथा षोडशकं द्विजः ॥ वर्णक्रमेण दद्याच निधिं पात्रेतु धर्मतः ).

खोटें बोलणाऱ्या पासून राजानें त्याच्या द्रव्याच्या हिश्शापैकीं दंडादाखल आठवा भाग घ्यावा. " अनृतं तु वदन् दंड्यः सुवितस्यांशमष्टमः ॥ प्रनष्टस्वामिकमृक्थं राजात्र्यब्दं निधापयेत् ॥ " बिन वारसाचें ( द्रव्य जिनगी ) राजानें तीन वर्षें आपल्या स्वाधीन ठेवावें. तीन वर्षांच्या पूर्वीं त्या जिनगीला जर वारस उभा असेल तर त्याची चौकशी करून वारसास ती द्यावी. वारस ठरविणें हें त्याच्या रूपावरून व संख्येवरून ठरवावें. (?) तीन वर्षांनंतर ती जिनगी राजानें खजिन्यांत सामील करावी. अज्ञानाची जिनगी तो सज्ञान होईपर्यंत राजानें आपल्या ताब्यांत ठेवावी. सज्ञानाची व्याख्या शैशवा नंतरची स्थिति अशी आहे. ज्याप्रमाणें अज्ञानाची जिनगी रक्षण करण्याचा अधिकार राजाला आहे, त्याचप्रमाणें बालपुत्रा ( जिचें मूल लहान आहे, ), निष्कुला, अनाथ, पतिव्रता, विधवा, ( आतुरा ) आजारी व " जीवंती " ( ? ) या स्त्रियांच्या जिनगीचें रक्षण राजानें करावें. त्यांच्या ( वृत्तीची ) उपजीविकेची जबाबदारी अर्थात् राजावर राहणार. वरील तऱ्हेच्या स्त्रियांची जिनगी हिरावूं इच्छिणाऱ्या तिच्या बांधवांस राजानें शिक्षा करावी. ही शिक्षा चोराप्रमाणें असावी.

तुरुंगावरच्या अधिकाऱ्याचा रोजमुरा चोराच्या सांपडलेल्या द्रव्यावर भागवावा. चोरी झाली नसतांही जो चोरी झाली असें म्हणतो त्यास निसार्घ्य नांवाची अथवा दंडाची शिक्षा करावी. ( अहृते योहृतब्रुयान्निःसार्योदंड्यएवसः)

घरवाल्यानें घरांतील जमिनींत सांपडलेलें द्रव्य राजाला दिल्यावर तें द्रव्य राजाचेंच होय. स्वराष्ट्रांत घडणाऱ्या व्यापारांवर $\frac{1}{20}$ कर असावा. परराष्ट्रांतील ( परदेश ) व्यापारांवर कर नफा नुकसानी ( क्षयव्यय ) प्रमाणें ठरवावा. (शुल्कांशं परदेशाच क्षयव्ययप्रकाशकम् ज्ञात्वा संकल्पयेत् ) व्यापाऱ्यास होणाऱ्या फायद्यावर $\frac{1}{20}$ कर घेतलाच पाहिजे. व्यापाऱ्यानें तो न दिल्यास शिक्षेस पात्र होईल. नौकेवरील कर पूर्वीप्रमाणें असावा असें अनुमान निघतें. कारण कराचा नक्की उल्लेख केला नाहीं. पूर्वीप्रमाणें हा अर्थ मागील संदर्भावरून घेतला आहे. स्त्रियांना व संन्याशांना नौकेचा कर नाहीं. नौका ( दासांच्या ) कोळ्यांच्या चुकीनें नष्ट झाल्यास नौकेच्या खर्चाचा बोजा कोळ्यावर राजानें लादावा.

( वरील वाक्यावरून असें अनुमान मात्र काढतां येईल कीं आज मित्तीस चालू असलेली लिलांवपद्धती पूर्वी अमलांत आणीत असावेत. मात्र मक्त्याचे पैसे घेऊन नौका पुरविणें राजाचें काम असावें) शूक धान्यावर कर $\frac{1}{6}$ असावा. शूक धान्य म्हणजे बाजरी वगैरे, शिंबि धान्यावर कर $\frac{1}{6}$ घ्यावा. राजानें वनांतील धान्यें देशकालानुरूप आणावींत ( वरी, नाचणी, सावें, देवभात वगैरे ). पशु व सोनें, यावरील कर $\frac{1}{5}$ व $\frac{1}{6}$ घ्यावा. सुगंधी द्रव्यें, औषधी, रस, मूल, फूल, फळ, कांदे, पानें, भाज्या, गवत, वेळू, कातडें, वेळूंतील बी ( हें अगदीं गव्हांसारखें असतें ) वेळूंचीं अथवा वेतांचीं ( वैदल ) भांडीं, दगडाचीं भांडीं, किंवा इतर धातूंचीं भांडीं, मधु, मांस, अथवा तूप, या सर्व पदार्थांवर $\frac{1}{6}$ कर असावा.

कराची माफी फक्त ब्राह्मणांस आहे. श्रोत्रिय ब्राह्मणाची उपजीविका त्याच्या गुणावरून व वृत्तीवरून ठरवावी. त्याचप्रमाणें गुणी माणसांना राजाश्रय मिळावा. जो राजा धर्मानें वागतो त्याचें आयुष्य, द्रव्य, व राष्ट्र वाढतें. कारागिरांकडून एक महिना काम घ्यावें.

अ. २२४ हा अंतःपुरांतील स्त्रियांच्या रक्षणाचा अध्याय आहे. त्रिवर्ग वृक्षाचें रूपक केलें असतां, तें असें होईल कीं धर्म हें या वृक्षाचें मूळ आहे. अर्थ त्याच्या शाखा असून काम त्याचें फळ होय. या त्रिवर्गाची प्राप्ति केवळ स्त्रियांच्या रक्षणानें होते म्हणून अंतःपुरांतील स्त्रियांचें रक्षण करणें हें राजाचें अनेक कर्तव्यांपैकीं एक मुख्य कर्तव्य होय. स्त्रिया कामाधीन असून, त्यांच्यासाठीं रत्नांचा संग्रह करावा. विषयाचें सेवन फारच मर्यादित असावें. यापुढें या अध्यायांतील विशेष म्हटला म्हणजे कोणती स्त्री आपणांवर आसक्त नाहीं हें ओळखण्याचीं लक्षणें व ती स्त्री वश होण्यास थोडा औषधिप्रकार सांगितला आहे हा होय.

अ. २२५ राजधर्म ( राजपुत्राचें शिक्षण ) राजपुत्र एकांगी उपयोगाचा नाहीं. त्याचें शिक्षण धार्मिक, आर्थिक, कामिक, सांग्रामिक, शिल्पप्रचुर असावें. तोंडापुतें गोड बोलणाऱ्या लोकांची संगति त्याला न लागण्याविषयीं फारच खबरदारी घेतली पाहिजे. तामसी, लोभी, किंवा मानी लोकांची संगति नसावी. राजपुत्राच्या हालचालीची वित्तं बातमी लागण्यासाठीं शरीररक्षणाच्या निमित्तानें राजानें पुष्कळ लोक त्याच्या सेवेला ठेवावे. राजपुत्राला राजानें दुखवूं नये. राजपुत्र उनाड बनेल असें दिसल्यास राजानें युक्तीनें त्यास बंधन करावें. नम्र अशा राजपुत्रास सर्व अधिकाराच्या जागा द्याव्या. फांसें, शिकार, किंवा मद्यपान यांपासून त्यास अलिप्त ठेवावें. दिवसा झोंप, वृथा अभिमान, बोलण्यांत उद्धटपणा, निंदा, दंड, कठोरपणा, द्रव्याचा निरर्थक खर्च, काम, क्रोध, मद, मान, लोभ, दया इत्यादि दुर्गुण त्याला न लागण्याची तजवीज राजानें करावी. आकाराचा ( बांधणीचा ) उच्छेद व दुर्गादिकांची पडझड होणें म्हणजे अर्थनाश होय. देशकालादिकांचा विचार न करतां केलेलें दान अथवा निरर्थक खर्च, हें अर्थदूषण आहे.

राजानें प्रथम क्रोधादि जिंकून नोकरांवर ताबा ठेवावा, नंतर देश जिंकावा, पुढें बाह्य शत्रूंना जिंकावें. बाह्य शत्रू तीन

प्रकारचे आहेत. खालील श्लोकांचा नीट अर्थ लागत नाहीं. "गुरवस्ते यथापूर्वं कुल्यानंतरकृत्रिमः । पितृ पैतामहं मित्रं सामंतश्च तथा रिपोः । कृत्रिमंच महाभाग मित्रं त्रिविध मुच्यते" स्वामी, अमात्य, जनपद, दुर्ग, दंड, कोष व मित्र या सात अंगाला मिळून राज्य म्हणतात. वरील सात अंगापैकीं एकाहि अंगाचा द्रोह करणारास मृत्यूची शिक्षा करावी. तीक्ष्ण अथवा मृदु प्रसंगवशात् राजानें बनावें. नोकरांशीं हसूं नये. हंसणाऱ्या राजाचा नोकरांकडून वरचेवर अपमान होतो. लोकसंग्रहार्थ राजानें कृतकव्यसन म्ह. नेहमीं कार्यतत्पर असावें.

स्मितपूर्व असें नेहमीं राजानें बोलत असावें. दीर्घसूत्र राजा उपयोगाचा नाहीं. पण राग, दर्प, मान, द्रोह, पाप, व अप्रिय यांबद्दल राजानें दीर्घसूत्र असावें.

राजानें वागण्याचे नियमः—आपली मसलत कोणाला समजूं देऊं नये. मंत्रविचार एकट्यानें किंवा पुष्कळांशीं करूं नये. केव्हांही कोठेंही विश्वास ठेऊं नये. राजानें उद्धट असूं नये. त्याच्या ठिकाणीं विनय असावा. राजांच्या कल्याणाच्या गोष्टी म्हणजे युद्धांतून परत न येणें, प्रजेचें पालन करणें, ब्राह्मणास दान देणें ह्या होत. कृपण, अनाथ, वृद्ध, विधवा, याची जीविका राजानें चालवावी. वर्णाश्रमव्यवस्था, तापसांचें पूजन, व तपस्वी वचनांवर विश्वास हें राजाचें आद्य कर्तव्य होय. राजानें बगळ्याप्रमाणें अर्थचिंतन, सिंहाप्रमाणें पराक्रम, लांडग्याप्रमाणें लूट, सस्याप्रमाणें पडतें, डुकराप्रमाणें दृढ प्रहार, मोराप्रमाणें चित्राकार, घोड्याप्रमाणें दृढभक्ति, कोकिलाप्रमाणें मधुर आलाप, कावळ्याप्रमाणें शंका, या सर्व गोष्टी लक्षांत ठेवाव्या. राजानें अज्ञातवस्तींत असावें. परीक्षा केल्यावांचून भोजन व शयन राजानें करूं नये. अज्ञात स्त्रीची भेट घेवूं नये; व अज्ञात नावेमध्यें बसूं नये. राजाच्या राज्याची शोभा व टिकाऊपणा हा केवळ लोकांच्या प्रजेच्या अनुरागावरच अवलंबून आहे.

सा मा दि उ पा य क थ न अ. २२६ प्रथम चार श्लोकांत दैव व पुरुष या वादांत पुरुषवादालाच अग्रगण्यत्व दिलें आहे. शत्रूचा बीमोड करण्यास चार उपाय आहेत ते येणें प्रमाणें:—साम, दान, भेद व दंड. सामाचे भेद दोन. तथ्य व अतथ्य. अतथ्य याचा आपण असा अर्थ करूं कीं वाजवी पेक्षां ज्यास्त साम (शांति). हा साम साधु पुरुषांमध्यें आढळतो यामुळें साधु पुरुष दुष्ट लोकांकडून पीडले जातात.

दुसरा प्रकार प्रसंगवशात् समजावा. परस्पर ज्यांच्यांत द्वेष आहेत, किंवा एकमेकांत कोपाग्नि वाढला आहे, अथवा अपमान झाला आहे अशा लोकांत भेद करणें फारच सोपें आहे किंवा त्यांस भिववणें, हेंही कदाचित् सोपें जाईल. ज्ञातोचा भेद करणाराचें फार बेतानें रक्षण करावें. मांडलिक अथवा प्रधानपुत्रादिकांचा कोप शमवून म्हणजे एकी करून शत्रूंवर जय करावा. या चारी उपायांत दान हा उत्तम उपाय होय. वरील तीन उपायानें शत्रू साध्य न झाल्यास दंडाचा उपयोग करावा. दंडाबद्दल सावधगिरी पाहिजे. अदंड्यांना दंड करूं नये व दंड्यांना क्षमा करूं नये.

अ. २२७. दं ड प्र ण य न. दंडार्थ सुवर्णाची भाषा वापरली आहे आणि कोष्टक दिलें आहे तें असें:—तीन यव= कृष्णल; पांच कृष्णल=माष; सहा कृष्णल=कर्षार्ध; सोळा माष= सुवर्ण; चार सुवर्ण=निष्क; १० निष्क=धरण.

दंड (साहस) कमीतकमी (प्रथम) २५० पण असावा. मध्यम ५०० असावा. व जास्तींत ज्यास्त (उत्तम) १००० पण असावा: (असीतिभिर्वराटकैः पण इत्यभिधीयते) पण म्हणजे एक आणा.

चोरांनीं न चोरतां माझी चोरी झाली अशी खोटीच अफवा उठवतो त्यास राजानें दंड करावा. खोटें बोलणें अथवा बोलविण्याचा प्रयत्न करणें त्या दोघांस पूर्वीच्या दुप्पट दंड करावा. या श्लोकांतील दम शब्द दंड या अर्थी आहे. ( दम शब्द आपल्या मराठींत सुद्धां आहे. ) खोटी साक्ष देणाऱ्या त्रैवर्णिकांस पूर्वीप्रमाणेंच शिक्षा राजानें सांगावी. ब्राह्मणास शिक्षा म्हटली म्हणजे मुख्यत्वें करून त्याला आपल्या हद्दींतून घालवून देणें ही होय. ठेव ज्याकडे ठेवली असेल व तिचा उपयोग ठेव ठेवून घेणारा जर करील तर त्यास ठेवेइतकी किंमत ठेव दाबणाराकडून घ्यावी. ठेवीचा नाश करणारा अथवा ठेव न ठेवतां ती मागणारा ह्या दोघांना चोराप्रमाणेंच किंवा दुप्पट दंड करावा. अजाणतां जो दुसऱ्याच्या मालाची विक्री करतो,तो निर्दोष. परंतु जाणूनबुजून विक्री करणारास चोराप्रमाणेंच दंड करावा. पैसा घेऊन जो आपलें शिल्प देत नाहीं त्यास चोराप्रमाणें शिक्षा द्यावी. देतों म्हणून कबूल करून न देणारास सुवर्ण दंड करावा. भृति ( वेतन ) जो घेऊन काम करीत नाहीं, त्यास आठ कृष्णल दंड करावा.

विनाकारण किंवा अकालीं नोकरास जो सोडतो त्यालाही पूर्वीप्रमाणेंच दंड असावा. नोकर विकत घेतला अथवा विकला याबद्दल घेणारास अथवा विकणारास १० दिवसाच्या आंत पश्चात्ताप झाल्यास व्यवहार परत व्हावा. वराचे दोष मनांत न आणतां जो आपली मुलगी देतो ती मुलगी दिली असली तरी न दिलेली समजावी. एकदां मुलगी देऊन तीच पुन्हा दुसऱ्यास दिली गेल्यास देणारास उत्तम साहस, म्हणजे १००० पण दंड करावा. कोणत्याही वस्तूबद्दल विसार घेऊन एखाद्या लोभी व्यापाऱ्यानें ती वस्तु दुसऱ्यास विकल्यास तो सहाशें ( सुवर्ण ) दंडाला पात्र आहे. राखणावळ घेऊन जो गाईचें पोषण करीत नाहीं किंवा गाय राखीत नाहीं तो १०० सुवर्ण शिक्षेला पात्र आहे. गांवाचा घेर सरासरी १०० धनुष्य म्ह. ३०० हात असावा. शहराचा चौफेर घेर दुप्पट तिप्पट अथवा ज्यास्तही असावा. यावरून तत्कालीन शहरें किती लहान होतीं हें कळेल.

त्याभोंवतीं धान्यें कणसासह रचावीं व त्याला कुंपण इतकें उंच असावें कीं तें उंटाला सुद्धां दिसूं नये. अशा व्यवस्थेनें ठेवलेल्या धान्याची नासाडी करणारास ५०० सुवर्ण

दंड करावा. धान्य नसतांना कुंपण मोडणारा दोषी ठरत नाहीं. धाकदडपशाहीनें घर, तळें, बाग, शेत वगैरे घेणारास ५०० सुवर्ण दंड करावा. अजाणून चूक झाल्यास २०० सुवर्ण दंड करावा. मर्यादेचें उल्लंघन करणारास २०० पण शिक्षा असावी. ब्राम्हणापेक्षां १०० पट क्षत्रियाला दंड असावा. वैश्याला२०० पट असावा व शूद्राला बंधन असावें. क्षत्रियाची, वैश्याची, किंवा शूद्राची निंदा करणाऱ्या ब्राम्हणास अनुक्रमें ५०।२५। १२ पण असा दंड असावा. क्षत्रियाची निंदा करणाऱ्या वैश्यास दंड पूर्वीप्रमाणेंच व शूद्राचा जिव्हाच्छेद करावा. ब्राम्हणाला धर्माचा उपदेश करणाऱ्या शूद्राला दंड करावा व श्रुतदेशादि वितथी म्ह० बहुश्रुतपणाचें ढोंग करणारा त्यास दुप्पट दंड करावा.

निरर्थक अथवा सज्जनांना भलतेच दोष देणाऱ्यास उत्तम प्रतीचा दंड. 'मी चुकलों' असें कबूल करणारास निम्मा दंड करावा. आईबाप, भाऊ, वडील, सासरा, गुरु इत्यादिकांस शिविगाळ करणारा ( आक्षारयन् ) व गुरुला रस्ता न देणारा १०० पण दंडाला योग्य होतो. "अंत्यजातिर्द्विजातिं तु येनांगेनापराध्नुयात् तदेवच्छेदयत्स्यक्षिप्रमेवाविचारयन्" अंत्यजाति त्रैवर्णिकांचा ज्या अंगानें अपराध करील, त्या अंत्यजातीच्या अंगाचा च्छेद करावा. सभेंत बसलेल्या राजाच्या देखत गर्वानें थुंकणाराचे ओंठ तोडावेत. त्याचप्रमाणें गुदानें अपशब्द करणारासही त्याच्या अवयवच्छेदनाची शिक्षा असावी. "योयदंगंचरुजयेत्तदंगं तस्य कर्तयेत्" सिंहासनावर बसलेल्या राजाच्या देखत खालीं बसणारा जें आपलें कोणतेंही आंग खाजवील तें त्याचें आंग तोडावें. गाई, घोडे, हत्ती उंट वगैरे पशूंचा घात करणाराचे अर्धे हातपाय तोडावे. निर्फल वृक्ष करणारास सुवर्ण शिक्षा द्यावी. जाणून वा न जाणून दुसऱ्याचें द्रव्य हरण करणारा, मर्यादेवरील अथवा रस्त्यावरील जलाशयाची मोडतोड करणारा दुप्पट दंडाला पात्र आहे. आडांतील दोरी अथवा घट हरण करणारा, किंवा पाणपोईची नासाडी करणारा, किंवा प्राण्यांना मारहाण करणारा "एक मास" शिक्षेला पात्र आहे. हा श्लोक मनुस्मृतीच्या धर्तीवर थोडया फरकानें आहे. ( यस्तुरज्जुंघटं कूपाद्धरेच्छिन्द्यच्च तां प्रपाम् ॥ सदंडं प्राप्नुयान्मासंदंडयः स्यात्प्राणि ताडणे ) दहा किंवा त्यापेक्षां अधिक कुंभ धान्य हरण करणारास वधाची शिक्षा असावी. मनुस्मृतींतील टीकाकारानें जितके कुंभ चोरले असतील तितक्या कुंभांच्या ११ पट धान्य चोराकडून वसूल करावें, असें दिलें आहे. सुवर्ण, रुपें, चांगलीं वस्त्रें, स्त्रिया व मनुष्यें यांची चोरी करणारास शिक्षा वधाची असावी.

येनयेनयथांगेनस्तेनोनृषुविचेष्टते ॥ तत्तदेवहरेदस्यप्रत्यादेशाय पार्थिवः॥ मनुष्याची चोरी करतांना मनुष्यास ज्या ज्या अंगाला दुखापत झाली असेल तें तें चोराचें अंग जाहीर रीतीनें तोडावें. "ब्राह्मणः शाकधान्यादिस्वल्पंगृह्णन्नदोषभाक्" ब्राह्मणानें शाकधान्याची थोडी चोरी केल्यास तो दोषी समजला जात नाहीं. एकाद्यानें गाय किंवा देव यांचें निमित्त करून चोरी केल्यास शिक्षा पूर्वीप्रमाणें कायम; घर, शेतादि चोरणारा, व स्त्रीवर बलात्कार करणारा, विषप्रयोग करणारा, आग लावणारा, किंवा शस्त्र उगारून अंगावर येणारा हे सर्व वधाच्या शिक्षेला पात्र आहेत. परस्त्रीशीं संभाषण करणारा, परवानगी वांचून प्रवेश करणारा, हे दंडास पात्र आहेत. स्वतः वर वरणारी स्त्री दंडाला पात्र नाहीं. उत्तम वर्णांतील स्त्रीशीं हलक्या वर्णांतील मनुष्यानें संबंध केल्यास तो वधाच्या शिक्षेस पात्र आहे. "भर्तारलंघयेद्यातांश्वभिःसंघातयेत्स्त्रियं" पतीचें उल्लंघन करून निघून जाणाऱ्या स्त्रियेस कुत्र्याकडून फाडवून खाण्याची शिक्षा करावी. वैश्यस्त्रीगामी ब्राह्मण, अंत्यजागामी क्षत्रिय, हे पूर्ण दंडास पात्र आहेत.

सवर्णदूषित स्त्री "पिंडमात्रोपजीवि" करावी. 'ज्यायसा' दुषितानारी ( वृद्धाकडून दूषित झालेली स्त्री ) हिला मुंडणाची शिक्षा असावी. वेतन घेऊन लोभानें दुसऱ्याकडे गमन करणारी वेश्या वेतनाच्या दुप्पट दंडाला पात्र आहे. भार्या, पुत्र, दास, शिष्य, भाऊ किंवा सोदर हे अपराधी असतां दोरीनें किंवा वेळूच्या छडीनें पाठीवर शिक्षा करावी. डोक्यांवर मारूं नये. लोकांच्या रक्षणासाठीं नेमलेल्या (रक्षार्थाधिकृत ) अधिकाऱ्यानीं ( कोतवाल शिपाई वगैरे ) प्रजेकडून पैसे खाल्ल्यास त्यांची ( अधिकाऱ्यांची ) मालमत्ता जप्त करून त्यांस घालवून द्यावें, व ज्या कामावर ज्यांची योजना केली आहे त्या लोकांनीं कामकऱ्यांस कामाची आडकाठी केल्यास त्यांस वरील प्रमाणेंच शिक्षा करावी. अमात्य किंवा न्यायाधीश ( प्राड्विवाक ) आपली कामगिरी अयोग्य रीतीनें बजावील त्यांस पूर्वीचीच शिक्षा कायम. गुरुपत्नीगमन करणारा, सुरा प्राशन करणारा, व चोरी करणारा, व ब्रह्महत्या करणारा, अशा महापातक्यांनां अनुक्रमें भग, सुराध्वज, श्वपाद व मस्तक अशा खुणा कराव्यात. ही शिक्षा ब्राह्मणासच असावी असा पुढील श्लोकावरून तर्क होतो; कारण पुढील श्लोकांत "शूद्रादीन्घातयेत् राजा पापान्विप्रान्प्रवासयेत् ॥ महापातकीनांवित्तं वरुणायोपपादयेत्" असें ह्मटलें आहे. राष्ट्रामध्यें नेमलेला अधिकारी अथवा मांडलीक सामंत यांना मिळून चोरी करणाऱ्या चोरांचे व त्यास मिळणाऱ्या सामंताचे किंवा अधिकाऱ्याचे हात तोडावेत; किंवा त्यास शूळावर चढवावें. गांवामध्यें जे चोराला वेतन देतात, किंवा त्याला आंतून फूस देतात. तसेंच भांडार कोश देणारे सर्व पूर्वीच्याच शिक्षेला पात्र आहेत. तडाग, देवता, आगारादिकांचा भेद करणारे यांस पूर्वीचीच शिक्षा कायम असावी. रस्त्यावर घाण करणारांस दंड करावा व घाण काढावयास लावावी. प्रत्येक महिन्याला द्यावयाचा कर बुडविणारास ५०० पण शिक्षा असावी.

समाबरोबर विषम जो वागतो त्यास "मध्यम साहस" असावा. व्यापाऱ्याकडून लांच खाऊन अवरोध न करणारास निरनिराळ्या तऱ्हेनें "उत्तम साहस" करावें. द्रव्यांना दोष

देणारे, व प्रतिच्छंद (?) विक्रय करणारे दोघे मध्यम दंडाला पात्र आहेत. खोटें बोलणारा, कपट करणारा, खोटी साक्ष देणारा त्यांना दुप्पट दंड करावा. अभक्ष्य भक्षण करणारा ब्राह्मण किंवा शूद्र त्यास कृष्णल दंड करावा. तुलाशासन करणारा, खोटी तुला करणारा किंवा तुला नाश करणारा अथवा यांचा उपयोग करून व्यवहार करणारा हे सर्व उत्तम दंडाला पात्र आहेत. विष देणारी, अग्नि, पति, गुरु, विप्र, अपत्य, यांचा नाश करणारी अथवा त्यास फसविणारी स्त्री नाक, कान, हात, ओंठ तोडून गाईबरोबर घालवून देण्यास योग्य आहे. शेत, घर, गांव, अरण्यें यांची नासधूस करणारा किंवा राजस्त्रियांकडे गमन करणारा यांना कटाग्नीनें जाळावें. राजाज्ञेंत कमीजास्त लिहून फरक करणारा तसाच पारदारिक यांना उत्तम दंड असावा. राजाच्या आसनांवर किंवा राजाच्या रथादिकामध्यें बसणारा उत्तम दंडाला पात्र आहे. न्यायानें जिंकलें असतांही जो आपणांस अजित म्हणतो त्यास दुप्पट दंड करावा. राजाला द्वंद्वास आव्हान करणारा वधाला योग्य आहे, व न बोलावतां बोलाविलें आहे असें सांगणारा शिक्षेला पात्र आहे. अपराधी दंड करणाऱ्याच्या हातून पळून गेल्यास दांडिक हीनवल समजून शिक्षेला पात्र आहे. यापुढील व्यवहारप्रकरणांत कांहीं दंड आले आहेत.

यु द्ध या त्रा—अ० २२८ ते २३३ पर्यंत युद्धाला निघण्यापूर्वी अथवा निघाल्यानंतर घडणाऱ्या शुभाशुभ चिन्हांवरून जयापजयाची दिशा ठरविणें. अ. २२८ युद्धयात्रा, योद्धे धष्टपुष्ट असावे. ज्या बाजूला भूकंप होईल ती दिशा युद्धाला अपजय देणारी आहे. तसेंच केतूबद्दलही जाणावें. शरीरस्फुरण व सुस्वप्नदर्शन यायोगानें आपणांस जय प्राप्त होईल असें राजानें समजावें. ऋतुमानानें सैन्याच्या योजना—पावसाळयांत हत्ती व पायदळ ज्यांत पुष्कळ अशी सेना योजावी. हेमंत व शिशिर ( मार्गशीर्ष ते फाल्गुन ) रथ व घोडे ज्यांत जास्त अशी सेना योजावी. वसंतऋतूंत किंवा शरदृऋतूंत चारीप्रकारची सैन्ययोजना असावी. सेनेमध्यें विशेषतः पायदळ ज्यास्त असावें.

यु द्ध, आ णि श कु न—अ. २२९ स्वप्नशुभाशुभ दुःख स्वप्नहरण अ. २३०-३२ शकुन सहा प्रकारचे आहेत. वेळ, दिशा, देश, कारण, शब्द, व जाति. हे शकून उत्तरोत्तर ज्यास्त शुभाशुभ फल देणारे आहेत. रात्रींचर, दिवाचर, व उभयचर, पशुपक्ष्यांचीं नांवें येथें दिलीं आहेत. ज्या मार्गानें पुष्कळ कावळे जातात त्या दिशेनें वेढा पडलेला शहराचा भाग शत्रूच्या हस्तगत होतो इ. प्रकारचें विवेचन. अ. २३३. ग्रहावरून जयापजयाची किंवा यात्रेची योजना करणें हा या अध्यायांतील विषय आहे.

अ. २३४ षा ड्गु ण्य—साम, भेद, दान व दंड यांचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. त्यांपैकीं स्वदेशामधील दंडाचा प्रकार पूर्वी थोडासा सांगितला. आतां परदेशीं दंडाबद्दल थोडा विचार करूं. दंडाचे "प्रकाश" व "अप्रकाश" असे दोन प्रकार आहेत. पैकीं लुटालूट, गांवाची नासाडी, धान्याचें हरण, जाळपोळ हे प्रकार पहिल्या सदरांत येतात. व विषप्रयोग, जाळपोळ, मारेकऱ्याकडून मारविणें, चांगलें पाणी ( अनेक द्रव्यांनीं ) बिघडविणें, हे दुसऱ्या सदरांत मोडतात. युद्धांत पाय टाकण्यापूर्वी राजानें आपल्या युद्धानें होणाऱ्या नुकसानीबद्दल पूर्ण विचार केला पाहिजे. नुकसान अथवा अनर्थ ओढवण्याचा संभव असल्यास शत्रूशीं संधीच करावा. शक्य तितकें अर्थक्षय करणाऱ्या दानाचा विनियोग करूं नये.

शत्रूशीं कपट करण्याचा उपाय पुढीलप्रमाणें योजावा. शत्रूच्या शिबिरांत एका लड्ढ पक्ष्याच्या पुच्छाला कोलीत बांधून सोडून द्यावें म्हणजे शत्रूला उल्कापात झाला असें वाटेल व त्याचें मन कचर खाईल. उल्कापात हें फार अशुभ मानीत. याप्रमाणें अनेक उत्पात शत्रूला दाखवावे. तपस्व्यांकडून किंवा ज्योतिषांकडून शत्रूचा क्षय होईल असें सांगवावें. शत्रूच्या मृत्यूच्या अनेक कंड्या पिकवाव्या. ऐंद्रजालिक प्रयोग दाखवावे, शत्रुसेनेवर रक्तवृष्टी पाडावी. देवाचा प्रसाद आपणास झाला आहे असें दाखवावें. राजवाडा किंवा उंच शिखरें यांवर शत्रूंचीं मस्तकें बांधावीं. षाड्गुण्य म्हणजे सहा प्रकार. संधि, विग्रह, यान, आसन, द्वैधीभाव व संशय.

रा जा ची दि न च र्या—अ. २३५; दोन मुहुर्त रात्र उरल्यावर राजानें निजून उठावें. गुप्तदूतांस अगोदर बोलवावें, आयव्यय श्रवण करावा, मलमूत्रांचा उत्सर्ग, स्नानसंध्या, देवपूजन करून सुवर्ण धेनु वगैरे दानधर्म करावा. नंतर अनुलेपन करावें. आरशांत पाहावें. गुरूची भेट घेऊन त्याचा आशीर्वाद घ्यावा. उंची अलंकार वस्त्रें परिधान करून सभेंत प्रवेश करावा. एकंदर कार्यांचा इतिहास ऐकून घ्यावा व कार्यांचा निर्णय करावा. सभेचें कार्य संपवावें. व्यायाम करावा. शस्त्रादिकांची पाहणी करावी, इत्यादि.

र ण दी क्षा—अ. २३६ रणदीक्षा मिळाल्यावर राजानें सैन्यानिशीं निघाल्यावर एक कोस थांबून तेथें ब्राह्मणादिकांची पूजा करावी. परदेशाला गेल्यावर राजानें तेथील देशाचाराप्रमाणें वागावें. तेथील लोकांचा अपमान करूं नये, सैन्यरचना सूचीमुखासारखी असावी. सैन्य थोडें असतां पुष्कळ आहे असें शत्रूला भासवावें. सैन्यरचना करतांना पुढें थोडें, पाठीमागें वाढतें ठेवावें. व्यूहाची रचना प्राण्यांच्या अंगावरून व द्रव्यावरून करावी. व्यूहाचीं सामान्य दहा नांवें आहेत. गरुड, मकर, श्येन, अर्धचंद्र, वज्र, शकट, मंडळ, सर्वतोभद्र, चक्र व सूची. सर्व व्यूहांमध्यें सैन्य पांच ठिकाणीं वाटलें असतें. पांच पांच भागांपैकीं लढावू असे एक किंवा दोन असून बाकीचे भाग त्यांच्या रक्षणासाठीं ठेवावे. राजानें स्वतः युद्ध करूं नये. सैन्यापासून एक कोस अंतरावर दूर रहावें. "मूलच्छेदेविनाशः स्यात्रयुध्येच स्वयंनृपः सैन्यस्यपश्चात्तिष्ठेत्तु क्रोशमात्रे महिपतिः" योध्यांनां आश्वासन देणें हें महत्वाचें कार्य आहे.

सैन्याचा मुख्यभाग मोडकळीस आला कीं, त्या ठिकाणीं राजानें वास्तव्य करूं नये. सैन्याची गर्दी असल्यास किंवा विरळ असल्यास व्यूहभेदाकडे त्याची योजना करूं नये. व्यूह फोडतांना एकजुटीनें किंवा एकदम फोडावा. प्रथम शत्रूचा व्यूह शिथिल करून संधि साधून तो फोडावा. व्यूह फोडणाराचें रक्षण फार तजविजीनें करावें. हत्तीला पादरक्षार्थ चार योद्धे असावेत. रथाच्या रक्षणार्थ चार अश्व असावेत. हे रक्षक ढालतलवारीनिशीं असावेत. धनुष्यवाल्यांबरोबर तितकेच ढालवाले असावेत. धन्व्यांच्या पाठीमागें अश्व असावेत. नंतर रथ, नंतर हत्ती, नंतर पायदळ; तोंडाला नेहमीं शूरच लोक असावेत. शूर लोकांचे फक्त खांदेच दिसावेत. त्याच्यापुढील श्लोकार्धाचा अर्थ अस्पष्ट आहे ( शूरान्प्रमुखतो दत्वा स्कंधमात्रप्रदर्शनम् कर्तव्यमीरूसंघेन शत्रुविद्रावकारकं )

शूरांचें लक्षण—उंच शरीर, पोपटी नाक, प्रेमळ नजर ( अजिम्हेक्षण ) संहृतभ्रू, संतापी, कलहप्रिय, नित्य संतुष्ट असणें हें आहे. मृतांचीं शवें युद्धभूमीपासून दूर करणें हें पायदळाचें मुख्य काम होय. तसेंच अन्नपाण्याचा व आयुधांचा पुरवठा करणें हें होय. टक्करीचें काम हत्तीचें आहे. आपल्या सैन्याचा भेद करूं इच्छिणाऱ्या शत्रूपासून स्वसैन्याचें रक्षण करणें, एकजूट झालेल्या शत्रूच्या सैन्याची फळी फोडणें हें समशेरबहाद्दरांचें काम होय. शत्रूला पाठमोरें करणें धन्व्यांचें काम होय. संघटित झालेल्या योध्यांस व त्यांच्या वाहनांस त्रस्त करणें, संघटित सैन्याची फाटफूट करणें, फाटाफुटीची एकी करणें, हें रथ्याचें काम होय. तटादिकांचा भेद करणें हीं हत्तींचीं कामें होत. विषम (भूमी डोंगराळ अथवा आडवाव्याची जागा) ही पायदळास योग्य आहे. रथाला खांचखळग्याची जागा उपयोगाची नाहीं. हत्तीला दलदलीची जागा चांगली. या तऱ्हेनें रणभूमी पाहून राजानें आपल्या सैन्याची योजना व ने आण करावी. योध्यांना नेहमीं नावांनें व कुलानें उत्तेजित करावें. धर्मनिष्ठ राजाला नेहमीं जय प्राप्त होतो. युद्ध बरोबरीचें असावें. उ. हत्ती हत्तीबरोबर इत्यादि. प्रेक्षक, अशस्त्र, किंवा पतित यांनीं रणभूमीवर प्रवेश करूं नये.

शत्रु शांत, निद्राभिव्याप्त असतां, नदी किंवा वन, अधोत्तीर्ण, असतां, आकाश अभ्राच्छादित असतां, कपटयुद्ध करावें. शत्रू भग्न झाले, असें ओरडावें (बाहूप्रगृह्यविक्रोशेत् भग्ना भग्ना). सैन्याची कुमक आली शत्रूचा सेनापती पडला, राजाला धरलें वगैरे बातम्या आपल्या सैन्यांत नेहमीं पसरवाव्यात, शत्रूला धरल्यावर प्रधानाकडून नजराणा ( रत्नादि ) आल्यास त्याचा स्वीकार करावा. शत्रूच्या स्त्रियांचें रक्षण करावें. शत्रूला धरून सोडून द्यावें. त्याच्याशीं युद्ध करूं नये. पुत्राप्रमाणें त्याचें पालन करावें. देशाचार कधींच मोडूं नये. विजय घेऊन ध्रुव नक्षत्रावर घरीं आल्यावर देवब्राह्मणांचा पूजा करावी; त्याचे आशीर्वाद घ्यावेत. योद्धयांच्या कुटुंबपोषणाची योग्य तजवीज ठेवावी. युद्धांत मिळविलेलें द्रव्य नोकर चाकर अथवा योद्धे यांमध्यें वांटावें.

अ. २३७ श्रीस्तोत्र. अ. २३८ रामानें लक्ष्मणास सांगितलेल्या नीतीचें वर्णन सामान्य आहे ( नीति व धर्म ). अ. २३९ राजधर्म—राजाच्या गुणाचें वर्णन म्हणजे थोडक्यांत साधूंच्या गुणांचेंच वर्णन होय. (विनीतत्वं धर्मकता साधोश्चनृपतेर्गुणः) यापुढें पुरोहित, अमात्य वगैरेंचीं थोडक्यांत लक्षणें दिलीं आहेत. अ. २४० षाड्गुण्य. राजाचे मुख्य विचारविषय होणाऱ्या मंडळांत १२ राजे असावेत. शत्रू, मित्र, शत्रुमित्र, मित्राचा मित्र, शत्रूच्या मित्राचा मित्र, पार्ष्णिग्राह, आक्रंद, आसार, अवनय इत्यादि. संधी सोळा प्रकारचे आहेत. कपाल, उपहार, संतान, संगत, उपन्यास, प्रतीकार, संयोग, पुरुषांतर, अदृष्टनर, आदिष्ट, आत्मा, उपग्रह, परिक्रम, छिन्न, परदूषण, व स्कंधोपनेय. या सोळा प्रकारांत मुख्य चार प्रकार होत. परस्परोपकार, मैत्र, संबंध व उपहार. संधीला २० माणसें अयोग्य आहेत. बाल, वृद्ध, दीर्घरोगी, बंधुबहिष्कृत, भीरुक, मित्रेलोक, लुब्ध, लुब्धजन, विरक्तस्वभावी, अत्यंत विषयी, अनेकचित्तमंत्र, देवब्राह्मणनिंदक, दैवोपहतक, दैवनिंदक, दुर्भिक्षव्यसनोपेत्त, वलव्यसनसंकुल, स्वदेशस्थ, बहुरिपु, बहुकालमुक्त, सत्यधर्मव्यपेत. हे सर्व संधी करण्यास अयोग्य आहेत. एकमेकांच्या अपकारानेंच विग्रह उत्पन्न होतो. वैर पांच प्रकारचें आहे ( सापत्न, वास्तुज, स्त्रीज, वाग्जात, व अपराध ). विग्रहाचे १६ प्रकार आहेत. यान हें पांच प्रकारचें आहे.

अ. २४१. सामादि. मंत्रशक्ति ही प्रभाव व उत्साह यांच्या जोरावरच प्रशस्त मानिली आहे. मंत्राचे प्रकार ५ आहेत, ते असे. "अविज्ञात" गोष्टींचें ज्ञान, ज्ञातचा गोष्टींचा निश्चय. द्विविध अर्थाच्या संशयाची निवृत्ति, शिल्लक पाहणें ( शेषदर्शन ), देशकालाच्या विभागानें सहायसंपत्तीचा विचार, विपत्तीचा प्रतीकार. मद, प्रमाद, काम, सुप्त व प्रलापित हे मंत्राला फोडणारे आहेत. प्रगल्भ, स्मृतिमान् वाग्मी, शस्त्र व शास्त्र यांत तत्पर, कामाचा पूर्ण अभ्यास असलेला ( अभ्यस्तकर्मा ) हाच राजाच्या सेवेला योग्य आहे. दूताला इतके गुण अवश्य आहेत. शत्रूच्या पुढें समजल्यावांचून उभें राहूं नये, किंवा सभेंत जाऊं नये. शत्रूचा उणेपणा पाहून त्याशीं विरोध करावा. कार्यांच्या कालाची नेहमीं राजानें अपेक्षा करावी. रागापराग हे दूतांच्या दृष्टीवरून व गालाच्या हालचालीनें जाणावे. गुप्तदूत व्यापारी, शेतकरी, भिक्षुक किंवा सोंगाड्या असावा. मंत्र, मंत्रफलसिद्धि, कामकाजाचें निरीक्षण, आयति, आयव्यय (जमाखर्च), दंडनीती, शत्रूचा प्रतिषेध, व्यसनाचा प्रतीकार, राज्य व राजाचें रक्षण, हीं कामें अमात्याचीं आहेत. तो जर व्यसनी असेल तर नियमित कार्य होणार नाहीं. हिरण्य, धान्य, वस्त्र यांची प्रजा ही वाहन होय. इत्यादि. अर्थ स्पष्ट नाहीं. (हिरण्य धान्य वस्त्राणि वाहनं प्रजया भवेत् ॥ तथान्येद्रव्यनिचया हस्तिसव्यसना प्रजा ) आपत्तींत असलेल्या प्रजेचें रक्षण, कोष व दंड यांचें निरीक्षण यानेंच करावें. दुर्गव्यसन म्हणजे यंत्र, प्राकार, परिखा वगैरे मोडकळीला येणें, शस्त्रांचा

पुरवठा नसणें, क्षीण सैन्याची भरती असणें, हें होय. सैन्यव्यसन. उपरुद्ध, परिक्षिप्त, अमानित, विमानित, अभूत, व्याधित, श्रांत, दूरयात, नवागत, परिक्षीण, प्रतिहत, प्रहताप्रतर, आशानिर्वेद, भूयिष्ट, अनृतप्राप्तः, कलत्रगर्भ, निक्षिप्त, अंतःशल्य, विच्छिन्न, विविधासार, शून्यमूल, अस्वास्यसंहत, भिन्नकूट, दुष्पार्ष्णिग्राह, हें सैन्यव्यसन होय. या पारिभाषिक शब्दांचा अर्थनिश्चय काळजीपूर्वक केला पाहिजे सैन्याच्या तळामध्यें राजाचा निवेश व खजिना असावा. सामाचे भेद चार; दानाचे भेद पांच. भेदाचे प्रकार तीन. दमाचे भेद तीन. हे कुठें व कसे योजावे याचें थोडक्यांत विवेचन दिलें आहे.

अ. २४२ राजनीति. सैन्य सहा प्रकारचें असावें. त्यांचीं नांवें, मौल, भूत, श्रोणि, सुहृत, द्विषत्, आटविक. उत्तरोत्तर हे प्रकार अधिक कमी योग्यतेचे आहेत. हत्ति, घोडे, रथ, पायदळ हे सैन्याचे भाग अथवा अंग झाले. परंतु सैन्यभरती कशी असावी यावद्दलचे वरील प्रकार आहेत. मौल म्ह. खानदानीचे व पिढीजाद, व शास्त्रवेत्ते ( मनुस्मृति अध्याय ७.५४ पहा); भूत–लायक किंवा स्वामिनिष्ठ; श्रोणी-(अर्थ काय); सुहृत्–मित्र; द्विषत्–शत्रु;आटविक–रानटी अरण्याची ज्यांनां माहिती आहे असे लोक. व्यूह शब्दाचा अर्थ आपण सैन्याची शिस्त व मांडणी असा ठरवूं. नदी, पर्वत, अरण्यें, दऱ्या खोऱ्या इत्यादि ठिकाणीं जेथें भीतीचा संबंध असेल तेथं सैन्यानिशीं खुद्द सेनापतीनें जावें. "नद्यद्रिववनदुर्गेषु यत्र यत्रभयंभवेत् सेनापतिस्तत्रगच्छेत् स्वयं व्युहीकृतैर्बलैः" ( शुक्रनीतीमध्यें हा श्लोक थोड्या पाठभेदानें आहे. शुक्रनीति अ. ४ प्र. ७ ). सैन्यांतील नायक सगळ्यांच्या पुढें असावा व त्याच्याजवळ धाडशी शूर असे वीर असावेत. मध्यें कलत्र, स्वामी कोष इत्यादि असावेत. दोन्ही पार्श्वभागाला घोडे, घोड्यांच्या बाजूला रथ, रथांच्या बाजूला हत्ती, हतीच्या दोन्ही बाजूला रानटी सैन्य असावें. पाठीमागून सेनापती. अशी सेनेमध्यें मांडणी असावी.

खिन्नांना आश्वासन देत सज्ज अशा सैन्यासह दर मजल गांठावी. मागें रणदीक्षाप्रसंगीं, व्यूहांचीं नांवें सुचविलीं आहेत. त्यांपैकीं पूर्वगामी सैन्यरचना असावी. पुढें भय आल्यास दोन्ही बाजूला मकर, श्येन, सूची, वीरवक्त्र यांपैकीं कोणती तरी असावी. पिछाडीला भीति उत्पन्न झाल्यास शकटव्यूह असावा. पार्श्वभागाला वज्रव्यूहाची रचना असावी. सर्व बाजूला सर्वतोभद्रव्यूह असावा. युद्धाचे प्रकार दोन. प्रकाशित युद्ध व अप्रकाशित युद्ध. अप्रकाशित युद्धांत विशेषतः छावणी रक्षण करणारांचा नाश करावा. सैन्याची प्रथम हुलकावणी देऊन आपल्या पाठीमागें लागणाऱ्या शत्रुसैन्याला एक जुटीनें मारावें. छापा घालणें, अघाडीचें, पिछाडीचें, बगलेचें. हें सैन्य बहुधा प्रथम आटविक सैन्य लढवावें. नंतर वाहक सैन्य योजावें. छावणी. गांव, शहर, स्वामी, प्रजादिक सैन्य हें विश्वस्त असतां छापा घालावा. छापा केवळ रात्रींचा घालावा असें नाहीं. तर दिवसासुद्धां छापा घालावा. रात्रीं शत्रुसैन्य निद्रिस्त असतां त्यावर छापा घालतांना हत्ती व ढाल तलवार धरणाऱ्या सैन्याची योजना करावी. गजदलाचा विशेष उपयोग म्हटला म्हणजे वनदुर्गामध्यें प्रवेश करणें. एक जुटीनें असलेल्या सैन्याची फोड करणें, फुटाफुट झालेल्या सैन्याची एक जुट करणें, खजिना सांभाळणें, अभिन्न सैन्याचा भेद करणें व मित्रसंधान या गोष्टींकडे रथदलाचा उपयोग होतो. अरण्यें, दिशा, मार्ग यांचा शोध लावणें; ( वीवधासार लक्षण ) शत्रूच्या मार्गाची अथवा धान्यादिक पुरवठ्याची लक्षणें जाणणें; पाहणी करणें, अनुयायांची हालचाल करणें (अनुयायाना पसरण ), जरुरीचीं लगबगीचीं कामें करणें, ( दिनानुसरण ) हतोत्साहांना पाठबळ देणें, शिलकी अथवा पीछाडीच्या सैन्याचा नाश करणें, हें घोडदळाचें काम आहे. पायदळ नेहमीं सज्जशस्त्र असावें. शिबिराचें शोधन, स्वच्छता, तसेंच बस्तिकर्म, मलशोधन, दगड धोंडे, झाडें झुडें, कांटेरी झुडपें, जाळ्या, वारुळ वगैरे वाटेंतील काढून टाकणें. हीं कामें पायदळांचीं आहेत. पायदळाला जमीन भरपूर असावी. म्हणजे बाहेर जाणें येणें अथवा पळण्याच्या वेळेस पळवाट काढणें यासाठीं जमीन लायक असावी. पायदळाला सुद्धां अति कठीण जनीन उपयोगाची नाहीं. तथापि थोडीशीं झाडी, दगड धोंडे, खडकाळ प्रदेश,लहान सहान डोंगर किंवा टेकड्या यांतून सैन्याची ने आण करण्यास पायदळ उत्तम आहे. वाळूचा व चिखलाचा प्रदेश घोडदळाला उपयोग नाहीं. चिखल, झाडें, मातखाचर किंवा पाणथळ भूमी ही रथदळाला उपयोगी नाहीं. झाडी, लता, निर्झर, मोठाले डोंगर, समभूमी व चिखल नसलेला प्रदेश गजदळाला प्रशस्त आहे.

राजकार्यामध्यें येणाऱ्या प्रतिग्रह शब्दाचा अर्थ किंवा व्याख्या अशी आहे कीं, व्यूहांतील बाकीचीं सहा अंगें नष्ट झालीं असतां ( सहा अंगें पुढें आहेत. ) सैन्याचा स्वीकार करणें, म्हणजे त्यांना आश्वासन देऊन लढविणें, यालाच प्रतिग्रह म्हणतात. या प्रतिग्रहावांचून व्यूह विलग दिसतो. प्रतिग्रहा वांचून युद्ध करणें अयोग्य होय. प्रतिग्रह याची व्याख्या दिली आहे कीं, "उरस्यादीनिभिन्नानि प्रतिगृण्हन्वलानिहि ॥ प्रतिग्रह इतिख्यातो राजकार्यांतरक्षमः" राज्याचें मूळ कोशावर ( खजिन्यावर ) अवलंबून असल्यामुळें तो खजिना नेहमीं राजाच्या जवळ असावा. त्या खजिन्याचा योध्यांकडे उपयोग करतात. उदाहरणार्थ योध्यास शत्रूच्या नाशाबद्दल बक्षीस. युद्धांत योद्ध्यांकडून राजा मारला गेल्यास १००००० द्रव्य योद्ध्यांस द्यावें. राजाचा पुत्र मारला गेल्यास ५०००० द्रव्य त्यांस द्यावें. ( द्रव्य हा शब्द सामान्यवाची आहेसा दिसतो.) सेनापती, गजयोद्धा वगैरे प्रमुख वीरांस मारणाराला ५०००० द्रव्य किंवा कामगिरी पाहून देणें. व्यायामविनिवर्तन ( पूर्णपणें धडपड करणें. ) सैन्याची धडपड अर्थात् हालचालही

पूर्णपणें होईल अशा बेतानें गर्दी न करतां युद्ध करावें. यामध्यें संकर व संकुल हे शब्द निरनिराळ्या अर्थाचे आहेत. पहिला अर्थ दाटी व दुसरा अर्थ एकजूट किंवा एकदम गर्दी करणें. महासंकुलयुद्धामध्यें हत्तीची योजना करावी. एका घोडेस्वाराला तीन पायदळ असावेत. एका हत्तीला १५ पायदळ असावेत,तीन घोडेस्वार असावेत.हेंच विधान रथाचें आहे.

व्यूहांचीं मुख्य अंगें सात आहेत. उर, कक्ष, पक्ष, मध्य, पृष्ठ, प्रतिग्रह व कोटी. बृहस्पतीच्या मतें व्यूहाचीं अंगें उर, कक्ष, दक्ष व पतिग्रह हीं आहेत. व शुक्राचार्यांच्या मतें कक्षा यांत नसावी. ( स्मृतिसमुच्चयांत दिलेले औशनस व बृहस्पती स्मृति यांत हा विषय नाहीं. ) फूट न पाडतां युद्ध करावें व एकमेकांनीं एकमेकांचें रक्षण करावें. व्यूहाच्या मध्यें सैन्य थोडें असावें. युद्ध केवळ नायकप्राण आहे. उराच्या ठिकाणीं प्रचंड हत्तीची योजना करावी. कक्षांना रथ, पक्षाला हत्तीचें सैन्य. याप्रमाणें व्यूहाची रचना केल्यास अर्तभेद व्यूहरचना असें म्हणतात.

रथांच्या जागीं घोडेस्वार, घोडेस्वारांच्या जागीं पायदळ, किंवा रथांच्या जागीं हत्ती हीं लढवावींत. व्यूहाचीं पूर्वी सात अंगें सांगितलीं आहेतच. ह्या सात अंगांपैकीं कमी ज्यास्त प्रकारानें व्यूहरचना केल्यास त्याला निरनिराळ्या व्यूहांचीं नांवें प्राप्त होतात. त्यांचीं मुख्य नांवें व पोटभाग थोडक्यांत पुढीलप्रमाणें दिलीं आहेत. मंडल, असंहत, भोग व दंड हे व्यूहरचनेचे भाग होत. व्यूहरचना म्हणजे पद्धतवार अथवा सशास्त्र सैन्यांची मांडणी. व्यूहांचीं नांवें पूर्वी दिलीं आहेत. व्यूहांच्या अंगांचीं मागें दिल्याप्रमाणें सात अंगें आहेत. त्या सात अंगांमध्यें सैन्य कसें उभें करावयाचें या शिस्तीला अथवा योजनेला वरील म्हणजे मंडल, असंहत, भोग व दंड हीं नांवें आहेत. मंडल म्हणजे सैन्याची सर्व बाजू हलविणें. (मंडलः सर्वतोवृत्ति ) वृत्ति=हालचाल. असंहत म्हणजे सैन्याचे भाग पाडून वेगवेगळाली हालचाल करणें. ( पृथग्वृत्तिरसंहतः ) दंड म्हणजे तिरकी सैन्याची हालचाल करणें. ( तिर्यग्वृत्तिस्तुदंडस्यात् ) भोग म्हणजे वरील लक्षणांहून निराळी रचना अर्थात् सरळ व अखंड सैन्याची हालचाल करणें हा होय. (भोगोन्यावृत्तिरेवच.) तिरकी पण निरनिराळ्या तऱ्हेनें सैन्याच्या रचनेमुळें दंडामध्यें पडलेले भेद. प्रदर, दृढक, असह्य, चाप, कुक्षि, प्रतिष्ठ, सुप्रतिष्ठ, श्येन, विजय, संजय, विशाल, सूची, स्थूणाकर्ण, चमूमुख, सर्पास्य, वलय.

भोग याचे भेद अतिक्रांत, प्रतिक्रांत, विपर्यय, स्थूणपक्ष, धनुष्पक्ष, द्विस्थूण, दंड, ऊर्ध्वंग, द्विगुण व द्विचतुर्दंड. गोमूत्रिका, अहिसंचारी, शकट, मकर.

मंडल—दंडपक्ष, ( शकट ) व्यतिकीर्ण, हे भेद आहेत.

संहत—अष्टानीक, ऊर्ध्वांग, वज्रभेद असे प्रकार आहेत. कांहींत व्यूहांचीं नांवें व भेद आले आहेत. मंडळाचे प्रकार दोन. असंहताचे ६ प्रकार व भोगाचे ५.

दंडक व्यूहामध्यें कक्ष, पक्ष, उर व चवथें कोणतें तरी अंग असावें.

या व्यूहांचा अर्थ दुर्बोध झाल्यामुळें येथील श्लोक पुढें दिले आहेत. 'स्यात्कक्षपक्षोरस्यैश्च वर्तमानस्तु दंडकः । तत्र प्रयोगो दंडस्य स्थानं तुर्येण दर्शयेत् । स्याद्दंडसमपक्षाभ्यामतिक्रान्तः प्रदारकः । भवेत्स पक्षकक्षाभ्यामतिक्रान्तो दृढः स्मृतः । कक्षाभ्यां च प्रतिक्रांतव्यूहोऽसह्यः स्मृतो यथा । कक्षपक्षावधः स्थाप्योरस्यैः क्रान्तश्च खातकः ॥ द्वौ दंडौ वलयः प्रोक्तो व्यूहो रिपुविदारणः । दुर्जयश्चतुर्वलयः शत्रोर्वलविमर्दनः । कक्षपक्षोरस्यैर्भोगो विषमं परिवर्जयेत् । सर्पचारी गोमूत्रिका शकटः शकटाकृतिः । विपर्ययोऽमरः प्रोक्तः सर्वशत्रुविमर्दकः स्यात्कक्षपक्षोरस्यानामेकीभावस्तु मंडलः । चक्रपद्मादयो भेदा मंडलस्य प्रभेदकाः । एवंच सर्वतोभद्रो वज्राक्षवरकाकवत् । अर्धचंद्रश्च शृंगाटोह्यचलो नामरूपतः । व्यूहा यथासुखं कार्याः शत्रूणां बलवारणाः ॥

युद्धशास्त्रविषयक भाग जो येथें मांडला त्याच्यावरून त्या कालाच्या युद्धपद्धतिसंबंधानें आपणांस निश्चित ज्ञान किती थोडकें आहे, हें मात्र अधिक व्यक्त होतें.

स्त्री पु रु ष ल क्ष णा दि. अ. २४३ पुरुष लक्षण. हीं लक्षणें वाचनीय आहेत. अ. २४४ स्त्रीलक्षण अ. २४५.

चा म र, व श स्त्रा स्त्रें.—चामरादिलक्षण. चामराला दांडा सोन्याचा असावा. त्याला पंख, मोर, हंस, शुक बलाका, यापैकीं एखाद्या पक्ष्याच्या पंखाचे चामर असावे. मिश्र पंख नसावेत. छत्राच्या दांड्याला ३ ते ८ पर्यंत भद्रासन क्षीर वृक्षाचें असून ५० अंगुल उंच असावें व त्याचा विस्तार तीन हाताचा असावा. त्याला जागोजाग सुवर्णादि बसवावें.

धनुष्य तीन द्रव्याचें असावें. धातु, शिंग, किंवा लांकूड. त्याप्रमाणें धनुष्याच्या दोरीचीं द्रव्येंसुद्धां तीनच आहेत. वंश, भंगा, ( अंबाडी किंवा ताग, ) त्वचा ( तात वगैरे ). लांकडाच्या धनुष्याचें प्रमाण ४ हातांचें असावें. इतर द्रव्याचें कमी ज्यास्त प्रमाण आहे. मुष्टिग्राह ( मुठींत धनुष्य धरण्याच्या जोगें ), स्वल्पकोटी, त्वचाशृंग, शार्ङ्ग, लोहमय वगैरे त्यांत भेद आहेत. कोटीचा आकार स्त्रीच्या भुंवई प्रमाणें असावा. वरील द्रव्याच्या मिश्रणानें किंवा पृथक्त्वानें धनुष्य बनवावें. शार्ङ्ग धनुष्याला रुप्याचे बिंदु असावेत. कुटिल, स्फुटित, व सच्छिद्र असे धनुष्याचे दोष आहेत. धातुमय धनुष्य, सोनें, रुपें, तांबें, व लोखंड यापैकीं कोणत्याही धातूचें असावें. शृंगमय धनुष्य माहिष, शारभ किंवा रोही यांच्यापैकीं जनावराच्या शिंगाचें असावें. काष्ठमय धनुष्य, चंदन, वेत, साल, इत्यादिपासून तयार केलेलें असावें. सर्वांत वेळूचें धनुष्य जास्त चांगलें असतें. हे वेळू शरदृतूंमध्यें काढलेले असावेत. बाण वेळूचा असावा. त्या बाणाच्या टोंकाशीं शेंबी लोखंडाची, किंवा सोनें, रुपें इत्यादि धातूंची असावी.त्यांचीं टोकें तीक्ष्ण असावींत, व त्यांना तेल लावावें. "नंदक" नांवाचें

खड्ग–त्याची उत्पत्ति—मेरु पर्वतावर ब्रह्मदेव यज्ञ करीत होते त्यांत लोह दैत्य आला. त्यावेळेस अग्नीची प्रार्थना ब्रह्मदेवानें केली. तेव्हां अग्नीपासून एक पुरुष उत्पन्न झाला व त्यानें त्या दैत्याला खड्गानें मारिलें. त्या योगानें सर्वांना आनंद झाला, म्हणून त्यास नंदक असें म्हणतात. तें नंदक खड्ग भगवंतानें घेतलें. खड्गाचे प्रकार–खटीखट्टर, गांवाचें नांव (?) हें दिसण्यास फार चांगलें आहे. वार्षिक—कायच्छिद्. सूर्पारक—हें मजवूत आहे. वंग—तीक्ष्णच्छेद. ( दीर्घःसुमधुरःशब्दो यस्य खड्गस्य सत्तम ) खड्ग चांगलें म्हणजे आवाजदार व ५० बोटें लांब असावें. २५ व १२ लांबीचीं हीं मध्यम व कनिष्ठ आहेत. खड्ग लांब असून त्याचा शब्द मधुर असावा. आवाज किंकिणी-प्रमाणें असावा. खड्गाचें अग्र पद्माच्या पाकळीप्रमाणें किंवा मंडलाग्राप्रमाणें असावें म्हणजे उत्तम. काव्हेराच्या पानाप्रमाणें असणें हें चांगलेंच आहे. त्याला तुपासारखा रंग असावा. त्याची प्रभा विजेप्रमाणें असावी. खड्ग मध्यभागीं व्रणलिंगाप्रमाणें असावें. काक, उलूक अशा वर्णाप्रमाणें शोभा असावी. आपलें तोंड खड्गामध्यें पाहूं नये. उच्छिष्टानें शिवूं नये, व त्याचीं मूल्य, जाति, हीं सांगूं नये.

रत्नपरीक्षा अ. २४६ वज्र, मरकत, रत्न, पद्मराग मौक्तिक, इन्द्रनील, महानील, वैदुर्य, गंधशस्य, चंद्रकांत, सूर्यकांत स्फटिक, पुलक, कर्केतन, पुष्पराग, ज्योतीरस, राजपट्ट, राजमय, सौगंधिक, गंज, शंख, गोमेद, रुधिराक्ष, भल्लातक, धूली, मरकत; तुत्थक, सीस, पीलु, प्रवाल, गिरिवज्र, भुजंगमणि, वज्रमणि, टिट्टिभ, पिंड, भ्रामर, उत्पल. यामध्यें पाचाचें नांव आढळत नाहीं. या प्रकरणाचा विचार शुक्रनीतींत बराच केला आहे. व त्याची परीक्षा जरा विस्तृत दिली आहे.

अ. २४७ वास्तुलक्षण. वास्तूंत विशिष्ट देवतांची स्थापना अ. २४८ पुष्पादिपूजाफल.

धनुर्वेद अ. २४९ धनुर्वेदाचे पाद चार. रथ, हत्ती, घोडे व पायदळ. परंतु हे चार पाद योध्यांच्या शरीराचे होत; योद्धयाच्या पद्धतशीर क्रियेचे प्रकार पांच. त्यांचीं नांवें; यंत्रमुक्त, पाणिमुक्त, मुक्तसंधारित, अमुक्त व वाहुयुद्ध ( नियुद्ध ) हीं होत. शस्त्र व अस्त्र असे युद्धाचे संपत्तीचे दोन भेद. युद्धाच्या तऱ्हा दोन; सरळ युद्ध व कपटी युद्ध.

यंत्रमुक्त म्हणजे वाण फेंकणें वगैरे भाग यांत येतो. पाणिमुक्त–दगड, तोमर वगैरे टाकणें यास पाणिमुक्त म्हणावें. मुक्तसंधारित–शत्रूनें केलेल्या शस्त्राच्या किंवा अस्त्राच्या भडिमारास सांवरून धरणें, त्यांनीं सोडलेलीं अस्त्रें आपण सावरणें याला मुक्तसंधारित म्हणतात. ढाली वगैरे यांत येतील. अमुक्त—तलवारी वगैरे शस्त्रांच्या फेंकीला अमुक्त म्हणतात. नियुद्धः—शस्त्रास्त्रांवांचून युद्ध करणें यास नियुद्ध म्हणतात.

उत्तम प्रतीचें युद्ध म्हणजे धनुर्युद्ध, मध्यम प्रास, व कनिष्ठ खड्गयुद्ध होय. धनुर्वेदामध्यें शिकविणारा गुरु ब्राम्हण मुख्य असावा. नंतर क्षत्रिय, व वैश्य, निदान पक्षीं शूद्र असावा शूद्राचा मुख्य अधिकार युद्ध करण्याचाच आहे. सैन्यांत भरती शक्य तितकी आपल्याच देशांतील लोकांची असावी. हीं येथील वचनें लक्षांत ठेवण्याजोगीं आहेत.

सैन्य शिक्षा पद्धति.–कवाईत–आंगठे, घोटे, व हातबोटें, हीं एकमेकाशीं घट्ट जुळलीं असून नजर पायांकडे सारखी देणें, यास समपदस्थान म्हणावें. वैशाखस्थान—हातबोटें पायांवर ठेवून गुडघे सरळ व ताठ करणें, यास वैशाखस्थान म्हणावें. पायाच्या बोटांत अंतर तीन वितींचें असावें. मंडलस्थान—ज्यांत गुडघे हंसांच्या पंक्तीप्रमाणें दिसतात व मधलें प्रमाणें ४ वितींचें असतें त्यास मंडळ म्हणतात. आलीढ—नांगराच्या आकाराप्रमाणें ताठ गुडघे व मांडी करणें त्यास आलीढ म्हणतात. यामध्यें अंतर ५ वितींचें असावें. विपर्यस्त—वरच्या उलट लक्षणास विपर्यस्त म्हणावें. जातस्थान—डावा गुडघा वांकडा करून उजवा गुडघा सरळ करणें, घोटे व (पार्ष्णिग्रह) टाचा सारखे ठेवणें यांस जातस्थान म्हणतात. त्यामध्यें अंतर ५ बोटांचें असावें, किंवा १२ बोटांचें असावें. दंडायतस्थान—डावा गुडघा सरळ करून उजवा पसरट करणें, किंवा उजवा गुडघा (कुब्ज) वांकडा करणें याला दंडायत म्हणतात. विकटस्थान-याचें लक्षण वरील प्रमाणेंच असून मधील अंतर मात्र दोन हातांचें असावें. संपुटस्थान—दोन्ही पाय उंच करणें, किंवा पसरट (उत्तान) गुडघे द्विगुण करणें, या विधीला संपुटस्थान म्हणतात. स्वस्तिक स्थान—किंचित् फिरविलेले व दंडासारखे सरळ पाय ठेवणें यास स्वस्तिक स्थान म्हणतात. यांमधील अंतर १६ बोटांचें असावें. ही सर्व पद्धत बहुधा धनुर्धाऱ्याच्या बैठकीची असावी असें वाटतें. धनुष्याला वंदन करून हातांत घ्यावें. त्याला दोरी लावलेली असावी. धनुष्याची कोटी जमिनीला टेंकवावी. "फलादेश" जमीनीवर ठेवावा. धनुष्य तोलावें. मनगटें व हात वांकडे करून बाणाचा पंख धनुष्याच्या दोरीवर चढवावा. धनुष्याचा विन्यास १२ अंगुलाचा असावा. पुढें अर्ध्या श्लोकांत दोरीची प्राणशक्ति पाहून तो करावा त्यांत कमी ज्यास्त प्रमाण नसावें म्हणून सांगितलें आहे. धनुष्य नाभीवर ठेऊन नितंबावर बाण ठेवावेत. हात कानापर्यंत ओढावा. मुष्टीला प्रथम धरावें. दक्षिण स्तनाच्या अग्रभागीं बाण असावा. मूठ सारखी असावी. आंत, बाहेर, खालीं, वर, वांकडी, उत्तान चंचल, घट्ट वळलेली अशी नसावी. पहिल्या मुष्टीनें लक्ष्य आच्छादित करून छाती वर उचलावी व सारथ्यानें त्रिकोणावर बसावें. खांदा खालीं करावा, मान निश्चल असावी, व मस्तक मयुरांचित असावें (मयुरांचित मस्तकाचें लक्षण शारंगदेवानें संगीतरत्नाकरामध्यें दिलें आहे.) कपाळ, नाक, तोंड, कोपरे, खांदे हे सरळ असावेत. खांदा व हनवटी यांमध्यें तीन अंगुलांचें अंतर असावें. मुख्य प्रमाण तीन बोटांचें असावें. दुय्यम २ व कनिष्ठ १ बोटाचें असावें. अंगठा व त्याच्या जवळचें बोट यांनीं बाण उचलावा किंवा दुसऱ्या दोन बोटांनीं घ्यावा. तो प्रत्यंचेवर चढवावा. प्रत्यंचा बाणाच्या

लांबी इतकी ओढावी. ती जोरानें ओढावी. या एकंदर प्रकाराला आमुक्त असें नांव आहे. लक्ष्यवेध दृष्टीच्या व मुष्टीच्या अनुलक्षेंकरून करावा. उच्छेद म्हणजे डाव्या बाजूनें हात सोडणें याला उच्छेद म्हणावें. विमुक्तकामध्यें कोंपरा खालीं करावा. केवळ लक्ष्याकडेच दृष्टी असणें यास मध्यम म्हणावें. हातबाण हा सगळ्यांत उत्तम होय. तसेंच धनुष्याचें उत्तम प्रमाण ४, मध्यम साडेतीन, व कनिष्ठ तीन हात होय. हें वरील सर्व पायदळाचें विवेचन झालें. परंतु हे सगळे नियम अथवा शिस्त सर्वांनाच घोडेस्वार, रथदळ, गजदळ, यांनाही लागू आहे. अ. २५० [ धनुर्वेद पुढें चालु ] धनुर्विद्येचें शिक्षण देतांना प्रथम यज्ञभूमीवर सुनिर्धौत असें धनुष्य ठेवावें. मांसानें हवन करावें, धनुष्य, गदा वगैरे आयुधांची पूजा करावी. चलाख विद्यार्थ्यानें एकचित्त होऊन हातांत बाण घ्यावा. ( तूण ) भाता पाठीला बांधावा व डाव्या अगर उजव्या कांखेंत तो अडकवावा. मोकळा बाण त्यांत ठेवावा. नंतर भात्यामधून बाण काढावा. तो उजव्या हातानें घ्यावा. उजव्या हातानें बाण मध्यें धरून डाव्या हातानें कक्षा व धनुष्य धरावें. धनुष्याला दोरी चढविल्यावर बाण पुंखाकडून दोरीवर चढवावा. तो सिंहकर्णानें (अशा पुंखानें ?) ताणून, ( सिंहकर्ण हें या पुंखाचें विशेषण लावावें कीं क्रियार्थ घ्यावें, ही शंका आहे ) डाव्या कानाजवळ त्या बाणाच्या पुंखाचें फल न्यावें. ( वर्णान् याचा अर्थ बाण घ्यावा असें वाटतें. ) वर्णांना डाव्या हातांच्या मधल्या बोटानें धरावें. मन लक्ष्याकडे ठेऊन मुष्टी व दृष्टी समरेषेमध्यें आणावी, व उजव्या कानांकडे ओढून बाण सोडावा. दंड कपाळाचें लक्ष्य करून मारावा. चंद्रक १६ अंगुलाचा बाण हा कपाळावर मारावा. अभ्यास प्रथम अगदीं सावकाश करावा. ( अक्षिलक्ष्य ) नेम सावकाश धरून चतुरस्र म्हणजे चौकोनी लक्ष्य त्याचा वेध करावा. या अभ्यासाला क्षिप्रक म्हणावें. हा अभ्यास मूळापासून करावा. अतिशय सावकाशानें करावा. हा चतुर्वेधाचा अभ्यास पूर्णपणें झाला म्हणजे क्रमानें तीक्ष्ण, परावृत्त, गत, निम्न, उन्नत अशा लक्ष्यांचा अभ्यास व्हावा. ( या अभ्यासक्रमाच्या वाचनानें आपणांस हल्लींच्या गोळीबार पद्धतीची आठवण होते. ) ही धनुर्वेदाच्या अभ्यासाची पहिली पायरी झाली. हा अभ्यास पुढें वाढत वाढत दोन, तीन वेध एकाच वेळीं करण्यापर्यंत जातो. यापुढील १३ व १७ श्लोकांचा अर्थ नीट लागत नाहीं. (अ० २५१) धनुर्विद्येच्या अभ्यासाचें वर्णन करतांना, या अभ्यासाची साधारण परीक्षा विद्यार्थ्यांच्या पुढील विशेषणावरून होईल. अभ्यासक जितहस्त, जितमति, जितदृष्टि व लक्ष्यसाधक असावा. याप्रमाणें धनुर्विद्येचा अभ्यास झाल्यानंतर वाहनावर बसून अभ्यास करण्यास शिकावें.

पा श.—यापुढें थोडक्यांत पाशाचें वर्णन आहे. पाश दहा हात असावा. या श्लोकांतील करमुख याचा अर्थ लागत नाहीं. या पाशाच्या दोऱ्या कापसाच्या, मुंजाच्या ( मुंज एक प्रकारचें गवत आहे. ) तांतीच्या, किंवा झाडाच्या सालीच्या मजबूत कराव्या (पुढील अर्ध्या श्लोकांतील त्रिंशत् शब्दाचा अर्थ कदाचित् ३० धाग्याचा असा असूं शकेल काय ? ). पाश डाव्या हातांत घेऊन दुसऱ्या हातानें तो टाकावा. कक्षेंत त्याचें स्थान असावें. कुंडलाच्या आकृतीप्रमाणें पाश करून मस्तकावर टाकावा. चर्मवेष्टित, व तूणान्वित अशा माणसावर या पाशाचा विनियोग करावा. वल्गित, प्लुत, व प्रव्रजित या ठिकाणीं समयोग विधि करून पाश टाकावा. (अर्थ बरोबर समजला नाहीं.) शत्रूला प्रथम जिंकून नंतर पाश टाकावा.

त ल वा र, चि ल ख त—तलवार डाव्या बाजूला बांधावी. डाव्या हातानें म्यान धरावें व उजव्या हातानें त्यांतून तलवार काढावी. तलवारीची रुंदी ६ बोटांची असावी व लांबी अथवा उंची ६ हातांची असावी. वर्म, (चिलखत ). लोखंडाच्या बारीक सांखळ्या ( शलाका ) तारांनीं गुंफून तयार करावें. चिलखताचे प्रकार निरनिराळे आहेत.

भाता चामड्यांचा असावा, तो मजबूत व नवा असावा. भाता अर्धा हात असावा, किंवा बाणाच्या बरोबरीचा असावा. वरचा भाग तिरका असून वर गेलेला असावा.

सों ट्या चा उ प यो ग—उजव्या हातांत लगुड घेऊन उगारावा व मारावा. किंवा दोन्ही हातानें मारावा. ( उभाभ्यामथ हस्ताभ्याम् कुर्यात् तस्य निपातनं ) वध करणें फारच सफाईनें असावें. (अक्लेशेन ततः कुर्वन्वधे सिद्धिः प्रकीर्तिता.)

धनुर्वेद अ. २५२ ( पुढें चालु ) आयुधें—ढाल, तरवार, पाश, शूल, तोमर, गदा, परशु, मुद्गर, भिंदिपाल, लगुड, वज्र, पट्टिश, कृपाण, क्षेपणी, धनुष्य, बाण, चक्र हीं अयुधें होत. ढाल तलवारीच्या क्रिया ३२ प्रकारच्या आहेत. त्यांचीं नांवें. भ्रांत, उद्भ्रांत, आविद्ध, आप्लुत, विप्लुत, प्लुत, संपात, समुदीश, श्येनपात, आकुल, उद्धूत, अवधूत, सव्य, दक्षिण अनालक्षित विस्फोट, करालेन्द्र, महासख, विकराल, निपात, बिभीषण, भयानक, प्रत्यालीढ, आलीढ, वराह, लुलित, समग्र, अर्ध, तृतीयांश, पाद, पादार्ध, वारिज, वगैरे.

पाशक्रिया.—परावृत्त, अपावृत्त, गृहीत, लघु, ऊर्ध्वक्षिप्त, अधःक्षिप्त, संधारित, विधारित, श्येनपात, गजपात, ग्राहग्राह्य, हे अकरा प्रकार पाशधारणाचे होय.

पाश फिरविण्याचे प्रकारः—ऋजु, आयत, विशाल, तिर्यक् व भ्रामित.

चक्र—छेदन, भेदन, पात, भ्रमण, शमन, विकर्तन, व कर्तन.

शूल—आस्फोट, क्ष्वेडन, आंदोलिक भेदत्रास, आघात.

तोमर—ऋजुघात, भुजाघात, पार्श्वघात, दृष्टिघात.

गदा—आवृत्त परावृत्त, पादोद्धत, हंसमर्द विमर्द.

मुद्गर—ताडन, छेदन, चूर्णन भिंदिपाल-संभ्रांत, विश्रांत, गोविसर्ग, सदरहूच्या लगुडाच्या क्रिया तशाच होय.

वज्र-अंत्य, मध्य, परावृत्त, निदेशान्त

कृपाण—हरण, छेदन, घात, भेदन, रक्षण, पातन, स्फोटन क्षेपणी—त्रासन,रक्षण घात,वलोद्धरण, व आयत.

गदा युद्धामध्यें विशेषतः घडणाऱ्या शारीरिक क्रिया पुढीलप्रमाणें. सप्तांग, अवदंश, वराह, उद्धूतक, हस्तावहस्तमालीन, एक-हस्तावहस्तक, विहस्तवाहुपाश, कटिरोचित कोद्गत, उर, ललाट, हे गदायुद्धांतील हस्तक्रियेचें सामान्य लक्षण, करोद्धूत, विमान पादाहति, विपादिक, गात्रसंश्लेषण, शांत, गात्रविपर्यय, उर्ध्व-प्रहार, घात, गोमूत्र, पादक, तारक, दंड, कवरीबंध, तिर्यक्बंध, अपामरी, भीमवेग, सुदर्शन, सिंहक्रांत, गजाक्रांत, गर्दभाक्रांत, हीं सर्व गदायुद्धांतील कृत्यें आहेत. याच्यांतील वहुतेक भाग दुर्बोध असून वराचसा पारिभाषिक शब्दांनीं भरलेला आहे.

नियुद्ध—बाहुयुद्ध-अथवा बाहुमूलाचें (वगलेच्या मुळाचें) आकर्षण, विकर्ष, ग्रीवा विपरिवर्त, पर्यासत, विपर्यासत, पशुमार, अजाविक, पादप्रहार, आस्फोट, कटिराचित, गात्र श्लेष, स्कंधगत, महीव्याजन, उरुललाटघात, विस्पष्टकरण, उद्धूत, अवधूत, तिर्यङ्मार्गगत, यांतील बऱ्याच विशेषणांचा अर्थ लागण्यासारखा आहे. तसेंच बरेच पारिभाषिक शब्द आहेत.

गजयुद्ध—गजारोही गजस्कंध, अवक्षेप, अपरांमूख, देवमार्ग, अधोमार्ग अमार्ग गमनाकुल, यष्टिघात, अवक्षेप, जानुबंध, भुजाबंध, गात्रबंध, पिपृष्ट, सोदक, शुभ्र भुजावेष्टित, ही हत्तीवर बसलेल्या योध्यांची पद्धतशीर युद्धक्रिया होय.

हत्तीच्या रक्षणार्थ दोन अंकुश धरणारे, एक मानेवर बसणारा, दोन स्कंधावर बसलेले, धानुष्क किंवा ढाल तलवार धरणारे असे असावेत.

प्रत्येक रथाला व घोडेस्वाराला रक्षक म्हणून तीन घोडेस्वार व धनुर्धारी असावेत. धनुर्धाऱ्याच्या रक्षणार्थ चर्मधारक असावा.

अध्याय २५३ व्यवहारविषयक आहे. यांतील नियम व विचारपद्धति हीं धर्मशास्त्रग्रंथांबरोबर विचार करण्याजोगीं आहेत. अ. २५४ यांत ऋण देण्याबद्दलचे नियम आहेत. अ. २५५ दिव्यप्रमाणांस दिला आहे. अ. २५६ दायविभाग प्रकरण अ. २५७ सीमाविवादादिनिर्णय. २५८ वाक्पारुष्यादि प्रकरण यांतील बराचसा भाग आजच्या हिंदुकायद्याच्या मूलाशीं आहे. यांचें सविस्तर वर्णन येथें बरेंच लांबट होईल.

जा दु टो ण्या क डे वे दां चा उ प यो ग—अ. २५९ ऋग्विधानम्. ऋग्विधान याचा अर्थ अनेक कार्यांकरितां विशेषतः अभिचारासाठीं ऋग्वेदमंत्राचा केलेला उपयोग. यावर स्वतंत्र एक ग्रंथ आहे. गायत्री जप-मेधा कर्मः-"सदस्पती" इ. तीन ऋचा. पुढें मृत्युनाशक ९ ऋचा दिल्या आहेत. निरोगी होण्याबद्दल ऋचा "मित्रप्राज्ञपुरंदरम्" निर्भय पंथ होण्यास "तें पंथा" हा मंत्र म्हणावा. ऋग्वेदांतील अमुक मंत्र म्हटल्यास जातिश्रैष्ठ्य प्राप्त होतें इत्यादि प्रकारची माहिती ऋग्विधानांत आहे. याचप्रमाणें पुढील तीन वेदांचीं "विधानें" समजावीं.

अ. २६० यजुर्विधान. या विधानांत फक्त पूर्वाध्यायांत वर्णिलेल्या फलाच्या प्राप्तीसाठीं हवन करण्यास निरनिराळीं हवनीय द्रव्यें कोणतीं याचें वर्णन आहे. यांतील हवनांस द्रव्यें. शत्रुविद्वेषासाठीं कावळ्याचे व घुवडाचे पंख घ्यावेत, असा उल्लेख आहे. ऋग्वेदविधानांत ऐंद्रजालिक मायेचाच फक्त उल्लेख केला आहे; परंतु यजुर्वेदविधानांत उच्चाटनविधि सांगितला आहे.

वरील दोन विधानांत न येणारा अंजनमोहन प्रकार या सामवेदविधानफलश्रुतीमध्यें सांगितला आहे. अ. २६१ सामविधान अ. २६२ अथर्वविधान. अ. २६३ उत्पातशांति.

उ पा स ना विषय—अ. २६४ देवपूजावैश्वदेवबलि-वर्णन. अ. २६५ दिक्पालादिस्नान. अ. २६६ विनायकस्नान. स्वप्नामध्यें अनेक दुश्चिन्हें दिसणें, त्याच्या परिहारार्थ स्नान. अ. २६७ माहेश्वरस्नानलक्षकोटिहोमादिकांचें वर्णन. अ. २६८ नीराजनाविधि. अ. २६९ छत्रादिप्रार्थना. अ. २७० विष्णुपंजर.

रा ज की य इ ति हा स, व वा ङ्म ये ति हा स—अ. २७१ वेदशाखादिकथन. अ. २७२ पुराणदानादिमाहात्म्य. अ. २७३ सूर्यवंश. अ. २७४ सोमवंश अ. २७५ यदुवंश वर्णन. अ. २७६ द्वादशसंग्राम कृष्णाच्या हातून घडलेल्या लढाया. अ. २७७ राजवंशवर्णन. यांत तुर्वशांची कथा आहे. अ. २७८ पुरुवंशवर्णन. हा वंश पांडवांपर्यंतचाच आहे.

आ यु र्वे द. (अध्याय २७९-३०५ यांत मनुष्यवैद्यक, पशुवैद्यक, वृक्षवैद्यक व मधून मधून भिन्न विषय आले आहेत.) अ. २७९ सिद्धौषधालय अ. २८० सर्वरोगहरण औषधी.

मुख्यतः व्याधींचे प्रकार ४ शारीर, मानस, आगंतु व सहज अ. २८१ रसादिलक्षण, सोमजरस स्वादु, अम्ल व लवण, व अग्निज—कटुतिक्त व कषाय. अ. २८२ वृक्षायुर्वेद—प्लक्षवृक्ष उत्तरेकडे, वड पूर्वेकडे, दक्षिणेकडे आम्र, पश्चिमेकडे अश्वत्थ वृक्षांचें रोपण करावें. लिंब, अशोक, पुंनागड, शिरीष, प्रियंगव, अशोक, कदली, जांभूळ, बकुळ, डाळिंब या वृक्षांना सकाळ संध्याकाळच्या थंड वेळेस पाणी घालावें.

उपटून लावलेलें वृक्षास वर्षाऋतूमध्यें जमीन कोरडी असतां पाणी रात्रीं द्यावें. उत्तम २० हात, मध्यम १६ हात व कनिष्ट १२; हें वृक्षांस लावण्याचें प्रमाण आहे. झाडाला फळ न आल्यास शस्त्रानें छाटावें, झाडांना फळ येतें पण तें पूर्ण पिकत नाहीं, तर त्यांस विडंग (वावडिंग) व तूप चिखलांत मिसळून पाणी घालावें किंवा हुलगे, उडीद, मूग, तीळ, सातू व तूप या द्रव्यांचें चूर्ण करून थंड पाणी झाडांना घालावें म्हणजे झाडांना फुलें व फळें चांगलीं येतात.

झाडांच्या फलपुष्पादिकांची वाढ होण्यास सात रात्रीं शेळीच्या लेंड्या, सातूचें चूर्ण, तीळ, गोमांस व पाणी हीं घालावींत. झाडांची वाढ माशांच्या पाण्यानें चांगली होते. झाडांचे दोहद व कीड नाहींशीं होण्याला वावडिंग व तांदूळ, माशांचें मांस हीं पाण्यांत मिसळून घालावींत.

अ. २८३ अनेक रोगांचा नाश करणारीं औषधें अ. २८४ मंत्ररूपी औषधें; अ.२८५ मृतसंजीवन कर सिद्धयोग अ. २८६ मृत्युंजय योग औषधें अ. २८७ गजचिकित्सा. प्रशस्त हत्ती म्हटले म्हणजे लांब सोंडेचे,ज्यांचा उच्छ्वास मोठा आहे, असे होत. वीस किंवा अठरा नखें त्यास असावीं ? त्यांना मद थंडीच्या दिवसांत येत असावा, उजवा दांत उंच असावा व शब्द मेघासारखा असावा. कर्णे विपुल असून त्याच्या अंगावर सूक्ष्मबिंदु असावेत. यापुढें हत्तीला औषधें कोणतीं द्यावीं याचा विचार दिला आहे.

अ. २८८ अश्ववाहनसार. यामध्यें घोड्याचा वेग, चालण्याची ढब, घोड्याला शिकवणूक कशी असावी याचा उल्लेख केला आहे. अ. २८९ अश्वचिकित्सा औषधी. अ. २९० अश्वशांति. अ. २९१ गजशांति अ. २९२ गवायुर्वेद अ. २९३ मंत्रपरिभाषा अ. २९४ नागलक्षण. सर्पादिकांच्या जाति. या जातींच्या लांबीचीं कांहीं प्रमाणें दिलीं आहेत.

वि ष वै द्य क (अ. २९५ ते २९८) अ. २९५ दंशचिकित्सा अ. २९६ पंचांगरुद्रविधान अ. २९७ विषाला हरण करणाऱ्या मंत्र व औषधी. अ. २९८ गोनसादि चिकित्सा अ. २९९ बालादिग्रहहरबालतंत्र. अ. ३०० ग्रहादिपीडाशमनार्थं मंत्र. अ. ३०१ सूर्यार्चन. अ. ३०२ अनेक मंत्रौषधि कथन. अ. ३०३ अंगाक्षरार्चन.

मं त्र, व उ पा स ना वि ष य, अ. ३०४ पंचाक्षरादि पूजा मंत्र अ. ३०५ विष्णुनामें. अ. ३०६ नारसिंहादि मंत्र अ. ३०७ त्रैलोक्यमोहनमंत्र अ. ३०८ त्रैलोक्यमोहनीलक्ष्म्यादिपूजा. अ.३०९ त्वरितापूजा. अ. ३१०–३११ त्वरितामूलमंत्र. अ. ३१२ त्वरिताविद्या. अ. ३१३ नानामंत्र अ. ३१४ त्वरिता. ज्ञान. अ. ३१५ स्तंभनादिमंत्र अ. ३१६ नानामंत्र. अ.३१७ सकलादिमंत्रोद्धार. अ. ३१८ गणपूजा. अ. ३१९ वागीश्वरी पूजा अ. ३२० मंडलपूजा अ. ३२१ घोरास्त्रादिशान्तिकल्प. अ. ३२२ पाशुपतशान्ति अ. ३२३ षडंगान्यघोरास्त्राणि अ. ३२४ रुद्रशांति अ. ३२५ रुद्राक्षादि लक्षण व धारण, अंशकादि, ह्या मंत्रशास्त्रांतीलच भाग आहे अ. ३२६ गौर्यादिपूजा. अ. ३२७ देवालयमाहात्म्य.

छंद, काव्य, नाटक, नृत्य, शिक्षा, अलंकार, ( अ. ३२८–३४८ ) अ. ३२८।३२९ छंदसार हें पिंगलाच्या ग्रंथावरून उतरलें आहे असें ग्रंथकार म्हणतो ( छंदोलक्ष्ये मूलजैस्तैः पिंगलोक्तं यथाक्रमं. )

अ. ३३० छंदःसार. अ. ३३१ छंदाच्या जाति. अ. ३३२ विषमवृत्त. अ. ३३३ अर्धसमवृत्त. अ. ३३४ समवृत्त.अ. ३३५ प्रसादवर्णन. अ. ३३६ शिक्षा ( हल्लीं प्रसिद्ध असलेली शिक्षा तिच्या मानानें पाहतांही बरीच कमी आहे अवघे २२ श्लोक आहेत व त्या भिन्न श्लोकांचे तीन चरण शिक्षेच्याहून वेगळे आहेत ) अ. ३३७ काव्यादिलक्षण अ. ३३८ नाटकनिरूपण अ. ३३९ रसनिरूपण. अ. ३४० नृत्यामध्यें अंगविक्षेपकर्मनिरूपण अ. ३४१ अभिनयादिनिरूपण अ. ३४३ शब्दालंकार, अ. ३४४ अर्थालंकार, अ. ३४५ शब्दार्थालंकार. अ. ३४६ काव्यगुणविवेक अ. ३४७ काव्यदोषविवेक अ. ३४८ एकाक्षराभिधान. याच्यांत बहुतेक एका अक्षराचे एक किंवा क्वचित् अधिक अर्थ दिले आहेत.

व्या क र ण सा र–अ. ३४९–३५९ कात्यायनानें सांगितलेलें व्याकरणसार तुह्मांस सांगतों, असा उपक्रम आहे. प्रथम १४ सूत्रांचा पाठ दिला आहे. यामध्यें सूत्र किंवा वृत्ति अथवा वार्तिक ह्या भाग नसून शब्दाचें स्वरूप दाखवित आहे. ३५० संधिसिद्धरूपें, ३५१ सुब्विभक्तिसिद्धरूपें, ३५२ स्त्रीलिंगशब्दसिद्धरूपें, ३५३ नपुंसकशब्दसिद्धरूपें, ३५४ कारकें, ३५५, समास ३५६ तद्धितरूपें, ३५७ उणादिसिद्धरूपें, ३५८ तिङ्विभक्तिसिद्धरूपें, ३५९ कृत्सिद्धरूपें.

श ब्द को श—अ. ३६० स्वर्गपातालादि वर्ग यामध्यें आलेलीं नांवें किंवा श्लोक अमरकोशामध्यें आढळतात. अ. ३६१ अव्ययादि. अ. ३६२ नानार्थ वर्ग अ. ३६३ भूमि वनौषधि वर्ग अ. ३६४ नृब्रह्मक्षत्रविट्शूद्रवर्ग अ. ३६५ ब्रह्म वर्ग अ. ३६६ क्षत्रविट्शूद्रवर्ग. अ. ३६७ सामान्यनामलिंग.

अ. ३६८ प्रलयवर्णन, अ. ३६९ आत्यंतिक लय गर्भोत्पत्ति; मृताचें शरीर नष्ट झाल्यावर तो वायुरूप यमलोकीं जातो. तेथें दुःख भोगून वायुभूत गर्भाला येतो. मासानुक्रमें गर्भाची वाढ व त्याची उत्पत्ति. अ. ३७० शरीराचे अवयव यामध्यें हातापायांच्या, शिरा, नाड्या, अस्थि तशाच इतर अवयवांच्या इत्यादिकांच्या संख्या दिल्या आहेत. अ. ३७१ नरकनिरूपण.

यो ग अ.३७२ यमनियम अ.३७३ आसनप्राणायाम अ.३७४ ध्यान, अ. ३७५ धारणा, अ. ३७६ समाधि, अ. ३७६–३८० अध्यात्मब्रह्मज्ञान यामध्यें झालेला जडभरतरहुगणसंवाद भागवतामध्येंही आहे. परंतु श्लोकरचना निराळी आहे. अ. ३८१ गीतासार; कृष्णार्जुनसंवादतात्पर्य यामध्यें बहुतेक गीतेंतील श्लोक आहेत. अ. ३८२ यमगीता. यामध्यें प्रत्येकांचीं विशिष्ट मतें ग्रथित केलीं आहेत. उदाहरणार्थ सर्वत्र समदर्शी, निर्ममत्व असंगता, हींच मुख्य कल्याणाचीं साधनें आहेत असें पंचशिख म्हणतो. गर्भापासून मरणापर्यंतच्या वयाच्या अवस्था जाणून त्याप्रमाणें वागणें हेंच कल्याणाचें साधन हें गंगाविष्णूचें मत आहे. याप्रमाणें निरनिराळीं बरींच मतें आहेत.

अ. ३८३ आग्नेयपुराणमाहात्म्य.

**अग्निमांद्य**—अन्न न पचणें हें अन्नमार्गांतील व इतर इंद्रियांच्या रोगांचें एक लक्षण होय, व म्हणून वैद्यशास्त्रांत याला स्वतंत्र रोग मानीत नाहींत. परंतु ज्यांच्या इंद्रियामध्यें किंवा जठर, आंतडीं इत्यादि अन्नमार्गामध्यें कांहीं बिघाड न होतां ज्यांची अन्नपचनक्रिया सुरळीत चालत नाहीं व ज्यांना वरील अन्नमार्गाची दुर्बलता हेंच कारण लावतां येईल अशा रोग्यांची संख्या बरीच मोठी असल्यामुळें

या लक्षणाचा येथें स्वतंत्ररीत्या विचार केला आहे. कारण शहरांतील अस्वाभाविक रहाणीमुळें हा सर्वसाधारण रोगच आहे असें बाह्यतः दिसतें. याचीं कारणें तर पुष्कळच आहेत. कित्येकदां असें होतें कीं हळूहळू प्रगट होणारा एखादा भयंकर रोग शरीरांत विन्हाड करीत असतो. पण तो बाल्यावस्थेंत असल्यामुळें त्याचीं लक्षणें प्रामुख्यानें नजरेस न येतां तदनुषंगिक अपचन हेंच वरचेवर होऊं लागल्यामुळें अपचनाखेरीज आपणांस दुसरें कांहीं एक होत नाहीं असें रोग्यास वाटतें.

(१) अन्न सदोष असल्यामुळें होणारें अपचनः—यांत वाईट व जडान्न येवढेच दोष समाविष्ट नसून जें अन्न एरवीं खाल्ल्यानें हितवर्धक झालें असतें तें बेसुमार खाल्ल्यामुळें प्रकृति बिघडणें, अगर अनियमितपणानें, अगर वारंवार खाणें किंवा मोठालीं लंघनें सदा करणें यांचाहि समावेश होतो. भिन्न भिन्न माणसांना कोणास कमी तर कोणास जास्ती त्यांचे प्रकृतिमानाप्रमाणें लागतें; इतकेंच नव्हे तर त्याच माणसाचा आहार वरचेवर परिस्थित्यनुरूप बदलतो. उन्हाळ्याच्या दिवसांपेक्षां हिंवाळ्यांत अन्न जास्त जातें. नेहमीं बैठा रोजगार करणाऱ्या लोकांपेक्षा ज्यांनां उघड्या हवेंत पुष्कळ श्रम होतील अशीं कामें करावीं लागतात त्यांचा आहारही मोठा असतो. दांत दुखरे अगर किडके असल्यामुळें, अगर जेवण लवकर आटपण्याची घाई असल्यामुळें अन्नचर्वण नीट न होणें हें एक फार महत्वाचें कारण आहे. याशिवाय जे पदार्थ आपण खातों ते पचनास हलके अगर जड स्वभावतःच असतात, अगर स्वयंपाकांत त्यांवर होणाऱ्या भाजणें, उकडणें, तळणें, तेल, तूप, फोडण्या, मसाले इत्यादि संस्कारांमुळें ते तसे कधीं कधीं होतात. आपण पेय पदार्थ पितों ते सर्वच व सर्वांसच हितावह असतात असें नव्हे. चहा पिणें यासारखाही अपचन होण्यास उत्तेजक दुसरा पेय पदार्थ नाहीं. चहा सर्वांनां आवडत असेल पण मानवत मात्र नसावा. जेवतांनां अति पाणी प्याल्यानेंहि अपचन होतें. कारण जाठररसांत पाणी फार मिश्र झाल्यामुळें तो हीनवीर्य होतो, व अन्नपाचक अशी लाळेची उत्पत्ति कमी होते. यामुळें पोटांत अन्नास फार वेळ पचन होण्यासाठीं थांबावें लागतें. किडके दांत, व तोंडांत फोड, हिरड्यांतून रक्त, पू इत्यादि कारणांनीं मुखशुद्धींत बिघाड होणें हेंहि एक कारण आहे.

(२) इतक्या अन्नविषयक कारणांखेरीज रोग्यास होणाऱ्या इतर कारणांमुळें अपचन होतें. कांहीं अनिष्ट, अशुभ बातमी येऊन थडकलो कीं खाल्लेलें आपोआप पचविण्याची स्वाभाविक शक्ति स्तंभित होऊन उलट अन्न ओकून पडण्याचाहि संभव असतो. अशीच स्थिति मानसिक चिंता, भीति, गददग यामुळें उत्पन्न होते. शरीरयष्टीस येणाऱ्या कमकुवतपणाचा परिणाम जठर व अन्नपचन यांवर होत असतो. कसरतीनें उदर छाती पोट इत्यादींचे स्नायु कमविले नसल्यास उदरांतील गात्रें व इंद्रियें शिथिल पडतात व त्यांचा भार पोटास जाणवतो. व अपचन होण्याची खोड अशामुळें जडते. लहानपणीं झालेल्या आंत्ररोगामुळें झालेली आंतड्याची गुंतागुंत हृदयदौर्बल्य, व त्यामुळें अपुरे होणारे रक्ताभिसरण, परिभ्रष्ट मूत्रपिंड यांपैकीं कोणत्याहि कारणानें अपचनाची व्यथा सुरू होणें शक्य आहे, इतकेंच नव्हे, तर त्याबरोबर पोटशूल हेंही लक्षण असणें संभवनीय आहे. औषधोपचार व पथ्यपाणी सर्व संभाळूनही अपचन बरें होत नाहीं असा अनुभव आल्यास मूत्रपिंड बिघडले असावेत, अशा स्थितीचें तें लक्षण आहे. किंवा रोगी तरुण असून पंधरा वीस वर्षें उमरीचा असल्यास संधिवाताचें अगर कफक्षयाचें पूर्वचिन्ह आहे असें समजण्यास हरकत नाहीं. फार वर्षें अपचनानें अशक्त झालेला मनुष्य क्षयजंतूंच्या आकस्मित तडाख्यांत सांपडण्यास योग्य सावज असतो, हें जरी खरें आहे तथापि उलटपक्षीं हेंहि खरें आहे कीं मनुष्याला अगोदरच क्षय फुप्फुसांत झाला असतां वरें होण्यास अति चेंगट अशा प्रकारचें अपचन त्याबरोबर वहुधा असतें. यावरून हें ध्यानांत येईल कीं कोणत्याहि कारणानें मनुष्याच्या शरीरांत दौर्बल्यानें प्रवेश केला म्हणजे जठरादि पचनेंद्रियें विकृत न होतां देखील पचनक्रिया सुरळीत चालू शकत नाहीं व या अपचनाचा प्रकृतीवर स्पष्ट परिणाम घडतो.

या अपचनाचीं लक्षणें:—हीं निरनिराळ्या कारणामुळें भिन्न भिन्न रोग्यांमध्यें नानाप्रकारचीं असतात, व तीं सर्व येथें वर्णन करणें शक्य नसल्यामुळें त्यांतील प्रामुख्यानें सतत साधारणतः आढळणारीं लक्षणें येथें देतों:—जिभेस बुरशी असते, तोंडास दुर्गंधि असते, रुचि नसते, भूक लागत नाहीं, मळमळणें अगर ओकारी, उरांत दुखणें, पोटास तडस लागणें, वात धरून पोट फुगणें, आंबट ढेकरा येणें, घशाशीं जळजळणें, व पाणी घशाशीं येऊन तें तोंडावाटे पडणें, बद्धकोष्ठ अगर अतिसार, इत्यादि या रोगाचीं मुख लक्षणें आहेत.

हा आजार फाजील खाल्ल्यानें नवीनच उद्भवला असेल तर होणारीं लक्षणें अशीं:—प्रथम पोट दुखूं लागून मळमळूं लागतें; नंतर डांचणारें अन्न वांति होऊन पडून जातें. व रोग्याला बरें वाटून तो पूर्ववत् निरोगी होतो. आम्लपित्तामुळें वांति होण्याची संवय असणाऱ्या माणसांना वरील प्रकारचें अपचन केव्हां केव्हां होतें. पण जुनाट अपचनाचीं लक्षणें वेगळ्या प्रकारचीं असतात. जेवणांनंतर पोटांत कालवल्यासारखें होऊन पोटांत जड वाटूं लागून तें दुखत तर नाहीं, पण त्यास तडस लागते. कधीं कधीं पोटदुखीही पण असते. अशा प्रकारचीं लक्षणें दर जेवणानंतर होतात किंवा कांहीं विशिष्ट प्रकारचें अन्न खाल्यानेंच होतात. किंवा पथ्य करा अगर न करा कांहींही जड किंवा हलका पदार्थ खाल्यानेंहि हीं लक्षणें होतात. याचा परिणाम असा होतो कीं जठरांत अन्न फार वेळ राहिल्याने तें आंबतें व पोटांत वात धरून कपट, आणि आंबट दुर्गंधियुक्त अशा ढेंकरा येतात. कधीं कढत आंबट अगर साधें किंवा कडू पाणी व त्यांत कांहीं शितें असें घशाशीं जळजळत येतें. व त्यानें तोंडास चुळ

सुटतात. पुनः भोजन केल्यानें अमळ बरें वाटतें. पहिल्या सारखीं लक्षणें पुनः होऊं लागतात. खाण्याची वखवख सुटते किंवा क्षुधा मंद असते, किंवा भलत्याच पदार्थांवर वांछा जाते. पोटाची विकृति जिभेवरून लागलीच कळते. जठर व अन्नमार्ग दुर्बल झाला असतां जीभेस तवकीलासारखी पांढरी बुरशी येते. कडा व शेंडा लाल असून वरील खवले स्पष्ट दिसत असलेली जीभ पोटांत दाह आहे असें सुचविते. फिकट रंगाची व बिलबिलीत जीभ असल्यास पौष्टिक औषधाची गरज आहे असें ती सुचविते. जितकें अपचन जुनाट तितका बद्धकोष्ठ होण्याचा संभव अधिक असतो, व नवीन विकार असतां अतिसार होऊन जुलाब होतात. पुष्कळदां तर असें होतें कीं त्या अपचनाचे पीडेपेक्षां इतर लक्षणें शरीराच्या अन्य भागांत जीं होतात त्यांनींच रोग्यास अधिक पीडा होते. उदाहरणार्थः—उरांत दुखणें, दम लागणें, छाती धडधडणें, डोकेंदुखी, चक्कर व भोंवळ, दृष्टिमांद्य, हातपाय गार वाटणें व अतिग्लानि हीं लक्षणें या रोगांत फार करून असतातच. शिवाय मेंदूवर परिणाम होतात ते असेः—निद्रानाश, चिरडखोरपणा, औदासिन्य, उद्वेग रोग इत्यादि.

उपचारः—याविषयीं सामान्य सूचना थोडक्यांत येणें प्रमाणें:—अन्नामध्यें इष्ट फेरफार करणें हें पहिलें कर्तव्य होय. रोग्याचें वय, पाचनशक्ति, व त्याच्या काम धंद्याच्या मानानें होणारी शरीराची झीज याचें मनन करून अन्न कमी करावें किंवा नाहीं हें ठरवावें. जेवढें अन्न खरोखरी हवें त्यापेक्षां अन्न कमी खाण्याचे ऐवजीं अंमळ जास्तच खाण्याकडे माणसांची प्रवृत्ति खास असते यांत शंका नाहीं. आणि ज्यांना ही अपचनाची पीडा आहे त्यांनीं पूर्ण भूक शांत होण्याचे अगोदर उठावें हाच नियम चांगला आहे.

जेवणानंतर तें पचन होण्यासाठीं चारसहा तास तरी जाऊं देऊन मग पुनः खावें. पण वरचेवर खाणें जसें वाईट तसें वरचेवर व बराच वेळ उपास करणें हेंहि वाईट आहे. आपणाला जें अन्न मानवतें, व पचतें असें ठाऊक आहे तेंच अन्न खावें व ज्यानें अपचन होतें असें ठाऊक आहे तें मिष्टान्न असलें तरी वर्ज्य केलें पाहिजे. एकास जें पचतें तें दुसऱ्यास पचेल असा नियम नसतो. अशा माणसांनीं नैट्रोजनयुक्त पौष्टिक अन्न वर्ज करून पिष्टान्न अधिक सेवन करावें. व अपचन ज्या मानानें कमी होत जाईल त्या मानानें हा नियम पाळण्यांत ढिलाई केली तरी चालेल. जेवणाचे अगोदर एक अगर दोन भांडीं कढत पाणी अशा रोग्यांनीं प्यावें. जेवतांना पाणी बहुतेक पिऊंच नये. जेवणाचे अगोदर पाणी प्याल्यानें पहिली घाण धुऊन जाऊन जठर रस उत्पन्न होण्यास उत्तेजन मिळतें व मग अन्न पचन उत्तम होतें. अतिसावकाशपणें जेवून चर्वण उत्तम होऊं द्यावें. लाजूं नये. मानेचा मागील भाग, पोटाचा पुढील भाग व पोटऱ्या हीं गारठूं न देण्याची खबरदारी घ्यावी. कारण हीं गरम ठेवल्यानें अन्नपचन चांगलें होतें. पायमोजे घालावेत, व पोटास दोन तीन वेढे येतील असा गरम पट्टा बांधावा. फोडण्या, मसाले, चमचमीत केलेलें अन्न तळकट तेलकट पदार्थ न खातां साधें अन्न खात जावें. व तेंहि पचत नसल्यास कांहीं दिवस दुधावर रहावें. पण तें दुध तरी वेतानेंच पीत असावें. कोणी स्वयंस्फूर्तीनें अगर डाक्टरी सल्ल्यामुळें अन्नपचनासाठीं थोडें मद्य सेवन करितात. पण एकंदरींत त्यापासून तोटेच फार आहेत म्हणून त्यास कधीं स्पर्श करूं नये. जेवणाचे अगोदर व नंतर पुरेशी विश्रांति असावी. ज्या मार्गानें एकंदर प्रकृति सुधारेल अशी व्यवस्था ठेवावी. म्हणून उघड्या हवेंत व्यायाम करावा. सकाळीं निजून लवकर उठावें व थंड पाण्यानें प्रातःस्नान करावें. हा नियम फार उत्तम आहे.

औषधोपचारः—हा विषय वैद्यशास्त्राचा व वैयक्तिक असल्यामुळें वरील नानाविध कारणांनीं होणाऱ्या अपचनास लागू पडणारें असें विस्तृत वर्णन देणें येथें अशक्य आहे. परंतु कांहीं उपयुक्त औषधींचे गुणधर्म व उपयोग देतों ते असेः—बायकार्बनेट आफ सोडा हें औषध जेवणापूर्वीं कडवट पाचक औषधाशीं ( काडेकिराईत ) मिश्र करून दिल्यानें भूक लागते. व जेवणानंतर दोनतीन तासांनीं दिल्यास, त्यापासून करपट ढेंकरा, आम्लपित्त यांचा नाश होतो. विसमथयुक्त औषधें दाहयुक्त अजीर्णांत देण्यास चांगलीं. तीं द्रव्यरूपानें किंवा पुड्या अशा दोन्ही तऱ्हेनें देतां येतात. मज्जाशक्ति वाढवून अन्नपचन सुधारण्यास कुचला, किंवा त्याचें सत्त्व हीं औषधें उत्कृष्ट आहेत. जडान्न किंवा साधें जेवण पचविण्यास हायड्रोक्लोरिक आसिड व पेपसिन हीं औषधें आहेत. पण वांती हें लक्षण त्रासदायक झाल्यास इन्ग्लुव्हीन नांवाचें पाचक औषध उपयोगी पडतें, पिष्टान्न पचत नसल्यास डायास्टीज अगर माल्ट, किंवा पोपयीचें पिकलेलें फळ, अगर पॅपेन नामक त्याचें सत्त्व यांपैकीं एक अगर अधिक पदार्थ देणें चांगलें. पोटांत व आंतड्यांत अन्नरस आंवूं नये. यासाठीं सल्फोकारबालेट ऑफ सोडा हें औषध चांगलें आहे व अशीं दुसरींही थोडीं औषधें आहेत. पोटांत अन्नरस कुजल्यामुळें वारा धरूं नये यासाठीं जंतुघ्न अशीं बिसमथ सालीसिलेट, बेटानपथोल हीं औषधें चांगला गुण दाखवितात. हीं सर्व औषधें अगर दुसरीं कोणतींहि देशी अगर विलायती औषधें किती जरी उत्तम असलीं तरी तज्ज्ञ माणसास आपली प्रकृति दाखवून मग घेत जावीं.

या रोगाबद्दल आर्य वैद्यकीय विवेचन येणेंप्रमाणें:—अजीर्ण म्हणजे खाल्लेलें अन्न व पान हीं न जिरणें. अन्नादिक न जिरल्यानें जे रोग होतात त्यांचें वर्णन अष्टांग हृदय अ. ८ या प्रकरणांत केलें आहे.

अन्नाचें रसादि धातूंत योग्य रीतीनें रूपांतर न होतां विकृत अन्नरसानें जे रोग होतात ते अजीर्णाचे रोग असें मानतात.

सामान्यतः वातिक, पैत्तिक, व श्लेष्मिक असें तीन प्रकारचें अजीर्ण मानतात. या अजीर्णविकारापासूनच विषूचिका, आमदोष, अलसक, इत्यादि रोग उत्पन्न होतात. शौचाला न होणें किंवा जास्त होणें, ग्लानी येणें, अपान वायू न सुटणें, पोट फुगून जडपणा येणें, व भोंवळ, हीं अजीर्णाचीं सामान्य लक्षणें आहेत. शौचाला न होणें, वातिक अजीर्णांत पोट दुखणें, शौचाला साफ न होणें, पोट फुगणें व आंग गळणें हीं लक्षणें होतात.

पित्ताचे अजीर्णास विदग्धाजीर्ण म्हणतात. व तहान, मोह, भोंवळ, आंबट ढेकर, व दाह हीं लक्षणें असतात. ह्याच अजीर्णानें अल्पपित्त नांवाचा विकार होतो.

कफाचे अजीर्णांत डोळे व गाल यांस सूज येते व नुकतें जेवल्याप्रमाणेंच ढेंकर येतात. तोंडाला पाणी सुटतें, मळमळतें, व जडपणा येतो. याशिवाय रसाजीर्ण म्हणून चवथें एक अजीर्ण मानलें आहे, यांत अन्नरसाचें धातूंत रूपांतर पूर्ण रीतीनें झालेलें नसतें त्यामुळें ढेंकर शुद्ध आली तरी भोजनाविषयीं अप्रीति, हृदयांत थोडी पीडा, व जडपणा हीं लक्षणें होतात. हीं वर सांगितलेलीं चार प्रकारचीं अजीर्णें फार वाढलीं असतां बेशुद्धी, बडबड, ओकारी, तोंडाला पाणी सुटणें, आंग गळणें, भोंवळ, हे उपद्रव ( रोगानंतर झालेले रोग ) होऊन मरणसुद्धां येतें. अलसक, विषूचिका, व विलंबिका या रोगांस अन्नादिकांचें अजीर्णंच कारणीभूत होतें.

अतिशय जेवण करणाऱ्या दुर्बल माणसानें वारंवार फार खाल्लें असतां त्या अन्नाच्या अजीर्णानें वातादि दोष कुपित होऊन त्या अपक्व अन्नांतच मिसळून त्या अपक्व अन्नास बाहेर टाकूं लागल्यास विषूचिका ( या रोगाचीं व हल्लींच्या कॉलऱ्याचीं लक्षणें सारखीं आहेत ) व तें अपक्व अन्न आंत सांठल्यास अलसक असे रोग उत्पन्न होतात.

यांपैकीं विषूचिकेचें वर्णन खालीं लिहिल्याप्रमाणें. टोंचणें, फोडणें इत्यादि नाना प्रकारच्या वेदना. सुयांनीं टोंचल्याप्रमाणें ज्यांत होतात त्या रोगास विषूचिका असें म्हणतात. "सुचीभिरिव गात्राणिविध्यतीतिविषूचिका" ॥ या रोगांत ओकाऱ्या व जुलाब फार मोठ्या प्रमाणांत होतात व वायूचें आधिक्य असेल तर पोट दुखणें, भोंवळ, पोट फुगणें, कंप, हीं लक्षणें होतात. पित्ताधिक विषूचिकेंत ताप, अतिसार, अंतरिंद्रियांत दाह, तहान, डोळ्यांपुढें अंधेऱ्या येणें, हीं लक्षणें होतात. कफाधिक विषूचिकेंत ओकारी, आंग जड होणें, बोलतां न येणें, थुंकी फार सुटणें, इत्यादि कफाचीं लक्षणें होतात.

अग्नि मंद असणाऱ्या, व वेगांचें (मलमूत्रादि) धारण करणाऱ्या दुर्बल मनुष्यानें खाल्लेलें अन्न दोषांनीं दुष्ट होऊन तें शल्याप्रमाणें पोटांत एकाच जागीं सांठतें. त्या दुष्ट अन्नाच्या भोंवतीं कफ असतो. यामुळें त्याचा मार्ग अडतो, व आंतले आंत वायु घुसळतो. यामुळें पोटदुखी, पोट फुगणें, इत्यादि विषूचिकेंतील दोषलक्षणें ज्या दोषाचें आधिक्य असेल त्याप्रमाणें सुरू होतात. या विकारांत दुष्ट अन्न आळशी मनुष्याप्रमाणें एके जागींच असतें यामुळें या विकारास अलसक असें म्हणतात.

या अलसक विकारांतील आमदोष अतिशय दुष्ट होऊन शरीरांतील सर्व छिद्रांत शिरून राहतात. त्यामुळें दांडक्याप्रमाणें सर्व शरीर ताठतें, त्या विकारास दंडकालसक म्हणतात. या विकारानें लौकर मरण येतें. यावर औषध यशस्वी होत नाहीं.

विषूचिका व अलसक हे दोन्ही रोग त्रिदोषजन्य असून बरे होण्यास कठिण आहेत.

आपणास न पचेल इतकें पुष्कळ खाणें हें अजीर्ण विकारांस मुख्य कारण आहे; तथापि कांहीं वेळां थोडें खाल्लें ( असतांही अजीर्ण करतात. ते पदार्थ येणेंप्रमाणें.) आपणास न आवडणारें अन्न, वातकारक विशेषतः ज्यानें पोट फुगतें असें हरभरे, पावटे, इत्यादि अन्न, भाजकें अन्न, कच्चे पदार्थ, जड अन्न, मलिन, थंड व रूक्ष अन्न, तसेंच कोरडें किंवा विदाही,(घशाशीं जळजळणारें)अन्न व फार पातळ अन्न हीं थोडीं खाल्लीं तरी पचत नाहींत.

अतिशय भूक लागल्यामुळें किंवा शोक व क्रोध यांनीं चित्त संतप्त झालें असतां थोडें खाल्लेलें अन्नही पचत नाहीं.

पथ्यकारक अन्न व अपथ्यकारक अन्न हीं दोन्ही एकाच वेळीं खाल्लीं असतां त्यास " समशन " म्हणतात. जेवल्याबरोबर थोड्याच वेळांत पुन्हां जेवणें यास " अध्यशन " म्हणतात.

अवेळीं ( अर्थात् जेवणाची वेळ नसतां ) थोडें किंवा पुष्कळ जेवणें यास विषमाशन म्हणतात. हीं तिन्ही प्रकारचीं जेवणें घोर असे अजीर्ण विकार उत्पन्न करून मृत्यु आणतात.

अजीर्ण विकारानें ज्याचे दांत, ओंठ, नखें, हीं काळीं झालीं आहेत, ज्याचे डोळे खोल गेले आहेत, जो ओकारीनें पीडला आहे, ज्याची शुद्धि नष्ट झालेली आहे, ज्याचा आवाज बसला आहे व ज्याचे सर्व सांधे ढिले पडले आहेत तो असाध्य होतो.

ढेंकर शुद्ध येणें, उत्साह असणें, आंग हलकें वाटणें, लघ्वी, शौच इत्यादिकांचे वेग चांगले येणें,( शौचाला, लघ्वीला, साफ होणें ) भूक व तहान चांगलीं लागणें, हीं लक्षणें आहार जिरल्याचीं आहेत.

अजीर्ण हा रोग स्वतंत्र व परतंत्र असा दोन्ही प्रकारचा असल्यामुळें प्रथम त्याची नीट परीक्षा करून औषधोपचार करावे. परतंत्र म्हणजे दुसऱ्या रोगामुळें उत्पन्न झालेला असल्यास त्याची अधिक चौकशी करावी. व स्वतंत्र असल्यास प्रथम लंघन करावें. एवढयानें काम न भागल्यास पाचक औषधें घ्यावीत व दोष जास्त असल्यास पाचक औषधांचाही उपयोग होत नाहीं. तसें झाल्यास ओकारीचीं व रेचनाचीं औषधें ( म्हणजे शोधन औषधें ) घ्यावीं.

अजीर्णाचाच अलसक या नांवाचा विकार झाला असल्यास तावडतोब ओकारीचें औषध द्यावें. शेकावें. मळ आणी वायु

यांचें अनुलोमन करणाऱ्या वाती गुदद्वारांत घालाव्या. हात पाय वळूं लागल्यास शेकून ऊबदार फडक्यांनीं घट्ट बांधावेत.

विषूचिका झाली असतां खोटा डागाव्या, उपास करावा, व रेचक दिलेल्या माणसाला ज्याप्रमाणें क्रमानें अन्नावर येऊं द्यावें लागतें त्याप्रमाणें प्रथम मंड वगैरे देऊन अग्नी प्रदीप्त झाल्यावर नेहेमींचें अन्न खाऊं लागू द्यावें व अजीर्णाच्या पहिल्या अवस्थेंत कोणतेंही पाचक औषध देऊं नये कारण त्या औषधानें पचन न होतां अजीर्ण वाढतें.

**अग्निमापक**—अत्युष्णमान मोजण्याचें यंत्र. याला इंग्रजींत पायरॉमिटर म्हणतात. हा शब्द प्रथम मशेनब्रोक यानें धातुशलाकेच्या प्रसरणानें उष्णमान मोजण्याच्या यंत्रासाठीं उपयोजिला होता. एखाद्या धातूच्या अथवा क्षाराच्या वितळण्यावर अवलंबून असणाऱ्या खंडित उष्णदर्शकाचाहि या कामाकडे उपयोग करण्यांत येतो. प्रिन्सेप यानें रुपें व सोनें आणि सोनें व प्लातिन यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या अशा मिश्रधातू बनविल्या कीं त्यांचे वितळण्याचे बिंदू ९५४° पासून १७७५° उष्णमानापर्यंत २५ पासून २० अंशांच्या अंतरानें पडतील. ज्या भट्टीचें उष्णमान पहावयाचें असेल त्या भट्टींत या मिश्रधातूंचे गोळे क्रमाक्रमानें टाकून त्यांपैकीं कोणता गोळा वितळतो हें पाहिलें असतां त्या भट्टीच्या उष्णमानाची स्थूल कल्पना सहज करतां येते. कार्नेली व विल्यम्स हे या कामासाठीं ज्यांचे वितळण्याचे बिंदू ठाऊक आहेत अशा विशिष्ट क्षारांचा उपयोग करीत होते. चिनी भांड्यांच्या कारखान्यांत ज्यांचा उपयोग करतात ते 'सेजरचे शंकू' हे चिकणमातीचे केलेले लहान लहान शंकू असून त्यांच्या वितळण्यानें भट्टीचें उष्णमान कळतें.

**अग्निमित्रः**—शुंग राजांतील दुसरा, पुष्पमित्राचा पुत्र, व सुज्येष्ठ राजाचा बाप, ह्या पुष्पमित्राचा काळ इ. स. पू. १५० पूर्वीचा—पतंजलीचा काळ—धरतात; पतंजलि पुष्पमित्राचा नांवानें उल्लेख करितो.

**अग्निवेश्यः**—( १ ) एक ब्रह्मर्षि

( २ ) सूर्यवंशी नरिष्यंत कुलोत्पन्न देवदत्त राजाचा पुत्र याची जातुकर्ण्य आणि कानीन अशीं नामांतरें होत.

हा तपानें ब्राह्मण झाला होता. याच्या संततीस अग्निवेश्यायन असें नांव पडलें होतें.

( ३ ) अगस्त्य ऋषीचा एक शिष्य. याजपासून द्रोणाचार्यानें धनुर्वेदाची शिक्षा व ब्रह्मशिर नांवाचें अस्त्र संपादन केलें होतें. हा पांडवांसमागमें कांहीं काळ द्वैतवनांत होता.

( ४ ) या नांवाचे अनेक राजे भारतीयुद्धांत पांडवांकडे होते.

**अग्निशिर** (१) काम्यक वनाच्या उत्तरेकडे असणारें तीर्थ. येथें सृंजयपुत्र संजय नांवाच्या राजानें शम्याक्षेप नांवाचा यज्ञ केला होता. तसेंच भरत राजानेंहि १४८. यज्ञ केले होते; अशी कथा आहे ( भारत वनपर्व अ० ९०. )

**अग्निष्टोम** (१)चक्षुर्मनुस नड्वले पासून झालेल्या ३११ पुत्रांतील सातवा यास ग्रंथांतरीं अग्निष्टुत् असेंहि म्हटलें आहे. ( मनु शब्द पहा )

( २ ) एक यज्ञविशेष सविस्तर वर्णन "वेदविद्या" पुस्तकांत दिलें आहे.

**अग्रदानी**—ह्या जातीची लोकसंख्या आसाममध्यें सुमारें दोनशें आहे. ब्राम्हणांच्या पोटजातीपैकीं ही एक हलकी पोटजात असून हिचे लोक प्रेतदहनाचे वेळीं मंत्र सांगतात, व श्राद्धाची दक्षणा व दानें घेतात. ( सेन्सस १९११ भाग ३. ) अग्रदानी याचा अर्थ ( अग्रे दानं अस्य । ) प्रेताचें दान घेणारा ब्राम्हण असा आहे ( प्रेतोद्देशेन यद्दानं दीयते तत्प्रतिग्राही । ). याची व्याख्या खालीं दिल्याप्रमाणें आहेः—

लोभो विप्रश्च शूद्राणामग्रेदानं गृहीतवान् ।
ग्रहणे मृतदानानां अग्रदानी बभूव सः ॥

**अग्रहारी**—जबलपूर जिल्हा व राजगड संस्थान येथें राहणारी बनिया लोकांची एक उपजाती. यांचा आग्र्याशीं संबंध आहे

संयुक्त प्रातांत ही जात मुख्यत्त्वेंकरून आढळते. १९११ सालीं एकंदर ७९२७९ अग्रहारी होते. पैकीं ७७२८३ संयुक्त प्रांतांतले आढळले. या लोकांत ७९१७४ सनातनी हिंदु, १०० शीख, ५ जैन, मिळून ७९२७९ होते.

**अग्रिजेन्टम्**—सिसीलीच्या दक्षिण किनाऱ्यावरील शहर समुद्र किनाऱ्यापासून २॥ मैलावर आहे. इ. पूर्वी ५८२ सालीं गॅलच्या वसाहतवाल्यांनीं हें शहर वसविलें. पिल्हारीस (इ. स. पू. ५७०–५५४ ) आणि थेरॉन ( ४८८–६३ ) या दोन एकतंत्री राजानंतर ग्रॅसिडेअसला हद्दपार केल्यावर येथें प्रातिनिधिक राज्य स्थापण्यांत आलें. इ. सनापूर्वी ४०५ सालीं कार्थेजीनिअन लोकांनीं हें शहर लुटलें. ३३८ सालीं टॅपोलिअननें येथें वसाहती केल्या. फिंटिआस या एकतंत्री राजाच्या कारकीर्दींत या शहरास थोडी पूर्वसत्ता मिळाली. २६१ आणि २१० सालीं रोमन लोकांनीं आणि २५० सालीं कार्थेजीनिअन लोकांनीं हें शहर लुटलें. येथून धान्य कापड आणि गंधक परदेशांस जातें. या शहराच्या पूर्वेस ॲथेना खडकावर झ्युस ॲटेबिअस आणि ॲथेना ह्यांचीं मंदीरें होतीं. शहराच्या उत्तरेकडील उंच कड्याच्या एका शिखरावर हा खडक आहे आणि दुसऱ्यावर प्राचीन शहर आहे. या दोन शिखरांमध्यें एक मोठी दरी आहे. या शहराच्या पूर्वेस असलेल्या ॲक्रॅगस नांवाच्या दरीवरून या शहरचें नांव पडलें. या शहरचे प्राचीन अवशेष भाग म्हटले म्हणजे डॉरीक पद्धतीनें बांधलेलीं मंदिरें होत. हिरेक्लीसचें मंदिर फार जुनें आहे. पोप दुसरा ग्रेगरी ह्यानें ५९७ सालीं येथील मंदिराचे ठिकाणीं मुख्य प्रार्थनामंदिर बांधलें. झ्युसच्या मंदिरांत ॲटलासच्या आकृती आहेत.हें आणि हिरेक्लीसचें मंदिर धरणीकंपानें मोडलीं गेलीं. याशिवाय पुष्कळ अवशेष भाग आहेत परंतु त्यांत महत्त्वाचें असें कांहींच नाहीं.

या शहरच्या भिंतीला हिप्याक्लसच्या मंदिराजवळ असलेल्या पोर्टोऑरिआ दरवाज्यांतून एक सडक गेली आहे. या शहराच्या पश्चिमेस ग्रीक लोकांचीं थडगीं आहेत. दक्षिण भिंतीच्या बाहेर रोमनलोकांची स्मशानभूमी आहे. प्यालाटिझ्झो येथें एक लहान खेडें शोधून काढलें आहे.

**अग्रोर**—हझारा जिल्ह्यांत मानशेर तहशिलींत असलेलें वायव्य सरहद्दीवरील एक खोरें. उत्तर अक्षांश ३४.२९ ते ३४.३६ व पूर्व रेखांश ७२.५८ ते ७५.९. लांबी १० मैल, रुंदी ६ मैल. खालच्या अंगाच्या भागांत खेडीं, झोंपड्या व राया जिकडे तिकडे दिसून येतात व येथें पीक उत्तम येतें. व सभोंवर पाइन झाडांनीं ( पांगारा ) आच्छादित पर्वत उंच आकाशांत गेलेले आहेत. हा प्रदेश सारखा सपाट नसून एकावर एक जिन्याच्या पायऱ्यांप्रमाणें चढत गेला आहे. येथें पाणी मुबलक असल्यामुळें पीक क्वचितच बुडतें. येथें स्वाति व गुजर लोकांची वस्ती विशेष आहे. लोकसंख्या सुमारें सतरा हजार. येथील बहुतेक लोक इस्लामी धर्माचे आहेत. राजतरंगिणीमध्यें या प्रदेशाचा उल्लेख अत्युग्रपुर या नांवानें आलेला आहे. तैमुरलंगच्या काळापासून अठराव्या शतकाच्या आरंभापर्यंत हा प्रांत कर्लुख तुर्कांच्या घराण्याकडे होता. इ. स. १७०३ मध्यें जलाल बाबा सय्यद नांवाच्या माणसानें त्यांस हुसकावून देऊन तो प्रांत स्वाति लोकांत वांटून दिला. इ. स. १८३४ मध्यें अम्ब येथील नवाबानें हें खोरें घेतलें परंतु इ. स. १८४१ मध्यें शीख लोकांनीं तो प्रांत पुन्हा सादुद्दिनचा वंशज अटा महमद यास दिला. शीख मुलूख खालसा करतांना अटा महमदाला अग्रोरचा ( चीफ ) संस्थानिक करून सरहद्दीच्या या भागाचा बंदोबस्त त्याकडे सोंपविण्यांत आला. परंतु ही व्यवस्था सुरळीत चालली नाहीं म्हणून इ. स. १८५२ मध्यें एक सैन्य धाडावें लागलें व १८६८ मध्यें एक पोलीस ठाणें या खोऱ्यांत ठेवण्यांत आलें. खानाला या गोष्टीनें राग आला व त्यानें डोंगराळ मुलुखांतील जमातींना चिथवून तें ठाणें जाळून टाकलें. तेव्हां सैन्य धाडून त्याला पदच्युत करून लाहोर येथें आणून ठेविलें. परंतु इ. स. १८७० मध्यें त्यास पुनः ( चीफ ) संस्थानिक नेमिलें. त्याचे मागून त्याचा मुलगा अल्ली गद्दोर हा संस्थानिक झाला. परंतु त्यानें ब्रिटिश मुलखांत स्वाऱ्या करण्यास मदत केल्यामुळें त्याला दूर करण्यांत आलें. व इ. स. १८९१ च्या अग्रोर व्हॅली रेग्युलेशन प्रमाणें त्याचें संस्थान सरकारजमा करण्यांत आलें.

इ. स. १९०१ मध्यें जमिनीची पहाणी होऊन सध्यां उत्पन्न १३३०० रु. आहे.

येथें फक्त कापसाचें कापड तयार होतें. या खोऱ्यांतील मुख्य गांव ओघी खेडें आहे. तेथें हझारा सरहद्दीवरील सैन्याचें एक पोलीस ठाणें आहे.

**अग्रोहा**—हिसार जिल्हा ( पंजाब ) मधील फत्तेबाद तहशिलींतील एक पुरातन शहर. उत्तर अक्षांश २९.२० व पूर्व रेखांश ७५.३८. हें हिसारच्या वायव्येला १३ मैलांवर आहे. हें अगरवाला बनिया जातीच्या लोकांचें मूळचें स्थान असें म्हणतात. व तें बरेंच महत्त्वाचें ठिकाण होतें. किल्ल्याचे अवशेष व इमारतींचे चौथरे पूर्वीच्या महत्त्वाची साक्ष पटवतात. इ. स. ११९४ मध्यें महमद घोरीनें तें शहर जिंकून घेतलें तेव्हां बनिया लोक सर्व दक्षिण भागांत पसरले.

सध्यां या गांवाला बिलकूल महत्त्व नाहीं व इ. स. १९०१ मध्यें येथील लोकसंख्या फक्त ११७२ होती.

**अघमर्षण**—(१) एक ऋषि. मधुच्छंदाचा पुत्र व त्याचें कुळ.

(२) आणखी एक ऋषि.

(३) विंध्य पर्वताजवळील एक तीर्थ. येथें प्राचेतस दक्षानें दीर्घ कालपर्यंत तप केलें.

(४) अघमर्षण म्हणजे पापक्षालन. संध्येंत अघमर्षणविधि असतो; त्यावेळीं ऋग्वेद १० वें मंडळ १९० सूक्त म्हणतात तें असेः—

ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्यजायत ।
ततो रात्र्य जायत ततः समुद्रो अर्णवः ॥१॥
समुद्रादर्णवादधिसंवत्सरो अजायत ।
अहोरात्राणि विदधद्विश्वस्य मिषतो वशी ॥२॥
सूर्याचन्द्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत्
दिवंच पृथिवीं चान्तरिक्षमथोस्वः ॥ ३ ॥

या अघमर्षण सूक्ताला पदपाठ नाहीं हें विशेष आहे. हें सूक्त उच्चारून पाणी हुंगून जमिनीवर टाकण्यांत येतें. त्याचा अर्थ शरीरांतील पापपुरुष हातांतील पाण्यामध्यें श्वासरूपानें टाकून तें पाणी आपल्या डाव्या बाजूस जमिनीवर आपटलें असतां त्या पापपुरुषाचा नाश होतो. यथाश्वमेधः क्रतुराट् सर्वपापापनोदनः । तथाघमर्षणं सूक्तं सर्वपापप्रणाशनं ॥ असा या सूक्ताचा प्रभाव आहे. स्नानाच्या वेळींहि हें सूक्त म्हणतात. गुरुपत्नी, जननी, भगिनी, स्नुषा यांच्याशीं गमन यासारखीं भयंकर पातकेंहि त्रिवार पाण्यांत उभें राहून सूक्त म्हटलें असतां नाहींशीं होतात अशीहि फलप्राप्ति या विधीच्या स्तोत्यांकडून सांगण्यांत आली आहे.

**अघारिया**—आग्र्याहून आलेले. एकंदर हिंदुस्थानांत १९११ सालीं ५५४११ अघारिया होते. पैकीं जवळ जवळ निम्मे वऱ्हाड, मध्यप्रांत व निमे बिहार ओरिसा प्रांतांत होते. हे संबलपूर जिल्ह्यांत राहतात. संख्या २७०००. रायगड, सारंगगड, बिलासपूर जिल्हा छोटानागपूर येथेंहि सांपडतात. यांची परंपरागत माहिती अशी आहे कीं हे आग्र्याजवळ राहणाऱ्या रजपुतांचे वंशज आहेत आणि दिल्लीच्या राजाला डोकें न लववतां एका हातानेंच सलाम करण्याचा त्यांचा हक्क होता. दिल्लीच्या बादशहानें यांना

कापून काढण्याची युक्ति केली. त्यांत एक खेरीज करून सर्वांचा नाश झाला. त्यालाहि बोलावणें गेलें, तेव्हां त्यानें आपल्या ऐवजीं एका चांभारास पाठविलें, व स्वतः छत्तीस गडाकडे पळाला. हे पितृतर्पण करतांना प्रथम या चांभारास पाणी देतात. गजपति उडिया राजानें तीन भाऊ सैन्यांत नोकरी मागण्याकरितां आले तेव्हां दोन तरवारींचीं म्यानें समोर आणविलीं आणि ज्याकडून जें निवडलें जाईल त्यावरून त्याचा धंदा ठरेल असें सांगितलें. त्याप्रमाणें सोन्याच्या मुठीची तरवार एका भावानें उचलली पण त्यांतून बैलास हांकण्याचा चाबूक निघाला म्हणून हे शेतकरी झाले अशी कथा आहे. यांपैकीं एकाला जानवें देऊन बाकीच्यांचीं जानवीं तोडलीं. हे स्वतःला सोमवंशी रजपूत समजतात, व त्यांचा आकार, चेहरा पूर्णपणें आर्यन् मानव वंशाच्या मानलेल्या चेहऱ्याप्रमाणें आहे अशी कांहीं लेखकांची समजूत आहे. (Russell and Hiralal-Tribes and Castes of C. P.)

यांत दोन जाती आहेत. बडे, व छोटे छोटे हे अघारिया पुरुष आणि अहीर बायका यांपासून झाले आहेत. यांचीं ८४ गोत्रें आहेत. यांतील ६० गोत्रांस पटेल, १८ गोत्रांस नाईक आणि ६ गोत्रांस चौधरी अशा पदव्या आहेत. यांच्या गोत्रांमध्यें ब्राह्मण गोत्रें व रजपूतकुलनामें व कांहीं प्राण्यांचीं नावें व कांहीं अज्ञातार्थ शब्द यांचें मिश्रण आहे. जातींतील लग्नाला योग्य वधुवरांचीं लग्नें ५।६ वर्षांत एकदां एकाच मुहूर्तावर उरकून घेण्यांत येतात.

जा ति दै व त—यांचा "दूल्हा" नांवाचा देव आहे. हा गोंडांचाहि आहे. उडिया ब्राह्मणांच्या हातचें पाणी हे लोक पीत नाहींत. शेतकींत हे लोक प्रवीण आहेत. पुष्कळ लोक मालगुजार आहेत. यांच्यांत पुरुषांपेक्षां बायकांची संख्या जास्त आहे. यांच्या बायका शेतांत काम करीत नाहींत. घराच्या बाहेरचें कामहि करीत नाहींत.

**अघासुर**—कंसानें कृष्णास मारण्यासाठीं पाठविलेला राक्षस. हा बक व पूतना यांचा भाऊ व कंसाचा सेनानायक होता. यानें सर्पदेह धारण केला व तो चार योजनांइतका मोठा असून त्याच्या मुखांत गाई व गोप दरी समजून प्रवेशले. कृष्णानें त्यांत प्रवेश करून स्वतः मोठा देह धारण केला व या रीतीनें त्यास फाडून मारलें. (भागवत द. स्कं अ. १२)

**अघोरी**—अघोरी, अघोरपंथी, औगर, औघर हीं नांवें हिंदुस्थानांतील एका साधूंच्या पंथाला लावतात. या पंथांतील लोक नरमांसभक्षक व इतर अघोर कृत्यें करणारे असल्यानें फार प्राचीन काळापासून यांचें नांव ऐकूं येतें.

ना मा र्थ—'अघोर' (न घोर) या शिवनामापासून या पंथसंज्ञेची उत्पत्ति असल्यानें, त्याचा शैवसंप्रदायाशीं असलेला संबंध व्यक्त होतो. अघोरीश्वर या नांवानें शिवाची उपासना म्हैसूरमध्यें इक्केरीच्या देवळांत व इतर अनेक ठिकाणीं दृष्टीस पडते. या पंथाच्या अनुयायाला अघोरपंथी म्हणतात.

प्र सा र—सध्यां या पंथाचा प्रसार होणें बरेंच कठिण झालें आहे. १९०१ च्या खानेसुमारीवरून पाहातां या लोकांची संख्या ५५८० होती व त्यापैकीं बरेचसे (५१८५) बिहार-मध्यें व बाकीचे अजमीर, मारवाड व वऱ्हाड मध्यें आढळून आले, २ अंदमानबेटांत गुन्हेगार म्हणून होते. १८९१ साल-च्या आंकड्यांपेक्षां वरील आंकडे बरेच निराळे आहेत; कारण त्यावेळीं संयुक्त प्रांतांत ६३० अघोरी व ४३१७ औगर, बंगा-लमध्यें ३८०७ अघोरी आणि पंजाबमध्यें ४३६ औगर नमूद केले होते. या तफावतीचीं कारणें अशीं कीं, इतर सर्व साधूं-च्या वहिवाटीप्रमाणें हे लोक यात्रेकरितां व पर्वस्नानासाठीं एक-सारखे इकडे तिकडे फिरत असतात; व दुसरें असें कीं, या पंथाच्या नाचक्कीमुळें खानेसुमारीच्या वेळीं यांतील बरेच जण आपला खरा पंथ लपवून ठेऊन, इतर कोणत्यातरी संभावित सदरांत आपलीं नावें नोंदवितात. जेथें यांचे मठ असत अशीं प्राचीन काळचीं प्रमुख ठिकाणें म्हणजे, अबूचा पाहाड, गिरनार, बुद्ध-गया, काशी व हिंगलाज होत. (पश्चिमेकडे हिंगलाजपर्यंत भारतीय अनेकेश्वरी वाद पोंचला होता.) पण सध्यां अबूच्या पाहाडावर किंवा दुसऱ्या कोणत्याहि क्षेत्रीं यांचे मठ किंवा कांहीं पसारा आढळत नाहीं.

पं था चा इ ति हा स—ओघाप्रमाणें वर्तणाऱ्या वैरा-ग्यांचा प्रथम जो उल्लेख आढळतो, तो ह्युएन त्संगच्या प्रवास-वर्णनांतील होय. अंगाला राख फांसून, कवट्यांच्या माळा धारण करणारे (कापालधारी), नागवे (निर्ग्रंथ) साधू त्यानें हिंदुस्थानांत पाहिले. यापुढील काळांतील कापालिकांचें विशेष वर्णन उपलब्ध आहे. शंकरविजयांत या कापालिकांबद्दल आनंदगिरीनें असें म्हटलें आहे कीं, "चितेच्या राखेनें त्यांचें अंग माखलेलें असून, त्यांच्या गळ्यांत नररुंड माळा असते; त्यांच्या कपाळावर एक काळी रेघ ओढलेली असते व केंसांच्या जटा केल्या असतात. कुंगणाला एक व्याघ्रचर्म गुंडाळलेलें असून डाव्या हातांत माणसाच्या डोक्याची कवटी व उजव्या हातांत एक घंटा घेतलेली व तोंडानें "शंभो भैरव कालीनाथ!" असें ओरडत तो ती एकसारखी वाजवीत जातो. मालतीमाधवांत भवभूतीनें अघोरघंट हा चामुंडादेवीला मालती बळी देत असतां तिला माधवानें सोडविल्याचें फार सुंदर कथानक दिलें आहे. प्रबोध चंद्रोदयांत कापालिक व्रताचें उत्तम वर्णन दिलें आहे. दबिस्तानांत—याचा कर्ता १६७० च्या सुमारास वारला—एका योग्यांच्या पंथाची माहिती दिली आहे. अन्नाच्या बाबतींत यांनां निषिद्ध असें कांहींच नाहीं. ते माणसांना सुद्धां मारून खातात. यांतील कांहींजण आपली विष्ठा अन्नांत मिस-ळून व फडक्यांत गाळून पितात, व असें सांगतात कीं या योगानें मनुष्य मोठमोठ्या गोष्टी करूं शकतो. या प्रकाराला ते 'अतिलिया' किंवा 'अखोरी' म्हणतात. गोरखनाथापासून

यांची उत्पत्ति आहे असें या ग्रंथांत म्हटलें आहे. दबिस्ताना-च्या कर्त्यानें असा एक माणूस पाहिला, तो आपलें नेहमीचें गाणें म्हणत एका प्रेतावर आरूढ झाला होता. त्या प्रेताला पाणी सुटेपर्यंत तसेंच ठेवून नंतर त्यानें त्यांतील मांस खाल्लें. हें कृत्य अतिशय पुण्यदायक असें ते समजतात. गोरखनाथ हा मध्ययुगांतील एक मोठा साधु होता; त्याच्यासंबंधी अनेक अद्भुत कथा सांगतात व कांहीं योगी त्याला आपला पूर्वज मानतात.

पंथाची सद्यःस्थिति—हल्लीं अघोऱ्यांच्या दुष्ट चालीं-संबंधीं अनेक गोष्टी सांगतात. लंडन येथें १६८७ सालीं थेवेनो ( M. Thevenot ) याचा प्रवासवर्णन ग्रंथ प्रसिद्ध झाला. त्यांत मुंबई इलाख्यांत भडोच जिल्ह्यांत "डेबका" ( Debca ) येथें एक अघोऱ्यांची वसाहत आहे असें वर्णन केलेलें आढळतें. वार्डनेंहि आपल्या ग्रंथांत ( Ward View of the Hindoos [1815] ii 373) अघोरी पंथानुयायांचें ( "Ughorit-Punthee" ) वर्णन दिलें आहे. अबूच्या पाहाडावरील एका अघोरी वसा-हतीविषयीं टॉडनें लिहिलें आहे ( Tod: Travels in W. India [1839] p. 83 ff ) फत्तेपुरी नांवाचा एक अतिविख्यात अघोरपंथी बरींच वर्षें एका गुहेंत राहात होता. त्याच्याच सांगण्यावरून शेवटीं तेथें त्याला चिणण्यांत आलें. तेथील एका संभावित गृहस्थानें टॉडला अशी गोष्ट सांगि-तली कीं "नुकतेंच कांहीं दिवसांपूर्वीं मी आपल्या भावाचें शव स्मशानांत नेत असतां एका अघोऱ्यानें याची उत्तम चटणी होईल असें सांगून मजजवळ तें मागितलें." कालिका मातेला नैवेद्य म्हणून नरमांसभक्षक अघोरी बळी देण्याकरितां माणसांना धरितात. बुकॅनन ( Martin Buchanan, E. India, ii 492 f. ) साहेब आपल्या ग्रंथांत एका अघोऱ्याविषयीं पुढील गोष्ट लिहितो. १९ व्या शतकाच्या प्रारंभीं संयुक्त प्रांतांत गोरखपुर येथें एक अघोरी आला. येथील राजाच्या घरांत शिरून त्यानें त्याच्या अंगावर घाण टाकली तेव्हां राजानें अह्मुती ( Ahmuty ) नांवाच्या तेथील जिल्हा-न्यायाधिशाकडे तक्रार नेली. अह्मुतीनें त्या अघो-ऱ्याला हांकलून देण्याविषयीं हुकूम सोडला. पण पुढें लवक-रच जेव्हां अह्मुती स्वतः आजारी पडला व त्या भागांतील राजाचा वारस स्वर्गवासी झाला तेव्हां त्या भागांतील लोक असें समजूं व सांगूं लागले कीं, साधूच्या अपमानाचें हें प्रायश्चित्त मिळालें. [ The Revelations of an Orderly ( Benares 1849 ) ] या पुस्तकांत अघोऱ्यांचे अंगावर शहारे आणणारें वर्तन फार चांगलें वर्णिलें आहे व ग्रंथकर्त्यानें त्यांत शेवटीं या गोष्टी अजीबात बंद करण्याविषयीं सरकारला विनंति केली आहे. हें पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर साधूंची नागवे हिंडण्याची वहिवाट पोलिस कायद्यानें बंद पाडली व त्यानंतर विशेष ठराव पास करवून ( ब्रिटिश हद्दींत ) नरमांसभक्षण शिक्षार्ह ठरविण्यांत आलें. तथापि अगदीं अलीकडे म्हणजे १८८७ मध्यें उज्जनीक्षेत्रांत एका यात्रेच्या वेळीं एक टोळी येऊन, तिनें तेथील अधिकाऱ्यां-जवळ कांहीं बकरीं मागितलीं. तीं देण्याचें नाकारल्यावर, त्या टोळींतील लोक स्मशान-घाटावर गेले व तेथील एक प्रेत उचलून त्यांनीं तें खाण्यास सुरवात केली. तेव्हां पाहाणारांच्या उरांत धडकी भरून त्यांनीं पोलिसांना बोलाविलें; पण त्या नंग्या गोसाव्यांनीं त्यांनीं मागितलेलीं बकरीं मिळेपर्यंत आपलें खाणें बंद ठेविलें नाहीं.

एका अघोऱ्याचें चरित्र—ब्रूक ब्रॅकमन नांवाच्या इंडियन मेडिकल ऑफिसरनें मिळविलेली एका अघोऱ्याची जन्मकथा एच. बालफरनें [ JAI [1897] xxvi 340 ff ] दिली आहे. हा मनुष्य जातीनें लोहार असून पंजाबांतील पतियाळा संस्थानांत राहात असे. तो प्रथम भीक मागत असे, पण पुढें एका अघोऱ्यानें त्याला आपला शिष्य केला. तो बदरीनारायण करून नंतर नेपाळांत गेला; तेथून जगन्नाथाला जाऊन शेवटीं मथुरा व भरतपुर येथें आला. भरतपूरला त्याची चौकशी झाली. त्यानें अशी जबानी दिली कीं, "मी सध्यां कोण-त्याहि जातीकडून अन्नग्रहण करितों, व जातीचा विधिनिषेध मी मानीत नाहीं. मी कोणाच्याहि हातचें खातों. मी स्वतः नर-मांस खात नाहीं पण माझ्या पंथांतील कांहीं जणांना तें खाऊन पुन्हां सजीव करण्याची ताकद आहे. कांहींजवळ मंत्रसामर्थ्य असतें व तें मनुष्याचें मांस खातात; पण माझ्यांत हें सामर्थ्य नसल्यानें मला तशी ताकद नाहीं. मी फक्त मनुष्याच्या डोक्याच्या करवटींतून अन्न खातों व पाणी वगैरे पितों. याशि-वाय मी घोड्याव्यतिरिक्त सर्व मृत जनावरांचें मांस भक्षण करितों. घोडा निषिद्ध मानला आहे म्हणून खात नाहीं. माझे सर्व जातबांधवहि माझ्याप्रमाणेंच घोड्याच्या मांसाशिवाय सर्व मांस खातात."

एक घोड्याचेंच मांस निषिद्ध कां मानिलें आहे. हा वादग्र-स्त विषय आहे. कोणी म्हणतात घोडा ( घोरा ) हें नांव या पंथाच्या नांवासारखें असल्यानें अघोरी तें निषिद्ध मानीत असावेत. पण हें म्हणणें बरोबर दिसत नाहीं. उलट हिंदुस्था-नांत गाईपूर्वींहि घोड्याला पवित्र मानूं लागले होते. अश्वमेधांत घोड्याला विराज् म्हटलें आहे; व अजूनहि घोड्याला पवित्र समजतात.

अघोरी पंथाचा इतर हिंदु पंथांशीं संबंध—आपल्या पंथांतील व्यवस्थेच्या बाबतींत अघोरी इतके मुग्ध असतात कीं, इतर पंथांशीं त्यांचे असणारे संबंध अद्याप पूर्ण-पणें ज्ञात झाले नाहींत. अर्वाचीन काळचा पंथ किंवा निदान काशीला ज्याचें मुख्य ठिकाण आहे त्याची शाखा, आपली उत्पत्ति एका किनराम नांवाच्या साधूपासून झाली असें सम-जते. किनरामाचा गुरु कालुराम गिरनार येथें १८ व्या शत-काच्या अखेरीस होऊन गेला [ Crooke, Tribes and

Castes 126 ]; म्हणून या लोकांना कधींकधीं किन्नरामी या नांवानें संबोधण्यांत येतें. अघोऱ्यांच्या धार्मिक समजुती जवळ जवळ परमहंसांप्रमाणेंच असतात. परमहंस हे ब्रह्मस्थितींत निमग्न असून त्यांना सुखदुःख समान वाटतें; ते जगापासून इतके अलिप्त असतात कीं, स्वतःच्या खाण्यापिण्याचीहि त्यांना शुद्ध नसते.

जीवितसाधनांविषयीं बेपर्वाईनें वागणारा दुसरा पंथ म्हणजे सरभंगी. पण आयुष्यांतील गरजांविषयीं या दोन पंथांची बेपर्वाई अघोऱ्यांच्या दुष्ट चालींहून फार भिन्न आहे. पंजाबच्या औघर योग्यांशीं यांचा कसा संबंध आहे हें निश्चित नाहीं. अघोऱ्यांत विशेष म्हणजे ते कधींकधीं नरमांस व मल खातात.

न र मां स व म ल भ क्ष ण—अघोऱ्यांसंबंधी महत्त्वाचे प्रश्न म्हणजे पहिला, नरमांस व मल भक्षण; व दुसरा, खाण्यापिण्याकरितां मनुष्याच्या कवटीचा उपयोग, हे होत. काली, दुर्गा इत्यादि स्वरूपांत असलेल्या देवीचे शाक्त उपासक जे गूढ संस्कारविधी करितात, त्यांच्यांशीं नरमेध व नरमांस भक्षण या चालींचा मुख्यत्वेंकरून संबंध पोहोंचतो. या कालीपूजेला ५ व्या शतकांत पूर्व बंगालमध्यें सुरुवात झालेली दिसते. कालिका पुराणांत मनुष्यबलिदान करण्यास स्पष्टपणें सांगितलें आहे; हल्लीं मनुष्याऐवजीं खबूतरें, बकरीं व क्वचित् बैलरेडे बळी देतात. हिंदुधर्मांत असले प्रकार अनार्यांकडून घेतलेले असावेत; व तेसुद्धां भिल्लांकडून नव्हे तर पूर्वेकडील रानटी जातींकडून असावेत असें स्पष्ट दिसतें. अजूनहि आसाम वगैरे ठिकाणीं हे प्रकार घडून येतात. तेव्हां अघोरी पंथाचा हिंदुधर्मांतल या बाजूशीं निकट संबंध आहे.

कदाचित् दुसऱ्या बाजूनेंहि या चालीची उपपत्ति लागेल. रानटी जातींत आपण असें पाहतों कीं, चेटकें व वैदू आध्यात्मिक उन्नतीकरितां दुसऱ्यांना किळसवाणे वाटणारे पदार्थ खातात. या समजुतींत अघोरी चालीचें मूळ सांपडेल; व शैवसिद्धांताप्रमाणें सर्व गोष्टी सारख्या दर्जाच्या व हलक्या असतात, असें जें अर्वाचीन अघोरी विवरण करितो ती कल्पना वृद्धीहि अलिकडची आहे.

मा ण सा च्या क व टी चा भां ड्या प्र मा णें उ प यो ग—खाण्यापिण्याकरितां कवटीचा उपयोग करण्यांत वरच्या प्रमाणेंच हेतु असावा. अशा तऱ्हेनें उपयोगिल्या जाणाऱ्या कवट्यांत विशेष जादू असते असें पुष्कळ ठिकाणीं समजण्यांत येतें. उदाहरणार्थ, पूर्व आफ्रिकेंतील वाडो ( Wadoe ) लोकांत राजा नेमण्याच्या वेळीं एखाद्या नवख्या मनुष्याला मारून त्याच्या कवटीचा अभिषेक विधींत पिण्याच्या भांड्याप्रमाणें उपयोग करितात. बगंडांच्या ( Baganda ) राजाचा नवीन उपाध्याय पूर्वी आपल्या जागीं असलेल्या उपाध्याच्या कवटीनें पाणी वगैरे पितो, असें केल्यानें त्याचें भूत नवीन उपाध्यायांत शिरतें अशी समजूत आहे. हिमालयांत हिमवातामध्यें मरण पावलेल्या स्त्रियांच्या कवट्या भूत वेताळांना पाचारण करण्यासाठीं नगाऱ्याप्रमाणें तयार करीत ( Waddell,—Among the Himalayas ). या व यासारख्याच दुसऱ्या गोष्टींत असें दिसून येतें कीं, उपयोगांत आणिली जाणारी कवटी फार काळजीपूर्वक निवडलेली असते. कवटी वापरण्याची अघोऱ्यांची चाल जर याप्रमाणेंच उद्भूत झाली असेल तर ती सध्यां निकृष्ट स्वरूपाची आहे असें म्हणावें लागतें; कारण वापरावयाच्या कवट्या निवडण्यांत ते विशेष काळजी घेत नाहींत.

कवट्यांचा पात्रांप्रमाणें उपयोग करण्याची वहिवाट यूरोपखंडांत देखील आहे. प्राचीन जर्मन व केल्ट लोकांत अशी वहिवाट होती. तिच्या बापाच्या कवटींतून पेय घेण्याचा अल्बॉइन ( Alboin ) नें जेव्हां आपल्या राणीस आग्रह केला तेव्हां त्याचें मरण ओढवलें अशी एक कथा आहे (Paulus Diaconus: Hist. Langob. ii. 28 in Gummere. Germ. Orig. 120 ). अजूनहि अशी समजूत आहे कीं, आत्महत्या करून मरण पावलेल्याच्या कवटीनें पाणी वगैरे पिण्यास सुरुवात केल्यास अपस्मार बरें होतें.

अ घो ऱ्यां ना शि क्षा—माणसांचीं प्रेतें खाण्याबद्दल किंवा त्यांचा उपमर्द करण्याबद्दल हल्लीं पुष्कळ अघोऱ्यांना कोर्टानें शिक्षा दिलेल्या आहेत. १८६२ मध्यें गाझीपूरच्या सेशन जज्जानें एका अघोऱ्याला एक प्रेत रस्त्यावरून ओढून नेल्याबद्दल इं. पि. कोड २७०—२९७ कलमांखालीं एक वर्षाची सक्त मजूरीची शिक्षा दिली होती. अशाच तऱ्हेचे खटले १८८२ मध्यें पंजाबांत ( रोहटक येथें ) व १८८४ सालीं डेऱ्हाडून येथें झाले होते. १८८४ त गंगेंतील एका बेटावर नरमांस खात असलेल्या एका अघोऱ्याला दोघां युरोपियनांनीं पकडलें होतें; त्याच्या झोंपडीभोंवतीं अनेक मुंडकीं व कवट्या वांबूंवर लटकत होतीं; एक तर नुकतेंच धडावेगळें झालेलें दिसत होतें.

अ घो री दी क्षा—बहुतेक साधुवर्ग नवशिक्याला दीक्षा देण्याचे मंत्र व विधि गुप्त ठेवितात. तेव्हां अघोरीपंथाच्या दीक्षेबद्दलची माहिती बरोबर मिळणें कठिण आहे. एकानें अशी माहिती दिली आहे कीं, त्यावेळीं गुरु शंख वाजवितो व त्याबरोबर इतर भाडोत्री वाद्यें वाजवितात. नंतर गुरु माणसाच्या कवटींत लघवी करून, ती शिष्य होऊं घातलेल्याच्या डोक्यावर ओततो व न्हाव्याकडून त्याचें मुंडन करवितात नंतर तो नवशिष्य थोडी दारू व हलक्या जातींकडून मिळविलेलें भिक्षान्न सेवन करतो; आणि कमरेला भगवें वस्त्र गुंडाळून हातांत दंड धारण करितो. या दीक्षाविधींत गुरु आपल्या शिष्याच्या कानांत कांहीं मंत्र सांगतो. असें सांगतात कीं कांहींवेळां नरमांसभक्षणहि या विधीचाच एक भाग असतो. यासंबंधीची आणखी एक माहिती अशीः—ही दीक्षा काशींत या पंथाचा

उत्पादक जो किन्नराम त्याच्या समाधीच्या ठिकाणीं देण्यांत येते. त्यावेळीं समाधीवर दोन पेले, एक भांगेचा व एक दारूचा, ठेवलेले असतात. ज्यांना आपली जात कायम राखावयाची असेल त्यांनीं फक्त भांग घ्यावी व ज्यांना पुरती दीक्षा हवी असेल त्यांनीं दोन्ही पेयें घ्यावींत. नंतर किन्नरामाच्या वेळेपासून जागृत असलेल्या अग्नीला फळें अर्पण करण्यांत येतात. व एक जनावर ( बहुधा बकरा ) बळी देण्यांत येतें. यानंतर शिष्याचें डोकें गुरूच्या लघवीनें ओलें करून त्याची हजामत करवितात व शेवटीं जमलेल्या लोकांना मेजवानी देण्यांत येते. बारा वर्षांच्या उमेदवारीनंतर पूर्णपणें पंथांत शिरकाव होतो.

पे हे रा व व रू प.—अघोऱ्यांचीं चित्रें जीं जमा केलीं आहेत. ( Anthropological Society of Bombay ) त्यांत चिताभस्मानें आच्छादिलेलें त्यांचें शरीर दिसून येतें. ब्रह्मा, विष्णु व महेश यांच्या एकीचें चिन्ह त्यांच्या कपाळावर असतें. रुद्राक्षांच्या माळा व सापाच्या हाडांच्या आणि रानडुकरांच्या सुळयांच्या कंठ्या त्यांच्या गळयांत दिसतात; व त्यांच्या हातांत एक कवटी असते. या पंथांतील कांहीं लोकांच्या गळयांत माणसांच्या दांतांच्या माळाहि असतात, असें ऐकिवांत आहे.

**अचल**—दुर्योधनाचा मामा. शकुनीचा भाऊ. वृषक आदिकरून आपल्या पन्नास बंधुसहवर्तमान भारती युद्धांत अर्जुनाच्या हातून मरण पावला. पुत्रदर्शनपर्वांत इतर लढाईंत पडलेल्या योद्धयांबरोबरच याचेंहि धृतराष्ट्र गांधारीला व्यासांनीं दर्शन करवून दिलें आहे ( महाभारत ७.३० १५.१५,३२८७९ )

२. विष्णु सहस्रनामांपैकीं एक.

**अचला** ( किल्ला. )—मुंबई, नाशिक जिल्हा, चांदोर डोंगरामधील अगदीं पश्चिम टोंकावर हा किल्ला असून दिंडोरीच्या उत्तरेस २० मैलांवर आहे. इ. स. १८१८ मध्यें कॅ. ब्रिग्ज यानें याचें असें वर्णन केलें आहे कीं हा डोंगरी किल्ल्याप्रमाणेंच असून याचा चढ जरा उभा व बिकट आहे. याला एक वेस असून बाकीच्या तटाचा पाया तेवढा दिसतो. यावरून हा तट पुरा बांधला गेला नसावासें वाटतें. छपरी चौकी असून तेथेंच दारूचें कोठार असावें. त्रिंबकेश्वर येथील किल्ल्याबरोबर १८१८ मध्यें कर्नल मॅकडोवेल यास मिळालेल्या १७ किल्ल्यांपैकीं हा एक होता. [ Blaker's Mahratha War 322 ].

**अचेष्टः** ( आर्गन )—वातावरणांतील वायुघटकांपैकीं हें एक मूलद्रव्य आहे. इ. स. १८९४ चे पूर्वीं सुमारें १०० वर्षेंपर्यंत अशी समजूत होती कीं, वातावरणाच्या वायुघटकांची संपूर्ण माहिती होऊन आतां त्यासंबंधानें नवीन ज्ञात होण्यासारखें कांहीं राहिलें नाहीं. वातावरणाचे घटक म्हणजे देशकालस्थितिमानानें अल्पांशानें कमीजास्त प्रमाणांत असणारी आर्द्रता, कर्बाम्लवायु ( कॅरबॉनिक ॲसिड ), उज्ज (हायड्रोजन), अम्रवायु (अमोनिया) इत्यादिकांचा केवळ अंश हे वगळल्यास वातावरणाचे मुख्य घटक नत्र ( नायट्रोजन ) आणि प्राण हेच होत अशी पूर्ण समजूत होती. वातावरणाचें पृथक्करण केल्यास त्यांतील प्राणाचें प्रमाण काढून बाकी शेष राहिलेला वायु तो नत्रच समजण्यांत येत असे. सर हेन्री कॅव्हेन्डोश याच्या वेळेपर्यंत हा शेष राहिलेला वायु सर्वस्वी नत्राम्लभावी आहे किंवा नाहीं याची खातरी करण्याकरितां प्रत्यक्ष प्रयोग करण्याचें तर राहिलें पण यासंबंधीं नुसती शंकासुद्धां कोणास आली नाहीं.

हें पहाण्याचा योगायोग कसा आला तें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. माउटनें जे नियम केले होते ते पडताळून पहाण्याचें काम वरींच वर्षें चाललें होतें, त्यांत मुख्य वायु उज्ज; प्राण व नत्र, यांचें विशिष्टगुरुत्व पहाण्याकरितां नवीन प्रयोग सुरू केले होते. याकरितां व्हेर्नन हार्कोर्टच्या रीतीप्रमाणें अम्र वायु हवेंत मिश्र करून तें मिश्रण रक्तोष्ण असलेल्या तांब्याच्या चूर्णावरून नेलें. यांत उष्णतेच्या प्रभावानें हवेंतील प्राण याचा संयोग अम्रामधील उज्जाशीं होतो. ही संयोगक्रिया पूर्ण झाल्यावर हें मिश्रण गंधकाम्लांतून नेऊन तो शुष्क ( निर्जल ) केला होता. यांत जो नत्र असतो तो मुख्यत्वें हवेंतील असतो—अम्नपासून तयार झालेल्या नत्राचाहि थोडा अंश असतो. वरील प्रयोगांतील आलेलें फल जुळतें आलें असल्यानें आतां नत्राच्या विशिष्टगुरुत्वाबद्दल कांहीं प्रश्न राहिला नाहीं असें ठरलें. परंतु सदर प्रयोगांत अम्नाचा उपयोग न करितां हवेंतील प्राणवायु घेऊन तांब्याचें प्राणिदिकरण करून जो शेष नत्र राहील त्याचें विशिष्टगुरुत्व पहावें असें ठरलें. हे जे प्रयोग केले त्यांचें फल जुळतें आलें. परंतु हारकोर्टच्या रीतीनें तयार केलेल्या नत्राच्या विशिष्टगुरुत्वामध्यें व या रीतीनें तयार केलेल्या नत्राच्या विशिष्ट गुरुत्वांत $\frac{१}{१०००}$ चा फरक दिसून आला. यानंतर हारकोर्टच्या रीतीनें हवा न घेतां नुसता शुद्ध प्राण अम्नामध्यें मिश्र करून नुसत्या अम्नापासूनच नत्र तयार केला. त्याचें विशिष्टगुरुत्व पहातां शेंकडा $\frac{१}{२}$ चा फरक दिसून आला. हवेंतील प्राणवायूचें संयोगीकरण कोणत्याहि रीतीनें करून जो नत्र येई तो नत्रसप्राणिद, अम्न, आणि अमोनिनत्रायित यांपासून तयार केलेला नत्र यांच्या वि. गु. त ½% चा फरक पडूं लागला. हा फरक कांहीं अशुद्धतेनें आला म्हणावा तर तें संभवनीय दिसेना, व इतका फरक कशानें पडतो त्याचेंहि निराकरण होईना. या दोन्ही रीतीनें तयार केलेले नत्रवायु आठ महिने ठेवून पाहिले तरीहि त्यांच्या वि. गु.त कांहीं फरक दिसून आला नाहीं, तसेंच विद्युत्स्फुलिंगाचाहि कांहीं परिणाम त्यावर घडून आल्याचें दिसून आलें नाहीं.

तेव्हां हवेमध्यें नत्रापेक्षां अधिक वि. गु. चा एखादा वायु असावा व त्यामुळें हा फरक पडत असावा अशी शंका येऊं लागली, व याचें पूर्ण निराकरण लार्ड रॅले व सर वुइल्यम रॅमसे

यांनीं केलें. यावेळीं हवेंतील नत्र हा सर्व नत्राम्लभावी आहे किंवा कसें व वातावरणनत्र आणि दुसऱ्या पदार्थांतील नत्र हे एकच आहेत कीं निरनिराळे आहेत हा प्रश्न उद्भवला. सर हेन्री. कॅव्हेन्डीश यानेंतर इ. स. १७८५ मध्येंच हा प्रश्न सोडविल्यासारखा होता. इ. स. १८९४ मध्यें रॅले आणि रॅमसे यांनीं ब्रिटिश असोसिएशनला वातावरणांत एका नवीन वायूचा शोध लाविल्याचें कळविलें. या वायूवर कोणत्याहि द्रव्याचें रासायनिक कार्य झाल्याचें दिसून आलें नाहीं म्हणून यास अचेष्टः किंवा निर्गुणः ( आर्गॅन ) असें नांव दिलें; व या नवीन वायूच्या धर्मांविषयींची माहिता रॉयल सोसायटीकडे इ. स. १८९५ च्या जानेवारींत पाठविण्यांत आली. आणि हा नवीन वायु वातावरणांतून पृथक् करण्याचे प्रयोग मोठ्या प्रमाणावर सुरू करण्य त आले.

वातावरणांतून निर्गुण वायु दोन रीतींनीं तयार करण्यांत येतो. १ ली रीत ही कॅव्हेन्डीशनें योजलेली तीच असून तींत पुष्कळ सुधारणा करण्यांत आलेली आहे. यांत हवा व उज्ज यांचे मिश्रणावर विद्युत्स्फुलिंगाची क्रिया करण्यांत येते व तयार झालेल्या नत्राम्लाचें शोषण पातळ अल्कद्रवांत होतें. नत्र या मिश्रणांतून अदृश्य झाला किंवा नाहीं हें पहाण्याकरितां एक लहान विच्छिन्नकिरणदर्शक यंत्र असतें. याच्या बारीक चिरेंतून पाहिलें असतां नत्र असल्यास त्याची पिवळी रेषा दिसते. ही पिवळी रेषा दिसेनाशी झाली म्हणजे नत्र सर्वस्वी नाहिंसा झाला असें समजावें. नंतर अधिक शक्तिमान यंत्रानें पुनः विच्छिन्नकिरण पहाण्यांत येतें. अचेष्टाचा विच्छिन्नकिरणपट फार आश्चर्यकारक असतो. परिस्थितीप्रमाणें तो रक्तासारख्या लाल किरणापासून ते शेवटीं पोलादासारख्या गर्द निळ्या रंगाचा असतो. दाब, विद्युत्प्रवाहाचा जोर वगैरे योग्य परिस्थिति असल्यास अचेष्टाचा विच्छिन्नकिरणपट गर्द निळ्या रंगाचा असतो.

दुसऱ्या रीतींत हवेंतील नत्राचें शोषण मग्नधातूनें करण्यांत येतें. याकरितां मग्नचा कीस कठिण कांचेच्या नळींत किंवा लोखंडाच्या नळींत भरावा; ही नळी रक्तोष्ण झाली म्हणजे ताम्राच्या योगानें निष्प्राण केलेली हवा या रक्त मग्नवरून न्यावी. या उष्ण मानावर नत्र मग्नशीं संयुक्त होतो व अचेष्ट पृथक् होतो. मग्नधातु आणि निर्जळ खटआणिद यांचें मिश्रण नुसत्या मग्नधातूच्या ऐवजीं योजल्यास संयोग अधिक त्वरित होतो. या रीतीनें तयार केलेल्या अचेष्टाची घनता १९.९४० असते.

अचेष्ट पाण्यांत विद्राव्य असतो. १२° श मानावर अचेष्ट सुमारें शेंकडा ४ प्रमाणानें पाण्यांत विद्रुत होतो म्हणजे नत्रापेक्षां २½ पटीनें जास्त अचेष्ट विद्रुत होतो. सर्व वायूंचा विशिष्ट उष्णतेचा गुणकांक १.४ असतो पण अचेष्टच्या विशिष्ट उष्णतेचा गुणकांक १.६७ असतो. हवेच्या मानानें अचेष्टची वक्रीभवनता फक्त. ९६१ आहे. अचेष्टाचा चिकटपणा हवेच्या मानानें १.२१ असो.

नीच उष्णमानाचा परिणाम अचेष्टावर काय होतो तो खालील कोष्टकांत दाखविला आहे.

| नांव | स्थित्यंतरदर्शक उष्णमान (क्रिटिकल टेंपरेचर) | स्थित्यंतरदर्शक भार क्रिटिकल प्रेशर | उत्क्वथनांक (बॉयलिंग पॉइंट) | हिमांक (फ्रीझींग पॉइंट) |
|---|---|---|---|---|
| नत्रः | —१४६·० | ३५·० | —१९४·४ | —२१४.० |
| अचेष्टः | —१२१·० | ५०·६ | —१८७·० | —१८९.६ |
| प्राणः | —११८·८ | ५०·८ | —१८२·७ | ? |

अचेष्ट हा मग्न किंवा खटशीं संयुक्त होत नाहीं, तसेंच प्राण, उज्ज, व नत्र, याशींहि संयुक्त होत नाहीं. तो कशाशीं संयुक्त होतो हें पहाण्याकरितां पुष्कळ प्रयोग करून पहाण्यांत आले आहेत.

अचेष्ट बरोबर दुसरे तीन—सौर शिवाय—वायु वातावरणांत असतात त्यांचा शोध रॅमसे व एम्. डब्ल्यु. ट्रव्हर्स यांनीं लावला आहे. त्यांचीं नांवें— न्युन ( निऑन ), क्रिप्त ( क्रिप्टॉन ) आणि झेन ( झेनॉन ) अशीं आहेत. यांस अचेष्टाचे सहचर असेंहि म्हणतात. या सर्वांचे धर्म अचेष्टासारखेच आहेत. सर बुइल्म रॅमसे यांचें असें मत आहे कीं या सर्व अचेष्ट सहचरांचें एकत्र प्रमाण अचेष्टाच्या ४०० पेक्षां जास्त नसावें. या सर्वांचे भौतिक धर्म खालीं कोष्टक रूपानें दिले आहेत.

| अनुक्रमांक | भौतिकधर्म | सौरः ( हलिअम ) | न्युनः ( निऑन ) | अचेष्टः ( आर्गॉन ) | क्रिप्त ( क्रिप्टॉन ) | झेन ( झेनॉन ) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | वक्रीभवनत्व ( रिफ्रॅक्टिव्हिटि ) हवा=१ | ·१२३८ | ·२३४५ | ·९६८ | १·४४९ | २·३६४ |
| २ | घनत्व ( डेन्सिटि ) O=प्र=१६ | १.९८ | ९·९७ | १९·९६ | ४०·८८ | ६४ |
| ३ | उत्क्वथनांक ७६० मात्रासहस्रांश भार ( मिलिमिटर ) | ६° श. मू. उ. मान (अॅबसो ०° ब. | ? | ८६·९ मू. उ. मा. | १२१·३०३ मू उ. मा. | १६३·९ मू. उ. मा. |
| ४ | स्थित्यंतरक उष्णतामान=क्रिटिकल टॅंपरेचर | ? | मू उ. मान ६८° च्या खालीं. | १५५·६ मू उ. मा. | २१०·५०° मू. उ मा | २८७·७° मू. उ. मा. |
| ५ | स्थित्यंतरक भार ( क्रिटिकल-प्रेशर ) | ? | ? | ४०·२ मात्रा | ४१·२४ मात्रा | ४३·५ मात्रा |
| ६ | एक मात्राशतांश रसाचा भारांक I c c. liquid चें वेट | ? | ? | १·२११२ ग्रॅ. Gm. | २·१५५ ग्रॅ. Gm. | ३·५२ ग्रॅ. Gm. |

सांप्रत रसरूप वायू सर्व प्रयोगशाळांत मिळणें सुलभ असल्यानें अचेष्ट तयार करण्याला फार सोपें आहे. नत्रापेक्षां अचेष्ट कमी बाष्पभावी असल्यानें रसरूप वातावरण वायु बाष्पीभूत होत असतां अचेष्ट रसरूपांत जमतो. यामुळें प्राणाचें प्रमाण वाढतें पण त्यामुळें अडथळा येत नाहीं. रसरूप हवेपासून ती वाष्पीभूत होत असतां निरनिराळ्या स्थितींतील वाष्प हवेचें पृथक्करण खालीं दिलें आहे त्यावरून यांत वरीच अंतर्दृष्टि येईल.

| अनुक्रमांक | प्राणचें शेंकडा प्रमाण | अचेष्ट (आर्गन)चें शेंकडा प्रमाण | नत्र आणि अचेष्ट यांमधील अचेष्टाचें शेंकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| १ | ३० | १·३ | १·९ |
| २ | ४३ | २·० | ३·५ |
| ३ | ६४ | २·० | ५·६ |
| ४ | ७५ | २·१ | ८·४ |
| ५ | ९० | २·० | २०·० |

**अचोली**—आफ्रिकेंत आलबर्ट नायांझा सरोवराच्या उत्तरेस १०० मैलांवर वरच्या ( Upper ) नाइल नदीच्या थडींत राहणाऱ्या नीग्रो लोकांस "अचोली" असें म्हणतात. ह्या लोकांत गालांवर व मांड्यांवर नागमोडीसारखे पट्टे काढून आपलें शरीर सुशोभित करण्याची चाल आहे. त्यांच्या झोंपड्या वाटोळ्या असतात व त्या आंतून चिखलानें सारविलेल्या असतात. आपलें पोट पारध करून भरतात व लढाईचे वेळीं ढाल व भाल्याचा उपयोग करितात.

**अच्युताश्रम**—हे स्वतःस चिदानंदानुचर म्हणवितात. यावरून यांचे गुरु चिदानंद. यांचे शिष्य गोपाळ याज्ञवल्की ( कृष्णयाज्ञवल्कीचे पुत्र ) यांचे विनंतीवरून शिवकल्याणांनीं श्री अभनुवामृत टीका रचिली ( १५५७ ). तेव्हां हे शिवकल्याण समकालीन किंवा किंचित् तत्पूर्वी होऊन गेले. ग्रंथ—भगवद्गीता ( १६१४ ? ) ब्रह्मकथा. रामवोविया. ( सं. क. का. सू. )

**अच्युताश्रम शिष्य**—वरील उल्लेखावरून हे कृष्ण याज्ञवल्की होत (१५५७). अच्युताश्रमांचा ग्रंथ श्रीभगवद्गीता हा १६१४ तील व त्यांचे शिष्यांचे विनंतीवरून शिवकल्याणांनीं लिहिलेली टीका १६५७ त हें जरा संशयात्मक आहे.

ग्रंथ—शतकज्ञान शिवस्तुति, रामस्तुति. ( सं. क. का. सू. )

**अछनेरा**—संयुक्त प्रान्तांत आग्रा जिल्ह्यांत किरवाली तालुक्यांत हें एक शहर आहे. आग्रा राजपुताना रस्त्यावर अथवा राजपुताना माळवा व कानपूर अच्छनेरा रेलवेच्या जंक्शनवर उत्तर अक्षांश २७.१० व पूर्व रेखांश ७७.४६ मध्यें हें वसलेलें आहे. इ. स. १९०१ मध्यें लोकसंख्या ५७३५ होती. अठराव्या शतकांत जाट लोकांच्या वेळीं हें शहर पहिल्यानें महत्त्वास आलें. नंतर मध्यें ऱ्हास पावून रेलवेचें जंक्शन झाल्यापासून हें पुन्हां महत्त्वाचें स्थान झालें आहे. इ. स. १८५६ च्या २० कायद्याप्रमाणें येथें राज्यव्यवस्था चालविण्यांत येते. व्यापार म्हणण्यासारखा कांहीं नाहीं. एक सरकी काढण्याचा कारखाना आहे. सरकी काढण्याकडे गुंतलेलीं माणसें १५० वर. तशीच एक प्राथमिक शिक्षणाची शाळा आहे.

**अज** ( १ )—परमेश्वरनाम. नहि जातो न जायेऽहं न जनिष्ये कदाचन। क्षेत्रज्ञः सर्व भूतानां तस्मादहमजः स्मृतः॥
—महाभारत.

( २ )प्रियव्रत वंशी ऋषभदेव कुलांत जन्मलेला जो प्रतिहर्ता नांवाचा राजा त्याला 'स्तुति' नांवाच्या बायकोपासून झालेल्या दोन पुत्रांतील ज्येष्ठ.

( ३ ) एक ऋषि, व त्याचें कुल.

( ४ ) रघूचा मुलगा, याची पत्नी इंदुमति; अजविलाप नांवाचा रघुवंशाचा भाग मोठा रसाळ आहे.

( ५ ) ( विदेह वंश ) ऊर्ध्वकेतु नांवाचा जनकाचा पुत्र व पुरुजित् जनकाचा बाप.

( ६ ) सोमवंशी विजयकुलोत्पन्न जन्हुराजाचा पुत्र जो पुरु राजा त्याचें नामांतर.

( ७ ) भारती युद्धांतील एक पांडव पक्षीय राजा ( भारत उद्योगपर्व अ. १७१ )

**अजगर**.—हा प्रचंड सर्प अमेरीकेंतील न्यू गिनी वगैरे उष्ण देशांत,हिंदुस्थानांत, हिंदी बेटांत व आफ्रिकेंत दलदलीच्या जागीं आढळतो. अजगराच्या सुमारें चाळीस जाती असून त्यांपैकीं वहुतेक अमेरिकेंत आहेत. मेक्सीकोपासून ब्रेझिल पर्यंतच्या प्रदेशांत एक जात आहे, तिचा रंग फिका तपकिरी असून त्यावर सुमारें १५।१८ पट्टे असतात. बहुतेक जातीच्या अजगरांचा स्वभाव अगदीं सौम्य असतो व ते माणसाळतात.

अजगराला स्वतःपेक्षां मोठे असलेले प्राणी गिळतां येतील इतका त्याला जबडा उघडतां येतो. अजगर ३० फूट देखील लांब असतो अशी विश्वसनीय माहिती मिळते. कित्येक वेळां साठ फूटांपर्यंत लांबीचे अजगर असल्याचें ऐकण्यांत येतें. प्राचीन रोम शहरच्या भरभराटीच्या काळांत लिहून ठेविलेल्या वर्णनांत १२० फूट लांबीचा अजगर बॅग्राडामच्या किनाऱ्यावर होता असें आढळतें. हा अजगर मारण्याकरितां रेग्युलसच्या सैनिकांनीं सर्व प्रकारचीं हत्यारें चालवून पाहिलीं, पण एकाचाहि उपयोग झाला नाहीं. त्या अजगरानें शिपायांच्या टोळ्यांच्या टोळ्या घशाखालीं घातल्या, व अखेर मोठाली किल्ल्यावर मारा करण्याचीं यंत्रें त्याच्यावर चालविलीं तेव्हां तो मरण पावला. ही अजगराची गोष्ट सर्वस्वी बनावट नसली तरी लांबीसंबंधीं त्यांत बरीच अतिशयोक्ति असली पाहिजे यांत शंका नाहीं.

अजगर सबंध बोकड, किंवा डुक्कर किंवा माणूस गिळून खातात हें खरें आहे. १८६१ सालीं जार्डिन डिस प्लँटेस मध्यें एक अजगरानें पांघरण्याचें एक ब्लँकेट गिळून खाल्लें, पण तें पचून जाणें शक्य नसल्यामुळें चार आठवडे पोटांत राहून

अखेर परत तोंडावाटे बाहेर पडलें व नंतर लवकरच तें अजगर मरण पावलें.

अजगर या जातीच्या सर्पांचा उल्लेख वैदिक वाङ्मयांत, विशेषतः अथर्ववेदांत आहे. अश्वमेध यज्ञांत बळी द्यावयाच्या जनावरांच्या यादींत अजगर प्राणी आहे. पुराणांत अजगरासंबंधाचा विशेष उल्लेख नलराजाच्या कथेंत येतो. निद्रित स्थितींत दमयंतीला नल सोडून गेल्यावर ती अरण्यांत नळाचा शोध करीत हिंडत असतां एका थिप्पाड अजगरानें तिला पकडलें व गिळण्यास सुरवात केली. तेव्हां ती मोठ्यानें आक्रोश करूं लागली. तो ऐकून एक व्याध धांवत आला व त्यानें तीक्ष्ण धारेच्या शस्त्रानें अजगराचें तोंड फाडलें व दमयंतीला मुक्त केलें. अशा उल्लेखावरून फार प्राचीन काळापासून हिंदुस्थानांत अजगरांचा त्रास असल्याचें दिसतें.

**अजंठा डोंगरः**—बुलढाणा जिल्ह्यांतील दक्षिणेकडील प्रदेश अजंठा डोंगरानें व्याप्त झालेला आहे. या डोंगरास चांदोर, सातमाळा, इनद्याद्रि डोंगर, सह्याद्रिपर्वत अशीं निरनिराळीं नांवें आहेत. पश्चिमेकडील सह्याद्रिपर्वत ज्या फत्तराचा बनलेला आहे तोच फत्तर या डोंगरांत आहे. सह्याद्रीपासून हा डोंगर नाशिक जिल्ह्यांतील भनवाड जवळ काटकोनांत सुरू होत असून तो पूर्वेकडे सुमारें ५० मैल पर्यंत पसरलेला आहे. सरासरी उंची ४००० फूट किंवा कांहीं ठिकाणीं त्यापेक्षांहि अधिक आहे. या ठिकाणीं बरीच रुंद खिंड असून, या खिंडींतूनच मनमाडजवळून जी. आय. पी. रेलवे जाते. मनमाडच्या दक्षिणेस अंकईपासून पुन्हा हा डोंगर लागतो. पुढें कासारी येथें दुसरी खिंड लागते व सुमारें ५० मैलपर्यंत हा डोंगर ईशान्येकडे पसरलेला आहे. येथून हे डोंगर वऱ्हाडमध्यें शिरतात. निजामच्या राज्यांतील परभणी आणि निजामाबाद या जिल्ह्यांत हे डोंगर असून या ठिकाणीं या डोंगरास सह्याद्रि पर्वत असें स्थानिक नांव आहे. हे डोंगर दक्षिण पठाराचो उत्तरेकडील सीमा आहेत. पूर्वी गुजराथ आणि माळवा यामधून व्यापार किंवा सैन्य दक्षिणेंत यावयाचें असल्यास तें मनमाड आणि कासारी खिंडींतून येत असे; आणि गावताला आणि अजंठा हे मार्ग असत. अजंठा हें हल्लीं निजामच्या राज्यांत असून येथें बौद्धांचीं कोरीवलेणीं आहेत. या डोंगरांत जिकडे तिकडे किल्ले आहेत.

उंच शिखरें—मारकिंद (मार्कंडेय) (४३८४ फूट) हें इ. स. ८०८ सालीं राजे लोकांचें राहण्याचें ठिकाण असून बागलाणांत जाणाऱ्या मार्गावर आहे; समोरच सप्तशृंग नांवाचें क्षेत्रस्थान आहे (४६५९ फूट). रावळ्या-जावळ्या-हे दोन किल्ले इ. स. १६३५ सालीं मोगलांनीं घेतले.

धोडप—या डोंगरांतील सर्वांत उंच शिखर (४७४१). तुद्रई (४५२६ फूट).

ऐन-इ-अकबरीमध्यें या डोंगरांचा सह्यिा अथवा सहसा असा उल्लेख केलेला आहे.

**अजंठा येथील लेणीं.**—निझामच्या हद्दींत उ. अक्षांश २०. २५ व पू. रेखांश ७६.१२. फर्दापूर पासून नैर्ऋत्येस साडेतीन मैलावर अजिंठा अथवा सह्याद्रि पर्वताच्या एका मुख्य खिंडीमध्यें हीं लेणीं आहेत. यांस जाण्याकरितां जी. आय. पी. रेलवेच्या पाचोरा जंक्शनवरून जाम्नेरच्या ब्रँच लाईननें २५ मैलांवरच्या पाहूर स्टेशनावर उतरून पुढें सडकेनें पंधरा मैल निजाम सरकारच्या हद्दींतील अजिंठा गांवापर्यंत जावें लागतें. गांवापासून लेण्यापर्यंत सुमारें चार मैल पर्वताच्या तीन चार आळी ओलांडून प्रवास करावा लागतो. हा पुढचा रस्ता नागमोडी व खडकाळ असून फार अडचणीचा आहे, व त्यापुढें अगदीं एकांताच्या व भयानक अशा खिंडींत लेणीं आहेत. लेण्यांच्या पलीकडे मोठा कडा तुटलेला असून तेथून ७ पायऱ्यांनीं एक धबधबा पडतो. डोंगराच्या माथ्यावर पूर्वी लेणापुर नांवाचें खेडें असून त्यास जाण्याकरितां लेण्यांपासून पायऱ्या खोदून वाट केलेली होती हीं लेणीं पूर्वीच्या हमरस्त्यावर असून येथील वनशोभाहि अप्रतिम आहे. या लेण्यांचा उल्लेख ह्युएन त्संग यानें केलेला आढळतो. पण तो येथें आला नव्हता. (Stan. Julien Memo. Sur. les cont Occident II. 151)

त्याच्या वर्णनावरून असें दिसतें कीं, त्या वेळीं या गुंफा बौद्धधर्मीयांचें तीर्थयात्रेचें स्थान असून हजारों मनुष्यांची तेथें सतत येरझार चालत असे. पुढें बौद्धधर्माचा निरास झाल्यावर या स्थळाचें महत्त्व कमी होऊन तिकडे जाणारांना सभोंवतालच्या जंगलांतील क्रूर भिल्ल व हिंस्रपशू यांचा त्रास होऊं लागला व त्यामुळें तेथील रहदारी हळूहळू कमी होत होत नाहींशी झाली, व पुढें तें स्थल अज्ञात होऊन राहिलें. अशी स्थिति १८२१ पर्यंत होती. पुढें कंपनी सरकारच्या मद्रासच्या अंमलदारांना अजिंठ्याच्या लोकांच्या तोंडून तेथें लेणीं असल्याचें कळलें, परंतु रस्ता अति बिकट व भीतिप्रद होता. तरी जनरल सर जेम्स अलेक्झांडर यानें तेथें जाण्याचें धाडस केलें. मार्गांत अनेक संकटें आलीं तरी शेवटीं तो मुख्य जागीं जाऊन पोहोंचला. सर्व लेणीं पाहून तो अगदीं थक्क होऊन गेला. व त्यानें हीं लेणीं प्रसिद्धीस आणलीं. तरी पुढें १८४९ पर्यंत त्या लेण्यांची उपेक्षा केलेली आढळते व तोंपर्यंत येथें जाण्याचा रस्ताहि फार बिकट व भीतिप्रद होता. १८४९–५५ यांच्या दरम्यान कोर्ट ऑफ डायरेक्टर्सनीं मेजर गिल यास येथील कांहीं चित्रांच्या नकला करण्यास पाठविलें†.

† टीप. यानें ३० मोठालीं चित्रें काढून लंडनला पाठविलीं त्यांपैकीं २५ सिडनहॅम स्फटिकभवनांत मांडलीं होतीं १८६६ च्या अग्निप्रलयांत तीं जळून गेलीं. बाकीचीं पांच चित्रें व Mrs Speirs Ancient India या पुस्तकांतील कांहीं खोदकामाच्या लहानशा नमुन्यांशिवाय गिलचें काम उपलब्ध नाहीं.

१८७४ त त्यानें सर्व लेण्यांची उत्तमप्रकारें पहाणी करून बरींच चित्रें साफ केलीं. १८७४ मध्यें चित्रें असलेल्या लेण्यांस दरवाजे व खिडक्या बसविण्याचें ठरलें होतें परंतु तें तसेंच राहिलें. लेणीं साफ करण्याचें काम अद्यापि चालूच आहे.

हीं एकंदर २९ लेणीं आहेत त्यांपैकीं दोन अर्धवट असून एकाचा रस्ता बिकट आहे व दुसऱ्यास मुळींच रस्ता नाहीं. यांपैकीं पांच लेणीं ( ९,१०,१९,२६,२७ ) चैत्य ( बौद्ध देवळें ) असून लांबट आकाराचीं व आंतील बाजू वाटोळी अशीं आहेत. मध्यें दोन खांबांच्या रांगा आहेत व अर्धवर्तुळाकृति भागांत डाघोबा आहे. पुढें कमजास्त उंचीची भिंत असून तिला एक दरवाजा व दोन खिडक्या अथवा तीन दरवाजे आहेत. कांहींच्या पुढें पडव्या असून वर गच्ची आहे. बाकीचे विहार असून ते बहुतेक चौकोनी आहेत. त्यांच्या बाजूंना खोल्या आहेत. यांच्यामध्येंहि खांब आहेत. समोरच बुद्धाची मूर्ति बहुतकरून असते.

यांपैकीं कांहीं लेणीं अर्धवट राहिलेलीं आहेत परंतु एक खेरीज सर्व लेण्यांमध्यें चित्रें रंगविलेलीं आहेत. हीं सर्व लेणीं खिस्तपूर्व दुसऱ्या शतकापासून खिस्तीशकाच्या आठव्या शतकापर्यंत १००० वर्षांत निरनिराळ्या काळीं खोदलीं गेलीं असावीं. यांपैकीं कांहीं लेण्यांत शिलालेख आहेत परंतु त्यांपासून विशेषसी ऐतिहासिक माहिती मिळत नाहीं. परंतु यांतील चित्रांवरून हिंदुस्थानांतील तिसऱ्यापासून आठव्या शतकापर्यंतच्या लोकांची राहणी चांगली समजते. या चित्रांमध्यें त्यावेळचे राजे, राण्या, मंत्री, नोकरचाकर, शिपाई ( सैनिक ), कारागीर शेतकरी यांचीं त्या वेळच्या पोषाखांत चित्रें असून निरनिराळ्या प्रसंगांवरून त्यांच्या चालीरीतीं व धर्म यांचें ज्ञान होतें. चित्रकलेच्या दृष्टीनें पाहिलें असतां हीं चित्रें अप्रतिम असून इतकीं भावनादर्शक चित्रें जगांत क्वचितच आढळतील असें ग्रिफिथ वगैरेंचें म्हणणें आहे.

लेणें १:—हा विहार असून याला पुढें पडवी असून तिच्या बाजूंना व आंत खोल्या आहेत. यांतील खांबांवर, पुढच्या बाजूस व आंत सर्वत्र फारच उत्तम नक्षीकाम केलेलें असून बुद्धाच्या चरित्रांतील कांहीं प्रसंग खोदलेले आहेत. आंतील बाजूवर निरनिराळे देखावे रंगविलेले आहेत. एकंदर सुमारें २० निरनिराळे प्रसंग रेखाटले असून त्यांत एक इराणांतून आलेल्या वकिलातीचा देखावा आहे.

लेणें २:—हें पहिल्याप्रमाणेंच एक विहार असून यांत पुष्कळ खोदकाम केलेलें आहे व सुमारें ३८ चित्रें आहेत.

लेणें ३:—हें दुसऱ्या लेण्याच्या थोडेंसें वरच्या बाजूस असून अर्धेंच राहिलेलें आहे.

लेणें ४:—हा सर्वात मोठा विहार आहे. यामध्येंहि कांहीं खोदकाम आहे. यामध्यें एकच अर्धवट चित्र दिसतें.

लेणें ५:—या विहाराची पडवी खोदून झाली असून बाकीचें काम अर्धवट आहे. यामध्येंहि कांहीं खोदकाम केलेलें आहे.

लेणें ६:—हा दुमजली विहार असून सर्वांत अलीकडील असावा. यांत कांहीं खोदकाम आहे व रंगविलेल्या चित्रांचे कांहीं अवशेष आहेत.

लेणें ७:—हा विहार वरील विहारांपेक्षां थोडा निराळ्या पद्धतीचा आहे. यांत शाक्यमुनीची सिंहासनाधिष्ठित मूर्ति असून सभोंवतीं कांहीं आकृती खोदलेल्या आहेत. यांत कांहीं रंगविलेलीं चित्रेंहि आहेत.

लेणें ८:—हा विहार सर्वांत जुना असून खि. पू. पहिल्या शतकांतला असावा. याचा पुढचा भाग पडून गेला आहे. आंत दोन खोल्या ( गर्भगृह ) असून त्यांत मूर्ति नाहीं.

लेणें ९:—हा खि. पू. पहिल्या शतकांतील चैत्य असावा. यांत स्तूप असून कांहीं खोदकाम आहे व ५ रंगविलेलीं चित्रें आहेत. हीं चित्रें मागाहूनचीं व निरनिराळ्या काळचीं आहेत.

लेणें १०:—हा चैत्य असून खि. पू. दुसऱ्या शतकांतील म्हणजे या लेण्यांपैकीं सर्वांत जुना असावा. यांत स्तूप असून वासिष्ठीपुत्राचा एक शिलालेख आहे. यांत सर्व बाजूंना चित्रें काढलेलीं होतीं व कांहीं अक्षरें लिहिलेलीं आढळतात.

लेणें ११:—हा विहार असून याच्या पडवींत दोन्ही बाजूंस दोन खोल्या असून मधल्या दालनांत बुद्धाची मूर्ति व एक मनुष्याची आकृति खोदलेली आहे व आंत एक खोली आहे. यांतील चित्रें खराब होऊन गेलीं आहेत.

लेणें १२:—यांत एक दालन असून १२ खोल्या आहेत व एक शिलालेख आहे.

लेणें १३:—यांत एक दालन असून ७ खोल्या आहेत.

लेणें १४:—हें तेराव्या लेण्याच्या वरच्या बाजूस असून यांत एक दालन असून कांहीं खांब आहेत. हे येथील इतर खांबांप्रमाणें अष्टपैलू नसून चौकोनी व निराळ्या घर्तीचे आहेत.

लेणें १५:—या विहाराला पुढें पडवी, आंत एक चौकोनी दालन व १० खोल्या आहेत, व एक बुद्धाची मूर्ति आहे.

लेणें १६:—हा एक विहार असूत यांतील शिल्पकाम उत्कृष्ट आहे. यांत एकंदर १६ खोल्या आहेत, व एक भव्य बुद्धाची मूर्ति आहे. यांत एक शिलालेख असून त्यांत मध्यप्रांताच्या विंध्यशक्ति वगैरे ६।७ वाकाटक घराण्यांतील राजांचा उल्लेख आहे. यांत बुद्धाच्या चरित्रांतील वगैरे १४ चित्रें आहेत.

लेणें १७:—हा विहार असून यांत एक शिलालेख आहे. त्यांत अश्मक, धृतराष्ट्र, त्याचा पुत्र हरि सांब, त्याचा पुत्र क्षितिपाल सौरि सांब, उपेन्द्र गुप्त व त्याचा पुत्र स्काच अशा राजांचीं नांवें आढळतात. हे स्थानिक राजे असावे. यांत एकंदर ६१ चित्रें आहेत.

लेणें १८:—हें एका टांक्यास आच्छादन म्हणून व दुसऱ्या लेण्यास जाण्याकरितां वाट म्हणून खोदलेलें दिसतें.

लेणें १९:—हा चैत्य असून चांगल्या स्थितींत आहे. यांत पुष्कळ खोदकाम केलेलें आहे. व कांहीं चित्रांचे अवशेष आहेत.

लेणें २०:—हा लहानसा विहार असून यांत एक पडवी, एक दालन व एकंदर ६ खोल्या आहेत. यांत बुद्धाची मूर्ति व कांहीं आकृति खोदलेल्या आहेत. चित्रांचे अवशेष आहेत.

लेणें २१:—हा विहार असून यांत बरेंच खोदकाम केलेलें आहे. यांत बुद्धाची मूर्ति व कांहीं खोल्या आहेत. छतावर भूमितींतील आकृति वगैरे चित्रें आहेत.

लेणें २२:—हा एक लहानसा विहार आहे. यांत शाक्यमुनीची मूर्ति असून विपश्यि, शिखि, विश्वभु वगैरे बुद्धांचीं चित्रें आहेत व कांहीं शब्द लिहिलेले आहेत.

लेणें २३:—हा एक विहार असून यांतील गर्भगृह अर्धवट राहिलें आहे. चित्रांचा कांहीं मागमूस लागत नाहीं.

लेणें २४:—हा एक अर्धवट राहिलेला विहार आहे. व यांतील तयार झालेल्या खोदकामावरून हा पुरा झाला असता तर फारच अप्रतिम झाला असता असें दिसतें.

लेणें २५:—हा एक लहानसा विहार असून याला एक पडवी व एकच दालन आहे.

लेणें २६:—हा १९ व्या लेण्यासारखाच एक चैत्य आहे. यांत पुष्कळच खोदकाम केलेलें आहे. यांत दोन शिलालेख आहेत. यांत एक बुद्धाची मृत्युशय्येवरील भव्य मूर्ति आहे.

लेणें २७:—हें अर्धवट राहिलेलें आहे.

लेणें२८:—यामध्यें एका चैत्यास आरंभ केलेला असून अर्धवट राहिलेलें आहे.

लेणें २९:—यास जाण्यास रस्ता नसून यांत फक्त एका विहाराची पडवी खोदून झाली आहे.

'हिंदुस्थानांतील कोरीव लेण्यांचें वर्णन' या नांवाच्या फर्ग्यूसन व बर्जेसकृत पुस्तकावरून पुढील महत्त्वाची माहिती घेतली आहे [ पान २८५ ].

"हीं लेणीं इ. सनापूर्वी पहिल्या शतकापासून इ. सनाच्या ७ व्या शतकापर्यंतच्या काळांत खोदण्यांत आलीं. त्यांत जीं फार प्राचीन आहेत, तीं पैठणच्या शातकर्णींच्या वेळचीं आहेत, हीं सर्व लेणीं बौद्धांचीं होत. त्यांतील प्राचीन हीनयान बौद्धपंथाचीं असून मागाहूनचीं महायानपंथाचीं आहेत. पहिल्यांत चैत्य व डागोबा असून दुसऱ्यांत बुद्धांच्या मूर्ति आहेत. या दोन्ही प्रकारच्या लेण्यांत रंगीत चित्रें आहेत. खरखरीत असलेल्या भिंतीवर भाताचा कुंडा व तागाचे वगैरे तंतु मिसळून चिकट केलेल्या गिलाव्याचा थर देऊन त्यावर हीं चित्रें काढिलीं आहेत. गिलाव्यावर प्रथम भूमिकेसाठीं एका प्रकारचा रंग देऊन नंतर त्यावरतीं चित्रें आंखून रंगविलेलीं आहेत.

हीनयान आणि महायान पंथांच्या लेण्यांतील फरक अगदीं स्पष्ट आहे. हीनयान पंथांतील भिक्षु एक दोन सोबती घेऊन ओबडधोबड लेण्यांत एकीकडे रहात असत. म्हणजे त्यांनीं या बाबतींत प्राचीन हिंदुधर्मांतील संन्याशाची वहिवाट चालू ठेविली होती. पण महायान पंथाचे भिक्षु भव्य सुंदर लेण्यांत राहून सर्व सुखसोईंचा उपभोग घेत. शिवाय पहिल्यांतील लोक बुद्धाच्या शरीराच्या अवशेषावर उभारलेल्या डागोबाची मात्र पूजा करीत, तर दुसरे बुद्ध, बोधिसत्त्व आणि तारा आदिकरून त्यांतील स्त्रीस्वरूप शक्ति, यांचे प्रचंड पुतळे करून त्यांची पूजा करीत. त्यांनीं मूर्तिपूजेचें फारच अवडंबर माजविलें.

सामान्यपणें या लेण्यांतील चित्रें बुद्धाच्या चरित्रांतील किंवा जातक कथांतील विषयांवर आहेत. अगदीं अलीकडच्या एका लेण्यांत मात्र इराणच्या खुसरू नामक राजाकडून आलेल्या शिष्ट मंडळाची पुलकेशी आपल्या दरबारांत भेट घेत आहे असा देखावा दाखविला आहे."

अजिंठालेण्यांतील चित्रें किती हृदयंगम व भावनोद्दीपक असतात हें पुढील एका देखाव्याच्या वर्णनावरून दिसून येईल.

मृत्युशय्येवर एक राजकन्या पडली असून, तिचे डोळे अर्धवट मिटले आहेत, मान लटकी पडलेली आहे व गात्रें शिथिल झालीं आहेत. एका दासीनें तिला आधार दिला आहे व दुसरी तिचा हात आपल्या हातांत घेऊन मोठ्या कळवळ्यानें तिच्या तोंडाकडे पाहात आहे. या दुसऱ्या स्त्रीच्या चेहऱ्यावर राजकन्येचें आयुष्य सरत आलें अशी खात्री झाल्याकारणानें चिंतेची गाढ छटा पसरली आहे. आणखी एक दासी मागें उभी राहून राजकन्येला वारा घालीत आहे व डाव्याबाजूस दोन पुरुष अतिशय दुःखित मुद्रेनें पाहात आहेत. खालीं जमिनीवर इतर नातेवाईक निराश स्थितींत बसले आहेत. त्यापैकीं एक स्त्री तर तोंडावर हात धरून ओक्साबोक्सी रडत आहे. ( लेणें नं. १६ ).

हा हृदयभेदक देखावा कलेतिहासांत सर्वश्रेष्ठ असल्याबद्दल पाश्चात्त्य पंडितहि ग्वाही देतात. फ्लॉरेंटाईन कला यापेक्षां जास्त सरस चित्र रेखाटील व व्हेनेशियन कला यांतील रंगावर ताण करील यांत संशय नाहीं; पण यांतील आविर्भावदर्शन मात्र कोणालाच साधणार नाहीं असें ग्रिफिथ्साहेब आपल्या रिपोर्टांत ( १८७३-७४ ) म्हणतात.

लेण्यांतील चित्रांत मुख्य व्यक्ति राजा ही असते. जुन्या चित्रांत ( १० वें लेणें. इ. स. १५० ) राजे एकाच जातीचे दिसतात; पण अलिकडील चित्रांतील ( इ. स. ३००-६३० ) राजे निरनिराळ्या जातीचे असावेत असें दिसतें, व ते सर्व हिंदीच दिसतात. कांहीं चित्रांत राजे लढाईंत, शिकारींत, किंवा प्रवासांत वगैरे गृहबाह्य व्यवसायांत गुंतलेले आहेत व कांहींत राजवाड्यांतील खाजगी किंवा दरबारी व्यवसायांत मग्न असल्याचें दाखविलें आहे. पुष्कळ चित्रांत राजाबरोबर राण्यांचीं चित्रें आहेत. त्यांच्या अंगावर दागिने आहेत व वस्त्रें डाकाच्या मलमलीप्रमाणें फार झिरझिरित आहेत. राजे व राण्या यांच्या खालोखाल महत्त्वाच्या व्यक्ती म्हणजे राजपुत्र व राजांचे प्रधान या होत. दरबारी लोक व स्त्रिया यांचीं

चित्रें पुष्कळ ठिकाणीं आहेत. राजवाड्याच्या चित्रांत स्त्रीपुरुष चाकरांची खूप गर्दी आढळते. त्यांत वरेचसे खोजे नोकर आहेत. नोकरांचे पेहेरावहि निरनिराळ्या पद्धतीचे आहेत. लढायासंबंधीच्या चित्रांत राजावरोवर सैनिकांचीं चित्रें आहेत. जुन्या चित्रांत ( १० वें लेणें ) सर्व सैनिक पादचारी असून त्यांच्याजवळ परशु, भाले व काठ्या असलीं हत्यारें आहेत. नंतरच्या ( इ. स. ४००-६०० ) चित्रांत पायदळावरोवर घोडेस्वारहि असून त्यांच्याजवळ धनुष्यबाण, तरवारी, भाले, चक्रें, तसेंच बचावार्थ ढाली व शिरस्त्राणें, इत्यादि हत्यारें आहेत. व्यापार व कारागीर यासंबंधानें स्वतंत्र चित्रें नाहींत, पण स्त्रियांच्या अंगावरील वस्त्रालंकारांवरून सोनार, विणकरी, नकशी काम करणारे वगैरेंच्या कलाकौशल्याबद्दल बरीच कल्पना येते. चित्रांत रथादि वाहनें, जहाजें आहेत त्यावरून जमिनीवर व समुद्रावर चालणाऱ्या व्यापाराची कल्पना होते. शेतकऱ्यांचीं चित्रें क्वचित् आहेत, पण ते केळीं ( १,१९ ), सुपारी ( १,१८ ), आंबे ( ५ ), द्राक्षें ( १४ ), वगैरे फळझाडें, व अनेक प्रकारचीं फुलझाडें यांची लागवड करीत असत असें दिसतें. तसेंच या चित्रांवरून बौद्ध, जैन व ब्राह्मण धर्मांतील रीत रिवाजाबद्दल पुष्कळ माहिती मिळते. तात्पर्य, ऐतिहासिक संशोधकांनां हीं लेणीं म्हणजे माहितीनें भरलेली बहुमूल्य खाण आहे.

अजिंठा येथील लेण्यांचें वर्णन पुढील गृहस्थांनीं दिलें आहे.


(1) Burgess' Notes on the Buddha Rock Temples of Ajantha.
(2) Mr. Griffith's Reports (1874-1879),
(3) Madras officers account 1819. T. B. L. S. III. 520.
(4) Sir James E. Alexander's visit in 1824. T. R. A. S. II. 362.
(5) Mr. Ralph's account of a visit in 1838. J. B. B. R. A. S. III. part II. 71-72.
(6) Lieut Blake's Description, Bombay Courier 1839.
(7) Description of Mandu & Ajuntha Bombay. Times Press 1844.
(8) Mr Fergusson's paper J. R. A. S. 1842.
(9) Dr. J. Muir's Journey from Agra to Bombay. 1854,
(10) Major Gill's Stereoscopic photographs of Ajantha & Elura 1862.
(11) Dr. Bhau Daji's transcripts and translations of Inscriptions J. B. B. R. A. S. VII. 55-74.
(12) Major Gill's Illustrations of Architecture & Natural History in Western India 1864.
(13) Mr. Burgess' Rockcut Temples of Ajantha Ind. Ant. III. 269-274.
(14) Griffith's account of the Frescoes Ind. Ant. I. 354; II. 152; III. 25; IV. 253.
(15) Dr. Rajendralal Mitra's Foreigners in Ajantha Paintings. J.A.S. Ben. XLVII. 62.
(16) Mr. Fergusson's Chosroes II. in Ajantha Paintings. J.R. A. S. New series XI.

मुंबई गॅझेटिअर-खानदेश, बुलढाणा गॅझेटिअर.


**अजनाळ.**—पंजाब इलाखा-अमृतसर जिल्ह्यांतील एक तहशील.

उ. अ. ३१° ३७' ते ३२° ३' व पू. रे. ७४° ३०' ते ७४° ५९'. क्षेत्रफळ ४१७ चौरस मैल.

तहशिलच्या दक्षिणेकडील प्रदेशांस बारीदोआब कालव्याचें पाणी मिळतें. तहशिलीची जमीन साधारण कमी दर्जाची असल्यामुळें लागवडीचें प्रमाण कमीच आहे.

या तहशिलींत ३३१ खेडीं असून अजनाळ हें मुख्य आहे. जमीनमहसुली व इतर कर मिळून एकंदर उत्पन्न इ. स. १९०३-४ सालीं ३६१००० रुपये होतें. [ इ. गॅ. ]

**अजमीढः**—१ पुरुवंशांतील सुहोत्रास ऐक्ष्वाकीपासून तीन पुत्र झाले. त्यांपैकीं ज्येष्ठपुत्र अजमीढ यास तीन स्त्रियांपासून ६ पुत्र झाले. पहिली धूमिनी इचा पुत्र ऋक्ष; दुसरी नीली, इचे पुत्र दुष्यंत व परमेष्ठी; तिसरी केशिनी, इचा पुत्र जन्हु, यानेंच गंगा प्राशन केली ( म. भा. आदिपर्व अ. ९४ )

२ हस्तिनापूर वसविणारा सोमवंशोद्भव हस्ति याचा नातु विकुंठनाचा पुत्र यास ४ भार्या—कैकयी, गांधारी, विशाला व ऋक्षा यांपासून एकंदर २४ पुत्र झाले. ऋक्षेचा मुलगा संवरण वंश स्थापक होय. ( म. भा. आदि. अ. ९५ )

३ अजमीढ, द्विमीढ व पुरुमीढ हे तिघे हस्तीनराचे पुत्र होत. अजमीढापासून कण्व व त्यापासून मेधातिथी झाला. त्याजपासून काण्वायन ब्राह्मण झाले. अजमीढाचा दुसरा पुत्र बृहद्दिषु ऋक्ष नांवाच्या पुत्रापासून संवरण व संवरणाचा कुरु यानेंच कुरुक्षेत्र हें धर्मक्षेत्र केलें. ( विष्णुपुराण ४।१९ )

भरद्वाज ( वितथ ) याचा मुलगा मन्यु, मन्यूचा बृहत्क्षत्र व बृहत्क्षत्राचा हस्ती हा पुत्र असून त्याचा पुत्र अजमीढ अशी परंपरा भागवत पुराणांत सांपडते ( भागवत ९।२१।३० ) ही परंपरा इतर पुराणांत वेगळी आहे.

अजमीढाच्या वंशजांनाहि अजमीढ असें संबोधण्यांत येतें.

**अजमीरमेरवाड**—उत्तर अक्षांश २५°२४' ते २६°४२'व पूर्व रेखांश ७३°४५' ते ७५° २४.' यांत राजपुतान्यांत अगदीं अलग असलेला ब्रिटिश मुलूख आहे. राजपुतान्यांतील पोलिटिकल एजंट येथें कमिशनर आहे. हा प्रांत अजमीर मेरवाड यांचा बनलेला आहे.

अजमीरच्या उत्तरेस जोधपूर, दक्षिणेस उदेपूर, पूर्वेस जयपूर आणि पश्चिमेस जोधपूर आहे. मेरवाडच्या उत्तरेस जोधपूर व अजमीर, दक्षिणेस उदेपूर, पूर्वेस अजमीर व उदेपूर

व पश्चिमेस जोधपूर आहेत. एकंदर क्षेत्रफळ २७११ चौ. मैल असून इ. स. १९०१ मध्यें लोकसंख्या ४७६९१२ होती. अजमीर हें नांव अजराजापासून पडलें आहे.

अजमीर पुष्कळ भागीं वाळुकामय असून कोठें कोठें डोंगराळ आहे. पण मेवाड निखालस डोंगराळ आहे. अजमीर शहरानजीक तारागड ज्या डोंगरावर आहे तो समुद्रसपाटीपासून २८५५ फूट उंच आहे. अजमीर डोंगरपठारावर वसलेलें असून तें पठार सर्व हिंदुस्थानांत अति उंच आहे. ह्या प्रांतात फार मोठ्या अशा नद्या नाहींत. येथील अनासागर तलावाच्या सभोंवतालच्या डोंगरांतून साबरमती नदी निघते. पुष्कर खेरीज येथें लक्षांत ठेवण्याजोगें सरोवर नाहीं. अजमीर प्रांतांत डोळ्यांत भरण्यासारखें सृष्टिसौंदर्य क्वचित दिसून येतें. पण अजमीर शहराची मात्र तशी गोष्ट नाहीं. येथें पावसाळा सुरू होतांच सर्व डोंगर हिरवा शालू नेसलेले दिसतात व सूर्यास्ताचा देखावा मनोहारी असतो.

अरवलीपर्वताच्या पूर्वेस राजपुतान्यांत सांपडणाऱ्या सर्व वनस्पती येथें मिळतात. पिंपळ, वड, लिंब, सेमल हीं झाडें येथें विशेष आहेत. फळझाडांमध्यें डाळिंब व पेरू हीं सर्वत्र पुष्कळ आढळतात.

वाघ मेरवाडमध्यें क्वचित आढळतो पण चित्ते व तरस पुष्कळ आहेत. तसेंच रानडुकर, भेकर, नीलगाय हीं अजमीरमध्यें आढळतात व त्यांची शिकार करण्याचा लोकांना विशेष नाद आहे.

येथील हवा ( निरोगी ) आरोग्यदायक आहे. उन्हाळ्यांत हवा कोरडी व उष्ण असते पण हिंवाळ्यांत ती थंड व उत्साहजनक असते. साधारणपणें अजमीर येथील उष्णतामान जानेवारी महिन्यांत ५९·४, मेमध्यें ९१·५, जुलै ८४·९ व नोव्हेंबरमध्यें ६७·९ असतें. येथील गेल्या इ. स. १९०१ मध्यें संपणाऱ्या २५ वर्षांतील पावसाचें सरासरी मान २१·२ आहे.

अजमीरचा तारागड चव्हाणघराण्यांतील रजपूत अजराजानें इ.स. १४५ मध्यें बांधला अशी समजूत आहे. पण इतिहासज्ञांच्या मतें अजय व अज हे इ. स. ११०० मध्यें होऊन गेले. प्रथम अज मग अजय व त्यांच्यामागून अर्णोराजा गादीवर आला. त्याच्यामागून त्याचा मुलगा विग्रहराज जो विशालदेव ह्या नांवानें प्रसिद्ध आहे तो राज्यावर आला. इ. स. ११९२ मध्यें विशालदेवाचा नातू पृथ्वीराज हा गादीवर होता. महंमद घोरीनें त्याचा पराभव करून त्याला आपला मांडलीक बनवल्यावर, त्याचा चुलता हरिराज यानें पृथ्वीराजास पदच्युत करून आपण गादी बळकावली. परंतु त्यानें घोरीचा सुभेदार कुतुबुद्दिन याच्या त्रासानें लवकरच आत्महत्या केली. पुष्कळ राज्याच्या घडामोडी व रक्तपात होऊन शेवटीं मारवाडच्या मालदेव राठोरच्या ताब्यांत हा प्रांत गेला व मग अकबर बादशहानें हा प्रांत आपल्या राज्याचा एक सुभा केला. इ. स. १७२१ मध्यें मोंगलराज्यास उतरती कळा लागली असतां अजमीर पुन्हां मारवाडचा राजा जसवंतसिंग याच्या अजितसिंह नामक मुलानें आपल्या ताब्यांत घेतलें. कांहीं वर्षांनीं अजमीरचा किल्ला व प्रांत मराठ्यांच्या ताब्यांत आला व शेवटीं सिंद्याच्या कडून इंग्लिशांनीं इ. स. १८१८ मध्यें तो आपणाकडे घेतला.

जुन्या इतिहासाला मदत होईल अशा इमारती किंवा जुन्या पुराण्या वस्तू व ठिकाणें अजमीर व पुष्कर सोडून बाहेर क्वचितच आहेत. अजमीर प्रांताच्या आग्नेय भागांत अतिशय पुरातन हिंदू देवळांचे अवशेष आढळून येतात.

इ. स. १९०१ च्या खानेसुमारी प्रमाणें (अजमीर २६७४५३ व मेरवाड १०९४५९ ) अजमीर व मेरवाडची लोकसंख्या ४७६९१२ ( १९११ मध्यें ५०१३९५ ) होती. ती इ. स. १८९१ च्या मानानें फारच कमी आहे व त्याचें कारण म्हणजे दुष्काळ. दर चौरस मैलाला लोकसंख्येचें प्रमाण १७६ पडतें; तेंच इ. स. १८९१ मध्यें २०० होतें. ह्या प्रांतांत ४ मोठीं शहरें व ७४० गांवें आहेत. लोकसंख्येच्या मानानें पुरुषांचें प्रमाण शेंकडा ५२.६ आहे. इ. स. १९०१ मध्यें

| | | पुरुष. | बायका |
|---|---|---|---|
| अविवाहित | १७६३३८ | ११३९४३ | ६२३९५ |
| विवाहित | २३२९२० | ११६४६९ | ११६४५ |
| विधुर व विधवा | ६७६५४ | २०६१४ | ४७०४ |

अशा तऱ्हेची स्थिति होती. तान्ह्या मुलांचीं लग्नें होत नाहींत दोन किंवा जास्त बायका करण्याचा प्रघात नाहीं. बायकांना दोन नवरे तर ठाऊकच नाहीं. मुसुलमानांत घटस्फोट चालू आहे. विधवाविवाह जाट वगैरे जातींत लागतात. मेरवाड मध्यें जिंदगी बापाकडून न मिळतां आईकडून मिळते. अजमीर मध्यें सर्व इस्टेट वडील घराण्यांतील वडील मुलाकडे जाते. लहान मुलांना मारण्याचा प्रघात कोठेंहि नाहीं.

येथील भाषा राजस्थानी व हिंदी ह्या आहेत. एकंदरींत लोक उद्योगी व चांगल्या वर्तनाचे आहेत परंतु दुष्काळाच्या दिवसांत मेरवाडांतील मेर व अजमीरचे मिन लोक दरवडे वगैरे घालतात. लोक शरीरानें धष्टपुष्ट असून चांगले काटक असतात. येथें हिंदुलोकांच्या खालोखाल मुसुलमान लोक आहेत. येथील हिंदु वैष्णव, शैव व शाक्त या तीन पंथांचे आहेत. शेंकडा ५५ लोक शेतकीवर उपजीविका चालवणारे आहेत. कांहीं लोक विणकाम व कातडीं कमावणें हे धंदे करतात. वरच्या वर्गांतील लोक बहुतेक शाकाहारी आहेत.

शहरांमध्यें घरें दगडाचीं बांधलेलीं असतात पण खेड्यांतून तीं मातीचीं केलेलीं असतात. आरोग्यशास्त्रदृष्ट्या घरांची बांधणी चांगल्या प्रकारची नसते.

कसरत, दांडपट्टा, कुस्ती, हे इकडील उघड्या हवेंतील खेळ होत. सध्यां क्रिकेट फुटबाल वगैरे इंग्लिश खेळांचाहि शिरकाव होऊं लागला आहे. लोकांना गाणें बजावणें, सतार, बीन, वगैरेचा नाद विशेष आहे.

येथील हिंदुलोकांचे मुख्य सण म्हणजे होळी, दिवाळी, दसरा व तेजाजीका मेळा. व्यापारी लोक गांगोर नांवाचा एक सण पाळतात. पार्वतीदेवी आपल्या बापाकडे परत गेली त्याचा हा उत्सव असतो. तेजाजीका मेळा हा जाटांचा उत्सव आहे. तेजाजी म्हणून एक प्रसिद्ध योद्धा होऊन गेला.

येथील शेतकीची स्थिति समाधानकारक नाहीं. कारण खोल उत्तम मातीच्या जमिनी येथें नाहींत. खडक पुष्कळ वर आलेले आहेत. पाऊस थोडा पडून अनियमित असतो. ह्यामुळें खत फार टाकावें लागतें.

येथील मुख्य पिकें म्हणजे ज्वारी, मका, कापूस, गळिताचीं धान्यें आणि गहूं हीं आहेत. पुष्करच्या आसमंतभागांत उंसाची लागवड करतात व तोडगड तहशीलमध्यें अफूचीं झाडें लावतात. एक हिवाळ्यांत व एक वसंतऋतूच्या वेळीं अशीं दोन पिकें काढतात.

जमिनीचा खंड पिकाच्या रूपानें देतात. उत्पन्नाच्या $\frac{1}{2}$ पासून $\frac{1}{3}$ पर्यंत मालकाला खंड मिळतो. कांहीं पिकांच्या बाबतींत खंडादाखल पैसे देतात. मजुराचा रोजमुरा २ आणे पासून ४ आणेपर्यंत असतो. गंवडी, सुतार, लोहार, यांना रोज ४ आणे ते ८ आणे पर्यंत मिळतात. खेड्यांतून बलुत्याची वहिवाट आहे.

शहरांत मध्यम वर्गांतील लोक खाऊनपिऊन सुखी आहेत. पण खेड्यांत शेतकरी लोकांची स्थिति इ. स. १९०१ मधील दुष्काळापासून अजून सुधारली नाहीं.

अजमीर मेरवाडच्या डोंगरामध्यें धातूंच्या खाणी पुष्कळ आहेत. अजमीरच्या उत्तरेकडील डोंगरामध्यें लोखंड व तांबें यांच्या खाणी आहेत. व तारागडच्या डोंगरांत शिसें सांपडतें.

अजमीरमध्यें कलाकुसरीचीं कामें किंवा उद्योगधंदे विशेष म्हणण्यासारखे नाहींत. मेरवाडबद्दल तर बोलावयासच नको. कांहीं ठिकाणीं मागावरील कापड, हस्तीदंती व लाखेच्या बांगड्या करतात. अजमीरच्या तुरुंगांत गालिचे व सतरंज्या होतात.

या प्रांताची राज्यव्यवस्था एका कमिशनरकडे असते. तो अजमीर शहरीं राहतो. तोच मुख्य न्यायाधीश असून पोलीसखातें, जंगलखातें, शिक्षणखातें यांच्यावर त्याचा अधिकार चालतो. ह्याच्या हाताखालीं दोन असिस्टंट कमिशनर्स असतात. एकंदर या प्रांताच्या तीन तहशिली केल्या आहेत. अजमीर, बेवार व तोडगड. राजपुतान्यांतील गव्हरनर जनरलचा एजंट हाच चीफ कमिशनर असतो.

अजमीर येथील जमीनधाऱ्याची पद्धत राजपुतान्यांतील इतर संस्थानांप्रमाणेंच आहे. जमिनीचे दोन भाग केले आहेत. एक खालसा व दुसरी इस्तिमरारि—सैन्यांतील नोकरी करितां दिलेली जमीन. परंतु मराठ्यांच्या ताब्यांत हा मुलुख आला तेव्हां क्षत्रिय बाण्याला उत्तेजन देणें त्यांना हितावह नसल्यामुळें त्यांनीं सैन्यांतील नोकरीच्या ऐवजीं एक ठराविक पैशांच्या रूपानें मोबदला घेणें सुरू केलें. ब्रिटिशांच्या ताब्यांत हा मुलुख गेल्यावर त्यांनीं ही खंडणी पुष्कळ वाढवली; परंतु इ. स. १८७३ मध्यें इस्तिमदार लोकांना सनदा देण्यांत येऊन त्यांची खंडणी एकदांच ठरविण्यांत आली आहे.

दुसरी एक ध्यानांत घेण्याजोगी पद्धत म्हणजे “भूम” होय. अशा जमीनीच्या मालकाला भूमिया म्हणतात. ही पदवी मानाची समजली जाते. पूर्वी भूमियांचीं कामें तीन प्रकारचीं असत—१ ज्या गांवांत भूम असेल त्याचें रक्षण करणें. २ जे पांथस्थ उतारू असतील त्यांच्या मालमत्तेचें रक्षण करणें. ३ कांहीं गुन्ह्यापासून झालेलें नुकसान भरून देणें. सध्यां ह्या लोकांचें काम म्हणजे दंगेधोपे झाल्यास सरकाराला मनुष्यसाहाय्य करणें हें आहे.

मेरवाडमध्यें ब्रिटिशांच्या पूर्वी एक सत्ता कायम नसल्यामुळें तेथें जमीनधाऱ्याची पद्धत वगैरे कांहीं एक नव्हती. इ. स. १८५१ मध्यें जी मोजणी झाली त्यावेळीं (अजमीर) सर्व जमीन कसणाऱ्यांना जमिनीचे मालक करण्यांत आलें.

दुसरी उत्पन्नाची बाबत म्हणजे अफूवरील कर. ह्या देशांतून चीनमध्यें अफू पुष्कळ जात असे.

येथील शिक्षणसंस्थांत शिकणारे विद्यार्थी अलाहाबाद युनिव्हर्सिटीच्या परिक्षेस बसतात. इ. स. १९०२–३ मध्यें ४७१८ मुलें येथील शाळांमधून शिक्षण घेत होतीं. स्त्रीशिक्षणहि वाढत्या प्रमाणावर आहे. इ. स. १९०३ मध्यें शाळेंत जाणाऱ्या मुलींची संख्या १८४० होती.

**अजमीर शहर**—राजपुतान्यांतील अजमीर-मेरवाड प्रांतांतील एक मुख्य शहर. उत्तर अक्षांश २६°, २७' आणि पूर्व रेखांश ७४°, ३७' हें शहर मुंबईच्या उत्तरेस ६७७ मैल आहे. लोकसंख्या (१९११) ८६,२२२ इ. स. १८७९ सालापासून येथें आगगाडी झाल्यामुळें लोकसंख्या सारखी वाढत आहे. या शहराच्या इतिहासाविषयीं अजमीर मेरवाड पहा

हें शहर तारागड डोंगराच्या पायथ्याशीं वसलेलें आहे. रुंद रुंद रस्ते व कांहीं इमारती सुंदर असून शहराभोवतीं एक दगडी तट बांधलेला आहे. त्यास पांच दरवाजे आहेत. तट हल्लीं सुस्थितींत नाहीं. तारागड डोंगरावर किल्ला बांधलेला असून किल्ल्याच्या टप्प्यांत शहर वसलेलें आहे. पायथ्यापासून किल्ला सुमारें १३००।१४०० फूट उंच आहे. इ. स. १८३८ सालीं किल्ला निकामी करण्यांत आला व इ. स. १८६० सालापासून या किल्ल्याचा उपयोग नसिराबाद आणि. मह्रू येथें असलेलें गोरें सैन्य उन्हाळ्यांत राहण्यास करतें; किल्ल्यांत मुसुलमान फकीर सय्यद हुसेन याची कबर आहे. शके १६६१ मध्यें दिल्ली घेतल्यानंतर नादीरशहा या पिराच्या दर्शनास येणार होता असा उल्लेख आहे (रा. खं ६–१३३,२४४). तो फकीर हा कीं मुइन उद्दीन हें सांगतां येत नाहीं.

अजमीर येथें प्राचीन इमारती पुष्कळ आहेत अढाइ-दिनका झोंपडा नांवाची एक प्रसिद्ध मशीद बरीच जुनी आहे. प्रथमतः ही मशीद चव्हाण राजा विशालदेव यानें बांधलेली वेदशाळा होती परंतु महमद घोरीनें हीस मशिदीचें रूप दिलें. असें सांगतात कीं महमद घोरी या शाळेवरून जात असतां अडीच दिवसांनीं येथें परत आल्यावर त्या शाळेची मशीद झालेली असली पाहिजे व याच मशिदींत मी निमाज पढेन असें त्यानें फर्मावलें होतें. म्हणून या मशिदीस अडीच दिवसांचें झोंपडें असें नांव मिळालें आहे. मशीद हल्लीं चांगल्या स्थितींत आहे. दिल्ली जवळील कुतुबमिनार व ही मशीद साधारण एकाच वेळीं बांधलेलीं आहेत. अजमीरपासून दहा मैलांवर पुष्कर तीर्थ नांवाचें प्रसिद्ध सरोवर आहे. ( पुष्कर पहा ).

अनासागर तलावाच्या बांधावर शहाजहान बादशहानें बांधलेलीं पांच संगमरवरी क्रीडागृहें फारच रम्य आहेत. यांपैकीं एकच मोडकळीस आलें असून बाकीचीं सुस्थितींत आहेत. पूर्वी यांपैकीं तीन क्रीडागृहांत ब्रिटिश अंमलदार रहात असत. हल्लीं त्यांना पूर्वीच्या स्थितींत ठेवलें आहे.

दरगा ख्वाजा साहेब नांवाची दुसरी इमारत येथें पहाण्यासारखी आहे. हींत मुइनउद्दीन खिस्ती नांवाच्या फकीराची कबर आहे. हा सुमारें इ. स. १२३५ सालीं मरण पावला. येथें दरवर्षी रजब महिन्यांत उरूस भरत असतो. दरग्यांत अकबर, शहाजहान यांनीं बांधलेल्या मशिदी आहेत. अकबर बादशहानें बांधलेल्या मशिदींत चितोडच्या लुटींत मिळालेला चौघडा आणि पितळी समया ठेवलेल्या आहेत.

अजमीरचा किल्ला अकबरानें बांधला. किल्ला चौकोनी असून प्रत्येक कोंपऱ्यावर अष्टकोनी बुरुज आहेत. मोंगल बादशहा अजमीरास असतांना याच किल्यांत त्याचा मुक्काम असे. मराठ्यांच्या वेळीं हेंच त्या प्रांताचें मुख्य ठिकाण होतें. हल्लीं किल्ल्यांत तहशिलीची कचेरी ताहे. मूळ इमारतींत पुष्कळ फेरफार केल्यामुळें पूर्वीचें रूप पार पालटून गेलें आहे. शहराभोंवतालचा तट याच वेळचा असून त्यास दिल्ली, मदार, उस्री, आग्रा आणि तिरपोलिया दरवाजे आहेत.

अनासागरपासून जवळच सतराव्या शतकांत जहांगीर बादशहाचे वेळीं तयार केलेला दौलत बाग असून त्यांत जुने पुष्कळ वृक्ष आहेत. त्यावर हल्लीं म्युनसिपालिटी देखरेख करीत असून गांवांतील लोकांचें फिरावयास जाण्याचें हें एक मुख्य ठिकाण आहे.

व्या पा र आणि उ द्यो ग धं दे—अजमीर हें एक महत्त्वाचें रेलवे स्टेशन आहे. येथें पुष्कळ नामांकित पेढ्या असून त्यांचा व्यापार आसपासच्या संस्थानांत चालतो व कांहींच्या शाखा हिंदुस्थानांतील सर्व मुख्य मुख्य शहरांत आहेत.

इ. स. १८६९ पासून येथें म्युनिसिपालिटी अस्तित्वांत आहे. सन १९०२-३ सालीं हिचें उत्पन्न १८३००० रुपये होतें. येथें सन १८९१-२ च्या दुष्काळनिवारणार्थ काढलेल्या कामांत फॉय सागर तलाव बांधलेला असल्यामुळें गांवास पाण्याची सोय फार उत्तम झाली आहे.

शि क्ष ण—मेयो कॉलेज व सरकारी आर्टस कॉलेज या शिक्षणविषयक संस्था येथें आहेत. मेयो कॉलेजमध्यें संस्थानिकांचीं मुलें शिक्षण घेण्यास येतात.

अजमीर येथें तुरुंग व मोठें हॉस्पिटल आहे. राजपुतान्यांत भरभराटींत असलेलीं जीं एकंदर नऊ शहरें आहेत त्यांत अजमीर हें दुसऱ्या नंबरचें शहर असून १८८१ पासून या शहराची संख्या प्रत्येक खानेसुमारींत वाढलेलीच दृष्टीस पडते. अजमीर व विकानेर याखेरीज सर्व शहरांची लोकसंख्या कमी झाल्याचें आढळत असल्यामुळें अजमीर व विकानेर येथील वाढ विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. शिवाय जननाची नोंद योग्य प्रकारें केली जात नाहीं असें असतांहि अजमीर शहराची लोकसंख्या वाढती असल्याचें खानेसुमारींत दिसत आहे. तथापि अजमीरच्या लोकसंख्येंत शेंकडा ४७ इतर संस्थानें व जिल्हे यांमधून आलेले बहिरागत आहेत हें लक्षांत घेतां खुद्द अजमीरांत जननापेक्षां मृत्यूच अधिक होत असावे असें अनुमान निघतें. बहिरागतांपैकीं सुमारें $\frac{1}{४}$ संयुक्त प्रांतांतील असतात. अजमीर हें बहुतेक सर्वजातीय वस्तीचें शहर आहे; सर्वांत अधिक लोकसंख्या मुसुलमान शेख जातीच्या लोकांची असून पुढें ब्राह्मण, पठाण, कोळी, महाजन, रजपुत, खिस्ती, सय्यद, कायस्थ व इतर असा संख्यानुक्रम लागतो. बहुतेक बाहेरून येणारे लोक सहकुटुंब येतात यावरून ते कायम वस्ती करण्याकरितां येतात असें दिसतें.

येथें तीन हॉस्पिटलें व एक नर्सिंग असोसिएशन आहे. दोन कॉलेजें, तीन हायस्कूलें, दोन मुलींच्या व कांहीं मुलांच्या शाळा, रेलवे टेक्निकल स्कूल वगैरे शिक्षणसंस्था आहेत. हिंदु, मुसुलमान व यूरोपियन यांच्या इतर संस्था आहेत. येथें चार वर्तमानपत्रें निघतात. राजपुतान्यांत अनेक ठिकाणीं ज्यांच्या शाखा आहेत अशा व्यापारी कंपन्या येथें पुष्कळ आहेत. अजमीर जेलमध्यें सतरंज्या, गालीचे चांगले सुबक तयार होतात. येथील चंदनी फण्या व माळा प्रसिद्ध आहेत. दोन जिनिंगचे कारखाने, चार पिठाच्या गिरण्या, बर्फाचे दोन कारखाने व लोखंडी ओतकामाचा कारखाना येथें चालतो.

अ ज मी र श ह र व त्या चें नां व यां ची उ त्प त्ति— कर्नल टॉड म्हणतो* कीं पुष्कराचा अजपाल नांवाचा गुराखी चोहान राजा बुसिल्देव ( वीसल देव ) ह्याचा पूर्वज होता, व त्यानें हें शहर बांधिलें व ह्या शहराचें नांव त्याच्या नांवावरून पडलें.

* Annals of Rajasthan. Vol I. p. 663 f.

†कनिंगहॅम्‌चें मत असें आहे कीं अजमीरची स्थापना चोहान अथवा चाहमान राजा अजयपाल ह्यानें केली. हा राजा इ. स. ८१९ पूर्वी होऊन गेला. कनिंगहॅम्‌नें फेरीस्ताचा आधार घेऊन हें शहर फार प्राचीन आहे असें ठरविलें आहे; कारण फेरिस्ता "अजमीरच्या राजाचा" उल्लेख इ. स. ६८४ त करतो. गझनीच्या महमूदानें इ. स. १०२५ त सोमनाथावर स्वारी करतांना अजमीर लुटलें होतें.

राजपुताना + गॅझेटीअरमध्यें अजमीरच्या स्थापनेचा काल इ. स. १४५ व स्थापनकर्त्याचें नांव राजा अज, "पहिला चोहान अन्हल याचा वंशज" असें दिलें आहे.

प्रो. लासेन् साहेबांचा × असा तर्क आहे कीं ह्या शहराचें मूळचें नांव अजमीढ असें असावें व त्या नंतर त्या ठिकाणीं 'अजमीर' असें पुढें नांव पडलें असावें. टॉलेमीनें ( सुमारें इ. स. १५० ) ह्याच शहराचा गगस्मिर ( Gagasmira ) ह्या नांवानें उल्लेख केलेला आहे,

नयचंद्राच्या हम्मीर महाकाव्यांत ( १. ५२ ) चोहान वंशांतला चाहमान याचा तिसरा उत्तराधिकारी अजयपाल यानें अजयमेरु किल्ला स्थापिला असें लिहिलेलें आहे.

प्रवन्ध चिंतामणि* नामक ग्रंथांत चाहमान राजांची एक आनामिक यादी छापलेली आहे. त्या यादींत चोहान वंशांतील चवथा राजा अजय राज ह्याला 'अजय मेरु दुर्गणारकः' असें म्हटलेलें आहे. ह्या चोहान वंशाचा आरंभ सन ६०८ मध्यें झालेला आहे.

अजमीर हें शहर फार प्राचीन कालचें आहे ह्याविषयीं वर दिलेल्या सर्व प्रमाणभूत ग्रंथांचें एकमत आहे.

परंतु, डॉ. जे. मॉरिसन् साहेबांनीं चाहमानांच्या वंशावरील लेखांत § "विसावा राजा अजयराज अथवा सल्हण" ह्याच्या खालीं पृथ्वीराजविजय नामक ग्रंथांतून एक लहानशी टिप्पणी दिलेली आहे. त्या टिप्पणींत ¶ ह्या राजानें अजयमेरु बांधिला असें विधान केलें आहे. ह्याप्रमाणें ह्या शहराची संस्थापना उत्तरकालीन आहे असें ठरविलें आहे.

अजय राजानें इ. स. ११०० व ११२५ ह्या कालामध्यें अथवा त्या सुमाराला राज्य केलें असावें, आणि अजयमेरु त्याच सुमाराला बांधला असावा ह्याला प्रमाण असें आहेः—

अजयराजाचा मुलगा अर्णोराज ह्यानें गुजराथचा जयसिंह सिद्धराज ह्याची मुलगी कांचनदेवी इच्याशीं लग्न केलें‡. ह्यावरून तो जयसिंह-सिद्धराज ह्याच्याशीं समकालीन असावा व त्यापेक्षां लहान असावा असें ठरतें. जयसिंह-सिद्धराजानें इ. स. १०९४ ते ११४३ पर्यंत राज्य केलें. जयसिंहाचा उत्तराधिकारी कुमारपाल ह्यानें अर्णोराज अथवा आनाक ह्याच्याशीं जयशाली लढाई केली.† ह्या लढाईचा शेवट इ. स. ११४९-५० अथवा ११५०–५१ मध्यें झाला.* अर्णोराजाचा दुसरा पुत्र चवथा विग्रह अथवा वीसलदेव ह्याच्या अजमीराच्या अंकीत लेखाचा काल × इ. स. ११५३ आहे. ह्यावरून दिसून येतें कीं अर्णोराज इ. स. ११५० व ११५३ ह्यांच्यामध्यें मरण पावला असावा म्हणून अर्णोराजानें बाराव्या शतकाच्या दुसऱ्या पादांत व त्याच्या बापानें इ. स. ११०० वि ११२५ ह्या कालामध्यें अथवा त्या सुमाराला राज्य केलें असावें.

पृथ्वीराजविजय हा ग्रंथ दुसऱ्या पृथ्वीराजाच्या काळीं म्हणजे बाराव्या शतकाच्या शेवटच्या पादांत रचिलेला आहे. हम्मीरमहाकाव्य १४ व्या शतकाच्या शेवटीं व फेरिस्ताची हकीगत १६ व्या शतकाच्या शेवटीं लिहिलेली आहे. ह्यावरून, व एकट्या पृथ्वीराजविजयांतच दिलेली चाहमानांची वंशावलि अंकित लेखांतील वंशावलीशीं जुळते असें डॉ. मॉरिसन साहेबांनीं म्हटलें आहे, ह्यावरून, ह्या ग्रंथाचें प्रामाण्य जास्त महत्त्वाचें आहे असें ठरतें.

प्राचीन अरब भूगोलशास्त्रवेत्ते ह्या अजमीर शहराचा उल्लेख करीत नाहींत. फक्त प्रभावकचरितांत + ह्याचा उल्लेख आलेला आहे. अजमीर ही चाहमानराजांची राजधानी फेरिस्ताच्या वेळेस असावी. ह्या राजांची सत्ता पूर्व राजपुतान्यांत इ. सनाच्या ६ व्या शतकापासून होती. ह्यावरून फेरिस्तानें चुकीनें शाकम्भरींच्या चाहमानांना "अजमीरचा राजा" असें म्हटलें असावें. ह्या सर्व गोष्टींवरून पृथ्वीराजविजयांतलेंच विधान बरोबर आहे असें ठरतें.

तें विधान असें कीं शाकम्भरीचा विसावा चाहमान राजा अजय हा ह्या स्थलाचा संस्थापक होता व तें शहर उत्तरकालीन आहे असें म्हणणें इतिहासाला अनुसरून आहे.

अजयमेरु नांवाचा अर्थ पृथ्वीराजविजयांत / दिल्याप्रमाणें "अजयराजानें केलेला मेरु" असा आहे. अशीं दुसरीं पुष्कळ नांवें प्रचलित आहेत. उदाहरणार्थ, जेसलमेरु, कमलमेर

† Archaeological Survey Reports Vol. II, p. 252 ff.

+ Rajputana Gazetteer, Vol. II. p. 14.

× Indische Alterthumskunde. Vol III. p. 151

* Bombay edition of the Prabandhachintamani P. 52 ff.

§ Vienna Or. Journal, Vol VII. p. 191.

¶ Prithvirajavijaya. Sarga V, 77, 99, 100, 102.

‡ पृथ्वीराजविजय सर्ग ७

† Gujarat Chronicles.

* Epigraphia Indica. Vol II p. 422

× Indian Antiquary Vol. XX. P. 201. The date is that of the incision of Vigraha's Harakelinataka.

+ XXII. 420.

/ V 100.

Indian. Antiquary. Vol XXVI P. P. 262—164

( कुम्भलमेरु ), बाल्मेर अथवा बामेंर् ( बाहडमेरु ), झांजमेर ( झांझमेरु ), अजमीरगड ( अजयमेरुगढ ).

अजमीरचा मराठेशाहीशीं संबंध बराच येतो.

(१) अजमीर सुभ्याची सुभेदारी मल्हारराव होळकर व जयाप्पा शिंदे यांस दिल्लीचा बादशाहा व मराठे यामध्यें (१७५०) झालेल्या करारनाम्यानें मिळाली ( रा. खं. १.१.४ ).

(२) जोधपूरवर स्वारी करतांना अजमीर हें महत्त्वाचें लष्करी ठाणें होतें. सन १७५८ त राजे विजेसिंग यांनीं अपाजी शिंद्याचीं ठाणीं काढून लावलीं होतीं, म्हणून मराठ्यांनीं अजमीरास जमून जोधपूर व मिरतं ह्या तालुक्यांतील गांव जमीनदोस्त करून टाकिले. ( रा. खं. १-४८-८८ ).

(३) पुढें तो सुभा होळकरास इनाम मिळाला असावा. शके १७६४ त पठाण दिल्लीवर येणार अशी बातमी आल्यामुळें पातशहानें शिंदेहोळकरांस मदतीला बोलाविलें. त्या मदतीबद्दल अजमीर सुभा मल्हाररावास पातशाहानें दिला ( रा. खं. ६. १.८२ ).

**अजमीरीगंजः**—आसाम प्रांत. सिल्हेट जिल्हा. हबीगंज विभाग. २४° ३३' उत्तर अक्षांश व ९१° १५' पूर्व रेखांश. हा सुर्मा नदीतरीं सहाशें लोकवस्तीचा गांव आहे. येथें व्यापार बराच चालतो येथून तांदूळ, सुकी मासळी, बांबू, चटया वगैरे बाहेर देशीं पाठवितात.

**अजमेर**—हें एक काठेवाडमधील अगदीं निराळें संस्थान होतें परंतु अलीकडे नवानगरमध्येंच याचा समावेश होतो. लोकसंख्या पांचशें वर.

**अजमोदल**—( थायमोल ) हा ओंव्यापासून काढतात. बाह्योपचारांत याचा उपयोग परोपजीवी कीटकांचा नाश करण्याकरितां तसेंच इसब आणि 'प्सोरीआसिस' यांच्या कांहीं विवक्षित स्थितींत होतो. याचा अल्कहल द्रव गजकर्ण, दद्रु यावर लावतात. क्षतांत, सन्निपातज्वरांत याचा अंत्रकोथघ्न या दृष्टीनें उपयोग करतात. परंतु त्याचा मुख्य उपयोग ( Ankylostome duodenale ) अँकिलोस्तोम डयुओडिनेलचा नाश करण्याकरितां कृमिघ्न म्हणून होतो. अजमोदलच्या योगानें मूत्रास हिरवा रंग येतो. अजमोदल अदिद हें औषध अमेरिकेमध्यें सरकारी दवाखान्यांतून वापरतात. तें अजमोदल आणि अद यांचा संयुक्त पदार्थ आहे. हें औषध ॲरिस्टॉल किंवा ॲनिडॅलिन या नांवानें प्रसिद्ध आहे. अदप्युत्तिकाच्या ऐवजीं याचा उपयोग करितात व तें कमी विषारी आहे. "ग्लायकोथायमोलिन" या नांवाचें औषध श्लेष्मल आंत्राच्या शैत्यविकारावर वापरतात. नख्तलीन, कापूर, व अजमोदल यांचें मिश्रण "थायमोलिन" या नांवानें बाजारांत विकत मिळतें.

अजमोदलची रासायनिक घटना क१०उ१४प्र किंवा क६उ३ ( प्रउ ) ( कउ३ ) ( क३उ७ ) [ १:३:६ ] अशी आहे. अजमोदल हा मथिलतुल्यमेदिलभानल ( मेथिल इसो प्रापिल फिनोल ) असून कंठिजरल ( कारव्हाक्रोल ) याशीं तुल्यरूपी ( समघटक ) आहे. हा सुगंधी असून उत्कर्ब 'सायमीन' क१०उ१४ आणि 'थायमीन' क१०उ१६ यांबरोबर ओंव्याच्या तेलांत व दुसऱ्या तेलांत असतो. या तेलांतून अजमोदलचें निष्कासन करण्याकरितां त्यांत सौम्य दाहक पालाशचा जलद्रव घालून चांगलें हलवून मिश्रण करावें. व हा द्रव गाळून आलेल्या गळणांत उद्धराम्ल घालावें म्हणजे अजमोदलचा निपात येतो. तो गाळून वाळवून ऊर्ध्वपतनानें शुद्ध करावा.

अजमोदल मेन्थोनपासून कृत्रिम रीतीनें करतां येतो. याकरितां मेन्थोनचा हरपुत्तिकांत ( क्लोरोफॉर्म ) करून त्यावर स्तंभनची क्रिया करावी म्हणजे द्विस्तंभ मेन्थोन तयार होतो. यांतून उद्-स्तंभाम्लाचे दोन अणू काढले म्हणजे अजमोदल तयार होतो. अजमोदलचे स्फटिक मोठे चपटे व निर्वण असतात. यांचा रसांक ४४° श. असून उत्क्वथनांक २३०° श असतो. अजमोदल आणि स्फुरगंधकिद यांचें पातन केलें म्हणजे सायमीन तयार होतो.

अजमोदल यास ओंव्याचा तिखट वास असून रुचि तीक्ष्ण असते. अल्कहल, इथ्र, हरपुत्तिक किंवा ऑलिव्ह ऑईलमध्यें अजमोदल विद्राव्य आहे, परंतु थंड पाण्यांत तो प्रायः अविद्राव्य आहे. हा कर्बाम्लापेक्षां ( कॅर्बोलिक ॲसिड ) फार शक्तिमान पूतिनाशक आहे परंतु याच्या अविद्राव्यतेमुळें याचा या कामीं उपयोग करण्यास अडचण येते. याचा संपृक्त जलद्रव ( एक भाग १००० भाग गरम पाण्यांत ), अजमोदल पट्टी व मलम यांचा उपयोग औषधी कामांत होतो.

**अजमोदा**—ह्यास इंग्रजींत Celery Seed हें नांव आहे. ही एक ओंव्याची जात आहे. हें झाड वार्षिक आहे. हें झाड हिंदुस्थानांत पुष्कळ ठिकाणीं होतें. बंगाल्यांत विशेषेंकरून याची लागवड फार होते. याची उंची सुमारें दीड हात असते. व ह्यास पांढरे रंगाचीं बारीक फुलें येतात. भाजीपाल्याचे मसाल्यांतहि अजमोदा घालतात, व अजीर्णावरहि देतात. ( पदे वनौषधि गुणादर्श )

**अजयगड संस्थान**—बुंदेलखंड पोलिटिकल एजन्सीच्या अधिकारांत असलेलें मध्यहिंदुस्थानांतील एक सनदी संस्थान. उत्तरअक्षांश २४°५'ते २५°१०' आणि पूर्व रेखांश ७९°५०'ते ८०°२१'. क्षेत्रफळ ७७१ चौ. मै. हें विंध्यपर्वतांच्या अगदीं आंत असून पर्वत दऱ्या खोरीं यांनीं हें तुटक झालेलें आहे. यांत केन व बैर्मा या नद्या वाहतात. पावसाचें सरासरी मान ४७ इंच आहे.

अजयगडचे संस्थानिक राजा छत्रसालचे वंशज असून बुंदेले रजपूत आहेत. इ. स. १७३१ मध्यें राजा छत्रसालनें आपल्या राज्याचे हिस्से पाडून दिले. त्यांतील एक ३१ लाखांचा मुलुख व अजयगड त्याचा तिसरा मुलगा जगत्राज यास मिळाला. जगत्राजाच्या मरणानंतर त्याचा मुलगा पहाड-

सिंग याचे आपले पुतणे खुमानसिंग व गुमानसिंग यांच्याशीं तंटे चालू होते. सरते शेवटीं समेट होऊन गुमानसिंगला बांडाप्रांत व अजयगडचा किल्ला मिळाला. गुमानसिंगचा पुतण्या बख्तसिंग, हा त्याचे मागून बांडाच्या गादीवर बसला होता, त्यास इ. स. १७९२ मध्यें अलि बहादुरनें हांकून लावून त्याची अन्नान्न दशा केली. इ. स. १८०३ मध्यें बुंदेलखंड इंग्लिशांचे ताब्यांत आलें तेव्हां त्यांनीं बख्तसिंगला मुलूख देईतोंपर्यंत ३०००० रुपये पेन्शन करून दिलें. इ. स. १८०७ मध्यें त्यांस कोट्रा व पवाई परगण्यांची सनद मिळाली. अजयगडचा किल्ला व सभोंवतालचा प्रांत त्या वेळेस लक्ष्मण दौवा नांवाच्या एक प्रसिद्ध लुटारूच्या ताब्यांत होता. देशांत शांतता प्रस्थापित करणें त्यावेळीं अतिशय जरूर असल्यामुळें इंग्लिशांनीं आपली सार्वभौम सत्ता त्यास मान्य करण्यास लावून तो मुलूख त्याजकडे ठेवला. परंतु मित्रत्वाच्या अटी त्याकडून पाळल्या न गेल्यामुळें इ. स. १८०९ मध्यें कर्नल मार्टिन डेलनें तो मुलूख स्वारी करून जिंकून घेतला. या प्रांताचा बराचसा मोठा भाग त्यावेळेस बख्तसिंगाच्या राज्यांत सामील करण्यांत आला. इ. स. १८१२ त नवी सनद करून हा सर्व मुलूख त्यांत नोंदण्यांत आला.

बख्तसिंग इ. स. १८३७ मध्यें मरण पावला, व त्याचा मुलगा माधवसिंग राज्यावर आला पण तोहि फार दिवस टिकला नाहीं. कारण इ. स. १८४९ मध्यें त्याच्या मरणानें गादी पुनः रिकामी झाली. त्याच्या मागून महिपतसिंग गादीवर आला व तो इ. स. १८५३ मध्यें वारल्यावर त्याचा पुत्र विजयसिंग यास गादी मिळाली; पण तो दोन वर्षांनीं म्हणजे १८५५ मध्यें निवर्तला. तो निपुत्रिक होता व गादीला कोणी वारस न राहिल्यामुळें राज्य सरकारजमा झालें. याच सुमारास बंडास ( १८५७ ) सुरुवात झाली. यावेळेस राजाची आई इंग्रजांशीं फंदफितुरी न करतां मित्रत्वानें वागली म्हणून संस्थान खालसा न करतां गादीचा वारस विजयसिंगाचा भाऊ ( कीं दासीपुत्र ) रणजोरसिंग, वारस कबूल करण्यांत येऊन इ. स. १८५९ मध्यें त्याला गादीवर बसवला. इ. स. १८६२त रणजोरसिंगला दत्तक घेण्याची “ सनद ” मिळाली. व इ. स. १८७७ मध्यें “ सवाई ” किताब वंशपरंपरेनें मिळाला. इ. स. १८९७ मध्यें त्यास के.सि.आय्.इ. हा किताब मिळाला. याला ११ तोफांच्या सलामीचा मान आहे. यास पहिला मुलगा इ.स. १८६६ मध्यें झाला. त्याचें नांव राजाबहादुर भोपाळसिंग.

अजयगडच्या किल्ल्याखेरीज या संस्थानांत दोन ठिकाणें पुराणसंशोधन दृष्ट्या महत्त्वाचीं आहेत. अजयगडच्या ईशान्येस १५ मैलांवर एक खेडें आहे तें पूर्वी एका मोठ्या शहराचें ठिकाण होतें. तें शहर इ. स. ११६५ ते १२०३ मध्यें चंदेल राज्याचा शेवटचा राजा परमाल देव याचा प्रधान बच्छराज यानें वसविलें होतें अशी समजूत आहे. दुसरें ठिकाण म्हणजे गंजपासून २ मैलांवर असलेलें नाचना हें गांव होय. याला पूर्वी कुठार असें म्हणत असत व तें तेराव्या शतकांत सोहनपाल बुंदेला याच्या वेळीं महत्त्वास आलें. तेथें पूर्वी एक मोठें भरभराटीस आलेलें शहर असावें असें पुष्कळ गोष्टींवरून दिसतें व तें चवथ्या शतकांतील म्हणजे गुप्तराजांच्या वेळचें असावें.

इ. स. १९०१ मध्यें संस्थानची लोकवस्ती ७८२३६ होती, त्यापैकीं हिंदु शेंकडा ८९ म्हणजे ७०३६०; वन्य —विशेषतः गोंड शेंकडा ६ म्हणजे ५०६२; व मुसुलमान शेंकडा ३ म्हणजे २३१४ होते. या संस्थानांत राजधानी अजयगड व ४८८ खेडीं आहेत. १९११ त लोकसंख्या ८७०९३ होती.

येथील जाती—ब्राह्मण ११९००, चांभार ९२०० कच्छि, बुंदेले ठाकुर, लोध, अहीर आणि गोंड प्रत्येकीं ३००० ते ४०००. शेंकडा ४० लोक शेतकीवर उपजीविका करणारे आहेत व शें. १७ मजूरीवर राहतात. एकंदर ४०७ चौ. मै. क्षेत्रापैकीं शें. ५३ लागवडीची जमीन आहे. त्यापैकीं शें. १० बाहेरच्या पाण्यावर आहे. १४४ चौ. मै. जंगल आहे. १४१ चौ. मै. लागवडीस योग्य असून पडीत आहे. आणि ७९ चौ. मै. रुक्ष आहे. चणे, कोदन, गहूं, ज्वारी, धान, बाजरी, आणि कापूस हीं येथें होणारीं पिकें आहेत. केन नदीच्या कालव्याचें काम चालू आहे. एके वेळीं लोखंडाच्या खाणी चालू होत्या, पण सध्यां त्या बंद आहेत. कांहीं ठिकाणीं हिरे सांपडतात. बंदुका, तलवारी, पिस्तुलें हीं येथें तयार होतात. या संस्थानचा व्यापार जवळ जवळ कांहींच नाहीं. कारण तें अगदीं डोंगरांत दूर वसलेलें आहे. एकंदर ७२ मैल लांबीचे रस्ते आहेत. त्यांतील २४ मैल पक्के असून ४८ मैल कच्चे आहेत. या संस्थानचें उत्पन्न २$\frac{3}{10}$ लाख आहे. तें बहुतेक सर्व जमिनीचा सारा आहे.

सैन्य—७५ घोडेस्वार, ३५० पायदळ, ४४ गोलंदाज व ९ तोफा, त्याशिवाय ६८ पोलीस व २११ गांव पोलीस आहे. शाळा थोड्या आहेत व त्यांत शेंसवाशें विद्यार्थी शिकत आहेत. अजयगड शहरीं एक दवाखाना आहे. ( इं. गॅ. भाग ५. )

**अजयगड शहर.**—मध्यहिंदुस्थानांतील अजयगड संस्थानचें राजधानीचें शहर. उत्तर अक्षांश २४°.५४' व पूर्व रेखांश ८०°.१८' इ. स. १९०१ मध्यें लोकसंख्या ४२१६.

सध्याच्या राजधानीला “ नवा शहर ” हें नांव आहे. शहराच्यावर किल्ल्याचे तट उंच आकाशांत वर गेलेले दिसतात. हा किल्ला, बुंदेलखंडांतील जे आठ प्रख्यात कोट आहेत, कीं ज्याच्या बळावर बुंदेल्यांनीं मुसुलमानांना दाद दिली नाहीं त्यांपैकीं एक आहे. इ. स. १८०० मध्यें बांडाच्या अल्ली बहादुरनें हा किल्ला नऊ महिने वेढा देऊन घेतला. पण इ. स. १८०३ मध्यें त्याच्याकडून तो लखमन दौवा याच्याकडे गेला व इ. स. १८०९ मध्यें कर्नल मार्टिन डेलनें तो जिंकून घेतला.

किल्ला "केदार पर्वत" नांवाच्या डोंगरावर बांधलेला आहे व तो समुद्रसपाटीपासून १७४४ फूट उंचीवर आहे. पन्नास फूट माथा सोडून चढण सोपी आहे पण पुढें एकदम सुळके आकाशांत गेलेले आहेत. पूर्वीच्या लेखांत या किल्ल्याला जयपुरदुर्ग असें म्हटलेलें आहे. हा ९ व्या शतकांत बांधला गेला हें निःसंशय आहे तरी पण अबुलफझल शिवाय कोणीहि याचा उल्लेख इतिहासांत करीत नाहीं. हा तिकोनाकृति आहे. याला पूर्वी पांच दरवाजे होते पण सध्यां तीन बुजवून टाकण्यांत आले आहेत. तट तीन यार्ड रुंदीचा आहे. वर पाण्याचीं टांकीं पुष्कळ आहेत. तीन जैन मंदिरें उध्वस्त स्थितींत अजून वर दिसतात. तीं १२ व्या शतकाच्या पद्धतीवर बांधलेलीं आहेत. चंदेल राजांच्या वेळचे इ. स. ११४१ ते १३१५ चे दरम्यानचे पुष्कळ शिलालेख आढळून आले आहेत.

या डोंगरावर सागवान व तेंडुचीं झाडें पुष्कळ आहेत. व त्यामुळें किल्ल्याच्या सौंदर्यांत पुष्कळ भर पडते.

शहरांत एक प्राथमिक शिक्षणाची शाळा, टपालगृह, व दवाखाना आहेत. जी. आय. पी. रेल्वेवर हें एक स्टेशन आहे. तेथून महाऱ्याला जाणारा चांगला रस्ता आहे. मोटार, टांगे, बैलगाड्या वगैरेंतून तेथें लोक जातात. नरैनी येथें डाक बंगला आहे. हल्लींच्या राजधानीला 'नौशहर' (नवें शहर) असें नांव असून ज्या डोंगरावर किल्ला आहे त्याच्या उत्तर टोंकाला तें वसविलें आहे. ( ! आनोल्ड-गाईड १९२० )

**अजयपाल.**—( इ. स. ११७३-११७७ ) गुजराथच्या चालुक्य वंशांतील कुमारपालानंतरचा राजा. याच्या बापाचें नांव महीपाल. कुमारपाल निपुत्रीक मेल्यामुळें अजयपाल हा त्याच्या भावाचा पुत्र स. १२२९ मध्यें गादीवर आला [ व्याश्रय काव्य व वेरावळ येथें असलेला पाटणचा अंकित लेख पहा ]. कुमारपालप्रबंधांत म्हटलें आहे कीं, कुमारपालाच्या मनांत आपल्या मुलीचा मुलगा प्रतापमल्ल यास राज्य द्यावयाचें होतें, पण अजयपालानें बंड करून विषप्रयोगानें कुमारपालाचा खून केला. सुकृतसंकीर्तनाचा कर्ता लिहितो कीं अजयपालाच्या दरबारीं असलेलें रुप्याचें छत सपादलक्षा ( शिवालिक ) च्या राजांकडून आलेली नजर होती. जैनग्रंथांत याचा उल्लेख आढळत नाहीं. कीर्तिकौमुदींत अजयपालाचा केवळ नांवाला उल्लेख आला असून प्रबंध चिंतामणिकारानें तर अजयपालानें आपल्या चुलत्यानें बांधलेलीं जैन देवालयें उध्वस्त केलीं असें स्पष्टच म्हटलें आहे. आंबडा वगैरे कुमारपालाचे जैन अमात्य त्याच्या मर्जीत नव्हते. अजयपाल हा निर्दय व गर्विष्ठ स्वभावाचा होता असें दिसतें. उदयपुरच्या अंकितलेखांत इ. स. ११७३ च्या सुमारास सोमेश्वर हा अजयपालाचा कारभारी होता असा उल्लेख आहे. त्यानें कपर्दि नामक इसमास तो ब्राह्मणानुयायी होता म्हणून आपला कारभारी नेमिलें होतें. पण त्याचें पटेनासें झालें तेव्हां यानें त्याला उकळत्या तेलाच्या कढईत टाकण्याचा हुकूम सोडला! दुसऱ्या एका प्रसंगीं त्यानें रामचंद्र नामक एका जैन पंडितास तांब्याच्या तापलेल्या पत्र्यावर बसण्याची शिक्षा दिली. उपर्युक्त आम्रभट उर्फ आंबडा नामक त्याच्या सरदारानें त्याचा हुकूम पाळण्याचें नाकारल्यावरून दोघांमध्यें लहानशी लढाई होऊन तींत आंबडा मारला गेला. स. १२३३ त अजयपालाच्या विज्जलदेव नामक द्वारपालानें त्याचा खंजीर भोसकून वध केला. अजयपाल मुसुलमान झाला होता हें टॉडचें विधान ( वेस्टर्न इंडिया ) खरें मानण्यास सबळ पुरावा पाहिजे. त्याच्या पश्चात् त्याचा पुत्र दुसरा मूळराज हा पाटणच्या गादीवर बसला. मूळराज अल्पवयस्क असल्यामुळें त्याची आई नैकी देवी, कादंबराजा परमादि ( ११४७–११७५ ) याची कन्या, ही सर्व कारभार पाहूं लागली व तिचा भाऊ भीमदेव हा सेनापति झाला. भीमदेव हा मोठा शूर होता. परंतु दोन वर्षांच्या आंतच बाळराजा मूळराजा मरण पावला. [ संदर्भग्रंथ—बॉंबे गॅझिटियर, गुजराथ ]

**अजयसिंह**—( इ. स. १२९०-१३०१ ):—चितोडचा राणा लखमसीच्या पश्चात् चितोडचा खरा वारस अजयसिंह हा मेवाडच्या पश्चिम सरहद्दीवर अरवली डोंगराच्या खोऱ्यांत केळवाडा नामक स्थळ आहे तेथें जाऊन राहिला. लखमसीनें जोहारास निघते समयीं (लखमसी पहा) अजयसिंगास असें सांगितलें होतें कीं तूं वृद्ध होऊन राज्य पाहण्यास असमर्थ होशील तेव्हां तुझ्या मागून तुझा वडील भाऊ ऊरसिंह हा प्रारंभीं या लढाईंत मेल्यामुळें त्याच्या पुत्रास (हमीरास) राज्यावर बशीव. अल्लाउद्दिनाच्या हातीं चितोड आल्यावर तो कांहीं दिवस तेथें राहिला व तेथील देवळें वगैरे उध्वस्त करून त्यानें तें शहर झालोरच्या मालदेव नांवाच्या आपल्या एका सामंताच्या स्वाधीन केलें. मेवाडांत दिल्लीचे शिपाई व स्वार जिकडे तिकडे रक्षणास ठेवले होते. त्यांच्या शिवाय अजयसिंहास डोंगरांतील भील वगैरे लोकांच्या नायकांशींहि झगडावें लागत असे. या सर्वांत पंजा भील म्हणून एक अतिशय बलिष्ठ नाईक होता. त्यानें एकदां शेरो नाल्यावर स्वारी केली व अजयसिंहाशीं गांठ घालून त्याच्या मस्तकावर भाल्याचा वार केला. अजयसिंहास सज्जनसिंह व अजिमसिंह असे अनुक्रमें चौदा व पंधरा वर्षांचे दोन पुत्र होते, परंतु ते ह्या संकट प्रसंगीं कामास आले नाहींत म्हणून अजयसिंहानें हमीर आजोळीं होता त्यास बोलावणें पाठविलें व मुंजाचा सूड घेण्याविषयीं त्यास आज्ञा केली. तेव्हां थोडक्याच दिवसांनीं हमीर मुंजाचें शीर कापून आपल्या चुलत्याकडे घेऊन आला व तें त्यानें त्याच्या पुढें टाकलें. तेव्हां अजयसिंह खुष झाला व तुझ्या कपाळीं दैवानें साम्राज्योपभोग लिहिला आहे असें म्हणून त्यानें आपल्या पुतण्याच्या कपाळीं मुंजाच्या रक्ताचा टिळा लावला. अजयसिंहाच्या दोन मुलांपैकीं धाकटा अजिमसिंह लवकरच केळवाडा येथें मरण पावला. दुसरा सज्जनसिंह राहिला त्यानें हमीराशीं आपल्या पश्चात् राज्याकरितां भांडूं नये म्हणून अजयसिंहानें त्यास देशाबाहेर

पाठविलें. सज्जनसिंह मेवाड सोडून निघाला तो दक्षिणेंत आला व तेथें पुढें त्याच्या कुलांत शिवाजी उत्पन्न होऊन त्यानें महाराष्ट्र देश मुसुलमानांपासून स्वतंत्र केला; मेवाडच्या वखरींत अजयसिंहा पासून शिवाजीपावेतों अजयसिंह, सज्जनसिंह, दलीपसिंह, शिवजी, भोराजी, देवराज, उग्रसेन, माहूलजी, खेलूजी, जनकोजी, सटवाजी, संभाजी आणि नंतर छत्रपति शिवाजी असा वंशवृक्ष दिला आहे. लोकहितवादींनीं माहूलजीच्या जागीं मालोजी व संभाजीच्या जागीं शहाजी अशीं निराळीं नांवें दिलीं आहेत. [ टॉडचें राजस्थान ].

**अजशृंगी** ( मेंढशिंगी )—ह्या वनस्पतीचा वेल असतो. हिला संस्कृतमध्यें मेषशृंगी असेंहि नांव आहे. मराठींत मेंढशिंगी, हिंदुस्थानींत मेंढाशिंगी असें म्हणतात. ह्या वेलीचा रस दुधासारखा असतो. हिचीं फळें मेंढयाच्या शिंगाचे आकाराचीं असतात. ह्या वेलास कांटे असतात. मुख्यत्वें नेत्रविकारावर हिचा उपयोग होतो. मेंढशिंगी वेली खंडाळ्याच्या घांटावर व इतर डोंगरावर वऱ्याच आढळतात. वांतीच्या योगें कफ बाहेर काढणारी ही वनस्पति आहे. हिच्या सालीचाहि औषधाचे कामीं उपयोग होतो. ( पदे-वनस्पति गुणादर्श )

**अजामिल**—पूर्वी, कान्यकुब्ज देशांत राहणारा एक ब्राह्मण होता. यानें, मातापितरांचा, व विवाहित स्त्रीचा त्याग करून, एक शूद्र स्त्री बाळगून, तिच्याशीं विषय सेवन करण्यांत आपलें अमूल्य आयुष्य प्रायः घालविलें. एकदां यानें, तिला झालेल्या संततींतील नारायण नांवाच्या कनिष्ठ पुत्रास सहजरीत्या हांक मारण्याच्या संधीस, विष्णुदूतांचा, व यमदूतांचा संवाद श्रवण केला, तो केवळ याच्याच विषयींचा असल्यामुळें, यास अनुताप होऊन, यानें, त्या दासीचा, व तिच्या संततीचा तत्काळ त्याग करून, उर्वरित आयुष्य गंगाद्वारीं जाऊन भगवद्ध्यानांत घालविलें, त्या योगानें यास उत्तम लोकाची प्राप्ती झाली. ( भाग० षष्ठ० अ० १-२ ).

**अजातशत्रु**—( अजमासें ख्रि. पू. ५५४-५२७ ).—हा शैशुनाग घराण्यांतील सहावा राजा सुमारें ख्रि. पू. ५५४ मध्यें मगधाच्या गादीवर बसला (बुद्धोत्तर जग पृ. १६६;१७१-२ व २४३ पहा). याचीं कूणिक किंवा कूणिय अशीं नामांतरें आहेत. हा गादीवर कसा आला यासंबंधीं बराच मतभेद आहे. याचा पिता बिंबिसार यानें वृद्धापकालीं राज्य आपल्या पुत्राच्या ( अजातशत्रूच्या ) स्वाधीन केलें असें जैन दंतकथा म्हणते, तर अजातशत्रूला गादीवर केव्हां बसेन अशी उत्कंठा लागून त्यानें पित्याचा वध केला असें बौद्ध व ब्राह्मी दंतकथा प्रतिपादन करतात. पुराण बौद्धकथांत हें कृत्य गौतमबुद्धाचा शालक जो देवदत्त त्याच्या चिथावणीवरून झालें असें सांगितलेलें आढळतें [ ऱ्हीस डेव्हिड्स, बुद्धिस्टिक इंडिया]. अखेरी अखेरीस व्हि. स्मिथचें अजातशत्रूच्या पितृवधाची हकीकत बनावट असावी असें मत झालें होतें [ ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया पहा]. बिंबिसाराच्या कारकीर्दींत वर्धमान महावीर व गौतमबुद्ध हे दोन महान धर्मसंस्थापक मगधदेशांत स्वमतप्रसार करीत होते. महावीर अजातशत्रूच्या आईचा एक जवळचा आप्त होता. तो व गौतमबुद्ध हे दोघेहि अजातशत्रूच्या कारकीर्दींतच निवर्तलेले दिसतात. अजातशत्रूची व व गौतमबुद्धाची एकदां मुलाखत झाली असावी. सामञ्ञफल सुत्तांत या भेटीची कथा आहे; त्यांत अजातशत्रूनें आपल्या पितृघाताच्या अपराधाबद्दल पश्चात्ताप दर्शवून बुद्धावर आपली असलेली भक्ति व्यक्त केल्यावरून, गौतमानें त्याला क्षमा केली असें वर्णन आहे. भर्हुत स्तूपावर या प्रसंगाचें चित्र आहे. [ बुद्धोत्तर जग पृ. १४७ पहा ].

कोसलराजाची बहीण अजातशत्रूची सावत्र आई असून, नवऱ्याचा अमानुषपणें वध झालेला पाहून ती साध्वी दुःखातिशयानें मरण पावली. तेव्हां कोसल राजा अजातशत्रूवर चालून आला. पुष्कळ दिवस लढाई चालून शेवटीं मगध राजानें कोसलावर मात केली; व कोसल राजकन्येचें पाणीग्रहण करून त्याच्याशीं तह केला [ व्हि. स्मिथ, अर्ली हिस्टरी. ऱ्हीस डेव्हिड्सनें थोडी निराळी हकीकत दिलीं आहे—बुद्धोत्तर जग पृ. १६८ पहा ].

या जयानें अजातशत्रूची आकांक्षा न शमतां, त्यानें गंगेच्या उत्तरेकडील, हल्लीं ज्याला तिरहूत म्हणतात त्या लिच्छवींच्या राज्यावर स्वारी केली. या देशाची राजधानी वैशाली असून तेथील राजकन्या अजातशत्रूची आईच होती. तरी अजातानें आपल्या आजोबाचा मुलख आपल्या हस्तगत केला. पुढें त्यानें हिमालयाच्या पायथ्यापर्यंतचा प्रदेश आपल्या राज्यास जोडला व अशा रीतीनें गंगा व हिमालय यांमधील भाग मगधराजाच्या अंकित करून सोडला. यानें लिच्छवींनां अटकाव करण्याकरितां शोणतीराच्या उत्तरेस त्याच्या गंगेशीं होणाऱ्या संगमाजवळ पाटली गांवीं एक किल्ला बांधिला व पुढें याचा नातू उदय यानें पाटली नगरांची स्थापना केली. पुढें हें नगर कुसुमपुर, पुष्पपुर किंवा पाटलिपुत्र या नांवांनीं प्रसिद्धीस आलें व मौर्यांच्या अमदानींत मगधाचेंच नव्हे तर अखिल भारताचें केंद्रस्थान बनलें. या नगररचनेचें वर्णन वायुपुराणांत आहे. याचीं तीनहि नांवें पुष्पवाचकच आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे

अजातशत्रु सुमारें ख्रि. पू. ५२७ त वारला.

वरील अजातशत्रूचा काळ व्हि. स्मिथच्या आधारें दिला आहे. परंतु स्वतः स्मिथलाहि हा काळ समाधानकारक वाटत नाहीं. प्रथम त्यानें ख्रि. पू. ५०५-४७५ हा स्थूलमानानें अजातशत्रूचा काळ व ख्रि. पू. ४८७ किंवा ४८६ हा बुद्धनिर्वाणाचा काळ गृहीत धरला होता. ( अर्ली हिस्टरी, १९१४ सालची आवृत्ति पहा ). परंतु या सनांची ख्रि. पू. ५२७ हें महावीराचें निर्वाणाचें परंपरागत साल व त्याची आणि अजातशत्रूची भेट या गोष्टींशीं त्यास संगति जुळवितां न आल्यामुळें महावीर हा बिंबिसाराच्या

कारकीर्दीतच वारला असावा असें म्हणून त्यानें आपली सुटका करून घेतली.

यानंतर खारवेलच्या अंकितलेखाच्या वाचनामुळें सर्वच शैशुनंगांचा काल मागें ढकलणें प्राप्त होऊन अजातशत्रूच्या कारकीर्दीस ख्रि. पू. ५५४–५२७ हा काल यावा लागला. परंतु या कालाशींहि महावीर व बुद्ध हे बिंबिसार व अजातशत्रु यांचे समकालीन होते व ते अजातशत्रूच्या कारकीर्दीत मरण पावले ही परंपरागत समजूत नीट जुळेना. तेव्हां या चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याच्या भानगडींत न पडतां महावीर-निर्वाणाचें साल ख्रि. पू. ४७७ असावें या याकोबीच्या मताच्या उल्लेखानें एकंदर प्रश्न अधिकच गूढ करून, यासंबंधाचा कालनिर्णय समाधानकारक झालेला नाहीं असें म्हणून तो मोकळा होतो.

बिहार आणि ओरिसाच्या रिसर्च ( संशोधन ) सोसायटी ( मंडळा ) च्या जर्नलच्या डिसेंबर १९१९ च्या अंकांत रा. के. पी. जयस्वाल यांनीं राजा अजातशत्रूची मूर्ति संशोधल्याचें वृत्त दिलें आहे [ मॉडर्न रिव्ह्यु फेब्रुवारी १९२० ]. पूर्वी ही यक्षाची मूर्ति म्हणून समजत. पण त्या मूर्तीच्या आसनावर एक लेख आहे त्यांत, सेनि [ श्रेणि ] अज[ात] शत्रु, कुणिक सेवासिनगो ( शिशुनाग ) मगधनम् राज, इत्यादि अक्षरें स्पष्ट आहेत त्यावरून शंका घेण्याचें कारणच नाहीं असें जयस्वाल यांनीं दाखविलें आहे.

**अजाह्वत सरदेशमुखः**—आपल्या मंत्र्याच्या एका नातलगाकरितां शाहूनें ' अजाह्वत सरदेशमुख ' ही एक नवीन जागा निर्माण करून त्या अधिकाऱ्याकडे कुल सरदेशमुखी बाब वसूल करण्याचें काम दिलें होतें. शाहूच्या निधनानंतर बाळाजी बाजीरावानें ती जागा नांवाला मात्र कायम ठेवली. त्यानें अजाह्वत सरदेशमुखास कांहीं जमीन जहागीर करून देऊन दक्षिणच्या सहा सुभ्यांतील सरदेशमुखी गोळा करण्याच्या कामांत ढवळाढवळ करण्याचा त्याचा हक्क काढून घेतला. [ ग्रांट डफ ].

**अजितः**—जैन लोकांतील २४ तीर्थकरांतील दुसरा. यास ते लोक दुसरा अर्हत् असें मानितात. अर्थात मूळ अर्हताच्या मागून हा झाला, असें उघड सिद्ध होतें. जैन लोकांनीं उत्सर्पिणी म्हणजे उत्कृष्ट काळ, आणि अवसर्पिणी म्हणजे निकृष्ट काल, असे जे काळाचे दोन भेद मानिले आहेत, त्यांतील दुसऱ्या कालापैकीं दुःखरूप जो सांप्रतचा पांचवा फेरा त्यांत हा जन्मला होता असें त्यांचें मत आहे. तीर्थंकर होण्यापूर्वीचा जन्म वैजयन्त नांवाचें दुसरें अनुत्तर विमान, जन्मनगरी अयोध्या, पिता जितशत्रु, माता विजयसेनादेवी, देहाची उंची ४५० धनुष्य, रंग सुवर्णासारखा, आयुष्य ७२ लाख पूर्व, दीक्षास्थान सप्तच्छदवृक्ष ( सातवणीचें झाड ), निर्वाण आसन खड्गासन ( कायोत्सर्ग ), निर्वाणस्थान सम्मेदशिखर. त्याच्यानंतर ३० लाख कोटिसागर वर्षांनीं शंभवनाथ झाले. ( जैन-लोकांचा इतिहास. लेखक—" अनंततनय " ). अजितकेशकंबल हा सद्धर्मालंकारांत उल्लेखिलेला महावीरपूर्व तीर्थंकर ( ज्ञानकोश प्रस्तावनाखंड—४ था विभाग ) व अजित एकच आहेत कीं काय याचा शोध केला पाहिजे.

**अजीगर्त**—भृगुकुलोत्पन्न एक ब्राह्मण. यास, शुनःपुच्छ, शुनःशेप, शुनोलांगूल, असे तीन पुत्र होते. त्यांतील मध्यम पुत्र शुनःशेप त्यास, यानें, वरुणास बलि देण्याकरितां हरिश्चंद्रराजास विकलें ( शुनःशेप पहा; हरिश्चंद्र पहा );

२ ( अज्यै गमनाय गर्तं अस्य ) ज्याला जाण्याला बीळ आहे असा—साप.

**अजीव संयुक्त पदार्थ**—या वर्गात हल्लीं परदेशांतून येणारे कृत्रिम रंग येतात. हे सर्व कृत्रिम रंग रासायनिकरीत्या तयार केलेले असतात. त्यांपैकीं प्रमुख म्हणजे क्रिसोइडाइन नांवाचा नारिंगी रंग, बिस्मार्क ब्राउन, फेनिलिन ब्राउन, मॅंचेस्टर ब्राउन इत्यादि पिंगट रंग, गोल्ड ऑरेंज, मंदारिन ऑरेंज, किंवा ऑरेंज नंबर तीन इत्यादि नारिंगी रंग येतात. या वर्गांत कांहीं पिंवळे व तांबडे रंगहि येतात. सेंद्रिय रसायनशास्त्रांत अजीव संयुक्त पदार्थ ( अॅझो कॉंपाउन्डस ) म्हणजे ज्ञ.नःन.ज्ञ' या घटनेचे पदार्थ समजले जातात. या सारणींत ज्ञ=आरिल मूलक आणि ज्ञ'=आदिष्ट उत्कर्विल किंवा आरिल मूलक असें समजावें. ( आरिल हा शब्द आर्य शब्दांतील ऋधातूपासून तयार केला असून त्याचा अर्थ ओजस्विन्, तेजस्विन् हा आहे. इंग्रजी Aryl या शब्दाशीं आरिल या शब्दाचें उच्चार व अर्थसाम्य असल्यानें Aryl=आरिल हा शब्द या कोशांत योजला आहे). नत्र संयुक्त पदार्थां ( नायट्रो कांपाउंडस ) चें उज्जिदीकरण ( रिडक्शन ) करून अजीवि संयुक्त पदार्थ तयार होतात. हें उज्जिदीकरण अम्लद्रवांत केलें असतां त्या जातीचे अमिन पदार्थ तयार होतात, परंतु अल्कीय द्रवांत उज्जिदीकरण केलें म्हणजे अजीवी संयुक्त पदार्थ तयार होतात. हें उज्जिदीकरण करण्याकरितां अल्क आणि जस्ताचा कीस यांचा उपयोग करतात. अजीवी पदार्थ द्वजीवि संयुक्त पदार्थांपेक्षां ( डाय अॅझोकांपाउन्डस ) अधिक स्थिर असतात याचें कारण अजीवी संयुक्त पदार्थांतील द्विपाशबद्ध ( डब्ली लिंक्ड ) नत्रपरमाणु उदीन बीजगर्भांशीं ( बेंझीन न्युक्लिअस ) आसक्त ( अटॅच्ड ) झालेले असतात. या वर्गांत अजीवी रंग ( अॅझोकलर्स ) म्हणून जो महत्त्वाचा रंगवर्ग आहे त्याचा समावेश होतो.

अल्कीय जशद चूर्णाऐवजीं अल्कीय वंगायिता (स्टॅनाइट) 'चाहि उज्जिदीकरक म्हणून उपयोग करतात. याशिवाय द्वजीवित ( डाय अॅझोटाइझ्ड) अमिनाचा संयोग, भानल ( फिनोलिक ) किंवा अमिन घटनातुल्य संयुक्त पदार्थांशीं केला म्हणजे देखील अजीवि संयुक्त पदार्थ तयार होतात, परंतु या अमिन किंवा भानलांतील परस्थान ( पॅरा पोझिशन ) हें मात्र अन्याप्त (फ्री) असलें पाहिजे. द्वजीवि अमिनें ( डायअॅझो

अमाईन्स ) तन्मूलक अनाम्ल ( बेस )आणि त्या अनाम्लाचा उद्धरिद, यांशीं उष्ण केलीं असतां द्यजीवि अमीनांच्या अणूंची पुनर्रचना होऊन मुद्धां हे अजीवि संयुक्त पदार्थ तयार होतात. हे अजीवी संयुक्त पदार्थ अत्यंत रंजित ( कलर्ड ) असतात परंतु त्यांत क्षारोत्पादक, अम्ल किंवा अनाम्ल संघ असल्याशिवाय त्यांचा रंगाचे कामीं उपयोग होऊं शकत नाहीं. प्राणिदीकारकांच्या योगानें यांचें रूपांतर अजीविप्राण (अजीविप्र ? अॅझॉक्सी=Azoxy ) संयुक्त पदार्थांत होतें आणि उज्जिदीकरणा ( रिडक्शन ) च्या योगानें त्यांचें रूपांतर उदजीवि संयुक्त पदार्थांत ( हायड्राझो ) किंवा अमिनांत होतें.

अजीव उदीन ( अॅझोबेन्झिन ) क६उ५नःनक६उ५ हा पदार्थ नत्रउदिनाचें ( नायट्रो बेंझिन ) उज्जिदीकरण अल्क हलांत जशदचूर्ण व दाहक सिंधूनें केलें असतां तयार होतो, किंवा या ऐवजीं अल्कीय वंगस हरिदानें हें उज्जिदीकरण होतें. तें याप्रमाणें:—

नत्रउदिन उज्ज अजीवउदिन पाणी
२क६उ५नत्र२ + ४उ२ = क६उ५नःनक६उ + ४उ२प्र

अजीव उदीनाचे अल्कहलांतून स्फटिक केले असतां ते नारिंगी लाल रंगाचे चपटे स्फटिक होतात. त्यांचा रसांक ६८° श असून उत्क्थनांक २९३° श असतो.

अमिन अजीव संयुक्त पदार्थः—हे पदार्थ लालसर पिवळे किंवा लाल वर्णाचे असतात. हे बहुधा स्फटिकरूप असतात आणि यांचें त्वरित उज्जिदीकरण होतें. नीलीन ( अनीलीन ) आणि निलीन उद्धरिद यांच्या बरोबर हे पदार्थ उष्ण केले असतां इंदुलीनें ( इंदुलाइन्स ) होतात.

या वर्गांतील मुख्य पदार्थांचें संक्षिप्त वर्णन खालीं दिलें आहेः—अमिन अजीवउदीन क६उ५.न२.क६उ४नउ२ ( अॅमिनो अॅझो बेन्झीन ) हा पदार्थ द्यजीव अमिनउदीना ( डाय अॅझो अमिनो बेंझिन ) पासून अणूंच्या अंतस्थ रचनेमुळें तयार होतो. याचे पिवळे चपटे किंवा सुईच्या आकाराचे स्फटिक असतात. यांचा रसांक १२६° श असतो. नत्र अजीव उदीना ( नायट्रो अॅझो बेंझिन ) चें उज्जिदीकरण ( रिडक्शन ) अमोनि गंधकिदानें ( अमोनियम सल्फाइड ) केल्यावर अमीन अजीव उदीन तयार होतो आणि त्याचें (अमीन अजीव उदीनाचे ) उज्जिदीकरण वंगस हरिदानें ( स्टॅनस क्लोराइड ) केल्यावर त्याचें रूपांतर नीलीन ( अनीलीन ) आणि मित भानिलीन द्विअमिन ( मेटा-फेनिलीन डाय अमिन ) यांत होतें. यावरून याची घटना ठरते.

द्वि अमिन अजीव उदिन ( डाय अमिनो अॅझो बेन्झिन ) क६उ५ न२·क६उ३(नउ२)२ हा पदार्थ द्यजीव उदिन हरिदाची ( डाय अझो बेझिन क्लोराइड ) किया मित भानिलीन द्वि अमिनावर ( मेटा फेनिलीन डायअमाइन )केली म्हणजे खालीं दाखविल्याप्रमाणें तयार होतो.

द्वि अजीव उदिन हरिद मितभानिलीन द्वि अमिन
क६उ५नःनह + क६उ४(नउ२)२
द्वि अमिन अजीव उदिन उद्धराम्ल
= क६उ५·नःन.क६उ३(नउ२)२+ उह

हा पीतवर्णी स्फटिकरूप अनाम्ल आहे. याचा अम्लद्रव रक्तवर्णी असतो. याचा उद्धरिद ( हायड्रोक्लोराइड ) हा पिंवळ्या नारिंगी वर्णाचा रंग बाजारांत ( क्रिसोइ डाइन ) कांचनिदिन या नांवानें विकला जातो. लोकर व रेशीम यांस पिवळा रंग देण्याचे कामीं हा योजतात.

त्रि अमिनो अजीव उदिन (ट्राय अमिनो अॅझो बेंझिन अथवा मेटा–अमिनो–बेंझिन–अॅझो–मेटा फेनिलीन–डायअमाईन किंवा बिस्मार्क ब्राऊन, फेनिलिन ब्राउन, व्हेसुव्हाइन, मॅंचेस्टर ब्राउन ) नउ२.क६उ४.न२.क६उ३(नउ२)२ म्हणजे मित-अमिन-उदिन-अजीव-मित-भानिलीन द्वि अमिन हा पदार्थ नत्रसाम्लाची ( नायट्रस अॅसिड ) क्रिया मितभानिलिनद्विअमिनावर केली म्हणजे तयार होतो. मितभानिलिन द्विअमिनउद्धरिदाच्या द्रवांत सिंधुनत्रायिताचा द्रव घालावा म्हणजे हा पिंगट रंग तयार होतो तो असाः—

मितभानिलिन द्वि अमिन उद्धरिद मितभानिलिन
( नउ २ ) क६ उ ४. न २. ह + क ६ उ ४ (नउ २)२
बिस्मार्क ब्राऊन उद्धराम्ल
=( नउ २ ) क६उ४नःन.क६उ३ ( नउ २ )२ + उह

द्वि अमिन अणु मधील एक अमिन संघ द्यजीवित होतो आणि द्वि अमिनच्या दुसऱ्या अणूशीं संयुक्त होऊन हा अजीव रंग होतो.

याचे पिंगट स्फटिक असतात. ते गरम पाण्यांत सहज विद्रुत होतात. यानें सुतावर गाढ पिंगट रंग बसतो परंतु सुतास रंग देण्यापूर्वी सुतावर रंगबंधक औषधें चढवावीं लागतात.

मथिल नारंग (मेथिल ऑरेंज=हेलिआन्थीन. गोल्डऑरेंज, मंदारिन ऑरेंज; किंवा ऑरेंज नं. ३ ) हा परद्वि मथिल आमिन उदिन अजीव उदीन गंधकिकाम्ल (पॅराडायमेथिल अमिनो बेंझिन अॅझो-बेंझिन सल्फोनिक अॅसिड ) याचा सिंधु ( सोडिअम ) क्षार आहे. याची सारणी .( कउ३)२नकउ४.न२. क६उ४गप्र३धु) अशी आहे. ही नारिंगी रंगाची स्फटिकमय भुकटी असते. ही पाण्यांत विद्राव्य असते व त्या द्रव्याचा पिंवळा रंग असतो. यांतील अम्ल असंयुक्त स्थितींत लालभडक रंगाचें असतें. यामधील नारंगाचा उपयोग अल्काम्लसूचि म्हणजे इंडिकेटर या नात्यानें होतो. मथिल नारंगाची घटना काय आहे ती त्याचें उज्जिदीकरण ( रिडक्शन ) उद्धराम्ल युक्त द्रवांत वंगस हरिदानें (स्टॅनस क्लोराइडनें ) केलें म्हणजे त्यापासून गंधकिल निलीनाम्ल ( सल्फअनिलिक अॅसिड ) आणि पर अमिनद्वि मथिल निलीन ( पॅरा-

ॲमिनो डायमेथिल अनिलीन ) हे पृथग्भूत होतात यावरून ध्यानीं येईल.

प्राण अजीव संयुक्त पदार्थ.—प्राण अजीव संयुक्त पदार्थ तयार करण्याकरितां भानल ( फिनोल ) ईषद् अल्क व शीत द्रव तयार करून त्यांत द्विअजीव ( डाय अझोनियम ) च्या क्षाराचा द्रव घालावा म्हणजे हे पदार्थ तयार होतात. हा द्विअजीविल संघ ( डाय अझो-ग्रूप ) उत्प्राणिल संघाच्या ( हायड्राक्सिल ग्रूप ) संमुख येतो व परस्थान व्यापतो, परंतु यास अडथळा केल्यास तो आसन्न स्थानीं जातो. तो साक्षात् मितस्थानीं कधींहि जात नाहीं.

पर प्राणअजीवउदिन ( पॅरा ऑक्सि अॅझो बेंझिन ) किंवा उदिन—अजीव—भानिल ( बेंझिन अॅझो फिनोल ) क६उ५नःक६उ४(प्रउ) ४ हा पदार्थ तयार करण्याकरितां द्वि. अजीवित निलीनीन् (डाय अझोटाइझ्ड अनिलीन) चा संयोग अल्कद्रवांतील भानल ( फिनोल ) शीं करावा लागतो.

हा नारिंगी लालवर्णी स्फटिकीभवन पावणारा पदार्थ असून तो १५४° श वर वितळतो.

आसन्न-प्राण अजीविल उदिन ( ऑर्थो ऑक्सी ऑझो बेंझिन ) क६उ५नःन(१)क६उ४.प्रउ( २ ) या घटनेचा पदार्थ पर-पदार्थ तयार करतांना त्यासह अल्पांश प्रमाणांत होतो. यापासून तो बाष्पोद्रेकानें पातन करावा. हा आसन्न पदार्थ बाष्पपातावरोबर येतो. याचा नारिंगी वर्ण असून सूचिकाकार स्फटिक असतात. याचा रसांक ८२.५°-८३° श असतो. पातळ अमोनि हरिदाच्या द्रवांत जशदचूर्णाच्या योगानें याचें उज्जिदीकरण केलें म्हणजे त्याचेपासून आसन्न ( आर्थो ) ॲमिनो फिनोल ( अमिन-भानल ) आणि निलीन ( अनिलीन ) तयार होतात.

मित-प्राण अजीवि उदीन ( मेटा ऑक्सी अॅझो बेंझिन ) क६उ५नःन(१)क६उ४ ( प्रउ ) ३ हा पदार्थ आसन्न ( आर्थो ) सालेयिदिन ( अनिसिडीन ) आणि द्विअजीवि उदिन ( डाय अॅझो बेंझीन ) यांच्या घनीकरणानें ( कंडेन्सेशननें ) तयार होतो. यांपासून जो पदार्थ तयार होतो तो नंतर व्यजीवित ( डाय अझोटाइज्ड ) करून अल्कहलानें उज्जीदीकृत ( रिडयूस्ड ) करावा म्हणजे उदीन अजीविमित सालेयल ( ॲनिसोल ) होतो आणि त्यापासून त्यावर स्फट हरिदानें ( अल्युमिनियमक्लोराइड ) उदक प्रक्रिया केली म्हणजे मितप्राण अजीवउदीन तयार होतो. हा ११२ – ११४° श मानावर वितळतो. त्याचें उज्जीदीकरण ( रिड-क्शन ) सहज होतें व तज्जातीय ( कॉरेस्पान्डिंग ) उदजीव संयुक्त पदार्थ तयार होतो.

द्व्यजीवि अमिनें:—(डाय अॅझो अमाइन्स):—अमि-नांची घटना ज्ञ. नः न. नउज्ञ१ ( ज्ञ=मूलक ) या सारणीप्र-माणें असते. (१) प्राथमिक अमिनांची ( प्रायमरी अमाइन्स ) द्व्यजीविक्षारावर (डाय अॅझोनियम साल्ट) क्रिया केली म्हणजे

( २ ) असंयुक्त प्राथमिक अमिनावर ( फ्री प्रायमरी आमाइन्स ) नत्रसाम्लाची क्रिया केली असतां आणि

( ३ ) प्राथमिक अमिनावर ( प्रायमरी अमाइन्स ) नत्रस् अमाइनां ( नायट्रोस अमाइन्स ) ची क्रिया केली असतां हीं तयार होतात. हीं स्फटिकरूप घनरूप असून प्रायः पीतवर्णी असतात. यांचा अम्लांशीं संयोग होत नाहीं. यांचें रूपांतर अमिनअजीवि ( अमिनो अॅझो ) संयुक्त पदार्थांत त्वरित होतें; यांचें दाट हरसंधिद ( हॅलोजन ) अम्लांच्या योगानें पृथक्करण होऊन उदिन हरसंधिदें ( बेंझिन हॅलॉइड्स ), नत्र आणि अमिन पृथक् होतात. अम्लनिरुदें ( ॲसिड अनहायड्राइड ) इमिन उज्ज परमाणु ( इमिनो हायड्रोजन ॲटम ) च्या स्थानीं जाऊन त्यांच्या स्थानीं अम्लिल ( ॲसिडिल ) मूलकें ( रॅडि-कल्स ) निविष्ट होतात; आणि तीं पाण्यावरोबर उकळलीं असतां त्यांचें रूपांतर भानलांत ( फिनोल ) होतें.

द्व्यजीवि अमिन उदिन ( डाय अॅझो अमिनो बेंझिन ) क६उ५नःनउक६उ५ हा पदार्थ प्रथम पी. ग्रीस यांनीं काढला. याचे पीतवर्णी स्फटिकरूप पातळ पत्रे असतात. हे ९६° श उष्णमानावर वितळतात व यापेक्षां थोड्या अधिक उष्णमाना-वर यांचा स्फोट होतो. हे अल्कहल इथ्र आणि उदिन यांत सहज विद्रुत होतात.

द्व्यजीवि अमिन उदिन ( डाय अझोइमिनो बेंझिन ) क६उ५न३ हा पदार्थ व्यजीवि उदिन परिस्तंभिदा ( डा अॅझो बेंझिन पर ब्रोमाइड ) वर अन्नवायूची ( अमोनियाची ) क्रिया केली म्हणजे तयार होतो. हें पीतवर्णी तेल असून त्याचा उत्क्व-थनांक ५९° श असतो. यास गुंगी येण्यासारखा वास असतो. उष्णतेनें याचा स्फोट होतो. उद्धराम्लाच्या योगानें याचें रूपां-तर हरनिलीन ( क्लोर अनिलीन ), मध्यें होतें आणि नत्र निघून जातो, आणि उकळत्या गंधकाम्लाच्या योगानें त्याचें रूपांतर अमिन भानल ( अमिनो फिनोल ) मध्यें होतें.

अजीविप्राण संयुक्त पदार्थ ( अॅझॉक्सि कापाउन्ड्स ) हे ज्ञ. न. प्र. न. ज्ञ. ( ज्ञ=मूलक ) या घटनेचे असतात. हे बहुत-करून पीतवर्णी किंवा रक्तवर्णी स्फटिकरूप घन पदार्थ अस-तात. हे पदार्थ नत्र ( नायट्रो ) किंवा नत्रस ( नॅट्रोसो) संयुक्त पदार्थांचें उज्जिदीकरण केल्यानें तयार होतात. हें उज्जिदीकरण अल्कहल युक्त दाहक पालाशानें उष्ण केल्यानें होतें. हें अजीवि (अझो) संयुक्त पदार्थांचें प्राणिदीकरण केल्यानेंहि तयार होतात.

**अझमगड जिल्हा.**—( १ ) संयुक्त प्रांतांत, गोरखपूर विभागाचा दक्षिणेकडील जिल्हा. क्षे. फ. २२०७ चौ. मै. याच्या उ. फैझाबाद व गोरखपूर जिल्हे; पू. बालिया, द. गाझीपूर व जोनपूर आणि पश्चिमेस जोनपूर व सुलतानपूर, हे आहेत. घोग्रा, टोन्स, छोटी शरयू या ह्या जिल्ह्यांतील नद्या होत. या जिल्ह्यांत २० तळीं आहेत; पैकीं गंभीरवन कोटेल, जमवावन सलोना, पाकी, पेवा, हीं मुख्य आहेत.

या जिल्ह्यांतील जमीन नदीच्या गाळाची बनलेली आहे. पावसाळ्याशिवाय इतर ऋतूंत हवा निरोगी असते. पावसाचें सरासरी वार्षिकमान ४१ इंच आहे.

इ ति हा स.—भार, सोएरी, व चेरू हे येथील मूळचे रहिवासी होत अशी परंपरा आहे. मुसुलमानांच्या हाताखालीं हा जिल्हा प्रथम कनोजच्या व पुढें दिल्लीच्या राज्यांत सामील झाला. अझमगडजिल्हा कांहीं दिवसपर्यंत शर्की राजांच्या हातांत होता. पण तें घराणें मोडल्यानंतर शिकंदर लोदीनें तो जिल्हा फिरून दिल्लीच्या राज्यास जोडला व तेथें शिकंदरपूरचा किल्ला बांधिला. सतराव्या शतकाच्या अखेर, मुसुलमानी धर्म स्वीकारिलेल्या गौतम रजपुतांच्या हातांत हा जिल्हा होता. १७३१ च्या सुमारास, त्या घराण्याचा मुख्य मोहबतखान यानें कर देण्याचें नाकारल्यावरून अयोध्येच्या नवाबानें त्याजवर सैन्य पाठवून त्याला पळावयास लाविलें. १७५८ पासून १८०१ पर्यंत हा जिल्हा अयोध्या प्रांतांत मोडत असे.

१८५७ सालांत जूनच्या ३ ऱ्या तारखेस अझमगड येथील देशी शिपायांनीं बंड करून कांहीं अधिकाऱ्यांस ठार केलें व सरकारी खजीना फैजाबाद येथें नेला. यूरोपियन लोक गाझीपुरास पळून गेले. गाझीपूरहून सैन्याची मदत आल्यावर इंग्रजांनीं अझमगड काबीज केलें. परंतु कांहीं दिवसांनीं दिनापुरास बंड सुरू झाल्यावर त्यांना फिरून गाझीपूरकडे जावें लागलें. कुंवरसिंग हा लखनौहून पळून या जिल्ह्यांत आला होता; त्याजवर इंग्रज सैन्यानें अत्रावली येथें हल्ला केला; पण त्यानें तो परतवून इंग्रजांना अझमपूरकडे खेंचलें व त्या गांवाला वेढा दिला. हा वेढा जवळजवळ दोन महिने टिकला. परंतु पुढें सर ई. ल्युगार्ड यानें त्याचा पराभव करून वेढा उठविला. कुवरसिंग गंगानदी उतरून जात असतां मरण पावला; व पुढें ५।६ महिन्यांत जिल्ह्यांत शांतता झाली.

मधुवन येथें कनोजच्या हर्षवर्धन राजाच्या वेळचा ( इ. स. ६३१ ) एक ताम्रपट सांपडला आहे. एका तळ्यावर असलेल्या लेखावरून तें तळें ११४४ त तयार केलेलें आहे असें दिसतें.

उ द्यो ग धं दे—या जिल्ह्यांतील मुख्य धंदे साखर तयार करणें व कापड विणणें हे होत. विलायती कापड येऊं लागल्यापासून येथील कापडाचा धंदा वराच खालावला आहे. मुबारकपूर, मौ व कोपागंज येथें कापड विणण्याचे मुख्य कारखाने आहेत. या जिल्ह्यांत पूर्वी निळीची लागवड बरीच होत असे. परंतु कृत्रिम नीळ येऊं लागल्यापासून ती अगदीं खालावत चालली आहे. कापड, कापूस, तंबाखू, मीठ, भांडीं वगैरे जिन्नस बाहेरून या जिल्ह्यांत येतात व साखर, अफू, गळिताचीं धान्यें, नीळ व सोरा वगैरे जिन्नस बाहेर जातात.

आगगाडीचे लहान फांटे या जिल्ह्यांतून गेलेले आहेत. शहागंजपासून, अझमगड व मौपर्यंत बंगाल आणि नार्थ वेस्टर्न व औध-रोहिलखंड फाट्याची लूप लाईन, यांना जोडणारा एक फांटा आहे. कोपागंजहून एक फांटा डोहरीघांटपर्यंत व दुसरा बालियापर्यंत गेलेला आहे.

रा ज्य व्य व स्था—या जिल्ह्यावर कलेक्टर असून त्याच्या हाताखालीं एक सिव्हिल सर्व्हंट असतो. देवगांव, अझमगड, माहूल, सग्री, घोसी आणि महमुदाबाद या तालुक्यांवर तहशीलदार आहेत. जिल्ह्याच्या ठिकाणीं डिस्ट्रिक्ट व सेशन्स जज्ज असून इतर ठिकाणीं सबजज्ज व मुनसफ आहेत.

लो क सं ख्या.—१९०१मध्यें या जिल्ह्याची लो. सं. १५,२९,७८५ होती, शें. ८६ लोक हिंदू व शें. १४ मुसलमान आहेत. येथील लोकवस्ती बरीच दाट आहे; व या जिल्ह्यांतून पुष्कळ लोक बाहेर जातात. शें. ९४ लोक बहारी भाषा बोलतात. शें. ६० लोकांचा उदरनिर्वाह शेतकीवर होतो व शें. १२ लोक मजुरीवर पोट भरतात. १९११ सालीं लोकसंख्या १४,९२,८१८ होती.

शे त की—जिल्ह्याच्या दक्षिण भागांतून पाणी नीट वाहून जात नसल्यामुळें जमीनी चिखलाच्या आहेत व त्यांत मुख्यत्वेंकरून तांदूळ पिकतो. उत्तर भागांत चिकण मातीची जमीन बरीच आहे. छोटी शरयू व घोग्रा नदीकांठच्या खांचर जमिनींना पुरांपासून धोका असल्यामुळें त्यांत फारसें उत्पन्न होत नाहीं. या जिल्ह्यांतील मुख्य पिकें तांदुळ व जव हीं होत. याशिवाय, वाटाणे, गहूं, हरभरा, मका, ऊंस वगैरे पिकेंहि होतात. विहिरी, तळीं व लहान ओहोळ यांच्या पाण्यावर सर्व शेती होते.

या जिल्ह्याची पद्धतशीर जमाबंदी १८३४ पासून १८३७ पर्यंत झाली. १८६६ पासून १८७५ पर्यंत, त्या जमाबंदीची फेरतपासणी होऊन, जमीनीचे निरनिराळे वर्ग ठरविण्यांत आले व त्याप्रमाणें जमिनीवर कर आकारण्यांत आले. १९०३-४ मध्यें जमिनीवर करांचें उत्पन्न १७.८ लक्ष रु. म्हणजे सरासरी दर एकरीं १.५ रु. होतें.

येथील हिंदु मुसुलमानांत वारंवार दंगे होतात. व लोकहि साधारणपणें बरेच भांडखोर आहेत.

या जिल्ह्यांत फक्त अझमगड येथें म्युनिसिपालिटी आहे. इतर ठिकाणचीं कामें जिल्हा बोर्डाकडे असतात.

शि क्ष ण:—१९०१ मध्यें, या जिल्ह्यांत लिहितां वाचतां येणाऱ्यांचें लो. सं. त प्रमाण शें ३·३ ( पुरुषांपैकीं शे ६·८ व बायकांपैकीं शें. २ ) होतें. १९०३-०४ मध्यें एकंदर शाळांची संख्या २६५ असून त्यांत १ हायस्कूल होतें.

**अझमगड गांव**—हें गांव संयुक्त प्रांतांत, अझमगड जिल्ह्यांत टोन्स नदीच्या कांठीं असून, बंगाल आणि नार्थवेस्टर्न रेलवेचें स्टेशन आहे. लो. सं. ( १९०१ ) १८८३५०. हें गांव गौतम राजाच्या मुलांपैकीं अझमखानानें १६६५त, स्थापिलें. या गांवाभोंवतीं टोन्स नदी असल्यामुळें पुरांपासून गांवाचें नुकसान होतें; याकरितां १८९८ च्या सुमारास गांवाभोंवतीं एक तट बांधिलेला आहे. १९०३-४ सालीं येथील

म्युनिसिपालिटीचें उत्पन्न १९०००रु. होतें. येथें साखर स्वच्छ करण्याचे व कापड विणण्याचे कारखाने आहेत. या गांवांत २ हायस्कुलें, एक हॉस्पिटल व ७ प्राथमिक शाळा आहेत.

**अझर बैजन**--अझर बैजनच्या लोकराज्याला १९१७ पर्यंत अस्तित्व नव्हतें. रशियाची बादशाही सत्ता नष्ट झाल्यावर काकेशिया पर्वतापलीकडील कांहीं रशियन प्रांतांनीं स्वतंत्र राज्यें स्थापलीं, त्यांपैकीं हें एक होय. अझर बैजनला पूर्वीचा राष्ट्रीय इतिहास मुळींच नाहीं. फार काय पण या लोकांना आपण कोणत्या मानववंशांतले आहोंत याची जाणीव नव्हती. बाकू व एलिसाव्हेटोपोल हे दोन प्रांत मिळून १९१७ मध्यें अझर बैजन लोकराज्य बनलें. हा प्रदेश १८१३ मध्यें गुलिस्तानच्या तहानें इराणाकडून रशियाकडे गेला. अझरबैजन हें नांवहि रशियन अमलाखालीं लुप्त झालें होतें तें लोकराज्य स्थापन झाल्यावर पुन्हा धारण करण्यांत आलें. हा प्रदेश कुरु व आरास ह्या दोन नद्यांमध्यें आहे. तो चांगला सुपीक असून तेलाच्या खाणींनीं युक्त आहे. त्यांतील दोन तृतीयांश लोक तार्तारवंशांतल्या एक जातीचे आहेत. ते शिया पंथाचे आहेत; पण ॲनाटोलियांतील सुनी लोकांशीं त्यांचा चांगला स्नेहभाव आहे. एकंदर लोकसंख्या २६,००,००० असून त्यांपैकीं १७,४०,००० मुसुलमान, ५,४०,००० आर्मेनियन व २,३०,००० रशियन आहेत, व बाकी इतर युरोपियन वगैरे आहेत. सरहद्दीबद्दल अझरबैजनचा वाद एरिव्हॉन व जॉर्जिया या दोन शेजारच्या लोकराज्यांबरोबर चालू आहे. अझरबैजनचें अजमासें क्षेत्रफळ ३२,००० चौरस मैल आहे.

येथील मुख्य धंदा तेल (पेट्रोलियम) काढून, तयार करून परदेशीं पाठविणें हा आहे. बाकू शहराच्या—अझरबैजनची राजधानी—आसपास तेलाच्या पुष्कळ खाणी सांपडल्या आहेत. त्यामुळें बाकू शहराला मोठें राजकीय व व्यापारी महत्त्व आलें आहे. हें शहर रेल्वेनीं मास्को, अफगाण सरहद्द, पामीर, इराणांतील एरिव्हान व टाब्रिझ शहरें, तुर्कस्थानांतील एर्झेरूम, आणि काळ्या समुद्रावरील बाटूम शहराला जोडलें गेलें आहे. यांत तेलाच्या खाणी असल्यामुळें जागतिक युद्धाच्या वेळीं या भागांत महत्त्वाच्या हालचाली झाल्या.

तरुण तुर्क पक्षाच्या सार्वमहंमदीयसंघटनेच्या धोरणाचा मध्य आशिया व हिंदुस्थान यांच्याप्रमाणें अझर बैजनवरहि फार परिणाम झाला. पण त्याहूनहि अधिक परिणाम रशियांतील बोल्शेव्हिक राज्याचा झाला. तुर्की व रशियन धोरणांच्या परस्पर संघातांनीं अझर बैजनचा अलीकडील इतिहास बराचसा बनला आहे.

**इतिहास.**—अझर बैजनचा उल्लेख इराणांतील सोराब व रुस्तुम वगैरे पौराणिक कथांतून एक प्रांत म्हणून येतो. अझर बैजनचा स्वतंत्र राष्ट्र या नात्यानें इतिहास २० सप्टेंबर १९१७ पासून सुरू होतो. १९१७ मार्च मध्यें रशियाचा झार पदच्युत होऊन नवें तात्पुरतें सरकार स्थापन झालें व त्यानें स्वयंनिर्णयाच्या तत्त्वाचा पुकारा केला. त्याच वर्षाच्या सप्टेंबरांत बोल्शेव्हीक लोकशाही रशियांत स्थापन झाली. या धामधुमीचा फायदा घेऊन ट्रॅन्सकाकेशियन लोकांच्या कौन्सिलनें टिफ्लिस येथें सभा भरवून आपलें संयुक्त लोकराज्य जाहीर केलें. परंतु जॉर्जियन व आर्मेनियन ख्रिस्ती आणि अझर बैजनचे तार्तर मुसुलमान यांचें जमेना म्हणून त्यांचीं लहानलहान राज्यें बनून अझरबैजन तुर्काशीं, आर्मेनिया रशियाशीं, व जॉर्जिया जर्मनीशीं स्नेहसंबंध जोडूं लागला. बाकू व आसपासच्या प्रदेशावर बोल्शेव्हीक सरकारची सत्ता स्थापन झाली होती. तेथील रशियन व आर्मेनियन लोकांनीं तुर्की मुसुलमानांना तेथून हांकून लावण्याचा व कत्तली करण्याचा उपक्रम केला. या अंतस्थ फाटाफुटीमुळें १९१८ मे मध्यें संयुक्त लोकराज्य मोडून जॉर्जिया व अझरबैजन यांनीं प्रत्येकीं स्वतंत्र लोकराज्य स्थापलें. तुर्कस्थाननें सार्वमहंमदीय धोरणानुसार बाकू घेण्याची व मध्य आशियांत शिरण्याची तयारी चालविली. त्यांना विरोध करण्याकरितां बाकू येथील रूसो-आर्मेनियन सैन्याला मदत म्हणून मेसापोटेमियांतून जनरल डनस्टर व्हिलच्या हाताखालीं ब्रिटिश सैन्य पाठविण्यांत आलें. लवकरच जागतिक युद्ध तहकुबीच्या तहानें थांबल्यावर तुर्की व जर्मन सैन्य या भागांतून निघून गेलें व ब्रिटिश सैन्य तेथें शिरलें. तुर्की सैन्य बाकू शहर सोडून गेल्यावर अझरबैजनच्या सरकारनें तें शहर आपल्या ताब्यांत घेतलें. तेथें सुव्यवस्थित राज्यकारभार चालविण्याकरितां ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं अझरबैजनच्या अननुभवी लोकांस तेलाच्या खाणी चालविणें, बोटी बांधणें, स्टेट बँक चालविणें, पोस्ट व तार खात्याची व्यवस्था करणें, पोलीस व न्यायखातें व्यवस्थित ठेवणें वगैरे अनेक बाबतींत मदत केली. त्यामुळें या लोकराज्यामध्यें शांतता व सुव्यवस्था स्थापन झाली. पण १९१९ आगष्टमध्यें ब्रिटिश सैन्य तेथून काढून घेण्यांत आल्यावर अझरबैजनच्या राज्यकारभारांत गोंधळ माजला.

१९१९ जानेवारीमध्यें पॅरिस येथें भरलेल्या तह परिषदेनें कॉकेशियन प्रदेशाकडे बरेंच लक्ष पुरविलें, पण तेथील लोकराज्यांनीं सरहद्दीचा तंटा आपसांत मिटवावा असें ठरवून प्रकरण युद्धावर येऊं नये म्हणून तेथें एक हायकमिशनर नेमिला. बाटूम जॉर्जियाला देण्यांत आलें. पण सेव्हर्सच्या तहामुळें तुर्की राष्ट्रीय चळवळ ॲनाटोलियांत फार जोरांत येऊन त्याचा अझरबैजनवर परिणाम झाला. तुर्की राष्ट्र व रशियन बोल्शेव्हीक या दोघांना दोस्तराष्ट्रांकडून विरोध होत असल्यामुळें ते दोघे कांहीं काळ एक झाले व दोस्तांच्या हातून हा मुलूख परत घेण्याची खटपट त्यांनीं चालविली. रशियानें १९२० मध्यें अझरबैजनचें स्वतंत्र लोकराज्य नष्ट करून तेथें सोव्हिएट सरकार स्थापलें. पुढें तेथल्या तार्तर लोकांनीं बंड केल्यामुळें १५००० तार्तर लोकांची बोल्शेव्हिकांनीं कत्तल केली. पुढें तुर्कस्थान व

रशिया यांनीं मिळून जॉर्जिया व एरिव्हान हीं स्वतंत्र लोकराज्यें नष्ट करून तेथें सोव्हिएट लोकराज्यें स्थापलीं. नंतर तुर्कस्तानला अर्देहान व कार्स हे प्रांत आणि आर्मेनियाचा कांहीं भाग मिळाला, व रशियानें ट्रान्सकाकेशियांतील आपला पूर्वींचा बहुतेक मुलूख परत ताब्यांत घेतला; आणि अझरबैजन, जार्जिया व एरिव्हान हीं कांहीं काळ स्वतंत्र बनलेलीं राष्ट्रें नामशेष झालीं.

**अझारा, डॉन्ट जोस निकोलस डी ( १७३१–१८०४ ):**—हा एक स्पॅनिश मुत्सद्दी होता. याचा जन्म १७३१त ॲरॅगॉनमधील बारबुनेल्स येथें झाला. १७८५त याला रोमच्या दरबारीं वकील नेमण्यांत आलें. येथें त्यानें जुन्या इटालियन वस्तूंचा संग्रह करण्यांत व कलाकौशल्याचा पुरस्कार करण्यांत बराच नांवलौकिक मिळविला. यहुदी लोकांना स्पेनमधून घालवून देण्याच्या दुर्घट व धोक्याच्या कामांत यानें पुढाकार घेतला होता व सहाव्या पायसची निवडणूक त्याच्याच मदतीनें घडून आली होती. फ्रेंच लोकांनीं १७९८ मध्यें रोम घेतल्यावर हा फ्लॉरेन्स येथें रहावयास गेला. परंतु पोपच्या अज्ञातवासांत व इ. स. १७९९ मध्यें तो व्हॅलेन्स येथें मरण पावल्यावरहि त्यानें त्याच्या वतीनें बरेंच कार्य केलें.

यानंतर यास पॅरिसच्या दरबारीं स्पेनतर्फे वकील नेमण्यांत आलें. येथें दुर्दैवानें, फ्रान्सच्या स्पेनवरील वर्चस्वाचा विघातक तह घडवून आणण्याची कामगिरी त्याच्या नशिबीं आली. यावर नेपोलियनची मर्जी होती. हा पॅरिस येथें १८०४ मध्यें मरण पावला.

**अझीमगंजः**—हें गांव बंगाल प्रांतात, मुर्शिदाबाद जिल्ह्यामध्यें भागीरथीच्या उजव्या तीरावर आहे. दुसऱ्या तीरावर असलेल्या जिआगंज सुद्धां याची लोकसंख्या सुमारें तेरा चवदा हजार आहे. नलहटीपासून येथपर्यंत १ रेलवेचा फांटा आलेला आहे. येथें व्यापार बराच चालतो. अझीमपूरपासून बऱ्हाणपूर (बंगाली) पर्यंत लहान बोटी चालू असतात. येथील म्युनिसिपालिटीचें उत्पन्न १९०३–४ मध्यें, १६००० रु. होतें.

**अझोटसः**—अझोटस हें नांव ग्रीक व रोमन लेखकांनीं पॅलेस्टाईन मधील अशदाद नांवाच्या प्राचीन शहराला दिलें होतें. एकर जिल्ह्यांतील एसदुदगांवीं असलेल्या पडक्या इमारती अझोटसच्या आहेत असें दाखविण्यांत येतें. सीरिया व इजिप्त यांमध्यें असलेल्या प्रसिद्ध लष्करी मार्गावर व भूमध्य समुद्र किनाऱ्याच्या आंत ३ मैलांवर हें शहर होतें. हें प्रसिद्ध पांच फिलिस्टाइन शहरांपैकीं एक होतें. येथें ड्रेगन पूजा संप्रदाय चालू होता. इस्रायली सत्तेचा प्रतिकार करून अझोटस मॅकाबीसचे वेळेपर्यंत स्वतंत्र होतें असें म्हटलें तरी चालेल. इ. स. पूर्वी ७२१ त, असुरियन लोकांनीं हें शहर घेतलें. परंतु लगेच स्वतंत्र होऊन यानें पुढील शतकांत ईजिप्तचा राजा सामेटिकस ह्याच्या विरुद्ध २९ वर्षें टक्कर दिली. ख्रिस्ती शकारंभाचे सुमारास येथें एका बिशपची योजना झाली परंतु शहर या दृष्टीनें अझोटसचा दर्जा कधींच वाढला नाहीं. एसदुद येथें प्राचीन मुख्य अवशेष म्हणजे एक सारासन पद्धतीचा खान ( धर्मशाळा ) आहे.

**अझोर्स**—किंवा पश्चिमेकडील बेटें. पोर्तुगालच्या ताब्यांतील अतलांतिक महासागरामधील एक द्वीपसमूह. लोकसंख्या ( १९११ ) २,४२,६१३; क्षेत्रफळ ९२२ चौरस मैल. हीं बेटें उत्तर अक्षांश ३६° ५५' व ३९° ५५' आणि पश्चिम रेखांश २५° व ३१° १६' यांच्या दरम्यान वायव्याग्नेय दिशेनें पसरलीं आहेत. या बेटांचे परस्परांपासून बरेच दूर दूर असलेले असे तीन समूह असून तीं अडीच मैलांहूनहि अधिक खोल समुद्रांतून वर आलेलीं आहेत. यांपैकीं आग्नेयीकडील समूहांत सेंट मायकेल्स ( साओ मायक्युएल ), सेंट मेरी ( सान्ता मेरिआ ) व फोर्मिंगस; मधल्या समूहांत फायल, पायको, सेंट जॉर्ज ( साओ जॉर्ज ), टर्सेइरा व ग्रासिओसा; आणि वायव्येकडील समूहांत फ्लोर्स व कोर्व्हो हीं बेटें मोडतात, या द्वीपसमूहांत क्षेत्रफळांत व लोकवस्तीनें सर्वांत मोठें बेट म्हटलें म्हणजे सेंट मायकेल्स [क्षेत्रफळ २९७ चौ. मै. व लोकवस्ती (१९०१),२१,३४०] हें होय. या बेटांपासून यूरोपच्या किनाऱ्याचा निकटचा भाग ८३०० मैलांहून दूर, आफ्रिकेच्या किनाऱ्याचा निकटचा भाग ९०० मैलांहून दूर व अमेरिकेच्या किनाऱ्याचा निकटचा भाग १०० मैलांहून दूर आहे. तथापि तेथील हवामान व वनस्पती यूरोपखंडाशीं सदृश असल्यामुळें त्यांचा यूरोपखंडाच्या बेटांत समावेश करण्यांत येतो.

भूवर्णन—या सर्व बेटांची जमीन सारखीच चढउतारांची मिळून झालेली असून त्यांत पठाराचा प्रदेश मुळींच नाहीं म्हटलें तरी चालेल. यांपैकीं सर्वांत लहान शिखर कोर्व्होचें समुद्रसपाटीपासून ३०० फूट असून सर्वांत उंच शिखर पायकोचें ७६१२ फूट वर आहे. कांहीं थोडके अपवाद वगळल्यास समुद्रकिनारा बहुतेक उंच व मुलकेवजाच आहे. हा द्वीपसमूह उघड उघड ज्वालामुखीजन्य दिसत असून त्याचा शोध लागल्यापासून येथें जे अनेक भूकंप व ज्वालामुखींचे स्फोट अनुभूत झाले आहेत त्यांवरून या गोष्टीस पुष्टि मिळते. आतांपर्यंत फ्लोर्स, कोर्व्हो, ग्रासिओसा व फायल हीं बेटें निसर्गक्षोभाच्या तडाक्यांतून बहुतेक सुटलेलीं आहेत. भूक्षोभाचें केंद्रस्थान बहुतांशीं सेंटमायकेल्स हें असून आश्चर्याची गोष्ट ही कीं त्याच्याच शेजारचे सेंट मेरीच्या बेटास मात्र त्यापासून धक्का बसलेला नाहीं. इ. स. १४४४-४५ सालीं सेंट मायकेल्स येथें एक मोठा स्फोट झाला. परंतु या स्फोटाची जी हकीकत आज उपलब्ध आहे ती बरीच अतिशयोक्तिपूर्ण दिसते. पुढें १५२२ सालच्या उग्र क्षोभांत तर त्या वेळची त्या बेटाची राजधानी व्हिल्ला फ्रांका हें शहर तेथील ६००० रहिवाश्यांसह सबंधचें सबंध पुरलें गेलें. यानंतरहि १६३०, १६५२, १६५६, १७५५, १८५२ वगैरे सालीं येथें भूकंप व ज्वालामुखीस्फोट होऊन गेले व त्यांपैकीं कित्येक उग्र

स्वरूपाचेहि होते. कित्येक प्रसंगीं (उ० १६३८,१७२०,१८११, १८६७ सालीं ) येथें भूगर्भजन्यस्फोटहि झालेले असून त्यां-बरोबर वहुतेक एखादें तात्पुरतें बेट समुद्रांतून वर येतें. इ. स. १८११ सालीं जून महिन्यांत असेंच एक बेट सेंट मायके-ल्सच्या पश्चिम टोंकापासून दोन मैल अंतरावर समुद्रांतून वर आलें तें साब्रिना नांवानें प्रसिद्ध आहे.

हवामानः—या बेटांचें हवामान समशीतोष्ण असून सावलींतील उष्णमान सामान्यतः जानेवारींत फा. ४८° च्या खालीं व जुलैमध्यें ८२° च्या वर जात नाहीं. हिंवाळ्यांत वारा वायव्य, पश्चिम आणि दक्षिण दिशेनें व उन्हाळ्यांत बहुशः उत्तर ईशान्य व पूर्व दिशेनें वाहतो. येथें मोठमोठीं तुफानें वारंवार होतात.

प्राणी व वनस्पतीः—पाळीव पशूंशिवाय या बेटांत ससा, उंदीर, पाकोळी वगैरे दुसरे थोडेच सस्तन प्राणी आहेत. पक्षी बरेच असून त्यांच्याकडून पिकांचें नुकसान होऊं लागल्यामुळें चाळीस पन्नास वर्षांपूर्वी सेंट मायकेल्स येथें लाखों पक्ष्यांचा संहार करण्यांत आला होता. फायल येथें व्हेल मासे पकडण्याचा धंदा किफायतशीर प्रमाणावर चालतो. येथील वनस्पतींच्या जाती सामान्यतः यूरोपांतल्या-प्रमाणेंच आहेत. बहुतेक बेटांत गवत वगैरे विपुल वाढतें; परंतु १९ व्या शतकापर्यंत उंच वृक्षांचें येथें बहुतेक दुर्भिक्षच होतें. नारिंग, लिंबू, डाळिंब व दुसऱ्या कित्येक जातींच्या फळांची लागवड करण्यांत येते. एके काळीं उंसाच्या लागवडी-कडे बरेंच लक्ष देण्यांत येत होतें; परंतु आतां ती जवळ जवळ बंद झाली आहे. १६ व्या शतकांत निळीची लागवड प्रथम करण्यांत आली पण तिचीहि अवस्था उंसाप्रमाणेंच झाली आहे.

लोकवस्ती व शासनपद्धतिः—या बेटांतील लोक बहुतेक पोर्तुगीजसंभव असून त्यांच्या रक्तांत पुरिश व फ्लेमिश रक्ताचा बराच अंश आहे. बरेचसे नीग्रो, इंग्लिश, स्कॉच व आयरिश लोकहि–विशेषतः फायल व सेंट मायकेल्स बेटांत–येऊन राहिलेले आहेत. राज्यकारभाराच्या सोयीकरतां या द्वीपसमूहाचे तीन जिल्हे केले असून त्यांना त्यांतील मुख्य शहरांवरून पाँटा डेलगाडा ( सेंट मायकेल्सची राजधानी ), आंग्रा ( टर्सेइराची राजधानी ) व होर्टा (फाय-लची राजधानी ) अशीं नांवें पडलेलीं आहेत. लिस्बनच्या लोकप्रतिनिधिसभेस पाँटा डेलगाडास चार व इतर दोन जिल्ह्यांस प्रत्येकीं दोन दोन प्रतिनिधि पाठविण्याचा हक्क आहे. लष्कराच्या छावण्या आंग्रा व पाँटा डेलगाडा येथें आहेत. लिस्बनशहर हें सेंट मायकेल्समधील व्हिल्ला फ्रांका डो कांपोशीं व तेथून पायको, फायल, सेंट जॉर्ज व ग्राशिओसा या बेटांशीं तारायंत्रानें जोडलेलें असून शिवाय १९०१ मध्यें फायल व आयर्लंड यांच्या दरम्यानहि तार टाकण्यांत आली आहे. आंग्रा व पाँटा डेलगाडा येथें वातावरणीय वेधशाळा आहेत.

व्यापारः—या बेटांचा पोर्तुगाल, ग्रेटब्रिटन, जर्मनी, युनायटेड स्टेट्स वगैरे देशांशीं व्यापार चालतो. आयात मालांत कापड, कोळसा, साखर, लिहिण्याच्या वस्तू, लोखंडी सामान, रासायनिक द्रव्यें, रंग, तैलें वगैरे वस्तूंचा समावेश होत.असून निर्गत होणाऱ्या वस्तू म्हटल्या म्हणजे फळफळा-वळ, मद्य व खाद्य पदार्थ या होत. पाँटाडेलगाडा जिल्ह्यांत मातीचीं भांडीं, सुती कापड, मद्यें, गवताच्या टोप्या, व चहा या जिनसा; आंग्रा जिल्ह्यांत तागाचें व लोकरीचें कापड, लोणी, साबू, विटा, कवलें, वगैरे पदार्थ आणि होर्टा जिल्ह्यांत टोपल्या, चटया यांसारख्या वस्तू तयार होतात.

इतिहासः—कोर्व्हो येथें बरींच कार्थेजियन नाणीं सांप-डतात त्यावरून त्या धाडशी लोकांनीं या बेटांत पाय ठेवला होता असें दिसतें. १२व्या शतकांतील अरब भूगोलवेत्ता इद्रिसि हा कॅनरी बेटांनंतर पश्चिम महासागरांत जीं दुसरीं नऊ बेटें वर्णितो तीं बहुधा अझोर्सच असावींत. अरबी ग्रंथका-रांच्या वर्णनांत या बेटांत दाट वस्ती व साधारण मोठीं शहरें असल्याचा उल्लेख आला असून येथील लोक आपसांतील लढायांमुळें निकृष्टावस्थेस पोंचले असल्याचें म्हटलें आहे. तथापि या बेटांचा स्पष्ट उल्लेख इ. स. १३५१च्या नकाशांत सांपडतो, परंतु त्यांत त्यांचीं नांवें निराळीं आहेत. या बेटांचा मागमूस यूरोपीय राष्ट्रांस प्रथम १४३२ मध्यें लागून पोर्तु-गीज व फ्लेमिश लोकांनीं येथें वसाहत करण्यास सुरुवात केली. १५८० पासून १६८० पर्यंत हीं बेटें स्पेनच्या अंमलाखालीं होतीं. १९ व्या शतकाच्या आरंभीं पोर्तुगालच्या गादीसाठीं भांडणाऱ्या पक्षांत या बेटांच्या मालकीबद्दल झगडा लागून शेवटीं मेरिआ राणीचा अंमल या बेटांत प्रस्थापित झाला. मेरिआराणीचें वास्तव्य १८३० पासून १८३३ पर्यंत आंग्रा येथें होतें. [ संदर्भ ग्रंथ–डब्ल्यू. एफ. वाकर, अझोर्स; ए० एस० ब्राउन, मदिरा अँड कॅनरी आयलंड्स विथ अझोर्स ]

**अझोव्ह**—अझोव्ह हें रशियाच्या डॉन कोसॅक्स प्रांतां-तील शहर आहे. हें डॉन नदीच्या कांठीं आहे. १३ व्या शतकांत जिनोइज लोकांनीं येथें एक वखार बांधली. तिला टाना असें म्हणतात. अझोव्ह व्यापारी व लष्करी महत्त्वाचें ठिकाण होतें. १६९६ मध्यें पीटर धी ग्रेट यानें हें शहर घेतलें. परंतु तें १७११ मध्यें तुर्कांना परत दिलें. १७३९ त तें रशि-यन साम्राज्याला कायमचें जोडलें गेलें. त्यानंतर हें बंदर गाळ बसून बंद झालें व त्यामुळें या शहराचें महत्त्व कमी झालें. लोकसंख्या १९०० मध्यें २५२१४ होती व बहुतेक लोक मासे धरण्याचा धंदा करणारे होते.

**अझोव्हचा समुद्र.**—दक्षिण यूरोपांतील एक अंतस्थ लहानसा समुद्र–हा काळ्या समुद्राशीं येनिकेलच्या सामुद्रधुनीनें जोडला जातो. इतिहासपूर्वकालांत याचा कास्पियन समुद्राशीं संबंध होता. याची नैर्ऋत्येशान्य लांबी २३० मैल, व जास्तींत जास्त रुंदी ११० पर्यंत मैल व क्षेत्र १४५१५ चौरस मैल आहे. हा

नोव्हेंबरपासून एप्रिल मध्यापर्यंत गोठलेला असतो. यास डॉन हीच कायती एक मोठी नदी मिळते. याची जास्तींत जास्त खोली ४५ फूट असून त्याची सपाटी काळ्या समुद्राच्या वर ४½ फूट आहे. परंतु दिवसेंदिवस ही सपाटी कमी कमी होत आहे. पाणी बहुतांशीं इतर समुद्रांच्या मानानें गोडें आहे पण या गोडेपणांत स्थलपरत्वें व प्रवाहपरत्वें फरक होतो. रशियाच्या व्यापारास अझोव्हच्या समुद्राचें वरेंच महत्त्व असून त्याच्या किनाऱ्यावर टागान रॉग, वेरड्यान्स्क, मेन्युपोल व येनिकेल हीं शहरें आहेत.

**अटक जिल्हा**—पंजाव प्रांतांतील एक जिल्हा. क्षे. फ. ४०२२ चौ. मै. मर्यादाः प० व वा० सिंधू नदी, व त्याच्या पलीकडे वायव्य सरहद्दीवरील प्रांतांतील कोहात आणि पेशावर हे जिल्हे; ईशान्येस त्याच प्रांतांतील हजारा जिल्हा; पूर्वेस रावळपिंडी जिल्हा; आग्नेयीस झेलम, द० शाहपूर, व नैर्ऋत्येस मियानवाली हे जिल्हे. तलगंगचें पठार समुद्रसपाटीपासून १२०० फूट उंचीवर असल्यामुळें, तेथील हवा इतर भागापेक्षां थंड आहे. अटकचे डोंगर, जंडलचे वालुकामय उतार आणि नरर व मखदच्या लहान टेंकड्या येथें उन्हाळा फार कडक असतो, उष्ण वारे वाहतात व सूर्याचे किरण फार प्रखर असतात. वार्षिक पावसाचें मान सरासरी १७ ते २४ इंच असतें.

इ ति हा स—या जिल्ह्याचा व रावळपिंडी जिल्ह्याचा इतिहास जवळ जवळ एकच आहे. बुद्धांच्या वेळच्या अवशेषांपैकीं मुख्य हसन अब्दाल हें गांव, तक्षिला राजधानीच्या ताब्यांत होतें. ओहिंद जवळ गझनीच्या महंमुदानें आनंदपाळाचा पराभव केला होता.

लो क सं ख्या—१९२१ त, या जिल्ह्याची लो. सं. ५,१२,२४९ होती. लो. सं. पैकीं शें.९० मुसलमान आहेत. पंजावींच्या निरनिराळ्या जाती येथें आहेत. पुस्तू भाषा चालते.

शे त की—जिल्ह्याच्या उत्तरेकडे चाचचें सखल मैदान अतिशय सुपीक आहे. सोहान व इतर प्रवाहांच्या कांठच्या गांवांची जमीनहि सुपीक आहे. इतर ठिकाणची जमीन चांगली नाहीं. या जिल्ह्यांत वस्ती फार विरळ असल्यामुळें, पाऊस कमी झाला तरी दुष्काळ फारसा कधींच भासत नाहीं. येथील मुख्य पीक गहूं हें असून हरभरा, गळिताचीं धान्यें, बाजरी वगैरे पिकेंहि होतात; जोंधळा, बाजरी, वगैरे पिकें शरद ऋतूंत होतात. ह्या जिल्ह्यांत घोड्यांची पैदास चांगली होते.

अटक तालुक्यांत गरकव येथें संगमरवरी दगडाचे खलवत्ते व दुसऱ्या वस्तू होतात. कालाचित्त डोंगरांत दगडी कोळसा सांपडतो. फत्तेहजंग जवळ पेट्रोलियम काढण्याच्या पांच विहिरी आहेत.

व्या पा र व द ळ ण व ळ ण—या जिल्ह्यांत महत्त्वाचे कारखाने नाहींत. अटक तालुक्यांत रेशमी कशिद्याचें काम व सर्व ठिकाणीं देशी कापड होतें. याशिवाय, लुंगी, लांकडी कातकाम, लोखंडी भांडीं, कुलुपें, जीन, चटया, साबण, वगैरे जिन्नसा तयार होतात. हझारो येथें तपकीर होते; कापड, तांदूळ, मीठ, भांडीं, वगैरे जिन्नस बाहेरून येतात.

नार्थवेस्टर्न रेलवेचा फांटा या जिल्ह्याच्या उत्तर भागांतून जातो. मध्य भागांतून कुशालगड फांटा गेलेला आहे. पश्चिम भागांत, मारीअटक हा फांटा कँबेलपूरपासून मुलतानकडे गेलेला आहे. आगगाडीच्या मुख्य फांट्याजवळून गेलेला हसन अब्दाल—अबटाबाद हा रस्ता व रावळपिंडी कुशालगड रस्ता, हे दोन पक्के रस्ते आहेत.

रा ज्य व्य व स्था—अटक, पिंडीघेव, फतेहजंग व तलगंग या तालुक्यांवर तहसीलदार व नायव तहसीलदार आहेत.

जिल्ह्याचें मुख्य ठिकाण कँबेलपूर हें असून तेथें डेप्युटी कमिशनर असतो.

पिंडीघेव व हझारो येथें मुनिसिपालिट्या आहेत. अटक ही 'नोटिफाइड' एरिया आहे. इतर ठिकाणचा कारभार जिल्हा बोर्डाकडे आहे.

१९०१ त, लो. सं. पकीं शें. ३.६ ( पुरुषांपैकीं शें. ६.४ व स्त्रियांपैकीं शें. ४ ) लोकांना लिहितां वाचतां येत होतें.

**अटकः**—( नदी ). अटक हा शब्द नेहमींच्या बोलण्यांत अटक या गांवास न लावतां सिंधुनदाच्या उत्तर भागास च लावतात. अटक हें नांव अकवरानें नदीच्या दुस्तरतेमुळें दिलें असलें तर पुढें तें लोकसमजुतींत हिंदुस्थानची सरहद्द वनलें, आणि ज्या प्रदेशापलीकडे हिंदूनें जाऊं नये गेल्यास प्रायश्चित्त पडेल अशी सीमा असें झालें. अटक म्हणजे जी पलीकडे हिंदूस जाण्यास धर्मशास्त्रीय अटक आहे अशी नदी असा अर्थ वनला. अटक ही हिंदुस्थानची सीमा ही गोष्ट यानंतर स्थापित झाली असें मात्र नाहीं. कां कीं सिंधूपलीकडे हिंदुस्थान ही परकीयांची समजूत "हप्तहिंदवः"चा उल्लेख करणाऱ्या अवेस्ती काळापासून आणि ज्या काळांत इंडिया हें नांव ग्रीकांत वापरलें गेलें त्या काळापासून आहे. ज्याप्रमाणें हिंदुस्थानची ही धर्मशास्त्रीय सरहद्द लोकांत मानली गेली त्याप्रमाणें हिंदु राज्यकर्त्यांच्या राजकीय विचारांची व कार्यकर्तृत्वाची मर्यादा होती असें म्हटलें तरी चालेल. जानेवारी १७६० मध्यें, बाळाजी बाजीराव हा गंगाधर यशवंत यास पत्र लिहितो कीं तुम्हीं सर्वांनीं ( दत्ताजी शिंदे जनकोजी शिंदे वगैरे ) एकचित्तेंकरून मेहनत करून अबदालीचें पारिपत्य करून अटकपार करावा ( राजवाडे खं. १. १५६,२४५ ) खैवर घाटापलीकडे क्वेटा वगैरे ठिकाणीं जाऊन शत्रूस अडविण्याची कल्पना मराठी राज्यकर्त्यांस नसावी. तसेंच ज्याप्रमाणें हिंदुस्थानभर या अर्थानें "आसेतुहिमाचल" असा शब्द वापरण्यांत येई त्याप्रमाणेंच "अटकेपासून रामेश्वरापर्यंत" असे शब्दहि वापरण्यांत येत. शके १६७४ कार्तिकमध्यें बाळाजी बाजीराव पिलाजी जाधवरावास लिहितो कीं नवाब

व मराठे एक असा लौकिक अटकेपासून रामेश्वरापर्यंत आहे. ( राजवाडे खंड ६, २७१,३५७ ).

**अटक गांव**—हें गांव, पंजाब प्रांतांत, अटक जिल्ह्यांतील अटक तालुक्याचें मुख्य ठिकाण होतें. हें नॉर्थ वेस्टर्न रेलवेचें स्टेशन असून, कलकत्त्याहून १५०५ मैल, मुंबईहून १५४१ मैल व कराचीहून ८८२ मैल दूर आहे. लो. सं. (१९०१) २८२२. काबूल व सिंधू यांच्या संगमाच्या थोडा खालच्या बाजूस सिंधूनदीच्या कांठीं अटकचा किल्ला आहे. तेथें शिबंदी तोफखाना व पायदळ ठेविलेलें आहे. किल्याच्या समोरच कमालिया व जलालिया नांवाच्या काळ्या दगडांच्या कड्यां-मध्यें सिंधु नदीच्या पात्रांत भोंवरे आहेत. या कड्यांवरून अकबराच्या कारकीर्दींत दोन रोशानिया पाखंड्यांनां ढकलून देण्यांत आलें होतें.

नदीच्या वरच्या बाजूस, अटकपासून १६ मैलांवर, ओहिंद येथें, होड्यांचा पूल करून अलेक्झांडर नदीपार आला असें म्हणतात. अकबरानें, आपला भाऊ हकीम मिरझा, याच्या स्वाऱ्यांपासून बचाव करण्याकरितां १५८१ त हा किल्ला पुन्हा बांधिला; व त्याचें नांव अटक-बनारस असें ठेविलें. दुसरी अशीहि दंतकथा आहे कीं, येथील नदी उतरून जाण्यास कठीण आहे म्हणजे, अटक करते म्हणून अकबरानें या किल्याचें नांव "अटक" असें ठेविलें; व नदी उतरून गेल्या-वर पश्चिम किनाऱ्यावर त्यानें खैराबाद म्हणजे "सुरक्षितप-णाचें माहेर घर" स्थापन केलें. रघुनाथरावानें स्वारी करून अटकपर्यंत मराठ्यांची सत्ता वाढविली होती. १८१२ त रणजितसिंगानें या किल्ल्यावर हल्ला केला होता. पहिल्या शीख युद्धांत इंग्रजांनीं हा किल्ला घेतला होता. परंतु दुसऱ्या युद्धांत तो त्यांना कायम ठेवितां आला नाहीं. तें युद्ध संपल्यावर नंतर शीख लोकांकडून तो किल्ला फिरून इंग्रजांच्या ताब्यांत आला. १८७३ त सिंधुनदीवर असलेला रेलवेपूल व दुसरा रस्ता तयार झाला.

अटक येथें बेगमकी सराइ या नांवाची एक धर्मशाळा होती तिची दुरुस्ती पंजाब सरकारनें ३००० रुपये खर्चून नुकतीच केली आहे. ( इं. गॅ. ६ )

**अटलांटिक महासागर**—वि स्ता र:—अटलांटिक महासागर हा इंग्रजी S अक्षराच्या आकाराचा पाण्याचा पट्टा यूरोप व आफ्रिका यांचा पश्चिम किनारा आणि उत्तर व दक्षिण अमेरिकेचा पूर्व किनारा यांच्यामध्यें आहे. हा उत्तरेस आर्क्टिक महासागरापासून दक्षिणेकडील दक्षिण महासागराप-र्यंत पसरला आहे. यामुळें भूमध्यरेषेच्या उत्तरेकडील आणि दक्षिणेकडील असे अटलांटिक महासागराचे दोन भाग पड-तात. यांपैकीं उत्तर अटलांटिक हाच विशेष प्रसिद्ध असून त्याच्या पश्चिमेच्या बाजूला कॅरीबियन समुद्र, मेक्सिकोचें आखात, सेंटलॉरेन्सचें आखात व हडसन उपसागर असून, पूर्वेच्या बाजूला भूमध्य समुद्र, काळा समुद्र, उत्तर समुद्र, व बाल्टिक समुद्र हे आहेत. उत्तर अटलांटिक महासागर हा आर्क्टिक महासागराला हडसन सामुद्रधुनी डेव्हिस सामुद्र-धुनी, डेन्मार्क सामुद्रधुनी व नार्वेजियनसमुद्र यांनीं जोडलेला आहे. उत्तर अटलांटिकची रुंदी ६० अक्षांशाजवळ सुमारें २००० मैल, ५० अक्षांशाजवळ १७५० मैल, २५ अक्षांशा-जवळ सर्वांत अधिक म्हणजे ४५०० मैल आहे. पुढें पुन्हां रुंदी कमी होऊन केपपामस आणि केपसेंटरॉक यांच्यामध्यें रुंदी फक्त १६०० मैल आहे.

दक्षिण महासागर उत्तर महासागराहून अनेक बाबतींत भिन्न आहे. म्हणजे त्याच्या दोन्ही बाजूंचा किनारा सरळ आहे, समुद्र वगैरे दोन्ही बाजूंस मुळींच नाहींत. रुंदी दक्षिणे-कडे वाढत जाऊन ३५° दक्षिण अक्षांशाजवळ ३७०० मैल आहे. उत्तर महासागराचें एकंदर क्षेत्रफळ, त्यांतून निघणारे समुद्र वगळतां, १,०५,८८,००० चौरस मैल आहे. दक्षिण महासागराचें क्षेत्रफळ १,२६,२७,००० चौरस मैल आहे. अटलांटिक महासागराला पृथ्वीवरील बऱ्याचशा मोठमोठ्या नद्यांचें पाणी येऊन मिळतें. त्या नद्या सेंटलॉरेन्स, मिसिसिपी, ओरीनोको, अमेझॉन, कांगो, नायगर, लॉयर, ऱ्हाइन, एल्ब वगैरे अनेक आहेत.

त ळ च्या पृ ष्ठ भा गा ची र च ना:—अटलांटिक महासाग-राच्या तळभागाच्या रचनेसंबंधानें विशेष महत्त्वाची गोष्ट अशी कीं ५०° उत्तर अक्षांशापासून ४०° दक्षिण अक्षांशाप-र्यंत बहुतेक मध्यभागाच्या सुमारास खडकाळ प्रदेशाचा एक पट्टा आहे. हा खडकाळ भाग साधारणत: १७०० पुरुष खोलीवर आहे. अझोर्स बेटांच्या बाजूला हा खडकाळ भाग बराच रुंद झालेला असून ५०° उत्तर अक्षांशाच्या सुमारास तो आयर्लंड व न्यूफाउंडलंड यांच्या दरम्यान पसरलेल्या खडकाळ प्रदेशाला जाऊन मिळालेला आहे. ५०° अक्षांशाच्या उत्तरेच्या बाजूला आईसलंड व फेरो बेटें यांच्यापासून स्काट-लंडच्या उत्तर टोंकापर्यंतहि असाच खडकाळ भाग असून तो बराच उथळ म्हणजे सरासरी २५० पुरुष खोलीवर आहे. म्हणजे अटलांटिक महासागर आणि आर्टिक महासागर यांच्या-मध्यें हा एक बांधच आहे. मधल्या खडकाळ पट्ट्याच्या दोन्ही बाजूला अटलांटिक महासागराची खोली पुष्कळ म्हणजे ३००० पुरुषपर्यंत आहे. आणि मधून मधून खोली याहूनहि जास्त आहे. अशा खोल भागांना ( बिस्केच्या उपसागराजव-ळचा ) पीकडीप, ( केपव्हर्ड बेटाजवळचा ) मोसलेलीप वगैरे नांवें दिलेलीं आहेत. बहामा बेटाजवळचा नेअर्सलीप हा सर्वांत मोठा व खोल असून त्याची खोली ४५६१ पुरुष आहे. १९०४ पर्यंत ४०° दक्षिण अक्षांशाच्या दक्षिणेकडील दक्षिण अटलांटिकच्या खोलीसंबंधाची माहिती बरोबर नव्हती. अंटार्टिक प्रदेशाचा शोध लावण्याकरितां गेलेल्या स्कॉटिश सफरींतील लोकांनीं दक्षिण अटलांटिकच्या दक्षिणे-कडील तळभागाचा बराच शोध लावला, बोव्हेट बेटें आणि

सँडवीच बेटें यांना जोडणारा एक पूर्वपश्चिम खडकाळ पट्टा आहे. आणि दक्षिणमहासागराच्या मध्यभागांत उत्तरेकडून दक्षिणेकडे जाणारा सुमारें १००० मैलांचा खडकाळ पट्टा वरील पव्यास जाऊन मिळाला आहे.

म हा सा ग र त ल सं शो ध नः—एच्. एम्. एस्. "च्यालेंजर" (१८७३ ते १८७६), जर्मन जहाज "गॅझेल" (१८७४ ते १८७६), "ट्राव्हेलियर" जहाज (१८८०), आणि युनायटेडस्टेट्सचें पाहणी करणारें "ब्लेक" जहाज यांतील मंडळींनीं अटलांटिक महासागराच्या तळभागाचें संशोधन बरेंच केलें व त्यांत जर्मन जहाज "व्हायडीव्हीया" (१८९८) यामधील प्रोफेसर च्यून वगैरे मंडळी आणि अंटार्क्टिक प्रदेशाच्या संशोधनार्थ गेलेली मंडळी (१९०३ ते १९०४) यांनीं बरीच भर घातली.

बे टें:—इतर महासागरांच्या मानानें अटलांटिक महासागरांत बेटांची संख्या बरीच कमी आहे. खंडांच्या शेजारचीं बेटें म्हणजे भूमध्य समुद्रांतील कांहीं बेटें, आयर्लंड, ब्रिटिश बेटें, न्यूफाउण्डलंड, वेस्टइंडीज, फॉक्लंडबेटें एवढींच आहेत. आणि मुख्य महासागरांतील अझोर्स, कॅनरीबेटें, केपव्हर्डबेटें, असेन्शनबेट, सेंटहेलेनाबेट, ट्रिस्टंडा-कुन्हा व वौव्हेटबेट हीं मुख्य आहेत.

खो ली व त ळ भा ग—उत्तर अटलांटिकची सरासरी खोली २०४७ आणि दक्षिण अटलांटिकची २०६७ पुरुष आहे.

अटलांटिक महासागराचा बहुतेक तळ भाग ग्लोबीजेरिना जातीच्या चिखलाचा बनलेला आहे. १००० ते ३००० पुरुष खोलीवरील भाग बहुतेक या जातीच्या चिखलाचा आहे. ३००० पुरुषांहून अधिक खोलीचा भाग तांबड्या चिकण मातीचा आहे. उष्ण कटिबंधांतला उथळ भाग प्टेरोपॉड जातीच्या चिखलाचा आहे. अटलांटिक महासागराचा अगदीं दक्षिणेकडील भाग डायटोम जातीच्या चिखलाचा आहे. याशिवाय अधला मधला भाग निळ्या, तांबड्या व हिरव्या चिखलाचा व वाळूचा बनलेला आहे. कित्येक ठिकाणीं ज्वालामुखी पर्वतांतल्यासारखें व पोंवळ्याच्या जातीचें द्रव्यहि सांपडतें.

अटलांटिक महासागर मूळ कसा तयार झाला हा प्रश्न अद्याप सुटला नाहीं. बहुतेक भूस्तरशास्त्रज्ञांचें मत असें आहे कीं अटलांटिक महासागर इतर महासागरांइतका जुना आहे. परंतु इ. सुएझ् व एम्. न्यूमेयर हे दोघे भूस्तरशास्त्रज्ञ असें मानतात कीं, पॅसिफिक महासागर हा फार जुना आहे. आणि अटलांटिक महासागरमात्र अलीकडचा द्वितीयावस्थाक (मेसोझोइक) युगांतला आहे. ज्यूरीन (ज्युरासिक) काळांत अटलांटिक महासागराच्या मध्यभागाच्या आसपास आफ्रिका व दक्षिण अमेरिका यांचेमध्यें एक खंड होतें. अशाबद्दलचा पुरावा न्यूमेयरनें पुढें आणला आहे. एफ्. कॉस्मॅट यानें असें दाखविलें आहे कीं, अटलांटिक महासागर सितोपल (क्रेटेशियस) कालविभागांत बहुतेक हल्लींच्या स्वरूपांतच होता.

अ ट लां टि क म हा सा ग रा च्या पा ण्या चें उष्णता मा न—उष्णतामानाबद्दल माहिती देतांना उत्तर अटलांटिक व दक्षिण अटलांटिक असे दोन भाग करणें सोइस्कर आहे. उष्णतामानाची मध्यरेषा म्हणजे पृष्ठभागाच्या महत्तम उष्णतेचें सरासरीनें मध्यम मान दर्शविणारी रेषा आफ्रिकेच्या किनाऱ्याच्या ५° उत्तर अक्षांशापासून निघून त्या अक्षांश रेषेच्या जवळून चाळीस पश्चिम रेखांशापर्यंत जाते. व पुढें उत्तरेकडे वळून कॅरिबियन समुद्राकडे जाते. ह्या रेषेजवळचें उष्णतामान ८०° हून थोडें अधिक असतें. तेथून उत्तरेकडे उष्णतामान हळूहळू कमी होत जातें. आणि ६०° फा ची समोष्णतादर्शक रेषा ४५° उत्तर अक्षांशाच्या जवळ आढळते. यापेक्षां उत्तरेकडे गेल्यावर उष्णतामान अमेरिकेच्या बाजूपेक्षां यूरोपकडच्या बाजूला अधिक असतें. उत्तर अटलांटिक महासागरांतील वर सांगितलेलें उष्णतामान समुद्राच्या पृष्ठभागापासून ५०० पुरुष खोलीपर्यंत सारखेंच असतें. आर्टिक महासागराजवळच्या अटलांटिक महासागराच्या अगदीं उत्तरेकडील भागांत ३०० पुरुषाच्या खालीं पाण्याची उष्णता घनीभवन बिंदूहून म्हणजे ४°हून कमी असते. दक्षिण अटलांटिक महासागरांत उष्णतेचें मान आफ्रिकेकडील बाजूपेक्षां अमेरिकेकडील बाजूला अधिक असतें. ५०० पुरुष खोलीच्या खालीं समोष्णतादर्शक रेषा अक्षांश रेषांना बहुतेक सरळ समांतर गेलेल्या असतात.

खा र ट प णाः—सर्व महासागरांहून अटलांटिक महासागराचें पाणी अधिक खारट आहे. या महासागरांतील सर्वांत अधिक खारट पाण्याचा भाग उत्तर अटलांटिकच्या २०° आणि ३०° उत्तर अक्षांशांच्या मध्यें आहे. या दोन भागांमधला भूमध्य रेषेजवळचा पाण्याचा भाग बराच कमी खारट आहे. उत्तर महासागरांत अधिकाधिक उत्तरेकडे खारटपणा कमी कमी होत गेला आहे. व त्यांतहि पूर्वेकडील भागापेक्षां पश्चिमेकडील भागांतलें पाणी अधिक गोडें असतें. शिवाय पाण्याचा खारटपणा निरनिराळ्या ऋतूंत व निरनिराळ्या वर्षी कमी अधिक होत असतो. दक्षिण अटलांटिकमध्यें अधिकाधिक दक्षिणेकडे जावें तों पाण्याचा खारटपणा कमीकमी होत जाऊन महासागराच्या अगदीं दक्षिण टोंकाला पाणी बरेंच गोडें असतें.

ह वा मा न.—अटलांटिक महासागरावरील वाऱ्याचें भ्रमण नियमित स्वरूपाचें आहे. दक्षिण अटलांटिकमध्यें आफ्रिका आणि दक्षिण अमेरिका यांच्या आकुंचित भूपृष्ठभागामुळें वारे बहुधा नेहमीं प्रमाणें वाहतात. पण उत्तर अटलांटिकमध्यें हवेचा दाब निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळा आहे व त्यामुळें वाराहि कमीजास्त प्रमाणांत वाहाण्याचा संभव आहे. तरी यांत भूप्रदेशविस्तार अतिशय असून तोन्ही बाजूनीं महासागर बर्फानें परिवेष्टिलेला आहे त्यामुळें वाऱ्यांचें बरेंच

नियंत्रण होतें. " उत्तर अटलांटिक प्रत्यावर्त " बराच मोठा असून, हिंवाळ्यापेक्षां उन्हाळ्यांत त्याची गति जास्त असते.

प्र वा ह—वरील वातावरणीय हालचालींत व्यापारी वारे मात्र धिमे असतात व त्या योगानें पृष्ठभागाच्या पाण्याला गति देण्यांत ते मोठा भाग उचलतात. वस्तुतः हे व्यापारी वारे विषुववृत्तीय प्रवाह उत्पन्न करितात. अटलांटिक महासागरामधील सुप्रसिद्ध प्रवाह म्हणजे " गल्फ स्ट्रीम " उर्फ आखात प्रवाह होय. या प्रवाहाची रुंदी सुमारें १०० मैल, खोली ६ शें ते १५ शें फूट असून उष्णतामान सरासरी ७९° असतें. वेग ताशीं ४१५ मैल असतो. याचा संचार फार मोठा आहे व फांटेहि अनेक आहेत.

अटलांटिकमध्यें पृष्ठभागाखालून जाणारेहि प्रवाह आहेत. ज्या ठिकाणीं वर " गल्फस्ट्रीम " सारखे प्रवाह असतात तेथें हे शीत प्रवाह बरेच खालून वाहातात. ही अधोगति कांहींत स्पष्ट दिसून येते; उदाहरणार्थ यूरोपीय-आफ्रिकन बाजूला १००० पुरुषपर्यंत ही गति पाहातां येणें शक्य असतें. नार्वेजियन समुद्राचे खालील थर वर्फासारखे थंड असणाऱ्या आर्टिक महासागराच्या पाण्याचे आहेत. उत्तर अटलांटिक आर्टिक भागापासून तोडल्यासारखा असल्यानें, व त्याची खालवर गति जोराची असल्यामुळें, ही अधोगति त्यांत दिसून येत नाहीं, पण उलटपक्षीं दक्षिण अटलांटिकमध्यें, दक्षिण महासागराशीं त्यांतील पाण्याचा सरसहा संबंध येत असल्याकारणानें, अंटार्टिकचें पाणी विषुववृत्त व त्याहि पलीकडे आढळून येतें.

**अटलांटिक सिटी**—हें अटलांटिक काउंटीचें मुख्य स्थान संयुक्त संस्थानांतील न्यूजरसी संस्थानांत आहे. लोकसंख्या सुमारें अठ्ठावीस हजार. यांपैकीं सुमारें सातहजार नीग्रो होते. संयुक्त संस्थानांत हें हवा खाण्याचें ठिकाण म्हणून प्रसिद्ध आहे. व येथें उत्तम उपाहारगृहें आहेत. येथें फिरण्याकरितां उत्तम रस्ते अटलांटा सीटी हास्पिटलसारखीं रुग्णालयें व दुसरीं सोईचीं वसतीस्थानें अनेक आहेत.

**अटालिया**—हें पँफिलियांतील प्राचीन शहर असून परगाममच्या दुसऱ्या ॲटलसराजावरून याला हें नांव मिळालें. आग्नेय फ्रिजिया या सुपीक जिल्ह्याजवळील बंदर म्हणून ह्याला बरेंच महत्त्व होतें. मध्य आशियामायनरमधून सीरिया व ईजिप्तमध्यें जाण्याच्या मार्गांत हें होतें. म्हणूनच पॉल व बार्नाबर येथून जहाजानें ॲंटिऑकला गेले. ख्रिस्तीशकारंभाचे सुमारास अटालिया हें पेर्गाचें बंदर असल्यामुळें, जुन्या राजधानीस मागें टाकून राज्याचें मुख्य शहर झालें. येथील अवशेषांत हेड्रियनचो वेस आहे. बाजूला महाराणी जुलियानें बांधलेला बुरुज आहे.

**अटीनाः**—( १ ) इटाली देशांतील अत्यंत प्राचीन अशा ३ शहरांतील एक. हें लुकानियामध्यें आहे. याची तटबंदी अगदीं पुरातन अशी आहे. इ. स. पूर्वी ७ व्या शतकांत हें शहर होतें. येथें रोमनलोकांचें अर्धचंद्र सभागृह व पुष्कळ हस्तलिखितें आहेत.

( २ ) हें एक गांव कॅसियम जवळ होतें.

( ३ ) याच नांवाचें एक गांव वेनेशीप्रांतांत होतें असें प्लिनीच्या ग्रंथांत आलें आहे.

**अठरा आखाडे**—गोसाव्यांच्या अठरा संप्रदायांस हे शब्द लावण्यांत येतात. येथें अठरा हा शब्द अनेक या अर्थानें वापरण्यांत येत असावा, गोसाव्यांचे संप्रदाय खालीलप्रमाणें आहेतः—

अघोरी; अरण्य; अवधूत; आनंद; आश्रम; इंद्र; उदासी; कानफाट्या; कालवेला; गोदंड; गोरखपंथी किंवा गोरखनाथी; डवरा; नंगागिरी; निरंजनी; निर्मोही; पुरी; भराडी; भारती; राऊळ; वन; सरभंगी.

अखाडा याचा एक अर्थ संप्रदाय, पंथ असा आहे; तेव्हां अठरा अखाडे म्हणजे अठरा ( गोसाव्यांचे ) पंथ असा रूढार्थ निघाला. यांपैकीं अनेक पंथ त्यांमध्यें विवाह सुरू होऊन म्हणजे गोसावीपण जाऊन जातिस्वरूपाप्रत पोंचले आहेत. [ गोसावी पहा ]

**अठरा कारखानेः**—राज्यांतील अठरा मोठीं खातीं. यांच्या वर्गीकरणाचे तीन प्रकार आहेत, ते असे ( मोलस्वर्थ व क्यांडी यांच्या कोशाप्रमाणें. ):( १ ) उष्टर; खबुतर; जनान; जवाहीर; जामदार; जिकीर; तालीम; तोफ; थट्टी; दप्तर; दारू; दिवान; नगार; पील; फरास; बंदी; मोदी; शिकार—असे अठरा खाने. ( २ ) तोप—पील; उष्टर; फरास; शिकार; रथ; जामदार; जवाहीर; जिराईत; नगार; दारू; वैद्य; लकड; इमारती; मुदबख; कुणबिणी; खाजगत; थट्टी येणेंप्रमाणे—( ३ ) खजिना दफ्तर; जामदार; पील; जिराईत; अंबर; फरास; मुदबख; नगार; सरबत; आबदार; शिकार; तालीम; दारू, उष्टर; बकरे; तोप; तराफ.

यांतील कांहीं शब्द सहज समजण्याजोगे नसल्यानें त्यांचे अर्थ देत आहों; उष्टर=उंट. पील=हत्ती. मुदबख=पाक. सरबत=रस, अर्क, औषध. जिराईत=धान्यकोठार. थट्टी=गुरें, गोठा. फरास=बिछायती, तंबू वगैरे कापड. मोदी=युद्धसामग्री. अबदार=पिण्याचें पाणी ज्याच्या ताब्यांत आहे असा अधिकारी. अंबर=धान्य; शराफ=तांबूल.

शिवाजी महाराजांनीं राज्याभिषेकानंतर खासगी व्यवस्थेसाठीं अठरा शाळा स्थापिल्या त्यांविषयीं कृष्णाजीपंत केळुसकर आपल्या चरित्रांत माहिती येणेंप्रमाणें देतात; गजशाला ( पीलखाना ), मल्लशाला ( तालीमखाना ), धान्यसंग्रह (अंबारखाना), भेरिदुंदुभि ( नगारखाना ), यंत्रशाला ( तोफखाना ), वैद्यशाला ( शरबतखाना ), पानीयशाला ( आबदारखाना ), उष्ट्रशाला ( शुतरखाना ), शिबिरशाला ( फरासखाना ), खटकशाला ( शिकारखाना ), रत्नशाला ( जवाहीरखाना ), पाकशाला ( मुदपाकखाना ), शस्त्रशाला ( शिलेखाना ), तांबूल

शाला ( शराफखाना ), रथशाला ( गाडीखाना ), लेखनशाला ( दफतरखाना ), नाटकशाला ( नटखाना ) आणि जिनसखाना.

हे कारखाने वारंवार स्वरूपांत वदलत असत असें दिसतें. राज्यसूत्रें पेशव्यांच्या हातीं आल्यावर त्यांसहि १८ कारखाने ठेवणें भाग पडलें.

पेशवे सरकारचे अठरा कारखाने व त्यांतील अधिकारीः

१ तोफखाना—सखारामपंत पानशे, २ गणपतराव विश्वनाथ पानशे, ३ माधवराव कृष्ण पानशे, ४ जयवंतराव पानशे. दारूगोळा, खलासी वगैरे कामगार, रखवालीचे गाडदी, गाड्यांचे वैलसुद्धां कारखाना तयार होता.

२ पीलखाना—ह्यांत हत्ती शंभर होते. सरदार–१ भगवंत परशजी व २ अल्लीमहात. कारकून रामचंद्रपंत गाडगीळ.

३ उष्टरखाना—गणपतराव मोरेश्वर. ह्यांत उंट अजमासें १००० एक हजार.

४ शिलेखाना—सदाशिवपंत वाकणकर.

५ फरासखाना—राघोपंत आंबीवर यांजकडे. खरड्याच्या स्वारींतील डेरे राहुट्या वगैरे दलवादल डेऱ्यांसुद्धां.

| | |
|---|---|
| ६ कोठी<br>७ लकडखाना<br>८ इमारत<br>९ वागा<br>१० कुरणें<br>११ वहीतकोठी<br>१२ रथखाना<br>१३ पुणें पेटा | —हे सर्व कारखाने नारो शिवराम खाजगीवाले यांजकडे होते. खाजगीवाले यांचे हाताखालीं कारभारी गणेशपंत मटंगे. पुणें पेटा ह्या कारखान्यांत धरलेला आहे. तो ह्या कारखान्याच्या खर्चाकडे होता किंवा कसें तें समजत नाहीं. |

१४ थट्टी—नारायण रामचंद्र पुणें सुभा यांजकडे.

१५ पोतें व जामदारखाना—शामराव कृष्ण पोतनीस.

१६ जिन्नसखाना व वैद्यशाळा—शामराव वावूराव करमरकर यांजकडे.

१७ पुस्तकशाळा—गोविंदपंत आपटे.

१८ खासगी—नारो शिवराम खासगीवाले. (इतिहाससंग्रह पुस्तक १ लें. अंक १२ वा जुलै १९०९. )

**अठरा टोपकरः**—( एका जुन्या वाडावरून. ) नांवापुढील प्रतिशब्द अजमासानें दिले आहेत.

श्री.

पाश्चात् प्रभेद टोपिया १८

१ फिरंगी ( Portugal ), २ वलंदेज ( Holland ), ३ सुवेस ( Swiss ), ४ निविशयान ( Norwegian ? ), ५ यप्रदोर (?), ६ ग्रेंग (Greek), ७ रखतार (?), ८ लतियान ( Latian ), ९ यहुदीन ( Jew ), १० इंगरेज (English ), ११ फरासीस ( French ), १२ कसनत्यान ( Shetlandian ? Celtic ? ), १३ विनेज ( Venetians), १४ दिनमार्क (Denmark), १५ उरुस (Irish or Russian), १६ रुमियान (Roman or Rumanian); १७ तलियान ( Italian ), १८ प्रेमरयान ( Pomeranians)[ भा. इ. सं. मं. इतिवृत्त १८३५ ]

**अठरा धान्यें व उपधान्यें.** अठरा मोठीं धान्यें म्हणजे गहूं, साळ, तूर, जव, जोंधळा, वाटाणा, लाख, चणा, जवस, मसूर, मूग, राळा, तीळ, हरीक, कुळीथ, सावा, उडीद, व चवळी. एका मजेदार संस्कृत श्लोकांत हीं सर्व धान्यें गोंविलीं आहेत. तो श्लोक असाः

गोधूम शालि तुवरी यव यावनाल
वातानलंक चणका अतसा मसूराः।
मुद्ग प्रियंगुतिलकोद्रवकाः कुलित्थाः
श्यामाक माषचवला इति धान्यवर्गः ॥

१८ उपधान्यें:—हीं दोन प्रकारांनीं मोजतात; ( १ ) संजगुरा; भादली; वरी; नाचणी; वरग; कांग; खपलेगहूं; मका; करडई; राजगिरा; मटकी; पावटा; मूग; वाल; कारळा; देवभात; सातू; अंवाडी.

( २ ) संजगुरा; नाचणी; वरी; मका; मटकी; राजगिरा; शिरस; पांढरफळी; जिरें; मेथी; वेणुवीज; देवभात; कमळवीज; पाकड; अंबाडी; भेंडीवीज; गोवारी; कुड्याचें बीज.

कांहींजण खसखस व पांढरा राळा अशीं आणखी दोन उपधान्यें यांत मिळवून उपधान्यांची संख्या वीस धरितात.

**अठरा पुराणें:**—मद्वयं भद्वयं चैव ब्रत्रयं वचतुष्टयम्। अनापल्लिंगकूस्कानि पुराणानि पृथक् पृथक् ॥ आलिंपाग्नि पुराणानि कूस्कं गारुडमेव च ॥ अठरा पुराणांचीं नांवें अशीं:— १ ब्राह्म ( श्लोकसंख्या १० हजार ), २ पाद्म ( ५५ हजार ), ३ वैष्णव ( २३ हजार ), ४ शैव किंवा वायु ( २४ हजार ), ५ भागवत ( १८ हजार ), ६ भविष्य ( १४५०० ), ७ नारद ( २५ हजार ), ८ मार्कंडेय ( ९ हजार ), ९ अग्नि ( १५४०० ), १० ब्रह्मवैवर्त ( १८ हजार ), ११ लिंग ( ११ हजार ), १२ वराह ( २४ हजार ), १३ स्कंद (८११००), १४ वामन (१० हजार), १५ कूर्म (१७ हजार), १६ मत्स्य ( १४ हजार ), १७ गरुड ( १९ हजार ), व १८ ब्रह्मांड ( १२ हजार ), पुराणांतील श्लोकसंख्येविषयीं एकमत नाहीं. पुराणांवर विशेष माहिती "पुराणें" या लेखांत सांपडेल.

उ प पु रा णें:—उपपुराणें पुष्कळ आहेत. त्यांपैकीं कांहीं जुनीं व कांहीं अलीकडचीं आहेत. देवी भागवत ( काल सुमारें इ. स. ११०० ) यांत खालील यादी दिली आहे. —१. सनत्कुमार, २. नृसिंह ३. नंदी, ४. दुर्वास, ५. नारद (उप) ६. कपिल, ७. मानव, ८. उशनस, ९. वारुण, १०. काली, ११. वासिष्ठलिंग, १२. माहेश्वर, १३. सांव, १४. सौर, १५. पाराशर, १६. शिव (धर्म), १७. मारिच, १८. भागवत ( भार्गव ), कांहीं ग्रंथांतून ब्रह्मांडोपपुराण हें १९ वें उपपुराण धरतात.

**अठ्ठाविशी**—( आठ्ठावीस्सी ) अठ्ठाविशी किंवा अठ्ठावीस महाल हें नांव ( अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत ) तापी नदीच्या दक्षिणेकडील गायकवाडाच्या वांट्याच्या अठ्ठावीस परगण्यांस लावण्यांत येत होतें. यांना सुरत अठ्ठाविशी म्हणत. इ. स. १७८० मध्यें फत्तेसिंह गायकवाडानें हा भाग इंग्लिशांस दिला. [ ग्रांटडफ व बाँबे गॅझेटियर ].

**अडगांव**—हें गांव प्रांत वऱ्हाड, जिल्हा अकोला, तालुका अकोट मध्यें आहे. उ. अक्षांश २१° ७'. पू. रेखांश ७६° ५९'. लोकसंख्या तीनहजार. ह्या गांवाजवळील विस्तीर्ण मैदानावर जनरल वेल्स्ली यानें रघूजी भोंसल्याचा भाऊ व्यंकोजी ह्यावर २९ नवंबर १८०३ रोजीं जय संपादन केला, व गाविलगडचा किल्ला सर केला.

**अडत्याः**—कोणत्याहि व्यापारामध्यें, देवघेवीचीं कामें करण्याकरितां, आपले कारखान्यांत तयार केलेला, किंवा कोठारांत सांठवून ठेवलेला माल खपविण्याकरितां किंवा इतर व्यवहारांत आपले तर्फे जवाबदारी अंगावर घेऊन आपल्या वतीनें तिऱ्हाईत माणसाशीं व्यवहार करण्याकरितां मध्यस्थ माणसाची जरूर असते. अशा माणसास अडत्या, गुमास्ता किंवा दलाल अशी संज्ञा आहे. कायद्याच्या भाषेंत गुमास्ता म्हणजे दुसऱ्या मनुष्याकरितां कांहींतरी कृत्य करण्याला अथवा तिसऱ्या मनुष्याशीं असलेल्या देवघेवींत दुसऱ्या माणसाऐवजीं प्रतिनिधीदाखल वागण्याला नेमलेला जो मनुष्य तो होय. ज्या मनुष्याकरितां हा व्यवहार केला जातो म्हणजे गुमास्ता ज्याचा प्रतिनिधी असतो त्याचें नांव मुख्य किंवा मालक असें समजावें ( कलम १८२ कराराचा कायदा ).

व्या पा री द ला लां चे प्र का र अ ड त्याः—मालकानें पाठविलेला किंवा ताब्यांत दिलेला माल दलाली घेऊन विकणें हें याचें मुख्य काम असतें. आडत्या याचें दुसरें काम म्हणजे मालकाकरितां लागेल तो माल विकत घेणें व तो माल ताब्यांत घेऊन मालकाकडे पोंचता करणें. एकाच कामाकरितां अडत्या नेमतां येतो, व त्या कामासंबंधानेंच त्यास मुखत्यारपत्र मिळतें, किंवा मालकाचीं ह्याच प्रकारचीं जीं जीं कामें निघतील तितकीं सर्व कामें बजावण्यास त्यास कुलमुखत्यारपत्रहि दिलें जातें. याची नेमणूक कांहीं विवक्षित कालपर्यंत किंवा मालक मुखत्यारनामा रद्द करी तोंपर्यंत चालू असते. अडत्या दलाल नव्हे.

मुंबईस बाहेर गांवचा जो व्यवहार होतो तो अडत्यांमार्फत होतो. हे अडते पुष्कळ प्रसंगीं पेढीवाले सावकारहि असतात. बाहेर गांवच्या मनुष्याची पत मुंबईच्या व्यापाऱ्यास अपरिचित असते, त्यामुळें अडत्याच्या अस्तित्वाची आवश्यकता असते, हा अडत्या आपल्या इभ्रतीवर माल खरेदी करून बाहेर गांवच्या व्यापाऱ्यास पाठवतो. हा अडतीचा धंदा मुंबईस मोठ्या प्रमाणावर चालतो. हे अडते कमिशन १ रुपया शेंकडा कापून घेतात; याशिवाय रकमेवर व्याजाची आकारणी करतात. ते धर्मादाय म्हणूनहि दर शेंकडा चार आणेपासून आठ आणे कापून घेतात, या तऱ्हेनें धर्मादाय म्हणून कापून घेतलेल्या रकमेवर कोणत्याहि प्रकारची देखरेख नाहीं. या अडत्यांपैकीं जे महाराष्ट्रीय अडते आहेत त्यांची असोसिएशन झाली आहे पण त्यांत सर्व पेढ्या आल्या नाहींत. परदेशाशीं व्यापार करणारे जे अडते आहेत त्यांचें वर्णन परदेशी व्यापाराच्या वर्णनाबरोबर दिलें आहे.

**अडलम.**—अडलम हें कानानिटिश शहर असून जुडाच्या जातीनें व्यापलेल्या भागांत आहे. कदाचित् हेंच आधुनिक ऐ-डेकल्-मा ( बीट जीब्रीनच्या ईशान्येस ७ मैलांवर ) शहर असावें. या ठिकाणीं एक किल्ला आहे. या किल्ल्यांत डेव्हिडनें दोन वेळ आश्रय घेतला होता येथें खारेटुन ( सेंट चारिटन ) याची गुहा असल्याची दंतकथा कदाचित् धर्मयोध्यांच्या वेळेपासून प्रचारांत आली असावी. दुःखानें गांजलेले लोक, कर्जबाजारी व जीवितास कंटाळलेले. यांचें आश्रयस्थान, या अर्थानें अडलमचें वर्णन सरवाल्टर स्कॉटनें केलें आहे.

[ I Sam xxii. I; 2 Sam V. 17. Sir walter Scott Waverley ch. LVII and Old Mortality. ]

**ॲडलर फेलीक्स**—अमेरिकन शिक्षणशास्त्रज्ञ. जन्म अलझे (जर्मनींत) गांवीं १८५१मध्यें. कॉर्नेल विश्वविद्यालयांत पौरस्त्य वाङ्मयाचा अध्यापक १८७४ सालीं. १८७६त न्यूयार्क येथें नीतिशिक्षणसंस्था ( Society for Ethical Culture ) या संस्थेच्या वाढीकरितां त्यानें बरेच श्रम केले. १९०२ सालीं तो कोलंबिया विश्वविद्यालयांत राजकीय व सामाजिक नीतिशास्त्र यांचा मुख्याध्यापक झाला. डॉ. ॲडलरनें लोकोपयोगी व सामाजिक सुधारणांकरितां मोठी चळवळ केली. उदाहरणार्थ जिल्हानिहाय शुश्रूषागृहें, खंडानें घेतलेली मिळकत, घरें इत्यादि बाबी. यानें पुढील पुस्तकें प्रसिद्ध केलीं: धर्म व कर्म, मुलांचें नीतिशिक्षण, आयुष्य व संचित, विवाह व घटस्फोट, कर्तव्यधर्म. [ Creed and Deed (1877); The Moral Instruction of Children 1892; Life and Destiny ( 1903 ); Marriage and Divorce 1903; आणि The Religion of Duty (1906 )].

**अडसः**—गांव, तालुका नागपुर, जिल्हा नागपुर. लोकसंख्या सुमारें ३००. नागपुरच्या वायव्येस १७ मैलांवर नागपुर तहशिलींत हें लहानसें खेडेगांव असून यांत ५ जुनीं देवळें आहेत. गणपतीच्या देवळांत मूर्ति एकाच दगडाची केलेली असून देवाभोंवती प्रदक्षिणा घालतां येतील अशा रीतीनें बसविली आहे. गांवाजवळच्या टेंकडीवर तीन लिंगांचें महादेवाचें देवालय असून लिंगें जमिनींतून आपोआप वर आलीं आहेत असा समज आहे. येथें भोंसल्यांनीं बांधलेले दोन तलाव आहेत. बांधकाम दगडी आहे. नोवेंबर व जानेवारी महिन्यांत लहान

लहान जत्रा भरतात. या देवळाचे पूजारी गोसावी असून, देवळाकरतां दिलेल्या जमिनीची व्यवस्था एकजण पाहतो. गांवांतील रहिवासी वहुतेक ब्राह्मण आहेत. (नागपूर डि. गॅ.)

**अडाण:**—या नदीची लांबी एकंदर १३० मैल आहे. ही वाशीम तालुक्यांत उगम पावून पैनगंगा नदीस मिळते. उन्हाळ्यांत या नदीस वहातें पाणी नसतें. तरी ठिकठिकाणीं पाण्याचे डोह सांपडतात ( यवतमाळ डि. गॅ. ).

**ॲडाम्स जॉन**—अमेरिकेचा दुसरा अध्यक्ष, जन्म १७३५ क्विन्सी गांवीं. याचा बाप शेतकरी होता. हा १७५५ सालीं हारवर्ड कॉलेज मधून पदवीधर झाला. इ. स. १७६८ सालीं यानें इंग्लंडदेशांत पसार झालेला "स्टँप अक्ट" अमेरिकन लोकांस आपले प्रतिनिधि पार्लमेंट सभेंत पाठविण्याचा अधिकार नसल्यामुळें त्यांस लागू नाहीं, असें प्रतिपादन केलें. अमेरिकेचें स्वातंत्र्य जाहीर करण्याचा खलिता ज्यांनीं काढिला त्यांपैकीं हा एक होता. ब्रिटिश सरकाराशीं व्यापारासंबंधीं तह करण्याकरितां यानें पुष्कळ प्रयत्न केले. फ्रेंच लोकांविषयीं याचें मत वाईट होतें व त्या लोकांचा विश्वास यास वाटत नव्हता. इंग्लंड देशांत अमेरिकेचा राष्ट्रीय वकील या नात्यानें हा तिसऱ्या जॉर्ज बादशाहाच्या दरबारीं होता. १७९६ सालीं हा अमेरिकेचा अध्यक्ष निवडला गेला. अमेरिकेंतील संस्थानांच्या एकीकरतां यानें फार मेहनत केली. याचा स्वभाव अतिशय तापट असून तो फार साहसी व आवेशी होता. तो हातीं घेतलेलें काम जीव लावून करीत असे. पण स्वतःच्या मतांबद्दल फाजील अभिमानामुळें व हेकेखोर भांडणखोरपणामुळें हा पुढें लवकरच लोकांस अप्रिय झाला. मृत्यु ४ जुलै स. १८२६.

**ॲडाम्स जॉन क्विन्सी**—अध्यक्ष जॉन ॲडाम्सचा वडील मुलगा. जन्म १७६७ सालीं क्विन्सी गांवीं. याच्या नांवावरून ह्या गांवास हें नांव पडलें. १७८७ सालीं हारवर्ड विद्यालयाचा पदवीधर. थॉमस पेनच्या 'मनुष्याचे हक्क' या प्रसिद्ध पुस्तकाचें खंडन करण्याकरितां यानें बरेच लेख लिहिले. १७९६ सालीं जॉर्ज-वाशिंगटननें यास पोर्तुगाल देशांतला अमेरिकेचा वकील नेमिलें. पुढें त्यास बर्लिन येथें तीच जागा दिली. १८०३ मध्यें संयुक्त संस्थानांच्या सभेचा हा एक सभासद झाला. हा संयुक्त ( फेडरेलिस्ट ) पक्ष सोडून लोकशाहि ( रिपब्लिक ) पक्षास मिळाला. १८०६-१८०९ हार्वर्ड कॉलेजांत अध्यापक. १८०९ रशियांत अमेरिकेचा वकील. १८१८ मनरो अध्यक्षाचा चिटणीस. अध्यक्ष मनरोच्या नांवानें प्रसिद्ध असलेलें तत्त्व यानेंच शोधून काढिलें. १८२३ च्या अखेरीस हा अमेरिकेचा अध्यक्ष झाला. यानें गुलामगिरी नाहींशी करण्याकरितां फार प्रयत्न केले. मोठ्या चिकाटीनें व परिश्रमानें यानें लेखनस्वातंत्र्यास आळा घालणारे नियम रद्द केले.

याच्या मध्यें खरी योग्यता, लोकांविषयीं कळकळ, स्वतंत्रपणा वगैरे गुण होते. ह्याची बुद्धि विशाल होती.

**ॲडाम्स हेनरी कार्टर:**—हा अमेरिकन अर्थशास्त्रवेत्ता डेव्हन पोर्ट येथें जन्मला (१८५२). उच्च शिक्षण झाल्यावर तो जॉन हापकीन्स विश्वविद्यालयांत फेलो व लेक्चरर होता. व पुढें कॉर्नेल विश्वविद्यालयांत लेक्चररचें काम केल्यावर तो मिचिगान विश्वविद्यालयांत अर्थशास्त्र व आयशास्त्र ( Finance ) या विषयाचा अध्यापक झाला. तो अंतःसंस्थानीय व्यापारी संघाचा ( Interstate Commerce Committee ) आंकडेशास्त्री असे.

त्यानें लिहिलेल्या ग्रंथांपैकीं, उद्योगधंद्यामध्यें संस्थानचें अंग ( The State in relation to Industrial Action 1887 ), संयुक्त संस्थानांतील व्यवहार (Transaction in the United States 1885 ), राष्ट्रीय कर्ज (Public Debts 1887), आयशास्त्र (The Science of Finance 1888), अर्थशास्त्र व कायदेशास्त्र ( Economics & Jurisprudence 1897) हे ग्रंथ मुख्य आहेत.

**अडावद**—मुंबई पूर्वखानदेश. चोपड्याच्या पूर्वेस १२ मैलांवर सुमारें पांच हजार लोकवस्तीचें गांव. पूर्वी हें महत्त्वाचें ठिकाण असून महालाचें ठाणें होतें. गांवामध्यें गढी होती तिची माती लोक नेतात व पूर्वीच्या कचेरीमध्यें हल्लीं शाळा भरते. येथें लालबागेमध्यें एक बांधलेली पायऱ्यांची जुनी विहीर आहे. ही एका शामदास गुजराथ्यानें बांधली. याखेरीज एक १०८९ हिजरी ( इ. स. १६७८) मध्यें बांधलेली मशीद असून तीवर फारसी लेख आहे. याच्या वायव्येस तीन मैलांवर उनवदेव नांवाचें उन्हाळें आहे. ( मुं. गॅ. )

**ॲडीस अबाबा:**—ही अबिसिनीयाची राजधानी होय. उ. अ. ९° व. पू. रे. ८° ५६' हें शहर एन्टेटो रांगेच्या उतरणीवर समुद्रसपाटीपासून ८००० फूट उंचीवर वसलेलें आहे. भोंवतालचा प्रदेश गवताच्या कुरणांनीं व्यापलेला आहे. हें शहर म्हणजे एक छावणीच आहे असें म्हटलें तरी चालेल. येथें मोठ्या इमारती नाहींत. येथील मुख्य व्यापारी हिंदु व आर्मेनियन लोक आहेत. येथील इमारतींत फारसें शिल्पकौशल्य दिसत नाहीं. दुसऱ्या मेनेलेकनें १८९२ इसवी सालीं या शहराची स्थापना केली.

**ॲडीरॉनडॉक्स्.**—या नांवाचा पर्वतसमूह अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत ईशान्य न्यूयार्कमध्यें क्लिंटन, इसेक्स फ्रँकलिन व हॅमिलटन परगण्यांत आहे. भूगोलवेत्त्यांनीं याचा समावेश " आपालाकियन " व्यूहांत केला आहे पण तें बरोबर नाहीं. खरोखर याचा समावेश कानडाच्या "लारेन्शियन" डोंगरांत होतो. याचीं शिखरें २०० आहेत. त्यांची उंची २००० ते ५००० फूट आहे. येथें पुष्कळ नद्यांचें उगमस्थान आहे. त्यांत मुख्य नदी हडसन आहे. येथें सरोवरेंहि पुष्कळ आहेत. त्यांत वरचें व खालचें "कारन्याक" व "लॅसिड" हीं फार मोठीं आहेत. यावरील जंगलें फार दाट आहेत. यांत

देवदार व स्प्रूस झाडें वाढतात. लोखंड व ग्राफाईट हे पदार्थ सांपडतात.

**ॲडिसन जोसेफ**—( १६७२–१७१९ ) प्रसिद्ध कवि व निबंधकार. हा १६७२ सालीं मेच्या पहिल्या तारखेस मिल्स्टन येथें जन्मला. ह्याचा शाळेंतील विद्याभ्यास संपल्यावर, हा कांहीं दिवस ऑक्सफोर्डला क्वीन्स कॉलेजमध्यें होता. सुमारें दोन वर्षांनीं, मॅगडालेन कॉलेजमध्यें त्याला लॅटिनकाव्यामध्यें प्रगति दाखविल्यावद्दल "डेमि" नांवाची शिष्यवृत्ति मिळाली. त्याचे पहिले लेख सगळे लॅटिनमध्यें असून कवितावद्ध आहेत. एका 'जॉर्जिक' काव्याचें भाषांतर व ड्रायडनच्या मिसलेनीझ मधील एक कविता यामुळें त्याचा चार्लस मॉन्टेग्यू व लॉर्ड सॉमर्स यांच्याशीं परिचय झाला. १६९९ सालीं हा फ्रान्समध्यें फ्रेंच भाषा शिकण्याकरितां गेला असतांना मॉंटेग्यू व सॉमर्स यांनीं याची वार्षिक ४५०० रुपये पगारावर नेमणूक केली. परंतु हा इटालीमध्यें वर्षभर राहून १७०२ सालीं स्वित्झरलंडहून परत येत असतांना व्हिगपक्षाची सत्ता गेल्यामुळें त्याला नोकरीस मुकावें लागलें.आतां त्याची सांपत्तिक स्थिति फार खालावली होती. "केटो," "पदकाविषयीं संवाद" व "इटालीमधील कांहीं भागांवरील विचार" हे सर्व लेख त्यानें यूरोपखंडांत असतांना लिहिले. भाषेंतील चैतन्य व विनोद यांनीं हे लेख परिपूर्ण आहेत परंतु त्यांत चिकित्सकबुद्धि व पुरातन वस्तुज्ञान हीं दिसत नाहींत.

१७०४–१७१० पर्यंत ह्यानें सरकारी नोकरी केली. यानें आपली विद्वत्ता व सामर्थ्य आपल्या लेखांनीं लोकांच्या नजरेस आणिल्यामुळें तो सार्वजनिक कामास लायक ठरला. याला मोठमोठ्या लोकांत व राजदरबारीं मान होता. १७०४ मध्यें यानें ड्यूक आफ मार्लबरोला उद्देशून एक कविता लिहिली. ती लोकांना फार पसंत पडली. १७०६ मध्यें त्याला अंडर सेक्रेटरीची जागा मिळाली. १७०७ मध्यें हॅलिफॅक्सनें त्याला सेक्रेटरी केलें. १७०८ मध्यें ह्याचा पार्लमेंटमध्यें प्रवेश झाला. ह्या सर्व हुद्द्यांचीं कामें त्यानें चोख रीतीनें बजाविलीं. ह्या सर्व अवधांत त्यानें कांहीं राजकीय लेख लिहिले होते. तो जरी स्वभावानें लाजाळू होता, तरी त्याचें सरळ वर्तन व औपकारिक बुद्धि यांमुळें लोक त्याची कींव करीत.

१७१० मध्यें "टॅटलर," १७११ मध्यें "स्पेक्टेटर" आणि १७१३ मध्यें "गार्डिअन" या मासिकांत त्यानें पुष्कळसे विनोदपर, बोधपर, व ज्ञानोत्तेजक लेख लिहिले. ह्यांत स्पेक्टेटर मधील लेख फार विचारपूर्वक लिहिलेले असून त्यांचें ध्येय फार उच्च आहे. समाजाच्या वेडगळ चाली व मानवस्वभाववैचित्र्य व लोकांची विघडलेली अभिरुचि हे विषय स्पेक्टेटरमध्यें घेतलेले असून त्यांत लोकांवर ठिकठिकाणीं गोड शब्दांत टीका केलेली आहे. ह्या लेखांत गहन तत्त्वज्ञानाचीं मतें नसलीं तरी समाजसुधारणेकडे बरेंच लक्ष दिलेलें आहे.

स्पेक्टेटरचा संपादक, स्टील, हा ॲडिसनचा बाळपणचा मित्र होता. परंतु स्टीलनें "पीअरेज बिल" वर लिहितांना लोकपक्ष उचलून धरला आणि ॲडिसननें त्यावर टीका केली त्यामुळें त्यांचा बेबनाव झाला. त्याचप्रमाणें ॲडिसननें टिकेलचें इलियड पोपच्या इलियडहून चांगलें आहे असें प्रतिपादल्यावरून, ॲडिसनचें पोपशींहि वांकडें आलें. ॲडिसन १७१९ च्या १७ जूनला मरण पावला. ॲडिसनची सरळ व सुबोध भाषा त्यानंतरच्या ग्रंथकारांस आदर्शभूत झाली आहे व अद्यापिहि भाषापद्धतीमध्यें अडिसनच्या संप्रदायास मान्यता आहे.

**ॲडिसनचा रोगः**—हा रोग सर्व शरीराला झाला असतां त्याचीं मुख्य लक्षणें म्हणजे त्वचेचा स्वाभाविक जो वर्ण असतो त्याचें विकृतसंवर्धन, अत्यंत अशक्तपणा, अपचन, अतिसारादि पचनेंद्रियाचे रोग, हृदयक्रिया अशक्त व अनियमित चालणें हीं होत. यास कारण सुप्रारेनेड ग्रंथि ( Suprarened gland ) या पिंडांचे नेहमींचे व्यापार व कार्य न होणें हें होय. यास अपवादात्मक रोगी आढळतात. त्यांमध्यें हे पिंड न बिघडतां त्वचा मात्र पालटते. अगर हे पिंड बिघडूनहि त्वचेस विकार होत नाहीं. या रोगाचा शोध इ. स. १८५५ सालीं ॲडिसन या डाक्तरानें लाविला. व याचे शोधावरून पारीस येथील ब्रौउन स्वीकर्ड या जगविख्यात शोधकास या पिंडाचें शरीरांतील कार्य व उपयोग यांचें संशोधन करण्याची स्फूर्ती झाली. यानंतर बरेच वर्षांनीं मिक्सिसिडेमा(Myxcedema)नामक रोग थायरॉइड पिंडाचें सत्त्व देऊन बरा करितां येतो असा शोध लागल्यावर शरीरांतील असल्या सर्वच नलिकाशून्य पिंडाच्या क्रिया व कार्य यांचें संशोधन जारीनें सुरू झालें. व हें कार्य तडीस नेण्याची अहमहमिका सर्व देशांतील यूरोपियन तज्ज्ञांमध्यें सुरू झाली. पण शेवटीं लंडनच्या शेफर नांवाच्या शोधकानें यांतील आंतररसाचें कार्य व महत्त्व याचें खात्री पटणारा शोध व विवेचन केलें व अगोदर ॲडिसन याची जी रोगोपपत्ति निघाली होती तिचें दृढीकरण झालें. हे शोध येणेंप्रमाणें आहेत (१) या पिंडामध्यें अतिशय जलाल असें सत्त्व असतें. (२) हें सत्त्व प्राण्यांना पोटांत दिलें असतां विषबाधेसारखीं लक्षणें होतात.(३)यापासून अड्रेनलिन (Adrenalin) नांवाचें विशिष्ट सत्त्व निराळें काढतां येतें. (४) व हें पोटांत दिलें असतां शरीरांतील लहान धमन्यांचें आकुंचन होऊन शरीरांतील रक्ताभिसरणाचा दाब अगर भार वाढतो. यांत आणखी खालील शोधांची नवीन भर पडली आहे ते असेः—(५) हे पिंड बिघडले म्हणजे त्यांतील आंतररसोत्पत्ति थोडथोडी होत जाते. अगर मुळींच नष्ट होते आणि मग वरील लक्षणें होऊं लागतात. (६) हे पिंड विकृत होण्याचें कारण उदरामधील ( सिंपथेटिक ) सहानुभूतिक मज्जातंतूचें जाळें असतें, त्यामध्यें दाह अगर बिघाड होऊन या रोगास आरंभ होतो.

मृतरोग्याचे विकृत पिंडाची तपासणी करितां आढळून येणाऱ्या बाबी:—(१) शेंकडा ८० रोग्यांत ह्या पिंडांतील गाभा क्षयक्रिया सुरू होऊन पूयोत्पत्तीनें विलबिलीत झालेला असतो. बहुधा दोन्ही बाजूंचे पिंड बिघडलेले असतात व रोग्याचे शरीरांत दुसरीकडे कोठें तरी क्षयक्रिया सुरू असते. किंवा पृष्ठवंशास्थि क्षयक्रियेनें पोखरलेले असतात व येथून रोगबीज या पिंडांत फैलावतें. (२) कांहीं पिंड वरील क्षयक्रिया न होतां केवळ शुष्क होऊन संकुचित झालेले दिसतात. (३) अगर त्यांत दाहक्रियेचीं लक्षणें होऊन शेवटीं तो पिंड शुष्क व संकुचित होतो. (४) अगर पिंडांत कांहींहि विकृति नसून त्याचे जवळ असणारी सहानुभूतिक मज्जाग्रंथि विकृत होऊन ती रोगाचे जाळ्यांत गुरफटून गेलेली आढळते.

लक्षणें:—रोग्यास हळूहळू अशक्तपणा वाटण्यास आरंभ होतो व तो वाढत जातो. चोर जसा हळूच घरांत प्रवेश करितो त्याप्रमाणें हीं सर्व नवीन नवीन लक्षणें हळूहळू शरीरांत प्रवेश करितात. हृदयक्रिया अशक्त व अनियमित होऊन घेऱ्या व चक्कर येऊन एखादेवेळीं त्या बेशुद्धींत रोग्याचा अंतहि होतो. रक्ताभिसरणाच्या दाबाचें मान अत्यंत कमी झालेलें असतें. मळमळ, ओकारी अगर जुलाब हीं लक्षणें मधून मधून जोर करितात. ह्या रोगाचा पाया शरीरांत भक्कम भरला गेल्यानंतर सर्वांचे लक्षांत येण्यासारखें बाह्य लक्षण दिसूं लागतें तें हें कीं त्वचेमध्यें पिंगटपणा अगर पिंवळटपणा, काळसरपणा अगर काळेपणा दिसूं लागतो. ह्या त्वचापालट हस्तपादमुखादि नेहमीं उघडे असणारे भाग, अगर नेहमीं अंमळ काळसरच असणारे काख, स्तनाभोंवतालची जागा, अगर कंबरेचा जो भाग नेहमीं वस्त्रानें अगर कंबरपट्ट्यानें आवळला जातो तेथें विशेष आढळून येतो. कधीं तोंडांतील अगर अन्य ठिकाणच्या श्लेष्म त्वचेंतहि ह्या बदल दिसून येतो. रोग्याचें उष्णतामान बाजवीपेक्षां कमी असतें. पुरुषांना व श्रीमंतांपेक्षां गरिबलोकांना ह्या रोग विशेषेंकरून होतो. याचें कारण पौष्टिक पदार्थ खाण्यापिण्याचे कमतरतेमुळें गरिबांना होणारा क्षयरोग हें होय.

निदान:—रोग प्रथमावस्थेंत ओळखण्यास अगदीं सोपा असा नसतो. कारण गरोदरपणा, गर्भाशयग्रंथि, उदरोत्पन्नग्रंथि, कांहीं विवक्षित हृद्रोग व (Ex opthalmic goitre) या रोगामध्येंहि यासारखाच त्वचेंत पालट होतो. सोमलभस्म व रौप्यभस्मादि औषधें फार दिवस घेतल्यानेंहि त्वचापालट होतो. पण कमी असणारा रक्ताभिसरणभार हृदयाचा व इतर अशक्तपणा या लक्षणांवरून रोगनिदान होण्यास मदत होते. हें रोगनिदान ठरविण्यासाठीं या पिंडाचें आंतररससत्त्व पोटांत दिलें असतां रोग्याचे रक्ताभिसरणभारांत एकदम सुधारणा होते, व साध्या माणसास तें दिलें असतां कांहीं बदल होत नाहीं.

उपचार:— प्रकृति एकंदरीनें सुधारेल असे सर्व इलाज व उपचार करावे. पौष्टिक आहार व सोमल, कुचला इत्यादिमिश्रित पाचन वाढविणारीं पौष्टिक औषधें द्यावींत. मोकळ्या व स्वच्छ हवेंत रोग्यास ठेवावें, व निरनिराळ्या प्रकारचें या पिंडरसाचें सत्त्व विकत मिळतें त्याचा उपयोग केल्यानें सुधारणा होते.

या रोगाचें वर्णन आपले वैद्यकांत नाहीं, असें वाटतें. परंतु आपले देशांतहि ह्या रोग अगदीं अपरिचित नाहीं. म्हणून याजकडे आपले वैद्यवर्गानें लक्ष पुरवावें.

**अडुर.**—मुंबई, धारवाडजिल्हा, हनगलच्या पूर्वेस दहा मैलांवर असलेलें खेडें. लोकसंख्या सुमारें दीड हजार. बाराव्या शतकांतील एका शिलालेखांत पांदीपुर (Pandipur) या नांवाखालीं या गांवाचा उल्लेख असून इ. स. १८६२ पर्यंत हें एका लहानशा भागाचें मुख्य ठिकाण होतें. पूर्वेस काळेश्वर महादेवाचें देऊळ असून तेथें (Fleets Kanarese Dynasties 36,85,47) सन १०४४ सालचा एक शिलालेख आहे. या गांवांत आणखी दोन शिलालेख सांपडले आहेत. एक सन १०३४ चा असून दुसऱ्यावर तारीख नाहीं. ज्यावर तारीख नाहीं त्या शिलालेखाच्या आंतील मजकुरावरून तो पूर्वींचे चालुक्य राजे यांच्यांतील सहावा राजा कृत्तिवर्मा (इ. स. ५६७) याच्या वेळचा आहे असें स्पष्ट दिसतें. आणखी एक शिलालेख तेरावा राष्ट्रकूट राजा कृष्ण दुसरा याच्या वेळचा (८७५ते९११) इ.स. ९०४ मधील आहे. इ. स. १०४४ तील शिलालेख पश्चिमेकडचे चालुक्य वंशांतील राजांपैकीं सहावा राजा सोमेश्वर पहिला (इ. स. १०४२-१०६८) याचे वेळचा आहे. याच्या वेळचे एकंदर ४० शिलालेख सांपडले आहेत. (मुं. गॅ.).

**अडुळसा:**—या वनस्पतीचीं झाडें आपल्या देशांत सर्व ठिकाणीं सांपडतात.

नांवें:—संस्कृत-वासक, वासा, अटरुष इ०; म० अडुळसा; वं० बाकस, वासक; हिं० अरूषा; उरिया—बासं; का० आडूसा, आडसोगे; ते० अडसर; ता० अधडोडे; गु० अडूसो; Latin-Adhatoda; English-Adhatoda Vasaka.

वस्तुक्षेत्र:—हिंदुस्थानांतील बहुतेक उष्णप्रदेशांत ४००० फूट उंचीपर्यंत हें झाड सांपडतें. हिमालयाचे खालील भागांत हीं झाडें विपुल असून पूर्व हिंदुस्थानांत साधारण व पश्चिम आणि दक्षिण हिंदुस्थानांत तुरळक तुरळक आहेत. या झाडांचीं वनेंच्या बनें आढळतात. कोठें कोठें कुंपणाकरितां यांची लागवड केली जाते.

उपयोग—औषध, रंग, खत वगैरे कामाकरितां याचा उपयोग करतात. याशिवाय ही वनस्पति कृमिनाशकहि आहे.

पुरातन कफविकार, दमा व क्षय या रोगांवर या वनस्पतीचा उपयोग होतो. जॅकवुडच्या किसाबरोबर (करवतीनें कापलें असतां पडणारा चुरा) याचीं पानें उकळलीं असतां पिवळा रंग तयार होतो. यांच्या अंगीं कृमिनाशक धर्म अस-

ल्यामुळें किंवा यांत बरेंच पालाश ( पोटॅश Potash ) असल्यामुळें खताकरितां ह्या पानांचा उपयोग करतात. मौक्तिक भस्म तयार करण्याकरितांहि या वनस्पतीचा उपयोग करतात. या झाडांपासून बंदुकीचे दारूकरितां कोळसा व बंगालमध्यें मणि तयार करतात.

नाग टेकड्यांवर या झाडांच्या बुंध्याचा शकुन पाहण्याकडे उपयोग करतात. ही वनस्पति कृमिनाशक किंवा कोथघ्न आहे यासंबंधीं बराच मतभेद आहे. या वनस्पतींत आल्कलॉइड आहे असा शोध हूपरनें लावून त्यास व्हॅसिसाइन ( Vacisine ) असें नांव दिलें. टार्ट्रेट हें बाजारांत मिळतेंच परंतु त्याच्या इतकेच गुणकारी दुसरे कमिनाशक पदार्थ असल्यामुळें त्याचा फारसा उपयोग होत नाहीं. खताच्या व कृमिनाशक गुणांच्या बाबतींत पानांच्या उपयोगाविषयीं आणखी शोध लागणें अवश्य आहे.

अडुळशाचीं पानें पेरूच्या पानासारखीं दिसतात. या झाडाचें पंचांग ( मूळ, पानें, फळें, फुलें, साल ) औषधी आहे. व आर्य वैद्यकांत या झाडाचा पुष्कळ रीतीनें उपयोग होतो.

अडुळशाच्या पानांचा उपयोग करतात. आर्यवैद्यकांत कित्येक रोगांत अडुळशाच्या मुळाचाहि उपयोग करण्यास सांगितलें आहे. हिंदुस्थानांत सर्वत्र मिळणारी अत्युत्तम व अत्यंत उपयोगी अशी ही वनस्पति होय. परंतु तिच्याकडे जावें इतकें जनतेचें लक्ष जात नाहीं.

अडुळशाचीं वाळलेलीं अथवा ओलीं पानें चांगलीं जुनाट, अगर पिकलेलीं घ्यावीत. कोंवळीं घेऊं नयेत. हीं पानें कडसर असून, त्यांस उग्र व चहाप्रमाणें एक प्रकारचा गंध येतो. पानें लांबट, कोन्हांटीच्या पानांसारखीं असतात.

रा सा य नि क पृ थ क्क र ण :—अडुळशांत "व्हासिसिन" ह्या नांवाचें अल्कलॉईड ( क्षार ) व " अॅटॅटोडिक अॅसिड " ह्या नांवाचें सेंद्रिय अम्ल ( Organic Acid ) असतें.

गु ण ध र्मः—कफदोषनाशक, कफसंस्रावी आणि वातशामक असून रक्तपित्त, क्षतक्षय यांत पडणारें रक्त थांबविण्याचा विशेष धर्म यांत आहे.

पुष्कळ दिवसांचा खोकला, श्वास, वैशेषिक कफ किंवा कफक्षयाची प्रथमावस्था ( ह्या अवस्थेंत तापाचा भर विशेष नसतो, लक्षणें तीव्र नसतात. ) व इतर कफविकार यांत अडुळशाचा अत्यंत उपयोग होतो. परंतु तीव्रज्वरपरीत रोगी असल्यास मात्र ह्याचा व्हावा तसा नीट परिणाम होत नाहीं. जुनाट रोगांत विशेषतः अडुळशा बरोबरच पिंपळी दिली असतां विशेष उपयोग होतो. ( Dr. U. C. Dutt, Hindu Materia Medica ). अडुळसा कडू, थंड असून कावीळ, रक्तपित्त, कफज्वर, क्षय, श्वास यांचा नाश करणारा आहे. ( राजनिघंटु ). ऊर्ध्वग व अधोग रक्तपित्ताचा नाश करणारा आहे ( गण ). हृद्रोग, वांति, कुष्ठ, तहान, इत्यादिकांत उपयोगी आहे ( धन्वंतरी ). ज्वर, मेह, अरुचि, यांत उपयोगी असून, वातुल व कफनाशक आहे ( केयदेव नि० ). येणेंप्रमाणें निरनिराळ्या गुणदोष निघंटूंत त्याचे गुणधर्म दिलेले आहेत. क्षयरोगावर अडुळसा हें अत्यंत उपयोगी औषध आहे असा समज होता, परंतु सर्वच क्षयांवर याचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं.

अडुळशाच्या पानांचा रस काढून तो अतिसार व संग्रहणींत देतात. विशेषतः रक्तातिसार व पित्तसंग्रहणी यांत उत्तम उपयोग होतो.

पानें वाळवून त्यांचें धूम्रपान केलें असतां श्वासाचा आवेग शमतो. अडुळशाचीं फुलें व फळें कडू, सुगंधयुक्त व शामक आहेत. फुलांचा काढा अगर वाफ देऊन रस काढून तो वापरावा. कित्येक वेळां त्यांचा हिम अगर फांटहि उपयोगी पडतो. फुलांचा हिम पूयप्रमेहावर फार उपयोगी होय. क्षयरोगाच्या तापांत होणारी तगमग व भासणारी तीव्र उष्णता यांत अडुळशाच्या फुलांचें सरवत अगर हिम दिल्यास फार फायदा होतो. अडुळशाचीं फळें लसणाच्या पाकळ्या अगर सतापाच्या पाल्याप्रमाणें माळ करून मुलांच्या गळ्यांत घालतात. त्यायोगें मुलांस थंडीवाऱ्याची फारशी बाधा होत नाहीं.

अडुळशाच्या ताज्या पानांचा गरम गरम चहा करून तो घेतला असतां थंडीवाऱ्यापासून आलेल्या खोकल्यास फार हितावह होतो.

अडुळशाचा सुका अर्क, ओला अर्क, मद्ययुक्त अर्क (Tincture ) व सरवत अशीं करतां येतात. अडुळशाचा रस अगर काढा वाफेवर आटवून गोळा तयार करतात, त्यास सुका अर्क ( Dry Extract ) असें म्हणतात. तोच अर्क किंचित् पातळसर राखून त्यांत मद्यार्क मिसळल्यास त्यास पातळ अर्क (Fluid Extract) असें म्हणतात. अडुळशाचा रस फिल्टरपेपर अगर फलाणीनें गाळून त्यांत शेंकडा ४० इतका उत्तम मद्यार्क मिळवून ठेवतात, त्यास मद्यार्कयुक्त अर्क अगर रस म्हणतात. सरबत तयार करून त्यांत अडुळशाचा रस समप्रमाण मिश्र करून तें पुन्हा आटवून लोहाप्रमाणें घट्ट करावें. त्यास अडुळशाचें सरवत म्हणतात. त्याचें प्रमाण वयोमान व प्रकृतिमानपरत्वें योजावें. [ वॅट. पदे. कलावैभव, भिषग्विलास २२ ].

**अॅडीलेड.**—ही दक्षिण ऑस्ट्रेलियाची राजधानी आहे. हें शहर टोरेन्स नदीच्या मुखापासून ७ मैलांवर त्याच नदीच्या कांठीं वसलेलें आहे. या शहराचे दोन भाग केलेले आहेत. एक वसतीचा व दुसरा उद्योगधंद्याचा. या दोन भागांमध्यें एक उपवन आहे व त्यामधून टोरेन्स नदी वाहत जाते. येथें रस्ते फार सुंदर आहेत. येथील इमारती व बागा फार प्रेक्षणीय आहेत. लोकसंख्या २२५३१७ ( १९१७ ).

अॅडीलेड विश्वविद्यालय १८७६ सालीं उघडलें. शिल्पशास्त्र, शेतकी, खनिखोदन, व्यापार वगैरे शिक्षण देणाऱ्या शाळा येथें आहेत. शहरांत अनेक सुंदर पुतळे उभारलेले आहेत.

कर देणाऱ्यांनीं निवडलेला एक मेयर व सहा अल्डरमेन शहराची व्यवस्था पहातात. लोखंडी व मातीचीं कामें, दारू, साबण वगैरे येथें तयार करण्यांत येतात. आस्ट्रेलियाचें हें मध्यवर्ती शेअरमार्केट आहे. येथून आगगाड्या मेलबोर्न, सिडने, ब्रिस्बेन वगैरे ठिकाणीं सुटतात. उन्हाळ्यांत येथील हवा फार उष्ण असते; पण समुद्र व पर्वत जवळ असल्यामुळें फार त्रास होत नाहीं. इतर ऋतूंत हवा सुरेख असते. पावसाचें वार्षिक मान सरासरी २०.४ इंच असतें.

ॲडीलेड शहराची स्थापना १८३६ त झाली; राणी ॲडीलेड हिच्या सन्मानार्थ ४ थ्या विल्यमच्या इच्छेवरून याला ॲडीलेड हें नांव देण्यांत आलें.

**ॲडेल्सबर्गः**—हें एक लहान व्यापाराचें गांव कॉर्निओलामध्यें आस्ट्रियांत आहे. या गांवापासून एक मैलावर सर्व यूरोपांत भव्य, सुंदर व मोठी अशी एक गुहा आहे. या गुहेंत पाण्यांत विरलेल्या खडूच्या फारच प्रेक्षणीय आकृती दृष्टीस पडतात.

**अडेसर.**—कच्छ मधील ( मुं. इं. ) वागडमध्यें रणावर असलेलें सुमारें तीनचार हजार लोकसंख्येचें ठिकाण. येथें धान्य व गूळ यांचा थोडासा व्यापार चालतो. येथील पडक्या भिंती १८१६ सालीं राव भारमलजीनें उडविलेल्या सरवत्तीची आठवण देतात. ( मुं. गॅ. ).

**ॲडोनीसः**—याचा ग्रीकदंतकथेंत उल्लेख केलेला आढळतो. हा अतिशय सुंदर असल्यामुळें "अफ्रोडीटीचा" फार आवडता होता. याच्या जन्मासंबंधानें निरनिराळ्या दंतकथा प्रसिद्ध आहेत. सिरियाचा राजा थेईस यास त्याच्या मुलीपासून अफ्रोडीटीनें उद्भूत केलेल्या अस्वाभाविक प्रेमामुळें पुत्र झाला. त्याला हें समजतांच त्यानें तीस ठार मारण्याचा हुकूम केला. पण देवांची तिजवर मर्जी असल्यामुळें त्यांनीं तिचें झाडांत रूपांतर केलें. पुढें १० महिन्यांनीं त्या झाडांतून एक सुंदर मूल बाहेर आलें. अफ्रोडीटीच्या सांगण्यावरून पर्सिफोनीनें त्यास जतन करून वाढविलें. "झ्यूस"नें असें ठरविलें कीं वर्षाचा $\frac{1}{3}$ भाग ॲडोनीसनें आपणास वाटेल तसा घालवावा. बाकीचा $\frac{2}{3}$ निमे निमे अफ्रोडीटी व पर्सिफोनीबरोबर राहून काढावा. यास एका रानडुकरानें ठार मारिलें.

पूर्वीं अथेन्स, अलेक्झांड्रिया यांसारख्या मोठ्या शहरीं या देवाच्या जत्रा भरत असत.

२ ॲडोनीस म्हणजे वनस्पतीचें चैतन्य आहे असें म्हणतात. त्याचें जन्ममरण म्हणजे सृष्टींतील हिवाळ्यांत व वसंतऋतूंत होणारे बदल दाखविण्याकरतां केलेलें रूपक होय.

३. शेक्सपियरचें "व्हीनस ॲंड अडोनीस" नांवाचें एक काव्य आहे. तसेंच शेलेनें कीट्सकवीच्या निधनासंबंधीचें "ॲडोनीस" नांवाचें एक शोकगीत लिहिलें आहे.

४. ॲडोनीस हें सहा महिने क्रान्तिवृत्ताच्या उत्तरेस, सहा महिने दक्षिणेस असणाऱ्या सूर्यावरचें रूपक आहे.

५. चवथ्या जॉर्जला पन्नाशीचा अडोनीस ( The Adonis of 50 ) म्हणत.

६. एक वनस्पतींची जात; याला "फेझंटचा ( Pheasant एक पक्षाचा ) डोळा" असेंहि म्हणतात.

७. एका फुलपांखराचें हें नांव आहे.

**अडोवा.**—अबिसीनियामधील टायग्रे प्रांताची राजधानी. हें शहर गोंडारच्या ईशान्येस १४५ मैलांवर आहे. अडोवा हें धनधान्यादिकांनीं समृद्ध अशा जिल्ह्यांत वसलें आहे. मसावापासून मध्य अबिसीनियापर्यंत जाणाऱ्या मुख्य मार्गावर असल्यामुळें हें अरबस्तान व सुदानमधील व्यापाऱ्यांचें जमण्याचें स्थान आहे. १८८७–९६ यांच्या दरम्यानच्या इटाली व अबिसीनिया यांच्यामधील लढायांत अडोवाचें फार नुकसान झालें. तथापि येथील धर्मस्थानें मात्र युद्धाग्नींतून बचावलीं. १८९६ सालीं अबिसीनियनांनीं इटालिअन सैन्याचा ॲडोवाचे लढाईंत पूर्ण मोड केला.

**ॲड्मिरॅल्टी बेटें:**—न्यूगिनीचे उत्तरेस १° ते ३° दक्षिण अक्षांश आणि १४६° ते १४८° पूर्व रेखांशांत असणाऱ्या सुमारें ४० बेटांचे समूहास ॲड्मिरॅल्टी बेटें हें नांव दिलें आहे. यांपैकीं मॅनस हें सर्वांत मोठें बेट सुमारें ६० मैल लांब असून येथील अतिउच्च शिखर सरासरी ३००० फुट उंच आहे. १६१६ मध्यें डच लोकांनी या बेटांचा शोध लावला. १७६७ मध्यें फिलिप कार्टेरेट येथें आला होता. परंतु या बेटांचे सभोंवतालच्या पाण्यांतील खडकामुळें "चालेंजर" जहाज येईपर्यंत येथें कोणास उतरतां आलें नाहीं. येथील रहिवाशी पाप्युअन वळणाचे परंतु मिश्र जातीचे दिसतात. हे लोक नरमांसभक्षक आहेत. यांनीं पुष्कळ गोऱ्यांचे खून केले आहेत.

**अड्याळः**—तहशील भंडारा, जिल्हा भंडारा. भंडाऱ्याच्या दक्षिणेस पवनीरस्त्यावर १४ मैलांवर हें एक मोठें खेडेगांव आहे. क्षेत्रफळ १३०० एकर. लोकसंख्या सुमारें तीन हजार.

येथें एक महावीर अथवा हनुमानाचें जुनें देऊळ असून मूर्ति फार मोठी आहे व ती स्वयंभू आहे असा समज आहे. कांहीं वर्षांपूर्वी खोदकाम चालू असतांना बाहेर काढलेली एक जैनांच्या पारसनाथ देवाची पाषाणमूर्ति आहे. येथें पांच सहा चांगले तलाव असून गांडळी लोकांची बरीच वस्ती आहे. रेशमी कांठाचीं धोतरें वगैरे काम, बांबूच्या टोपल्या व चटया येथें तयार होतात. येथें पोलिस ठाणें, प्राथमिक शिक्षणाची शाळा, टपालकचेरी व तपासणी अधिकाऱ्यांकरतां बांधलेलें एक लहानसें घर आहे. आरोग्यरक्षणाकरितां या ठिकाणीं एक लहान रक्कम उभारण्यांत येते.

**ॲड्राः**—हें बंदर स्पेनच्या दक्षिणेस अलमेरिया प्रांतांत "रायो ग्रँडे डी ॲड्रा" नदीच्या मुखाजवळ भूमध्यसमुद्रावर आहे. या बंदरांतून शिसें, द्राक्षें वगैरे जिन्नस बाहेर रवाना

होतात. लोकसंख्या ११,१८८ (१९००). मुख्यतः युनायटेड किंगडममधून कोळसा येतो.

**ॲड्रारः**—उत्तर आफ्रिकेंतील सहारा मरुभूमींतील निरनिराळ्या प्रांतांचें हें नांव आहे. रायो डी ओरो (Rio de Oro) या स्पॅनिश संरक्षित संस्थानाचे दक्षिणेकडील डोंगराळ भागाला अड्रार सुटफ (Suttuf) असें म्हणतात. टिंबक्टूचे ईशान्येस असलेल्या उंचवट्याच्या भागालाहि ॲड्रार असें म्हणतात. पण ॲड्रार या नांवानें नेहमीं ओळखला जाणारा प्रदेश म्हणजे सेनिगालचे उत्तरेस ३०० मैलांवर असणारा, पश्चिम सहारामधील होय. या ॲड्रार मध्यें फ्रेंचांचें प्रस्थ फार आहे. हा प्रदेश बहुतेक रुक्षच आहे, पण मधून मधून ओलाव्याच्या जागा दिसतात. येथील एकंदर लोकसंख्या सुमारें, १०,००० आहे. शिंगेटी, वादान व उजेफ्ट या ठिकाणीं लोकवस्ति दाट असून, शिंगेटी हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. येथून सुवर्णरज, शहामृगाचीं पिसें आणि खजूर सेंट लुई येथें जातात. मिठाचाहि मोठा व्यापार आहे.

**ॲड्रिअन**—अमेरिकेच्या संयुक्त संस्थानांत मिचिगानमध्यें लेनावी परगण्यांत रायसीन नदीवर हें एक शहर आहे. लोकसंख्या सुमारें अकरा हजार. येथें ॲड्रियन कॉलेज ( १८५९ ) आहे. मुलींकरितां १८७९ सालीं स्थापिलेली एक औद्योगिक शाळा आहे. येथें सार्वजनिक वाचनालय आहे. येथें व्यापार चांगला चालतो; विशेषतः तारांचीं कुंपणें तयार होतात. कृषिविषयक हत्यारें, वाद्यें, खेळणीं, मोटारी वगैरे तयार करण्याचे कारखाने व गिरण्या आहेत. १८२८ सालीं हें शहर म्हणून नोंदलें गेलें. हेड्रिअन नांवाच्या रोमन बादशहावरून या शहराला नांव पडलें असें म्हणतात.

**ॲड्रिआः**—हें गांव इतालीदेशांत रोव्हीगो प्रांतांत ॲडीगे व पो या नद्यांच्या मुखांमध्यें वसलेलें आहे. हें समुद्रापासून सुमारें १३½ मैल लांब आहे. हें रेव्हीगो प्रांताच्या धर्मखात्याच्या अधिकाऱ्याचें मुख्य ठिकाण आहे. पूर्वी ॲड्रिआ नांवाचें शहर जेथें वसलें होतें त्याच ठिकाणीं हें सध्यां आहे. ह्याच गांवावरून ॲड्रीआटिक समुद्रास ॲड्रिआटिक हें नांव पडलें. पक्ष्यांच्या विशेष निपजाविषयीं ॲरिस्टाटलच्या कालीं हें गांव प्रसिद्ध होतें. पूर्वी हें दर्यावयापाराचें ठिकाण होतें.

**अड्रिआटीक समुद्र.**—हा भूमध्य समुद्राचा भाग असून इताली व आस्ट्रीया हंगेरीचा किनाऱ्याचा भाग, मांटेनीग्रो व अलबिनियाच्या किनाऱ्यालगतचा प्रदेश यांमध्यें आहे. यास हें ॲड्रीआ गांवावरून नांव पडलें. याची लांबी ५०० मैल व रुंदी ११० मैल आहे. हा ४०° ते ४५° ४५' उत्तर अक्षांशांत आहे. या समुद्राचे कांठीं व्हेनिस हें प्रसिद्ध शहर आहे. इतालीकडचा किनारा सखल आहे व बाकीचा किनाऱ्याचा भाग खडकाळ आहे. या समुद्राची सरासरी खोली १३३ पुरुष आहे.

**ॲड्रिआनोपल.**—ॲड्रिआनोपल ( प्राचीन हेड्रिआनोपोलिस ) हें यूरोपांतील तुर्कस्तानांतल्या ॲड्रिआनोपल प्रांताची राजधानी आहे. याची लोकसंख्या सुमारें ८०००० असून निम्मे तुर्क व बाकीचे यहुदी, ग्रीक, बल्गर, आर्मिनियन वगैरे लोक आहेत. आकार व महत्त्व यांत ॲड्रिआनोपल हें कॉन्स्टँटिनोपल व सॅलोनिका यांच्या खालोखाल आहे. येथें ग्रीक आर्चबिशप व एक आर्मिनियन व दोन बल्गर बिशप असतात. ॲड्रिआनोपल हें बल्गेरियाच्या सरहद्दीवरील मुख्य तटबंदीचें शहर असून याच्या भोंवतीं आधुनिक पद्धतीनें बांधलेल्या किल्ल्यांची रांग आहे. हें तुंजानदीच्या दोन्ही तीरावर वसलें असून येथेंच तिला मॉरित्झा नदी मिळते. बेलग्रेड व सोफियाहून कॉन्स्टँटिनोपल व सॅलोनिका येथें जाण्याच्या रेलवेवर ॲड्रिआनोपल आहे. हें अगदीं पौरस्त्य शहर असून येथें इदादिए शाळा, कलाकौशल्याची शाळा, यहुदी लोकांची शाळा, झॅपिआन नांवाचें ग्रीक विद्यालय, इंपिरिअल आटोमनबँक, टोबेकोरिजी, अग्निबुरुज, व कामदारासाठीं बांधलेलें राजवाडे ह्या मुख्य इमारती आहेत. प्राचीन इमारतींत एस्कीसराइ नांवाचा सुलतानचा प्राचीन पडका राजवाडा, अलीपाशाचा बाजार, आणि तुर्की वास्तुसौंदर्याचा नमुनाच असलेली १६व्या शतकांतील दुसऱ्या सेलिमची मशीद, ह्या इमारती मुख्य आहेत.

ॲड्रिआनोपलमध्यें ५ उपनगरें असून त्यांतील कॅरॅगॅच हें अगदीं पाश्चात्त्य पद्धतीवर वसलें आहे. येथें सर्व वर्गाच्या लोकांच्या शाळा असून त्यांपैकीं कांहीं नवीन व कांहीं अगदीं जुन्या पद्धतीच्या आहेत. हमिदिए नांवाच्या सरकारी शाळेंत तुर्की व फ्रेंच या दोन्ही भाषांचे प्रोफेसर असून दोन्ही विषय शिकवितात. येथें एक ग्रीक लोकांची वाङ्मयसंस्था आहे.

इ. स. १८७७-७८ च्या युद्धानें ॲड्रिआनोपलची आर्थिक स्थिति फार चमत्कारिक झाली होती. इ. स. १८८५ सालीं पूर्व सामेलियांतून हें शहर काढल्यानें तर ती स्थिति जास्तच वाईट झाली. हें शहर पूर्वी थ्रेस व बाल्कन्स व डॅन्युबनदी मधला बराच भाग म्हणजे सध्याचा बल्गेरिया यांचें व्यापाराचें केन्द्रस्थान होतें. परंतु १८८५ पासून याचा ⅔ परकीय व्यापार फिलिप्पोपोलिस शहरानें बळकाविला. येथें रेशीम, कमावलेलीं कातडीं, लोंकरीचें, तागाचें व सुताचें कापड तयार होतें व व्यापार साधारण चांगला चालतो. फळें व शेतकीच्या मालाखेरीज कच्चें रेशीम, कापूस, अफू, गुलाबपाणी, गुलाबाचें अत्तर मेण व 'तुर्कीतांबडा'रंग वगैरे पदार्थांची निर्गत होते.

अड्रिआनोपलचें मूळचें नांव उस्कादम, उस्कुदाम अथवा उस्कोदाम होतें. परंतु हेड्रियन नांवाच्या रोमन बादशहानें (११७-१३८) हें शहर वाढवून यास दुसरें नांव दिलें. येथें इ. स. ३७८ सालीं गॉथ लोकांनीं रोमन लोकांचा पराभव केला. पहिल्या मुरादनें इ. स. १३६१ सालीं हें शहर घेतलें तेव्हां पासून १४५३ पर्यंत म्हणजे कॉन्स्टँटिनोपलचा पाडाव होईपर्यंत येथें तुर्की सुलतान रहात असत. इ. स. १८२९ ते

१८७८ मध्यें हें शहर रशियनांच्या ताब्यांत होतें. पुढें तें तुर्कस्तानाला मिळालें. बाल्कन युद्धांत हें तहामध्यें तुर्कस्ताननें सोडून द्यावयाचें होतें परंतु तुर्कांनीं लढाई चालू ठेवून तें तसेंच बळकाविलें. परवांच्या महायुद्धांत हें शहर सोडण्याची पाळी तुर्कांवर आली होती. पण सध्यां तें तुर्कांच्याच ताब्यांत आहे.

**अढोई**—कच्छमधील ( मुं. इ. ) मोर्वीच्या ताब्यांतील तटबंदीचें शहर. लोकसंख्या सुमारें साडेचार हजार. येथें कापसाचा बराच व्यापार चालतो. उत्तरेस सुमारें दोन मैलांवर काठी लोकांच्या लपून बसण्याच्या लहान लहान गुहा आहेत. ( मुं. गॅ. ).

**अणिमांडव्य**—मांडव्य ऋषीचें नामांतर.—पूर्वी मांडव्य या नांवाचा महानिश्चयी व सर्वधर्मज्ञ असा एक ऋषि होता. त्यानें पुष्कळ कालपर्यंत निष्कामबुद्धीनें तपश्चर्या केली. एके दिवशीं दुसरीकडे चोरी करून मिळविलेलें धन घेऊन आश्रमांत लपण्यासाठीं चोर आले. शिपायांस कांहीं संशय येऊन त्यांनीं त्या आश्रमांत शिरून चोहोंकडे पाहिलें तो त्यांस तेथें लपलेले चोर व लपविलेलें धन हीं दोन्ही सांपडलीं. तेव्हां ऋषीची शंका येऊन राजानें त्या चोरांसह ऋषीस सुळावर चढविलें. प्राणांचें संयमन करून त्यानें तेथें वेदपठनपूर्वक तपश्चर्या करण्यास आरंभ केला. इतर ऋषी मांडव्य ऋषीची स्थिति अंतर्ज्ञानानें पाहून अतिदुःखित होत्साते पक्ष्यांचें रूप घेऊन ऋषीजवळ आले व राजाच्या अनुमतानें ऋषीस दिलेली शिक्षा फिरविली. पोटांत शिरलेला शूल काढावयास लागले तों तो कांहीं निघेना. तेव्हां तो मूळाशीं तोडला पण आंत जें शूलाग्र अडकलें होतें तें तसेंच राहिलें म्हणून याचें नांव अणिमांडव्य प्रकट झालें. ही शिक्षा ऋषीनीं लहानपणीं गमती खातर एका पतंगाच्या पुच्छाला काडी टोंचली म्हणून यमधर्मानें फर्माविली. अल्प अपराधाबद्दल असह्य पीडा होईल असा दंड व्यर्थ केल्यामुळें धर्मास शूद्र वर्णांत जन्म प्राप्त होईल असा ऋषीनीं शाप दिला. व चौदा वर्षेपर्यंत बडलेल्या दुष्कृत्याबद्दल जीवास दंड असू नयें असा नियम बांधून दिला. [ म. भा. आदिपर्व १०७–८ ]

**अणु**.—पदार्थांच्या ज्या अत्यंत सूक्ष्म भागास स्वतंत्र रीतीनें अस्तित्व असतें त्यास अणु ( Molecule ) अशी संज्ञा पदार्थविज्ञान--शास्त्र ( Physics ) आणि रसायनशास्त्र ( Chemistry ) या दोन शास्त्रांत दिली आहे. अणु हा शब्द आपल्या तत्त्वज्ञानांत आढळतो पण भौतिकशास्त्रांत त्यास निश्चित स्थान नाहीं. अॅटम ( atom ) हा शब्द यूरोपांत सतराव्या शतकांत उत्पन्न झाला. त्यावेळीं अणु आणि परमाणु यांत भेद समजत नसत; त्यामुळें अणु आणि परमाणु हे दोन शब्द एकाच अर्थानें वापरीत. एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापासून यांतील भेद लक्ष्यांत घेऊन शब्दयोजना करण्यास सुरुवात झाली. परमाणु हा शब्द रासायनिक क्रियेस अनुलक्षून योजतात; अणूपेक्षां सूक्ष्म अशा पदार्थांच्या कणांच्या योगानें रासायनिक क्रिया होतात; अणूपेक्षां सूक्ष्म अशा या पदार्थ–कणास परमाणु अशी संज्ञा आहे. दोन किंवा अधिक परमाणू मिळून एक अणु होतो.

पदार्थांचा अणूंत विभाग होतो, किंवा पदार्थकणांच्या समुदायाच्या योगानें पदार्थांची रचना झाली आहे अशी समजूत फार प्राचीन काळापासून अतींद्रियशास्त्र आणि सृष्टिशास्त्र यांची झाली आहे. आधुनिक शास्त्रीमंडळांत अणु आणि पदार्थ-रचना यांच्या विषयींच्या कल्पना कशा रीतीनें बदलत गेल्या याविषयींचा इतिहास जेम्स क्लार्क मॅक्सवेल यांच्या शब्दांत पुढें दिला आहे.

**अणुसिद्धान्त व अनन्त विभाग सिद्धान्त**.—"अणु हा पदार्थांचा असा विभाग आहे कीं, त्याचे विभाग होऊं शकत नाहींत. अण्वात्मक सिद्धान्तांत ( Atomic Theory or Molecular Theory) असें गृहीत धरलें आहे कीं, पदार्थांची रचना अणुसमुच्चयाच्या योगानें झाली आहे. याविरुद्ध जो सिद्धान्त आहे त्याचें असें मत आहे कीं, पदार्थ हे सर्वत्रसम ( Homogeneous ) आणि सारखे व्यापिलेले ( Continuous ) म्हणजे अविच्छिन्न असे आहेत. त्यांचें असें म्हणणें आहे कीं, पाण्यासारख्या पदार्थांचे कितीहि विभाग केले तरी त्याचे आणखी विभाग होऊं शकतील. पाण्याच्या एका थेंबाचे अनंत विभाग केल्यानंतरहि जो सूक्ष्म विभाग येईल त्याचे फिरून पाहिजे तितके विभाग करितां येतील. याप्रमाणें पाहिजे तितके वेळां विभाग करितां येणें, हा सिद्धान्त अण्वात्मक सिद्धान्तास प्रतिरोधी आहे. या प्रतिरोधी सिद्धान्तास "अनंत विभाग सिद्धान्त" (Infinite divisibility of matter ) अशी संज्ञा आहे.

अणुसिद्धान्तवाद्यांचें असें म्हणणें आहे कीं, पदार्थांचे विभाग कांहीं मर्यादेपर्यंत होतात; त्यापुढें विभाग होणें शक्य नाहीं. अत्यंत लहान असा जो विभाग त्यास अणु हें नांव दिलें आहे. अणूचा विभाग होऊं शकत नाहीं असें मत अणुसिद्धान्तवाद्यांचें आहे. परंतु एतद्विरोधी लोकांचें असें म्हणणें आहे कीं, अणु कितीहि लहान असला तरी त्याचे पूर्व-पश्चिम-अधः-उर्ध्व इ. इ. देश ( Parts ) असतील; व याप्रमाणें देश ( Parts ) असणाऱ्या वस्तूचे विभाग झाले पाहिजेत. प्राचीनकाळीं डिमॉक्रिटस यानें अणुसिद्धान्त स्थापिला आणि अॅनॅक्झॅगोरस यानें याविरुद्ध असा सिद्धान्त स्थापिला कीं, पदार्थ ( जड ) आपापल्या प्रदेशांत सारखे पसरलेले आहेत; त्यामुळें अर्थातच जडपदार्थांचे वाटेल तितके विभाग होऊं शकतात, हें अनुमान यांतून निघतें. अॅनॅक्झॅगोरस याचें हें मत, त्याविरुद्ध दुसरें मत व अनेक प्रकारचें खंडण मंडण हें सर्व ल्युक्रेशिअस नांवाच्या ग्रंथकारानें उत्तम प्रकारें ग्रथित करून ठेविलें आहे.

**अणुसिद्धान्ताचा प्राचीन व अर्वाचीन इतिहासः**— आधुनिक काळांत सृष्टीविषयीं म्हणजे सृष्टपदार्थांचा अभ्यास जारीनें सुरू आहे. यावरून असें समजून आलें आहे कीं, पदार्थांच्या सूक्ष्म कणांच्या आकारावर व त्या कणांच्या गतीवर अनेक गुणधर्म अवलंबून आहेत. या प्रकारच्या शास्त्रीय शोधामुळें अणुसिद्धान्ताच्या प्रश्नाविषयीं जारीनें विचार सुरू आहेत. तेव्हां याविषयींच्या मताचा जरा जास्त विस्तृतपणें विचार पाहिजे. त्याकरितां दोन्ही विरुद्ध पक्षांचें म्हणणें काय आहे तें पाहूं. फार प्राचीनकाळच्या (म्हणजे ग्रीक) तत्त्वज्ञान्यांनीं, संख्या, अविच्छिन्न महत्त्वमान ( Continuous magintide ), दिक् ( स्थल ), काल, जडपदार्थ ( मूर्तद्रव्य ) आणि गति ( वेग ) याविषयीं स्वयं स्फूर्तीनें उत्तम प्रकारें विचार केला आहे. इतक्या जोमदारपणें या गोष्टीविषयीं पुढें फारच थोडा विचार झाला असेल. त्यांचें प्रत्यक्ष ज्ञान आणि शास्त्रीय अनुभव हीं अत्यंत अल्प होतीं. साधारणपणें असें म्हणतां येईल कीं, त्यांच्या वेळेपासून मानवी प्राण्यांनीं आपले अनुभव लिहून ते पुढील पिढ्यांस उपयुक्त करण्यास नुकतीच सुरुवात केली होती. अर्थात त्याकाळीं परंपरागत सांठलेल्या ज्ञानाचा सांठा फार थोडा होता. अगदीं प्रथमतः जर त्यांना यथायोग्य असें ज्ञान कोणत्या वस्तूचें झालें असेल तर तें संख्येचें होय. संख्येच्या सहायानेंच आपण व्यवहारांत जड वस्तूचें मापन आणि गणना ( Calculation ) करितों. आतां हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे कीं, संख्या ही विच्छिन्न ( discontinuous ) आहे. एका संख्येपासून दुसऱ्या संख्येकडे आपण द्रुत गतीनें ( by jumps or per Saltum ) जातों. परंतु भूमितींत जें महत्त्वमान ( Magnitude ) आपणास आढळतें तें सर्वस्वी अविच्छिन्न ( Continuous ) असतें. संख्येसंबंधाची विचारपद्धति भूमितींतील महत्त्वमानास लावण्याचा प्रयत्न झाला; त्यामुळें अपरिमेय ( incommensurable ) संख्या आणि अवकाशाची ( Space ) अनंतविभागणी करण्याची शक्यता या दोन कल्पनांचा उदय झाला. परंतु कालाला या कल्पना लावण्यांत आल्या नाहींत. त्यामुळें इलिआ येथील झेनोच्या काळांत असें समजण्यांत येई कीं, गणना करतां येईल इतके कालाचे क्षण आहेत; परंतु अवकाशाचे अगणित बिंदु आहेत. त्यामुळें झेनोनें कांसव आणि अचिलीस यांचें आपलें प्रसिद्ध कूट लोकांपुढें ठेविलें. हें कोडें याप्रमाणें आहेः—अचिलीस हा एक ग्रीक योद्धा आहे व त्याची अत्यंत झपाट्यानें चालण्यांत प्रसिद्धी आहे. समजा कीं, एक कांसव चालत आहे व त्याच्या मागें हजार यार्डांवर अचिलीस हा उभा आहे. कांसवाचा वेग अचिलीसच्या $\frac{1}{10}$ आहे. आतां अचिलीस हजार यार्ड चालला तर तितक्या वेळांत कांसव शंभर यार्ड जाईल. आतां अचिलीस शंभर यार्ड जाईल तर कांसव दहा यार्ड जाईल. अचिलीस दहा यार्ड चालल्यास कांसव, एक यार्ड जाईल. याप्रमाणें होऊन नेहमीं कांसव पुढेंच राहील.

याप्रमाणें अवकाश, काल इत्यादिकांविषयीं प्राचीन लोकांच्या कल्पना होत्या. त्यामुळें अचिलीस आणि कांसव यांचें कोडें नीटपणें सोडवितां येईना. परंतु अरिस्टॉटल यानें असें दाखवून दिलें कीं, कालाचे अवकाशाप्रमाणेंच अनंत-विभाग होऊं शकतात. त्यामुळें वरील कूट समाधानकारक रितीनें सोडवितां येतें, परंतु कालाचे अनंत विभाग होऊं शकतात ही कल्पना त्या काळीं चांगलीशी प्रसृत झाली नाहीं.

याप्रमाणें प्राचीनकाळीं अवकाश आणि काल यांच्या अनंत-विभागाविषयींच्या कल्पना उदयास येत होत्या. याच कल्पना जडपदार्थांस लावण्याचा यत्न सुरू झाला. ज्याप्रमाणें अवकाशाचे अनंत विभाग होऊं शकतात त्याप्रमाणेंच जडपदार्थांचे अनंत-विभाग होतील अशी कल्पना शोधकांच्या मनांत उद्भवली. या दृष्टीनें पाहिलें असतां प्राचीन अणुवाद हा संख्येची कल्पना जडपदार्थांस लावण्याचा यत्न आहे असें ध्यानांत येईल; व याविरुद्ध असणारा अनंत-विभाग-सिद्धान्ताचा वाद हा अविच्छिन्न महत्त्वमानाची कल्पना जडपदार्थांस लावण्याचा यत्न आहे. अणुसिद्धान्तवाद्यांचें असें म्हणणें होतें कीं, अवकाश आणि जड पदार्थ हे दोन्हीहि गुणधर्मानें भिन्न आहेत; एक अणु आणि दुसरा अणु यांच्या दरम्यान कांहीं तरी अवकाश असतो; नुसत्या अणूंच्या योगानेंच पदार्थ झालेले नाहींत तर अणु आणि दरम्यान अवकाश असे दोन मिळून पदार्थ झाले आहेत. असें जर नसतें तर पदार्थांस गति प्राप्त झाली नसती. याविरुद्ध अनंतविभागवाद्यांचें असें म्हणणें होतें कीं विश्वांतील प्रत्येक स्थल द्रव्यानें भरलेलें आहे; हें द्रव्य म्हणजेच आकाश होय; प्रत्येक वस्तूची गति माशांच्या गतिप्रमाणें आहे; मासा पुढें गेला असतां मागें पाणी एकत्रित होतें, आणि पुढच्या बाजूस माशास जागा देतें, त्याप्रमाणेंच इतर पदार्थांचें आहे.

आधुनिक काळांत डेकार्टेनें असें मानिलें कीं, जडपदार्थांस जाडी लांबी आणि रुंदी हीं असलींच पाहिजेत; त्याचप्रमाणें अवकाश ( स्थल ) यांत कांहीं तरी जडपदार्थ असलाच पाहिजे; कारण अवकाश म्हणजे लांबी रुंदी व जाडी यांचा समुच्चय; जडपदार्थ असल्याशिवाय लांबी रुंदी व जाडी यांची कल्पनाच होणें शक्य नाहीं. नुसत्या शून्याच्या ठिकाणीं जाडी, लांबी, रुंदी इत्यादिकांची कल्पनाच संभवत नाहीं. याप्रमाणें डेकार्टेनें आपल्या सर्व ग्रंथांतून जडपदार्थ आणि अवकाश या दोन्ही कल्पना एकत्रित केल्या. यामुळें अणुवाद मान्य केला. त्याचें असें मत होतें कीं, हे सारे जडपदार्थ अणूंच्या संयोगानें झालें आहेत.

याप्रमाणें प्राचीन तत्त्ववेत्ते आणि अर्वाचीन तत्त्ववेत्ते या दोघांतहि दोन निरनिराळे पंथ होतेः—एक अणुवाद्यांचा व

दुसरा अनंत-विभाग-वाद्यांचा हे दोन्ही विचार गणितांतील संख्येची कल्पना आणि भूमितींतील अविच्छिन्न महत्त्वमानाची कल्पना या दोन निरनिराळ्या कल्पनांपासून निघाले आहेत. जड पदार्थांच्या ठायीं दिसून येणाऱ्या साऱ्या गुणधर्मांचा उलगडा अनंतविभागकल्पनेच्या योगानें करणें शक्य नाहीं. असें जरी आहे तरी शास्त्रांत कित्येक वेळां या कल्पनेचा उपयोग करून घेतां येतो. जलस्थितिशास्त्रांत ( Hydrostatics ) जलाची ( उर्फ प्रवाही पदार्थांची ) त्याच्या एका महत्त्वाच्या गुणधर्मावरून व्याख्या केली आहे; व त्यावरून अनुमानानें पुष्कळ गोष्टी सिद्ध केल्या आहेत व त्यामुळें जलस्थितिशास्त्र तयार झालें आहे. याप्रमाणें नुसत्या अनुभवावरून जलस्थितिशास्त्राची रचना करितां येते व त्यामुळें जल हें अणूंच्या योगानें झालें आहे किंवा जल हें अनंतविभाग करितां येण्यासारखें आहे, याविषयींचा विचार करण्याची गरज पडत नाहीं. याप्रमाणेंच फ्रेंच गणितशास्त्रवेत्त्यांनीं स्थितिस्थापक ( Elastic) पदार्थांविषयीं सिद्धान्त बसविले; हे सिद्धान्त बसवितांना असें गृहीत धरलें कीं, पदार्थ अणूंपासून झाले असून त्यांतील अणूंचें एकमेकांवर जें आकर्षण होतें त्यामुळें प्रत्येक अणु आपआपल्या मध्यस्थितींत स्थिर रहातो. यानंतर स्टोक आदिकरून दुसऱ्या आक्षेपकांनीं यावर असें दाखवून दिलें कीं, स्थितिस्थापकत्वाविषयीं जेवढ्या प्रयोगसिद्ध गोष्टी आहेत तेवढ्याविषयींचा खुलासा दुसऱ्या रीतीनें करितां येतो. तो असा कीं, स्थितिस्थापक पदार्थाचा कितीहि लहान खंड घेतल्यास तो खंड समजातीय ( homogeneous ) असतो असें समजल्यास कार्यभाग होतो. कितीहि लहान खंड समजातीय आहे असें समजणें म्हणजे एक प्रकारें अणुवाद नाकारण्यासारखें आहे. ही समजातीयत्वाची किंवा अविच्छिन्न महत्त्वमानाची कल्पना वहनसिद्धान्ता ( Theory of fluxion ) च्या कल्पनेची जननी आहे व वहनसिद्धान्तापासूनच आधुनिक * गणितशास्त्र निघालें आहे. समजातीयत्वाची ( किंवा अनंतविभागत्वाची ) कल्पना केल्यानें वरील प्रकारच्या आधुनिक गणित शास्त्राच्या साहाय्यानें जड पदार्थाविषयींच्या अनेक गोष्टी सिद्ध करितां येतात.

जडपदार्थांची अण्वात्मक रचनाः—अविच्छिन्न महत्त्वमानाप्रमाणें समजातीय गुणयुक्त ( अर्थात् अनंत–विभागशीलवान् ) जड पदार्थ नसून जडपदार्थांची रचना कणांनीं ( खंडशः ) झाली असावी, याविषयीं प्रयोगसिद्ध असा फारच मोठा पुरावा गोळा झाला आहे. पदार्थविज्ञानशास्त्रदृष्ट्या पदार्थांच्या सर्वांत लहान खंडास ( कणास ) अणु अशी संज्ञा आहे. ज्या वेळेस रासायनिक क्रियांचा विचार करण्यांत येतो त्या वेळेस अणूचा विभाग परमाणूंत करण्यांत येतो; आणि ज्या वेळेस परमाणूचा विद्युच्चमत्कार-( किंवा विद्युत् निरीक्षण दृष्ट्या )–दृष्ट्या विचार करण्यांत येतो त्या वेळेस परमाणूचा अतिपरमाणूंत विभाग करण्यांत येतो. अर्थात् अणुसमुच्चयाच्या योगानें जडपदार्थ झाले आहेत व अणुकल्पनेच्या योगानें सर्व विद्युदितर आणि रासायनेतर कार्यकारणभावांचा खुलासा झाला पाहिजे. याप्रकारें वायुमय पदार्थांविषयीं फार सुलभ रीतीनें खुलासा करितां येतो. वायूचा गतिविषयक सिद्धान्त ( Kinetic Theory of gases ) म्हणून एक प्रसिद्ध सिद्धान्त आहे; जडपदार्थ अणुसमुच्चयाच्या योगानें बनलेले आहेत असें सिद्ध करण्याचा त्या सिद्धान्ताचा हेतु आहे. या सिद्धान्ताच्या योगानें अनंतविभागसिद्धान्तवाद्यांचीं मतें खंडित झालीं आहेत; शिवाय या सिद्धान्ताचें सहाय्य न घेतां विद्युत् आणि प्रकाश यांच्या साहाय्यानें पदार्थांची अण्वात्मक रचना सिद्ध करितां येते.

अणूचें आकारमानः—लार्ड रॅले यानें कांहीं प्रयोग केले; त्यावरून अणूंच्या आकारमानाविषयीं अनुमान बसवितां येतें. पाण्यावर तेलाचा पातळ तवंग पसरून त्या योगानें तरत्या कापरावर काय परिणाम होतो याविषयीं प्रयोग केले. त्यावरून असें दिसून आलें कीं, तेलाचा थर $\frac{१०.६}{१०^८}$ सेंटिमीटर इतक्या जाडीचा असतांना त्या तुकड्यावर विशिष्ट परिणाम घडत असे; परंतु तेलाचा थर $\frac{८.१}{१०^८}$ सेंटिमीटर इतक्या जाडीचा असल्यास त्या तुकड्यावर तो विशिष्ट परिणाम होत नसे. यावरून तेलाच्या या दोन निरनिराळ्या जाडीच्या थरांच्या योगानें निरनिराळीं कार्यें होतात हें सिद्ध होतें. असें कां व्हावें याचा विचार करूं लागलें असतां असें ध्यानांत येईल कीं, तेलाचा थर फार पातळ झाला असतांना त्याची अण्वात्मक रचना ध्यानांत घ्यावी लागते. यावरून असें दिसून येईल कीं, अणूचें आकारमान $\frac{१}{१०^८}$ सेंटिमीटर या इयत्तेच्या " दर्जाचें " असावें. दुसऱ्या निरनिराळ्या प्रयोगांवरून या अनुमानास बळकटी आली आहे. थॉमस यंग यानें सन १८०५ सालीं अणूचें आकारमान मोजण्याविषयीं वरील प्रमाणेंच तेलाच्या तवंगावर प्रयोग केले होते. लार्ड रॅले याच्या मतानें या बाबतींत यंगचा हा प्रयोग अगदीं पहिल्यांदाच झालेला होता. यंग यानें जें सरासरीचें गणित केलें आहे, त्यावरून अणूचें एकमेकांवर घडणारें आकर्षण एका इंचाच्या $\frac{१}{२००००००००}$ अंशा इतक्या इयत्तेचें आहे असें त्यानें अनुमान बसविलें. हें अनुमान $\frac{१}{१०^८}$ सेंटिमीटर इतक्या इयत्तेचें आहे, हें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. यावरून सन १८०५ सालींच आधुनिक शोधाचा पाया रचला गेला होता. तसेंच त्यानें गणितावरून असें सिद्ध केलें कीं, पाण्यांतील अणूचा व्यास किंवा त्या अणूंतील अंतर $\frac{१}{२०००००००००}$ ते $\frac{१}{१००००००००००}$

* आधुनिक गणितशास्त्रः—शून्यलब्धिसारख्या गणितशास्त्रान्तर्गत महत्त्वाच्या भागाची उत्पत्ति वहनकल्पनेपासून झाली आहे. ही कल्पना प्रथमतः न्यूटन आणि लिब्निट्झ यांनीं काढली.

इंचाइतकें असलें पाहिजे; म्हणजे हें अंतर $\frac{\cdot १२५}{१०^{८}}$ ते $\frac{\cdot ०२५}{१०^{८}}$ सेंटिमीटर इतकें असावें.

आधुनिक-शास्त्र-वेत्त्यांनीं वायूच्या अणूच्या व्यासाची जी लांबी काढली आहे ती पुढील कोष्टकांत दिली आहे.

**अणुगति सिद्धान्तावरून काढलेला अणूचा व्यास.**

| वायु | बॉइलच्या नियमानें व्यास | स्निग्धतेच्या गुणकानुरोधानें व्यास | उष्णतावहनाच्या गुणकावरून व्यास | वायूच्या प्रसरणावरून व्यास | या सर्वांची सरासरी. |
|---|---|---|---|---|---|
| उज्ज (हायड्रोजन) | $२\cdot०५\times१०^{-८}$ | $२\cdot०५\times१०^{-८}$ | $१\cdot९९\times१०^{-८}$ | $२\cdot०२\times१०^{-८}$ | $२\cdot०३\times१०^{-८}$ |
| (कार्बन मोना आक्साइड) कर्ब प्राणिद | …… | $२\cdot९०\times१०^{-८}$ | $२\cdot७४\times१०^{-८}$ | $२\cdot९२\times१०^{-८}$ | $२\cdot८५\times१०^{-८}$ |
| नैट्रोजन (नत्र) | $३\cdot१२\times१०^{-८}$ | $२\cdot९०\times१०^{-८}$ | $२\cdot७४\times१०^{-८}$ | …… | $२\cdot९२\times१०^{-८}$ |
| हवा | $२\cdot९०\times१०^{-८}$ | $२\cdot८६\times१०^{-८}$ | $२\cdot७२\times१०^{-८}$ | …… | $२\cdot८३\times१०^{-८}$ |
| प्राण ( आक्सिजन ) | …… | $२\cdot८१\times१०^{-८}$ | $२\cdot५८\times१०^{-८}$ | $२\cdot७०\times१०^{-८}$ | $२\cdot७०\times१०^{-८}$ |
| (कार्बन डाय आक्साइड) कर्ब द्विप्राणिद | $३\cdot००\times१०^{-८}$ | $३\cdot४७\times१०^{-८}$ | $३\cdot५८\times१०^{-८}$ | $३\cdot२८\times१०^{-८}$ | $३\cdot३३\times१०^{-८}$ |

वरील कोष्टकावरून हें स्पष्ट दिसून येईल कीं, निरनिराळ्या मार्गांनीं अणूचा व्यास काढला असतां तो जवळ जवळ सारखाच येतो. अत्यंत सूक्ष्म अशा वस्तूंचें मोजमाप करण्यांत कांहींना कांहीं फरक हा येणारच; त्यामुळें वरील कोष्टकांतील व्यास सारखे नाहींत. याशिवाय आणखी एक महत्त्वाचें कारण आहे. वरील कोष्टकांतील अणूच्या व्यासाचें गणित करितांना प्रत्येक अणु गोल ( sphere ) आहे असें गृहीत धरून गणना केली आहे. परंतु प्रत्येक जातीच्या वायूचा अणु गरगरीत गोलाकारच असेल असें आपणास म्हणतां येणार नाहीं. त्यामुळें अणूच्या व्यासांत निरनिराळ्या पद्धतीनें फरक येतो.

उ ष्ण ता आ णि अ णू ची ग ति—पदार्थांत असणारे अणू गतिमान असतात असा अलीकडील शास्त्रवेत्त्यांचा सिद्धान्त आहे. हें अणू जरी फार वेगानें फिरतात तरी पदार्थ स्वतः स्थिर असतो. या अणूंस जी गति असते ती परस्परांच्या सापेक्षतेनें असते. अणूंस गति असते याला प्रयोगानें ज्या कित्येक पुष्टिदायक गोष्टी आढळतात त्यांच्या सहायानें अणुगतीचा सिद्धान्त बसविला आहे. सामान्यतः असें म्हणतां येईल कीं, अणूंस तीन प्रकारची गति असते. घन, प्रवाही आणि वायु हीं तीन प्रकारचीं पदार्थांचीं रूपें आहेत. या तीन प्रकारच्या पदार्थांच्या रूपाप्रमाणें तीन गती आहेत. घन-पदार्थांतील अणू अत्यंत सूक्ष्म प्रमाणांत गतिमान आहेत. ही गोष्ट व्यवहारांतील अनेक अनुभवांवरून सिद्ध करितां येते. उदाहरणार्थ, एखाद्या धातूच्या वस्तूवर सोन्याचा मुलामा चढविला तर कित्येक वर्षेंपर्यंत किंबहुना कित्येक शतकेंपर्यंत तो मुलामा जशाचा तसाच रहातो. त्या मुलाम्यांतील अणू स्थलान्तर करून त्या धातूंत ते सुवर्णकण शिरत नाहींत. त्याचप्रमाणें एखाद्या हलक्या धातूवर सुवर्णाचा पातळपत्रा ( वर्ख ) बसविला तर त्या हलक्या धातूंतील कण त्या पत्र्यांत येत नाहींत किंवा त्या पत्र्यांतील सुवर्ण-कण त्या धातूंत शिरत नाहींत. यावरून घनपदार्थांतील अणू अत्यंत सूक्ष्म प्रमाणांत हलतात हें सिद्ध होतें. परंतु पदार्थ वायुरूप स्थितींत असतांना त्यांतील अणू बऱ्याच वेगानें गतिमान असतात; एखाद्या अत्तराचा सुवास सर्व खोलीभर पसरतो; कारण त्या अत्तराच्या कांहीं अंशाचें वायूंत रूपान्तर होतें; व त्या वायूचे अणू खोलींत सर्व ठिकाणीं पसरूं शकतात.

आतां घन-स्थितींतील पदार्थांच्या अणूंची कशी काय स्थिति असते हें पाहूं या. कित्येक असें समजतील कीं, घनस्थितींतील पदार्थांचे अणू अगदीं स्थिर असतात; परंतु ही चूक आहे. घनपदार्थांचें आकुंचन आणि प्रसरण होतें. यावरून घनपदार्थांतील अणू सूक्ष्म प्रमाणांत गतिमान असतात, असें समजून येईल. प्रत्येक अणु जरी हलत असला तरी अणूअणूंची टक्कर झाल्यामुळें व त्यांमधील आकर्षणामुळें ते अणू फारच थोड्या अवधींत पूर्वस्थितीवर येतात. उष्णतेनें पदार्थ प्रसरण पावतात

व उष्णता काढून घेतल्यास पदार्थाचें आकुंचन होतें. यावरून आपणास असें म्हणतां येईल कीं, पदार्थ थंड थंड करीत गेल्यास त्या पदार्थांतील अणूंची गति स्तब्ध झाली पाहिजे. याप्रमाणें अतिशीत पदार्थांतील अणू स्तब्ध असतात व त्या वेळेस उष्णतामान २७३° श ( सेंटिग्रेड ) इतकें असतें असें गणितानें सिद्ध झालें आहे; म्हणजे आपणास असें म्हणतां येईल कीं,–२७३° शपेक्षां कमी उष्णतामान आपणास तयार करितां येणें शक्य नाहीं. या उष्णतामानास मूलशून्यांश ( Absolulte zero ) असें म्हणतात.

घनपदार्थ उष्ण असतांना त्यांचे जे विशेष गुणधर्म आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात त्या गुणधर्मांचा अणुसिद्धान्ताच्या योगानें कसा उलगडा करितां येतो हें आपणांस पहावयाचें आहे. समजा कीं, दोन पदार्थ–२७३° श उष्णतामानावर आहेत; अर्थात त्यांतील अणू अगदीं स्तब्ध आहेत. हे दोन पदार्थ एकमेकांवर घांसण्यास सुरुवात केली. याप्रमाणें दोन पृष्ठभाग एकमेकांवर घर्षित झाले तर त्या दोन पदार्थांतील पृष्ठभागावरील अणू हलूं लागतील. याप्रमाणें घर्षणानें उष्णता उत्पन्न होईल. ही उष्णता अर्थातच प्रथमतः पदार्थांच्या पृष्ठभागीं असेल. परंतु पृष्ठभागांतील अणू गतिमान झाल्यानें त्या अणूंशेजारील थरास गति प्राप्त होईल. याप्रमाणें शेजारील अणू गतिमान होऊन त्या सर्व पदार्थांत हळूहळू उष्णता प्रसृत होईल. या रीतीनें उष्णता प्रसृत होण्याच्या प्रकारास उष्णतेचें वहन ( Conduction ) असा शास्त्रीय शब्द आहे. उष्ण पदार्थांतील अणू हलत असतात. त्यांना हलण्यास कांहीं ठराविक जागा ठराविक उष्णतामानावर लागत असली पाहिजे. हें उष्णतामान वाढविल्यास त्या अणूंच्या आंदोलनास जास्त जागा लागली पाहिजे; व व्यवहारांत याप्रमाणें घडून येतांना दिसतें; कारण उष्णतेनें पदार्थाचें प्रसरण होतें. उलट रीतीनें असेंहि आढळून येतें, कीं, दाव वगैरेचा उपयोग करून पदार्थ आकुंचित केल्यास त्याचें उष्णतामान वाढतें.

ज्या मानानें पदार्थाचें उष्णतामान वाढविलें जाईल त्या मानानें अणूंच्या आंदोलनास जास्त जागा लागेल. अमुक एक इयत्तेच्यापेक्षां जास्त उष्णतामान एखाद्या पदार्थास प्राप्त झाल्यास त्या पदार्थांतील अणू इतक्या जोरानें आंदोलन पावूं लागतील कीं, अणूंस आपल्या पूर्वस्थितीवर येणें शक्य होणार नाहीं. याप्रमाणें अणूंची वारंवार बदलणारी अशी स्थिति झाल्यास त्या स्थितीला प्रवाही अवस्था असें नांव दिलें आहे. एखादा अणु जास्त प्रमाणावर आंदोलायमान होऊं लागला तर तो आपली मध्य स्थिति सोडून दुसरीकडे जाईल; व त्या दुसऱ्या ठिकाणीं दुसऱ्या अणुसंघाच्या योगानें तो अणु नवीन आकर्षण–बंधानें बांधला जाईल. परंतु त्या पदार्थाच्या पृष्ठभागाशेजारील एखाद्या अणूला जास्त गति मिळाली आणि ती गति त्या पदार्थांतून बाहेर पडण्याच्या दिशेची असली तर तो पदार्थ सभोंवारच्या अणु–बंधांतून सुटून सरळ मार्गानें त्या पदार्थापासून फुटून बाहेर पडेल. याप्रमाणें पुष्कळसे अणू बाहेर पडूं लागले तर त्या पदार्थांतील अणू कमी होतील. याप्रमाणें पदार्थांतील अणू बाहेर जाण्याच्या क्रियेस "बाष्पीभवन" ( evaporation ) असा शास्त्रीय पारिभाषिक शब्द आहे.

* प्रमाण उष्णतामान आणि दाब असतांना एखाद्या पदार्थाच्या वायूची घनता ( density ) तो पदार्थ घन अवस्थेंत असतांना जी घनता असते त्याच्या एक सहस्रांश असते. यावरून गणिताच्या साहाय्यानें असें सिद्ध करितां येतें कीं, घन स्थितींत जडपदार्थ असतांना त्याच्या अणूंमध्यें जें अंतर असतें त्याच्या दसपट अंतर तो पदार्थ वायुरूप-स्थितींत असतांना असतें.

आतां वायूच्या अणूसंबंधानें शास्त्रज्ञानें आतांपर्यंत प्रयोगसिद्ध किंवा गणितसिद्ध अशी काय माहिती मिळविली आहे तें पाहूं. हवेंतील अणूच्या व्यासाची सरासरी सुमारें $\frac{३}{१०^{८}}$ सेंटिमीटर असते. हे अणू जर चौरसाच्या चौकटीप्रमाणें हवेंत असतील तर त्या दोन अणूंमधील अंतर सुमारें सरासरीनें $\frac{२.९}{१०^{७}}$ सेंटिमीटर असतें. प्रमाण उष्णतामान आणि दाब असतांना एक परिमाणाच्या घनांत ( म्हणजे औरस चौरस एक सेंटिमीटर लांबीरुंदीचा घन ) सुमारें $२.७५ \times १०^{१९}$ अणू असतात. $२.७५ \times १०^{१९}$ म्हणजे २७५ संख्येवर सतरा शून्यें होत. ही संख्या परार्धापेक्षां दोन स्थलानें मोठी आहे व इतके अणू एका घन सेंटिमीटरमध्यें असतात ! आतां वायूच्या अणूची गति प्रयोगानें व गणितानें काढली आहे ती देतों.

| वायूचें नांव | उष्णतामान | गति दर सेकंदास |
|---|---|---|
| (हायड्रोजन) उज्ज | ०° शतांश | १८३९०० सेंटिमीटर |
| हवा | १५° " | ४९८०० " |
| पाण्याची वाफ | ०° " | १८५०० " |

त्याचप्रमाणें गणितानें असें सिद्ध झालें आहे कीं, $\frac{१}{१०^{१२}}$ ग्राम वजनाच्या अणूची किंवा अणुसमुच्चयाची सरासरीनें शून्य शतांश उष्णता मानावर २ मिलिमीटर प्रमाणें दर सेकंदास गति किंवा वेग असावा. $\frac{१}{१०^{१२}}$ ग्राम इतक्या प्रमाणाचा अणु आपणास सूक्ष्म-दर्शक यंत्रानें दिसणें शक्य आहे; त्याचप्रमाणें दर सेकंदास २ मिलिमीटरप्रमाणें वेग असणारी वस्तु डोळ्यांनीं पाहतां येणें शक्य आहे; परंतु त्या वस्तूचा वेग सतत एकाच दिशेंत कांहीं काळपर्यंत चालला पाहिजे. अणूंची एकमेकांशीं किंवा भांड्याच्या बाजूशीं वारंवार टक्कर झाल्यामुळें वेगाची दिशा वरचेवर बदलते; व त्यामुळें प्रत्येक अणूला व्यक्तिशः पाहतां येणें शक्य नाहीं. असें जरी आहे तरी अनेक लघुगतींचें

* प्रमाण उष्णतामान आणि दाब=Normal Temperature and pressure. शून्य शतांश उष्णतामान हें प्रमाण उष्णतामान होय; आणि वायुभारमापक नळींत पाण्याची उंची ७६ मिलिमीटर असतांना प्रमाण दाब असतो.

( Short motion) फल (Resultant) म्हणून एक सरासरीची गति झाली पाहिजे व ती दर सेकंदास २ मिलिमीटरपेक्षां कमी असली पाहिजे. आर. व्हान. स्मोलुचौस्की यानें असें दाखवून दिलें कीं, राबर्ट ब्रौन या नांवाच्या वनस्पति-शास्त्रज्ञानें सन १८२७ सालीं जी कांहीं अणूची हालचाल अवलोकन केली तीच हालचाल वरील सरासरीची गति आहे. वरील हालचालीस ब्रौन याची हालचाल असें नांव आहे. याप्रमाणें ब्रौनच्या हालचालीच्या निरीक्षणाच्या योगानें अणूच्या गतीचा दृक्-प्रत्यय मिळतो.

डा ल्ट न चा सि द्धां त—पुढील नियम डाल्टननें शोधून काढला आहे. एखाद्या पात्रांत निरनिराळ्या वायूंचें मिश्रण असेल तर त्या प्रत्येक वायूच्या दाबाच्या बेरजेइतका त्या मिश्रणाचा दाब असतो. उदाहरणार्थ एका पात्रांत नत्र आणि प्राण अशा दोन वायूंचें मिश्रण आहे. त्यांतील नत्रचा दाब १५ सेंटिग्रॅम आहे आणि प्राणचा दाब ६१ सेंटिग्रॅम आहे तर त्या मिश्रणाचा दाब ( १५+६१= ) ७६ शहात्तर सेंटिग्रॅम भरेल.

बॉ इ ल आ णि चा र्ल्स चा सि द्धां त—कोणत्याहि वायूचें उष्णतामान कायम असतांना त्या वायूचा दाब त्या वायूच्या आकारमानाच्या घनफळाच्या व्युत्क्रम प्रमाणांत ( Inverse proportion ) बदलतो आणि त्या वायूचें घनफळ कायम ठेविल्यास त्या वायूचा दाब उष्णतामानाच्या समप्रमाणांत बदलतो.

अ व्हा ग ड्रो चा सि द्धां त—अगदीं सारख्या आकाराच्या घनफळांत असणारे असे निरनिराळ्या जातीचे वायू जर एकाच उष्णतामानावर आणि एकाच दाबांत असणारे असे घेतल्यास त्या निरनिराळ्या वायूंच्या अणूंची संख्या एकच असते.

वर दिलेला बॉइल आणि चार्लसचा नियम अगदीं बरोबर नाहीं. कारण उष्णतामान किंवा दाब यांत विस्तृत प्रमाणावर फरक केल्यास हा नियम अगदीं बरोबर लागू पडत नाहीं वायूचें उष्णतामान, दाब आणि क्षेत्रफळ यांचे परस्परांशीं ठराविक प्रमाण असावें लागतें; वरील त्रयींत जास्त मोठ्या प्रमाणावर फरक केल्यास हें प्रमाण राहूं शकत नाहीं; अर्थात या तऱ्हेचा फरक होण्याचीं कारणें कांहीं तरी असलीं पाहिजेत; त्याबद्दल व्हॉन डर वॉल या शास्त्रज्ञानें विचार करून दोन कारणें बसविलीं आहेत. त्यांपैकीं एक कारण अणूअणूंमधील आकर्षणाचा परिणाम हें आहे. त्याप्रमाणें दुरुस्ती करून समीकरण मांडल्यास तें बदललेल्या क्षेत्रफळादिकांस लागू पडतें.

वरील डाल्टन, चार्लस-बाईल, अव्हागड्रो आणि व्हॉन डर वॉल यांच्या नियमावरून आणि विचार-सरणीवरून अणु-सिद्धान्तास पुष्टीच मिळते.

**अणे**:—जिल्हा पुणें जुन्नरच्या पूर्वेस २५ मैलांवर अणे खिंडीच्या नाक्यावर हें खेडें आहे. लोकवस्ती सुमारें दोन हजार. येथें आठवड्याचा बाजार दर बुधवारीं भरतो.(पूना. गॅ.)

**अण्णाजी दत्तो**:—शिवाजीच्या अष्टप्रधानांतील एक अधिकारी. सतराव्या शतकाच्या प्रारंभीं हिंदुपदपादशाहीची कल्पना मूर्त स्वरूपांत येऊं लागत आहे तोंच शहाजीचीं व शहाजीनें पाठविलेलीं वृद्ध व अनुभविक माणसें कमीकमी होऊं लागलीं तेव्हां शिवाजीच्या संग्रहांत नवीन जोमाचीं व उत्कट कळकळीचीं कांहीं स्वामिनिष्ठ माणसें गोळा झालीं. त्यांत अण्णाजी दत्तो प्रभुणीकर हा होता. हा देशस्थ ब्राह्मण असून तो इ. स. १६४७ च्या सुमारास शिवाजीस येऊन मिळाला व लहान मोठीं कामें करून त्याजजवळ राहिला. याच्याकडे संगमेश्वर तालुक्यांतील देशकुलकर्णपण होतें. अण्णाजीचा जसा पूर्ववृत्तांत उपलब्ध नाहीं तसाच त्याच्या खासगी चरित्रावर प्रकाश पडेल अशी माहितीहि उपलब्ध झालेली नाहीं.

विजापूरकरांकडून विडा उचलून आलेल्या अफजलखानाबरोबर शिवाजी एकांगी सामना देण्यास तारीख १० नोव्हेंबर १६५९ रोजीं प्रतापगडावरून खालीं उतरला त्या वेळीं अण्णाजीस शिवाजीनें प्रतापगडावर जिजाई व संभाजी यांच्या संरक्षणार्थ ठेविलें होतें. अफजलखानास चीत केल्यानंतर, अण्णाजी दक्षिण कोंकणचा माहितगार म्हणून, त्यास शिवाजीनें तावडतोब पन्हाळा किल्ला घेण्यास पुढें पाठविलें, व त्यानें "मालसावंत याचे हजारीं सांगून" पन्हाळा सर करण्याचा प्रयत्न केला. नंतर तारीख २८ नोव्हेंबर १६५९ रोजीं शिवाजीनें खासा जाऊन पन्हाळा घेतला. अण्णाजीनें आपली कर्तबगारी अशाच रीतीनें शिवाजीसन्निध राहून दाखविल्यामुळें व शिवाजीसहि तो हिशेबी व लेखनकुशल दिसून आल्यामुळें तारीख २९ आगष्ट १६६१ रोजीं शिवाजीनें राज्याची वाकनिशी त्यास सांगितली व पालखी दिली. वाकनिशींत खासगीचा कारभार, पत्रव्यवहार, दफ्तर संभाळणें इत्यादि दरख असत. भोजनाची तजवीज, आमंत्रणें करणें, इत्यादि कामेंहि वाकनिसासच करावीं लागत. परंतु ही वाकनिशी अण्णाजीस देण्यापूर्वींच जमिनीची पहाणी करणें, सारामहसुलाची व्यवस्था पाहणें इत्यादि राज्यांतर्गत व्यवस्थेचीं कामें दादाजी कोंडदेवाच्या मृत्यूनंतर अनुभविक म्हणून अण्णाजीस सांगितलीं जात असत व अण्णाजी दत्तोनेंहि दादाजीचीच सारापद्धत चालू ठेवून आपलें काम फारच चोख रीतीनें केलें होतें. "राज्याची चांगलीच मशागत केली यास्तव शिवाजीनें कृपाळू होऊन यास तारीख ३ एप्रिल १६६२ रोजीं सुरनिशी देऊन याचा यथारीति सन्मान केला." सुरनीस किंवा सचीव यानें राजपत्रें होतील त्यांत न्यूनाधिक अक्षर मजकूर शोध करून नीट करावीं व तसेंच महाल, परगणे यांच्या हिशेबाचे शोध करावे; राजपत्रावर संमत करून बार चिन्ह रुजू करावें; युद्धादि प्रसंग करून राजहित तें करावें असें होतें. अण्णाजीनें गांवकामगारांवर मुळींच विश्वास न ठेवतां स्वतः सर्व गांव फिरून सारापट्टी वसविणें वगैरे देखरेखीचें व अन्तर्व्यवस्थेचें काम चांगल्या रीतीनें केलें असलें तरी युद्धादि प्रसंग करून त्यानें स्वतंत्रपणें एखादा मुलूख मिळविला

असें झालें नाहीं. शिवाजीनें सन १६६४ च्या जानेवारींत कोळवणांतून ( ठाणें जिल्ह्यांतून ) जाऊन तारीख ६ रोजीं सुरत लुटली. त्या वेळीं त्यानें अण्णाजीस बरोबर घेतलें होतें. पुढें दक्षिण पादाक्रान्त करण्यास प्रतापराव गुजर वगैरे जी कांहीं खाशी मंडळी पाठविण्यांत आली त्यांत अण्णाजी होता. परंतु या सफरींतहि अण्णाजीनें कांहीं विशेष शौर्य दाखविलें नाहीं. नाहीं म्हणावयास हुबळी शहर मात्र अण्णाजीनें लुटलें असल्याचा उल्लेख सांपडतो ( इ. स. १६७३ ). हुबळी हें त्या वेळीं व्यापाराचें मुख्य ठिकाण होतें. या शहरांत बरीच लूट, सुरतेपेक्षांहि अधिक, मिळाली असावी असा अजमास आहे. परंतु इंग्रज व इतर वखारवाले आणि शिवाजी यांच्यामध्यें नंतर वाटाघाटी झाल्या त्यांवरून असें दिसतें कीं अण्णाजीनें शिवाजीला हुबळीच्या लुटीची पूर्ण हकीकत शेवटपर्यंत कळविली नसावी. कदाचित् राजापूरच्या लुटींत दाखविलेल्या अव्यवस्थितपणामुळें शिवाजीनें जबाबदार माणसांस जें शासन केलें त्यामुळें अण्णाजीकडून असें घडलें असावें. इ. स. १६६६ त शिवाजी संभाजीसह आग्र्यास दिल्लीश्वरास भेटावयास गेला त्या वेळीं शिवाजीनें आपला राज्यकारभार ज्या त्रयीवर टाकला होता तींत अण्णाजी होता. या मंडळींनीं कार्यदक्ष राहून तारीख ५ मार्च ते २० नोव्हेंबर १६६६ पर्यंत राज्याचा कारभार चांगल्या प्रकारें सांभाळिला म्हणून त्यांच्या संबंधीं "तुम्ही राज्याचे आधारस्तंभ" वगैरे बहुत प्रकारें शिवाजीनें गौरवोद्गार काढले. अण्णाजीचा बहुतेक काल सारामहसूल ठरविणें, गांवांशिवांच्या तक्रारींची चौकशी करणें, निकाल देणें यांतच जाई. अण्णाजी युद्धादि प्रसंगांत क्वचितच सामील होई. तरी देखील अण्णाजी दक्षिण कोंकणचा माहितगार म्हणून जेव्हां जेव्हां दक्षिण भागांत युद्धप्रसंग निघे तेव्हां तेव्हां त्यास बरोबर पाठविण्यांत येत असे. इ. स. १६५९ त मिळविलेला पन्हाळा विजापूरकरांनीं इ. स. १६६२ त परत घेतला होता व नंतर मराठ्यांनीं आपल्या अंमलाखालीं आणलेल्या मुलुखांत खवासखान अधिकाधिक व्याप करूं लागला म्हणून शिवाजीनें दक्षिणेंतील बंदोबस्तीचें मुख्य ठिकाण जो पन्हाळा किल्ला तो घेण्याचें सन १६७३ त ठरविलें, व "अण्णाजीपंतास तो पुन्हां भेद करून घ्यावा" अशी आज्ञा करून "बावाजी नाईक पुंडे विजापुरास वकील होता त्यास बोलावून माघारीं आणलें. कोंडाजी फर्जंद यास पालखी वगैरे देऊन गौरव केला व गुप्त सल्लामसलत सांगून व त्याच्या बरोबर गणाजी व मोत्याजी रवलेकर मामा यांच्या हाताखालीं बरेच लोक देऊन रवाना केलें. अण्णाजी राजापुरीं तीन दिवस आधीं म्हणजे तारीख २ मार्च १६७३ रोजीं जाऊन हेरांकडून बातमी आणणें वगैरे योजना करीत होता. तोंच तारीख ५ मार्चला कोंडाजी वगैरे मंडळी जाऊन पोहोंचली व त्यांनीं त्याच दिवशीं रात्रीं निबिड अंधारांत किल्ल्यावर छापा घालून सर्वत्र दाणादाण केली. यावेळीं अण्णाजी पंडित ह्या पिछाडीचें रक्षण करण्यासाठीं म्हणून सैन्यासह त्यांच्या पाठीमागें मोठ्या अरण्यांत लपून राहिला होता. तारीख ६ रोजींहि बऱ्याच चकमकी उडून किल्ला कोंडाजीनें ताब्यांत घेतला व जासुदाबरोबर विजयपत्रिका शिवाजीस रवाना केली. अण्णाजी पंडित देखील हर्षभरित होत्साते धांवत आले." नंतर आठ दहा दिवसांनीं शिवाजी पन्हाळ्यावर आला तोंपर्यंत अण्णाजी तेथेंच राहिला होता. याप्रमाणें पन्हाळा पुन्हां एकदां घेतला तो सतराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत मराठ्यांकडेच राहिला. नंतर याच वर्षांत राज्याभिषेक होण्याच्या पूर्वीं शिवाजीनें अष्टप्रधानांचे कारभार वांटून दिले तेव्हां त्यांत अण्णाजीकडे चेऊलपासून दाभोळ, राजापूर, कुडाळ, बांदें व फोंडे अंकोलपर्यंत म्हणजे सर्व दक्षिण कोंकणचा कारभार सांगितला होता. शिवाय जमिनी पाहून कायम सारा करणें वगैरे जमीनमहसुलाचें काम पूर्वींप्रमाणें त्याच्याकडेच कायम ठेविलें. अण्णाजीस रत्नागिरी तालुक्याचें देशपांडेपण व कोल्हापूर इलाख्यांतील भूधरगडाजवळील सामानगडची सबनिशीहि दिली होती. अण्णाजीनेंच सामानगड बांधिला असें म्हणतात. अण्णाजीकडे दक्षिण कोंकणचा कारभार असल्यामुळें सर्व समुद्रकिनारा त्याच्याकडेच असे व त्यामुळें त्याचा यूरोपीयन वसाहतवाल्यांशीं नेहमीं संबंध येई. व ते त्यास अण्णाजी पंडित किनाऱ्याचा सुभेदार ( व्हाइसराय ) असें म्हणत. तारीख ५ जून १६७४ रोजीं शिवाजीस राज्याभिषेक झाला त्या वेळीं अण्णाजीकडे राज्यान्तर्गत व्यवस्थेचें काम असल्यामुळें त्यासच राजावर छत्र धरण्याचा मान मिळाला व त्या प्रसंगीं त्याचा बादली वस्त्रें, पोषाख, कंठी, चौकडा, तुरा, शिरपेंच, शिकेकट्यार, ढाल, तरवार, हत्ती, घोडा, ऐसे देऊन सन्मान करण्यांत आला. अण्णाजीस पालखी खर्च मिळून सालिना १०,००० होनांची किंवा महिना ३००० रुपयांची नक्त नेमणूक होती. अण्णाजी राजपत्रांवर जो आपला शिक्का मोर्तब करी त्यांतील मुख्य शिक्का अष्टकोनी असून, मोठा व लांबट होता व त्यांत पुढीलप्रमाणें चार ओळी होत्या. ( १ ) श्री शिवचरणी ( २ ) निरंतर दत्त ( ३ ) सुत अनाजिपं ( ४ ) त तत्पर. जोडावर मारण्याचा किंवा लेखनसीमेचा शिक्का लहान व वर्तुलाकार असून त्यांतील मजकूर ( १ ) लेख ( २ ) नावधि रे ( ३ ) धते असा आहे. इ. स. १६७४ नंतर शिवाजीनें पुन्हां सर्व पहाणी करण्याचें ठरविलें व त्यांतच अण्णाजीचीं पुढील ४-५ वर्षें गेलीं. दरम्यान माळव्यावर मात्र अण्णाजीस पाठविलें होतें. इ. स. १६७८ त शिवाजी कर्नाटकांत जावयास निघाला त्या वेळीं मागें अण्णाजीस राज्यसंरक्षणार्थ ठेविलें होतें. अण्णाजी बहुतेक रायगडींच असे. तो जेव्हां गांवें पहाण्यास जात असे तेव्हां मागें त्याचा मुतालिक सुरनिशीचें सर्व काम पाही.

गांवकामगार वगैरे जमिनीची पहाणी चुकीची करीत व त्यामुळें विशेषतः राज्याचेंच नुकसान होत असे. म्हणून अण्णाजीनें बरीच सक्त मेहनत घेऊन व स्वतः गांवोगांव फिरून

पहाणी केली व सारा बसविला. अशा रीतीनें राज्याचा वसूल बराच वाढला, अन्तर्व्यवस्था नीट झाली व अण्णाजीच्या उत्कर्षासहि ह्यायोगें अधिकाधिक भर पडत चालली. परंतु या कारणानेंच त्या वेळच्या कित्येक थोर व कर्तृत्ववान् लोकांचें व अण्णाजीचें वितुष्ट आलें व हणमंते वगैरे मंडळी जमीनमहसुलाचे व गांवांशिवांचे तंटे "महाराजांनीं जातीनें निवडावे" अशी मागणी करूं लागले. याचा परिणाम असा झाला कीं, सर्व जमिनीची पहाणी पुन्हां करून सारापट्टी ठरवावी म्हणून शिवाजीनें आज्ञा केली व त्याप्रमाणें राज्याभिषेकानंतर पहाणीस सुरुवात झाली. या पहाणींतहि दादाजीचीच जमीनीची तक्षिमा म्हणजे प्रत ठरविण्याची व मोजणीची पद्धति स्वीकारलेली होती. परंतु ऋतुमानाप्रमाणें कमीअधिक आंखूड होणाऱ्या दोरीऐवजीं राजहस्तानें पांच हात व पांच मुठी लांबीच्या काठीचें माप चालू केलें. शिवाजी मूळचा आजानुबाहु म्हणून या मापाबद्दल कुरकुर करणें शक्य नव्हतें व शिवाय राजहस्त. उत्पन्नाच्या दोन पंचमांश सारापट्टी हेंच प्रमाण कायम ठेविण्यांत आलें, परंतु गल्ल्याऐवजीं नगदीमध्यें सारा घेण्याची पद्धत चालू केली, शिवाय यावेळीं जी सारापट्टी मुक्रर केली ती कायम म्हणून समजण्यांत आली. पडीक जमिनीवरहि सारा बसविल्यानें पडीक जमिनीची लागवड होऊं लागली. जेथें जमिनी मोकळ्या पडल्या होत्या तेथें नव्या वसाहती करवून व लागवडीसाठीं बियाणें, गुरें व पैसाहि २ वर्षांच्या मुदतीनें देण्यांत येऊन लागवड करण्यांत आली. दुष्काळांतहि बियाणें, गुरें वगैरे देण्यांत आल्यामुळें कायम सारापद्धतीबद्दल तक्रारीस जागा राहिली नाहीं. सारापट्टी नवीन बसवितांना अण्णाजीनें वेळोवेळीं गांवांगांवांस आज्ञापत्रें लिहिलीं त्यांवरून असें दिसतें कीं सारापट्टी बसविणें ती प्रथम कारकुनांनीं व गांवकामगारांनीं गांवांतील चार शिष्टांच्या संमतीनें व मागील दोन तीन वर्षांच्या उत्पन्नाच्या मानानें कायम करावी व त्यांत गांवांतील प्रमुख गृहस्थांनीं मदत करावी; व अशा तऱ्हेनें सारा ठरविणें वगैरे झाल्यानंतर गांवाचें लिहून यावें व नंतर अण्णाजीनें स्वतः जाऊन राजहितास बाध येत नाहीं व गांवांत तक्रारी नाहींत असें पाहून सारापट्टी कायम करावी. परंतु असें करण्यांत व्यक्तिहिताकडे अण्णाजीस डोळेझांक करावी लागली व त्यामुळें तो कांहीं व्यक्तींच्या द्वेषास पात्र झाला. मोरोपंत पिंगळे पेशवा हाच मुख्यतः सर्व राज्यास जबाबदार असल्यामुळें अण्णाजीच्या विरुद्ध बरेच वेळां निकाल द्यावा लागे व शिवाजीसहि तो मान्य असे. त्यामुळें अण्णाजी मोरोपंताचा द्वेष करूं लागून मोरोपंत व अण्णाजी यांच्यामध्यें वैमनस्य आलें. शिवाजीच्या राज्याभिषेकप्रसंगीं मोरोपंतानें जो थोडासा विरोध दाखविला त्यामुळें अण्णाजीस मोरोपंताचा उघड उघड द्वेष करण्यास सवड सांपडली होती. अण्णाजीचा सर्व वेळ एकंदरींत राज्यांतर्गत व्यवस्थेंत गेल्यामुळें तो कित्येक थोर लोकांच्या नुकसानीस कारणीभूत झाला होता. याचा परिणाम असा झाला कीं, अण्णाजीचा दरारा जितका आहे म्हणून वाटत होता तितकेच त्याच्याविरुद्ध सर्व प्रजा व लहानथोर कामगार झाले होते.

हिंदु लोकांच्या वारसी हक्कांतच सर्वनाशी गृहकलहाचें बीजारोपण झालेलें आहे. नुसत्या उत्कर्षाच्या ओलाव्यानें बीज जेथल्यातेथेंच नाश पावतें, हें खरें. परंतु थोड्याहि उत्कर्षाच्या ओलाव्यास एखाद्या कर्तृत्ववान् पुरुषाची ऊब मिळतांच हें बीज अंकुर घेतें. सर्वगुणसंपन्न व विनयशील अशा सईबाईच्या मृत्यूनंतर व राजारामाच्या जन्माबरोबर उत्पन्न झालेलें गृहकलहाचें भूत जिजाबाईच्या करड्या अंमलाखालीं पूर्णपणें गाडून गेलें होतें तेंच शिवाजीच्या राज्याभिषेकोत्सवामुळें व संभाजीला युवराजपदीं पाहातांच वर उसळी घेऊं लागलें व जिजाबाईच्या मृत्यूनंतर उच्छृंखल होऊन शिवाजीच्या घरांत उघडपणें खेळूं लागलें. अण्णाजी हा मूळचा महत्त्वाकांक्षी व बुद्धिवान् पंडित. परंतु त्याच्या अंगांत शौर्य किंवा युद्धनैपुण्य नसल्यामुळें तो पहिल्यापासून कारस्थानी. याला या भुताचा वास शिवाजीसन्निध व बहुतेक रायगडींच राहिल्यानें तेव्हांच लागला व यानें अर्थातच त्या कालीं सबल असलेल्या सोयराबाईचा पक्ष धरिला. अण्णाजीनें सोयराबाईवर लवकरच आपला पगडा चांगलाच बसविला. संभाजीविरुद्ध कारस्थानें करवून त्याला नालायक बनविण्यास सोयराबाईस सर्वांशीं मदतगार हा एवढाच सरकारकून असल्यानें सोयराबाईनेंहि त्याचाच पुरस्कार केला. हा सोयराबाईचा गुप्तकट शिवाजी कर्नाटकच्या स्वारीवर गेल्यानंतर अधिकच जोरावला व त्यानें संभाजीला त्याच्या बायकोसह उठवून लावलें. शिवाजी परत आल्यानंतर त्याला संभाजी उठून गेल्याची बातमी कळली तेव्हां त्यानें संभाजीस परत आणण्याचा प्रयत्न केला. या बळावत चाललेल्या गृहकलहास कांहीं तरी तोड काढून हिंदुपदपादशाहीचें संरक्षण करावें या विवंचनेंत शिवाजी असतां त्यास आजार झाला व त्या आजारांत शिवाजीचा अंतसमय जवळ येत आहे असें दिसतांच संभाजीच्या बंदोबस्ताच्या व इतर योजना गुप्त रीतीनें चालू झाल्या. या प्रसंगीं मोरोपंत वगैरे थोर थोर मंडळी शिवाजीनें मुद्दाम बोलावून आणली होती व बाळाजीहि जवळ होता. परंतु या थोर मंडळींचीं मनें हिंदुपदपादशाहीच्या प्रतापसूर्याच्या अस्ताचलावरून फांकणाऱ्या किरणांत इतकीं व्यग्र होऊन गेलीं होतीं व त्यांना या राजधानींतील व राजघराण्यांतील गृहकलहापासून दूर राहिल्यानें इतकें भांबावून गेल्यासारखें झालें कीं त्यांना क्षुद्रबुद्धि व सापत्नभावानें प्रेरित झालेल्या सोयराबाईचा कावा व महत्त्वाकांक्षी अण्णाजीची स्वार्थपरायणता अगदीं दुर्बोध झाली. त्या स्वामिनिष्ठ सरकारकुनांना किंवा प्रधान मंडळाला सोयराबाई व अण्णाजी यांच्या विरुद्ध जातां येईना. इकडे अण्णाजीनें शिवाजीचा आजार वाढत आहे ही बातमी संभाजीस न कळेल अशी पूर्ण खबरदारी घेतली व पुढें शिवाजीच्या मृत्यूनंतरहि म्हणजे त्याच्या मृत्यूची वार्ता नजर कैदें-

तील ( त्यावेळीं समजल्या गेलेल्या ) संभाजीस तो पूर्ण बंदिवान केला जाईपर्यंत कळूं नये अशी व्यवस्था केली. शिवाजीच्या मृत्यूनंतर १८ दिवसांनींच म्हणजे तारीख २१ एप्रिल १६८० रोजीं अण्णाजीनें सर्वाधिकार आपल्याकडे घेऊन नऊ दहा वर्षांच्या राजारामास 'मंचकारोहण' करविलें व मोरोपंतांशीं 'तह' करून तो संभाजीस कैद करण्यास रायगडाहून निघाला. अण्णाजीच्या या वरचढ वर्तणुकीनें मोरोपंताला आपल्या भावी आयुष्याचा संशय वाटूं लागून त्याच्या मनांतील अढी साहजिकच दृढ होऊं लागली. इकडे जनार्दनपंतास व हंबीररावासहि अण्णाजीनें–बाळाजीनें नाकारिलें तरी–त्याच्या मुलाकडून जबरदस्तीनें लिहवून आज्ञापत्रें पाठविलीं होतीं; खरें पाहिलें तर हंबीरराव याचा दर्जा व राज्यांतील वजन यांकडे लक्ष दिलें तर अण्णाजीनें सर्व कारभार त्याच्या संमतीनेंच करावयास पाहिजे होता. परंतु स्वामिनिष्ठ हंबीररावास सोयराबाईचा पक्ष मान्य होणार नाहीं म्हणून अण्णाजीची खात्री होती. याकरितां अण्णाजीनें त्याच्या संमति वगैरेच्या भानगडींत न पडतां सोयराबाईस हाताशीं धरून, स्वार्थांधतेमुळें आपल्या स्वतःच्या दराऱ्यावर व सामर्थ्यावर फाजील विश्वास ठेवून राजारामाचें बाहुलें पुढें केलें व सर्व राज्यकारभार आपणाकडे ठेवण्याची महत्त्वाकांक्षा धरिली. यामुळें सर्व राजमंडळ व कारकून वगैरे अण्णाजीबद्दल बरेच शंकित झाले. मोरोपंत व जनार्दनपंत हणमंते तर त्याचा पूर्वीपासूनच द्वेष करीत होते, व हंबीररावहि अण्णाजीची वर्तणूक अपमानकारक जाणून जास्तच चिडीस पेटला. जिकडे हंबीरराव तिकडे सेना व प्रजा अशी वस्तुस्थिति. तेव्हां जनार्दनपंत लागलीच अण्णाजीविरुद्ध बाजू धरून संभाजीस जाऊन मिळाला, व हंबीररावानेंहि संभाजीशीं व इतर थोर मंडळीशीं पत्रव्यवहार करून अण्णाजी, मोरोपंत व प्रल्हादपंत यांस कराडहून जाऊन वाटेंत धरिलें व संभाजीपाशीं नेलें. पुढें हंबीररावानें कुलफौज एक करून राज्य संभाजीस दिलें व संभाजी जूनमध्यें रायगडास येऊन राज्य करूं लागला, व त्यानें सोयराबाईस ठार करून राजारामास कैद केलें. अशा रीतीनें अण्णाजीचा डाव फसला. पुढें ४-५ महिन्यांनीं म्हणजे सप्टेंबर महिन्यांत संभाजीनें अण्णाजीस बंधमुक्त केलें व मजमूहि त्याजकडे दिली परंतु अण्णाजी झालेल्या चुकीबद्दल पश्चात्ताप न पावतां उलट अपमानाबद्दल सूड घेण्याचा हट्ट धरून होता. अवरंगजेबाचा मुलगा अकबर संभाजीकडे आश्रयार्थ पळून आला त्याजजवळ अण्णाजीनें शिरके मंडळीस चिथाऊन संभाजीविरुद्ध कारस्थान केलें. तें अकबरानें संभाजीच्या भीतीस्तव स्वतःच संभाजीस कळविलें. त्यामुळें संभाजीस फार क्रोध येऊन त्यानें शिरक्यांचें शिरकाण करविलें व अण्णाजीबरोबर इतरहि मातबर मंडळीस परळीखालीं कैद करून हत्तीच्या पायाखालीं तुडविलें. अशा रीतीनें या पुरुषाचा सन १६८१ च्या आगष्ट महिन्याच्या अखेरीस शेवट झाला. परंतु त्यानें केलेल्या कारस्थानांचे अनिष्ट परिणाम मात्र मराठ्यांना व महाराष्ट्राला कायमचे भोगावे लागले.

सारांश, शिवकालीं जितकी स्वधर्माविषयीं जागृति झाली होती त्याच्या दशांशानेंहि स्वराज्यविषयीं प्रेम किंवा राष्ट्रीयत्वाची भावना जागृत झाली नव्हती. मुसुलमान व हिंदू यांमधील तेढ अवरंगजेबाच्या दक्षिणेंतील स्वारीनंतर जितकी तीव्रतेनें भासूं लागली तितकी ती शिवकालीं नव्हती. इंग्रजांच्या हाताखालीं सेवक म्हणून वागण्यांत ज्याप्रमाणें अजूनहि समाधान मानलें जातें त्याप्रमाणेंच मुसुलमान राजाची नोकरी पतकरण्यांत समाधान किंबहुना मोठेपणा त्यावेळीं वाटे; आणि ज्याकाळीं सेव्यसेवकधर्मच प्रधान असतो त्याकाळीं स्वराज्य किंवा स्वधर्मासाठीं स्वार्थत्याग केला जाणें शक्य नसतें. अष्टप्रधानाच्या मिळकती व मोठाले पगार याकडे पाहिलें तर त्या वेळचे कर्तृत्ववान् म्हणून ठरलेले पुरुषहि केवळ विकत घेतले जात असेंच म्हणावें लागेल. अवरंगजेबासारखा शत्रु हिंदुपदपादशाहीचा समूळ नाश करण्याकरितां बाहेर पडला असतां सवाईशूर संभाजीला दूर सारून राजारामासारख्या बाहुल्याला पुढें करणाऱ्या स्वार्थासक्त अण्णाजीचें वर्तन चमत्कारिक वाटेल इतकेंच नव्हे तर शिवाजीच्या हाताखालीं अनुभवी व कार्यदक्ष समजल्या गेलेल्या अण्णाजीनें आपल्या चुकीबद्दल पश्चात्ताप न पावतां हटवादीपणानें पुन्हां तितकीच भयंकर चूक करून हिंदुपदपादशाहीच्या चिंधड्या उडविण्यास प्रवृत्त होणें कोणालाहि तिरस्करणीय वाटल्याशिवाय रहाणार नाहीं. परंतु त्यावेळीं परिस्थितीच अशी होती कीं पुढाऱ्यांनाहि स्वार्थ व स्वामिनिष्ठा यांखेरीज अन्य संस्कृतीचा संसर्ग झाला नव्हता. मात्र या घनघोर चुकीचा परिणाम असा झाला कीं अण्णाजीच्या पहिल्या कारस्थानांत अडकल्या गेलेल्या प्रधान मंडळीवरील संभाजीचा विश्वास कायमचा नष्ट झाला. कित्येक मृत्युमुखीं पडले व जे राहिले ते उदासीन झाल्यामुळें नामशेष होऊन गेले. यायोगेंकरून महाराष्ट्राची कुवत ऐनप्रसंगीं नाहींशी झाली व संभाजीसारख्या वीराला आनुवंशिक मुत्सद्द्यांच्या अभावीं स्वधर्माचा बचाव करणें कठिण झालें. जिकडे तिकडे बेबनाव झाला व शिवाजीनें व इतर थोर मंडळींनीं सतत अर्धे शतक आपलें रक्त सांडून व अहर्निश झटून केलेला हिंदुपदपादशाहीचा सर्व प्रयत्न अण्णाजीनें केवळ स्वार्थासाठीं हटवादीपणानें वायां दवडिला. परंतु शिवाजीनें तयार केलेल्या महाराष्ट्रांत औरंगजेबाच्या इस्लामी तरवारीनें सरांस सर्व मराठ्यांचें रक्त पडूं लागतांच महाराष्ट्राच्या नव्या पिढींत स्वराज्यविषयक भावनांचें बीजारोपण होऊन त्यांच्यांत स्वार्थत्यागाची जागृति व परधर्मीयांविषयीं तेढ कायमची उत्पन्न झाली व मराठ्यांना जिवंत राहण्यासाठीं नंतर २५ वर्षेंपर्यंत आपलें सर्वस्व खर्ची घालून रक्त सांडावें लागलें.

**वा. सी. बेंद्रे.**

**अण्णिगिरी**:–मुंबई इलाखा धारवाड जिल्हा. धारवाड-गदग रस्त्यावर नवलगुंदच्या आग्नेयीस सुमारें १० मैलांवर उ. अ. १५°.२२' पूर्व रे. ७५°.२६'. एक सात हजारांवर लोकवस्तीचा

गांव आहे. अमृतेश्वराचें एक देऊळ असून तें जखनाचार्यांनें बांधलें असें म्हणतात. देवळांतील भिंतीवर पुराणांतील चित्रें खोदलेलीं आहेत. देवळांत इ. स. ११५७ पासून १२०८ पर्यंतच्या दरम्यानचे सहा शिलालेख सांपडले आहेत. दुसऱ्याहि कांहीं देवळांतून शिलालेख सांपडतात.

इ. स. ११६१ सालीं कलचुरीचा राजा विज्जल यानें पश्चिमेकडील चालुक्यांचा पाडाव करून अण्णिगिरी ही आपली राजधानी केली. इ. स. ११७५ पर्यंत ही राजधानी असावी असें विज्जलचा पुत्र सोमेश्वर (११६७–११७५) याच्या वेळचे शिलालेख येथें सांपडले आहेत, यावरून दिसतें. इ. स. ११८४ सालीं पश्चिम चालुक्यांचा राजा चवथा सोमेश्वर यानें कल्याण येथील जैन व लिंगायत यांमधील लागलेल्या भांडणाचा फायदा घेऊन चालुक्य राज्य पुन्हां स्थापण्याचा प्रयत्न केला होता. इ. स. ११८९ सालीं देवगिरीचा तिसरा यादव भिल्लम (११८७–११९१) याचा मांडलिक महामंडलेश्वर बाचिराज याची राजधानी अण्णिगिरी होती असें एका शिलालेखावरून दिसतें. पुढें लवकरच वीरबल्लाळ नांवाचा होयसल राजा (११९२–१२११) याचीहि ती राजधानी होती असें एका शिलालेखावरून दिसतें (फ्लीटचा "कानडी राजघराणीं" ग्रंथ).

इ. स. १८०० सालीं प्रसिद्ध धोंड्या वाघ ह्यानें डंबलहून पळ काढला तेव्हां अण्णिगिरीस त्यानें मुक्काम केला होता. अण्णिगिरी, धारवाड आणि हुबळी येथें आक्टोबर १८०० सालीं क. वेल्स्लीनें तंबु तयार करविले (सप्लिमेंटरी डिस्पॅचेस भाग २). ब्रिटिश अंमल सुरू झाला त्यावेळीं अण्णिगिरी हें निपाणी संस्थानच्या जहागिरींत मोडत होतें. १८२७ सालीं येथें ४५० घरें, १४ दुकानें व कांहीं विहिरी होत्या. इ. स. १८३९ सालीं कोणी कायदेशीर वारस न उरल्यामुळें ती जहागीर ब्रिटिश सरकारनें खालसा केली. हुबळी धारवाडप्रमाणें हें गांव पूर्वी कापडाविषयीं प्रसिद्ध होतें. (धारवाड ग्याझेटीअर; इंपीरियल ग्या. ५)

**अतरसुंबा पोटविभाग**—याच्या उत्तरेस देहगांव तालुका; पूर्व व दक्षिण दिशांस खेडा तालुक्याचा कांहीं भाग; व पश्चिमेस देहगांव पोटविभाग. याशिवाय या विभागांतील पुष्कळ गांवें ब्रिटिश हद्दींत आहेत.

हा प्रदेश डोंगराळ, अरण्यमय व रमणीय असा आहे. १८७९–८० सालीं पावसाची सरासरी २५.६० इंच होती. धात्रक, मागम, धम्मी, वाराणशी आणि मोहोर या नद्या यांतून वाहातात. पृष्ठभागची जमीन बहुतेक रेताड आहे तरी कांहीं ठिकाणीं काळी जमीन दिसते. वस्ती बहुतेक कोळ्यांची आहे. १९११ सालीं लोकसंख्या २०,२२२ होती.

**अतरसुंबा गांव**—बडोयाच्या अतरसुंबा पोटभागांतील (मुं. इ.) ठिकाण. लोकसंख्या तीन हजार. येथें महालकरी कचेरी, टपालकचेरी, गुजराथी शाळा व एक पडित किल्ला आहे. येथील लोक कांहीं लोखंडी काम करितात व त्यांची सुऱ्यांबद्दल प्रसिद्धी आहे. (मुं. ग्यॅ.).

**अतारीः**—हें खेडेगांव (३०°.२६' उत्तर अक्षांश; ७२°.१' पूर्व रेखांश) पंजाब प्रांतांत, मुलतान जिल्ह्यांतील कबीरवाला तहसिलीमध्यें आहे. अलेक्झांडरनें हिंदुस्थानावर स्वारी केली त्यावेळीं त्यानें घेतलेलं हें तिसरें गांव होय. हेंच ब्राह्मणाबाद असावें असें कनिंगहॅम याचें मत आहे. हल्लीं या गांवाला कांहींच महत्त्व नाहीं. येथें एक पडका किल्ला आहे. तो पूर्वी फार अभेद्य असावासें दिसतें. हा ७५० चौरस फूट असून, ३५ फूट उंच आहे. याच्या दोन्ही बाजूंना प्राचीन शहराचे अवशेष पसरले आहेत. या अवशेषांचा इतिहास किंवा जुन्या शहराचें नांव कोणाला माहीत नाहीं. या शेजारचें अतारी गांव अगदीं अर्वाचीन आहे. (इं. ग्यॅ.).

**अतिकाय**—धान्यमालिनी नामक स्त्रीपासून, रावणास झालेला पुत्र. याचें शरीर अतिस्थूल होतें म्हणून यास हें नांव पडलें होतें. यानें ब्रह्मदेवाचें आराधन करून तो प्रसन्न झाल्यावर, अस्त्रें, कवचें, दिव्यरथ, आणि सुरासुरांपासून अवध्यत्व, इत्यादि संपादिलें होतें म्हणून इंद्राचा पराभव केला, व वरुणास जिंकून त्याचा पाशहि आणिला. रावणास याचें मोठें साह्य होतें. कुंभकर्ण मरण पावल्यावर, हा युद्धार्थ रामासंमुख आला असतां, लक्ष्मणानें याशीं घोर युद्ध करून यास मारिलें. (वा० रा० युद्ध० स० ७१).

**अतिपरमाणु विद्युत्कण.**—१ निरवयव विद्युत् मूलमान अथवा विद्युत्परमाणूची कल्पनाः— विद्युत् विश्लेषणाच्या (Electrolysis) सहाय्यानें मॅक्सवेल यास असें दिसून आलें कीं पदार्थांच्या प्रत्येक परमाणूवर सारखाच विद्युद्भार असतो. पण यानंतर (१८७३)मध्यें तो स्वतःच त्याच्या विरुद्ध विधान करूं लागला पण पूर्ण शोधाअंतीं आतां त्यानंतरच्या शास्त्रज्ञांनीं वरील गोष्ट सिद्ध केली आहे.

एकाकी परमाणूवरील विद्युद्भार हें विद्युत्चें स्वाभाविक मूलमान (Unit) आहे. याचे पूर्ण आधार अथवा पटी असूं शकतात पण अपूर्ण पटी असूं शकत नाहींत आणि हें मूलमान सध्यां व्यवहारांत असलेल्या स्थिर विद्युत् मूलमानापेक्षां बरेंच लहान आहे.

डॉ. जॉनसन स्टोनी यानें, विद्युद्भार असलेल्या परमाणूला 'विद्युत्कणवाही परमाणू' व द्रव्य विरहित विद्युद्भाराला 'विद्युत्कण' अशी संज्ञा दिली व तींच नांवें अद्याप चालू आहेत. हे विद्युत्कण परमाणूंना अगदीं विलगलेले असतात व विद्युत्विश्लेषणाचे वेळीं मात्र ते निरनिराळ्या विद्युन्मार्गांशीं संघात झाल्यामुळें नाहींसे होतात. हे विद्युद्भार, परमाणूबरोबर जातात म्हणा, किंवा विद्युद्भारच परिमाणूंना विद्युन्मार्गांकडे नेतात म्हणा, पण विद्युत्विश्लेषणाचे वेळीं विद्युन्मार्गांमुळें विद्युद्भार नाहींसा होऊन निव्वळ द्रव्यपरमाणू कायम रहातो. व

हा विद्युद्भार एकाकी परमाणूवर एकपट असेल तर द्वणुकावर दुप्पट असतो यावरून याचा परमाणूशीं असलेला संबंध कांहीं तरी नियमितच असला पाहिजे, व या परमाणूशीं असलेल्या प्रमाणाला विद्युत् मूलमान किंवा विद्युत्परमाणु म्हणण्यास कोणतीच हरकत नाहीं.

२ अति परमाणु विद्युत्कणांची कल्पनाः—(अ). निर्वात नळींतील दृश्य.—विद्युन्मंडलांत एक साधारण निर्वात नळी घातली व दुसऱ्या ठिकाणीं थोडी उघडी जागा ठेवली, तर विद्युत्प्रवाह त्या उघड्या जागेंतून जाण्याऐवजीं, त्या निर्वात जागेंतून जाणें पसंत करतो. अशा तऱ्हेनें निर्वात जागेंतून विद्युत्प्रवाह जात असतांना त्या नळींत चमचम करणारा स्फुरप्रकाश दिसूं लागतो, त्यानंतर निर्वात प्रदेश जसजसा वाढत जाईल तसतसा या चमकणाऱ्या उजेडाचा रंग बदलून अखेर त्याचा नळीच्या आसाच्या ठिकाणीं एक सबंध पट्टा दिसूं लागतो. त्यापेक्षांहि निर्वात प्रदेश जर जास्त वाढविला तर त्या सबंध पट्टयाऐवजीं त्याचे निरनिराळे तुकडे दिसूं लागतात व ऋणध्रुवाजवळ एक काळा भाग दिसूं लागतो, पण या काळ्या भागानें सर्व नळी व्यापून टाकण्यापूर्वीच ऋणध्रुवापासून आणखी एक तेजोभाग तुटून निघतो, पण हें सर्व चालू असतांना निर्वात भाग जर वाढवीत नेला तर अखेर सर्व तेजोभाग नाहींसा होऊन सर्व नळीभर अदृश्य असा एक प्रवाह सुरू होतो; पण यावेळीं विद्युन्मंडळांत जी उघडी जागा ठेवलेली असते, तिची लांबी मात्र वाढवावी लागते. नाहीं तर विद्युत्, आतां त्या निर्वात जागेतून मार्ग काढण्याऐवजीं या मोकळ्या जागेंतून मार्ग काढते; असो. अशा तऱ्हेनें जो हा अदृश्य प्रवाह सुरू होतो त्याला ऋणध्रुवकिरण म्हणतात.

(आ) ऋणध्रुवकिरणः—निर्वात नळींत एकदां अदृश्य प्रवाह सुरू झाला म्हणजे उजेडाचा किंवा दृश्य भागाचा कांहींच प्रश्न रहात नाहीं, पण ऋणध्रुवापासून कांहीं तरी अतिशय वेगानें बाहेर पडत असतें, आणि तें जोंपर्यंत कशानें थांबविलें गेलें नाहीं तोंपर्यंत तें अदृश्य असतें, पण त्याच्या सरळ गतींत जर कां विरोध झाला तर तें दृश्यमान होऊं लागतें. अर्थातच या कृष्ण किरणांनीं व्यापलेला प्रदेश कृष्णच असणार पण याच्या सीमा मात्र प्रकाशित असतात, कारण त्या ठिकाणीं या किरणकणांना प्रतिबंध होत असतो; एरवीं ह्यांची गति अगदीं सरळ असते व ते आपापसांत एकमेकांवर सुद्धां आपटत नाहींत. ह्या कृष्ण किरणांत कांहीं शक्ति आहे हेंहीं सिद्ध होणें फारसें कठिण नाहीं. कारण हे कृष्ण किरण जर एका केंद्रांत आणले, व त्या ठिकाणीं प्लातिन ( प्लॅटिनम ) धातूचा तुकडा ठेवला तर तो अतिशय तापतो, यावरून या कृष्ण किरणांच्या अंगीं शक्ति असते हें उघड आहे. निर्वात भाग जसजसा वाढवावा तसतसा प्लातिनचा पत्रा कमी कमी उष्ण होतो व पूर्ण निर्वात अवकाशाच्या वेळीं दृश्य उजेड त्यांतून निघत नसला तरी, दुसऱ्या एका उच्च दर्जाच्या किरणांचें विसर्जन होऊं लागतें, आणि या किरणांनाच आपण क्ष-किरण म्हणतों. प्रक्षेप होणारा पदार्थ जर एकदम जोरानें थांबविला गेला तर हे क्ष-किरण विसर्जन त्यांतून होऊं लागतें; आणि हा धर्म चर विद्युद्भारांच्याच अंगीं असतो व तोहि त्यांची गति जर प्रकाशगतीच्या बरोबरीनें असेल तरच हा धर्म त्यांच्या अंगीं असूं शकतो.

या ऋणध्रुव किरणांची भेदक शक्ति फार चमत्कारिक आहे. हे कोणत्याहि धातूच्या पत्र्यांना भेदून पार निघून जातात व नंतर बाहेर हवेंत आले, म्हणजे हवेच्या प्रतिबंधामुळें ते तेजोमय होतात. हें दृश्य पाहून कांहींची अशी कल्पना झाली कीं हे विद्युद्भारयुक्त पदार्थ-परमाणू असावेत, पण पदार्थ परमाणूंना आघाताशिवाय एक हजारांश इंच सुद्धां प्रवास करतां येत नाहीं.

कांहीं काळ अशी कल्पना होती कीं हे जे ऋणध्रुव किरण आहेत हे पळणारे परमाणू असून त्यांची गति साधारण अणूंच्या गतीसारखीच आहे, पण फरक एवढाच कीं त्यांचा मोकळा मार्ग हा मात्र साध्या वायुरूप पदार्थांच्या परमाणूंना जेवढा मिळतो, त्यापेक्षांहि जास्त आहे, त्याचप्रमाणें ते जे फिरतात ते समांतर रेषांत फिरत असल्यामुळें, आणि त्यांची गति उष्णतांशुविक्षेपणासारखी अनियमित नसल्यामुळें, त्यांना बराच मोठा मोकळा मार्ग मिळतो. क्रूक नांवाच्या शास्त्रज्ञाची अशी कल्पना होती कीं ज्याप्रमाणें वायुरूप, द्रवरूप व घनरूप या पदार्थांच्या तीन स्थिति आहेत त्याचप्रमाणें ही एक चवथी स्थिति होय.

आतां अशी एक शंका निघणें साहजिक आहे कीं, ऋणध्रुवापासून निघणाऱ्या परमाणूंना गति कशावरून असते, या शंकेचें निराकारण निर्वात नळींत कांहीं चक्ररचना करून नंतर विद्युत्प्रवाह सोडला असतां, तीं चक्रें फिरूं लागतात या प्रयोगानें होतें. दुसरें या किरणांच्या जवळ जर घोड्याच्या नालाच्या आकाराचा लोहचुंबक आणला, तर हे आपल्या सरळ मार्गापासून च्युत होतात. यावरून ह्या किरणांतील परमाणू विद्युत्पूर्ण आहेत हें सिद्ध होतें, एवढेंच नव्हे तर हे विद्युत्परमाणू ऋण विद्युत्पूर्ण आहेत हेंहि प्रयोगानें सिद्ध होतें; व यांच्यांत धनविद्युत्पूर्ण परमाणूंची संख्या फारशी असेल हें संभवत नाहीं. यावरून असें दिसतें कीं, कांहींका कारणामुळें असेना, निर्वात नळींत ऋण विद्युत्किरण धन विद्युत्किरणापेक्षां फार चपल असतात एवढेंच नव्हे तर त्यांची गति अतिशयच असते. या गतीमुळें त्यांना वाटेल तितकें लांब जातां येतें, व तसेंच विरुद्ध विद्युद्भार असलेल्या कणांशीं संयोग पावून स्वतःला नाहींसेहि करून घेतां येतें.

प्रो. टौनसेंडच्या मतानें यांची वाहकता, जर हवेंत धुळीचे कण नसतील तर बरीच टिकते, कारण हवेंत धुळीचे कण असले म्हणजे, ते विद्युद्भारांची देवाण घेवाण करीत असतांना स्वतःलाहि कांहीं ठेवतात. आणि हवेंत धुळीचे कण बिलकुल नसले तर वाहकशक्ति नष्ट होण्यास जास्त

वेळ लागतो, यावरून असें वाटतें कीं, हे चर परमाणू फारच लहान असले पाहिजेत, व त्यांचे एकमेकांवर क्वचितच आघात होत असले पाहिजेत. परमाणू जितके आकारानें लहान तितका त्यांना आघात सहज चुकवितां येतो. वायूच्या अणूचें चापल्य किंवा प्रसरणशक्ति त्याच्या परमाणूंच्या आकारावर, आणि त्यांच्या स्वतंत्र मोकळ्या रस्त्यावर अवलंबून असते. विद्युद्विश्लेषणांत जे चपल परमाणू असतात ते द्रव्य-परमाणू नसून, द्रव्यपरमाणूपासून निराळा झालेला त्यांचा विद्युद्भार असतो, आणि अर्थातच द्रव्यपरमाणूचें ओझें नाहींसें झाल्यामुळें त्याला वाटेल तेवढ्या गतीनें फिरतां येतें; व विद्युन्मार्गांच्या विद्युच्छक्तीचाहि त्याच्यावर परिणाम होतो. यावरून असें दिसतें कीं विद्युद्भार हा द्रव्य-परमाणूपासून निराळा एकटा राहूं शकतो, किंवा एका परमाणूपासून दुसऱ्या परमाणूकडे जात असतांना कांहीं वेळतरी तो एकटा रहातो असें धरण्यास हरकत नाहीं. या क्षणिक स्वातंत्र्यांत निर्वात अवकाशांत कांहीं विद्युद्भार विजातीय विद्युद्भाराशीं मिसळून नाहीसें होणें साहजिक आहे, त्याचप्रमाणें कायमचे सुटून जाऊन वाटेल तिकडे वावरणेंहि साहजिक आहे. अशा तऱ्हेच्या कल्पनेनें मोकळ्या असलेल्या विद्युद्भारांना म्हणजे एकाकी परमाणूवरील मोकळ्या झालेल्या विद्युद्भाराला अतिपरमाणुविद्युत्कण हें नांव दिलें गेलें.

ऋणध्रुव किरण ज्यांचे बनलेले आहेत त्या चपल कणांकडे जर पाहिलें तर ते बहुतकरून अतिपरमाणुविद्युत्कणच असावेत असें वाटूं लागतें, कारण त्यांच्या अंगीं विलक्षण चापल्य, अतोनात वेग आणि प्रसरण पावण्याची अगाध शक्ति हीं आहेत; आणि त्यांना कोणतेंहि द्रव्य असें म्हणतां आलें नाहीं, तरी द्रव्याचे कांहीं गुण त्यांच्या अंगीं नाहींत असें मात्र म्हणतां येणार नाहीं. द्रव्यपरमाणूप्रमाणेंच यांच्या अंगीं जडत्व व भ्रामकत्व हीं आहेत, आणि त्यामुळेंच ते निर्वात नळींत तयार केलेली चक्रयोजना फिरवितात; तशीच त्यांच्या अंगांत गति-विशिष्ट-शक्ति आहे, व त्यामुळें त्यांच्या मार्गामध्यें आलेला प्लातिनचा तुकडा तापविला जातो; आणि अतिशय वेगानें फिरत असतां जर ते मध्येंच जोरानें थांबविले गेले, तर एकदम त्यांचा उजेड पडूं लागतो किंवा त्यापेक्षांहि उच्च दर्जाच्या किरणविसर्जनास म्हणजे क्षकिरणविसर्जनास सुरवात होते. विद्युत्तत्त्वाप्रमाणें क्षकिरणांच्या या धर्मावरून कांहीं निश्चित गोष्टींचा सुगावा लागण्यासारखें आहे. विद्युत्प्रवाहाकरितां धन विद्युत्परमाणूंचीच जरूर असते ऋण विद्युत्परमाणू कितीहि असले तरी त्यांचा कांहींएक उपयोग नसतो. तरीहि पण ते सर्वच संपून जाऊं नयेत म्हणून ते वरचेवर उत्पन्न होत असतात. ऋण विद्युत्कणांच्या गर्दीमुळें निर्वात नळींत जी कांहीं शिल्लक हवा राहिलेली असते तिचें विश्लेषण होऊं लागतें, आणि त्या विश्लेषणांत धन वैद्युदणू (Positive ions) उत्पन्न होतात. हे धन-वैद्युदणू ऋणध्रुवापासून होत असणाऱ्या ऋण विद्युत्कणांच्या भडिमाराला न जुमानतां ऋणध्रुवाकडेसच जात असतात; आणि अखेर त्यावर आपटतात व या आघातामुळें आणखी विद्युत्कण उत्पन्न करितात. ऋणध्रुवावर जो प्रकाशित भाग असतो, त्याच ठिकाणीं हें विश्लेषण चालू असतें असा समज आहे.

ज्या जोरानें ते पुढें लोटले जातात त्यावरून त्यांच्यावर जबर विद्युद्भार असला पाहिजे असें वाटतें, आणि त्यांची भेदून जाण्याची शक्ति इतकी विलक्षण आहे कीं, त्यांना साधारण आपणांस छिद्ररहित दिसणाऱ्या धातूच्या पत्र्यांमधूनहि जातां येतें यावरून त्यांचा आकार फारच लहान असला पाहिजे हें सिद्ध होतें.

(इ) ऋणध्रुव किरणांची गति व विद्युद्रासानियक सममूल्यः— ज्यावेळीं अतिपरमाणु विद्युत्कणांची गति मोजावी, त्यावेळीं ऋणध्रुव किरण हे परमाणूंचे बनलेले आहेत ही कल्पना पार नाहींशी होते, कारण त्यांची गति दर सेकंदाला दहा हजार मैल किंवा कमींत कमी म्हणजे प्रकाशाच्या गतीच्या एक दशांशाइतकी येते; आणि सेंटिमीटर ग्रॅमपद्धतीनें मोजली तर ती $१०^{९}$ इतकी भरते व विद्युद्रासायनिक सममूल्य $१०^{-७}$ इतकें भरतें. याला प्रमाण मात्र उज्ज (हायड्रोजन) वायु धरला आहे. निर्वात नळींतील वायु कोणताहि असला किंवा विद्युन्मार्ग कसलेहि असले, तरी यांत फरक होत नाहीं. दोन विद्युन्मार्गांतील संभाव्य शक्तीचा फरक व नळींतील निर्वाततेचें प्रमाण यावर ऋणध्रुव किरणांची गति अवलंबून असते.

ऋणध्रुव किरण ज्या कणांचे झाले आहेत, त्यांची गति जरी विलक्षण असली तरी त्यांची शक्ति साधारणच आहे, आणि त्यांचा एकंदर पिंड फारच थोडा होतो, पण त्यांचा एकंदर विद्युद्भार मात्र विलक्षण मोठा असतो. कारण ते १५ मायक्रो फॅरडची ग्राहकता एका सेकंदाला ५ व्होल्टनें वाढवितात, किंवा ज्या उष्णतामापकाची उष्णताग्रहणशक्ति ४ मि. ग्रॅ. पाण्याइतकी आहे त्याची उष्णता २ अंशानें वाढवितात; पण त्यांचा पिंड मात्र इतका लहान आहे कीं ३/१० मि. ग्रॅ. गोळा करण्याला निदान शंभर वर्षे तरी लागतील. त्यांची गति बंदुकींतून सुटलेल्या गोळीच्या गतीपेक्षां लाखों पटीनें जास्त आहे. आणि या किरणांना जर द्रव्य म्हणावयाचें असेल तर द्रव्यांत ह्यांचीच सर्वांत जास्त गति आहे. आतां ह्या ऋणध्रुव किरणांतील कण, परमाणू आहेत असें म्हटलें तर निदान त्यांच्यावरील विद्युद्भार तरी अतिशय मोठा आहे असें म्हटल्याशिवाय गत्यंतर नाहीं. पण या उडणाऱ्या कणांचा विद्युद्भार व विश्लेषणांत सांपडलेल्या परमाणूंचा विद्युद्भार सारखाच आहे असें निश्चित वाटल्यावर, मग हे जर परमाणू असतील तर त्यांचा पिंड तरी विश्लेषणांत सांपडलेल्या परमाणूंच्या पिंडापेक्षां हजारांशानें लहान असला पाहिजे; आणि असा एकदा विचार कायम झाला म्हणजे हे ऋणध्रुवापासून निघणारे कण कांहीं तरी निराळे म्हणजेच आतांपर्यंत जे अति-

## अतिपरमाणु विद्युत्कण.




लेनार्डनें पिंड व विद्युद्भार यांचें प्रमाण मोजण्याकरितां केलेल्या प्रयोगांतील आकृति. ( पा. १०७ )



अफगाण मिशन.

हे मुत्सद्दीमंडळ १९२१ सालीं यूरोपभर फिरून अफगाणिस्तानचें साम्राज्यपद जाहीर करीत होतें व यूरोपांत आणि अमेरिकेंत कॉन्सल व वकीलाती स्थापन करीत होतें. (डावीकडून उजवीकडे) बसलेले.—महंमदवलीखान, मिशनचे अध्यक्ष; कर्नल हबिबुल्लाखान लष्करी खात्याकडचे; उभे असलेले.—गुलाम सिद्दिकखान आणि फैज महंमदखान मिशनचे सल्लागार; एडिब बे, अफगाण कॉन्सुलेटचे ज्यांनां प्रमुख करून बर्लिन येथें ठेवण्यांत आले ते.

परमाणुविद्युत्कण आहेत अशी कल्पना केली आहे ते असले पाहिजेत किंवा ते निराळे विद्युत्परमाणूच असले पाहिजेत.

३ उपनील लोहित किरणांच्या योगानें होणारा विद्युत्स्राव:—ऋण विद्युत्पूर्ण अशा भागावर जर उपनील लोहित किरण-मग ते कोणत्याहि प्रकाशस्थानापासून आलेले असोत-पाडले, तर त्या भागांतून विद्युद्भार हळू हळू नाहींसा होऊं लागतो, त्या भागाजवळ जर लोहचुंबक आणला तर लोहचुंबकाच्या शक्तिरेषा ( Lines of force ) ज्या दिशेनें जात असतील त्या मानानें त्याच्यांत फरक होत असतो. हा स्राव, कण स्वतः बाहेर निघून जाण्यामुळेंच होत असतो. ऋणध्रुव किरणांत ज्याप्रमाणें विद्युत्कण स्वतःच हिंडत असतात, त्याचप्रमाणें उपनीललोहित प्रकाशामुळें ते या भागांतूनहि स्वतःच जाऊं लागतात. हा देखावा पहाण्याकरितां निर्वात प्रदेश लागतो असें नाहीं, पण निर्वातप्रदेशांत हा चांगला दिसतो. खरें म्हटलें तर अणूमध्यें चलविचल सुरू झाल्याशिवाय हा स्राव शक्य नाहीं. ही चलविचल उपनीललोहित किरणांच्या समकालिक आंदोलनांच्या योगानें सुरू होते. व अणूमध्यें चलविचल सुरू झाली म्हणजे त्यांचा ऋण विद्युद्भार त्यांच्या पासून ढिला होतो, व तो तेथून अर्थातच दूर जाऊं लागतो; याशिवाय किरणांच्या योगानें थोडीशी धन विद्युत् उत्पन्न होते, व या धनविद्युत् उत्पत्तीच्याच योगानें फक्त जो परिणाम होतो तो धातूच्या उष्णतामानावर अवलंबून असतो.

जे. जे. थॉम्सन या शास्त्रज्ञानें हा स्राव मोजण्याकरितां कांहीं प्रयोग केले. त्यानें असें शोधून काढलें कीं या कणांचा लोहचुंबकामुळें धातूच्या पत्र्याला सोडल्यावर फिरण्याचा जो मार्ग आहे तो चक्राभास (Cycloid) आहे आणि त्या चक्राभासाचें प्रमाण $\frac{प}{व}$ ( प=पिंड आणि व=विद्युद्भार ) हें होय; म्हणजे, त्या कणाचा पिंड व त्यावर असलेला विद्युद्भार यांच्या भागाकाराच्या प्रमाणांत त्या चक्राभासाचा आकार असतो. हे चक्राभास अदृश्य असून त्यांना प्रत्यक्ष पहाणें फार कठिण आहे. त्यांची कल्पना मात्र करतां येते ती अशी कीं, समजा एखाद्या धातूच्या पत्र्यांतून हे कण निघून जात आहेत, तर त्या धातूच्या पत्र्याजवळ दुसरा एक पत्रा आणला, तर तो पत्रा जर चक्राभासाची जी त्रिज्या असेल त्याच्या आंत आला तर त्याच्यावर विद्युद्भार येईल व तो त्रिज्यान्तराच्या जर बाहेर गेला तर त्यावर विद्युद्भार बिलकुल येणार नाहीं; अशा तऱ्हेनें तो दुसरा पत्रा हलवून या कणांचा मार्ग चक्राभास आहे हें काढतां येतें; पण हाच पत्रा जर त्रिज्यान्तराच्या बाहेर नेऊन विद्युत्क्षेत्र जास्त शक्तिमान् केलें किंवा लोहचुंबकीय क्षेत्र कमी केलें तरी यावर पुष्कळसे विद्युत्कण येऊं शकतील. बरोबर त्रिज्यान्तर मोजण्याला दुसरा धातूचा तुकडा पुढें मागें सरकवून पाहून ज्या ठिकाणापासून विद्युद्भार येणें कमी होऊं लागेल तें त्रिज्यान्तर धरणें बरोबर होईल व हें अन्तर, व पिंड, विद्युच्छक्ति वगैरेचा संबंध $\left(\frac{२ प. वि.}{व. ल^{२}}\right)$ या सारणीनें दाखविला जातो. यांत [ प=पिंड, वि=क्षेत्रांतील विद्युच्छक्ति, व=पिंडावरील विद्युद्भार, ल=लोहचुंबकाची शक्ति ( पृथ्वीची लोहचुंबकशक्ति) ]. यापैकीं क्षेत्राची विद्युच्छक्ति व पृथ्वीची लोहचुंबक शक्ति माहित असल्यामुळें, पिंड व विद्युद्भार यांचें प्रमाण सहज काढतां येतें. हें त्रिज्यान्तर जरी अगदीं बरोबर मोजतां आलें नाहीं, तरी या प्रयोगामुळें आलेली पिंड व विद्युद्भार यांच्या प्रमाणाची किंमत थॉमसननें काढलेल्या $१०^{७}$ याच्या अगदीं जवळ जवळ येते.

या प्रयोगांत कांहीं जर विशेष असेल तर तें हें कीं, यांत विद्युन्मापकाच्या विक्षेपाशिवाय दुसरें कांहींच दिसत नाहीं. लेनार्डच्या पद्धतीनें प्रयोग केला तर महत्तम विक्षेप किती हें पहावें व थॉमसनच्या पद्धतीनें प्रयोग केल्यास शून्य विक्षेपापासून अमुक एक विक्षेपापर्यंत कसें जातें, हें पहावयाचें.

४ लेनार्डचा $\frac{प}{व}$ प्रमाण मोजण्याकरतां प्रयोगः—या प्रयोगांत विद्युत्स्फुलिंगाचें तेज विद्युद्भारित 'क' या तबकडीवर पडतें आणि मग तिच्यांतून विद्युत्कण बाहेर पडून ते 'ब' या सरंध्र तबकडींतून 'इ' या तबकडीवर पडतात, आणि अशा वेळीं त्यांच्या मार्गांत जर योग्य त्या तऱ्हेनें लोहचुंबकाची शक्ति सोडली तर ते 'फ' या तबकडीवर त्यांचें विक्षेपण होऊन पडूं लागतात. ज्यावेळीं लोहचुंबकाची शक्ति जास्त लावावी त्यावेळीं त्यांचें पूर्ण विक्षेपण होऊन ते सर्व 'फ' या तबकडीवर पडूं लागतात. 'इ' व 'फ' हे निरनिराळ्या विद्युन्मार्गांला जोडलेले असतात. ज्यावेळीं 'फ' या तबकडीवर बहुतेक कण येऊं लागतात त्यावेळीं या विद्युत्कणांच्या चक्राभासमार्गाची स्पर्शज्या पृथ्वीशीं समांतर असते व हा चक्राभासविक्षेप 'फ' या तबकडीच्या मध्यांतून जात असतो. एवढ्या गोष्टी या वक्रगतीची त्रिज्या काढण्यास पुरेशा होऊन त्या लेनार्डनें $\left(\frac{प. \times ग.}{व. \times ल.}\right)$ या सारणीनें दर्शविल्या आहेत यांत (प=पिंड, ग=पिंडाची गति, व=त्याचा विद्युद्भार, ल=पृथ्वीची लोहचुंबकीय शक्ति ) गतीचें माप ती, 'ब' व 'क' या दोन भागांतच असल्यामुळें त्यांच्या शक्त्यन्तरावर आहे आणि ती, [ $\frac{१}{२}$ प$\times$ग$^{२}$=व (श-श') या सारणीनें काढतां येते, ( यांत श व श' हे दोन विद्युन्मार्गांचे शक्तिनिदर्शक म्हणजे 'क' व 'ब' चे शक्तिनिदर्शक आहेत व (श-श') यानें शक्त्यन्तर दाखविलें जातें; याप्रमाणें गति व पिंड व विद्युद्भार यांचें प्रमाण हीं दोन्ही मोजलीं जातात.

ही पिंड व विद्युत्भार यांच्या प्रमाणाची किंमत दाव ज्या वेळीं थोडा असेल त्यावेळीं काढलेली आहे, पण दाव जर जास्त झाला तर यांची किंमत यापेक्षांहि कमी येऊं शकते. यावरून असें दिसतें कीं थोड्या दावाच्या वेळीं विद्युत्कण हा परमाणूशीं संयोग पावत असला पाहिजे. साध्या वातावरणाचा दाब असतांना धन किंवा ऋण परमाणूच्या अवयवाची गति वायू-

रूप द्रव्यांत निराळी नसते, तें क्षेत्र मात्र विद्युत्क्षेत्र असलें पाहिजे, रेडियमपासून निघालेल्या विद्युत्कणांची गति इतकी असते कीं, त्यांच्या बाबतींत हा परमाणूंच्या संयोगाचा भाग दिसूनहि येत नाहीं.

५ अतिपरमाणु विद्युत्कणांची गतिः—धनवाहकाची गति दर सेकंदाला $१०^{८}$ सेंटिमीटर आहे व ऋणवाहकाची गति दर सेकंदाला $३\times१०^{९}$ सेंटिमीटर आहे. हें गतिप्रमाण प्रत्यक्ष मोजून काढलेलें आहे. या गतीमध्यें जो फरक दिसतो यावरून धन-विद्युद्वारांच्या बरोबर द्रव्यपरमाणूंची संगती नेहेमींच असते, या काल्पनिक सिद्धांताला पुष्टि मिळते, आणि त्यांचा द्रव्यपरमाणूंशीं संयोग झाल्यामुळेंच त्याला परमाणूंचा अवयव वैद्युदणु ( ion ) ह्मणतात. पण ऋणविद्युद्वार पुष्कळदां स्वतंत्रच सांपडतात, कदाचित् एकादे वेळीं त्यांच्याहि बरोबर द्रव्यपरमाणूंचें ओझें असेल, पण त्यावेळीं त्यांना रज ( Corpuscle ) म्हणावें लागेल. पण द्रव्यपरमाणुविरहीत असणारा विद्युद्वार, आपणाला सिद्धांतांत माहीत असलेल्या अतिपरमाणु विद्युत्कणा सारखाच असला पाहिजे.

६ वैद्युदण्वीभवन ( Ionisation ) किंवा पृथक्करण.—हवा किंवा वायुरूप पदार्थ यांचें क्ष-किरणांच्या योगानें धन व ऋण वैद्युदणूंमध्यें वैद्युदण्वीभवन होतें, किंवा एखाद्या पदार्थाच्या अतिपरमाणु विद्युत्कणांच्या विसर्जनानेंहि होतें. पाण्याच्या पडण्याचे धक्यानें सुद्धां हवेचें वैद्युदण्वीभवन होतें; व याच कारणामुळें धबधब्याच्या तळाची हवा विश्लेषित असते.

७ दृढीकरण ( Condensation )—क्ष-किरणांच्या योगानें जर हवेचें पृथक्करण झालें व अशा पृथक्करण झालेल्या हवेंत जर विद्युन्मार्ग ठेवून त्यांचे विभाग केले तर ऋण विभाग एका विद्युन्मार्गाकडे व धन विभाग दुसऱ्या विद्युन्मार्गाकडे असे होतील व भांड्यांतील हवेच्या विरलतेचें पहिल्या हवेशीं १.२५ असें प्रमाण आलें, तर अर्ध्या भांड्यांत धुकें दिसूं लागतें, पण हेंच प्रमाण १.३१ केलें तर तें दिसत नाहीं. यावरून दृढीकरणाला धनविभागापेक्षां ऋण विभागच जास्त उपयोगी आहेत हें सिद्ध होतें. आतां ही झाली पदार्थपरमाणूंच्या ऋण व धन विभागांची गोष्ट. पण त्याप्रमाणें ऋणविभाग मध्यवर्ती असले म्हणजे त्यांच्या भोंवतीं दृढीकरण होऊं लागतें, तसे जर 'अतिपरमाणू विद्युत्कण' असले तर होऊं लागेल काय हा प्रश्न निघतो. या प्रश्नावर सी. टी. आर. वुइलसन नांवाचा शास्त्रज्ञ असें लिहितो कीं, अतिपरमाणु विद्युत्कण जरी असला तरी तो हवेचें प्रसरण होण्यापूर्वींच परमाणूशीं संयोग पावून ऋण विभाग बनलेला असतो. पूर्णसंपृक्ततेच्या चौपट आर्द्रता ज्या हवेंत आहे त्या हवेंत शुष्क हवेच्या वैद्युदणूच्या आकाराचे अणू विद्युत्कणाच्या भोंवतीं जमा होऊन मग शक्तिसमता ( equilibrium) होते. पण यापेक्षांहि जास्त आर्द्रता जर हवेंत असेल तर मात्र परिस्थितींत पुनः चलविचल होऊन नंतर आर्द्रतेच्या अणूंचा थेंब होऊन तो दिसूं लागतो. पण अशा स्थितींत विद्युत्कण जर प्रसरण क्षेत्रांत प्रसरणानंतर एकदम एकाएकीं घुसले, व चौपट संपृक्ततेपेक्षां जास्त आर्द्रता असूं लागली, तर मग थेंबाच्या दृढीकरणाकरितां तेच वैद्युदणु न होतां तसेच्या तसेच मूलबिंदू होतात. पण उप-नील-लोहित किरणांच्या प्रकाशांत जर प्रयोग केला तर या विद्युत्कणांचे अतिशय लवकर म्हणजे प्रसरण होण्यापूर्वींच वैद्युदणू झालेले असतात.

८ विद्युत्कणाच्या बद्दल निर्णयः—आतांपर्यंतच्या प्रयोगानें विद्युत्कणाचा विद्युत्भार व पिंड यांच्या प्रमाणाची किंमत काढली गेली, पण विद्युन्भार व पिंड यांची निरनिराळी किंमत काढली गेली नाहीं; त्याला मुख्य अडचण ही कीं, आतांपर्यंत आपण बहुसंख्याक विद्युत्कण घेत होतों आणि म्हणून त्यांचा सर्वांचा एकत्र पिंड आपणाला मिळत असे. उदाहरणार्थ 'स' ही या विद्युत्कणांची संख्या व 'प,' हा पिंड असला तर आपल्याला 'सप', ही सर्व विद्युत्कणांच्या पिंडाची किंमत मिळत असे, पण 'स' व 'प' यांची निरनिराळी किंमत मिळत नसे. त्याचप्रमाणें 'ग' ही त्यांची गति धरली तर त्यांच्या एकत्रित गतीची किंमत ( $\frac{१}{२}$प×ग$^{२}$ ) या सारणीनें मिळे; पण, 'प' व 'ग' यांची, निरनिराळी किंमत मिळाली नाहीं. तेव्हां 'स' व 'प' व त्याचप्रणाणें 'ग' व 'प' यांची निरनिराळी किंमत कशी काढावी हा प्रश्न रहातो.

पुन्हा दुसरी गोष्ट म्हणजे हे विद्युत्कण एखाद्या रिकाम्या भांड्यांत सोडले व तें भांडें विद्युन्मापकाला जोडलें तर एकंदर विद्युन्मान काय हें मोजणें कठिण नाहीं. म्हणजे ( स×व ) ही किंमत निघेल, पण 'स' आणि 'व' ह्यांची निरनिराळी किंमत कशी काढणार ?

तेव्हां स×प, स×व. $\frac{१}{२}$ पग$^{२}$, ग, $\frac{व}{प}$, इत्यादि निरनिराळ्या सारण्यांच्या किंमती मिळतात. पण पिंडाची स्वतंत्र किंमत पाहिजे ती किंवा त्याचप्रमाणें विद्युत्भाराची स्वतंत्र किंमत मिळत नाहीं. ती मिळविण्यास 'स' म्हणजे संख्या याची किंमत काय आहे हें काढलें पाहिजे, व त्याची किंमत काय हें बरोबर तऱ्हेनें सांपडलें म्हणजे वरेंचसें काम झाल्यासारखें होईल, ही संख्या मोजण्याचा निरनिराळ्या तऱ्हेनें विल्सन ॲटकिन, व सर जार्ज स्टोक्स वगैरे शास्त्रज्ञांच्या सिद्धांताच्या सहायानें जे. जे. थॉमसननें प्रयत्न केला.

(अ) अटकिनचा प्रयोगः—घनमध्यबिंदू असल्या शिवाय धुक्याचा बिंदू तयार होत नाहीं. व हे मध्यबिंदू जितके असतील त्या मानानेंच धुक्याचे बिंदू तयार होतात. जर वाफ गाळून घेतली व तिच्यांत अशा तऱ्हेचे घनमध्यबिंदू अगदीं कमी केले, तर धुकें लवकर तयार होत नाहीं व झालेंच तर पाण्याचे मोठाले थेंब दिसूं लागतात. यावरून दृढीकरणाला घनमध्यबिंदूची जरूर आहे हें निर्विवाद

होतें. या घनमध्यबिंदूची किंवा मूलबिंदूची जरूर कां असावी याचें केल्व्हिननें चांगलें स्पष्टीकरण केलें आहे. वाफेच्या जोरावर वक्र पातळीचा परिणाम होत असतो, कारण जों जों द्रव पदार्थांचो पातळी वक्र होऊं लागते तों तों त्याची जास्त जास्त वाफ होऊं लागते, व जर प्रदेश अत्यंत बाह्य वक्र झाला तर द्रव पदार्थांची एकदम वाफ होईल; आणि म्हणूनच द्रव पदार्थांचा अतिसूक्ष्म परमाणु सांपडत नाहीं. वाफेचें दृढीकरण होण्याला धुळीच्या कणासारखा उत्तम वक्र भाग असलेला प्रदेश किंवा परमाणू किंवा कांहीं एकत्रित झालेले परमाणू हेच योग्य आहेत, किंवहुना याचीच विशेष जरूर आहे.

( आ ) थॉमसनचा प्रयोगः—१८८८ मध्यें थॉमसननें असें दाखविलें कीं पदार्थांत विद्युत्जागृति केली असतां, त्याच्या वक्रपणाचा जो गुण असतो तो नाहींसा होतो; व बाह्यवक्र भागावर वाफेच्या दृढीकरणाला तिची ( विद्युत्जागृतीची ) मदत होते. वक्रतेमुळें पृष्ठतन्यतेचा (Surface Tension) अंतःकेंद्रिक अवयव तयार होतो. म्हणजे वक्रभागामुळें सर्व जोर त्रिज्येच्या द्वारें केंद्रावर येतो. पण विद्युत्जागृतीमुळें, त्याच्या अगदीं उलट म्हणजे, वक्रतेला बाहेर लोटणारा असा दाव उत्पन्न होतो. 'ट' ही जर पृष्ठतन्यता धरली व 'र' ही जर त्रिज्या धरली तर तन्यतेचा केंद्रिक अवयव ( $\frac{२ट}{र}$ ) या सारणीनें दाखविला जाईल, आणि विद्युत्बाह्य तन्यता

( $\frac{व^२}{८\times\frac{२२}{७}\times क\times र^४}$ ) या सारणीनें दाखविली जाईल.

( व=विद्युभार, र=त्रिज्या, क=एक नियमित संख्या ) या दोन्ही सारणींचें समीकरण मांडून जी 'र' ची किंमत येईल ती ज्या वैद्युदणूवर पाण्याचा थेंब दृढ होऊं शकतो, अशा वैद्युदणूच्या आकाराची किंमत होय. ह्या दोन्ही सारण्यांचें समीकरण मांडून 'र'ची किंमत $१०^{-८}$ इतकी येते, व ही परमाणूच्या आकारमानाशीं बरोबर जुळते. यावरून सर्व साधारण दंवावधीच्या वेळीं वैद्युदणूच्या योगानें दृढीकरण होण्यास हरकत नाहीं; आणि इतकाच विद्युद्भार वहाणारें पण आकारमानानें मात्र यापेक्षां मोठें असें जर कांहीं असेल तर त्यावर फारच लवकर दृढीकरण होईल. यावरून विद्युद्भार ह्या दृढीकरणाला मदत करतो, व पुरेसा विद्युद्भार असेल तर, मध्यबिंदु ( Nuclus ) चा आकार लहान असला तरी त्यावर दृढीकरण होऊं शकतें, किंवा पुरेसा विद्युद्भार लहान आकाराच्या पिंडावर देखील दृढीकरण होण्यास लावील हें सिद्ध होतें. आणि यावरून थोडें पुढें गेलें, तर विद्युत्कणच जर मध्यबिंदु आले तर कोणत्याहि द्रव्यपिंडाची जरूर न लागतां वाफ त्यावरच द्रवरूप होऊं लागेल असें म्हणण्यास हरकत नाहीं. ते ( विद्युत्कण ) गाळून काढणें शक्य नाहीं, व काढले तरी, धुळविरहित हवेंत ते उत्पन्न होण्यास वेळ लागत नाहीं. पुष्कळसे वैद्युदणू जर हवेंत असतील, तर दाट धुकें दिसूं लागेल पण या धुक्याचा रंग नेहेमींच्या धुळीच्या कणाभोवतीं जमणाऱ्या पावसाळी धुक्यापेक्षां अगदीं निराळा दिसेल. हे जे विद्युत्पूर्ण मध्यबिंदू आहेत ते ज्या योगानें हवेचें पृथक्करण होतें किंवा हवेंत वैद्युदणू उत्पन्न होतात अशा कोणत्याहि रीतीनें, उत्पन्न होतात.

क्ष–किरणांच्या सहाय्यानें किंवा दुसऱ्या कोणात्यातरी रीतिनें विद्युन्मध्यबिंदू उत्पन्न करून, कांहीं एक मर्यादित वाफेचें द्रव्य असें दृढीकरण केलें. विद्युन्मध्यबिंदूंच्या योगानें एकदम धुकें तयार झालें व हळूहळू थेंब पडूं लागले, त्यानें त्या थेंबाच्या रंगावरून त्यांच्या आकाराचा अजमास केला, पण तो अर्थातच असमाधानकारक होता. पुढें त्या थेंबांचा पडण्याचा वेग मोजून पुढें त्यांच्या आकाराचा अजमास थॉमसननें केला. ते थेंब सारख्याच आकाराचे असतात व ते एकदमच पडूं लागतात; त्यामुळें ते मोजण्यास कठीण जात नाहीं.

वैद्युदणू उत्पन्न करणारे क्ष–किरण स्फटा(अल्युमिनम)च्या घट्ट झांकणांतून एकाद्या भांड्यांत येतात. विद्युत्स्राव मोजण्याकरितां स्फटेचें ( अल्युमिनम ) झांकण व पाणी यांचा विद्युन्मापकाकडे संबंध जोडलेला असतो. विद्युन्मापकाच्या दोन्ही टोंकांचें विद्युच्छक्त्यन्तर साधारण ठेवलेलें असतें. इतकी व्यवस्था झाल्यावर, प्रसरणाकरितां जी सोय केलेली असते, तिच्या योगानें प्रसरण करतात. प्रसरण होऊं लागल्याबरोबर धुकें दिसूं लागतें व त्यांचा पडण्याचा किंवा धुकें होण्याचें थांबण्याचा वेग प्रकाशित ( भांड्यातील ) भागाकडे पाहून मोजतां येतो. स्टोकच्या सारणीप्रमाणें द्रवबिंदूचा आकार काढतां येतो. ( $क=\frac{२}{९}\frac{गु\times घ\times र}{हवेची\ घनता}$ ). यांत (गु=गुरुत्वाकर्षणाची किंमत, घ=थेंबाची हवेपेक्षां जास्त असणारी घनता, र=थेंबाची त्रिज्या, क=त्यांचा पडण्याचा वेग.) या सारणीवरून थेंबाचा पतनवेग व त्याचा आकार यांचा काय संबंध आहे हें काढतां येतें. प्रसरण किती झालें हें माहिती असल्यामुळें किती पाण्याचे बिंदू झाले हें काढतां येतें; आणि म्हणून हे थेंब किती आहेत व त्याचप्रमाणें त्यांच्या दृढीकरणाला लागणारे मध्यबिंदू म्हणजे वैद्युदणू किती आहेत हेंहि काढतां येतें. एका प्रयोगांत एका घनसेंटिमीटरला अशा तऱ्हेचे थेंब ३०००० प्रमाणें मोजले गेले, आणि जितके थेंब तितकेच मध्यबिंदू, म्हणून मध्यबिंदूंचीहि संख्या मोजली गेली.

या प्रयोगाच्या योगानें मध्यबिंदूंची संख्या सांपडल्यामुळें निव्वळ पिंडाची किंमत, व त्याचप्रमाणें त्या पिंडाच्या निव्वळ विद्युद्भाराची किंमत काय हें त्याच्या प्रमाण सारणीवरून ( $\frac{व}{प}$ ) काढतां आलें.

स्थिर विद्युत् मूलमानाच्या प्रमाणानें मोजले तर विद्युद्भार ( $३\times १०^{-१०}$ ) इतका भरतो, व विद्युच्चुंबकीय मूलमानाच्या प्रमाणें मोजला तर ( $१०^{-२०}$ ) इतका भरतो. यावरून पिंडाची जी किंमत निघेल ती अर्थातच घन विद्युद्वाहकाची किंवा वैद्युदणूंची होईल; आणि तो परमाणूचा खरा खरा जो पिंड

आहे त्याची किंमत दाखवील; किंवा या किंमतीपेक्षां जर जास्त किंमत येऊं लागली तर एकापेक्षां जास्त परमाणू एके ठिकाणीं झाले असें म्हटलें पाहिजे. ऋणविद्युद्वाहक किंवा विद्युत्कण यांच्या ($\frac{व}{प}$) विद्युद्भार व पिंड यांच्या प्रमाणाची किंमत ($१०^{७}$) इतकी आहे आणि त्यांच्या पिंडाची किंमत नक्की ($१०^{-२७}$) ग्रॅम इतकी येते. ही सगळ्यांत हलका जो उज्ज (हायड्रोजन) वायूचा परमाणू त्याच्या $\frac{१}{१८००}$ आहे. अशा तऱ्हेनें परमाणूपेक्षांहि लहान पिंड अस्तित्वांत आहेत याची प्रयोगानें सिद्धता मिळाली. या सिद्धतेच्या योगानें या शास्त्रांत एक निराळें मन्वंतरच झालें.

९ अतिपरमाणु विद्युत्कणावरील विद्युद्भारः— एच. ए. विलसन नांवाच्या शास्त्रज्ञानें, 'त्रिशंकू'च्या प्रयोगानें या विद्युद्भाराची किंमत काढली. तो प्रयोग म्हणजे असा कीं, द्रव झालेल्या वाफेचा बिंदू हवेंतून खालीं पडत असतांना त्याला त्रिशंकूप्रमाणें मधल्यामध्येंच लोंबत ठेवण्यास किती विद्युच्छक्ति लागेल, ती मोजून मग त्या बिंदूचें वजन व ही विद्युच्छक्ति यांचें समीकरण मांडून मग प्रमाण काढणें. भ=जर त्या बिंदूचें वजन असेल व इ=विद्युत्क्षेत्राची शक्ति आणि व, जर त्या बिंदूंत असलेल्या मध्यबिंदूचा विद्युद्भार असेल तर त्यांचें भ=इ×व असें समीकरण मांडतां येईल, या समीकरणांत इ, म्हणजे विद्युत्क्षेत्राची किंमत व 'भ' म्हणजे त्या थेंबाचें वजन यांच्या किंमती माहिती असल्यामुळें 'व' म्हणजे विद्युद्भार याची किंमत काढतां येते. या प्रयोगाअन्वयें आलेली विद्युद्भाराची किंमत ($३.१\times१०^{-१०}$) इतकी होती.

गतिमापनाच्या सहाय्यानें थॉमसननें काढलेली किंमत ($३.४\times१०^{-१०}$) इतकी होती.

आकारः—हे इकडे तिकडे फिरणारे कण हे द्रव्यकण असून त्यांच्यावर कांहीं विद्युद्भार आहे असा हा कल्पित सिद्धांत घेऊन चाललें तर, या कणांची विद्युत् आणि द्रव्य अशी दुहेरी रचना होते, आणि अर्थातच त्याला येणारें जडत्वहि या दोन कारणांमुळें असलें पाहिजे. अशा दुहेरी कल्पनेमुळें प्रगति होणें कठिण जाऊं लागलें; पण त्याऐवजीं हे फिरणारे कण दुसरें कांहीं नसून विद्युत्कण आहेत, व त्यावर विद्युद्भार आहे व तेच परमाणूंचे घटक आहेत, पण त्यांना कोणत्याहि द्रव्याच्या मध्य बिंदूची (Material nucleus) जरूर नाहीं, अशी कल्पना केली तर ती प्रगतीच्या वाटेंत अडथळा आणणार नाहीं. परमाणूंचे जे गुणधर्म आहेत ते सर्व या घन अथवा ऋण विद्युत्कणांच्या समुदायांच्या मुळें झालेले असावेत व त्यांपैकीं एक दुसऱ्यापासून निराळा करणें शक्य असून तो स्वतंत्र आहे. या कल्पित सिद्धांतानुरोधानें या कणांचा पिंड जर मोजतां येतो तर त्यांचा आकारहि मोजतां आला पाहिजे. कांहीं विद्युद्गुण व कांहीं द्रव्यगुण अशा दोन्हींचाहि हिशेब धरूं म्हटलें तर आपल्याला कशाचा पत्ता लागणार नाहीं, व म्हणूनच हे कण निव्वळ विद्युत्कण आहेत असें धरून चालणेंच श्रेयस्कर होईल. दुसरा कल्पित सिद्धांत जर गृहीत धरला तर पिंड व विद्युद्भार यांच्या प्रमाणावरून या कणांचा आकारहि काढतां येईल; कारण यांचा पिंड उज्ज (हायड्रोजन) परमाणूचा पिंडाच्या $\frac{१}{१०००}$ आहे व त्याचा विद्युद्भार स्थिरविद्युत् मूलमाना प्रमाणें मोजला तर, ($१०^{-२०}$) इतका होतो हें आपण मागें पाहिलेंच, तेव्हां विद्युत्कणाचें जितकें जडत्व आहे, तितकेंच जडत्व या विद्युद्भाराचें असावयाचें असें असल्यास त्या विद्युद्भाराचा आकार ($१०^{-१३}$) सेंटिमीटर त्रिज्या असलेल्या गोलाएवढाच असला पाहिजे, तेव्हां आपला जो कल्पित विद्युत्कण आहे त्याचाहि आकार हाच असला पाहिजे, आणि या आकाराकडे पाहिलें म्हणजे मग ऋणध्रुव किरणांची भेदक शक्ति यथार्थ आहे असें वाटूं लागतें. कारण द्रव्यपरमाणूच या विद्युत्कणांचे बनलेले आहेत, व अर्थातच मग अशा दोन कणांत बरीचशी मोकळी जागा रहात असली पाहिजे, आणि म्हणूनच या कणांना एखाद्या धातूच्या पत्र्यांतून धक्का न खातां पार निघून जातां येतें.

विद्युत्कणाचा व्यास($१०^{-१३}$) इतका आहे व परमाणूचा व्यास $१०^{-८}$ सेंटिमीटर इतका आहे. सूर्यमालेशीं जर याची तुलना केली तर पृथ्वीचा व्यास तिच्या कक्षेच्या $\frac{१}{२४०००}$ आहे. आतां पृथ्वी हाच विद्युत्कण आहे अशी कल्पना केली तर परमाणूचा गोल इतका मोठा होईल कीं, सूर्य हा जर मध्य कल्पिला तर त्या गोलाची त्रिज्या पृथ्वीचें सूर्यापासून जितकें अंतर आहे त्याच्या चौपट होईल. साध्या वातावरणांत चार इंचाचे जागेंत एक विद्युत्कण जवळजवळ दहाकोट दुसऱ्या कणांना चुकवून जात असतो; पण जे परमाणू अतिशय घन धातूंतून पलीकडे जात असतात त्यांना मात्र इतका मोकळा रस्ता मिळत नाहीं. सरासरी मिलिमीटरच्या एक हजारांशाइतका त्यांना मोकळा मार्ग मिळतो, आणि तोहि सरळ रेषेंत मिळत नाहीं; आणि म्हणूनच स्फट (प्लॅटिनम)च्या पत्र्यांतून हे कण जात असतांना, त्या पत्र्याच्या पृष्ठभागांत जवळच थांबविले जातात आणि मग त्या गतिविरोधानें क्ष-किरण उत्पन्न होतात.

हे फिरत असतांना एकमेकांचे जे एकमेकांवर आघात होतात, त्यांची तुलना आकाशांतील तारकांच्या आघातांशीं करतां येण्याजोगी आहे. हे एकमेकांवर आपटणारे पिंड एकास लाख या प्रमाणांत आहेत. ह्या फिरणाऱ्या विद्युत्कणांची स्थिति सूर्यमालेवर येणाऱ्या धूमकेतूच्या स्थितीप्रमाणें होते. ज्याप्रमाणें धूमकेतू फिरत फिरत एखाद्या ग्रहाच्या गुरुत्वाकर्षणाच्या तडाख्यांत आला म्हणजे, तो ग्रह आपल्या गुरुत्वाकर्षणाच्या तडाख्यांत धरून आपल्या ग्रहमालेंतील एक कायमचाच ग्रह त्या धूमकेतूला करून टाकतो, त्याचप्रमाणें परमाणूरूपी ग्रह या विद्युत्कणरूपी धूमकेतूला कायमचाच

आपल्या मालेंतील करून टाकतो. यावरून विद्युत्कण परमाणूच्या परिमाणांतच थांबविला जात असला पाहिजे, म्हणजे $१०^{-८}$ सेंटिमीटर एवढयाच अंतरांत थांबविला जात असला पाहिजे, आणि एक विद्युत्कण थांबविण्यास $\frac{१}{१०}$ डाइन शक्ति लागते ( डाइन=सेंटिमीटर ग्रॅम पद्धतीनें एक ग्रॅमवजन, एका सेकंदांत एक सेंटिमीटर वर उचलण्यास लागणारी शक्ति ) आणि म्हणूनच आत्यंतिक किरणविसर्जनाचे देखावे दिसतात. प्रकाशाच्या वेगाच्या $\frac{१}{३०}$ वेग असणाऱ्या विद्युत्कणाची गति थांबविण्यास किती शक्ति लागते हें खालील सारणीनें कळेल.

$$\text{शक्ति}\div\text{वेळ}=\frac{१}{२}\text{प}\times\text{ग}^{२}\times\frac{\text{ग}}{२\times\text{परिमाण}}=१०^{-२७}\times(१०^{९})^{३}\times१०^{८}=$$

$१०^{८}$ अर्ग. $१०^{८}$ अर्ग म्हणजे जवळ जवळ १०वॅट ( वॅट=एक अम्पीयर तीव्रता असलेल्या विजेच्या चालक शक्तीच्या एका व्होल्टनें केलेलें काम ). पण यापैकीं फारच थोडा भाग किरणरूपानें जातो, व बाकीचा उष्णता म्हणून बाहेर पडतो. किरणरूपानें किती बाहेर पडतो हें 'लारमूरच्या सारणीनें काढतां येतें.

$$\frac{(\text{विद्युत्भार})^{२}}{\text{गति}}\times(\text{गतिवर्धन})^{२}=\frac{१०^{-४०}}{१०^{१०}}\times१०^{५२}=१००\text{अर्ग}$$

तेव्हां $१०^{८}$ अर्ग पैकीं फक्त $१०^{२}$ अर्गच कायते किरण रूपानें बाहेर पडतात, बाकीचे उष्णता म्हणून बाहेर येतात.

या शक्तीपैकीं उष्णतेपेक्षां किरण म्हणून किंवा किरणापेक्षां उष्णता म्हणून कशी व किती शक्ति बाहेर येईल हें विचार करण्यासारखें आहे. किरणविसर्जन शक्तीच जर जास्त पाहिजे असेल, तर विद्युत्कणाचा वेग, प्रकाशवेगाच्या निदान अगदीं जवळ जवळ पाहिजे व त्याचा गतिविरोध जागच्याजागीं झाला पाहिजे; विद्युत्कणाचा वेग प्रकाशवेगाच्या $\frac{१}{१०}$ असेल व त्याची गति त्याच्या व्यासाइतक्या अंतरांतच जर थांबविली गेली तर सरासरी शेंकडा १० शक्ति किरणविसर्जनरूपांत प्रकट होते; पण तो विद्युत्कण थांबविण्यास जवळ जवळ दोन ते तीन हजार किलोवॅट शक्ति लागेल. पण यापैकीं विद्युत्कण परमाणू परिमाणांतच थांबविणें जास्तींत जास्त शक्य आहे आणि एवढयाकरितां ५० वॅट् शक्ति लागते, पण यांत क्ष-किरणरूपांत फक्त एक दशलक्षांश हिस्साच मिळतो. पण जसजसी गति कमी होते, तसतसी जास्त जास्त शक्ति उष्णतारूपांत प्रकट होते. विद्युत्कणाची एकंदर शक्ति व किरणरूपांत प्रकट होणारी शक्ति यांचें प्रमाण त्याचें परिमाण व त्यास थांबविण्यास लागणाऱ्या वेळांत उजेड किती लांब जाईल तें अंतर, यांच्या प्रमाणावरोबर असतें.

**११ विद्युत्कण सिद्धान्त–वहन व किरणविक्षेपण:—** ( अ. ) वहनः—द्रव्यपरमाणूंच्या अंगीं हे जे विद्युद्गुणधर्म आहेत ते सर्व या विद्युत्कणांच्याचमुळें असावेत हें दाखविण्याचा प्रयत्न लारेंटझ व लारमूर या दोघांहि शास्त्रज्ञांनीं केला. त्यांची अशी कल्पना होती कीं विद्युत्प्रवाह ज्याला म्हणतात तो खराखरा प्रवाह नसून, ती फक्त या विद्युत्कणांची गति आहे. ते कदाचित् परमाणूंच्या बरोबर हिंडत असतील, आणि तसे ते विद्युद्विश्लेषणाचे वेळीं हिंडतातहि; किंवा विरलवायूमध्यें जसे असतात तसे ते मोकळेच फिरत असतील. किंवा घनपदार्थांत उष्णतावहनाचे वेळीं जी क्रिया होते त्याप्रमाणें कदाचित् हे विद्युत्कण एका परमाणूपासून दुसऱ्या परमाणूच्या स्वाधीन केले जात असतील.

विद्युद्वहनाच्या शक्य अशा तीन तऱ्हा आहेत ( १ ) पक्षी ज्याप्रमाणें दाणा चोंचींत धरून उचलून आपल्या घरांत नेऊन ठेवतो, त्याप्रमाणें विद्युत् एके ठिकाणाहून उचलून दुसरे ठिकाणीं नेऊन ठेवली जाणें ( २ ) विरल वायुद्रव्यांत ऋण ध्रुव किरणापासून, बंदुकींतील गोळी जशी निघते, त्या प्रमाणें किंवा (३) परमाणू स्वतः फार लांब न हालतां एके बाजूस विद्युत् घेण्याकरतां थोडे व दुसऱ्या बाजूस देण्याकरतां थोडे या तऱ्हेनें म्हणजे उदाहरणार्थ पुष्कळ माणसें ओळीनें उभीं करून हातोहात ज्याप्रमाणें कांहीं जिनसा एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं नेतात तसें. विद्युद्रोधक द्रव्यांतून विद्युद्वहन वळजवरीनें चाललेलें असतें, आणि धातूंतून तें सहज तऱ्हेनें चाललेलें असतें. जोंपर्यंत विद्युत्प्रवाह फार झाला नाहीं तोंपर्यंत तो धातूंतून घालविण्यास बाह्य शक्ति लागत नाहीं. जोंपर्यंत विद्युत्कणांची शक्ती उष्णतेवर अवलंबून असते, तोंपर्यंत धातूंत विद्युत्कण मोकळे असतात.

वायुरूप द्रव्यांत ऋण विद्युत्कण मोकळे झाले म्हणजे फारच जोरानें धावूं लागतात, पण धन विद्युत्कण किंवा वैद्युदणू यांचा वेग इतका नसतो.

द्रवरूप द्रव्यांत कोणत्याच तऱ्हेचे विद्युत्कण मोकळे सांपडत नाहींत. त्यांचा परमाणूंशीं लागलीच संयोग होतो, आणि नंतर ते वैद्युदणु या रूपानें असतात, पण त्यांचा वेग कमी असतो.

घनरूप द्रव्यांत, कांहींत ऋण तर कांहींत धन यांचा वेग जास्त असतो.

( ब ) किरणविक्षेपण—किरणविक्षेपणाची शक्ति परमाणूंत, वर, किंवा भोंवतीं ज्याप्रमाणें विद्युत्कण फिरत असतील, त्या पद्धतीवर अवलंबून आहे. निव्वळ द्रव्य (Matter) जर घेतलें तर त्याचा इथ्र (इथर)शीं संबंध येत नाहीं. त्याचा जर इथ्रशीं संबंध येतच असेल तर तो विद्युद्द्वारामुळेंच येतो. इथ्रमध्यें चलन उत्पन्न होत असेल, तर तें या विद्युद्गतिवर्धनामुळेंच. विच्छिन्नकिरणपटांतील निरनिराळ्या रेषा गतीच्या निरनिराळ्या कंपनसंख्येवर(Frequency)अवलंबून आहेत. पण हेंच जर किरणविक्षेपणाचें कारण असेल, तर त्यावर लोहचुंबकाचा परिणाम झाला पाहिजे; कारण फिरता विद्युद्द्वार म्हणजे वर्तुलगति-विद्युत्प्रवाहच होय. विद्युत्कण वाटेल त्या दिशेंत हिंडत असतांना जर त्याच्याभोंवतीं वाढत्या

शक्तीचें लोहचुंबकीय क्षेत्र उत्पन्न केलें, तर कांहींची गति वाढेल तर कांहींची कमी होईल व ही क्रिया तें क्षेत्र नाहींसें होईपर्यंत चालेल. ह्यावरून असें दिसतें कीं किरणविक्षेपक पदार्थ जर लोहचुंबकीय क्षेत्रांत ठेवला, व त्याच्या विच्छिन्न किरणपटांतील रेषांचें जर निरीक्षण करूं गेलें तर त्यांतील कांहीं रुंद दिसतील तर कांहींनीं जागा बदलल्यासारखी दिसेल तर कांहींमध्यें दुसरा कांहीं फरक झाल्यासारखें दिसेल. अशा तऱ्हेच्या प्रकाराची 'लारमूर' नें कल्पना केली होती, पण त्याला प्रयोगानें तें सिद्ध करतां आलें नाहीं. त्याच्या पाठीमागून १८९७ सालांत झीमननें एक चांगलें अपभवनजाल ( Diffraction grating ) व लोहचुंबक घेऊन, या रेषा रुंद होतात हें मोठ्या कुशलतेनें अवलोकन केलें. अशा तऱ्हेनें सहज सुरवात झाल्यावर या विषयाला बरेंच महत्त्व आलें, आणि मग निरनिराळ्या पदार्थांतून निघणाऱ्या किरणांच्या विच्छिन्नपटांत असणाऱ्या प्रत्येक रेषेंत लोहचुंबकामुळें काय फरक होतो याचें निरीक्षण करण्यांत आलें. लोहचुंबकामुळें कांहीं रेषा दुप्पट तर कांहीं चौपट, सहापट अशा झाल्या, यावरून हा जो लोहचुंबकाचा परिणाम आहे तो अर्थातच लहानसहान नसून अतिशय तीव्र आहे पण तो पहाण्याला सामुग्रीहि अत्युत्तम लागते. आणि किरणविक्षेपण जर विद्युत्कणांच्याचमुळें असेल तर त्यांच्या गतीला विरोध करणारा द्रव्यपिंड त्याबरोबर फारच थोडा असला पाहिजे हें उघड आहे; एवढेंच नव्हे तर विच्छिन्न किरणपटांतील रेषांच्या अनुमानावरून निरनिराळ्या विद्युत्कणांबरोबर प्रत्यक्ष द्रव्यभाग किती आहे, हेंहि काढतां येतें, किंवा दुसऱ्या तऱ्हेनें सांगावयाचें म्हणजे किरणविक्षेपणोपयोगी असा विद्युद्रासायनिक सममूल्य किती आहे हें काढतां येतें. प्रो. झीमननें सिंधू (सोडियम)च्या रेषांत होणाऱ्या फरकावरून विद्युत्सममूल्याची किंमत $१०^{७}$(सें. ग्रॅ. प) इतकी आहे हें काढलें आणि हीच किंमत बरोबर विद्युद्भार व पिंड यांच्या प्रमाणाची आहे; आणि अलीकडील कांहीं प्रयोगांनीं हें कायम केलें आहे. ऋणध्रुव किरणांत जे कांहीं कण पडत असतात, त्यांचें आंदोलन किरणविक्षेपाच्या उगमस्थानांत होतें; आणि ऋणध्रुव किरण जर फिरत्या विद्युत्कणांचे झालेले असले, तर किरणविक्षेपण या फिरत्या विद्युत्कणांमुळेंच होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. झीमनचा प्रयोग जर जास्त बारकाईनें करूं गेलें तर झीमन, लारेन्झ, फिटझीरल्ड व लारमूर वगैरेंनीं किरणविक्षेपणाचें कारक विद्युत्कणच आहेत हें जें सांगितलें तें जरी अद्याप पूर्ण सिद्ध झालें नसलें तरी पुष्कळसें समाधानकारक रीतीनें सिद्ध होतें.

लारेन्झच्या सिद्धांताच्या अनुरोधानें झीमननें केलेल्या शोधानें परमाणूंचे गुणधर्म दाखविण्याच्या बाबतींत व किरणविक्षेपणाच्या पद्धतीवर उजेड पाडण्याकरितां विच्छिन्नकिरण वर्गीकरण पद्धतीला दुप्पट जोर आल्यासारखें झालें आहे; आणि त्या योगानें ग्रह आणि उपग्रह या ऐवजीं परमाणू व विद्युत्कण असलेलें हें एक निराळेंच भौतिक ज्योतिष उत्पन्न झालें.

१२ शीघ्रगतीच्या योगें जडत्वाची वाढः—जडत्व हें नेहमीं ठराविक असून, याचा व गतीचा कांहीं संबंध नाहीं असेंच नेहमीं समजलें जातें. ज्या वेळीं एखादा पिंड शीघ्रवेगानें फिरत असतो, त्या वेळीं जाणाऱ्या शक्तिरेषा त्याच्या पृष्ठभागावर ज्या तऱ्हेनें वांटल्या गेलेल्या असतात, ती पद्धति जर बदलली, तर मग मात्र त्या रेषांच्या लंबपार्श्वगतीनें जडत्वांत फरक पडूं शकतो, आणि म्हणूनच विद्युज्जडत्व वेगावर अवलंबून असण्याचा संभव आहे. ही गोष्ट यंत्रशास्त्रांत अद्यापपर्यंत माहित नव्हती. ज्या वेळीं एखादा विद्युद्भार फिरूं लागतो, त्या वेळीं तो आपल्या भोंवतीं वर्तुलाकार लोहचुंबकीय रेषा उत्पन्न करतो, आणि या रेषाहि त्या पिंडाच्याच वेगानें फिरत असल्यामुळें त्यांच्यापासून आणखी स्थिरविद्युद्रेषा निघतात. ह्या ज्या दुसऱ्या प्रतीच्या रेषा निघतात त्यांचा परिणाम साध्या वेगाच्याच वेळीं काय, पण अतिशय मोठ्या वेगाचे वेळींसुद्धां फारसा दिसत नाहीं, पण हा वेग जसजसा प्रकाशी वेगाच्या जवळजवळ बरोबरीला येऊं शकतो, त्या वेळीं मात्र त्याचा परिणाम होतो. प्रकाशी वेगाइतका वेग झाल्यावर जडत्व अगदीं अंतिम सीमेला जातें; पण हें होण्यास मात्र तो विद्युद्भार अगदीं बारीक बिंदूएवढा असायला पाहिजे. आतांपर्यंत प्रकाशाचा वेग असलेलें असें कांहींच अस्तित्वांत नव्हतें आणि म्हणून हा जडत्ववर्धनाचा प्रश्न कमी महत्त्वाचा होता. ऋणध्रुवापासून निघणाऱ्या कणांचा वेग दर सेकंदास २०००० मैल आहे, आणि त्यांच्या बाबतींत शेंकडा एकनें वाढतो. पण यापेक्षांहि कांहीं ठिकाणीं आतां तसा जास्त वेग दिसून येतो, तो म्हणजे विद्युत्किरणविसर्जक ( Radioactive ) पदार्थांकडून फेंकल्या गेलेल्या विद्युत्कणांचा किंवा परमाणूंचा होय. तेव्हां अशा तऱ्हेच्या या किरणांचें जडत्व काय असलें पाहिजे, हीहि एक महत्त्वाची गोष्ट होऊं लागली आहे.

१३ जडत्वाच्या विद्युत् सिद्धांताचें समर्थनः—ज्या कणावरून या जडतेचें मोजमाप होणार तो कणच मूळांत केवळ विद्युन्मय असून, त्यांत मध्यबिंदूला सुद्धां दुसरें द्रव्य नाहीं, या गोष्टीचें तरी अगोदर कशानें समर्थन करणार? ही गोष्ट सिद्ध झाल्याशिवाय जडत्व किंवा जडत्ववर्धन हें विद्युन्मूलक आहे हें कसें सिद्ध होईल? वरील गोष्ट सिद्ध करण्याकरितां थॉमसननें किरणविक्षेपणाचें उष्णता-उत्पादनाशीं काय प्रमाण आहे याचा विचार केला, कारण किरणविक्षेपण जें होतें तें त्या कणांतील विद्युद्भागामुळें होतें व उष्णता इतर द्रव्यामुळें उत्पन्न होते हें वर सिद्ध झालेंच आहे; तरी पण या प्रयोगामुळें वरील गोष्ट कायमची सिद्ध झाली नाहीं. यानंतर कॉफमननें दुसऱ्या एका रीतीचा अवलंब केला. त्यानें एकाच प्रकारचे किरण विद्युत् व विद्युत् चुंबकीय शक्तीच्या

क्षेत्रांत एका वेळीं घालून व त्या शक्तिरेषांहि एकाच दिशेनें सोडून प्रत्येक शक्तीनें त्या रेषा कशा वळतात हें काढलें. व या प्रयोगावरून त्यानें असें काढलें कीं, या किरणांचा वेग प्रकाशवेगाच्या जवळ आला म्हणजे विद्युद्भार रासायनिक सममूल्याची किंमत जडत्वाच्या विद्युत्सिद्धांताच्या योगानें जितकी वाढावयास पाहिजे तितकीच वाढे, आणि हा सिद्धांत सर्व जडत्ववर्धन विद्युत् मुळेंच आहे दुसऱ्या कशाहिमुळें नाहीं असें सांगतो; व वरील कॉफमनच्या प्रयोगामुळें, ज्या वेळीं त्या कणाचा वेग प्रकाशाच्या वेगाइतका होतो, त्यावेळीं विद्युत् शिवाय दुसऱ्या तऱ्हेच्या कोणत्याहि द्रव्यामुळें होणाऱ्या जडत्वाला जागाच उरत नाहीं.

कॉफमननें मोजलेला विद्युत्कणाचा जास्तींत जास्त वेग २.३६, २.४८, २.५९, २.७२, २.८५ $\times$१०$^{१०}$ सेंटिमीटर इतका व प्रकाशाचा वेग ३.०$\times$१०$^{१०}$ सेंटिमीटर इतका आहे. तेव्हां या दोन्ही प्रमाणें प्रकाशाच्या एकास विद्युत्कणाचा.७८७, .८१७,.८६३;.९०७,.९५ या प्रमाणांवरून शून्य गति असल्या वेळेपेक्षां प्रकाशाची गति असल्या वेळीं मूळ पिंड किती वाढल्यासारखा दिसतो याचें प्रमाण अनुक्रमें १.५, १.६६, २.०, २.४२, ३.१, आणि प्रत्यक्ष पाहिलेला— १.६५, १.८३, २.०४, २.४३, ३.०४ इतका आहे. यावरून प्रयोग आणि सिद्धांत हीं किती जवळ जवळ जमतात हें दिसतें.

अशा तऱ्हेनें सिद्धांतीय व प्रयोगाचीं उत्तरें अगदीं जमलीं. विद्युत्कणांचें जडत्व विद्युद्भारामुळेंच आहे या सिद्धांताबद्दल जरी तो काल्पनिक असला तरी, शंका घेण्यास जागाच रहात नाहीं. आणि यापुढें जर विद्युत्कणाला द्रव्यमध्य आहे व तो सर्व विद्युन्मय नाहीं असें कोणी म्हणूं लागला, तर तें सिद्ध करण्याची जबाबदारी त्याच्याच शिरावर राहील, आजपर्यंतच्या प्रयोगावरून तरी वरील गोष्ट सिद्ध झाली आहे. पण परमाणूच्या बद्दलचा मात्र प्रश्न रहातो, परमाणु सर्वस्वी या विद्युत्कणांचाच झाला आहे हें मात्र खात्रीनें आज सांगतां येत नाहीं.

१४—द्रव्यासंबंधीं विद्युत् दृष्टिः—आतांपर्यंत सांगितलेल्या निरनिराळ्या प्रयोगांचें एवढें सार निघतें कीं हे जे महत्त्वाचे गणले जाणारे चपल कण आहेत ते, केवळ विद्युद्भार असून त्यांचा मध्यसुद्धां द्रव्याचा किंवा दुसऱ्या एखाद्या अविद्युत् पदार्थाचा नाहीं. यावरून ऋणविद्युत्, लहान लहान, निरनिराळ्या, अभेद्य व द्रव्यापासून निराळ्या अशा भागांत राहूं शकतें हें महत्त्वाचें अनुमान काढतां येतें; आणि यावरून विद्युत्प्रवाह, लोहचुंबक, व तेजोत्पादनासारखीं मूळ दृश्यें यांचा अर्थ आपणाला कळूं लागतो; पण रासायनिक क्रिया, किरणविसर्जनाचें सविस्तर स्पष्टीकरण, विद्युद्वहनासंबंधीं निरनिराळ्या पदार्थांत दिसून येणारे फरक व त्याचप्रमाणें लोहचुंबकीय द्रव्यासंबंधीं दिसून येणारे फरक याचा अर्थ पूर्णपणें समजण्यास द्रव्य हें काय आहे हेंहि समजलें पाहिजे. विद्युत्कणाचे अंगीं जरी विद्युज्जडत्व आहे हें सिद्ध झालें असलें तरी परमाणूसंबंधीं तें अद्याप सिद्ध झालें नाहीं. याशिवाय आतांपर्यंत फक्त ऋण विद्युत्कणच पहाण्यांत आहे; धनविद्युत्कण अद्याप पहाण्यांत सुद्धां आला नाहीं. यावरून द्रव्यपरमाणूशिवाय त्याला निराळें अस्तित्वच नसेल किंवा द्रव्यपरमाणूच स्वतः धनविद्युत्चा गोळा असेल. कसेंहि असलें, तरी अनुमानापलीकडे तें काय आहे याचा मात्र अद्याप नक्की शोध लागला नाहीं. लारमूरच्या मतें धनविद्युत्कण हा ऋणविद्युत्कणाचें आरशांत दिसणारें प्रतिबिंब आहे व प्रयोगाची घटना याच दृष्टीनें करावी. कांहीं झालें तरी हे धनविद्युत्कण काय आहेत हा पदार्थविज्ञानशास्त्रांतील आतां पहिला प्रश्न आहे व त्याचा निकाल झाल्याशिवाय परमाणू म्हणजे काय हें समजणार नाहीं. तथापि हें काय असावें याविषयीं खालीं दिलेल्या कांहीं कल्पना अस्तित्वांत आहेतः—

(१) सर्वसाधारण द्रव्याचाच परमाणूचा मध्यभाग झाला असावा, फरक एवढाच कीं हे जे विद्युत्कण (अर्थातच ऋणविद्युत्कण) त्या भोंवतीं असतात त्यांचा विद्युद्भार शून्यवत करण्याकरितां त्याच्यांत कांहीं धनविद्युद्भार असला पाहिजे.

(२) परमाणूंचा पिंड धन व ऋण विद्युत्कणांचा झाला असावा. योग्यशा बंधनांनीं ते एकमेकांत गुंतले जाऊन त्यांची कांहींतरी स्थिर आंतररचना असावी.

(३) परमाणूचा मध्य धनविद्युत्च्या एकाच अभेद्य गोलकाचा असावा, त्याचा आकार बहुतकरून गोल असावा, आणि त्याच्यांत विद्युद्भाराला पुरेसे असे अर्थातच धनविद्युत्कण पेरलेले असावे. हे चक्रगतीनें मध्यबिंदूंभोंवतीं फिरत असले पाहिजेत.

(४) धन व ऋण विद्युत् एकमेकांना अगदीं घट्ट बांधून टाकून परमाणू बनवलेला असावा. त्यांना दूर (एकमेकांपासून निराळें) करण्याकरितां कसलीहि शक्ति लाविली तरी ते दूर होत नसले पाहिजेत; व सबंध एकच पिंड आहे अशाच तऱ्हेनें रहात असावे.

(५) परमाणू हा तीव्रतेनें एकजीव केलेला धनविद्युद्रूपी सूर्य मध्यभागीं असून त्याभोंवतीं त्याच्या कक्षेंत आकर्षणशक्तीच्या पल्लयांत बरेचसे ऋण विद्युत्कण फिरत असले पाहिजेत.

यांपैकीं तिसऱ्या कल्पनेशिवाय बाकी सर्व अनिश्चित आहेत. तिसऱ्या कल्पनेंतसुद्धां बरीचशी अंधुकता आहे, व जोंपर्यंत धनविद्युत् म्हणजे काय हें आपणाला पूर्णपणें समजलें नाहीं तोंपर्यंत ती रहाणारच, पण त्याशिवाय बाकीच्या बऱ्याच निश्चित गोष्टी त्यांत दिसतात. त्या कल्पनेची कांहींहि किंमत असली तरी, आतांपर्यंत तिच्याच अनुरोधानें पुष्कळसें काम झालें आहे, आणि अद्यापपर्यंत जरी ती पूर्णत्वास आली नसली, तरी तिच्या स्वाभाविक किंमतीमुळेंच तिच्याकडे

विशेष लक्ष्य देणें जरूर आहे. तिचा काल्पनिकपणा जर कमी झाला असता तर तिची पूर्ण माहिती या ठिकाणीं देणें जरूर होतें; पण एका विद्वान् शास्त्रकोविदानें नुकत्याच एका लेखानें या सिद्धांतांत अनिश्चिततेची बरीच भर टाकली; आणि आतां नाइलाज म्हणून ती कल्पना या स्थितींतच सध्या सोडून देणें भाग आहे. तरीपण विद्युत्कणांच्या रचनेचा प्रश्न सोडून दिला तरी, द्रव्य विद्युन्मय आहे, या दृष्टीनें कांहीं गुणधर्मांचें स्पष्टीकरण करतां येण्याजोगें आहे.

संसक्तिस्वरूप ( Nature of Cohesion )—नं. ३ च्या कल्पनेवरून विद्युत्कण कोणत्यातरी नियमित आकारांत जुळलेले असतात याची कल्पना येईल, त्यांचे कोणकोणते आकार होतात हें स्फटिकशाखेच्या अभ्यासावरून समजेल.

रासायनिक आकर्षणः—वास्तविक रासायनिक आकर्षण हें दोन परमाणूंत असतें. या परमाणूंत कोणत्यातरी जातीचा एक किंवा एकापेक्षां अधिक असे अनियमित विद्युत्कण असतात. एखाद्या परमाणूंत ऋण विद्युत्कण जास्त आहेत व दुसऱ्यांत धन विद्युत्कण जास्त आहेत असे दोन परमाणू जवळ आले तर त्यांचा कमीजास्तपणा भरून निघून एक तटस्थ ( Neutral ) अणु तयार होतो. पण हा जो जोड बसतो, तो मात्र कायमचा नसतो; कारण ज्या ठिकाणीं हा जोड बसतो त्याच ठिकाणीं तो तुटतो; फक्त सेंद्रिय रसायनशास्त्रांत रसायनें वाटेल तशीं निरनिराळ्या तऱ्हेनें पृथक् करण्याच्या पद्धती प्रचलित आहेत. घर्षणाच्या योगानें या अणूंचा विद्युत्संभार कमी किंवा जास्त होतो. ज्यांचें वजन अतिशय आहे अशा तऱ्हेचे स्थूल परमाणू आपोआपच अस्थिर होतात; व अशा तऱ्हेनें अस्थिर झाले म्हणजे पुन्हा स्थिर होण्याकरितां ते आपल्या आंतररचनेंत फरक करतात. हा फरक करीत असतांना जरुर पडेल तसे विद्युत्कण ते बाहेर फेंकून देतात. आणि त्यामुळेंच किरणविसर्जना(Radio-activity) चा देखावा दृश्य होतो.

अणु-शक्ति ( molecular force )—रासायनिक संसक्तीशिवाय अणू संसक्तीचाहि कांहीं भाग आहे. त्या अणूसंसक्तीचा जोर ज्या परमाणूवर विद्युद्भार किंवा वैद्युदणुसंभार नाहीं अशावरच चालतो, विद्युत्कण सुव्यवस्थित तऱ्हेनें बसत असतांना परमाणूवर खांचा किंवा टोंकें तयार होतात, अशा तऱ्हेच्या एकमेकांत बसण्यासारख्या दोन खांचा व टोंकें आलीं तर ते दोन परमाणू जोडले जातात, अर्थातच अशा तऱ्हेचा जोड टिकाऊ असत नाहीं, व साधारण अंतरावर हा आकर्षणाचा जोर कांहींच नसतो. पण ते परमाणू जसजसे जवळ येतात तसतसा हा अधिक वाढतो, व ही क्रिया विद्युच्छक्तीनेंच होत असावी असें वाटतें. पण अशा तऱ्हेची संसक्ति रासायनिक दृष्टीनें जे अणू संवृत्त आहेत त्यांच्यामध्येंच असते, व ती अण्वंतरांत आलेल्या जोडविद्युत्कणांच्या एकमेकांवरील क्रियेप्रतिक्रियेमुळेंच असते किंवा हें कार्य अवशिष्ट स्नेहाकर्षणामुळें होतें असेंहि म्हणतां येईल. जर दोन अणू अण्वन्तराच्या बाहेर असतील, व त्यांचे समोरासमोरचे भाग जर विरुद्ध विद्युद्भारानें भारित केले, तर क्षणांत रासायनिक आकर्षणासारख्याच आकर्षणानें संसक्ति शक्ति वाढली जाईल. आणि अण्वन्तरापेक्षांहि जास्त अंतरावर या संसक्तिशक्तीचा परिणाम दिसूं लागेल. परमाणूंच्या ध्रुवीभवनानें साधारण अणुशक्तीचें औपक्रमिक पण खऱ्या खऱ्या अशा रासायनिक स्नेहाकर्षणांत रूपांतर होतें. दोन्ही तऱ्हेच्या या शक्तींचें वरील नंबर ३ च्या कल्पनेनें विद्युत्च्याच आधारावर स्पष्टीकरण करतां येतें.

१५ परमाणूच्या रचनेसंबंधीं आणखी कांहीं विचारः—नं. ३ च्या कल्पनेवर असा एक आक्षेप घेतां येण्याजोगा आहे कीं त्याच्या भागांत अन्योन्य प्रतिकार असून सुद्धां धनविद्युत्पिंड एके ठिकाणीं कसा राहूं शकतो. हा आक्षेप धनविद्युत्संबंधींच नव्हे तर ऋणविद्युत्संबंधीं सुद्धां असूं शकतो. या आक्षेपांत कांहीं अर्थ आहे असें म्हणावयाचें असेल तर विद्युत्कणांना आणखी कांहीं भाग आहेत असें म्हणावयास पाहिजे. आपणाला आतांपर्यंत एवढेंच माहित आहे कीं निरनिराळे विद्युत्कण एकमेकांचा प्रतिकार करतात, व ते धनविद्युद्भारानें आकर्षिले जातात, पण एकाच विद्युत्कणाचे विभाग एकमेकांना दूर लोटतात हें मात्र आपणाला माहीत नाहीं. वित्युकणाची कार्यशक्ति दाखविणाऱ्या रेषा सर्वस्वी बाहेरच असावयास पाहिजेत, त्यांनीं आंत असण्याची जरूर नाहीं, आणि सर्व विद्युत्कार्यांकरितां विद्युत्कण हा अविभक्त एक असणें बरें.

दुसरेंहि एक असें मत आहे कीं आपण ज्याला परमाणू म्हणतों तो फक्त धन विद्युत्चाच नसून धन व ऋण विद्युत्चें कधींच निराळें न होणारें पूर्ण मिश्रण होय, आणि ते बाह्य सर्व पदार्थांशीं कोणत्याहि तऱ्हेनें एकएकटे वागत नसून दोन्हींच्या मिश्रणाच्या गुणधर्मांप्रमाणें वागतात. उदाहरणार्थ पाणी प्राण व उज्ज या दोन वायूंचें झालेलें आहे पण पाणी हें नंतर बाह्य शक्तीशीं प्राण किंवा उज्ज असें निराळ्या शक्तींत वागत नसून पाणी याच रूपानें वागतें. तद्वतच वरील परमाणु पिंडाचें आहे. आतां पुढें या पाण्यांत जसे प्राणाचे प्रमाणाबाहेर अधिक परिमाणू घालतां येतील, तद्वतच कांहीं जास्ती विद्युत्कण या परमाणुपिंडाभोंवतीं फिरत असतात. अशा स्थितींत परमाणू एकत्रित बद्ध करून धरण्यासाठीं शक्ति-रेषा आंतील बाजूनें जातात व बाह्य बाजूनें जात नाहींत व त्यामुळें जवळील दुसऱ्या एखाद्या परमाणूवर त्याचा परिणाम होत नाहीं. अशा स्थितींत परमाणु मध्याला उत्तम रचना केलेल्या दंडाकचीच उपमा लागूं पडेल, ह्याला भाररहित होण्याला त्याचप्रमाणें प्रत्यक्ष विश्लेषणाशिवाय त्याचें पृथक्करण होण्याला त्याला बावच

रहात नाहीं. प्रत्यक्ष विश्लेषणाच्या योगानें मात्र किरणविसर्जन दृष्टोत्पत्तीस येतें.

१६. किरण विसर्जन—कोणत्याहि पदार्थांच्या परमाणूभोंवतीं विद्युत्कण आहेत आणि ते त्याच्या कक्षेंत परिभ्रमण करीत आहेत, असेंच असेल तर असा प्रश्न निघतो कीं ते सतत किरणविक्षेपण करीत आहेत काय, कारण फिरते विद्युद्धार एक प्रकारचे विसर्जक आहेत, आणि कमी अधिक प्रमाणांत ते किरणविसर्जनहि करतात, आणि त्यायोगानें त्यांची गतिशक्ति नाहींशी होते, व असा तऱ्हेनें शेवटीं एक शांत तरी होतात किंवा निराळ्या स्वरूपांत त्यांचा बदल होतो. वरील तऱ्हेनें ज्यांची क्रिया होते असे कांहीं पदार्थ आधुनिक शोधकांस सांपडले आहेत, व विसर्जन होतें एवढेंच नव्हे, तर तें विसर्जनहि पुष्कळ प्रकारचें आहे.

१ ला प्रकार—रॉंटजेन किरणाप्रमाणेंच लहरी स्वरूपांत यांना 'ग' किरण म्हणतात.

२ रा प्रकारः—ऋणध्रुवकिरणांप्रमाणेंच किरण, यांत प्रत्यक्ष विद्युत्कणच असतात यांना 'ब' किरण म्हणतात.

३ रा प्रकारः—यांत विद्युद्धारसहित वैद्युदणु परमाणू किंवा अर्ध परमाणू जे जवळ जवळ सौर ( हेलियम ) वायूच्या स्वरूपांत असतात असे दूर फेंकले जातात. यांना 'अ' किरण म्हणतात.

४ था प्रकारः—इतक्या सर्व विसर्जनानंतर विद्युद्धाररहित अवशिष्ट भागाचे तुकड्यांपासून गंधस्वरूपांत बाहेर पडतो.

ज्यांच्या परमाणूंचें वजन अतिशय असतें अशा पदार्थांपासून वरील तऱ्हेचें विसर्जन होतें. याचें कारण ज्यापासून रांटजेन किरण निघतात असे अतिशय वेगवान अंतःक्षोभ होत.

आघातामुळें होणारें किरणविसर्जन मान्य करावें लागेल, पण ज्या अर्थी विद्युत्कण कक्षाभ्रमण करतात त्या अर्थी ज्या पदार्थांच्या परमाणूंचें वजन थोडें आहे अशा पदार्थांच्या कडून तरी विक्षेपण कां होऊं नये. याचें उत्तर असें देतां येईल कीं या पदार्थांत विसर्जक निरनिराळे झालेले नसतात, आणि पृष्ठभागावरील विसर्जन आंतल्या बाजूस जे पडदे असतात त्यांच्या योगानें होत असतें आणि हे विसर्जक संख्येनेंहि फार असतात व एकापेक्षां अधिक विसर्जक असले म्हणजे त्यांच्या व्यक्तिशः विसर्जनानें अन्योन्यविसर्जनाचा नाश होतो, आणि त्यामुळें बाह्य परिणाम कांहींच दिसूं शकत नाहीं.

खरें पाहूं गेलें तर उष्णतामान कमी असतांना सर्वच पदार्थांतून किरणविसर्जन होत असतें; आणि शक्ति-क्षय होत नसेल तर त्याचें कारण आयात आणि निर्यात किंवा ग्रहण आणि विसर्जन सारखें असतें हें होय विसर्जन थांबतें हें नव्हे. आणि अशा तऱ्हेनें विसर्जन किती होतें हें पाहणें असेल तर, ज्याचें विसर्जन मोजावयाचें असेल तो पदार्थ शून्यांश उष्णतेच्या जागेंत ठेविला पाहिजे; कारण त्या ठिकाणीं त्याला कोणत्याहि तऱ्हेची शक्ति ग्रहण करतां येणार नाहीं, जें काय होईल तें सर्व विसर्जनच होईल.

अंतःशक्ति खर्च पडून जर किरण-विसर्जन चालू असेल तर परमाणू स्थिर नसून क्षणिक व अस्थिर होऊं लागतील; व तसेंच त्यांच्यांत अंतःस्फोटहि होणें साहजिक होईल; आणि सर्वच परमाणू, या दृष्टीनें सारख्या तऱ्हेनें वागावयास पाहिजेत. किरण-विसर्जन हा विषय अतिशयच मोठा असल्यानें त्याचें विस्तृत विवेचन करण्याचा येथें विचार नाहीं.

ज्याच्या योगानें विद्युत् उत्पन्न होऊन छायाचित्र काढण्याकरितां तयार केलेल्या कांचेवर परिणाम होतात असेंहि कांहीं पदार्थांचें किरण-विसर्जन होतें. पुष्कळ पदार्थ विद्युत्कणासारखे किंवा वैद्युदणूसारखे कण फेकीत असतात. हे प्रक्षेपितकण ज्यावेळीं फोटोग्राफप्लेटवर आपटतात त्यावेळीं ते त्यांच्या आघाताच्या योगानें विद्युल्लहरी उत्पन्न करतात, आणि त्यायोगानें त्या कांचेच्या तुकड्यावर लावलेल्या राजतक्षारावर परिणाम होतो. हा गुण ज्याचे परमाणू वजनदार आहेत अशा वरुण ( युरेनियम ) रद ( रेडियम, ) वगैरे धातूंनाच लागू नसून सर्व पदार्थांना लागू आहे. फरक इतकाच कीं या पदार्थांत ( म्हणजे ज्यांचे वजनदार परमाणू आहेत ) तो विशेषेंकरून दिसून येतो.

तीव्र किरणविसर्जनशक्ति असलेल्या रद ( रेडियम ), पोल (पोलो नियम) वगैरे सारख्या पदार्थांतून जे 'अ' किरण निघतात त्या 'अ' किरणांचा जशदगंधकिदाशीं ( Zinc Sulphide ) आघात होऊन प्रकाशित किरण निघूं लागतात व हे किरण थोडे मोठे केले तर दिसूं लागतात. किंवा या क्षारस्फटिकावर त्यांची क्रिया होऊनहि त्यांच्यांतून किरण निघूं लागतात. ( क्रूक्सचा शोध ).

कांहीं कांहीं बदल होतात ते किरणरूपानें होत नाहींत आणि त्यामुळें परमाणूंचें वजन बदलत नाहीं, पण जेव्हां जेव्हां 'अ' किरणविक्षेपण होतें तेव्हां तेव्हां सौर ( हेलियम ) वायूच्या परमाणूच्या वजनाच्या प्रमाणांत याचें वजन कमी झालें पाहिजे. रांटजेन किरणाच्या बरोबर नेहमीं विद्युत्कण असतात. हीं सर्व निस्रुत द्रव्यें वायुरूपांत किंवा त्यासारखीं असतात, आणि बाकीचीं घन–निक्षेप ( Solid deposit ) स्वरूपांत असतात. हीं निस्रुत द्रव्यें त्यावरच सांचून रहातात व हीं ज्या पदार्थावर सांचलेलीं आहेत त्याची किरणविसर्जन क्रिया पूर्वीपेक्षांहि अधिक चालते. कारण हीं निस्रुत द्रव्यें मूळद्रव्यापेक्षां तीव्र क्रियाकारक असतात. रेडियमवरील निस्रुतद्रव्य शून्यांशाच्या खालीं १५०°श अंशाचे वेळीं द्रवरूपांत येतें.

'अ' किरण ज्यावेळीं लोहचुंबकीय क्षेत्रांत घालावे त्यावेळीं ते आपल्या मार्गांतून थोडेसे वक्र होतात, व यावरून त्यांच्यावरील विद्युद्धार धन आहे हें दिसतें. रूदरफोर्ड व बेक्केरल या दोन्हीहि शास्त्रज्ञांचीं अशींच मतें होतीं, पण नुकतीच सादी नांवाच्या शास्त्रज्ञानें हा धन विद्युद्धार मूलचा नसून हवेच्या वैद्युदणवीभवनानें मध्यंतरीं आला असावा अशी शंका काढली.

कारण निर्वातस्थान जर चांगल्या तऱ्हेनें उत्पन्न केलें तर मग किरणांच्या अंगीं वक्रता येत नाहीं; आणि यावरून मूळारंभीं त्यांच्या अंगीं कसल्याच तऱ्हेचा विद्युद्भार नसावा हें त्यानें दाखविलें, व हे दोन तऱ्हेचे प्रयोग करून सिद्ध केले. त्याचप्रमाणें रेडियम धातूची किरणविसर्जकता कोणत्याहि उष्णतामानाच्या वेळीं सारखी असते हेंहि त्यानें दाखविलें.

१७. रेडियम धातूच्या योगानें दिसणारा विच्छिन्न किरणपटः—रेडियम धातूचा विच्छिन्नकिरणपट याचे दोन अर्थ होऊं शकतील (१) ज्या उजेडांत रेडियम जळत आहे त्या उजेडाचा विच्छिन्नकिरणपट (२) किंवा रेडियमपासून निघणाऱ्या प्रकाशाचा विच्छिन्न-किरणपट. दुसऱ्या तऱ्हेचा विच्छिन्न किरणपट जर पाहिला तर तो नत्र ( नायट्रोजन ) या वायूचा असावा असें दिसतें. यावरून रेडियम हवेंत ठेवला असतां नत्रला बरेच धक्के बसतात असें दिसतें. रेडियमचा जो स्वयंप्रकाश आहे, तो त्याचा दुसऱ्या वस्तूवर होणाऱ्या परिणामामुळें होय. साधी कांच जर रेडियम किरणावर धरली तर काळी होते.

विद्युद्दर्शकाच्या सहाय्यानें रद ( रेडियम ) धातूचा पत्ता लावणें ही फारच सूक्ष्म भेदग्राही पद्धत आहे. तिच्यांत रेडियमच्या किरण-विसर्जन क्रियेची वाजवीपेक्षां जास्त जी वैद्युदण्वीभवनाची शक्ति आहे तिचा उपयोग होतो. प्रत्येक 'अ' किरणकणाची गति थांवण्याच्या पूर्वी तो हजारों वैद्युदणू उत्पन्न करतो. योग्य सूक्ष्म ग्राहकतेचा विद्युद्धारित विद्युद्दर्शक त्याच्या विद्युन्नाशाच्या योगानें वैद्युदण्वीवन किती झालें हें दाखवतो, आणि त्यावरून 'अ' किरणकण किती आहेत हेंहि दाखवितो. पण एक मिलिग्रॅम रेडियममधून अशा तऱ्हेचे कोट्यवधी कण दर सेकंदाला निघत असतात.

१८. विद्युद्विषयक उपपत्तिः—डब्ल्यू. वीन, नांवाच्या शास्त्रज्ञानें किरणांतून ही शक्ति निघूं लागते हें पाहिलें व 'अ' व 'ब' किरण परमाणूंच्या निरनिराळ्या भेदक शक्तीचा फायदा घेऊन एक प्रकारच्या किरणांना जाऊं देतात व दुसऱ्यांना अडकवून धरतात, व अशा तऱ्हेनें विद्युदुत्पन्न होते हें दाखविण्याचें नवीन यंत्रसाधन स्ट्रटनें तयार केलें. त्यानें एक लहान कांचेची नळी घेतली, व तिची बाहेरची बाजू विद्युत्प्रवाही केली, व त्याला सुवर्णपत्रें (वर्खे) लावून ठेविलीं, नंतर या नळींत रेडियम क्षार घालून ठेविला; आणि नंतर तिचा विद्युत्प्रवाही पदार्थांपासून संबंध तोडून, तिच्या भोंवतीं निर्वात प्रदेश तयार केला. रेडियमपासून धन व ऋण कण सारख्याच प्रमाणांत निघतात; पण ऋण कण लहान आणि जास्त भेदक असल्यामुळें लवकर निघून जातात, आणि धन तसेच वाढत जातात त्यामुळें सुवर्णपर्णांवर विद्युद्धार जमा होत जातो. यावरून किरण-विसर्जनानें विद्युदुत्पादन होतें हें सिद्ध होतें. विद्युद्धारित विद्युद्दर्शक रेडियमच्या अभावीं सुद्धां विद्युत् हळू हळू गमावीत असतो असें नेहमीं दिसून येतें. हा विद्युन्नाश वातावरणाच्या वैद्युदण्वीभवनानें होतो. हें अण्वीभवन कांहीं अंशीं बाहेरून येणाऱ्या किरणविक्षेपणानें होतें व कांहीं अंशीं ज्या धातूच्या पत्र्याच्या पत्र्या विद्युद्दर्शकांत वसविलेल्या असतात, त्या धातूच्या किरण-विसर्जनानें होतें. यावरून साधारण पदार्थांत सुद्धां किरण-विसर्जन होत असतें हें सिद्ध होतें.

ज्याअर्थी सर्व पदार्थांच्या जवळील हवेंत वैद्युदण्वीभवन चालू असतें, त्याअर्थी प्रत्येक पदार्थांत हा किरणविसर्जन धर्म असला पाहिजे, असें वरील आधारावरून, नार्मन कँबेल नांवाच्या शास्त्रज्ञाचें म्हणणें आहे. याशिवाय प्रयोगावरून असेंहि दिसून येतें कीं प्रत्येक पदार्थाची कांहीं तरी विशिष्ट किरणविसर्जन क्रिया आहे, व यामुळें प्रत्येक पदार्थांत थोडा बहुत तरी रेडियमचा अंश आहे व त्यामुळें ती होत असते या कल्पनेला धक्का बसतो; व ही किरणविसर्जन क्रिया अशा तऱ्हेनें रेडियम अवशेषाची नसून प्रत्येक पदार्थाच्या अंगीं असलेली विशिष्ट किरणविसर्जन क्रिया होय हेंच सिद्ध होतें.

किरणविसर्जन हें जर पृथक्करणाचें चिन्ह आहे व त्यामुळें जर प्रत्यक्ष पृथक्करण व द्रव्यनाश होतो, तर मग हें किरणविसर्जन ज्या पदार्थांच्या अंगीं तीव्र आहे ते पदार्थ फारच थोड्या प्रमाणांत अस्तित्वांत असले पाहिजेत. सर्वसाधारण चिरकालिक अशीं जीं द्रव्यें आहेत तीं किरणविसर्जनांत फार तीव्र नाहींत. एखाद्या पदार्थाची विपुलता त्याचें उत्पादनाचें प्रमाण, त्याचा आयुष्यावधि व नाशप्रमाण यांवर अवलंबून असतें.

१९. विद्युत्कणवलयांकित किरण विसर्जनः—स्पंदन पावणाऱ्या किंवा भ्रमण पावणाऱ्या एका विद्युत्कणाची किरणविक्षेपण शक्ति जरी वरीच असली तरी त्याच्या सम प्रमाणावर जर दुसरा एखादा विद्युत्कण आला तर त्या दोघांचीहि किरणविक्षेपण शक्ति वरीच कमी होते. कारण वस्तुतः कांहीं अंतरावर ते अगदीं विरुद्ध अवस्थेंत असतात. किरण-विक्षेपण जर वाढवावयाचें असेल तर व्यासाच्या दुसऱ्या टोंकावर असलेला विद्युत्कण निराळा चिन्हांकित असावा. प्रो. थॉमसननें जसें जसें विद्युत्कण संख्येनें वाढवावे तसतसें किरणविक्षेपण कसें कमी होतें हें काढलें आहे. समभुज त्रिकोणाच्या तिन्ही कोणावर जर एकजातीय विद्युत्कण असतील तर त्या तिघांचें किरण-विक्षेपण दोन स्वतंत्र असणाऱ्यांच्या किरणविक्षेपणापेक्षां कमी होईल. व्यासाच्या दोन्ही टोंकावर असणाऱ्या विद्युत्कणांचें किरणविक्षेपण एकट्याच्या $\frac{1}{40}$ इतकें सुद्धां होत नाहीं. काटकोन त्रिकोणाच्या चार कोपऱ्यांवर असलेल्या चारी विद्युत्कणांचें किरणविक्षेपण त्यांची गति प्रकाशाच्या $\frac{1}{10}$ इतकी असेल तर एकाच्या $\frac{1}{6000}$ इतकें होतें. पण कोणत्या का कारणामुळें होईना ते जर का समप्रमाणांतून निसटले, तर त्यांच्या एककेंद्री गतीचा विचार केला तर त्यांचें अन्योन्य किरण-विक्षेपण नाहींसें न होतां तें एकाएकीं अतिशय वाढतें. तीव्र उष्णता-

मानाच्या योगानें होणारें किरणविक्षेपण सुद्धां असेंच एकाएकीं तीव्र होतें.

२०. परमाणूचें अस्थैर्यः—जोंपर्यंत कोणात्मक वेग कांहीं एका मर्यादेपेक्षां जास्त आहे तोंपर्यंतच परिभ्रमित विद्युत्कण-वलय स्थिर असतें. तीनच विद्युत्कणांची गोष्ट घेतली तर ते स्वस्थ असले तरी स्थिर असतात, तरी पण ते फिरूं लागले तर त्यांचें स्थैर्य वाढतें; पण काटकोन चौकोनाच्या चार कोपऱ्यांवरील चार विद्युत्कण घेतले तर ते फिरते असल्याशिवाय स्थिर रहातच नाहींत. त्यांची गति जर .५७च्या खालीं येईल तर त्यांची काटकोण चौकोनाची रचना विघडून ते एकदम चतुष्कोण फलकाच्या रचनेंत येतात. पांच असतील तर त्यांना यापेक्षांहि जास्त वेगाची जरूर आहे. सहा असले तर कोणत्याहि वेगानें स्थिर राहूं शकत नाहीं; पण त्यांतच जर सातवा कण मिळविला, तर तें वलय स्थिर राहूं शकतें. बारा विद्युत्कणांचें जर स्थिर वलय पाहिजे असेल तर सात मध्यभागीं ठेवून त्याभोंवतीं पांचांचें वलय असावें लागतें. अशा तऱ्हेनें पुष्कळसे कण निरनिराळ्या लयांत व व्यवस्थित बसवितां येतील; पण त्या वलयांची गति मात्र नियमित गतीपेक्षां जास्त पाहिजे. ती जर त्यापेक्षां कमी होईल, मग ती त्यापैकीं एका का वलयाची होईना, तर सर्वांचीच रचना विघडते व नंतर नवीन घटना होते; या वेळीं परमाणूंच्या रचनेंत एकदम क्षोभ उत्पन्न होतो. या क्षोभानंतर त्या परमाणूंची घटना होते. नवीन घटनेंत संभाव्यशक्ति कमी होऊन गतिविशिष्ट शक्ति वाढते, व कांहीं परमाणूहि निघून जाण्याचा संभव असतो; व अशा तऱ्हेनें एकाच्या जागीं दुसराच पदार्थ बनतो; किंवा पहिलाच पण निराळ्या रूपांत दिसूं लागतो; आणि हें सर्व होत असतांना किरणविसर्जनक्रिया चालू असते, किंवहुना किरणविसर्जनक्रियेनेंच हें होतें.

२१. परमाणूंच्या अस्थैर्याबद्दल लॉजचें मतः— परमाणुबाह्य असा जो विद्युत्कण परमाणूभोंवतीं हिंडत असतो, त्याचा किरण-विसर्जन क्रियेमुळें शक्तिऱ्हास होत असून तो हळू हळू त्या परमाणूकडे ओढला जातो; आणि नंतर त्याची गति वाढते. त्याची गति वाढूं लागली म्हणजे त्याचें कार्यक्षम-जडत्वहि वाढूं लागतें, आणि मग मध्याभिगामी शक्तीच्या योगानें त्याला त्याचे कक्षेंत ठेवणें कठिण पडतें. ही शक्ति ज्या अर्थी विद्युदाकर्षणावर अवलंबून आहे आणि गतीवर नाहीं, त्या अर्थी जशी गती वाढेल तसें तें कमी होईल; व शेवटीं एकदां अशी वेळ येईल कीं या किरणाच्या गोळ्याला ताब्यांत धरण्याला विद्युदाकर्षण पुरेसें रहात नाहीं व मग सध्याच्या गतीनें तें दूरदूर जाण्याचा प्रयत्न करितें आणि अशा जाण्यानें त्याला ताब्यांत धरणाऱ्या विद्युदाकर्षण शक्तीचा जोर कमी कमी होतो व त्याचा मध्योत्सारी वेग मात्र कायम असतो. अशा ओढाताणींत समतोलता नाहींशी होते आणि तो कण स्वतःच्या गतिचक्राच्या स्पर्शरेषेच्या दिशेंत परमाणूपासून दूर निघून जातो; व अशा तऱ्हेनें एका नवीन तऱ्हेच्या किरणविसर्जनक्रियेला सुरवात होते. ही किरणविसर्जनक्रिया म्हणजे मनस्वी वेगानें धावणाऱ्या विद्युत्कणांचें उत्सर्जन होय. याचा बेक्वेरल नांवाच्या शास्त्रज्ञानें शोध लाविला. एखाद्या विद्युत्कणाचें एकाएकीं उत्सर्जन किंवा त्याच्या गतीला एकाएकीं विरोध यांच्या योगानें इथरमध्यें एक प्रकारच्या लहरी उत्पन्न होतात, त्यासच रांटजेन किरण म्हणतात, व याचा शोध रांटजेन नांवाच्या शास्त्रज्ञानें लाविला.

२२. उपसंहारः—हा विषय कितीहि लिहिला तरी पुरेसा होण्यासारखा नाहीं, तरी पण स्थलसंकोचास्तव जास्त वाढवितां येत नाहीं. यांत मुख्य महत्त्वाचा मुद्दा म्हणजे विद्युत् हें मूल तत्त्व असून, आपण ज्याला परमाणु म्हणतों, व ज्याचे त्यापुढें विभाग करणें शक्य नाहीं, तो परमाणु या विद्युत्कणांचाच बनलेला आहे, हा होय. व सर्व पदार्थांचे परमाणू याच तऱ्हेनें झालेले आहेत. सर्व पदार्थांच्या एकमूलत्वाचा किंवा अद्वैताचा (Unification of matter) जो तत्त्वज्ञांचा सिद्धांत आहे त्याची सिद्धता पदार्थविज्ञानशास्त्रज्ञांच्याकडेच आली म्हणण्यास हरकत नाहीं. ही सिद्धता जरी बहुतांशीं साध्य असली तरी पूर्णत्वानें साध्य नाहीं हें लक्षांत ठेवलें पाहिजे, कारण अद्याप मुख्य भाग हा विद्युत् मूलबिंदूचा झालेला आहे हें सिद्ध होण्यापूर्वी बरेंच काम राहिलें आहे. त्यानंतर परमाणूमधील अवकाशजागा, विद्युत्कणापेक्षांहि जास्त आहेत असें दिसून आल्यावर त्याची तुलना, ज्याच्या भोंवतीं, सारख्या आकाराचे, जडत्व असलेले (Inertia) व एकमेकांना विद्युद्योगानें आकर्षण व प्रतिसारण करणारे गोल आहेत अशा एखाद्या तेजोमेघाशीं करतां येईल; कारण या तेजोमेघाचें किरणविसर्जन, कांहीं परमाणूंच्या क्ष-किरणासारखेंच आघात अगर धक्के याशिवाय होत नाहीं.

परमाणु व अतिपरमाणुविद्युत्कण (electron) यांच्या आकारांत अतिशय विसादृश्य आहे; कारण एका पूर्णविरामाएवढा जर अतिपरमाणु विद्युत्कण धरला व एका परमाणूंत ते हजार आहेत असें धरलें तर त्या परमाणूचा आकार मोकळ्या अवकाशासुद्धां जवळ जवळ शंभर घनफूट होतो. आणि असें आहे तरी त्याच अतिपरमाणु विद्युत्कणांचा परमाणु झाला आहे, तेच त्याला जडत्व देतात, त्यांच्याच योगानें त्याच्या कक्षेंत जे परमाणू येतील त्यांच्याशीं याचा संयोग होतो, व एखादा संख्येनें जास्त किंवा कमी असल्यामुळें यांच्याच योगानें परमाणु निरनिराळे रासायनिक गुणधर्म दाखवितो.

अतिपरमाणु विद्युत्कणांच्या प्रकृतिधर्मांचा विचार करून त्याविषयीं मत ठरविणें अकालिक होईल. कारण धनविद्युत् मुख्य भागाशीं एवढी बांधलेली कां असावी व ऋणविद्युत्कण मात्र मोकळे स्वतंत्रपणें कां हिंडावे हें स्पष्ट झालें नाहीं

त्याचप्रमाणें गुरुत्वाकर्षण हें काय आहे हेंहि पूर्णपणें समजलें नाहीं. ज्या वेळीं विद्युत्कणांचा सिद्धांत पूर्णतेला येईल त्यावेळीं गुरुत्वाकर्षणाचाहि खरा अर्थ विशद होईल. ऋणविद्युत्कण मोकळ्या स्थितींत सांपडत असल्यामुळें आतांपर्यंत त्यांचाच विचार झाला, पण धनविद्युत्कण काय आहेत हें समजल्याशिवाय हे विद्युत्कण म्हणजे काय व कशा तऱ्हेनें वागतात हें समजणें कठिण आहे. लारमूर या शास्त्रज्ञाच्या मतानें पाहिलें तर तो म्हणतो धनविद्युत्कण हें ऋणविद्युत्कणांचें आरशांतील प्रतिबिंब आहे.

आतांपर्यंत धनविद्युत्कणाबद्दल काय माहीत आहे याचा विचार केला तर ते, कधीं ऋणविद्युत्कणाप्रमाणें मोकळे सांपडले नाहींच, पण एवढें मात्र म्हणतां येईल कीं, ऋणविद्युत्कण काढून घेतले म्हणजे जें काय शिल्लक राहील तें ते होत. अशा तऱ्हेनें सिद्धांताची मांडणी करणें म्हणजे बेंजामिन फ्रँकलिनच्या मताला पुष्टि देण्यासारखेंच आहे, आणि यावरून पूर्वींच्या शोधकांनीं केलेलीं भविष्यें खरीं ठरण्याचा संभव उत्पन्न होतो.

धन व ऋण विद्युत्कणांच्या एकमेकांत मिश्रणामुळें परमाणु झाला आहे हें फ्रँकलीनचें मत नव्हतें, व अद्यापपर्यंत हीं तर नुसतीं अनुमानें आहेत, तीं अनुमानें, सिद्धांतरूपांत येण्यापूर्वी धनविद्युत्कणाचें खरें स्वरूप काय आहे हें स्पष्ट होणें आवश्यक आहे.

**अतिरात्र यज्विन्**—हा अप्पया दीक्षितांचा नातु व नारायण दीक्षित यांचा मुलगा होता. यानें 'कुशकुमुद्वतीय' नांवाचें पंचांकी नाटक लिहिलें. हा, 'नीलकंठविजयचंपू'चा कर्ता नीलकंठदीक्षित याचा धाकटा भाऊ होता.

**अतिविष** ( सं. अतिविष, घुणप्रिया. ).— इंग्रजींत ओकोनायटम हेटरोफिलम हें शास्त्रीय नांव या वनस्पतीस दिलेलें आहे. यांत पांढरें, काळें व पिवळे अशा तीन जाती आहेत; ह्या नांवावरून किंवा मराठी अथवा संस्कृत नांवावरून सुद्धां ही एक बचनागाचीच जात असावी व ती विषारी असावी असा लागलीच बोध होतो. परंतु ती विषारी मुळींच नाहीं. मात्र वनस्पतिशास्त्राच्या वर्गीकरणानुसार तिच्या आकाररूपावरून ती व बचनाग हीं एकाच वर्गांत येतात. ही वनस्पति हिमालयावर व इतर डोंगरपठारीस पुष्कळ आढळते.

व र्ण नः—बाजारांत मिळणारें अतिविष म्हणजे गांठी गांठी असलेल्या बारीक मुळ्या होत, त्यांचीं टोंकें बारीक होत गेलेलीं असतात, लांबी एक इंचापासून दीड दोन इंच किंवा थोडी अधिक असते, जाडी तीन अष्टमांशापासून एक चतुर्थांश इंच असते; त्यांचा बाह्य रंग करडा असून त्यांस उभ्या कांहींशा सुरकुत्या असतात व त्यांचे वर मधून मधून बारीक मुळ्यांचे वण असतात, व त्या सहज मोडल्या जातात; मुळ्यांच्या आंतील रंग पांढरा असतो, त्यास वास मुळींच नसतो, त्या पिठूळ असून निवळ कडू असतात व त्यांचे अंगीं अम्लता किंवा तुरटपणा मुळींच नसतो. अतिविष घेतांना प्रत्येक मुळी मोडून घ्यावी, जी आंतून पांढरी पिठूळ व निवळ कडू नसेल ती घेऊं नये, त्यांत चावल्यावर जिभेवर खरख झाली व थोडासा सुंदपणा आला तर ती मुळी कधींहि घेऊं नये, ती विषारी आहे असें समजून टाकून द्यावी.

गु णः—अतिविषाचे अंगीं विशेषतः ज्वरघ्न व शक्तिवर्धक धर्म आहेत. त्याचे अंगीं पाचक व स्तंभकहि धर्म आहेत. अर्थात् त्यामुळें त्याचा उपयोग ज्वर—विशेषतः हिंवज्वर, ज्वरानंतरची अशक्तता, अपचन व उलटी होणें, हगवण व खोकला इत्यादिकांमध्यें करितात. याची साल वस्त्राला रंग देण्याच्या कामीं उपयोगी पडते.

प्र मा णः—ज्वरामध्यें २०–३० ग्रेन पूड प्रत्येक तीन किंवा चार तासांनीं ताप अंगांत नसतांना किंवा असतांना सुद्धां घेण्यास हरकत नाहीं. हिंवज्वराची पाळी टळण्यासाठीं मात्र कोयनेलप्रमाणें हें औषध पाळीच्या वेळाचे अगोदर दोन तीन वेळां पोंचेल अशा बेतानें किंवा घाम येऊन गेल्यावर तीन किंवा चार तासांनीं थोड्या पाण्याबरोबर घ्यावें. शक्ति वाढण्यासाठीं किंवा इतर विकारांत पूड ५–१० ग्रेनपर्यंत घ्यावी. मुलांना वयाचे मानानें प्रमाण योजावें.

का ढा—ज्वरांत हगवण असतांना अतिविष, सुंठ, कुड्याची साल, नागरमोथे व गुळवेलीचें मूळ हीं प्रत्येक सहासहा मासे घेऊन अच्छेर पाण्यांत काढा करून चौथा हिस्सा उरवावा व त्यापैकीं थोडथोडा दिवसांतून तीन चार वेळां द्यावा.

चू र्णः—लहान मुलांच्या ज्वरांत, हगवणींत, खोकल्यांत किंवा त्याचा कोठा बिघडून उलटी वगैरे होत असतांना अतिविषापासून चांगला उपयोग होतो. त्यासाठीं त्याची नुसतीच पूड देतात किंवा ती दुसऱ्या औषधांशीं मिश्र करून देतात—अतिविष, नागरमोथे व काकडशिंगी हीं समभाग घेऊन त्यांचें चूर्ण तयार करावें व तें मधांत मुलांस वयाचे मानानें द्यावें. पुष्कळदां समभाग पिंपळीची पूड वरील चूर्णांत मिसळतात. ह्या चार औषधांच्या चूर्णांस बालचातुर्भद्रिका हें विशेषनांव चक्रदत्तानें दिलें आहे.

अतिविषास संस्कृत नांव घुणप्रिया हें जें दिलेलें आहे तें अगदीं अन्वर्थक आहे. म्हणजे त्यास लौकर कीड लागते अर्थात् तें किडीला प्रिय असें मानलें आहे.

**अतिसार**—नि दा नः—वारंवार पुष्कळ आणि पातळ शौचास होणें यास अतिसार म्हणतात.

वातज, पित्तज, कफज, संन्निपातज, भयज, आणि शोकज, असे ह्या रोगाचे सहा प्रकार आहेत.

अतिशय पाणी पिणें, शुष्कमांसभक्षण, संवय नसलेले पदार्थ खाणें, अतिशय दारू पिणें, अतिशय जेवणें, अतिस्नेहपान, जंत, मूळव्याध, मलमूत्र, इत्यादिकांचा अवरोध, इत्यादि वायू वाढण्याच्या कारणांनीं कुपित झालेला वायू सर्व शरीरांतील पातळ पदार्थ आंतड्यांत आणतो. त्यामुळें अग्नि मंद होतो, व मळ पातळ होऊन पडूं लागतो,

अतिसार होण्याचेपूर्वी हृदय, गुदद्वार व आंतडीं ह्यांत टोंचल्याप्रमाणें वेदना होतात. अंग गळतें, शौचास होत नाहीं. पोट फुगतें आणि अन्न पचेनासें होतें. याप्रमाणें पूर्वरूपें होऊन नंतर अतिसार होतो.

अतिसाराचे सहा प्रकारांपैकीं वातजन्य अतिसारांत मुरडा फार होतो, व शौचाला होतेवेळीं फरफर आवाज होतो. शौचाला थोडथोडें होतें. मळ रुक्ष व फेंसट आणि गांडील असा पडतो. गुदद्वारांत कातरल्यासारखी पीडा ( परिकर्तन ) होते. बुळबुळीत, आणि जळलेल्या गुळाप्रमाणें काळसर तांबूस रंगाचा मळ होतो. रोग्याचें तोंड कोरडें असतें. रोमांच उभे राहतात व आंग बाहेर येतें.

पित्तजन्य अतिसारांत, पिंवळा, हिरवा, व काळा मळ होतो व त्यास अतिशय घाण येते. मळावरोबर रक्तहि येतें. रोग्यास तहान फार लागते. वेशुद्धी, घाम, आणि अंगाची आग होते. मुरडा होतो व गुदद्वाराची फार आग होते आणि तें पिकतें.

कफानें झालेल्या अतिसारांत, मळ दाट, बुळबुळीत, पांढरा, आणि कफयुक्त असून त्यास फारच घाण येते. मुरडा सारखा चालू असतो, रोग्यास झोंप फार येते, अन्न नकोसें होतें, शौचाचे वेळेस फार कुंथावें लागतें, आळस येतो, मळमळतें, पोट, गुदद्वार आणि ओंटी पोट हीं जड वाटतात. शौचाला जाऊन आलें तरी पुन्हा होतेंसें वाटतें.

त्रिदोषानें होणारे अतिसारांत सर्व दोषांचीं लक्षणें होतात.

भयानें चित्ताचा क्षोभ झाला म्हणजे वायु पित्तयुक्त होऊन मळाला पातळ करितो. मळ अतिशय ऊन असून, फार पातळ असतो त्यावरोबर रक्तहि येतें त्यामुळें मळ गुंजेसारखा लाल असतो. वर लिहिलेली वातपित्तात्मक अतिसारांतील लक्षणें यांत होतात.

शोकानें होणाऱ्या अतिसाराचींहि हींच लक्षणें आहेत.

हे भय आणि शोक यांनीं झालेले अतिसार कष्टसाध्य समजावे.

सर्व अतिसारांचे पुन्हा खालीं लिहिल्याप्रमाणें चार भेद आहेत.

साम, व निराम, रक्तयुक्त, व रक्तविरहित; पैकीं आमयुक्त अतिसारांत जडपणा असल्यामुळें मळ पाण्यांत बुडतो. मळ दुर्गंधी असतो. पोट फुगणें, पोट दुखणें, मळमळणें हीं लक्षणें असतात.

याचे उलट लक्षणें असतां निराम अतिसार समजावा. कफजन्य अतिसार निराम असला तरीहि त्याचा मळ पाण्यांत बुडतो.

ज्या अतिसारांत मळाचा रंग पिकलेल्या जांभळासारखा असतो किंवा स्वच्छ असतो अथवा तूप, तेल, चरबी, मज्जा, वेसवार, दुध, दहीं, यांचेप्रमाणें किंवा काळा, निळा, अरुणवर्ण असून मळावर इंद्रधनुष्याचे रंगाचीं कर्तुळें दिसतात. तो अतिसार असाध्य असतो. अतिशय कुजलेला मळ ज्या अतिसारांत पडतो तो असाध्य असतो.

तहान, अंगाची आग, डोळयांपुढें अंधेऱ्या, दमा, बडबड उचकी, वरगळ्या दुखणें, वेशुद्धी, चित्ताची अस्वस्थता, गुदद्वार-पिकणें, गुदद्वार बंद न होणें, सुज, पोटदुखणें, ताप, तहान, दमा, खोकला, अरोचक, ओकारी, वेशुद्धी, उचकी हे उपद्रव, झालेला, ज्याचें शरीर थंड झालें आहे असा अतिसारानें पीडिलेला रोगी बरा होत नाहीं.

दमा, पोटदुखणें, तहान, आणि ताप हीं लक्षणें झालेला वृद्ध मनुष्य अतिसारांतून वांचत नाहीं.

अतिसार झालेल्या रोग्यांस शौचावांचून वेगळी लघवी होऊं लागली, आणि अपानवायू सरूं लागला, भूक लागूं लागली, हलकें वाटूं लागलें म्हणजे अतिसार बरा झाला असें समजावें.

चि कि त्सा—अतिसार हा वहुत करून अग्नीस मंद करून आमाशयापासून उत्पन्न होतो. म्हणून तो वातजन्य असला तरी देखील त्यावर प्रथम उपवासरूप लंघनच हितावह होतें.

अतिसारांत पोटशूळ, पोटफुगी, व लाल सुटणें हे विकार असल्यास वांती करवावी. जेव्हां फार सांचलेले दोष कांहीं पक्व व कांहीं अपक्व अशा आहाराचीं एकवट्न अतिसार उत्पन्न करितात, तेव्हां ते अतिशय चाळवल्यामुळें प्रवृत्त होऊन आपोआप वाहेर निघून जात असतात. म्हणून त्यांस तसेंच जाऊं देणें हेंच याचें औषध आहे. म्हणजे पाचक-वगैरे औषध न देतां नुसतें पथ्य राखावें म्हणजे झालें.

आमातिसारावर प्रथमच स्तंभक औषध देऊं नये. तसेंच पोटफुगी, जडपणा, शूळ, व ओलसरपणा हे विकार असून शौचास थोडथोडें होत असल्यास स्तंभक औषध न देतां उलट रेच करणारे हिरडे द्यावे.

ज्याचे दोष मध्यम प्रमाणांत वाढले आहेत, त्यानें लंघन करून ओंवा, पिंपळी, सुंठ, धणे, व हिरडेदळ, यांचा काढा घेणें.

ज्यांचे दोष कमी आहेत, अशा अतिसाऱ्यांस उपास हाच प्रशस्त आहे. जेवणाची योग्य वेळ झाली म्हणजे हा रोगी भुकेनें कांहींसा व्याकुळ झाला म्हणजे त्यास हलकें अन्न बेतानें खाऊं घालावें. असें केल्यानें लौकरच त्याची अन्नावर रुचि होते. जठराग्नि प्रदीप्त होतो व शक्ति येते.

या भोजनावर पिण्याकरितां ताक, कांजी, कण्हेरी, द्राक्षासव, यांची संवयीप्रमाणें योजना करावी.

पित्तजन्य आमातिसारावर आरंभीं तीक्ष्ण व उष्ण वर्ज्य करून वाकी पूर्वींचीच लंघनचिकित्सा करावी.

लंघन करतांना तहान लागल्यास किराईत व उपळसरी यांसहित ज्वरांत सांगितलेलें ऊन पाणी द्यावें. भूक लागली असतां शतावरी, चिकणा, रानमुग व उडीद यांनीं सिद्ध केलेलें अग्निदीपक असें पेयादि अन्न खाणें हितकर आहे. इतकें करू-

नहि अतिसार बंद न झाल्यास इंद्रजव, कुड्याची साल, व अतिवीष यांचा कल्क तांदुळांच्या धुवणांतून मध घालून द्यावा.

पित्तातिसारांत पित्तकर पदार्थ खाल्ल्यानें रक्त पडूं लागतें व गुदपाक होतो त्यांवर मोचरस, उपळसरी, ज्येष्ठमध, व लोध्र यांनीं तयार केलेलें शेळीचें दुध, मध व साखर घालून प्यावें. त्याच्याबरोबर भात जेवावा व त्या दुधांत कापसाच्या घड्या भिजवून गुदावर ठेवाव्या. शतावरीच्या मुळ्यांचा कल्क दुधांतून प्यावा व अन्न न खातां दुध पिऊन रहावें. म्हणजे रक्तातिसार लौकर बरा होतो.

ज्यास मुरडा होऊन वारंवार थोडथोडें रक्त पडतें आणि वायूचा अवरोध झाल्यामुळें तो कष्टानें सरतो किंवा मुळींच सरत नाहीं त्यास पिछावस्ती द्यावा. शिसवा व पांढरा कांचन यांचा पाला ठेंचून तो व जव यांचा काढा करावा. आणि त्यांत तुप व दुध घालून आंव, गुदभ्रंश, व कुंथण्याच्या वेदना यांवर त्याचा पिछावस्ती द्यावा.

कफक्षीण होऊन पुष्कळ दिवस अतिसार राहिल्यानें गुद अशक्त झालें म्हणजे स्वस्थानांतील वायु हटकून प्रबळ होऊन रोग्यास एकाएकीं मारतो. म्हणून तावडतोब त्यास शमवावें. वायूच्या नंतर पित्त व पित्ताच्या नंतर कफ जिंकावा. किंवा तिघांत ज्याचा जोर असेल त्यास प्रथम शमवावा.

भीति व शोक, यांपासूनहि वायु लवकर कुपित होतो. म्हणून भयातिसार व शोकातिसार यांवर वातनाशक चिकित्सा करावी, आणि रोग्यास समाधान व आनंद होईल असे उपाय करावे.

ज्यास मळ पडल्यावांचून लघवी होते, वारा सरतो आणि ज्याचा अग्नि प्रदीप्त असून कोठा हलका आहे त्याचा अतिसार बरा झाला असें समजावें.

उपास, ओकारी, झोंप, पेज, जुने तांदुळाचा भात, ससा किंवा हरिण यांचे मांसाचा रस, शेळीचें तूप, दुध, दहीं व ताक, मध, जांभळें, डाळिंबें, जायफळ, अफू, जिरें, इत्यादि पदार्थ अतिसारांत हितकर आहेत.

शेकणें, रक्तस्राव, पाणी पिणें, स्नान, मैथुन, उसळी, पावटे, संवय नसलेलें अन्न, द्राक्षें, लसुण, नारळ, पालेभाज्या अंबट व खारट रस, इत्यादि पदार्थ अतिसारांत अपथ्य आहेत.

बेंबीचे खालीं दोन आंगळें किंवा माकडहाडाचे वर अर्धचंद्राकार डाग दिल्यानेंहि अतिसार जातो. शंखोदररस, अगस्तिसुतराज, कुंकुमवटी, इत्यादि योगरत्नाकरांत सांगितलेलीं औषधें अतिसारांत गुणकारी आहेत. [वाग्भट; चरक, योगरत्नाकर इ.]

**अतीतः**—साताराजिल्ह्यांतील एक गांव सन १७३० मध्यें रामचंद्र पंडित अमात्य यास सरंजाम दिला त्यांत मौजे अतीत ( ताळुके तारगांव, तर्फे हरचेरी ) याचा उल्लेख आहे. (रा. खं. ८.१२२.२५१). शके १६१८ कार्तिकमध्यें सेनापति धनाजी जाधव यांनीं स्वशिक्क्याचें पत्र लिहून अतीत वगैरे गांवांच्या देशमुखी हक्काबद्दल तंटा होता त्याचा निकाल केला, व महादजी जगदळे याजकडे सदरहू देशमुखी असल्याबद्दल कळविलें ( रा. खं. १५.४८.९३ ).

**अतीत**–या जातीच्या लोकांना कच्छमध्यें दुसरीं अनेक नांवें आहेत. ( १ ) गिर ( २ ) पर्वत ( ३ ) सागर ( ४ ) पुरि ( ५ ) भारती ( ६ ) वन ( ७ ) अरन ( ८ ) सरस्वती (९) तीर्थ व ( १० ) आश्रम असे पोटविभाग या जातींत आहेत. आपल्या पोटजातीचें नांव आपल्या नांवापुढें लावण्याची चाल या लोकांत आहे. जसें:—चंचळ भारती वगैरे. या जातींतील लोकांना ब्रह्मचारी रहातां येतें, अगर गृहस्थाश्रम घेतां येतो. पहिल्या प्रकारच्या लोकांना मठधारी व दुसऱ्या प्रकारच्या लोकांना घर्बारि म्हणतात. हे मद्यमांस सेवन करितात. बरेच लोक भीक मागून उदरनिर्वाह करतात. परंतु इतर धंदे करण्याचीहि त्यांना मुभा आहे. यांना गोसावी असेंहि म्हणतात. हे जानवें घालीत नाहींत; यांना पुनर्विवाह संमत आहे. यांचीं मुख्य ठिकाणें म्हणजे भुजमधील कल्याणेश्वर, अंजार येथील अजेपाल आणि पश्चिमेकडील कोटेश्वर होत. बहुतेक अतीत शैव असतात. मेल्यावर यांच्या समाधी बांधून त्यांवर लिंग बसवितात. आसामांतहि यांची थोडीशी वस्ती आहे. [ Ind. Ant. V. 168. मुं. गॅ. सेन्सस रिपोर्ट. ]

**अतीतानंद** ( अतीत )—याचे ग्रंथावरून याचे गुरु ब्रह्मानंद का स्वानंदानंद अथवा शिवानंद हें निश्चित सांगतां येत नाहीं. रा. चांदोरकरांचें मत शिवानंद असावें असें आहे. ग्रंथ—योगवासिष्ठ. ( सं. क. का. सू. )

**अतीश**—अतीश किंवा दीपंकर हा बौद्धधर्मीय साधु हिंदुस्थानचा रहिवाशी होता तरी त्यानें तिबेटांत जाऊन तेथें लामाधर्मांत बरीचशी सुधारणा घडवून आणिली. इ. स. १०३८ त जेव्हां त्यानें तिबेटांत पाऊल टाकलें तेव्हां त्यावेळचा तेथील बौद्धधर्म अनीतिमान् भिक्षुकांच्या हातांत असून त्यांतील पिशाच भक्तीमुळें तो अवनतीस पोंचला आहे असें अतीशाला आढळून आलें. शुद्धतम बौद्धधर्माचा नमुना पुढें ठेवून त्यानें एक नवीन कादम नांवाचा पंथ काढिला. या पंथांतूनच पुढें, हल्लीं तिबेटचा राष्ट्रधर्म असणारा गेलुग ( पीत–शिरस्त्राण ) पंथ निघाला. ब्रह्मचर्यपालन व पिशाचभक्तीचें उच्चाटण या अतीशानें केलेल्या कांहीं धार्मिक सुधारणा होत. त्यानें जे अनेक तात्त्विक ग्रंथ लिहिले त्यांमध्यें 'बोधिपंथप्रदीप' हा प्रख्यात आहे. त्यानें हिंदुस्थानांतल्या बौद्धभाष्यांचीं तिबेटी धर्मग्रंथांतून भाषांतरें केलीं. अतीशाच्या उपदेशाचा हितकारी परिणाम म्हणजे सस्क्य व कर्ग्यु नांवाचे दोन अर्धवट सुधारलेले पंथ पुढें निर्माण झाले; व त्यांतल्या त्यांत सस्क्य पंथाचें वर्चस्व तर बरेच दिवस टिकून होतें. इ. स. १०५२ त अतीश ल्हासाजवळ ने-टंग ( Ne-tang ) येथें मरण पावला. तेथें त्याच्या समाधीवर उभारलेला स्तूप अद्याप दिसतो.

**अतूरः**—हें गांव, मद्रास इलाख्यांत, सालेम जिल्ह्यांतील अतूर ताळुक्याचें मुख्य ठिकाण आहे. लोकसंख्या सुमारें दहा

हजार. गांवाच्या उत्तरेस एक जुना किल्ला आहे. तेथें अठराव्या शतकांत प्रसिद्ध सरदार, चेटी मुदलियार, हा रहात असे. सालेमहून त्यागद्रुगला जाणाऱ्या घांटावर हा किल्ला असल्यामुळें हैदरअल्लीच्या युद्धांत याला बरेंच महत्त्व होतें. १७६८ त, व पुन्हां टिपूशीं झालेल्या युद्धांत इंग्रजांनीं हा किल्ला घेतला. येथें निळीची लागवड होते; व बैलगाड्याहि चांगल्या होतात. ( इं. गॅ. ).

**अत्तर व सुगंधी पदार्थः**—अत्तरें करणें किंवा सौगंधिकी कला. मनुष्यास शब्द, स्पर्श, रूप, रस वगैरे ज्याप्रमाणें प्रिय आहेत त्याचप्रमाणें घ्राणेंद्रियास प्रिय असलेलीं अत्तरें किंवा सुवासिक पदार्थ यांचा उपयोग मनुष्य जातींत फार प्राचीन काळापासून प्रचलित आहे. पुष्पांचा मधुर सुवास तसेंच कस्तूरी मृग, जवादी मांजर वगैरे प्राण्यांपासून निघणारीं सुगंधि द्रव्यें व वनस्पतिजन्य निर्यास यांपासून निरनिराळीं अत्तरें व सुगंधी तेलें व अर्क तयार होतात. सुगंधी पदार्थांचे योगानें मनुष्याचें मन प्रसन्न व आल्हादित होतें. यामुळें प्राचीन काळच्या सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत त्यांचा मोठ्या प्रमाणावर उपयोग होत असे. इजिप्त, अरबस्तान, असुरिया, इराण, या देशांत तसेंच इटली व ग्रीस या देशांत ह्यांचा फार खप होत असे. व त्यामुळें अत्तरें व सुगंधी पदार्थ तयार करण्याची कला फार पूर्णत्वास गेली होती. आपला हिंदुस्थान देश ह्या कलेंत फार प्रवीण होता. कारण सुगंधी द्रव्यें या देशांत फार विपुल असून ह्या कलेस उत्तेजनहि फार मिळत असे. अत्तरें व सुगंधी तेलें यांचा शोकी व विलासी लोकांतच प्रसार नसून धार्मिक संस्कार व शुभ कृत्यें करतांना व देवतांचें पूजन करतेवेळेस पुष्पें व इतर सुगंधी पदार्थांचा उपयोग करण्याचा प्रघात सर्व देशांत प्रचलित आहे. सुगंधी पुष्पें देवांस किंवा साधुसंतांचे मूर्तीस वाहणें तसेंच सुगंधी तैल मर्दन करून अभ्यंग स्नान करणें फार प्राचीन काळापासून बहुतेक सर्व देशांत प्रचलित आहे. मिसर देशांत मृत मनुष्याचे प्रेतास संस्कार करतेवेळीं सुगंधी तेलाचा वगैरे सौगंधिक पदार्थांचा उपयोग करीत. ग्रीस व रोममध्यें सुगंधी पदार्थांचा इतका प्रसार एकदां झाला होता व त्यांच्या किमती इतक्या भयंकर वाढल्या होत्या कीं त्याला आळा घालण्याकरितां सरकारला निरनिराळे कायदे वेळोवेळां करावे लागले. कित्येक अगदीं जंगली जातींत सुद्धां अत्तरें व सुगंधी तेलें वापरण्याचा फार शौक आहे. तसेंच गृहशुद्धीकरतां चंदन, अबीर व ऊद वगैरे सुगंधी पदार्थ जाळण्याचा कित्येक समाजांत प्रघात आहे.

सुगंधी द्रव्यें वर सांगितलेल्या पदार्थांखेरीज रासायनिक मिश्रणानेंहि तयार होतात त्यांना रासायनिक सुगंध म्हणतात.

अत्तरें व अर्क काढण्याच्या निरनिराळ्या कृति आहेत. त्या सर्व या लेखांत विस्तृत रीतीनें देणें शक्य नाहीं. रासायनिक अर्क जर्मनी वगैरे परदेशांतून आपले देशांत येऊं लागल्यापासून आपलेकडील अत्तराचे कारखाने बहुतेक नामशेष झाले आहेत. कारण हे अर्क किंमतीनें स्वस्त असून त्यांचे मिश्रणानें सुगंधी तेलें वगैरे करण्याचें काम अगदीं सोपें झालें आहे. ह्यामुळें हिंदुस्थानांतून परदेशीं कच्चीं सुगंधी द्रव्यें बाहेर पाठविणें एवढाच धंदा बहुतेक शिल्लक राहिला आहे. लाखों रुपये किंमतीचा कच्चा माल हिंदुस्थानांतून बाहेर जाऊन त्याचें रूपांतर होऊन निरनिराळे अर्क व अत्तरें आपले देशांत येतात उ. १९१४।१५ मध्यें वजन टन ६७२५ व किंमत १४ लाख रुपये इतका कच्चा माल आपल्या देशांतून बाहेर गेला.

दिल्ली, अमृतसर व लाहोर येथून या अत्तरांचा व्यापार होतो. कच्चा माल मुंबई बंदरांतून बाहेर जातो. खालील सुगंधी द्रव्यांपासून तेलें किंवा अत्तरें तयार होतात. विलायती किंवा वेड्या बाभळीची फुलें, बेलाची फुलें, धूप, शिलारस, कोष्ट कोलिंजन, वेलची, अगरू, भुईमुग, दालचिनी, संत्र्याचीं फुलें, किंवा संत्र्याच्या सालीचें तेल, खट्यानिंबाचें फूल, रोशेल, मोतिया, जुई, चमेली, व जाईचीं फुलें, सोनचाफा, व साधा केवडा, कस्तुरी, जटामांसी, पाच किंवा पानडी, गुलाबाचीं फुलें, चंदन, गव्हलाकचोरा, तीळ, वाळा, लोबाण, नागरमोथा, दवणा, मरवा, इ.

आपले देशांतून सुगंधी द्रव्यें फक्त परदेशीं जातीं तर विशेष नुकसान आपलें झालें नसतें. परंतु त्याच कच्च्या मालाचीं अत्तरें परत देशांत आल्यानें आपलें फार नुकसान होतें. परदेशी अत्तरामुळें कनोजचे कारखाने बंद पडत चालले आहेत. कारण अत्तरांचे तीव्र अर्क ( Concentrated Essences) साध्या तेलांत मिसळून त्यापासून सुगंधी तेलें व अत्तरें करणें फार सोपें व कमी खर्चाचें झालें आहे. हीं मिश्रणें जरी अस्सल अत्तराशीं तुलना केल्यास कमी दर्जाचीं ठरतात तरी त्यांचा खप अतोनात होतो. नुकतीच जर्मनीबरोबर लढाई होऊन त्या लढाईच्या धामधुमींत परदेशीय अर्क येणें अजीबात बंद झालें होतें त्यावेळीं मात्र कनोजच्या कारखान्यास पुनः उत्तेजन मिळालें होतें. कनोज, जोनपूर व गाझीपूर हीं तीन शहरें अत्तरासंबंधानें सर्व हिंदुस्थानांत फार प्रसिद्ध आहेत. आपलेकडील तेलें व अत्तरें काढण्याच्या कृति फार सोप्या परंतु ओबडधोबड तऱ्हेच्या असल्यामुळें त्यांचा टिकाव सध्या परकीय मालापुढें होत नाहीं.

कृति नं० १—पांढरे तीळ चांगले स्वच्छ धुऊन वाळवावे. नंतर त्यांस थोडा पाण्याचा हात लावून जाईचें किंवा इतर ज्या फुलाचें तेल काढणें असेल त्या फुलाचा एक थर करून त्यावर एक तिळाचा थर द्यावा. ह्याप्रमाणें एक फुलांचा व त्यावर एक तिळाचा असे थर देत राहावें व नंतर त्यावर एक स्वच्छ रुमाल झांकून १२ पासून १८ तासपर्यंत तसेंच राहूं द्यावें नंतर तेलघाणीनें तेल काढावें.

कृति नं० २-अत्तर करणारे गंधीलोक एका मोठ्या भांड्यांत पाणी भरून त्यांत फुलें टाकतात नंतर त्या भांड्याखालीं आंच लावून त्यांतील वाफ ऊर्ध्वनलिकायंत्रानें दुसऱ्या भांड्यांत उतरवितात. ह्या भांड्यांत आरंभींच चंदनी तेल किंवा रोशेल

घातलेलें असतें. ह्याप्रमाणें संचायकामध्यें वाफेचें पाणी जमून थंड झाल्यावर ह्या पाण्याचे वरतीं तेल जमतें तें युक्तीनें वरचेवर काढून घेतात. हें तेल म्हणजेच उत्तम अत्तर.

कृति नं. ३–आपणास ज्या फुलांचें अत्तर काढणें असेल तीं फुलें एका कांचेच्या कुपींत भरावीं व तीं बुडेपर्यंत तिळांचें तेल घालून हवा आंत न जाईल अशा रीतीनें वाटलीला बूच मारावें व ती सुमारें महिना सवा महिना उन्हांत ठेवावी. नंतर तीं फुलें काढून टाकून पुन्हा नवीन फुलें घालावीं. याप्रमाणें तीन चार वेळ केल्यानें उत्तम प्रकारचें अत्तर तयार होईल.

गुलावपाणी—गुलावाचीं फुलें व पाणी एकत्र करून एका मडक्यांत घालावीं. व ह्या मडक्यावर दुसरें एक लहानसें मडकें पालथें घालून ओल्या मातीनें दोन्हीचीं तोंडें बंद करावीं. व एक नळी घेऊन त्यावरच्या लहान मडक्याच्या कुशींत भोंक पाडून त्यांत ती नळी गच्च बसवावी. व त्या ठिकाणींहि ओली माती बसवावी. म्हणजे आंतील पाणी किंवा वाफ बाहेर येणार नाहीं. मग त्या नळीचा मध्यभाग दुसऱ्या शीतळ पाण्यांत बुडेल असें करावें, आणि नळीच्या तोंडापुढें एक भांडें ठेवून मडक्या-खालीं अग्नि प्रदीप्त करावा. आंतील पाणी तापलें म्हणजे त्याची वाफ होऊन ती नळींतून खालीं ठेवलेल्या पात्रांत पडेल, त्यासच गुलावपाणी म्हणतात. हें ऊर्ध्वनलिका यंत्रानें काढलेलें पाणी फार सुवासिक होतें.

कृति नं. २–ओटो डी रोझ (गुलावी अत्तराचा अर्क) -॥- ड्राम, मॅग्नेशिया १ औंस, डिस्टिल्डवाटर ( ऊर्ध्वपातितजल ) -॥- ग्यालन. प्रथम आटोडीरोझ व मॅग्नेशिया यांचें मिश्रण करावें नंतर डिस्टिल्डवाटर त्यांत घालून ब्लाटिंगपेपरनें गाळून वाटलींत भरावें.

ऑरेंजवाटर—निरोळीच्या तेलाचे थेंब ३० व ३/४ ड्राम मॅग्नेशिआ एकत्र करून डिस्टिल्डवॉटर ३ पाव घालावें. उत्तम सुवासिक ऑरेंजवाटर तयार होतें.

कोलनवाटर करण्याची कृति नं. १–निरोळीचें तेल २५ थेंब, एसेन्स ऑफ सिदरेट २५ थेंब, आरेंज २५ थेंब, एसेंस ऑफ लेमन २५ थेंब, एसेन्स आफ वर्गेमोर २५ थेंब, एसेन्स ऑफ रोजबरी -॥- औंस, एसेन्स ऑफ पोर्चुगाल निरोळी -।- औंस, अलकोहोल १ ग्यालन हे सर्व जिन्नस एकत्र करून काचेच्या भांड्यांत बूच मारून ८ दिवस ठेवावे.

लवेंडर वाटर तयार करण्याची कृति–उत्तम लवेंडर तेल २ ड्राम, लवंगेचें तेल -।- ड्राम, कस्तुरी २॥ ग्रेन, स्पिरिट आफ वाईन २॥ औंस, पाणी १ औंस, प्रथम लवेंडर थोडें स्पिरिट-मध्यें मिसळून नंतर वाकी वर राहिलेल्या सर्व जिनसा घालून सर्व एकत्र करून सारखें हालवून ८ दिवस ठेवावें. नंतर त्याचा उपयोग करावा.

उदवत्त्या तयार करण्याची कृति नं. १–नखला ४॥ टांक, गठाना २॥ टांक, गुलावकळी -।- टांक, दगडफूल २। टांक, उदाचें फूल -।- टांक, शिलारस -।- टांक, मध -।- टांक, वाळा -॥- टांक, ब्राम्ही २॥ टांक, चोपचिनी २॥ टांक, जटामांसी ४॥ टांक, पत्री २॥ टांक, वरील जिन्नस वारीक वस्त्रगाळ करून मधांत कालवावे व काळेपणा येण्याकरितां त्यांत कोळशांची पूड घालून नंतर वांबूच्या चोया घेऊन त्यावर उदवत्त्या वळाव्या.

कृति नं० २–मलबारी चंदन -।- टांक, कृष्णागरु -।- टांक, देवदार ४॥ टांक, नखला ५ तोळे, मध ९ तोळे, कवच्याऊद ५ तोळे, अंवर -।॥- तोळा, चोपचिनी ३ तोळे, गहुला १ तोळा, ब्राम्ही १ तोळा, साखर २॥ तोळे, अगरु ५॥ तोळे, कस्तुरी -।- तोळा. सर्व जिन्नस वस्त्रगाळ करून मधांत कालवावे व कोळशाची पूड घालून वांबूच्या चोयांवर उदवत्त्या वळाव्या.

कृति नं० ३–डिंकाचे पाण्यांत बुका कालवून दाट बलक करावा नंतर त्या बलकांत एकेक काडी बुडवून काढून बुक्यांत घोळावी. नंतर ती गुळगुळीत फळीवर हलक्या हातानें लाटून साफ व तुळतुळीत करावी.

उत्तम सुवासिक उदवत्ती करणें असल्यास उदवत्ती लाटून झाल्यावर अत्तराचा अगर सुवासिक तेलाचा बोळा हलकेच वरून फिरवून उदवत्ती सावलींत वाळवावी.

कृति नं० ४–नागरमोथे ४ तोळे, कृष्णागरु ४ तोळे, वाळा २ तोळे, दालचिनी ४ तोळे, तगर २ तोळे, कचोरा २ तोळे, चंदन १८ तोळे, दगडफूल २ तोळे, गव्हला ६ तोळे, गुलावकळी २ तोळे, मैदालकडी ९ तोळे, कस्तुरी -।- तोळा, हे सर्व पदार्थ वेगवेगळे कुटून शिलारस व कस्तुरीशिवाय वाकीचे एकत्र करून वस्त्रगाळ करावे. नंतर शिलारसांत ती वस्त्रगाळ केलेल्या इतर पदार्थांची भुकटी व कस्तुरी घालून मिश्र करावी. काळा रंग येण्याकरितां कोळशांची थोडी वस्त्रगाळ केलेली भुकटी त्यांत मिसळून सर्व मिश्रण मर्दन करून एकजीव करावा. उदवत्ती करण्यास गोल आकारापेक्षां चौरस आकाराच्या काड्या घेणें बरें, कारण चौरस आकार मिश्रण जसें धरतो तसा गोल धरित नाहीं. काड्यांवर मिश्रण लावतात तें हातास चिकटूं नये म्हणून सुवास दिलेली कोळशाची भुकटी जवळ ठेवावी व ती मधून मधून हातास लावीत जावी.

अगरवत्ती करण्याचा प्रकार–कस्तुरी १ गुंज, अंवर २ गुंजा, चंदन १ तोळा, केशर १ तोळा, तगर २ तोळे, कंकोल -॥- तोळा, लवंग फूल -॥- तोळा, गवला १ तोळा, अगरु २ तोळे, उद -।॥- तोळा, शिलारस २ तोळे, नखला १ तोळा, वेलदोडे १तोळा, जायफळ -॥- तोळा, कोष्ठकोलिंजन २ तोळे, गुळ १ तोळा, कृष्णागरु १ तोळा, नागर मोथा -॥- तोळा, हे जिन्नस घ्यावे. वाकी सर्व कृति उदवत्तीप्रमाणें.

केशराच्या गोळ्या करण्याची कृति—चांगलें केशर आणून उन्हांत वाळवावें. नंतर खलबत्त्यांत वारीक खलावें. वस्त्रगाळ पूड झाल्यावर त्यांत थोडें गुलाबपाणी घालून खलांत वारीक खलून तयार झाल्यावर त्याच्या गोळ्या करतेवेळीं हातास थोडेंसें सुवासिक तेल लावून लांवट गोळ्या करून वाळवाव्या.

अष्टगंध—केशर, कस्तुरी, कापूर, गोरोचन, देवदार, कृष्णागरु, पांढरा चंदन, नागरमोथे, यांना अष्टगंध ही संज्ञा आहे.

कृत्रिम कस्तुरी करणें—एक ड्राम अंबरतेल घेऊन त्यामध्यें त्याच्या चौपट नत्राम्ल (नैट्रिक ॲसिड) थोडथोडें घालावें, नंतर कांचेच्या सळईनें तें मिश्रण पिंवळी पूड होईपर्यंत ढवळावें म्हणजे त्याला खऱ्या कस्तुरीचा वास येऊं लागतो. नंतर त्यांत कस्तुरी १५ ग्रेन मिळवावी.

अरगजा करण्याचा प्रकार—नागरमोथा, गवला, नरकचोरा, जटामांसी, तज आणि वाळा हीं प्रत्येक दोन दोन भाग घ्यावींत. दगडफूल, कृष्णागर, जायपत्री, लवंग, वेलदोडे, चंदन, जायफळ, कापूरकचरी, पाच व कस्तूरी हीं प्रत्येक एक एक भाग, केशर -॥- भाग, मोतिया अत्तर -।- भाग, चंदनी अत्तर -।- भाग, गुलाबी अत्तर -।- भाग या सर्व जिनसा घेऊन त्यांपैकीं कस्तुरी, केशर, आणि अत्तरें खेरीज करून बाकी सर्व जिनसा कुटून बारीक वस्त्रगाळ कराव्या. नंतर त्यांत केशर व कस्तुरी खलून त्या मसाल्यास अत्तराचीं पुटें द्यावीं. म्हणजे उत्तम प्रकारचा सुवासिक अरगजा तयार होतो.

अंगास लावण्याचीं सुगंधी उटणीं.

कृति नं. १—बारीक दालचिनी, वेलदोड्याचे दाणे, शेवग्याच्या बिया, नागरमोथा, जायपत्री, कचोरा, वाळा, आणि कापूर हे जिन्नस सारख्या प्रमाणानें घेऊन पाण्यांत वाटून अंगास लावणें; हें उटणें फारच सुगंधी आहे.

दशांगाच्या गोळ्या—सुगंधी पदार्थांच्या गोळ्या करून सुवास येण्याकरितां जाळतात. त्या करण्याचा प्रकार येणेंप्रमाणें:—उंचीचंदन ८, गुगुळ ८, वाळंतवोळ २, धूप ४, कृष्णागर ८, देवदार २, जायफळ -॥-, कोष्ट कोळिंजन २, कापूर -॥-, वाळा ३, वर लिहिल्याप्रमाणें तोळेवार जिन्नस घेऊन ते बारीक वस्त्रगाळ करून त्या चूर्णांच्या तुपांत गोळ्या कराव्या.

वर सांगितलेल्या कृतीप्रमाणें शुद्ध अत्तरें व तेलें निघतात. परंतु अलीकडे रसायनशास्त्राच्या प्रगतीनें या पूर्वींच्या पद्धतींची जरूरच राहिली नाहीं. रासायनिक रीतीनें प्रथम सर्व जातींच्या सुवासिक द्रव्यांचें पृथक्करण करतां येतें. या पृथक्करणाचे साधनानें प्रत्येक जातीच्या सुगंधांत मूलद्रव्यें कोणतीं आहेत व कोणत्या प्रमाणांत तीं सृष्टपदार्थांत मिसळलेलीं सांपडतात, हा प्रथम शोध करतां आला. या शोधामुळें अत्तरांत भेसळ करून निरनिराळीं मिश्रणें तयार करून गंधी लोक निर्भेळ अत्तरें म्हणून विकतात. मूळ फुलें किंवा इतर सृष्टिजन्य सुगंधी पदार्थ यांचा उपयोग दिवसेंदिवस मागें पडत चालला आहे व रासायनिक मिश्रणजन्य अत्तरें व अर्क यांचाच खप अतिशय जारीनें सुरू आहे. जर्मन हैको (Heiko) नांवाचे सुगंधी अर्क साधे तेलांत (म्हणजे तिळेल खोबरेल वगैरे) किंवा वासरहित व रंगहीन घासलेट तेलासारखें एक शुभ्र तेल मिळतें त्यांत मिसळून नाना प्रकाराचीं अत्तरें व केंसास लावण्याचीं तेलें तयार करतात. या कृतीनें थोड्या खर्चांत तेलें व अत्तरें होत असल्यामुळें करणारास फायदा चांगला राहून मेहनत फार थोडी पडते. कृत्रिम नीळ व वनस्पतिज नीळ यांच्यांत जो फरक तोच कृत्रिम अत्तर व फुलांपासून किंवा इतर सृष्टपदार्थांतून काढलेलें अत्तर यांतहि दिसून येतो म्हणजे खऱ्या अत्तराला किंवा अर्काला जो सौम्य आल्हादकारक व टिकाऊ सुवास येतो तो कृत्रिम अत्तरांत किंवा अर्कांत नसतो. याचें कारण खऱ्या फुलांत व सुगंधी द्रव्यांत असे कांहीं सूक्ष्म पदार्थ असतात कीं त्यांचा शोध रसायनशास्त्र्यांस अद्याप लागला नाहीं. व यामुळें कृत्रिम सुगंध करण्याची कला अद्याप पूर्णावस्थेस पोंचली नाहीं. [ वाङ्मय-वाङ्मयसूची ' आध ' व ' आभ ' पहा ].

अत्तार फरिदुद्दिन—हा इराणी कवि व गूढतत्त्ववादी निशापूर येथें १११९ त जन्मला. व तो १२२९ त मारला गेला. परंतु त्याच्या जन्ममृत्यूच्या तारखांविषयीं मतभेद आहे. त्याचें खरें नांव अबू तालिब ( किंवा अबू हमिद ) महमद बिन इब्राहिम हें असून फरिदुद्दिन ( धर्मांतील मोतीं ) हा त्याचा नुसता किताब होता. तो आपल्या बापाचाच गंध्याचा धंदा करी. गूढ व अज्ञेय अशा आत्म्याच्या अस्तित्वाबद्दल खालीं दिल्याप्रमाणें अत्यंत चमत्कारिक तऱ्हेनें त्याचे मनांत जागृति उत्पन्न झाली. एके दिवशीं एक फकीर त्याच्या दुकानापुढें येऊन त्याला म्हणाला कीं, "हा सर्व माल येथेंच सोडून तुला मृत्यूला कवटाळावें लागेल, याबद्दल मला खेद होतो." हें ऐकल्याबरोबर त्यानें आपलें दुकान वगैरे सोडून देऊन सर्व चित्त पारमार्थिक गोष्टींकडे लाविलें. त्यानें मक्का, ईजिप्त, दमास्कस व हिंदुस्थान वगैरे ठिकाणीं प्रवास गेला. त्याचें बरेंचसें राहणें शायख मुक्कामीं झालें.

त्याच्या मृत्यूचीहि हकीकत मोठी चमत्कारिक आहे. जेंगिझखानाच्या एका सैनिकानें त्याला कैद करून गुलाम केलें. त्याची चांगली किंमत येत असतां त्यानें आपल्या धन्याला आणखी जबर किंमत येईल तोंपर्यंत वाट पाहण्यास सांगितलें. पुढें पहिल्या सवद्याप्रमाणें किफायतशीर सवदा करतां न आल्यामुळें त्यानें रागावून फरिदुद्दीनला ठार केलें. पुढें याच्यावर एक भव्य थडगें बांधण्यांत आलें; या जागेला धार्मिक महत्त्व प्राप्त झालें. त्यानें १,२०,००० द्विपाद कविता लिहिल्या. शेवटीं त्यानें इतकें खडतर तपाचरण केलें कीं, तो पुढें काव्यहि लिहीनासा झाला. त्याचें अत्यंत प्रसिद्ध काव्य म्हटलें म्हणजे 'मंतिक आतर' हें होय. ब्रह्मपदीं लीन होण्याबद्दल जिवाची काय धडपड असते व शेवटीं त्याला काय प्राप्त होतें हें त्यांत चांगलें दाखविलें आहे.

अत्यग्निष्टोम—सप्त सोमसंस्थांपैकीं एक याग. अग्निष्टोम याग झाल्यानंतर हा याग करावयाचा असतो. त्यांतील सर्व कर्में अग्निष्टोमाप्रमाणेंच करावयाचें असतें. यांतील विशेष हा कीं, अग्निष्टोमामध्यें सुत्येच्या ( शेवटच्या ) दिवशीं बारा शस्त्रांचें शंसन व बारा स्तोत्रांचें गान होतें व अत्यग्निष्टोमांत ही संख्या तेरा असते. अलीकडील काळांत या सप्त सोमसंस्था ( याग ) वेगवेगळाल्या कोणी करीत नाहीं. अग्निष्टोमानंतर शेवटची सोम-

संस्था जो सर्वपृष्ठनामक याग तोच करतात व त्यामध्यें मधील अत्यग्निष्टोम, उक्थ्य, षोडशी, अतिरात्र, वाजपेय यांचा समावेश केला जातो. याचा उल्लेख संहिता ग्रंथांत आढळत नाहीं.

**अत्राफ इ बाल्डा**—हैद्राबाद संस्थानांतील एक जिल्हा. याचा बहुतेक भाग डोंगराळ आहे. मुशी व मांजरा या नद्या या जिल्ह्यांतून वाहतात. संरक्षित व इतर जंगलांत चित्ते, अस्वल, तरस व कधीं कधीं वाघ वगैरे श्वापदें आढळतात. तळीं व पाण्याचे प्रवाह पुष्कळ असल्यामुळें या जिल्ह्यांतील हवा सर्द आहे व पावसाळ्यांत मलेरिया तापाचा आजार बराच सुरू असतो. आक्टोबर ते मार्चपर्यंत हवा निरोगी असते. वार्षिक पाऊस सरासरी ३३ इंच पडतो.

**इ ति हा स**—हा जिल्हा ११५० ते १३२५ पर्यंत वारंगळच्या काकतीय राजांच्या ताब्यांत होता; परंतु मुसलमानांनीं दख्खन जिंकिल्यापासून तो त्यांच्याच ताब्यांत आहे. सुलतान महमद-शहा ब्राह्मणी ह्याच्या कारकीर्दींत तेलंगणचा सुभेदार स्वतंत्र होऊन त्यानें १५१२ त सुलतान कुली कुतुबशहा ही पदवी धारण केली. अवरंगजेब बादशहानें हा जिल्हा कुतुबशाही राजांपासून घेऊन दिल्लीच्या साम्राज्यास जोडला; पुढें अठराव्या शतकाच्या पूर्वार्धांत हैद्राबाद संस्थानची स्थापना होऊन त्यांत ह्या जिल्ह्याचा समावेश झाला.

हैद्राबादच्या पश्चिमेस गोवळकोंड्याचा किल्ला ही कुतुबशाही राजांची राजधानी होती.

हैद्राबाद शहर सोडून इतर भागाची लोकसंख्या सुमारें सवाचार लक्ष आहे. शें. ८७ लोक हिंदू आहेत; व ते तेलगू भाषा बोलतात.

**शे त कीः**—बहुतेक जमिनींत वाळूचें प्रमाण जास्त आहे. ज्वारी, बाजरी व तांदूळ हीं येथील मुख्य पिकें होत.

कंकर, बासाल्ट व ग्रानाइट हे खनिज पदार्थ या जिल्ह्यांत सांपडतात. अंबरपेट तालुक्यांत अशुद्ध सोडा (crude carbonate of soda ) व पाटलूर तालुक्यांत शहाबादी दगड सांपडतात.

**व्या पा र आ णि द ळ ण व ळ णः**—चांदूर येथें साड्या व हातरुमाल, आणि असफनगर येथें तांब्याचीं व पितळेचीं चांगलीं भांडीं होतात. ज्वारी, तांदूळ व इतर धान्यें, कापूस, गूळ, तंबाखू, कातडीं, हाडें, वगैरे पदार्थ या जिल्ह्यांतून बाहेर जातात, व मीठ, अफू, रेशमी सुती कापड, केरोसीन वगैरे जिन्नस बाहेरून येतात. हैद्राबाद हें व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे; पण इतर पुष्कळ ठिकाणीं दर आठवड्यास बाजार भरतो.

निजाम स्टेट रेलवे या जिल्ह्यांतून पूर्वपश्चिम गेलेली आहे. हैद्राबादहून हैद्राबाद गोदावरी व्हॅली, हा आगगाडीचा फांटा निघतो. हैद्राबादहून पांच सडका निघतात. पहिली शामसाबाद-वरून महबूबनगरला; दुसरी नलगोंदला तिसरी विवीनगरवरून भोंगीरला; चवथी मेदचलला, पांचवी लिंगपलीवरून पतंचेरूला जाते. दुसरी एक सडक धारूरवरून कोहीरला जाते.

**रा ज्य व्य व स्था व गै रेः**—या जिल्ह्यांत सहा तालुके आहेत. मेदचल, जकल, पतलूर, असफनगर, अंबरपेट, शहाबाद. दोन तालुक्यांचा एक विभाग करून त्यावर तालुकदार नेमिलेला असतो, व प्रत्येक तालुक्यावर तहसिलदार असतो. या जिल्ह्यांत लोकल बोर्ड अद्याप स्थापन झालेलीं नाहींत. हैद्राबाद संस्थानांतील इतर जिल्ह्यांच्या मानानें हा जिल्हा शिक्षणाच्या बाबतींत बराच पुढें गेलेला आहे. १९०१ मध्यें शें ३-५ लोकांना लिहितां वाचतां येत होतें.

**अत्रावळीः**—हें गांव, संयुक्त प्रांतांत, अलीगड जिल्ह्यांतील अत्रावली तालुक्यांत आहे. १९०१ मध्यें याची लो. सं. १६५६१ होती. १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं हें गांव जून पासून सप्टेंबरपर्यंत बंडखोरांच्या ताब्यांत होतें. दंगेखोरपणा-बद्दल येथील मुसलमानांची ख्याती आहे.

**अत्रिः**—मूळ शब्दार्थ "खाणारा" असा आहे. हा महर्षि अग्नि, इंद्र, अश्विन् व विश्वेदेवता यांच्या सूत्रांचा कर्ता म्हणून वेदांत आला आहे. याच्या संबंधीं वैदिक वाङ्मयांतील माहिती विभाग तीन दाशराज्ञ युद्ध या प्रकरणांत व शब्दसृष्टि प्रकरण ५ यामध्यें येऊन गेली आहे. यासंबंधाची पौराणिक माहिती पुढीलप्रमाणें मांडतां येईल. स्वायंभुव मन्वंतरामध्यें, प्रजोत्पादनार्थ, ब्रह्मदेवानें जे दश मानसपुत्र निर्माण केले होते, त्यांतील हा एक असून ब्रह्मदेवाच्या नेत्रापासून उत्पन्न झाला होता. व यास, कर्दम प्रजापतीच्या कन्यांतील अनसूया नामक कन्या, ही स्त्री होती. यास तिचे ठायीं दत्त, दुर्वासा, आणि सोम, असे तीन पुत्र झाले होते. पुढें त्याच मन्वंतरांत, सर्व ब्रह्ममानसपुत्र महादेवाच्या शापानें मरण पावले, त्यांत हाहि मरण पावला होता.

(२) पूर्वीचे ब्रह्मपुत्र मरण पावले असतां, ब्रह्मदेवानें, त्यांस, चालू वैवस्वत मन्वंतरारंभीं, पुनः उत्पन्न केलें, त्यांत हा ब्रह्मदेवानें स्वतः यज्ञ केला, त्यांतील अग्नीच्या अर्चि ( ज्वाला ), त्यांपासून उत्पन्न झाला होता. येथेंहि यास, अनसूयाच स्त्री होती, मात्र दत्त, दुर्वासा, सोम, आणि अर्यमा, असे चार पुत्र, व अमला नामक महाब्रह्मनिष्ठ कन्या, अशीं अपत्यें होतीं. हा प्रस्तुत, प्रति ज्येष्ठमासीं असणाऱ्या द्वादशादित्यांतील एका आदित्यासमागमें संचार करीत असतो.

दाशरथि राम, दंडकारण्यांत चालला असतां, याच्या आश्रमास गेला होता. त्या कालीं यानें, त्याचें उत्तम प्रकारानें, आदरातिथ्य केलें होतें, तसेंच अनसूयेनेंहि, सीतेचें आतिथ्य करून, तिला पातिव्रत्यविषयक नीति सांगितली होती. पुढें, राम जाण्यास निघाला असतां, सीताहि निघाली तेव्हां, तिला, मार्गसंबंधीं श्रम, व राक्षसांपासून भीति इ० होऊं नयेत, म्हणून अनसूयेनें, अंगरागादिक उत्तम उत्तम वस्तु दिल्या, नंतर अत्रीनें सीता व लक्षण यांसहित रामास दंडकारण्याचा मार्ग दाखवून मार्गस्थ केलें ( वा. रा. अयो. स. ११७–११९ ).

याच्या कुलांत यासहित मंत्रद्रष्टे ऋषि सहा होते. ते असे मुख्य स्वतः हा, अर्द्धस्वन, श्यावाश्व, गविष्ठिर, कर्णक, आणि पूर्वातिथि. ( मत्स्य. अ. १४४ ).

याच्या वंशाची वृद्धि करणारे ऋषि नऊ. ते असे.—अत्रि, गविष्ठिर, वाद्भुतक, मुद्गल, अतिथि, वामरथ्य, सुमंगल, बीजवाप, आणि धनंजय. यांत अत्रिवंशांतील ऋषि, व त्यांची प्रवरव्यवस्था अशी.—उद्दालकि, शोण, कर्णिरथ, शौक्रतु, गौरग्रीव, गौरजिन, चैतायण, अर्द्धपण्य, वामरथ्य, गोपन, तकिबिंदु, कर्णजिव्ह, हरप्रीति, नैद्राणि, शाकलायनि, तैलप, वैलेय, दुसरा अत्रि, गोणिपति, जलद, भगपाद, सौपुष्पि, आणि छंदोगय, हे सर्व, आत्रेय, श्यावाश्व, आर्चनानस, अशा तीन प्रवरांचे होते.

गविष्ठिर कुलोत्पन्न, दाक्षि, बलि, पर्णवि, ऊर्णनाभि, शिलार्दनि, बीजवापि, शिरीष, मौंजकेश, दुसरा गविष्ठिर, आणि भलंदन, हे सर्व, आत्रेय, गाविष्ठिर, पौर्वातिथ आणि आत्रेय, गाविष्ठिर, आर्चनानस, अशा दोन भेदांनीं त्रिप्रवरांचे होते. वाद्भुतक कुलोत्पन्न, आत्रेय, आर्चनानस, वाद्भुतक अशा त्रिप्रवरांचे मुद्गलोत्पन्न, आत्रेय, आर्चनानस, पौर्वातिथ, अशा त्रिप्रवरांचे. धनंजय कुलोत्पन्न आत्रेय, आर्चनानस, धानंजय, अशा त्रिप्रवरांचे आणि अतिथि, वामरथ्य, सुमंगल, बीजवाप, या चारहि कुलोत्पन्नांस, आत्रेय, आर्चनानस, आतिथ, आणि आत्रेय, आर्चनानस, गाविष्ठिर, अशा दोन भेदांनीं तीन प्रवर असतात. मात्र यांत सुमंगल कुलास, आत्रेय, सुमंगल, श्यावाश्व, असा विशेष असतो.

कालेय, वालेय, वामरथ्य, धात्रेय, मैत्रेय, कौंद्रेय, शौभ्रेय, इत्यादिक ऋषि, अत्रीच्या कन्या वंशांतील होत म्हणून, यांस आत्रेय, वामरथ्य, पौत्री, असे तीन प्रवर असतात. ( मत्स्य० अ० १९६ ). या कन्याकुलांतील वंशाशीं, विश्वामित्र, आणि वसिष्ठ, यांतील कुलोत्पन्नांचा विवाह होत नाहीं.

(३) चालू वैवस्वत मन्वंतरांतल्या एकोणिसाव्या चौकडींत झालेला व्यास.

हा व्यास होऊन गेलेला अत्रि, अमुक असा निश्चय करतां येत नाहीं, म्हणून असें वाटतें कीं, वसिष्ठ आणि अंगिरा, या दोन कुलांत दोन अत्रि आढळतात, त्यांतील एक असावा.

(४) चालू मन्वंतरांतल्या सप्तर्षींतील एक, हाहि, वर सांगितलेल्या दोहोंतील एक असावा.

(५) गौतमऋषीचा मित्र, एक ऋषि, हा, द्वितीयार्थक जो शुक्र त्याच्या चार पुत्रांत दुसरा पुत्र अत्रि आहे, तोच असावा असें वाटतें. हा अत्रि, एकदां वेनकुलोत्पन्न एका राजाच्या यज्ञांत द्रव्ययाचनेकरितां गेला, आणि तेथें राजाची यानें, तूं केवळ ईश्वरच आहेस, अशी स्तुति केली. तिचा, वाह्यात्कारीं तिरस्कार करून, राजानें यास म्हटलें कीं, राजाची ईश्वराशीं साम्यता करून, स्तुति करणें योग्य नाहीं, तेव्हां दोघांतून कोणाचें म्हणणें खरें, असा त्या समेंत वाद पडला. शेवटीं, यथार्थ निर्णय व्हावा म्हणून, कांहीं सदस्य सनत्कुमारांकडे गेले व झालेलें वर्तमान त्यांनीं त्यांस सांगितलें, तें ऐकून सनत्कुमारांनीं, अत्रीचें म्हणणें खरें असें सांगतांच, त्यांनीं परत येऊन, तें म्हणणें राजास कळविलें, त्यावरून राजा संतुष्ट होऊन, त्यानें यास इच्छेपेक्षां अधिक द्रव्य देऊन मार्गस्थ करतांच, हा आपल्या आश्रमास परत आला ( भार० वन० अ० १८५ ).

**अथगड**:—ओरिसांतील एक देशी संस्थान याच्या उत्तरेस धेनकानालचें संस्थान, पूर्वेस व दक्षिणेस कटक जिल्हा, आणि पश्चिमेस टिग्रिया व धेनकानालचीं संस्थानें आहेत. येथील जमीन सपाट व सुपीक असून येथें मुख्यत्वेंकरून भाताचें उत्पन्न होतें.

या संस्थानचा मूळपुरुष श्री. करणनीलाद्री ववार्त पाटनाईक हा होय. तो प्रथम पुरीच्या राजाचा प्रधान होता. राजानें खूष होऊन त्याला हें संस्थान दिलें असें कांहींचें मत आहे. व कांहीं असें म्हणतात कीं, राजानें आपली बहीण त्यास देऊन हें संस्थान आंदण दिलें. संस्थानाची लोकसंख्या सुमारें चवेचाळीस हजार आहे. १९०१ मध्यें यांपैकीं फक्त २६४३ हिंदु नव्हते. ( इं. गॅ. ).

**अथणी तालुका**:—मुंबईप्रांतांत बेळगांव जिल्ह्यांतील ईशान्येकडचा एक तालुका १९२१ मधील लो. सं. १२४६७८. अथणी व कुडची हीं या तालुक्यांतील मोठीं गांवें आहेत. बहुतेक जमीन ओसाड व वृक्षरहित आहे. हवा कोरडी व निरोगी आहे. या तालुक्याच्या दक्षिण भागांतून कृष्णा नदी वहाते.

**अथणी गांव**:—मुंबई इलाखा बेळगांव जिल्हा उ. अ. १६° ४०' व पू. रे. ७५° ७'. बेळगांवच्या ईशान्येस सुमारें ७० मैलांवर हा गांव आहे. लोकसंख्या (१९२१) १३५३८. जुना गांव पडका असून त्याचे उत्तरेकडील व दक्षिणेकडील दरवाजे अद्यापि पहावयास मिळतात. येथें दर रविवारीं व सोमवारीं बाजार भरतो; व गुरांचा बाजार बराच चालतो. इ. स. १८५३ सालापासून येथें म्युनिसिपालिटी आहे. ( इ. स. १८८२-८३ सालीं तिचें उत्पन्न १२५३० रुपये व खर्च १४०४० रुपये होता. ) येथें ५१६ जिनिंगचे कारखाने आहेत. मुख्य पीक कापूस, तसेंच जोंधळा वगैरे धान्यें होतात. गांवांत एक हायस्कूल, ए. व्ही. स्कूल, प्राथमिक शाळा आहेत. येथून विजापूरला मोटार जाते. येथें एक पडकी मातीची गढी असून तींत दोन वाडे आहेत. सिद्धेश्वर, अमृतेश्वर अशीं दोन जुनीं देवळें असून एक मशीदहि आहे.

इ ति हा सः—इ. स. १६३९ सालीं फ्रेंच प्रवासी मंदेलस्लो यानें अथनी शहर ( Atteny city ) असा उल्लेख केला असून विजापुर आणि गोवा यांच्या दरम्यान मोठ्या व्यापाराचें ठिकाण आहे ( Harris' Voyages II 129 ) असें वर्णन केलें आहे. इ. स. १६७० सालीं इंग्लिश भूगोलवेत्ता आजिल्वी यानें हा गांव विजापुरापासून दोन दिवसांचे रस्त्या-

वर असून व्यापाराचें ठिकाण आहे असें लिहून ठेवलें आहे ( Atlas V 247 ). इ. स. १६७५ सालीं इंग्रज प्रवासी फ्रायर यानें हुटणी ( Huttaney ) या नांवानें याचा उल्लेख केला आहे (East India and Persia 175). इ. स. १६७९ सालीं मोंगल सेनापति दिलावरखान याच्या ताब्यांत हा गांव होता. हा गांव त्यानें शिवाजीपासून जिंकून लुटला होता. पितापुत्रांचें भांडण झाल्यामुळें संभाजी याचे पूर्वी कांहीं दिवस दिलावरखानाकडे येऊन राहिला होता. येथील लोकांस गुलाम म्हणून विकून टाकण्याची इच्छा दिलावरखानाची होती परंतु संभाजी या गोष्टीविरुद्ध होता. तथापि खानानें संभाजीच्या मताकडे दुर्लक्ष केलें, त्यावरून संभाजी रागावून पुन्हां आपल्या बापास जाऊन मिळाला. यावेळीं इंग्लिशांच्या कारवार येथील वखारीशीं या गांवाचा बराच व्यवहार होता. इ. स. १७२० सालीं निजामानें हा गांव सर केला होता. परंतु आपला त्यावेळचा दोस्त कोल्हापुरचा राजा याचे हवाली केला; व त्यानें इ. स. १७३० सालीं सातार्‍याचे शाहु छत्रपतीस देऊन टाकला. इ. स. १७९२ सालीं कॅ. मूरनें हा महत्त्वाचा व्यापारी गांव होता, असें वर्णन केलें आहे. येथील दक्षिण व पश्चिम दरवाजे रास्त्यांनीं बांधले आहेत. इ. स. १८३९ सालीं निपाणीचा संस्थानिक निपुत्रिक मरण पावल्यामुळें हा गांव ब्रिटिश सरकारकडे आला. ( बॉ. गॅ. ).

**अथमलिकः**--बंगालमध्यें ओरिसाचें एक मांडलिक संस्थान, याच्या उत्तरेस रैराखोलचें संस्थान, दक्षिणेस महानदी, आणि पश्चिमेस सोनपूर व रैराखोल हीं आहेत. प्रतापदेव हा या संस्थानचा मूल पुरुष होय अशी दंतकथा आहे. पुरीच्या राजानें त्याच्या सात भावांपैकीं दोघांस ठार मारिल्यावर, त्यानें अथमलिक येथें येऊन डोम राजास ठार मारून संस्थान आपल्या ताब्यांत घेतलें. १८९४ मध्यें इंग्रजांनीं येथील राजास ओरिसांतील इतर संस्थानिकांप्रमाणें सनद दिली. संस्थानचें उत्पन्न ७१००० रु. आहे. राजा इंग्रजांस वार्षिक खंडणीदाखल ४८० रु. देतो. इमारती लांकूड, तांदूळ, व गळिताचीं धान्यें यांचा व्यापार बैलगाड्यांनीं व नावांनीं होतो. येथें कटकवरून जावें लागतें. बी. एन्. रेलवेवर हें स्टेशन आहे. पाऊस सरासरी ५१·८२" असतो. लोकसंख्या (१९११) ५३७६६.

**अथर्वणः**--प्राचीन अग्निउपासक पुरोहितास अथर्वन् असें म्हणत. पुढें हें नांव सरसकट सर्व भिक्षुकांस पडलें. 'अथर्वन्' हा शब्द पर्शुभारतीय काळचा असून अवेस्तांतील अथ्रवन् याशीं संबद्ध दिसतो. ( वेदविद्या पा. ५२ पाहा ). ब्राह्मण जातीचा उदय होऊन त्यांच्याकडे पौरोहित्य येण्यापूर्वी अथर्वण वर्गाकडे भारतीयांचें पौरोहित्य असावें असा एक समज आहे. अथर्वणांचा वेद अथर्ववेद असून त्याच्या शाखा कसकशा पडत गेल्या हें पुढील उतार्‍यांत दिलें आहे:--

व्यासमहर्षींनीं यजुर्वेद महातरूची अथर्वसंज्ञक चौथी शाखा आपल्या अत्यंत तेजस्वी 'सुमंतु' नामक शिष्याला सांगितली आणि सुमंतूनें त्या शाखाविभागाचें आपल्या 'कवंध' नामक शिष्याकडून अध्ययन करविलें. कवंधानें त्या संहितेचे दोन शाखाभेद केले आणि देवदर्श व पथ्य या दोन शिष्यांना पढविले. मौद्ग, ब्रह्मवली, शौलकायनि, पिप्पलाद व आणखी दुसरे कित्येक, देवदर्शाचे शिष्य झाले. पथ्याचेहि जाजलि, कुमुदादि व शौनक असे तीन शिष्य संहिताकार झाले. शौनकानें आपली संहिता दोन ठिकाणीं करून एक बभ्रूला व एक सैंधवायनाला दिली. सैंधवायन व मुंजकेश यांच्या शिष्यांनींहि आपआपल्या संहितेचे दोन दोन विभाग केले. श्रेष्ठ अशा आथर्वणांच्या संहितांचे नक्षत्रकल्प, वेदकल्प, संहिताकल्प, आंगिरसकल्प आणि शांतिकल्प असे पांच भेद आहेत. वायु पुराणांत असलेली हकीगत प्रायः अशीच आहे. फक्त सैंधवायनानें आपल्या मुंजकेशनामक शिष्याला आपली संहिता दोन ठिकाणीं विभागून दिली, इतकाच फरक आहे. परंतु त्यानें विष्णुपुराणास विरोध न येतां उलट एकवाक्यता होते. सैंधवायन व मुंजकेश या गुरुशिष्यांच्या पुढें होणार्‍या शिष्यांनीं आपआपल्या संहितांचे दोन दोन विभाग केले असा विष्णु पुराणांतील श्लोकाचा अर्थ घेतला म्हणजे कांहीं भानगड राहात नाहीं. वायु पुराणांत आलेल्या नांवाचा विष्णु पुराणांतील नांवांशीं किंचित् फरक आहे पण तो फक्त नांवाचा आहे. मौद्गलाला मौद म्हटलें आहे, शौलकायनीला शौष्कायनि म्हटलें आहे व देवदर्शाच्या जागीं वेदस्पर्श आला आहे, एवढेंच काय तें. पंचकल्पांपैकीं दुसरा कल्प जो 'वेद' त्याच्या ऐवजीं 'वैतान' असें नांव आलें आहे. अथर्ववेदतरूच्या एकंदर ९ शाखा विस्तारल्या व त्याला पांच कल्परूपी फळें लटकलीं. चरणव्यूहामध्यें अथर्वसंहिता भेदाच्या नांवाची यादी आहे ती अशीः--पिप्पल, दान्त, दामोदांत, औतपन, जावाली, शौनक, ब्रह्मपलाश व देवदर्शी आणि चारणविद्य खेरीज कल्पापैकीं वैतानास 'विधानकल्प' व आंगिरसकल्पास 'अभिचारकल्प' असा नांवांत फरक आहे. ( 'स्वाध्याय' वर्ष १ लें, अंक १ ला. )

अथर्वणांचा वैदिक इतिहास तिसर्‍या विभागांत आलाच आहे. सध्यां हिंदुस्थानांत या वर्गाचें अस्तित्व बहुतेक नष्ट झालें असून कोठेंकोठें यांचे अवशेष दिसून येतात.

अ थ र्व वे दी ब्रा ह्म णां सं बं धीं आ धु नि क मा हि ती-- या प्राचीन वर्गाची सध्यांची महाराष्ट्रांतली स्थिति लक्षांत येण्यासाठीं सातारा जिल्ह्यांतील चिंधवली गांवीं राहाणार्‍या रा. अंताजी काशीनाथ कुळकर्णी ( काळे ) या अथर्वण शाखीय गृहस्थांनीं पुढील माहिती दिली आहे. रा. कुळकर्णी यांचें घराणें चिंधवलीस दोन तीनशें वर्षांपासून आहे, त्यांचें गोत्र भालंदन, व प्रवर काश्यप, आवत्सार, नैध्रुव असे आहेत. यांचे कुलगुरु नागेश भट बि. वाळंभट जोशी नांवाचे कौशिक गोत्री माहुलीकर ब्राह्मण होते. भालंदन गोत्राखेरीज भारद्वाज, उपमन्यू,

कौशिक व शावास्य ( श्यावाश्व ? ) हीं त्यांच्या शाखेचीं गोत्रें होत. चिंधवलीस अथर्वणांचीं तीन घरें आहेत, कांहीं मलवडीस आहेत. यांचे धर्मविधी गेलीं १५।२० वर्षें यांच्या शाखेप्रमाणें होत नाहींत. या शाखेचे विधी करणारे ब्राह्मण हल्लीं सांगली व ग्वाल्हेर संस्थानांत आढळतात. रा. कुळकर्णी यांना त्यांच्या शाखेच्या ब्राह्मणांची वस्ती कोठें कोठें आहे असें विचारितां त्यांनीं पुढील ठिकाणें सांगितलीं.

१ वांई तालुकाः–चिंधवली. २ सातारा तालुकाः–माहुली संगम, चिंचणेरे–महागांव. ३ कोरेगांव तालुकाः–जायगांव. ४ माण तालुकाः–मलवडी, दहिवडी, विदाल, महिमानगड. ५ खटाव तालुकाः–मोळ, दिसकळ, वूध, पुसेगांव, कडगुण, खटाव, खादगुण, जाखणगांव, अंभेरी, जायगांव, निढळ, उंवरमळे, कुरवली ( सिद्धेश्वराची ), कातरखटाव. ६ सांगली संस्थान. ७ पुणें जिल्हा. काशी, प्रयाग, गया, लष्कर, इत्यादि ठिकाणींहि यांची तुरळक वस्ती आहे.

महाराष्ट्रांत या शाखेचे शरीरसंबंध देशस्थ, क्वचित कऱ्हाडे ब्राह्मण, ऋग्वेद,–अथर्वण,–आपस्तंव शाखीय, यांच्याशीं होतात. आपला वेद सर्वांत वडील असल्याचें हे ब्राह्मण मानतात. या वेदाचें आधिदैवत्य भार्गवरामाकडे दिलें जातें. पूर्वी श्री. छत्रपति सरकार यांनीं या ब्राह्मणांची परीक्षा करण्याचें योजिलें असतां नैवेद्याच्या पदार्थांचीं फुलें झालीं व छत्रपतींनीं या ब्राह्मणांना मोठीं वेतनें दिलीं अशी आख्यायिका सांगतात. श्राद्धपक्षांत पितरांचा नामोच्चार करितांना प्रथम पणजे, मग आजे व नंतर शेवटीं वडील म्हणजे आदित्य, रुद्र, वसुरूपः अशी परंपरा म्हणतात. सांगली संस्थानांत शावास्य गोत्री बापूआणा गोरे या नांवांचे गृहस्थ मोठे विद्वान् आहेत.

**अथर्वणाचार्यः**––हा तेलगू ब्राह्मण कवि फार जुना आहे. सुमारें ३॥ हजार वर्षांपूर्वी हा होऊन गेल्याविषयीं सांगतात. संस्कृत आणि तेलगू या दोन्ही भाषा यास उत्कृष्ट येत होत्या. महाभारताच्या सारांशावर जो यानें तेलंगी भाषेंत ग्रंथ रचिला तो तुटक तुटक अशा रीतीनें कांहीं कांहीं उपलब्ध आहे. याच्या मागून झालेल्या कवींच्या ग्रंथांत याच्या कवितेचा पुष्कळ भाग त्यांनीं घेतलेला आढळतो. ( परशा–तेलगूवाङ्मय; जनार्दन रामचंद्र–कविचरित्र ).

**अथर्ववेद**––या वेदासंबंधीं सामान्य माहिती वेदविद्या या विभागांत तिसऱ्या प्रकरणांत दिली आहे. त्यावरून या वेदाचें सामान्य स्वरूप लक्षांत येईलच. यज्ञांतील चार मुख्य ऋत्विजांपैकीं ब्रह्मा हा अथर्ववेदी असावा या कल्पनेचा उदय कसा झाला, अथर्व्यांचें पौरोहित्य त्रैविद्यांनीं कसें हिसकावून घेतलें वगैरे माहिती दुसऱ्या व तिसऱ्या विभागांत प्रसंगोपात दिलीच आहे. अथर्ववेदांगभूत जें सूत्र वाङ्मय आहे त्यासंबंधीं विवेचन येथें देण्याचें योजिलें आहे.

१ वैतानसूत्र

**अथर्ववाङ्मयांत स्थान**––अथर्ववेदाचे धर्मविधि किंवा संस्कार ज्यांत सांगितले आहेत असे पांच ग्रंथ आहेत; यांना श्रुति इतके महत्त्वाचे ग्रंथ मानतात. ते पुढें दिले आहेतः–– (१) कौशिकसूत्र किंवा संहिताकल्प किंवा संहिता विधि. (२) वैतानकल्प किंवा वैतानसूत्र. ( ३ ) नक्षत्रकल्प. ( ४ ) शान्तिकल्प (५) अंगिरसकल्प किंवा अभिचारकल्प किंवा विधानकल्प.

अथर्ववेदाच्या नऊ शाखा किंवा भेद फार पुरातन कालापासून करण्यांत आलेले आहेत; पैकीं चार शाखांचे वरील पांच ग्रंथ आहेत. त्या चार शाखा येणेंप्रमाणें––

१ शौनकीय २ अक्षल ३ जलद ४ ब्रह्मवद. अथर्ववेदस्य नवभेदा भवन्ति । तत्र चतसृषु शाखासु शौनकादिषु कौशिकोऽयं संहिता विधिः । ( अथर्ववेद पद्धति–उपोद्घात ).

पैप्पलाद ह्या नांवाच्या एका अथर्ववेदाच्या शाखेचें नांव सर्वांमध्यें अधिक परिचित आहे. कौशिक व वैतान सूत्रें ह्या शाखेचीं नाहींत; कारण त्या सूत्रांत प्रतीकांचीं अवतरणें न घेतां पैप्पलादाचे मंत्र सबंधच्या सबंध घेतलेले आहेत. शौनक व देवदर्शी यांच्या मापनाविषयीं मतांना विरोध करण्यांत आला आहे; व कौशिकसूत्र ८५-६-७ येथें कौशिकसूत्र शौनकीय शाखेचें आहे असें स्पष्टपणें सांगितलें आहे. शौनकीनांचें मत शेवटीं दिलें आहे; आणि कौशिकाच्या नेहमींच्या पद्धतीप्रमाणें तें ग्राह्य समजलें पाहिजे.

वर जीं पांच श्रौतसूत्रें ( किंवा ५ कल्प ) दिलीं आहेत त्यापैकीं आंगिरस किंवा अभिचारकल्प हें अथर्ववेदाचें परिशिष्ट आहे; त्यांत अभिचार किंवा जादुटोणा या विषयासंबंधीं लिहिलें आहे. कौशिक सूत्राच्या ६ व्या अध्यायाच्या स्पष्टीकरणास अभिचार कल्पाचा थोडासा उपयोग होण्यासारखा आहे.

नक्षत्रकल्प व शान्तिकल्प हीं दोन्ही सुद्धां अथर्ववेदाचीं परिशिष्टेंच आहेत. हें त्यांच्या नांवावरून समजण्यासारखें आहे. ब्रह्मवेदपरिशिष्टे–नक्षत्रकल्पाभिधानम् । एके ठिकाणीं नक्षत्रकल्पाला पहिलें परिशिष्ट म्हटलें आहे; व परिशिष्टांच्या यादींत त्याचें नांव प्रथम घातलें आहे.

**कौशिक व वैतान सूत्राचा परस्पर संबंधः**–– कौशिक व वैतानसूत्रें यांत संस्कार सांगितले आहेत; परंतु इतर वेदांच्या शाखांतील ज्या सूत्रांत संस्कार सांगितले आहेत त्या सूत्रांच्या परस्पर संबंधाहून कौशिक व वैतान सूत्रांचा परस्पर संबंध व त्यांचा अथर्व संहितेशीं संबंध अनेक बाबतींत निराळा आहे. त्रैविद्यम् किंवा त्रयी विद्या असें इतर तीन वेदांना म्हटलें आहे; व त्यायोगें अथर्ववेदांतील सूत्रें वेद संज्ञेस पात्र असण्याबद्दल संशय दर्शविला आहे. श्रौत संस्कारांत अथर्व वेदांतील सूक्तांचा उपयोग करण्यास तीं अपात्र आहेत अशी समजूतहि व्यक्त झाली आहे. ब्राह्मणांत गोपथ ब्राह्मण व श्रौत सूत्रांत वैतानसूत्र हीं अनुक्रमें ब्राह्मणवाङ्मय व श्रौत-

वाङ्मय यांतील अगदीं अलीकडील रचलेले ग्रंथ आहेत. अथर्ववेदांत गोपथ ब्राह्मण आहे इतर वेदांतील चरणांत वाङ्मय लिहिण्याची जी पद्धत प्रचारांत होती तिचें अनुकरण गोपथ ब्राह्मण व वैतानसूत्र यांत केलेलें आहे. वैतानसूत्रासंबंधीं ही हकीकत झाली. पण मान्त्रिकविद्या, भूत काढणें वगैरे ज्या वेदांत आढळतात, त्या वेदाला चिकटून राहणाऱ्या मनुष्याच्या जीवितक्रमाविषयीं व त्याच्या भूत काढण्याच्या वगैरे क्रियांसंबंधीं प्रत्यक्ष व्यवहारांत अनेक गोष्टी प्रचलित होत्या व इतर वेदांना माहीत नसणाऱ्या अनेक गोष्टी या अथर्ववेदानुयायांकडून जगापुढें मांडल्या गेल्या. अथर्वण ग्रंथांत अथर्ववेदांतील सर्वांत मोठ्या व महत्त्वाच्या कौशिक सूत्राला जी उच्च स्थिति प्राप्त झाली आहे ती वरील कारणामुळेंच होय.

गृह्यसूत्रें श्रौतसूत्रांवर अवलंबून आहेत. गृह्यसूत्रांत श्रौतसूत्रांचा उल्लेख अनेक ठिकाणीं स्पष्टपणें केलेला आहे.

श्रौतसूत्रांत ज्या विधींचें एकदां वर्णन आलें आहे त्यांचें पुन्हा वर्णन गृह्यसूत्रांत केलेलें नाहीं.

आपस्तंबांत धर्मविषयक सर्व सूत्रें एकेठिकाणीं केलीं आहेत; आपस्तंबाच्या सूत्रग्रंथांत श्रौतसूत्र गृह्यसूत्राच्या अगोदर आलें आहे.

गृह्यसूत्रें बरोबर रीतीनें कळण्यास मुख्य अडचण ही येते कीं तीं श्रौतसूत्रांवर सर्वस्वी अवलंबून असून जणू काय त्यांचीं परिशिष्टें आहेत असें दिसतें व श्रौतविधींची माहिती पूर्णपणें आपणांस आहे असें तीं सूत्रें गृहीत धरतात.

कौशिक व वैतानसूत्रें यांतील परस्पर संबंध वर दिलेल्या गृह्य व श्रौतसूत्रांतील संबंधासारखा नाहीं. कौशिकसूत्र वैतानसूत्रावर कोणत्याहि रितीनें अवलंबून नाहीं; उलट वैतानसूत्र कौशिकसूत्रावर अवलंबून आहे ही गोष्ट ज्या ठिकाणीं दोन्ही सूत्रांतील विषयांत फरक असेल व श्रौतविधि व गृह्यविधि यांत फरक असेल तेथें दृष्टोत्पत्तीस येते. म्हणून वैतानसूत्रासंबंधीं बहुतकरून असें म्हणतां येईल कीं, अमुक एका शाखेंत ज्यांची सावकाश व धिम्मेपणानें वाढ झाली आहे अशा श्रौतसंस्कारांतील विधींपासून वैतानसूत्र आपोआप सहज बनलेलें नाहीं; तर तें सूत्र मुद्दाम तयार करण्यांत आलें; व तें ज्या वेळेस अथर्ववेदानुयायांना त्यांचे इतर वेदांच्या पुरोहितांबरोबर वादविवाद चालू असत त्यावेळीं वेदांतील संस्कार व विधी करण्याकरितां आपला स्वतःचा एक सूत्रप्रन्थ असावा असें वाटावयास लागलें त्या वेळेस तयार करण्यांत आलें. वैतान सूत्रास अथर्व वेदांतील संस्कारांचा पाया असें म्हणतां येणार नाहीं; कारण त्यांत दुसरीकडून उसना घेतला नाहीं असा किंवा कौशिक सूत्रांत आढळत नाहीं असा फारच थोडा भाग आहे. वैतानसूत्रांत यजुःसंहितेंतील अनेक ऋचा व पाठ आढळतात; व संस्कारांचें वर्णन करितांना त्यांत कात्यायनाच्या श्रौतसूत्राचें अनुकरण केलेलें स्पष्ट दिसतें. वैतानसूत्र १. १. ८. देवता हविर्दक्षिणा यजुर्वेदात्। ह्या वाक्यावरून ही गोष्ट आपोआपच उघड दिसते. याच वरून दुसरी गोष्ट अशी दिसून येते कीं वैतान व कात्यायन ह्यांचा परस्परसंबंध असावा. कारण कात्यायनावर लिहिलेल्या भाष्यांत वैतानसूत्र, आथर्वण किंवा अथर्व-सूत्र या नांवांखालीं वैतान सूत्रांतील अनेक वार अवतरणें घेतलीं आहेत. वैतानसूत्र व कौशिकसूत्र यांच्या परस्परसंबंधाविषयीं असें म्हणतां येईल कीं कौशिक सूत्र ही दुसरी एक स्वतंत्र संहिता आहे असें समजून अशी गोष्ट गृहीत धरली आहे कीं कौशिकांतील संस्कार व अथर्व वेदांतील मन्त्राहून निराळ्या ठिकाणाहून घेतलेले मंत्र हे वाचकांना माहीत आहेत व त्यांचा त्यांना अर्थहि समजला आहे.

वैतान सूत्राची उत्तमप्रत व त्याचें उत्तम भाषांतर गार्बे साहेबांनीं संपादिलेल्या वैतान सूत्र ग्रन्थांत आढळतें.

अं त र् र च ना—वैतान सूत्रांतील कांहीं मजकूर अथर्व वेदांतील कांहीं भागाशीं शब्दशः जुळतो. वैतान सूत्रांतला कोणता भाग अथर्व वेदाच्या कोणच्या भागाशीं जुळतो तें पुढें दिलें आहे.

वैतान सूत्रांतील १. १९; १०. ५; ३७. २३; ३. १७; ९. ४; २८. ३२—इत्यादि सूत्रें अनुक्रमें अथर्ववेदांतील १९. ६९, १-४; १२. १, २३-२५; १८. ३, ८; ९; २, ४८; १, ६१; २, ५३; ४, ४४; ७. ११०, ३; ३; १०, ७; ३. १७, २ या सूक्तांशीं जुळतात. अथर्ववेदांतच फक्त आढळणारा असा वैतान सूत्रांतला मजकूर कौशिकांत येणारा मजकूर वगळल्यास फारच थोडा आहे.

वैतान सूत्रांत ब्राह्मण ब्रह्मवेदविद् असला पाहिजे असें म्हटलें आहे. ( वै. सू. १. १. ) ब्रह्मवेद हा शब्द कौशिकांत आढळत नाहीं; पण त्याचे ऐवजीं कौशिकांत व वैतान सूत्रांत एके ठिकाणीं भृग्वंगिरोविद् हा पुराण शब्द आढळतो (कौशिक ६३-३ व ९४-३ आणि वैतान १. ५ ). अथर्वाङ्गिरोविदं ब्रह्माणम्। गोपथ ब्राह्मण व परिशिष्टें यांतहि भृग्वंगिरोविद् शब्द आढळतो. ब्रह्मवेदविद् हा शब्द अलीकडचा दिसतो. अथर्ववेद व त्याचे पुरोहित यांचें श्रेष्ठत्व कोठें कोठें वैतानांत दर्शविण्यांत आलें आहे. उदाहरणार्थ वै. सू. ११. २ यांत सांगितलें आहे कीं, उद्गातृ, होतृ व अध्वर्यु यांच्या ऐवजीं अथर्वाङ्गिरोविद् ब्राह्मण पसंत करावा. अथर्वण वर्गांतील पुरोहित सर्वांत श्रेष्ठ आहे हें दाखविण्याचा प्रयत्न वै. सू. ६०. १ व ३७. २ यांत स्पष्टपणें केलेला दिसतो. ब्राह्मण पुरोहित व त्याचा वेद यांचा मोठेपणा दर्शविण्याकरितां अथर्व परिशिष्टांत शक्य तो प्रयत्न इतरांकरितां अपशब्द योजना करूनहि करण्यांत आला आहे.

अशा प्रकारचा प्रयत्न अथर्ववाङ्मयांतच केवळ करण्यांत आलेला आहे असें नाहीं. तर महाभाष्यांत अथर्ववेदाला वेदांमध्यें प्रथमस्थान देण्यांत आलें आहे. अथर्वाङ्गिरसाशीं पुरोहित परिचित असला पाहिजे असें याज्ञवल्क्यानें ( १. ३१२ )

म्हटलें आहे. ऋग्वेदाच्या गृह्यसूत्रांत तर्पणसमयीं अथर्वऋषि सुमन्तु याला ऋषींच्या यादींत प्रमुख स्थान देण्यांत आलें आहे (शाखा ५. १०, ३).

अथर्वण वाङ्मयांत वैतान सूत्राखेरीज इतरत्र कोठेंहि न आढळणारा असा वैतान सूत्रांत फारसा मजकूर नाहीं; मात्र वै. सू. २-१० व ४३-२५ यांत अभिचार स्वतंत्र रीतीनें आणला आहे. शौनक यज्ञाविषयीं माहिती इतरत्र आढळत नाहीं. शान्त्युदकाचें वर्णन वै. सूत्रांत ज्या उताऱ्यांत आलें आहे त्या उताऱ्यांतील संस्कारानें अथर्वण वाङ्मयांत एका संस्काराची भर पडली आहे.

कौशिकसूत्र व गोपथ ब्राह्मण यांत ज्याप्रमाणें पैप्पलाद शाखेंतील सूक्तें घेतलीं आहेत त्याप्रमाणें वैतानसूत्रांतहि स्वतंत्रपणें पैप्पलादांतील ३ सबंध सूक्तें घेण्यांत आलीं आहेत. (पैप्पलाद शाखा १०.१७; १४.१; २४.१).

वैतानसूत्र व कौशिक सूत्र यांचा परस्पर संबंध अनेक प्रकारचा आहे. वैतानसूत्राचे मुख्य आठ अध्याय आहेत; परंतु त्यांना प्रायश्चित्त सूत्रें जोडून वैतान सूत्राचे एकंदर १४ अध्याय करण्यांत आले आहेत.

कौशिक सूत्राचे १४ अध्याय आहेत तेव्हां वैतानाचेहि १४ च असावेत म्हणून वैतानाचे १४ करण्यांत आले असावेत. दोन्ही सूत्रांतील साम्याचीं आणखी कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेतः—(१) दोन्ही सूत्रांत अध्यायाच्या प्रारंभीं फार ठिकाणीं एक लांबलचक मन्त्र आढळतो. (२) अयस्‌ या स्वरूपांत ज्यांचें प्रथमेचें अनेकवचन असतें असे शब्द द्वितीयेप्रमाणें योजले आहेत. वै. सू. ११.२४ व कौ. सू. ८.१९. (३) दोन्ही सूत्रांत प्रसंगविशेषीं "ब्राह्मण" याचा उल्लेख ब्राह्मणोक्तम्। किंवा इतिब्राह्मणम्। या वाक्यानें करितात. (वै. सू. ७.२५ व कौ. सू. ६.२२; ८०.२.). (४) मन्त्रोक्त हा शब्द दोन्ही सूत्रांत पुष्कळ वेळां आढळतो (वै. सू. १. १४; कौ. सू. २१. ११). (५) सरूपवत्सा। हा शब्द कौशिक व वै. सू. यांत आढळतो. (६) शान्त्युदक हा शब्द वैतान सूत्रांत एकदांच आढळतो पण कौशिक सूत्रांत तो अनेकदां आढळतो (वै. सू. ५. १० कौ. सू. अध्याय ९).

वैतान सूत्रांत सांगितलेले ऋषि किंवा गुरु कौशिक सूत्रांत आढळतात. दोन्ही सूत्रांत जेथें अगदीं एक स्वरूपाचीं सूत्रें आढळतात अशींहि कांहीं उदाहरणें आहेत. उदा. वै. १.१-५. कौ. ६४. ३; ९४. ३; वै. २. २. कौ. २. ६; वै. ३. २०. कौ. ६. २३; वै. ७. २०. कौ ६. २०; वै. १२. ७. कौ. ५७. ५; वै. ३४. १२. कौ. १८. ७; वै. ४३. ७ कौ. ४. १८.

दोन्ही सूत्रांत वरील प्रकारचें साम्य आढळतें. तेव्हां कौशिक सूत्रांतून वैतान सूत्रांत साम्यदर्शक सर्वच उतारे घेतले आहेत अशी कल्पना करणें बरोबर होणार नाहीं. अथर्वणांतच आढळणारा असा अथर्वणांचा जो विशिष्ट मजकूर असेल तो कदाचित् अथर्ववेदानुयायांपुरताच कांहीं कालपर्यंत मर्यादित असेल; म्हणजे धर्मविषयक ग्रन्थ लिहिणाऱ्यांच्या उपयोगीं तो सर्वांस सारखाच पडावा; व यामुळें वैतान सूत्रांत कौशिकांतून किती भाग घेतला हें नक्की सांगतां येत नाहीं. वैतान सूत्र व गोपथ ब्राह्मण यांतील कांहीं उतारे अगदीं तंतोतंत जुळतात; पण तेवढ्यावरून गोपथ ब्राह्मण वैतान सूत्रापूर्वी रचलें गेलें किंवा काय हें अजमावतां येत नाहीं. उदा. वै. सू. २. १५=गो. ब्रा. १. ५. २१; वै. सू. ३. १०=गो. ब्रा. २. १. २.

तथापि वैतान व कौशिकसूत्रें यांतील एकाच विषयासंबंधीं विवेचनाकडे पाहिल्यास असें आढळून येतें कीं, कौशिकसूत्रांत कोणत्याहि गोष्टीविषयीं येणारें विवेचन पूर्ण असतें व वैतानांत तीच गोष्ट किंवा त्यांची मालिका ह्यांविषयीं विवेचन संक्षिप्त दिलेलें असतें; एखाद्या गोष्टीच्या समुदायाची हकीकत संक्षिप्त व तांत्रिक दिलेली असते. हा प्रकार इतक्या स्पष्टपणें दृष्टीस पडतो कीं लहानशा वैतानसूत्रांतील मजकुरावरून असें असण्याचें कारण काय ह्याचा उलगडा होत नाहीं. वैतानांत मधून मधून ऋषींचीं नांवें दिलीं आहेत. उदाहरणार्थ कौशिक, युवन् कौशिक, भागली, माठर, शौनक. परंतु कौशिकसूत्रांत हीं नांवें आलीं असून अधिक विस्तृत यादी दिली आहे; कौशिकसूत्रांत आणखी आढळणारीं नांवें पुढें दिलीं आहेतः— गार्ग्य, पार्थश्रवस्, कांकायन, परिवभ्रव, जातिकायन, कौरुपथि, इषुफालि व देवदर्श.

कौशिकसूत्राच्या ७ व्या व ८ व्या अध्यायांत परिभाषासूत्रें आहेत; पहिल्या ६ अध्यायांत दर्शपूर्णमास विधीचें वर्णन आहे; पण हे अध्याय मागाहूनचे आहेत हें सिद्ध करितां येतें.

परिभाषासूत्रें वैतानांत लागू पडत नाहींत तथापि वैतानसूत्र १०.२.३ यांत कौशिकसूत्र ८-१२ व ८-१३ ह्यांचा उपयोग केला आहे.

वैतानसूत्र कौशिकसूत्रावर अवलंबून आहे हें दर्शविण्यास वर दिला आहे त्याहूनहि जास्त बळकट पुरावा दाखवितां येईल. कौशिकसूत्रांत विस्तृतपणें वर्णिलेल्या विधींचा किंवा संस्कारांचा उल्लेख वैतानसूत्रांत आढळतो; पण वैतानांत संपूर्ण वर्णन न देतां त्या संस्काराच्या प्रारंभींच्या व शेवटच्या कार्याचा उल्लेख दिलेला असतो; उदाहरणार्थ, वै. सू. १. १९ व कौ. सू. ३. ४. वै. सू. ११. १४ व कौ. सू. २४. २६-३१. वै.सू २४. ३. व कौ. सू. ७. १४; १४०. १७. वै. सू. २४. ७ व कौ. सू. ६. ११-१३.

वरील पुरावा जरी भक्कम आहे तथापि वरील सारख्या बाबतींत वैतानानें कौशिकांतून उतारे उसने घेतले ही गोष्ट कायमची सिद्ध झाली असें याकोबी साहेबाप्रमाणेंच आम्हांसहि वाटत नाहीं. अथर्ववेदानुयायांत जे धर्मविधि किंवा संस्कार प्रचारांत होते ते कौशिक सूत्रें व वैतानसूत्रें या दोन ग्रंथांत स्वतंत्रपणें दिले असणें संभवनीय आहे; लेखनाच्या पद्धतींतील फरकामुळें व

लेखनाच्या धाटणींतील फरकामुळें कौशिकसूत्रांत संस्कारांचें पूर्ण वर्णन आलें आहे व वैतानांत फक्त त्यांची रूपरेखा दिलेली आहे; यापेक्षां जास्त कांहीं म्हणतां येत नाहीं. वैतानांत संस्कारासंबंधीं जी अर्धवट हकीकत देण्यांत आली आहे, ती पूर्ण करावयाची असल्यास कौशिकसूत्रांच्या मदतीनें तें कार्य होण्यासारखें आहे असें वैतानसूत्रांत कोठेंहि सांगितलेलें नाहीं. असें जरी आहे तथापि हा पुरावा अगदींच पोचट आहे; व म्हणून वैतानसूत्र ५.१० हाच पुरावा आपण पत्करूं. गार्बेसाहेबांना ५.१० चें भाषांतर करितां येईना; अशी त्यांनीं कबुली दिली आहे; याचें कारण असें दिसतें कीं, चित्यादिभिराथर्वणीभिः । हे शब्द सूत्रदर्शक आहेत अशी गार्बेसाहेबांची चुकीची समजूत झाली आहे. परिभाषासूत्र कौशिक ८.१६ च्या आधारें वै. सू. ५. १० याचें उत्तम रीतीनें स्पष्टीकरण करितां येतें. वैतानसूत्र ५. १० यांत शान्त्युदक बनविण्याकरितां उपयोगांत आणल्या जाणाऱ्या पवित्र वस्तूंची ( विशेषेंकरून या वस्तु वनस्पतीच आहेत ) याद दिलेली आहे. वै. सू. त यांना आथर्वण म्हटलें आहे व त्यानंतर दुसरी जी याद दिली आहे तिला आङ्गिरस म्हटलें आहे. कौशिकसूत्रांत ही दुसरी याद दिलेली नाहीं. कौशिकसूत्रांत पहिली यादी पूर्ण दिली असल्यामुळें वैतानसूत्रांत ती त्रोटकरूपानें दिली आहे; व कौशिकांत दुसरी यादी दिलेली नाहीं म्हणून वैतानांत दुसरी यादी संपूर्ण दिलेली आढळते. व ह्याच एका गोष्टीवरून असें म्हणतां येईल कीं वैतानसूत्र कौशिकसूत्रावर स्पष्टपणें अवलंबून आहे; व कौशिकसूत्रानंतर तें रचलें गेलें. हीच गोष्ट आणखी एका रीतीनें पारिभाषिक शब्दांसंबंधीं पुराव्यानें सिद्ध होते. दोन्ही सूत्रांत त्या त्या सूत्रांतील एखाद्या सूत्राचें अवतरण घेतांना त्या सूत्रांचीं प्रतीकें दिलेलीं आढळतात ही नेहमींचीच पद्धत आहे.

कौशिकसूत्रांत तर चालू पद्धतीचा अवलंब केलेला आहे. ती पद्धत अशी कीं, त्याच वेदांतील दुसऱ्या शाखेंतील सूक्तें किंवा पाठ देतांना व इतर वेदांतील शाखेंतील सूक्तें किंवा पाठ देतांना तीं संपूर्ण द्यावयाचीं. वैतान सूत्रांतहि ह्याच रीतीचा अवलंब केलेला आहे; पण याला विशेष लक्ष्यांत ठेवण्यासारखा एक अपवाद आहे; तो असाः—

जें सूक्त किंवा जो पाठ कौशिकसूत्रांत व वैतानसूत्रांतहि आला असेल त्या सूक्तांचें किंवा पाठाचें अवतरण देतांना वैतानांत प्रतीकेंच फक्त दिलेलीं आहेत. हेंच सूक्त जरी इतर संहितेंत आढळत असलें किंवा अस्तित्वांत असणाऱ्या कोणत्याहि संहितेंत तें आढळत नसून फक्त कौशिक सूत्रांतच तें जरी आढळत असलें तथापि वैतान सूत्रांत ह्या गोष्टीला महत्त्व दिलेलें नाहीं. त्यांत फक्त प्रतीकेंच दिलीं आहेत. एक दोन उदाहरणें देऊन हें जास्त चांगलें समजण्यासारखें आहेः—

( १ ) तैत्तिरीय संहिता ३. २. ४. ४ यांत जो पाठ आहे तो शुक्लयजुर्वेदांत श्रौतसूत्रांत, कात्या. २. १. २२ व कौ. सू. ३. ५ यांत संपूर्ण दिला आहे; पण वै. सू. १. २० येथें त्या पाठाचें 'अहे दैधिषव्य' असें फक्त प्रतीकच दिलेलें आहे.

( २ ) कौ. सू. ६. ११ यांत एक मन्त्र आहे. दारिलानें याला कल्पजा असें नांव दिलें आहे. याकोबीसाहेबांना हा मन्त्र कोणत्याहि संहितेंत आढळला नाहीं.

वैतान सूत्र २४. ७ येथें या मन्त्राचें 'विमुञ्चामि' असें फक्त प्रतीकच दिलें आहे.

आतां ज्या सूत्रावर वैतान सूत्र अवलंबून आहे अशी कल्पना व्यक्त झाली आहे त्या कौशिक सूत्राकडे वळूं.

### कौशिकसूत्र

कौ शि कं सू त्रा ची र च नाः—विधींच्या विस्ताराच्या दृष्टीनें कौशिक सूत्र बाकीच्या माहित असलेल्या सूत्रांपेक्षां निराळें आहे. हें सूत्र ज्या शाखेचें आहे त्या शाखेंतील लोकांच्या उपयोगाकरितां या सूत्रांत विधींचें विस्तारपूर्वक विवेचन आहे. हें कांहीं श्रौतसूत्र नव्हे. अथर्ववेदाच्या शौनक शाखेचें श्रौतसूत्र, वैतानसूत्र ( वितान कल्प ) हें आहे, ही गोष्ट कौशिक सूत्र १–६ व वैतानसूत्र १–४ यांतील दर्शपूर्णमासीय यागासंबंधी विवेचनाच्या तुलनेवरून तेव्हांच लक्षांत येण्यासारखी आहे. श्रौतविधींना उपयुक्त असलेली परिभाषा या सूत्रांत नाहीं. होतृ, अध्वर्यु आणि उद्गातृ हे शब्द पारिभाषिक अर्थानें सगळ्या कौशिकसूत्रग्रंथांत कोठेंहि आढळत नाहींत व श्रौताग्नीचा उपयोग केवळ क्वचित् व गौणत्वानें केलाआहे. जसेंः- २२,१४;६७,६;७०,९–१२;७१,१—६;७७,२३;८०,१८—२३;८१,३१–३२;८८,२०;८९,१५, अग्निहोत्राचा दोनदां उल्लेख केला आहे. ७२,४३;८०,२५.

हा ग्रंथ, गृह्यसूत्र शब्दाच्या नेहमींच्या अर्थाच्या दृष्टीनें, गृह्यसूत्रहि नव्हे. असल्या ग्रंथांत नेहेमीं येणारे सर्व महत्त्वाचे विधि, ह्मणजे गर्भाधानापासून विवाह धरून अंत्येष्टिपर्यंत सर्व संस्कार, तसेंच मधुपर्क, आज्यतन्त्र इत्यादि, हे या ग्रंथांत आले आहेत. परंतु यांना ग्रंथांत प्राधान्य दिलें नाहीं. व्लूमफिल्डच्या मतें ग्रंथाच्या मुख्य भागांत, नंतर केव्हांतरी, गृह्य विषयांना कांहीं तरी गौणस्वरूप देऊन, ते ग्रंथांत वरोबर खपवून दिले असावेत. अथर्वांतील सूक्तें म्हणतांना त्याबरोबर जे विधि करावयाचे असतात त्याचें हें सूत्रमय वर्णन होय. प्राचीन काळापासून सूत्राचा पाठ व कांहीं विधियुक्त आचार हीं एकदम करावयाचा परिपाठ आहे. याच आचारांचें सुधारलेलें स्वरूप सूत्रांत दिलें आहे. तथापि या ग्रंथाचें अथर्व सूत्र हें बीज असून दुसरे भाग मागाहून गोळा केले गेले, असें मानणें जरी यांतील विषयांचा अर्ध्यांहून जास्त भाग गृह्य सूत्रांनीं व्यापला आहे, तरी बरेंच धाडसाचें होईल. तथापि तें कसेंहि असलें तरी कौशिक सूत्र हें अथर्व सूत्र व गृह्य सूत्र ह्या दोन स्वतंत्र सूत्रांचें मिश्रण आहे असें मानण्यास

हरकत नाहीं. पुढें दिलेलें विवेचन ह्या दोन स्वतंत्र सूत्रांच्या मिश्रणाची गोष्ट लक्षांत घेऊन केलें आहे.

**कौशिक सूत्राच्या रचनेचा काल निर्णय.**— या सूत्राच्या रचनेच्या कालस्थलाबद्दल सांप्रदायिक माहिती उपलब्ध नाहीं. अथर्वाच्या वाङ्मयांतच सापेक्षकालानुक्रमासंबंधी दोन कालांचा उल्लेख आला आहे. प्रथमतः, मंत्रांचा किंवा सूक्तांचा काल संपून गेला होता. ग्रंथकार शौनक शाखेची संहिता गृहीत धरितो, हें पुढें पूर्णपणें सिद्ध केलें आहे. त्याचप्रमाणें त्याला काश्मीर शाखेपासून आलेल्या पुष्कळशा अथर्ववेदाच्या ज्ञानाची माहिती होती. या सूत्रांत शौनक इत्यादि अथर्ववेदाच्या चारी शाखांचे रूढ आचार दिले आहेत, हें केशव आणि अथर्वणीय पद्धतींचें म्हणणें खरें असेल तर या सूत्रांत सांगितलेल्या आचारांना सूत्रांत गोंवावयाची स्थिति येण्याच्यावेळीं, सगळ्या नसल्या तरी बहुतेक शाखांच्या अथर्व संहिता मुख्यत्वेंकरून पुऱ्या झाल्या असाव्या असें आपणास म्हणतां येईल. दुसरी गोष्ट म्हणजे हें सूत्र वैतान सूत्र इत्यादींच्या पूर्वीचें असून त्यांनीं त्यांतील गोष्टी गृहीत धरल्या आहेत. वैतान हें अथर्ववेदी लोकांचें श्रौताचें छोटें पुस्तक असून तें अशा वेळीं रचिलें गेलें कीं, त्यावेळीं या वेदांच्या लोकांना आपला, सर्वमान्य वेदांच्या प्रान्तांत प्रवेश करून घ्यावयाचा होता म्हणून त्यांना वेदांतील यज्ञाची विवेचना करणारा त्यांचा असा स्वतंत्र ग्रंथ असणें जरूर होतें. कौशिक सूत्राचें संस्करण व वैतान सूत्राचें संस्करण यामध्यें किती काल लोटला हें सांगणें अशक्य आहे. अथर्ववेदांतील सांप्रदायिक आचारांची व्यवस्थित व सूत्ररूपांत घालण्याची खटपट म्हणजेच जें कौशिक सूत्र तें बऱ्याच नंतरच्या काळांत झालें असलें पाहिजे, असें ब्लूमफील्डचें म्हणणें आहे. यावरून त्यांत सांगितलेले आचारहि अर्वाचीन आहेत अशी कोणी चुकीची कल्पना करून घेऊं नये. या वेदांतील विधींचें स्वरूपच असें दिसतें कीं, मंत्रांचें पठण व कृति हीं एकदम व्हावींत. अथर्ववेदांत अशीं पुष्कळ सूक्तें आहेत कीं, त्यांत सांगितलेल्या पदार्थांचें इकडे तिकडे हलवणें वगैरे क्रिया केल्याशिवाय तीं म्हणतांच येत नाहींत.

कौशिक सूत्रांचें ग्रथन किंवा संस्करण एकदांच झालें असावें. म्हणजे आज जो ग्रंथ आपल्यापुढें आहे त्याचा मालमसाला एकावेळीं प्रथम एकेठिकाणीं जमा केला असावा; व नंतर त्याचा सर्वांगसिद्ध ग्रंथ बनविला असावा. अशाच तऱ्हेच्या धोरणाचा दुसरा ग्रंथ एकाकाळीं होता, म्हणजे ग्रंथाचें एक प्राचीन स्वरूप होतें, व शेवटल्या संस्करणांतून ग्रंथ बाहेर पडल्यावर अमुक अमुक भाग मागाहून घातले गेले, असें ब्लूमफील्ड मानीत नाहीं. परंतु, या सूत्रांत संग्रहीत केलेला विषय, स्वतंत्र स्वरूपाच्या अशा निरनिराळ्या मूलस्थानापासून आला असला पाहिजे, व संस्करणकारानें कांहीं इतका बेमालूम मिलाफ केला नाहीं कीं, त्यांत निरनिराळ्या कालस्थलांचे व कर्त्यांचे परिणाम दिसूं नयेत, ही गोष्ट स्पष्ट दिसते.

शकुनापशकुनाबद्दलचा तेरावा अध्याय हा एकंदर संहितेच्या विषयापेक्षां अगदींच निराळ्या विषयाचा असल्यामुळें; तो स्वतंत्र आहे असें तेव्हांच लक्षांत येतें. या अध्यायाचीं स्वतःचीं सूक्तें आहेत व ही गोष्ट खालीं त्याह्या दिलेल्या अथर्ववेदाच्या दुसऱ्या भागांशीं विपरीत दिसते प्रत्येक अपशकुनाचा परिणाम घालविण्याकरितां म्हणून त्यांच्या प्रतीकांनीं दर्शविलेले अथर्ववेदाचे मंत्र सामान्यतः अप्रधान म्हणून गणलेले दिसतात. या अध्यायाची भाषा इतकी पाल्हाळिक आहे कीं सूत्रग्रंथांत ती बिलकूल शोभण्यासारखी नाहीं. गद्य परिशिष्टांच्या लिहिण्याच्या धाटणीच्या जवळ जवळ सारखीच यांतील भाषेची पद्धत आहे.

कपालेनांगारा भवंति–अंगारकल्प, १३५, १ किंवा चतस्रोधेन्वा उपक्लृप्ता भवंति श्वेता कृष्णा रोहिणीयुरूपा चतुर्थी १२०, १; १२६,५ अशातऱ्हेचीं वाक्यें अथर्वसूत्रांत सांपडणार नाहींत. ९७. ७ मध्यें ' अपेत एतु निर्ऋतिर् इत्यतेन सूक्तेन,' हें वाक्य व त्या पुढच्या वाक्यांत दिलेलें सकलपाठांतलें सूक्त, हें फार अघळपघळ दिलेलें असून सूत्राच्या भाषेला शोभण्यासारखें नाहीं. १०४, ३; ११३, ३; १२३, १; १३३, २ यांतील 'एताभ्याम् सूक्ताभ्याम्' १३३, १ मधील 'एतैः त्रिभिः सूक्तैः' १३६, ६ मधील ' इति एताभ्याम् ( ऋग्भ्याम् ); ११२, १ मधील ' इति एताभिः चतसृभिः ( ऋग्भिः ) यांबद्दल वरील प्रमाणेंच म्हणतां येईल. भाषेचा अघळपघळपणा हा तेराव्या अध्यायांत विशेष दृष्टोत्पत्तीस येतो. ९३ व्या कंडिकेमध्यें विषयांची निराळी अनुक्रमणिका देऊन या अद्भुतविषयक अध्यायास सुरुवात केली आहे यावरून हा अध्याय स्वतंत्रपणें तयार झाला असावा असें सप्रमाण दिसतें. असें असल्यास कौशिक सूत्राच्या संस्करणकारांनीं हा अध्याय होता तसाच आपल्या ग्रंथांत समाविष्ट करून घेतला असावा. प्रो. वेबरचें मतहि असेंच आहे.

हें मत चुकीचें असावें असें समजण्यास कांहीं कारण आहे असें ब्लूमफील्डलाहि वाटत नाहीं. कौशिकसूत्राच्या अंतभागांत निरनिराळे थर आहेत व कौशिकसूत्राच्या संस्करणकारांनीं बेमालूम मिलाफ न केल्यामुळें निरनिराळ्या ग्रंथकारांचें निरनिराळे भाग दृग्गोचर होतात तथापि निरनिराळ्या मूलस्थानांतून आलेल्या लिखाणांत व माहितींत पुष्कळ गोष्टी समान आहेत व सूत्रकारानेंहि कांहीं कांहीं स्थलीं आपल्याकडून होईल तितक्या उत्तम तऱ्हेनें ग्रंथांत घातलेल्या माहितीचा मिलाफ करण्याची खटपट केली आहे. अध्याय १३ मध्यें, चातनगण ( १६६, ९ ),मातृनामानि सूक्तानि ( ९४, १५; ९५। ४; ९६, ३; १०१, ३; ११४, ३; १३६, ९; ) व वास्तोष्पतीयानि सूक्तानि ( १२०, ९ ) आलेलीं आहेत त्यांवरून असें सिद्ध होतें कीं, त्या अध्यायकर्त्याला बाकीच्या ग्रंथाची, निदान त्या शाखेच्या पारिभाषिक शब्दांची माहिती होती. ११८, १ मध्यें शौनक संहितेंतून आलेला एक मंत्र-

संग्रह, त्याच्या प्रतीकासह दिलेला आहे; तेराव्या अध्यायाच्या पूर्वी म्हणजे सकलपाठ ९१–१ मध्यें पूर्वी याचें अवतरण घेतलें असें म्हणून याबद्दल उलगडा करितां येईल. अशा तऱ्हेचें दुसरें उदाहरण म्हणजे ' भवन्तम् नः समनसौ समोकसौ ' हें १३३, ७ मध्यें आलेलें प्रतीक सकलपाठ १०८, २ च्या आधारावर घेतलें आहे, किंवा ६८, ३५ मधील 'इदावत्सराय' हें प्रतीक सकल पाठ ४२, १७ च्या आधारावर आहे. या ग्रंथांत हेंच एक उदाहरण दिसतें कीं जेथें संस्करणकारानें सर्व माहितीच्या व ज्ञानाच्या मालमसाल्याचें उत्तम मिश्रण तयार केलें आहे. शेवटल्या संस्करणाचे वेळीं, सकलपाठ ४२,१६ मधील 'व्रतानिव्रतपतये' हा मंत्र सोडून देऊन सूत्रपद्धतीचा उपयोग करण्यांत सूत्रकार चुकला आहे. पण प्रतीक पूर्वीच ६, १९ मध्यें येऊन गेलें आहे. सूत्र ग्रंथांत पूर्वापर संबंध बरोबर रहावा म्हणून याच्या विरुद्ध क्रम आला असता. १३७, ३० मध्यें पुढें येणाऱ्या तीन श्लोकांचीं प्रतीकें दिलीं आहेत व हें सफाईदारपणें रचना न झाल्याचें आणखी उदाहरण आहे. २, ४१ मध्यें यांतील पहिल्याचें प्रतीक 'इतितिसृभिः' असें म्हणून अगदीं तशाच तऱ्हेनें दिलें आहे.

एका काळीं बहुतकरून अद्भुतविषयक(शकुन अपशकुन विषयक ) ग्रंथ अथर्ववेदाच्या विषयाच्या प्रान्तांत कोठेंतरी स्वतंत्रपणें असावा व अशा संग्रहांत घालण्यास त्यांतील विषय योग्य असल्यामुळें तो अंतर्भूत केला असावा. त्याचप्रमाणें पारस्कर गृह्यसूत्रांमध्यें अद्भुतासंबंधीं तीन अध्यायांचा अंतर्भाव केला होता. पण प्रो. स्टेन्झ्लर या संपादकानें उगीच ते अध्याय गाळून टाकले. एकंदर ग्रंथांत हा तेरावा अध्याय समाविष्ट करण्याचें काम जरी बऱ्याच चांगल्या तऱ्हेनें केलें गेलें आहे तथापि तो अध्याय निराळा ग्रंथ असावा याबद्दलच्या खुणा लुप्त झाल्या नाहींत.

वरवर अवलोकन करतांना जरी स्पष्ट दिसत नाहीं, तथापि हें फार संभवनीय दिसतें कीं, अध्याय १४ वा हाहि कौशिकसूत्रामधील नंतरचा थर असावा, किंवा निदान मुख्य ग्रंथ पुरा झाल्यावर या ग्रंथांत सांपडणारे, यांतील विषयांशीं विजातीय असलेल्या विषयावरील पांच अध्याय पहिल्या संस्करणकारांनीं स्वतः घातले असावेत. प्रथमतः बाराव्या व चवदाव्या अध्यायांच्यामध्यें तेरावा अध्याय घालण्याचें कांहीं संभवनीय कारण दिसत नाहीं. जर तेरावा अध्याय एक तऱ्हेच्या परिशिष्टासारखा आहे तर चौदावा अध्याय तेरावा घातला त्यावेळीं किंवा पुष्कळ मागाहूनहि घातलेला असला पाहिजे. या अध्यायांतील अंतस्थ पुराव्यावरून वरील गोष्टीस पुष्टि मिळते. कंडिका १४१ मध्यें वेदपठणाचे नियम अगदीं अपभ्रष्ट स्वरूपांत दिले आहेत व त्यांतील मधल्या मधल्या भागांत गद्य व पद्य यांचें मिश्रण आहे. तें नंतरच्या स्मृतींसारख्या स्वरूपाचें आहे हें वाचकांचे लक्ष्यांत आल्याशिवाय रहत नाहीं. ग्रंथांत ही कंडिका घालण्याची इच्छा संस्करणकाराच्या मनांत मागाहून आलेली दिसते. कारण १३९ व्या कंडिकेमध्यें वेदपठणाला विद्यार्थ्यांनीं कशी सुरुवात करावी याबद्दल चांगल्या सूत्रभाषेंत विवेचन केलें आहे व या दोन भागांच्या मध्यें इंद्रमहोत्सव नांवाचें राजकर्म याचें विवेचन घुसडून देणें अगदीं निरर्थक आहे. कंडिका १३९ ची भाषा जरी सामान्यतः बाकीच्या ग्रंथांतील गृह्यविधीवर्णनाच्या भाषेपेक्षां निराळी नाहीं, तथापि तींत आलेल्या विषयाचें विवेचन पूर्वी ५६।८ मध्यें आल्यामुळें, या कंडिकेबद्दल संशय येतो. ५६,८ मध्यें विद्यार्थ्यास सावित्रीचें पठण करण्यास सांगितलें आहे पण १३९,१० मध्यें सावित्री व त्याबरोबर आणखी दोन अथर्वण मंत्र ४,१,१ व १.१. यांचें पठण सांगितलें आहे. दोन मंत्र जास्त सांगावयाची कल्पना मागाहून सुचलेली असून ती अगदीं परिशिष्टाच्या स्वरूपांत आलेली आहे व तिचें कारण म्हणजे कोणती तरी युक्ति करून या वेदाला बाकीच्या वेदांच्या पंक्तीला बसवून, धर्मग्रंथांत याचें स्थान महत्त्वाचें व अभेद्य करावयाचें होतें. १३९, १० मध्यें आलेल्या 'त्रिषप्तीय' शब्दावरून ही कंडिका मुख्यग्रंथाच्या अंतर्भागांतील नाहीं अशाबद्दल पारिभाषिक पुरावा मिळतो. कौशिक ७,८ हें एक परिभाषा सूक्त आहे. त्यांत सांगितलें आहे कीं, ग्रंथाच्या पुढच्या भागांत 'पूर्वम्' म्हणजे ( सूक्तम् ) हा शब्द त्रिषप्तीयसूक्ताबद्दल सुटसुटीत म्हणून वापरला आहे. जेथें जेथें या सूक्ताचा उल्लेख आहे तेथें तेथें सर्व ग्रंथभर ही परिभाषा विनचूकपणें वापरली आहे. पहा; १०,१;११,१;१२,१०; १४,१;१६,५;१८,१;१९;३२,२८ हा अधिकार येथें लागू पडत नाहीं. एवढयावरून निदान इतकें म्हणतां येईल कीं, बाकीच्या ग्रंथाशीं या अध्यायाचा मिलाफ बरोबर झालेला नाहीं व यावरून आणि मागें दिलेल्या बाकीच्या पुराव्यावरून हा अध्याय नंतरचा आहे हें पुष्कळ सबळपणें सिद्ध होतें.

हीच स्थिति कंडिका १३८ ची आहे. यांत्र अष्टका विधीचें लांबच लांब वर्णन आहे. पण ह्याच विधीचें वर्णन पूर्वी १९,२८ मध्यें चांगल्या सूत्रभाषेंत आलेलें आहे. केशवाच्या लक्षांत, हीं दोन्हीं वर्णनें तत्त्वतः एकाच विधीचीं आहेत, ही गोष्ट आलेली आहे व त्यानें दोहोंचें विवेचन एके ठिकाणीं कंडिका १९ मध्यें केलें आहे. कंडिका १३८ मागून घातलेली आहे याबद्दल शंका येण्याचें, कांहीं कारण नाहीं. कंडिका १४० चा विषय इंद्रमहोत्सव आहे व त्यांतील भाषापद्धतीचा विचार करितां वरीलच सिद्धांतास पुष्टि मिळते. हें एकंदरीनें परिशिष्ट असून, थोड्या विस्तारानें अथर्व परिशिष्टांत १९ वें म्हणून आलेलें आहे ह्यावरून निदान इतकें सिद्ध होतें कीं, यांतील भाषेंत व शब्दरचनेंत या संग्रहास न शोभणारें असें कांहीं नव्हतें. कण्डिका १३७ मधील आज्यतंत्र हें दर्शपूर्णमासविधीच्या एका भागाचें विस्तृत वर्णन असून, त्यामध्यें वेदी करण्याचे नियम व लक्षण हे विषय मात्र जास्त घातले आहेत. ६, २९-३० मध्यें, इमौ दर्शपूर्णमासौ व्याख्यातौ ।

दर्शपूर्णमासाभ्याम् पाकयज्ञाः । असें लिहिलें आहे. यावरून १३७,४३ मधील, 'व्याख्यातं सर्वं यज्ञियं तन्त्रम्' याची जरूरी नाहीं. केवळ सूत्रभाषेच्या दृष्टीनें पाहतां कण्डिका १३७, ही कण्डिका १–६ च्या नंतरची आहे हें १३७, ३० ची २,४१ मधील 'अग्निर्भूम्याम् इति तिंस्रभिः' याच्याशीं तुलना केली असतांना लक्षांत येईल. १३७, ३० मध्यें तीन्ही ऋचांचीं प्रतीकें अथपासून इतिपर्यंत दिलीं आहेत. दर्शपूर्णमासौ व आज्यतंत्र यांचें वर्णन देतांना पद्धतींत (केशव, दशकर्माणि अथर्वणपद्धति आणि अन्त्येष्टि) निरनिराळ्या ठिकाणच्या उताऱ्याचीं एकमेकांत अगदीं निविड गुंतागुंत केली आहे हें येथें नमूद करणें जरूर आहे.

यावरून १३ व १४वा अध्याय हे या ग्रंथाचे नंतरचे थर दिसतात.

पहिल्या अध्यायाच्या पहिल्या सहा कंडिकांची गोष्ट अगदीं निराळी आहे. १–८ पर्यंत कांहीं अगदीं सामान्य परिभाषा सूत्रें दिल्यावर, या परिभाषांत या ग्रंथाचे मूल आधार दिले आहेत, ९–२१ पर्यंत विशेष परिभाषा आहेत. यामध्यें देव व पितर यांच्या पूजांमधील भेद दिलेला आहे, व ही सूत्रग्रंथांची पद्धति आहे. पहिल्या सहा कंडिकांमध्यें केवळ दर्शपूर्णमासविधींचेंच वर्णन आहे. परंतु ९–२१ या परिभाषांचें धोरण पहिल्या सहा कंडिकांपेक्षां जास्त विस्तृत स्वरूपाचें असलें पाहिजे कारण त्यामध्यें पितरांच्या कसल्याहि पूजेचा उल्लेख आलेला नाहीं, ह्या परिभाषांचा संबंध ग्रंथाच्या नंतरच्या भागांना उद्देशून असण्याचा संभव आहे व वस्तुस्थितिहि निःसंशय अशीच आहे. विशेषतः अध्याय ११ पहा.

परंतु असें मानण्यास एक अडचण आहे. ती अशी कीं, दर्शपूर्णमासानंतर लागलीच विशेष विस्तृत धोरणाच्या परिभाषा असलेल्या तीन कंडिका आलेल्या आहेत. ह्या त्याच हेतूनें तेथें घातल्या आहेत व पहिल्या कंडिकेंतील ९–२१ या अधिकारांचा उपयोग पुष्कळ अध्याय जाईपर्यंत आलेला नाहीं. पहिल्या सहा कंडिका आज जेथें आहेत तेथें त्या प्रथम नव्हत्या आणि यजुःसंहितेच्या श्रौतसूत्राच्या ग्रंथाचा आरंभ दर्शपूर्णमास देऊन करावयाचा, या नेहमींच्या रीतीस मान देऊन त्या तेथें घातल्या असाव्यात, असें ब्लूमफील्डचें मत आहे. या मतास पुष्टि देण्यास कांहीं पारिभाषिक पुरावा नाहीं असें नाहीं. 'व्रतानिव्रतपतये' ह्या ऋचेचें प्रतीक ६,१८ दिलें आहे व ती ऋचा सकल पाठ ४२,१६ मध्यें येते. यावरून असें दिसतें कीं, कौशिक व वैतानसूत्राच्या नेहेमींच्या रितीप्रमाणें ४२,१६ नंतर ६,१८ आलें पाहिजे. परंतु हेंहि सांगितलें पाहिजे कीं, अशाच तऱ्हेचे दुसरें एक उदाहरण आहे पण त्याचा अशा तऱ्हेनें अर्थ लावितां येत नाहीं. कौशि० 'अच्युता द्यौरिति' याचें प्रतीक ३५,१२ मध्यें आहे व सकल पाठ, ९८,२ मध्यें आहे. वस्तुतः तेराव्या अध्यायाच्या मंत्रांचा उपयोग केव्हां केव्हां ते एक स्वतंत्र संहिताच असावेत अशा तऱ्हेनें केला गेला आहे; जसें गणमाला, अथर्वपरिशिष्ट ३४,२९ मध्यें, कौशिकसूत्र१०४,२ ह्या मंत्र 'या असूरा'(!) या त्याच्या प्रतीकानें, दुसऱ्या अथर्व ऋचांच्या प्रतीकांबरोबर दिला आहे. 'प्रयच परशुं इति दर्भाहाराय दात्रम् प्रयच्छति' (५–२४) च्या नंतर ८, ११ मध्यें थोड्या निराळ्या भाषेंत अशाच अर्थाचें परिभाषासूत्र आलेलें आहे. यावरून निदान इतकें सिद्ध होतें कीं, १–६ अध्याय हे पुढें येणाऱ्या अध्यायांच्या धोरणानें व त्यांच्याशीं जुळून रचले गेले नाहींत. हे अध्याय दुसऱ्या एकाद्या ग्रंथांतील होते. किंवा याच ग्रंथाचा निराळा पाठ असून नंतरच्या काळीं कोणी निराळ्या ग्रंथकारानें ते रचिले हें ठरविणें बरेंच कठिण आहे. कंडिका ५२ व ५३ नंतर लागलीच, मुख्य अथर्वसूत्रें झाल्यानंतर व गृह्याच्या अध्यायापूर्वी त्यांचें योग्य स्थान होतें. एकंदरींत ह्या भागाच्या विशेष गोष्टी तेवढ्या देऊन, कांहीं सिद्धांत न काढणेंच बरें.

**कौशिकसूत्र अथर्वसूत्र व गृह्यसूत्रांचा संबंध.**— वर नामनिर्देश केल्याप्रमाणें, मुख्य अथर्व सूत्रांना आरंभ ७ व्या कंडिकेपासून होतो, व तीं ५३व्या कंडिकेपर्यंत आहेत. मात्र मध्यें ४२,५ पासून ४५ च्या अखेरीपर्यंत दुसरा विषय असून हीं सूत्रें गृह्य सूत्राच्या तऱ्हेच्या भाषेंत आहेत. ग्रंथाच्या या भागांत म्हणजे अथर्व सूत्रांत मात्र अथर्व वेदाच्या कालांतील आयुष्यक्रमाच्या स्पष्ट दिसणाऱ्या विशिष्ट गोष्टी आल्या आहेत. बाराव्या अध्यायाच्या अखेरीपर्यंतच्या उरलेल्या कंडिकांमध्यें अथर्व मंत्रांच्या आधारावर, अथर्वण वेदाच्या दृष्टीनें नेहमींच्या गृह्य आचारांचें वर्णन आलें आहे. अथर्व सूत्र हें अगदीं अल्पाक्षर, सूत्रमय भाषेंत लिहिलेलें असून त्यांतील आचार अगदीं जुने व स्वतंत्र आहेत. शब्दसंग्रह व शब्दसमृद्धीच्या दृष्टीनें यांतील भाषा लक्षांत ठेवण्यासाखी आहे व अथर्व संहितेच्या अर्थज्ञानाकरितां, तिची किंमत फार वरच्या दर्जाची आहे. बाकीच्या ग्रंथांपेक्षां यांत एक विशेष आहे तो हा कीं, अथर्वसंहितेच्या बाहेरच्या मंत्रांचें अवतरण यांत अगदींच क्वचित् आलेलें आहे. अथर्वसूत्राच्या भाषेपेक्षां गृह्यसूत्राची भाषा पुष्कळ अघळपघळ आहे व या दोन भागांतील भेद दाखविणारे पुष्कळ पारिभाषिक मुद्देहि आहेत. दोन्हीहि वाचल्यानंतर वाचकांचें असें मत होतें कीं, शेवटल्या संस्करणाच्यावेळीं, जें संस्करण आज आपणांपुढें आहे त्यांत एका सामान्य गृह्यसूत्रांत अथर्वसूत्र मिसळलें गेलें असावें.

ह्या गृह्यसूत्रांतील एकदम लक्षांत येण्याजोगी विशेष गोष्ट म्हटली म्हणजे अथर्ववेदांत न आलेले व म्हणून सकलपाठांत दिलेले मंत्र फार वेळां आलेले आहेत ही होय. पुष्कळदां एकाच मंत्राचें प्रतीक व सकलपाठ एकदम येतात. ६.२ मध्यें प्रतीक, सकलपाठानंतर आलें आहे; ४२. १५, १७; ६२. २०, २१; ६८. ९, १०; ६८. २५, २६; ७२. १३, १४;

९०. २५;९१. १; इत्यादि यांमध्यें प्रतीक सकलपाठापूर्वी आलेलें आहे. केव्हां केव्हां सकलपाठांतील मंत्र व अथर्वणांतील प्रतीकें येतात; जसें ६, २; ७१, ६; ७२, १३; ७८, १०; १३३,२. अथर्ववेदांतून न घेतलेला मंत्रविषयहि पुष्कळच आहे.

गृह्यसूत्रांतील प्रतीकें देण्याच्या रीतीवरून त्यांतील लांबलचक भाषासरणी तेव्हांच लक्ष्यांत येते. ६४,२७ मध्यें 'इति सूक्तेन' असे शब्द आले आहेत; ५३, १३ मध्यें 'इति अनेन सूक्तेन' ५४,५ मध्यें, 'इति एतेन सूक्तेन,' ६७, १५ मध्यें 'इति एतै त्रिभिः सूक्तैः;' ६५, ९ मध्यें 'इति सूक्तेन' यानें एका सूक्ताच्या भागाचाच उल्लेख केला आहे. ८१, २० मध्यें दोन प्रतीकांच्यापूर्वी 'उभयोः' हा शब्द उगीच आलेला आहे. अथर्व सूत्रामध्यें अशा तऱ्हेचे शब्द बिलकुल आलेले नाहींत. नाहीं म्हणावयास तीन उदाहरणें आढळतात. ९,१; ३५,१२ मध्यें 'इति एक' (ऋक्) चा अर्थ असा कीं तेथील प्रकृत सूक्तांतील एकच ऋचा म्हणावयाची; आणि ९,२८ मधील 'इतिसर्वेण सूक्तेन' जास्त घातलेलें आहे असें दिसतें. यावरून भाषेची निराळी पद्धत दृष्टोत्पत्तीस येते. परंतु यद्यपि असें म्हणतां येईल कीं, गृह्यसूत्रामध्यें मोठ्या सूक्तांचा उल्लेख आल्यामुळें त्यांतील विशिष्ट ऋचेचा उल्लेख करण्यास विस्तारानें लिहिणें जरूर आहे, तथापि वर दर्शविलेल्या स्थलांतील पुष्कळ स्थलीं असलेल्या मोठ्या सूक्ताचा उल्लेख नाहीं ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे.

अथर्व सूत्रामध्यें आ+चम् धातूचें 'आचमयति' असें रूप आलें आहे व अन्य ठिकाणीं 'आचामयति' आलेलें आहे. तसेंच हु या धातूचें वर्तमान कालवाचक कृदन्ताचें पुल्लिं० प्रथ० एक वचनाचें रूप अथर्वसूत्रांत 'जुह्वत्' आलें आहे व गृह्यसूत्रांत 'जुह्वन्' आलें आहे. या व दुसऱ्या पुराव्यावरूनहि अथर्व सूत्रें व गृह्य सूत्रें यांतील भाषेंत फरक आहे हें लक्षांत येईल. गृह्यसूत्रांची भाषा अघळ पघळ व सरळ असून अथर्व सूत्रांची भाषा जास्त संक्षिप्त व पारिभाषिक स्वरूपाची आहे. अथर्व सूत्रांची भाषा व तेराव्या अध्यायाची भाषा यांच्या मधल्या तऱ्हेची भाषा गृह्यसूत्रांची आहे. तेराव्या अध्यायाची भाषा जवळ जवळ परिशिष्टाच्या भाषेसारखी आहे हें पूर्वी सांगितलेंच आहे.

अथर्वसूत्रामध्यें अथर्व वेदाच्या १९व्या कांडांतील बिलकुल अवतरण घेतलें नाहीं ही गोष्ट नमूद करून ठेवण्यासारखी आहे; कारण कौशिकसूत्राचा व अथर्ववेदाच्या १९ व्या कांडाचा विशिष्ट तऱ्हेचा संबंध आहे.

वरील विवेचनांतील सर्व मुद्दे अबाधित रहाणें शक्य नाहीं. तथापि पुढें दिलेल्या गोष्टी स्पष्ट होतील असें ब्लूमफील्डचें मत आहे. कौशिकाच्या नांवावरचें सूत्र नंतरच्या सूत्रकालांतलें आहे; त्यामध्यें निरनिराळ्या तऱ्हेचे थर असून त्यांचा मिलाफ विशेष चतुराईनें केला गेला नाहीं; त्या प्रत्येक थराचें विशिष्ट स्वरूप निरनिराळ्या लेखकाचे निरनिराळे भाग या कारणानें आलेलें असो किंवा निरनिराळ्या काळीं निरनिराळा भाग लिहिला गेला या कारणानें आलेलें असो, विषय, भाषापद्धति व परिभाषा या तीन्ही गोष्टींत फरक दिसून आल्यामुळें अथर्वसूत्रें व गृह्यसूत्रें यांत भेद आहे ही गोष्ट सिद्ध झाली आहे; तेरावा व चौदावा अध्याय हे बाकीच्या ग्रंथाच्या मागाहून रचले गेले असावेत व शेवटल्या संस्करणाच्या वेळीं ही गोष्ट लपवितां आली नाहीं; व पहिल्या अध्यायाच्या पहिल्या सहा कंडिका प्रथमतः या ग्रंथाच्या नंतरच्या थरांतील असाव्यात.

**कौशिक सूत्राच्या त्याच्या संहितेशीं संबंध.**—अथर्ववेदाच्या नऊ शाखा, चरण किंवा भेद होते या अढळ सांप्रदायिक समजुतीचा, अथर्ववेदाचा अभ्यास करणाऱ्या विद्यार्थ्याला प्रथम विचार करावा लागतो. या सांप्रदायिक समजुतीस मुख्य मूलभूत आधार चार आहेतः— (१) दोन चरणव्यूहः पहिला चरणव्यूह हा शुक्ल यजुर्वेदाचें पांचवें परिशिष्ट असून त्यांतील पहिल्या अध्यायांत अथर्व वेदाच्या शाखा दिल्या आहेत. दुसरा चरणव्यूह हा अथर्व वेदाचें ४९ वें परिशिष्ट असून त्यांत या विषयाचा थोडक्यांत विचार केला आहे. (२) पाणिनीच्या अष्टाध्यायींत, महाभाष्यांत व पाणिनीला माहित असलेल्या दुसऱ्या वाङ्मयांत या शाखांचा प्रसंगोपात्त आलेला उल्लेख. (३) पुराणांतील अथर्व वेदाच्या शाखांसंबंधीं अगदीं नंतरचीं पण बाजवीपेक्षां जास्त व्यवस्थित वर्णनें व नंतरच्या वाङ्मयांतील उदाहरणार्थ रामकृष्णाचा संस्कारगणपति हा ग्रंथ, अशांतील वर्णनें व (४) अथर्ववेदाच्या वाङ्मयांत प्रसंगोपात्त जागोजागीं आलेले उल्लेख. अथर्ववेदाच्या शाखांचा विचार पुष्कळ वेळां झालेला आहे. [ पहाः—वेबर इंडिश स्टुडिएन १,१५२,२९६;३,२७७–२७८;१३,४३४–४३५; ओसिना पोरटेंटा, पान ४१२–४१३; इंडिश लिटरेटूरगेशिष्टे पान १७०. मॅक्स मुल्लर 'प्राचीन संस्कृत वाङ्मय', पान ३७१.' गोपथ ब्राह्मणाची राजेंद्रलाल मित्राची प्रस्तावना, पान, ६; शब्दकल्पद्रुम; वेद; रोट, काश्मीरांतील अथर्ववेद पान २४; अ. ओ. सो. नि. का. पु० ११ पान ३७७–३७८; सायमन, बैट्रागत्सूर केन्टनिस डेर वेडिशेन् शूलेन. पान ३१ ].

वर दिलेल्या रोटच्या ग्रंथांत त्यानें शाखा विषयाच्या सांप्रदायिक कल्पनेचें फारच व्यवस्थेनें व चिकित्सक बुद्धीनें परीक्षण केलें आहे. त्यानें असा सिद्धांत केला आहे कीं, शाखांच्या या नऊ नांवापैकीं पांच खरीं व विश्वसनीय म्हणून धरावींत व बाकीचीं चार हीं अविश्वसनीय म्हणून सोडावींत. ब्लूमफील्डच्या मतें अथर्वणवेदाच्या वाङ्मयांत त्याच्या शाखांसंबंधीं जे जागोजाग उल्लेख आलेले आहेत त्यांनाच जास्त चिकटून राहिल्यास याविषयींच्या सांप्रदायिक कल्पनेंतील चुकांची दुरुस्ती होऊन अथर्ववेदी लोक स्वतः कोणकोणत्या नऊ निराळ्या शाखा मानीत होते हें लक्षांत येईल. ज्याप्रमाणें अथर्ववेदाच्या पांच कल्पांसंबंधीं वाङ्मयांत आलेल्या परस्परविरुद्ध हकीकती एकत्र करून त्यापासून एक टिकाऊ सिद्धांत निघतो

(पहा अ. ओ. सो. का. पु. ११ पान ३७९ ). त्याप्रमाणें येथेंहि परस्परविरुद्ध हकीकतींतून एक तत्त्वाची गोष्ट बाहेर काढणें शक्य आहे. याविषयाच्या माहितीबद्दल वर दिलेल्या मूलाधारापैकीं चवथा म्हणजे प्रत्यक्ष अथर्वणवेदाचें वाङ्मय हा सर्वांत महत्त्वाचा आहे याबद्दल संशय असणें शक्य नाहीं.

धाकट्या चरणव्यूहाच्या चार हस्तलिखित प्रती ब्लूमफील्ड यास मिळाल्या. त्यामध्यें या विषयासंबंधीं उल्लेखः—तत्र ब्रह्मवेदस्य नव भेदा भवन्ति तद्यथा। पैप्पलादाः तौदाः मौदाः शौनकीया जाजला जलदा ब्रह्मवदा देवदर्शाः चारणवैद्याश्च। तेव्हां ह्याच्या मतें हींच अथर्ववेदाच्या शाखांचीं नांवें होत व याबद्दलच्या भाराभर चुकीच्या हकीकती असण्याचीं कारणें म्हणजे हस्तलिखित प्रतींचें चुकीचें वाचन, नंतरच्या लेखकांनीं मुद्दाम वेडीवांकडीं बनविलेलीं या शाखांचीं नांवें व अखेरीस मागून घातलेले भाग हीं होत. असें ब्लूमफील्ड मानतो.

( १ ) पैप्पलाद, किंवा पैप्पलादक, पैप्पलादी, पिप्पलाद, पैप्पल, पिप्पल, पैप्पलायन. ह्या सगळ्या शाखांच्या नांवाचें मूळ पिप्पलादी या आचार्याच्या नांवावरून बनलेलीं आहेत.

( २ ) तौद किंवा तौदायन याच नांवाचीं बदललेलीं रूपें, तौत, तौत्तायन, तौत्तायनीय अशीं व इतर पुष्कळ निराळीं आहेत.

(३) मौद पैप्पलादं गुरुं कुर्यात् श्रीराष्ट्रारोग्यवर्धनम्। तथा-शौनकिनां चाऽपि देवमंत्रविपश्चितम्। पुरोधा जलदो यस्य मौदो-वास्यात्कथंचन । अब्दात् दशभ्यो मासेभ्यो राष्ट्रभ्रंशम् स गच्छति। असें अथर्वपरिशिष्ट २,४ मध्यें लिहिलें आहे. या शाखेचें 'मौदायन' असेंहि पैप्पलादायन, तौदायन, जलदायनाप्रमाणें नांव आहे.

(४) शौनकीय किंवा शौनकिन्. वैतानसूत्र ४३, २५ मध्यें ज्याला चेटकी विद्या जाणावयाची असेल त्यानें शौनक यज्ञ करावा म्हणून म्हटलें आहे. पाणिनीनें शौनक गणाबरोबर देवदर्शनीयाः असें पद घातलें आहे.

(५) जाजल. महाभाष्यामध्यें जजलिनांवाच्या आचार्याच्या नांवावरून ही शाखा दिली आहे. याबद्दल 'जाबाल' अथर्व परिशिष्ट ४९ मध्यें आलें आहे. रोटचें मत असें आहे कीं या शाखेचा स्थापक कौशि० ९, १०; १७, २७; वैतान सू० १, ३; २२, १; २८, १२; मध्यें आलेला आचार्य भागली असावा. पण ब्लूमफील्ड म्हणतो कीं त्यास या मतांस पुष्टि देणारा पुरावा बिलकुल मिळाला नाहीं.

(६) जलद याचें जलदायन असेंहि रूप येतें. रा. शंकर पांडुरंग पंडित यांच्या म्हणण्याप्रमाणें कौशिक सूत्र ज्या शाखांचें आहे त्यांपैकीं जलद ही एक आहे.

(७) ब्रह्मवद. चरणव्यूहाबाहेर कोणत्याहि अथर्वण ग्रंथांत हें शाखेचें नांव म्हणून आढळलें नाहीं. याच नांवाची ब्रह्मवल, ब्रह्मदावल, ब्रह्मपलाश व याहूनहि अपभ्रष्टरूपें गौण ग्रंथांत येतात.

(८) देवदर्श किंवा देवदर्शिन्, याची दिवदर्श, देवर्षि, वेददर्श इत्यादि दुसरीं बदललेलीं रूपें येतात.

(९) चारण वैद्य ( विद्या ) हें नांव केशवाच्या कौशिक सूत्र ६, ३७ मध्यें आढळतें.

ब्लूमफील्डच्या मतें येथवर दिलेलें अथर्वणवेदाच्या सांप्रदायिक शाखांचें वर्णन, निश्चित स्वरूपाचें आहे असें मानण्यास हरकत नाहीं. अनेक शाखांपैकीं शाखांचीं हींच नावें कां पसंत केलीं व भार्गवासारखीं चारण वैद्य, मौद, जलद यांच्या बरोबरच सांगितलेलीं कां गाळलीं ह्याबद्दल तर्क करणें सोपें नाहीं. तसेंच शांतिकल्पासारख्या यःकश्चित् परिशिष्टाला, त्याच्यापेक्षां योग्यतेनें वीस किंवा त्याहून अधिक परिशिष्टें जास्त चांगलीं असतांना, अथर्वण सूत्राच्या बरोबरीला पांच कल्पांत कां बसविलें ह्याबद्दलहि तर्क करणें सोपें नाहीं. आपणांस असें गृहीत धरितां येईल कीं, निरनिराळ्या तऱ्हेनें महत्त्वाच्या व पद्धतीच्या ग्रंथांचीं नांवें अगदीं वरवर दिसणाऱ्या कारणांकरितां एके ठिकाणीं आणिलीं गेलीं. कौशिक सूत्र चारशाखांचा संहिताविधिः आहे, हें वर सांगितलें आहे, या गोष्टीवरून या शाखाभेदाप्रमाणें संहितांतहि भेद आहे किंवा निदान एकाच संहितेच्या सूत्रांत तरी भेद असावा ही गोष्ट शक्य नाहीं हें सिद्ध होतें.

प्राचीन प्रत व काश्मीर प्रत यांच्याशिवाय दुसऱ्या संहिता शाखा असल्याचें आजतागाईत ऐकिवांत नाहीं. प्रो. रोटनें आपल्या अथर्ववेदाच्या पुस्तकांत कश्मीर प्रत पैप्पलाद आहे म्हणून सांगितलें आहे परंतु यास सर्व ठिकाणच्या पंडितांचें अनुमत नाहीं. ब्लूमफील्ड म्हणतो कीं या सिद्धांताबद्दल संशय घेण्यास कांहीं कारण दिसत नाहीं. पैप्पलाद हें नांव केव्हां केव्हां अथर्ववेदीय ग्रंथांना उगीच दिलेलें असतें व त्या ग्रंथांचा अर्थाअर्थीं या शाखेशीं मुळींच संबंध नसतो पण ही स्थिति दुसऱ्या वेदांच्या ग्रंथांसंबंधानेंहि अशीच असल्यामुळें त्याबद्दल विशेष स्पष्टीकरण करण्याचें कारण नाहीं. प्राचीन प्रत शौनक शाखेची आहे ही कल्पना जास्त निश्चित झाली आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. अथर्व पद्धतीमध्यें वैतानसूत्र शौनकसूत्र म्हणून दिलेलें आहे व ह्या अथर्व पद्धतीच्या विधानाबद्दल संशय मानण्याचें कारण नाहीं. शौनकसूत्र अथर्वसूत्रावर अवलंबून आहे हें तितकेंच निश्चित आहे. म्हणजे कौशिक हें शौनकिनांचें सूत्र आहे. कौशिक हें 'चतसृषु शाखासु शौनकादिषु संहिताविधिः' आहे या केशवकृत अथर्वणपद्धति व सायण यांच्या विधानावरून स्वतंत्रपणें वरीलच मुद्दा सिद्ध होतो. कौशिक ८५, ७, ८ मध्यें देवदर्शिन् व शौनकिन् यांच्यामधील मतभेद दाखविला आहे, त्यांत कौशिकानें शौनकिन्चा पक्ष घेतला आहे. त्यावरूनहि वरीलच मुद्दा सिद्ध होतो ( अ. ओ. सो. नि. का. पु. ११, पान ३७७ ). कौशिक व वैतान हीं

दोन्हीं सूत्रें शौनकीय आहेत याबद्दल संशय घेण्यास जागा नाहीं. हीं दोन्ही सूत्रें प्राचीन प्रतीच्या आधारावर रचिलीं आहेत म्हणजे प्राचीन प्रतहि याच्याच म्हणजे शौनकीय शाखेची आहे याबद्दल पुरावा भरभक्कम आहे.

अथर्वण वेदाच्या वाङ्मयांत नेहमीं येणारी एक सांप्रदायिक कल्पना अशी आहे कीं, प्राचीन प्रतींत १, १, १, मध्यें दिलेल्या 'येत्रिषप्ता'च्या ऐवजीं अथर्वण संहितेचा आरंभ 'शंनो देवीरभिष्टये' या मंत्रानें झालेला आहे. 'शंनो देवीरभिष्टय इति एवमादि कृत्वाऽथर्वणवेद अधीयेत' असें गोपथ ब्रा० १, २९ मध्यें म्हटलें आहे. ब्रह्मयज्ञामध्यें वेदाच्या आरंभींचे मंत्र दिले आहेत, त्यांत अथर्वण वेदाचा आरंभ 'शंनोदेवीरभिष्टये' या मंत्रानें दिला आहे. डॉ. हौगच्या म्हणण्याप्रमाणें कांहीं प्राचीन प्रतीच्या हस्तलिखितांत अथर्ववेदाचा आरंभ, 'शंनोदेवीरभिष्टये' या मंत्रानें झाला आहे. डॉ. हौग व भांडारकर यांच्या म्हणण्याप्रमाणें अथर्ववेदानुयायी प्रत्येक माणसानें आपलें तोंड धुतांना 'ये त्रिषप्ताः' व 'शंनोदवीरभिष्टये' हे मंत्र म्हटले पाहिजेत. महाभाष्याच्या प्रस्तावनेंत 'शंनोदवीरभिष्टये' हा मंत्र अथर्ववेदाच्या आरंभींचा म्हणून दिला आहे. पैप्पलाद संहितेमध्यें, जिची यूरोपांत उपलब्ध असलेली एकच प्रत प्रो० रोटच्या ताब्यांत आहे, तिच्यांत पहिलें पान गहाळ झालें आहे परंतु या पंडिताचें असें मत आहे कीं, संहितेचा पहिला मंत्र वर सांगितलेलाच असावा, कारण तो मंत्र त्या प्रतींत अन्य ठिकाणीं कोठें आलेला नाहीं व प्राचीन प्रतीच्या आरंभाचा 'ये त्रिषप्ताः' हा मंत्र दुसऱ्या अनुवाकाच्या आरंभीं दिला आहे. ही गोष्ट आतां जवळ जवळ निश्चित आहे असें मानावयास हरकत नाहीं, कारण अथर्व परिशिष्ट ३४,२० मधील पैप्पलादि शान्तिगणाचा आरंभ 'शंनोदेवी' या प्रतीकानेंच केला आहे.

शौनक संहितेचा आरंभ 'ये त्रिषप्ताः' या मंत्रानें होतो. हौगच्या मताप्रमाणें अथर्ववेदाचा आरंभ 'शंनोदेवी' या मंत्रानें होऊन तो मंत्र पुनः त्याच्या योग्य जागीं १,६,१ मध्यें आला आहे व म्हणून त्या हस्तलिखितांत हा मंत्र वर सांगितलेल्या संप्रदायानुसार मागाहून घातलेला असावा. अथर्व परिशिष्ट ४४,६, 'वेदव्रतस्यादेशेन' विधीमध्यें असें विधान केलें आहे कीं, 'ये त्रिषप्ताः' हा अथर्वण वेदाचा आरंभाचा मंत्र आहे. वैतान सूत्रामध्यें 'ये त्रिषप्ताः' व 'शंनोदेवी' यांपैकीं एकाचाहि उल्लेख नाहीं.' परंतु कौशिकामध्यें असा स्पष्ट पुरावा आहे कीं ज्या शाखेच्या संहितेच्या आधारावर हें सूत्र रचिलें त्याचा आरंभ 'ये त्रिषप्ताः' या मंत्रानें झाला आहे. परिभाषा सूत्र ७,८ हें 'पूर्वम् त्रिषप्तीयम्' असें आहे. त्याचा अर्थ जेथें जेथें पूर्वम् शब्द प्रतीक म्हणून वापरला असेल, तेथें तेथें त्यानें त्रिषप्तीय सूक्त अभिप्रेत आहे असें समजावें या परिभाषेनुसार नेहमीं या सूक्ताला उद्देशून सूत्रामध्यें पूर्व शब्द आला आहे. यावरून असें ठाम दिसतें कीं कौशिक हें अथर्वाच्या प्राचीन प्रतीचें सूत्र आहे व प्राचीनप्रत शौनकीय आहे व ही कौशिक, वैतान, व प्रतिशाख्य या तीन सूत्रांची संहिता होय हें स्पष्टपणें सांगितलें आहे.

या दोन संहितांमधील समान गोष्ट अशी कीं, संबोधनाच्या अखेरीस येणारा ओ व पुढील स्वर यांचा संधि केलेला नाहीं.

कौशिकसूत्राच्या अथर्वणसंहितेची प्राचीनप्रत अस्तित्वांत होती हें स्पष्ट आहे कारण त्यांत त्यांतील पुष्कळच सूक्तांचें अवतरण प्रतीकांनीं केलें आहे. यावरून ज्यानें यज्ञयागादि करावयाचें त्याला संहिता पाठ आलीच पाहिजे. असें गृहीत धरलें आहे असें दिसतें. काण्ड १९ चा विचार पुढें केला आहे. तें सोडून दिल्यास बाकीच्या वेदांतील सूत्रांत अथपासून इतिपर्यंत दिलेल्या ऋचा अतिशयच थोड्या आहेत. कौशिक ६,१७ मध्यें अथर्व ६.८५,२; कौ. १०६,७;७५,५ मध्यें अथर्व १४.१,१३ याच त्या होत. मध्यें अथर्व ७, ४८,२; कौ. ९७,६ मध्यें अथर्व ८, २,९.; कौ. शेवटल्या उदाहरणाखेरीज पहिल्या तीन उदाहरणांमध्यें मंत्रसहितेपासून घेतलाच नाहीं हें स्पष्ट आहे. अथपासून इतिपर्यंत मंत्र अथर्ववेदांतील ऋचांशीं कांहींसे जुळते आहेत ही गोष्ट केवळ आकस्मिक होय. अशी स्थिति निरनिराळ्या शाखांच्या मंत्रांची तुलना करतांना नेहमीं दृष्टोत्पत्तीस येते. कौशिकसूत्रामध्यें १५ व २० हीं कांडें अजीबात गाळलीं आहेत. त्यांतील १५ वें अव्यवहार्य व रूपकमय स्वरूपाकरितां, तो व्रात्यग्रंथ म्हणून गाळलें असावें; व विसावें एकतर तें हीं सूत्रें रचलीं गेल्यानंतर संहितेंत घातलें असावें म्हणून किंवा त्याचा श्रौताशीं स्पष्टपणें संबंध होता म्हणून गाळलें असावें व हेंच जास्त संभवनीय दिसतें, सोमयज्ञाच्या शस्त्रांकरितां व स्तोत्रांकरितां, कांहीं अपवाद खेरीज करून वैतान सूत्रामध्यें विसाव्या कांडाचा उपयोग केला आहे.

१९ व्या काण्डाचा या सूत्रांशीं असलेला संबंध विशेष लक्ष पुरविण्यासारखा आहे. यांतील फारच थोड्या मंत्रांचें अवतरण प्रतीकांनीं केलें आहे. जसें कौ. ६,३७;४५,१७; व ६८,२९, मध्यें १९. ५२,१: कौ. ६,३७ मध्यें १९. ५९,१: कौ. ६६, मध्यें १९. ६०,१: कौ ५७,९६ मध्यें १९. ६४,१: कौ. १३९,१० मध्यें १९. ६८, १. बाकीचीं एकोणिसाव्या कांडांतील अवतरणें हीं सकलपाठांतील सूत्रांत दिलेले मंत्र होत. व म्हणून हीं शौनकीय संहितेमधून घेतलेलीं नव्हत. कौ. ६,३७ मध्यें दारिलानें एका कोपऱ्यांतल्या प्रतीकाकरितां (१९,५९) सगळ्या सूक्ताचा सकल पाठ दिला आहे ही चमत्कारिक गोष्ट आहे ! वर दाखविलें आहे कीं कौशिकांतील अथर्व सूत्र या नांवानें संबोधिलेल्या भागामध्यें १९ व्या कांडांतलें एकहि अवतरण प्रतीकानें दिलेलें नाहीं. या शाखेची म्हणून तयार झालेली व मान्य झालेली संहिता आणि स्पष्टपणें निराळ्या ठिकाणाहून आलेला दुसरा मंत्रसमूह यांच्या मधील स्थान कौशिक सूत्रांत या १९व्या कांडाचें असावें असें

रोटच्या मताप्रमाणें पिप्पलाद शाखेभर १९व्या कांडाचा विषय पसरला होता. आपणास असें गृहीत धरावयास हरकत नाहीं कीं, या कांडाचा विषय अथर्ववेदाच्या सर्व शाखांच्या संप्रदायांना माहीत होता, तो पहिल्या संस्करणाचे वेळीं गाळला होता, पण मागाहून संगृहीत करण्यास योग्य असा वाटल्यामुळें मूळवेदांत सामील केला गेला असावा. व्हिट-नेच्या मतें अथर्व परिशिष्ट, एकोणिसावें कांड मुदलींच मानीत नाहीं. कौशिकसूत्राचें धोरण संशयित स्वरूपाचें दिसतें; कांहीं मंत्र त्याच्या शाखेच्या इतक्या परिचयाचे आहेत कीं त्यांचें निदर्शन नुसत्या प्रतीकांनीं केलें असतां पुरें होतें; तर दुसरे कांहीं अथपासून इतिपर्यंत देणें भाग होतें. नंतरच्या अथर्ववाङ्मयांत या मंत्रांचा परिचय अर्थात् जास्त दृढ झालेला दृष्टोत्पत्तीस येतो. परिशिष्टांत १९ वें कांड बाकीच्या अथर्ववेदाप्रमाणेंच मानलें असून त्यांतीलच अवतरणें विशेषतः वारंवार येतात. उदाहरणार्थ १९,७ हें नक्षत्रकल्प १० मध्यें घेतलें आहे; १९,९ हें नक्षत्र २६ व अथर्वपरि-शिष्ट ४,४; ६,२ मध्यें घेतलें आहे इत्यादि. अथर्वपरिशिष्ट ३४ मधील गणमालेमध्यें १९ व्या कांडातले पुष्कळ मंत्र अव-तरण करून घेतले आहेत.

हिलेब्रँट यांनीं असा एक प्रश्न उपस्थित केला आहे कीं, एखादा मंत्र किंवा सूक्त, ज्या स्वरूपांत संहितेंत आलें आहे, त्यापेक्षां तें निराळ्या स्वरूपांत असावें असें या सूत्रावरून दिसतें काय ? या प्रश्नाचाहि विचार केला पाहिजे. सामान्यतः ऋचेंतील शब्द व सूक्तांतील ऋचांची संख्या व अनुक्रम या दृष्टीनें सूत्रांत आलेले मंत्र व सूक्तें हीं अगदीं संहिते-बरहुकुम आहेत. परंतु यासंबंधानें पुढें दिलेला मुद्दा लक्षांत ठेवण्यासारखा आहे. जेव्हां एकादें अथर्वसूक्त, स्पष्टपणें, अनेकावयवघटितस्वरूपाचें असतें, म्हणजे संहि-ताकारांनीं जेव्हां संहिता करण्याचे वेळीं पुष्कळ सूक्तांचें मिळून एक सूक्त बनविलेलें असतें, तेव्हां सूक्तकारांनीं अशा सूक्तांचा प्रत्येक अवयव लक्षांत घेऊन त्याचा योग्य स्थलीं उपयोग केलेला आहे. अथर्व ४,३८ हें सूक्त स्पष्टपणें पुष्कळ लहान लहान सूक्तांचें बनलें आहे. या सूक्ताच्या ५–७ या ऋचांवर ग्रिलनीं केलेल्या टीकेला कौशिकसूत्रानें पुष्टि दिली आहे व या सूक्ताच्या अंतस्थ पुराव्यावरून तीच गोष्ट सिद्ध होते. ऋचा १–४मध्यें द्यूतविषयक अभिचार मंत्र आहे व कौशिक-सूत्रामध्यें ४१,१३ मध्यें अथर्व ७,५०; व ७,१०९ यांतील अशाच तऱ्हेच्या दुसऱ्या मंत्रांबरोबर यांचा विचार केला आहे. ऋचा ५–७ या कौ० २१,११ मध्यें एका जनावराविषयींच्या अभिचारमंत्रांत घेतल्या आहेत. ह्या शेवटल्या ऋचा पहिल्या ऋचांपेक्षां पूर्णपणें इतक्या निराळ्या तऱ्हेच्या मानल्या आहेत कीं, त्यांना कर्कीप्रवादाः असें निराळें पारिभाषिक नांव दिलें आहे. त्याचप्रमाणें अथर्व ७,७४ हें सूक्तहि पुष्कळ निरनिराळ्या सूक्तांचें बनलें आहे ही गोष्ट सूक्तकाराच्या लक्षांत आलेली आहे. कौ० ३२,८ मध्यें पहिल्या दोन ऋचा अप-चित नांवाच्या जखमा घालविण्याच्या तंत्राला लाविल्या आहेत. तिसरी ऋचा कौ० ३६,२५ मध्यें मत्सर घालविण्याचा मंत्र म्हणून, योग्यस्थळीं घेतली आहे व चवथी ऋचा कौ० १,३४ मध्यें योग्यस्थळीं घेतली आहे. अथर्ववेदाच्या संस्करणका-रानां अशा निरनिराळ्या स्वरूपाच्या ऋचा एके ठिकाणीं घाल-ण्यास त्यांच्या अंगीं असलेलें कोणतें न्यून म्हणजे त्यांना त्याचा अर्थ कळला नाहीं किंवा दुसरें कांहीं कारण झालें असावें हें नेहमींच सांगतां येणें शक्य नाहीं. याचप्रमाणें अथर्व ७,७६ या सूक्ताचे कौशिक व वैतान दोन्ही सूत्रांनीं तीन भाग पाडले आहेत. वरील सर्व उदाहर-णांत संहितेच्या परंपरेपेक्षां विधीची किंवा आचाराची परंपरा श्रेष्ठ मानिली आहे यांत संशय नाहीं.

[ अथर्ववेदासंबंधीं संदर्भग्रंथ व वाङ्मय बुद्धपूर्व जग या ग्रंथाच्या शेवटीं दिलें आहे. ]

**अथेन्सः**—ग्रीसचें राजधानीचें शहर. हे आटिका मैदा-नाच्या दक्षिण टोंकाला वसलें आहे. अथेन्सच्या भौगोलिक रचनेचा एकंदर इतिहासावर फार परिणाम झालेला आहे. आटिका मैदानांत सर्व प्रकारच्या खाद्योपयोगी वस्तु उत्पन्न होत असल्यामुळें अथेन्समध्यें उपजीविकासाधनांची कांहीं तूट नाहीं. एखादें शत्रुसैन्य जमिनीवरून अथेन्सवर अचा-नक छापा घालूं म्हणेल तर तें शक्य नाहीं व समुद्रापासून बरेंच दूर असल्यामुळें समुद्रावरून आरमार अचूक मारा करील याचीहि अथेन्सला काळजी वाळगावयास नको. येथील हवामान सामान्यतः समशीतोष्ण आहे, तथापि केव्हां बद-लेल याचा नेम नसतो. उत्तरेकडील वारे आणि समुद्रलहरींच्या वायूमुळें येथें उन्हाळा फार थंड असतो. स्वच्छ व उत्तेजक हवेमुळेंच येथील लोक बुद्धिमान आणि उत्साही आहेत असें कित्येक जुन्या ग्रंथकारांचें म्हणणें आहे.

अगोरा म्हणून अथेन्समध्यें एक प्रसिद्ध व्यापाराची पेठ असे. या ठिकाणीं भरभराटीचा व्यापार चालत असून मोठाल्या भव्य इमारती होत्या.

अथेन्समधील महत्त्वाचें स्थळ म्हणजे ज्या ठिकाणीं प्लेटो आणि आरिस्टाटल शिकवीत असत ती अॅकेडमी होय. शोध-कांच्या प्रयत्नांमुळें ज्यांत निसर्गदेवतेचें आणि अपोलोचें वा-स्तव्य होतें अशा दोन गुहा सांपडल्या आहेत. अथेन्समधील दुसरें महत्त्वाचें स्थान म्हणजे ऑलिंपिअन देऊळ होय.

अथेन्सची लोकसंख्या १८३४ त ५००० हून कमती होती ती १८७० त ४४५१०, १८७९ त ६३३७४, १८८९ त १०७२५१ आणि १८९६ त १११४८६ अशी वाढत गेली. सध्यां अथेन्स, पिरिअस, फेलेरॉन मिळून लोकसंख्या सुमारें ३,००,००० इतकी आहे. १९१२ सालीं अथेन्स मध्यें दोन विश्वविद्यालयें स्थापन झालीं.

अर्वाचीन कालांत अथेन्सचा व्यापारधंदा फार वाढत्या प्रमाणावर आहे. पिरिअस मध्यें ८ कापडाच्या गिरण्या असून, १५ वाफेनें चालणाऱ्या पिठाच्या चक्क्या, साबणाचे कारखाने आहेत. बोटी बांधण्याचा धंदा फार मोठ्या प्रमाणावर चालतो.

अथेन्सच्या प्राचीन इतिहासाविषयीं खात्रीलायक माहिती फारशी उपलब्ध नाहीं. दंतेकथेवरून व परंपरागत माहितीवरून पाहतां असें कळतें कीं आयोनिअन लोक अथेन्समध्यें आले व त्यांच्या प्रयत्नानेंच निरनिराळ्या ज्ञातींचें एकीकरण होऊन राजसत्ता स्थापन झाली. परंतु या राजसत्तेचा लवकरच अंत होऊन महाजनसत्ता अस्तित्वांत आली व लोकांचे राजकीय हक्क एकामागून एक हिरावून घेतले जाऊं लागले. शेवटीं पेसीट्रेटस या अरेरावी सरदाराच्या स्वामित्वाखालीं एकतन्त्री राज्यपद्धतीचें भूत अथेन्समध्यें मनमुराद वावरूं लागलें. परंतु या भुताला ताळ्यावर आणण्याचें काम क्लीस्थिनीझ या पंचाक्षऱ्यानें पत्करून, आपल्या कर्तबगारीनें तें भूत गाडून टाकलें व प्रजासत्ताक राज्याची मुहूर्तमेढ अथेन्समध्यें रोंवली.

स्वतंत्रतेबरोबरच उत्साह अंगीं बाणल्यामुळें अथेनिअनांनीं इ. स. पूर्वी ४५० या वर्षीं इराणावर विजय मिळविला. या विजयाचें पुष्कळसें श्रेय थेमिस्टोक्लीझ या प्रसिद्ध मुत्सद्याला आहे. इराणच्या पराभवानंतर अथेन्सनें आरिस्टिडीझ व सायमन या दोन प्रसिद्ध मुत्सद्यांना आपलें पुढारीपण दिलें. यांच्या कर्तबगारीनें व कर्तव्यपरायणतेनें अथेन्सला डेलिअन संघाचें अध्यक्षत्व मिळून, अथेन्स साम्राज्य या पदवीस जाऊन पोंचलें. सायमनच्या नंतरचा महत्त्वाचा मुत्सद्दी म्हणजे पेरिक्लीझ हा होय. याचें धोरण अथेन्स साम्राज्याचा सरराहा प्रसार करणें हें होतें. इ. स. पूर्वी ४४३-४२९ हीं वर्षें म्हणजे अथेन्सच्या पूर्ण वैभवाचा उज्ज्वल काळ होय. या वेळीं अथेन्सचा व्यापार इजिप्त आणि कोलचिझपासून तों इटुरिआ व कार्थेजपर्यंत सारखा पसरलेला होता. वाङ्मय आणि संस्कृतिविषयक बाबतींत तर अथेन्स उच्च शिखरावर विराजित झालें होतें. तथापि या उज्ज्वल वैभवचित्राला लेशमात्र कलंक नव्हता असें म्हणतां यावयाचें नाहीं. पेरीक्लीझच्या नंतर अथेन्सला जें मंत्रिमंडळ मिळालें तें नालायक किंवा स्वार्थसाधु असल्यामुळें साम्राज्यप्रसाराचें धोरण नेटानें चालवूं शकलें नाहीं आणि अथेन्सच्या वैभवाचा पेलापोनीशिअन युद्धांत अंत होऊन मासिडोनच्या फिलीपच्या अंमलाला अथेन्सला मुकाट्यानें मान वांकविणें भाग पडलें. हा परकीय अंमल इ. स. पूर्वी २२९ या वर्षीं दूर झाला आणि अथेन्स फिरून एकदां स्वतंत्र झालें. या वेळीं अथेन्सला लष्करी राष्ट्र म्हणून जरी मान नसला तरी लोकसत्ताक राजपद्धतीचें पुरस्कर्तें राष्ट्र म्हणून त्याची सबंध यूरोपभर ख्याती होती.

यापुढील अथेन्सचा इतिहास म्हणजे केवळ परतन्त्र राष्ट्राचा नसला तरी रोमन साम्राज्याखालील राष्ट्राचा इतिहास होय. इ. स. पूर्वी २२८ या वर्षीं अथेन्सनें रोमशीं मैत्री जोडली. रोमन बादशहांचा अथेन्सवर फार लोभ असे. या वेळचें अथेन्स हें लढवय्यें राष्ट्र नसून पंडितांचें राष्ट्र होतें. 'ज्ञानाचें माहेर घर' अशी त्याची या वेळीं कीर्ति होती. परंतु हें वैभवहि अथेन्स फार दिवस भोगूं शकलें नाहीं. जस्टिनीअनच्या कायद्यानें तत्त्वज्ञानाचा अभ्यास बंद होऊन प्राचीन अथेन्सचा अवतार येथेंच संपला.

यापुढील अथेन्सचा इतिहास म्हणजे बिझान्शिअमच्या अंमलाचा काळ, लॅटिन अंमलाचा काळ, व तुर्क अंमलाचा काळ, अशा तीन भागांत विभागतां येईल. इ. स. १४५८ त तुर्कांनीं अथेन्स जिंकलें. १८२१ त, अथेन्सनें तुर्कांना हुसकावून लावण्याच प्रयत्न केला पण १८२६ तें फिरून तुर्की अंमलाखालीं गेलें. १८३३ सालापर्यंत तुर्कांचा आक्रापोलीसच्या दुर्गावर अंमल होता. १८३३ त अथेन्स हें नूतन ग्रीसच्या राज्याचें राजधानीचें शहर बनलें. गेल्या दोनतीन वर्षांत अथेन्समध्यें घडलेल्या सर्व गोष्टींचा इतिहास ग्रीस या लेखांत येईल, कारण त्यांचा सर्व ग्रीसच्या इतिहासाशीं संबंध पोंचतो.

**अथोर**—बडोद्याच्या सिद्धपूर पोटभागांतील सुमारें अडीच हजार लोकसंख्येचें ठिकाण. येथें एक प्रसिद्ध गणपतीचें देऊळ व एक धर्मशाळा आहे.

**अदवानी तालुका**—बेल्लारी जिल्ह्यांतील ( मद्रास ) अगदीं उत्तरेकडील तालुका. अदवानी हें पूर्वी निजामचें पोटसंस्थान होतें. उत्तर अक्षांश १५° ३०′ व १५° ४८′ यांच्या दरम्यान व पूर्व रेखांश ७६° ५६′ व ७७° ३८′ मध्यें असून याचें क्षेत्रफळ ८३९ चौ. मै. आहे. लोकसंख्या सुमारें एक लक्ष ऐशींहजार. यांत तीन शहरें व १९१ खेडीं आहेत.

शहरें—अदवानी, लोकसंख्या ( तीसहजार ) मुख्य ठिकाण. योमिगनुर ( चवदा हजार ), कोसिगि ( आठ हजार ). येथील प्रदेश सपाट असून जमीन काळी भोर कापसाच्या पिकास योग्य अशी आहे. कांहीं ठिकाणीं उंचवटे आहेत. मुख्य पिकें म्हणजे कापूस, चोलम (Cholam) कोरा (Korra ). जमिनीचा मगदूर इतका चांगला आहे कीं दर एकरीं येथें सरकार सारा १४ आणे आहे. सर्व पिकें पावसाच्या पाण्यावर अवलंबून असतात. फक्त शेंकडा १ एकरास विहिरीचें पाणी मिळतें. त्यामुळें अवर्षणाच्या वर्षीं फार हाल होतात. इ. स. १८७६-८ चे दुष्काळांत $\frac{1}{3}$ लोक अन्नान्न होऊन रोगांनीं मृत्युमुखीं पडले.

**अदवानी शहर**—याच नांवाच्या तालुक्याचें मुख्य ठिकाण उत्तर अक्षांश १५° ३८′ व पूर्व रेखांश ७७° १७′. हें मद्रासपासून ३०७ मैलांवर आहे. या जिल्ह्यांतील हें एक मल्लारीच्या खालोखाल सर्वांत मोठें शहर आहे. लोकसंख्या ( १९२१ ) ३०२३२ त्यांपैकीं शेंकडा ६० हिंदु असून मुसुलमानांचें प्रमाण शेंकडा ३७ होतें. ख्रिश्चन लोक फार थोडे आहेत.

अदवानी हें या प्रांतांतील कापसाच्या व्यापाराचें केंद्रस्थान असून कापसाचे गठ्ठे बांधण्याचे व सरकी काढण्याचे येथें अनेक कारखाने आहेत. त्यांत सुमारें ७०० लोक मोसमांत काम करतात. येथील मुख्य धंदे सुती व रेशमी कापड मागावर विणणें हे आहेत. तसेंच रंग व टिकाऊपणाबद्दल नांवाजलेल्या सतरंज्या येथें पुष्कळ होतात. या शहरास इ. स. १८६७ मध्यें म्युनसिपालिटी मिळाली. इ. स. १९०३–४ या वर्षांतील उत्पन्नाचें व खर्चाचें प्रमाण ५६५०० व ५०००० होतें. पाण्याकरितां एक मोठा तलाव बांधलेला आहे त्यांत ४५०००० घन फूट पाणी मावतें. त्यांतून गांवाला पाणी पुरवलें जातें.

इ ति हा स—अदवानीचा किल्ला फार बळकट असून, सरळ उंच गेलेल्या गिरिशिखरांवर बांधलेला आहे. कृष्णा व तुंगभद्रा या दोन नद्यांमधील सुपीक प्रदेशाचें हें नाक असल्यामुळें दक्षिण हिंदुस्थानच्या लढायांमध्यें या किल्ल्यानें बरेंच कार्य केलेलें आहे. इ. स. च्या १४ व्या शतकामध्यें विजयनगरच्या राजांचा हा एक उत्तम गड असून त्याकाळीं तो अभेद्य समजला जात असे. इ. स. १५६८ मध्यें तालिकोटच्या लढाईनंतर तो विजापूरकरांच्या ताब्यांत गेला; व इ. स. १८०० मध्यें तो इंग्लिशांच्या ताब्यांत येईपर्यंत मुसुलमानांच्या ताब्यांत होता. इ. स. १६०४ ते ३१, पर्यंत येथें विजापूरचा सरदार मलिक रहामनखान हा किल्लेदार होता. नंतर इ. स. १६३२–८७ पर्यंत सिद्दि मसूदखान हा किल्लेदार होता. इ.स. १६८६ मध्यें अवरंगझेब दक्षिण जिंकण्यास आला असतां, त्यानें तो किल्ला जिंकून घेतला. १७५४ च्या सुमारास फ्रेंचांचा अधिकार मुसा बुसीमार्फत या किल्ल्यावर स्थापन झाला असावा कारण शहानवाजखानानें मुसाबुसीचे मनोगतानुरूप अदवानीचा मामला ख्वाजे न्यायदुल्लाखानास करार केला. (पत्र ता. ५।१। १७५४ रा. खं. १.२२,५९). इ. स. १७५६ मध्यें निझामनें आपला आप्त बसालतजंग यास तो जहागीर दिला. १७६० सालीं सदाशिवराव भाऊंनीं जेव्हां निजामावर स्वारी केली तेव्हां बसालतजंग निजामाच्या मदतीस गेला (बाबुराव बुंदेल्याचें गोविंदपंतांस पत्र २० मार्च १७६० रा. खं १,१६९–२७२). पेशव्यांचा निजामाशीं संग्राम १७७४ मध्यें चालू होताच, त्या सुमारास बसालतजंगाचा मुलगा अदवानीकडून नवाबाकडे येत असतां मोहल्लेवर आला आणि श्रीमंतांस बातमी कळून श्रीमंत धांवले (चैत्र व॥ ६ शके १६९५ चें पत्र. रा. खं. १०,११८, ७५). या पत्रांत बसालतजंगास निजामअल्लीचा जांवई म्हटलें आहे. इं. ग्या. १९०८ मध्यें भाऊ म्हटलें आहे.

बसालतजंगाच्या ताब्यांत अदवानीचा किल्ला असतां हैदरनें दोन वेळ हल्ला चढविला पण तो निष्फळ झाला असा उल्लेख इं. ग्या. मध्यें आहे. तो कोणच्या प्रसंगानें हल्ला झाला व तो निष्फळ करण्याचें श्रेय मराठ्यांस आहे, याविषयीं माहिती येणेंप्रमाणें देतां येईल. १७७९ च्या सुमारास मराठे, निजाम व हैदर यांची इंग्रजांविरुद्ध जूट झाली. त्या जुटींत निजाम मिळण्याचें कारण अदवानीसंबंधाची भानगड होय.

इ. स. १७७८ मध्यें फ्रेंचांशीं लढाई होण्याचा प्रसंग दिसूं लागला तेव्हां अर्काटच्या महमदअल्लीमार्फत अदवानीचा नवाब बसालत जंग याच्याशीं इंग्रजांनीं तह केला तो निजामला न विचारतां केला. त्या तहामध्यें नवाबानें आपल्या मुलखापैकीं कांहीं भाग इंग्रजांस भाड्यानें दिला, आणि फ्रेंच फौज काढून टाकण्यासंबंधानें अभिवचन दिलें. त्याबद्दल इंग्रजांनीं हैदराविरुद्ध अदवानी किल्ल्याचें संरक्षण करूं अशी हमी घेतली. (हैदरअल्ली व टिपू सुलतान यांचें चरित्र एल. बी. बावरिंग आक्सफर्ड १८९३). त्या तहाप्रमाणें शके १७०० (इ. स. १७७९) मध्यें बसालतजंग याच्या नोकरींत फ्रेंच सरदार लाली हा होता. परंतु त्याची नोकरी सोडून पेशव्याकडे येण्याची इच्छा परशुरामभाऊंस त्यानें दर्शविली परंतु परशुरामभाऊंनीं त्यास चाकरीस ठेवण्याचें नाकारल्यानंतर तो निजामअल्लीकडे गेला (खरे. ऐ. ले. सं. पृ. ३४०१).

वर सांगितलेल्या करारामध्यें निजामास दुर्लक्षिल्यामुळें निजाम चिडून गेला व पुढें त्या कटांत पडला. अदवानीच्या संरक्षणास इंग्रज जात असतां त्यांस हैदराच्या मुलखांतून जावें लागलें त्यामुळें हैदर व इंग्रज यांमध्यें चकमक उडाली आणि हैदरानें अदवानीपर्यंत मुलूख ताब्यांत घेतला. हा मुलुख पडला निजामाचा. आणि तो हैदर घेतो यामुळें हैदराचें व निजामाचें फिसकटणार होतें तें नाना फडनविसांनीं टाळलें असें दिसतें.

शके १७०१–२ मध्यें तेथें पेशव्यांचा वकील कृष्णाजी नारायण जोशी हा होता आणि तो मराठ्यांतर्फे निजाम, हैदर व अदवानीवाले यांशीं राजकारण करीत होता. नाना फडनविसांचें कार्य खालील पत्रांतील उतारे स्पष्ट करतील.

कृष्णाजी नारायण जोशी यांस नाना यांचें मार्ग. शु. ७ १७०१ मधील पत्रांत नाना लिहितात—रा. गोविन्द नारायण यांचे पत्रावरून अदवानीचा महसरा उठवून नवाब हैदरअल्लीखान नेण्हार तें समजलें. महसरा अदवानीचा लौकरच उठवून नेत असें आधीं करवावें (रा. खं. १९,११,५, १५१८; १६१९).

अदवानीचा महसरा लवकरच उठवून अमिरुल उमराव यांशीं सल्लखा करतों म्हणून नबावांनीं वकीलास उत्तर लिहिलें परंतु अद्याप हंगामा मना झाला नाहीं. अदवानीचा महसरा उठविण्यांन येईल असें निजाम अल्लीखान यांस लिहिलें गेल्यावरून अदवानी ताब्यांत घेण्यासाठीं त्यांनीं फौज पाठविली. त्याशी बहादुराकडील फौजेचा कलह न व्हावा म्हणून मार्ग. व॥ ६ शके १७०१ चें पत्र. (रा. खं. १९–१९–१०).

हैदरअल्लीखान बहादूर यास नानांचें पत्र (मार्ग. व॥ १०

शके १७०१.) अदवानी तालुक्यांत आम्हैरबांकडून हंगामा आहे येविशीं तहनाम्यांत कलम लिहिलें व आपणांसहि कलमीं केलें...विनाबरा अदवानीचा हंगामा जलद रफा व्हावा म्हणजे नवाब मवसूफ यांची खातरजमा होऊन सर्वत्रांची एकदिली जालियाचा दाब दुषमनावर पडून नेमल्या मसलतीस जिल्हे व खलक येईल. ( रा. खं. १९-२५-१६ ).

कृष्णराव नारायण जोशी यांचें पत्र ( पौष वद्य ११-१७०१ ) हैदर अल्लीशीं मुलाजमत झाली. त्या प्रसंगीं, तहनाम्यांतील अदवानीच्या कलमासंबंधीं बोलले कीं श्रीमंतांची व निजाम अल्लीखान बहादूर यांची दोस्ती आहे पण आमचें व त्यांचें सुदामत नाहीं. त्यांनीं इंग्रजांचे मसलतींत आपल्याशीं बेइमानी केली. त्यांच्या तालुकातीचें कलम तहनाम्यांत कां लिहिलें ? ( रा. खंड १९-४९-३० )

कृष्णराव नारायण जोशी यांस नानांचें पत्र ( माघ शुद्ध ॥ २, १७०१ ) अदवानीचा हंगाम मना होय तोंपर्यंत आम्हीं सिकाकोलीकडे जात नाहीं. असें निजाम अल्लीखान बहादूर म्हणतात म्हणून लिहिलें आहे. (रा. खं. १९-५८-३९ )

( माघ शु॥ ३ चे ) पत्रांत नवाब वसालत जंग बहादूर यांचे वकील पट्टणांत आहेत, त्यांशीं नवाब बहादूर पन्नास हजार होन मागतात म्हणोन कळलें. तरी श्रीमंतांचे मर्जीकरितां अदवानीचा हंगामा दूर करून अमीर, उमराव यांसी सलूखाच करतों ऐसें नरसिंगराव यांसी बहादरांनीं लिहिलें होतें त्याप्रमाणेंच करावें, पैक्याविशीं कांहीं न म्हणावें म्हणून नाना लिहितात. (रा. खं. १९-५९-४० )

( ज्येष्ठ व॥ १०-१७०२ ) च्या कृष्णराव नारायण यांस लिहिलेल्या पत्रांत अदवानी हवेलीचीं ठाणीं सुटल्याबद्दल उल्लेख आहे. ( रा. खं. १९-१६४-१०८. )

भाद्रपद व ॥ २ शके १७०२. रामचंद्र कृष्ण रिसबुड यांचें नानास पत्र—"मुकाम अदवानी नजीक नवाब बसालतजंग जाणोन वर्तमान यथास्थित असे"–(रा. खं. १० २५९.१८३.)

अदवानीचें रक्षण करण्याचें कार्य शके १७०१ मध्यें जरी मराठ्यांनीं केलें तरी त्यांस तें शके १७०८ ( इ. स. १७८६) मध्यें करतां आलें नाहीं. त्या वेळेस टिपूनें तो किल्ला घेतलाच. त्याची हकीगत येणेंप्रमाणें वासुदेवशास्त्री खरे देतात. ( ऐ. ले. सं. पृ. ४०१३-५ ).

"बदामी काबीज झाल्यावर हरीपंत तात्या मे महिन्याच्या अखेरीस तेथून कूच करून गजेंद्रगडाकडे गेले. त्या किल्ल्यास मोर्चे दिल्यावर पायदळाच्या दोन लहान तुकड्या टिपूकडून कुमकेस येत होत्या त्या मराठी स्वारांनीं वाटेंतच गांठून मारून टाकिल्या. मग किल्लेकऱ्यांनीं घोरपड्यांचे मार्फत संधानाचें बोलणें लाविलें. आठ दिवस वाटाघाट होऊन आतां किल्ला स्वाधीन व्हावा तों टिपूनें अकस्मात् जाऊन अदवानीस मोर्चे दिल्याची बातमी आली. अदवानीचें संस्थान निजामअल्लीचे बंधु बसालतजंग यांचें होतें हें पूर्वी सांगितल्याचें वाचकांस स्मरत असेलच. वसालतजंग आतां वारले होते व त्यांचे पुत्र मोहबतजंग हे मुलांमाणसांसुद्धां अदवानींत होते. टिपूनें त्या किल्ल्यास वेढा घालून फार निकड केली. परंतु मोहबतजंगांनीं शर्थीनें लढून शत्रूचे दोन हल्ले माघारे परतविले. 'आपली कुमक झाली नाहीं तर आपण मुलांमाणसांसुद्धां शत्रूच्या हातीं सांपडणार; याकरितां आपल्या घराण्याची अब्रू रहावी, आपल्या घरच्या बायका टिपूच्या हातीं लागूं नयेत, एवढ्याकरितां तरी कुमकेस फौज पाठवून आपला बचाव करावा,' अशी मोहबतजंगांनीं आपल्या चुलत्याची म्हणजे निजामअल्लीची प्रार्थना केली, निजामअल्लींनीं तत्काळ आपले धाकटे बंधू मोगल अल्ली यांबरोबर पंचवीस हजार फौजेची रवानगी केली व हरिपंततात्यास निकडीचीं पत्रें पाठविलीं कीं, तुम्ही आपली फौज व मोगलअल्ली एकत्र होऊन टाकोटाक अदवानीस जाऊन टिपूचे मोर्चे उठवावे. तीं पत्रें येतांच तात्यांनीं गजेंद्रगड घेण्याकरितां तिसरा हिस्सा फौज आपणाजवळ ठेवून सुमारें दोनतृतीयांश फौज तारीख ९ जून रोजीं अदवानीकडे रवाना केली. त्या फौजेंत आप्पा बळवंत मुख्य सरदार असून त्यांचे हाताखालीं बाजीपंत अण्णा, रघुनाथ नीळकंठ पटवर्धन व मोगलाई फौजेसुद्धां तहवारजंग हे सरदार नेमिले होते. आप्पा बळवंत यांनीं भागानगराहून मोगलअल्ली आले होते, त्यांस सामील करून घेऊन अदवानीकडे झपाट्यानें चाल केली. ते तेथें पोंचतांच टिपू मोर्चे उठवून तीन कोस मागें सरला. तारीख २२ जून रोजीं आप्पा बळवंत व बाजीपंत व रघुनाथराव पटवर्धन हे त्रिवर्ग सरदार तयार होऊन टिपूवर चालून गेले. टिपूनें आपल्या अघाडीस हजार बाराशें स्वारांची चौकी ठेविली होती, ती मराठ्यांनीं मारून उधळून दिली व तिचे शें दीडशें घोडे हिसकून घेतले, तों खासा टिपू सुलतान पायदळ व तोफा घेऊन गोटांतून आला त्यानें तोफांचा भडिमार केला. अस्तमानपर्यंत लढाई होऊन शेवटीं मराठ्यांनीं टिपूस त्याच्या गोटापर्यंत रेटीत नेलें. इतकी लढाई झाली तरी मोगलांची चाळीस पन्नास हजार फौज लढाईचा तमाशा पहात गोटांतच बसून होती ! मराठ्यांची कुमक तिनें काडीमात्र केली नाहीं.

आप्पा बळवंत निघून गेल्यावर दोन दिवसांनीं गजेंद्रगड हरिपंततात्यांच्या हवालीं झाला. मग तेहि अदवानीकडे गेलेल्या फौजेचा पाठपुरावा करण्याकरितां तेथून निघून कवताल भानूपर्यंत आले. ते दिवस अखेरीचे होते, तरी तुंगभद्रेच्या उत्तरतीरीं बुनगें ठेवून पलीकडे जाऊन पलीकडची फौज व आपण एकत्र होऊन टिपूवर चालून जावें व लढाईचा हंगाम त्याच्या मुलखांत पाडावा असा तात्यांचा बेत होता. त्या वर्षी त्या प्रांतीं मृगाचा पाऊस झाला नव्हता. पुढचीं एक दोन नक्षत्रें पाऊस न पडता, तर तात्यांचा बेत सिद्धीस जाता आणि कदाचित् चार महिनेपर्यंत मोगल मराठी फौजांची छावणीहि तिकडेच झाली असती. परंतु आर्द्रांचा पाऊस झपाट्याचा

सुरू झाल्यामुळें तात्यांचा पलीकडे जाण्याचा बेत एकीकडेच राहून पलीकडे सडी फौज अदवानीच्या कुमकेस गेली होती, ती नदीस पाणी येऊन पलीकडेच अडकून पडते कीं काय ही त्यांस काळजी उत्पन्न झाली ! अशा अडचणीच्या दिवसांत अदवानीस शह देऊन टिपूनें हरिपंत तात्यास एक प्रकारचें कोडेंच घातलें होतें व हें कोडें ते कसें सोडवितात हें तो पहात बसला होता ! सडी फौज घेऊन पलीकडे जावें तर बुनगें अलीकडे राहिल्यामुळें नदीस पाणी आल्यावर निभाव लागणार नाहीं आणि मागून धान्य व वैरण पोंचणार नाहीं ! पलीकडे न जावें तर अदवानीचा टिकाव शत्रूपुढें कसा लागणार ? नरगुंदचा अनुभव तात्यांस होताच. या सर्व अडचणींचा विचार करून त्यांनीं आप्पा बळवंत यांस लिहून पाठविलें कीं, तुम्ही मोहबतजंग यांस मुलेंमाणसें व चीजवस्तसुद्धां अदवानीहून काढून नदीस पाणी भरलें नाहीं तों लौकर निघून अलीकडे यावें. याप्रमाणें आप्पा बळवंत यांनीं केलें. पण अदवानीची तटबंदी पाडणें, तोफा फोडणें, धान्याचा नाश करणें, या गोष्टी शत्रु ठाणें घेणार हें कळलें असूनहि परत जाण्याच्या धांदलीत त्यांस करितां आल्या नाहींत. ते घाईघाईनें परत आले तों तुंगभद्रा नदीस उराइतकें पाणी झालेंच होतें ! अलीकडच्या तीरीं लष्कर पुरतें उतरतें व उतरतें तों नदीस पूर येऊन दुथडा पाणी भरून चाललें !

याप्रमाणें अदवानीच्या मसलतींतून शर्थीनें पार पडल्यावर दोन्ही सैन्यें पुन्हां एकत्र होऊन कनकगिरीपर्यंत आलीं. तेथें मोगल अलीस निरोप देऊन तहवारजंगास मात्र बरोबर घेऊन हरिपंत तात्या बहादुरबिंड्यास आले. इतकें होतें तों जुलैचा महिना संपला. कुमकेस आलेली फौज नदीपार जातांच टिपूनें अदवानीच्या किल्ल्यावर निशाण चढविलें. अदवानी टाकून येण्याची मसलत हरिपंतांनीं केली ती परशुरामभाऊस पसंत पडली नाहीं. "अदवानी टाकून आले, हें ठीक झालें नाहीं. होणार भावी !" हे त्यांचे उद्गार एका पत्रांत आहेत. परंतु तात्यांच्या अडचणी काय होत्या त्या आम्हीं वर दर्शविल्याच आहेत."

या प्रसंगीं टिपूनें अदवानी किल्ला घेतला. तो पुढें निजामाला टिपूकडून जो प्रदेश गेला त्यांत निजामाला परत मिळाला व पुढें तो १८०० मध्यें इंग्रजांस मिळाला.

**अदानाः**—आशिया मायनरच्या आग्नेयीस हा एक तुर्की राज्याचा भाग आहे. यांतच प्राचीन सीलीशियाचा समावेश होतो. येथें खनिज संपत्ति फार आहे. हें एक इतिहासप्रसिद्ध व लष्कराच्या दृष्टीनें फार महत्त्वाचें ठिकाण आहे. येथें खलीफ हरून अलरशिद यानें बांधिलेल्या इमारती अजून दृष्टीस पडतात. हें रोमन लोकांचें महत्त्वाचें लष्करी ठाणें होतें.

**अदा बझारः**—आशिया मायनरमध्यें कान्स्टांटीनोपलमधून पूर्वेस जाणाऱ्या लष्करी हमरस्त्यावर हें शहर वसलेलें आहे. येथें रेशीम, तंबाकू, अक्रोड वगैरे जिनसांचा व्यापार चालतो.

**अदिकल**—अंबलवासी जातिसमूहापैकीं एक वर्ग—हे मूळचे ब्राह्मण आहेत असें म्हणतात; परंतु भद्रकालीच्या देवळामध्यें उपाध्यायाचें काम केल्याकारणानें व मांस आणि दारू यांचे नैवेद्य दाखविले म्हणून ते भ्रष्ट झाले. ते यज्ञोपवीत धारण करितात, क्षुद्र देवतांच्या देवळांमध्यें उपाध्यायाचें काम करतात, व दुसरीं देवळांतलीं कामें करतात. लग्न आणि वारसा या बाबतींत ते मक्कत्तयम नियमांप्रमाणें वागतात. ते वृद्धि व सुतक दहा दिवस पाळतात. दहा गायत्रीमंत्र जपतात; त्यांच्याच जातीचे लोक त्यांची भिक्षुकी करितात. त्यांच्या बायकांस आदियम्मा असें म्हणतात. नम्बुद्रि बायकांसारिखे दागिने या वापरतात पण बाहेर जातांना त्यांच्यासारखी ताडाची छत्री घेत नाहींत व त्यांचेप्रमाणें नायर कुणबीण बरोबर नेत नाहींत. [ Castes and Tribes of S. India. Census Report–Travancore ( 1911 )]

**अदिचनल्लुर.**—तिनेवेल्ली जिल्ह्यांतील (मद्रास इलाखा) श्रीवैंकटम् तालुक्यांतील एक खेडें. हें उत्तर अक्षांश ८°३८′ व पूर्व रेखांश ७७°५०′ वर असून श्रीवैंकटम् शहरापासून तीन मैलांवर व पालमकोट्टापासून १५ मैलांवर आहे. हें ताम्रपर्णीनदीच्या उजव्या तीरावर वसलें आहे. इ. स. १८९९ व त्याचे पुढील वर्षांत पुरागवस्तुसंशोधन खात्याचे सुपरिन्टेंडेन्ट री साहेब यांच्या देखरेखीखालीं झालेल्या खोदणींत असें आढळून आलें आहे कीं दक्षिण हिंदुस्थानांत आतां पावेतों सांपडलेल्या स्मशानभूमींपैकीं ही सर्वांत मोठी व इतिहासपूर्वकालीन आहे. ताम्रपर्णीनदीच्या दक्षिण तीरावर एका भागांत शेंकडों मृतांचे अवशेष घालून पुरलेलीं भांडीं सांपडलीं आहेत. म्हणून या जागेच्या लगतची १०० एकर जागा सरकारनें संशोधनाकरितां राखून ठेवली आहे. हीं भांडीं ३ पासून १० फूट खोल व एकमेकांपासून ६ फूट अंतरानें पुरलेलीं आढळतात. या भांड्यांतील अवशेष व इतर वस्तू अजून चांगल्या स्थितींत सांपडतात. शुद्ध सोन्याचे दागिने, लोखंड व कांसें यांचीं अपूर्व व उत्तम कारागिरीचीं भांडीं व तसेंच मातीचीं भांडीं सुमारें १२०० वस्तू आतांपर्यंत मिळाल्या आहेत. लोखंडाच्या वस्तू म्हणजे टांगायचे दिवे, तलवारी, भाले, चाकू, हातोडे, अंगठ्या, बांगड्या, त्रिशूळ, तिवया वगैरे होत. तसेंच कांशाच्या वस्तू म्हणजे पेले, सुबक नक्शीच्या सुरया, वाडगे व सुंदर दिवे. ह्या सर्व वस्तू मद्रास येथील पदार्थसंग्रहालयांत जतन करून ठेवण्यांत आल्या आहेत. लोकांत अशी एक दंतकथा आहे कीं, पुरातन कालीं या ठिकाणीं एक मोठें शहर होतें. रीसाहेबांचें मत असें आहे कीं हें शहर पाण्ड्यराजांच्या वेळचें असावें; व प्रेतें पुरण्याच्या पद्धतीवरून या मतास पाठिंबा मिळतो. संशोधनाचें काम चालू आहे व त्यामुळें पूर्व इतिहास जास्त स्पष्ट होईल [ इं. गॅ. ५].

**अदितिः**—अदितीचें वैदिक स्वरूप 'वेदविद्या' (पा. ३२५–३२६) विभागांत वर्णिलें आहे, पुराणांतून पुढील

माहिती आढळते. कश्यप ऋषीच्या तेरा स्त्रियांतील ज्येष्ठ. ही, प्रचेतस दक्षाची कन्या असून हिला, आदित्यसंज्ञक बारा देव हे पुत्र होते ( महा० आदि० ६५ ). मैनाक पर्वताच्या मध्यभागीं असणाऱ्या विनशननामक तीर्थाच्या ठिकाणीं अदितीनें पूर्वी चरु शिजविला होता असें प्रसिद्ध आहे ( महा. वन. १३५ ). प्राग्ज्योतिष नामक इतरांना अगम्य व अत्यंत अमेद्य असें एक असुरांचें नगर होतें यांत महाबळी भूमिपुत्र नरकासुर अदितीचीं रत्नमय कुंडलें हिरावून नेऊन राहिला होता. त्यास श्रीकृष्णानें जिंकून कुंडलें परत आणलीं ( महा. उद्यो० ४८ ). कदंब कवीनें लिहिलेलें अदितिकुंडलाहरण नांवाचें एक नाटक वरील प्रसंगावर लिहिलेलें आहे.

श्रीकृष्णांनीं पूर्वी अदितीच्या उदरांत सात वेळ गर्भरूपानें वास्तव्य केलें. आणि अदितीचीं जीं पृश्निप्रभृति रूपांतरें त्यांमध्यें तिच्या गर्भरूपानें निर्माण झालेला असा श्रीकृष्ण एकच आहे ( महा. शांति. ४३ ). पूर्वी देवयुगांत मोठमोठे महात्मे देव तीन लोकांचें अनुशासन करीत असतां अदितीनें पुत्रप्राप्तीसाठीं नित्य एक पायावर उभें राहून घोर व दुर्घट तपश्चर्या चालविली आणि त्या योगें तिच्या उदरीं भगवान् विष्णु हा जन्म पावला ( महा. अनु. ८३ ).

**अदिलाबाद जिल्हाः**—हैद्राबाद संस्थानांतील वारंगळ भागाच्या उत्तरेकडील एक जिल्हा. इ. स. १९०५ च्या फेरवदलापूर्वी हा सिरपुर व तांदूर यांचा बनलेला एक पोटभाग होता. याच्या उत्तरेस वऱ्हाड व मध्यप्रांतांतील चांदा जिल्हा; आग्नेयीस वऱ्हाडपैकीं नांदेड व वाशिम जिल्हे; आणि दक्षिणेस करिमनगर आणि निझामाबाद जिल्हे आहेत. पैनगंगा नदीमुळें हा जिल्हा वऱ्हाडपासून विभक्त झाला आहे. तसेंच वर्धा व प्राणहिता नद्यांच्या मुळें चांदा जिल्हा यापासून निराळा झाला आहे. याचें क्षेत्रफळ ७४०३ चौ. मै. आहे. यांत सह्याद्री पर्वत किंवा सातमाळ डोंगर वायव्य ते आग्नेय दिशेनें १८५ मैल पसरलेला आहे. गोदावरी नदी याच्या दक्षिण भागास पाण्याचा पुरवठा करते. दुसरी महत्त्वाची नदी पैनगंगा. येथें मोठालीं अरण्यें आहेत व त्यांत सागवान, अबनूस, बिलगू, जिट्गी, आंबा, चिंच व बिजासाल वगैरे झाडें मोठालीं वाढतात.

डोंगराळ प्रदेशांत मोठी शिकार पुष्कळ सांपडते, ती येणेंप्रमाणें—वाघ, चित्ता, अस्वल, तरस, लांडगा, आणि रानटी कुत्रा. तसेंच मैदानांत नीलगाय, सांबर आणि भेकर ( ठिपक्यांचे हरीण ) हीं मिळतात. मोठाल्या अरण्यांमुळें सर्व संस्थानांत हा भाग अतिशय रोगट झाला आहे. मे महिन्यांत उष्णतामान १०५° वर येतें तें डिसेंबर महिन्यांत ५६° खालीं उतरतें. पावसाचें सरासरी मान ४१ इंच आहे.

इ. स. १९०१ च्या खानेसुमारीप्रमाणें येथील लोकसंख्या ४,७७,८४८ होती. सध्यां या जिल्ह्याचे पुढीलप्रमाणें आठ तालुके केले आहेत; सिरपुर, राजुर, निरमल, चिन्नुर, एदलावाद, लक्षेटिपेट, किनवट आणि जानगांव. शेंकडा ८० हिंदु लोकांची वस्ती आहे व शेंकडा १० गोंड लोक आहेत. येथील वसूल सुमारें ६॥ लाख आहे. राज्यव्यवस्था तीन तालुकेदारांच्या हातीं असून त्यांतील पहिल्या वर्गाचा तालुकेदार दिवाणी व फौजदारी काम पाहतो. व तिसरा तालुकेदार २ व ३ वर्गाचे मॅजिस्ट्रेटचे अधिकार चालवतात. या भागांत लोकलबोर्डांची स्थापना झाली आहे. [ इं. गॅ. ५ ]

**अदिलाबाद ( एदलाबाद ) तालुका.**—हैद्राबाद संस्थानांतील त्याच नांवाच्या जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ २२२० चौरस मै. इ. स. १९०१ मध्यें लोकसंख्या ११२३१४ तीच इ. स. १८९१ मध्यें फक्त ९९३३२ होती. या तालुक्यांत एक एदलाबाद शहर ( वस्ती ७२०१ ) व ४२० खेडीं आहेत. त्यांत एदलाबाद हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण आहे. ३० खेडीं जहागिरीदाखल आहेत. इ. स. १९०१ मध्यें उत्पन्न १$\frac{3}{4}$ लाख होतें. येथें लोकवस्ती फार विरळ आहे व पुष्कळ जमीन पडीत आहे. ( इं. गॅ. ५ )

**अदिलाबाद शहर**—यालाच दुसरें नांव एदलाबाद. हैद्राबाद संस्थानमधील त्याच नांवाचा तालुका व जिल्हा यांचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १९° ४' व पूर्व रेखांश ७८° ३३'. इ. स. १९२१ मध्यें लोकसंख्या ८२७१ होती. येथें पहिला वर्ग तालुकदार, पोलिस सुपरिन्टेन्डेंट, जकात इन्स्पेक्टर व जंगल खात्याचा दरोगा यांच्या कचेऱ्या असून एक दवाखाना, टपालगृह व शालागृह हीं आहेत. येथें एक हिंदु मंदिर असून तेथें दरवर्षी जत्रा भरते. ही एक धान्याची पेठ आहे. ( इं. गॅ. ५ ).

**अद्धनकी**—मद्रासइलाख्यांत गंतूर जिल्ह्यांतील ओंगोल तालुक्यांतील एक शहर. ओंगोल रेलवे स्टेशनपासून २३ मैलांवर गंडलकम्मा नदीच्या कांठावर. उत्तर अक्षांश १५° ४९' व पूर्व रेखांश ७९ ५९' वर हें वसलेलें आहे. इ. स. १९०१ लोकसंख्या ७२३०. इ. स. १४०० चे सुमारास प्रतापरुद्राचा मुलगा हरिपालुडु यानें बांधलेला एक मातीचा किल्ला येथें आहे. गळिताचीं धान्यें व गुरें यांचा बाजार येथें बराच मोठा भरतो. येथें डेप्युटि तहशिलदाराची कचेरी आहे. ( इं. गॅ. ५ ).

**अद्रिका**—यमुना नदींत अद्रिका नांवाची अप्सरा ब्रह्मशापानें मत्स्यी होऊन पडली होती. तिनें श्येनाच्या पायांतून पडलेला वसुराजाच्या रेतानें पूर्ण असा द्रोण घेऊन त्यांतील वीर्य भक्षिलें. पुढें त्या मत्स्यीला दहाव्या महिन्यांत धीवरांनीं धरून फाडिलें. तेव्हां तिच्या उदरांतून एक मुलगा व मुलगी अशीं दोन मुलें बाहेर आलीं. त्यांनीं तीं बालकें उपरिचर राजाच्या पुढें ठेविलीं. मुलाचें नांव मत्स्य व मुलीचे नांव सत्यवती अथवा मत्स्यगंधा असें ठेवून मुलगी एका नाविकाला अर्पण केली. इकडे ती अद्रिकामत्स्यी दोन मानवांस जन्म दिल्याबरोबर तूं मुक्त होशील या उश्शापाच्या आधारानें मुक्त होऊन स्वर्गधामाला गेली( महा. आदि. ६३ ).

**अद्वैत**—हें भारतीय विश्वस्पष्टीकरणपर मतांपैकीं एक मत असून यालाच शास्त्रीय परिभाषेंत " केवलाद्वैत " म्हणतात. हें भारतीय तत्त्वज्ञानांतील अत्यंत श्रेष्ठ व पूर्णावस्थेस पोहोंचलेलें मत होय, असें ह्या मताचे अभिमानी समजतात. आणि भरतखंडांत असल्या तऱ्हेचा विचार करणाऱ्यांमध्यें या मतास इतर मतांपेक्षां अधिक अनुयायी आहेत. ह्या मतास हाणून पाडण्याकरितां मागाहून " विशिष्टाद्वैत ", " शुद्धाद्वैत ", " द्वैत "वगैरे अनेक मतसंप्रदाय अस्तित्वांत आले, व कांहीं काळ त्या मतांचें प्राबल्यहि झालें. तथापि अद्वैत तत्त्वज्ञानाचा परिणाम केवळ भारतीयांच्याच नव्हे तर जगाच्या सर्वसामान्य विचार–विकासावर होत आहे. हिंदुसंस्थानांत आजच्या काळांत वेदांतावरील निरनिराळ्या ग्रंथांमध्यें शांकर ग्रंथांचेंच अध्ययन अधिक होतें. ऋग्वेदांतील दहावें मंडल वगैरे उत्तरकालीन सूक्तांत दिसून येणारे तत्त्वज्ञानोन्मुख प्रश्नात्मक विचार उपनिषद्ग्रंथांत कसकसे विकास पावत गेले, व ह्या ग्रंथांतील इतस्ततः विखुरलेलें तत्त्वज्ञान " अद्वैतादि " मतांच्या आत्यंतिक सीमेवर कसें जाऊन थडकलें ह्या प्रश्नाचा इतिहास अत्यंत मनोरंजक आहे.

भारतीय तत्त्वज्ञानाचा साकल्यानें थोडक्यांत इतिहास लक्षांत घेतला असतां उपनिषद्ग्रंथ हेच मूल केवळ याच विचाराला वाहिलेले असे तात्त्विक ग्रंथ होत असें दिसून येईल. उपनिषदांतील तत्त्वज्ञान रेखीव नाहीं व त्यामुळें सृष्ट्युत्पत्तीसारख्या अत्यंत महत्त्वाच्या प्रश्नावर देखील अनन्य असा सिद्धांत उपनिषदांतून आढळत नाहीं. उपनिषदांतील तत्त्वें वेदांत सूत्रांत अधिक निश्चित झालीं, आणि कांहीं सूत्रें दर्शनांत समाविष्ट झालीं. सर्वच दर्शनें उपनिषन्मूलक नाहींत. सूत्रवाङ्मय रचनाकालांत प्रत्येक दर्शनास बरेंच सुव्यवस्थित स्वरूप देण्यांत आलें. ह्याच कालांत सांख्य, वैशेषिक, मीमांसक, नैय्यायिक वगैरे अनेक सांप्रदायिकांनीं आपापल्या मतांचे सूत्रग्रंथ रचले व आपल्या मतांस बरेंच निश्चित स्वरूप दिलें. सूत्रकारांपैकीं एक प्रमुख आचार्य बादरायण यानें " शारीर सूत्रें " अगर " वेदांत सूत्रें " तयार केलीं. आज उपलब्ध असलेल्या बादरायण सूत्रांत जे बादरायणविषयक उल्लेख आहेत त्यांवरून बादरायण हा सूत्रांचा कर्ता होता कीं नव्हता असा संशय पॉल डायसेन यांनीं उपस्थित केला आहे. या सूत्रग्रंथांत अनेक वेदांतविरोधी मतांचें खंडण आहे. तथापि यांतील मतें पूर्णपणें आज निश्चित नाहींत. या सूत्रांवर व भगवद्गीतेवर अनेक वेदांताचार्यांचीं भाष्यें होऊन अनेक भिन्न मतें पुन्हां प्रस्थापित झालीं. त्यांतील शांकरमत हें केवलाद्वैत मत होय.

ए. गौह ह्या पाश्चात्त्य पंडितानें आपल्या " उपनिषदांतील तत्त्वज्ञान " या ग्रंथांत असा सिद्धांत काढला आहे कीं, बादरायणांनीं वेदांत सूत्रांतून जें 'अद्वैत' मत प्रस्थापित केलें, तेंच परंपराप्राप्त मत शंकराचार्यांनीं प्रस्थानत्रयीवर भाष्यें लिहून पुनरुद्धाटित केलें. परंतु याविरुद्ध जॉर्ज थीबो या जर्मन पण्डितानें आपल्या वेदांतसूत्रावरील शांकर भाष्याच्या प्रस्तावनेंत असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे कीं शंकराचार्यांकडून 'अद्वैत' मताची प्रस्थापना होण्यापूर्वीं, म्हणजे सूत्ररचनाकालापासून अद्वैत मतप्रस्थापनकालापर्यंत बौधायन, आत्रेय, आश्मरथ्य, औडुलोमी, कार्ष्णाजिनि, काशकृत्स्न, जैमिनि, बादरि वगैरे अनेक वैदिकमार्गीय आचार्यांमध्यें " अद्वैत " सिद्धांताचा मूल पाया जें जीव व ब्रह्मन् यांचें पूर्ण ऐक्य, त्याजबद्दल तीव्र मतभेद होता, ( वेदांत सूत्रें अ. १ पाद ४ सूत्रें २०–२२ ) व बादरायणाचे सूत्रांत दिग्दर्शित होणारें खरें मत, शंकराचार्यांच्या 'अद्वैत' मताशीं जुळतें नसून, रामानुजाचार्यांनीं मागाहून प्रस्थापित केलेल्या "विशिष्टाद्वैत" मताशींच जुळतें असावें.

" अद्वैत " मतांतील अत्यंत महत्त्वाचा असा जो " मायावाद " तो मूळ प्रस्थानत्रयींतच दिसून येतो, किंवा शंकराचार्यांनीं आपल्या अचाट बुद्धीच्या जोरावर नवीनच शोधून काढला व त्याची आपल्या 'अद्वैत' मतास जोड दिली ह्या संबंधीं देखील आधुनिक पंडितांत बराच मतभेद आढळून येतो. कोलब्रूक वगैरे पंडितांनीं असें प्रतिपादन केलें कीं, " मायावाद " हा मूळ उपनिषदादि ग्रंथांत नसून शंकराचार्यांनीं त्याची नवीन उभारणी केली. परंतु ह्याच्या विरुद्ध ए. गौह यानें असें दाखविलें कीं, " मायावादा"चें प्राथमिक स्वरूप उपनिषद्ग्रंथांत जागोजाग दिसत असून फक्त त्याची सुव्यवस्थित मांडणी मागाहून करण्यांत आली. वेदामध्येंच मायावादाची पूर्वपीठिका पुष्कळच आहे हें बरेच पंडित विसरतात. अद्वैत तत्त्वाविषयीं किंवा द्वैततत्त्वाविषयीं मांडणी म्हणजे आजकालच्या 'मोनिस्ट' आणि 'ड्युअलिस्ट' यांमधील मतभेद नव्हे. अद्वैत हें केवळ विश्वस्पष्टीकरणविषयक मत नव्हतें तर तो विशिष्ट आचार आणि उपासना यांचा बोध करणारा आणि माणसें आपणांभोंवतीं गुंडाळणारा आणि भिक्षुकी धंद्यावर विशिष्ट परिणाम घडविणारा संप्रदाय होता आणि यामुळें अद्वैताची स्थापना करण्याच्या खटपटीबरोबर दुसऱ्या कांहीं खटपटी कराव्या लागल्या. ज्या विचारामुळें यज्ञसंस्था दुर्बल झाली अशा प्रकारचे विचारसमुच्चय उपनिषदांत पुष्कळ आहेत. यज्ञसंस्थेस उतरता काळ आला त्याबरोबर केवळ औपनिषद विचारच वाढला असें नाहीं तर बौद्ध संप्रदाय, जैनमत इत्यादि विचारसंप्रदायहि उत्पन्न झाले. भागवत संप्रदायहि अशाच वेळेस उत्पन्न झाला. यज्ञसंस्थेमुळें उत्पन्न झालेलें ब्राह्मण-महत्त्व या विचारांनीं कमी होणार होतें. उपनिषदांमधून जीं दर्शनें उत्पन्न झालीं त्यांचे कर्तेहि ब्राह्मणच होते. बौद्ध, जैन इत्यादि मतांचे प्रवर्तक ब्राह्मणेतर किंवा तत्संप्रदायानुयायी ब्राह्मण होते. ब्राह्मणांस ब्राह्मणमहत्त्व राखावयाचें होतें यामुळें बौद्ध, जैन इत्यादि मतांमुळें जीं दैवतें उत्पन्न झालीं व ज्या उपासना सुरू झाल्या त्यांच्याशीं विरोध करण्याकरितां किंवा त्यांस दुर्बल करण्याकरितां सामान्य

लोकांचीं जीं दैवतें होतीं त्यांना महत्व देणें ब्राह्मणांस व संस्कृत ग्रंथकारांस प्राप्त झालें. यज्ञप्रवर्तक आणि यज्ञविरोधी हे पक्ष न राहतां निराळे पक्ष झाले. बौद्ध, जैन वगैरे हा वर्ग एकीकडे आणि वेदांगें रचणारा, दर्शनें उत्पन्न करणारा आणि सामान्य जनांच्या उपासनांचें व सूतकथांच्या वीरांचें महत्त्व गाणारा वर्ग दुसरीकडे अशा तऱ्हेचे दोन तट पडले. या दोन तटांमुळें जे तत्त्ववेत्ते वेदांगें व दर्शनें यांच्या प्रवर्तकांतून निघाले त्यांस प्रचलित उपास्यांस भजणाऱ्या वर्गांपासून तोडवलें नाहीं. कारण तसें करणें म्हणजे आपल्याच पक्षावर आघात करणें होय. ब्राह्मणजातीचें महत्त्व हें तर अद्वैतमतास अगदींच विरुद्ध असणार, तथापि हे विचारप्रवर्तकद्दि ब्राह्मणच पडले तेव्हां जातिमूलक महत्त्व राखावयाचा मोह शंकराचार्यांस देखील सोडवला नाहीं. यामुळें तत्त्वांत अद्वैत मानावयाचें व आचार मात्र निराळा ठेवावयाचा या प्रकारचा प्रचार सुरु झाला. या प्रकारचा विचार व आचार यांच्या विसंगतीमुळें उत्पन्न होणारी तडफड मनीषा-पंचकांत व्यक्त झालेली दृष्टीस पडते.

अद्वैतमताचा शंकराचार्यांच्या पंचायतन पूजेशीं संबंध नाहीं आणि जातिभेदाशीं मुळींच नाहीं. शंकराचार्यांच्या आयुष्यांत त्यांच्या वैयक्तिक स्थितीमुळें विशिष्ट उपासनांचीं विरोध आणि चातुर्वर्ण्यतत्त्वाचेंच केवळ नव्हे तर जातींच्या उच्चत्व-नीचत्वबोधक विषमतेचें तत्त्व शंकराचार्यांस स्वीकारावें लागलें; आणि इकडे वेदान्ताच्या गोष्टी बोलावयाच्या व ब्राह्मणेतर जातींचा विटाळ मानावयाचा अशी परिस्थिति उत्पन्न झाली.

अद्वैत मत हें केवळ मत म्हणून राहिलें असतें तरी त्याचें महत्त्व होतेंच. पण तें मत केवळ मत म्हणून राहिलें नाहीं तर विशिष्ट उपासना, व विशिष्ट आचार स्थापन करणारें बनलें. शंकराचार्यांचा प्रयत्न अनेक तऱ्हांचा होता. त्यांस, ( १ ) अद्वैत मताची म्हणजे सर्व विश्व एकद्रव्यमय आहे या तत्त्वाची स्थापना, ( २ ) या तत्त्वास वैदिक आधार आहे या तत्त्वाचें आणि त्याबरोबर वेदांचें समर्थन आणि ( ३ ) प्रचलित उपासनांस निराळें स्वरूप देणें, या गोष्टी करावयाच्या होत्या. अनुकूल अशा अनेक उपासनासंप्रदायांशीं झगडावयाचें होतें. शंकराचार्यांनीं बौद्धांचा पाडाव केला नाहीं तर त्यांस कर्म व उपासना मार्गांच्या प्राधान्याचा पाडाव करावयाचा होता.

बौद्धधर्माच्या उतरत्या काळीं पुष्कळसे संप्रदाय पुनः वाढले. हे संप्रदाय म्हणजे शैव, वैष्णव, कापालिक वगैरे होत. हे संप्रदाय आस्तिक मताचा पुरस्कार करणारेच होते. परंतु ह्या संप्रदायांतील अनाचार, भीषण कृत्यें, विकट कर्मकाण्ड वगैरेमुळें कोणाहि खऱ्या सात्त्विक अंतःकरणाच्या पुरुषास अत्यंत किळस आला असता. कारण एकंदर समाजांत, सार्वत्रिक हिताचा विचार करून पुनः बिघडलेली परिस्थिति नीट सुधारण्याची शक्ति फारच थोड्या लोकांच्या अंगांत असते. त्या वेळची सामाजिक परिस्थिति, अतिशयोक्ति सोडली तर शांकर दिग्विजयांतील पुढील श्लोकांतून उत्तम तऱ्हेनें दृष्टीस पडतेः—

वर्णाश्रमसमाचारान्द्विपंति ब्रह्मविद्विपः
श्रुवन्त्याम्नायवचसां जीविकामात्रतां प्रभो ॥ ३२ ॥
× × × ×
शिवविष्ण्वागमपरैर्लिंगचक्रादि-चिन्हितैः
पाखण्डैः कर्म संन्यस्तं कारुण्यमिव दुर्जनैः ॥ ३९ ॥
× × × ×
सद्यः कृत्तद्विजशिरः पंकजार्चित भैरवैः
न ध्वस्ता लोकमर्यादा का वा कापालिकाधमैः ॥३७॥
× × × ×
अन्येऽपि बहवो मार्गा सन्ति भूमौ सकण्टका
जनैर्येषु पदंदत्वा दुरंतं दुःखमाप्यते ॥ ३९ ॥

अशा प्रकारच्या परिस्थितींत समाजास अंतर्मुख करणाऱ्या एखाद्या समाजधुरीणाची अत्यंत जरुरी होती, व ह्या ऐन आणिबाणीच्या वेळीं आद्य शंकराचार्यांनीं “ अद्वैत ” मताची मांडणी करून एकंदर जनतेस ज्ञानकांडप्रवण केलें.

अ द्वै त सि द्धां ता चीं मू ल भू त प्र मे यें.—(१) एकच एक आत्मतत्त्व आहे, तद्भिन्न, तत्सजातीय किंवा तद्विजातीय असें दुसरें कांहीं नाहीं. (२) हें आत्मतत्त्व निर्विशेष असल्यामुळें “ हें असें किंवा तसें आहे ” असें ह्याजबद्दल कांहींच म्हणतां येत नाहीं. अर्थातच हें निर्गुण असल्यामुळें मांगल्यादि गुण देखील ह्यावर आरोपित करतां येत नाहींत. (३) हें स्वतः ज्ञानस्वरूप आहे. म्हणजे ज्ञान हा याचा गुण नव्हे, आणि म्हणून अर्थातच ज्ञातृत्व, ज्ञेयत्व इत्यादि गुण आत्मतत्त्वाचे ठिकाणीं संभवत नाहींत. (४) परमात्मा स्वरूपतः कूटस्थ नित्य व अद्वितीय आहे. यालाच “ ब्रह्माद्वैत ” म्हणतात. (५) परब्रह्मच ‘ माया ’ रूप उपाधीमुळें “ईश्वर”, व ‘ अविद्या ’ रूप उपाधीमुळें “ जीव ” असतो, व जडसृष्टि आभासात्मक असल्यामुळें खोटी ठरते. अर्थात एकच ‘ब्रह्म’ सत्य. (६) ब्रह्म स्वरूपतः अभिन्न परंतु दिसण्यांत भिन्न अशी त्रिगुणात्मक “ माया”शक्ति हाताशीं धरून जगताची उत्पत्ति करतें. किंवा थोडक्यांत बोलावयाचें म्हणजे परब्रह्माचे ठायीं अज्ञानरूपी मायेमुळें जगताची भ्रांति होते, ज्याप्रमाणें शुक्तीवर रजताची किंवा रज्जूवर सर्पाची. हाच “विवर्त”वाद. (७) परब्रह्माचाच विवर्तरूप परिणाम असणारें हें आभासात्मक जग मिथ्या होय. (८) ह्या खोट्या जगांतच “ वेदांत ” शास्त्राचा अंतर्भाव होत असल्यामुळें तें शास्त्रहि मिथ्याच होय. परंतु स्वप्नांतील पदार्थांप्रमाणें शास्त्र तत्त्वज्ञानास साधनीभूत होतें. (९) अर्थज्ञानास साधनीभूत प्रमाणें सहाः—प्रत्यक्ष, अनुमान, उपमान, शब्द, अर्थापत्ति व अनुपलब्धि; (१०) जीव हा परमात्म्यापासून अभिन्न असल्यामुळें तो विभु व एकच होय. जीवांचें अनेकत्व औपाधिक. (११) ब्रह्मविचारास आरंभ करण्यापूर्वी (अ) नित्यानित्यवस्तुविवेक, (आ) इहामुत्रार्थ फलभोगविराग ( इ ) शमादिषट्क संपत्ति

मुमुक्षत्व, ह्या साधनचतुष्टयाच्या प्राप्तीची आवश्यकता. (१२) "अहं ब्रह्मास्मि," "तत्त्वमसि" "सत्यंज्ञानमनंतं ब्रह्म" इत्यादि वेदांत महावाक्यांच्या अखंडानुसंधानानें आत्मसाक्षात्कार झाल्यावर ह्याच लोकीं सदेहमुक्ति मिळते. प्रारब्धकर्मांचा क्षय झाल्यानंतर शरीरत्याग झाल्यावर मिळणारी अखंड " विदेहमुक्ति " प्राप्त होऊन त्या सुखदुःखातीत अवस्थेंत जीव-ब्रह्माचें पूर्णैक्य होतें.

शांकरमताचा एक मुख्य विशेष असा आहे कीं त्यांतील देवताशास्त्र, सृष्टिरचनाशास्त्र, मानसशास्त्र, परलोकसंबंधीं कल्पना ह्या संबंधीं कोणतीहि गोष्ट विचारांत घेतली तरी तिला दोन स्वरूपें असलेलीं आढळतात. उदाहरणार्थ, परमार्थतः निर्गुण, निष्क्रिय, शांत, निरंजन असें ज्ञानस्वरूप परब्रह्म व्यावहारिक दृष्टीनें परमेश्वर या संज्ञेस प्राप्त होतें, व अशा रीतीनें ह्या दोन्ही स्वरूपांचा संबंध केवळ आभासरूप असतो. पारमार्थिक दृष्ट्या सृष्टिरचना म्हणजे सत्स्वरूपाचेंच प्रकाशन असून, व्यवहारदृष्ट्या मात्र अनंत कालापासून "धाता यथा पूर्वकल्पयत्" सारखी विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय हे सारखे चालू असतात, व अशा रीतीनें हें संसारचक्र अबाधितपणें चालू असतें. परमार्थिकदृष्ट्या प्रत्येक जीव हा परब्रह्मस्वरूप असून त्यानें स्वतः व्यवहाराकरितां स्वीकारलेल्या अविद्यारूप अध्यासामुळें मात्र त्यास उपाधि प्राप्त होतात व त्यामुळें "मी, तूं" असे भेद पडतात. ब्रह्मसूत्रावरील भाष्योपोध्दाताचे आरंभींच श्रीशंकराचार्य म्हणतात—"मी" "तूं" ह्या दोन कल्पनांनीं दर्शविण्यांत येणारे विषयी व विषय हे प्रकाश व अंधःकार याप्रमाणें विरुद्ध स्वभावाचे असून त्यांचें कधींहि ऐक्य होणें शक्य नाहीं हा आपल्या रोजच्या व्यवहारांतील अनुभव आहे. मग त्यांचे प्रत्येकाचे धर्म एकमेकांशीं कसे जुळणार ?

इतर सर्व गोष्टींतल्या प्रमाणेंच मोक्ष व त्याचीं साधनें ह्यामध्येंहि दोन स्वरूपें दृष्टीस पडतात. साधनामध्यें निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार करून देणारी ती पराविद्या—"परा यथा तदक्षरमधिगम्यते" आणि अपरा विद्येंत वेदवेदांगें इतर सर्व शास्त्रें यांचा अंतर्भाव केलेला आहे. अपराविद्येनें सगुण ब्रह्माची प्राप्ति होते व पराविद्येनें ज्ञानस्वरूप जें परब्रह्म त्याशीं तादात्म्य होतें असा शांकर मताचा अभिप्राय आहे. अशा रीतीनें एकदा ब्रह्मसाक्षात्कार झाला म्हणजे

भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्व संशयाः ।
क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥

अंतःकरणाची गांठ सुटून तें स्वतंत्र होतें व सर्व संशयांचा नाश होतो, त्याचप्रमाणें ब्रह्मसाक्षात्कार झाला असतां त्याला कर्मेंहि करावयाचीं शिल्लक रहात नाहींत.

"अद्वैत" संप्रदायाचें वाङ्मय.—श्रीमच्छंकराचार्यांनीं "अद्वैत" मताची प्रस्थापना केली व ह्याच्याच जोडीला भारतवर्षांतील चार दिशांस चार सांप्रदायिक मठांची स्थापना करून आपले पट्टशिष्य, पद्मपाद, सुरेश्वराचार्य, तोटक, हस्तामलक चित्सुखाचार्य इत्यादींकडून "अद्वैत" मतावर पुष्कळच वाङ्मय तयार केलें. पुढें जोडलेल्या ग्रंथांच्या यादीवरून अद्वैत संप्रदायांतील ग्रंथांचा विस्तार दिसून येणार आहे. श्रीमदाद्यशंकराचार्यांनीं जरी मूळ अद्वैत मताची प्रस्थापना केली असली तरी बऱ्याचशा गोष्टींतील दोष मागाहूनचे भाष्यकार व स्वतंत्र ग्रंथकार ह्यांनीं काढून टाकून एकंदर अद्वैत मताची सुंदर व व्यवस्थित मांडणी केली.

एकंदर अद्वैत मताच्या अफाट ग्रंथसागरांत चित्सुखाचार्यांची "चित्सुखी" मधुसूदनसरस्वतीची "अद्वैतसिद्धि" व श्रीहर्ष पंडितकृत "खंडनखाद्य" हे तीन मुख्य ग्रंथ होत. ह्याशिवाय नैष्कर्म्यसिद्धि, सिद्धांतलेख इत्यादि ग्रंथ सुप्रसिद्ध आहेत. त्याप्रमाणें सदानंदकृत वेदांतसार, धर्मराजकृत वेदांत परिभाषा, आद्य शंकराचार्यकृत उपदेशसाहस्री, अपरोक्षानुभूति इत्यादी सुलभ ग्रंथ अद्वैत मताच्या अभ्यासकांस प्राथमिक अवस्थेंत उपयोगी पडण्यासारखे आहेत. ह्या सर्व ग्रंथांमध्यें जे जे ग्रंथ मागाहून विरोधी सांप्रदायिकांचें खंडण करण्याकरितां रचले गेले त्यांमध्यें जास्त जास्त क्लिष्टता व शब्दावडंबर आढळून येतें.

"अद्वैत" मत हें तात्विक विचाराची परमावधि.—भारतीयांचें तत्त्वज्ञान उपनिषद्ग्रंथांत प्रादुर्भूत होऊन त्याची एकंदर परिणति सांख्यांच्या चोवीस किंवा पंचवीस तत्त्वांमधून व वैशेषिकांच्या सप्तपदार्थांमधून होत होत क्रमाक्रमानें तेंच तत्त्वज्ञान तीन, दोन अशीं तत्त्वें मुख्य कल्पून सरतेशेवटीं एका अविभाज्य, अवर्णनीय तत्त्वावर कसें येऊन थडकलें याचा विचार वर केलाच आहे. परंतु ऐतिहासिक दृष्ट्या पाहिलें तर शंकराचार्यामागून, रामानुजाचार्यांनीं "विशिष्टाद्वैत" मताची प्रस्थापना केली. त्यानंतर मध्वाचार्यांनीं 'द्वैत' व वल्लभाचार्यांनीं "शुद्धाद्वैत" अशीं दोन मतें प्रस्थापित केलीं. आतां या चारी मतांमध्यें कांहीं बाबतींत मतवैचित्र्य व कांहीं बाबतींत मतैक्यता होती.

यांपैकीं श्रीशंकराचार्य ज्ञानमार्गाचे पुरस्कर्ते, मायावादाचे उपस्थापक व चित्तशोधनासाठीं कर्मोपासनांचें ग्रहण करणारे आहेत. श्रीरामानुजाचार्यास ज्ञानाइतकीच कर्मोपासनांची जरूरी भासत असून हे मायाविरोधी व भक्तिप्रतिपादक आहेत. पूर्णद्वैती श्रीमन्मध्वाचार्य हे कट्टे मायाविरोधी असून या आचार्यांनीं भक्तीचें माहात्म्य विशेष वाढवून जीवानें नित्य परेशसेवा करावी असें ठरविलें. श्रीवल्लभाचार्य हे पूर्ण अद्वैत मान्य करितात परंतु मायेचा सर्वथा विरोध करतात. यांनींहि भक्तिमार्गाचा अतिरेक केला असून माध्व संप्रदाय व वल्लभ संप्रदाय ह्यामुळें ज्ञानमार्ग कांहीं थोडासा संकुचितच झाला. जीव व जगताचें स्पष्टीकरण करण्यासाठीं शंकराचार्यांनीं "विवर्तवाद" अंगीकारला, व असतें तसें कां दिसत नाहीं ह्याबद्दल एक स्पष्टीकरण जगापुढें मांडलें. रामानु-

जांनीं 'परिणाम' वादाचा अंगिकार करून जीव व जगत् हे ब्रह्माचे ( ज्याप्रमाणें दहीं हा दुधाचा परिणाम आहे ) परिणाम होत, असें सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. मध्वाचार्यांनीं "आरंभवाद" स्वीकारून विष्णुस्वरूप ब्रह्मानें जीव-जगतादि उत्पन्न केलें असें दाखविण्याची खटपट केली. वल्लभाचार्य यांनीं अविकृत परिणामवादाचाच स्वीकार केला.

अशा रीतीनें ह्या विरोधी तत्त्वज्ञांमधील मतभेद पाहिले असतां असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, शंकराचार्यांनीं पारमार्थिक विचाराची परमावधि समजलें जाणारें असें जें 'अद्वैत' त्याची प्रस्थापना केल्यावर इतर आचार्यांनीं पुनः त्याविरुद्ध कोणत्या कारणामुळें खटपट वादविवाद वगैरे केली असावी ? परंतु या चारहि मतांच्या सूक्ष्म निरीक्षणावरून असें दिसून येतें कीं केवळ समाजधारणेकरितां म्हणून रामानुजादि संप्रदायस्थापकांनीं शंकराचार्यांस विरोध केला. कारण केवलाद्वैत सिद्धांत जरी सर्वतः खरे मानण्या सारखे आहेत तथापि अद्वैत सिद्धांताचें साम्राज्य झालें असतां अनधिकारी उन्मत्त व उन्मार्गगामी होण्याचा फार संभव दिसतो. सामान्य जनता अद्वैतांतील सूक्ष्म विचार आकलन करण्यास असमर्थ असल्यामुळें "अहंब्रह्मास्मि" यासारख्या महावाक्यांचा देखील "ऋणं कृत्वा घृतं पिबेत्" यासारख्या चार्वाकाच्या देहात्मवादांत शेवट होण्याचा अत्यंत संभव असतो. व ह्या सार्वत्रिक अज्ञानजन्य अधःपातास भिऊनच जनतेच्या सुरक्षिततेकरितां मागील आचार्यांनीं आपलीं अद्वैत विरोधी मतें प्रस्थापित केलीं असावींत, व माध्वांनीं शंकराचार्यांवर "प्रच्छन्न बौद्ध" त्वाचा आरोप केला त्याचें कारण देखील "अद्वैत" मत हें थोड्याशा विकृत स्वरूपांत विज्ञानवादी बौद्धाच्या मताजवळ येतें हेंच असावें असें कांहींचें म्हणणें आहे. शिवाय अद्वैत मतास विरोध करतांना त्यांतील कांहीं गोष्टींकडे उत्तर कालीन आचार्यांनीं डोळेझांक केली. कारण जगत् मिथ्या म्हणणें हें केवळ पारमार्थिक दृष्ट्या होय. व्यावहारिक दृष्टीनें शंकराचार्यांनीं जग-जीव-परमेश्वर यामध्यें भेद मानलाच आहे. व शंकराचार्यांच्या मायावादाचें महत्त्व याच एका गोष्टीनें दृष्टोत्पत्तीस येतें. कारण मायावाद हा जणूं उपनिषद् ग्रंथांतील अद्वैतपर वाक्यांचा समन्वय करून दाखविणारी दुधारी तलवारच होय असें अद्वैत वादाचें समर्थन करणाऱ्यांचें म्हणणें आहे. त्याचप्रमाणें विविधतेंतच ऐक्य पाहण्याकरितां देखील मायावादाचाच अत्यंत उपयोग होतो. कारण मायेचें अस्तित्व व्यावहारिकच असल्यामुळें व्यवहारांत सर्व प्रकारच्या विविधतेस वाव आहेत. व पारमार्थिकदृष्ट्या मायाच अस्तित्वांत नसल्यामुळें पूर्ण ऐक्यच शिल्लक राहतें. असें अद्वैत वादाचें समर्थन करण्यांत येतें.

मागाहून प्रस्थापित झालेल्या वैदिक मतांचें सूक्ष्म निरीक्षण केलें असतां असें दिसून येईल कीं रामानुजांनीं आपलें "विशिष्टाद्वैत" मत ज्यास सांख्यांचा "परिणाम वाद" ( Evolution theory ) म्हणतां येईल त्यावर उभारलें. त्याचप्रमाणें मध्वाचार्यांनीं आपल्या 'द्वैत' मताची मांडणी करण्याकरितां नैय्यायिकांच्या परमाणुकल्पनेचा स्वीकार करून त्याला "आरंभवादाची" जोड दिली. वल्लभांचा पुष्टिमार्गप्रधान भक्तिसंप्रदाय दिसण्यांत अद्वैत असला तरी त्याची मांडणी तीव्र भावनांच्या ऐक्यावरून केलेली दिसते. अशा रीतीनें शंकराचार्यांस विरोध करण्याकरितां मागाहून झालेल्या संप्रदायप्रवर्तकांनीं स्वीकृत केलेलीं मतें शंकराचार्यांच्या पूर्वीचींच आहेत, फक्त मागाहूनच्या आचार्यांनीं आपल्या बुद्धिकौशल्यानुरूप त्यांत थोडे बहुत फेरफार केले, व ह्या दृष्टीनें पाहतां शंकराचार्यांनीं प्रस्थापित केलेलें नवीन मतच अत्यंत महत्त्वाचें आहे व हीच विचारविकासाची परम सीमा होय असें अद्वैतमार्गी मानतात.

**अद्वैत मताचा किंबहुना भारतीय तत्त्वज्ञानाचा जगांतील विचारावर परिणामः—** सांप्रत जगांत हयात अशा महंमदी, ख्रिस्ती वगैरे संप्रदायांनीं स्वीकारलेला आरंभवाद ( निर्माणवाद ) हा उच्च तत्त्वज्ञानांतील अगदीं प्राथमिक अवस्थेचा होय, व ह्या दृष्टीनें पाहतां मध्वाचार्यांच्या निर्माणवादावर उभारलेला 'द्वैत' सिद्धांत वरील परकीय संप्रदायांच्या जवळ आहे हें स्पष्ट आहे. पाश्चात्त्य जगांत दिसून येणारी आध्यात्मिक प्रवृत्ति व संस्कृति, ग्रीक संस्कृतीपासून उद्भूत झाली आहे, व प्लेटो, सॉक्रेटीस, पायथॅगोरस इत्यादि ग्रीक तत्त्ववेत्त्यांचे ग्रंथ व भारतीय आध्यात्मिक ग्रंथ यांचा तुलनात्मक दृष्टीनें विचार करतां आत्म्याचें अमरत्व, पुनर्जन्म वगैरे कल्पना ग्रीकतत्त्ववेत्यांनीं भारतीय तत्त्वज्ञानापासूनच थोड्या विकृत स्वरूपांत उचलल्या आहेत हें आधुनिक शास्त्रीय शोधांवरून सिद्ध झालें आहे. तौलनिक भाषाशास्त्राचा जनक सर वुइल्यम् जोन्स हा एके ठिकाणीं म्हणतोः—"भारतीयांच्या उच्च, स्पष्ट, विशद व व्यापक तत्त्वज्ञानपद्धतीशीं ग्रीक तत्त्वज्ञानपद्धति ताडून पाहतां ग्रीक लोकांचें तत्त्वज्ञान भारतांतूनच तिकडे गेलें असलें पाहिजे, असा निष्कर्ष काढल्याशिवाय राहवत नाहीं."

ह्या वर उल्लेखिलेल्या निर्माणवादापेक्षां विकासवाद ( परिणामवाद ) आधुनिक शास्त्रास जास्त सम्मत आहे. आधिभौतिक सर्व शास्त्रें ह्या विकासवादावर उभारलेलीं आहेत, परंतु शास्त्रीय ज्ञानाची अशी एक हांव असते कीं, असें एक शास्त्र आपल्या हस्तगत व्हावें कीं ज्याच्या योगानें या सर्व चराचर विश्वाचा उलगडा करतां येईल. पाश्चात्त्य शास्त्रें असें ऐक्य शोधून काढण्याच्या खटपटींत आहेत. परंतु "अद्वैत" मतानें विवर्तवाद उत्पन्न करून त्यापूर्वीच पुढील मार्ग मोकळा केला आहे. असें त्या संप्रदायाच्या अनुयायांचें म्हणणें आहे. ज्यांनीं ज्यांनीं तत्त्वज्ञानासंबंधानें विचार केला आहे, ते ते पुरुष पाश्चात्त्य असोत व पौरस्त्य असोत, वैदिक असोत किंवा अवैदिक असोत, तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यांत ते केवळ

एक अद्वितीय वस्तूशिवाय बाकीच्या सर्व वस्तू गौण समजतील. प्लेटो, कँट, अज्ञेयवादी स्पेन्सर् किंवा हक्स्ले इत्यादि प्राचीन अर्वाचीन कोणीहि तत्त्वजिज्ञासू घेतला तरी तो निःशब्द निष्कलंक ऐक्याचा शोध करीत असल्याचें दिसून येतें. परंतु पाश्चात्त्य जगास आपलें ध्येय अद्याप प्राप्त झालेलें नाहीं. तथापि शर्यतींतील घोड्याप्रमाणें आत्यंतिक सुखापाठीमागें भरधांव पळतां पळतां सरतेशेवटीं पाश्चात्य शास्त्रें" अद्वैत" मताच्या विवर्त वादावर विसावा घेण्यास येतील अशी भारतीय अद्वैती तत्त्वज्ञान्यांची खात्री आहे.

[ वाङ्मयः—वेदान्तसार–सदानंद; वेदान्तपरिभाषा–धर्मराज; ब्रह्मसूत्रभाष्य–शंकराचार्य; गीताभाष्य–शंकराचार्य; उपनिषद्भाष्य–शंकराचार्य; पंचपादिका–सुरेश्वराचार्य; चित्सुखी–चित्सुखमुनि; खण्डनखाद्य–हर्ष; अद्वैतसिद्धि–मधुसूदनसरस्वती; पंचदशी–विद्यारण्य; मांडुक्योपनिषदि गौडपादकारिका–गौडपाद; सिद्धांतलेश–अप्पय्यादीक्षित; नैष्कर्म्यसिद्धि–सुरेश्वर; उपदेशसाहस्री–शंकराचार्यः अद्वैतकामधेनु–उमामहेश्वर; अद्वैतकालामृत–नारायण पंडित; अद्वैतकौस्तुभ–भट्टोजी दिक्षित; अद्वैतचंद्रिका–अनंतभट्ट; अद्वैतचिंताकौस्तुभ–महादेवानंद; अद्वैतचिंतामणी–रंगनाथ; अद्वैतज्ञानसर्वस्व–मुकुंदमुनि; अद्वैततत्त्वदीप–नित्यानंद; अद्वैततरंगिणी–रामेश्वरशास्त्री; अद्वैतदर्पण–भुजराम; अद्वैतदीपिका–विद्यारण्य; अद्वैतदीपिका–नृसिंहाश्रम; अद्वैतनिर्णय–अप्पय्यादीक्षित; अद्वैतनिर्णयसंग्रह–तीर्थस्वामिन्; अद्वैतपंचपदी–शंकराचार्य; अद्वैतपरिशिष्ट–केशव; अद्वैतप्रकाश–रामानंदतीर्थ; अद्वैतबोधदीपिका–नृसिंहभट्ट; अद्वैतब्रह्मविद्यापद्धति–नंदीश्वराचार्य गोपालाश्रम; अद्वैत ब्रह्मसिद्धी–सदानंद काश्मिर; अद्वैतभूषण (?) अद्वैतमकरंद–लक्ष्मीधर कवि; अद्वैतमंगल–मधुसूदनवाचस्पति; अद्वैतमंजरी–मधुसूदनवाचस्पति; अद्वैतमतसार–मधुसूदनवाचस्पति; अद्वैतमुक्तासार–लोकनाथ; अद्वैतमुखर–रंगराज; अद्वैतरत्न–रंगराज; अद्वैतरत्नकोष–अखंडानंद; अद्वैतरत्नकोष–नृसिंहाश्रम; अद्वैतरत्नरक्षण– मधुसूदनसरस्वती; अद्वैतरस मंजरी–नल्ला पंडित; अद्वैतरहस्य–रामानंदतीर्थ; अद्वैतरीति–नृसिंह पद्माश्रमिन्; अद्वैतवाद–नृसिंहाश्रम; अद्वैतविद्याविचार–वेंकटाचार्य; अद्वैतविद्याविजय––महाचार्य; अद्वैतविवेक–आशाधरभट्ट; अद्वैतविवेक–रामकृष्ण; अद्वैतवैदिकसिद्धांतसंग्रह–नरसिंह; अद्वैतशास्त्रसारोद्धार–रंगोजीभट्ट; अद्वैतसिद्धांतविवेचन–ब्रह्मानंद सरस्वती; अद्वैतसिद्धांत विवेचन–विद्यानंद सरस्वती, अद्वैतसिद्धि–मधुसूदन सरस्वती; अद्वैतसिद्धि–सहजानंद तीर्थ; अद्वैतसिद्धिखंडन–वनमालिन्; अद्वैतसूत्रभाष्य–शंकराचार्य; अद्वैतानंद–ब्रह्मानंद; अद्वैतानंदलहरी–वेंकट शास्त्री; अद्वैतानंदसागर–रघूत्तमतीर्थ; अद्वैतानुभूति–रघूत्तमतीर्थ; अद्वैतामृत-जगन्नाथसरस्वती; अद्वैतेश्वरवाद–रघुनाथ; इ० ]

**अद्वैतानंद**—हे नामांकित पुरुष श्रीक्षेत्र काशी येथें संन्यास घेतल्यावर रहात असत. हे मूळचे महाराष्ट्र ब्राह्मण असून मोठे विद्वान होते. यांजवळ अध्ययन करण्यास पुष्कळ विद्यार्थी असत, म्हणून यांस काशींत गुरुस्वामी असें लोक म्हणत. शांकरवेदांत विषयावर यांचा ब्रह्मविद्याभरण नांवाचा उत्कृष्ट ग्रंथ आहे. सदानंदकृत जो वेदांतसारनामक ग्रंथ आहे त्यावर यांची संस्कृत टीका आहे. मध्वमुनीश्वर व कटिबंधादिक कविता करणारा प्रसिद्ध जो अमृतराय तो, असे दोघे यांचे शिष्य होते. हे कधीं जन्मले व मरणकाळीं यांचें वय किती होतें तें नक्की माहित नाहीं परंतु शके १६८७ पार्थिवनामक संवत्सरीं हे काशींत समाधिस्थ झाले असें अर्वाचीन कोशकार म्हणतात. अमृतरायाचा गुरु अंबिकासरस्वती होता असें त्याच्याच " अविनाशसंदेहहरण " ग्रंथांत आढळतें. मध्वमुनींनीं आपले गुरु अद्वैतानंद यांजकडून रायास उपदेश देवविला अशी एक दंतकथा आहे. [ सं. क. का. सू.; अ. को. ]

**अधर्मसंततिः**—प्रत्येक देशांत अनीतीच्या आचरणामुळें झालेली संतति आहेच. आणि ही संतति अनेक प्रकारचे सामाजिक प्रश्न उभे करते. वेश्यागमन आणि शरीरविक्रय यामुळेंच केवळ अनीतीचें आचरण होतें असें नाहीं तर अन्यत्रहि वरेंच होतें, निदान अधर्मसंततीची संख्या वाढविण्यास वेश्यागमनाहून निराळीं कारणें आहेत. आपल्याकडे अधर्मसंततीचीं कारणें अनेक आहेत. दासी ठेवण्याच्या चालीनें देवळांतल्या भाविणीपासून झालेल्या संततीनें, आणि वैधव्यांत असलेल्या स्त्रियांच्या अनीतीच्या आचरणानें अधर्मसंतति उत्पन्न झाली आहे. आपणांकडे कुमारींपासून झालेल्या मुलांची संख्या फारशी नाहीं तथापि नाहींच असेंहि नाहीं. पंढरपूरच्या अनाथ बालकाश्रमाच्या अहवालांत कुमारिकांपासून झालेल्या मुलांचेहि आंकडे येऊं लागले आहेत. पाश्चात्त्य देशांत अधर्मसंतति बहुतेक अंशीं कुमारींपासून झालेलीच असते.

अधर्मसंततीचें भिन्न भिन्न प्रमाण, समान आचारविधींनीं नियंत्रित झालेल्या समाजांचा नैतिक दर्जा कांहींसा दिग्दर्शित करितें, तरी निरनिराळ्या राष्ट्रांची जेव्हां आपण तुलना करूं तेव्हां अधर्म संततीच्या प्रमाणावरून राष्ट्रांतील नीतिमत्ता ठरवितां येणार नाहीं. एखाद्या देशांत अधर्मसंततीचें प्रमाण अतिशय मोठें असलें तर त्याचें कारण तेथील नीतिमत्ता बिघडली आहे हेंच केवळ नसून तेथील आचारविधी किंवा आर्थिक स्थिति तरुणपणीं विवाहाला पोषक नसतील किंवा मुलांच्या आईबापांनीं मागाहून लग्न केल्यास मुलें औरस बनणें तेथील कायद्याप्रमाणें शक्य होत असल्यामुळें अधर्मसंतति हा मोठ्या महत्त्वाचा प्रश्नच नसेल. ज्या लोकांत अधर्मसंततीचें प्रमाण बरेंच कमी असेल, पण गर्भपात व गर्भधारणेला मुद्दाम प्रतिबंध करणें यासारख्या पद्धति प्रसृत पावल्या असतील तर त्या लोकांत

केवळ अधर्मसंततीचें प्रमाण पाहून त्यांची नीतिमत्ता उच्च तऱ्हेची ठरविणें भ्रामक आहे. या तऱ्हेची चूक न्यूआ होमनें आपल्या 'व्हायटल स्टॅटिस्टिक्स' वरील ग्रंथांत केली आहे; बहुतेक ख्रिस्ती देशांतल्यापेक्षां मुसुलमानी देशांत अधर्मसंतति निःसंशय कमी आहे. पण तेवढयावरून मनोनिग्रहाच्या बाबतींत मुसुलमान श्रेष्ठ आहेत असें म्हणतां येत नाहीं. तथापि समान संस्कृति व आचारधर्म असलेल्या भिन्न समाजांत अधर्मसंततीच्या प्रमाणांत जी भिन्नता येते, ती नीतिकल्पना व नीतिभावना कांहीं अंशीं स्पष्ट करण्यास खास उपयोगी पडते.

ज्या स्त्रियांस अधर्मसंतति होते त्या स्त्रिया सर्वस्वी वाईट असतात असें नाहीं. स्त्रियांसंबंधी विचार (Thoughts about Women) या ग्रंथांत मिस मुलॉक (Miss Mulock) अशा स्त्रियांविषयीं विधान करिते कीं, "अशा पतित झालेल्या स्त्रिया त्यांच्या दर्जाच्या मंडळींत निकृष्टतम मुळींच नसतात. त्यांच्यापैकीं पुष्कळ अतिशय उत्तम म्हणजे सुधारलेल्या, हुषार सत्यवादी आणि प्रेमळ असतात, असें बऱ्याच स्त्रियांकडून मीं ऐकिलें आहे." स्कॉट, गोएटे (Goethe), ह्युगो, हॅथॉर्न, टॉलस्टॉय आणि जॉर्ज इलिअट यासारख्या अद्भुतरम्य काव्यकारांनीं असेंच दाखविलें आहे.

अधर्मसंततीच्या प्रमाणाविषयीं कांहीं नियम आंकडेशास्त्राच्या साह्यानें आढळून येतो काय, असा प्रश्न केल्यास त्यास होय म्हणून उत्तर देतां येईल. दरवर्षी त्याच देशांत किंवा समाजांत, तितक्याच वारंवार या प्रकाराची आवृत्ति होते. उदाहरणार्थ, इंग्लंडमध्यें गेल्या पंधरा वर्षांत अधर्मसंततीचें प्रमाण दर हजारीं ३९ आणि ४२ यांच्यामध्यें कोठेंतरी असे. हें या राष्ट्रांतील प्रमाण इतकें एकसारखें आहे कीं १८९१ मध्यें आलबर्ट लेफिंगवेल यानें असें भविष्य वर्तविलें होतें कीं १८९३ सालीं इंग्लंड आणि वेल्स मध्यें जन्माला येणाऱ्या दर हजार मुलांमध्यें निदान ४२ किंवा ४३ मुलें अनौरस असतील आणि अशा मुलांची एकंदर संख्या सुमारें ३८,००० भरेल. जेव्हां १८९५ त, १८९३ सालचे आंकडे प्रसिद्ध झाले तेव्हां लेफिंगवेलचें भविष्य बरोबर होतें असें प्रत्ययास आलें. मानवीवर्तनावर ताबा चालविणाऱ्या कायद्यांच्या प्रमाणशीर सातत्यावर इतक्या निश्चितपणें अवलंबून राहातां येतें कीं, विकार व मूर्खपणामुळें घडणाऱ्या गोष्टींचें भविष्य देखील अगोदर कित्येक वर्षे वर्तवितां येतें.

**अधर्मसंततीचें प्रमाण काढण्याची रीतः**—आंकडेशास्त्र वापरतांना अधर्मसंततीच्या आंकड्यांची तुलना दुसऱ्या कोणत्या आंकड्याशीं करून प्रमाण काढावें? हें प्रमाण निरनिराळ्या अनेक पद्धतींनीं काढतात. देशाच्या एकंदर लोकसंख्येशीं जारजजननाचें जें प्रमाण (Proportion) पडतें तें किंवा एकंदर जननाशीं याचा येणारा संबंध, किंवा सर्वांत उत्तम म्हणजे, १५–४५ वर्षे वयाच्या अविवाहित बायकांच्या संख्येशीं अधर्मजननाचा संबंध काढून अधर्मसंततीचें प्रमाण ठरवितात. खालील कोष्टकांत दोन काळांतील (१८८०–८१; १९०१–४) निरनिराळ्या देशांचें लोकसंख्येच्या दर हजारीं अधर्मसंततीचें प्रमाण दाखविलें आहे.

| देश. | दोन वर्षे १८८०-८१ | चार वर्षे १९०१-४ |
|---|---|---|
| आस्ट्रिया | ६२ | ५७ |
| सॅक्सनी | ६४ | ५२ |
| बव्हेरिया | ५९ | ४८ |
| स्वीडन | २९ | ३३ |
| डेन्मार्क | ३६ | ३२ |
| प्रशिया | ३३ | ३० |
| इटली | ३५ | २५ |
| फ्रान्स | २३ | २३ |
| नॉर्वे | २५ | २२ |
| बेलजम | २७ | २२ |
| स्कॉटलंड | २८ | १७ |
| न्यू झीलंड | १८ | १२ |
| इंग्लंड व वेल्स | १९ | ११ |
| आयर्लंड | ६ | ५ |

वरील दोन काळांतील आंकड्यांची तुलना केल्यास, असें दिसून येतें कीं अधर्मसंतति हळू हळू कमी होत आहे. पण त्यावरून नीतिमत्ता वाढली असें म्हणतां यावयाचें नाहीं, कां कीं गर्भसंभव टाळण्याचें व गर्भनाश करण्याचें कौशल्य पुष्कळच वाढलें आहे. तथापि निरनिराळ्या राष्ट्रांमध्यें अधर्माचरणांत जो फरक दृष्टीस पडतो त्याचें कारण काय असावें?

(१) धार्मिक श्रद्धेमुळें, म्हणजे एखाद्या विशिष्ट संप्रदायाचा अंगीकार केल्यामुळें हा फरक पडणार नाहीं. प्रॉटेस्टंट पंथाची त्याच्या नीतिमत्तेबद्दल मोठीशी स्तुति करतां येईल असें नाहीं, कारण स्वीडन नॉर्वे, स्कॉटलंड व डेन्मार्क या देशांत पूर्ण कॅथॉलिक आयर्लंडपेक्षां अधर्मसंततीचें प्रमाण फार मोठें आहे. त्याच प्रमाणें, कॅथॉलिक पथांत नीतिमत्ता श्रेष्ठ आढळेल व ती या विकारदोषाला आळा घालील अशी अपेक्षा करणेंहि बरोबर होणार नाहीं; कारण इंग्लंड आणि स्काटलंड या प्रास्टेस्टंट देशांतल्यापेक्षां आस्ट्रिया, सॅक्सनी व बव्हेरिया या ठिकाणीं जारजोत्पत्तीचें प्रमाण जास्त आहे. दोन अगदीं निरनिराळ्या धर्मांचे देश एक ख्रिस्ती व दुसरा ख्रिस्तीतर तुलनेस घेतले असतांहि त्या तुलनेचा फायदा ख्रिस्ती देशांस मुळींच मिळत नाहीं. उदाहरणार्थ, बुद्धधर्मी जपान घ्या तेथें १९०२ सालीं एकंदर लोकसंख्येशीं अधर्मसंततीचें प्रमाण ३० होतें—म्हणजे पांच (तीन कॅथॉलिक व दोन प्रॉटेस्टंट) यूरोपांतील राष्ट्रांचें जारज जननाचें प्रमाण जपानांतल्यापेक्षां अधिक होतें. खुद्द इंग्लंडमध्यें, नॉरफोक आणि हियरफोर्ड परगण्यांत १८९९ते

१९०२ या चार वर्षांत जारजजननांची जी संख्या होती तितकीच जपानच्या उत्तर व मध्य प्रांतांत होती हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

( २ ) अधर्मसंततीच्या प्रमाणांतले फरक शिक्षणांतल्या फरकांमुळें होतात असें म्हणतां येणार नाहीं. जेथें केवळ अज्ञानाचें साम्राज्य आहे तेथल्यापेक्षां जेथें उच्च दर्जाचें प्राथमिक शिक्षण दिलें जातें अशा जिल्ह्यांतून किंवा परगण्यांतून जास्त सुस्थिति दिसून येत नाहीं. पॅरिस सोडून फ्रान्समध्यें, असें नजरेस आलें आहे कीं जेथें निरक्षरता सर्वसामान्य आहे अशा ठिकाणीं अधर्मसंततीचें प्रमाण अतिशय कमी असतें.

( ३ ) एकंदर जननसंख्येशीं असणारें अधर्मसंततीचें प्रमाण मोठाल्या शहरांतल्यापेक्षां इतर भागांतच बहुधा जास्त असतें. उदाहरणार्थ, इंग्लंडांतील तीन मोठ्या शहरांतील जारजजननाचें दहा हजारीं प्रमाण व कांहीं शहराबाहेरील जिल्ह्यांतील हें प्रमाण खालील प्रमाणें आहे.

| शहर | १९०१. | १९०२. | १९०३. | १९०४. | १९०५. |
|---|---|---|---|---|---|
| लंडन | ३७ | ३६ | ३६ | ३८ | ३८ |
| बर्मिंगहॅम | ३३ | ४० | ३५ | ३९ | ४० |
| मँचेस्टर | २७ | ३२ | ३२ | ३५ | ३० |
| **परगणें** | | | | | |
| कंबर्लंड | ५८ | ५७ | ६१ | ५९ | ५६ |
| नॉरफोक | ६४ | ६१ | ६४ | ६२ | ६५ |
| नॉर्थ वेल्स | ५९ | ६० | ५६ | ५८ | ६० |

इंग्लंडाबाहेर हा नियम उलट दिसतो. पॅरिस, व्हिएन्ना, बर्लिन आणि इतर राजधानीच्या शहरीं त्या सभोंवतालच्या ग्राम्य जिल्ह्यांतल्यापेक्षां हें अधर्मसंततीचें प्रमाण जास्त असलेलें दिसतें. पॅरिसमध्यें याचें बहुतांशीं कारण तेथें अनेक कामकरी असून त्यांच्या मध्यें प्रचलीत असलेले स्त्रीपुरुषसंबंध सरकारनें किंवा धर्मपीठानें मान्य केलेले नाहींत हें होय.

(४) गरिबी किंवा नेहेमींची दुर्भिक्षता यामुळें अधर्मसंततीचें प्रमाण वाढतें असें नाहीं. नॉर्थ आयर्लंड अतिशय समृद्ध आहे; पण त्या ठिकाणीं दरवर्षी जारजजननाचें प्रमाण, जेथें सामान्यतः नेहेमीं दुष्काळ असतो अशा आयर्लंडमधील दक्षिण व पश्चिम भागांतल्या पेक्षां अतिशयच जास्त असतें. लंडनमधील कांहीं भागांतील आंकड्यांची तुलना फार बोधक होईल यांत शंका नाहीं. या शहरीं, उच्च वर्गाचे लोक "वेस्टएंड" भागांत व गरीब लोक "ईस्टएंड" भागांत राहातात. खालील कोष्टकांत दर हजारीं जननांत अनौरसतेचें प्रमाण दिलें आहे.

वरील कोष्टकावरून असें दिसून येईल कीं, लंडनसारख्या एखाद्या मोठ्या शहरांत, ज्या भागांत शहरांतील अतिशय गरीब लोक राहातात, ते भाग जननांच्या अनीतीनें अति कमी पछाडले गेले असतात. ही गोष्ट दरवर्षी दिसून येईल.

| लंडन | १९०१. | १९०२. | १९०३. | १९०४. | १९०५. |
|---|---|---|---|---|---|
| **ईस्ट एंड:** | | | | | |
| स्टेपने | १२ | ११ | ९ | १० | १८ |
| बेथ्नल ग्रीन | १३ | १२ | १५ | १४ | १३ |
| माईलएंड, (जुनें शहर) | १५ | ११ | १३ | १६ | १६ |
| व्हाईटचॅपेल | २२ | २० | २४ | २४ | १९ |
| **वेस्टएंड** | | | | | |
| सेंटजार्ज, हॅनोवर स्क्वेअर | ४० | ५२ | ४५ | ४७ | ४५ |
| केन्सिंगटन | ४८ | ४९ | ४४ | ४५ | ४९ |
| फुलहॅम | ४३ | ४३ | ४२ | ४५ | ४५ |
| सेंटमेरिलेबोन | १८२ | १८१ | १८६ | १८५ | १९८ |

राष्ट्रांत किंवा विशिष्ट भागांत अनौरसत्वाकडे होणाऱ्या प्रवृत्तींत जो विशिष्ट फरक दिसून येतो, त्याचीं खरीं कारणें कांहीं आनुवंशिक प्रभावांत सांपडतील. याचा अर्थ असा नव्हे कीं एखादें गूढ व अतर्क्य बल एका वर्गांतील लोकांना दुसऱ्या-वर्गांतील लोकांपेक्षां दुराचाराकडे किंवा अवास्तविक संबंधाकडे जास्त ओढून नेतें; तर त्याचा अर्थ इतकाच कीं, निरनिराळ्या राष्ट्रांत आणि समाजांत—दुराचाराकडे प्रवृत्ति सारखीच आहे असें धरून चालले तरी—निवारक बलें सर्वांना सारखींच जाणवत नाहींत. एक बलिष्ट दुष्कृत्यनिवारक गोष्ट म्हणजे लोकापवाद होय. ज्या ज्या समाजांत किंवा देशांत अधर्मजननाकडे नेहमींचेंच आपल्या इष्टमित्रांवर व शेजाऱ्यापाजाऱ्यांवर केव्हां तरी ओढवणारें एक स्वाभाविक संकट म्हणून कानाडोळा करण्यांत येतो त्या ठिकाणीं, जेथें असें जनन आईच्या तोंडाला काळोखी फांसते अशा प्रकारची समजूत असते ठिकाणच्यापेक्षां अधर्मसंततीचें प्रातिवार्षिक प्रमाण खास जास्त दिसून येथें. लोकांच्या भावनेचा मानवी वर्तनावर अन्य गोष्टींत कसा परिणाम होतो हें आपण प्रत्यहीं पहातोंच. कॉर्सिका आणि सिसिली या देशांतल्याप्रमाणें ज्या ठिकाणीं खासगी सूडास चोरून क्षमा व संमति मिळते, तेथें कायद्याची मदत मागण्याऐवजी खून करण्यांत येतील; जेथें घटस्फोट गर्हणीय मानण्यांत येत नाहीं तेथें वारंवार घटस्फोट होतील. हें सूक्ष्म लोकमतबल मापणें, एका समाजांत दुसऱ्यांतल्यापेक्षां याचा कितपत प्रभाव पडतो हें ठरविणें, मानवी वर्तनावर पिढयानुपिढया याच्या होणाऱ्या परिणामांच्या अभ्यासानेंच फक्त शक्य आहे.

बहुतेक सर्व यूरोपांतल्या देशांतून अधर्मसंतति हळू हळू कमी होत चालली आहे हें मागें कोष्टक देऊन सिद्ध केलेंच आहे. इंग्लंड आणि वेल्समधील, १५ ते ४५ वर्षे वयापर्यंतच्या अविवाहित बायकांच्या एकंदर संख्येशीं अधर्मजननाचें काय प्रमाण पडतें तें काढल्यास, ३५ वर्षांत ( १८७०-१९०५ ) हें प्रमाण शेंकडा ५० नें उतरलें आहे असें दिसून येईल.

इंग्लंड आणि वेल्स.

| वर्षें. | दर दहाहजारीं प्रमाण |
|---|---|
| १८७०—७२ | १७० |
| १८८०—८२ | १४१ |
| १८९०—९२ | १०५ |
| १९००—२ | ८५ |
| १९०३ | ८४ |
| १९०४ | ८४ |
| १९०५ | ८२ |

अधर्मजनन कमी करण्यासंबंधीं फारच थोडें लिहितां येईल. ज्या कांहीं देशांतून लग्नसंबंधांतील सर्व अडथळे कायद्यानें दूर केलेले असतात, तेथें निःसंशय यावर बराच परिणाम घडलेला दिसतो; पण बहुतकरून अशा ठिकाणीं दुःखी जोडप्यांची संख्या वाढण्याकडे व घटस्फोटाकडे बरीच प्रवृत्ति होत राहील. सर्वच ठिकाणीं हल्लीं लोकापवादाची तीव्रता कमी होत चालली आहे; पण लोकापवाद जाज्वल्य झाला असतांहि बालहत्यांकडे अधिकाधिक प्रवृत्ति होते. एवढें मात्र खात्रीपूर्वक सांगतां येईल कीं, वैवाहिक जीविताची आणि कौटुंबिक सुखाची जिकडे तिकडे खरी प्रशंसा झाल्यास, ज्यापासून बव्हंशीं अधर्म जनन होतें ते क्षणिक व विधिविरुद्ध संबंध कमी होऊं लागतील.

हिंदुस्थानांत अधर्मसंततीचें प्रमाण मुळींच सांगतां येत नाहीं. जेथें विवाहांची नोंद नाहीं जननाचीहि सक्तीची नोंद नाहीं तेथें अधर्म संततीचे आंकडे कोठून मिळणार.

**अधर्मसंततीचें समाजांतील स्थान** — रोमन लोकांमध्यें अधर्मसंततीचे दोन वर्ग पाडले होते. एक नोथी म्हणजे राखेचीं मुलें व दुसरा स्पुरी म्हणजे जी धर्मपत्नी नाहीं किंवा राख नाहीं अशा स्त्रीचीं मुलें व या दोन्ही वर्गांतील संतती आईची वारस असे, व नोथी संततीला बापाचा आश्रय मिळविण्याचा हक्क असे. पण त्याच्या संपत्तीवर मात्र वारस नसे. तथापि इतर बाबतींत या दोन वर्गांना नागरिकांचे बहुतेक हक्क असत. जर्मन कायदा याहून अगदीं भिन्न अशा तत्त्वावर तयार केला होता. त्यांत फक्त एकाच सामाजिक दर्जाच्या मातापितरांपासून झालेली संतति औरस समजण्यांत येई. इतरांनां अधर्मजात किंवा अकरमासे समजण्यांत येई; व आई किंवा बापयांच्यांपैकीं ज्याचा दर्जा खालचा असेल त्या दर्जाचे ते बनत. जर्मन कायद्याचा हेतु बीजशुद्धि कायम ठेवण्याचा असे. पण समाजाची नीतिमत्ता सुधारण्याचा त्यानें प्रयत्न केला नाहीं, कारण अगम्यगमन निंदास्पद समजण्यांत येत नसे. जुन्या सरंजामी सरदारीच्या काळांत जारज संततीसंबंधाचा हा कायदा कायम राहिला. अशा संततीला वारसाचा हक्क मिळत नव्हता. तेराव्या शतकांत रोमन कायद्याचा यावर परिणाम होऊन त्यांतील कडकपणा कांहींसा कमी झाला. ज्यांचे जनक राजघराण्यांतील असत अशांच्या बाबतींत हा जर्मन कायदा लागू केला जात नसे, अशी संतति काळीमा आणणारी म्हणून सुद्धां समजली जात नसे; व तिला वारसाचा हक्कहि मिळे. फ्रँक लोकांमध्यें क्लोव्हिसचा दासीपुत्र पहिला थिओडोरिक हा औरस मुलाबरोबर ज्याचा वांटेकरी झाला. इ. स. ८९५ मध्यें अर्नुल्फनें आपला राखीपुत्र इव्हेंटिबोल्ड यास लोरेनचा राजा केलें. विल्यम दि कॉंकररच्या ढालीवरील चिन्हांत अनौरसतेचा पट्टा होता; कारण तो नार्मंडीच्या ड्यूकचा राखीपुत्र होता.

इंग्लिश कायद्यांत अजूनहि अधर्मसंततीस पुरे हक्क मिळाले नाहींत. तो जे मिळवील तेवढेच त्याचे हक्क. दिवाणी कायद्याच्या दृष्टीनें तो कशाचाहि वारस होऊं शकत नाहीं. कारण त्याला कोणाचा पुत्रच मानण्यांत येत नाहीं. पण नैतिक दृष्ट्या तो कुटुंबरहित किंवा संबंधरहित मानला जातो असें मात्र मुळींच नाहीं. उदाहरणार्थ, त्याला आपल्या आईशीं किंवा बहिणीशीं लग्न लावतां येत नाहीं. वंशपरंपरागत नसलें तरी दुसरें एखादें आडनांव त्याला धारण करितां येतें. व पार्लमेंटनें त्याच्या बाबतींत तसा ठराव केला तर तो औरस व वारसहि बनतो.

भिकाऱ्यांच्या कायद्यांत सर्व औरससंततीचें राहण्याचें ठिकाण त्यांच्या जनकाच्या ठिकाणावरून ठरवितात. पण अनौरस संततीचें ठिकाण मात्र तिच्या आईचें जें ठिकाण असेल तेंच धरतात. अनौरस मुलाच्या आईनें त्याचा प्रतिपाळ करावा असा कायदा असल्यानें त्याला पोसण्याची जबाबदारी तिच्यावर पडते. पण या जबाबदारींत बापाचा कांहीं हिस्सा असावा हें तत्त्व पूर्वीपासून इंग्लिश कायद्यानें मान्य केलें आहे. याचें कारण आईला कांहीं मुलाच्या पोटाकरितां इलाज करतां यावा किंवा बापाला कांहीं थोडी शिक्षा असावी म्हणून नसून केवळ स्थानिक धर्मखात्यावर त्याला पोसण्याचा बोजा पडूं नये म्हणून हें तत्त्व कायद्यानें मान्य केलें आहे. इ. स. १५७६ चा कायदा जो इंग्लिश अधर्मसंततीच्या कायद्याला आधारभूत मानला जातो, त्यानें न्यायाधिशांना धर्मखात्याच्या ताब्यांत असलेल्या जारज मुलाच्या आईबापांना शिक्षा लावण्याचा व त्यांच्यापासून मुलाचा एका आठवड्याचा खर्च वसूल करण्याचा अधिकार दिला आहे. पुढें स. १६०९ आणि स. १७३३ सालीं पास झालेल्या कायद्यान्वयें धर्मखात्यावर पडलेल्या किंवा पोषणाची जबाबदारी पडण्याचा संभव असलेल्या कोणाहि मुलाच्या आईनें त्याच्या बापाला धरून द्यावयाचें असे. व तो मुलाचा खर्च धर्मखात्याला देईपर्यंत त्याला अडकवून ठेवण्यांत येई. इ. स. १८०९ व १८१० सालच्या कायद्यान्वयें हीं बंधनें फार दृढ करण्यांत आलीं. स. १८३२ सालीं भिकाऱ्यांविषयींच्या कायद्याची अम्मलबजावणी कशी काय होते याची चौकशी करण्याकरितां एक कमिशन नेमण्यांत आलें. त्यानें आपल्या रिपोर्टांत अधर्मसंततीवर बराच भर दिला, व १५७६ पासूनच्या कायद्यांची विचारणा करून असें ठरविलें कीं अधर्मसंततीस

संमति देणारा कायदा अतिशय अदूरदर्शी दिसतो; कारण त्यामुळें पुष्कळशा दुराचरणाला जागा मिळाली. उदाहरणार्थ, स्थानिक धर्मखात्यानें वसूल केलेली आठवड्याची पोटगी बहुधा आईला देण्यांत येई. पुष्कळ वेळांतर आईला ती मिळण्याविषयीं जिम्मा घेतला जाई. तेव्हां कमीशनर्सनीं असें सुचविलें कीं मुलाच्या पोषणाची जबाबदारी केवळ आईवर पडली पाहिजे; विधवेवर हीच जबाबदारी असते; तेव्हां व्यभिचाराला आपण अशी सवलत ठेवली तर आपत्तीपेक्षां दुराचरणाला जास्त महत्त्व दिल्यासारखें होईल. इ. स. १८३४ च्या भिकाऱ्यांविषयींच्या कायद्यांत दुरुस्ती होऊन मानलेल्या बापानें बालसंगोपनाचा खर्च देण्याचें तत्व अमलांत न आणण्याचा प्रयत्न झाला. पण जनता हें तत्त्व झुगारण्यास तयार नसल्यामुळें स. १८४४ सालीं अधर्मसंततीच्या कायद्याची चौकशी करण्याकरितां एक कमिशन बसून मानलेल्या बापाकडून पोषणाचा खर्च घेण्याची तजवीज असावी असा त्याचा अभिप्राय पडला व त्याप्रमाणें स. १८४५ सालीं अधर्मसंततीचा कायदा पास होऊन मुलाच्या बापावर स्वतंत्र दिवाणी दावा आणण्याचा आईला अधिकार मिळाला व त्या संबंधांत धर्मखात्यानें अगदीं पडूं नये असें ठरलें. पुढें कायद्यानें धर्मखात्याला मुलाच्या पोषणार्थ पैसा वसूल करण्याचा अधिकार दिला.

हल्लीं अधर्मसंततीला जे अधिकार नाहींत त्यांतील मुख्य हा कीं त्याला कोणाचाहि वारस होतां येत नाहीं. कारण तो कोणाचा संबंधी नसतो. कोणत्याहि पूर्वजाचें बीज त्याच्या ठिकाणीं धरतां येत नाहीं; तेव्हां अशा अधर्मसंतति खेरीज जर एखाद्या मालमत्तेला दुसरा कोणी वारस नसेल तर ती जिंदगी ज्याच्या हद्दींत असेल त्याच्याकडे जाते. ज्याप्रमाणें हा माणूस कोणाचा वारस नसतो त्याप्रमाणें त्यालाहि त्याच्या पोटच्या मुलाखेरीज दुसरे कोणी वारस नसतात. तेव्हां जर अशा मनुष्यानें एखादी जमीन खरेदी केली व तो संतति किंवा मृत्युपत्रावांचून वारला तर ती जमीन त्याच्या इनामदाराकडे जाते. पूर्वी अधर्मसंततीस उपाध्येगिरी किंवा कोणतेंहि धार्मिक काम मिळत नसे. पण हल्लीं तो व साधारण मनुष्य यांच्यांत भेदभाव ठेवला नाहीं. स्कॉटलंडमध्येंहि अधर्मसंततीसंबंधी अशाच तऱ्हेचा कायदा आहे. पूर्वी त्या ठिकाणीं अशा माणसाला संतति नसेल तर मृत्यूपत्रहि करितां येत नसे. पण स. १८३५ च्या कायद्यानें ही सवलत दिली. इंग्लंडमधील देशाचारांवरून आंखलेल्या रूढ कायद्यान्वयें पार्लमेंटनें आपला अधिकार गाजवून ठराव केल्याखेरीज व्यक्तीची अधर्मसंततीच्या स्थितींतून सुटका होत नाहीं. पण ज्या देशाचे कायदे रोमन कायद्याला अनुसरून तयार केले आहेत त्या ठिकाणीं त्याचा हा दर्जा कायम नसून त्याच्या आईबापांनीं विवाह केल्यानंतर त्याची अनौरसता संपते.

**अधर्मसंततीचें भारतीय समाजांत स्थान.**—हिंदु समाज हा जातिबद्ध असल्यामुळें अधर्मसंततीस कोणत्याहि जातींत स्थान मिळत नाहीं. अशी प्रजा निराळी रहाते. व त्यांस निराळी जात बनवावी लागते. अशी परिस्थिति असल्यामुळें कांहीं लहान लहान अनिश्चितपद जाती अधर्मसंततीमुळें उत्पन्न झाल्या असणें शक्य आहे. त्या कोणत्या हें आज सांगणें शक्य नाहीं. कायस्थांच्या विरुद्ध या तऱ्हेचें विधान याज्ञवल्क्य, कल्हण इत्यादि ग्रंथकारांनीं केलें आहे परंतु त्यावर विश्वास टाकतां येत नाहीं. कांहीं धर्मशास्त्र ग्रंथात ज्या अनेक जातींचा संकरजाति म्हणून उल्लेख आहे त्यांत मागध, सैरंध्र, चांडाल यांसारख्या राष्ट्रस्वरूपी जातींचा उल्लेख आहे. आपल्याकडे गोवर्धन ब्राह्मणांस गोलक म्हणून “अमृते जारजःकुंडः मृते भर्तरि गोलकः” या मनुस्मृतिवाक्यान्वयें त्यांस इतर ब्राह्मण पंक्तिबाह्य धरीत पण गोवर्धन ब्राह्मण ही प्रादेशिक जात असावी, व त्यांची जोशीपणाची वृत्ति निदान रामदेवराव जाधवाच्या काळाइतकी जुनी असावी असें दिसतें. ब्राह्मण पुरुष व ब्राह्मण स्त्री यांची अधर्मसंतति ब्राह्मणांतच गफलतीनें मिसळून गेल्याचीं उदाहरणें प्रस्तुत लेखकाच्या अवलोकनांत आहेत. एकत्र रहाणाऱ्या पण विवाहबद्ध नसलेल्या सजातीय स्त्रीपुरुषापासून झालेली संतति धडपड करून अडचणींत सांपडलेलीं वधूवरें पाहून आपल्या आईबापांच्याच जातींत प्रवेश करते. जेव्हां वरच्या जातींतील विधवा स्त्रिया पुरुषाबरोबर रहात नसतील व त्यांस मुलें झालीं असतील तेव्हां त्या आपल्या मुलांची कशी तरी वाट लावतात. त्या मुलांस मारून टाकतात, किंवा पंढरपूर सारख्या ठिकाणीं ठेवून देतात किंवा ख्रिस्ती मिशनऱ्यांस किंवा गोसाव्यांस आपलीं मुलें देऊन टाकतात. पूर्वी जैनांतील बरेच साधु अशा ब्राह्मण विधवांपासून झाले असें एक हेमचंद्राचा चरित्रकार म्हणतो. ब्राह्मण, प्रभु यांसारख्या उच्चवर्गांतील विधवा किंवा कुमारी आपल्या अधर्मसंततीस उघडपणें बाळगून आहे असें एकहि उदाहरण आमच्या पहाण्यांत नाहीं.

जेव्हां पुरुष व स्त्री भिन्न जातीय असून अधर्म व्यवहारानें एकत्र रहात असतील तेव्हां त्यांस जी मुलें होतात तीं रक्षिलीं जातात. अशी मंडळी विदुर जात फुगवितात, पण त्यांसहि हल्लीं बराच प्रतिबंध झाला आहे. ब्राह्मण पुरुष आणि ब्राह्मणेतर स्त्री अशापासून जी संतति आहे तिनें इतरांपासून वियुक्तता स्थापन केली आहे, म्हणजे आपली स्वतंत्र जात बनविली आहे. आणि ते स्वतःहि पाराशर ब्राह्मण म्हणवून घेऊं लागले आहेत. मराठ्यांमध्यें प्रथम अधर्मसंततीस दूर ठेवण्यांत येतें व त्यांचा समावेश कुलीनांत होत नाहीं. पण कालांतरानें तसलीं कुटुंबें सुशिक्षित व संपन्न झालीं म्हणजे त्यांच्याशी चांगल्या कुळांतील लोकहि लग्नव्यवहार करूं लागतात. म्हणजे मराठे जातींतच अधर्मसंततीला थोडें बहुत औदार्य दाखविलें जातें, असें म्हणतां येईल. मुंबईतील कांहीं अकरमासे मराठ्यांच्या सामान्य जनतेपेक्षां अधिक चांगल्या स्थितींत शैक्षणिक व सांपत्तिक दृष्ट्या आहेत. ते मराठ्यांत मिसळून

जाण्यास फारसे तयार नाहींत. ते आपली निराळी जात करूं पहात आहेत. अशांपैकीं पुष्कळ मंडळी आपणांस ब्रम्हो म्हणवितात. अशांच्या लग्नांची व्यवस्था त्या मंडळींतच होते. ब्राह्मणादि चांगल्या जातींतहि अशांची लग्नें झाल्याचीं उदाहरणें आहेत. अधर्मसंततीस ज्या अडचणी आहेत त्या सामाजिक आहेत. कायद्याच्या त्यांस अडचणी नाहींत. एका बाबतींत तर त्यांची स्थिति कायद्यानें इष्ट प्रकारची आहे. एखादी हिंदु स्त्री यूरोपियन बरोबर लग्न करती झाली तर त्या स्त्रीच्या संततीस हिंदु समजण्यांत येणार नाहीं. पण तिचा यूरोपियन बरोबर अधर्म संबंध असला तर मात्र तिच्या संततीस हिंदु समजण्यांत येतें. मुंबईतील अकरमाशांत असा वर्ग आहे. तसेंच मलयाळी लोकांपैकीं तिय्या जातींत असा वर्ग आहेच. आश्चर्याची गोष्ट एवढीच कीं थर्स्टनवर विश्वास ठेवल्यास तो वर्ग तिय्या जातीच्या बाहेर समजण्यांत येत नाहीं.

**अधिकमास**—यास धोंडा, मलमास किंवा पुरुषोत्तममास असेंहि म्हणतात. बारा वर्षांत चैत्र, ज्येष्ठ व श्रावण हे अधिक होतात. अठरा वर्षांनीं आषाढ अधिक येतो. चोवीस वर्षांनीं भाद्रपद अधिक येतो. १४१ वर्षांनीं अधिक आश्विनमास येतो. व ७०० वर्षांनीं अधिक कार्तिकमास येतो. आश्वीन व कार्तीक हे दोन महिने अधिक आले तरी त्यांस अधिक म्हणत नसून भाद्रपदापर्यंत मात्र अधिक म्हणतात. ज्या वर्षीं अधिक आश्विन पडतो त्या वर्षीं पौषक्षय होतो. व त्या वेळीं दोनप्रहर पर्यंत मार्गशीर्ष व दोन प्रहरानंतर पौष होतो. आणि याप्रमाणें त्या दोन्ही महिन्यांचीं धर्मकर्मेंहि एकाच महिन्यांत करितात. या जोडमासाचें नांव संसर्प आहे. कार्तिकापुढील चार महिने अधिक होत नाहींत, व आश्विनाचे पूर्वीं क्षयमास होत नाहींत.

**पूर्व इतिहास**—चांद्रवर्ष व सौरवर्ष यांचा मेळ घालण्यासाठीं आपल्याकडे सरासरी बत्तीस तेहेतीस चांद्रमासांनीं चांद्र वर्षांत जो एक महिना अधिक घालावा लागतो त्यास अधिमास किंवा अधिकमास असें म्हणतात. चांद्र सौर वर्षांचा प्रचार आपल्याकडे वैदिक कालापासून आहे व बारा महिन्यांचें एक वर्ष ही कालगणना देखील वैदिक कालाइतकीच प्राचीन आहे. परंतु सौरवर्षाचे सुमारें ३६५- दिवस असतां बारा चांद्र महिन्यांचे सारे ३५४ च दिवस होतात. यामुळें एका वर्षाचे फक्त बारा चांद्रमासच मानले तर, पहिला म्हणून जो मास मानला असेल तो प्रथम उन्हाळ्यांत असेल तर पुढें हिंवाळ्यांत, पुढें पावसाळ्यांत असा उत्तरोत्तर मागें पडूं लागेल; व हल्लींच्या मुसुलमानांच्या मोहरमाप्रमाणें सुमारें ३३ वर्षांत त्याचें सर्व ऋतूंतून भ्रमण होईल. याचा दुसरा परिणाम असा होईल कीं ३३ सौरवर्षांत चांद्रवर्षांची संख्या सुमारें एक वर्षानें अधिक वाढेल. अर्थात् प्रत्येक चांद्रवर्षांत सुमारें अकरा बारा दिवस किंवा बत्तीसतेहेतीस चांद्रमहिन्यांनीं एक चांद्रमहिना अधिक धरल्याशिवाय चांद्र व सौर वर्षांचा मेळ बसणें शक्य नाहीं. ब्राह्मणें व संहिता यांत यज्ञ व संवत्सर हे पर्यायवाचक शब्द आहेत असें दाखविणारीं अनेक वचनें ( ऐ० ब्रा० २. १७; ४.२२. शत० ब्रा० ११.१.११. व २.७. १. तै० सं० २.५.७.३; ७.५.७.४; ७.२.१०.३. ) असल्यामुळें, कै. लो. टिळकांच्या मतें यज्ञ ही संवत्सराचीच एक प्रतिमा होती व तो त्याप्रमाणें बारा चांद्रमहिन्यांत संपूर्णहि होत असे. परंतु नवीन यज्ञाची सुरुवात संवत्सरारंभीं व्हावयाची असल्याकारणानें अथर्ववेद ४.११.११ मध्यें यज्ञदेवता प्रजापति ही उरलेले १२ दिवस नवीन वर्षाच्या यज्ञाची तयारी करण्यांत घालविते असें म्हटलें आहे. सर्व वर्षभर श्रम केल्यामुळें ऋभू ( म्हणजे ऋतू ) हे ह्या अवधींत आपली गति मंद करून सूर्याचा पाहुणचार घेत बसतात असें जें ऋग्वेदांत (४.३३.७) वचन आहे तें देखील ह्या अधिक दिवसांसच अनुलक्षून आहे. यावरून ऋग्वेदकालीं केव्हां तरी चांद्रवर्ष व सौरवर्ष यांचा मेळ घालण्याकरितां प्रत्येक चांद्रवर्षांत बारा दिवस अधिक धरण्याची वहिवाट असावी असें अनुमान निघतें ( Orion. 1916 Ed. p. 15. ). या अधिक दिवसांसंबंधीं ऋग्वेद १.२५.८ मध्यें आणखी जो एक उल्लेख आला आहे तेथें संदर्भावरून अधिक मास असा अर्थ विवक्षित दिसतो. तैत्तिरीय संहितेंत १.४.१४ मध्यें अधिक मासाला संसर्प असें नांव दिलें असून पुन्हां ५.६.७ मध्यें तेरा मासांचा उल्लेख केला आहे. वाजसनेयी संहितेंत अधिक मासासाठीं अंहसस्पति ( ७.३० ) व मलिम्लुच ( २२.३० ) अशीं नांवें योजिलीं आहेत. यांतील दुसऱ्या शब्दावरूनच हल्लीं अधिकमासासाठीं वापरण्यांत येणारा मलमास हा शब्द सिद्ध झाला आहे. अधिकमासाच्या अपवित्रतेचा ऐतरेय ब्राह्मणांतहि उल्लेख सांपडतो. कारण त्यांत ३.१ मध्यें तेराव्या महिन्यास निंद्य असें म्हटलें आहे. संसर्प व अहंसस्पति हे दोन शब्द क्षय मास येतो त्या वर्षीं जे दोन अधिक मास येतात त्यांच्यासाठीं उपयोजिले जातात असें मुहूर्त चिंतामणिकारानें म्हटलें आहे ( प्रकरण १ श्लोक ४७ पहा ). यांपैकीं क्षयमासापूर्वी येणारा अधिक मास तो संसर्प व नंतर येणारा तो अहंसस्पति. ज्या वेदांत अधिकमासाचा उल्लेख आहे त्यांतील कांहीं भाग ख्रि० पू० १५०० पूर्वीं तयार झाले होते असें यूरोपीय पंडित म्हणतात. परंतु कै. शं० बा० दीक्षित यांच्या मतें अधिकमास घालण्याची पद्धति शकपूर्व ५००० वर्षांपासूनच आपल्या देशांत चालू असावी.

**अधिकमास ठरविण्याची प्राचीन व अर्वाचीन रीतः**—ज्या नक्षत्रीं चंद्र पूर्ण होतो त्या नक्षत्राचें नांव महिन्यास देण्याची आपल्या देशांत प्राचीन काळीं वहिवाट असल्यामुळें, कोणत्या नक्षत्रांवर चंद्र एकामागून एक दोन महिने पूर्ण होतो किंवा कोणत्या नक्षत्रांवर तो मुळींच पूर्ण होत नाहीं तें पाहून आरंभीं अधिकमास क्षयमास धरीत असावे असें प्रथमदर्शनीं वाटतें. परंतु कृत्तिकांपासून दोन दोन नक्षत्रांवर चंद्र पूर्ण झाला म्हणजे त्या महिन्यास कार्तिकादि नांवें द्यावीं व फाल्गुन,

भाद्रपद, आश्विन हे महिने तीन तीन नक्षत्रांचे धरावे या नियमानें अधिकमास व क्षयमास वारंवार येतात. कै० शं. बा. दीक्षित यांच्या मतें चंद्राच्या गतीचें सूक्ष्म मान समजण्यापूर्वी कांहीं काल ही पद्धति स्थूल मानानें म्हणजे फारसे अधिकमास क्षयमास न आणतां चालली असावी ( Twelve year cycle, by S. B. Dixit, Indian Antiquary, January 1888. ). भारतीय युद्धकालीं पांच वर्षांचें एक युग कल्पून त्यांत दोन महिने म्हणजे एक सबंध ऋतु एकाच वेळीं अधिक घालण्याचा संप्रदाय असावा असें रा. रा. चिं. वि. वैद्य यांनीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. वेदांग ज्योतिषांत चांद्रमान बरेंच सूक्ष्म आहे. वेदांग ज्योतिषपद्धतीनें ३० महिन्यांत एक अधिकमास होतो. त्यावेळींहि ५ वर्षांचें एक युग मानीत असून त्यांत तिसऱ्या वर्षी आषाढ व श्रावण यांमध्यें एक अधिकमास व पांचव्या वर्षी पौषानंतर दुसरा अधिकमास घालीत. परंतु हाहि नियम सूक्ष्म नसल्यामुळें प्रचारांतून गेला असावा. पितामहसिद्धांतांत ३२ महिन्यांनीं अधिकमास घालण्याची पद्धति आहे. पंचसिद्धांतिकोक्त सूर्यसिद्धांत इत्यादि सूक्ष्म सिद्धांत झाल्यावर अधिमास सूक्ष्म गणितानें येऊं लागला. ज्या चांद्रमासांत मेष संक्रमण होईल तो चैत्र मानून पुढील मासांस वृषभादि संक्रांतीवरून वैशाखादि नांवें अनुक्रमें द्यावीं व ज्यांत स्पष्ट संक्रमण मुळींच येणार नाहीं तो अधिक मास समजावा असा हल्लीं मासनामासंबंधीं सामान्य नियम आहे. परंतु याविषयीं ज्या दोन परिभाषा आढळतात त्यांप्रमाणें अधिकमासास अगोदरच्या किंवा नंतरच्या यांतून कोणत्याहि मासाचें नांव दिलें जाऊं शकतें. या बाबतींत माधवाचार्य ( विद्यारण्य ) कृत कालमाधव ग्रंथांत ब्रह्मसिद्धांतांतलें म्हणून समजलें जाणारें "मेषादिस्थे सवितरि यो यो मासः प्रपूर्यते चांद्रः । चैत्राद्यःस ज्ञेयः पूर्तिद्वित्वेऽधिमासोंऽत्यः ॥ असें एक वचन आहे. दुसरें एक वचन व्यासाचें म्हणून कालतत्त्वविवेचन नांवाच्या धर्मशास्त्र ग्रंथांत "मीनादिस्थो रविर्येषामारंभप्रथमे क्षणे । भवेत्तेऽब्दे चांद्रमासाश्चैत्राद्या द्वादश स्मृताः ॥" याप्रमाणें आहे. यांपैकीं पहिला ग्रंथ शक १३०० च्या सुमाराचा व दुसरा १५४२ चा आहे. दोन्हीहि वचनांप्रमाणें इतर मासांस एकच संज्ञा येतात, परंतु अधिकमासास मात्र पहिल्या वचनान्वयें पूर्व मासाची व दुसऱ्या वचनान्वयें नंतरच्या मासाची संज्ञा मिळते. सांप्रत दुसरी पद्धति सर्वत्र चालू आहे आणि भास्कराचार्यांच्या वेळीं व खुद्द कालमाधव ग्रंथकालीं देखील हीच पद्धति चालू होती. तथापि पहिली परिभाषा कांहीं काल चालत होती असें दाखविणारा शककालाच्या सहाव्या शतकांतील चौथा धरसेनाचा एक ताम्रपटलेख खेडा येथें मिळाला आहे.

**मध्यम संक्रमणाचे व स्पष्ट संक्रमणाचे अधिक मासः**—सांप्रत अधिकमास किंवा क्षयमास मानणें तो स्पष्ट संक्रमणावरूनच मानतात. परंतु मध्यम मानानें अधिकमास मानण्याची पद्धति एके कालीं प्रचारांत होती असें दिसून येतें. मध्यम गति नेहमीं सारखी असते. त्या गतीनें ३२ चांद्रमास, १६ तिथी, ३ घटका आणि ५५ पळें इतक्या कालानें म्हणजे कधीं ३२ महिन्यांनीं व कधीं ३३ महिन्यांनीं अधिकमास पडतो. तसेंच या मानानें सौरमासाचें मान ३० दिवस, २६ घटिका व १८ पळें आणि चांद्रमासाचें मान २९ दिवस, ३१ घटिका व ५० पळें आहे. यामुळें एका चांद्रमासांत दोन संक्रांती कधींच व्हावयाच्या नाहींत. व त्यामुळें क्षयमास कधीं व्हावयाचा नाहीं. सूर्याची स्पष्ट गति नेहमीं सारखी नसते. यामुळें स्पष्ट सौरमास कमजास्त मानाचे होतात, आणि एका चांद्रमासांत कधीं दोन संक्रमणें होऊं शकतात. यामुळें क्षयमास होतो. क्षयमास येतो तेव्हां एका वर्षांत दोन अधिकमास येतात. स्पष्ट मानानें दोन अधिक मासांमध्यें लघुतम अंतर २८ महिने किंवा क्वचित् २७ महिने आणि महत्तम अंतर ३५ महिने असतें. वर जो चौथ्या धरसेनाचा ताम्रपट सांगितला आहे त्यावरून शकें ५७० मध्यें गुजराथेंत मध्यम मानानें व मेषादिस्थे या परिभाषेनें अधिकमास मानीत असत असें दिसतें. ज्योतिषदर्पण नामक मुहूर्तग्रंथांत श्रीपतीच्या ( शके ९६१ ) सिद्धांतशेखर ग्रंथांतला एक उतारा आहे त्यावरूनहि मध्यम मानानें अधिक मास मानण्याचा पूर्वी प्रचार होता ही गोष्ट स्पष्ट दिसते. भास्कराचार्यानें क्षयमास सांगितला आहे. मध्यममानानें क्षयमास मुळींच येत नसल्यामुळें त्याच्या वेळीं ती पद्धति प्रचारांतून गेली असली पाहिजे. शक वर्ष १००० च्या सुमारास मध्यम मानानें क्षयमास धरण्याची पद्धति पूर्णपणें प्रचारांतून गेली असावी असें कै. शं. बा. दीक्षित यांचें मत आहे.

कै. शं. बा. दीक्षित व रॉबर्ट सेवेल या दोघांनीं इ. स. १८९६ त छापून प्रसिद्ध केलेल्या इंडियन कॅलेंडर नांवाच्या पुस्तकांत इ. स. ३०० पासून १९०० पर्यंत स्पष्टमानाचे अधिक मास व इ. स. ३०० पासून ११०० पर्यंत मध्यम मानाचे अधिक मास कोणकोणते होते ते दिले आहेत.

सांप्रत नर्मदोत्तर भागीं पूर्णिमांत मास आहेत. वराहमिहिराच्या कालीं ज्या पूर्णिमांत मासांत मेषसंक्रमण होईल तो चैत्र अशी पद्धति होती. परंतु आतां पूर्णिमांत मानांतहि मासंसज्ञा व अधिक मास अमांतमानानेंच मानतात. दोहोंकडील शुक्लपक्ष नेहमीं एकाच संज्ञेच्या मासांतले असतात आणि दक्षिणेकडील कृष्णपक्ष ज्या संज्ञेच्या मासाचा असेल त्याच्यापुढील संज्ञेच्या मासाचा उत्तरेकडे तोच कृष्णपक्ष असतो.

**पूर्णिमांत व अमांत मानें:**—अमांतमानानें जेव्हां अधिक महिना येतो, त्या सुमारास वास्तव पूर्णिमांत मान घेतलें तर मुळीं अधिक महिनाच नसतो. कारण अमांतमानाचा अधिक महिना येतो त्यावेळीं एक संक्रांति अधिक मासापूर्वीच्या कृष्णपक्षाच्या अखेरीस होते व दुसरी अधिक मासानंतरच्या शुक्लपक्षाच्या आरंभीं येते. पूर्णिमांत मानानें अधिकमासाचा शुक्लपक्ष मागील महिन्याचा दुसरा पक्ष होतो व कृष्णपक्ष पुढील

महिन्याचा पहिला पक्ष होतो. अशा रीतीनें त्यावेळीं दोन्हीहि पूर्णिमांत महिन्यांत संक्रमणें होत असल्याकारणानें त्यांपैकीं कोणताच वस्तुतः अधिक होऊं शकत नाहीं. अमांतमानाची माससंज्ञा व अधिकमास पूर्णिमांत मानावर लादलीं गेल्यामुळें पूर्णिमांत मानांत अधिकमासास नांव देण्यासंबंधींहि बरीच अव्यवस्था होते. समजा कीं अमांतमानाप्रमाणें वैशाख महिना अधिक आला आहे. यावेळीं पूर्णिमांतमानाच्या वैशाख महिन्याचा कृष्णपक्ष म्हणजे पहिला पंधरवडा अगोदरच झालेला असतो. अमांतमानास अनुसरून पूर्णिमांतमानांत अधिक मासास वैशाख असें नांव दिलें, तर शुद्ध वैशाख महिन्याचा कृष्णपक्ष अगोदर, त्यानंतर अधिक वैशाख व त्याच्यानंतर शुद्ध वैशाखाचा कृष्णपक्ष असा विचित्र क्रम येईल. ही अव्यवस्था टाळण्याकरितां अशा प्रसंगीं पहिल्या व दुसऱ्या पक्षास मिळून पहिला वैशाख आणि तिसऱ्या व चौथ्यापक्षास मिळून दुसरा वैशाख अशीं नांवें देतात.

अधिकमास महात्म्यः—बृहन्नारदीय पुराण व पद्मपुराण यांमध्यें पुरुषोत्तममासमहात्म्य व मलमासमहात्म्य या नांवाखालीं अधिकमासाचें महात्म्य वर्णन केलें आहे. पहिल्याचे एकतीस अध्याय असून दुसऱ्याचे एकोणतीस अध्याय आहेत. अर्थात् हीं महात्म्यें भिक्षुकी थाटाचीं असून त्यांत अधिक मासांत कोणतीं व्रतें करावीं, कोणतीं दानें द्यावीं, व्रताचें उद्यापन वगैरे कसें करावें व त्या व्रतांपासून कोणती फलप्राप्ति होते इत्यादि ठराविक पद्धतीचें विवेचन आहे व अधिकमासमहात्म्यश्रवणाची फलश्रुतिहि वगळलेली नाहीं. विशेषतः मलमासमहात्म्यांत व्रतें व दानें यांस प्रमुख स्थान दिलें आहे. यापैकीं नमुन्याकरितां म्हणून बृहन्नारदीय पुराणांतील पुरुषोत्तम महात्म्यांत काय सांगितलें आहे तें थोड्या शब्दांत येथें देतों. हें महात्म्य कोणापासून कोणाला कळलें व तें कसकसें पुढें चालत आलें याची परंपरा देऊन सूत शौनकादिकांस कथन करीत आहे असा उपोद्घात केला आहे ( अ. १ ). शुकागमन हें नांव पहिल्या अध्यायास दिलें आहे. पुरुषोत्तम मासासंबंधीं नारायण व नारद यांचा पूर्वी संवाद झाल्याचें सांगितलें आहे ( अ. २ ). अधिकमास हा व्रतवैकल्य करण्यास अप्रशस्त समजला गेला असल्यामुळें त्याच्या ठिकाणचा कमीपणा जावा म्हणून तो वैकुंठास विष्णूची प्रार्थना करण्याकरितां गेल्याचें वर्णन आहे ( अ. ३ ) व त्यानें केलेली विष्णूची प्रार्थना दिली आहे (अ. ४). विष्णु अधिकमासासह गोलोकांत गेल्याचें वर्णन आहे व विष्णूनें अधिकमासाकरितां श्रीकृष्णाची केलेली प्रार्थना दिली आहे ( अ. ५ ). पुरुषोत्तम मासास श्रीकृष्णाकडून वरप्राप्ति व ऐश्वर्यप्राप्ति झाली हें सांगितलें आहे ( अ. ६ ). पुढें श्रीकृष्ण पांडवांस त्यांच्या दुःखाचें कारण सांगतो कीं, द्रौपदी ही पूर्वजन्मीं मेधावी नांवाच्या ब्राह्मणाची मुलगी असून आईबाप वारल्यावर पोरकी झाली तेव्हां अतिशय शोक करिती झाली. अशा स्थितींत तिला दुर्वासाचें दर्शन झालें. त्यानें तीस पुरुषोत्तम मासाचें महत्त्व वर्णन करून सांगितलें परंतु तिनें इतर महिन्यांपेक्षां पुरुषोत्तम मासासच अधिक कां मानावें असा प्रश्न केला असतां दुर्वासास क्रोध आला. परंतु त्यानें तिला शाप न देतां तिला सांगितलें कीं ज्या अर्थी तूं पुरुषोत्तममासाचा अनादर केला आहेस त्या अर्थी तुला पुढें दुःख होईल. तेव्हां तिनें शिवाराधना करण्याचा निश्चय केला. पुढें शिव प्रसन्न होऊन तिला वर माग असें म्हणाला असतां तिनें पति द्यावा अशी विनंति पांच वेळां पति शब्द उच्चारून केली म्हणून तिला पुढील जन्मीं पांच पति होतील असा शंकरानें वर दिला. पुढील जन्मांत ती यज्ञकुंडांतून द्रौपदीरूपानें जन्म पावली, व पांडवांची पत्नी झाली. तिनें पुरुषोत्तम मासाचा अनादर केल्यामुळें तिला दुःशासनापासून पीडा व वनवास प्राप्त झाला. असें श्रीकृष्णानें सांगून युधिष्ठिरास पुरुषोत्तम व्रतोपदेश केला ( अ. ७ ते १२ ). येथून पुढें दृढधन्वा नांवाच्या राजाच्या कथेला आरंभ होतो. तो एकदां शिकारीस गेला असतां अरण्यांत एका शुकाच्या तोंडून एक श्लोक ऐकल्यामुळें त्याला हुरहुर लागते. इतक्यांत वाल्मीकिमुनि येऊन त्याच्या चिंतेचें कारण समजावून देण्याकरितां त्यास त्याच्या पूर्व जन्मींची कथा सांगतात. तो पूर्व जन्मीं द्रविड देशांत सुदेव नांवाचा ब्राह्मण होता. त्यानें पुत्रप्राप्तीकरितां तपाचरण केलें असतां त्याच्या नशिबीं नव्हता तरी गरुडाच्या विनंतीवरून विष्णूनें त्याला एक पुत्र दिला. पण तो वाराव्या वर्षी पाण्यांत बुडून मरेल असें देवलानें सुदेवास सांगितलें. त्याप्रमाणें तो मरण पावला त्यावेळीं त्याच्या आईबापांनीं फार शोक केला. तेव्हां श्रीहरीनें त्या पुत्रास जिवंत करून दीर्घायु केलें; व त्याला पूर्व कथा सांगितली कीं, पूर्वी धनु नांवाचा एक ऋषि होता. त्यानें अमर पुत्र व्हावा या इच्छेनें तपाचरण केलें तेव्हां त्यास अमर पुत्र नव्हे पण समोरील पर्वत जाग्यावर असेपर्यंत जगणारा पुत्र मिळाला. पुढें त्या पुत्रानें महिष नांवाच्या ऋषीचा शालिग्राम विहीरींत टाकला तेव्हां त्यानें त्यास 'तूं आज मरशील' असा शाप दिला पण तो मेला नाहीं तेव्हां त्याच्या मृत्यूचें कारण ओळखून हजारों महिष उत्पन्न करून त्यानें तो पर्वत नाहींसा केला. तेव्हां तो मुनिपुत्र तात्काल मरण पावला. नंतर धनुऋषीनें पुत्राच्या कलेवरासह चिता प्रवेश केला. याप्रमाणें पूर्वकथा सांगून पुढील जन्मीं तूं दृढधन्वा नांवाचा राजा होशील व जेव्हां तुला विष्णूचें विस्मरण होईल तेव्हां हा पुत्र शुकरूपानें तुला स्मरण देईल व तुला वैराग्य प्राप्त होईल असें श्रीहरीनें त्या सुदेवास सांगितलें ( अ. १३ ते १९ ) नंतर पुरुषोत्तम मासमहात्म्य वर्णन करून त्यामुळें तुला पुत्र प्राप्ति झाली असें सांगितलें. नंतर त्याला व्रताचें आह्निक ( अ. २० ) पूजनविधि ( अ. २१ ) व व्रतनियम ( अ. २२ ) कथन केले. तेवीस व चोविसाव्या अध्यायांत पुरुषोत्तम मासांत दीपदान केलें असतां काय फल मिळतें हें दाखविण्याकरितां चित्रबाहु राजाला अगस्ति ऋषीनें त्याच्या पूर्वजन्मींचें वृत्त

कथन केल्याचें वर्णन आहे त्यांत तो चमत्कार पुरांत मणिग्रीव नांवाचा नास्तिक दुष्ट व जीवहिंसापरायण असा शूद्र असतां त्यानें उग्रदेव नांवाच्या ब्राह्मणाची एकदां सेवा केली व त्यानें त्यास पुरुषोत्तम मासांत दीपदान करावयास सांगितलें व त्याप्रमाणें त्यानें केल्यामुळें तो पुढील जन्मीं चित्रबाहु राजा म्हणून जन्मास आला अशी कथा आहे. ( अ. २३–२४ ). पंचविसाव्या अध्यायांत वाल्मीकि मुनीनें दृढधन्वा राजास उद्यापनविधि सांगितला आहे. सविसाव्या अध्यायांत गृहीत नियमत्यागाबद्दल विवेचन केलें आहे. याप्रमाणें वाल्मीकिनें कथा सांगितल्यावर दृढधन्वा राजा राज्यावर पुत्रास बसवून तपाचरणास गेला व पुढें पत्नीसह हरिसन्निध गेला. सत्ताविसाव्या अध्यायाच्या अवशिष्ट भागांत चित्रशर्मा नांवाच्या एका कृपण ब्राह्मणाची कथा आहे. त्यानें कोणतेंहि पुण्य केलें नसून चोरी वगैरे पापें केल्यामुळें त्यास मरणानंतर प्रेतयोनि व नंतर कपियोनि प्राप्त झाली. तेथें तो पुरुषोत्तम मासाच्या वद्य दशमीच्या दिवशीं एका कुंडांत पडला व पांचव्या दिवशीं मरण पावला. त्यामुळें आपोआपच व्रताचरण होऊन तो दिव्य देह धारण करून विमानांत बसून श्रीहरिसंनिध गेला. एकोणतिसाव्या अध्यायांत एकंदर दिवसाचें आह्निक सांगितलें आहे. तिसाव्या अध्यायांत पतिव्रताधर्मनिरूपण केलें आहे. याचा अधिमासाशीं अर्थाअर्थी कांहीं संबंध नाहीं. शेवटच्या एकतिसाव्या अध्यायांत अर्थात् पुरुषोत्तममासमहात्म्याची श्रवण फलश्रुति सांगितली आहे.

**अधिरथः**—चंपाच्या आसमंतांत राहाणारा एक सूत; हा धृतराष्ट्राचा मित्र होता. ( महाभारत ३,३०९,१७१५३ ) यास राधा नांवाची स्त्री असून, या दांपत्यानें कर्णाचें संगोपन केलें होतें. हा अंगदेशाचा राजा होता असेंहि म्हणतात; कारण कर्णाला जें अंगदेशाचें राज्य मिळालें तें याचा वारस म्हणून होय. अधिरथानें कर्णाचें वसुषेण असें नांव ठेऊन त्याला हस्तिनापुरीं द्रोणाचार्याकडे अस्त्रविद्या शिकण्यास पाठविलें ( म. भा. ३,३०८). महाविख्यात् कर्ण राधेय, सूतपुत्र, सूत इत्यादि नांवांनीं संबोधिला जाई.

**अधेवाडः**—भावनगरच्या दक्षिणेस अजमासें तीन मैलांवरचें मालेश्वरी नदीच्या ( काठेवाड ) उत्तर तीरावरील गांव. लोकसंख्या सुमारें पांचशें. येथील जाजदिया हनुमानाचें देऊळ व गुरुचेलानी पादुका यांचेमुळें या ठिकाणाला बरेंच महत्त्व आलें आहे. हें स्थान सोमनाथाच्या यात्रेंतील एक क्षेत्र आहे. ठाकोर रामदासजींनीं आपला पुत्र साधुलजी यास दिलेलें हें गांव असून, त्याच्या वंशाकडे तें चालत आहे. (मुं. गॅ. ८).

**अनः**—लोअर बर्मा. क्याकपा जिल्ह्यांतील टाउनशिप उ. अ. १९° १६' ते २०° ४०' व पू. रे. ९३° ४५' ते ९४° २६'. क्षेत्रफळ १८६१ चौरस मैल. १९०१ सालीं यांत ३५३ खेडीं होतीं. लोकसंख्या सुमारें तीस हजार. या भागांत जंगल बरेंच आहे. इ. स. १९०३–४ सालीं ३९ चौरस मैलांत लागवड केलेली होती. अन हें मुख्य ठिकाण अन नदीच्या कांठीं वसलें आहे. ( इं. गॅ. ५. )

**अनकापल्लीः**—मद्रास इलाखा विजगापट्टम जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील तहशील. उ. अ. १७° २९' ते १७° ५५' व पू. रे. ८२° ५७' ते ८३° १५' क्षेत्रफळ २९७ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें एक लक्ष पासष्ट हजार. अनकापल्ली गांव व १४३ खेडीं या तहशिलींत आहेत. इ. स. १९०३–४ मध्यें एकंदर उत्पन्न १२२०००. तहशिलीचा उत्तरेकडील प्रदेश फार सुपीक असून तांदुळ व ऊंस इत्यादि फायदेशीर पिकें चांगलीं पिकतात. या तहशिलींत फक्त जमीनदाऱ्या आहेत. गोडे घराणें, कासीमकोट, विजयानगरम् आणि चिपुरपल्ली या जमिनदाऱ्या मिळून ही तहशील झाली आहे. कासीमकोट जमीनदारी ही पूर्वी चिकेकोल सरकारची फौजदारी होती. व इ. स. १७९४ ते १८०२ पर्यंत कासीमकोट हें एका जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. इ. स. १८०२ नंतर याचा विजयानगर जिल्ह्यांत समावेश करण्यांत आला. ( इं. गॅ. ५ ).

**अनकापल्ली गांवः**—अनकापल्ली तहशिलीचें मुख्य ठिकाण. उत्तर अक्षांश १७° ४२' व पूर्व रेखांश ८३° २'. हा गांव शारदा नदीतीरीं विजगापट्टण गांवाच्या पश्चिमेस २० मैलांवर आहे. हा भाग सुपीक असल्यामुळें येथून धान्य व गुळ बराच बाहेरील प्रांतांत जातो. लोकसंख्या (१९२१) २०३६०. इ. स. १८७८ सालीं म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३–४ मध्यें उत्पन्न २५००० खर्च २१०००. हा गांव सदर्न मराठा रेलवेचें मद्रास वाल्टेर लाइनवरील एक स्टेशन आहे. पाऊस सरासरी ३४·९८ इंच पडतो ( अर्नोल्ड–इंडियन गाईड, इं. गॅ. ५ ).

**ॲनॅक्झॅगोरसः**—या आयोनिअन् तत्त्वज्ञानपंथांतील तत्त्ववेत्त्याचा मन्ज आशिया मायनरमधील क्लॅझोमॅनी येथें ख्रि. पू. ५०० च्या सुमारास झाला.

क्लॅझोमॅनी येथून हा ख्रि. पू. ४६४ च्या सुमारास अथेन्स येथें गेला व तेथें ज्योतिष व गणितशास्त्रांतील प्रावीण्यामुळें व विशेषतः त्याच्या थोर संन्यस्त वृत्तीमुळें त्याला मोठें वजन प्राप्त झालें व त्यानें बरेच दिवस पेरिक्लीझच्या संगतींत घालविले. येथें नाटककार युरीपीडीझ हा याचा प्रमुख शिष्य बनला. तत्त्वज्ञान व शास्त्रीय संशोधन यांची आवड अथेन्समधील लोकांत यानें उत्पन्न केली. पुढें पेलोपोनेशिअन लढाईचे पूर्वी पेरिक्लीझवर हल्ला झाला व ॲनॅक्झॅगोरसवर अधर्माचरणाचा आरोप करण्यांत आला पण पेरिक्लीझच्या भाषणामुळें तो निर्दोषी ठरला. पण त्याला अथेन्स सोडून जावें लागलें. तेव्हां तो स्वदेशीं ( आयोनिया ) येऊन लॅमसॅकस येथें राहिला व तेथेंहि मोठी मानमान्यता मिळवून ख्रि. पू. ४२८ मध्यें मरण पावला.

ॲनॅक्सॅगोरसचीं ज्योतिष, प्राणिशास्त्र, भौतिक घटना, परमाणुवाद, वगैरे संबंधाचीं मतें पांचव्या विभागांत ( पृष्ठें २४१–२४६ ) दिलीं आहेत.

त्यांवरून असें दिसून येईल कीं, तत्त्वज्ञानाच्या इतिहासांत ॲनॅक्सॅगोरसनें तात्त्विक विचारांना एक निराळें वळण लावलेलें दिसतें. आणि दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे तत्त्वज्ञान विषयक विचारांचें केंद्रस्थान याच्यावेळीं ग्रीक वसाहतीऐवजीं अथेन्स शहर बनलें. त्याच्या परमाणुविषयक विचारांनीं आणि जगद्घटनेची उत्पत्ति यंत्रशास्त्रविषयक तत्त्वांवर लावण्याच्या पद्धतीनें भौतिक शास्त्रांतील सुप्रसिद्ध परमाणुवादाचा पाया घातला गेला. जगांतील चमत्कारांचा उलगडा किंवा कार्यकारण-भाव बुद्धिप्रामाण्यवादाच्या तत्त्वावर लावण्याचा त्यानें प्रयत्न केला. हा त्याचा बुद्धिप्रामाण्यवाद पुढें आरिस्टॉटलनें उचलून धरला, व नंतर तो अनेक टीकोपटीकारांनीं पुढें चालू ठेविला.

**ॲनॅक्झिमँडरः**—हा ग्रीक तत्त्ववेत्त्यापैकीं अनुक्रमानें दुसरा होय. ख्रिस्ती शकापूर्वी ६१० व्या वर्षीं हा जन्मला. याच्या पंथास "आयोनियन तत्त्वज्ञानपंथ" असें आपण नांव देऊं. याला कोणी थेलीस या प्रख्यात तत्ववेत्त्याचा स्नेही व कोणी शिष्य असें मानतात. परंतु याच्या मतांवरून हा थेलीसचा शिष्य असावा असें मुळींच अनुमान निघत नाहीं.

यानें थेलीसप्रमाणें "विविध चमत्कारांच्या मागील असर्योद एकतत्त्व" ( Substance or substratum ) शोधून काढण्याचा प्रयत्न केला. पण याचें मत थेलीसहून फार भिन्न होतें. थेलीसनें "जल" हें एक मूलतत्त्व मानिलें होतें पण ॲनॅक्झिमँडर यानें जल, पृथ्वी, अग्नि यापैकीं एकहि मूलतत्त्व न मानतां फक्त एकच सर्वव्यापी "अनंत" तत्त्व आहे असें ठरविलें. या तत्त्वास त्यानें "अनंत किंवा अगणित" ( Infinite) असें नांव दिलें. तो म्हणे, 'जल, अग्नि वगैरे नाशिवंत आहेत त्याअर्थी त्यांपैकीं एकहि मूलतत्त्व असूं शकत नाहीं.' आपल्या "अनंताचें" त्यानें खालीं दिल्याप्रमाणें वर्णन केलें आहे. "तें अविनाशी आहे, तें अगम्य आहे, तें स्वयंभू आहे. त्याच्या अंगीं चालकशक्ति अथवा प्रेरणा शक्ति (Directive power ) आहे. ज्याप्रमाणें एखादें जहाज सुकाणूनें वळवतां येतें त्याप्रमाणेंच हें संपूर्ण विश्वाचा कारभार चालवितें."

विंडेब्रँड म्हणतो कीं यूरोपखंडांत ईश्वराविषयीं कल्पना ॲनॅक्झिमँडरच्या "अनंता" वरून आली असावी.

पृथ्वी गोलाकार आहे असें याचें मत होतें. विश्वाच्या उभारणीविषयीं व प्राणिमात्रांच्या उत्पत्तीविषयीं यानें पुढें दिल्याप्रमाणें अनुमान काढलें होतें. तो म्हणे कीं, प्रथम तारे, नंतर पृथ्वी, नंतर समुद्र आणि नंतर प्राणी निर्माण झाले. जिवंत प्राण्यांपैकीं मासे प्रथम निर्माण झाले नंतर दुसरी व सर्वांचे शेवटीं मनुष्य प्राणी निर्माण झाला. ॲनॅक्झिमँडरच्या मताप्रमाणें प्राणिमात्रांची उत्पत्ति व भगवान् श्रीविष्णूचे मत्स्य, कूर्म वगैरे दशावतार यांत बरेंचसें साम्य आहे ही विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

**अनंगपालः**—( १ ) महंमद गिझनीनें ज्याचा अनेकदां पराभव केला तो लाहोरचा राजा. महंमदानें हिंदुस्थानावर पहिली स्वारी केली तेव्हां (१००१) याचा बाप जयपाल यानें प्रथम त्याला तोंड दिलें; पण या लढाईंत जयपालाचा पराभव झाला, व त्याला बरीच खंडणी देऊन आपली सुटका करून घ्यावी लागली. या नामुष्कीबद्दल जयपालाला बरीच लाज वाटून त्यानें अग्निकाष्ठें भक्षण केलीं. त्याचा मुलगा अनंगपाल हा कांहीं दिवस महंमदाशीं सलोख्यानें वागला, व तो त्याला निमूटपणें दरसाल खंडणी पाठवीत गेला. पण पुढें महंमदाचा मुलतानचा सुभेदार अबदुल फत्ते लोदी याला आपल्या बाजूला वळवून तो महंमदाला विचारीनासा झाला. तेव्हां महंमदानें इ.स. १००५ त पंजाबवर स्वारी करून अनंगपालास काश्मीरकडे पळवून लाविलें. पण महंमद परत गेल्यावर अनंगपालानें, उज्जन, ग्वाल्हेर, कनोज, दिल्ली, अजमीर इत्यादि ठिकाणच्या राजांचा एक संघ स्थापून महंमदाला पार हांकून लावण्याची जंगी तयारी केली. पेशावरच्या मैदानांत चाळीस दिवसपर्यंत दोन्ही पक्षांकडील सैन्यें एकमेकांकडे पहात तटस्थ उभीं होतीं. पुढें प्रत्यक्ष लढाईला सुरुवात होऊन बराच वेळपर्यंत हिंदूंनीं मुसुलमानांवर मात करून त्यांनां जेरीस आणिलें होतें. हिंदूंचा विजय होणार हें निश्चित झाल्यासारखें होतें. पण इतक्यांत एक दुर्दैवाचा प्रसंग ओढवला व विजयश्री परतून गेली. अनंगपालाचा हत्ती तीर लागून घायाळ झाला व घाबरून पळत सुटला. तेव्हां हिंदु सैन्याचा धीर सुटून तेंहि मागें सरू लागलें, व अशा रीतीनें महंमदाचा जय होऊन, हिंदूंचें नष्टचर्य ओढवलें. १०२१–२३ त महंमदानें लाहोरप्रांत खालसा केला. अनंगपाल कधीं वारला याचा उलगडा होत नाहीं. एके ठिकाणीं तो १०१३ च्या सुमारास निवर्तल्याचें लिहिलें आहे, तर दुसऱ्या एका इतिहासांत महंमदानें लाहोरप्रांत खालसा केला त्या वेळीं ( १०२१–२३ ) तो जिवंत असल्याचें दृष्टीस पडतें.

अनंगपालाचें पुष्कळ ठिकाणीं "आनंदपाल" असें दुसरें एक नांव सांपडतें. हें दुसरें नांव बरोबर आहे असें वाटतें. लल्ली यानें स्थापन केलेल्या काबूलच्या ब्राह्मणी राज्याच्या घराण्यांत ( काल ८८०–१०२१ ) जयपाल, नंतर अनंगपाल, नंतर त्रिलोचनपाल असे शेवटचे तिघे राजे होऊन गेले व १०२१ त महंमदानें तें घराणें बुडविलें असा उल्लेख सांपडतो व या राजांचा कालहि वरील जयपाल, अनंगपाल यांच्या कालांशीं जुळतो ( मध्ययुगीन भारत भाग २ रा. प्र. ११ वें. ) तेव्हां अनंगपाल किंवा आनंदपाल या काबूलच्या ब्राह्मणी घराण्यांतील असला पाहिजे हें उघड झालें.

(२)—दिल्लीच्या तोमर वंशांतील या नांवाचे राजे. तुंवर किंवा तोमर घराण्याचा संस्थापक अनंगपाल हा असून त्याचा राज्याभिषेक शक इ. स. ७३६ हा आहे. ह्यानें प्रथम दिल्लीस गादी स्थापिली. पण त्याच्या वंशजांनीं ती तेथून हलवून कनोजला नेली. तेथून त्यांना राठोडांचा मूळपुरुष चंद्रदेव यानें हांकून दिल्यावर, दुसरा अनंगपाल दिल्लीस आला व त्यानें दिल्ली आपली राजधानी केली. अनंगपालानें दिल्लीस राज्य केल्याचा सन तेथें

असलेल्या प्रख्यात लोहस्तंभावर "संवत् दिहली ११०९ अनंगपाळ वही" अशा अक्षरांत दिलेला आहे; यावरून इ. स. १०५२ मध्यें अनंगपाळ दिल्लीस राज्य करीत होता हें उघड दिसतें. पुढल्या शतकांत तोमर घराण्याचा शेवटचा राजा तिसरा अनंगपाळ याजपासून अजमीरच्या विशाळदेव चव्हाणानें दिल्ली जिंकून घेतली व त्याला दुसरें लहानसें राज्य देऊन आपला मांडलिक केलें. चव्हाण व तोमर यांचा शरीरसंबंध होऊन पृथ्वीराज जन्मास आला; व तो पुढें दिल्लीचा अधिपति झाला.

**अनंग भीमः**—कलिंग देशाचा राजा. यास लाडदेव असेंहि दुसरें नांव होतें. यानें शके १०९४ मध्यें जगन्नाथाचें देऊळ बांधिलें, अशाविषयींचा लेख त्या देवळांतील एका दगडी खांबावर कोरलेला आहे. अनंगरंग ग्रंथाचा कर्ता जो कल्याणमल्ल तो याच्या पदरीं होता.

**अनंगहर्ष मात्ररातः**—हा नरेंद्रवर्धनाचा मुलगा असून यानें 'तापसवत्सराजचरित्र' नांवाचें नाटक लिहिलें. आनंदवर्धन व त्याचा टीकाकार अभिनवगुप्त यांच्या ग्रंथांत या नाटकाचें नांव आलेलें आहे. ( पिशेल Z. D. M. G. 39. p. 315 ).

आनंदवर्धनाचा काल नवव्या शतकाचा उत्तरार्ध हा आहे. त्यावरून अनंगहर्ष हा त्याच्या अगोदर झाला असावा. ज्याअर्थी यानें 'रत्नावली'चा आधार घेतला असें दिसतें त्याअर्थी त्याच्यामतें याचें नाटक ७–९ या शतकांच्या दरम्यान रचलेलें असावें.

तापसवत्सचरित्रामधील कथानक भासाच्या स्वप्नवासवदत्ताप्रमाणेंच आहे. पण यांत कांहीं नवीन गोष्टी दृग्गोचर होतात त्या येणेंप्रमाणें:

वासवदत्तेच्या मरणानंतर उदयन तपस्वी होतो. तसेंच यौगन्धरायणानें पद्मावतीच्या हातांत उदयनाची तसबीर ठेवल्यानंतर त्याच्यावर अनुरक्त झालेली पद्मावतीहि तपस्विनी बनते. वासवदत्ता व उदयन यांमधील संभाषणप्रवेश हा यांत आढळत नाहीं. दोघेहि मरणोत्सुक होत्साते एकमेकाला प्रयाग येथें शेवटीं भेटतात. नंतर एकमेकांचें निवेदन होतें, व रुमण्वताचा विलय झाल्याचें वर्तमान कळतें.

**अननसः**—अननसाचें झाड केतकीच्या झाडासारखें असतें. याचीं पानें तीन साडेतीन फूट लांब व दोन इंच रुंद असतात. पानें बहुत करून भुरकट हिरव्या रंगाचीं असतात. पण कधीं कधीं रंगी बेरंगीहि दृष्टीस पडतात. या झाडाचें खोड फारच आंखूड असतें. या झाडाच्या फळाची रचना फार लक्ष पुरविण्यासारखी मजेदार आहे. फळ लागण्यासारखें झाड झालें म्हणजे त्यांतून एक दांडा वर निघतो व त्या दांड्यावर फार दाट अशीं फुलें येतात. या प्रत्येक फुलाचें स्वतंत्र फळ न होतां तीं चिकटून एकच मोठें फळ होतें.

हें झाड उष्ण प्रदेशांत होतें. ब्राझीलदेश या झाडाचें जन्मस्थान आहे.

अमेरिकेचा शोध लागल्यानंतर लवकरच अननसाचीं झाडें सर्व जगभर पसरलीं व उष्ण कटिबंधांतील देशांतून तीं चांगलीं वाढूं लागलीं. पाइनशंकूंत ( pine-cone ) व त्याच्यांत बरेंच साम्य असल्यामुळें स्पेनमधील लोक त्याला पिनस ( pinus ) म्हणत. ब्राझीलियन 'ननस' या नांवावरून पोर्तुगीझ लोक त्याला अननस म्हणूं लागले व अलीकडील सर्व नांवें बहुतेक याच नांवावरून झालेलीं आहेत. हिंदुस्थानांत याला अननस, अनारस, अनाशापाझाम, नानट, व अनस अशीं नांवें आहेत. अननसाचीं अगदीं अर्वाचीन इंग्रजी नांवें म्हटलीं म्हणजे फॉरेनस्क्रूपाइन्, (foreign Screw-pine ), यूरोपिअन जॅक फ्रूट ( European jack fruit ) वगैरे आहेत. यूरोप, आशिया, अरवस्तान व मिसर येथील जुन्या अभिजात भाषांतून याला नांव आढळत नाहीं. हें झाड अर्वाचीन असल्यामुळें याला संस्कृतमध्येंहि नांव सांपडत नाहीं.

इ ति हा सः—वेस्टइंडीज बेटांत व अमेरिका खंडांत हीं झाडें होतात असें ओव्हिएडोनें ( Oviedo ) लिहिलें आहे. ख्रिस्तोफर ॲकोस्टा ( Christopher–Acosta ) यानें १६०५ सालींच हिंदुस्थानांत अननस विपुल असल्याचें लिहून ठेविलें आहे. ( in Clusius Hist. Exot. pl. 1605, 284 ) ब्राझिल, हायटि ( Haiti ) व मेक्सिको येथें अननस असल्याचें मार्कग्राफ ( Marcgraf ) आणि हरॅनन्डेझ ( Hernandez ) यांनीं वर्णन केलें आहे. १६ व्या, १७ व्या व १८ व्या शतकांतील बहुतेक वनस्पतिशास्त्रज्ञांनीं त्याचें वर्णन करून चित्रेंहि काढिलीं आहेत. बोइम ( Boym ) याचें अननस हिंदुस्थानांतून चीनमध्यें गेला असें म्हणणें आहे. ॲकोस्टाप्रमाणेंच व्हीड्स् म्हणतो कीं पोर्तुगीझ लोकांनीं अननस हिंदुस्थानांत आणिला व एका शतकाच्या आंतच हिंदुस्थानांतील, सर्व भागांत तो इतका विस्तृत प्रमाणावर फैलावला कीं रंफिअसला ( Rumphius ) तो एतद्देशियच आहे असें वाटलें. लिन्सकोटन (Linshcotan), पिरार्ड ( Pyrard ), बरनिअर ( Bernier ), व हरबर्ट ( Herbert ) वगैरे प्राचीन प्रवाशांनीं त्याचा प्रामुख्यानें उल्लेख केला आहे.

जहांगीरनें अननस परदेशांतून येथें आल्याचा उल्लेख आपल्या आत्मचरित्रांत केला आहे; तथापि बाबरनें दिलेल्या येथील फळांच्या यादींत अननस कोठेंच दिसत नाहीं.

फ ळा ची ला ग व डः—उष्ण कटिबंधांतील अननसापेक्षां इंग्लंडमधील उष्णतागृहांतून ( hot houses ) तयार झालेले अननस फार रुचकर असतात असें म्हणतात. यूरोपांत अननसाची लागवड प्रथम लेडेन् ( Leyden ) येथें १६५० त झाली असें दिसतें. इंग्लंडांत तयार झालेला पहिला अननस दुसऱ्या चार्लसला ( १६७२ ) नजर करण्यांत आला होता. अर्वाचीन साधनांनीं दळणवळण फार

जलद होत असल्यामुळें वेस्टइंडिज, मदिरा व कॅनरी बेटांतून लागतील तितके अननस यूरोप व अमेरिका खंडांत जातात; त्यामुळें तिकडे उष्णता गृहांतून अननस तयार करणें कमी होऊन अननसाची किंमत कमी झाली; परंतु यूरोप व अमेरिकेच्या आसपासच्यां उष्ण कटिबंधांतील भागांतून अननसाच्या निरनिराळ्या जाती, लागवडीचे प्रकार व त्याचा खप यांजकडे अलीकडे लोकांचें लक्ष बरेंच लागलें आहे. हिंदुस्थानांत हीं झाडें विपुल असूनहि व्यापाराकरितां अननसाच्या जातीची सुधारणा करण्याची व औद्योगिक दृष्टीनें याची लागवड करण्याची खटपट अद्याप कोणी केली नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें अननसाची लागवड करून व्यापार करणाराला चांगला फायदा होण्यासारखा आहे.

हवा व वस्तुक्षेत्रः—अननस पहिल्यानें पश्चिम किनाऱ्यावर लाविला परंतु पुढें लवकरच तो पूर्व किनाऱ्यावरहि लाविला गेला. पूर्व व उत्तर बंगाल, आसाम व ब्रह्मदेश ह्या भागांतील हवा व जमीन अननसाला फारच योग्य आहे. हिंदुस्थानच्या इतर भागांतूनहि कोठें कोठें अननस होतो परंतु पश्चिम घाट व मुख्यत्वेंकरून त्याचें दक्षिण टोंक यावर याची उत्पत्ति फारच होते. आसामांत व विशेषतः खासिया टेंकड्यांतून रुचकर अननसाची उत्पत्ति आपोआप व विपुल होते. तेनासरीममध्यें तर त्याची उत्पत्ति इतकी होते कीं जून व जुलैमध्यें एका रुपायाला एक होडीभर अननस मिळतात असें डॉ. हेल्फर सांगतात.

जाती किंवा प्रकारः—हिंदुस्थानांतील लेखक फक्त एक किंवा दोन जातींचीच माहिती देतात. फिरमिंगर (Firminger) म्हणतो सिलहटी अथवा कुमला अननस लहान असून त्याला फार थोडे परंतु विलक्षण मोठाले डोळे असतात. व ढाक्याचा अननस गुळगुळीत असून त्याला पांढरे डोळे असतात. सिलोन, पेनांग व इंग्लंड मधील येणाऱ्या अननसांचेंहि त्यानें वर्णन केलें आहे. परंतु हिंदुस्थानांतील अननसांच्या निरनिराळ्या जातींची माहिती कोठेंच उपलब्ध नाहीं.

जमीन व खतः—वाळू असलेली चिकण मातीची व लवकर पाणी चांगलें निघून जाणारी जमीन फार उत्तम असें कांहीं लोकांचें मत आहे. निव्वळ वाळूच्या ठिकाणींहि अननस होतात, असेंहि म्हणतात. जमिनींत चुन्याचें प्रमाण जास्त असलेलें चांगलें. प्राणिज खत चांगलें कुजल्या शिवाय रोपांजवळ घालूं नये कारण त्यामुळें त्यांची वाढ खुंटते. जमीन जितकी कसदार, व खत जितकें उंची असेल तेवढें अननसाला चांगलें असें स्वीड म्हणतो. खारावलेले मासे वाळवून केलेल्या खताची बुडरो फार स्तुती करितो. व पावसाळ्याच्या पूर्वी जमिनींत हें खत पुरावें असें त्याचें म्हणणें आहे. परंतु वेस्टइंडीज मधील अनुभवावरून जास्त खतापासून रोपें मरतात असें फिरमिंगर म्हणतो. कुजलेला पाचोळा, कुजलेलें शेण व वाळू यांनीं भुसभुशित झालेल्या जागीं चांगले अननस होतात. छायेंत झालेले अननस जरी आकारानें मोठे असतात तरी ते रुचीला कमी असतात. फळ तयार होत असतांना रोपांना वारंवार पाणी द्यावें लागतें. कांहीं दिवसांनीं रोपाचें स्थलांतर करणें फार चांगलें असतें. तीन चार वर्षांनीं झाडें निकस झाल्यासारखीं दिसूं लागतात व असें झाल्यावर तीं उपटून टाकून जमीन पुन्हा तयार करून त्या ठिकाणीं नवीन रोप लावावें.

सीलोन, त्रावणकोर, मलबार, कारोमांडल किनारा व बंगाल वगैरे प्रांतांत याची लागवड फार होते. अननसाचीं झाडें समुद्र किनाऱ्यालगतच्या प्रांतांत फार होतात म्हणजे याला हवा फार सर्द व दमट अशी पाहिजे. जमीन उत्तम निचऱ्याची व पुळणवट अशी लागते. अननसाची स्वतंत्र अशी लागवड फारशी कोठें करीत नाहींत. नारळ सुपारी किंवा आंबे यांच्या बागेंत याचीं झाडें करतात. मुंबई शहराच्या आसपास व ज्या ठिकाणीं रेलवेची सोय आहे अशा ठिकाणीं अननसाकडे थोडेंबहुत लक्ष दिलें जातें. परंतु इतर ठिकाणीं याची लागवड काळजीपूर्वक होत नाहीं. सामान्यतः याची लागवड करण्याची रीति अशीः—मुळांपासून जीं पिलें निघतात तीं किंवा देंठाजवळ जीं पिलें असतात तीं काढून एका वाफ्यांत लावतात. तेथें तीं चांगलीं मोठीं होईपर्यंत म्हणजे दोन वर्षेपर्यंत ठेवतात. वाफ्याला मधून मधून भरपूर पाणी देतात. फळाच्या शेंड्यावरील पिलें लावण्यासाठीं घेत नाहींत. नंतर आंब्याच्या झाडाखालील जमीन नांगरून तीन तीन फुटांवर वाफ्यांत तीं पिलें लावतात. यांना फळ येण्याला दोन किंवा तीन वर्षें लागतात. झाडें लावल्यानंतर त्यांना जमिनींतून आणखीं पिलें फुटतात आणि सर्व जमीन अननसांच्या झाडांनीं व्यापिली जाते. झाडें एकदां लावल्यावर कोणी पावसाळ्यांत एक एक पसा एरंडीची पेंड दर झाडास देतात. कोणी कोणी एप्रील अगर मे महिन्यांत सर्व बागेला पाणी देतात. याशिवाय झाडांची फारशी काळजी कोणी घेत नाहीं. फूल जानेवारी किंवा फेब्रुवारी महिन्यांत येऊन फळ जून महिन्यांत तयार होतें. अननसाचीं झाडें उघड्यावर उन्हांत चांगलीं होत नाहींत. फळावर ऊन पडल्यासहि फळ चांगलें भरत नाहीं.

पावसाळ्यांत कोंकणांत अननस पिकून बाहेरगांवीं पाठविण्याची सोय नसल्यामुळें बहुतेक पीक फुकट जातें.

प्रजनन व हंगामः—फळ तयार झालें म्हणजे मुख्य बुंध्याच्या आसपास जमिनींत असलेल्या बुंध्यापासून पुष्कळ अंकुर किंवा पिलें निघूं लागतात. यांचेपासून प्रजनन चांगलें होतें. प्रजननाचा दुसरा मार्ग म्हणजे फळांवर आलेले पानांचे अंकुर व फळांतील बिया होत.

निकोलस साहेबांनीं सांगितलेली लागवडीची तऱ्हा खालीं दिली आहेः—

‘ सहा फूट अंतरावर ओळी पाडाव्या व प्रत्येक ओळींत तीन फुटांहून कमी अंतर न ठेवतां अंकुर लावावेत. अशा रीतीनें एक एकरांत २५०० रोपें तयार होतील. पहिला बहार

येऊन गेल्यावर दर रोपाचे सुमारें चार कोम अथवा अंकुर ठेवून बाकीचे कापून टाकावे म्हणजे दुसऱ्या हंगामाचे वेळीं सुमारें १०००० फळें उत्पन्न होतील. रोपें कांटेरी असल्यामुळें मध्यें काम करण्यास अवश्य ती जागा राहण्याकरितां ओळींत बरेंच अंतर ठेवणें इष्ट आहे. शिवाय दोन ओळींत जास्त जागा ठेविल्यानें पहिलीं रोपें उपटून काढल्यावर नवीन लागवडीच्या वेळीं जुन्या दोन ओळींच्यामध्यें नवीन रोपें लावितां येतात व अशा तऱ्हेनें एकाच जागेवर बरेच दिवस सारखें पीक काढून घेतां येतें.

वेस्ट इंडीजमध्यें लागवडीनंतर आठ किंवा नऊ महिन्यांनीं फळें तयार होतात. हिंदुस्थानांतील दक्षिणेकडील भागांत ऑगस्ट महिन्यांत लागवड करावी असें फिरमिंगर म्हणतो. रोपाला फेब्रुवारी व मार्च महिन्यांत फुलें येऊन जुलै व ऑगस्ट महिन्यांत फळें पिकण्यास सुरवात होते, व सप्टेंबर आणि अक्टोबरमध्यें त्यांची पूर्ण वाढ होते. कधीं कधीं रोपाला फुलें उशिरा आल्यामुळें हिवाळ्यांत फळें तयार होतात. अननस पिकण्यास उष्णता अवश्य पाहिजे असल्यामुळें हिवाळ्यांतील फळें चांगलीं पक्व होत नाहींत व त्यामुळें तीं आंबट व खाण्यास वाईट असतात. मुंबई इलाख्यांत जोमदार अंकुरांची लागवड जानेवारी ते मार्चपर्यंत करावी व मुळ्या फुटेपर्यंत त्यांनां पाणी द्यावें असें वुडरो म्हणतो.

फळ पूर्ण पिकण्याचे पूर्वी तें चांगल्या धारेच्या चाकूनें देठांपासून कापितात. कांहीं अंतरावर फळें पाठविणें झाल्यास प्रत्येक फळ गवतांत किंवा कागदांत गुंडाळावें. दोन किंवा तीन फळांपेक्षां जास्त फळें एके ठिकाणीं बांधूं नये. फळें चेंगरली गेल्यास व तीं जास्त पिकलेलीं असल्यास रस्त्यांत तीं सडण्याची भीति असते व एक फळ सडल्यास इतर सर्वांचा तें खराब करितें.

वांक तयार करणें:—पानांपासून उत्तम वांक निघतो. फिलिपाईन् बेटांत त्यापासून पिना (Pina) नांवाचें कापड तयार करितात तें उत्तम मलमलीसारखें असतें. उत्तर बंगालांतील रंगपूर जिल्ह्यांत चांभार जोडे शिवण्याचा धागा यापासून करितात म्हणून तेथें या वांकाची फार मागणी आहे. गोव्याकडे या वांकाचे केलेले कंठे (Necklaces) गळ्यांत घालितात. वॉलिच नांवाच्या गृहस्थानें खाशिया टेकड्यांतील अननसाच्या वांकापासून तयार केलेली एक पिशवी १८३६ त खरेदी केली होती. यावरून वांकाचा उपयोग येथील लोकांना माहित असल्याचें स्पष्ट सिद्ध होतें. १८८७ सालीं ईस्ट इंडियन असोसिएशन पुढें वेन्टन् साहेबांनीं आसामच्या भावी व्यापारासंबंधीं माहिती सांगतांना सिलहट्मध्यें अननस, वांक व फळांपासून मद्यार्क करितां येण्यासारखा आहे ह्या गोष्टीचा मुद्दाम उल्लेख केला. अलीकडे सर जे. बकिंगहॅमनीं पाठविलेला आसामांतील वांकाचा नमुना लंडनमधील इंपीरिअल इन्स्टिटयूट संस्थेकडे परीक्षेकरितां पाठविला होता. या परीक्षेंत हा वांक उत्तम तऱ्हेचा ठरून त्याची किंमत एका टनास सरासरी २० ते २५ पौंड येईल असें ठरलें.

इतर देशांपेक्षां येथें अननसापासून होणाऱ्या प्रत्येक उत्पन्नाकडे फार दुर्लक्ष केलें जातें; परंतु त्याचा योग्य उपयोग केल्यास पुष्कळ फायदा होण्यासारखा आहे. या फळांत औषधी गुणधर्म असून त्याचेपासून मद्यार्क व सिरका तयार करितां येण्यासारखा आहे.

औषधी गुणधर्मः—अननसाच्या पानांचा रस जंतविकारावर पाजितात. फळाचा रस दंतरोगावर देतात. पानांचा ताजा रस साखर घालून उचकीवर पाजितात. कच्च्या अननसाच्या रसानें गर्भपात होतो असें म्हणतात. कच्चा अननस खाल्ला तर स्तंभन पावलेला ऋतुस्राव चांगला होतो. फळांतल्या पांढऱ्या भागाचा रस साखर घालून पोटांत घेतला तर जुलाब होऊन जंत असतील तर पडून जातात. पक्व फळाचा रस काविळीवरहि उपयोगी पडतो असें म्हणतात. अननसांच्या पानांच्या तंतूंचें उंची कापड होतें. सिंगापूर, कालिफोर्निया वगैरे ठिकाणाहून पाकवलेले अननस डब्यांत भरून येतात. या धर्तीवर मलबार वगैरे हिंदुस्थानांतील ठिकाणीं हा धंदा मोठ्या प्रमाणावर निघण्यासारखा आहे.

**अनंतः**—(१) परमेश्वर नाम (२) एक कद्रुपुत्र. (३) कधीं हें नांव शेषासहि लावतात. (४) अनंतचतुर्दशीस पूजा करून हातांत बांधावयाचा चौदा गांठींचा रेशमी दोरा. यासारखाच दुसरा अनंती नांवाचा दोरा बायकांच्या डाव्या दंडाला बांधतात.

**अनंत व्रतः**—अनंतव्रत हें एक प्रमुख भारतीय व्रत असून ह्याचें पालन दरवर्षी भाद्रपद महिन्यांतील शुद्ध चतुर्दशीस करावयाचें ठरलेलें असतें. प्रत्येक कुटुंबांत हें व्रत चालत नसून दुसऱ्या कोणीं हें व्रत करावयास सांगितल्यास, किंवा अनंतदोरक कोठें सहजगत्या सांपडल्यास अगर हें व्रत वंशक्रमागत असल्यासच करावें लागतें. अनंत हें शेषशाई नारायणाचें अगम्य स्वरूप असून त्याची कल्पना सर्परूपांत दर्शविली जाते.

ह्या अनंतव्रतांतील पूजेकरितां लागणारी अनंतशेषाची प्रतिमा दर्भांची करावी लागते, व चौदा प्रकारचीं फलपुष्पें ह्या पूजेस लागतात, त्याचप्रमाणें नैवेद्यास देखील निरनिराळीं चौदा पक्वान्नें लागतात. भाद्रपद शुद्ध चतुर्दशीचे दिवशीं कुटुंबांतील यजमानानें दिवसभर शुचिर्भूत राहून उपवास करून संध्याकाळीं पत्नीसह अनंतपूजा करावयाची असते, व त्या दिवशीं प्रसादाकरितां भोजनास शक्त्यनुसार आप्तेष्ट बोलाविण्याचीहि चाल आहे.

वरील दर्भांच्या अनंतमूर्तीबरोबरच बाजारांतून रेशमाचा व जरीनें सर्पाकृति केलेला असा अनंतदोरक आणवून त्याचीहि पूजा करावी लागते व पूजेनंतर हा दोरक पुढील वर्षापर्यंत,

निदान कांहीं विशिष्ट कालमर्यादेपर्यंत हातांत बांधावा लागतो. अनंतव्रतपालनानें अनंत कल्याणाची प्राप्ति होऊन आपलें नष्ट ऐश्वर्य, संपत्ति किंवा राज्यें मिळतात असा समज आहे.

पांडव कष्टप्रद असा वनवास बारा वर्षे भोगीत असतां त्यांनीं एकदां श्रीकृष्णास आपल्या नष्टैश्वर्याच्या पुनःप्राप्तीचा उपाय विचारला, त्या वेळीं श्रीकृष्णानें त्यांना अनंतव्रत करण्यास सांगितलें व ह्या व्रताचा प्रभाव दाखविणारी कथा सांगितली.

कृतयुगामध्यें सुमंतु नामक वसिष्ठ गोत्री ब्राह्मणानें भृगुऋषीच्या दीक्षा नामक कन्येशीं विवाह केला, व तिजपासून त्यास सुशीला नामक पवित्र व उदारप्रकृति मुलगी झाली. पुढें कालांतरानें दीक्षा मृत झाल्यामुळें सुमंतूनें कर्कशा नामक एका अति दुष्ट व भांडखोर स्त्रीबरोबर विवाह केला. पुढें सुशीला उपवर झाली व तिच्या विवाहाबद्दल पित्यास काळजी वाटूं लागली. एकदां " कौंडिण्य " नामक ऋषि सुमंतूच्या घरीं आला, त्यावेळीं हा आपल्या मुलीस योग्य वर आहे असें जाणून सुशीलेचा विचार घेऊन वरनिश्चय केला. लग्नसोहळा योग्य रीतीनें पार पडला, व वधुवरें सुमंतूच्या घरीं दोन महिने राहिलीं. पुढें जाण्याची वेळ जवळ आली, त्यावेळीं सुमंतूस सुशीला व कौंडिण्य यांचा वियोग सहन न होऊन, त्याचप्रमाणें आपल्या दुष्ट पत्नीचा भांडखोर स्वभाव पाहून फार वाईट वाटलें. कौंडिण्यानें दोन तपस्व्यांनीं फार दिवस एका ठिकाणीं राहूं नये असें सुमंतूचें सांत्वन करून तेरा दिवस जास्त मुक्काम केला.

पुढें चौदाव्या दिवशीं जामात जावयाच्या वेळीं सुमंतूनें आपल्या कर्कशा स्त्रीस मेजवानीची तयारी करण्यास सांगितलें. परंतु त्या खाष्ट स्त्रीनें घर बंद केलें. कौंडिण्य व सुशीला यांनीं सुमंतूची रजा घेऊन रथांतून प्रयाण केलें. मार्गांत नदीकांठीं कांहीं सुवासिनी स्त्रिया उत्तमोत्तम वस्त्रालंकार धारण करून अनंतचतुर्दशीव्रत करीत असतांना पाहून सुशीला ही त्या व्रतांत सामील झाली. कौंडिण्य ऋषीनें आपलें नित्य अनुष्ठान संपवून दोघांनीं रथांत बसून पुढील मार्ग धरला, व सरतेशेवटीं ते अमरावती नगरी जवळ येऊन पोहोंचतात, तोंच तेथील नागरिकांनीं त्यांचें आदरातिथ्य करून त्यास आपला राजा केलें व अशा रितीनें अनंतव्रताचा प्रभाव त्यांनां तत्काळ कळून आला.

एके दिवशीं सुशीलेच्या हातांत बांधलेला अनंतदोरक पाहून, कौंडिण्यास जिज्ञासा उत्पन्न झाली. तेव्हां सुशीलेचें बोलणें त्यास खरें न वाटून व कांहीं तरी जादूटोणा आहे असें वाटून त्यानें रागानें तो अनंत तोडून टाकला, व सुशीलेच्या विनवणीस न जुमानतां तो दोरा अग्नींत टाकला. सुशीलेस अत्यंत वाईट वाटून तिनें लागलीच अग्नींतून तो अनंत बाहेर काढून त्याचें पूजन केलें.

ह्या प्रकारच्या वर्तनामुळें कौंडिण्यास दारिद्र्य आलें, व आपलें राज्य, संपत्ति वगैरे सर्व त्यानें गमाविलीं. आपल्या मूर्खपणाचा पश्चात्ताप होऊन त्यानें मूर्तिमंत लक्ष्मीनारायणाचें दर्शन होईपर्यंत अन्नपाणी न घेण्याचा निश्चय केला. अशा रीतीनें ह्या दोघां पतिपत्नींनीं अनंताचा शोध लाविला व त्याचें पूजन केल्यावर पूर्वीचें सर्व वैभव त्यांस पुनश्च प्राप्त झालें; अशी कथा आहे.

**अनंतः**—( १ ) यानें कात्यायन श्रौतसूत्रावर टीका लिहिली आहे. ' प्रतिज्ञापरिशिष्ट भाष्य ' हा ग्रंथ अनंतानें लिहिला. देवभद्र व याज्ञिकदेव यांनीं अनंताच्या ग्रंथांतून उतारे घेतले आहेत. अनंतानें वसुदेव, कर्क, पितृभूति, यशोगोमिन् व भर्तृयज्ञ यांच्या ग्रंथांतून उतारे घेतलेले आहेत. [ ऑफ्रेक्ट–कॅट. कॅट. पीटरसन–रिपोर्ट ४ ]

( २ ) अनंताच्या पित्याचें नांव हरि होतें याचा अनंतसुधारस या नांवाचा पंचांगगणित ग्रंथ आहे. शककाल १४४७ असावा. ग्रंथ सूर्यसिद्धांतानुसारि आहे. मुहूर्तमार्तंडकार नारायण याचा पिता अनंतच असावा. पण याबद्दल संशय आहे.

[ शं. बा. दीक्षित—भारतीय ज्योतिःशास्त्र ]

( ३ ) कामधेनु या नांवाचा ग्रंथ शके १२७९ मध्यें महादेव यानें लिहिला या कामधेनु ग्रंथावर अनंताची टीका आहे. जातकपद्धति या नांवाचा अनंताचा एक जातकग्रंथ आहे. याचें गोत्र गार्ग्य होतें. व राहण्याचें ठिकाण विदर्भ देशांत धर्मपुरी येथें होतें. पुढें अनंत काशीस राहत असे. अनंताचा बाप चिंतामणि फार विद्वान असून ज्योतिषीहि होता. मुलाचें नांव नीलकंठ होतें. नीलकंठाचा तोडरानंद म्हणून एक ग्रंथ आहे. ताजिकावरहि नीलकंठाचा ग्रंथ आहे त्यास ताजिक नीलकंठी म्हणतात. नीलकंठाचा मुलगा गोविंद नांवाचा होता. जाहांगीर बादशाहाचे दरबारांत गोविंदाची मानमान्यता विशेष होती. धर्मपुर हें त्यांचें वास्तव्यस्थान विदर्भ देशांत असून केव्हां केव्हां याला मातृपूर असेंहि म्हणतात. पीयूषधारा नांवाची टीका मुहूर्तचिंतामणीवर त्यानें केलेली होती. ताजिक नीलकंठीवर रखाला नांवाची टीका गोविंदचे नांवावर मोडतो.

अ नं ता चो वं शा व ळ.

चिंतामणि ( गार्ग्यगोत्रे )
|
अनंत ( पत्नी पद्मा )
|
नीलकंठ ( पत्नी चंद्रिका ) शके १५०१ — राम शके १५१२–२२
|
गोविंद ( पत्नी गोमती ) अ. श. १४५१
|
माधव श. १५५५

[ शं. बा. दीक्षित–भारतीय ज्योतिःशास्त्र ].

(४)–जयराम स्वामी वडगांवकर यांचे शिष्य दोन. एक अनंत व एक गोपाळ. गोपाळांचा समाधि शक १६१२. दोघांनीं मिळून काव्य केलें आहे. दुसरे एक अनंत (भट) समर्थ शिष्य हे सातार प्रांतीं मेथवड येथील (१५८०–१६४५). तिसरे रंगनाथ स्वामीचे शिष्यांपैकीं कोणी असावे. ग्रंथ—ब्रह्मस्तुति, माधवगुण, द्रौपदीस्वयंवर, रुक्मिणीस्वयंवर, गरुडगर्वपरिहार, रुद्रयामल. (सं. क. का. सू.)

(५)-गुरु समर्थ. ग्रंथ—रामचरित्र, बभ्रुवाहनाख्यान, सुधन्वाख्यान, सुलोचनाख्यान, सीतास्वयंवर, गोपीगीत, रामदासस्तुति, सुलोचनागहिंवर, लहुकुशाख्यान, श्रियाळचरित्र, सिंहध्वजाख्यान, गरुडगर्वपरिहार, गजगौरीव्रत, अहिल्योद्धार, अहिमहिआख्यान. [सं. क. का. सू.]

(६)-गुरु रंगनाथ. ग्रंथ—पदें. (सं. क. का. सू.)

(७)-ग्रंथ--गरुडाख्यान, निर्वाणषट्क, पाळणे, भूपाळ्या, लहुकुशाख्यान, चक्रव्यूह. (सं. क. का. सू.)

(८)–मंडनाचा मुलगा अनंत, यानें "कामसमूह" या नांवाचा ग्रंथ लिहिला. इ. स. १४५७.

(९)-अंतु-सोनार. ग्रंथ—कोल्हाटखेळ (सं. क. का. सू.)

**अनंतत्वः**—**शब्दार्थः**—अनंतत्वासंबंधाचा प्रश्न बराच भानगडीचा व कठिण आहे. अनंतत्व (Infinity) हा शब्द दोन अर्थांनीं वापरण्यांत येतो. पहिला अर्थ, अनंतत्व म्हणजे अंतरहित स्थिति हा होय; दुसरा अर्थ, अनंतत्व म्हणजे संपूर्णता किंवा अव्यंगता (perfectness). पहिल्या अर्थाचें उदाहरण म्हणजे मूलांकांची मालिका. जर आपण १, २, ३, ......याप्रमाणें मूलांक क्रमानें मांडीत गेलों तर हा क्रम अमुक ठिकाणीं संपतो असें म्हणतांच येत नाहीं. आपण कितीहि मोठी संख्या मांडली तरी तिच्यांत आणखी एक आंकडा वाढविणें शक्य असतेंच. म्हणून हा संख्याक्रम अनंत आहे म्हणजे याला अंतच नाहीं. उलट पक्षीं वर्तुळाचा जो परिघ असतो त्याला अनंत म्हणजे संपूर्ण (complete) असें म्हणतां येईल. अनंत या शब्दाचे हे अर्थ एकरूप नाहींत इतकेंच नव्हे तर कांहीं अंशीं ते परस्परविरोधी आहेत. तरीहि त्या दोन अर्थांत घोटाळा होण्याचा संभव आहे, ही गोष्ट पुढील गणितविषयक उदाहरणावरून सिद्ध होईल. १, $\frac{३}{२}$, $\frac{७}{४}$, $\frac{१५}{८}$:... हा संख्याक्रम अनंत म्हणजे अंतरहित आहे. यापैकीं प्रत्येक संख्या $\frac{२न-१}{न}$ अशा स्वरूपाची आहे व 'न' ची किंमत प्रत्येक वेळीं दुप्पट वाढत असते. या ठिकाणीं मूळ 'न' ची किंमत कितीहि मोठी धरली तरी तिची दुप्पट करणें नेहमीं शक्य आहे. परंतु या उदाहरणांत 'न'ची किंमत जेव्हां पुष्कळ मोठी असते तेव्हां $\frac{२न-१}{न}$ या संख्येची किंमत $\frac{२न}{न}$ यापेक्षां फारच थोडी कमी असते. म्हणून असें म्हणतां येईल कीं, या संख्याक्रमाची अखेर अखेर किंमत २ या संख्येइतकी जवळजवळ होत जाते. हीच गोष्ट कधीं कधीं निराळ्या शब्दांत अशी सांगतां येते कीं, जेव्हां न ची किंमत अनंत असते तेव्हां वरील संख्येची किंमत २ असते. म्हणून हा संख्याक्रम अनंतापर्यंत वाढविला तर तो संपूर्णतेप्रत पावतो. हाच अर्थ झेनोनें सुचविलेल्या दुसऱ्या एका कोड्यावरून स्पष्ट होतो. एखादा पदार्थ (अ–ड–क--ब) अपासून ब कडे जात आहे असें मानल्यास प्रथम तो अक हें निम्मे अंतर प्रथम संपवील हें उघड आहे, व त्याकरितां अकच्या निम्मे अंतर अड हें तो पदार्थ त्याहून आधीं संपवील. याप्रमाणें अनंत वेळां कल्पना करतां येईल; म्हणजे या उदाहरणासंबंधानें असें म्हणतां येईल कीं, अब एवढें अंतर प्रवास करण्यांत अनंत संख्याक्रम पूर्ण होतो. अशा उदाहरणांत अंतरहितता आणि संपूर्णता ह्या दोन परस्परविरोधी अशा गोष्टी एकत्र आल्यासारख्या दिसतात.

पारमार्थिक विषयांतील उदाहरण घेऊन हाच अर्थ व्यक्त करतां येतो. कालदृष्ट्या अस्तित्व व कार्यकर्तृत्व या बाबतींत ईश्वर हा अनंत आहे म्हणजे त्याच्या अस्तित्वाला आणि कार्यकर्तृत्वाला मर्यादा नाहीं. म्हणूनच ईश्वराला अनंत व सर्व शक्तिमान् हीं विशेषणें लावतात. उलटपक्षीं ईश्वर शहाणा व चांगला आहे असें आपण म्हणतों तेव्हां त्याच्या शहाणपणाला व चांगुलपणाला मर्यादा नाहीं, तो पूर्णपणें शहाणा व चांगला आहे असा अर्थ असतो. ईश्वर अमर्याद शहाणा आहे म्हणजे विशिष्ट बाबतींत तो जितका शहाणा दिसतो त्याहून तो अधिक शहाणा आहे असा तुलनात्मक अर्थ दर्शविण्याचा बोलणाराचा उद्देश नसतो. तात्पर्य ईश्वरामध्यें कालदृष्ट्या अनंतत्व व ज्ञानदृष्ट्या संपूर्णत्व ह्या दोन्ही कल्पना एकत्र वास करीत असतात.

थोडक्या विचारानें हें दिसून येईल कीं, संख्येनें मोजण्यासारखे ज्यांचे भाग पडतात त्यांनाच अनंतत्व ही कल्पना लागू शकेल. परंतु केवळ गुणवाचक अशा चांगुलपणा, शहाणपणा, सौंदर्य, अशा शब्दांना अनंत, अमर्याद असें विशेषण लावणें शक्य नाहीं. अशा बाबतींत अनंतत्व याचा अर्थ संपूर्णता, अव्यंगता असाच घेतला पाहिजे. परंतु "अनंतकल्याण" वगैरे शब्दांत 'अनंत' ह्याचा पूर्णतादर्शक अर्थानें उपयोग करण्याचा प्रघात पडला आहे. आणि ज्या अर्थीं 'अनंत' ह्याचा मूळ अर्थ 'अंतरहित' असा आहे, व ज्या अर्थी हाच शब्द पूर्णतादर्शक अर्थानें योजिला जातो त्याअर्थी ह्या दोन्ही अर्थांचा विचार केला पाहिजे.

**अनंतकल्पनेचा इतिहासः**—या कल्पनेचा पश्चिमेकडे मूळ उगम, सर्व विश्व हें एका अमर्याद द्रव्याचें बनलेलें आहे ह्या अत्यंत प्राचीन अशा ग्रीक विचारांत आढळून येतो. वस्तुतः ही कल्पना 'अनंतत्वा'संबंधीं नसून 'अमर्यादत्वा'ची द्योतक आहे, परंतु अमर्यादत्वाच्या कल्पनेपासून अनंतत्वाच्या कल्पनेचा उद्भव साहजिक आहे, व पायथागोरिअन् ग्रीक विचारपद्धतींत असा प्रकार झालेला स्पष्ट आढळून येतो. यानंतर 'एलिअटिक्' (Eleatics) विचारपद्धतींत ह्या अनंतत्वाच्या

कल्पनेचा पुष्कळ विकास झालेला दिसतो. ह्या पंथ परमाणुवादी असून ह्याची अशी कल्पना आहे कीं हें अंतराल अनंत असून त्यामध्यें अनंतसंख्याक परमाणू संचार करतात. परंतु ह्या नंतरच्या ग्रीक विचारांत म्हणजे सॉक्रेटिस व त्याचा पंथ ह्यांची भरभराट असतांना अंतरहितत्वाची कल्पना कमी महत्त्वाची होऊन त्या जागीं पूर्णत्वाच्या कल्पनेस महत्त्व चढूं लागलेलें आढळतें.

यूरोपीय विचारामध्यें अंतरहितत्व व पूर्णत्व यांच्या कल्पना कशा प्रादुर्भूत झाल्या ह्याची माहिती वरीलप्रमाणें थोडक्यांत आहे. परंतु ह्या दोन्ही कल्पनांचा एक मिलाफ करण्याचें कार्य कार्टेजिअन् विचारपरंपरेंतील लोकांनीं केलें. ह्या परंपरेंतील मूलभूत सिद्धांत असा आहे कीं, कांहींतरी अत्यंत पूर्णतत्त्व अस्तित्वांत आहे असें मानलेंच पाहिजे. ह्या कार्टेजिअन् मताप्रमाणें अंतराल हें एक अनंत असें पूर्णतत्त्व असून इतरहि सत्स्वरुप द्रव्यें अशाच प्रकारचीं आहेत. स्पिनोझा यानें आपल्या तत्त्वज्ञानांत वरील सिद्धांताचीच तार्किक दृष्टया उपपत्ति लावून दाखविली आहे. ह्यानंतर लिबनिट्झ ( Leibnitz ) यानें 'प्लेटो'च्या चांगुलपणाच्या कल्पनेचा पुनरुद्धार करून झेनोच्या कालापासून जे सिद्धांत त्याज्य म्हणून समजले जात त्यांस महत्त्व आणलें.

अनंतपटीनें मोठेपणा व अनंतअंशानें बारीकपणा ह्या दोन कल्पनांमधील अडचणी प्रसिद्ध तत्त्वज्ञ कांट यानें उत्तम प्रकारें मांडल्या आहेत. ह्यामध्यें अत्यंत महत्त्वाचा मुद्दा हा आहे कीं, अनंतपट विस्तार व अनंत अंशानें विभागणी ह्या दोन्ही कल्पनांमध्यें परिपूर्ण अनंतत्वाची परस्परविरुद्ध कल्पना मान्य केल्याचा दोष पदरीं येतो. अगदीं अलीकडे अनंताच्या कल्पनेचा विचार जास्त गणितशास्त्रीय दृष्टीनें करण्यांत येऊं लागला आहे.

परीक्षणात्मक सारांशः—ह्यानंतर 'अनंत' या शब्दामधील परिपूर्णत्व व अमर्यादत्व, या दोन्ही कल्पना बाजूस टेवून, सांप्रत अनंतशब्दामध्यें कोणती विशिष्ट कल्पना आपणांस आढळून येते हें पाहिलें पाहिजे. गणितशास्त्रदृष्टया असें स्पष्ट दिसून येतें कीं, कांहीं विशिष्ट प्रकारच्या श्रेढी अनंत असतात. तेव्हां या कल्पनेसंबंधीं सूक्ष्म विचार करूं लागलें तर तीन प्रकारांनीं ह्याविरुद्ध बाजू मांडतां येईल ती येणेंप्रमाणें:-

( १ ) अशा प्रकारचे गणितशास्त्रीय निर्णय नेहमींच भावनाविषयक ( subjective ) असल्यामुळें त्यांस वस्तुविषयक महत्त्व ( objective significance) कांहींच रहात नाहीं.

( २ ) हे निर्णय अस्तित्वांत असलेल्या गोष्टींचे कांहीं विशिष्ट गुणधर्म दर्शवितात.

( ३ ) हे निर्णय म्हणजे कांहीं वस्तुविषयक वैशिष्टय ( objective significance ) असलेल्या गृहीतगोष्टी असून खरोखरीच्या अस्तित्वांत असलेल्या उदाहरणांना लागू पडणारे नाहींत.

ह्या वरील तीन मुद्दयांचा थोडक्यांत विचार केला तर असें दिसून येईल कीं ह्या मुद्दयांत कांहीं तरी दोष आहेत. ह्यांपैकीं पहिला मुद्दा, बर्क्ले, ह्यूम इत्यादिकांच्या अंतःसृष्टिविषयक कल्पनावादाशीं ( Subjective idealist ) जुळता असून, फ्रीगे ( Frege ) वगैरेनीं ह्याचें उत्तम खंडन केलें आहे. दुसऱ्या मुद्दयाचा विचार करतां असें दिसतें कीं, संभवनीय गोष्टी व खरी वस्तुस्थिति ह्या दोहींमधील फरक ह्यांचा वरील मुद्दयांत विसर पडलेला दिसतो. तिसऱ्या मुद्दयाविषयीं एवढेंच म्हणतां येईल कीं, कोणतीहि गृहीतगोष्ट थोड्याबहुत प्रमाणांत ( objective ) बाह्यसृष्टिविषयक स्वरूपाची असते. उदाहरणार्थ बाह्यसृष्टींत कधींहि अस्तित्वांत नसलेल्या अश्वदेहधारी व मानवमुखी किन्नर नामक प्राण्याच्या कल्पनेचें मूळ अश्व व मनुष्य यांच्या कांहीं गुणधर्मांचें विशिष्ट संमिश्रण करून केलेल्या कल्पनेंत सांपडेल. त्याचप्रमाणें प्रत्येक कल्पना तंतोतंत बाह्यसृष्टींत अस्तित्वांत असलेल्या गोष्टींशीं लागू पडणारच नाहीं असा नियम नाहीं. उदाहरणार्थ कोणतीहि संख्या विभाज्य असते व ही विभागपद्धति कित्येक वस्तूंच्या बाबतींत लागू करतां येते. एका मेंढयांच्या कळपाचे बरोबर सारखे दोन भाग पाडतां येतील व ह्या भागांचे पुनः दोन पोटभाग पाडतां येतील, परंतु ह्या नंतरची त्यांची सारखी विभागणी करावयाची म्हणजे कांहीं मेंढयांचा नाश केला पाहिजे. परंतु ह्या पोटविभागाच्या कल्पनेलाहि कांहीं सत्यार्थ आहे, कारण ही पोटविभागणीची कल्पना मेंढयांच्या बाबतींत जरी प्रत्यक्षपणें जुळती नसली तरी मेंढयांची किंमत वगैरे सारख्या अप्रत्यक्ष बाबींत जुळणारी आहे. ह्याचप्रमाणें अनंत अशा संख्येच्या कल्पनेंत गणितशास्त्रदृष्टया खरें महत्त्व आहे, परंतु प्रत्यक्ष सृष्टींतील कोणत्या पदार्थास वरील कल्पना लागू करतां येईल हा एक प्रश्न आहे.

अनंत विस्तारः—अनंतविस्ताराची कल्पना अवकाशांतील ( space ) वस्तू, कालातील घडामोडी, व अस्तित्वांत असलेल्या वस्तू ज्यावर अवलंबून आहेत अशा परिस्थिति परंपरा ( series of conditions ) ह्यांना लागू पडते असा सामान्य समज आहे. औपचारिक रीत्या म्हटलें तर अशा परंपरांपैकीं कोणत्या तरी एका विशिष्ट स्थानीं थांबण्यास कांहींच कारण नाहीं, कारण ह्या परंपरा कितीहि लांबपर्यंत आपण वाढवल्या तरी त्यापेक्षां लांब अशीं स्थानें आहेतच. परंतु ह्यावरून अशा प्रकारच्या बऱ्याच गोष्टी अस्तित्वांत आहेत असें म्हणतां येत नाहीं. उदाहरणार्थ, आपल्या वर्णमालिकेमध्यें आ वर्ण अ वर्णामागून व इ वर्णापूर्वी येतो, परंतु अ वर्णापूर्वी कोणतेंच अक्षर नाहीं. तेव्हां या ठिकाणीं केलेली ही मर्यादा मनुष्यानें घालून दिलेल्या रुढीवर अवलंबून आहे. ह्याचे उलट करडा रंग पांढऱ्यापेक्षां काळसर परंतु गर्द

काळ्या रंगापेक्षां फिका आहे, ह्या रंगपरंपरेंतील दोन्ही टोंकें वरील वर्णमालिकेच्या टोंकाप्रमाणें रुढीकृत नसून निसर्गनियमित आहेत. तेव्हां ह्याप्रमाणेंच अशी एखादी घटना असेल काय, कीं जिच्या पूर्वी दुसरी गोष्ट घडली नसेल, किंवा अशी एखादी तारका असेल काय कीं जिच्या पश्चिमेकडे दुसरी कोणतीहि तारका नसेल? अशा प्रकारचे अंतबिंदू कल्पनेनें पाहण्यामध्यें बऱ्याच अडचणी आहेत. ल्युक्रेशिअस् यानें अशा प्रकारच्या बऱ्याच अडचणी स्पष्टपणें दाखविल्या आहेत. तो म्हणतो कीं समजा, एखादा मनुष्य त्या बाह्य विश्वाच्या अगदीं कडेच्या टोंकावर उभा राहिला व एखादा बाण मारूं लागला तर त्याला अडथळा कोण करणार! ह्याला उत्तर इतकेंच कीं जरी ह्या अफाट अंतरालांत तशा प्रकारची प्रतिबंधक कांहीं वस्तु नाहीं तरी विश्वाच्या अगदीं कडेच्या टोंकावर जाणें व तेथून बाण मारणेंच त्यास शारिरीक दृष्टीनें अशक्य होण्याचा संभव आहे. त्याचप्रमाणें अंतरालाच्या स्वरूपांत त्यास अडथळा करण्याचें साधन नसलें तरी एकंदर विश्वाच्या घटनेंतच अशी प्रतिबंधक परिस्थिति असेल. प्रसिद्ध तत्त्ववेत्ता कांट् यानें कालाच्या बाबतींत ह्यापेक्षांहि जास्त विचारणीय अडचण दाखविली आहे. कालामधील अस्तित्वास मर्यादा असल्याबद्दलच्या कल्पना ह्याच सर्वांत जास्त भानगडीच्या आहेत.

अ नं त वि भा ग णीः—अनंत विस्ताराच्या कल्पनेविरुद्ध असलेल्या आक्षेपापेक्षां अनंत विभागाच्या कल्पनेविरुद्ध जास्त स्पष्ट आक्षेप निघतात. अंतरहित परंपरेच्या पूर्णत्वाची अडचण ह्या अनंत विभागाच्या कल्पनेमध्यें अनुस्यूत आहेच पण ह्याशिवाय दुसरी अडचण म्हणजे ह्यामध्यें असलेली मर्यादाकल्पना होय. जेव्हां आपण एखाद्या वस्तूचे अनंत विभाग पाडल्याची कल्पना करतों त्यावेळीं तो प्रत्येक भाग अनंत अंशानें सूक्ष्म असतो अशी कल्पना करावी लागते. आणि म्हणूनच कांट् म्हणत असे कीं अनंत विभागाची कल्पना करतांना एखादी परंपरा नुसती अनियमितपणें अंतरहित मानून उपयोगी नाहीं तर पूर्णपणें सर्व बाजूंनीं अनंत मानली पाहिजे. परंतु ह्या कांटच्या म्हणण्यांत असा दोष आहे कीं, तो तें विभाज्य द्रव्य एकच रूपाचें आहे असें गृहीत धरतो. आणि जर एखादा पदार्थ एकाच स्वरूपाचा असला तर तो सारख्या रीतीनें विभाज्य आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं, परंतु तो पदार्थ सर्व बाजूंनीं सारख्याच स्वरूपाचा असतो किंवा नाहीं हाच प्रश्न आहे. उदाहरणार्थ अत्यंत तीव्र उष्णता लहान लहान अशा अनेक उष्णतांची बनलेली दिसत नाहीं, किंवा एखादी तीव्रता ( Intensity ) व त्याच्या लागलीच खालच्या दर्जाची तीव्रता यांमधील भेद, दुसरी एखादी तीव्रता व तिच्या खालच्या दर्जाची तीव्रता यांमधील भेदाइतकाच सारखा असतो असें म्हणणेंहि युक्त होणार नाहीं. त्याचप्रमाणें निळा व हिरवा रंग यांमधील अंतर हिरवा व पिवळा रंग यांमधील अंतरासमान आहे असेंहि म्हणतां येणार नाहीं. या उदाहरणांत दिलेल्या द्रव्यांत समानधर्मी अथवा समान मूलमानाधार ( Homogenous units ) अंशांची अनंत परंपरा असल्याचें मानण्यास आपणांस कांहींच आधार नाहीं. त्याचप्रमाणें निरनिराळ्या ओळखतां येण्यासारखा गुणधर्मांचींच उदाहरणें आपण घेतलीं तर हें निःसंशय समजावें कीं ही संख्या मर्यादित आहे. हे दृश्य पदार्थ अनंत अशा सारख्या अंशांत विभाज्य आहेत ही समजूत आधिभौतिक शास्त्रांच्या सांप्रतच्या विकासावरुन चुकीची ठरूं पहात आहे.

अ नं त गु णः—गुणधर्मांच्या अनंतत्वाची कल्पना ईश्वर कल्पनेमध्यें आपल्याकडे वारंवार उपयोगांत आणली जाते. ही अनंतत्वाची कल्पना मुख्यतः ज्ञान, शक्ति, व दयाळुत्व ह्या तीन गुणांस नेहमीं लावण्यांत येते. ह्यापैकीं अनंतत्वाचा अर्थ अमर्यादपणा असा घेतला तर अनंत ज्ञान याचा अर्थ वस्तूंच्या अनंतसंख्येचें ज्ञान असा होईल. आतां ज्याअर्थी संख्यांची घटना एकाच तत्त्वावर झालेली आहे त्याअर्थी एखाद्या हुषार गणितशास्त्रज्ञास अनंत संख्यांची कल्पना करणें अशक्य नाहीं, परंतु असें जरी आहे तरी ह्या संख्यांमध्यें असतील नसतील ते सर्व परस्परसंबंध यांचेंहि त्यास ज्ञान होईल असें म्हणतां येणार नाहीं, ह्या दृष्टीनें अनंतज्ञानाची कल्पना कांहींशी समजण्यासारखी आहे.

परंतु अनंतशक्तीची कल्पना मात्र, अनंत याचा अर्थ अंतरहित असा केला तर, समजण्यास वरीच अवघड आहे. कांहीं ग्रंथकारांनीं या अनंतशक्तीच्या कल्पनेची उपपत्ति लावण्याचा प्रयत्न केला परंतु ह्या योगानें त्यांनीं काढलेलीं अनुमानें अगदींच मूर्खपणाचीं ठरलीं. ह्या अनंतशक्तीचा अर्थ जे. एम्. इ. मॅक्टॅगर्ट याच्या मताप्रमाणें कोणत्याहि गोष्टीपासून त्याच्याविरुद्ध गोष्ट म्हणजे काळ्या रंगाचा पांढरा, चांगल्याचें वाईट, अनंताचें सांत, २+२=५ किंवा १०० करणें अशासारख्या गोष्टी घडवून आणणें हा होय. परंतु अशा प्रकारांची अनंत शक्ति असलेल्या ईश्वराच्या अंगीं अगदींच शक्ति नसण्याचाहि संभव आहे. परंतु अनंत शक्ति याचा कोणतीहि निवड केलेली वस्तु प्राप्त करून घेण्याचा संभव असणें, असा अर्थ करणें मात्र शक्य आहे. कारण निवड करतांना अशक्य किंवा वाईट गोष्टी वगळल्या जातात. अशा निवडक गोष्टी अनंत असणें शक्य असल्यामुळें, अनंत शक्ति याचा अर्थ अंतरहित शक्ति असा करण्यास हरकत नाहीं.

अनंतकल्याण याचाहि अर्थ अनंतशक्ति ह्याच्या अर्थाप्रमाणें करणें शक्य आहे, व ह्या दृष्टीनें पाहतां अनंतकल्याण म्हणजे संपूर्ण हित असा गुणवाचक अर्थ घ्यावा. अनंतत्वाच्या कल्पनेतील या वर सांगितलेल्या अडचणीमुळेंच कांहीं लोकांनीं "मर्यादित ईश्वरा"ची कल्पना काढली.

अ नं त वि श्व (cosmos ):—एका दृष्टीनें विश्वामध्यें अनंतत्वाचा समावेश होतो कारण त्यामध्यें संख्येचा समावेश होतो व संख्या ही अनंत आहे. यावरून मात्र असें म्हणतां

येणार नाहीं कीं विश्वामध्यें अनंत अस्तित्वें ( Existences ) असतात. आतां कल्पना करण्यास योग्य ह्या दृष्टीनें खऱ्या असणें एवढाच अस्तित्व ह्याचा अर्थ घेतला तर ह्या विश्वांत अनंतत्व भरून राहिलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. परंतु स्वतः विश्व हेंच अनंत असें म्हणतां येत नाहीं. सर्वव्यापि व पूर्ण या दृष्टीनें मात्र तें अनंत आहे असें म्हणतां येईल.

**अनंतदेवः**—( १ ) हा भास्कराचार्यांच्या वंशांतला होय. यानें ब्रह्मगुप्ताच्या सिद्धांतांतील २० व्या अध्यायावर आणि बृहज्जातकावर टीका केली आहे. याचा शककाल ११४४ होय. ( शं. बा. दीक्षित—भारतीय ज्योतिःशास्त्र. )

( २ )—कृष्णभक्तिचंद्रिका नाटकाचा कर्ता. याचे बापाचें नांव आपदेव होतें. अनंतदेव हा बाजबहादूर चंद्राचा आश्रित होता. त्याचा पिता आपदेव हा एका पूर्वकालीन अनन्तदेवाचा पुत्र व एका पूर्वकालीन आपदेवाचा नातू होता. ( ऑफ्रेक्ट–कॅट. कॅट. पीटरसन–रिपोर्ट ४).

**अनंतपदः**—शतपद अथवा गोम व वाणी वगैरे प्राणी अनंतपद ( Myriopoda ) संघ-संधीपाद, या वर्गांत येत असून यांच्यांत व कीटक वर्गांत पुष्कळ साम्य दिसून येतें. विशेषतः वायुनलिकांच्या योगानेंच यांच्यांतील श्वसनक्रिया चालते. यांचें पुष्कळ संधि असलेलें शृंग, नेत्रयुगुल व दोन अथवा तीन दंष्ट्रा इत्यादिकांनीं युक्त असें शीर्ष हीं अगदीं सहज ओळखतां येण्याजोगीं असतात. कबंधाचे प्रदेश ओळखूं येत नाहींत. तरी तो भाग पुष्कळ वलयांनीं युक्त असा असतो. त्याच्या प्रत्येक वलयाला एक अगर दोन अशा पायांच्या जोड्या लागलेल्या असतात.

कवचधारी व कीटकवर्ग या वर्गांशीं तुलना करितां या वर्गांत प्राणी पुष्कळ कमी आहेत. या वर्गांतील प्राण्यांचे दोन गण पडतात—पहिला गण शतपदांचा (centipodas) असून दुसरा युगुल पदाचा ( diplopoda ) होय. कांहीं शास्त्रज्ञांच्या मतें "सीम् फायला" चतुर्विंशतिपद (symphyla) व पॅरोपोडा ( Pouropoda ) असे याचे आणखी दोन गण आहेत. स्कोलोपेन्ड्रा (scolopendra) अथवा गोमेसारणा विषयुक्त अनंतपद प्राणी हा याचें उदाहरण होय.

**गोमः**—गोम बहुतेक सर्वांनां माहीत असतेच. यांचा वर्ण काळसर तांबडा असून उन्हाळ्यांत या पुष्कळ सांपडतात. माळावर दगडाखालीं तर या बहुतकरून असतातच. जमीन उकरतांनाहि या आढळतात. या फार चपळ असतात. हिंवाळ्यांत या स्वतःला पुरून घेतात. नर अंडीं खातो म्हणून मादी अंडीं नेहमीं जमीनींत झांकून ठेविते.

एखादी गोम जर आपण घेऊन नीटपणें पाहूं लागलों तर तिला प्रथम शीर्ष असून त्यानंतर कबंधाला प्रथम अगदीं लहान वलय असलेलें आढळून येईल. याच्यानंतर कबंधाचीं पंधरा, बावीस वगैरे निरनिराळीं वलयें आढळतात. पुणें, जेजुरी वगैरे प्रांतांत या गोमा फार मोठमोठाल्या आढळून येतात. पुष्कळ वेळां एका वलयाच्या पृष्ठार्धावर पिवळा तर दुसऱ्याच्या पृष्ठार्धावर काळा असे एक टाकून एक पट्टे असतात. शीर्षावर लांब लांब शृंगें असतात. या शृंगांच्या पायथ्यांशींच नेत्र असतात. गोम उलटी करून पाहिली असतां तिच्या तोंडाच्या भागांत मुखद्वाराकडे वळलेली वळकट दंष्ट्रांप्रमाणें असलेली एक अवयवांची जोडी दिसून येते. ही विषदंष्ट्रांची जोडी असून ती खरोखर पाहिलें असतां प्रथमचरणांची जोडी होय. या दंष्ट्रेचें टोंक खुपसलें असतां वीष आंत टाकलें जातें व भक्ष्य मरतो. चिमट्यांनीं जर ही दंष्ट्रा बाजूस काढली तर आंत द्वितीय पार्श्वोष्ठांची जोडी आढळते. हे पार्श्वोष्ठ जरी साधारण पायासारखे दिसत असले तरी त्यांच्यांत थोडा फेरफार झालेला असतो. यांच्याच पुढें प्रथमपार्श्वोष्ठांची जोडी असते व त्यांच्यापुढें खरी दंष्ट्रांची लहान जोडी असते. कबंधाच्या प्रत्येक वलयाला पाठीमागें एक चरणांची जोडी असते.

छेदनक्रियेनंतर आंत पुष्कळशा वातनलिका आढळून येतात. शरीराच्या प्रत्येक अंतर्भागाला प्रत्यक्षपणें प्राणवायु ह्या पुरवितात. यांच्याच योगेंकरून गोमेची श्वसनक्रिया चालते.

हृदय नलिकारूपानें असून ही नलिका पृष्ठभागीं लांबचेलांब असते. मूत्रमयमल बाहेर टाकण्याकरितां नलिकांचा एक समुदाय बनलेला असतो व त्या नलिका गुदाच्या जरा अलीकडेच त्यांत उघडतात. या महोत्सर्ग नलिकांना "माल्पिघी"च्या नलिका ( Malpighian tubes ) म्हणतात. यांची संख्या कमीजास्त असते.

पचनेंद्रियनलिका सरळ नळीच असून ती शरीराच्या पूर्व टोंकापासून पश्चिमटोंकापर्यंत असते. तिला दोन लालापिंड लागलेले असून ते मुखक्रोडांत उघडतात.

मेंदूवत शीर्षज्ञानकंद शीर्षाच्या भागांत असून त्यापासून दोन ज्ञानरज्जू निघून त्या अन्ननलिकेच्या दोहों बाजूंवरून शरीराच्या उदरतलावर जातात व उदरतलावर असलेल्या ज्ञानकंदाच्या सांखळीशीं संयोग पावतात. नर व मादी निरनिराळीं असतात. त्यांचीं जननेंद्रियस्रोतसें शेवटच्या वलयावर उघडतात.

वर वर्णिलेली गोम ही शतपद गणांत येते. या गणांतील प्राणी चपटे असून त्यांच्या शरीराच्या प्रत्येक वलयावर पायांची एकच जोडी असते. कबंधाच्या पहिल्या वलयावर एक विषदंष्ट्रेची जोडी असते.

**युगुलपादः**—या वर्गांतील दुसरा गण म्हणजे युगुलपाद ( Diplopoda ) हा होय. ह्या दुसऱ्या गणांतील प्राणी पहिल्या गणांतील प्राण्यांपेक्षां बरेच वाटोळे असतात. कबंधाच्या चौथ्या वलयापासून पुढें प्रत्येक वलयास पायांच्या दोन दोन जोड्या असतात. विषदंष्ट्रा या प्राण्यांत नसतात. जननेंद्रियांचीं स्रोतसें कबंधाच्या तिसऱ्या वलयावर उघडतात,

यांचीं शृंगें लहान असतात. यांना पार्श्वोष्ठांची एकच जोडी असते व खरी दंष्ट्रा असते. पहिल्या व दुसऱ्या कवंधाच्या वलयांना एकएकच पायांची जोडी असते. कवंधाच्या तिसऱ्या वलयाला पाय नसतात. पैसा अथवा वाणी हें या गणाचें उत्कृष्ट उदाहरण होय. आपल्याइंकडे पावसाळ्यांत या प्राण्यांचे थवेच्या थवे आढळतात. हे वनस्पतिभक्षक असून झाडांच्या मुळांना फार त्रास देतात. यांना स्पर्श केला असतां हे शरीर गुरफटून निपचीत पडतात. व शरीराच्या पृष्ठाधांतून घाणेरडा द्रवपदार्थ बाहेर टाकतात. **वि. ना. हाटे.**

**अनंतपुर जिल्हा**:—मद्रास इलाख्यांतील एक जिल्हा—उ. अ. १३° ४१' ते १५° १४' व पू. रे. ७६° ४९' ते ७८° ९'. क्षेत्रफळ ६७२२ चौरस मैल. उत्तरेस बल्लारी आणि कर्नूल हे जिल्हे; पश्चिमेस बल्लारी आणि म्हैसूरचें संस्थान; दक्षिणेस म्हैसूरचें संस्थान; आणि पूर्वेस कडाप्पा जिल्हा.

अनंतपुर जिल्हा हा म्हैसूर पठाराचा अगदीं उत्तरेकडील प्रदेश होय. दक्षिणेस हा भाग २२०० फूट उंचीवर असून उत्तरेच्या बाजूस गुत्तीकडे १००० फूट उंच आहे. पूर्वेकडील प्रदेश डोंगराळ असून ईशान्येकडील प्रदेश सपाट आहे. हा भाग व गुत्ती तालुक्याच्या पश्चिम दिशेकडील भाग वगळला असतां बाकीचा जिल्हा ओसाड, जंगलविरहित आहे. जमीन तांबुस रंगाची असून उंचसखल आहे. दक्षिणेकडे पेनकोंडा तालुका हा फारच डोंगराळ असून लागवड करण्यास अगदीं निकामी आहे; वर सांगितलेल्या सपाट भागांतील जमीन काळी असून कापसायोग्य आहे. मदकशीर तालुक्यांत पाण्याची सोय असल्यामुळें तो तालुका जास्त सुपीक आहे.

**भू स्त र**:—पेन्नार नदी या जिल्ह्यांतून वाहते. या जिल्ह्याचा उत्तरेकडील व पूर्वेकडील भागच फक्त भूस्तरसंशोधक खात्यानें तपासला आहे. या तालुक्यांत वज्रकरूरच्या आसपास भूपृष्ठावर केव्हां केव्हां हिरे सांपडतात. परंतु ते वरच कां सांपडावेत हें गूढ आहे. येथील निळया रंगाचा खडक किंवर्लें (आफ्रिका) येथील निळया मातीच्या रंगाप्रमाणें दिसतो परंतु दोघांची उत्पत्ति अगदीं निराळ्या पदार्थांपासून आहे असें स्पष्ट दाखविलें गेलें आहे. पुष्कळ खेड्यांत कुरुंद नांवाचा खनिज पदार्थ सांपडतो. मुलमररी व नेरिजमुपल्ली येथें चांगल्या प्रतीचा 'स्टीयटाइट' सांपडतो असें म्हणतात.

**व न स्प ति**—अगदीं ओसाड जमिनीवर ज्या उगवतील अशाच वनस्पति या भागांत दृष्टीस पडतात. निवडुंग, बाभूळ व तरवड हीं झाडें पुष्कळ उगवतात.

**व न्य प्रा णि**—कडापा जिल्ह्याच्या सरहद्दीवर रानडुकर, सांबर वगैरे प्राणी आढळतात.

**ह वा**—येथील हवा कोरडी असून निरोगी आहे. उन्हाळा मार्च महिन्यांत सुरू होऊन जून महिन्याच्या आरंभीं पावसाळा सुरू झाला म्हणजे नाहींसा होतो. या जिल्ह्यास दोन्ही पावसापैकीं कोणताहि पुरेसा पडत नाहीं. ईशान्य दिशेकडून येणारा पाऊस आक्टोबरमध्यें बरा पडतो पण पुढें मुळींच पडत नाहीं. असें म्हटलें तरी चालेल. पावसाची सर्व जिल्ह्याची सरासरी २३ इंच आहे. इ. स. १८५१ व १८८९ सालीं या भागांत मोठीं वादळें उद्भवलीं होतीं त्यामुळें त्यावेळीं फार नुकसान झालें होतें.

**इ ति हा स**—चवदाव्या शतकांत विजयानगरच्या राज्यांत सामील होण्यापूर्वीचा या भागाविषयींचा इतिहास उपलब्ध नाहीं. या जिल्ह्यांत असलेले पेनुकोंडा व गुत्ती हे दोन किल्ले विजयानगरच्या राज्यांतील फार महत्त्वाचे भाग होते. आणि जेव्हां इ. स. १५६५ सालीं दक्षिणेंतील मुसुलमानांविरुद्ध झालेल्या तालीकोटच्या लढाईत विजयानगरचा रामराजा मारला गेला त्यावेळीं नामधारी राजा सदाशिव हा आपल्या अनुयायांसहित पेनुकोंडा येथें पळून गेला. या ठिकाणीं विजयानगरचे राजे पुष्कळ दिवस रहात होते. या किल्ल्यानें पुष्कळ वेढ्यांस दाद दिली नाहीं. अखेरीस हा किल्ला मुसुलमानांनीं सर केला. परंतु मध्यंतरीं विजयानगरचा राजवंश उत्तर अर्काट मधील चंद्रगिरी येथें राहण्यास गेला होता. पुढें गुत्ती किल्लाहि मुसुलमानांनीं सर केला. हा किल्ला मुसुलमानांपासून मुरारराव यानें जिंकून घेऊन तेथें त्यानें आपलें राहण्याचें ठिकाण केलें होतें. त्या वेळेच्या धामधुमीच्या काळांत त्या भागांतील स्थानिक सत्ता तेथील पाळेगारांच्या हातांत असे. परंतु ज्या वरिष्ठ सत्तेचा विजय होत असे त्या सत्तेस या पाळेगारांना नमावें लागत असे. या पाळेगारांचें आपसांत वैमनस्य असल्यामुळें कोणांतच फारसा राम नसे. त्यांतल्या त्यांत अनंतपुरचे हंडे पाळेगार जरा वजनदार असत. हैदरअल्लीच्या हातांत सत्ता आल्याबरोबर त्यानें हा आपल्या राज्याजवळील मुलुख लवकरच काबीज केला. इ. स. १७७५ सालीं गुत्ती किल्ला मात्र हैदराविरुद्ध मुराररावानें लढविला होता. परंतु किल्ल्यांतील लोकांस पाणीपुरवठ्याच्या अभावीं शरण यावें लागलें.

इ. स. १७९२ सालीं ब्रिटिश, मराठे व निजाम यांनीं एकत्र होऊन टिपूचा पराभव केला. त्यावेळीं त्यानें जो भाग यांच्या स्वाधीन केला त्यांत अनंतपुरचा ईशान्येकडील भाग म्हणजे ताडपत्री आणि ताडीमरी तालुके निजामाच्या वांट्यास आले. पुढें इ. स. १७९९ सालीं श्रीरंगपट्टणच्या हल्लयांत टिपु मारला गेल्यावर त्यावेळीं जी वांटणी झाली त्यांत या जिल्ह्याचा बाकीचा भाग निजामाकडे आला. परंतु इ. स. १८०० सालीं आपल्या राज्यांत ब्रिटिश सैन्य जें ठेवावयाचें होतें त्याच्या खर्चाकरतां हा सर्व मुलुख त्यानें ब्रिटिशांस तोडून दिला. या मुलखाचे दोन जिल्हे बनविण्यांत आले; व हल्लींचा अनंतपुर जिल्हा पूर्वा बल्लारी जिल्ह्यांत मोडत असे. परंतु हा फार मोठा जिल्हा झाल्यामुळें एका कलेक्टरच्यानें काम झेंपेना. म्हणून इ. स. १८८२ सालीं त्या एका जिल्ह्याचे बल्लारी व अनंतपुर असे दोन जिल्हे करण्यांत आले.

या जिल्ह्यांत प्राचीन नांव घेण्यासारख्या गोष्टी म्हटल्या म्हणजे पेनुकोंडा व गुत्ती हे किल्ले होत. ताडपत्री येथील देवळांतील खोदकाम प्रेक्षणीय आहे. त्याचप्रमाणें लेपाक्षी व हेमावती येथील देवळें पाहण्यालायक असून या जिल्ह्यांत जे शिलालेख आहेत त्या सर्वांत हेमावती येथें जुने लेख सांपडले आहेत. त्यांत पल्लव राजांच्या एका शाखेची वंशावळ सांपडली आहे. नवपाषाणयुगांतील वस्तीचे अवशेष कांहीं टेंकड्यावर सांपडले आहेत व कांहीं इतर प्रागैतिहासिक लोकांनीं बांधलेलीं थडगीं इतस्ततः आढळतात.

या जिल्ह्याची लोकसंख्या कसकशी वाढत गेली हें पुढें दिलेल्या आंकड्यावरून कळून येईल.

| सन | लोकसंख्या |
|---|---|
| १८७१ | ७४१२५५ |
| १८८१ | ५९९८८९ |
| १८९१ | ७२७७२५ |
| १९०१ | ७८८२५४ |
| १९११ | ९६३२२३ |
| १९२१ | ९५५९१७ |

इ. स. १८७६ सालचा दुष्काळ या जिल्ह्यास बराच भोवला होता.

पुढील कोष्टकावरून एकंदर जिल्ह्याची स्थिति थोडक्यांत कळून येईल.

( १९२१ च्या खानेसुमारीवरून )

| तालुका | क्षेत्रफळ | संख्या | | लोकसंख्या १९२१ | दर चौरस मैलीं लोकसंख्येचें प्रमाण |
|---|---|---|---|---|---|
| | | गांवें | खेडीं | | |
| गुत्ती | ८९६ | ४ | १२८ | १३४३५५ | १५० |
| ताडपत्री | ६४१ | २ | ९५ | १११५५० | १७४ |
| अनंतपुर | ९२५ | १ | १०९ | १११८२५ | १२१ |
| कल्याणद्रुग | ८१७ | १ | ७३ | ८०१६४ | ९८ |
| पेनुकोंडा | ६७८ | २ | ९४ | ९२९१८ | १३७ |
| धर्मवरम | ७३२ | १ | ६२ | ८८६६८ | १२१ |
| मदकशीर | ४४३ | १ | ५७ | ८५५९५ | १९३ |
| हिंदुपुर | ४२८ | १ | ७८ | १००४९० | २३५ |
| कादिरि | ११६२ | १ | १३७ | १५०३५२ | १२९ |
| एकंदर | ६७२२ | १४ | ८३६ | ९५५९१७ | १४२ |

या जिल्ह्यांत अनंतपूर येथेंच फक्त म्युनसिपालिटी आहे. या जिल्ह्यांत जमीनदारी नाहीं तथापि शेंकडा सोळा एकर जमीन इनाम आहे. जमीन फार कमी प्रतीची आहे. मुख्य पिकें—ज्वारी, कोरा, नाचणी, एरंडी इत्यादि. गुरांची अवलाद हलकी असून मेंढयांची पैदास या भागांत फार होते. प्रत्येक मेंढीपासून दरवर्षी चार पौंडपर्यंत लोंकर निघते.

या जिल्ह्यांत जंगल ५१६ चौरस मैल आहे. जंगलांत थोडे फार सागवान व वांबु यांचीं रानें आहेत,

ख नि ज प दा र्थ——इमारती दगडाशिवाय कांहीं नाहींत असें म्हटलें तरी चालेल. वज्रकरूर येथील हिऱ्यांच्या खाणी हल्लीं बंद पडल्या आहेत. कुरुंद कधीं कधीं देशी पद्धतीनें काढण्यांत येतो.

व्या पा र व उ द्यो ग धं दे——मुख्य धंदा सुती व रेशमी वस्त्रें विणणें हा होय. येथून कापूस, गूळ, तरवडाच्या साली वगैरे बाहेर जातात. मद्रास व सदर्न मराठा रेलवे या जिल्ह्यांतून जाते.

दु ष्का ळ——अवर्षणामुळें या जिल्ह्यांत दुष्काळ पुष्कळवेळां पडलेला आहे. इ. स. १७०२-३ सालीं येथें दुष्काळ पडला होता असा दप्तरी पुरावा मिळतो. इ. स. १८०३, १८२४ या सालीं थोडाबहुत दुष्काळ जाणवला. इ. स. १८३२-३३ सालचा दुष्काळ सर्वांत भयंकर होता. इ. स. १८३८,१८४३,१८४४, १८४५,१८५४,१८६५,१८६६,१८७६-७८,१८८४,१८९१, १८९६ हीं सालें दुष्काळाचीं गेलीं. पैकीं १८७६-७८ च्या दुष्काळाच्या वेळीं तन्निवारणार्थ सुरू केलेल्या कामावर एकावेळीं १,३७,३४७ म्हणजे शेंकडा १८ लोक काम करीत होते.

विजयानगराच्या राज्याचे वेळीं जमीन वसूलीची काय पद्धत होती हें माहीत नाहीं. अर्धें उत्पन्न राजास देत असत अशी आख्याइका आहे. विजापुर बादशहांनीं कामिल ( कमाल ) कर म्हणून ठरविण्याचा प्रयत्न केला होता. शेतकऱ्यांकडून वसूल जमीनदार, पाळेगार किंवा पाटील करी. अवरंगझेबानें विजापुर बादशहाचीच पद्धति कायम ठेविली होती असें दिसतें. मराठ्यांच्या अमदानींत काय पद्धति होती हें समजण्यास मार्ग नाहीं. हैदरानें कायम धारा सुरू केला होता. टिपूनें तो वाढविण्याचा प्रयत्न केला होता पण तो सिद्धीस गेला नाहीं. इ. स. १७९२ सालीं निजामाकडे हा भाग आल्यावर एक मोठा दुष्काळ पडला त्यामुळें वसूल कमी होऊं लागला.

कंपनी सरकारकडे हा भाग आल्यावर मेजर ( सर थामस ) मनरो साहेबानें रयतवारी पद्धति सुरू केली. इ. स. १८०२ आणि १८०६ सालीं व्यवस्थेशीर पाहणी झाल्यावर धारा बसविण्यांत आला. पुढें इ. स. १८२० सालीं मनरोनें बसविलेला धारा कांहीं प्रमाणांत कमी करण्यांत आला. पुन्हां इ. स. १८५९ सालीं धारा कमी केला. इ. स. १८९०-९७ मध्यें पुन्हा पाहणी होऊन धाऱ्याची नवीन आकारणी झाली आहे.

खालील आंकडे हजाराचे आहेत.

| | १८९०-९१ | १९००-१ | १९०३-४ |
|---|---|---|---|
| जमीन महसूल | १००९ | ११३९ | ११९३ |
| एकंदर उत्पन्न | १६२४ | २१७४ | २१५० |

**अनंतपुर विभाग**——मद्रास इलाखा अनंतपुर जिल्ह्यांतील एक विभाग. यांत अनंतपुर आणि कल्याणद्रुग या तालुक्यांचा समावेश होतो.

**अनंतपुर तालुका**—मद्रास. अनंतपुर जिल्ह्यांतील तालुका उ. अ. १४° २४' ते १४° ५५' व पू. रे. ७७° १७' ते ७७° ५९'. क्षेत्रफळ ९२५ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें एक

लाख. यांत १०९ खेडीं आहेत. इ. स. १९०३–४ मध्यें एकंदर उत्पन्न १९०००० होतें. तालुका उंचसखल असून जमीन तांबडी व दगडाळ असून हलक्या प्रतीची आहे. म्हणून जंगल व झाडी या भागांत कमी असल्यामुळें प्रदेश ओसाड दिसतो. उत्तरेकडील जमीन थोडी काळी आहे. उत्तरेकडे आणि पूर्वेकडे अनुक्रमें पेन्नार आणि चित्रावती या नद्या आहेत परंतु त्यांचा शेतीला उपयोग होत नाहीं.

**अनंतपुर गांव**—जिल्ह्याचें, विभागाचें व तालुक्याचें मुख्य ठिकाण. उ. अ. १४° ४१', व पू. रे. ७७° ३७', सदर्न मराठा रेलवेच्या गुंटकल–बंगलोर शाखेवर हें स्टेशन आहे. लोकसंख्या (१९२१) ११४५२.

विजयानगर राजाचा दिवाण चिक्कण्णा उडियार यानें इ. स. १३६४ सालीं हा गांव वसविला. व त्यास आपली पत्नी 'अनंता' हिचें नांव दिलें. याच चिक्कण्णानें त्याच सुमारास अनंतपुर येथें असलेला मोठा तलाव बांधला. या तलावांत पंदामेरू नदी अडविली आहे. विजयानगरच्या राजापासून हनुमप्पा नायडुपैकीं हंडे घराण्यास या भागाची सनद सोळाव्या शतकांत मिळाली. या घराण्याकडे हा प्रदेश दोन शतकेंपर्यंत होता. इ. स. १७५७ सालीं गुत्तीचा संस्थानिक मुरारराव यानें या गांवास वेढा दिला होता. परंतु ५०००० रुपये मिळाल्यावर त्यानें वेढा उठविला. इ. स. १७७५ सालीं हैदरानें गुत्ती व बल्लारी जिंकून या भागांतून ६९००० रुपये उकळले. तेथील पाळेगारास या रकमेची भरपाई करतां न आल्यामुळें हैदरानें त्यास कैदेंत टाकलें व त्याचा प्रदेश आपले राज्यास जोडला. यापुढें त्या घराण्यानें डोकें वर काढलें नाहीं. वयोवृद्ध पाळेगार इ. स. १७८८ सालीं मरण पावला. यानंतर लवकरच टिपूनें या घराण्यांतील कोणीं याउपर त्यास त्रास देऊं नये म्हणून त्या घराण्यांतील सर्व पुरुषांस फांशी देण्याचा हुकूम केला; व त्या सर्वांस गांवाबाहेर फांशी देण्यांत आलें. त्या वृद्ध पाळेगाराचा तिसरा पुत्र श्रीरंगपट्टणास होता तो निसटला व कालहस्ती येथील राजाच्या आश्रयास जाऊन राहिला. इ. स. १७९९ सालीं तो परत अनंतपुरास आला पण तो निजामास लवकरच शरण आला. निजामानें त्यास सिद्दरामपुर गांव इनाम दिला. इ. स. १८०१ सालीं तो मरण पावल्यावर मुख्य शाखेची नक्कल झाली.

इ. स. १८६९ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ. स. १९०३-४ मध्यें उत्पन्न १७५०० व खर्च १६००० होता. अनंतपुर गांवाभोंवती बागाईत असल्यामुळें हवा रोगट आहे. यूरोपियन लोकांची वस्ती चांगल्या ठिकाणीं झाली आहे. पाऊस सरासरी इंच २०.२९. येथें चांगला डाक बंगला आहे. एक कॉलेज, तीन हायस्कुलें, सरकारी ट्रेनिंग शाळा, व इतर कांहीं शाळा आहेत. एक जिनिंगचा कारखाना आहे. धान्य, लोखंड व किरकोळ माल यांचा व्यापार चालतो. मुख्य पोलिस कचेरी, मॅजिस्ट्रेट कोर्टें, दुय्यम तुरुंग वगैरे कचेऱ्या आहेत. [इं. गॅ. ५. अर्नोल्ड. इं. गाइड; सेन्स रिपोर्ट].

**अनंतपुर**—म्हैसूर संस्थान. शिमोगा जिल्ह्याच्या सागर तालुक्यांतील एक खेडें. उ. अ. १४° ५' व पू. रे. ७५° १३'. लोकसंख्या सुमारें चारशें. पूर्वी यास अंधासुर असें नांव असून हें महत्त्वाचें ठिकाण होतें. अंधासुर नांवाच्या राजानें हें वसविलें. पुढें आठव्या शतकांत हुंचा राज्याचा संस्थापक जिनदत्त यानें अंधासुरास जिंकलें. अकराव्या शतकांत अंधासुर गांव चालुक्यांच्या राज्यांत मोडत होता. इ. स. १०४२ सालीं १२०० ब्राह्मणांस या गांवाचा अग्रहार केला होता व इ. स. १०७९ सालीं हें गांव राजधानीचें ठिकाण होतें असें दिसतें. सतराव्या शतकांत केलदी राजा वेंकटप्पा नाईक यानें शिवाचार मठ स्थापिला, चंपकसरस् नांवाचा तलाव बांधला आणि गांवाचें नांव आनंदपुर असें ठेविलें. त्याचें रूपांतर हल्लीं अनंतपुर असें झालें आहे. हैदर आणि टिपू यांच्या काळांत या गांवांवर पुष्कळ वेळां मोहिमी झालेल्या होत्या. (इं. गॅ. ५).

**अनंतफंदी**—नगर प्रांतांत संगमनेर म्हणून जो मोठा गांव आहे तेथील हा राहणारा होय. हा वाजसनी ब्राह्मण होता, व याचें गोत्र कौंडिण्य होतें. याच्या बापाचें नांव कवानी बाव व आईचें नांव राजूबाई (राऊबाई–महाराष्ट्र कविचरित्र; संतकविकाव्यसूचीकार गऊबाई लिहितात, हा कदाचित् मुद्रकदोष असेल.) असून याचें आडनांव घोलप होतें. संगमनेरास मलीकफंदी म्हणून एक चमत्कारिक फकीर होता, त्याशीं याचा फार स्नेह असल्यामुळें लोकांनीं त्याचें फंदी हें उपपद यास जोडलें, व तेव्हांपासून यास असें नांव पडलें. याचें जन्म शके १६६६ रक्ताक्षि नामक संवत्सरीं झालें होतें व हा मरण पावला त्या वेळीं ७५ वर्षांच्या वयाचा असून त्या वेळेस शालीवाहन शक १७४१ होता.

अनंत फंदी पूर्वी तमाशे करीत हिंडत असे व स्वतः रचलेल्या लावण्या तमाशांत म्हणून पोऱ्यांस नाचवीत असे. एकदां असें झालें कीं, अहल्याबाई होळकरीण संगमनेरास येऊन उतरली असतां तिला याचें वृत्त कळलें. त्यावरून तिनें यास बोलावून आणून सांगितलें कीं, जें कृत्य तुम्हीं करतां तें ब्राह्मणास करणें योग्य नाहीं. तेव्हांपासून यानें तमाशा करणें सोडून दिलें व कथा करणें धरिलें. यापूर्वी अनंतफंदी होळकर राज्यांत गेले असतां बाईनें त्यास तमाशा ऐवजीं कीर्तन करण्याचा उपदेश केला होता. त्यानंतर लोकाग्रहास्तव यावेळीं एकदांच तमाशाला फंदीनें सुरुवात केली असतां अवचित संगमनेरास अहिल्याबाईची स्वारी आली व तिनें फंदी तमाशा करीत आहे हें ऐकून त्याचें डोकें मारण्याचा हुकूम केला. हें वृत्त तमाशांत फंदीस समजतांच त्यानें तमाशाचें कीर्तनांत परिवर्तन केलें. तेव्हां बाई खूष होऊन त्याला बक्षिस देऊन पुढें गेल्या; अशी एक दुसरी कथा आहे (म. कविचरित्र).

याची कविता कटाव, फटके, लावण्या व क्वचित् श्लोक आर्या आणि ओंव्या अशा प्रकारची असून ती प्रायः सर्व मराठी भाषेंत आहे. ओंवीबद्ध असा याचा एकच माधवग्रंथ मात्र आहे. अनंतफंदीस श्रीपतफंदी अथवा सवाई फंदी व बापूफंदी या नांवाचे दोन पुत्र होते. सवाईफंदीहि कवि होता. याचे वंशज हल्लीं संगमनेरास आहेत. ( नवनीत ).

अनंतफंदीची वाणी रामजोश्यासारखी सुसंस्कृत नसली तरी ती प्रसादयुक्त व जोरकस आहे. त्याच्या कीर्तनाची सर्व महाराष्ट्रभर प्रसिद्धी होती. त्याच्या समकालीन शाहिरांचें मत त्याविषयीं उत्तम होतें हें होनाजी बाळाच्या फंदीवरील लावणीवरून उघड होतें.

फंदी अनंत कवनाचा सागर अजिंक्य ज्याचा हातखंडा ॥
चमत्कार चहुंकडे चालतो सृष्टीवर ज्याचा झेंडा ॥ ध्रु० ॥
× × × ×
सरस्वती जिव्हाग्रिं अक्षयीं भंग नसे ज्याच्या हरपा ।
कवन वहुत उदरामधिं भरलें फणस जसा मोठा कापा ॥

फंदीच्या माधवग्रंथांत सवाई माधवरावाच्या मृत्यूची कथा वर्णन केली आहे. याचे ६ अध्याय असून, ओंव्या ३६० आहेत. शिवाय या कवीच्या लावण्या व फटके अनेक आहेत. यास ऐतिहासिक कवि म्हणतां येईल. याच्या काव्यावरून तत्कालीन इतिहासावर बराच प्रकाश पडतो. खडर्याच्या लढाईवरचा फंदीचा पोवाडा प्रसिद्ध आहे. सवाई माधवराव, दुसरे बाजीराव, नाना फडणीस, होळकर, फत्तेसिंग गायकवाड वगैरे त्या वेळच्या थोर व्यक्तींवर फंदीनें फटके रचले होते. यानें हिंदुस्थानी लावण्याहि रचल्या होत्या.

अनंतफंदीचे वडील चिरंजीव श्रीपत उर्फ सवाई फंदी हेहि चांगले कवि होते. "फंदी मूल" हीं अक्षरें याच्या कवितेच्या शेवटीं आढळतात. यानें गायकवाडींत वर्षासन मिळविलें. सवाईफंदीचा रावबाजीवरचा पोवाडा सर्वांच्या तोंडी होता; त्यांत तत्कालीन दुःस्थिति, पेशव्यांचे दुर्गुण चांगले रेखाटले आहेत.

उश्या केशरी टिळा कस्तुरी कमालखानी हार गजरे ।
गहेनाजी वहेनाजी अक्षयीं जवळ पालखीच्या हुजरे ॥
जुनीं माणसें ती कणसाला महाग गैर त्याची बुज रे ।
चार चटारी भटारि हलके जाणुनि घे अलबत मुजरे ॥
× × × ×
शाल्योदन मिष्टान्न भोगता सवा शेर ज्याचा सवता ।
चोविस वर्षें चैन भोगिली, राज्यक्रांति जाणुन नवता ॥ध्रु०॥

या फटक्यावरून कवीचा निर्भीडपणा व्यक्त होतो.

( सं. क. का. सू. अ. को. नवनीत; महाराष्ट्र कविचरित्र )

**अनंत बडवे**--अठराव्या शतकाच्या उत्तरार्धात हा कवि होऊन गेला. हा कवि प्रल्हादबुवांचा नातू होय. यानें आपल्या आजापासून कवित्वशक्ति उचललेली दिसते. यानें आपल्या गुरूवर गोपाळाष्टक नांवाचें जें कवन रचिलें आहे तें फार मधुर आहे. यानें लिहिलेले ग्रंथः--(१) मल्हारी माहात्म्य (ओंव्या १३८);(२) श्रीमद्भागवताच्या पंचमस्कंधांतील भरताख्यान (ओंव्या १०२); ब्रह्मोत्तर खंडाच्या आधारानें लिहिलेलीं (३) शिवरात्रीमहात्म्य (ओंव्या ७३) व (४) प्रदोषमहात्म्य (ओंव्या ७५) या खेरीज कांहीं स्फुट पदेंहि आहेत. [ सं. क. का. सू. महाराष्ट्र कविचरित्र. ]

**अनंतमूळ**:--नांवें:--अनंत मूळ ( अनंत वेल ),सुगंधि पाला, सारिवा ( संस्कृत ), मग्रबु, उपळसरि, नन्नरि इत्यादि नांवें या वनस्पतीस आहेत. उत्तर हिंदुस्थानांत बंगाल प्रांतांत व दक्षिणेंत त्रावणकोर ते सिलोनपर्यंतच्या सर्व प्रदेशांत अनंतवेल सांपडतो.

इंग्रजी सार्सापरिल्याचे तोडीचा रक्त शुद्ध करण्याचा गुण या वनस्पतींत असल्यामुळें तिचा एतद्देशीय औषधांत उपयोग करतात; बहुधा काढा किंवा पाकाच्या रूपांत अनंतमूळ देतात, सूज कमी करण्यास, प्रकृतिस्वास्थ्याकरितां व मूत्ररेचक म्हणून याचा उपयोग होतो. अग्निमांद्य, ज्वर, रक्तदोष, उपदंशादि विकारावरहि अनंतमूळ देतात. कधीं कधीं सबंध वेलीची पूड करून तांदुळाच्या कण्हेरींत घालतात अगर वाळलेल्या पानांचा काढा करतात. बाजारांत अनंतमुळाच्या लहान लहान जुड्या मिळतात त्यांत एक अथवा अधिक झाडांच्या मुळ्या बांधलेल्या असतात. अनंतमुळाच्या एक शेरास १२ आणे अगर रुपया पडतो. यूरोपमध्यें अनंतमुळाच्या एका पौंडाला १॥ अथवा दोन शिलींग पडतात.--[ वॅट; पदे; Ayurvedic system of Medicine by N. N. Sen Gupta Vot. III. ]

**अनंतरामः**--यानें स्वानुभूतिनाटक नांवाचें एक अन्योक्तिपर नाटक लिहिलें.

**अनंतशयनः**--त्रावणकोर येथील विष्णूचें स्थान. येथें १४ हात लांबीची विष्णूची मूर्ति शेषावर निजलेली असल्या कारणानें या स्थळास हें नांव पडलें आहे. आनंदगिरीनें आपल्या शंकरविजयांत असें लिहिलें आहे कीं, भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य येथें दिग्विजय करीत फिरत आले आसतां या स्थळीं देवदर्शन करून एक महिनापर्यंत राहिले होते व येथें त्यांस उपनयनादिसंस्कारहीन असे विष्णुशर्मादिक साहा प्रकारचे वैष्णव आढळले होते. तेव्हां आचार्यांनीं त्यांस बोध केला व पुनः ब्राह्मण्यांत आणिलें. पेशवाईंत सुद्धां या देवस्थानाविषयीं पूर्ण माहिती असून, त्यावेळच्या एका पत्रांत त्याचा उल्लेखहि आहे.

**अनंतसुत** ( मुद्गल ):--हेच कृष्णदास मुद्गल काय? नाथांपूर्वी एक वर्ष समाधिस्थ झाले असावे असें महिपतिबाबा म्हणतात. तेव्हां समाधिशक १५२०. ग्रंथ--रामायण, रुक्मिणीस्वयंवर, कालियामर्दन ( सं. क. का. सू. )

**अनंतसुत** ( विठ्ठल )--हा कवि सुमारें ७० वर्षांपूर्वी बडोदें येथें होऊन गेला. त्याचे वडील अनंत हांगा नदीच्या

कांठीं पिंपळगांव येथें रहात; त्यांच्याकडे पिंपळगांव व इतर तीन गांवें यांचें जोशीपण व कुळकर्णीपण असे. विठ्ठलाच्या आईचें नांव राधाबाई. त्या वारल्यानंतर अनंतांनीं संन्यास-दीक्षा घेतली. विठ्ठलानें वडीलांनाच गुरु केलें होतें. अनंतसुताचा "दत्तप्रबोध" हा एकच ग्रंथ प्रसिद्ध आहे. त्याचे पहिले ३७ अध्याय शिवपुराण, नारदपुराण, व पद्मपुराण यांच्या आधारें लिहिले असून, त्यांत दत्तात्रेयाच्या पौराणिक कथा वर्णिल्या आहेत; पुढील २४ अध्यायांत दत्त-संप्रदायांतील संतांच्या कथा आहेत. कवीनें आपल्या तीर्थ-रूपांची.भगवद्भक्ति व त्यांना झालेला साक्षात्कार या ग्रंथांत चांगला वर्णिला आहे; त्याचप्रमाणें आपली दत्तभक्तांची गुरु-परंपरा दिली आहे. यांत एके ठिकाणीं दत्तसंप्रदायाचें स्वरूप जें सांगितलें आहे तें विशेष वाटल्यावरून पुढें देत आहों:—

निंबराजासि रुक्मिणीरमण। सुप्रसन्नें लेववी भूषण।
दिधलें स्ववस्त्र पीतवसन। करावें रक्षण अद्यापि॥
तैंपासोनी सर्वांसी। पिंवळावाणा सांप्रदायासी।
पिंवळ्या पताका निश्चयेंसी। शोभा श्रीहरीसी मानली॥
सोंवळें करविलें परिधान। तैसेंचि करविलें कीर्तन।
तोचि क्रम सर्वांलागोन। करिती आचरण त्या रीतीं॥
उभे राहावें कीर्तनीं उघडें। पागुटें नसावें आंगडें।
कास घालोनि वाडें कोडें। गावे पवाडे श्रीहरीचे॥
ती आज्ञा शिरीं वाहोन। सांप्रदायी करिती कीर्तन।
सप्त पिढी वरदान। निंबराजा पावन जाहलेंसे॥

हा पीतवस्त्र परिधान करणारा व उघड्यानें कीर्तन कर-णारा निंबराज संप्रदाय हल्लीं अस्तित्वांत आहे.

( महाराष्ट्रकविचरित्र )

२—संतकविकाव्यसूचीकार एका अनंतसुत विठ्ठलाची माहिती देतात तो व वरील एक नसावेत. याचे ग्रंथ—वस्त्रहरण ( १५९४ ), गजगौरीव्रत, सुधन्वाख्यान (?) ताटकावध, गरुडहनुमानभेट.

**अनमदेश.**—राजपिंपळयाच्या दक्षिणेस ( रेवाकांठा मुं. इ. ) मानसेल मधील ठिकाण. पहिला सुलतान अहंमद ( १४११-१४४३ ) याचा मित्र व मसलत देणारा शेखअहंमद याच्या जन्मदिवसानिमित्त बांधलेली मशीद येथें आहे ( मुं. गॅ.६ )

**अनयमलय**—उ. अ. १०° १५,' ते १०° ३१,' व पू.रे. ७६°५१,' ते ७७° २०,' मद्रास, इलाखा. कोईमतुर जिल्ह्याच्या दक्षिणेस पसरलेला सह्याद्रि पर्वताचा एक भाग. ह्यास हत्तीचा डोंगर असेंहि नांव आहे. या डोंगरावरील हवा नीलगिरी डोंगराप्रमाणें आहे.

या डोंगराच्या दोन ओळी आहेत एक खालची व दुसरी वरची. खालच्या ओळीची सरासरी उंची ३००० ते ४५०० फूट असून वरच्या ओळीची उंची ८०००फूटपर्यंत आहे, खालच्या डोंगराच्या उतरणीवर १८५०० एकर जमीन कॉफीचे मळे करण्याकरितां तयार केली आहे. डोंगरांत जंगल अप्रतिम आहे. येथील सागवान नामांकित आहे. डोंगरांतून सागवान बाहेर काढण्याचें काम हत्ती करतात. त्याचप्रमाणें माल तळावर आल्यावर तेथून एकदम खालीं आणण्याची व्यवस्था एक तार बांधून केली आहे. या डोंगरांत सांपड-णाऱ्या निरनिराळ्या वनस्पतींचे, लांकडांचे व तंतूचे नमुने कोइमतूर येथील जंगलपदार्थसंग्रहालयांत ठेविले आहेत. या जंगलांत शिकार पुष्कळ सांपडते. गवे, सांवर, वाघ, अस्वलें वगैरे पुष्कळ आहेत.

कांहीं जंगली लोक या जंगलांत रहातात त्या लोकांच्या जाती—कादन, मुदुवन, पुलैयन, मलसर इत्यादि. ( इं. गॅ.५ )

**अनयमुडी.**—(हत्तीचें कपाळ) मद्रास इलाखा. त्रावणकोर संस्थानच्या अगदीं ईशान्येकडील कोंपऱ्यास असलेलें सह्याद्रि पर्वताचें शिखर. उत्तर अक्षांश १०°१०' व पूर्व रेखांश ७७°४'. या डोंगराची उंची ८८३७ फूट असून दक्षिण हिंदुस्थानांत याच्याइतका उंच डोंगर नाहीं. या डोंगरावरून कोइमतुर, मदुरा व मलबार जिल्हे आणि त्रावणकोर व कोचीन संस्थानें या प्रदेशाचा देखावा अप्रतिम दिसतो. निरभ्र दिवशीं पश्चिमेकडे समुद्र देखील दिसतो. कॉफीची लागवड या भागांत सुरू होण्यापूर्वीं येथें पुष्कळ शिकार मिळत असे. नैऋत्य दिशेकडील पावसाळा सुरू असतां हत्तीचे कळप जंगलांत आढळतात. (इं. गॅ. ५ )

**अनरण्य**—( १ ) सूर्यवंशी इक्ष्वाकु कुलोत्पन्न पुरुकुत्स त्याचा कनिष्ठ मुलगा जो त्रसदस्यु त्याचा द्वितीय पुत्र. यास हर्यश्व आणि बृहदश्व असे दोन पुत्र होते. हा अयोध्येस राज्य करीत असतां रावणानें येऊन त्यास जिंकलें. रणावर मरते समयीं अनरण्यानें त्यास शाप दिला कीं माझा वंशज तुझा सकुल नाश करील. ( वा. रामायण उत्तर० स० १९ )

( २ ) सूर्यवंशी ऋतुपर्णांचा पौत्र. ऋतुपर्ण—सर्वकर्मा —अनरण्य—विघ्न. अशी परंपरा आहे.

( ३ ) कार्तिक मासांत ज्यांनीं मांसाशन वर्ज केलें आहे अशा प्राचीन राजांपैकीं एक (महाभारत १३. ११५,५५६१).

( ४ ) सूर्योदय व सूर्यास्त या कालीं ज्यांचें नामस्मरण करावें अशा राजांपैकीं एक ( महाभारत १३.१६६, ७६८४ ).

**अनला** ( १ ) सुरभिकन्या रोहिणीची दुसरी कन्या हीची कन्या शुकी ( महा. कर्ण. ).

(२) माल्यवान् राक्षसास सुंदरी नामक भार्येपासून झालेली कन्या व विश्वावसूची पत्नी. हिची कन्या कुंभीनसी. ( वा. रा. उत्तर० सर्ग ६१ ).

**अनवरुद्दीन**--कर्नाटकचा नबाब. यानें मूळ शिपाई-गिरीवर आपलें नशीब काढलें. याला प्रथम निजामउलमुल्कानें कर्नाटकच्या बालराजाचा कारभारी नेमिलें. त्या बालराजाचा पुढें खून झाला व त्या भयंकर कृत्याकडे दुर्लक्ष करून अन-वरुद्दीनानें विश्वासघातानें स्वतःच कर्नाटकची गादी बळ-काविली. प्रथम तो दिल्लीच्या बादशाहाच्या पदरीं नोकरीस

लागला व लवकरच पुढें कोरा जहानाबादचा सुभेदार नेमला गेला. परंतु त्याच्या अव्यवस्थित कारभारामुळें किंवा गैर आचरणामुळें त्याला प्रांताचा वसूल करून बादशाहाच्या खजिन्यांत भरतां येईना म्हणून तो ती नोकरी सोडून अहमदाबादेला गेला. त्या ठिकाणीं निजामउल्मुल्काचा बाप गाझीउद्दीनखान यानें सुरत शहरांत त्याला एका मोठ्या प्रतीच्या व जबाबदारीच्या जागेवर नेमलें. गाझीउद्दीनाच्या मरणानंतर त्याचा मुलगा दक्षिणेकडील प्रांताचा सुभेदार बनला तेव्हां त्यानें अनवरुद्दिनाला कर्नाटक आणि राजमहेंद्री या प्रांतांवर देखरेखीस ठेविलें. या प्रदेशांचा कारभार त्यानें १७२५ ते १७४१ पर्यंत केला व त्याचाच पुढें तो नबाब बनला. पुढें निजामउल्मुल्काचा नातु मुजफरजंग याच्या बरोबर झालेल्या लढाईंत तो मारला गेला (१७४९). त्या वेळीं त्याचें वय १०७ वर्षांचें होतें असें म्हणतात. त्याचा थोरला मुलगा कैद झाला आणि दुसरा मुलगा महंमद अली त्रिचनापल्लीला पळून गेला. या नबाबाच्या स्तुतिपर अनवरनामा नांवाचें वीररसप्रधान काव्य अबदी नांवाच्या कवीनें केलेलें आहे. त्यांत मेजर लॉरेन्स याचे पराक्रम आणि इंग्लिश व फ्रेंच यांच्या हिंदुस्थानांतील लढाया यांचें बरेंच यथातथ्य वर्णन केलेलें आहे. अनवरुद्दीनखानाचा मुलगा महंमदअली याला हैदराबादचा नबाब नासिरजंग यानें कर्नाटकच्या सुभेदारीवर कायम केलें.

[बील, ओरिएंटल बायोग्राफिकल डिक्शनरी. इतिहाससंग्रह. पु. ३. पृ. ६७]

**अनवळ**=(अनंतहल्ली). विजापुर जिल्ह्यांत कलादगीच्या आग्नेयीस पांच मैलांवर एक लहानसें खेडें आहे. लोकसंख्या सुमारें एक हजार. गांवांत अनंत, मारुति व रामलिंग अशीं देवळें आहेत. येथील अनंताच्या देवळांत शेषशायी विष्णूची मूर्ति पायाशीं लक्ष्मी व नाभींतून निघालेला कमलासन ब्रह्मा यांसहित आहे. त्याच्यावर विष्णूचे दशावतार दाखविले आहेत. देवळाला दुसरा मजला आहे. गोविंदराव चिंचणीच्या निधनानंतर वारस नसल्यामुळें अनवल खालसा झालें. (मुं. गॅ.)

**अनवरी**—आहदुद्दिन अल्ली अनवरी हा इराणचा कवि. याचा जन्म खोरासानमध्यें १२ व्या शतकाचे प्रारंभीं झाला. सुलतान संजीर याच्या तो खास मर्जींतील असून प्रत्येक स्वारीबरोबर तो हजर असे. हझारस्पला सुलतानानें वेढा दिला असतां अनवरी व त्याचा प्रतिपक्षी राशिदी यांच्यामध्यें काव्यविषयक रणकंदन सुरु होतें. राशिदी ह्या किल्ल्यांत होता. यांचीं काव्यें बाणावरून इकडून तिकडे जात होतीं असें म्हणतात. १२ व्या शतकाच्या अखेरीस बल्ख येथें त्याचा अंत झाला. "दिवान अनवरी" या त्याच्या काव्यसंग्रहांत पुष्कळ मोठ्या कविता व कांहीं वीणागीतें होतीं. "खोरासनचे अश्रू" हा याचा सर्वांत मोठा ग्रंथ होय. सादीनें आपल्या गुलिस्तानांत त्याच्या कांहीं कविता घेतल्या आहेत. हा आपल्या काळांतील सर्वांत मोठा ज्योतिषी म्हणून प्रसिद्ध होता.

**अनवलोभनः**—हा द्विजांच्या सोळा संस्कारांपैकीं एक संस्कार आहे. गृह्यकर्म सांगणाऱ्या सर्व गृह्यसूत्रांतून हा संस्कार सांगितलेला नाहीं. आश्वलायन गृह्यसूत्रांत पुंसवन संस्कारानंतर हा संस्कार सांगितला आहे. गर्भिणी स्त्रीच्या तिसऱ्या महिन्यांत हा संस्कार करावयाचा असतो. गर्भिणीच्या गर्भाचा नाश न व्हावा यासाठीं हा संस्कार करावयाचा असतो व म्हणूनच त्याचें नांव अनवलोभन (न अवलुप्यते गर्भोऽनेन) असें आहे. बहुतेक हा संस्कार पुंसवन या संस्कारावरोबरच केला जातो. यांतील मुख्य विधि म्हणजे अश्वगंधा वनस्पतीचा रस गर्भिणीच्या पतीनें तिच्या उजव्या नाकपुडींत पिळावयाचा असतो. या रससेचनाच्या योगानें गर्भाचा नाश होत नाहीं अशी भावना आहे. ह्या रससेचनाचे वेळीं जो मंत्र पठित आहे 'माहं पौत्रमघं नियां' तोहि अर्थदृष्ट्या यथार्थ आहे.

**अनसिंग**— तालुका वाशीम, जिल्हा अकोला. वाशीमच्या आग्नेयीस १५ मैलांवर हें दोनहजार लोकवस्तीचें खेडें आहे. पूर्वी हें एका परगण्याचें मुख्य ठिकाण होतें. शृंगऋषीवरून या गांवास हें नांव पडलें असें मानतात. या ऋषीचें देऊळ हल्लीं ओसाड असलेल्या गांवठणांत आहे. देऊळ हेमाडपंती घाटाचें असून गांवांतील लोकांनीं देवळाकरितां सहा शेतें अलीकडे खरेदी केलीं आहेत. जवळच एक पायऱ्यांची विहीर व नाला असून त्यांत पाणी बारा महिने असतें. विहिरीच्या एका बाजूस एक सतीचा हात खोदलेला आहे. याविषयीं निरनिराळ्या गोष्टी सांगण्यांत येतात. हात बांगड्यांनीं भरला असल्या कारणानें तोच फक्त जळला नाहीं. या सतीची अशी गोष्ट आहे कीं हिचा पिता दक्ष आणि नवरा शिव यांच्यामध्यें भांडण झाल्यामुळें हिनें आत्महत्या केली. तिच्या नवऱ्यानें तिच्या शरीराचे तुकडे तुकडे केले. ते तुकडे ५१ ठिकाणीं पडले. हात या ठिकाणीं पडला व विहिरीवर खोदला जाण्याचें हें कारण असें समजतात. या गांवची आसपासची जमीन हलकी आहे. इ. स. १८९९–१९०० च्या दुष्काळांत येथील डंग्राळा तलाव उपसला असल्यामुळें यांत बारा महिने पाणी असतें. दुसरी तीन तळीं आहेत. पण पाणी नेहमीं नसतें; एकंदरींत पाण्याचा पुरवठा अपुरा आहे. येथें पोलीस कचेरी, व शाळा असून आठवड्याचा बाजार भरतो. (अकोला डि. गॅ.)

**अनसूया** (१) कर्दमऋषीस देवहूतीपासून झालेल्या नऊकन्यांतील एक. स्वायंभू मन्वंतरांतील ब्रह्ममानसपुत्र अत्रिऋषि त्याची स्त्री.

(२) वैवस्वत मन्वंतरांत अत्रि पुनः उत्पन्न होऊन अनसूया ही त्याची भार्या म्हणून झाटलें आहे.

अनसूया ही परम पतिव्रता महातपस्विनी होती. हिचा विशेष इतिहास असा आढळतो कीं एकदां दहावर्षात्मक अनावृष्टि झाली असतां हिनें स्वतपोबलानें फळें, मुळें, उदक

इत्यादि निर्माण करून बहुत प्राण्यांस वांचविलें होतें. दुसरें असें कीं मांडव्य ऋषीस शूलावर चढविलें असतां त्या शूलास अंधःकारांत एका ऋषिपत्नीचा धक्का लागला असतां तिला तूं सूर्योदयीं विधवा होशील म्हणून मांडव्यानें शाप दिला. ऋषिपत्नीनें सूर्योदयच होऊं दिला नाहीं. प्राणिमात्रांचे व्यवहार कुंठित झाले. सर्व ऋषि आतां करावें काय याचा विचार करीत असतां, ती ऋषिपत्नी अनसूयेची परम सखी आहे असें समजलें, व सर्व ऋषि देवांस पुढें करून हिला शरण आले. व त्यांनीं सर्व वृत्त निवेदन केलें. अनसूयेनें ऋषिप्रार्थना मान्य केली आणि आपल्या तपःसामर्थ्यानें आपल्या सखीस वैधव्य येऊं न देतां सूर्यास उदयास आणिलें. चित्रकूटाच्या दक्षिण अरण्यांत अत्रिऋषींचा आश्रम असतांना, राम सीतालक्ष्मणासहित त्या आश्रमीं ऋषिदर्शनार्थ गेले. त्यावेळीं अनसूयेनें सीतेस फार ममतेनें वागवून व पतिव्रताधर्म शिकवून, तिला दिव्यवस्त्र व अंगराग अर्पण केला. तें वस्त्र परिधान केल्यानें व अंगरागाचें अनुलेपन केल्यानें शरीर सुशोभित व विगतश्रम होत असे. ( वा. रा. अयोध्याकांड सर्ग ११७. )

अत्रिसुत दत्तात्रेयाची ही माता होय. ब्रह्मा, विष्णु व महेश हे हिच्या पातिव्रत्याची परीक्षा करावयास भिक्षामिषानें आले असतां हिनें आपल्या सामर्थ्यानें त्यांस लहान बालकांचें रूप दिलें व तेच पुढें दत्तात्रेयरूपानें अवतरले अशी कथा आहे.

**अनळः**—( १ ) आग्नेयी दिशेचा दिक्पाल वसु. याचे मुलगे चार. कुमार, शाख, विशाख, नैगमेय, ( महा. आदि. ६७ )

( २ ) बिभीषणाच्या चार राक्षस अमात्यांपैकीं एक.

( ३ ) गरुडाचा पुत्र. ( महा. उद्यो. ११ )

( ४ ) यमसभेंतील एक राजा, ( महा सभा. ८ )

**अनाः**—अना हें शहर युफ्रेटीस नदीवर वसलेलें आहे. एका बाबिलोनिअन पत्रांत (इ. स. पूर्वी सुमारें २२०० वर्षें) ह्या शहराचा उल्लेख हनाट या नांवानें केला आहे. असुर नझिर पाल ( इ. स. पूर्वी ८७९ ) चा लेखक याला अनाट म्हणतो. ग्रीक व लॅटिन लेखक याला अनाथा व अरब लेखक याला अना, अशा नांवानें संबोधितात. हें शहर एका बेटावर होतें याविषयीं बहुतेक लेखकांचें एकमत आहे.

बाबिलोनियन साम्राज्यांत अनाची स्थिति कशी होती हें मुळींच कळत नाहीं. तरी ख्रिस्तपूर्व तीन हजार वर्षांच्या सुमारच्या एका पत्रांत, सुहीच्या अधिकाऱ्याच्या अमलाखालील प्रदेशांत झालेल्या गडबडीच्या हकीकतींत अनाच्या सहा मनुष्यांचा उल्लेख केला आहे. अना येथें जुलियन बादशहास इराणच्या स्वारींत पहिला अडथळा आला. खलीप क्रेम ह्या हद्दपारीनंतर येथें येऊन राहिला.

बऱ्याच लेखकांनीं व प्रवाशांनीं अनासंबंधीं माहिती लिहून ठेविली आहे. आधुनिक अना शहर युफ्रेटीसच्या उजव्या तीरावर आहे. अरबी कवींनीं येथील दारूचें वर्णन व स्तुति केली आहे. येथें जाडा भरडा असा कपडा फक्त तयार होतो.

**अनागत वंशः**—(भविष्य काळची नोंद).मेत्तेय या भावी बुद्धावर १४२ पद्यखंडांचें हें एक काव्य पालींत कस्सपानें लिहिलें आहे असें गंधव वंशांत आढळतें आणि सासन वंशदीपामध्यें चोल साम्राज्यांत तो रहात असे, असें सांगितलें आहे. कांचिपूर येथें तो रहात नसावा असें आपल्यास अनुमान करितां येईल कारण चोल रध्य या नांवाऐवजीं कर्त्यानें कांचीपूर हेंच नांव वापरलें असतें. बुद्धवंशाचाहि कर्ता हाच असें जें विधान करितात तें चुकीचें दिसतें. कस्सपाचा काल किंवा त्याचे दुसरे ग्रंथ याविषयीं कांहींच माहिती आढळत नाहीं. उपतिस्सानें अनागतवंशावर टीका लिहिली आहे. हा उपतिस्स इ. स. ९७० मध्यें सिंहलद्वीपांत लिहिल्या गेलेल्या महाबोधि वंशाचा कर्ता असावा असें कोणी म्हणतात. मेत्तेय या भावीबुद्धाच्या ठिकाणीं पुढील काळांतील बौद्ध लोकांचा विश्वास वाढत गेल्यानें अनागत वंशाला बरेंच महत्त्व आहे. तेव्हां त्याचा काल ठाऊक नसणें ही दुःखाची गोष्ट आहे. निकायामध्यें भावीबुद्ध उत्पन्न होतील अशीं विधानें आहेत पण एक खेरीज करून कोणत्याहि निकायांत किंवा पिटकांत मेत्तेयाचा उल्लेख केलेला नाहीं. बुद्धवंशाच्या अखेरीस त्याचें नांव आढळतें खरें पण हा भाग मूळ ग्रंथांतला नसून मागाहून जोडलेला दिसतो. नेत्ती प्रकरणांतहि मेत्तेयाचें नांव नाहीं. वर जो अपवादात्मक ग्रंथ सांगितला तो दीघनिकाय असून त्यांतील सव्विसाव्या (२६) संवादांत बुद्धाच्या तोंडीं असें भविष्यवचन घातलें आहे कीं, मेत्तेयाला हजारों अनुयायी मिळतील पण मला सारे शेंकडोंच आहेत. महावस्तूमध्यें ही कथा फार प्रचलित दिसते. त्यांत अकरावेळां मेत्तेयाचा उल्लेख केला असून दोनतीन उताऱ्यांत तर त्याजविषयीं सविस्तर माहिती दिली आहे. त्याच्या केतुमति शहराच्या विस्ताराविषयीं आलेली माहिती अनागत वंशाशीं जुळते ( महावस्तु ३, २४०=अनागत वंश ८ ); पण इतर गोष्टी जुळत नाहींत.

या ग्रंथावरून तीन महत्त्वाचे मुद्दे सुचतात. (१) यांतील कथेंत नवीन भाग असा कांहींच नाहीं. पूर्वीच्या बुद्धकथांवरच त्याची तंतोतंत उभारणी असून फक्त संख्या व नांवें कायतीं वेगळीं आहेत.

( २ ) मेत्तेय आणि पश्चिमेकडील मेसाया ( Messiah) यांच्या कल्पनेंत साम्य दाखवण्यास बऱ्याचशा गोष्टी आढळतात; सर्व कल्पना जरी सारख्या नसल्या तरी पुष्कळसे मुद्दे एका जातीचेच आहेत. मेत्तेयाचा काळ सुवर्ण युगाचा असून त्यावेळीं राजे, मंत्री आणि जनता राज्य सद्गुणी राखण्याविषयीं आणि सत्याचा जय घडवून आणण्यासाठीं एकमेकांबरोबर स्पर्धा करतील असें वर्णन केलें आहे.

( ३ ) मेत्तेय नांवाविषयीं थोडा घोटाळा आढळतो तो दूर केला पाहिजे. मेत्तेय म्हणजे "प्रेमाचा बुद्ध" नसून तें

एक गोत्रनाम आहे. कदाचित् गौतम या नांवाप्रमाणें तें पैतृक नांव असेल, व "मेत्तयचा वंशज" असा त्याचा अर्थ असेल. सुत्तनिपात मधील दुसरा एक मेत्तेय ऐतिहासिक पुरुष असून त्याचा व याचा कांहीं संबंध नाहीं. मेत्ता याचा अर्थ प्रेम असा असून भावीबुद्धाचें मेत्तेय असें नांव देण्यांत या शब्दाशीं त्याचा संबंध जोडण्याचा हेतु असेल. असे शब्दांचे खेळ किंवा शब्दश्लेश भारतीय वाङ्मयांत वारंवार सांपडतात. भावीबुद्धाचें स्वतःचें नांव "अजित" असें यांत दिलें आहे.

या ग्रंथाच्या एका हस्तलिखीत प्रतींत "अनागत बुद्धस्स वण्णना' असें सबंध नांव लिहिलेलें आढळतें. याच नांवाचा दुसरा एक गद्यपद्यात्मक ग्रंथ असून दहा भावीबुद्धांचें त्याच्यांत वर्णन आहे. मेत्तेय हा त्यांपैकीं एक आहे. हा ग्रंथ अद्याप अमुद्रित आहे.

**अनागोंदी**—हें शहर तुंगभद्रानदीच्या उत्तरतीरावरें असून दक्षिणतीरावरील विजयानगर शहराच्या समोर वसलेलें होतें. हल्लीं या ठिकाणीं पुरातन कालचीं अनेक देवळें आहेत. वालीची किष्किंधा नगरी येथेंच होती असें म्हणतात. अनागोंदी हें छोटेसें शहर तटबंदी केलेलें होतें. या ठिकाणीं एक लहानसा राजवंश बरेच दिवस राज्य करीत होता. पुष्कळ दिवस मेहनत करून अनागोंदीचा किल्ला तेथील राजांनीं चांगला मजबूत केला होता. अनागोंदीच्या राजवंशाची उत्पत्ति कोठून झाली हें आज कळून येत नाहीं. पुष्कळ वर्षें ते द्वारसमुद्र येथील होयसळ बल्लाळांचे मांडलीक होते. फेरिस्ता म्हणतो, सन १३५० पूर्वी सातशें वर्षें या राजवंशाचा अमल अनागोंदीस होता. हरिहर व बुक्क असे दोन बंधु वारंगळच्या राजाच्या पदरीं होते. सन १३२६त वारंगळ पडल्यावर ते अनागोंदीच्या आश्रयास येऊन राहिले. तेथें एकास अनागोंदीची दिवाणगिरी व दुसऱ्यास खजिनदारी मिळाली. त्यामुळें अनागोंदीच्या राज्यास लवकरच मोठें महत्त्व प्राप्त झालें. सन १३३४ त दिल्लीचा सुलतान महंमद तघलख याचा पुतण्या बाहुद्दिन बंड करून दक्षिणेंत आला, त्यास अनागोंदीच्या राजानें आश्रय दिला. तेव्हां सुलतान महंमदानें अनागोंदीवर स्वारी केली, आणि तें शहर काबीज करून तेथें मलीक नांवाचा आपला एक कारभारी नेमला. आनागोंदीचा पाडाव झाल्यावर हरिहर व बुक्क यांनीं अनागोंदीच्याच समोर तुंगभद्रेच्या दक्षिण तीरावर विजयानगर शहर स्थापलें तेव्हां अनागोंदो येथें पाडाव झालेले सरदार व लोक या नवीन शहरांत जाऊन राहिले व त्यामुळें लवकरच अनागोंदी शहराचें महत्त्व नाहींसें झालें.

या ठिकाणीं रंगनाथ स्वामी, व लक्ष्मी देवी यांचीं देवालयें आहेत. लक्ष्मीदेवीच्या देवळांत मारुती व गरुड यांच्या लांकडाच्या फारच मोठ्या व सुबक मूर्ती आहेत; त्या उत्सवाच्या वेळीं मिरवीत नेतात. अनागोंदीपासून २ मैलांवर पंपासरोवर आहे.

अनागोंदीच्या एका राजानें पंढरपुर येथील विठोबाची मूर्ति अनागोंदीस नेली होती ती भानुदासानें परत पंढरपूरास आणली अशी एक आख्यायिका आहे.

अशी एक कथा सांगतात कीं येथील एक राजा आपणाला सार्वभौम म्हणवून सर्व पृथ्वीचा वसूल आपल्या खातीं जमेस धरून, मग निरनिराळ्या देशांच्या नांवांनीं हिशेबांत लिही व अशा रीतीनें स्वतःची करमणूक करून घेई. यावरुन अनागोंदीचा जमाखर्च म्हणजे फाजील हिशोब असा अर्थ पडला. त्याचप्रमाणें अनागोंदीकारभार म्हणजे अंदाधुंदी.

**अनाझरवस.**—अनाझरवस हें प्राचीन सिलिशियन शहर असून पिरेमस (जिहून) नदीच्या मुख्य प्रवाहाच्या पश्चिमेस, १० मैलांवर अलैन मैदानांत आहे. रोमन साम्राज्याच्यावेळीं याला सेसेरिया म्हणत. भूकंपानें शहराचा नाश झाल्यावर जास्टिनिअन बादशाहानें हें शहर बांधल्यामुळें याला जस्टिनोपोलिस (इ. स. ५२५) असें नांव मिळालें. १२ व्या शतकांत, लेसरआर्मेनियाचा राजा पहिला थोरोस यानें हें शहर आपली राजधानी केली. या वेळीं याचें नांव अनाझर्वा असें होतें. अनाझरवसच्या नैसर्गिक मजबुतीमुळें वायझंटाइन साम्राज्य व त्यावर चाल करून येणारे मुसुलमान यांच्या मधील लढायांत या शहरानें बराच पुढाकार घेतला होता. हरुन अलरशीदनें इ. स. ७९६ त हें शहर पुन्हां बांधिलें. सैफ उद्दौला, हमदानीद (१०वें शतक) व सैकेत यांनीं या शहराची पुन्हां डागडुजी केली व धर्मयोध्यांनीं याचा नाश केला. शहराच्या खालच्या भागाची भिंत अलिकडची आहे. मल्लभूमी, विजयाची कमान, रंगभूमि इत्यादि अवशेष अजून दृष्टीस पडतात.

**अनाथ.**—हा एक विद्वान साधु होऊन गेला. हिंदुस्थानी भाषेंत दोहरेबद्ध असे याचे विचारमाला आणि सर्वसार उपदेश हे दोन ग्रंथ आहेत.

**अनार्कलीः**—(डाळिंबाची कळी) एका स्त्रीचें नांव. तिचेंच दुसरें नांव नादिरा बेगम असें आहे. ही जहांगीर बादशहाच्या कारकीर्दींत होऊन गेली. हिची कबर लाहोर येथें अनार्कली नांवाच्या ठिकाणीं आहे. अनार्कली या नांवासंबंधानें अनेक निरनिराळ्या गोष्टी सांगण्यांत येतात. तें जहांगीरच्या वेळच्या एका राजकन्येचें नांव होतें असें कोणी म्हणतात. कोणी म्हणतात अनार्कली या नांवाची एक दासी होती व तिच्यावर जहांगीरचें प्रेम जडलें. म्हणून अकबरानें तिला जिवंत पुरून टाकिली. या गोष्टींत फारसें तथ्य नसलें तरी एवढें मात्र खरें कीं, उपर्युक्त कबर ज्या नांवानें प्रसिद्ध आहे त्या नांवाची स्त्री अकबर किंवा जहांगीर यांच्या कारकीर्दींत होती आणि तिच्यावर कोणी तरी राजपुत्र आशक झाला होता; तसेंच तिला मृत्यूहि अशा परिस्थितींत आला कीं, त्या योगानें त्या प्रेमी पुरुषाचें हृदय विदीर्ण होऊन त्यानें पुढील अर्थाच्या पद्यमय ओळी तिच्या थडग्यावर लिहून ठेवल्या

आहेतः—" अरेरे ! जर माझ्या नष्ट प्रियेचें मुख मला पुन्हां पहावयास मिळेल तर मी अखेर निकालाच्या दिवसापर्यंत देवाचे आभार मानीत राहीन." [ बील, ओरिएंटल बायॉग्राफिकल डिक्शनरी ]

" अर्ली ट्रॅव्हेल्स इन इंडिया १५८३–१६१९" या ग्रंथांत विल्यम फिंच ( १६०८–११ ) यानें ही कबर प्रत्यक्ष पाहून तिचें केलेलें वर्णन येणेंप्रमाणें दिलें आहे: "अनार्कली ( फिंच हिला इम्माक केल्ले उर्फ डाळिंबाचा मगज असें संबोधितो ) ही अकबराची एक बायको व राजपुत्र दानियल याची आई होती. राजपुत्र सेलीमशीं हिचा कांहीं संबंध उघडकीस आल्यानें अकबरानें तिला भिंतींत चिणून मारली. पुढें सेलीम बादशहा झाल्यावर त्यानें तिच्या स्मरणार्थ ही सुंदर कबर बांधली." वरील ग्रंथांत एडवर्ड टेरी ( १६१६–१९ ) नांवाच्या दुसऱ्या प्रवाशानेंहि अनार्कली ही अकबरची आवडती स्त्री असून, तिच्याशीं वाईट संबंध ठेवल्यामुळें बादशहा सेलीमला बेवारस ठरविणार होता असें म्हटलें असल्याचें दिलें आहे.

**अनावल.**—गुजराथी खेडावाल ब्राह्मणांचा एक वर्ग. यासच भथेला ( भ्रष्टेला ) देसाई, मस्तान (महास्थान) अशीं नावें आहेत. वडोद्यांतील ( नवसरी जिल्हा, महुवा तालुका ) अनावल गांवावरून यांचें हें नांव पडलें. दक्षिण गुजराथेंतील पहिले वसाहतकार अनावल होत.

वडोदें संस्थानांत व्यारा महालांत उन्हाळीं किंवा ऊन पाण्याचे झरे आहेत. त्या उन्हाळ्यांशीं या जातीचा संबंध जोडण्यांत येतो. स्कंद पुराणांत अशी कथा आहे कीं, रावणवधानंतर राम सीतेसह पुष्पक विमानांतून अयोध्येस जात असतां, विंध्य पर्वताच्या दक्षिण उतारावर त्यानें अगस्त्यमुनीचा आश्रम पाहिला. तेव्हां मुनीचें दर्शन घेण्याकरितां खालीं उतरून, त्यांच्याच आज्ञेनें रावणवधार्थ प्रायश्चित्तविधि जेथें केला तें स्थान अनावल होय. या ठिकाणीं एका भिल्लाखेरीज कोणी नसल्यानें, हिमालयांतील गंगाकुलगिरी येथून ब्राह्मण आणविले. व त्यांच्या सुखार्थ गंगाजलाचा ऊन झरा रामानें निर्माण केला. हे ब्राह्मण १२००० असून निरनिराळ्या १२ गोत्रांचे होते; त्यांनीं शेषाच्या १२००० मुलींशीं लग्न केलें. त्यांनीं रामानें दिलेली दक्षणा न घेतल्या कारणानें तुम्हाला वेद शिकविण्याचा, याज्ञिकी करण्याचा किंवा दक्षणा घेण्याचाहि अधिकार राहाणार नाहीं. वैश्य धर्म तुम्ही स्वीकारावा, असा त्यांना शाप मिळाला. याप्रमाणें अनावल किंवा भथेला यांच्या उत्पत्तीची कथा सांगतात. दुसरी कथा म्हणजे रामानें ब्राह्मणांच्या अभावीं येथील भिल्लांना ब्राह्मण करून घेतलें व यज्ञ केला. यावरून ही जात शुद्ध नसावी व धर्मांतरानें हींत कांहीं समावेश झालेला असावा अशी समजूत आहे.

नवसरी प्रांतांत यांची वस्ती फार आहे. १९११ सालीं बडोदें संस्थानांत ९५१६ अनावल होते व सर्व शेतकरी जमीनदार म्हणून नोंदले गेले आहेत. मागील खानेसुमारीवरून पाहतां अनावलांची संख्या कमी होत आहेसें दिसतें. अनावलांतील श्रेष्ठ वर्गाला देसाई व कनिष्ठ वर्गाला भथेला म्हणतात. देसाई भथेल्याशीं बेटी व्यवहार करीत नाहींत. उलट पक्षीं भथेला आपल्या मुली देसायांच्या घरीं पडाव्यात म्हणून खटपट करितात. यामुळें कांहीं विचित्र प्रकार आढळून येतात. बहुपत्नीत्व रूढीविरुद्ध नाहीं. एखादा देसाई पैशाच्या अडचणींत असल्यास दुसरी बायको करितो व लग्नाच्यावेळीं तिच्या बापाकडून मोठा हुंडा घेतो. जबर हुंडा देण्याघेण्याच्या पद्धतीमुळें पुष्कळ बहुकन्याक देसाईकुलें कर्जबाजारी झालेलीं दिसतात. गेल्या २५।३० वर्षांत कांहीं सुधारणा घडून आलेली आहे. [ मुं. गॅ. सेन्ससरिपोर्ट ].

**अनाहगड:**—पंजाब पतिआळा संस्थानांतील एक निझामत. उ. अ. २९° ३३' ते ३०° ३४' व पू. रे. ७४° ४१' ते ७५° ५०' क्षेत्रफळ १८३६ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें चार लक्ष. हींत ४ गांवें व ४५४ खेडीं आहेत. या निझामतींत मधुन मधुन ब्रिटिश मुलुख आहे. सन १९०३–४ मध्यें एकंदर उत्पन्न ७.२ लाख रुपये होतें. (इं. गॅ.).

**अनाहगड**—पंजाब. पतिआळा संस्थानांतील अनाहगड निजामतींतील एक तहशिल उ. अ. ३०° ९' ते ३०° ३४' व पू. रे. ७५° १४, ते ७५° ४४' क्षेत्रफळ ३४६ चौरस मैल. लोकसंख्या एक लक्षावर आहे. या तहशिलींत ३ गांवें व ८६ खेडीं आहेत. इ. स. १९०३-४ मध्यें एकंदर उत्पन्न १.८ लाख रुपये होतें. ( इं. गॅ. )

**अनाहित:**—मझ्दसंप्रदायांत अनाहित ही एक प्रमुख देवता आहे. यश्त (५) आणि अवेस्तांत इतर अनेक ठिकाणीं हिची बरीच माहिती मिळते. "आर्द्वीसुरा अनाहित" म्हणजे श्रेष्ठ बलिष्ठ आणि पवित्र अशी ही देवी पर्जन्य आणि नैसर्गिक वसंत यांची अधिष्ठात्री असून नक्षत्रमंडळांत वास करिते. तेथूनच जगांतील सर्व नद्या उगम पावतात. दैवीजल केवळ निसर्गांतच प्रसवशक्ति उत्पन्न करतें असें नाहीं तर प्राणिक्षेत्रांतहि त्याचा प्रभाव चालतो, असा मझ्दानुयायांचा विश्वास आहे. अवेस्ताप्रमाणें पाहतां अनाहित पुरुषांच्या बीजाची शुद्धि करिते, त्याचप्रमाणें स्त्रियांचे गर्भ आणि दुग्ध पवित्र ठेविते (वेंदिदाद ७, १६, यश्त ५,५ ); उपवर कन्यका आणि प्रसूतिसमयीं बायका तिची आराधना करितात ( यश्त ५ ); वारा, पाऊस, ढग आणि गारा असे चार पांढरे घोडे ज्याला जुंपले आहेत अशा रथांत बसून ती संग्रामास जाते ( यश्त ५. २१, १३, आणि ५. १२० ). ती योद्ध्यांना जय मिळवून देते आणि त्यांना युद्धसामग्री पुरविते. अवेस्ता सूक्तांत ज्यांनीं अनाहितेप्रीत्यर्थ यज्ञ केले आहेत अशा झोरोआस्तर सहित सर्व प्राचीन वीरांचीं नांवें देऊन शेवटीं अनाहित देवतेचें रूप आणि पेहराव यांचें वर्णन दिलें आहे ( यश्त ५, १२६ व पुढें ): "ती उंच, सुंदर

व शक्तिमती कुमारिका आहे; तिनें उंच कमरपट्टा बांधला आहे; जरतारी झगा अंगावर घेतला आहे; कर्णभूषणें, कंठी, आणि सुवर्ण मुगुट धारण केला आहे" इत्यादि.

अनाहित ही अनत या सेमेटिक देवीसारखी आहे. हिरोडोटस म्हणतो कीं, असुर लोकांपासून इराणी लोक स्वर्गीय देवतांप्रीत्यर्थ यज्ञ करण्याचे शिकले. बेरोसस म्हणतो कीं, अर्टाक्सर्क्सिज नेमोन ( Artaxerxes Mnemon. ) यानें इ. स. पूर्वी तिसऱ्या चौथ्या शतकांत इराणी लोकांनां सगुण मूर्तीची उपासना करण्याचें प्रथम शिकविलें. अनाहित-पूजा सबंध इराणी साम्राज्यावर पसरलेली आढळते. इराणाच्या बाहेर आर्मेनियामध्यें ही देवता दिसते. इरेझ (Erez) क्षेत्रांत अनाहितेची एक सुवर्ण प्रतिमा असून संपत्तीविषयीं तिच्या मंदिराची ख्याती होती. आर्मेनियांतील कुलीन घराण्यांतल्या मुली त्या ठिकाणीं जाऊन लग्नापूर्वी तिऱ्हाइतांशीं संग करीत. ही धर्माच्या नांवाखालीं चालत असलेली अनीति मूळ सेमेटिक असून प्राचीन असगोत्र विवाहपद्धतीचें एक स्वरूप असावें. रोमन अंमलाखालीं इरेझ येथें जुन्या परंपरांना आश्रय मिळूं लागला; अनाहितेचे पवित्र पोळ अकिलीसेने येथें स्वैरतेनें भटकूं लागले; आणि शिकार करून यज्ञिय बळी मिळवण्यांत येऊं लागले.

ह्या इराणी देवीची पॉंटस आणि कॅपॅडोशिया येथेंहि आराधना होत असे. मा (Ma) या श्रेष्ठ देवतेशीं सारूप्य पावल्यामुळें तिच्या देवळांत गुलाम स्त्रीपुरुषांची आश्रयार्थ दाटी होऊं लागली. लीडियामध्यें विशेषतः अनाहितेच्या अस्तित्वाचे अवशेष आढळतात. ग्रीक लोक तिच्या युयुत्सु स्वभावामुळें एकीकडे अथीना देवीशीं व दुसरीकडे तिच्या समृद्धिदायक गुणामुळें ॲफ्रोडीटीशीं हिला एकरूप समजतात. इराणमध्यें खाल्डीयन नक्षत्रोपासनेचा परिणाम घडून ती शुक्राची चांदणी बनली; पण तिला पश्चिमेकडे "पर्शियन अर्टेमिस" किंवा "पर्शियन डायाना" असें नांव देतात. तिला बैल आवडतो म्हणून आर्मेनिया, कॅपॅडोशिया आणि लिडिया प्रांतांत "अर्टेमिस टाऊरोपोलोस" असें चुकीनें समजतात लॅटिन प्रदेशांत फ्रिजीयाच्या "मॅग्ना मेटरशी" ( Magnamater ) ( महामाता ) आणि मिश्र देवतेशीं हिचा संबंध जोडतात.

**अनिरुद्ध** — श्रीकृष्णाचा नातु. प्रद्युम्नाचा मुलगा. रुक्मिराजाची मुलगी रोचना ती याची स्त्री होती. विवाहप्रसंगीं बराच मोठा कलह झाला होता. यास रोचनेपासून वज्र नांवाचा मुलगा झाला होता.

बाणासुराची कन्या उषा ती याची दुसरी स्त्री. या विवाहांत यादवांशीं बाणासुराचें मोठें युद्ध झालें होतें.

उषाहरणाची कथा मनोरंजक व सुप्रसिद्ध असून ती नाटक सिनेमांतूनहि दाखविली जाते. राजा रविवर्म्यांचें उषास्वप्न हें चित्रहि फार मोहक आहे. या कथानकांतील नायक अनिरुद्ध आहे; तथापि त्याचा पराक्रम किंवा दुसरा एखादा गुण त्याच्याविषयीं श्रोत्यांच्या मनांत प्रेम जागृत करीत नाहीं हें खास.

[ भाग. दश. ६१; महा. आदि. २०१; महा. सभा.६० ]

( २ ) वि. सं. १५२० ( शके १४१५ ) सालीं लिहिलेल्या शतानंदाच्या "भास्वतीकरण" ग्रंथावरील टीकेचा कर्ता व भावशर्मन् याचा मुलगा अनिरुद्ध हा इ. स. १४६४ मध्यें जन्मास आला. एवढीच याविषयीं माहिती मिळते.

**अनु**—सोमवंशी ययातिशर्मिष्ठापुत्र. यानें ययातीची जरा ग्रहण केली नाहीं म्हणून यास मुख्य राज्याधिकार न मिळून हा म्लेंच्छाधिपत्य पावला. याला सभानर, चक्षु, परोक्ष असे तीन पुत्र होते. ( मत्स्य पु० ३४ ).

( २ ) ( सोमवंशी ) यदुपुत्र क्रोष्टा त्याच्या ज्यामघ वंशांत जन्मलेला क्रथकुलांतील कुरुवंश राजाचा पुत्र. यास पुरुहोत्र नांवाचा पुत्र होता.

( ३ ) क्रथवंशांत जन्मलेल्या सात्वतपुत्र अंध कुळांतील कपोतरामा राजाचा पुत्र. यास अंधक नांवाचा पुत्र होता.

( ४ ) ऋग्वेदांत अनु व आनव यांचा राष्ट्र म्हणून उल्लेख आला आहे. यदु, पुरु, तुर्वश, द्रुह्यु, वगैरे लोकांबरोबर हेहि उत्तर हिंदुस्थानांत परुष्णीच्या तीरीं होते. यांचा इतिहास तिसऱ्या विभागांत दाशराज्ञयुद्धाच्या प्रकरणांत सांपडेल.

**अनुनय**—अनुनय हा शब्द पुरुष स्त्रियांची किंवा स्त्रिया पुरुषांची प्रेमयाचना करितात त्यासंबंधीं वापरला आहे. या विषयाचें सोपपत्तिक विवेचन करणें झाल्यास तीन भाग करावे लागतील. विवाहपूर्व अनुनय, विवाहोत्तर दंपतींतील अनुनय, आणि विवाहाची अपेक्षा नसतां किंवा वैवाहिक नियमाविरुद्ध अनुनय. विवाहपूर्व अनुनय हा सर्व देशांत दृष्टीस पडतो असें नाहीं. विवाहोत्तर अनुनय हा मात्र चोहोंकडे दृष्टीस पडतो. आणि तसाच वैवाहिक नियमाविरुद्धहि अनुनय चोहोंकडे दृष्टीस पडतो. पशुपक्ष्यांमध्यें देखील संभोगापेक्ष अनुनय दृष्टीस पडतो, तर तो मनुष्य जातींत असावा यांत नवल नाहीं. अनुनयाचें पर्यवसान विवाहांत व्हावें हा बराच अर्वाचीन प्रकार होय. वैदिक काळीं किंवा पौराणिक काळीं अनुनयपद्धति विकासलेली दिसत नाहीं. आणि देशांत केवळ प्रौढ विवाह असले म्हणजे अनुनयपद्धति असते असें मुळींच नाहीं. पहिल्या विभागांत सीलोनमध्यें प्रौढ विवाह बराच परिचित असून अनुनयपद्धति मुळींच कशी नाहीं याचें वर्णन केलें आहे. वेदांमध्यें स्त्रियांसाठीं पुरुषाशीं अनुनय करण्याचा धंदा करणारीं माणसें अथर्ववेदांतील कांहीं सूक्तांतून येतात. गांधर्व विवाहखेरीज करून इतर प्रकारचे विवाहांत अनुनयाची कल्पनाच नाहीं. सीता, द्रौपदी, सावित्री यांची जरी कथा घेतली तरी त्यांत विवाहपूर्व अनुनय दिसत नसून विवाहोत्तर पत्नीधर्म फक्त दाखविला आहे. म्हणजे वस्तुतः अत्यंत प्राचीन कालांत सुद्धां अनुनय नाहीं. दमयंती किंवा दुसऱ्या अनेक राजकन्यांच्या कथा पाहिल्या तरी केवळ दूरस्थ पुरुष व स्त्रिया

यांनीं एकमेकांसंबंधानें माहिती करवून घेऊन किंवा रूपवर्णन ऐकून झुरणें किंवा मला चोरून न्या म्हणून कळविणें याच्या पलीकडे कांहीं मजल गेलेली दिसत नाहीं.

सध्यांची अनुनयपद्धति सविस्तर वर्णावयाची म्हणजे ती तिच्या आत्यंतिक स्वरूपांत वर्णिली पाहिजे. हें आत्यंतिक स्वरूप इंग्लंड व युनायटेड स्टेट्सचा उत्तर भाग यांमध्यें सांपडतें. हें स्वरूप खेड्यांपेक्षां शहरांत अधिक विकासलेलें दृष्टीस पडतें. ज्या मानानें जेथें पैतृक अधिकार किंवा मदत कमी त्या मानानें स्त्रीपुरुषांच्या मोकळ्या व्यवहारास अधिक क्षेत्र असणार.

अनुनयपद्धतीचें पहिलें अंग म्हटलें म्हणजे परिचय होय. पुष्कळशीं लग्नें अशीं होतात कीं जेथें विवाह्य तरुणीतरुणांचा परिचय बऱ्याच दिवसांचा किंवा अगदीं लहानपणापासूनहि असतो. परंतु अनेक लग्नें अशींहि होतात कीं जेथें विवाहपूर्व परिचय फारच थोडा असतो. मजा मारण्याकरितां निदाघकालीं चांगल्या हवेच्या किंवा मौज मारण्याच्या ठिकाणीं गेलेल्या तरुणींतरुणांमध्यें तात्कालिक परिचय होऊन त्या परिचयाचें पर्यवसान विवाहांत होतें, अशीं उदाहरणें कित्येक दिसतात. याप्रकारच्या स्थितीमुळें प्रेमसंपादनापेक्षेनें अनेक तरुणी व तरुण असल्या निदाघक्षेत्रांत जातात. अनेकांचा विवाहपूर्व परिचय एकदोन प्रसंगीं नौकाविहार आणि एकदोन प्रसंगीं नाटकास जाणें यापलीकडे नसतो. गेल्या महायुद्धाच्या कालांत रजेवर असलेले शिपाई थोडके दिवस मिळालेल्या सुटींत सहजगत्या भेटेल अशा तरुणींशीं लग्न करून जात. तेव्हां अर्थात अनुनयामध्यें विवाहपूर्व ओळखीची कालमर्यादा किती असते याविषयीं नियम सांगतां येत नाहीं. प्रथमचा परिचय जो होतो तो कोणातरी कुटुंबाच्या मित्राकडून व्हावा किंवा मुलीच्या हितचिंतकांनीं तिची व तरुणाची गांठ घालावी हें शिष्टमत आहे. कोणत्या तरी रीतीनें ओळख झाली असली तर ती लपवून आमची ओळख योग्य प्रसंगानें झाली असें दाखविण्याचा पुष्कळ तरुणतरुणींचा प्रयत्न असतो. घरगुती किंवा स्नेह्यामार्फत ओळखीपेक्षां स्वयंस्फूर्तीनें व स्वयंनिर्णयानें ओळख करून घ्यावी हा प्रकार पुष्कळ तरुणीतरुणांस रुचतो. रस्त्यामध्यें संध्याकाळीं शहराचा मध्यभाग ज्यांत नाटकगृहें सिनेमा व उपहारगृहें असतात, व मोठमोठालीं दुकानें असतात तो भाग तरुणींकडून व तरुणांकडून गजबजला जातो आणि तेथें कांहीं तरी प्रकार करून तरुणी तरुणाचें मन आकर्षण करून घेते.

**अ नु न या चें मा न स शा स्त्र.**—अनुनयपद्धतीमध्यें एका गोष्टीबद्दल तरुणास व तरुणीस खटपट करावी लागते. ती ही कीं, आपण दुसऱ्याकरितां फार फिकीर बाळगतों, असें दाखवावयाचें नाहीं. आणि पुष्कळदां असें होतें कीं आपलें प्रेम दुसऱ्यांपासून गुप्त ठेवावयाचें.

अनुनय पद्धतीच्या विकासास जी यूरोपांत व अमेरिकेंत अनुकूल परिस्थिति आहे तिचीं अंगें येणें प्रमाणें:—एकतर औद्योगिक वृद्धीमुळें स्त्रियांस बरेंच स्वातंत्र्य प्राप्त होतें. त्यामुळें रोजच्या व्यवहारांत स्त्रियांची अनेक पुरुषांशीं व पुरुषांची अनेक स्त्रियांशीं ओळख होते. एका ठिकाणीं शिकणें, एका ऑफिसांत काम करणें, एका चर्चचे सभासद असणें, एका दुकानांत काम करणें, रस्त्यावरच अन्य स्त्रीपुरुषांची ओळख करणें या प्रकारच्या अनेक अंगांमुळें स्त्रीपुरुषांची ओळख स्वाभाविक होते. वाटेल त्या पुरुषाशीं किंवा वाटेल त्या स्त्रीशीं तरुणीनें किंवा तरुणानें ओळख करावी हें तेथील आईबापांस फारसें संमत नाहीं. पण त्यांस त्याविरुद्ध फारसें कांहीं करितां येत नाहीं. पुष्कळशा लोकांना अलीकडे मुलींच्या लग्नाचे भानगडींत आपण पडूं नये असें कळूं लागलें आहे. युरोपांत व अमेरिकेंत देखील आईबापांनीं वर शोधून ठेवावा व तो मुलींनीं मान्य करावा, ही जी पूर्वागत भावना आहे तिचे अंश आईबापांच्या वर्तनांत अजून दिसून येतात. आणि ते तसे आले म्हणजे आईबाप आपल्यावर कोणीतरी पुरुष लादीत आहेत, अशी कल्पना मुलीस होऊन त्या आणलेल्या पुरुषाचा तिरस्कार, अपमान व द्वेष करूं लागतात. मुलींची वृत्ति पाहूनच किंवा तिच्यावर आपण कोणास तरी लादीत आहोंत, असा तिला संशय येऊं न देतां जुळवाजुळव मुलीच्या हितचिंतकांस करावी लागते. तेथें लग्न जुळविण्याच्या मुत्सद्देगिरीचें काम करणाऱ्या मायमावशा बिलकुल नाहींत असें नाहीं. तथापि त्यांची खटपट बरीच नियंत्रित झाली आहे. इच्छित तरुणाची व मुलीची स्वाभाविक रीत्या गांठ पडेल तर ती पडावी, इच्छित तरुणांस घरीं पाहुणे बोलवावे वगैरे खटपटी अजून होतातच. परंतु या खटपटी विशेषेंकरून वरच्या गृहस्थवर्गांत दिसून येतात. कां कीं संपत्तीनें समान असा वर्ग प्रत्येक गांवांत नियमित असतो. याकरितां स्थानिक योग्यांच्या भरीस बाहेरचे योग्य आणावे लागतात.

औद्योगिक परिस्थितीमुळें स्त्रियांची परिचयकक्षा वाढते एवढेंच नव्हे तर मुलींवर किंवा मुलांवर आईबापांस सक्ती करितां येत नाहीं. मुलगी मिळविते, अर्जिताचा अंश बाजारभावाप्रमाणें घरखर्चास देते, उरलेले पैसे ब्यांकेंत ठेविते. मुलगा तेंच करितो. त्यामुळें जी स्वतंत्रता प्राप्त होते तिचें पर्यवसान पैतृक अधिकाराच्या नियमनांत होतें.

औद्योगिक स्वातंत्र्याशिवाय अनुनयपद्धतीस जोर देणाऱ्या दुसऱ्या संस्था म्हटल्या म्हणजे मजा मारण्याच्या जागा होत. सार्वजनिक उपवनें, नाटकें, सिनेमा, इत्यादि मजा मारण्याच्या ठिकाणीं तरुण पुरुष आपल्या बरोबर मुलींस घेऊन जातात. जी मजा आपण मारावयाची तिची विभागी कोणी सहचरी असली म्हणजे मजा मारण्यास अधिकच आनंद होतो. अनेक ठिकाणें अशीं असतात कीं जेथें स्त्रीपुरुषांस एकमेकांस

घट्ट धरून बसणें आवश्यक होतें. उदाहरणार्थ, दोघांनीं मिळून एकत्र पोहोणें, किंवा समुद्रस्नानास जाणें, कृत्रिम वर खालीं करणाऱ्या रेलवेमध्यें बसणें इत्यादि. असल्या प्रकारची रेलवे अधिक लोकप्रिय करण्याकरितां ती मुद्दाम काळोखांतून न्यावयाची सोय केलेली असते.

**अनुभवजन्यज्ञानवादः**—सर्व ज्ञान इंद्रियदत्त निर्दिष्टापासून होतें असें मत. या मताप्रमाणें प्रारंभीं मन अगदीं कोरें असतें. त्यावर इंद्रियदत्त संवेदना यांत्रिक पद्धतीनें नोंदल्या जातात. मनाचे मानसिक कार्यांचा यांत कांहींच भाग नसतो. मन ज्ञानपूर्ण होण्याच्या या क्रियेंत असंख्य वैयक्तिक संवेदना असतात. सारख्या गोष्टीच्या वारंवार व न बदलणाऱ्या पुनरागमनानें नियम उत्पन्न होतात. हे नियम म्हणजे साहचर्यानें मिळालेल्या अनुभवाचीं लेखी विधानें होत. या विधानांत 'पाहिजेच' असा शब्द येऊं शकत नाहीं. अमुक परंपरा नेहमीं आढळते असें यांत विधान असतें, व त्यामुळें कार्यकारणभावाचें उच्चाटण होतें. या संबंधांतील "अवश्यकतेची" कल्पना सर्वस्वी अनुभवपूर्व असते. अनुभवजन्यज्ञानवादामुळें नैतिक नियमांची निरपेक्ष सत्ता नाहींशी झाली. समाज अथवा राजकर्ते यांच्या सोयीनुरूप व्यक्तींचे कल वळविण्याचे कामीं नैतिक नियमांचा उपयोग होतो. यानें अनुभवाचा खुलासा होत नाहीं असा यावर आक्षेप आहे. वैयक्तिक संवेदना क्षणिक असल्यामुळें ज्ञानप्राप्तिस्तव ग्रहणशक्तीहून भिन्न मानसिक क्रियांची जरूर असते. प्राचीन ग्रीसमध्यें हें मत विशेष प्रचारांत होतें. बेकननें हें मत पुन्हां पुढें आणिलें. लॉक, ह्यूम, मिल, बेंथॅम व इतर साहचर्यवादी यांनीं हें मत व्यवस्थित केलें.

**अनुमति** ( १ ) कर्दमकन्या श्रद्धा, तिच्या ठायीं अंगिरा ऋषीपासून झालेल्या चार कन्यांपैकीं कनिष्ठ.

( २ ) द्वादशादित्यांतील धाता नांवाच्या आदित्याची स्त्री.

( ३ ) शाल्मली द्वीपांतील एक महानदी.

( ४ ) एक ब्रह्मर्षि.

( ५ ) स्कंदाभिषेका करितां आलेली एक देवपत्नी. ( महाभारत शल्यपर्व अध्याय ४५. ).

( ६ ) पौर्णिमेच्या एक अलीकडला दिवस ( तै. सं १, ८, ८, १; ३, ४, ९, १. काठक संहिता १२, ८ वाजसनेयीसंहिता २९,६०; ३४, ८५ षड्विंश ब्राह्मण ५, ६. ) या दिवशीं देवपितरांना पिंड देतात. राजसूय यज्ञांत हिची देवता म्हणून पूजा करितात.

**अनुराधपुर**—हें शहर सुमारें १५०० वर्षे सिलोनची राजधानी होतें. तें कदंबा नदीच्याकांठीं इ० पू० सहाव्या शतकांत अनुराध नांवाच्या ( अनुराधा या नक्षत्रावरून हें नांव पडलें आहे ) राजानें वसविलें. त्यानंतर एक शतकानें पंडुकामय नांवाच्या राजानें आपली राजधानी उपत्तिस्सा येथून हालवून वरील शहरीं नेली. ती इ० सनाच्या आठव्या शतकांतील अग्गबोधी राजाच्या कारकीर्दीपर्यंत तेथें होती. पुढें अकराव्या शतकांत पुन्हां तेथें कांहीं दिवस राजधानी राहून नंतर तेथून कायमची हालविण्यांत आली. सिंहली शेतकरी लोक याला अनुराजपूर असेंहि म्हणतात. या शहराजवळ एक सुंदर तलावहि पंडुकाभय राजानें बांधून ठेवलेला आहे. त्याला व्हिक्टोरियालेक, जयवापी व अभयवापी अशीं तीन नांवें आहेत. त्याचा एकंदर घेर दोन मैलांचा आहे. याच्या दक्षिण कांठापासून सुमारें एक मैलाच्या अंतरावर बोधीवृक्ष आहे. तलावाच्या भोंवतीं जैन, आजीविक, व इतर कित्येक संप्रदायांच्या संन्याशांना राहण्याकरितां जागा बांधलेल्या होत्या. या तलावाच्या उत्तरेच्या बाजूला गामिनी उर्फ बिलान या नांवाचा दुसरा एक तलाव आहे. हे दोन तलाव बऱ्या स्थितींत अस्तित्वांत असून भोंवतालचें शहर व कांठच्या इमारती हीं सर्व मात्र नष्ट झालीं आहेत.

या शहराचें सौंदर्य व कीर्ति वाढविण्यास तिस्स नांवाचा इ० पू० तिसऱ्या शतकांतला राजा कारणीभूत झाला. हा बौद्ध सम्राट् अशोक याचा समकालीन होता. ते दोघे मोठे मित्र होते. तिस्स राजा त्याचे सरदार आणि प्रजाजन यांनीं बौद्ध धर्माचा स्वीकार केला, आणि बौद्ध संप्रदायाच्या अनेक सुंदर इमारती बांधल्या; त्यांपैकीं थूपाराम हिचे जे हल्लीं थोडें अवशेष उरलेले आहेत, त्यांवरून ही फार सुंदर असावी असें दिसतें. ही स्तूपाच्या आकाराची ७० फूट उंचीची इमारत आहे. या इमारतींत बुद्धाच्या अस्थींचे अवशेष आहेत अशी समजूत होती. या इमारतीशेजारीं तिस्स राजानें बांधलेली इस्सारा मुनिविहार नांवाची दुसरी एक इमारत आहे, या इमारतीचेंहि फक्त दगडी काम शिल्लक असून बाकीचा भाग पडलेला आहे. हिच्या शेजारीं एक लहानसा सुंदर तलाव आहे. १० इमारतींपैकीं बाकीच्या सर्व नष्ट झाल्या आहेत.

या ठिकाणचा बोधिवृक्ष २२०० वर्षांचा जुना असून अद्यापहि जिवंत आहे. गया येथील मूळ बोधिवृक्षाची एक खांदी अशोक सम्राटानें तिस्स राजाला नजर केली, ती त्यानें येथें लाविली तिचा हा वृक्ष झालेला आहे, असें सांगतात.

तिस्स राजाच्या मृत्यूनंतर ही राजधानी तामिळ लोकांनीं काबीज केली. त्यांच्यापासून दुत्थगामिनिअभय नांवाच्या राजानें एक शतकानंतर पुनः ती जिंकून घेतली. या राजास सिलोन येथील आख्यायिकांत मोठा मान आहे. यानेंहि अनेक इमारती बांधल्या. त्यांत कांस्य धातूचा राजवाडा ही सर्वांत शोभायमान इमारत होय. हिची उंची १५० फूट होती. तिला खर्च तीस कोटी रुपये म्हणजे सुमारें तीन लक्ष पौंड लागला असें एका बखरींत लिहिलेलें आहे. या राजाची दुसरी इमारत सोनेरी वाळूची दागवा नांवाची आहे. तिला एक हजार कोटी म्हणजे दहा लक्ष पौंड खर्च झाला असें बखरींत सांगितलें आहे. अद्यापहि ही इमारत बौद्ध लोक फार पूज्य मानतात. तिची उंची १८९ फूट असून तिला पालीभाषेंत महाथूप नांव आहे.

महावंश नांवाच्या ग्रंथांत या इमारतीचें विस्तृत वर्णन देण्याकरितां पांच प्रकरणें खर्ची घातलीं आहेत.

अनुराधपूरच्या इतिहासांत वर सांगितलेल्या मोठमोठ्या गोष्टी घडल्यानंतर कांहीं पिढ्या तेथें शांतता नांदली, परंतु इ. पू. १८९ मध्यें तामिळ लोकांनीं मोठ्या सैन्यानिशीं हल्ला करून पुन्हां हें शहर घेतलें. या हल्ल्यामुळें सिंहली लोक दूर जंगला पर्वतांत पळून गेले ते इ. पू. ८९ सालीं परत येऊन त्यांनीं तामिळ लोकांना पुन्हां हांकून लाविलें. हा विजय मिळविणारा सिंहली लोकांचा पुढारी वट्टगामिनि हा होय. त्याचें स्मारक म्हणून अभयगिरि दागवा नांवाचा मोठा स्तूप बांधण्यांत आला. याची उंची ४०० फूट होती. हा स्तूपहि हल्लीं पडलेला असून त्याचे अवशेष थोडे शिल्लक आहेत. या स्तूपाच्या शेजारीं जैन मुनींना राहण्याकरितां पंडुकाभय राजानें बांधलेला एक विहार होता. अशा प्रकारच्या अनेक इमारतींनीं शोभिवंत झालेलें अनुराधपूरचें स्वरुप बरींच वर्षें टिकलें. यानंतरच्या काळांत दुसऱ्या कित्येक इमारती बांधण्यांत आल्या, त्यांपैकीं इसवी सनाच्या चौथ्या शतकांत बांधलेली जेतवन आराम नांवाची इमारत अद्याप अस्तित्वांत आहे.

ह्या अनुराधपुर शहराचा उल्लेख चीनमधून इ०स० ४११-४१२ मध्यें आलेल्या फाहिआन नांवाच्या बौद्ध यात्रेकरूनें आपल्या ग्रंथांत केलेला आहे. ह्या शहरांतील भव्य व सुंदर इमारतींचें तेथील भिक्षूंच्या विद्वत्तेचें व राजा व प्रजाजन यांच्या पवित्राचरणाचें फार सुरेख वर्णन त्यानें केलें आहे. त्या वेळीं अनुराधपुर येथें एक मोठें विद्यापीठ होतें. त्याची प्रसिद्धी गंगेच्या कांठच्या नालन्दा येथील विद्यापीठाइतकी मोठी होती. या विद्यापीठांत वैद्यक, ज्योतिष, काव्य, वाङ्मय, वगैरे विषयांचें शिक्षण देण्यांत येत असे. येथें बहुतेक पाली ग्रंथांचें अध्ययन होत असे. अध्ययनविषयांत व्याकरणग्रंथ व शब्दकोशहि असत. नीतिशास्त्र, मानसशास्त्र, धर्मशास्त्र व धार्मिक तत्त्वज्ञान हे विषयहि शिक्षणक्रमांत असत. या विद्यापीठांत सीलोनच्या सर्व भागांतले इतकेंच नव्हे तर दक्षिण व उत्तर हिंदुस्तानांतील दूरदूरचेहि विद्यार्थी अध्ययनाकरितां येत असत. अशा विद्यार्थ्यांपैकीं बहार प्रांतातील गया येथून आलेला सुप्रसिद्ध भाष्यकार बुद्धघोष हा एक होता. बुद्धघोष सीलोनमध्यें असतां अनुराधपुर शहराचा पाण्याचा पुरवठा वाढविण्याकरितां ५० मैल अंतरावर कालवापी या नांवाचा आणखी एक सुंदर तलाव धातुसेन नांवाच्या राजानें इ०स० ४५० मध्यें बांधला. या तलावाचा परीघ ५० मैल असून त्याचा एका बाजूचा बांध १४ मैल आहे. तलावापासून कालवे खणून शहरापर्यंत पाणी आणलेलें आहे; या कामापैकीं बहुतेक अद्याप जसेंच्यातसें कायम आहे; व त्याचा शेतकीच्या कामाला फार मोठा उपयोग पूर्वी होत असावा. अनुराधपूर शहरांतील शेवटचें मोठें बांधकाम हेंच होय.

यानंतर येथील राजघराण्यांची आपसांत अनेक युद्धें झालीं. त्यावेळीं ते तामिळ लोकांना मदतीस बोलावीत असत. या तामिळ लोकांच्या लुटारू सैन्यानें अनुराधपुर शहर अनेक वेळां लुटलें. अखेर इ. स. ७५० मध्यें येथून राजधानी हालवून दक्षिणेकडे पुलस्तीपूर येथें नेण्यांत आली. अनुराधपुर पुढें दोनतीनशें वर्षें एका मागून एक असें निरनिराळ्या पक्षांच्या हातीं गेलें. अकराव्या शतकामध्यें एका सिंहली तोतयानें तें पुन्हा हस्तगत केलें. परंतु त्या तोतयाला लवकरच हांकून देण्यांत आलें व राजधानी पुलस्तीपूर येथेंच कायम राहिली. इ. स. १३०० नंतर अनुराधपुर येथील बहुतेक वस्ती उठून आसपास जंगल माजलें. बोधिवृक्षाजवळ लहान सहान झोंपड्यांत थोडेसे भिक्षू रहात असत. अलीकडे ब्रिटिश सरकारनें उरलेले अवशेष नीट स्थितींत कायम ठेवण्याचें मनावर घेतलें आहे.

१९०५ सालीं मटलेपासून अनुराधपुरापर्यंत आगगाडीचा फांटा वाढविण्यांत आला आहे. लोकसंख्याः—शहर ३६७२; प्रांत ७९११.

**अनविंद**.—(१) दुर्योधनाकडील एक वीर. यास अर्जुनानें मारलें. वसुदेवभगिनी राजाधिदेवी व तिचा पति अवंत्यराजा जयसेन यांचा धाकटा मुलगा. थोरल्या मुलाचें नांव विंद (महा. द्रोण. ९९).

(२) केकेय राजाचे दोन पुत्र विंद व अनुविंद. हा अनुविंद भारती युद्धांत पांडवांकडे होता, तो सात्यकीनें मारिला. (महा. कर्ण. १३).

(३) धृतराष्ट्राच्या शतपुत्रांतील एक (महा. आदि. ५६).

**अनुशाल्व**.—सौभपति शाल्वराजाचा भाऊ. शाल्वास कृष्णानें मारलें म्हणून कृष्णाचा द्वेष धरून पांडवांच्या अश्वमेधकालीं ससैन्य गुप्तरूपानें हस्तिनापुरीं आला आणि प्रसंग साधून अश्वाचें हरण केलें. भीम ससैन्य याच्या पाठीस लागला. यास पकडून आणण्याचे विडे प्रद्युम्न व वृषकेतु यांनीं उचलले. प्रद्युम्नाचा पराभव झाला. वृषकेतूनें मात्र पकडून आणलें. मृत्यूच्या भीतीनें त्यानें अश्व परत दिला, सख्य केलें, आणि अश्वमेधास साह्य करण्याचें यानें अभिवचनहि दिलें (जै. अश्वमेध अ. १२–१४). याचा महाभारतांत उल्लेख नाहीं.

**अनूपगडः**—राजपुताना. बिकानेर संस्थानाच्या सूरतगड निझामतींतील अनूपगड विभागाचें मुख्य ठिकाण असून विकानेरच्या उत्तरेस ८२ मैलांवर आहे. लोकवस्ती सुमारें एक हजार. उ. अ. २९° १२' व पू. रे. ७३° १२.' इ. स. १६७८ सालीं येथील किल्ला बांधला व बिकानेरचा संस्थानिक अनूपसिंग याचें नांव किल्यास ठेवलें. या विभागांत ७५ खेडीं असून, एकंदर लोकवस्ती सुमारें आठहजार आहे; पैकीं शेंकडा ५१ राठ आहेत; पाण्याचा या भागांत दुष्काळच असतो. शेती यथातथाच असून गुरचरण मात्र बरें आहे. सज्जी आणि

लाणा हीं झाडें या भागांत पुष्कळ उगवतात. यापासून सोडा तयार करतात. ( इं. गॅ. )

**अनूपशहर तहशीलः**—संयुक्तप्रांत बुलंद शहर जिल्ह्याची पूर्वेकडील तहशील असून तींत अनूपशहर, अहार आणि दिबई हे परगणे आहेत. उ. अ. २८° ५' ते २८° ३७' व. पू. रे. ७७° २८' ते ७८° २८'. क्षेत्रफळ ४४४ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें दोनलक्ष ऐंशी हजार.

या तहशिलींत चार गांवें व ३७८ खेडीं आहेत इ. स. १९०३–४ मध्यें जमीनमहसूल रु. ४९९००० इतर कर रु. ८०००० होतें. अपर गँजेस कनालच्या अनूपशहर फांट्यानें या तालुक्यांतील जमीन भिजली जाते. इ. स. १९०३–४ सालीं लागवडीखालीं असलेल्या ३३९ चौरस मैल जमिनी-पैकीं १५८ चौरस मैल बागाइती होती. ( इं. गॅ. ५. ).

**अनूपशहरः**—संयुक्त प्रांत बुलंद शहर जिल्ह्याच्या अनूपशहर तहशिलीचें मुख्य ठिकाण. उ. अ. २८° २१,' व पू. रे. ७८° १६' लोकसंख्या सुमारें आठ हजार. जहांगीर बादशहाच्या कारकीर्दींत बरगूजर राजा अनूप राय यानें हें शहर वसविलें. दिल्ली ते रोहिलखंड रस्त्यावर गंगानदीकाठीं हा गांव असल्यामुळें अठराव्या शतकांत यास फार महत्त्व होतें. इ. स. १७२७ ते १७५९ पर्यंत अहमदशहा अबदाली या बाजूस होता; व इ. स. १७६१ सालीं मराठ्यांचा पानिपत येथें ज्या संघानें मोड केला त्या संघास येथेंच व्यवस्थित स्वरूप देण्यांत आलें होतें. इ. स. १७७३ सालीं अयोध्येचा वजीर व ब्रिटिश यांनीं मराठ्यांनीं रोहिलखंडावर केलेल्या स्वारीस ज्या वेळीं तोंड दिलें त्यावेळीं त्यांच्या सैन्याची छावणी येथेंच पडली होती. या वेळेपासून ब्रिटिशांची छावणी इ. स. १८०६ पर्यंत येथें होती. यानंतर ती मीरत येथें नेण्यांत आली. येथें इ. स. १८६६ पासून म्युनसिपालिटी असून इ. स. १९०३-४ सालीं तिचें उत्पन्न ११००० रुपये असून १५००० रुपये खर्च होता. जवळचें रेल्वे स्टेशन औध रोहि-लखंड रेलवेवरील डिबइ होय. डिबई येथून १४ मैल दूर आहे. एक तहशिल शाळा व मिशनरी अँग्लो व्हर्नाक्युलर स्कूल आहे. शहरापुरतें कापड, ब्लँकेटें व जोडे येथें तयार होतात. नीळीचा एक कारखाना येथें आहे. पाऊस सरासरी २८,°८५." [ इं. गॅ. अर्नोल्ड–इं. गाइड ]

**अनूपदेशः**—याची राजधानी माहिष्मती नांवाची होती. तींत पूर्वी सहस्रार्जुन राहून राज्य करीत असे. भारती युद्धा-च्या काळीं येथें नील नांवाचा राजा असून तो पांडवांकडे होता. ( महा. भीष्म. ९ ).

**अनूपवायु.**—अनूपवायूस ( मार्शग्यास—मिथेन ) दल-दलवायु, मथुन, मथिल उदिद अशीं नांवें आहेत. याची सारणी कउ४ किंवा कउ३.उ अशी आहे. दलदलीच्या जागेंतील कुजलेल्या पाण्यांतून व इतर पदार्थांतून हा वायु निघतो. लांकूड व दुसरे सेंद्रियपदार्थ यांचें शुष्क पातन केल्यानें हा वायु नेहमीं तयार होतो. कधीं कधीं पाषाण तेला-च्या खाणीसमीप हा जमिनींतून निघतो. मनुष्याच्या कोठ्यांतून जे वायु निघतात त्यांत देखील हा वायु असतो. खनिज कोळशापासून प्रकाशाकरितां तयार केलेल्या धुरांत हा शेंकडा ३० ते ४० प्रमाणांत असतो.

कृतिः—कृत्रिमरीतीनें अनूप तयार करण्याकरितां कर्ब-द्विगंधकिद व उज्जगंधकिद यांच्या वाफेचें मिश्रण आरक्तोष्ण तांब्यावरून न्यावें म्हणजे अनूप तयार होतो तो असाः

| कर्बद्विगंधकिद | | उज्जगंधकिद | | ताम्र |
|---|---|---|---|---|
| कग २ | + | २ उ २ ग | + | ४ ता२ |
| ताम्रगंधकिद | | अनूप | | |
| =४ ता २ ग + | | क उ ४ | | |

(२) दोन भाग सिंधु दार्वित, ( सोडिअमॲसिटेट ) दोन भाग दाहक पालाश किंवा सिंधु आणि ३ भाग ताज्या भाज-लेल्या चुनकळ्या यांचें मिश्रण तांब्याच्या किंवा लोखंडाच्या सरफोसांत ( बकपात्रांत ) उष्ण केलें म्हणजे शुद्ध अनूप तयार होतो, तो असा

| सिंधु दार्वित | दाहक सिंधु | अनूप | सिंधुकर्वित |
|---|---|---|---|
| कउ३.कप्र२धु + | धु प्र उ = | कउ ४ + | धु २ कप्र ३ |

चुना मिसळण्याचा उद्देश मिश्रण लवकर वितळूं नये इतकाच असतो. या रीतीनें तयार केलेल्या अनूप वायूंत थोडा उज्ज व दारिन व इथिलीन यांची वाफ मिश्र असते.

( ३ ) शुद्ध अनूप तयार करण्याकरितां मथिल अदिद ( मेथिल आयोडाइड )वर, जस्त व पाणी यांचें कार्य करावें. नुसत्या जस्ताचें जोरानें कार्य घडत नाहीं म्हणून तांबें चढविलेल्या जस्ताचा उपयोग करावा. यास जशदताम्रयुग्म ( Zinc copper couple—झिंक कॉपर कपल ) म्हणतात. जस्ताच्या बारीक गोळ्या अगदीं सौम्य गंधकाम्लानें धुऊन शुद्ध करून त्या मोरचूताच्या द्रवांत घालाव्यात, त्यावर तांबें चढलें म्हणजे बाष्पजलानें धुऊन शेवटीं अल्कहलानें धुऊन घ्यावें.

हें जशदताम्रयुग्म तापक बाटलींत ( बॉयलिंग फ्लास्क ) घालून त्यांत मथिल अदिद व तितकाच अल्कहल यांचें मिश्रण ओतावें. तोंडास वायुवाहक नळी बसवून जलतापानें बाटलीस उष्णता द्यावी म्हणजे जस्ताचें कार्य अदिदावर घडून अनूप वायु सावकाश एकसारखा निघतो. हा पाण्यावर कांहीं वेळ राहूं दिला म्हणजे अदिद व अल्कहलाची वाफ पाण्यांत विद्रुत होऊन शुद्ध अनूप बाटलींत राहतो. रासायनिक कार्य खालीं लिहिल्याप्रमाणें घडतें:—

| मथिल अदिद | जशद | पाणी | अनूप | जशद अद उज्जित |
|---|---|---|---|---|
| कउ३द | + ज | + उ२प्र | =कउ४ | + ज. द. उप्र. |

धर्मः—अनूप कउ४ ( दलदलवायु=मार्श ग्यास ) रंगहीन व गंधहीन वायु असतो. याचें वि. गु. ०. ५५९ असतें. अनूप मध्यें ज्वलनक्रिया चालत नाहीं परंतु हा स्वतः हवेंत ज्वल-

नीय आहे. याची ज्योत फिकट असते. अनूप पाण्यांत अविद्रव्य आहे, परंतु दुप्पट आकारमानाच्या (मापाच्या) अल्कहलांत विद्रुत होतो. हवेच्या १४० पट दावानें ०° श उष्णमानावर किंवा—१५५° ते—१६०° श उष्णमानावर हवेच्या एक पट दावाखालीं हा रसरूप होतो. हा रसरूप वायु—१६२° श वर उकळतो आणि—१८६° श वर घन होऊन थिजतो. अनूपचें स्थित्यंतर (दर्शक) उष्णमान—९९.५° श आहे. अनूपमध्यें हवा मिश्र झाली म्हणजे तें मिश्रण वत्ती लागतांच उडतें. असें मिश्रण कोळशाच्या खाणींत वारंवार तयार होतें व त्यामुळें अपघात होतात. यामध्यें पुष्कळ हवा मिसळलेली असल्यास त्यापासून जीवनक्रियेस अपाय होत नाहीं. यांत विजेच्या ठिणग्या एकामागून एक सोडिल्या किंवा शुभ्रोष्ण नळींतून त्यास नेलें तर त्याचें पृथग्भवन होतें, कर्व भांड्याच्या बाजूवर जमा होतो आणि याच्या दुप्पट आकाराचा, म्हणजे दोन मापें अनूप असल्यास ४ मापें उज्ज वायु वेगळा होतो, या क्रियेंत इथुन ( इथेन ), इथिलीन ( एथायलीन ); दारिलीन ( ॲसिटायलीन ), उद्दीन ( वेंन्झीन ) वगैरे उत्कर्बांचे अल्पअंशहि तयार होतात.

याचें पूर्ण ज्वलन करण्यास दुप्पट आकाराचा ( मापे ) प्राणवायु लागतो. दोन मापें अनूपवायु व ४ मापें प्राणवायु यांचे ६ मापें मिश्रण—विजेच्या ठिणग्यांनीं—उडविलें तर दोन मापें कर्वद्विप्राणिद ( कार्बनडाय आक्साइड ) आणि ४ मापें पाण्याची वाफ बनते. कर्वद्विप्राणिदांत ( क प्र २ ) त्याच्या आकाराइतक्या आकाराचा प्राण वायु असतो म्हणजे दोन मापें प्राण असतो. यावरून मूळच्या चार मापें प्राणापैकीं दोन मापें कर्वशीं संयोग पावला व वाकी दोन मापें, चार मापें उज्ज वायूशीं संयोग पावून पाणी झालें. यावरून अनूपमध्यें ४ मापें उज्ज किंवा ४ भार उज्ज १२ भार कर्वशीं संयोग पावलेला असतो असें सिद्ध होतें.

अनूपवायु अतिशय स्थिर पदार्थ आहे. त्यावर क्रुमाम्ल ( क्रोमिक ॲसिड ), नत्राम्ल ( नायट्रिक ॲसिड ) किंवा नत्राम्ल व गंधकाम्ल यांचे मिश्रणाचें कांहीं रासायनिक कार्य घडत नाहीं. परंतु हर ( क्लोरीन ) व स्तंभ ( ब्रोमीन ) यांचें कार्य त्यावर घडून आदिष्ट पदार्थ होतात. अंधेरांत हरचें कार्य अनूपवर घडत नाहीं. पण एक माप अनूप व दोन मापें हरवायु यांचें मिश्रण सूर्यप्रकाशांत नेतांच उडतें, आणि कर्व असंयुक्त होऊन उद्धराम्ल ( हायड्रो क्लोरिक ॲसिड ) तयार होतें. विरल प्रकाशांत ( डिफ्यूज्ड लाइट ) हर, उज्जच्या स्थानीं जाऊन कउ३ह, कउ२ह२, कउह३ व कह४ हे आदिष्ट पदार्थ बननात. परंतु पाणी संनिध असल्यास उद्धराम्ल व कर्वद्विप्राणिद तयार होतात.

**अनेकुल तालुका.**—म्हैसूर संस्थान. बंगलोर जिल्ह्याचा आग्नेयीकडील तालुका उ. अ. १२° ४०′ ते १२° ५५′ व पू. रे. ७७° ३२′ ते ७७° ४९′. क्षेत्रफळ १९० चौरस मैल. लोकसंख्या सुमारें साठहजार. या तालुक्यांत तीन गांवें व २०२ खेडीं आहेत. इ. स. १९०३–४ मध्यें जमीनमहसूल १२६००० रुपये होता. ( इं. गॅ. ५. )

**अनेकुल गांव.**—म्हैसूर संस्थान. बंगलोर जिल्ह्याच्या अनेकुल तालुक्याचें मुख्य ठिकाण. बंगलोरच्या आग्नेयीस २२ मैलांवर आहे. उ अ. १२° ४३′ व पू. रे. ७७° ४२′ लोकसंख्या सुमारें पांचहजार. हल्लींचा किल्ला व तलाव सुगतूरच्या संस्थानिकानें सतराव्या शतकांत बांधला आहे. यानंतर शंभर वर्षांनीं अनेकुल हें म्हैसूर संस्थानाचें मांडलिक होतें व इ. स. १७६० सालीं तें हैदरानें आपल्या राज्यास जोडलें. इ. स. १४०० सालीं डोमिनिकन लोकांनीं येथें एक प्रार्थनामंदीर वांधलें होतें. इ. स. १८७० सालापासून येथें म्युनसिपालिटी आहे. इ. स. १९०३-४ मध्यें उत्पन्न रु. ३१०० खर्च रु. ४६०० होता. ( इं. गॅ. ५. )

**अनेवाडी**—सातारा जिल्ह्यांतील एक गांव. मराठेशाहींतील पत्रांत या गांवाचा उल्लेख अनेक वेळां येतो. एका पत्रांत याचें वर्णन "आज दिवाण ठाणें ता॥ देगाव किले सातारा ता॥ हुदेदारानी व मोकदमानी मौजे अनेवाडी प॥ कुडाल किले चंदन—" असें आलें आहे ( रा. खं. १५. १०१. १५५ ). निंबच्या गोसाव्याला सनद करून दिली त्यांत अनेवाडीचा एक गला आहे ( रा. खं. १५. १५४. १८९; खं. १५. १५५. १९२ ). येथून प्रतिवर्षी अन्नदानाकरितां तुरी व गहूं येत असत असें कांहीं पत्रांवरून दिसतें ( रा. खं. १५. ६२. १२३; ६४. १२९; ९१. १४८–९; १५२. १८५ ).

**अनूबाई घोरपडे.**—बा ल प ण व सं सा र—बाळाजी विश्वनाथ पेशव्याची सर्वांत धाकटी कन्या. हिचा इ. स. १७१३ सालीं इचलकरंजी घराण्यांतील व्यंकटराव नारायण घोरपडे याशीं वयाच्या सहाव्यासातव्या वर्षी सातारा मुक्कामीं विवाह झाला. व्यंकटराव व अनूबाई यांच्या विवाहासंबंधानें अशी एक गंमतीची आख्यायिका प्रसिद्ध आहे कीं, या लग्नांत वरपक्षाकडील सेनापतीच्या घरच्या बायकांनीं 'वधूपक्षाकडच्या बायकांनीं बुरखा घेतल्याशिवाय आमच्या मांडवांत पाऊलसुद्धां टाकूं नये' असा हट्ट धरून तो वधूपक्षाकडील बायकांच्या इच्छेविरुद्ध शेवटास नेला होता. अनूबाई व व्यंकटराव या उभयतांना वर्षांतून बरेच दिवस पुण्यांत आपल्याजवळ राहतां यावें म्हणून पेशव्यांनीं इ. स. १७२२ सालीं व्यंकटरावास राहण्याकरितां पुण्यास वाडा बांधून दिला व तेथील संसाराच्या सोईकरितां मौजे वडगांव तर्फ चाकण हा सबंध गांव, पर्वतीनजीकचा बाग व हडपसर येथील बाग त्यास इनाम करून दिला. अनूबाईस तिचीं वेणूताई व नारायणराव ( जन्म इ. स. १७२३-२४ ) हीं दोनहि अपत्यें पूर्व वयांतच झालीं. ही वेणूताईच पुढें पेशवाईतले प्रसिद्ध सरदार त्रिंबकराव मामा पेठे यास दिली.

राजकारणांत प्रवेशः—इ. स. १७४५ मध्यें अनूबाईच्या पतीस क्षयरोगानें मृत्यु येऊन तिला वैधव्यदशा प्राप्त झाली. तथापि अनूबाईची राजकारणांतील महत्त्वाची कामगिरी यानंतरच्या काळांतीलच आहे. नारायणराव व्यंकटेश याच्या कारकीर्दींत इचलकरंजी संस्थान वैभवाच्या शिखरास जाऊन पोंचलें तें अनूबाईच्या कर्तृत्वामुळेंच होय. नानासाहेब पेशवे व त्यांचे बंधू हे अनूबाईचे भाचे असल्यानें त्यांजपाशीं असलेल्या तिच्या वजनामुळें संस्थानचें बरेंच हित झालें. पेशव्यांनीं नारायणरावांकडे व्यंकटरावाची सरदारी पूर्ववत् चालू ठेवून प्रत्येक स्वारींत त्याजकडे कांहींना कांहीं तरी कामगिरी सोंपविली एवढेंच नव्हे तर इनामें, तैनाता देऊन, मोठमोठ्या मामलती सांगून व मुलूखगिरींत संस्थानिकांकडे खंडणी करार करण्याच्या बाबींतील बोलाचाली त्याजवरच सोंपवून लाखो रुपये त्यास मिळवून दिले.

जहागिरींची व मामलतींची प्राप्तिः—अनूबाई ही बाळाजी विश्वनाथाची कन्या असल्यामुळें शाहू महाराजहि स्वतः तीस बरेंच मानीत होते. व्यंकटराव वारल्यावर शाहूनें अनूबाईचा हा संबंध लक्षांत आणून सवंध आजरें महाल तीस इनाम करून दिला. पुढें १७५३ सालीं पेशवे करवीरकर संभाजीची मर्जी सुप्रसन्न करून घेण्याकरितां कर्नाटकच्या मोहिमींतून करवीरास गेले तेव्हां अनूबाईनें ती संधि साधून त्यांच्याबरोबर राहून, आजरें महालापैकीं एकतर्फी ३१ खेडीं कापशीकरांस संभाजी महाराजांकडून मोकासा चालत आलीं असल्यामुळें त्यांची रीतसर नवी सनद तिनें शंभु छत्रपतीकडून करून घेतली. या प्रसंगीं पेशव्यांस भीमगड, पारगड व वल्लभगड हे तीन किल्ले करवीरकरांकडून जहागीर मिळाले. त्यांची मामलत पेशव्यांनीं अनूबाईसच सांगितली. याच वर्षीं राणोजी घोरपडे यानें करवीर दरबाराशीं चाललेल्या कलहांत आपणांस अनूबाईकडून द्रव्याची व फौजेची कुमक होते हें लक्षांत आणून नारायणरावास गवसें गांव इनाम दिला. १७५६ सालीं पेशव्यांची सावनुरावर मोहीम झाली तींत अनूबाई हजर होती. या मोहिमींत पेशव्यास सोंधें संस्थानिकाकडून पूर्वीं इचलकरंजीकरांकडे असलेला मर्दनगडचा किल्ला मिळाला व तो त्यांनीं इचलकरंजीकरांच्या स्वाधीन करून त्यांत त्यांचे लोक ठेवले. याप्रसंगीं, नवीन मिळालेला मुलूख व पूर्वींचा मुलूख मिळून धारवाडच्या विस्तृत सुभ्याची मामलत धारवाडच्या किल्ल्यासुद्धां अनूबाईस पेशव्यांकडून मिळाली.

मातापुत्रांतील कलहास आरंभः—अनूबाईचा मुलगा नारायणराव हा आतां वयांत आला असल्यामुळें त्याला आपल्या आईच्या ओंजळीनें पाणी पिण्याचा कंटाळा येऊन मातापुत्रांत वितुष्ट आलें. हा वितुष्टाचा प्रकार नारायणराव आपल्या आईच्या सांगण्याप्रमाणें १७५७ मध्यें पेशव्यांबरोबर श्रीरंगपट्टणाच्या स्वारीस न जातां दुसरीकडे गेला तेव्हां उघडकीस आला. तेव्हां अनूबाईनें आपल्या मुलाची कशीबशी समजूत काढून त्यास १७५९ सालीं इचलकरंजीस परत आणलें.

अनूबाई व जिजाबाई यांचा संबंधः—१७५९च्या अखेरीस मराठ्यांची व मोंगलाची लढाई सुरू झाली तेव्हां अनूबाई नगरास येऊन पेशव्यांजवळ राहिली. १७६१ सालीं मात्र अनूबाई पेशव्यांच्या स्वारीबरोबर न जातां इचलकरंजीसच राहिली. याचें कारण शेजारीं करवीरच्या राज्यांत राज्यक्रांतीचा समय जवळ येऊन ठेपला होता हें होय. त्या सालच्या जानेवारींत संभाजी महाराजांचें देहावसान झालें तेव्हां अनूबाईनें तें वर्तमान टाकोटाक पेशव्यांस लिहून कळविलें. अशारीतीनें संभाजीच्या मरणानंतर करवीर संस्थान खालसा करण्याची मसलत पेशव्यांनीं योजिली तींत अनूबाईचें प्रथमपासूनच अंग दिसून येतें. पेशव्यांनीं करवीरच्या राज्याची जप्ती करण्याकरितां इचलकरंजीकरांकडील माणसें पाठविल्यामुळें जिजाबाईचा तर असा पक्का ग्रह झाला होता कीं सर्व कारस्थानाच्या मुळाशीं अनूबाईच आहे. पुढें जिजाबाईनें आपली सवत गरोदर असल्याची हूल उठविली तेव्हां त्या गोष्टीची परीक्षा करून बाळंतपणाच्या वेळीं प्रत्यक्ष हजर राहण्याकरितां पेशव्यांच्या सांगण्यावरून अनूबाई करवीरास जाणार होती. पण पानिपतचा पराभव व नानासाहेबाचा मृत्यु यांमुळें तो बेत रहित झाला.

पुत्राचा अव्यवस्थितपणा व मृत्युः—१७६१ च्या पावसाळ्यांत अनूबाई आपल्या मामलतीच्या ठिकाणीं धारवाडास होती. १७६२ च्या सुमारास अनूबाईचें आपल्या मुलाशीं पुन्हां बिनसलें. नारायणराव आतां व्यसनाधीन होऊन कारभारांत व खासगी वागणुकींत अव्यवस्थितपणा करूं लागला. त्यास व त्याच्या स्त्रियेस यापुढें अनूबाईनें नजरकैदेंत ठेवल्याप्रमाणें स्थिति होती. १७६४ सालीं अनूबाईच्या शरीरीं समाधान नसल्यामुळें ती माधवरावाबरोबर हैदराबरील स्वारीस येऊं शकली नाहीं. पानिपतच्या युद्धानंतर हैदरानें तुंगभद्रेच्या उत्तरेस स्वाऱ्या करून धारवाड काबीज केलें होतें तें या स्वारींत पेशव्यांनीं काबीज करून धारवाडचा सुभा मोकळा केला. व त्याची मामलत पुन्हां इचलकरंजीकरांना सांगितली. अनूबाई इचलकरंजीस दुखणेकरी पडून होती, ही संधि साधून नारायणरावानें दंगा आरंभला. पण अनूबाई लवकरच बरी झाल्यानें नारायणरावाचे बेत विरघळून जाऊन त्यास पुन्हां प्रतिबंधांत रहावें लागलें. नारायणरावाचें आतां सरकारी कामगिरीकडे लक्ष राहिलें नसल्यामुळें पेशव्याच्या मनांत त्याचें पथक मोडावें व सरदारी काढून घ्यावी असें आलें होतें; पण १७६६ च्या जूनमध्यें अनूबाईनें पुण्यास जाऊन व आपली भीड खर्च करून व्यंकटरावाच्या नांवें सरदारी करून घेतली. इ. स. १७६९ त मामलतीसंबंधीं बरीच बाकी तुंबल्यामुळें पेशव्यांनीं धारवाडचा सुभा इचलकरंजीकरांकडून काढून घेऊन बाकी वसूल करण्याकरितां कारकून व ढालाईत इचलकरंजीस पाठविले.

हा तगादा उठविण्याकरितां मुलगा आजारी होता तरी त्यास तसाच टाकून अनूबाई पुण्यास गेली व रदबदली करून पेशव्यांकडून बरीच सूट मिळवून राहिलेली बाकी चार महिन्यांत फेडण्याचा तिनें करार केला. या सुटीसंबंधीं कित्येक रकमांवर पेशव्यांचा 'वडील मनुष्य सबब रयात' असा शेरा होता. इ. स. १७७० मध्यें पेशव्यांची स्वारी कर्नाटकच्या मोहिमीस निघाली तेव्हां अनूबाई आपल्या नातवासह जेऊर मुक्कामीं त्यांच्या लष्करांत जाऊन पोहोंचली. पण इतक्यांत मुलगा वारल्याची बातमी आल्यामुळें ती पुन्हां इचलकरंजीस आली. अनूबाईचा आतां वृद्धापकाळ झाला असल्यामुळें तिच्यानें राज्यकारभाराची दगदग उरकेनाशी झाली होती. त्यांतच पुन्हां हा पुत्रशोक प्राप्त झाला! तथापि धैर्य धरून आपला नातू व्यंकटराव याच्या कल्याणाकरितां तिनें पूर्वीप्रमाणें कारभार पुढें चालविला.

आणखी आपत्तिः—इ. स. १७७३ सालीं त्रिंबकराव मामा पंढरपुराजवळ राघोबा दादाच्या पक्षाशीं झालेल्या लढाईंत मारले जाऊन अनूबाईच्या मुलीवर वैधव्याचा दुर्धर प्रसंग ओढवला. तेव्हां अनूबाई आपल्या नातवासह मुलीच्या सांत्वनार्थ पुण्यास गेली. तो राज्यक्रान्तीचा काळ असल्यानें अनूबाईनें दूरदर्शीपणा करून आपल्या जवळचा जामदारखाना व जडजवाहीर आपल्याबरोबर पुण्यास घेऊन जाऊन पुरंदरास पेशव्यांच्या जामदारखान्यांत नेऊन ठेवलें. इ. स. १७७४ च्या अखेरीस करवीरकरांनीं रघुनाथराव दादाच्या चिथावणीवरून पेशव्यांच्या मुलुखास उपद्रव देण्याचा उपक्रम करून त्यांनीं इचलकरंजीवर स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. अनूबाईनें त्यांशीं सलोखा करावा म्हणून पुष्कळ प्रयत्न केला पण उपयोग झाला नाहीं. तेव्हां अनूबाईनें न डगमगतां कोल्हापूरकरांच्या दोन स्वाऱ्या परतवून लावल्या; परंतु असें नेहमीं होऊं लागल्यास निभाव लागणार नाहीं हें जाणून पुन्हा या स्वाऱ्या न व्हाव्या म्हणून अनूबाईनें पुण्याच्या दरबारीं खटपट केली. पण पुणें दरबार हैदर व इंग्रज यांशीं लढण्यांत गुंतलें असल्यामुळें तिकडून अनूबाईस फारशी मदत होऊं शकली नाहीं.

तोतयाचें राजकारणः—आपल्या आयुष्याच्या अखेरी अखेरीस अनूबाईनें एक अविचाराचें राजकारण करून आपला फार दुर्लौकिक व नुकसान करून घेतलें. १७७६ सालीं पेशव्यांनीं भाऊसाहेबाच्या तोतयाची चौकशी केली तेव्हां अनूबाई पुण्यास होती. तो तोतया नसून खरोखर भाऊसाहेबच आहे असें अनूबाईचें मत होतें. तिची भ्रांति दूर करण्याकरितां पेशव्यांनीं त्या तोतयास कांहीं दिवस अनूबाईच्या वाड्यांत ठेविलें होतें तरी तिचें तें मत तसेंच कायम राहिलें, यामुळें १७७६ सालीं रत्नागिरीच्या मामलेदारानें तोतयास कैदेंतून सोडून त्याचें खूळ माजविलें तेव्हां अनूबाईनें तोतयाच्या मदतीस व्यंकटरावाची रवानगी केली. यामुळें पुणें दरबाराकडून तोतयाचें पुढें पारिपत्य झालें तेव्हां इचलकरंजीकरांची देशमुखी, सरदेशमुखी, तैनाती गांव व इनामगांव या सर्वांवर जप्ती आली. पण पटवर्धनांनीं रदबदली केल्यामुळें नानाफडनवीस व सखाराम बापू यांनीं अनूबाईच्या वृद्धापकाळाकडे लक्ष देऊन इचलकरंजीकरांकडून सवा लक्ष रुपये गुन्हेगारी घेऊन ती जप्ती उठविली.

राजकारणसंन्यास व मृत्युः—तोतयाच्या मसलतीचा असा परिणाम झाल्यावर अनूबाईनें संस्थानच्या कारभारांतून आपलें अंग काढून घेतलें. ती काशीयात्रेस गेली होती इतकी माहिती मिळते पण कधीं गेली तें साल कळत नाहीं. तिला इ. स. १७८३ सालीं तुळापूर येथें देवाज्ञा झाली.

स्वभाववर्णनः—पतीच्या निधनानंतर ३८ वर्षे संस्थानचा सर्व कारभार अनूबाई ही स्वतःच पहात होती. नानासाहेब पेशव्यांच्या अखेरीपर्यंत बहुतेक स्वाऱ्यांत ती हजर असे. तिचा मुलगा किंवा त्याच्या मृत्यूनंतर तिचा नातू व व त्यांचे कारभारी मोहिमींवर जात इतकेंच, परंतु त्यांच्या फौजेची तयारी करणें व त्यांस पैशाचा पुरवठा करणें ही जबाबदारी अनूबाईच सांभाळीत होती. दरबारचीं कामेंहि सर्व तीच करून घेत असे. तिची हिंमत, धोरण व महत्त्वाकांक्षा जबरदस्त होतीं. तिचे भाचे नानासाहेब व भाऊसाहेब व दादासाहेब यांवर तिची चांगली छाप होती. त्यांच्या लष्करांत प्रत्येक स्वारींत हजर राहून अनूबाईनें आपले बेत सिद्धीस नेण्याची संधि कधीं गमावली नाहीं व त्या कामीं कधीं आळस केला नाहीं! तिचा पुत्र नारायणराव यास तिनें कधीं स्वतंत्रपणें वागूं दिलें नाहीं. 'हें लहान पोर याला काय समजतें' अशाच भावनेनें तिनें त्यास जन्मभर म्ह. ४६ वर्षांच्या वयापर्यंत वागविलें! नारायणरावाच्या मागून संस्थानचा अधिकार तिच्या नातवास मिळाला तें तर तिच्या दृष्टीनें अगदीं नेणतें बाळच, तेव्हां त्यास ती स्वतंत्रपणें कशी वागूं देणार? मोठमोठ्या सर्व मसलती तिनेंच अंगावर घेऊन पार पाडल्या पुत्र व नातू हे नांवाला मात्र धनी होते. तिचा व्याप मोठा होता त्यामुळें तीस कर्जेहि झालें होतें. एके काळीं तर त्या कर्जाचा अजमास १२ लक्ष रुपये होता. बाईस कर्ज होतें त्याप्रमाणें तिनें संस्थानची जमाबंदीहि वाढविली होती. तिची वागणूक नेमस्तपणाची असे व खर्चाच्या बारीक सारीक बाबींवर सुद्धां तिचें लक्ष असे.

अन्नः—केवळ वैद्यक दृष्ट्या नव्हे तर, सामाजिक दृष्ट्याहि अन्न, अन्नशोधन, अन्नसमृद्धि या गोष्टी मानवी क्रियेच्या बुडाशीं कायमच्या वास करितात. अन्नाला ज्याप्रमाणें कामाचा कच्चा माल म्हणतां येईल, त्याचप्रमाणें त्याला सामाजिक अंगाचाहि कच्चा माल असें निःसंशय म्हणतां येईल. संस्कृतीच्या उच्चतम अवस्थांतून सुद्धां, सर्व संपत्तीचें सरतेशेवटीं अन्नाच्या प्राथमिक अवस्थेंत रूपांतर करितां येईल. अन्नाचा पुरवठा म्हणजे श्रमा ( labour ) ची प्राथमिक अवस्था; त्याचा संचय म्हणजे संपत्तीची प्राथमिक अवस्था.

धर्मनीतींत हा संबंध अप्रत्यक्ष असलेला दिसून येतो; पण या क्षेत्रांत इतर कोणत्याहि जीवितघटकांपेक्षां मनुष्याचें अन्न हें पुष्कळांशीं वरील गोष्टींशीं प्रत्यक्ष संबंध येत असल्याकारणानें जास्त समजण्यांत येतें. नैतिक कायद्याचा आरंभहि विशिष्ट अन्नाच्या निषेधापासून होतो. ख्रिस्ती संप्रदायाचें अंतिम ध्येय देवभोजन हेंच आहे.

सुधारलेल्या व रानटी समाजांत फरक म्हणजे स्वाभाविक ( नैसर्गिक ) अन्नाबद्दल कृत्रिम अन्नाची एकानें केलेली योजना होय. हंगामांत येणाऱ्या पिकांपैकीं कांहीं, पीक येत नसेल त्या दिवसांकरितां राखून ठेऊन, अन्नसंचयाखेरीज दुसऱ्या कांहीं कामीं मनुष्य आपले व इतरांचें श्रम खर्ची घालतो. याचा परिणाम अन्नेतर उत्पादक कामांच्या वाढींत होऊन, अन्नोत्पादनाला मदत होत नाहीं. नैसर्गिक गोष्टींपासून अन्न मिळविण्याची पद्धत त्रासदायक व कांहींशी अनिश्चित असते. आतां कृत्रिम पद्धतीनें अन्नसंचय करणें म्हणजे, जादा अन्न नुसतें सांठवून न ठेवतां तें वाढविण्याच्या कामीं लावणें होय. झाडें, बीं वगैरे तशींच वाढूं दिल्यास व पाळलेल्या जनावरांना मोठीं होऊन प्रजोत्पादन करूं दिल्यास चांगली अन्नसमृद्धि होते.

अ न्न–सा मु ग्री.—कृत्रिम रीतीनें ज्याची वाढ करितां येते असें प्राणिज अन्न निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळें आढळेल. बैल, घोडा, गाढव, उंट, बकरा आणि डुक्कर हीं प्रमुख जनावरें अन्नाला उपयोगी पडतात. याशिवाय मासे, पक्षी वगैरे आहेतच.

सर्व वानस्पत्य अन्नाची कृत्रिम वाढ करितां येते. फळें, कंद व धान्य असे त्याचे तीन वर्ग पडतात. उपयोग, श्रम, मूल्य या दृष्टींनीं पाहिल्यास धान्यांचा पहिला, कंदांचा मधला, व फळांचा शेवटचा दर्जा लागतो. यांच्या जोपासनेमुळें उन्नतीला किती मदत होते हें पाहातां, वरील प्रमाणेंच दर्जे लागतात. उदाहरणार्थ, फलाहारी रानटी मनुष्य, फळांच्या हंगामांत अजीर्ण होईपर्यंत खातो, तर इतर वेळीं बहुतेक उपाशी मरतो असें आपणांस दिसून येतें.

मनुष्य इतर उपजीविकेच्या साधनांपेक्षां मांस स्वाभाविक रीत्या त्यांतील उत्तेजक गुणांमुळें पसंत करतो ( सर्वांत उत्तम अन्न म्हणजे मांस असें शतपथ ब्राह्मणांत म्हटलें आहे ); उष्ण प्रदेशांत त्याचा जो कमी उपयोग केला जातो, याचें कारण पूर्वींपासूनची तशी सवय म्हणून नव्हे, तर हवेला योग्य असा आयुष्यक्रम ठेवण्याच्या अनेक वर्षांच्या प्रयत्नांचें तें फल आहे. उष्णप्रदेशांतील मद्यपाननिषेधाची गोष्टहि अशीच सांगतां येईल. तथापि, मनुष्याच्या विशेष प्रगतीला मिश्र अन्नच कारणीभूत झालेलें आहे. संस्कृति या नांवाला शोभण्यासारखी कोणतीहि गोष्ट धान्याखेरीज करून दुसऱ्या कृषिद्रव्यांवर उभारलेली नाहीं, याचें कारण धान्यांचें बीं कंद फळें यांच्याशीं तुलना करितां, स्नायू व मज्जा यांचें पोषण करण्यांत अतिशयच उत्तम असतें.

अ न्न–सि द्धि.—मानवी अन्न उत्पादनापेक्षां कार्यांचे जास्त प्रकार पाकसिद्धींत साहजिकच आढळून येतात. पण सर्व पाकशास्त्र भाजणें व शिजविणें या दोन गोष्टींत सांठविलें आहे. प्रत्यक्ष पदार्थाला अग्नि देण्याची वहिवाट सार्वत्रिक आहे; पुढें हळू हळू भट्टीची योजना होत गेली असावी. पण पुष्कळ असंस्कृत लोक, जमीनींत खड्डा करून त्याभोंवतीं कढत दगड लावितात व अशा रीतीनें साध्या प्रकारची भट्टी तयार करितात. अन्न कांहीं दिवस टिकण्याकरितां त्याला धुरी देण्याची रानटी लोकांची चाल आहे. भांड्यांत अन्न शिजविण्याची पद्धत दगडांनीं अन्न शिजविण्याच्या पद्धतीनंतरची आहे असें कांहींचें म्हणणें पडतें. तापून लाल झालेले दगड पाण्याच्या भांड्यांत टाकून, तें पाणी अन्न शिजविण्याजोगें ऊन करीत. पण किटली माहीत झाल्यापासून ही पद्धत बुडाली.

अन्नसिद्धीच्या पद्धतींच्या विकासाचीं तीन स्वरूपें म्हणजे १ रानटी, २ हिंदु, व ३ अर्वाचीन फ्रेंच याप्रमाणें निवडितां येतील. त्यांत सारखें सातत्य असेलच असें नाहीं. तिसऱ्या स्वरूपांत सौंदर्य तत्त्व तर दुसऱ्यांत धार्मिक तत्त्व आहे; पण ज्याप्रमाणें प्रत्येक स्वरूप सामाजिक जागृतीचें मुख आहे त्याच प्रमाणें त्याचा तीवर उलट परिणामहि होतो.

हिंदु स्वयंपाकघर व जेवण यांकडे पाहिल्यास त्या अन्नसाम्राज्यांत रोजच्या व्यवहारांतहि, एखाद्या विशिष्ट पवित्र मानलेल्या दिवशींचा क्रम सोडला तरी, विशेष तीव्र भावना सर्व विधींत दिसून येतात. मद्रासेकडील ब्राह्मणाचें अन्न किंवा स्वयंपाक चालला असतां त्याकडे शूद्रानें पाहिल्यास तो विटाळला असें मानण्यांत येतें.

धान्यांपासून तयार करण्यांत येणाऱ्या अन्नाचे सात प्रकार एकानें ( E. J. Payne, Hist. of the New World called America ) सांगितले आहेत, ते असे; भाजलेलें ओलें धान्य–हुरडा; पीठ केलेलें पक्कें धान्य; तांदुळाप्रमाणें भिजवून शिजविलेलें धान्य; पातळ शिजविलेलें पीठ-घाटलें किंवा खीर; पातळ चकत्या करून ( जाळीच्या भांड्यांत ( Grilled ) शेकलेलें पीठ; पातळ चकत्या करून भाजलेलें ( Baked ) पीठ–भाकरी; व फुगविलेली रोटी–पाव. या सात अवस्था मनुष्याच्या सुधारणावस्थादर्शक आहेत यांत संशय नाहीं.

अन्नसिद्धि व जोपासना यांच्याशीं संबद्ध असे अनेक लोकभ्रम आहेत. झोरोआस्ट्रियन लोकांमध्यें रात्रीं उत्तर दिशेला अन्न फेंकावयाचें नसतें. यूरोपियन शेतकऱ्यांना अजूनहि विस्तवांत रोटी टाकण्याची कल्पना अंगावर शहारे आणते. अवशिष्ट अन्न अशुद्ध मानण्याची हिंदूंची कल्पना पूर्वापार चालत आलेली आहे.

अ न्न–वि धि व नि षे ध—आरोग्यदृष्ट्या जीवित हें खाण्यावर अवलंबून आहे, हें तत्त्व सर्व मानवी चालीरीतींना

पूर्णपणें मान्य आहे. मानवी संपत्तीची पहिली गोष्ट म्हणजेच अन्न होय. समाजांत अशक्त लोकांस व लहान मुलांना खाण्याच्या बाबतींत जो प्रतिबंध करण्यांत येतो तो मानवी कायद्यांतील पहिला कायदा असें म्हटल्यास वावगें होणार नाहीं.

आस्ट्रेलियनांमध्यें लहान मुलांना निरनिराळे अन्नविषयक प्रतिबंध असतात, पण ते हळू हळू वयपरत्वें कमी होत जातात. या प्रतिबंधाचा हेतु कांहीं अंशीं वडील माणसांना उत्तम अन्न राखून ठेवण्याचा व कांहीं अंशीं अन्नाची तूट पडूं नये म्हणून असेल. आस्ट्रेलियन देश्य लोकांमध्यें आर्थिक सहकाराचा एक प्राचीन नमुना दृष्टीस पडतो. विवाहसंबंधानें बद्ध होणाऱ्या चार प्रकारच्या लोकांपैकीं प्रत्येक वर्गांतील प्रत्येक व्यक्तीनें विशिष्ट वयापर्यंत ठरावीक प्राणी खावयाचे नसतात, नारण्यास हरकत नाहीं. उदाहरणार्थ, बायकोनें खावयाचे पदार्थ नवरा खात नाहीं; नवराबायको दोघेंहि त्यांच्या मुलांना जे पदार्थ वर्ज असतात असेच पदार्थ खातात. या योगानें, मिळणाऱ्या अन्नाची योग्य वांटणी होते व इतर देशांत जास्त मुलें झालीं म्हणजे आईबापांच्या वांट्याला कमी अन्न जें येतें तसा प्रकार याठिकाणीं कितीहि मुलें झालीं तरी होत नाहीं, शिवाय या ठिकाणीं निरनिराळीं दैवकें ( totem ) असणारे लोक कांहीं विशिष्ट सण करितात. त्यांचा हेतु जें दैवक असेल तें जनावर किंवा वनस्पति विपुल मिळवी किंवा वाढावी, हा असतो. पण मजा ही कीं, आपल्या दैवकाचें अन्न आपण खावयाचें नसतें. तेव्हां हे सण एकमेकांना भरपूर अन्न मिळावें म्हणून पाळण्यांत येतात.

सर्व संपत्ति जरी सरतेशेवटीं अन्नमय करितां येते, तरी अलीकडील सुधारलेलें बंधुप्रेम या रूपांतील मालमत्तेसंबंधीं कांहीं गुन्ह्यांची तीव्रता कमी करितें तर कांहीं माफ करितें. भुकेच्या वेळीं जर एखाद्यानें अन्नाची चोरी केली तर कोणताहि चिनी मॅजिस्ट्रेट (न्यायाधीश) त्याला शिक्षा करणार नाहीं. हिंदु, ख्रिस्ती, इस्लामी व हिब्रूधर्म अशाच मताचे आहेत. कांहीं कमी सुधारलेल्या लोकांतहि हेंच दृष्टीस पडतें. तथापि डेंजर ( Danger ) नांवाच्या बेटांत जर एखादा अन्नाची चोरी करतांना आढळला तर त्याला देहांत शिक्षा मिळत असे.

अ न्न नि षे ध:---विशिष्ट अन्नाच्या बाबतींत निषेध वैयक्तिक किंवा सामुच्चयिक असतो. अंदमान बेटांत प्रत्येकानें जन्मभर एखादा विशिष्ट मासा किंवा प्राणी खावयाचा नसतो. आतां सामुच्चयिक निषेधाचें उदाहरण म्हणजे, नवहो (Navahos) लोक माश्याला कधींहि शिवत नाहींत. हिब्रू व मुसुलमान लोक डुकराचें मांस निषिद्ध मानितात. हिंदु लोक गोमांस निषिद्ध मानतात. ब्राह्मण यज्ञाशिवाय मांस निषिद्ध मानतात. तेव्हां याच्या बुडाशीं आदर किंवा तिटकारा या भावना असतात असें दिसतें.

कांहीं मांसांचे मनुष्यावर होणारे विशिष्ट परिणाम अशा निषेधांच्या बुडांशीं असतात असें कांहींचें म्हणणें आहे. निरनिराळे आजार सोडून दिल्यास अशा मांसाशनापासून कांहीं विशिष्ट गुणहि खाणाऱ्यांत शिरतात. अमेरिकन इंडियन स्थूल शरीराचे व वाईट गुण अंगीं असणारे प्राणी बहुधा खात नाहींत. कारण त्यांना अशी भीति वाटते कीं, या मांसापासून जडता येऊन आपल्या धार्मिक, युद्धविषयक व इतर कार्यांत लागणारा उत्साह पार नाहींसा होईल. नामाक्वा ( Namaquas ) आणि काफीर लोक भित्रेपणा येईल या भीतीनें ससे खात नाहींत.

आपल्याशीं ज्या प्राण्यांचा निकट संबंध येतो ते न खाण्याकडे मनुष्याची प्रवृत्ति दिसून येते. ब्राझिल मधील युरुना ( Yuruna ) लोक आपण संगोपलेले प्राणी खात नाहींत. हिंदूंमध्यें गोमांस न खाण्याविषयींच्या प्रवृत्तीचा संबंध वरील भावनेशीं जोडतां येईल.

या अन्ननिषेधाचे एकदोन प्रकार त्यांच्या धार्मिक किंवा जातिविषयक स्वरूपांमुळें विशेष महत्त्वाचे आहेत, हिंदु जे मांसान्न वर्ज करितात तें त्यांच्या धर्मतत्त्वांना अनुसरून करितात; पण त्याच्या मुळाशीं हवेला मानवेल ती योजना हळू हळू नकळत अमलांत आणण्याचा प्रकार आहे यांत संशय नाहीं; उष्ण प्रदेशांत मांसान्न थोडेंफार अपायकारक होतें. अर्वाचीन हिंदु गोमांस मुळींच खात नाहींत; कारण तें देवी भगवतीच्या गोरूपी पार्थिव प्रतिनिधीचें मांस आहे असें ते समजतात. हल्लीं सर्व उच्च दर्जाचे भारतीय प्राणिज-अन्न मुळींच खात नाहींत, ते निवळ शाकाहारी आहेत. शूद्र व इतर हलक्या जातींचे लोक वाटेल तें खातात. प्राचीन काळीं सणावारी व एरवींहि गोमांस व इतर मांस खात. द्विजांनीं मांस व मत्स्य श्राद्धदिनाखेरीज कधींहि खाऊं नये असें मनु सांगतो; पण असेंहि सांगतो कीं,

क्रीत्वा स्वयं वाप्युत्पाद्य परोपकृतमेव वा ।
देवान्पितॄंश्चार्चयित्वा खादन्मांसं न दुष्यति ॥

( मनुस्मृति ५।३२. )

नियुक्तस्तु यथान्यायं यो मांसं नात्ति मानवः ।
स प्रेत्य पशुतां याति संभवानेकविंशतिम् ॥

५।३५

पाहुण्याच्या आदरातिथ्यासाठीं वत्सतरी किंवा महोक्ष हनन करावयास वेदांत सांगितलें आहे. चरक संहितेंत (हिचा काळ इ. स. १ लें शतक असावा ) गरोदर स्त्रीनें गर्भवाढीसाठीं गोमांस खाण्यास हरकत नाहीं अशी सवलत ठेविली आहे. प्राचीन यज्ञकर्मांमध्यें ऋत्विज मांस खात व रक्त राक्षसांना म्हणून फेंकून देत. मागाहूनच्या तांत्रिक धर्मांत हिंदुधर्माच्या साधारण प्रवृत्तीच्या विरुद्ध विधि व सिद्धांत दिले आहेत. शाक्तोपासनेंतील पांच कर्मांपैकीं एक म्हणजे मांसाशन; दुसरें मत्स्याशन होय. दारू पिण्याला व मांस खाण्याला आपल्याला सबळ कारणें आहेत असें ते समजतात. असें करण्यानें आपल्या पूर्वजांचेंच वळण आपण गिरवितों असें सांगण्यांत येतें.

मांसाशनासंबंधीं हिंदूंचे विचार यूरोपीय नरभक्षणाबद्दलच्या विचारांशीं तुलना करण्यासारखे आहेत. सामान्यतः जीवाविषयीं आदर व सर्व सचेतन प्राण्यांबद्दल दया दाखविण्यास सांगणारी जी एक प्रवृत्ति आहे तीपासून हिंदु शाकाहारीत्वाचा उगम आहे असें वेस्टर मार्केला ( Westermark ) जें वाटतें त्यांत बरेंचसें तथ्य आहे. ज्याप्रमाणें मनुस्मृतींत शाक्तपंथाचें बीज आहे त्याप्रमाणें या घटनेचेंहि आहे. पुढील मनूचे श्लोक पाहा:

ना कृत्वा प्राणिनां हिंसां मांसमुत्पद्यते क्वचित् ।
न च प्राणिवधःस्वर्ग्यस्तस्मान्मांसं विवर्जयेत् ॥
म. स्मृ. ५,४८.

समुत्पत्तिं च मांसस्य वधबन्धौ च देहिनाम् ।
प्रसमीक्ष्य निवर्तेत सर्वमांसस्य भक्षणात् ॥ ४९
स्वमांसं परमांसेन यो वर्धयितुमिच्छति ।
अनभ्यर्च्य पितॄन्देवां स्ततोऽन्यो नास्त्यपुण्यकृत्॥५२॥

प्राणिहिंसानिषेध व प्राणि-अशन निषेध या दोहोंत संबंध आहे असें मानण्यास कांहीं हरकत नाहीं. बौद्ध व जैन धर्मांत हिंसानिषेध अत्यंत तीव्र आहे. "ताओ" संप्रदायांतहि त्याचें महत्त्व आहे. जर शुद्ध मांस खाण्याकरितां म्हणून मिळविलें नसेल किंवा खाणाराला तसें वाटलें नसेल तर कांहीं खाण्यास हरकत नाहीं असें बौद्धधर्म सांगतो. कारण हिंसेचें पाप हिंसकालाच लागतें. प्राचीन इजिप्त व ग्रीस देशांत शाकाहारित्वाचें धार्मिक स्वरूप माहीत होतेंसें दिसतें. मृत प्राणि, डुकराचें मांस व रक्त आणि ईश्वराला न वाहिलेली कोणतीहि गोष्ट न खाण्याविषयीं कुराणाची आज्ञा आहे. ज्यू आणि जुने ख्रिस्ती लोक रक्त मुळींच घेत नसत. याखेरीज ज्यू लोक आंतड्यांतील चरबी व मांडींतील स्नायु वर्ज करीत.

कल्पना व आचार—प्राचीनकाळीं अन्न व त्याचे गुण यासंबंधीं अनेक कल्पना निघाल्या; व त्यांचे परिणाम सामाजिक चाली बनविण्याकडे झाले असल्यानें, त्यांची थोडी माहिती देणें प्राप्त आहे. क्वीन्सलंडमधील लोक खरकटें, चेटक्यांना तें सांपडून त्याचा आपल्या नाशार्थ त्यांनीं उपयोग करूं नये म्हणून जाळून टाकीत. व्हिक्टोरियन जातींत अशी समजूत आहे कीं, आपण खाल्लेल्या प्राण्यांचीं हाडें जर आपल्या शत्रूला सांपडलीं तर तो त्यांचा, आजार उत्पन्न करण्याकडे उपयोग करितो, न्यू हेब्रिडीज येथील तन्ना ( Tanna ) लोकांमध्यें असे रोगकर चेटके आपला "नरक" ( Narak-अन्नाचा अवशेष ) जाळून एखाद्याला पीडा करितात; म्हणून सर्व तन्ना लोक आपल्याबरोबर एक करंडी बाळगतात व त्यांत केळ्यांच्या साली, नारळाच्या शेंड्या वगैरे खाद्यावशेष आपल्या शत्रूला ते सांपडूं नयेत म्हणून घालून ठेवतात; व तीं सर्व ओढ्यांत नेऊन टाकून देतात; कारण त्यांची समजूत ही असते कीं, वाहातें पाणी सर्व आपत्ति दूर करितें.

नवीन धान्य खाण्यापूर्वी क्रीक ( Creeks ) व सेमिनोल ( Seminoles ) लोक पवित्र अन्न मूळच्या साध्या अन्नानें दूषित होऊं नये म्हणून रेचक घेतात. निरनिराळ्या प्रकारचें अन्न एकमेकांत मिसळूं नये म्हणून ही प्रवृत्ति दिसते. अनेक जातींत ही चाल आहे.

अन्नांत हितकर किंवा अहितकर गुणधर्म असतात किंवा येतात अशी साहाजिकच समजूत झालेली आहे. येथून सुंदर पाकशास्त्राचा व शास्त्रीय पथ्यापथ्य विचाराचा उगम झालेला आहे. सर्व काळांत "शुद्ध" अन्नाची जरूरी भासते. या शब्दाचा अर्थ सुधारलेल्या व रानटी लोकांत समाजस्थितीच्या मानानें निरनिराळा असतो. धार्मिक दृष्टीनें "शुद्ध" म्हणजे सोंवळें, न विटाळलेलें, अमिश्र असें अन्न. प्राचीन हिंदुस्थानांत शुद्ध अन्नाची सर्व शुद्ध वस्तूंमध्यें फार मातबरी असे. अन्नाला विटाळ होतो इतकेंच नव्हे तर अन्नानेंहि विटाळ होतो. मओरी ( Maori ) राजा आपल्या डोक्याला अन्नाचा मुळींच स्पर्श होऊं देत नसे. तो स्वयंपाकघरांत किंवा अन्न जेथें टांगलेलें असे त्या घरांत मुळींच पाऊल घालीत नसे; कारण कदाचित् त्याच्या डोक्याला अन्न लागेल ही भीति. मओरी सिद्धांत असा असे कीं, अन्नाला जर पवित्र वस्तूचा संपर्क घडला तर तें पवित्र होऊन खाण्याला निरुपयोगी होतें. जे पवित्र असतात त्यांनाच फक्त तें खाण्याचा अधिकार पोहोंचतो.

प्रभावशाली व जादुमय अन्नांमध्यें मनुष्यमांस फारच सामर्थ्यवान समजतात. या व धर्मविधींतील मनुष्यभक्षणतत्त्वाच्या मुळाशीं मनुष्यमांस खाल्ल्यानें मनुष्यगुण अंगीं येतात ही भावना दिसते.

मृतसंसर्ग अन्नांत शिरतो असेंहि मानण्याची चाल आहे. अमेरिकन इंडियन लोकांत खुनी मनुष्यांना स्वतःकरितां किंवा दुसऱ्याकरितांहि स्वयंपाक करूं देत नसत; आपल्या भांड्याखेरीज दुसऱ्या कशानेंहि त्यांनी पाणी प्यावयाचें नसे. समोआ ( Samoa ) मध्यें मृताबरोबर असलेल्या मंडळींना कोणत्याहि अन्नाला शिवूं देत नसत; त्यांना कांहीं दिवसपर्यंत दुसऱ्यांनीं स्वयंपाक करून द्यावा लागे. आपणां हिंदूलोकांत सुतकामध्यें अशीच विटाळ मानण्याची चाल आहे.

सहभोजनाचे सण सर्वत्र असतात व त्या योगानें अन्नाच्या ठिकाणीं मानलेला समाजिक सोवळेपणा कमी होत जातो. एकत्र भोजन हें दोन व्यक्तींतच नव्हे तर दोन वर्गांतहि स्नेहभाव उत्पन्न करितें. स्त्रीपुरुषांना, विशेतः वाङ्‌निश्चय झालेल्यांना, कांहीं लोकांत जी एकत्र जेवण्यास बंदी असते, ती लग्नांत नाहींशी होऊन तीं एका हाडामांसाची बनतात याचें द्योतक म्हणजेच एकत्र जेवण होय. आपल्या इकडे लग्न झालेल्या मुलीस पुत्र होईपर्यंत तिच्या घरीं जेवण्यास तिच्या आईबापांस निषेध आहे. पुत्र झाल्यावर नातुभोजनाचा समारंभ करतात.

देवांचें अन्न—आपल्या जमातींत देव श्रेष्ठ आहेत ही भावना जेव्हां उद्भूत झाली तेव्हां अन्नासंबंधींच्या कल्पनांवरून विकास पावलेली यज्ञकल्पना पुढें आली असें म्हणण्यास हरकत नाहीं. नंतर दान व वर या कल्पना अस्तित्वांत आल्या.

निरनिराळ्या महत्त्वाच्या प्रसंगांनीं अन्नास पवित्रता येते. अधिपति व पवित्र माणसें यांच्या अन्नाला एक प्रकारचा पवित्रपणा येतो; यावरून यज्ञीय मांसाला किती महत्त्व असतें हें समजेल. देवांनां अन्न पुरविल्यास मनुष्याची शक्ति वृद्धिंगत होते अशी सर्वसाधारण कल्पना असते. खाद्य व पेय हीं यज्ञसाधनें होत. देवांच्या ठिकाणीं असलेला विशेष म्हणजे आयुरारोग्य तें अगणित व सतत यज्ञ केल्यानें लाभतें. शिवाय, उत्तमोत्तम अन्न देवांकरितां राखून ठेवण्यांत येतें. पेरू येथील देवांकरितां निराळे लामां ( Llama–एक प्राणी )चे कळप असत; त्यांचें मांस देवांपुढें ठेवून खात; व त्यांच्या ( देवमूर्तींच्या ) तोंडांतहि घालीत.

याच समजुतीवर मृतांना अन्न देण्याचे विधि ( श्राद्धें ) उभारलेले दिसतात.

कांहीं ठिकाणीं यज्ञ करण्यापूर्वी उपोषण करण्याची जी चाल असते ती यजमानानें देवाच्या आधीं खाणें गैर किंवा पाप आहे या कल्पनेवरून पडली असावी. यजमानाच्या ठिकाणीं पावित्र्य येण्याकरितांहि असें करावें लागत असेल.

अन्न संकेत व रूपकः—प्रभुभोजनांतील अन्न ख्रिस्तमांसरूप आहे कीं निवळ त्याचा एक संकेत आहे याविषयीं रोमनकॅथॉलिक व प्रॉटेस्टंट लोकांची परस्परविरोधी मतें पाहतां, तीं अन्नाचें गूढ मोल ठरविणारीं पण फार मनोरंजक नाहींत असें कोण म्हणेल ?

आत्मपीडेनें ईश्वर प्रसन्न करण्याकरितां मध्य अमेरिकन लोक माती किंवा गवतहि खातील. याच्या उलट ( हिंदु ) द्विजानें अन्नाचा वीट न मानितां त्याची पूजा करावी अशी त्याला शिकवण असते. यासंबंधी मनूचें वचन असें आहे.

पूजयेदशनं नित्यमद्याच्चैतदकुत्सयन् ।
दृष्ट्वा हृष्येत्प्रसीदेच्च प्रतिनन्देच्च सर्वशः ॥
पूजितं ह्यशनं नित्यं बलमूर्जं च यच्छति ।
अपूजितं तु तद्भुक्तमुभयं नाशयेदिदम् ॥

मनुस्मृति २,५४–५.

मेक्सिकन मनुष्याला जो उपदेश देण्यांत येतो तो म्हणजे "खात नाहीं असा जगांत कोणीहि मनुष्य नसतो कारण प्रत्येकाला पोट व आंतडीं असतातच......शरीराच्या पोषणानें जीविताचें संरक्षण होतें व त्यामुळें जग प्रजावान् होतें."

उपनिषदांत अन्नस्तुतिपर अशा तऱ्हेचीं वाक्यें आहेत कीं, अन्नं ब्रह्मेति व्यजानात् ॥ अन्नाद्ध्येव खल्विमानि भूतानि जायन्ते ॥ अन्नेन जातानि जीवन्ति ॥ अन्नं प्रयन्त्यभिसंविशन्तीति ॥–तैत्तिरीयोपनिषत्

"पृथ्वीवर राहाणारे सर्व प्राणी अन्नापासून उत्पन्न झालेले आहेत, ते अन्नावर जगतात व शेवटीं ( मेल्यावर ) अन्नाला मिळतात"

शतपथ ब्राह्मणांत असें म्हटलें आहे कीं, शरीरांत अन्न ठेवल्यावर तें शरीरच बनतें, प्राणांच्या योगानें अन्न शरीराशीं निगडित केलें असते. अन्नाचें सार अदृश्य असतें. सर्व गिळावयाच्या पदार्थांत अन्न सर्वश्रेष्ठ आहे. शतपथ ब्राह्मणांत अन्न व प्राण एक कल्पिले आहेत; ते दोघेहि देव आहेत. प्रतिहार सूक्तांची देवता अन्न आहे.

अशाच प्रकाराचे विचार बृहदारण्यकोपनिषदांत दिसतात. अन्नं ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा पूयति वा अन्नमृते प्राणात्प्राणो ब्रह्मेत्येक आहुस्तन्न तथा शुष्यति वै प्राण ऋतेऽन्नादेते ह्त्वेव देवते एकधाभूयं भूत्वा परमतां गच्छतः।

स्वर्गीय अन्नांत द्रव्यांतराच्या कल्पना व रूपक दिसून येतें. त्याठिकाणीं जड अन्न अजड बनतें.

वैद्यकी य—आपण जें अन्न खातों त्यांत खालीं सांगितलेले प्रकारांचा समावेश होतो व त्यांत रासायनिक घटक द्रव्यें कोणतीं आहेत हेंहि त्या नांवामुळें व्यक्त होतें.

| | |
|---|---|
| १ नत्र (नैट्रोजन) युक्त सात्त्विकअन्न<br>२ पिष्टान्न अगर मंडान्न<br>३ स्निग्ध अगर वसामय अन्न | हे अन्नप्रकार उद्भिज्ज आणि प्राणिज कोटीपासून आपणास प्राप्त होतात व ते लवकर नासण्यासारखे असतात. |
| ४ जल<br>५ क्षारयुक्त खाण्याचे पदार्थ. | हे बहुधा स्वाभाविक स्थितींत सांपडतात व अति जलद नासत नाहींत. |

मानवी प्राण्यांना शैशवावस्थेंत दूध व पक्षांचे पिलांनां गर्भावस्थेंत अंडीं या पदार्थांपासून वरील पांचहि प्रकारच्या अन्नांचा समावेश असलेलें स्वाभाविक अन्न मिळतें. व तेंहि त्या शैशवावस्थेंत युक्त अशा अल्प प्रमाणांत असल्यामुळें त्यावेळीं या पदार्थांशिवाय दुसऱ्या अन्नपदार्थाची गरज नसते; म्हणून त्यांना "उत्तमान्न" असेंहि कोणी म्हणतात. अंड्यांतील संवर्धनावस्थेंत पक्षांचे पिलांना तें अंडे जरी प्रशस्त अन्न असलें तरी दुधावर वाढणाऱ्या प्राण्यांनां त्यामध्यें पिष्ट पदार्थांची उणीव पडते. उद्भिज्ज कोटीपासून मिळणाऱ्या अन्नांत पिष्टान्न जरा विपुलच असतें; परंतु मांसादि प्राणिकोटींतील अन्नामध्यें सात्त्विक पदार्थांची विपुलता अंमळ जास्तच असते. यासाठीं प्राणी शाकाहारी असो अगर मांसाहारी असो त्याचा आहार अशा मिश्र तऱ्हेचा असावा कीं ज्यामुळें त्याचे खाण्यांत सर्व प्रकारचें अन्न योग्य प्रमाणांत जाईल. शाकाहारी प्राण्यांनां सात्त्विक पदार्थांसाठीं मांसच खाल्लें पाहिजे असें नाहीं; कारण नत्र( नैट्रोजन )युक्त सत्वान्न गहूं, उडीद इत्यादि उद्भिज्ज अन्नांतहि असतें. आहार कसा असावा या विषयीं अधिक माहिती पुढें दिली आहे:—

( १ ) वरील पांचहि प्रकारच्या अन्नांचा समावेश योग्य प्रमाणांत आहारांत झाला पाहिजे व अन्नहि पुरेसें पोटांत गेलें पाहिजे.

( २ ) ज्या देशांत मनुष्य रहात असेल तेथील हवामान, त्याचें वयोमान, व उद्योग धंद्यामुळें त्यास जितके कमी

अगर अधिक श्रम पडत असतील त्या मानानें त्याचा आहार कमी अगर जास्त असावा.

( ३ ) वरील पांचहि प्रकारचें अन्न योग्य प्रमाणांत मिळालें पाहिजे येवढेंच नाहीं तर तें अन्न सहज पचेल अशा स्वरूपांत पोटांत गेलें पाहिजे. उदाहरणार्थ वाटाणे, डाळी, व द्विदल धान्यें या पदार्थांमध्यें मांसापेक्षां नत्र( नैट्रोजन )युक्त सत्त्वान्नाचें अधिक प्रमाण असतें खरें; परंतु तें सत्त्व पचण्यास सुलभ अशा स्थितींत नसल्यामुळें मलोत्सर्जनाचे वेळीं त्याचा बराच अंश निघून जातो. यामुळें व्यवहारामध्यें या पदार्थांना पौष्टिक पदार्थ मानण्यांत येत नाहीं.

आहारामध्यें ज्या मानानें नैट्रोजनयुक्त अगर कर्ब ( कार्बन ) युक्त अन्न कमी अगर अधिक असेल त्या मानानें तो आहार कमी अगर अधिक पौष्टिक आहे असें समजतात. प्रतिदिवशीं साधारण कामधंदा करीत असलेला मनुष्य २५० ते २८० ग्राम कर्ब ( कार्बन ) शरीराबाहेर श्वासोच्छ्वासाचे वेळीं मुख्यतः कर्बद्वि प्राणिदा (कार्बन डायॉक्साइड) च्या रूपानें बाहेर टाकीत असतो असा हिशोब केला आहे. लघवीमध्यें युरिआ नामक क्षार असतो त्या मार्गानें १५ ते १८ ग्राम नत्र शरीराबाहेर मल द्रव्य म्हणून तोच मनुष्य टाकतो. शरीराचें पोषण व झीज यांचा जो आयव्यय सदा सुरू असतो त्यापासून हे निरुपयोगी पदार्थ म्हणून शरीराबाहेर जातात व काम, ऊष्णता व शक्ति हीं नानाप्रकारांनीं प्रगट होतात. मनुष्य आपल्या स्नायूंचे शक्तीनें मेहनत करूं लागला म्हणजे कर्बचें मोठ्या प्रमाणांत उत्सर्जन होतें. नैट्रोजनचें उत्सर्जन त्याच माणसांत होतें पण तें फार अल्प प्रमाणांत असतें. मनुष्य साधारण माफक मेहनत करीत असला तर त्याचे शरीराची जी झीज होते ती भरून निघण्यासाठीं त्यास अन्नाच्या रूपानें नवीन पोषक द्रव्य शरीरांत घातलें पाहिजे. मलोत्सर्जन झालेल्या पदार्थांमध्यें कर्ब व नत्र ज्या प्रमाणांत शरीराबाहेर गेले असतील त्या मानानें त्यांचें प्रमाण अन्नामध्यें ठेवावें लागतें. म्हणजे, २५०:१५ अथवा १६.६:१ हें तें प्रमाण पडतें. आहारांतील नत्रयुक्त सात्विक पदार्थांतील कर्ब व नत्र यांचें प्रमाण ५३:१५ अथवा ३.५:१ आहे म्हणून वरील योग्य प्रमाण साधण्यासाठीं अधिक कर्बाचा पुरवठा पिष्टान्न, स्निग्धान्न यासारख्या अन्य प्रकारच्या पदार्थांपासून करून घ्यावा लागतो. दोघा इंद्रियविज्ञानशास्त्रज्ञानीं रोजच्या आहाराची प्रमाणें दिलीं आहे तीं त्यांनीं पृथक्‌पणें प्रयोग करून काढिलीं आहेत व तीं एकमेकांशीं बरीच जुळतात तीं अशीं:—

| | | | |
|---|---|---|---|
| (१) नत्रयुक्त पदार्थ | १२० | (२) नत्रयुक्त पदार्थ | १०० |
| स्निग्ध पदार्थ | ९० | स्निग्ध पदार्थ | १०० |
| पिष्ट पदार्थ | ३३३ | पिष्ट पदार्थ | २५० |

आहारांतील निरनिराळ्या पदार्थांच्या गुणधर्मांचा विचार करणें जरूर आहे. त्यांपैकीं दुधास "उत्तमान्न" हें नांव दिल्याचें वर सांगितलेंच आहे.

दूध.—अर्भकानां हें अन्न जसें असावें तसें सर्वगुणसंपन्न आहे. पण मोठ्या माणसांस त्यावर निर्वाह करणें झाल्यास त्याचें सेवन बऱ्याच मोठ्या प्रमाणांत करावें लागेल व त्यामुळें कदाचित असला आहार त्रासदायक वाटेल पण जरूर तितकें दूध दिवसारात्रीं घेतल्यावांचून शरीरास लागणारा कर्ब व नत्र यांचा पुरवठा होणार नाहीं. दुधांत लोहाचा अंश फारच कमी असल्यामुळें फार दिवस अंगावर पाजलेलीं मुलें फिकट दिसतात.

दुधाचा थेंब सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिला असतां त्यांत दोन प्रकारचे पदार्थ असल्याचें दिसतें. एक वर्णहीन पातळ द्रव्य असून त्यांत दुसरे शेंकडो बिंदुरूपी पदार्थ तरंगत आहेत असें दिसतें; व ते सूक्ष्म अशा तैलबिंदूंचे बनलेले असतात. मातेच्या स्तनांत दुग्धोत्पत्ति झाल्यापासून थोड्या दिवसांतील दुधास कोलेस्ट्रम ( प्रसव दुग्ध=चुहेरांतील दूध ) असें नांव आहे. चुहेरांतील दुधांत दुग्धसत्त्व नामक नत्रयुक्त पदार्थ फारसा नसतो पण त्याच वर्गांतील ग्लाब्यूलीन नामक पदार्थ त्यांत असतो. सूक्ष्म दर्शक यंत्राचे साह्यानें हा पदार्थ तपासून पाहिल्यास त्यांत स्तनांतील दुग्धग्रंथींतील एकटदुकट पेशी तैलबिंदुपूर्ण अशा दिसतात व त्यांस प्रसव दुग्धपेशी म्हणतात. मनुष्याच्या अगर गाईच्या दुधांत किंचित अल्काची (अलकलीची ) किंवा कधीं समभावधर्मीय प्रतिक्रिया दिसते; परंतु मांसाहारी प्राण्याचें दूध अम्लप्रतिक्रिया दर्शवितें. कोणत्याहि प्राण्याचें दूध नासलें म्हणजे तें आंबतें कारण त्यांत जी दुग्धशर्करा असते तिचें त्यामुळें दुग्धाम्ल ( लॅक्टिक् असिड ) बनतें. जलगुरुत्वमापक यंत्रानें दुधाचें गुरुत्व समजतें. गाईच्या दुधाचें गुरुत्व १०२८ पासून १०३४ असतें. पाण्याचें गुरुत्व १००० कल्पिलें असून त्या मानानें हें गुरुत्व समजावयाचें असतें. दुधांतील अत्यंत हलका पदार्थ त्यांतील स्निग्ध लोणी होय व दूध घुसळलें म्हणजे हा स्निग्ध पदार्थ वर येऊन दुधाचें गुरुत्व १०३३–३७ इतकें वाढतें.

निरनिराळ्या प्राण्यांच्या दुधांतील घटक द्रव्यांचें तुलनात्मक कोष्टकः—

| घटक द्रव्यें. | स्त्री. | गाढवी. | गाय. |
|---|---|---|---|
| दुग्धसत्त्व | २.७ | १.७ | ४.२ |
| स्निग्धपदार्थ ( लोणी ) | ३.५ | १.३ | ३.८ |
| दुग्धशर्करा | ५.० | ४.५ | ३.८ |
| क्षार | ०.२ | ०.५ | ०.७ |

या कोष्टकावरून हें ध्यानांत येईल कीं लहान मुलांना आईचे दुधा ऐवजीं गायीचे दुधावर वाढवणें असेल तर त्यांत अधिक पाणी व साखर घातल्यानें त्याचें सादृश्य आईच्या दुधाशीं आणतां येईल. दुधांत जे नत्रयुक्तपदार्थ आहेत

त्यांपैकीं दुग्धसत्त्व नामक पदार्थ मुख्य होय. त्यामध्यें कांहीं धर्म प्रसवदुग्धाप्रमाणें असतात. त्यांत रेनेट नामक विरजण घातलें म्हणजे दुग्धजमंड नामक पदार्थ बनतो. खवा हा पदार्थ, हा दुग्धजमंड व दुधांतील लोणी यांचा बनलेला असतो. दुधांतील नत्रयुक्त दुसरा पदार्थ आलब्युमिन अथवा औजसद्रव्य हा होय पण तो अल्पप्रमाणांत असतो; यास दुग्धाल्ब्यूमिन असें म्हणतात. दूध आणून तें तसेंच बराच वेळ ठेवलें तर त्यांतील दुग्धशर्करा-सत्त्व नासून त्याचें दुग्धाम्ल ( लॅक्टिक ॲसिड ) बनून तें आंबतें. या आसिडामध्यें दुग्धसत्त्व वेगळें करण्याचा धर्म असल्यामुळें त्या दुधांत कांहीं गोठलेल्या दुधाचा चोथा व कांहीं पातळ आंबुस दूध असें मिश्रण तयार होतें; पण हें नासलेलें दूध गोठून त्यांतील न नासलेला दुग्धजमंड तयार होणें या दोन्ही क्रिया भिन्न आहेत. कांहीं विरजणाप्रमाणें आंबवणारी क्रिया घडवणारे उद्भिज्जंतुहि हें काम करतात. रेनेट म्हणजे अंगावर पिणाऱ्या प्राण्याच्या जठरांतील दूध गोठवणारा पदार्थ होय. तो बहुधा वासराच्या जठरापासून तयार करितात व यूरोपियन लोक दूध गोठवून त्याचें खाद्य करण्यासाठीं वापरतात. दहीं म्हणजे दुग्धजमंड, लोणी, व विरजलेलें आंबुस दूध. दह्याचें पांढुरकें पाणी असतें त्यांत दुग्धशर्करा, दुग्धक्षार व दुग्धाल्ब्यूमिन हे पदार्थ असतात व दहीं घुसळून ताक करितात त्यांतहि ते असतात. त्यामध्यें दुग्धक्षारसत्त्वनामक नत्रयुक्त पदार्थ असतो. गायीझशींच्या दुधापासून जें दहीं बनतें त्याच्या मोठमोठ्या कवड्या बनतात व तें पचण्यास जड असतें; पण अंगावरील दुधाचें मुलाच्या पोटांत जें दहीं बनतें त्याचें गोठणें अगदींच बारीक आकाराचें असल्यामुळें तें पचण्यास सुलभ असतें; व म्हणून लेंकरांना अगर आजारी माणसांना गायीच्या दुधावर कांहीं काल ठेवणें झाल्यास हा दुधाचा पचनास जडपणा मोडण्यासाठीं त्यांत चुन्याच्या निवळीचें अगर बारली नामक धान्याचें पाणी घालतात.

दुधांतील क्षारामध्यें चुन्याचा क्षार असतो व तो असतो म्हणूनच रेनेटच्या योगानें दूध गोठवून दुग्धजमंड तयार करितां येतो. तो क्षार कृत्रिम उपायांनीं काढून टाकल्यास रेनेटच्या साह्यानेंहि दूध गोठत नाहीं. दुधांतील दुग्धसत्त्व हें नत्रयुक्त असून शिवाय स्फुर ( फॉस्फरस ) युक्त असल्यामुळें महा पौष्टिक व आरोग्य बलवर्धक आहे. दुधांत मग्नस्फुरित ( म्याग्निशियम फॉस्फेट ) या क्षाररूपानेंहि थोड्या प्रमाणांत स्फुर असतो. दुधांतील वसामय पदार्थाचें परीक्षण केलें तर शरीरांत इतर ठिकाणीं असणाऱ्या मेदोमय रचनेप्रमाणेंच त्याची रचना असते व त्याप्रमाणें यांतहि ओलीन, पामिटीन, स्टियरीन हे स्निग्ध पदार्थ असतात; व ब्यूटिरीन आणि क्याप्रोइन हे स्निग्ध पदार्थ त्यांहून फार अल्प प्रमाणांत असतात, याशिवाय लीसिथिन नांवाचा फास्फरस युक्त स्निग्ध पदार्थ दुधांत असतो व तो बुद्धि व मज्जावर्धक असतो. हा पदार्थ मेंदूंतहि सांपडतो. दिसण्यांत स्निग्ध असा कोलेस्टीन नामक पीतवर्ण पदार्थहि सर्व दुधांत असतो व म्हणूनच गाय व इतर कांहीं प्राण्यांचें दूध विशेष पिंवळसर असतें.

दुग्धशर्करा दुधांत असते तिचें दूध शिळें झाल्यानें लॅक्टिक आसिड बनतें हें वर सांगितलें आहे. व ही क्रिया घडविणारे जंतु हवेंत असतात त्यामुळें ती क्रिया आपोआप होते असें आपणास वाटतें. या जंतूखेरीज आंबवणारे यीस्टवगैरे इतर पदार्थ आहेत. दुधांत यीस्ट घातलें असतां तें आंबून मद्याप्रमाणें फसफसतें व त्यापासून कौमिस नामक खाद्य पदार्थ करितात. तो आपल्याकडे प्रचारांत नसतो. वर सांगितलेल्या दुधांतील चुन्याच्या व मग्नस्फुरित ( मॅग्नेशियम फॉस्फेट ) या क्षाराखेरीज किंचित् लवणक्षार व पालाशहरिद ( पोटेशियम क्लोराइड ) हे क्षारहि दुधांत असतात.

अंडीं:—आहारामध्यें कोंबड्यांचीं अंडीं खाण्याचा प्रघात विशेष आहे; तथापि बदकें व इतर कांहीं पक्ष्यांच्या अंड्यांचा हि ह्या कामीं उपयोग होतो. अंड्यांवर टरफल असतें व तें खड्डप्रमाणें खटकर्बित ( कॅलशियम कार्बोनेट )चें बनलेलें असतें. तें फोडलें म्हणजे अंड्याचा पिंवळा बलक व पांढरा पदार्थ असे दोन भाग असतात. पांढऱ्या पदार्थाभोवतीं तंतुमय व जाळीदार वेष्टण असतें व त्यांत औजस द्रव्य ( आल्ब्युमिन ) हा महापौष्टिक पदार्थ फार असतो. यांतील घन पदार्थ शेंकडा १३.३ असतात व त्यापैकीं १२.२ नैट्रोजन युक्त पदार्थ असून बाकीच्या भागांत शकरा, स्निग्ध पदार्थ, लीसिथीन व कॉलेस्ट्रीन हे दुधांतील स्निग्ध पदार्थ व कांहीं क्षार इतके पदार्थ असतात. पिंवळ्या बलकामध्यें गर्भावस्थेंत असलेल्या पिलाचें पोषण व्हावें अशा प्रकारचें अन्न असतें. या बलकांतहि एक जरासा पारदर्शक असा थोडा भाग असून दुसरा मोठा भाग पिंवळ्या रंगाचा असतो. या दोहोंतहि व्हायटेलीन नांवाचें पौष्टिक नैट्रोजनयुक्त सत्त्व असतें व शर्करा, लीसिथिन, कॉलेस्ट्रीन, क्षार हे थोड्या प्रमाणांत असतातच. अंडें हें पचण्यास सुलभ व महापौष्टिक आहे. परंतु तें फारवेळ उकडण्यानें त्यांतील न्यूक्लीन नांवाचा नैट्रोजनयुक्त पदार्थ पचण्यास जड होतो. म्हणून कच्चीं अंडी खाण्याचा प्रघात खाण्यांत व औषधोपचारामध्यें दिसतो.

मांसः—खाण्यास लायक समजले गेलेल्या कांहीं पशुपक्ष्यादिकांचे स्नायू व तदंगभूत वेष्टणें व वसामय भाग यांस मांस म्हणतात. कांहीं प्राण्यांचें मांस खात नाहींत व कांहींचें मांस खाण्यासारखें असून तें खाण्याची पद्धति नाहीं इतकेंच त्याविषयीं म्हणतां येईल. हिंस्र प्राण्यांचें व इतर कांहीं प्राण्यांचें मांस अगदीं खाण्यास वाईट लागतें म्हणून तें खात नाहींत हें बरोबर आहे. घोड्याचें मांसहि खाण्यालायक असतें परंतु तो प्राणी वाहनाचे कामीं योजणें व्यवहारदृष्ट्या अधिक फायदे-

शीर असल्यामुळें त्याचें मांस लढाईंतील उपासमारीसारखी मोठी आपत्ति आल्याखेरीज खात नाहींत. तसेंच यूरोपांत गाय हा प्राणी दुधास फार उपयोगी समजल्यामुळें मांसासाठीं तेथें फक्त बैल मारले जातात. तशी नजर गायी व म्हशी कापण्यांत या देशांत न ठेवली गेल्यानें लक्षावधि दुभतीं व इतर गुरें मांसासाठीं मारलीं जातात, ही शोचनीय स्थिति आहे.

मांस या पदार्थांत पचण्यास सुलभ असें नत्रयुक्त सत्त्व सांठविलेलें असतें व त्यास मायोसीन हें शास्त्रीय नांव आहे. शिवाय त्यांत अन्य मांसरसक्षार असून मांसावरील वसा कितीहि काढून टाकली तरी आंत ती थोडी असतेच. स्नायूंचे एकांत एक एक असे तंतुमय समूह असतात व त्यांचे गर्भांत ही वसा असून ती ज्यामानानें कमी अगर जास्त असेल त्यामानानें तें मांस पचनास सुलभ अगर जड असतें. डुकराचे मांसांत अशी वसा वरीच असल्यामुळें त्यापासून अजीर्ण होण्याचा संभव फार असतो. कारण ती वसा मांसतंतूंवर लपेटली असल्यामुळें जठररस त्यांत मिनून न गेल्यामुळें न पचलेल्या स्थितींत तें मांस पुढें आंतड्यांत ढकललें जातें.

निरनिराळ्या मांसांतील रासायनिक घटकद्रव्यांचें कोष्टक

| घटकद्रव्य. | बैल | वांसरु | डुकर | घोडा | बदक |
|---|---|---|---|---|---|
| जल. | ७६.७ | ७५.६ | ७२.६ | ७४.३ | ७०.८ |
| घन पदार्थ. | २३.३ | २४.४ | २७.४ | २५.७ | २९.२ |
| नैट्रोजनयुक्त पदार्थ व सरस | २०.० | १९.४ | १९.९ | २१.६ | २२.७ |
| वसा | १.५ | २.९ | ६.२ | २.५ | ४.१ |
| पिष्ट पदार्थ. | ०.६ | ०.८ | ०.६ | ०.६ | १.३ |
| क्षार. | १.२ | १.३ | १.१ | १.० | १.१ |

कणीक व पीठः—गव्हाच्या दाण्याच्या गाभ्यामध्यें त्यांतील उत्कृष्ट पिष्टान्न व नैट्रोजनयुक्त सत्त्वांश सांठविलेलें असतें म्हणून त्याच्या कणकेमध्यें हीं द्रव्यें मोठ्या प्रमाणांत असतात. गव्हाच्या दाण्यावरील भुसा काढून गहूं घरीं अगर गिरणींत सालासकट दळले म्हणजे त्यांत वरील पौष्टिक अंश असून शिवाय कठिण व पिंगट रंगाच्या गव्हाच्या सालीच्या पिठांत नैट्रोजनयुक्त सत्त्व याहून अधिक असतें; पण हें पीठ पचण्यास अंमळ जड असतें हा यांत एक दोष आहे. त्यामध्यें एक कडंगर नामक पदार्थ पचनास जड जाणारा असतो परंतु त्यांत सारक धर्म असल्यामुळें अशा कणकेच्या पोळ्या बद्धकोष्ठाची पीडा असणाऱ्या माणसांना फार प्रशस्त आहेत. त्यांतील न पचणारा सेल्यूलोज नामक उद्भिज पदार्थ आंतड्यांनां आपल्या टोंचण्यानें प्रोत्साहन देतो व त्यामुळें मलोत्सर्जनाचे कामास आयतीच मदत होते.

कणीक उत्तम असली म्हणजे तींत गुळचटपणा मुळींच नसतो. तींत तो असला म्हणजे समजावें कीं दमटपणामुळें अगर शिळी होऊन तींत जीवोत्पत्ति होऊं लागली आहे. बारली अथवा यव धान्यापासून माल्ट नामक गोड पौष्टिक व पाचक पदार्थ करितात त्यावेळीं अशी जीवोत्पत्ति मुद्दाम होऊं देतात. कणीक पाण्यांत मळली म्हणजे त्याचा चिवट व चिकट लगदा अथवा गोळा बनतो; कारण ग्लुटेन नामक चिक्कण पदार्थ त्यांत सुप्तावस्थेंत असतो तो प्रगट होतो. तांदुळ वगैरे धान्यांचे पिठांत तो विलकूल नसल्यामुळें त्या पिठास चिक्कणाई येत नाहीं. पाणी घातल्यावर गव्हांतील ग्लोब्यूलीन पासून हें चिक्कण द्रव्य प्रकट होतें. पुढें दिलेल्या कोष्टकांत प्रचारांतील मुख्य धान्यांतील व इतर उद्भिज्ज खाण्याच्या पदार्थांच्या घटकद्रव्यांची तुलनादर्शक मांडणी केली आहे.

| घटकद्रव्य | गहूं | यव बार्ली | ओट | तांदूळ | डाळी द्विदलधान्यें | वाटाणा | बटाटे |
|---|---|---|---|---|---|---|---|
| जल. | १३.६ | १३.८ | १२.४ | १३.१ | १२.५ | १४.८ | ७६.० |
| नैट्रोजनयुक्तसत्त्व. | १२.४ | ११.१ | १०.४ | ७.९ | २४.८ | २३.७ | २.० |
| स्निग्ध पदार्थ. | १.४ | २.२ | ५.२ | ०.९ | १.९ | १.६ | ०.२ |
| मंडान्न. | ६७.९ | ६४.९ | ५७.८ | ७६.५ | ५४.८ | ४९.३ | २०.६ |
| (न पचणारे)सेल्यूलोज | २.५ | ५.३ | ११.२ | ०.६ | ३.६ | ७.५ | ०.७ |
| क्षार | १.८ | २.७ | ३.० | १.० | २.४ | ३.१ | १.० |

यावरून चटकन् ध्यानांत येतात तीं अनुमानें येणें प्रमाणें आहेत,—

(१) मंडान्न अगर पिष्टान्नाचें प्रमाण पिठांत बरेंच मोठें असतें.

(२) स्निग्ध पदार्थ अगदींच अल्प प्रमाणांत दिसतात; यामुळेंच भाकरी पाव अगर पोळीशी तूप, लोणी खाण्याची इच्छा स्वाभाविक होते.

(३) नैट्रोजनयुक्तसत्त्वान्न वटाण्याखेरीज इतर पदार्थांत विपुल आहे व वाटाणे, डाळी या पदार्थांत ही विपुलता विशेष दिसून येते. मात्र हें सत्त्व ग्लोब्यूलीन वर्गांतील चिक्कणधर्मीय ग्लुटेन नसून त्याच वर्गांतील व्हायटेलिन नांवाचें असतें.

(४) क्षारापैकीं पोट्याशियम व मॅग्नेशियम यांचे क्षार जास्त असतात आणि सोडियम व कॅलशियम ( चुना ) यांचे क्षार अल्प असतात.

पा व, भा क री, पो ळी,:—कणकीच्या गोळ्यांत, मीठ, यीस्ट ( ताडी ) व स्वाद आणणारे जिन्नस घालून ते मळून त्याचे रोट करून ते भाजतात. भाजण्याचे आरंभीं भट्टींतील ऊष्णता फारशी वाढली नाहीं तोंच कणकीतील पिष्टान्नापासून

त्या आंबवणाऱ्या यीस्ट पदार्थामुळें कणकींत थोडी शर्करा तयार होऊन नंतर फसफसण्याची क्रिया सुरू होते. या क्रियेंत कारबानिक आसिडवायू उत्पन्न होऊन त्याचे बुडबुडे रोटांत सर्वठिकाणीं प्रवेश करीतात व त्यामुळें रोट पोखरला जाऊन हलका व स्पंजासारखा भुसभुशीत होतो व त्यांत असंख्य छिद्रें निर्माण झाल्यामुळें पाचकरसांत तो सहजपणें मुरला जाण्यास लायक होतो; कारण रोट भाजल्यावर त्यांतील वायु व अल्कोहोल उडून जातात व आंबवण व फसफसण्याची क्रिया सुरू करणारें यीस्ट फार उष्णतेमुळें निर्वीर्य होतें. व रोटास पापुद्रा भाजक्या रंगाचा धरतो, म्हणजे पाव तयार झाला. भाकरी, पोळी यांत फसफसणें खेरीज करून हीच क्रिया कमी प्रमाणांत असते; व त्यामुळें पावासारखे हे पदार्थ हलके, भुसभुशीत व अशक्त रोगी माणसास पचण्यास सुलभ नसतात. येवढा फरक दोहोंमध्यें आहे.

१०० भाग पाव असल्यास त्यांत नैट्रोजन युक्त सत्त्व ७ पासून १० भाग, पिष्टान्न ५५ भाग, स्निग्धपदार्थ १ भाग, क्षार पदार्थ २ भाग व बाकीचे २९ पासून ३२ भाग जल असतें असें पृथक्करण केल्यामुळें समजून आलें आहे.

**अन्न शिजविणें, पाकसिद्धी, स्वयंपाकः**—मानव वंशाचे रीतिभातींत सुधारणा होत गेल्याचें स्वयंपाक हें एक फळ आहे व अनेक दृष्ट्या तें हितावह आहे ते असें:—

१ अन्नांत प्रविष्ट झालेल्या रोगबीजांचा, व कृमींचा शिजवल्यामुळें नाश होतो व त्यामुळें सांथीचे रोगास प्रतिबंध होतो इतकेंच नव्हे तर विशिष्ट मांसाशनापासून होणारे मोठाले दीर्घषट्काकार कृमिरोग व स्नायुवासी कृमिरोग अशा रोगापासून माणसांचा बचाव होतो.

२ उद्भिज अन्नांतील पिष्टान्न शिजल्यामुळें त्यांतील पचनास कठिण जो सेल्यूलोज पदार्थ तो उत्सर्जनासाठीं वेगळा होतो व जठर रस पिष्टान्नांत मिसळून तें अन्न चांगलें पचतें.

३ मांसाहारामध्यें पचनास जड असा जो भाग असतो, त्याचें डिंकासारख्या जेलाटीन नामक पदार्थांत रूपांतर होऊन, त्यामुळें तें पचनास सुलभ होतें. स्नायूंतील तंतूंत वाफ शिरून ते मोकळे होतात व स्नायु बंधन करणारे सर्व भाग शिजवण्यानें नरम होऊन पौष्टिक मांसल भागाचें पचन करण्यास जठर व इतर अन्नपाचकरसांस सुलभ जातें. मात्र मांसांतील मरणोत्तर काठिन्य कमी अगर नाहींसें होईपर्यंत थांबून नंतर तें शिजवावें. तें तयार करण्याचे भाजणें व शिजवणें असे दोन प्रकार आहेत व त्यापैकीं पहिली पद्धति विशेष फायदेशीर आहे. कारण मांस भाजलें म्हणजे त्यांतील पौष्टिक पदार्थ घन होऊन त्यांचें त्या मांसावर आच्छादन बनतें व आंतील चरबी तेवढी वितळून निघून जाते व मांसातील पौष्टिकरस त्या आच्छादनाखालीं राहूं शकतात. पण तेंच मांस शिजविलें व त्यांतील मांसाचें सार अगर कढो राखून ठेविलो नाहीं तर त्या मांसांतील पौष्टिक पदार्थ बरेचसे वायां जातात. शिवाय त्यांतील नैट्रोजनयुक्त पौष्टिक पदार्थ पचण्यास अधिक जड होतात. असें जरी आहे तरी एकंदरीत मांस शिजविण्यापासून अगर भाजून खाण्यापासून जितके फायदे आहेत तितके त्यापासून तोटे नाहींत. कच्या मांसातील मांसरस पचण्यास अगदीं सुलभ असतो.

मांसाचा काढा अगर अर्क तयार करण्यासाठीं, प्रथम मांस थंड पाण्यांत ठेवतात व लक्षपूर्वक व हळुहळू तें ऊन करतात. हें मांस जर साध्यापैकीं असेल तर थंड पाण्यांत न ठेवतां, तें एकदम आधणाच्या पाण्यांत घालावें; म्हणजे त्याच्या वाहेरील भाग घट्ट होतो व आंतील पौष्टिक मांसरस त्यांतून निसटून फारसे जात नाहींत. ह्या काढ्यांत व अर्कांत अन्नाचे गुणधर्म अगदीं नसतात हें लक्षांत ठेविलें पाहिजे. त्यांत पौष्टिक गुण नसतात, परंतु त्यांतील क्षार आणि ' क्रीआटिन, ' ' क्रियाटिनीन, ' लॅक्टिक अॅसिड इत्यादि मांसाकेंद्रव्यांमुळें त्यांत रुचकरपणा फार असतो व म्हणून आजारांतून उठलेल्या अशक्त माणसांनां हे पदार्थ हवेसे वाटून त्यामुळें त्यांनां उत्तम फायदा व आनंद होतो.

**मांसाचें सार किंवा रस्साः**—यांत मांसांतील अर्क असून शिवाय नायट्रोजनयुक्त पौष्टिक पदार्थ थोडे असतात. व डिंकाप्रमाणें कांहीं अंश असतो. या सारामध्यें हा डिंकासारखा पदार्थ अधिक हवा असल्यास रस्सा अगर सार शिजवतांना त्यांत हाडें अगर तंतुमय मांस अंमळ जास्त घालावें, रस्सा थंड झाला, म्हणजे तो दाट होतो याचें कारण हा डिंकासारखा जेलाटिन नामक पदार्थ होय.

**तोंडीलावणीं, मद्यप्राशन, चहा, कॉफी, पालेभाज्या व फळभाज्या.**—मद्यांतील अल्कोहोल ह्या पदार्थाला नेहमीचें स्थितींत अन्नाचें कार्य करतां येत नाहीं. तो फक्त अन्न पचनास मदत व उत्तेजन देतो. तिखट, मीठ, आलें, लिंबू, चटण्या, कोशिंबिरी, लोणचीं, पापड, मेतकूट, सांडगे, हे पदार्थ जठरसाचें दीपन करण्यास उपयुक्त आहेत, पण ते अपरिमित सेवन केल्यानें त्यांपासून अग्निमांद्य ही व्याधि जडते. चहा, कॉफी, कोको वगैरे पदार्थ मेंदू व मज्जातंतूनां मुख्यत्वेंकरून उद्दीपित करतात. या सगळ्यांमध्यें थीइन, कॅफीन हीं सत्वें असतात; व त्यांमध्यें हे गुण आहेत.

कोकोमध्यें थिओ ब्रोमिन हा स्निग्ध पदार्थ असतो तसेंच एक कोकेन नांवाचें सत्व असतें. हीं सत्वें विषारी आहेत, व चहा कॉफी हे पदार्थ फार सेवन केल्यामुळें मस्तक भणभणणें, पचनक्रिया मंद होणें, झोंप न येणें वगैरे तक्रारी सुरू होतात व त्या वैद्य लोकांच्या नेहमीं पाहण्यांत येतात. कॉफीमध्यें कांहीं सुवासिक पदार्थ असतात. चहामध्यें इजा करणारें टॅनेन नामक कडवट सत्त्व असतें. चहा फार वेळ उकळूं दिला नाहीं म्हणजे हें सत्त्व इजा करीत नाहीं. कडवट चहा पिऊं नये. कोको हा उत्तेजक व पौष्टिक पिण्याचा जिन्नस आहे, व त्यांत स्निग्ध व पौष्टिक पदार्थ बऱ्याच मोठ्या प्रमाणांत असतात.

पालेभाज्यांत पौष्टिक गुण नसतो परंतु त्यांत पोट्याशियमचे क्षार पुष्कळ असतात. कोबी, मुळे, नवलकोल यांत शेंकडा ८० ते ९२ पाणी असतें, १ ते २ भाग नैट्रोजनयुक्त पदार्थ, २ ते ४ भाग पिष्ट पदार्थ व १ ते १.५ भाग सेल्युलोज हा टाकाऊ पदार्थ असतो. असल्या अन्नांत पोषणशक्ति कमी असल्यामुळें गुराढोरांची पोटें व आंतडीं पुष्कळ वैरण खाण्यासाठीं मोठीं असतात. फलभाज्या, व पालेभाज्यांतील नानाप्रकारच्या क्षारांमुळें मनुष्याच्या शरीरावर फायदेशीर परिणाम घडतो. त्या खाण्यास रुचकर व स्वादिष्ट असतात. लिंबाचा रस हा आहारामध्यें अत्यंत जरूर आहे ! फळें, भाज्या, वगैरे खाण्याचा कोणास कंटाळा असतो; अगर आगबोटींतील दूरच्या प्रवासांत त्या मिळत नाहींत परंतु त्यामुळें रक्तपित्त ( Scurvy ) नामक रोग होतो.

**अन्नंभट्टः**—हा जातीचा तैलंग ब्राह्मण मोठा नैय्यायिक होता. गरिकपाद हें तैलंगणांतील खेडेगांव पूर्वी निजामअल्लीच्या अमलाखालीं होतें, तेथें याचा जन्म झाला. शालिवाहनाच्या पंधराव्या शतकांत चालुक्य राजांच्या वेळीं याचा उदय झाला. कौंडिण्यपुर ज्यास कोंडवीडू असें म्हणतात, तेथील संस्कृत शाळेंत हा बारा वर्षे राहून न्यायशास्त्र पढला व त्या शास्त्राचें ज्ञान यानें उत्तम प्रकारचें संपादिलें.

पुढें यानें नवीन अभ्यास करणाऱ्यांस न्याय शास्त्रांतील पदार्थ व सिद्धांत थोडक्यांत कळावे या हेतूनें एक लहानसा तर्कसंग्रह नांवाचा ग्रंथ रचिला. तो हल्लीं सर्वत्र प्रख्यात असून न्यायशास्त्राचे प्रथमाभ्यासी पहिल्यानें तोच पढत असतात.

यानें तर्कसंग्रह ग्रंथ केल्यावर न्यायशास्त्र पढविण्यासाठीं एक स्वतःचें विद्यालय स्थापिलें आणि तेथें आपल्या शिष्यांस तर्कसंग्रह, तर्कदीपिका, मुक्तावली, आणि गादाधरी, अशा क्रमानें त्या ग्रंथाचे पाठ दिले. याप्रमाणें याचा क्रम बहुत दिवस चालल्यानें याचे विद्यार्थी त्या शास्त्रांत उत्कृष्ट प्रवीण झाले.

अनंभट्ट सुमारें आपल्या वयाच्या ५५ व्या वर्षी श्रीक्षेत्र मल्लिकार्जुनाच्या दर्शनास गेला. याशिवाय यानें कोणताहि प्रवास कधींच केला नाहीं. फार तर काय पण द्रव्याच्या आशेनेंहि हा कधीं कोणा राजाच्या भेटीस गेला नाहीं. कारण तो सर्वदा संतोषवृत्तीचा असल्यामुळें, जें कांहीं द्रव्य त्याच्या बापाच्या वेळचें त्याजवळ होतें तेवढ्यांतच तो आनंदी असे. देवदर्शन करून हा आपल्या गांवीं आल्यावर यानें सकाळ व संध्याकाळचे दोन तास स्नानसंध्येंत घालवून राहिलेल्या वेळांत विद्यार्थ्यांना पढविण्याचा नियम ठेविला. यास मुलें पुष्कळ झालीं परंतु याच्या अंतकाळीं एकहि जिवंत नव्हतें असें सांगतात. ( कविच. )

**अन्नय्याचारीः**—हा तैलंग जातीय ब्राह्मण किंवा कोण कळत नाहीं, व कधीं झाला तें हि कळत नाहीं. मात्र तेलगी भाषेंत दोन भागांनीं रचलेलें पितामहचरित्र याचें प्रसिद्ध आहे, त्यांत सृष्टिकर्त्या ब्रह्मदेवाचें यानें वर्णन केलें आहे. ( कविच. ).

**अन्नवस्त्र**—ज्या मनुष्याला स्वतःचें पोषण स्वतःच्या श्रमानें करणें कांहीं कारणामुळें शक्य नसतें व त्याला दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागतें; अशा वेळीं त्याला आपल्या पोषणाची तजवीज कायदेशीर रीतीनें दुसऱ्या एखाद्या व्यक्तीकडून किंवा मालमत्तेतून करून घेण्याचा हक्क असतो त्या हक्कास अन्नवस्त्राच्या हक्क असें म्हणतां येईल.

हिंदु कायदा

इतर कोणत्याहि देशांतल्या कायद्यापेक्षां हिंदु कायद्यांत अन्नवस्त्राचा प्रश्न अधिक महत्त्वाचा व अधिक व्यापक आहे. इतर देशांतल्या कायद्याप्रमाणें अन्नवस्त्राचा प्रश्न फक्त बायको व मुलें यांचें पुरताच येतो. पण हिंदु कायद्यांतील एकत्र कुटुंब पद्धति व वारसा हक्कासंबंधीचे विशिष्ट नियम यामुळें अन्नवस्त्राचा हक्क अनेक इसमांना प्राप्त होत असतो. एकत्र कुटुंब पद्धतीचा मुख्य नियमच हा आहे कीं, एकत्रकुटुंबांतील सर्वच स्त्री-पुरुष-बाल-तरुण-वृद्धांना फक्त अन्नवस्त्राचा हक्क समाईक मिळकतींत असतो. अविभक्त कुटुंबाच्या कर्त्यावर अशा कटुंबांतील सर्व इसमांना व त्यांच्या बायकामुलांना पोसण्याची व त्यांच्या विवाहादि धार्मिक संस्कारांचा खर्च करण्याची जबाबदारी असते. ज्यांना समाईक मिळकतींतील हिस्सा मिळावयाचा असतो त्यांना समाईक स्थितींत अन्नवस्त्राचा हक्क असतो, इतकेंच नव्हे तर ज्या कुटुंबीयांना कांहीं वैयक्तिक नालयकीमुळें मिळकतींत वारसा हक्क नसतो, अशा इसमांना व त्यांच्या मुलांना, व मुलींना आणि त्यांच्या अव्यभिचारी स्त्रियांना अन्नवस्त्राचा हक्क असतो. मनुष्य कांहीं मानसिक किंवा शारीरिक व्यंगामुळें, किंवा अनौरसतेमुळें, किंवा दत्तविधान नाशावित ठरल्यामुळें वारसाहक्काला अपात्र होत असतो. वारसाहक्काला अपात्र अतएव केवळ अन्नवस्त्राचे हक्कदार कोण याविषयीं याज्ञवल्क्य स्मृतींत पुढील वचन आहेः—

क्लीबोऽथ पतितस्तज्जः पंगुरुन्मत्तको जडः ।
अन्धोऽचिकित्स्यरोगाद्या भर्तव्याः स्युर्निरंशकाः ॥

अर्थ—क्लीब, पतित, पंगु, उन्मत्त, जड, अन्ध, असाध्य रोगी व त्यांची संतति यांस दायभाग न देतां पोटगी द्यावी.

हिंदुधर्मशास्त्रांत अन्नवस्त्राच्या हक्कासंबंधाची जबाबदारी दोन प्रकारची असतेः ( १ ) व्यक्तीवरील, व ( २ ) ईस्टेटीवरील. व्यक्तिगत जबाबदारी ( पर्सनल ) ही मनुष्यावर त्याच्या कांहीं विशिष्ट नात्याच्या इसमांना कांहींहि ईस्टेट नसली तरी पोसण्याबद्दल असते. या जबाबदारीसंबंधानें मनुस्मृतीमध्यें पुढील वचन आहे.

वृद्धौ च मातापितरौ साध्वी भार्या सुतः शिशुः ।
अप्यकार्यशतं कृत्वा भर्तव्या मनुरब्रवीत् ॥

मनुस्मृति ( ८, ३५ ).

म्हणजे वृद्ध माता व पिता, साध्वी भार्या, व अज्ञानावस्थेंतील मुलगा ( मुलें ) यांना मनुष्यानें शंभर दुष्कृत्यें करून

मुद्धां म्हणजे कोणत्याहि विकट स्थितींत कोणतीहि सबब न सांगतां पोसलें पाहिजे. सदरहू नातेवाईकांखेरीज इतर कित्येक नातेवाईकांना पोसण्याची जो जबाबदारी माणसावर असते ती मात्र वारसाहक्कानें मिळालेल्या मिळकतीवर अवलंबून असते म्हणजे त्याला जी इस्टेट मिळाली असते तेवढ्यांतून अन्नवस्त्राचा खर्च चालविण्यास तो जबाबदार असतो. उदाहरणार्थ, वहीण, सावत्र आई, सून, भावजय वगैरेंना पोसण्याची जबाबदारी व्यक्तिगत नसते, ईस्टेटीवर अवलंबून असते.

पु त्रा चा हक्कः--पुत्राला पोसण्याची जबाबदारी तो वयांत येईपर्यंतच पित्यावर असते. ही जबाबदारी हिंदु कायद्याप्रमाणें इतर प्रत्येक राष्ट्राच्या कायद्यानेंहि सांगितलेली आहे. मुलगा वयांत आल्यावर ही व्यक्तिगत जबाबदारी संपते. पण बाप व मुलगे हे जर एकत्र कुटुंबी असून कुटुंबाची समाईक ईस्टेट असेल तर मुलगे वयांत आल्यानंतरहि समाईक ईस्टेटीवर पोषणाचा भार टाकण्याचा त्यांना हक्क असतो कारण मिताक्षरा हिंदुकायद्याप्रमाणें (बंगालेतर हिंदुस्थानाला लागू असलेला हिंदु कायदा) पुत्राचा जन्मावरोवर समाईक ईस्टेटींत वारसा हक्क उत्पन्न होत असतो, त्यामुळें विभक्त पडेपर्यंत समाईक ईस्टेटींतून अन्नवस्त्रादि खर्च चालविण्याचा हक्क वयांत आल्यानंतरहि मुलांना असतो. शिवाय राज्य किंवा एखादी ईस्टेट विभागली जाण्याची मनाई कायद्यानें असते व तिचा वारसा वडील मुलाकडे सर्वस्वी जातो, अशा प्रकारांत धाकट्या मुलांना वयांत आल्यानंतरहि पोषणाचा हक्क त्या ईस्टेटींवर असतो.

मु ली चा हक्कः---मुलीचें लग्न होईपर्यंत तिला पोसण्याची जबाबदारी बापावर असते. बाप वारल्यावर मात्र त्यांच्या पोषणाची जबाबदारी कोणाहि व्यक्तीवर नसून बापाच्या ईस्टेटीतून त्यांच्या अन्नवस्त्राचा खर्च मिळण्याचा मुलींना हक्क असतो. विवाह होतांच बापाच्या कुटुंबाऐवजीं ती नवऱ्याच्या कुटुंबांतील माणूस कायदेशीरपणें बनते. अर्थात् मग तिच्या पोषणाची जबाबदारी नवऱ्यावर व्यक्तिशः पडते व त्याच्या पश्चात् त्याच्या ईस्टेटीवर पडते. पण नवऱ्याची ईस्टेट मुळींच नसेल तर कायद्यानें तिच्या पोषणाची जबाबदारी कोणावरहि पडत नाहीं. मात्र कायदेशीर जबाबदारी नसली तरी नैतिक जबाबदारी तिच्या सासऱ्यावर पडते, आणि सासरा वारल्यावर त्याच्या इस्टेटींतून अन्नवस्त्र मिळण्याचा कायदेशीर हक्क तिला प्राप्त होतो. पण नवऱ्याकडून किंवा त्याच्या पश्चात् नवऱ्याच्या कुटुंबाकडून तिच्या अन्नवस्त्राची सोय होणें शक्य नसलें, तर तिच्या बापावर, त्याची स्वतंत्र मिळकत असेल तर, तिला पोसण्याची कायदेशीर नव्हे तरी नैतिक जबाबदारी असते. बापाच्या पश्चात् त्याच्या इस्टेटीवर विवाहित किंवा विधवा मुलीला अन्नवस्त्राचा कायदेशीर हक्क उत्पन्न होतो कीं नाहीं याबद्दल निरनिराळ्या हायकोर्टांचा मतभेद आहे. मुंबई हायकोर्ट कायदेशीर हक्क नाहीं असें म्हणतें, तर कलकत्ता हायकोर्टानें कायदेशीर हक्क आहे असें ठरविलें आहे.

ना त वं डें.—आजावर नातवंडांनां पोसण्याची जबाबदारी व्यक्तिशः नसते. अर्थात् समाईक मिळकतींतून अन्न वस्त्रादिकाचा खर्च चालण्याचा नातवंडांचा हक्क असतो, कारण समाईक ईस्टेटींत जन्मावरोवर नातवांचा वारसा हक्क उत्पन्न होत असतो.

अ नौ र स मु लें.—हिंदु इसमावर त्याच्या अनौरस पुत्राला पोसण्याची व्यक्तिगत जबाबदारी असते. आणि त्याच्या पश्चात् त्याच्या स्वतंत्र ईस्टेटींतून किंवा ज्या समाईक ईस्टेटींत त्याचा जन्मसिद्ध हक्क असेल तिच्यांतून अन्नवस्त्र मिळण्याचा अनौरस पुत्राला हक्क असतो. पण हा हक्क अनौरस पुत्राला मात्र असतो, त्याच्या मुलाला पुढें नसतो. अनौरस पुत्राचा हा हक्क तो वयांत आल्यानंतरहि असतो, असें मिताक्षरा कायद्याचें तत्त्व आहे; पण दायभाग ( बंगालप्रांताच्या ) कायद्याप्रमाणें हा हक्क वयांत येईपर्यंतच असतो. शिवाय हिंदुकायद्याप्रमाणें हा अन्नवस्त्राचा हक्क हिंदुस्त्रीपासून झालेल्या अनौरस पुत्रासच कायतो असतो, इतर धर्मांतील स्त्रीच्या मुलास नसतो. तथापि अशा परधर्मी स्त्रीपासूनच्या अनौरस मुलास क्रिमिनल प्रोसीजर कोडाच्या ४८८ कलमाप्रमाणें अन्नवस्त्र मागतां येतें. पण त्या कलमान्वयें बापाच्या पश्चात् त्याच्या ईस्टेटीवर अन्नवस्त्राचा दावा आणतां येत नाहीं.

अनौरस मुलीला अन्नवस्त्र मिळावें अशी हिंदु कायद्यांत व्यवस्था नाहीं. पण वर सांगितलेल्या क्रिमिनल प्रोसीजर कोडांतील कलमाप्रमाणें अनौरस मुलीलाहि अन्नवस्त्र मिळूं शकतें.

आ ई बा प---वृद्ध आईबापांना पोसण्याची जबाबदारी प्रत्येक माणसावर असते व ती जबाबदारी व्यक्तिगत असते, म्हणजे वडिलार्जित ईस्टेट मिळालेली नसली तरी स्वकष्टार्जितांतून त्याला आईबापांचें पोषण करणें कायद्यानें भाग आहे. त्याच्या पश्चात् त्याच्या ईस्टेटीवर ही जबाबदारी पडते. इतर कोणावर व्यक्तिगत जबाबदारी मात्र नसते.

बा य को---बायकोच्या पोषणाची जबाबदारी नवऱ्यावर व्यक्तिगत असते, ती ईस्टेटीवर अवलंबून नसते. बायकोचा हा हक्क विवाहसंबंधमात्रेंकरून उत्पन्न झालेला असतो. पण नवऱ्यानें टाकलेल्या बायकोला पोसण्याची जबाबदारी नवऱ्याच्या नातेवाईकांवर जी असते ती नवऱ्याची ईस्टेट त्यांच्या ताब्यांत असली तरच असते.

नवऱ्याजवळ राहून त्याच्या आज्ञेप्रमाणें वागणें हें बायकोचें आद्य कर्तव्य होय. म्हणून नवऱ्यापासून स्वतंत्र राहून पोटगी मागण्याचा हक्क बायकोला नसतो. पण या सामान्य नियमाला अपवाद आहेत. नवऱ्याच्या वाईट वागणुकीस्तव किंवा तिला नवऱ्यानें स्वतः जवळ बाळगण्याचें नाकारल्यास

किंवा दुसऱ्या योग्य कारणास्तव बायकोला स्वतंत्र राहून अन्नवस्त्र मागण्याचा हक्क येतो. पण नवऱ्याच्या साध्या अवकृपायुक्त वागणुकीस्तव किंवा त्यानें दुसरें लग्न केल्यामुळें किंवा व्यवहारांतील साध्या भांडणतंट्यास्तव तिला स्वतंत्र राहण्याचा हक्क उत्पन्न होत नाहीं. उलटपक्षीं जर नवऱ्यानें घरांतच एखादी उपस्त्री ठेविली असेल किंवा तो बायकोला जिवास धोका होईल इतक्या क्रूरपणानें छळीत असेल तर स्वतंत्र राहून अन्नवस्त्र मागण्याचा तिला हक्क पोहोंचतो.

पण योग्य कारणास्तव दूर राहिल्यावर जर बायको व्यभिचारकर्म करूं लागेल तर तिचा अन्नवस्त्राचा हक्क नष्ट होतो. पण हा हक्क कायमचा नष्ट होत नाहीं. या बाबतींत न्यायमूर्ति चंदावरकर यांनीं दिलेला निकाल महत्त्वाचा आहे तो असाः "हिंदु इसमाला स्वतःच्या विवाहित स्त्रीचा पूर्णपणें त्याग करतां येत नाहीं. जर ती वाईट वर्तन करीत असली तर तिला स्वःच्या घरांत नियंत्रणाखालीं ठेवून तिला जीव जगण्यापुरतें अन्नवस्त्र त्यानें दिलें पाहिजे. शिवाय तिला पश्चात्ताप होऊन ती प्रायश्चित घेऊन पुन्हां शुद्धाचरण करूं लागेल तर तिला पूर्ववत् पत्नीचे हक्क प्राप्त होतात. मात्र तिनें हलक्या जातीच्या माणसाशीं व्यभिचार केला असेल तर पुनः शुद्धि शक्य नाहीं; पण केवळ अन्नवस्त्र मिळण्याचा तिला हक्क राहतो."

इस्टेटीवरील जबाबदारी–हिंदु इसमावर अन्नवस्त्र पुरविण्याची व्यक्तिगत जबाबदारी आईबाप बायको व मुलें ह्यांच्या पुरतीच असते. इतर नातेवाइकांना पोसण्यासंबंधाची जबाबदारी ईस्टेटीवर अवलंबून असते. यासंबंधानें सामान्य नियम असा आहे कीं, ज्याची ईस्टेट असेल त्याच्यावर अन्नवस्त्राकरितां अवलंबून असणाऱ्या इसमांना ती ईस्टेट घेणाराला पोसावें लागतें. एकत्र कुटुंबांतील सर्व इसमांना समाईक मिळकतींतून पोसण्याची जबाबदारी कुटुंबाच्या कर्त्यावर असते हें वर सांगितलेंच आहे.

विधवा.—ज्या विधवेला नवऱ्याची इस्टेट वारसा हक्कानें प्राप्त होत नाहीं तिला पोसण्याची जबाबदारी (१) तिच्या नवऱ्याच्या स्वतंत्र ईस्टेटीवर असते; आणि (२) तिच्या नवऱ्याचा मरणसमयीं ज्या समाईक ईस्टेटींत हक्क असेल तर त्या ईस्टेटीवर असतें. नवऱ्याच्या ईस्टेटींतून अन्नवस्त्र मिळण्याचा हा हक्क नवऱ्याच्या मरणसमयीं ती त्याच्यापासून स्वतंत्र राहत असली तरी नष्ट होत नाहीं. शिवाय नवरा जिवंत असेपर्यंत स्वतंत्र राहून अन्नवस्त्र मागण्याचा हक्क बायकोला सामान्यतः नसला तरी विधवेला तो नियम लागू नाहीं, म्हणजे विधवेनें नवऱ्याच्या कुटुंबांतच राहिलें पाहिजे अशी कायद्याची सक्ति नाहीं. श्वशुरगृह सोडून ती पितृगृहीं किंवा इतर ठिकाणीं राहिली तरी तिचा अन्नवस्त्र मिळण्याचा हक्क कायम असतो. पण स्वतंत्र राहून ती जर व्यभिचारी बनेल किंवा इतर अयोग्य वर्तन करील तर तिचा पोटगीचा हक्क नष्ट होतो. तसेंच मृतपतीची ईस्टेट फार थोडी असेल तर कोर्टास स्वतंत्र पोटगी देववणार नाहीं. विधवेनें पुनर्विवाह केल्यास तिचा पहिल्या नवऱ्याकडील अन्नवस्त्राचा हक्क नष्ट होतो. (हिंदु विधवांच्या पुनर्विवाहाचा कायदा १८५६, कलम २).

पोटगीची रक्कम.—विधवेची पोटगी ठरवितांना (१) तिच्या नवऱ्याच्या इस्टेटीची किंमत, (२) मृतपतीचा दर्जा व (३) विधवेच्या गरजा व तिला कर्तव्य असलेलीं धार्मिक कृत्यें एवढ्या गोष्टी विचारांत घेतात. शिवाय वस्त्रें व अलंकार या अनुत्पादक स्त्रीधनाखेरीज दुसरें द्रव्योत्पादक स्त्रीधन, किंवा निर्वाह चालविण्यासारखें दुसरें स्वतंत्र साधन असेल तर तिला पोटगी मागण्याचा हक्क नसतो.

इतर इसमांची पोटगी ठरवितांना वरील प्रकारच्याच गोष्टी कोर्ट लक्षांत घेतें. तसेंच मृताच्या ईस्टेटींत जो कमजास्त फरक होईल त्याप्रमाणें पोटगीची रक्कम कमजास्त करून घेण्याचा हक्क असतो.

मुसुलमानी कायदा.

अन्नवस्त्र—मुसुलमानी कायद्यांत पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाहि मयताच्या इस्टेटींत वारसाचा हक्क मिळण्याचा नियम असल्यामुळें, आणि हिंदु कायद्यातील एकत्र कुटुंब पद्धतीचें तत्त्व नसल्यामुळें अन्नवस्त्राच्या हक्काचें क्षेत्र बरेंच मर्यादित होतें. ज्याला किंवा जिला स्वतःच्या मालकीच्या ईस्टेटींतून चरितार्थ चालण्याची सोय असेल अशा कोणालाहि अन्नवस्त्राचा बोजा दुसऱ्यावर टाकण्याचा हक्क नाहीं. प्रत्यक्ष बायकोला सुद्धा अन्नवस्त्राचा हक्क सतत सांगतां येत नाहीं.

बायको—सामान्य नियम असा आहे की, नवऱ्यानें बायकोचें पोषण केलें पाहिजे. पण ही नवऱ्यावरील जबाबदारी बायको त्याच्या उपयोगी पडत असेल तोंपर्यंतच असते. म्हणजे उदाहरणार्थ, जर बायको वैवाहिक संबंध ठेवण्यास अयोग्य इतकी अल्पवयी असेल, किंवा आज्ञाधारक नसेल व कायदेशीर सबब नसतांहि नवऱ्याला नाकारित असेल, किंवा नवऱ्याच्या ताब्यावाहेर राहात असेल तर तिला अन्नवस्त्राचा हक्क प्राप्त होत नाहीं. पण वरीलपैकीं कोणतेंहि कारण नसल्यास, बायको गरीब, श्रीमंत, मुसुलमानधर्मी किंवा इतर पंथाची, किंवा अनुपभुक्त, उपभुक्त कशीहि असो तिला अन्नवस्त्र पुरविणें नवऱ्याला भाग असतें. बायकोला कोर्टांत फिर्याद लावून अन्नवस्त्र मिळवितां येते, पण गतकालातील अन्नवस्त्राचा खर्च मागतां येत नाहीं. पण कोर्टाकडून पोटगीचा हक्क फक्त विवाहसंबंध टिकेपर्यंतच मिळतो, म्हणजे काडीमोड (डायव्होर्स) झाल्यास किंवा वैधव्य आल्यास हा पोटगीचा हक्क नष्ट होतो. पण काडीमोड प्रसंगीं इद्दत म्हणून जो काल जावा लागतो त्या काळांत पोटगीचा हक्क असतो. मुसुलमानी कायद्यानें एका काळीं चारपर्यंतच बायका करण्याची परवानगी असल्यामुळें पांचव्या किंवा त्यापुढील विवाहित स्त्रीस अन्नवस्त्राचा किंवा वारसाचा हक्क नसतो.

मु लें:--मुलगे व मुली अल्पवयी असेपर्यंत ( इंडियन मेजॉरिटी ॲक्ट प्रमाणें ) त्यांना पोसण्याची जबाबदारी बापावर असते, तथापि मुलगा वयांत आल्यावरोबर ही जबाबदारी संपते, मात्र वयांत आलेला मुलगा जर व्यंग ( इनफर्म ) असेल व बाप श्रीमंत असेल तर त्यावर मुलाला पोसण्याची जबाबदारी असते. उलट पक्षीं वयांत न आलेल्या मुलाकडून द्रव्योत्पादक असें मुलाच्या योग्यतेनुरूप काम करवून उत्पन्नांत भर घालण्याचा हक्क बापाला असतो. मुलींना विवाह होईपर्यंत, तसेंच काडीमोड झाल्यावर किंवा वैधव्य आल्यावर पोसणें बापाचें कायदेशीर कर्तव्य आहे. पण बाप गरीबीमुळें असमर्थ असल्यास मुलांचा आजा किंवा आई सांपत्तिक स्थिति बरी असल्यास त्यांच्या पोषणाला जबाबदार असते, आणि पुढें बापाला अनुकूलता आल्यास तो खर्च बापाकडून वसूल करून घेतां येतो. कोणी मुसुलमान बायकोला व औरस किंवा अनौरस मुलांना पोसण्याचें टाळीत असेल तर क्रिमिनल प्रोसिजर कोडांतील कलम ४८८-४९० प्रमाणें अन्नवस्त्रार्थ नेमणूक मागून घेतां येते.

आ ई बा प.—गरीब आईबापांना, तीं स्वकष्टानें द्रव्यार्जन करण्यास समर्थ असलीं तरी, पोसण्याची जबाबदारी सांपत्तिक दृष्ट्या लायक मुलांवर ( मुलगे व मुली ) असते व ती मुलगे व मुली दोघांवर सारखी असते. उदाहरणार्थ, एका मुसुलमान बापाला एक तीस हजारांचा मालक मुलगा व पंधरा हजारांची मालक मुलगी असेल व बापाचा खर्च दरमहा पन्नास रुपये असेल तर मुलगा व मुलगी यांनीं दरमहा पचवीस पंचवीस रुपये बापाला दिले पाहिजेत असें कायदा सांगतो.

इ त र ना ते वा ई कः--सांपत्तिक अनुकूलता असलेल्या प्रत्येक मुसुलमानानें आपल्या गरीब नातेवाईकांस ( विवाहसंबंधास निषिद्ध मानलेल्या=प्रोहिबिटेड डिग्रीज ) पोसावें. पण असले पुरुष नातेवाईक वयांत न आलेले किंवा व्यंग असतील, आणि स्त्री नातेवाईक पतिहीन किंवा गरीब पती असलेले असतील तरच ही पोषणाची जबाबदारी येते. तसेंच श्रीमंतावर गरीब नातेवाईकांस पोसण्याची ही जबाबदारी त्या नातेवाईकांना श्रीमंताच्या इस्टेटींत वारसा हक्क जितक्या प्रमाणांत असेल तितक्या प्रमाणांतच असते, व तितक्या प्रमाणांत हा हक्क फिर्याद लावूनहि वसूल करतां येतो.

ही पोषणाची जबाबदारी उभयपक्षांपैकीं कोणी धर्मांतर केलें तरी नष्ट होत नाहीं.

पाश्चात्त्य कायदा

अ न्न व स्त्र—( ॲलिमनी )—नवराबायकोचा घटस्फोट किंवा काडीमोड ( डायव्होर्स ) झाल्यावर, किंवा नवराबायकोचा दांपत्यसंबंध नष्ट होऊन विभक्तपणाबद्दल कोर्टाचा हुकूम ( ज्युडिशियल सेपरेशन=दांपत्यसंबंध तुटला तरी त्यांस त्यांच्या हयातींत लग्न करूं न देण्याचा हुकूम ) झाल्यावर नवऱ्याच्या इस्टेटींतून बायकोला पोटगीबद्दल जी नेमणूक मिळते तिला पाश्चात्त्य कायद्यांत ॲलिमनी असें म्हणतात. ही नेमणूक सामान्यतः नवऱ्याकडून बायकोला मिळावयाची असते; पण विशिष्ट परिस्थितींत ती बायकोकडून नवऱ्याला मिळते, ही नेमणूक दोन प्रकारची असते. (१) कच्ची ( टेंपररी ), व (२) कायम किंवा पक्की ( पर्मनंट ). कच्ची नेमणूक म्हणजे दाव्याचा निकाल होईपर्यंतची नेमणूक. ही दावा चालू असेपर्यंत बायकोच्या निर्वाहाची सोय व्हावी म्हणून नवऱ्याकडून बायकोला नेमणूक देववितात. असला दावा नवऱ्यानें केलेला असो किंवा नवऱ्याविरुद्ध केलेला असो. इंग्रजी कायद्यांत कच्ची नेमणूक नवऱ्याच्या निवळ उत्पन्नाच्या एक-पंचमांश देण्याची वहिवाट आहे; परंतु जर नवऱ्याला उत्पन्नाचें कांहींच साधन नसेल किंवा त्याचें दिवाळें वाजण्याचा प्रसंग असेल तर कच्ची नेमणूक देण्याचें कोर्ट नाकारितें. शिवाय बायको स्वतःच्या कमाईनें चरितार्थ चालवीत असेल तर ती गोष्ट कोर्ट लक्षांत घेतें, आणि पोटगीचा दावा लागण्यापूर्वी बरींच वर्षें नवराबायको विभक्त राहात असून बायको स्वतःचा निर्वाह स्वतंत्रपणें चालवीत असेल तर, किंवा नवऱ्यावर अवलंबून न राहतां तिला स्वतंत्र निर्वाहाचें साधन असेल तर कच्ची नेमणूक कोर्ट देववीत नाहीं. (२) कायम नेमणूक दाव्याचा निकाल झाल्यावर कोर्ट देवविते ती होय. मॅट्रिमोनिथल कॉझेस ॲक्ट १९०७ या कायद्याअन्वयें विवाहबंधमोचनाचा किंवा विवाहरद्दीचा ( नलिटी ) निकाल देतांना कोर्टानें योग्य वाटल्यास नवऱ्याकडून बायकोला एकदम ठोक रक्कम किंवा वार्षिक नेमणूक तिच्या हयातीपर्यंत देवविण्याचा हुकूम करावा. ही रक्कम किंवा नेमणूक बायकोची स्वतंत्र ईस्टेट असल्यास ती, तसेंच नवऱ्याची लायकी व त्यांची परस्पर वागणूक लक्षांत घेऊन ठरवावी. या पोटगीच्या निकालासंबंधानें योग्य तो दस्तैवज तयार होईपर्यंत कोर्टानें योग्य वाटल्यास हुकूमनामा करण्याचें तहकूब करावें. शिवाय या नेमणूकींत नवऱ्याचें उत्पन्न कमजास्त होईल त्याप्रमाणें पुन्हां कोर्टानें फेरबदल करावा. तसेंच मुलांच्या पोटगीकरितां स्वतंत्र नेमणूक देवविण्याचाहि कोर्टास हक्क आहे. ही नेमणूक खुद्द बायकोला किंवा तिच्या ट्रस्टींना देववावी. तसेंच त्यावर योग्य वाटतील ते निर्बंध कोर्टानें घालावे.

शिवाय इंग्लंडमध्यें सद्योनिर्णय ( तुरुत–निकालाचा )–समरी ज्युरिसडिक्शन ( मॅरिड वुइमेन ) ॲक्ट १९०५–या कायद्याअन्वयें नवऱ्यानें बायकोला टाकून दिल्यास किंवा नवऱ्याच्या क्रूर छळामुळें बायकोला दूर राहणें भाग झाल्यास नवऱ्याकडून बायकोला दर आठवडा दोन शिलिंगपर्यंत नेमणूक देवविण्याचा कोर्टाला अधिकार आहे.

यु नै टे ड स्टे ट् सः—या देशांतील बहुतेक संस्थानांत इंग्लंडांतल्या सारखाच कायदा आहे. शिवाय प्रत्यक्ष घटस्फोटाचा किंवा विवाहबंधमोचनाचा दावा न करतांहि केवळ

नवऱ्याच्या कांहीं अपराधास्तव त्याच्यापासून दूर राहणाऱ्या बायकोला इक्विटी कोर्ट नवऱ्याकडून नेमणूक देवविते. कांहीं संस्थानांत बायकोच्या इस्टेटींतून कांहीं विशिष्ट कारणांकरितां नवऱ्याला नेमणूक देण्याचा कायदा आहे; आणि नवऱ्याचें दुसरें लग्न हें नेमणूक बंद करण्यास पुरेसें कारण मानीत नाहींत. परंतु स्त्रीचें दुसरें लग्न झाल्यावर मात्र नेमणूक कमी करण्यांत येते.

**अॅनोबॉनः**—अॅनोबॉन, अथवा अॅनोबॉम हें गिनीच्या आखातांतील एक बेट स्पेनच्या ताब्यांत असून द. अक्षांश १°-२४' व पू. रेखांश ५°-३५' यांवर आहे. याची लांबी ४ मैल, रुंदी २ मैल, व क्षेत्रफळ ६ चौरस मैल आहे. कांहीं भागांत ३००० फूट उंची आहे, यांत सुंदर दऱ्या व भिंतीसारखे पर्वत एकामागून एक आहेत त्यामुळें फार सुंदर देखावा दिसतो. वस्ती नीग्रो लोकांची आहे. यांची संख्या ३००० आहे व धर्म रोमन कॅथोलिक आहे. सेंट अँटोनी हें मुख्य शहर व गव्हर्नरचें ठाणें आहे. नांगरवाडा ( गलबतें खुंटविण्याची जागा) सुरक्षित आहे, जाणारीं येणारीं जहाजें पाणी व अन्नसामुग्री घेण्याकरितां थांबतात. हें बेट पोर्तुगीज लोकांनीं १४७३ च्या जानेवारी १ ला शोधून काढलें म्हणून याला हें नांव (=नवीन वर्ष ) प्राप्त झालें. पोर्तुगीजांनीं १७७८ मध्यें हें बेट व फर्नांडोपो स्पेनला दिलें. यावरून या बेटाच्या रहिवाशांनीं स्पेनविरुद्ध बंड केलें व तडजोड म्हणून पांच एतद्देशीयांनीं या बेटाचा कारभार पहावा अशी व्यवस्था करण्यांत आली. १९ व्या शतकाच्या उत्तर भागांत स्पेनची सत्ता पुन्हां स्थापित झाली.

**अन्हिलवाडः**—अनहिलवाड नांवाच्या राजधानीवरून नांव पडलेलें गुजराथेंथील एक प्राचीन राज्य. प्राचीन अनहिलवाड हें हल्लींच्या बडोदा संस्थानांतील पट्टण. किंवा अनहिलवाड पट्टण शहराच्या किंचित वायव्येस वसलेलें होतें. तें इ. स. ७४५-४६ च्या सुमारास वनराज नामक पुरुषानें वसविलें.

प्राचीन अनहिलवाडचें वर्णन कुमारपाल चरितांत दिलें असून त्यांत त्या शहराचा अफाट विस्तार ( बारा कोस ), त्यांतील ८४ आपणस्थानें, तेथील सोन्यारुप्याच्या टांकसाळी, राजवाड्यांचे वैभव, असंख्य परंतु सुव्यवस्थित कचेऱ्या, रोजचा हजारों रुपयांचा वसूल, देवळें, पाठशाळा, निरनिराळ्या वृक्षराजींतून होणारा वेदावरील वादविवाद वगैरे शेंकडों गोष्टींसंबंधीं फार बारकाईनें व रसभरित माहिती कथन केली आहे ( फोर्ब्स ). अल इद्रीसी नामक एका प्राचीन ( इ. स. ११५३ ) ग्रंथकारानें अनहिलवाडच्या लोकांसंबंधीं माहिती येणेंप्रमाणें दिली आहे. " नहखाल ( अनहिलवाडचें मुसुलमानी नांव ) वर बलहार म्हणून एक महान् राजा राज्य करीत आहे. त्याज जवळ हत्तींचें दळ असून तो बुद्धाची उपासना करतो. त्याचा मुकुट सोन्याचा असून त्यानें अंगावर मूल्यवान् वस्त्रें परिधान केलेलीं असतात. तो आठवड्यांतून एकदां उत्तम वस्त्रें व अलंकार घातलेल्या शंभर स्त्रियांच्या लवाजम्यानिशीं घोड्यावर बसून शिकारीस बाहेर पडतो. कारभारी व सेनापती हे राजाबरोबर फक्त लढाईच्याच वेळीं जातात. राजास त्याचें सर्व सामर्थ्य त्याच्या हस्तिदळांमुळें आलेलें आहे. बलहार या त्याच्या विरुदाचा अर्थ राजाधिराज असा आहे. शहरांत व्यापारानिमित्त म्हणून आलेले अनेक मुसुलमान लोक दृष्टीस पडतात. राजा व त्याचे अधिकारी त्यांचा चांगला सन्मान ठेवून त्यांनां आश्रय देतात. हिंदू लोक हे निसर्गतःच न्यायप्रिय आहेत. त्यांची इमानीपणा, राजनिष्ठा वगैरे गुणांबद्दल ख्याति असून त्यांचा देश फार भरभराटींत असल्याचें जो तो ऐकतो. त्यांच्या प्रामाणिकपणाचें उत्कृष्ट उदाहरण म्हणजे जर एखाद्या धनकोच्या मनांत ऋणकोकडून कर्ज वसूल करावयाचें असलें तर धनकोनें त्या ऋणकोभोंवतीं एक रेघ ओढली कीं काय भागतें. मग ऋणको धनकोचें समाधान केल्याशिवाय किंवा कर्ज फेल्याशिवाय आपल्या जागेवरून कधींहि हलणार नाहीं ! लोक धान्य, शाकभाजी किंवा निसर्गतः ज्यांस मृत्यु आलेला आहे असे प्राणी खातात. ते कधीं हिंसा करीत नाहींत. त्यांच्या मनांत गाईबैलाबद्दल पूज्यबुद्धि असते."

प्राचीन अरब ग्रंथकारांनीं अनहिलवाडबद्दल दिलेली आणखी माहिती येणें प्रमाणें आहेः--

आम्हल, फाम्हल, काम्हस, कामुहुल, माम्हुल, नहलवार, नहरवाल हीं अन्हिलवाडची अरबी नांवें होत. निरनिराळे अरब ग्रंथकार निरनिराळ्या नांवांनीं याला संबोधितात. अल इस्तख्री ( इ. स. ९५१ ) यानेंच फक्त अनहिलवाड नांवाजवळचें "आम्हल" हें नांव या स्थलास देऊन त्यास "हिंद" (गुजराथ) मधील एक मोठें शहर म्हणून वर्णिलें. इब्नि हौकल ( इ. स. ९५८-९७६ ) हा " फाम्हल " शहर मोठें व मजबूत असून त्यांत एक " जामा " आहे असें लिहितो. अलबेरूणीचें "अहलवार" कडे लक्ष गेलें होतें. अल इद्रसी याला "माम्हल" असें संबोधतो व "हिंद" आणि सिंध यांच्यामधील (वालुका) रणाच्या कडेला हें असून घोडे व उंट बाळगणाऱ्या मेरांचें वसतिस्थान आहे असें लिहितो. वनराजानें इ. स. ७५० मध्यें अनहिलवाडची स्थापना केली तरी १० व्या शतकांतील अल इस्तखीच्या पूर्वी कोणींहि अरबी भूगोलज्ञानें त्याचा उल्लेख केलेला दिसत नाहीं. कदाचित् त्या शतकांत त्याची बाह्यांचें लक्ष वेधून घेण्याइतकी वाढ झाली असेल. ११ व्या शतकांत महंमदाच्या कारकीर्दीतील मुसुलमान इतिहासकारांनीं अनहिलवाडचा अनेकवार उल्लेख केलेला आहे. फेरिस्ता लिहितो कीं, अनहिलवाड जिंकून सोमनाथचा विध्वंस केल्यावर महंमदाच्या मनांत अनहिलवाड ही आपली राजधानी करण्याचें फार होतें; कारण त्या ठिकाणीं सोन्याच्या खाणी असून, सिंहलद्वीपासारखा रत्नमय प्रदेश त्याच्या अंकित होता. पण त्याचा बेत त्याच्या

मंत्र्यांनीं फिसकटून लाविला. तथापि पट्टण येथील दोन मशीदी महंमदाची या शहराविषयीं आवड व्यक्त करतात यांत संशय नाहीं.

अनहिलवाडचा यापुढील मुसुलमानीं उल्लेख नूरउद्दीन महंमद उफी (इ. स. १२११) यानें केलेला होय. हा आपल्या इतिहासांत ( जामी-उल-हिकायान ) अनहिलवाडच्या जय राजाची अशी एक गोष्ट सांगतो कीं, खंबायतच्या एका गरीब मुसुलमानानें हिंदूंच्या चिथावणीवरून तेथील अग्न्युपासकांनीं आपली मशीद फोडली अशी जयराजाकडे तक्रार आणतांच तो स्वतः खंबायतला गेला, व चौकशी करून अपराध्यांना शिक्षा देवविली व त्यांच्याकडून त्या मुसुलमानाची मशीद पुन्हां बांधून दिली. दुसऱ्या मूळराजानें ११७८ त महंमद घोरीचा पराभव केल्याचाहि उल्लेख यांत सांपडतो. या पराभवाचा वचपा कुतबुद्दीन ऐबकनें ११९७ त कसा घेतला हें ताजुल मआसीरनें सांगितलें आहे. त्याच्याच बखरींत, सुलतान नासिरुद्दीन कबाच हा ( इ. स. १२४६–१२६६ ) यानें आपला सेनापति खास खान याला देवलहून नहरवालवर पाठविलें व खासखानानें तेथून बरेच कैदी व संपत्ति वाहून आणली अशा तऱ्हेचें वर्णन आहे. गुजराथ पादाक्रांत केल्यावर, १३०० मध्यें सुलतान अल्लाउद्दीन खिलजीनें सोमनाथाचा नाश करण्यासाठीं आपला वडा सरदार उलुघखान याला त्या ठिकाणीं पाठविलें; खानानें तसें करून तेथील सर्वांत मोठी मूर्ति अल्लाउद्दीनाकडे धाडून दिली.

चा व डा घ रा णें:—पंचासरचा राजा जयशेखरि हा कल्याणच्या सोळंकी राजाशीं झालेल्या लढाईत पडल्यावर रूपसुंदरी ही स्वतःच्या भावाबरोबर प्राणसंरक्षणार्थ जंगलांत पळाली. हिचा मुलगा वनराजा यानें पुढें बरींच धाडसाचीं कृत्यें करून चांपानेर व अनहिलपुर हीं दोन शहरें वसविलीं. या अनहिलपुरची जागा अनहिलपुर नामक नोकरानें पाहून ठरविली म्हणून त्यास त्याचें नांव देण्यांत आलें. हा वनराजच चावडा घराण्याचा मूळपुरुष होय. इं. अँ. च्या १८७५ सालच्या पुस्तकांत अनहिलवाडच्या स्थापनेसंबंधीं एक निराळी दंतकथा दिली आहे. वनराजाचा मूळपुरुष वेणीराजाचा बाप वचराज म्हणून असून त्यानें दीवगडावर राज्य केलें. वेणीराजानें समुद्राची शपथ घेऊन एका व्यापाऱ्यास फसविल्यामुळें दीवगड वाहून गेला, व वेणीराजाच्या गरोदर स्त्रीला तेथून पळून जावें लागलें. तिला चांदूर येथें वनराज हा पुत्र झाला, व त्यानें पुढें अनहिलनांवाच्या धनगरानें पट्टण येथें निधी दाखविला तो घेऊन अनहिल पट्टण हें शहर स्थापिलें. या वंशांतील सात राजांचीं नांवें ऐनी अकबरीप्रमाणें रामराज, जोगराज,खेम किंवा भीमराज, पिथु, विजयसिंह,रावतसिंह आणि सावंतसिंह अशीं आहेत यांच्या पैकीं सातवा सावंतसिंह यानें सोळंकी घराण्यांतील मूळराजाला आपलें राज्य दिलें [ इ. स. ९४२ ]. वनराजाच्या गुरूच्या व आईच्या वजनामुळें पंचासर येथें पारसनाथाचें देऊळ बांधलें गेलें असून देवळांत ठेवलेल्या त्याच्या मूर्तीवरून वनराजाचा श्रावकांच्या धर्मास आश्रय होता असें सिद्ध होतें असें जैन लोक म्हणतात. परंतु उलट पक्षी ब्राह्मणांनांहि पट्टण येथें अद्यापर्यंत असलेल्या उमामहेश्वराच्या व गणेशाच्या मूर्तीकडे बोट दाखवून तसाच हक्क सांगतां येण्यासारखा आहे. या मूर्तीवर वनराजाचें नांव व शहराच्या स्थापनेचें वर्ष ( सवंत ८०२ ) दिलेलें आहे. फोर्ब्स म्हणतो कीं येथें जुने राजे उदारमतवादी असून या शहराच्या स्थापनेपासून नाशापर्यंत तेथें शैव व जैन हे दोनहि संप्रदाय एकत्र प्रचारांत होते यांत शंका नाहीं.

सो ळं की घ रा णें:—मूळराज व त्याचे वंशज हे बलहार म्हणून प्रसिद्ध आहेत. या घराण्यांतील दुसरा राजा चामुंड याच्या वेळेस गझनीच्या महंमूदनें सोमनाथवर स्वारी केली तेव्हा वाटेंत अनहिलवाडवर एकाएकीं हल्ला करून चामुंडास पळवून लाविलें. पुढें तो तसाच सोमनाथवर चालून गेला. राजपुत्र वल्लभसेन व भीमदेव यांनीं प्रतिबंध केला पण तो निष्फळ ठरला. सोमनाथवरून परत येतांना महंमुदानें पावसाळ्यांत चार महिने अनहिलवाड येथें काढले. परत स्वदेशीं जातांना दुलभला आपला मांडलिक नेमलें.

त्यानें अनहिलवाड येथें बांधलेलें तळें अद्याप दुलभ सरोवर म्हणून प्रसिद्ध आहे. वलभ हा कैदी होऊन महंमुदाच्या हातीं पडला होता. पण भीमदेव मोकळा होता त्यानें महंमुदाच्या मार्गांत अनेक अडथळे आणले.

पहिला भीमदेव, त्याचा मुलगा करणदेव व त्याचा नातू व सिद्धराज जयसिंह यांच्या वेळेला सोळंकी राज्याचा विस्तार फार दूरवर पसरला. त्यांच्या मांडलिकत्वाखालीं असलेलीं अठरा संस्थानें दक्षिणेस कोल्हापूर पासून माळव्यापर्यंत–कदाचित् गंगातटापर्यंत–पसरलेलीं होतीं.

सिद्धराजाच्या गुणानुवादपर पुष्कळ दंतकथा आहेत. सिद्धराजानंतर कुमारपाल गादीवर बसला. कुमारपाल हा जैन आचार्य हेमचंद्र याचा शिष्य असून त्याच्या नांवावर पुष्कळ दंतकथा आहेत. असें म्हणतात कीं या राजानें कुमार विहार नांवाचें पारसनाथाचें देऊळ बांधलें, परंतु महादेव पुढें त्याच्या स्वप्नांत येऊन मी अनहिलवाड येथें रहावयास येतों असें म्हणाला तेव्हां त्यानें महादेवासाठीं देऊळ तयार केलें. कुमारपालाचा पुत्र लवणप्रसाद याचेच वंशज पुढें अनहिलवाड येथें वाघेलवंशी म्हणून गादीवर आले.

दुसऱ्या भीमदेवाच्या वेळेला सोळंकी घराण्याच्या भरभराटीचा शेवट झाला. कुतुबुद्दीन बरोबर भीमदेवाचीं ११९४ त जी लढाई झाली तींत त्यानें कुतुबुद्दीनवर मात करून त्यास अजमेर येथें अडकवून ठेविलें.

परंतु पुढें कुतुबुद्दिनानें भीमदेवाच्या जीवनराय नामक सेनापतीचा शहरानजीक पराभव केला तेव्हां भीमदेव पळून गेला. ११९६ मध्यें भीमदेवानें मेर लोकांच्या संघाचें आधिपत्य पत्करून पुन्हां एकदां मुसुलमानांशीं लढाई केली पण

याहिवेळीं त्यास यश आलें नाहीं व मुसुलमानांनीं गुजराथ उध्वस्त करून अनहिलवाड काबीज केलें. यापुढें मुसुलमानांनीं या शहराचें नहरवाल असें नांव पाडलें.

वाघेल वंशः--मुसुलमानांस अनहिलवाड लवकरच सोडावें लागलें तरी यापुढें त्यास उतरती कळा लागली. वाघेल राजांनीं सुमारें एक शतकपर्यंत ( १२१४-१३०३ ) आपलें स्वातंत्र्य कायम राखिलें. कांहीं हकीकतींप्रमाणें वाघेल्यांनीं ११९६-१३२२ पर्यंत राज्य केलें असून तेवढ्या अवधींत त्यांचे मूलदेव, विसलदेव, भीमदेव, अर्जुनदेव, सारंगदेव, व करण घेलो असे सहा राजे झाले. करण वाघेल्यास १२९७ मध्यें अल्लाउद्दिनाच्या काराभाऱ्याचा भाऊ अलफखान यानें हांकून लाविल्यामुळें तो देवगडच्या रामदेवरायाच्या आश्रयास गेला. पण त्याचें दैव त्याच्या हात धुवून पाठीस लागलें होतें. त्याची स्त्री करेला देवल राणी हिला सुलतानानें पकडून आपल्या जनान खान्यांत ठेविलें; व तिच्याच हुकुमावरून तिची मुलगी देवल राणी हिला शहाजाद्याशीं लग्न लावण्याकरितां धरून नेण्यांत आलें.

वाघेलवंशाबरोबरच अनहिलवाडच्या राज्याचा व त्या शहराचाहि अंत झाला. ब्रिग्ज गुजराथ्रांत म्हणतो कीं तेराव्या शतकाच्या अखेरीस अल्लाउद्दिनानें अनहिलवाडचा तट उध्वस्त करून तेथील देवळें जमीनदोस्त केलीं; इतकेंच नव्हे तर अखेरीस त्यानें त्या शहरावरून गाढवाचा नांगर फिरवून आपलें समाधान करून घेतलें. यापुढील अनहिलवाडचा इतिहास म्हणजे त्याच्या जागेवर वसलेल्या पट्टण शहराचा इतिहास असल्यामुळें तो पट्टण या नांवाखालीं दिला आहे.

[ संदर्भग्रंथः--बॉ. गॅ. व्हॉ. ७; रासमाला; कुमारपालचरित; अयने अकबरी व इतर मुसुलमान ग्रंथकारांचे ग्रंथ. ]

**अन्होनी**--हें गांव हुशंगाबाद जिल्ह्यांत असून या गांवीं ऊन पाण्याचा एक झरा आहे. हा महादेव पाहाडाच्या थेट उत्तरेस आहे. ह्या पाहाडापासून घेनवा व नर्मदा ह्या दोन्ही नद्या वेगळ्या होऊन वाहत गेल्या आहेत. ह्यां उष्ण झऱ्याच्या पाण्यानें अंगावरील फोड व त्वचेचे रोग बरे होतात म्हणून या ठिकाणीं लोक जमतात. या गांवाच्या आग्नेय दिशेला १६ मैलांवर दुसरा एक ऊन पाण्याचा झरा आहे. त्याचें नांव महालक्षीर. त्यांतील पाणी इतकें उष्ण आहे कीं त्यांत हात घालणें अशक्य असतें.

[ म. प्रां. ग्या. १८७० पृ ४. ]

**अपकृत्यः**--"टॉर्ट" हा इंग्लंडच्या कायद्यांतील एक पारिभाषिक शब्द आहे त्याचें अपकृत्य हें भाषांतर होय. कायद्यानें घालून दिलेला एखादा नियम मोडला म्हणून नुकसान भरपाई दाखल कोणातरी व्यक्तीला त्याकरितां कोर्टांत फिर्याद आणतां येते, अशा विशिष्ट गुन्ह्याला हा शब्द योजतात. हा कायदा ब्रिटिशमुलुखांत, व ज्यावर ब्रिटिशांचा अंमल चालतो व ज्यांत ब्रिटिशांचा रूढ कायदा ( कॉमनलॉ ) म्हणून व्यवहारांत चालू आहे अशा देशांत, व युनायटेड स्टेट्स् मधील अनेक संस्थानांत चालतो. युनायटेड स्टेट्स् मध्यें म्हणजे मध्यवर्ती न्यायसत्तेंत कॉमनलॉ हा आधार म्हणून गणला जात नाहीं. एखादें कृत्य, "अपकृत्य" ह्या सदरांत येण्याला एक तर कायद्यानें केलेल्या एखाद्या नियमाचें उल्लंघन व्हावयाला पाहिजे व दुसरें, कोणा एका व्यक्तीला दावा आणण्याचा खाजगी हक्क प्राप्त झाला पाहिजे. म्हणजे दोन पक्षांमधील कायदेशीररीतीनें केलेला करार जरी पाळला नाहीं तरी त्यामुळें "अपकृत्य" केल्याचा गुन्हा होत नाहीं; त्याचप्रमाणें एखादा गुन्हा शिक्षेस पात्र होत असला तरी पण, जर कोणालाहि त्याविरुद्ध दिवाणी दावा आणतां येत नसेल, तर तें "अपकृत्य" होऊं शकणार नाही. एकच कृत्य "अपकृत्य" आणि करारभंगाचा गुन्हा किंवा "अपकृत्य" आणि फौजदारी गुन्हा, होऊं शकेल. "अपकृत्यांची" भरपाई फक्त नेहेमीं पैशांनींच होते असें नाहीं; तर "इक्विटी किंवा व्यवहारांतील समतेचा न्याय" म्याट्रिमोनियल म्ह० "विवाह संबंधीं" किंवा आडमिन्यालिटी म्ह० "दर्यावरील गोष्टी संबंधीं" जीं इंग्लंडांत कोर्टें आहेत त्या कोर्टांहून भिन्न अशा "कॉमनलॉ" कोर्टांत केव्हांहि, अपकृत्याबद्दल व तदनुषंगीक नुकसानभरपाईबद्दल दावा आणण्याचा हक्क पोहोंचतो.

सुधारलेल्या राष्ट्रांतील दर एक व्यक्तीला स्वतःचें शरीर संपत्ति व अब्रू ह्यांचें दुसऱ्यांपासून संरक्षण करण्याचा सर्व सामान्य हक्क असतो; व शेजाऱ्यांना उपसर्ग पोंचेल असें काम हातीं घेतांना, तें फार काळजीपूर्वक व जपून पार पाडण्याची जबाबदारी प्रत्येकावर असते. एखाद्यानें जाणूनबुजून किंवा बेपर्वाईनें दुसऱ्यास इजा केली तर त्याचा गुन्हा कायद्याच्या एखाद्या कलमाखालीं येतो कीं काय असा प्रश्न न उद्भवतां, त्याला आपल्या कृत्याचें समर्थन करतां येते कीं नाहीं असा प्रश्न पुढें येतो. हलगर्जीपणा किंवा निष्काळजीपणामुळें ओढवलेल्या संकटाची दाद घेण्याच्या कामीं जर हा "अपकृत्य-कायदा" जास्त कोठें कार्यक्षम झाला असेल तर तो, मालक व नोकर यांच्या परस्पर जबाबदारीच्या कायदेसंबंधांत होय. प्रत्येकजण नोकरीवर असलेल्या आपल्या नोकरांच्या कृत्य ( act ) व अपकृत्या ( default ) विषयीं जबाबदार आहे. म्हणजे ज्यानें खरा गुन्हा केला आहे तो कमी जबाबदार धरला जातो अशांतला प्रकार नाहीं. तर, पुष्कळ वेळां प्रत्यक्ष अपकृत्य करणारावर दावा आणण्यापासून कांहीं निष्पन्न होत नाहीं. असा कायदा नसता तर, निरपराधी मनुष्यांना संस्थांच्या नोकरांचा निष्काळजीपणा कितीही जाचक व अनर्थकारक झाला असला तरी, त्याबद्दल त्या संस्थांना जबाबदार धरतां आलें नसतें. तथापि ह्या कायद्यांत सुद्धां एक व्यंग होतें तें असें कीं, जर नोकरीवर असलेल्या एखाद्या नोकराच्या निष्काळजीपणामुळें तिऱ्हाइताचें नुकसान झालें तर मात्र त्याचा मालक त्या नुकसानीविषयीं जबाबदार असे; पण जर कां, एका नोकराला, त्याच मालकाच्या नोकरींत

असलेल्या दुसऱ्या नोकराच्या अपकृत्या ( default ) मुळें इजा झाली तर वरीक मालक जबाबदार धरला जात नसे व त्या नोकराला नुकसानभरपाई मिळत नसे. ह्यामुळें पुष्कळ अनर्थ ओढवत, व ह्यांवर इलाज म्हणून इ. स. १८८० सालीं "मालकावरील जबाबदारीचा कायदा "( Employers' Liability Act, ) नांवाचा कायदा पास केला व पुढें इ. स. १९०६ त "कामगारांस मिळणाऱ्या नुकसानीचा कायदा"( Workmen's Compensation Act) झाला; ह्या कायद्याखालीं कोणाच्या कांहीं एक चुकीमुळें न घडलेल्या अपघातांचेहि खटले येतात; व म्हणून " अपकृत्य–कायद्या " खालीं येणाऱ्या जबाबदारीच्या कारणांच्याहि पुढें हा कायदा गेला आहे, हें उघड आहे. ह्यानें एका तऱ्हेच्या सक्तीच्या विम्याची पद्धत अंमलांत आणली आहे, असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं.

आपल्या स्वतःबद्दल व आपल्या नोकरांबद्दलच्या जबाबदारीच्या कामांखेरीज दुसरें जास्त महत्त्वाचें काम म्हणजे सुरक्षितता राखण्याचें काम. घर, इमारत किंवा इतर कांहीं बांधकामें अशा सुस्थितींत ठेवलीं पाहिजेत कीं, कायदेशीर रीतीनें त्यांत राहणारांस, ती वापरणारांस किंवा त्यांजवळून जाणारांस, नीट काळजी घेतली असतां सहज टाळतां येण्यासारखा असा धोका उपस्थित होऊं नये. कांहीं फारच धाडसाच्या कामांत, शक्य ती काळजी घेतल्याचा पुरावाहि पुरा पडत नाहीं. सार्वजनिक कामें हातीं घेणाऱ्या स्थानिक अधिकारी वर्गावरहि अशा तऱ्हेची जबाबदारी अलीकडे लादण्यांत येऊं लागली आहे.

अपकृत्यांचें वर्गीकरण करण्यास फार जड जातें; याचें कारण वर्गीकरण करण्यास उपयोगी अशा महत्त्वाच्या सामान्य गोष्टी त्यांत सांपडत नाहींत असें नव्हे तर कोणत्या विशिष्ट तत्त्वावरून हें वर्गीकरण करावें यावद्दल घोटाळा होण्याचा संभव असतो. आपल्याला, प्रतिवादीचें कृत्य ( Act ) किंवा अकृत्य (Omission) करण्याचा हेतु, त्याविषयीं त्याला असलेलें ज्ञान, वगैरे गोष्टी लक्ष्यांत घेऊन वर्गीकरण करतां येईल; किंवा वादीला भोगाव्या लागलेल्या नुकसानीचें स्वरूप लक्ष्यांत आणून करतां येईल. ह्यापैकीं कोणचेंहि प्रथम घेतलें तरी निकाल सांगतांना, दुसऱ्याचा विचार अवश्य करावा लागतोच. प्रथम प्रतिवादीचे बाजूनें पाहातां, इतर निरनिराळे सोडवणुकीचे कोर्टानें मान्य केलेले मुद्दे सोडून दिल्यास, सर्वसाधारण नियमन करणारें तत्त्व म्हटलें म्हणजे, मनुष्य आपल्या कृत्यांच्या साहाजिक व संभवनीय परिणामांबद्दल जबाबदार आहे; ते परिणाम असे कीं, त्याच्या जागीं जर एखादा समंजस मनुष्य असता, तर त्याला ते ( परिणाम ) संभवनीय वाटले असते. तेव्हां जे परिणाम त्याला पूर्वी होतील म्हणून माहित होते किंवा व्हावेत म्हणून त्यानें योजलें होतें त्यांबद्दल तर तो जास्तच जबाबदार आहे. विशिष्ट तऱ्हेची वर्तणूक गैरशिस्त ठरण्यास कांहीं विशिष्ट गोष्टींचें ज्ञान अवश्य लागतें. ठकबाजी किंवा फसवणूक व इतर त्यासारख्या गुन्ह्यासंबंधांत वरील कलम लागू करतात. परंतु जेथें मनुष्याचें शरीर, अब्रू किंवा मालमत्ता ह्यांविषयीं निश्चिंत राहण्याच्या अबाधित हक्काला बाध येतो तेथें मात्र, ज्ञान किंवा विशिष्ट हेतु सिद्ध करण्याचें कारण पडत नाहीं, कारण हें ( हक्काचें ) अतिक्रमण फार अक्षम्य आहे म्हणून गुन्हेगाराच्या अंगावर बाजू आल्यावांचून राहात नाहीं. त्यांत त्याचा हेतु चांगला होता कीं वाईट होता हें कोणी पहात बसत नाहीं. आतां ह्याच्या उलट असें सिद्ध करण्यांत आलें आहे कीं, जी गोष्ट मूळची बेकायदेशीर नाहीं, ती जरी वाईट हेतूनें केली असली तरी बेकायदेशीर ठरत नाहीं. ह्या नियमाचा उपयोग हल्लीं सर्वसामान्य हक्क बजावण्याच्या कामीं करतात. तथापि हेंहि लक्ष्यांत ठेवलें पाहिजे कीं, जेव्हां जबाबदारी सिद्ध होते किंवा कबूल केली जाते तेव्हां नुकसानभरपाईची रक्कम कमी किंवा जास्त करण्यासंबंधांत व्यक्तीच्या मनांतील वाईट हेतूचा अभाव किंवा अस्तित्व आणि साधारणतः पक्षकारांची एकमेकांमधील वागणूक, ह्यांचा फार उपयोग होतो. फौजदारी कायद्यांतील कांहीं तत्त्वांच्या दृष्टीनें, ह्यापेक्षां जास्त सूक्ष्म विचाराची जरूरी असते.

कांही कृत्यांना अपकृत्य या सदरांतून मोकळें होण्याचे मार्ग ठेविले आहेत; कायद्याच्या अंमलबजावणीसाठीं, योग्य तो न्याय मिळण्यासाठीं आणि आयुष्यांतील व्यवहार कांहीं स्वतंत्रपणें चालण्यासाठीं, हे मार्ग खुले असलेच पाहिजेत. ठोकळ मानानें पाहातां, अशा गोष्टींत खालील दिलेल्या स्थितींपैकीं कोणची ना कोणची तरी एक स्थिति आढळून येतेः प्रतिवादी कायदेशीर हक्क बजावीत तरी असतो; किंवा असाधारण अडचणीमुळें त्याचें करणें न्याय्य असतें, किंवा तो असें कांहीं कृत्य करीत असतो कीं त्याच्या कृत्याच्या अतिश्रेष्ठ उपयुक्ततेमुळें, त्यापासून दुसऱ्यांना उपद्रव पोंचला तरी आणि त्या भरपाई दाखल कांहीं व्यवस्था केली असली किंवा नसली तरी त्याला तें करण्याबद्दल कायद्याची परवानगी असते; किंवा, ज्यांत मोफत वहिवाटीची आणि चढाओढीची सवलत ठेविली आहे अशा बवतींतल्या सार्वजनिक हक्काची बजावणी तो करीत असतो; किंवा, वादीनें स्वखुषीनें किंवा अन्य तऱ्हेनें विरुद्ध तक्रार करण्याचा हक्क गमावलेला असतो. निवळ अपघात झाला असतां, केव्हां ( नुकसान भरपाईची ) जबाबदारी उत्पन्न होते, किंवा केव्हां उत्पन्न होत नाहीं हें वकिलांवांचून दुसऱ्यास कळणार नाहीं. सार्वजनिक हक्कांच्या अंमलबजावणींत फार अडचणी उत्पन्न होतात. येथें खरें पाहूं गेलें असतां, मनुष्याचें स्वातंत्र्य कोणच्या ठिकाणीं त्याच्या शेजाराच्या स्वातंत्र्यानें मर्यादित करावयाचें हें फार धोरणानें ठरवावें लागतें; तें कसें, हें नुसतें सांगून कळणें नाहीं.

युनायटेड स्टेट्स्च्या सुप्रीम कोर्टांतील जस्टीस् होम्सनीं म्हटल्याप्रमाणें, हल्लीं अमर्यादित व्यापारी चढाओढीला मोक-

ढील दिली आहे; ह्यायोगें पुष्कळ व्यापारी बुडतात व कांहीं रसातळाला जातात पण ह्या अनियंत्रित चढाओढीनें समाजाच्या नुकसानीपेक्षां फायदाच विशेष आहे. निरनिराळ्या सांपत्तिक स्थितींत असणाऱ्या राष्ट्रांचे ह्यासंबंधी इतर कांहीं गोष्टींप्रमाणें निराळे कायदे असतील. हें स्वातंत्र्य नुसतें व्यापार चालविण्याच्याच बाबतींत नसून, तो कोणाशीं करावा आणि कोणच्या परिस्थितींत करावा हें स्वतः ठरविण्याच्या कामींहि आहे. त्याचप्रमाणें, कोणच्या हेतूनें एखाद्या सार्वजनिक हक्काची बजावणी झाली हें कांहीं कायदा पाहात नाहीं. जर एखाद्यानें आपल्या जिंदगीचा उपभोग घेण्याचा सर्वसाधारण हक्क बजावला किंवा प्रत्येक व्यक्तीनें आपआपला व्यवसाय चालू ठेवण्याचा हक्क गाजविला तर हीच गोष्ट त्यांनाहि लागू आहे. स्थावर ईस्टेटीच्या मालकांनीं आणि वहिवाटदारांनीं कांहीं विशिष्ट मर्यादेपर्यंत एकमेकांच्या सोयीगैरसोयीकडे लक्ष्य पुरविलें पाहिजे.

वादीच्या बाजूनें पाहातां, त्याला झालेल्या नुकसानीसंबंधांत खटला करण्यास आधारभूत अशा अपकृत्यांचे चार वर्ग करतां येतील. कांहीं निवळ व्यक्तिविषयक अपकृत्यें असतात. तीं अशीं कीं ज्यायोगें मनुष्याच्या शरीराला किंवा अब्रूला धक्का पोहोंचतो; अंगावर चाल करून जाणें ( assault ), बेकायदा अटक ( false imprisonment ), फूस लावून नेणें किंवा कुटुंबांतील माणसांना लालूच लाऊन पळविणें,इ. कांहीं अपकृत्यें अशीं असतात कीं ज्यायोगें मालकीपणाला किंवा त्यासारख्याच हक्कांना बाध येतो; ह्यांत, जमीन जुमल्यांत हुकमावांचून जाणें, त्यांचा अपहार करणें, वहिवाटीच्या हक्कांना विरोध आणणें आणि मालकी हक्काखेरीज मालमत्तेवर असणाऱ्या इतर वैय्यक्तिक हक्कांना अडथळा करणें इत्यादि गोष्टी येतात. कांहीं, मनुष्याच्या ईस्टेटीविरुद्ध अपकृत्यें असतात. ह्या वर्गांत अब्रू नुकसानी, कपट, अदावतीचा खटला, उपद्रव, वगैरे गुन्हे येतात. येथें ईस्टेट ह्या शब्दाचा जीविताचें स्वास्थ्य, सुख व फायदा हा व्यापक अर्थ आहे. आणि शेवटीं कांहीं अशीं अपकृत्यें असतात कीं जीं परिस्थित्यनुरुप शरीर मालमत्ता किंवा ईस्टेट ( स्वास्थ, सुख, अब्रू, वगैरे यांत येतात. ) ह्या सर्वांच्या किंवा ह्यापैकीं एकाच्या नुकसानीला कारण होतात; निष्काळजीपणानें, किंवा आपले शेजारी पाजारी, आपल्याकडे जाणारे येणारे लोक किंवा इतर लोक ह्यांच्या स्वास्थ्याविषयीं जे नियम केले असतात त्यांचें उल्लंघन केल्यानें शरीर, मालमत्ता किंवा ईस्टेट यांना धक्का पोंचतो.

ज्या कायदेपद्धतीचा ऐतिहासिक परिस्थितीशीं कमी संबंध येतो, तींत, ह्या अपकृत्यकायद्यानें जें काम होतें त्यापेक्षां मालमत्तेच्या कायद्यानें जास्त काम झालें असतें. आपली जंगम मालमत्ता, आपल्या मालकी हक्काला बाध आला किंवा आपल्या ताब्यांतून गेली, अशा प्रकाराची तक्रार करून मिळवितां किंवा परत मिळवितां येते. येथें, रोमन 'व्हिंडिक्याशिओ ' (Vindicatio) प्रमाणें उघड मालकी हक्क प्रस्थापित करता येत नाहीं. निष्काळजीपणाचा व उपद्रवाचा कायदा हेहि नवीन आहेत. सर्वांत अगदीं नवा कायदा म्हणजे गैरवाजवी चढाओढीचा (Unfaircompetition) ह्याला फार महत्त्व येत चाललें आहे. "एक्स डेलिक्टो" (exdelicto) आणि "क्वासि एक्स डेलिक्टो " ( Quasi ex delicto ) ह्या रोमन कायद्याचें आणि इंग्लिश "अपकृत्य" कायद्याचें बरेंच साम्य दिसून येतें. ह्यावरून, हा " अपकृत्य–कायदा" रोमन कायद्यामधून घेतला असें नव्हे तर, त्यांतील तत्त्वें आधारभूत घेऊन, त्यांवर स्वतंत्र कायद्याची उभारणी केली गेली आहे.

**अपकृत्यासंबंधीं ( टॉर्ट ) हिंदुस्थानांतील कायदाः**—गुन्ह्यासंबंधीच्या ( क्राइम ) कायद्याहून अपकृत्यासंबंधाच्या ( टॉर्ट ) कायद्यांत मुख्य फरक असा आहे कीं, अपकृत्यांबद्दल शारीरिक शिक्षा न करतां फक्त द्रव्यदण्ड करण्यांत येतो आणि तें द्रव्यहि दण्ड या अर्थानें सरकारजमा न करतां नुकसान भरपाई म्हणून वादीला देण्यांत येतें. शारीरिक शिक्षा न करणें येवढ्या दृष्टीनें पाहिल्यास हिंदुधर्मशास्त्रांत म्हणजे स्मृतिग्रंथांत ब्राह्मण या विशिष्ट जातीचे सर्वच अपराध 'अपकृत्य' ( टॉर्ट ) या सदरांत घालीत असत, कारण जुन्या हिंदु कायदे ग्रंथांत असा नियम आढळतो कीं, "न शारीरो ब्राह्मणे दण्डः" म्हणजे ब्राह्मणाला शारीरिक शिक्षा करूं नये, अर्थात् ब्राह्मणाला कोणत्याहि गुन्ह्याबद्दल द्रव्यदण्डच करीत असत. पण तें द्रव्य वादीला देत असत असें मात्र नाहीं. केवळ नुकसान भरपाई देवविणें या अर्थानें स्मृतिग्रंथांनीं कोणताहि अपराध 'अपकृत्य' ( टॉर्ट ) या सदरांत घातलेला दिसत नाहीं. अगदीं क्षुल्लक अब्रूनुकसानीच्या ( वाक्पारुष्य ) अपराधाबद्दल होणारा दण्डहि सरकारजमा होत असे. अपकृत्याबाबत खटले हल्लीं दिवाणी कोर्टांत चालतात, फौजदारी कोर्टांशीं त्यांचा संबंध नसतो; या दृष्टीनें पाहतांहि जुन्या ग्रंथांत अपकृत्य व गुन्हा असा फरक केलेला आढळत नाहीं. कारण पूर्वी सर्व प्रकारचे न्यायनिवाडे एकाच प्रकारच्या न्यायासनासमोर चालत असत; फौजदारी कोर्टें व दिवाणी कोर्टें असा हल्लीं प्रचलित असलेला फरक पूर्वी नव्हता.

**ब्रिटिश अमदानीतील अपकृत्यांचा कायदा.**—वर दर्शविल्याप्रमाणें अपकृत्यविषयक कायदा जुन्या हिंदु ग्रंथांत नसल्यामुळें तो समूळ इंग्रजी कायद्यावरून घेतलेला आहे, म्हणून त्याचें सामान्य स्वरूप वर दिलेल्या इंग्रजी कायद्यासारखेंच आहे. शिवाय ब्रिटिश सरकारनें पीनल कोडा प्रमाणें अपकृत्यांचा कायदा ( इंडियन टॉर्ट ॲक्ट ) स्वतंत्रपणें पास केलेला नाहीं. हिंदुस्थानांतील दिवाणी कोर्टांनीं वेळोवेळीं दिलेल्या निकालावरून ( केसलॉ ) त्याचें स्वरूप निश्चित होत गेलें आहे. यामुळें ठिकठिकाणीं कांहीं अंशीं इंग्रजी कायद्याहून निराळें स्वरूपहि त्याला प्राप्त झालें आहे. सबब तेवढे फरक येथें नमूद करूं.

अपकृत्य या सदराखालीं येणारी क्रिया फौजदारी गुन्हाहि असूं शकते. त्यामुळें त्या कृत्यासंबंधाचा इनसाफ दोन्ही प्रकारच्या कोर्टांत निरनिराळा करून घ्यावा, किंवा एका कोर्टांतील इनसाफानें दुसऱ्या कोर्टांतील इनसाफास 'प्राङ्‌निर्णयाच्या (रेस ज्युडिकेटा) किंवा 'अन्तर्भवना' (मर्जर) च्या तत्त्वानुसार बंदी असावी अशाविषयीं प्रश्न उपस्थित झालेले आहेत. या बाबतींत प्राङ्‌निर्णयाचें तत्त्व लागू होत नाहीं, म्हणजे एकाच कृत्याबद्दल दिवाणी व फौजदारी दोन्ही कोर्टांत काम चालवितां येतें हा नियम सर्वमान्य झाला आहे. पण इंग्रजी व हिंदुस्थानांतील कायद्यांत अद्याप एक बाबतींत फरक आहे. इंग्रजी कोर्टांनीं अगदीं अलिकडेहि असा स्पष्ट निकाल दिला आहे कीं, अपराध्याविरुद्ध त्याच्या मोठ्या गुन्ह्याबद्दल फौजदारी कोर्टांत प्रथम काम चालविल्याशिवाय दिवाणी कोर्टांत केवळ नुकसान भरपाईकरितां वादीला फिर्याद आणतां येणार नाहीं. पण हिंदुस्थानांत मद्रास हायकोर्टानें असा स्पष्ट निकाल दिला आहे कीं, वादीनें प्रथम फौजदारी कोर्टांत खटला भरलाच पाहिजे अशी अट नाहीं. जिल्हा तालुका कोर्टांतहि सर्वत्र हाच नियम चालू आहे. मात्र कलकत्ता हायकोर्टानें या बाबतींत निकाल कांहींसा इंग्रजी नियमाच्या अनुरोधानें दिला आहे.

दुसरा एक महत्त्वाचा फरक असा आहे कीं, हिंदुस्थानांतील कित्येक व्यक्तींच्या अपकृत्याबाबत खटले चालविण्याचा अधिकार येथील स्थानिक कोर्टांना नाहीं. हिंदुस्थानांत अनेक संस्थानिक आहेत. त्यांनीं परस्पराविरुद्ध केलेल्या कृत्याबद्दल येथील दिवाणी कोर्टांना न्याय करण्याचा अधिकार नाहीं. तसेंच ब्रिटिश सरकारनें परकीय मुलुख घेतल्याबद्दल किंवा गव्हर्नर-जनरल इन कौन्सिलनें एखाद्या संस्थानिकास पदच्युत केल्याच्या कृत्याबद्दल येथील कोर्टांत काम चालवितां येणार नाहीं. येथील गव्हर्नरजनरल, गव्हर्नर, किंवा त्यांच्या कौन्सिलचे सभासद यांनीं अधिकारी या नात्यानें केलेल्या कृत्यांचा इनसाफ करण्याचा अधिकारहि येथील कोर्टास नाहीं.

अन्नूनुकसानी, हवा व उजेड, ग्रंथकर्तृत्व (कॉपीराईट) या विशिष्ट अपकृत्यांसंबंधी माहिती त्या त्या लेखाखालीं पहावी.

**अपचन.**--या रोगामध्यें पोटांत वाजवीपेक्षां अधिक अन्न गेल्यामुळें अगर तें अन्न मसालेदार चमचमीत परंतु दाहोत्पादक असल्यामुळें जठराची स्वाभाविक अन्न पचण्याची शक्ति अपुरी पडते अगर अन्नाचें पचन होऊन तें पुढें आमाशयांत आपोआप जाण्यांत अडथळा उत्पन्न होतो. कोणाहि निरोगी माणसास पोटाच्या पचनशक्तीपेक्षा चार घांस अधिक खावे असा प्रसंगवशात् मोह पडणें साहजिक आहे; किंवा अन्नाचें प्रमाण नेहमीं इतकेंच असलें तरी त्या बरोबर बर्फ, अतिथंड पाणी, चहा अगर काफी अगर मद्य सेवन झाल्यामुळें पचनक्रियेंत मंदता येते. याचा परिणाम असा होतो कीं जेवणानंतर चार पांच तासांनीं पोट रिकामें व्हावयास पाहिजे तसें तें न होतां फार कालपर्यंत तें अन्न पोटांत रहातें. दुसरें अपचनाचें कारण अति शारीरिक श्रम केल्यानें जसा सर्व शरीरास थकवा येतो तसा जठरासहि येतो. अगोदर खाऊन पिऊन शरीर ताजे तवानें केल्याशिवाय कित्येक तास चालल्यानें अगर डोंगर चढल्यानें जठरास अशी स्थिति प्राप्त होऊन त्यावेळीं वेताचा आहार सेवन केल्यानेंहि अजीर्ण होतें.

ल क्ष णें.—अशावेळीं लागलीच किंवा थोड्या वेळानें पोटास फुगवटी येऊन चैन पडेनासे होतें; अगर पोटांत कळाहि येऊं लागतात. रात्रीची वेळ असली तर कांहीं कालपर्यंत रोग्यास लवकर झोंप येत नाहीं; परंतु नंतर त्याचा डोळा लागतो. परंतु पोटांतील कळांमुळें तो जागा होऊन जिभेस कोरड व बुरशी आलेली आहे असें त्यास आढळतें व बहुधा कपाळ दुखूं लागतें. या पीडेमुळें त्याची झोंपमोड होते. हृदयप्रांताजवळ मधून मधून अंग थरारतें व हृदय किंचित अनियमितपणें चालत आहे याची जाणीव रोग्यास त्यामुळें होते. सकाळीं उठावें तों तोंडास अत्यंत अरुचि बुरशी व अन्नाकडे पाहूं देखील नये असें रोग्यास वाटतें आणि अंगास थोडा चिकट घाम येतो. नंतर कांहीं काळानें हीं लक्षणें आपोआप शमन पावतात; किंवा कधीं कधीं या न पचलेल्या अन्नामुळें रोग्याचें पोट भारावल्यासारखें होऊन त्यास वांति होऊन वांतीबरोबर अर्धवट पचलेलें व जठररसांत मिश्र झालेलें सर्व अन्न पडतें व रोग्यास एकदम आराम वाटतो. कधीं कधीं आमाशयांत शिरलेलें व पित्ताशीं मिश्रित झालेलें अन्न जठरांत पुनः परत येऊन अनेक वेळा वांति होऊन पोट रिकामें झाल्यावर रोग्यास बरें वाटतें. हें न पचलेलें कांहीं अन्न आंतड्यांत राहिल्यामुळें व त्यांत दाहोत्पादक धर्म असल्यामुळें रोग्यास कधीं जुलाबहि होतात.

उ प चारः—अजीर्णाखेरीज दुसरा कांहीं एक रोग झाला नाहीं अशी खात्री प्रथम करून घेतली पाहिजे व त्यासाठीं रोग्यानें काय खाल्लें अगर प्यालें आहे व तें कोणत्या स्थितींत खाल्लें याची प्रथम चौकशी करून केवळ अजीर्ण आहे असें ठरलें म्हणजे सौम्य लक्षणयुक्त तें अजीर्ण असल्यास कांहीं वेळानें तें आपोआप बरें होतें. परंतु पोटांत वेदना व पीडा फार व रोग्याचा जीव हृदयाच्या अनियमित गतीमुळें कासावीस होत असल्यास जेणेंकरून रोग्यास त्वरित वांति होईल. असे उपाय करावेत. घशांत बोटें घालून वांति होते अगर एखादें पीस घेऊन त्यानें घशांत गुदगुल्या केल्यानेंहि ती होते. नाहींतर कढत पाण्यांत मीठ मिश्र करून तें वरचेवर पिण्यास द्यावें. ॲपोमॉरफीन हें औषध वांति होण्यासाठीं डाक्टर लोक टोंचून घालतात. तहान व जिभेस फार कोरड असल्यास थोडथोडें बर्फ द्यावें व सर्व लक्षणें शांत होईपर्यंत रोग्यास कांहींहि खावयास देऊं नये.

दीर्घकालीन अपचन म्हणजे वरील लक्षणें थोड्या फार प्रमाणांत नेहमींची होऊन बसणें. या रोगास अग्निमांद्य असें म्हणतात. शहरांतील सध्याची सदोष रहाणी, आहारविहार व हल्लींच्या जीवनक्रमांतील काळज्या, दगदगी यामुळें हा रोग बराच सर्वसाधारण असलेला आढळतो. त्याचें वर्णन "अग्निमांद्य" या सदरा खालीं पहावें.

आ यु र्वे दि क मा हि ती:-बॉवर हस्तलिखित ग्रंथांत(१.५०) जठराऽग्नीचे चार प्रकार सांगितले आहेत; १ मंद; २ तीक्ष्ण; ३ विषम; ४ सम. सुश्रुत १.३५,३ मध्यें हेच प्रकार सांगून पुढें त्यांपासून होणारे विकारहि दिलेले आहेत. विषमाऽग्नि असतां कधींकधीं अन्नपचन बरोबर होतें, परंतु कित्येक वेळां त्यापासून मेदोवृद्धि, शैत्य, मलावरोध, अतिसार, पोटांतील जडत्व, आंतड्यांत आवाज होणें, आमांश हे विकार होतात व दुसरे वातरोग उद्भवतात. तीक्ष्णाग्नि असल्यास वाटेल तेवढें अन्न तेव्हांच पचतें, पण त्यामुळें घसा, दाढी व ओंठ यांमध्यें आग, दाह व कोरड उत्पन्न होते व शिवाय पित्तरोग उद्भवतात. मंदाग्नि असल्यास अगदीं थोडकें अन्न सावकाश पचतें, पोट फुगतें, डोकें जड होतें, खोकला, कफ, लाळ गळणें, वान्ति, आंग ठणकणें वगैरे विकार होतात. अग्निमांद्य हा वैद्यकांतील एक रोगच असून त्यावर वृन्दसिद्धयोग ( ६-११० ) मध्यें हिंगु-त्रिफळा-मिश्रित गोळी घेण्यास सांगितलें असून बॉवर हस्तलेख ( २.४३-५५ ) मध्यें एक प्रकारचें चूर्ण सांगितलें असून त्यापासून १०० वर्षें आयुष्य मिळतें असें सांगितलें आहे.

अग्निमांद्याशीं निकट संबंध असलेला विकार म्हणजे अजीर्ण. हें अजीर्ण अतिशय पाणी पिण्यानें, अवेळीं भोजनानें, क्षुधा व नैसर्गिक क्रिया दाबून ठेविल्यानें अनियमित झोंप घेण्यानें, हलकें अन्नहि न पचल्यानें उत्पन्न होतें ( माधव ९३ ). यांचीं सामान्य लक्षणें आलस्य, जडत्व, पोट फुगणें, मलावरोध किंवा अतिसार हीं होतात. आम, विष्टब्ध व विदग्ध हे विकार कफ, वात, पित्त हे बिघडण्यावर अवलंबून असतात. आमदोष कफापासून होतो व त्यामुळें जडत्व, मळमळ, गाल व पापण्या सुजणें व खाल्ल्यावरोबर अन्त:क्षोभ होणें, वगैरे लक्षणें होतात. विष्टब्ध म्हणजे मलावरोध हा वातापासून होतो व त्यामुळें मेदोवृद्धि, अनेक वातरोग, मलावरोध, ग्लानी व अवयव ठणकणें अशीं चिन्हें होतात. विदग्ध हा दोष पित्तापासून होतो व त्यापासून भोंवळ, तृषा, मूर्च्छा, अन्तःक्षोभ, घाम, दाह वगैरे गोष्टी होतात. ( शार्ङ्गधर ९१-३; सुश्रुत ६.५६.१ ).

अजीर्णापासून मूर्च्छा, उन्मत्तवात, वान्ति, मळमळ आलस्य भोंवळ, प्रत्यक्ष मृत्युसुद्धां येतो. अजीर्णाचेच आनुषंगिक दोष म्हणजे विषूचिका आणि अलसक हे असून पोटांत फार आग होते, आंतड्यांत आवाज होतात, मलावरोध होतो, तृषा, अन्तःक्षोभ, हिंवताप, भोंवळ व विलंबिका म्हणजे मलावरोध इत्यादि गोष्टी होतात. शिवाय खालेलें अन्न खालीं पचूत जात नाहीं व वरूनहि मुखद्वारा बाहेर येत नाहीं अशी स्थिति होते व त्यामुळें जरी पोट दुखत नाहीं तरी ती बरी होण्यास फार कठीण पडतें. ( अग्निमांद्य पहा ) [ सु० ६.५६, मा० ९४.६, वा० १८५. १९६ भा० २. २, २४ ]

**अपदानः**—पालीभाषेंतील एक ग्रंथ. बुद्धाच्या वेळच्या बौद्ध संप्रदायांतील ५५० पुरुष सदस्यांचीं व ४० स्त्री सदस्यांचीं चरित्रें यांत आहेत. हा ग्रंथ प्रसिद्ध झालेला नाहीं, तथापि यांतील ४० चरित्रांतील भरपूर उतारे थेरीगाथाच्या टीकेंत ( Edward Müllers' edition ) दिलेले आहेत. त्यापैकीं एका उताऱ्यांत " कथावत्थु " या इ. स. पू. ३ ऱ्या शतकांत तिस्सनें केलेल्या ग्रंथाचा उल्लेख आढळतो. असें जर असेल तर अपदान हा ग्रंथ अर्वाचीन बौद्धग्रंथापैकीं एक आहे असें म्हणावें लागेल. दुसऱ्या इतर गोष्टींवरून हेंच दिसतें. उदाहरणार्थ, दीघनिकायामध्यें ऐतिहासिक बुद्धाच्या अगोदरच्या बुद्धांची संख्या सहा दिलेली आहे; बुद्धवंशासारख्या यापुढील ग्रंथांतून ही संख्या २४ पर्यंत वाढली आहे; पण अपदानामध्यें अकरा बुद्ध जास्त असून, त्यांची संख्या ३५ पर्यंत गेली आहे. यांतील निरनिराळ्या कथा निरनिराळ्या काळांतील असण्याचा बराच संभव आहे; पण वरील पुरावे असें दाखवितात कीं, बौद्धधर्मांतील दुसरे बहुतेक ग्रंथ रचिल्यानंतर या कथा संकलित केल्या गेल्या.

' विसुद्ध-जन-विलासिनी ' नांवाची एक अपदानावरची टीका उपलब्ध आहे. गंधवंशांतील दोन उताऱ्यांत या टीकेचा कर्ता बुद्धघोष आहे, असें दिसून येतें.

सुमंगल विलासिनीग्रंथावरून असें दिसतें कीं, दीघचे पाठक अपदान हा ग्रंथ अभिधम्म पिटकामध्यें आहे असें मानीत व मज्झिमचे पाठक तो सुत्तन्त पिटकामध्यें आहे असें प्रतिपादीत. संप्रदायांतील याच्या स्थानाविषयीं वरील शंका, त्याच्या अर्वाचीनतेचा एक पुरावा म्हणतां येईल. अपदान म्हणजे ' शुद्धाचरण, शूरकर्म '; व प्रत्येक अपदानांत प्रथम त्यांतील नायकाच्या किंवा नायिकेच्या पूर्वजन्मांचा इतिहास दिलेला असतो, नंतर त्यावेळच्या त्याच्या किंवा तिच्या आयुष्यांतील माहिती दिली असते. तेव्हां अपदान हें जातकाप्रमाणें वर्तमान व भूत काळाचें पुराण असतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. फरक इतकाच कीं, जातकांत एखाद्या बुद्धाचा पूर्वेतिहास दिलेला असतो व अपदानांत बहुधा अर्हताचा इतिहास असतो.

इ. स. पहिल्या शतकांत जेव्हां बौद्ध संस्कृतामध्यें ग्रंथरचना करूं लागले. तेव्हां या कथा लोकप्रिय होत्याच. फक्त अपदानाचें संस्कृत "अवदान" असें नांव पडलें. सध्यां पुष्कळ अवदानें संस्कृतांत किंवा तिबेटीचिनी भाषेंत रूपांतर पावलेलीं आढळतात. यापैकीं प्रसिद्ध म्हणजे ' अवदान-शतक ' आणि " दिव्यावदान " होत. या अवदानांतून अपदानांतील कथा जशाच्या तशा घेतलेल्या असतात असें नाहीं; तर

प्रचलित तत्त्वें व विचारसरणी ज्यांत गोंविली आहेत अशा नव्या कथा अवदानांत लिहिलेल्या असतात. पुष्कळशा अवदानांतून अर्हतांचीं चरित्रें आहेत; पण सर्वांत मोठ्या "महा-वस्तु-अवदान" नांवाच्या अवदानांतील मुख्य विषय बुद्धाच्या पूर्व जन्मांची मालिका हा आहे.

[ संदर्भ ग्रंथ—थेरीगाथा. मुल्लर–दि प्रोसीडिंग्स ऑफ दि ओरिएंटल कॉंग्रेस ॲट जिनेव्हा. गंधवंश. अवदानशतक (स्पेयर मुद्रित). दिव्यावदान (कॉवेल आणि नील). ओल्डेन-बर्ग–कॅटलॉग ऑफ पाली म्यानस्क्रिप्ट्स् ( इंडिया ऑफिस लायब्ररी ). फॉसबॉल–दि मंडाले म्यानस्क्रिप्ट्स् ( इंडिया ऑफिस लायब्ररी ). सुमंगल विलासिनी ( ऱ्हीसडेव्हिड्स् आणि कार्पेंटर ). महावस्तु ( सेनार्ट ). ]

**अपराजिता**.—या वनस्पतीस संस्कृतमध्यें विष्णुक्रांता असेंहि नांव आहे. हिचें झुडूप अगदीं लहान असून जमिनीवर वेलीप्रमाणें पसरतें. त्याचा विस्तार फार होत नाहीं. ह्या झाडाचीं पानें बारीक लांबट व पांढुरकीं असतात. फुलें निळसर तांबुस रंगाचीं असून बारीक असतात. व फळें फार बारीक येतात. औषधी कामाकडे या झाडाचा बराच उपयोग होतो. काविळीवर विष्णुक्रांतेची मुळी ताकाबरोबर प्यावयास देतात. मूळव्याधीवर विष्णुक्रांतेचे मुळांचा अंगरस तूप घालून देतात.

**अपरादित्य पहिलाः**—कोंकणचा शिलाहारवंशी राजा. याचा इ. स. ११३८ ( शक १०६० ) च्या, उरणनजीक सांपडलेल्या शिलालेखांत उल्लेख सांपडतो. डॉ. बुह्लर यास काश्मीरमध्यें सांपडलेल्या मंखाच्या श्रीकंठचरितांत ज्या अपरादित्यनामक कोंकणच्या राजाचा उल्लेख आला आहे तो हाच होय. या पुस्तकाचा काळ डॉ. मजकुरांनीं ११३५–११४५ असा ठरविलेला आहे. सदरहू श्रीकंठ-चरितोल्लिखित अपरादित्यानें शुर्पारका( सोपारा )हून तेजकंठ नामक पंडितास काश्मीर येथें भरलेल्या पंडितांच्या सभेस आपल्या देशातर्फे प्रतिनिधि म्हणून पाठविलें होतें. ही गोष्ट काश्मीर येथील जयसिंह ( ११२९–११५० ) राजाच्या कारकीर्दींत घडली. [ संदर्भ ग्रंथ. बॉं. ब्रॅं. रॉ. ए. सो. जादा अंक, १२, १८७७; बॉं. गॅ. व्हॉं. १, पा. २ ]

**अपरादित्य दुसरा**.—कोंकणचा शिलाहारवंशी राजा. याचे जमीन दान केल्याचे पांच शिलालेख उपलब्ध असून त्यांपैकीं इ. स. ११८४ ( शक ११०६ ) चा भिवंडी तालुक्यांत, इ. स. ११८७ ( शक ११०९ ) पैकीं एक परळ येथें, व दोन वसई तालुक्यांत ( एक काल नसलेला व दुसरा कदाचित् इ. स. ११८५ चा ) सांपडलेले आहेत. इ. स. १२०३ च्या मांडवीजवळ सांपडलेल्या केशिदेवाच्या शिलालेखांत ज्याचा अपरार्क या नांवानें उल्लेख आला आहे तो हाच असावा. केशिदेव हा या अपरार्कांचा पुत्र होता. याज्ञवल्क्यस्मृतीवरील मिताक्षरेच्या अपरार्कटीकेचा कर्ता अपरादित्य तो हाच असावा. या टीकेच्या शेवटीं सदरहू अपरादित्य हा शिलाहार घराण्यांतील राजा असल्याविषयीं म्हटलें असून १३ व्या शतकाच्या आरंभींच्या एक लेखकानें या अपरार्कांतील अवतरण दिलेलें आहे. इ. स. ११८७ मधील परळच्या शिलालेखांत अपरादित्यानें स्वतःचा महा-राजाधिराज व कोंकणचक्रवर्ती असा उल्लेख केला आहे. त्यावरून पश्चिम चालुक्य घराण्याच्या नाशानंतर जी अंदा-धुंदी माजली तिचा फायदा घेऊन इतर सामंत राजांप्रमाणें हा अपरादित्यहि स्वतंत्र झालेला दिसतो. [ संदर्भ ग्रंथ.—बॉं. गॅ. व्हॉं. १, पा. २; बॉं. ब्रॅं. रॉ. ए. सो. ज. पु. ९; १२ व जादा अंक; इं. अँ. ९. ]

**अपरांतकः**—अपरांतक ( भिन्न पाठ अपरांतिक ) "पश्चिमेकडील सरहद्दीच्या प्रदेशांतील लोक" पश्चिम विभागांतील एक जात, ( बृ. १४. २० ), यांस अपरांत्य हेंहि अपर नाम आहे. नाशिकच्या शिलालेखांपैकीं एकांत अपरांत लोक अथवा देश यांचा उल्लेख केला आहे; व रुद्रदामनूच्या जुनागड येथील शिलालेखांतहि उल्लेख आहे.

अशोकाच्या एका शासनांत यवन, कंबोज, व गंधार यांचा आपरांत असा वर्ग केला आहे. पंडित भगवानलाल इंद्रजी म्हणतात कीं, ठाणें जिल्ह्यांतील सोपारा हें अपरांत देशांतील मुख्य ठिकाण होतें.

[ बृहत्संहिता. १४. २०; Arch. Sur. West Ind. Vol. IV. Ind. Ant. Vol. VII. XX. J. B. B. R. A. S. XV ]

**अपस्मार**.—आयुर्वेदीय विवेचन.—स्मृतीचा नाश हा ज्या रोगांत होतो त्यास अपस्मार म्हणतात. "स्मृतिर्भू-तार्थविज्ञानं अपस्तत्परिवर्जनें" अशी अपस्मार शब्दाची निरुक्ति आहे. दुसऱ्या व्याधीनें क्षीण झाल्यानें, मलिन आहार विहार केल्यानें, किंवा चिंता, भय, शोक, इत्यादि कारणांनीं मन व शरीर हीं दोन्हीहि दोषांनीं व्याप्त होतात व ते दोष मनाचें व बुद्धीचें स्थान जें हृदय त्यास दुष्ट करून संज्ञावाहक स्रोत-सांसहि दुष्ट करितात. त्यावेळीं तो मनुष्य मूढ बनून अज्ञासा-रख्या नाना प्रकारच्या वाईट गोष्टी करितो. दांत खातो, फेंस ओकतो किंवा तोंडांत येतो, हातपाय जमीनीवर झाडतो, जें नसेल तें पहातो, अडखळून जमीनीवर पडतो, डोळे व भुंवया हीं वाकडीं होतात, याप्रमाणें कांहीं वेळ झालें म्हणजे दोषांचा वेग कमी होतो. तो वेग कमी झाल्यानंतर तो मनुष्य शुद्धीवर येतो व कांहीं कालानें पुन्हा वरच्या प्रमाणेंच वेड्यावांकड्या चेष्टा करितो असें वारंवार होतें. यांत मुख्य गोष्ट म्हणजे त्या रोग्यास आपण कोण, कोठें आहों, काय करितों याची शुद्ध नसते. बेशुद्धि हें मुख्य लक्षण ज्या रोगाचें आहे त्या रोगास मूर्छा असें म्हणतात. परंतु त्यांत कोणताहि व्यापार मनुष्य करीत नाहीं व तोंडातून लाळ वगैरे येणें हींहि लक्षणें त्यांत नसतात म्हणून त्या रोगापासून याचा भेद समजावा.

वातापासून, पित्तापासून, कफापासून, आणि सन्निपातापासून असे चार प्रकारचे अपस्मार होतात.

अपस्मार उत्पन्न होण्यापूर्वी हृदय कांपणें, अंग मेहरी आख्याप्रमाणें जड होणें, भ्रम, डोळ्यांपुढें अंधेरी येणें, चिंता करीत बसणें. भिवया वर चढणें, डोळ्यांस विकार होणें, शब्द नसतां ऐकूं येणें, घाम, लाळ व शेंबूड गळणें, अपचन, अरुची, मूर्छा, पोटांत गुडगुडणें, शक्तिक्षय, झोंप नाहींशी होणें, अंगमोडणें, तहान, स्वप्नांत गाणें, नाचणें, दारू व तेल पिणें, आणि तींच मुतणें इ० लक्षणें होतात.

वाताच्या अपस्मारांत रोगी मांड्या कांपत कांपत व वरचेवर धडपडत मूर्च्छित पडतो, आणि बेसूर रडत रडत सावध होतो. त्याचे डोळे सुजल्यासारखे वर येतात. दम लागतो तोंडांतून फेंस येतो, कांपतो, डोक्यास चटके देतो, दांत चावतो, मान फुगते, चहूंकडे वेडेवांकडे हातपाय टाकतो, बोटें वळतात, डोळे, त्वचा, नखें, व तोंड, हीं रुक्ष काळसर व तांबूस होतात, आणि त्याच्यापुढें काळें, चंचल, खरखरीत विद्रुप व विकृतमुख असें रूप दिसतें. पित्तानें वरचेवर फेंफऱ्याचे झटके येतात व वरचेवर सावध होतो. केंस, डोळे, तोंड, व त्वचा हीं पिंवळट होतात. जमीनीवर हात आपटतो. त्यास डोळ्यांसमोर भयंकर, पेटल्यासारखें व सारवल्यासारखें रूप दिसतें व तहान लागते.

कफापस्मारांत फार वेळानें फेंपऱ्याचा झटका येतो, आणि आला म्हणजे सावध होण्यासहि फार उशीर लागतो, चेष्टा थोड्या करितो, लाळ फार येते, डोळे, नखें व तोंड हीं पांढरीं होतात, आणि डोळ्यांपुढे पांढरें दिसतें.

सान्निपातिक अपस्मारांत वरील सर्व लक्षणें होतात व तो असाध्य आहे.

अ प स्मा रः—( एपिलेप्सी या अर्थानें )—या रोगांत रोग्यास आंचके येऊन अगर कधीं न येऊन बेशुद्धि एकदम येते व रोग्यास मेंदु, इंद्रियें वगैरे ठिकाणीं इतर रोग कांहीं नसतांना ही खोड त्यास जडते. रोग्यास जे भयंकर आंचके येतात त्यांकडे आपलें लक्ष विशेष जातें खरें, पण त्याबरोबर जी गुंगी असते तीही विलक्षणच असते. याशिवाय मेंदूवर गांठ, आवाळुं वाढून अगर मूत्रपिंडदाहरोगांत किंवा पंडुरोगांतहि झटके, अगर आंचके अगदीं अशा प्रकारचे येतात. पण त्यांचा या रोगांत समावेश करीत नाहींत. तर तसल्या आंचक्यांना 'अपस्मारसदृश' आंचके म्हणतात. या रोगांत आंचके येण्यास कारण अशी शरीराची कोणतीहि रचना अथवा इंद्रिय न विघडतां तो सुरू होतो. रचना विकृत न होतां फक्त व्यापार अगर क्रिया विकृत होते असे जे आणखी कांहीं रोग आहेत—उदा० उन्मादवायुरोग—त्यापैकीं हा आहे. या रोगांना केवळ रोग न म्हणतां 'व्यापार विकृति रोग' असें नांव देण्यास हरकत नाहीं.

का र णें:—पुरुषांपेक्षां स्त्रियांमध्यें हा रोग अंमळ अधिक प्रमाणांत असतो. शंभरांपैकीं पाऊणशें रोग्यांत रोगास आरंभ बालपणांत अगर यौवनावस्थेचे आरंभीं होतो. पण इतर सर्व वयांचे माणसांमध्यें तो आढळतो. कारण तो समूळ बरा होणें मुष्कीलीचें असतें व रोग्याचे मागें जन्मभर त्या रोगाचा त्रास लागतो व शेवटीं तो दुसरा कोणता तरी रोग होऊन मरतो. रोग होण्यास अनुकूल कारणें आहेत त्यांपैकीं वंशपरंपरा हें एक मोठें महत्त्वाचें कारण आहे. आई किंवा बापास हा रोग असल्याचें निम्या रोग्यांत तरी आढळून येतें. हा रोग नसला तर वेड, औदासीन्य, उन्माद रोग किंवा मद्यपवात यापैकीं एखादा रोग असतो. हा रोग स्वार्जित असल्यास त्यास सुरासेवन, अतिमैथुन, मुष्टिमैथुन, अशापैकीं कांहीं कारण असण्याचा संभव असतो. पण ज्या वयांत हा रोग सुरू होतो तेव्हां यांपैकीं पहिली दोन कारणें फारशीं संभवत नाहींत. व शेवटील कारणानें अपस्मारसदृशोन्मादरोग बहुधा होतो. खालील एखाद्या प्रकारचें निमित्त आंचके येण्यास पुरेसें होऊन तेव्हांपासून जन्मभर हा रोग रोग्यास पछाडतोः—भयंकर भीति, मानसिक चिंता, अगर चलविचल, डोक्यास इजा होणें, मोठाले ताप येऊन जाणें, नासापुट पार्श्वग्रंथि, डोळ्याची दृष्टि विघडणें, दांत किडणें, जंत होणें इत्यादि. पहिला झटका पुष्कळांना एक दोन तास रात्रीं झोंप झाल्यावर येतो. याचे दोन भेद आहेत, ते असेः—

म हा प स्मा रः—यामध्यें आंचके व बेशुद्धि हीं दोन्ही असतात. व (१) सूचनावस्था (२) बेशुद्धि व शरीर ताठणे (३) आंचके येणें व (४) शुद्धीवर येणें असें त्यांचें थोडक्यांत वर्णन आहे.

१ सू च नाः—सूचनेचे अनेक प्रकार असतात. जसे हात, पाय, तोंड, जीभ येथें मुंग्या येणें; कमी दिसणें; दृष्टिभ्रम, काजवे दिसणें, रंग दिसणें, पदार्थ अति मोठे दिसणें; ओकारी, भोंवळ, गुदमरणें, पोटदुखी यांपैकीं कांहीं होणें; एकदम आग होणें अगर थंडी वाजणें, घाम सुटणें अगर छाती धडधडणें, कसली तरी सांगतां येत नाहीं अशी भीति अगर काळजी, स्वप्नांत असल्याप्रमाणें भासणें, जें घडतें तें पूर्वी स्वप्नांत घडलेंच आहे असें वाटणें. याशिवाय अनेक इंद्रियासंबधीं अनेक सूचनालक्षणें होतात.

२ बे शु द्धिः—रोगी उभा असो किंवा चालत असो एकदम पुढें पडून किंचाळी मारून (अगर न मारतां) पुढें भुईवर आपटून बेशुद्ध होतो. हात आणि पाय लांब आंखूड वरचेवर करतो; डोळे, तोंड मिटतो उघडतो, बुबुळें फिरवतो; जीभ बाहेर काढल्यामुळें ती दांतांत सांपडून चावली जाण्याचा संभव असतो. लाळ व रक्तमिश्रित फेंस जीभ चावल्यामुळें तोंडातून येतो. चेहरा अति काळवंडतो व तोंड, ओंठ सुजल्यासारखे दिसतात. मळ लघवी व पुरुषाचें धातुस्खलन यांपैकीं एक अगर अनेक नकळत होतें. एखादा खांद्याचा सांधाहि

आंचक्यानें निखळतो. बुबुळास बोट लावलें तरी पापणी मिटत नाहीं. कनीनिका विस्तृत होते.

३ आंचकेः—ही अवस्था थोडी म्हणजे पांचसहा मिनिटें असते व मग ते कमी होऊं लागतात. श्वास लागणें व तोंडास फेंस येणें बंद होतें. व त्यास प्रथम झांपड व नंतर चांगली झोंप लागून कांहीं वेळानें एकदमच शुद्धीवर येतो. पण कित्येक वेळां यावेळीं तो वात होऊन वरळतो अगर वेड्यासारखें करितो.

रोगी आपणास बेशुद्धीमध्यें नानातऱ्हेच्या इजा नकळत आंचक्याचे तीव्रतेमुळें करून घेतो व त्यामुळेंहि वैद्यानें झटके पाहिले नसतील तेव्हां रोगाचें निदान ठरविण्यास एक साधन होतें.

लघु अपस्मारः—एकदम बेशुद्धि येणें यापेक्षां या भेदामध्यें बहुतेक रोग्यांना कांहींएक होत नाहीं. बोलतां बोलतां एकदम नजर ताठल्यासारखी करून कनीनिका विस्तृत होतात, बोलणें भलतेंच येऊं लागतें; व नंतर भोंवतालीं काय घडलें याचें त्यास ज्ञान नसतें. रोगी जेवत असला तर एकदम ताटांत अगर वाटींतच बोटें खुपसूं लागून थोडे सेकंदपर्यंत बेशुद्ध होतो व चटकन् शुद्धी येऊन अनुभवावरून मधील चुकी व विस्मृति त्याचे लक्षांत येते आणि मला जरा आतां भोंवळ येते अगर डोकें दुखतें, मी जरा आतां पडतों, असें म्हणून दुसरीकडे जातो. किंवा पूर्वी जें काम करीत असेल तेंच पुढें करूं लागतो. कधीं भोंवळ तर कधीं एखादाच आंचका येऊन हात अगर पाय हलणें व थोडी बेशुद्धि हें त्रासदायक लक्षण असतें, यांपैकीं कांहीं चिन्हें व लक्षणें महापस्माराच्या सूचनाचिह्नासारखींच असतात.

अन्वापस्मारस्थितिः—विशेषतः मागील भेदांत वर्णिलेला झटका निघून गेल्यानंतर ही स्थिति होऊन त्यामुळें मानसिक स्थितींत विलक्षण पालट पडतो. कांहीं दिवस गुंगी अगर वेड लागल्याप्रमाणें होतें. कधीं तो अशीं न कळतां कृत्यें करतो कीं त्याची त्यास मागाहून स्मृति नसते. इकडे तिकडे धांवून कोणी भेटेल त्यास तडाखे देतो; बाई असली तर आपलें मूलहि मारून टाकते किंवा रोगी चौर्यकर्म करितो. एक न्यायाधीश होते त्यांनीं अशा स्थितींत भरकोर्टांत कोपऱ्यांत जाऊन लघवी केली. या मानसिक स्थितीचें ज्ञान वैद्य डाक्तरांनां व वकिलांनां जरूर पाहिजे. त्या माणसाची रोगामुळें अशी मानसिक स्थिति होते हें लोकांस ठाऊक नसतें व मुद्दाम मारामारी अगर खून केला असा आरोप त्याजवर शाबीत होण्याचा संभव असतो. कधीं याबरोबर वेड, अतिराग, भ्रम, भास होतो. कधीं मुलगे, मुली व स्त्रियांना प्रथम या प्रकारचा अपस्मार होऊन पुढें त्याचें उन्माद वायूमध्यें रूपांतर होतें. कधीं कधीं हे दोन भेद एकमेकांत मिश्र होतात. म्हणजे रोग्यास प्रथम लघु अपस्मार होऊन मोठेपणीं महापस्मार होतो. कधीं नुसती सूचना अवस्थाच फक्त रोग्यास होते. पण असें क्वचितच घडतें.

रोगाचे भेदक्रमः—एका रोग्यांत रोगाचें एकच स्वरूप कायम रहात नाहीं. दोन झटक्यांमध्यें एक महिन्यापेक्षां अधिक काल प्रथम जातो. पण रोगाचा प्रभाव अधिक झाल्यावर हें अंतर कमी कमी होत जातें. कधीं तर रोजच एक, दोन, तीन सुद्धां झटके येतात. व तसें झालें म्हणजे मग बरेच दिवस झटके येत नाहींत. मोठा व कडक झटका येऊन गेला तर बरेच दिवस तो पुन्हां येत नाहीं. पण लहान झटक्याचें तसें नसतें. मद्यसेवन, अतिमैथुन, अतिआहार, मानसिक व शारीरिक श्रम फार केल्यानें आंचके लवकर येऊं लागतात. कांहीं बायकांना दर महिन्यांत रजस्वला असतांना आंचके येतात.

उग्रापस्मारः—कांहीं रोगी तर सतत आंचके येत कांहीं दिवस राहून शेवटीं त्यांतच ताप वाढून मरण पावतात. दुसरा झटका येण्यापूर्वीच्या मधील अवकाशांत जर झटके लवकर येत नसतील तर रोग्याची प्रकृति उत्तमच असते. रोगी चांगला धट्टाकट्टा, हौशी व बळकट असतो. पण जर झटके वरचेवर येत असतील किंवा रोग जुनाट असेल तर रोगी चिरडखोर, उदास होऊन त्याची बुद्धी व स्मरणशक्ति कमी होते व शेवटीं अगदीं मानसिक दौर्बल्य येतें. लहान मुलांना तर पूर्ण वेड लागतें, किंवा तीं अर्धवट होतात. वरील उग्रापस्मार खेरीज करून निवळ या रोगानें असा मृत्यू रोग्यास येत नाहीं. त्याचा मृत्यू अपघातापासून होतो. उंचावरून तो खालीं अगर पाण्यांत पडतो व बुडून मरतो. किंवा पांघरुणांत आंचके येऊन तोंड, नाक गुदमरून त्यामुळें मरतो. अगर विस्तवांत पडून, भाजून किंवा गाडी, घोडा, पायगाडीवरून पडून मरतो. हे आंचके येण्याचें कारण मेंदूच्या बाहेरील भागामध्यें असावें. कारण तेथें गांठ किंवा आवाळुं झालें असतां येणारे झटके अगदीं हुबेहुब असेच असतात. शिवाय तेथें हातपाय, चेहरा हालविण्याचे हुकुम सोडणारीं मज्जास्थानें असल्यामुळें असले आंचके येणें तेथूनच अधिक संभवनीय आहे. शिवाय, आंचक्याबरोबर बेशुद्धि येणें हें लक्षणहि वरील अनुमानास पुष्टी आणणारें आहे.

रोगनिदानः—आंचके पाहिले म्हणजे रोग ओळखण्यास सोपा आहे. ते न पाहिले तर उन्मादरोगाची बेशुद्धि व झटके येतात किंवा काय याचा संदेह पडतो. लघु अपस्माराचा हृदयदौर्बल्यमूर्छेशीं घोटाळा उडण्याचा संभव असतो. (१) उन्मादांतील झटके येतांना रोगी डोकें आपटणें वगैरे कांहीं तरी निश्चित क्रिया झटक्याच्या वेगांत करितो व दाबून धरिलें तर धडपड अधिक करतो. जीभ चावली जात नाहीं, चेहरा काळवंडत नाहीं. ते आंचके फार वेळ टिकतात. कान, नाक, डोळे, या ठिकाणीं उन्मादवायूच्या रोग्यास त्रास दिला असतां, कळत असतो. पण अपस्मारांत रोगी अगदींच बेशुद्ध असतो. (२) मेंदूवर गांठ, आवाळुं झालें असतां झटके एका बाजूलाच येतात. (३) कांहीं लोक पैसे उपटण्याकरितां

लोकांस दया यावी म्हणून ढोंग करितात. ते पडतांना जपून, इजा न होईल असे पडतात. त्यांच्या ढोंग करण्याच्या श्रमानें चेहरा लाल होतो. चेहरा काळा नसतो. व श्रमानें त्यांस घामहि येतो. कनीनिका विस्तृत झालेली नसते. व उजेड असल्यास ती बारीक होते. अंधारांत मोठी होते. तेथें स्पर्श करितांच डोळे मिटून घेण्यांत येतात. पापणी आपण उघडण्याचा यत्न केला तर ती अधिक गच्च मिटून घेतली जाते. तपकिर नाकास लावून शिंका येतात. चिमटे समजतात. ( ४ ) मेंदूच्या रोगामुळें झटके असल्यास डोकेंदुखी, ओकारी, अंधत्व व अर्धांगवायु हीं लक्षणें असतात. ( ५ ) मूत्रपिंडदाहजन्य झटके असतील तर लघवींत आलब्यूमिन, कठिण नाडी, सूज, मोठें झालेलें हृदय इत्यादि लक्षणें असतात. ( ६ ) किडके दांत, जंत, दंतोद्भव, बद्धकोष्ट, शिश्नाची चामडी टोंकाशीं अतिघट्ट असणें, टांचणी अर्भकास बोचत असणें अशा नानाविध कारणांनीं आंचके येतात. त्या सर्वांची चौकशी व शोध केला पाहिजे. बऱ्याच मोठ्या मुलांनीं अथवा मुलींनीं अंथरूण मुतून ओलें केलें असतां त्यांना अपस्मार आहे किंवा काय याचा शोध करावा. कारण झोपेंत आंचके येतात.

सा ध्या सा ध्य वि चा रः—मूल वयांत आलें म्हणजे रोग बरा होईल ही आशा बहुधा खोटी ठरते. रोग मोठेपणीं झाला असल्यास बराच सुसाध्य असतो. तसेंच जे आंचके निवळ दिवसा किंवा निवळ रात्रीं येतात तेहि औषधोपचारानें सुसाध्य असतात. मिश्र प्रकारचे आंचके दुःसाध्य असतात. तसेंच निवळ महापस्मार किंवा लघु अपस्मार बरा होण्यासारखा असतो पण मिश्र प्रकारचा अपस्मार नसतो. वेड, किंवा अर्धवेड लागून मानसिकस्थिति बिघडली असेल तर गुण येत नाहीं. रोग्यास सूचनावस्था असलेले रोगी बरे होण्याचा संभव असतो. शेंकडा १०–१२ रोगी औषधानें बरे होतात व शेंकडा ४७ रोग्यांना बराच फायदा होऊन रोग ताब्यांत बराच रहातो.

औ ष धो प चा रः—यांचा हेतु आंचक्यांचें येणें कमी करणें व नंतर तें येणें बंद करणें हा होय. त्यापूर्वी एक झटका येऊन गेल्यावर दुसरा झटका येण्याचे दरम्यान रोग्यास आहार हलका व पौष्टिक देऊन, मोकळी हवा, उजेड जेथें मुबलक आहे अशा जागीं त्यास ठेवावें. त्याचे दांत, डोळे तपासून त्यांत खोड असल्यास त्यावर उपाय करावेत. मांसाहार वर्ज्य करावा. पोट अगदीं भरुन जाईल इतका मोठा आहार नसावा. रात्रीं जेवण होतांच निजूं नये. चहा, कॉफी व दुसरीं उत्तेजक पेयें वर्ज्य करावींत. कोठा साफ ठेवावा. बद्धकोष्ट झाल्यानें कोठ्यांत घाण सांचते तसें होऊं देऊं नये. नियमितपणें दम न लागेल इतका व्यायाम करवावा. व ज्यांत धोका व जीवास अपाय होणार नाहीं असला कामधंदा त्यास पाहून द्यावा. कांहीं ठिकाणीं असल्या रोग्यांची वसाहत केली आहे. अशी सोय आपल्या देशांत केल्यास रोगी तेथें ठेवल्यानें जरी कामधंदा करितांना आंचके आले तरी त्यांस जपण्याची व शुश्रूषेची तजवीज तेथेंच केलेली असते. तेथें रोग्यांचें खाणें, व्यायाम, करमणूक, यासंबंधीं त्यांना जशी हितावह व्यवस्था पडेल अशीच तजवीज ठेवली गेल्यामुळें अशा वसाहती बनविल्यापासून फायदा आहे. असल्या रोगी मुलांना त्यांच्या दर्जानुरूप शिक्षण द्यावें खरें पण परीक्षा, अभ्यासाची सक्ति याचा धाक त्यांचे मागें असूं नये.

औ ष धें:—सोडियम, पोट्याशियम, स्ट्रानशियम, अमोनियम यांचे ब्रोमाइड क्षार या रोगावर फार उपयोगी असल्यामुळें बहुतेक रोग्यांवर त्यांचा बराच अंमल चालतो. पोट्याशियम ब्रोमाइड २०–३० ग्रेन पाण्यांत विरघळवून रोज तीन वेळां देतात. सौम्य रोगास व तरुण रोग्यांनां २० ग्रेनची हलकी मात्रा द्यावी व रोग तीव्र असल्यास ३० ग्रेन किंवा अधिकहि औषध द्यावें. पोट्याशियम, सोडियम, व अमोनियम, या तिहींचे मिश्र ब्रोमाइड सर्व मिळून ३० ग्रेन दिल्यानें अधिक फायदा होतो असें म्हणतात. कित्येक महिने किंवा वर्षें औषध द्यावें लागतें. त्यामुळें आंचक्यामधील अंतर कमी होऊन आंचक्याची तीव्रताहि कमी होते. म्हणजे दर आठवड्यास आंचके येत असल्यास ते महिन्या सवा महिन्यांनीं येतात. मध्यें औषध सोडलें, तर आंचके पुनः वाढतात; त्यामुळें औषध घेणें हा नित्य क्रम रोगी सहसा सोडीत नाहीं. जरी कित्येक महिने पर्यंत किंवा एक वर्ष पर्यंत औषध घेऊन आंचके आले नाहींत तरी औषध सोडूं नये. तर आंचके थांबल्यावरहि दोन वर्षें औषध घ्यावें. व थोड्या प्रमाणांत आणखी एक वर्ष औषध घ्यावें.

ब्रोमाइड मोठ्या प्रमाणांत दिल्यानें सुस्ती येते. हातापायास दुबळेपणा येऊन ते थंडगार लागतात. असें झालें तर ३० ग्रेन प्रमाण औषधाचें करावें. अशी स्थिति ३० ग्रेनपेक्षां जास्त औषध दिल्यानें होते व तिला ब्रोमाइड निशा म्हणतात. किंवा कांहीं दिवस औषध बंद ठेवावें. ब्रोमाइडपासून त्रास न होण्यास त्याबरोबर सोडियम ग्लिसरोफासफेट दररोज एकंदरींत २०–३० ग्रेन त्याशीं मिश्र करून द्यावें. किंवा त्यांत कुचल्याचा अर्क घालावा ( २०–३० थेंब ). तें पुष्कळ पाण्यांत विरघळवावें. व त्यापासून अंगावर पुटकुळ्या येतात त्या न याव्या म्हणून त्यांत २–३ थेंब लायकर आर्सेनिक ( सोमल ) या विषारी औषधाचे घालावेत. आहारांतील मीठ तोडल्यानें या ब्रोमाइड औषधांचा गुण चांगला येतो असें म्हणतात. मधून मधून ब्रोमाइड बरोबर दुसरीं औषधें मिश्र करून देतात तीं:—बेलाडोना, झिंकसल्फेट किंवा ऑक्साइड, लोहबोप्याक्स, क्यालशियमल्याकटेट, अँटिपायरीन, डिजिटालीस, भांग इत्यादि.

आं च के आ ले अ स तां का य क रा वें ?—सूचनावस्थेंत हातांत मुंग्या येऊन त्या वर जात असतील तर हात जोरानें चोळल्यानें किंवा बांधून टाकिला असतां आंचके येणें टाळलें जातें अशानें झटका थांबवितां येतो असें कळलें म्हणजे दंडाभोंवतीं दोरीचा वेढा बांधून एक टोंक मनगटाशीं ठेवावें म्हणजे जरूर

वाटेल तेव्हां हें टोंक ओढून दडाभोवतीं दोरी आंवळून झटका थांववावा. कांहीं रोगी ज्या ज्या प्रकारची सूचनावस्था असेल ती ती क्रिया करून आपापले झटके थांववूं शकतात. उदाहरणार्थ, कोणास अंमल पडून राहिल्यानें तर कोणास मुरडा ही सूचना असल्यामुळें शौचास जाऊन आल्यामुळें झटका थांववितां येतो. या क्रिया करण्यास जें लक्ष द्यावें लागतें व स्नायूंची क्रिया करावी लागते त्यामुळें झटका थांवत असावा व म्हणून मानसिक शक्तीचे प्रयत्नानेंहि तो थांवावा व त्यासाठीं रोग्यानें आपल्या रोगाकडे लक्ष न देतां अशा वेळीं भोंवताली लक्ष द्यावें असें कांहींचें मत आहे. नायट्राइट आफ आमील हें औषध हुंगल्यानें कोणाचा झटका थांवतो.

झ ट का आ ल्या व र का य क रा वें:—रोगी पडला असेल तेथेंच ( येथें पाणी अगर विस्तव नसेल तर ) त्यास पडूं द्यावें. त्याचें डोकें आपटून इजा न होईलसें करावें. कपडे, नेसणें, सैल करावें. एक बूच, किंवा काठीचा तुकडा दांतांच्या जवड्यामध्यें ठेवावा म्हणजे जीभ चावली जाणार नाहीं. निजतांना अशा रोग्यांनीं कृत्रिम दांताची कवळी काढून ठेवून झोंपीं जावें. नाहींतर झटक्यांत ती सुटून घशांत अडकून बसते. महापस्मारासाठीं ब्रोमाइड क्षाराचें प्रमाण दुप्पट करावें. व त्यांत क्लोरल १५ ग्रेन घालावें. दर ४ तासांनीं द्यावे. आमील नैट्रैट हुंगवावा. अगर क्लोरोफार्म, मार्फिया टोंचून घालावा.

**अपामिया:**—हें पश्चिम आशियांतील पुष्कळ शहरांचें नांव आहे.

( १ ) ओरोन्टेस नदीच्या खोऱ्यांत सिल्यूकिडी राजांचें खजिन्याचें शहर होतें. सेल्युकस निकेटरनें आपली बायको, अपामा, इचें नांव या शहराला दिलें. ७ व्या शतकांत खुश्रूनें याचा नाश केला. व अरबांनीं हें शहर पुन्हां बांधून याला फामिया नांव दिलें, ख्रिस्ती धर्मयुद्धाचे वेळेपर्यंत याचें महत्त्व होतें.

( २ ) फ्रिजियांतील एक शहर असून अंटायोकस सोटरनें स्थापिलें. ह्याच्या आईचें नांव अपामा होतें ह्यावरून शहराचें नांव पडलें. हें सिल्यूकिडी सत्तेचें त्याचप्रमाणें, ग्रीकोरोमन व ग्रीकोहिब्रू संस्कृतीचें व व्यापाराचें मुख्य ठिकाण झालें. अँटायोकस गेल्यावर हें परगामेनियन राज्यांत सामील झालें. यानंतर रोम व मिथ्रिडाटीझ यांच्या अंमलाखालीं आलें. तिसऱ्या शतकापासून अपामियाचे ऱ्हासास सुरवात झाली. १०७० त तुर्कांनीं हें शहर घेतलें व १३ व्या शतकापासून मुसुलमानी अंमलाखालीं राहिलें. बरेच दिवसपर्यंत हें आशिया मायनरमधील मोठें शहर होतें. येथें बरेच अवशेष व ग्रीकोरोमन शिलालेख आहेत.

( ३ ) युफ्रेटीस नदीच्या पश्चिम तिरावरील एक शहर, असुरियन लेखांतील तिलबारसिप व आधुनिक बिरेजिक.

( ४ ) बिथिनियांतील जुनें मिरलिया. पहिल्या प्रुसियसनें बांधून हें नांव दिलें होतें.

( ५ ) स्टिफानसनें व प्लिनीनें उल्लेख केलेलें शहर.

( ६ ) राघीजवळील पार्थियांतील एक ग्रीक शहर.

**अपीनस** ( इं. ओझीना. )—व्या ख्या:—प्रत्यक्ष नाकांतून किंवा नाकास लागून वरच्या अंगास असलेल्या खळग्यांतून जो अतिशय घाणेरडा स्राव पुष्कळ दिवस वाहतो त्यास अपीनस म्हणतात. नाकांतून घाणेरडा स्राव वाहणें यास स्वतंत्र रोग म्हणण्यापेक्षां तें नाकांतीउ विकाराचें—नाकाच्या आंतील श्लेष्मलत्वचेस पडलेल्या दुष्टक्षताचें—एक विशेष लक्षण आहे असेंच म्हणावें लागतें. तथापि, व्यवहारांत त्यास स्वतंत्र रोगच समजतात व त्यास पीनस असें म्हणतात, परंतु पीनस म्हणजे पडसें होय. या रोगास आपल्या वैद्यकांतील अपीनस हेंच नांव जवळ जवळ जुळतें. सबब तेंच येथें योजिलें आहे.

का र णें:—अपीनस होण्याचीं अनेक कारणें आहेत, त्यांपैकीं मुख्य कारणें म्हटलीं म्हणजे—उपदंश, गंडमाळा, दुष्टक्षत, नाकांतील हाड किडणें अथवा सडणें, नाकांत कांहीं बाह्यपदार्थ अडकून राहणें हीं होत. हीं कारणें नसूनहि, एखादे वेळीं अपीनसाचा विकार आपोआप उद्भवतो व त्याचें कारण प्रकृतिवैचित्र्य हेंच होय. कांहीं लोकांचें म्हणणें असें आहे कीं, पारा पोटांत प्रमाणाबाहेर दिल्यामुळेंहि हा विकार उद्भवतो.

ल क्ष णें:—अपीनसांत नाकांत होणारें क्षत, बहुधा अगदीं नाकाच्या वरच्या अंगासच आरंभीं असतें. गंडमाळाच्या प्रकृतीच्या मनुष्याचे नाकांत, बहुधा एका नाकपुडींतच क्षत पडून तींतून दुर्गंधयुक्त स्राव वाहूं लागतो, परंतु उपदंश विकार झालेल्याचे दोन्ही नाकपुड्यांत क्षतें पडतात असें पाहण्यांत येतें, व अशा रोग्याची इतर प्रकृतीहि बरीच बिघडलेली आढळते. विशेषतः लहान मुलांमध्यें कोणच्या कारणांपासून हा विकार उद्भवला हें ठरविणें कठिण जातें, कारण वरील दोन्हीहि प्रकार एकाच वेळीं त्यांचेमध्यें असण्याचा संभव असतो.

प्रत्येकाच्या प्रकृत्यनुसार व रोगाच्या क्रमानुसार स्रावाची स्थिति असते, मग तो उद्भवण्याचें कारण कांहींकां असेना. सर्दी, श्रमातिरेक, विटाळाची पाळी इत्यादिकांपासूनहि स्रावाच्या स्थितींत फेरबदल होतो. नाकांतून वाहणारा स्राव पुष्कळ किंवा थोडाहि असतो, तो घट्ट किंवा पातळ असतो, तो पुवासारखा अथवा शेंबडासारखा असतो, त्यास फारसा कसलाच रंग नसतो किंवा तो हिरवट पिवळ्या रंगाचा असतो, आणि कधीं कधीं त्यांत किंचित् रक्तहि मिश्र असतें. पुष्कळदां, त्याच्या नाकांत खपल्या धरतात, अथवा श्लेष्मलत्वचेचे पापुद्रे त्यांत मिळून घट्ट खडे अथवा गोळे बनतात; हे रोजचे रोज नाकांतून बाहेर पडतात, अथवा नाकाचे मागील छिद्राजवळ जमून दोन तीन दिवसांनीं एकदम बाहेर पडतात, त्यावेळीं त्यांचा अतिशय कंटाळवाणा दुर्गंध असतो; ते बाहेर पडले कीं, त्यांचे जागीं दुसरे गोळे लागलीच बनूं लागतात.

सं क रः—ह्या विकारांत नाकाचीं हाडें सडतात विशेषतः उपदंश झालेल्या रोग्यांच्या नाकांतील पडदा झडून जातो त्यामुळें नाक बसून कुरूपता उत्पन्न होते.

प री क्षाः—वाईट दांतांमुळें, तोंडांतील अथवा घशांतील क्षतामुळें, नाकांत कांहीं अडकून त्यांत शेंबूड कोंडला गेल्यामुळें अथवा प्रकृतींतच कांहीं बिघाड झाल्यामुळें श्वासास घाण येते, त्याप्रमाणें अपीनसाचे रोगांतहि श्वास दुर्गंधयुक्त असतो, यासाठीं श्वासाच्या दुर्गंधाच्या वरील कारणांचा नीट विचार करून नंतर अपीनस रोगाची परीक्षा ठरवावी. तो विचार करितांना नाकातोंडाची बारकाईनें तपासणी करून पाहावी व एकदां नाक बंद करून व एकदां तोंड बंद करून श्वासास दुर्गंधी केव्हां येते ह्याची खात्री करून घ्यावी म्हणजे परीक्षेस फारशी अडचण पडत नाहीं.

चि कि त्साः—ह्या रोगावर पोटांत व स्थानिक असे दुहेरी उपाय केले पाहिजेत. ते करितांना कारण शोधून काढून तें जेणेंकरून दूर होईल असें चिकित्सेचें धोरण ठेविलें पाहिजे. स्थानिक अथवा वरोपचार करितांना मुख्य ध्यानांत ठेवण्याचें तत्त्व म्हटलें म्हणजे नाक सदा अत्यंत स्वच्छ ठेवणें हें होय. ह्यांत कादीची हयगय अथवा दिवसगतीचा कंटाळा न केल्यास अगदीं असाध्य वाटलेलेहि अपीनसाचे रोगी बरे होण्याचा संभव आहे हें पक्कें ध्यानांत ठेवावें. नाक स्वच्छ ठेवावयाचें म्हणजे विकृत जागेंतून वाहणारा दुर्गंधयुक्त स्राव आंत घट्ट होऊन जमून राहतो तो दूर करणें अथवा त्याच्या घट्ट चिकटून बसलेल्या खपल्या दूर करणें हें होय. अशा रीतीनें नाक स्वच्छ ठेवणें हें काम सहज होण्याजोगें नाहीं. ह्याकरितां नाक स्वच्छ करितांना सावकाशीनें व योग्य साधनानें तें स्वच्छ केलें पाहिजे. प्रत्येक खपली निघून जाऊन पुनः ती न जमेल अशा रीतीनें नाक धुतलें पाहिजे. स्राव आंतल्या आंत जमूं दिला तर तो नासण्याची अथवा पृथक्करण पावण्याची क्रिया तेव्हांच सुरू होते. अर्थात्, त्यामुळें विकृत जागा बरी होण्यास मुळींच अवधी अथवा अनुकूल स्थिति प्राप्त होतच नाहीं. यासाठीं नाक स्वच्छ करणें तें नाकांत पाणी ओढून अथवा पिचकारीनें पाणी मारून न करितां नाक धुण्याच्या यंत्रानेंच (नेझल डूशनें) तें धुणें जरूर आहे. हें यंत्र म्हणजे एक दीड दोन फूट लांबीची व साधारण करंगळी एवढी रबराची मृदु नळी असून तिच्या एका तोंडास नाकांत बसविण्याजोगी तोटी बसविलेली असते व दुसऱ्या टोकास पाणी आंत ओढून घेईल अशी धातूची नळी बसविलेली असते. ही नळी सुमारें अच्छेर पाणी राहील अशा पात्रांत सोडून त्यामध्यें ऊन पाणी नुसतें अथवा कांहीं क्षार-युक्त औषधांसह (थोडें मीठ, सोडा आणि बोरिकआसिड ह्यांसारखें) घालावें. नंतर तोटी नाकपुडींत घालून पाण्याचें भांडें बरेंच वर करावें, आणि भांडें अंमळ कलतें करून नळींत पाणी जाईल असें करावें. एकदां तींतून प्रवाह सुरू झाला कीं, वातावरणाच्या दाबानें तो सारखा सुरू राहतो. नाक अगदीं स्वच्छ होईपर्यंत तो प्रवाह चालू ठेवावा. ह्या युक्तीचा उपयोग करितांना तोंड पुरतें उघडें ठेवावें, म्हणजे मृदुतालू (सॉफ्ट पॅलेट) वर उचलली जाऊन नाकाचीं मागील छिद्रें ह्यांचा संबंध तोंडाशीं अथवा घशाशीं बंद होऊन राहतो. त्यामुळें एका नाकपुडीवाटे गेलेलें पाणी दुसऱ्या नाकपुडीवाटे बाहेर पडतें. अशा रीतीनें कांहीं त्रास न होतां दोन्हींहि नाकपुड्यांचे आंतील सर्व पोकळी धुतली जाऊन खपल्याहि निघून जातात. ह्या प्रकारच्या धुण्यानें, एखादे वेळीं, सर्व आंतील घाण निघून गेली नाहीं किंवा नाकाच्या वरील भागाच्या खपल्या भिजून पडल्या नाहींत तर काडीस घट्ट कापूस बसवून त्या फायानें त्या खपल्या, हलकेंच, खरडून काढाव्या. हयगयीमुळें नाक पुष्कळ दिवस न धुतलें गेल्यामुळें आंत खपल्या वगैरे घाण अगदीं कठिण होऊन बसते, ती निघण्यासाठीं नाक धुण्यापूर्वी नाक गरम पाण्याच्या बोळ्यानें चांगलें शेकावें, व नाकांत वाफ ओढावी, म्हणजे खपल्या मृदु होऊन पाण्याचे प्रवाहाबरोबर निघून येतात. साधारण पिचकारीनेंहि नाक चांगलें धुतलें जातें. नाक चुन्याच्या स्वच्छ निवळीनें (लाईम वाटर) अथवा को-मट दूध व पाणी ह्यांच्या मिश्रणानेंहि धुतलें तरी चालतें. ह्याप्रमाणें दिवसांतून तीनचार वेळां नाक धुतलें असतां श्लेष्मा अथवा पू गोठून जमा होण्याचा संभव फार कमी झाल्यामुळें नाक स्वच्छ करण्यास फारसा त्रास पडत नाहीं, किंवा वेळहि लागत नाहीं. नाक धुतांना तोटी एका नाकपुडींतून काढून दुसऱ्या नाकपुडींत घालावी म्हणजे दोन्ही नाकांची पोकळी चांगली स्वच्छ होते.

खपल्या निघाल्यानंतर क्षारयुक्त औषधाच्या ऐवजीं, जरू-रीप्रमाणें, पुढील स्तंभक अथवा दुर्गंधनाशक औषधाची योजना करावी. दहा औंस पाण्यामध्यें औषधापुढें दिलेलें प्रमाण घालून त्या मिश्रणाचा नाक धुण्याचे कामीं उपयोग करावा.—परमँ-गनेट ऑफ पोट्याशियम २ ग्रेन; क्लोराईड ऑफ झिंक २ ग्रेन; सलफेट ऑफ झिंक ३० ग्रेन; क्यारबॉलिक आसिड १ ड्राम; नैट्रेट आफ सिल्व्हर (काडीखार) ४ ग्रेन; तुरटी ४० ग्रेन; सवागीखार ४० ग्रेन; क्लोरेट ऑफ पोट्याशियम ३० ग्रेन; टिंक्चर ऑफ आयोडीन १० थेंब; रसकापूर १–२ ग्रेन इत्यादि. ह्यांपैकीं कोणच्याहि औषधाचा एकसारखा बरेच दिवस उपयोग करावा. जेव्हां स्राव पुष्कळच असेल तेव्हां तुरटी, त्रिफळाचा काढा, बाभळीच्या सालीचा काढा ह्यासारख्या स्तंभक औषधाचा उपयोग करावा. जेव्हां स्रावास घाण फार येत असेल तेव्हां विशेषतः दुर्गंधनाशक औषधांचा (क्यार-बालिक आसिड, कांडीझफ्लुईड) उपयोग करावा.

नाक धुऊन झाल्यावर गाईचे तुपांत अथवा ग्लीसरीन, हॅझलीन, बालसम ऑफ पेरू, ह्या सारख्या एखाद्या न झोंब-णाऱ्या औषधांत अथवा तेलांत कापूस भिजवून नाकांत सळ-ईनें बसवावा. ह्याचे ऐवजीं कित्येक लोक तपकिरीचा अथवा कांहीं दुर्गंधनाशक पुडीचा ओढण्याकडे उपयोग करितात. बोरिक

आसिड, विसमथ, सॅलल, कापूर, मायफळाची पूड, कॅलो-मेल, कंकोळ, आयडोफार्म, हीं खडू, साखर, अथवा पिठी ह्यांच्याशीं योग्य प्रमाणांत मिसळून ती पूड नाकांत वरचेवर ओढतात. परंतु, कांहीं पूड ओढण्यापेक्षां वरील पातळ अथवा तेलकट औषधांचा उपयोग करणेंच चांगलें.

बहुतेक करून, नाक रोज धुण्याच्या योगानें व कांहीं दुर्गंध-नाशक औषध नेमानें घातल्याच्या योगानें आंतील क्षतें लौकर वरीं होऊन दुर्गंधयुक्त स्राव वाहण्याचाहि बंद होतो. मात्र, हाड किडलें किंवा सडलेलें असल्यास तें काढून टाकि-ल्यावांचून चिकित्सेचा उपयोग होत नाहीं. उपदंशाच्या रोगा-मुळें अपीनसाचा आजार झाला असल्यास वरील तत्त्वांस अनु-सरूनच स्थानिक उपचार करावे. १ भाग रसकापूर ( परक्लो-राईड आफ मरक्युरी ) ५,०००—१०,००० भाग पाण्यामध्यें विद्रुत करून त्या मिश्रणानें नाक धुवावें, आणि क्षतें पडलेल्या जागेवर काडीखार लावावा.

अपीनसामध्यें पोटांतील उपचारहि करणें, पुष्कळदां, फार जरूर असतें. त्यांत गंडमाळांची प्रकृति असली किंवा उपदं-शाचा आजार झालेला असला तर त्या त्या रोगांवरील चिकित्सा केल्यावांचून अपीनसाचा आजार वरा म्हणून होतच नाहीं.

प्रत्येक रोग्याची सर्वसाधारण प्रकृति सुधारण्यासाठीं त्यास चांगलें पौष्टिक अन्न दिलें पाहिजे, तसेंच त्यानें हवाशीर जागेंत राहून नेमानें व्यायाम घेतला पाहिजे. शक्य तर त्यानें थारे-पालटहि केला पाहिजे. आरंभापासूनच स्थानिक उपचाराबरो-बर पोटांत कॉडलिव्हर ऑईल, लोह, सोमल, कोयनेल इत्यादि शक्तिवर्धक औषधांचा उपयोग करावा. ह्याप्रमाणें उपचारांचा पाठलाग एकसारखा, पुष्कळ दिवस नव्हे, परंतु पुष्कळ महिने-पर्यंत करीत गेल्यास अपीनस हा त्रासदायक व घाणेरडा आजार वरा होण्याबद्दल निराश होण्याचें कांहींएक कारण नाहीं. परंतु, ह्याप्रमाणें उपचारांचा पाठलाग फारच थोड्या रोग्यांच्या हातून होतो, त्यामुळें अपीनस हा रोग कांहीं केल्या वरा होत नाहीं असाच लोकांचा घातुक समज होऊन बसला आहे.

[ भिषग्विलास ( पु. १४ ) पृ. ५८—६३. ]

**अपुष्प वनस्पतिः**—वनस्पतिशास्त्रांतील दोन मुख्य भा-गांपैकीं अपुष्पवनस्पति (Cryptogam) हा एक भाग होय. या भागांतील वनस्पतींत एकपेशीमय वनस्पतींपासून तों तहत पानें, खोड व मुळें हीं ज्यांत पूर्णावस्थेस पोंचलीं आहेत अशा वनस्पतींपर्यंत सर्व प्रकारच्या वनस्पती येतात. सपुष्प वन-स्पतींत व यांत जो एक मोठा भेद दिसून येतो तो हा कीं अपुष्प वनस्पती या जननपेशींपासून ( spores ) उत्पन्न होतात व सपुष्प बियांपासून होतात. सपुष्प वनस्पतींत सुद्धां जननपेशी तयार होतात, परंतु मूळच्या प्रमाणें नवीन झाडें उत्पन्न कर-ण्याचें सामर्थ्य त्यांत नसतें. ही जननपेशी रुजत घातल्यास तिच्यापासून नवीन झाड उत्पन्न व्हावयाचें नाहीं; तें बियां-पासूनच होईल. बीं हें अनेक पेशींचें मिळून झालेलें असतें व त्यांत अनेक पेशींचा एक गर्भ अगोदरच तयार झालेला असतो. जननपेशी ही एकपेशीमय असते, व अपुष्प वनस्पतींत ती मूळ वनस्पतींपासून सुटून जाते व नंतर तिच्यापासून अगदीं नवीन अशी वनस्पति निर्माण होते. यावरून अपुष्प वनस्प-तींना जननपेशीच्या वनस्पती व सपुष्प वनस्पतींनां बियांच्या वनस्पती अशींहि नांवें देतां येतील.

व र्गी क र णः—अपुष्प वनस्पतींचें वर्गीकरण वेगवेगळ्या प्रकारांनीं केलेलें आहे. पुढें दिलेलें वर्गीकरण ब्राऊन पद्धतीचें असून त्यांत ऐश्लर एङ्गलर, वेट्स्टाइन वगैरेचे फेरफार स्वी-कारले आहेत. या पद्धतीप्रमाणें अपुष्प वनस्पति ही वनस्पति-शास्त्रांतील खालची पायरी असून सपुष्प ही वरची पायरी आहे. अपुष्प वनस्पतींचे खालील मुख्य विभाग करतां येतात.

१ स्थाणुवर्ग, ( Thallophyta ) या भागांत पुष्कळ प्रकारच्या वनस्पती येतात. परंतु त्यांचा वानस्पतिक ( Vegetative ) भाग एक किंवा अनेक पेशींचा पण बहुधा पसरट व फांद्या फुटलेला असतो व याला स्थाणु असें म्हण-तात. उत्पादनक्रिया योगसंभव (Sexual) किंवा अयोगसं-भव ( Asexual ) अशा दोनहि तऱ्हेची असूं शकते, परंतु एकामागून एक अशा दोन्ही तऱ्हा नियमानें होत नाहींत.

२ लिंगकरंडकधारी ( Archigoniatae, ) या भागां-तील वनस्पतींच्या जीवनकथेंत हे दोनहि प्रकार असून दोन पिढ्या चांगल्या स्पष्ट दिसतात. अयोगसंभव अलिंगपिढी ( sporophyte ) पासून जननपेशी होतात. त्या जनन पेशीपासून योगसंभव लिंगपिढी ( Gamatophyte ) उत्पन्न होते. या पिढींत उत्पादक इंद्रियें येतात व त्यांतील नर व स्त्री या भागांच्या संयोगानें तयार झालेल्या जननपेशी-पासून पहिल्यासारखे जननपेशी उत्पन्न करणारें झाड तयार होतें. लिंगकरंडकधारीमध्यें दोन भाग आहेत. ( १ ) शैवाल वर्ग (Bryophyta). या भागांतील कांहीं वनस्पती पानांसारख्या पसरट असतात व कांहींत पानें व खोड चांगलीं वेगळीं दिसतात. या वनस्पतींनां खरीं मुळें नाहींत व त्यांच्या वाहिन्याहि जेव्हां असतील तेव्हां अगदीं साध्या असतात. अलिंग पिढी ही एका लहानशा फळासारख्या कवचीच्या भागाची असते व ती जवळ जवळ मूळ वनस्पतीवरच अवलं-बून रहाते. पण लिंग पिढी चांगली मोठी असून मुख्य वन-स्पती तीच दिसते. ( २ ) वाहिनीमय अपुष्प वर्ग (Pteridophyta ), या भागांतील वनस्पतींची लिंग पिढी लहान असून स्थाणुरूप ( Thallir ) असते. अलिंग पिढीमध्यें ( Sporophyte ) खोड, पानें व मुळें चांगलीं तयार झालेलीं असतात, व त्यांनां चांगल्या खऱ्या वाहिन्या असतात. या दृष्टीनें या वनस्पती सपुष्प वनस्पतींप्रमाणें असतात.

( १ ) स्था णु व र्ग ( Thallophyta ) याचे मुख्यतः पाण-केश ( Algae), अलिंब ( Fungus=कुरशी ) आणि शिला-वल्क ( Lichens ) असे तीन विभाग करतात. पाणकेशामधील

वनस्पतींत कांहीं रंगांचीं द्रव्यें, मुख्यतः हरिद्रव्य असतें. त्याच्या योगानें त्यांनां आपलें अन्न तयार करून घेतां येतें, व त्यासाठीं दुसऱ्यावर अवलंबून राहण्याची पाळी त्यांजवर येत नाहीं. बुरशीमधील वनस्पतींनां रंग नसतो, त्यांनां आपलें अन्न तयार करतां येत नाहीं, व त्यासाठीं त्यांनां दुसऱ्यावर अवलंबून रहावें लागतें, व त्या वांडगुळाप्रमाणें परान्नभक्षक होतात. हे भेद जरी त्यांच्या जीवित क्रमावर करतां आले तरी यांवरून त्यांच्या उत्पत्तीविषयीं कांहीं बोध होत नाहीं. शिलावल्क हीं वरील दोन वनस्पतींचीं मिळून झालेलीं असतात. त्यांतील पाणकेश हीं पाणकेशावरोवर, व बुरशी ही बुरशीवरोबर पहातां येतील, परंतु निरनिराळ्या शिलावल्कांमध्येंच चांगल्या तऱ्हेचें साम्य असल्यामुळें त्यांचा एक तिसरा निराळा भाग करतात. स्थाणुवर्गांतील सूक्ष्मजंतू ( Bacteria ) व नीलपाणकेश (Cyanophyceae) यांतील वनस्पती या सर्वांत साध्या आहेत. या दोनहि स्थाणुवर्गांमधील इतर वनस्पतींहून अगदीं भिन्न आहेत. पुच्छविशिष्ट ( Flagellata ) या भागांतील वनस्पतींनां पुष्कळदां अगदीं कनिष्ठ व साध्या प्राण्यावरोबर बसवितात. त्यांची एकंदर रहाणी वगैरे वनस्पतींसारखी आहे व प्राण्यांसारखीहि आहे. "कनिष्ठदर्जाच्या प्राण्यांचा उगम" असाहि त्यांचा विचार करतां येईल. बुरशीमधील कनिष्ठ वनस्पती(Mytomycetos) या त्यांच्यापासून बिनरंगाच्या वनस्पती झाल्या असाव्या. शैवाल तंतूच्या जातीहि यांच्याच पासून झाल्या असाव्या. कांडशरीरिका (Characeae) मात्र इतर सर्व स्थाणुवर्गांपेक्षां जास्त पुढें गेल्या असून त्यांची स्थाणुवर्गांमधील सर्वांत उच्च अवस्थेस पोंचलेल्यांत गणना करतात.

स्थाणुवर्गांमध्यें उत्पादन बहुधा असंयोगिक जननपेशीपासून ( Asexual spores ) होतें. या जननपेशी मात्र निरनिराळ्या वनस्पतींत निरनिराळ्या प्रकारांनीं तयार होतात. कांहींत कांहीं एका विशिष्ट प्रकारच्या पेशींचे बरेच भाग होऊन त्यांपासून जननपेशी होतात, या पेशींनां जननपेशीगुच्छ (Sporangium) असें म्हणतात. कांहींत स्थाणू (Thallus) च्या अगर दुसऱ्या पेशींचे तुकडे होतात अगर त्यांना एक प्रकारच्या कळ्या येतात, व या कळ्या पुढें जननपेशी बनतात. जेव्हां जननपेशीवर लहान लहान केसासारखे तंतू असतात तेव्हां ते हलून त्या पाण्यांत पोहत जातात. ज्यांना तंतू नसतात त्यांपैकीं ज्या पाण्यांत असतात त्या तशाच उघड्या असतात पण ज्या हवेंतून वावरणाऱ्या असतात त्यांना एक पेशीकवच येतें. योगसंभव ( Sexual ) उत्पादन देखील पुष्कळ ठिकाणीं आढळतें. त्यांतील अगदीं साधा प्रकार म्हणजे दोन संयोगी ( Sexual ) पेशी एकत्र होऊन त्यांच्यापासून एक पेशी तयार होणें व पेशीपासून नवीन वनस्पति उत्पन्न होणें. या पेशी कित्येकदां अगदीं सारख्या असतात. कांहीं ठिकाणीं एका पेशीला बारीक तंतू असतात. कित्येक ठिकाणीं एक पेशी अत्यंत लहान असून तिला तंतू असतात. या पेशीला नरपेशी ( Spermatozorid ) रेत म्हणतात. रेत रेतकरंडकांत ( Antheridia ) उत्पन्न होतें. दुसरी म्हणजे रजपेशी बरीच मोठी असते व ती रजकरंडक ( Arclugonium ) स्त्रीतत्त्वोत्पादक पेशीमध्यें उत्पन्न होते. स्थाणुवर्गांमध्यें कांहीं वनस्पतींत उत्पादन फक्त अयोगसंभव (Asexual) असतें, कांहींत फक्त योगसंभवच ( Sexual ) असतें, व कांहींत दोनहि तऱ्हांनीं होतें.

सूक्ष्म जंतुः--सूक्ष्मजंतू ( Bacteria ) हे त्यांच्या रूढ नांवावरून प्राणिवर्गांतील दिसतात तरी वस्तुतः ते एकपेशीमय, तंतूसारख्या अत्यंत सूक्ष्म अशा साध्या वनस्पति आहेत. त्यांच्यांत हरिद्रव्य नसल्यामुळें त्या परोपजीवी असतात. सर्व भूतलावर, पाण्यांत, जमीनींत, हवेंत, मृत आणि जिवंत प्राण्यांच्या शरीरांत सर्व ठिकाणीं या सांपडतात. यांच्या पेशीवर एक अत्यंत पातळ अशी त्वचा असते, व तिच्या आंत जीवद्रव्य असतें. या जीवद्रव्यांत कधीं कधीं एक किंवा दोन जडस्थानें ( Vacuoles ) असतात. त्यांत कांहीं कांहीं असे कण असतात कीं ते स्वतः जरी रंगहीन असले तरी रंगांत टाकिलें असतां त्यांच्यावर रंग चढतो. या कणांना कित्येक लोक केंद्र असें समजतात. सूक्ष्म जंतू हे या माहीत असलेल्या सर्व जिवंत सृष्टींत बहुधा सर्वांत लहान आहेत. ज्या गोल जाती आहेत त्यांच्यांतील सर्वांत लहान पेशींचा व्यास फक्त ०.०००८ मिलिमीटर म्हणजे ०.००००३ इंच असतो. क्षयरोगाचे सूक्ष्म जंतू हे लांवट आकाराचे असतात, त्यांचा साधारणतः आकार लांबी ०.००१५ ते ०.००४ मिलिमीटर व रुंदी ०.००१ मिलिमीटर असा असतो. यावरून ते किती लहान आहेत याची कांहींशी कल्पना येईल.

सर्वांत साध्या प्रकारचे सूक्ष्मजंतू या वाटोळ्या पेशी असतात. त्यांना गोलजंतू (Cocei) म्हणतात. लांवट काडीसारख्या आकारांना ऱ्हस्वजंतू किंवा यष्टिजंतू (Bactirium किंवा Bacillus) अशी संज्ञा आहे. ऱ्हस्वजंतूसारख्यांच पण किंचित् तांवड्या, कांहीं पीळ भरलेल्या तारेसारख्या कांहीं लांवच लांब धाग्यासारख्या अशा फिरून अनेक जाती आहेत. सूक्ष्मजंतूंत फांद्या वगैरे फुटत नाहींत. कांहींना फांद्या फुटलेल्या दिसतात पण त्या खऱ्या फांद्या नाहींत. एका पेशीच्या विभागून दोन पेशी झाल्यावर त्या दोनहि पेशी एकमेकींना चिकटलेल्याच राहूं शकतात. अशा रीतीनें त्यांची एक माळ बनते. पुष्कळदां अशा अनेक माळा एकत्र जमून त्यांच्या पेशीकवचापासून एक बुळबुळीत पदार्थ तयार होतो व त्या सरसासारख्या पदार्थांत त्या सर्व एक जुटीनें रहातात.

पुष्कळ सूक्ष्मजंतू सचेतन असतात, त्यांना बारीक बारीक जीवद्रव्याचे तंतू असतात. त्यांच्या योगानें ते पाण्यांत इकडे तिकडे पोहूं शकतात. जीवद्रव्याचे हे तंतू कांहीं सूक्ष्मजंतूंच्या सर्व भागावर असतात, कांहींच्या फक्त एका

टोंकावर असतात तर कांहींना फक्त एकच तंतु असतो. तंतूंचे झुपके इतके जवळ जवळ असतात कीं त्या सर्वांचा मिळून एकच जाड तंतु दिसतो. हे तंतू सूक्ष्मजंतूंना आंत ओढून घेतां येत नाहींत. पण ज्या वेळेस नको असतील तेव्हां अगर जननपेशी तयार होण्याच्या वेळीं हे झडून जातात.

वानस्पतिक (Vegetative) उत्पादन एका पेशीचे दोन तुकडे होऊन त्या पेशी स्वतंत्रपणानें मोठ्या वनून होतें. त्या पेशी मग फिरून दुसऱ्या पेशी उत्पन्न करितात. अयोगसंभव ( Asexual ) उत्पादन जननपेशीपासून होतें. प्रथम पेशींतील अगदीं आंतील जीवद्रव्याचा भाग इतर भागापासून सुटून त्याचा एक गोळा होतो व त्या गोळ्यावर एक जाड त्वचा येते. पेशींची बाहेरील त्वचा मग फुगते व आंतील जननपेशी तयार झाल्यावर फुटते. सर्व जातींत जननपेशी होत नाहींत.

जरी सर्व सूक्ष्मजंतूंची जीवनकथा अगदीं साध्या प्रकारची आहे, तरी त्यांच्यांतल्या वेगवेगळ्या जातींतील रहाणींत वराच फरक आहे. अन्न घेऊन त्यांपासून जे पदार्थ ते तयार करितात त्यांत तर फारच फरक आहे. वऱ्याच सूक्ष्मजंतूंना श्वासोच्छ्वासाकरितां प्राण-वायु लागतो, पण त्यांत अशा कांहीं जाती आहेत कीं त्या प्राणवायूचें अस्तित्व नसेल अशाच ठिकाणीं जोरानें वाढतात. कांहीं सूक्ष्मजंतूंच्या श्वासोच्छ्वासानें उष्णता उत्पन्न होते. दमट गवत, शेण किंवा दमट कापूस किंचित् गरम लागतात याचें कारण हेंच आहे.

कांहीं कांहीं सूक्ष्मजंतू कांहीं एक विशिष्ट काम करीत असतात. ज्या पाण्यांत गंधक विरघळलेला असतो अशा पाण्याच्या झऱ्यांत कांहीं सूक्ष्मजंतू सांपडतात त्यांचें नांव गंधकाचे सूक्ष्मजंतू. हे सूक्ष्मजंतू त्या पाण्यांतलें गंधक तेवढें घेऊन आपल्या शरीरांत सांठवून ठेवितात व शेवटीं त्याचें गंधकाम्ल तयार करितात. कांहीं लोहसूक्ष्मजंतू आहेत ते पाण्यांतलें लोखंड घेऊन लोखंडाचा एक रासायनिक पदार्थ आपल्या शरीरांत सांठवितात. दह्यांत एक प्रकारचे सूक्ष्मजंतू आहेत, त्यांचें काम दुग्धाम्ल (Lactic acid) नांवाचें अम्ल तयार करावयाचें. दुसऱ्या एक प्रकारचे आहेत त्यांचें काम नवनीताम्ल (Butyric acid) तयार करावयाचें. आणखी एक प्रकारचे सूक्ष्मजंतू शिरका (Acetic acid) तयार करतात. नवनीताम्ल तयार करणाऱ्या सूक्ष्म जंतूंना प्राणवायु नसावा लागतो. प्राणवायु न लागणारे दुसरे एक सूक्ष्मजंतू कागद, कापूस, वगैरे काष्ठक (सेल्यूलोज) पदार्थांपासून उज्ज व अनूप नांवाचे वायू तयार करितात. येथपर्यंत सांगितलेल्या जाती अर्धवट परोपजीवी आहेत. त्यांनां अर्धवट तयार केलेलें अन्न लागतें. तें अन्न चांगलें पचविण्यास योग्य करणें हें काम त्या करतात. पण अशा पुष्कळ जाती आहेत कीं त्या तेवढेंहि काम करीत नाहींत. त्यांनां अगदीं परिपक्व असें अन्न करून द्यावें लागतें. अशा जातींपैकीं मुख्य म्हणजे वनस्पतींवर पडणारे व प्राण्यांना होणारे रोग ज्या सूक्ष्मजंतूंपासून होतात त्या. हे सूक्ष्मजंतू प्राण्यांच्या रक्तांत जातात, त्यांवर आपली उपजीविका करतात, दुसरे अनेक सूक्ष्मजंतू उत्पन्न करितात व एक प्रकारचें द्रव्यहि उत्पन्न करितात. हें द्रव्यच प्राण्यांनां जाचतें. हें द्रव्य पुष्कळदां फार विषारी असतें व त्यामुळें नाना तऱ्हेचे रोग प्राण्यांनां होतात. संसर्गजन्य व सांथीचे वहुतेक रोग अशा सूक्ष्मजंतूंपासून होतात. क्षय, विषम, पटकी, पाळीचे ताप, प्लेग वगैरे रोग त्या त्या प्रकारच्या सूक्ष्मजंतूंपासून होतात.

जसे कांहीं सूक्ष्मजंतू भयंकर आहेत तसे प्राण्यांवर उपकार करणारे सूक्ष्मजंतूहि अनेक आहेत. कांहीं सूक्ष्मजंतू घाण नाहींशी करितात. अशा सूक्ष्मजंतूंची मदत घेऊनच गांवांतलें मोऱ्यांचें पाणी व इतर घाणी स्वच्छ करितात. वाटाणे, पावटे व त्यांच्या जातीच्या इतर कांहीं झाडांच्या मुळांत कांहीं गांठी सांपडतात. या गांठींत सूक्ष्मजंतू असतात. ते हवेंतील नत्र जो वायुरूपानें संचरत असतो व ज्याचा झाडांना कांहीं उपयोग होत नाहीं त्याचा कांहीं एका क्रियेनें रासायनिक पदार्थ तयार करितात. या रासायनिक पदार्थाचा झाडांना उत्तम खतासारखा उपयोग होतो, व अशा रीतीनें जमीनींतलें पोषक द्रव्य कमी न होतां वाढत जातें. दुसऱ्या अनेक तऱ्हेच्या सूक्ष्मजंतूंच्या गुणांवरून त्यांच्या विषयींचें अध्ययन फार झालें आहे, व त्यांचा हल्लीं उद्योगधंद्यांत फार मोठ्या प्रमाणावर उपयोगहि होत आहे.

( २ ) नी ल पा ण के श ( cyanophyceae ):— या वनस्पती एकपेशीमय अथवा तंतूसारख्या परंतु अगदीं साध्या व निळसर रंगाच्या असतात. यांच्या पेशीकवचांपासून एक प्रकारचा सरसासारखा चिकट पदार्थ निघतो, व त्यांत गुरफटलेल्या या वनस्पतींचे पुंजके कधीं कधीं सांपडतात. या वनस्पती पाण्यांत, दमट जमीनीवर, दगडावर अथवा झाडांच्या सालीवर सांपडतात. प्रत्येक पेशींत हरिद्रव्य असून एक नीलद्रव्य नांवाचें रंजित द्रव्य असतें व त्यावरूनच त्यांनां "नील पाणकेश" म्हणतात. उत्पादनक्रिया केवळ वानस्पतिक (Vegetative ) रीतीनें पेशीविभाग वनून होते. कांहीं जातींत जननपेशीहि आढळतात.

यांतील सर्वांत साध्या प्रकारच्या वनस्पती एकपेशीमय असून त्या दमट जमिनीवर, खडकावर अगर भिंतीवर सांपडतात. दोन दोन अगर चार चार पेशींचा पुंजकाहि पुष्कळदां सांपडतो. तंतुजातींतील साध्या वनस्पती वहुधा सर्व पाण्यांत व दमट जागीं सांपडतात. यांत पुष्कळ पेशी असतात पण त्या सर्व एकसारख्या असतात. तंतु मोडला तर त्याचे दोन्ही भाग वेगवेगळे होऊन दोन वनस्पती होतात. कांहीं जाती लांबट किंवा वाटोळ्या गोळ्यांच्या बनलेल्या असतात त्यांनां नॉस्टॉक ( Nostoc ) म्हणतात. त्यांतील एक किंवा अधिक पेशींत रंजितद्रव्य नसतें, बाकींच्यांत नील व हरिद्रव्यें असतात. या वनस्पती मोत्यांच्या सराप्रमाणें दिसतात. या पाण्यांत, दमट जागीं किंवा पाण्यावर तरंगणाऱ्या कांहीं वनस्पतींच्या पानांवर किंवा त्यांतील पोकळींत असतात.

(३) पुच्छविशिष्ट (Flagellata):—या वनस्पती मुख्यत्वेंकरून पाण्यांत असतात. त्या एकपेशीमय असून वेगवेगळ्या आकाराच्या असतात. त्यांची रहाणी वनस्पतींसारखी तशीच प्राण्यांसारखीहि असते. व त्यांना स्थाणुवर्गांतील एकपेशीमय व आदि प्राणी यांचा उगम असेंहि म्हणतां येईल.

त्यांना स्पष्ट असें पेशीकवच नसतें, व त्यांचा आकार त्यांना हवा तसा बदलतां येतो. प्रत्येक पेशीस एक किंवा अधिक तंतू असतात, त्यांच्या योगानें त्यांना गति मिळते. पेशींत एक केंद्र, एक जड स्थान, व कांहीं जातींत हिरवें किंवा पिवळें रंजितद्रव्य असतें. बहुधा एक तांबडा बिंदु पेशींत आढळतो, त्याला नेत्रबिंदु म्हणतात. कांहीं जातींत बिलकुल रंजितद्रव्यें नसतात, व कांहीं जातींना अन्न घन स्थितींतहि घेतां येतें. उत्पादन पेशीविभागानें होतें.

(४) कार्मिक (Myxonycetes):—या वनस्पती स्थाणुवर्गांतील कनिष्ठ दर्जाच्या भागांत मोडतात. यांचेंहि जीवन बरेंचसें प्राण्यांसारखें असल्यामुळें कित्येक प्राणिशास्त्रवेत्ते यांना प्राणिवर्गांत घालतात. यांच्या पुष्कळ जाती असून सर्व भूतलावर या सांपडतात.

जीवद्रव्याचा एक मोकळा गोळा व पुष्कळसे केंद्र यांचें मिळून या वनस्पतीचें शरीर होतें. यांच्यांत हरिद्रव्य बिलकुल नसतें. लांकडांत, जींत पुष्कळ कुजट घाण आहे अशा जमीनींत, पडलेल्या पानांवर आणि कुजट लांकडांवर या वनस्पती सांपडतात. यांना एक प्रकारची गति असून त्या पसरत पसरत पुढें जातात. शरीराचा एक भाग लांब करून पुढें नेतात व पाठीमागला भाग आंखडून पुढें पसरत जातात. कांहीं दिवसांनीं या शरीरापासून जननपेशी उत्पन्न होतात. प्रथम सबंध शरीराचे एक किंवा अधिक जननपेशी गुच्छ (sporangium) होतात. आंतील जीवद्रव्याचे मग पुष्कळ भाग होऊन त्यांपासून जननपेशी होतात. प्रत्येक जननपेशींत एक एक केंद्र असतो. जननपेशी पक्व झाल्यावर जननपेशीगुच्छ फुटतो व आंतील जननपेशी वाऱ्यावरोबर उडून जातात. योग्य ठिकाण सांपडल्यावरोबर त्यांपासून पुनः पहिल्यासारखी वनस्पति उगवते.

यांतील कांहीं जाती झाडांवर रोग पडतात त्यांपैकीं आहेत. एक जात झाडांच्या मुळांत शिरते, त्यांतील सर्व अन्न खाऊन टाकिते व अन्न संपल्यावर जननपेशी उत्पन्न करून ठेविते. दुसऱ्या एका जातीचें भक्ष्य कांहीं विशिष्ट सूक्ष्मजंतू आहे. या प्रकारचे सूक्ष्मजंतू या जातीवरोबर नेहमीं सांपडतात.

(५) पीत-पाणकेश (Peridineae).—या वनस्पती एकपेशीमय असून पुच्छविशिष्ट (Flagellata) सारख्या आहेत. या गोड्या पाण्यांत सांपडतात पण मुख्यत्वेंकरून समुद्रांत फार असतात. यांना दोन तंतू असतात. जीवद्रव्य, जडस्थान व केंद्र हीं प्रत्येक पेशींत असतात. पुष्कळ जातींत तांबूस व पिंवळीं रंजित द्रव्यें असतात. कांहींना रुंद पंखाप्रमाणें पसरट अवयव असतात. यांच्या योगानें त्यांना पाण्यांत तरंगतां येतें. कांहीं जातींत रंजित द्रव्याऐवजीं रंगहीन द्रव्यें असतात. या जाती परान्नभक्षक असून कांहींचा आयुष्यक्रम अगदीं प्राण्यांसारखा असतो. कांहीं समुद्रांतल्या जाती स्वयंप्रकाशी असतात, व रात्रीं त्यामुळें समुद्राचें पाणी चकाकतें. उत्पादन पेशीविभागानें होतें. कांहींत जननपेशीहि उत्पन्न होतात.

(६) संयोगी पाणकेश (Coniugataae):—या जातीच्या वनस्पती हिरव्या असून त्या गोड्या पाण्यांत सांपडतात. या एकपेशीमय किंवा तंतूसारख्या असतात. उत्पादन वानस्पतिक किंवा योगसंभवरीतीनें होतें. वानस्पतिक रीतीनें पेशीविभाग होऊन एका पेशीच्या दोन पेशी होतात व त्या स्वतंत्र रीतीनें राहूं लागतात. योगसंभव उत्पादनांत दोन पेशींतील लिंगांचा संयोग होऊन त्यांच्यापासून एक जननपेशी उत्पन्न होते व तिच्यापासून नवीन वनस्पति तयार होते.

एकपेशीमय जातींपैकीं डेस्मिड या वनस्पती गोड्या पाण्यांत सर्वत्र सांपडतात. या अनेक प्रकारच्या असून फार सुंदर दिसतात. कांहीं वाटोळ्या, कांहीं दोन अर्ध वर्तुळें एके ठिकाणीं चिकटविल्याप्रमाणें, कांहीं ताऱ्याप्रमाणें तर कांहीं चंद्रकोरीसारख्या असे अनेक आकार दृष्टीस पडतात. या पेशी स्वतंत्र एक एक राहूं शकतात किंवा कित्येक पेशी एकमेकांस चिकटून यांची एक रांग झालेली दृष्टीस पडते.

प्रत्येक पेशी अगदीं सारख्या अशा दोन भागांची झालेली असते, व ते भाग मध्यभागीं चिकटविल्यासारखे दिसतात. प्रत्येक अर्धांत एक किंवा अधिक हरिद्रव्याचे पट्टे असतात. त्यांतच कांहीं पिरनॉईडचे कणहि असतात. दोन्ही अर्धांच्या जोडावर मध्यभागीं केंद्र असतो. कित्येकांच्या पेशीत्वचेवर कांटे किंवा सुळे असतात कांहीं पेशींत दोन अर्धांचा जोड दिसत नाहीं (उदाहरणार्थ चंद्रकोरीसारख्या पेशी).

उत्पादनक्रियेंत प्रथम केंद्राचे दोन भाग होतात, मग पेशीचे बरोबर मध्यावर दोन भाग होतात. प्रत्येक भाग दुसरा एक भाग उत्पन्न करतो व दोन स्वतंत्र पेशी तयार होतात. योगसंभव रीतींत दोन पेशी जवळ जवळ येतात, त्यांच्यापासून एक चिकट पदार्थ निघतो त्यांत त्या गुरफटतात व मग दोन्ही पेशी त्यांच्या अर्धांच्या जोडावर फुटतात व त्यांतलें सर्व जीवद्रव्य बाहेर पडतें. तें जीवद्रव्य मग सर्व एके ठिकाणीं गोळा होतें व त्यापासून एक जननपेशी तयार होते. ही जननपेशी पुष्कळदां एका विशेष आकाराची दिसते. कारण तिच्यावर पुष्कळदां कांटे कांटे असतात. जननपेशीजवळच बहुधा रिकामे झालेले पेशींचे चार भाग दृष्टीस पडतात. पूर्वीच्या दोन पेशींचे केंद्र त्यांपासून झालेली जननपेशी रुजूं लागेपर्यंत एकत्र होत

नाहींत. त्यांपासून झालेला केंद्र मग पुन्हा विभाग पावतो व त्यापासून दोन मोठे व दोन लहान असे चार केंद्र होतात. जननपेशीपासून दोन पेशी होतात व प्रत्येकींत एक लहान व एक मोठा केंद्र जातो. कांहीं वेळानें धाकटा केंद्र नाश पावतो.

तंतुमय जाती पुष्कळ आहेत. शैवालतंतु व त्यांच्या अनेक जाती गोड्या पाण्यांत सांपडतात. नदींत किंवा तळ्यांत हिरवें शेवाळ पाण्यावर दिसतें. तें शेवाळ हाताला बुळबुळीत लागतें व निरखून पाहिलें असतां त्याचे तंतू स्पष्ट दिसतात. सूक्ष्मदर्शक यंत्रांतून प्रत्येक तंतु सांखळीसारखा अनेक पेशींचा झालेला दिसतो. या तंतूस शेंडा आणि मूळ असे वेगळे भाग स्पष्ट दिसत नाहींत, दोन्ही टोंकें सारखींच दिसतात. प्रत्येक पेशींत एक मोठा केंद्र व पुष्कळशीं रंजितद्रव्यशरीरें असतात. रंजित द्रव्यांचे हिरवे पट्टे फिरकीच्या मळसूत्राप्रमाणें आंत गुंडाळलेले असतात. या पट्ट्यांत मधून मधून कांहीं वाटोळे कण दिसतात, यांना पिरनॉइड कण म्हणतात. वानस्पतिक उत्पादन पेशीविभागानें होतें, किंवा एक तंतु तोडला तर दोन्ही भाग वेगवेगळ्या वनस्पती होतात व स्वतंत्र राहूं लागतात. योगसंभव उत्पादनांत दोन तंतू समोरासमोर अगदीं जवळ येतात. त्यांच्या पेशींच्या मध्यभागापासून नळ्यासारखे रस्ते उत्पन्न होऊन ते समोरच्या पेशीस जाऊन मिळतात. अशा रीतीनें नळ्यांनीं जखडलेल्या दोन तंतूंस शिडीचें रूप येतें. एका पेशींतील सर्व पेशीतत्त्वें मग या नळीवाटे दुसऱ्या पेशींत जातात, व त्या सर्वांचा मिळून एक गोळा होतो. यापासून एक जननपेशी होते व तिच्या पासून मग शैवालतंतु होतो. कित्येक जातींत समोरासमोर दोन तंतू न येतां एका तंतूतीलच शेजारच्या दोन पेशींत संयोग होतो व जननपेशी तयार होते. जननपेशी रुजल्यावर तींतून एक लांब पेशी बाहेर येते. या पेशीपासून पुढें पेशीविभागानें शैवाल तंतू होतात.

शैवाल तंतूंत संयोग होतांना एका पेशींतील पेशीतत्त्व दुसरींत जातें, तेथें त्याचा दुसऱ्या पेशीतत्त्वाशीं संयोग होऊन जननपेशी तयार होते व मग नवीन शैवालतंतु होतो. हा संयोग म्हणजे अर्थातच लिंगाचा संयोग—स्त्रीपुरुषसंयोग–आहे, परंतु यांतील स्त्रीतत्त्व कोणतें व पुरुषतत्त्व कोणतें हें मात्र ओळखतां येत नाहीं. अशा तत्त्वास "समान तत्त्वें" म्हणतात. समान तत्त्वांचा संयोग, हा उच्च प्रकारच्या स्पष्ट ओळखतां येणाऱ्या स्त्रीपुरुषतत्त्वांच्या संयोगाचा प्रारंभ आहे.

(७) द्यण्वी—(Diatoms):—या वनस्पती एकपेशीमय असतात. यांचे थवेचे थवे समुद्रांत आणि पाण्यांत नेहमीं सांपडतात. दमट जमीनीवरहि या रहातात.

या पेशी एक एक स्वतंत्र सांपडतात किंवा त्या सर्वांची एक वसाहत सांपडते. त्या पाण्यांत मोकळ्या संचार करीत असतात, किंवा एक सरसासारखा देंठ उत्पन्न करून त्यावर लागलेल्या असतात, कधीं कधीं या पेशी एकमेकींस चिकटून त्यांचा लांबच लांब पट्टा होतो. समुद्रांतील यांपैकीं एक जातीच्या वनस्पती सरसासारख्या एका स्थाणूमध्यें चिकटून बसतात.

पेशींचा आकार वेगवेगळया प्रकारचा असतो. तो बहुधा लांबट चौकोनी असतो; परंतु वाटोळा, लांबोळा, कडीसारखा, पाचरेसारखा, सरळ किंवा वांकडा असाहि असूं शकतो. पेशीत्वचेची रचना विशेष चमत्कारिक असते. पेशीत्वचा साबणाच्या पेटीसारखी दोन भागांची असते. एक भाग आंत असून दुसरा त्यावर झांकणासारखा ठेवलेला असतो. यावरून पेशी दोन प्रकारची असल्यासारखी दिसते. एका बाजूनें फक्त झांकणाच्या कडा दिसतात व वरून पाहिलें असतां सबंध झांकण दिसतें. पेशीत्वचेंत पुष्कळ भाग गारगोटींतील द्रव्याचा असतो त्यामुळें कितीहि आंच दिली तरी पेशीचा आकार व तीवरच्या रेघा जात नाहींत. पेशीत्वचेवर पुष्कळ आडव्या रेघा आणि भोंकें असतात. पेशींत मधोमध एक केंद्र आणि एकापासून चारापर्यंत मोठे किंवा पुष्कळ लहान रंजित द्रव्याचे कण जीवद्रव्यांत पसरलेले असतात. हे रंजित कण बहुधा चापट असून तांबूस पिंवळया अगर नारिंगी रंगाचे असतात. पिरनॉइडचे कणहि पुष्कळदां तींत असतात.

वानस्पतिक उत्पादन पेशीविभागानें होतें. पेशींचा विभाग नेहमीं त्यांच्या लांबीच्या बाजूनें होतो. प्रथम पेशींतील जीवद्रव्य वाढूं लागते, व जसजसें तें वाढत जातें तसतसें तें दोन्ही झांकणें हलके हलके बाजूस करून फुगूं लागतें. अखेर आंतील भाग इतका मोठा होतो कीं अनायासेंच पेशींची दोन्ही झांकणें बाजूस होतात. मग प्रत्येक अर्ध दुसरा एक अर्धभाग त्याच्या आंत बसेल अशा तऱ्हेनें उत्पन्न करतो व अशा रीतीनें दोन वनस्पती होतात. अर्थातच प्रत्येक वनस्पतीचे दोन्ही अर्धे भाग एकाच वयाचे नसतात. दर वेळेस अशा तऱ्हेनें विभागून व प्रत्येक वेळेस नवीन भाग आंतल्या बाजूस केल्यामुळें पेशी दर वेळेस थोडी थोडी आकारानें लहान होत जाते, व तिची त्वचा गारगोटीनें बरीचशी बनली असल्याकारणानें ती फुगलीहि जात नाहीं. तेव्हां सर्व वनस्पती दिवसेंदिवस लहान होत जातात. अशा तऱ्हेनें लहान होत होत एका ठराविक मुदतीपर्यंत गेल्यावर दोन पेशी जवळ जवळ येतात, त्यांतील जीवद्रव्याचे व केंद्रांचे दोन दोन विभाग होतात व दोन दोन विभागांचा संयोग होऊन दोन जननपेशी तयार होतात. या जननपेशी पूर्वीच्या पेशींच्या दुप्पट अगर तिप्पट मोठ्या होतात. व त्यांपासून पुनः द्यण्वी वनस्पती उत्पन्न होतात.

(८) द्वितंतुकी (Heterocontacae):—या वनस्पती एकपेशीमय अथवा तंतुमय असतात. एकपेशीमय वनस्पतींत त्या पेशीला दोन बारीक केंसासारखें तंतू असून त्यांपैकीं एक लांब व दुसरा आंखूड असतो; आणि एक केंद्र व २–६ पोपटी हिरव्या रंगाचीं रंजितद्रव्यें व एक जडस्थान

असतें. तंतुमय वनस्पतींचे शरीर तंतूंचें असतें. त्यांतहि केंद्र व हिरवीं रंजितद्रव्यें असतात. या तंतूंत विशेष असें आहे कीं त्यांची पेशीत्वचा दुहेरी असून त्या दोहों भागांत एक वलयाकृति मोकळी जागा असते. जननपेशींना दोन तंतू–एक आंखूड व एक लांब–असतात. कित्येक जातींत दोन समान लिंगतत्त्वें पेशींतून निघून संयोग पावतात व त्यांपासून उत्पादन होतें. वानस्पतिक उत्पादन पेशीविभागानें होतें.

(९) हरित् पाणकेश (Chlorophyceae):— या जातीच्या वनस्पतींचा विशेष म्हणजे त्यांचा शुद्ध हिरवा रंग होय. यांतील पुष्कळ जाती गोड्या पाण्यांत व दमट जागीं सांपडतात. समुद्रांतहि पुष्कळ जाती आहेत. यांच्यांत पुष्कळदां पिरनॉइड कण सांपडतात. यांत पिष्ठसत्त्व (starch) नेहमीं सांपडतें. कांहीं वनस्पती एकपेशीमय आहेत व कांहीं तंतुमय आहेत. तंतुमय जातींतहि कांहींना फांद्या फुटतात, इतरांना फुटत नाहींत.

एकपेशीमय जातींत प्रत्येक पेशीस बारीक बारीक केंसासारखे तंतू असतात. या तंतूंच्या योगानें त्या इतस्ततः फिरूं शकतात. प्रत्येक पेशींत एक एक केंद्र, जीवद्रव्य व हरिद्रव्य शरीरें असतात. यांतील कांहीं जातींत पेशी स्वतंत्रपणें संचार करितात व कांहींत दोन दोन चार चार एकत्र मिळून संघ करून रहातात. व्होलव्हाक्स नांवाच्या जातींत पुष्कळ पेशींचा एक पोकळ गोल बनतो व हा संघ एका वनस्पतीप्रमाणें वागतो. सर्व पेशींपासून तंतू निघालेले असतात. व त्यामुळें हा संघ पाण्यांत फिरतो. जेथें पाणी किंचित् हिरव्या रंगाचें दिसतें तेथें या वनस्पती सांपडतात. महत्कारी कांचेंतून पाहिलें असतां हे संघ टांचणीच्या डोक्या एवढ्या वाटोळ्या गोळ्यासारखे दिसतात. सूक्ष्मदर्शक यंत्रांतून पाहिलें असतां यांच्यांत पुष्कळशा पेशी आहेत असें दिसेल. यांत निरनिराळ्या पेशींचें जीवद्रव्य बारीक बारीक धाग्यांनीं एकमेकांस जोडलेलें असतें, व हरिद्रव्य पुष्कळ असतें. पेशीविभागानें, किंवा संघाचे तुकडे होऊन वानस्पतिक रीत्या अनेक नवीन वनस्पती उत्पन्न होतात. योगसंभव उत्पादनांत दोन तत्वांचा–रज व रेत यांचा–संयोग होऊन नवीन वनस्पति उत्पन्न होते. संघांत कांहीं विशिष्ट पेशी याच कामाला वाहिलेल्या असतात. कांहीं रेत उत्पन्न करितात. हें तत्त्व अगदीं सूक्ष्म, किंचित् लांबट आकाराचें, असून त्याला दोन केंसासारखे धागे असतात. कांहीं रज निर्माण करणाऱ्या पेशी असतात त्यांच्यापासून वाटोळ्या आकाराच्या रजपेशी होतात. या दोहोंचा संयोग संघाच्या मध्यभागच्या पोकळींत होऊन त्यापासून एक प्रकारची जननपेशी होते. बाहेरचा संघ मरून जातो, आंतील या पेशी बाहेर येतात व त्यांपासून नवीन वनस्पती उत्पन्न होतात.

एकपेशीमयांपैकीं दुसऱ्या कित्येक जातींत उत्पादन जवळ जवळ वरच्याप्रमाणें सांपडतें. परंतु कांहींत पेशींचे संघ वाटोळे नसून आडवे तिडवे असतात, अगर अजीवात संघच नसतात. कित्येकांत योगसंभव उत्पादनांतील दोन्ही तत्त्वें सारखींच–समानतत्त्वें–असून त्यांत स्त्री व पुरुष तत्त्वें वेगळीं ओळखतां येत नाहींत.

तंतुमय वनस्पतींत तीन मुख्य जाती आहेत. पहिल्या जातींपैकीं ऊर्णिका (ulothrix) ही वनस्पति तंतूंची झालेली आहे. दुसरी एक एंटेरोमॉर्फा (Enteromorpha) ही फितीप्रमाणें अगर पट्ट्याप्रमाणें रुंद व पातळ असते. यांना फांद्या फुटत नाहींत. ऊर्णिकेच्या तंतूंत पुष्कळ पेशी असतात. प्रत्येक पेशींत एक एक हरिद्रव्याचा पट्टा असतो. एका पेशीपासून एक अथवा पुष्कळ जननपेशी उत्पन्न होऊन त्यांच्यामुळें अयोगसंभव उत्पादन होतें. ह्या जननपेशींनां चार चार केंसासारखे तंतू असतात त्यांच्या योगानें त्यांस पोहतां येतें. योगसंभव रीतींत "समानतत्त्वांचा" संयोग होतो. हीं समानतत्त्वें जननपेशींप्रमाणेंच एका पेशीपासून उत्पन्न होतात, पण जननपेशींपेक्षां पुष्कळ असतात. प्रत्येक तत्त्वाला दोनदोन केंसासारखे तंतू असतात. एका वनस्पतींचीच दोन तत्त्वें संयोग पावत नाहींत. दोन वेगवेगळाल्या तंतूंचीं तत्त्वें संयोग पावतात व एक जननपेशी निर्माण होते. या पेशीपासून एक एकपेशीमय वनस्पति होते व ती जननपेशी उत्पन्न करते. या जननपेशींपासून पहिल्यासारख्या तंतूंची वाढ होते. ज्याप्रमाणें चार लहान तंतूंच्या जननपेशी उत्पन्न होतात तशाच चार अगर दोन तंतूंच्या पण अगदीं लहान, समानतत्त्वांसारख्या जननपेशीहि उत्पन्न होतात व कांहीं वेळानें त्यांपासून मूळच्यासारखी वनस्पति होते. उत्पादक इंद्रियांची अगर तत्त्वांची ही अपूर्णावस्था या वनस्पतींत विशेष आहे.

एलाडोफोरा (Eladophora) नांवाची तंतुमय वनस्पति मागील वनस्पतीपेक्षां थोडी भिन्न आहे. हिला फांद्या फुटतात. हिच्या प्रत्येक पेशींत पुष्कळ केंद्र असतात, व हिची हरिद्रव्यशरीरें पुष्कळ वाटोळ्या ठिपक्यांसारखीं दिसतात. हिच्या तंतूंची लांबी कधीं कधीं एक फूट भरते. दुसऱ्या जातींत न दिसणारी गोष्ट म्हणजे हिच्या टोंकाच्या पेशींत वर्धमान अग्र दिसतो. या वर्धमान अग्राजवळ एक टेंगुळासारखा फुगवटा येतो व तो वेगळा वाढूं लागून त्याच्यापासून फांदी निर्माण होते. असंयोगिक उत्पादनांत टोंकाजवळच्या पेशींत पुष्कळ जननपेशी उत्पन्न होतात व त्यांनां दोन दोन केंसासारखे तंतू असतात. या जननपेशी बाहेर पडून त्यांपासून नवीन वनस्पति तयार होते. योगसंभव उत्पादन ऊर्णिकेप्रमाणेंच समान तत्त्वांचा संयोग होऊन घडतें.

समुद्रांत सांपडणाऱ्या कांहीं जातींतील पेशींवर चुन्याचीं पुटें बसलेलीं असतात व त्यामुळें तीं पुष्कळदां पोंवळ्यासारखीं दिसतात. अशा कांहीं जातींत योगसंभव उत्पादन समान तत्त्वांचें नसून दोन, चांगल्या तऱ्हेनें ओळखतां येणाऱ्या स्त्री

व पुरुष तत्त्वांचा संयोग होऊन घडतें. सायफोनेल (Siphonales) या प्रकारांतील व्हॅचेरिया (Vaucheria) नांवाची जात गोड्या पाण्यांत व दमट जमिनीवर सांपडते. तिच्यांत ज्या जननपेशी तयार होतात त्या इतरांसारख्या सर्व पेशींत तयार होत नसून फक्त टोंकाच्या पेशींतच होतात. प्रथम टोंकाची पेशी फुगते व मग तिच्यांत एकच जननपेशी तयार होते. ती पेशी इतकी मोठी असते कीं, नुसत्या डोळ्यांनीं सुद्धां दिसते. या जातींतील योगसंभव उत्पादनहि निराळें आहे. प्रथम पेशीला दोन उंचवटे येतात व त्यांना मध्येंच पेशीकवच येऊन त्या मूळ पेशीपासून ते भिन्न होतात. ते उंचवटे मग वाढत जाऊन त्यांच्या दोन पेशी होतात. पैकीं एकींत पुष्कळ पुंस्तत्त्वें होतात व दुसरींत एकच स्त्रीतत्त्व होतें. आंत असलेल्या पेशीची तोंडाकडील त्वचा फुटून त्या पेशीला स्त्रीतत्त्वासमोरच एक खिडकीवजा मोकळी जागा होते. मग पुंस्तत्त्वाची पेशी फुटून तींतून पुंस्तत्त्वें बाहेर पडतात. व त्यांतील एक पुंस्तत्व खिडकींतून आंत जाऊन स्त्रीतत्त्वाशीं संयोग पावतें. या संयोगापासून एक जननपेशी तयार होते व तिच्यावर एक कवच येतें. या पेशीपासून मग पुढें नवीन वनस्पति उत्पन्न होते.

(१०) पिंगी (Phaeophyceae). तपकिरी रंगाच्या वनस्पतीः—ही जात हरित पाणकेशाप्रमाणेंच एकपेशीमय पुच्छविशिष्टा (Flagellata) पासून झाली असावी. या वनस्पतींच्या शरीरांची रचना हिरव्या वनस्पतींपेक्षां जरा उच्च दर्जाची असते. अपवादात्मक अशा कांहीं थोड्या वनस्पती सोडल्यास ही जात खाऱ्या पाण्यांत सांपडते असें म्हणण्यास हरकत नाहीं. समुद्रांतील जास्त थंड पाण्यांत या वनस्पतींची पूर्णावस्था झालेली दिसते. यांच्यांतील वेगवेगळ्या वनस्पतींच्या शरीरांत पुष्कळ वैचित्र्य आढळतें. सर्वांत साध्या प्रकारच्या वनस्पतींचीं शरीरें पेशींच्या एकापुढें एक राहून झालेल्या तंतूंचीं असतात. कांहींस फांद्या फुटतात, कांहींस फुटत नाहींत. कित्येकांचा स्थाणु अनेक पेशींचा व नळीसारखा पोकळ वाटोळा असतो व त्याला पुष्कळ फांद्या फुटलेल्या असतात. कांहींचा स्थाणु अनेकपेशीमय, चापट व पसरट असा असतो. अशा दोन्ही प्रकारांत वाढ एका अग्रस्थित वर्धमान पेशी (Apical Growing cell) नें होते. कांहीं वनस्पती वाटोळ्याहि असतात. पेशींत बहुधा एक केंद्र असतो. रंजित द्रव्य शरीरें बहुधा वाटोळीं किंवा वांकडीं तिकडीं असतात, त्यांत तपकिरी रंगीत द्रव्य असतें व त्यामुळें वनस्पतीस काळसर तपकिरी रंग येतो. चांगल्या पूर्णावस्थेस पोंचलेल्या वनस्पतींत शरीररचनेंत पुष्कळ सुधारणा झालेली दृष्टीस पडते. बाहेरचा पेशींचा थर नेहमीं बाह्य द्रव्यांचें सात्मीकरण करीत असतो, व त्याच्या आंतील थर हा कोठाराप्रमाणें सांठवून ठेवणारा थर होतो. दोन जातींत चाळणीसारख्या नलिकेप्रमाणें एक पेशीजाल आढळतें व तें बहुधा औजसद्रव्य (albumen) मिश्रित रस वाहून नेण्याचें काम करीत असावें.

समुद्रांत असणाऱ्या जाती आकारानें फार मोठ्या असतात. उत्तर समुद्रांत सांपडणाऱ्या लामिनेरिया (Laminaria) नांवाच्या वनस्पतीचा आकार चापट व पसरट पानासारखा असतो व त्याला एक देंठहि असतो. हें पान पुष्कळदां १० फूट लांब व त्याचा देंठ अर्धा इंच जाड असतो! दक्षिणध्रुव महासागरांत उगवणारी असलीच एक वनस्पति आहे. ती तळाशीं उगवते, तेथें एक जाळें करतें व तेथून तिच्या फांद्या वर पृष्ठभागावर येऊन पसरतात. या फांद्या २००–२२५ फूट लांब असतात! दक्षिणध्रुव महासागरांतील कांहीं जाती वृक्षासारख्या वाढतात. त्यांचें खोड मनुष्याच्या दंडाएवढें जाड असून त्या खूप उंच वाढतात. दुसऱ्या कांहीं जाती याहूनहि मोठ्या असतात. या सर्वांचें समुद्राच्या तळाशीं जमीनीवरच्या सारखेंच अरण्य होतें.

फ्यूकस (Fucus) नांवाची जात सर्व समुद्रांत सांपडते. मुंबईस आणि कोंकण पट्टींत समुद्र किनाऱ्यावर भरती बरोबर येऊन पडलेल्या अनेक वनस्पतींत ही नेहमीं सांपडते. तपकिरी तांबड्या रंगाची, साधारण जाड व जवळ जवळ एक इंच रुंद व चापट अशी ही वनस्पति असते. हिच्यावर पुष्कळदां फोड आल्याप्रमाणें किंचित् उंचवटे दिसतात. या फोडाखालीं चंबूप्रमाणें पोकळ जागा असून त्यांत उत्पादक इंद्रियें असतात. कांहीं जातींत एकाच पोकळींत पुरुष व स्त्री अशा दोन्ही जातींचीं इंद्रियें असतात. कांहींत फक्त एकएका जातींचीच व कांहीं जातींत तर एका वनस्पतीवर फक्त पुरुष व एकीवर फक्त स्त्री जातीचीं इंद्रियें आढळतात. या पोकळींत इंद्रियोत्पादक पेशींच्या आजूबाजूस कांहीं लांब केसांसारखे पेशींचे तंतू असतात. यांपैकीं कांहीं त्या पोकळीच्या तोंडांतून बाहेर झुपक्यासारखे येतात.

रेतकरंडक (Antheridium) लांबट असतात, व ते झुपक्या सारख्या एका लहान देंठावर येतात. ते फुटून यांतून पुष्कळशा रेतपेशी बाहेर येतात. या पेशी त्या वेळेस मूळ पेशीच्या आंतील आवरणांत गुंडाळलेल्या असतात. मग हेंहि आवरण फुटतें व पेशी मोकळ्या होऊन बाहेर पडतात. प्रत्येक पेशी लांबट आकाराची असून तिला दोन केंसासारखे तंतू असतात. हे तंतू सारख्या लांबीचे असतात. प्रत्येक पेशींत एक तांबडा बिंदु असतो. रजकरंडक (Archigonium) वाटोळा असतो. प्रत्येक करंडकांत ८ रजपेशी असतात. त्यांच्या भोंवतीं एक अतिशय पातळ वेष्टन असतें. पेशी फुटल्यावर तें पातळ वेष्टन फुटतें व रजपेशी बाहेर पडते. तिच्या भोंवतीं रेतपेशींचा एक मोठा घोळका जमतो व त्यांपैकीं एकाशीं ती संयोग पावते. पुढें तिजवर त्वचा येऊन ती तळाशीं जाते व मग यथाकालानें तिजपासून नवीन वनस्पति तयार होते. कांहीं फ्यूकसच्या जातींत रजपेशी ८ नसून चार, दोन किंवा एकच असते. अशा वेळेस प्रथम त्यांत ८ पेशी असून त्यांतील चार, सहा किंवा सात नाश पावतात व बाकीच्या चांगल्या रहातात.

या जातींतील पुष्कळ वनस्पती फार उपयोगाच्या आहेत. लामिनेरिया व फ्यूकस यांपैकीं कांहींच्या राखेपासून अद ( Iodine ) नांवाचा एक पदार्थ निघतो. हा औषधांत व रसायन शास्त्रांत फार लागतो. दुसऱ्याहि कांहीं जाती औषधी आहेत. कांहींचा उपयोग चिनी व जपानी लोक खाण्याकडे करितात.

( ११ ) ता म्र व न स्प ती (Rhodophyceae ):— या वनस्पतीसुद्धां समुद्रांत सांपडतात. यांचे आकारहि पुष्कळ प्रकारचे आहेत. एक वनस्पति अगदीं साध्या म्हणजे तंतूप्रमाणें पेशींची रांग असते. ही बहुधा फितीप्रमाणें रुंद पण चापट व बऱ्याच फांद्या फुटलेली अशी वनस्पति दिसते. कांहीं अगदीं पानासारख्या असतात. त्यांना देंठ, मधल्या शिरा वगैरे सर्व कांहीं असतें. या सर्व जातींना मुळांसारखे कांहीं तंतू असतात. ते जमीनींत घुसून वरच्या भागांस घट्ट धरून ठेवितात. कांहीं वनस्पतींत चुन्याचा थर बसून त्या पोंवळयाप्रमाणें दिसतात. यांत रंजितद्रव्य तांबडें असतें म्हणून यांचा रंग तांबडा किंवा तांबूस तपकिरी असतो. पेशींत एक किंवा अधिकहि केंद्र असूं शकतात.

अयोगसंभव उत्पादन इतर जातींप्रमाणें जननपेशींपासून होतें. योगसंभव उत्पादन मात्र इतरांपेक्षां बरेंच निराळें आहे. रेतकरंडकांत फक्त एकच रेतपेशी उत्पन्न होते. ती वाटोळी असून तिला तंतू नसतात. व त्यामुळें तिला चलनवलन नसतें. पाण्याच्या प्रवाहाबरोबरच तिला रजपेशीकडे जावें लागतें. रजकरंडक लांबट असून त्याचा खालचा भाग एखाद्या चंबूसारखा फुगीर असतो. यांत रजपेशी असते. वरचा भाग रेतास पकडण्यासाठीं असतो. रेत जवळ येतांच वरच्या भागाचें तोंड फुटतें व रेत आंत येतें. मग त्यांतील द्रव्य रजपेशीशीं संयोग पावतें. यांच्यापासून एकदम नवीन वनस्पति उत्पन्न होत नाहीं. यांच्या पासून प्रथम कांहीं तंतू तेथेंच उत्पन्न होतात. या तंतूंवर पुष्कळ जननपेशी येतात. या जननपेशींपासून दुसरे तंतू होतात व या दुसऱ्या तंतूंपासून नवीन वनस्पति होते. अशा प्रकारें एका वनस्पतीपासून दुसरीपर्यंत स्पष्ट दोन पिढया होतात.

या जातींतील वनस्पतीपासून एक घट्ट पण ओलसर डिंकासारखा पदार्थ करितात व तो औषधांत उपयोगी पडतो. शिवाय त्यापासून " ॲगर " नांवाचा एक पदार्थ करितात. तो खाण्याच्या व इतर पुष्कळ उपयोगीं येतो.

( १२ ) अ वि भा जि ता लिं ब ( Phycomycetes ):—अलिंब ( Fungi ) वर्गांतील हा एक प्रकार होय. या वनस्पती फार लहान असून त्या परोपजीवी आहेत. प्राणिज किंवा वनस्पतिजन्य घाणींवर किंवा मोठ्या प्राण्यांच्या आणि वनस्पतींच्या शरीरांवर या उगवतात. यांचा स्थाणु पुष्कळ गुंतागुंतीच्या तंतूंचा झालेला असतो. यांत मध्यें पेशीत्वचा येऊन त्याचे वेगवेगळे भाग होत नाहींत. फक्त उत्पादक इंद्रियें येण्याच्या वेळीं मात्र भाग होतात, व त्यांचीं तीं इंद्रियें वनतात. जीवद्रव्य सर्व तंतूभर असतें. त्यांत अतिशय लहान लहान असे पुष्कळ केंद्र असतात, पण रंजित द्रव्यशरीरें मात्र कोठेंहि दिसत नाहींत. म्हणून या वनस्पती रंगहीन असतात.

अयोगसंभव उत्पादन जननपेशींपासून होतें. प्रथम एका पेशींतील सर्व जीवद्रव्य विभागलें जातें व त्यापासून पुष्कळशा जननपेशी उत्पन्न होतात. ज्या जाती पाण्यांत असतात त्यांच्या जननपेशींना एक किंवा दोन केंसासारखे तंतू असतात. यांच्या योगानें त्यांना पोहतां येतें. ज्या जमीनीवर हवेंत असतात त्यांना एक पेशीकवच येतें. या वाऱ्यानें उडून इष्ट स्थळीं पडतांच त्यांपासून नवीन वनस्पति तयार होते. योगसंभव उत्पादनांत दोन रीती आहेत. कांहीं जातींत रेतकरंडकापासून एक नळी निघते व ती रजकरंडकास जाऊन मिळते. या नळीवाटे रेतांतील द्रव्य रजाशीं मिळतें व त्यांपासून एक जननपेशी तयार होते. फक्त एकाच वनस्पतींत रेत मोकळेंच बाहेर पडतें. दुसरी रीति म्हणजे दोन समान तत्त्वांचा संयोग व त्यापासून जननपेशीची उत्पत्ति.

कोबी, नवलकोल, बटाटा वगैरेंवर जो रोग पडतो तो याच जातींतील वनस्पतींचा होय. यांच्या स्थाणूं( Thallus ) तील तंतू पानांच्या त्वचारंध्रां( Stoma )तून आंत शिरतात व आंत आपलें जाळें पसरतात. बाहेर आलेले तंतू वर जाऊन त्यांवर जननपेशी येतात. या जननपेशी फार झपाट्यानें वाढतात व पुष्कळ येतात. त्या वाऱ्यावरोबर उडून जातात यामुळें हा रोग फार फैलावतो.

शेणावर, दमट भाकरीवर किंवा दुसऱ्या कोणत्याहि उघड्या ठेवलेल्या दमट असलेल्या खाण्याच्या पदार्थांवर जी बुरशी येते तीहि याच जातीची होय. ही मागल्या वनस्पतींहून पुष्कळच मोठी असते. कांहीं दिवसांनीं ही काळी पडत चाललेली दिसते. महत्कारी भिंगांतून ही पाहिली असतां तिची रचना स्पष्ट दिसते. कांहीं तंतू आडवे तिडवे पसरलेले असून कांहीं त्या पदार्थांच्या आंत घुसलेले दिसतात, व कांहीं वर उभे राहिलेले असतात. वर उभे राहिलेल्यापैकीं पुष्कळांच्या शेंड्यास एक एक वाटोळी गोळी आलेली दिसते. हीच जननपेशी उत्पादन करणारी पेशी होय. हिच्यांतील जीवद्रव्य विभागून विभागून त्यापासून आंत जननपेशी चांगल्या तयार झाल्यावर वरच्या पेशीचें कवच फुटतें व जननपेशी बाहेर पडतात. जननपेशी ज्या पेशींत असतात त्या हातास लहान लहान कणाप्रमाणें लागतात. व नुसत्या डोळ्यांसहि दिसतात. कित्येक वेळां या अयोगसंभव रीतिऐवजीं योगसंभव उत्पादन होतें. अशा वेळेस मूळ तंतूस बाजूनें दोन फांद्या फुटतात. या दोन तंतूंचा आकार किंचितसा मल्लांच्या जोडीसारखा असतो. त्या जवळ जवळ येऊन त्यांचीं टोंकें एकमेकांस चिकटतात. मग त्या चिकटलेल्या भागापासून जवळच दोनहि तंतूंत दोन त्वचा येतात. व त्या योगानें सबंध तंतूंपासून हे दोन लहान लहान भाग वेगळे होतात, चिकटलेल्या भागाची त्वचा फुटून

या दोन भागांतील द्रव्यें संयोग पावतात. मग त्यावर एक खडबडीत कांटेरी त्वचा येते व त्याची एक जननपेशी तयार होते. या नवीन जननपेशीपासून नवीन वनस्पती उत्पन्न होतात व त्यांपासून पुन्हा असंयोगिक रीतीनें जननपेशी उत्पन्न होतात. या जाती मोठ्या वनस्पतींवर रोग म्हणून उद्भवतात तरी त्यांची यावद्दलची माहिती "पिकांचे रोग" या सदरांत पहावी.

(१३) विभाजितालिंव (Eumycetes).— अलिंव वर्गांतील हा दुसरा प्रकार होय. यांतील वनस्पतींचें शरीरहि अविभाजितालिंवासारखेंच तंतूंचें असतें. पण यांच्यांतील तंतूंत पेशीत्वचा चांगल्या वाढल्या असल्यामुळें त्यांचे भाग झालेले असतात. पेशीत्वचा पातळ असते. यांतहि रंजितद्रव्यें नसतात. तंतू एकमेकांत गुरफटलेले असतात तरी त्यांचा एकजीव झालेला नसतो. उच्च दर्जाच्या अलिंवामध्यें मात्र पुष्कळ फांद्या फुटलेले तंतू एकत्र होऊन त्यांचा एक गोळा होतो व एक कांहींसें समपरिमाण पेशीजाल (Parenchymatons Tissue) तयार होतें. यांतील दोन पोटभेद यांच्या अयोगसंभव उत्पादनावरून ओळखतां येतात. पहिल्यांत एक मुद्गलाकार पेशी असते व तिच्यांत जननपेशींची एक ठराविक संख्या, वहुधा आठ, असते. दुसऱ्या पोटभेदांत वेगवेगळ्या आकारांच्या चार पेशींच्या एका भागावर किंवा एकपेशीमय एका भागावर जननपेशींची एक ठराविक संख्या, वहुधा चार, असते. या दुसऱ्या जननपेशी त्या भागावर कलीकांसारख्या येतात.

पोटभेद पहिलाः—यांत संयोगिक इंद्रियें असतात. रजाचा रेताशीं संयोग झाल्यावर त्यांपासून होणारी जननपेशी मूळ वनस्पतीपासून सुटून न जातां तेथेंच रहाते व तिच्यापासून तेथेंच तंतू उत्पन्न होतात व त्यांना अयोगसंभव जननपेशी येतात. हे तंतू व पूर्वीचे तंतू मिळून कधीं कधीं एक फळासारखा पदार्थ तयार होतो. प्रथम तंतूंपासून संयोगिक इंद्रियें उत्पन्न होणें ही लिंग पिढी (Gamatophyte), व नंतर यांच्या संयोगापासून झालेल्या जननपेशींतून तंतू उत्पन्न होऊन त्यांनां अयोगसंभव रीतीनें जननपेशी येणें ही अलिंगपिढी (Sporophyte), अशा दोनहि पिढ्या या वनस्पतींत होतात. या वावतींत व यांच्या संयोगाच्या वावतींत ही जात तांवड्या वनस्पतीं (Rhodophyceae) सारखी आहे.

अयोगसंभव उत्पादनांत एका पेशींतील केंद्राचे भाग होत होत त्यांपासून आठ निरनिराळे भाग होतात व त्यांच्या जननपेशी होतात. या वहुधा एकापुढें एक अशा लांव एका पेशींत असतात. या पेशीचें टोंक फुटून त्या बाहेर येतात व वाऱ्यावरोवर उडून जातात. पावसाळ्यांत बुटांवर, जोड्यावर किंवा लांकडावर निळसर हिरव्या किंवा पिवळ्या रंगाची एक बुरशी येते ती याच जातीच्या एका वनस्पतीची होय. या फार लहान असतात. एका प्रकारची अशीच एक बुरशी कांहीं धान्यांवर येते. ही फार औषधी आहे. हिच्या पासून अरगॉट (Ergot) नांवाचें शीघ्रप्रसूतिकर विषारी औषध काढितात.

याच जातींत किण्व (yeast) नांवाच्या वनस्पतीचा समावेश करतात. ही वनस्पति एक पेशीमय आहे. हिचा आकार वाटोळा किंवा लांवट वाटोळा असतो. प्रत्येक पेशींत एक एक केंद्र असतो. हिचें उत्पादन बहुधा वानस्पतिक रीत्याच होतें. पेशीला प्रथम एक कळीसारखी फुगवटी येते व ती वाढत जाऊन तिची एक स्वतंत्र पेशी होते. अशा अनेक पेशी एकमेकींस चिकटलेल्याच रहातात व त्यांची एक सांखळी तयार होते. ज्या ठिकाणीं या रहातात तेथील पोषक द्रव्य संपत आलें म्हणजे त्यांपासून जननपेशी उत्पन्न होतात. या वनस्पती साखरेवर रहातात व तिजपासून मद्य व कर्वद्विप्राणिद् नांवाचा वायु तयार करतात. द्राक्षांवर यांच्या जननपेशी असतात म्हणून द्राक्षांचा रस काढून ठेविला असतां तो आंवतो व त्यापासून मद्य होतें. ताडाचा रस—नीरा—प्रथम अगदीं गोड असतो, व त्यापासून गूळ आणि सरवतहि काढतात. पण तोच रस कांहीं वेळानें आंवून त्यापासून ताडी नांवाची दारू होते. ही दारू तयार करण्यास किण्वच कारण होतात. सर्व प्रकारची पिण्याची दारू किण्वापासून तयार होते यामुळें त्यांचा हल्लीं उद्योगधंद्यांत फार मोठ्या प्रमाणावर उपयोग होत आहे.

पोटभेद दुसराः—यांत योगसंभव उत्पादन मुळींच नसतें. फक्त एकाच वनस्पतींत हीं इंद्रियें अथवा या इंद्रियांचे अवशेष सांपडतात. पण या वनस्पतींत सुद्धां या इंद्रियांची संयोगशक्ति नष्ट झालेली असते. यांचेहि तंतू असतात व त्यांना वहुधा चारचार जननपेशी येतात. या जननपेशींपासून फिरून तंतू उत्पन्न होतात. गहूं, मका वगैरे धान्यांवर जो तांवडा रोग पडतो तो याचपैकीं. यांच्या योगानें पिकांचें फार नुकसान होतें. छत्री किंवा भूछत्र नांवाची वनस्पति याच जातीची आहे. हिचे अनेक प्रकार असून ते सर्व कुजणाऱ्या पदार्थांवर अथवा लांकडावर उगवतात. त्यांना एक देंठ असतो व त्यावर छत्रीसारखा पसरट अथवा वाटोळा गोळ्यासारखा एक भाग असतो. हा देंठ लांव लांव धाग्यासारख्या पेशींचा झालेला असतो. वरच्या मोठ्या भागांत जननपेशी येतात. त्या भागाच्या खालच्या भागावर झालरीसारखे पुष्कळ पापुद्रे असतात. या पापुद्र्यांवर पुष्कळ अतिसूक्ष्म तंतू येतात, व कांहींवर जननपेशी येतात. कांहीं जाती फार विषारी आहेत तर कित्येकांची गणना चांगल्या चवदार भाज्यांत होते! पुष्कळ लोक याची भाजी करून खातात. याहि जातींकरितां "पिकांचे रोग" हा लेख पहावा.

(१४) शिलावल्क (Lichens):—या वनस्पती दोन वनस्पती शेजारींशेजारीं राहून एकमेकींच्या मदतीनें झालेल्या संयुक्त वनस्पती आहेत. उच्च दर्जाचीं अलिंवें (मुख्यतः विभा-

जितालिंबांच्या पहिल्या पोटभागांतील ) व नील पाणकेश ( Cyanophyceae ) आणि हरित पाणकेश (Chlorophyceae ) यांच्या अगदीं निकट सहवासानें दोघांचा मिळून एक स्थाणु होतो व यालाच शिलावल्क असें म्हणतात. खरें पाहिलें असतां अलिंबें आणि हरित् किंवा नील पाणकेश ( Algae ) या दोहोंचा त्या त्या भागांतच विचार करावयाला पाहिजे. पण निरनिराळ्या शिलावल्कांमध्यें त्यांच्या त्यांच्यांतच इतका सारखेपणा आहे कीं त्यांची एक: वेगळीच जात केली असतां बरें.

प्रथम कांहीं पाणकेशांच्या (Algae) पेशींभोंवतीं पुष्कळसे बुरशीचे म्ह० अलिंबांचे तंतू जमतात व त्यांनां पूर्णपणें गुरफटून टाकितात. बुरशीला या पाणकेशांच्या पेशींपासून सेंद्रियद्रव्यें मिळतात. व त्यांवर त्यांची उपजीविका चालते. कित्येकदां तर हे तंतू पाणकेशांच्या पेशींतहि शिरतात व त्यांतील द्रव्य खाऊन टाकितात. उलटपक्षीं पाणकेशाच्या पेशींनां या अलिंबांपासून पाणी, निरिंद्रिय पदार्थ व कांहीं सेंद्रिय पदार्थहि मिळतात. अशा रीतीनें ही जोडी एकमेकांच्या मदतीनें आपआपला आयुष्यक्रम चालविते.

यांच्या स्थाणूंचे पुष्कळ प्रकार आहेत. अगदीं साध्या प्रकारचे म्हणजे दोन प्रकारच्या तंतूंचा मिळून एक संयुक्त तंतु होणारे तंतू दमट जागेवर काळसर रंगाचा किंचित् थर दिसतो, त्यांत सांपडतात. कांहीं पानासारखे असतात. यांच्या पेशींवर सरसासारखा एक चिकट व चिवट पदार्थ असतो. वरील दोन्ही प्रकारांत दोन्ही वनस्पतींचा मिलाफ चांगल्या तऱ्हेचा झालेला असतो. दुसऱ्या कांहीं प्रकारांत हा मिलाफ इतका चांगला नसतो, त्यांनां मिश्रस्थाणू म्हणतात. त्यांत अगदीं मध्यभागीं पाणकेशाच्या पेशी असतात. त्यांच्याभोंवतीं बुरशीचे तंतू विरळ विरळ असतात. याच्या वर आणि खालीं बुरशीचे जाड जाड थर असतात. हे दोन्ही बाहेरचे थर चांगले जाड असून झाडाच्या सालीसारखे असतात. अशा मिश्रस्थाणूंच्या शिलावल्काचे तीन विभाग करितात. पहिला पापुद्र्यासारखा. याचे थर दगडांवर सांपडतात. दुसरे पानांसारखे. यांचा आकार चापट पानासारखा असून हे फार सैल रीतीनें दगडाला चिकटलेले असतात. यांच्या खालच्या बाजूस बारीक तंतू येतात त्यांच्या योगानें हे दगड किंवा झाडांच्या साली यांनां चिकटतात. तिसरा प्रकार म्हणजे फलासारखा. हे तंतुमय किंवा फितीसारखे असतात. यांच्या स्थाणूंचें एक लहानसें झुडुप होतें; व तें खालीं बुंध्यासच फक्त दगडावर किंवा झाडावर चिकटतें व बाकीचें हवेंत मोकळें असतें किंवा जमीनीवर पसरतें.

यांच्यांतील बुरशीला जननपेशी येतात पण त्या नुसत्याच बहुधा उगवत नाहींत. त्यांच्या जोडीला जर त्यांनां लागणाऱ्या पाणकेशाच्या पेशी नसतील तर त्या उगवत नाहींत. कांहीं कांहीं मात्र नुसत्या उगवूं शकतात. शिलावल्कांचें वानस्पतिक उत्पादन होतें. स्थाणूचे तुकडे होऊन ते मोकळे होतात व प्रत्येक तुकडा वाढूं लागून स्वतःसाठीं तंतू उत्पन्न करून दगडास चिकटतो. मिश्रस्थाणूंत बहुधा पाणकेशांच्या पेशींभोंवतीं तंतूंचें एक घट्ट वेष्टण होऊन एक गोळा बनतो. मग स्थाणु फुटतो व हे गोळे बाहेर पडून जाऊन वाऱ्यावरोबर उडून जाऊन नवीन शिलावल्क उत्पन्न होतात. फलासारखा भाग फक्त बुरशीचा असतो. पाणकेश फक्त वानस्पतिक रीतीनेंच उगवतात. कांहीं बुरशींवर फलासारखे पदार्थ येऊन त्यांवर अगदीं नेहमींप्रमाणें तंतू येतात. विभाजितालिंबा ( Eumycetes ) च्या पहिल्या पोटभेदांतील जे तंतू शिलावल्कामध्यें असतात. त्यांचें योगसंभव उत्पादन सुद्धां होतें. दुसऱ्या पोटभेदाचींहि कांहीं शिलावल्कें असतात. मसाल्यांत घालतात तें दगडफूल हें एक शिलावल्कच आहे. लिटमस म्हणून एक रंग रसायनशास्त्रांत लागतो तो एका शिलावल्कापासून काढतात.

( १५ ) कां ड श री रि का ( characeae ):—स्थाणुवर्गांतील ही शेवटची जात होय. या वर्गांतील या फार उच्च दर्जाच्या वनस्पती असून अगदीं हलक्या व उच्च अशा दोन्ही वनस्पतींपेक्षां फारच भिन्न आहेत. या गोड्या पाण्यांत सांपडतात. यांचा रंग हिरवा असून या काड्यांसारख्या दिसतात. मध्यभागीं एक खोड असून त्याला जवळ जवळ सारख्या अंतरावर गवतासारखीं कांडीं व पेरीं असतात. प्रत्येक कांडाग्रावर वर्तुळाकार सर्व बाजूला मूळ खोडाप्रमाणेंच परंतु बारीक बारीक काड्यांसारख्या फांद्या फुटतात. या आडव्या फांद्यांनांहि कधीं कधीं आणखी फांद्या फुटतात. फांदी व खोड यांच्या मधील बगलेंत अक्षकोणांत आणखीहि एखादि फांदी फुटते. ही फांदी खोडाप्रमाणेंच चांगली लांब होते. बुंध्याजवळ कांडाग्रापासून निघालेल्या तंतूंनीं ही वनस्पति जमीनींत गट्ट रुजून रहाते. ही वनस्पति कित्येकदां एक फुटापेक्षांहि लांब वाढते. हिची लांबी एका अग्रस्थित वर्धमान पेशीनें वाढते या पेशीचे विभाग पडून खालच्याचे आणखी विभाग होत होत फांदी वाढते व वरचा भाग पूर्वीएवढा मोठा होऊन त्याचे फिरून दोन भाग होतात. त्यांतील वरचा फिरून वाढतो व मग त्याचे दोन भाग होतात. कांडीं वांबूंसारखीं पोकळ असतात. त्या आंतील पोकळीबाहेरच्या भागांतील पेशींत एक एक केंद्र असतो व पुष्कळ वाटोळीं हरिद्रव्यशरीरें असतात.

जननपेशींपासून अयोगसंभव उत्पादन कांडशरीरिकांत मुळींच नसतें. योगसंभव उत्पादन रेत व रज यांच्या संयोगानें होतें. रेतकरंडक वाटोळे व तांबड्या रंगाचे असून नुसत्या डोळ्यांनीं दिसतात. रजकरंडक लांबट आकाराचे असतात. या दोन्ही प्रकारचे करंडक मुख्य खोडाला अथवा त्याच्या फांद्यांना फुटलेल्या बारीक बारीक फांद्यांच्या कांडाग्रावर येतात. कांहीं कांहीं वनस्पतींत एकींवर फक्त रेतपेशीच व दुसरीवर फक्त रजपेशीच सांपडतात. बाकी बहुतेकांत रेत व रज हीं दोन्हीहि एकाच वनस्पतीवर सांपडतात.

रेतकरंडक प्रथम एका पेशीपासून होतो. त्या एका पेशीचे आठ भाग होतात. प्रत्येक भागाचे फिरून तीन तीन भाग होतात. मग बाहेरील आठ पेशींचा मिळून बाहेरचा पोकळ गोळा तयार होतो, व बाकीच्यांपासून गोळ्याच्या आठी भागांना आंतून दांडे तयार होतात. प्रत्येक दांड्याला नंतर आणखी दांडे येतात, व त्या दांड्यांना लांब लांब फितीप्रमाणें पिशव्या येतात. या पिशव्यांत रेतपेशी असतात. रेतपेशी बूच काढण्याच्या स्क्रूसारखी पिळदार असून तिला दोन केसांसारखे तंतू असतात.

रजपेशी प्रथम मोकळी असते पण लवकरच तिच्यावर पांच पेशींचें एक वेष्टण येतें. या पेशी तिच्या भोंवतीं गुंडाळून त्यांचीं टोंकें शेवटीं तुऱ्याप्रमाणें वर येतात. या सर्व टोंकांच्या मधील छिद्रांतून रेत आंत जातें व रजाशीं संयोग पावतें. रजपेशींत पुष्कळसे तेलाचे थेंब व पिष्ठसत्त्व ( starch ) असतें. रजाचा संयोग झाल्यावर त्यावर एक जाड त्वचा येते व तें मूळ वनस्पतीपासून खालीं गळून पडतें. त्यापासून मग कांहीं तंतू उत्पन्न होतात. व नंतर त्या तंतूंपासून खालीं मुळांसारखे तंतू व वर मुख्य फांदी तयार होऊन त्यास कांडशरीरिकेचें पूर्ण रूप येतें.

यूरोपांत एक वनस्पति आहे ती फक्त रजपेशीच निर्माण करते. हिच्यांत संयोग न होतां आपोआपच रजाची गर्भधारणा होते व तिच्यापासून नवीन वनस्पति होते. कांहीं वनस्पतींत खालच्या बाजूस लहान लहान कांद्यासारखे पदार्थ तयार होतात. त्यांच्यापासून वानस्पतिक रीतीनें नवीन वनस्पती उत्पन्न होतात. हे कांदे कांडाचेच एका विशिष्ट तऱ्हेनें बनलेले असतात. त्यांना बारीक बारीक फांद्याहि आलेल्या असतात.

२ लिंगकरंडकधारी—( १ ) शैवाल वर्ग ( Bryophyta ). या वर्गांत दोन जाती आहेत. एक शैवाल–शैवालतंतु नव्हे–व दुसरी शैवाल सारखीच दगड व विटा यांवर उगवणारी पसरट वनस्पति यकृतक ( Hepaticeae ). स्थाणुवर्गांत आणि या वर्गांत मुख्य भेद म्हणजे यांच्या संयोगेंद्रियाविषयींचा. या वर्गांत जननपेशींपासून अयोगसंभव उत्पादनहि होतें. जननपेशींपासून तयार होणाऱ्या वनस्पतीला संयोगिक इंद्रियें येतात. व या इंद्रियांच्या संयोगापासून होणाऱ्या वनस्पतीस जननपेशी येतात. अशा तऱ्हेनें या वर्गांत आलिंग आणि लिंग अशा दोनहि पिढ्या उत्तम तऱ्हेनें दिसतात. जनन पेशी रुजल्याबरोबर यकृतकामध्यें एकदम वनस्पति तयार होते. परंतु शैवालांत प्रथम त्यांपासून एक तंतुमयजाल उत्पन्न होतें व त्यावर कलिका येतात. या कलिकांपासून शैवाल उगवतें. यकृतकासधोऱ पुष्कळ वनस्पतींनां द्विपाद ( Dichotourous ) फांद्या फुटतात. व या सर्व खालच्या बाजूनें तंतूंनीं जमिनीस चिकटतात. उच्च यकृतिक व सर्व शैवाल यांच्यांत मात्र खोड व पानें चांगलीं भिन्न असतात व खोडास खालच्या बाजूस मुळांसारखे तंतू असतात. हे तंतू मुळांचें सर्व काम करितात. खरीं मुळें या वर्गांत नसतात. शैवालाची अंतर रचना सुद्धां फारच साध्या प्रकारची असते. जेव्हां खोडांत वाहिन्या असतात तेव्हां त्या अगदींच साध्या—म्हणजे फक्त लांब पेशींचा समुदाय, अशा—असतात. लिंगपिढीवर संयोगिक इंद्रियें येतात तीं शैवालांत पूर्ण वाढ झाल्यावर येतात. जीं स्थाणुरूप असतात त्यांच्या वरच्या भागावर व जीं कांद्यासारखीं असतात त्यांच्या शेंड्यावर हीं इंद्रियें येतात.

रेतकरंडक लांबट वाटोळे किंवा मुद्गलाकार असतात. त्यांना एक देंठ असतो. यांच्यांत पुष्कळ पेशी असून प्रत्येकापासून दोन दोन रेतपेशी उत्पन्न होतात. करंडकांचें वरचें तोंड फुटून रेतपेशी बाहेर पडतात. या किंचित् पिळदार असून त्यांना दोन दोन केंसासारखे तंतू असतात. रजकरंडक चंबूसारखे किंवा सुरईसारखे असतात त्यांना बहुधा देंठ नसतो, किंवा असलाच तर फार लहान असतो. कित्येकदां तर आजूबाजूच्या पेशींत ते थोडेबहुत पुरलेले असतात. यांच्या चंबूसारख्या भागांत एक पेशी असते ती रजपेशी बनते. व वरची लांब मान होते. रज पूर्णावस्थेस पोंचल्यावर वरच्या पेशीचें तोंड उघडतें व त्यांतून एक प्रकारचा रस वाहूं लागतो. या रसाकडे रेत आकर्षिलें जाऊन या दोघांचा संयोग होतो. यापासून मग एक आलिंगपिढी उत्पन्न होते. शैवालांत ही पिढी एका फळासारखी असते व ती मूळ वनस्पतीवरच सर्वदा चिकटून असते, व कांहीं अंशीं ती परोपजीवीहि असते.

या वर्गांतील दोन जातींपैकीं यकृतकांत जननपेशीपासून तंतुमय जाल चांगलेसे न होतां एकदमच लिंग पिढी होते. हिच्या जननपेशींना उडण्याकरितां पंखासारखे उपयोगीं पडावे म्हणून शेपटाप्रमाणें कांहीं अवयव असतात. दुसऱ्या जातींत, शैवालांत, तंतुमय भाग चांगला दिसतो. ही वनस्पति खोड व पानें यांनीं पूर्ण असते. व तिच्या जननपेशींना पंख नसतात.

( १ ) यकृतक ( Hepaticeae ):—हिचे चार विभाग केलेले आहेत. पहिल्या ( Riceiaceae ) जातींत वनस्पती पानांसारख्या असून त्या जमिनीवर पसरतात. कांहीं पाण्यावर व कांहीं पाण्यांतहि उगवतात. यांना फांद्या द्विपाद पद्धतीनें फुटतात. यांच्या खालच्या अंगास तंतू व वल्कपर्णें ( Scales ) असतात. यांच्या योगानें यांच्या मुळांचें काम होतें. रेत व रजकरंडक वरच्या अंगावर असतात. ते सभोंवतालच्या पेशींत थोडेसे पुरलेले असतात. संयोग झाल्यावर उत्पन्न होणाऱ्या पेशीपासून फळासारखा एक अवयव तयार होतो. यांत जननपेशी तयार होतात, व हाच भाग अगलिंपिढी होय.

दुसऱ्या प्रकारच्या ( Marchantiaceae ) वनस्पतींत पुष्कळ विकास झालेला दिसतो. या आकारानें जवळ जवळ पाऊण इंच रुंद असतात. यांचा आकार पानांप्रमाणें पसरट असून त्यांना द्विपाद फांद्या फुटतात. खालच्या बाजूस

तंतू व वल्कपर्णें असतात. वरच्या बाजूस कांहीं छिद्रें असतात या छिद्रांतून आंत हवा जाते. यांच्या स्थाणूवर पानासारख्या शिरा असतात. या शिरांवर मध्यें मध्यें एखाद्या पसरट पेल्यासारखे अवयव येतात. या पेल्यांचा कांठ करवतीच्या दातांसारखा कातरलेला असतो. या पेल्यांत पुष्कळसे लहान लहान बहुतेक वर्तुलाकार असे पदार्थ असतात. यांना एक एक देंठ असतो. यांच्यांत कांहीं पेशी अगदीं रंगहीन असतात त्यांच्यापासून मुळांचें काम करणारे तंतू उत्पन्न होतात. पूर्ण वाढीनंतर हे त्या पेल्यांतून सुटून बाहेर पडतात व त्यापासून नवीन वनस्पति तयार होते. अशा रीतीनें केवळ वानस्पतिक रीतीनें या प्रकारच्या वनस्पतींची वाढ फारच मोठी होते.

संयोगिक इंद्रियें यांच्या विशिष्ट फांद्यावर येतात. या फांद्या स्थाणूवर उंच व उभ्या येतात. कांहीं वनस्पतींवर पुरुष व स्त्री इंद्रियें निरनिराळ्या वनस्पतींवर येतात. पुरुष इंद्रियांची फांदी उंच देंठावर येते. हिचा आकार चापट व पसरट अशा भूछत्राप्रमाणें असतो. हिचो कड मात्र भूछत्राप्रमाणें सरळ नसून नागमोडी असते. हिच्यांत चंबूप्रमाणें खळगे असतात व त्यांत रेतकरंडक असतात. प्रत्येक पेशींत पुष्कळ रेतपेशी असतात. स्त्री इंद्रियांची फांदोहि एका उंच देंठावर येते. तिचा आकारहि थोडाबहुत पुरुष इंद्रियांसारखा असतो. पण हिच्या मध्यापासून व्यासाकडे लांब लांब काड्यांप्रमाणें नऊ अवयव गेलेले असतात. दर दोन काड्यांमध्यें खालच्या बाजूस एक एक लांबट पिशवी असते तिच्यांत रजकरंडक असतात. संयोगापासून फलासारखा एक भाग उत्पन्न होतो. रजकरंडकांतच हा भाग होऊन आंतील पेशींच्या जननपेशी होतात. मग त्या भागाचा देंठ लांबतो व तो भाग रजकरंडकास फोडून बाहेर येतो. त्याचेंहि बाहेरचें कवच फुटतें व जननपेशी बाहेर येतात. जननपेशींनां उडण्यासाठीं पंखाप्रमाणे शेपटें असतात. हीं आंतील पेशींचीच लांब वाढ होऊन झालेलीं असतात. जननपेशींपासून नवीन वनस्पती उत्पन्न होतात.

तिसऱ्या (Anthocerotaceae) भागांत स्थाणू जमीनीस अगदीं पक्का खिळलेला असतो. त्याच्यावर रेत व रजकरंडक येतात. त्यांना देंठ नसतो. व हे भोंवतालच्या पेशींत जवळ जवळ पूर्णपणें गाडलेले असतात. संयोगानंतर रजपेशी पूर्णपणें आंत जाते व तिच्यावर बाजूच्या पेशींचा थर येतो. आंत पूर्ण वाढ झाल्यावर आंतून शेंगेसारखा एक अवयव वर येतो. यांत जननपेशी तयार होतात. हिची मग चीरफांक होऊन दोन उभे भाग होतात व जननपेशी बाहेर पडतात. शेंगेच्या मध्यभागीं एक उभा तंतु असतो. स्थाणूच्या खालच्या भागावर कांहीं छिद्रें असतात त्यांत नॉस्टॉक नांवाचे नीलवनस्पतींतील तंतु आपली वसाहत करितात.

चौथ्या (Tungerman viaceae) भागांत कित्येकांत पानें व खोड चांगलीं वेगळीं दिसतात. कित्येकांत मुख्य भाग स्थाणुरूपच असतो. यांत स्त्री व पुरुष अवयव वेगवेगळ्या ठिकाणीं येतात. कोणावर ते दोन पानांत येतात. तर कोणावर टोंकाला येतात या त्यांच्या येण्याच्या जागेवरून त्यांतील भेद केले आहेत. संयोगापासून एक फलासारखा भाग होतो व त्यापासून पंखांनीं युक्त अशा जननपेशी तयार होतात.

(२) शैवाल. ( Mosses ).—या वनस्पती जेथें नेहमीं पाणी सांठून जागा ओली होते तेथें किंवा पावसाळ्यांत उघड्या जागेवर अथवा झाडांवर वगैरे उगवतात. या साधारणपणें एक किंवा दीड इंच उंचीच्या असतात. या उपटून पाहिल्या असतां यांना एक खोड, त्यावर पानें व खालीं मुळांसारखे तंतू दृष्टीस पडतात. पानें खोडाच्या सर्व बाजूंस जवळ जवळ वर्तुळाकार आलेलीं असतात. एखादे वेळेस खोड जमीनीवर आडवें पसरतें तेव्हां पानें जरी सर्व बाजूंनीं आलीं तरी तीं दोन बाजूंस वळून वर येतात, व त्यामुळें तेवढा भाग वेगळा दिसतो.

खोडांची अंतररचना अगदीं साध्या प्रकारची असते. कांहीं वनस्पतींत मध्यभागीं स्तंभा (Stele) सारखा एक पेशीजाल असतो. हा लांबट वाढलेल्या पेशींचा एक समुदाय असतो. यापेक्षां जास्त विशिष्ट विकास यांत झालेला नसतो. यांतून पोषक द्रव्य वहातें. कांहींत खोडाला कांहीं छिद्रें असतात. यांतून हवा आंतबाहेर जाते. पानाची रचनाहि अगदीं साध्या प्रकारची असते. त्यांत बहुधा पेशीचा एक थर असतो. त्यांत कांहींत मध्यभागीं एक शिरेसारखा भाग असतो. त्यांतहि फक्त लांब पेशी असतात. यांतून पानांस पाणी मिळतें. मुळांसारखे तंतू असतात तेहि साध्या पेशींचे असतात त्यांनां फांद्या फुटतात.

संयोगिक इंद्रियें बहुधा टोंकाशी पानांच्या गुच्छांत येतात. दोनहि प्रकारचीं इंद्रियें एकाच वनस्पतीवर येतात, पण कांहींत वेगवेगळ्या वनस्पतींवर येतात. फलासारखा भाग म्हणजे अलिंगपिंडी. हिच्यांत वेगवेगळ्या वनस्पतींत बरेच फरक दिसून येतात. या त्यांच्या फरकांवरून त्यांच्यांत जाती ठरविल्या आहेत. स्थूल मानानें पाहिल्यास तो भाग जाड कवचीसारख्या त्वचेनें आच्छादिलेला व आकारानें लांबट असतो. त्यांत मधोमध उभा असा एक बहुपेशीमय भाग असतो. यांत पोषकद्रव्यें असून वाढणाऱ्या जननपेशींना त्यापासून पोषण मिळतें. ह्यांच्या बाहेर सभोंवतालीं जननपेशींची पिशवी असते. त्यांत जननपेशी तयार होतात. जननपेशींना शेंपटासारखे अवयव नसतात. अपरिपक्व दशेंत जननपेशींच्या पिशवीबाहेर एक पेशीजाल असतें हें आवश्यक द्रव्याचें सात्मीकरण ( Assimilation ) करतें व जवळच एक पाणी सांठविणारें पेशीजाल असतें. बहुतेकांत या भागाला एक लांब देंठ असतो, व त्यावर हा उंच उचलून धरलेला असतो.

परिपक्क झाल्यावर त्याच्यावरचा भाग झांकणासारखा फुटून आंतून जननपेशी बाहेर येतात. कित्येकांत तो झांकणासारखा न फुटतां सबंधच उभा चीरफांकळी सारखा फुटतो व कित्येकांत मुळींच न फुटतां कुजून जातो. जननपेशींपासून प्रथम तंतू उत्पन्न होतात. या तंतूंवर मग कलिका येतात व त्यांपासून शैवाल उगवतें.

( ३ ) वाहिनीमय अपुष्पवर्ग [ Pteridophyta Vascular cryptogams] या वर्गांत स्थलनेचे ( Ferns ), पाणनेचे (Water Ferns), अश्वपुच्छें ( Horse tails) व मुद्गलकें ( club morses ) अशा चार जातीच्या वनस्पती येतात. या सर्व अपुष्प वर्गांत जास्त विकास पावलेल्या आहेत. शैवाल वर्गाप्रमाणें या वर्गांतहि दोन पिढ्या उत्तम रीतीनें दिसतात. प्रथम लिंगपिढीवर स्त्री व पुरुष दोन्ही इंद्रियें येतात व त्यांच्या संयोगापासून अलिंगपिढी उत्पन्न होते. या पिढीवर जननपेशी येतात व त्यांच्या पासून पुन्हां पहिल्या प्रमाणें लिंग पिढी होते.

लिंग पिढीस पुरस्थाणु ( Prothallus ) म्हणतात. हा अगदीं लहान, पाव ते अर्धा इंच असतो. कांहीं जातींत हा यकृतकां( Hepaticeae )तील वनस्पतींप्रमाणें दिसतो. हा पानांसारखा चापट व हिरवा असतो. याचा आकार जवळजवळ अळवाच्या पानासारखा असून त्याच्या खालच्या बाजूस तंतू येतात व ते जमीनींत शिरतात. कांहींत याला फांद्या फुटतात, व कांहींत हा तंतुरूप असतो. बहुधा हा जमीनीवर असतो पण कांहींत तो अर्धवट किंवा सबंधहि मातींत पुरलेला असतो, व कांहींत तर हा जननपेशींतच उगवतो. पुरस्थाणूवर संयोगिक इंद्रियें येतात. रेतकरंडकास पिळदार व केंसासारखे तंतू असलेल्या पुष्कळशा रेतपेशी असतात. रजकरंडकांत मात्र एकच रजपेशी असते. रजपेशींतून शैवालांप्रमाणें कांहीं रस वहातो. व त्यामुळें रेत तिकडे आकर्षिलें जातें. या संयोगापासून शैवालांप्रमाणें अलिंगपिढी उत्पन्न होते, हीच मुख्य नेचे, पाणनेचे वगैरे वनस्पति होय.

या वर्गांतील अलिंग पिढींत चांगलाच विकास झालेला दृष्टीस पडतो. यांच्या अंतर रचनेंत पुष्कळ वाढ झालेली असून त्यांना पानें, खोड व मुळें स्पष्ट दिसतात. बहुतेकांत रजाचा संयोग झाल्यावर रजकरंडकांतच असताना संयोग झालेली पेशी विभागूं लागते. हिचे प्रथम दोन विभाग होतात त्यांचे मग आठ होतात व यांच्याहि विभागानें पेशींचा एक लहानसा संघ तयार होतो. या संघापासून खोडाचा शेंडा, पहिलें पान, प्रथम मूल, व याच वर्गाला विशेष असा एक अवयव " पाय "(Foot) हीं उत्पन्न होतात. हा पाय म्हणजे पेशींचा एक समुदाय असतो. याच्या योगानें हा लहानसा गर्भ पुरस्थाणूवर चिकटून रहातो व पुरस्थाणूपासून पोषकद्रव्यें शोषून घेतो. जेव्हां गर्भाला स्वतःचीं मुळें फुटतात व पोषकद्रव्यें शोषूं लागतात, तेव्हां हा पाय निकामी होतो, व मग बहुधा पुरस्थाणूहि मरून जातो.

गर्भापासून झालेलें खोड साधें किंवा फांद्या फुटलेलें असतें. तें उभें किंवा जमिनी सरपट असतें. त्याला फांद्या फुटतात. त्यांचा पानांशीं कांहींहि संबंध नसतो. पानें सर्व बाजूंस असतात. किंवा फक्त दोहों बाजूंसच असतात. तीं वर्तुळाकार किंवा मळसूत्राकार येतात. यांनां शैवालाप्रमाणें तंतू नसून सपुष्पाप्रमाणें खरीं मुळें असतात. पानें सुद्धां सपुष्पाप्रमाणेंच असतात. पानें, खोड व मूळ यांतून स्पष्ट दिसणारे वाहिनीसंघ गेलेले असतात आणि म्हणूनच या वर्गाला वाहिनीमय अपुष्पवर्ग असें म्हणतात. जाडींत जी उपवाढ होते ती एका विशिष्ट प्रकारच्या संवर्धक पदरा ( Cambium ) पासून होते. परंतु अस्तित्वांत असलेल्या फार थोड्या वनस्पतींत ही दिसते. नष्ट झालेल्या पूर्वीच्या या वर्गांतील वनस्पतींत ही वाढ होत असे.

वानस्पतिक रीतीनें जननपेशी तयार होतात. या बहुधा पानांवर येतात किंवा क्वचित् खोडावर पानांच्या अक्षकोणांत येतात. जननपेशीगुच्छा( Sporangium )मध्यें जननपेशी येतात. यांच्या भोंवतीं एक जाड त्वचा असते. हिच्या आंतील पेशींपासून जननपेशी होतात. प्रत्येक परिपक्क जननपेशीला कित्येक पुटांचें एक कवच असतें. जननपेशींभोंवतीं एक जीवतत्त्वाचा चिकट भाग असतो. यांतून त्यांनां पोषकद्रव्यें मिळतात. बहुतेक सर्व जननपेशींपासून पुरस्थाणु (Prothallus ) होतो व त्यावर स्त्री व पुरुष हीं दोन्ही इंद्रियें येतात. कित्येकांपासून असा पुरस्थाणु उत्पन्न होतो कीं त्यावर फक्त एक प्रकारचीं इंद्रियें येतात. कित्येकांची मजल याहीपुढें जाऊन जननपेशींमध्येंच एक स्त्री जननपेशी ( Megaspore ) व दुसरी पुरुष जननपेशी ( Microspore ) अशा दोन वेगळ्या जाती होतात, व त्यांपासून अनुक्रमें रज व रेत उत्पन्न करणारे पुरस्थाणू उत्पन्न होतात.

या वर्गांतील हल्लीं अस्तित्वांत असलेल्या वनस्पतींचें वर्गीकरण पुढें दिल्याप्रमाणें करितात. ( १ ) नेचे. ( Filicinae ) यांत खोड साधें किंवा फांद्यांचें असतें. पानें चांगलीं पूर्णावस्थेस पोंचलेलीं असतात. जननपेशीगुच्छ पानांच्या पाठीमागें अथवा अक्षकोणांत येतात. ( २) अश्वपुच्छें ( Equisetineae ) यांचें खोड साधें किंवा फांद्या फुटलेलें, पानें वर्तुळाकार आलेलीं व सर्व एकास एक मिळून त्यांचे एक अखंड आच्छादन प्रत्येक कांडाग्राभोंवतीं झालेलें असतें. विशिष्ट पानांच्या खालच्या बाजूस जननपेशीगुच्छ येऊन त्या सर्वांचा एक तुरा शेंड्यावर येतो. ( ३ ) मुद्गलकें ( Lycopodineae ) यांचें खोड लांब आणि द्विपाद फांद्यांचें असतें. पानांच्या अक्षकोणांत किंवा त्यांच्या देंठापासून कठिण कवचांचे जननपेशीगुच्छ येतात.

१ नेचे—( १ ) स्थ ल ने चेः—यांना नुसते नेचे असेंहि म्हणतात. वाहिनीमय अपुष्प ( Pteridophyta) वर्गांतील सर्वांत जास्त वनस्पती या जातीच्या आहेत. यांच्यांत दोन विभाग करितात. ज्यांच्या जननपेशीगुच्छाची त्वचा पेशींच्या अनेक थरांची असते तो पहिला, व ज्यांची एकाच थराची असते तो दुसरा. पहिल्या भागांत हल्लीं फार थोड्या वनस्पती दिसतात, तथापि पूर्वीच्या काळीं फार असत. यांच्यांत लहान आकाराच्या आणि मोठ्या आकाराच्या अशा दोन्ही जातींच्या वनस्पती आहेत. यांच्यांतील कांहींचा पुरस्थाणु जमीनींत पूर्णपणें गाडलेला असतो व कांहींचा वर असतो. दुसऱ्या भागांत बाकीचे अस्तित्वांत असलेले सर्व प्रकारचे नेचे येतात. यांतील सर्वांत मोठ्या जाती उष्णकटिबंधांत होतात. बहुतेक जाती लहान लहान रोपट्यांप्रमाणें असतात, परंतु कांहीं नेचे वृक्षासारखेहि असतात. हे सिंहल द्वीपांत फार आहेत. निलगिरी पर्वतावर उटकमंड येथील प्रसिद्ध वनस्पती बागेंत पुष्कळ वृक्षासारख्या जाती आहेत. सह्याद्रींतील कॅसलरॉक येथील जंगलांतहि अशा पुष्कळ जाती सांपडतात. या दहा बारा फूट उंच असतात. यांना फांद्या फुटत नाहींत. यांच्या माथ्यावर लांब लांब संयुक्तपर्णांचा एक गुच्छ असतो. हीं पानें अंतिमकलिके ( Terminal bud ) पासून एकामागून एक उत्पन्न होतात. पानें वाळल्यावर खालीं पडतात व त्यांचा एक मोठा व्रण खोडावर रहातो. जे लहान शेपटाप्रमाणें असतात त्यांचें मुख्य खोड जमीनीवर सरपटत किंवा कित्येकदां जमीनीखालूनहि आडवें वाढतें. याच्या शेवटीं एक संयुक्तपर्णांचा झुपका असतो. पानें लहान असतांना तीं टोंकापासून देंठापर्यंत घड्याळाच्या स्प्रिंगप्रमाणें गुंडाळलेलीं असतात. सर्व नेच्यांत व पाणनेच्यांत ही गोष्ट विशेष आहे. कांहींत पानें साधीं असून त्यांचें पत्र विभागलेलें नसून सबंध असतें. उष्ण प्रदेशांत कित्येक जाती दुसऱ्या वृक्षांवर अर्धवट परोपजीवी वृत्तीनें रहातात. उदाहरणार्थ माकडाचें बाशिंग या नांवाचा एक नेचा मोठ्या झाडांवर सांपडतो. कांहीं पानांवर, खोडांवर, किंवा पानांच्या देंठावर एक विशेष प्रकारचीं तपकिरी रंगाचीं वल्कें ( Scales ) असतात.

जननपेशीगुच्छ पुष्कळ असून ते पानांच्या पाठीमागल्या बाजूवर येतात. ज्यांवर जननपेशीगुच्छ येतात तीं पानें इतरांहून भिन्न नसतात. अगदीं थोड्या अपवादात्मक वनस्पतींत हीं दोन प्रकारचीं पानें थोडीं भिन्न असतात. वेगवेगळ्या जातींत त्यांच्या रहाणींत, आकारांत व त्यांच्या रचनेंत आणि ठेवणींत पुष्कळ फरक सांपडतो अनेक जननपेशीगुच्छांचा मिळून एक संघ पानाच्या मागीलबाजूस एका लहानशा गादीवर येतो. यावर मग पेशींचें एक अस्तर येतें. प्रत्येक जननपेशीगुच्छ पानाच्या त्वचेच्या एका पेशीपासून तयार होतो व हिच्यांत पुष्कळ जननपेशी असतात.

जननपेशीगुच्छाचा सर्व साधारण आकार वाटोळा असतो. त्यांना बहुपेशी परंतु अगदीं बारीक असा एक लांब देंठ असतो. यावर जननपेशीगुच्छ येतो. ही एक फुगीर पिशवी असते. हिच्या देंठापासून वर माथ्यापर्यंत व तेथून दुसऱ्या बाजूस जवळ जवळ निम्म्या भागापर्यंत विशिष्ट पेशींची एक ओळ असते. या पेशींच्या त्वचा फार जाड असतात. कांहींत ही जाड त्वचांच्या पेशींची रांग दुसऱ्या बाजूस मध्यावर न थांबतां थेट खालीं येऊन देंठाला मिळते व या रांगेचें एक पूर्ण कडें बनतें. कित्येकांत या पेशी खालून देंठापासून देंठापर्यंत नसून फक्त वर माथ्यावर असतात. व कांहींत ही रांग नसून त्याऐवजीं मध्यावर दोन बाजूंस जाड त्वचांच्या पेशींचे दोन समुदाय असतात. या जाड त्वचेच्या पेशींचा उपयोग जननपेशीगुच्छाच्या स्फोटनाच्या ( Dehisence ) कामीं होतो. पेशींतील पाणी कमी होऊन त्यांच्या त्वचा आकर्षण पावतात व त्यामुळें जननपेशीगुच्छाला मध्यभागीं एक चीर पडते. या चिरेंतून जननपेशी बाहेर पडतात.

जननपेशीगुच्छाच्या संघाचा आकार, त्यांची ठेवण, व त्यावरील अस्तर यांच्यावरून वेगवेगळाले नेचे ओळखतां येतात मधील शिरेच्या दोहों बाजूस आडव्या शिरांवर हे बहुधा येतात. कित्येकांत हे संघ सरळ रेघांप्रमाणें असतात; कित्येकांत चंद्रकोरीप्रमाणें असतात; कित्येकांत सबंध वर्तुळाप्रमाणें तर कित्येकांत अर्धवर्तुळाप्रमाणें; कित्येकांत पानाच्या बाजूनें उभ्या लांब देंठापासून टोंकापर्यंत दोन बाजूंस दोन अखंड ओळी असतात, व पान कडेला किंचित् वळून त्या झांकिल्या जातात. वरील अस्तर कित्येकांत असतें तर कित्येकांत नसतें. अस्तरांतहि कित्येकांत तें सर्व बाजूंनीं असतें, कित्येकांत तें एकाच बाजूनें चिकटलेलें असतें तर कित्येकांत फक्त मध्येंच चिकटलेलें असतें. अशा रीतीचे अनेक बारीक-सारीक भेद आहेत.

पुरस्थाणु बहुधा हृदयाच्या आकाराचा अथवा पत्त्यांतील लालबदामासारखा असतो. त्याच्या खालच्या बाजूवर स्त्री व पुरुष इंद्रियें असतात. कित्येकांत हा तंतुमय असून शैवालांतील जननपेशींपासून होणाऱ्या तंतूसारखा दिसतो; व त्याच्या आडव्या फांद्यांवर दोन्ही इंद्रियें येतात. तंतूच्या मध्यें रेतकरंडक असतात व त्यांच्यावर व खाचेजवळ रजकरंडक असतात. रेतकरंडक वाटोळा असून पुरस्थाणूच्या त्वचेच्या एका पेशीपासून तयार होतो. हा त्वचेवर वर उचललेला बारीक फोडाप्रमाणें दिसतो. पूर्ण वाढीनंतर त्यांत एक मुख्य पेशी असते व हिच्यांत पुरुष तत्त्वाच्या जनक पेशी असून त्यांच्या बाहेर पेशींचीं दोन कडीं असतात. मधल्या पेशीचे विभाग होऊन त्यापासून रेताच्या जनक पेशी होतात, व ज्यापासून मग रेत होतें. रेत पिळदार असून त्याला पुष्कळ केंसासारखे तंतु असतात. जरा जुन्या झालेल्या पुरस्थाणूवर रजकरंडक येतात. हेहि एका पेशीपासूनच होतात. यांचा चंबूसारखा भाग पुरस्थाणूंत पुरलेला असतो व मान बाहेर येते. पूर्णावस्थेस पोचल्यावर मानेच्या पेशींतील द्रव्य फुगतें, वरचें तोंड उघडतें व

आंतील द्रव्य बाहेर पडतें. यामुळें रेत आकर्षिलें जाऊन संयोग होतो.

कित्येक वनस्पतींत पुरस्थाणूंपासून संयोगाशिवाय अलिंग पिढीची फांदी उत्पन्न होते; व अशा फांद्यांपासून पुरस्थाणूहि जननपेशींशिवाय उगवतो. कित्येक नेच्यांच्या खोडाचा व कांहीं वृक्षासारखा नेच्यांच्या पानांच्या देंठावरील केंसासारख्या तंतूंचा औषधांत उपयोग करितात.

(२) पाणनेचे (Hydropterideae)–या वनस्पती पाण्यांत किंवा दलदलीच्या जागीं उगवतात. यांत फक्त चार पांचच निरनिराळ्या वनस्पती आहेत. सर्वांच्या जननपेशी दोन प्रकारच्या असतात. इतर नेच्यांप्रमाणें यांच्या जननपेशी पानांच्या मागील बाजूस न येतां यांचे जननपेशीगुच्छ एका फळासारख्या पिशवींत येतात. यांच्या जननपेशीगुच्छांनां नेच्यांतील म्ह० स्थलनेच्यांतील जननपेशीगुच्छाप्रमाणें जाड त्वचेच्या पेशींचें एक कडें नसतें. यांच्यांत दोन प्रकार आहेत. एक स्थलवर्ती ( Marsilioceae ) दुसरा जलवर्ती ( Salviniaceae. )

स्थलवर्ती यांत पर्णगुच्छक ( marsilia ) व तृणपर्णक ( Pilularia ) अशा दोन वनस्पती आहेत. दोहोंचेंहि मूळ खोड जमीनीसरपट आडवें वाढत जातें, व त्यावर उभीं पानें येतात. प्रत्येक पानाला लांब देंठ असतो. पर्णगुच्छकाचें पान संयुक्त असून त्याच्यांत चार पर्णकें असतात. हीं सर्व एका ठिकाणाहून निघाल्यामुळें या पानांचा आकार चार पाकळ्यांच्या फुलाप्रमाणें दिसतो. जननपेशीगुच्छाचा फळासारख्या आकाराचा संघ पानांच्या देंठावर बुंध्यापासून जवळच येतो कित्येकांत असे पुष्कळ संघ येतात. तृणपर्णकामध्यें पानें लांब काड्यांसारखीं असतात. त्यांच्या पानांनां रुंद पत्र ( Lamina ) नसतें. त्यांच्यांतहि जननपेशीगुच्छाचे संघ देंठाजवळच येतात. दोघांचीं पानें नेच्याप्रमाणें शेंड्यापासून देंठावर गुंडाळलेलीं असतात. पर्णगुच्छकामध्यें जननपेशीगुच्छाच्या संघाचे उभे दोन भाग असतात. प्रत्येकांत चौदापासून अठरापर्यंत आडव्या ओळी असतात. प्रत्येक ओळींत पुष्कळ जननपेशीगुच्छ असतात. स्त्री व पुरुष अशा दोन्ही जातींच्या जननपेशींचे गुच्छ एकाच ओळींत सांपडतात. तृणपर्णकामध्यें संघाचे चार भाग असतात व त्यांत जननपेशीगुच्छ असतात. पुरुष जननपेशी लहान असते. तिच्यांत वाढ सुरू होऊन पुरुष पुरस्थाणु उत्पन्न होतो. यावर एक रेतकरंडक येऊन त्यांत रेतपेशी होतात. स्त्री जननपेशींतहि अशाच तऱ्हेनें पुरस्थाणु उत्पन्न होऊन एक रजकरंडक उत्पन्न होतो. दोन तत्त्वांचा संयोग होऊन तेथेंच अलिंगपिढी उत्पन्न होते.

जलवर्ती यांत अमूलक ( Salvinia ) व समूलक ( Azolla ) अशा दोन वनस्पती आहेत. या पाण्यावर तरंगत असतात. अमूलकामध्यें प्रत्येक कांडाग्रावर तीन तीन पानें येतात. पैकीं दोन वर हवेंत असून एक खालीं पाण्यांत जातें. वरच्या पानांचा आकार व रूप साधारण पानांसारखें असतें, परंतु पाण्यांतील पान मात्र तंतूसारखें असून त्याला बारीकबारीक केंस असतात. अमूलकाला मुळें नसतात. त्यांतील पाण्यांतील पानें त्याच्या मुळांचें काम करितात. पानांच्या देंठाशीं जननपेशीगुच्छाच्या संघाचा घोस येतो. प्रत्येक संघांत एकाच जातीचे जननपेशीगुच्छ असतात. हे संघ वाटोळे असतात समूलकामध्यें पानें पुष्कळ असून फार लहान लहान असतात. यांतील पानांचे दोन भाग असून एक वर हवेंत असतो, व दुसरा पाण्यांत बुडालेला असतो. आंत बुडालेला भाग पाणी शोषून घेण्याच्या कामीं मदत करितो. वरच्या भागांत कांहीं पोकळ्या असतात, त्यांत नॉस्टॉक नांवाचे नीलपाणकेश ( Cyanophyceae ) मधील तंतू वसाहत करितात. समूलकाला खरीं मुळें असतात. याच्याहि जननपेशीगुच्छांच्या संघाचे घोस पानांच्या देंठाजवळ येतात. यांतील दोन्ही जातींचे जननपेशीगुच्छ वेगवेगळ्या फणांत येतात. अमूलकांमध्यें पुरुष जननपेशीगुच्छामध्येंच पुरुष जननपेशी रुजते, व त्यांत पुरस्थाणु येतो. त्यांतून रेतकरंडकांतून एक लांब नळी बाहेर येते व ती जननपेशीगुच्छाच्या त्वचेस फोडून त्यांतून बाहेर येते. हिच्यांत चार रेतपेशी निर्माण होतात, व त्या या नळीवाटे बाहेर येतात. समूलकांत जननपेशीगुच्छ फूटून त्यांतील एका चिकट पदार्थांत जननपेशींचा एक गोळा होऊन तो बाहेर पडतो. त्यांतील रेतकरंडकातून आठ रेतपेशी बाहेर येतात. स्त्रीजननपेशी पुष्कळच मोठी असते. ही जननपेशीगुच्छामधून बाहेर न पडतां तेथेंच रुजते व तिच्यावर पुरस्थाणु येतो. त्यावर तीन रजकरंडक येतात पण त्यांपैकीं शेवटीं एकच रहातो. त्याच्यांत रेताशीं संयोग होऊन एक गर्भ तयार होतो. त्याला नेच्यांसारखा "पाय" असतो. गर्भापासून नवीन अलिंग पिढी उत्पन्न होते.

( २ ) अश्वपुच्छें (Equisetinae). या जातींत अश्वपुच्छ नांवाची फक्त एकच वनस्पति आहे. हिचे साधारण २० प्रकार आहेत. सर्व जगभर पाणथळ जमीनींत या उगवतात. यांचें खोड आडवें व जमीनीखालून वाढतें, व वर उभ्या फांद्या येतात. या दर वर्षीं मरून जातात व नवीन उगवतात. फांदी पुष्कळदां पांचसहा फूट उंच असते. दक्षिण अमेरिकेंत हिचा एक प्रकार आहे तो सर्वांत उंच वाढतो. त्याची उंची ४० फूट असून त्याचें खोड एक इंच जाड असतें. यांतील खोडावर लांब लांब अंतरावर कांडाग्रें असतात व त्यांच्या भोंवतीं वर्तुलाकार पानें येतात. सर्व पानें एकमेकांस जोडून त्यांचें एक वेष्टण कांडाग्राभोंवतीं होतें. पानांच्या शेंड्याला टोंकें असतात. पानांच्या अक्षकोणांत फांद्या येतात. यांना वर येण्यास जागा नसल्यामुळें या पानांचें कांडाग्राभोंवतींचें वेष्टण फोडून बाहेर येतात. जमीनीखालील खोडास गड्डे येतात, यांत पोषक द्रव्यें सांठविलेलीं असतात.

फांद्यांच्या खोडांचा छेद घेतला असतां आंत भेंडा (Pith) च्या जागीं एक मोठी पोकळी दिसते. तिच्या भोंवतीं अस-

लेल्या पेशीभागांत वाटोळ्या छिद्रांची एक रांग आढळते. यांच्या बाहेरील भागांत पिधानक त्वचा ( Cortex) असते. तींत हरिद्रव्य असतें. याच्या बाहेरच्या भागांत कठिनपेशीजाल ( Selerenchyma ) असतें. पानें अगदीं लहान असल्यामुळें त्यांचें सात्मीकरणा ( assimilation )चें काम खोडाला करावें लागतें व त्यासाठीं त्यांत हरिद्रव्य असतें.

फांदीच्या टोंकास तुऱ्याप्रमाणें एक भाग येतो. हा भाग जननपेशी उत्पन्न करणाऱ्या पर्णांचा असतो. हीं पानें विशेष रीतीनें वाढून त्यांचा चापट व देवापुढें नीरांजनांत लावण्याच्या फुलवातीप्रमाणें आकार होतो. त्यांनां देंठ असून त्यांचा चापट भाग पुढें बाहेरचे बाजूस येतो. हीं पर्णें खोडावर वर्तुळाकार येतात व त्यांचा तुरा बनतो. प्रत्येक पानाच्या खालच्या बाजूस पांच ते दहा पिशव्या येतात त्यांत जननपेशी असतात. प्रत्येक जननपेशी वाटोळी असून तिला दोन लांब शेपटाप्रमाणें पट्टे असतात. हे प्रथम तिच्या भोंवतीं गुंडाळलेले असतात. वाळल्यावर ते सुटवात व त्यामुळें जननपेशी उडूं शकते. किंचित् पाणी लागल्याबरोबर हे जननपेशींभोंवतीं एकदम गुंडाळले जातात यामुळें दोन कामें होतात. एक तर त्यामुळें ते दमट जागीं पोंचल्यावर जमीनीवर पडतात व रुजतात. व दुसरें हें कीं यांपासून दोन वेगळ्या प्रकारचे पुरस्थाणू उत्पन्न होतात तेव्हां संयोगासाठीं दोन्ही तऱ्हेचे पुरस्थाणू जवळ जवळ पाहिजेत ते यामुळें येतात. या शेपटांत जननपेशी अडकून त्यांचा एक गोळा होतो व तो एकदमच एका ठिकाणीं पडतो व अशा रीतीनें दोन प्रकारचे पुरस्थाणू जवळ जवळ उत्पन्न होतात. कांहींत सर्व फांद्यांवर जननपेशी येत नाहींत, फक्त विवक्षित फांद्यांवरच येतात. या फांद्यांत हरिद्रव्य नसतें. जननपेशींपासून दोन वेगळे पुरस्थाणू होतात, एक स्त्री व दुसरा पुरुष स्त्री पुरस्थाणु दुसऱ्यापेक्षां मोठा असतो. नेच्यासारखेच रेत व रज करंडक या पुरस्थाणूंवर येतात.

फांद्यांच्या बाहेरच्या पेशींत वाळूचे बारीक कण असतात. कित्येकांत ते इतके असतात कीं त्यांचा उपयोग भांडीं घांसण्याकडे व लांकडानां गुळगुळीत करण्याकडे करितात. कांहीं कांहींत विषारी पदार्थहि तयार होतात.

( ३ ) मुद्गलकें—( Lycopodinae ) या जातींत तीन भाग आहेत. लघुपर्णक ( Lycopodium ) वल्कपर्णक ( Selaginella ) व दीर्घपण ( Isoetes ). वाहिनीयम अपुष्पवर्गांतील इतर वनस्पतींतून यांनां त्यांच्या रहाणीवरून व त्यांच्या जननपेशीगुच्छाच्या वाढीवरून ओळखून काढितां येतें. खोडांनां व मुळांनां द्विपाद फांद्या फुटणें, व पानांचा अगदीं साधा प्रकार हे याच्या अलिंग पिढींत विशेष आहेत. पहिल्या दोन वनस्पतींत खोड लांब असून पानें लहान असतात, पण दीर्घपर्णकामध्यें खोड लहान गड्ड्याप्रमाणें असून पानें लांब व दाभणासारखीं असतात. नेच्यांप्रमाणें किंवा अश्वपुच्छांप्रमाणें यास पुष्कळ जननपेशीगुच्छ न येतां प्रत्येक पानाच्या अक्षकोणांत किंवा त्याच्या बुंध्याजवळ फक्त एक एकच जननपेशीगुच्छ येतो. जरी कांहीं वनस्पतींत जननपेशीगुच्छ येणाऱ्या पानांत आणि इतर पानांत कांहीं फरक नसतो तरी बहुतेकांत त्यांचा अगदीं एक निराळाच आकार असतो, अश्वपुच्छाप्रमाणें त्यांच्या फांद्यांच्या टोंकांशीं त्यांचा एक गुच्छ बनतो.

पानांशीं तुलना करतां यांचे जननपेशीगुच्छ इतरांपेक्षां पुष्कळ मोठे असतात व त्यांवर पेशींच्या अनेक थरांचें कवच असतें. त्यांच्यावर जाड त्वचेच्या पेशींचें कडें नसतें. दीर्घपर्णकामध्यें जननपेशीगुच्छाची त्वचा कुजते व जननपेशी बाहेर पडतात. परंतु इतरांत त्यांनां एक उभी चीर पडते, व जननपेशीगुच्छाचे दोन भाग होतात. लघुपर्णकाच्या जननपेशी एकाच प्रकारच्या असतात. वल्कपर्णक व दीर्घपर्णक यांच्या दोन वेगवेगळ्या प्रकारच्या असतात.

( १ ) लघुपर्णक प्रकारांतील बहुतेक सर्व वनस्पती जमीनीवर उगवणाऱ्या असतात, फारच थोड्या इतर दुसऱ्या झाडांवर उगवतात. या वनस्पती सह्याद्रीवर कॅसलरॉकच्या जंगलांत पुष्कळ सांपडतात. खोड बहुधा जमीनीसरपट असतें. व वर फांद्या फुटतात. फांद्या व मुळें द्विपाद असतात. खोडावर दाट पानें आलेलीं असून तीं लहान असतात. टोंकांशीं तुऱ्याप्रमाणें जननपेशीगुच्छाचीं पानें असून तीं जास्त रुंद व त्यांचीं टोंकें जास्त लांब असतात. इतर भागांपेक्षां तुऱ्यांत पानें जास्त दाट असतात. प्रत्येक पानाच्या अक्षकोणांत वरच्या बाजूस एक एक जननपेशीगुच्छ असतो. त्याचा आकार मिरचीच्या किंवा वांग्याच्या बियांसारखा असतो. मध्यभागीं एक चीर पडून त्याचे दोन भाग होतात. व जननपेशी बाहेर पडतात. जननपेशी एकाच तऱ्हेच्या असतात. पुरस्थाणु बहुधा जमीनीखालीं असतो. कित्येकदां त्याचा कांहीं भाग वर येतो व कित्येकांत तो सबंध वर असतो. वर असलेल्या भागांत हरिद्रव्य असतें, बाकीच्यांत नसतें. त्यांना खालच्या बाजूस मुळासारखे तंतू असतात व वरच्या बाजूवर संयोगिक इंद्रियें येतात. पुरस्थाणूचा आकार कित्येकदां पेल्यासारखा असतो तर कित्येकदां मुळ्यासारखा किंवा गाजरासारखा निमुळता व लांब असतो. रेतकरंडक जवळ जवळ पूर्णपणें बाजूच्या पेशींत गाडलेला असतो रजकरंडक वर असतो. संयोगापासून झालेला गर्भ कांहीं वेळ पुरस्थाणूवरच वाढतो व पूर्ण वाढ झाल्यावर मग स्वतंत्र होतो. त्याला एक नेच्यासारखा पाय असून दुसराहि पायासारखाच प्रलंबक ( Suspensor ) म्हणून एक भाग असतो.

( २ ) वल्कपर्णक यांत पुष्कळ प्रकारच्या वनस्पती येतात. या बहुतेक सर्व जमीनीवर पसरणाऱ्या आहेत, तथापि कांहीं वर उभ्याहि वाढतात. कित्येक कशाच्या तरी आधारानें वेलासारख्या वर जातात. यांच्या खोडांस द्विपाद फांद्या फुटतात. जवळ

जवळ लघुपर्णकासारखीच यांची रहाणी आहे. यांनां बारीक बारीक वल्काप्रमाणें पानें असतात. अशा पानांप्रमेरच दुसरीं मोठीं व रुंद पानें येतात. प्रत्येक पानाच्या बुंधाजवळ एक लहानसें अगदीं पातळ आच्छादन येतें हें या जातीचें विशेष लक्षण आहे. खोडाचे जेथें दोन विभाग होतात त्या ठिकाणाहून एक लांब पारंब्यांच्या तंतूप्रमाणें फांदी निघते, व जमीनींत जाते. ही फांदी खोडाचाच एक प्रकार आहे. हिला पानें येत नाहींत, व जमीनींत गेल्यावर तिला मुळें फुटतात. मूळ फांदी तोडून टाकिल्यास हिला पानें येतात.

फांदीच्या टोंकाशीं तुरा येतो. त्यांतील प्रत्येक पानाच्या अक्षकोणांत एक एक जननपेशीगुच्छ असतो. जननपेशी दोन प्रकारच्या असतात. स्त्रीजननपेशी चार चार मिळून एक एका जननपेशीगुच्छामध्यें असतात, पुरुषजननपेशी पुष्कळ सांपडतात. जननपेशीगुच्छांना चीर जाऊन ते फुटतात. व जननपेशी बाहेर पडतात. पुरुषजननपेशी गुच्छ फुटण्याच्या अगोदरच त्यांत वाढूं लागते. तिच्यांत पेशीविभाग होऊन एक अतिसूक्ष्म असा पुरस्थाणु येतो व त्यावर रेतकरंडक तयार होतो. याच्यांत पुष्कळ रेतपेशी होतात. यांनां केंसासारखे तंतू असतात. स्त्रीजननपेशी कित्येकदां जननपेशीगुच्छामध्येंच वाढूं लागते. जननपेशी फुटून पुरस्थाणु थोडा बाहेर येतो. यावर तीन रजकरंडक येतात. संयोग झाल्यावर गर्भ वाढतो. त्याला पाय असून लघुपर्णकाप्रमाणें दुसराहि प्रलंबक म्हणून भाग असतो. या वनस्पती रानांत पुष्कळ सांपडतात.

( ३ ) दीर्घपर्णक या वनस्पती पूर्वीच्या काळीं पुष्कळ होत्या. त्यांपैकीं हल्लीं एकच अस्तित्वांत आहे. हिचें खोड लहान गठ्ठयासारखें असून द्विपाद फांद्या फुटणारें आहे. फांद्या व खोड जमीनीसरपट असतात. पानांचा एक झुपका वर येतो. पानें लांब, दाभणासारखीं व कडक असतात. त्यांच्या बुंधाशीं आंतील बाजूस एक लांब खांच असते. तींत जननपेशीगुच्छ असतात. बाहेरच्या पानांत स्त्री व आंतील पानांत पुरुष जननपेशी सांपडतात. खोडास संवर्धक पदर (Cambium) असतो व त्यामुळें उपवाढ होते. वल्कपर्णकाप्रमाणेंच यांच्या पानांस एक लहान पातळ आच्छादन येतें. पुरुष जननपेशीहि वल्कपर्णकाप्रमाणेंच अगोदर वाढूं लागते व तिच्यांत सूक्ष्म पुरस्थाणू उत्पन्न होऊन रेतकरंडक येतात. रजकरंडकहि तसेच वाढून गर्भ तयार होतो. याला पाय असतो परंतु लघुपर्णक व वल्कपर्णक यांच्या प्रमाणें याला दुसरा भाग प्रलंबक हा असत नाहीं. ऐवढया बाबतींत ही वनस्पति मुद्गलक जातींतील इतरांहून थोडी भिन्न आहे.

प्र स्त री भू त अ पु ष्प व न स्प ती.—पूर्वीच्या काळांतील कांहीं वनस्पती व प्राणी वगैरे भूकंपांत अगर अन्य कारणानें पृथ्वीच्या पोटांत गाडले गेले. त्यांच्यावर जमीनीच्या वरील थरांचा दाब पडून दगडांवर, कोळशांवर वगैरे त्यांचे ठसे उमटले गेले, तर कित्येकांचे भागच स्वतः दगडाप्रमाणें बनले. या सर्वांनां प्रस्तरीभूत पदार्थ अशी संज्ञा आहे. अशा प्रस्तरीभूत वनस्पती पुष्कळ सांपडल्या आहेत. यांच्यावरून पूर्वी कोणत्या वनस्पती कशा प्रकारच्या होत्या व हल्लीं त्या अस्तित्वांत आहेत किंवा नाहींत, असल्यास त्या तशाच आहेत किंवा त्यांत कांहीं फरक झालेला आहे वगैरे माहिती मिळते. या प्रस्तरीभूत वनस्पती पृथ्वीच्या आवरणाच्या कोणत्या थरांत सांपडतात त्यावरून त्या अजमासें केव्हां जीवंत होत्या याचें अनुमान भूस्तर-शास्त्रज्ञांनां करितां येतें. यावरून प्रथम कोणत्या वनस्पती होत्या, नंतर कोणत्या आल्या, त्यांत फेरबदल काय व कसे झाले वगैरेंचें ज्ञान आपणांस होतें.

अपुष्पवर्गांतील अशा प्रस्तरीभूत वनस्पती पुष्कळ उपलब्ध आहेत. परंतु स्थाणुवर्ग आणि वाहिनीमय अपुष्पवर्ग यांतील मधला दुवा कांहीं अजून सांपडलेला नाहीं. वाहिनीमय अपुष्प वर्गांत मात्र पुष्कळ नवीन वनस्पतींची भर पडली आहे, व त्यामुळें हल्लींच्या वनस्पतींचें वर्गीकरण बरोबर करितां येतें. नेचे व अनावृतबीज वर्ग ( Gymnospermia ) म्हणून एक अपुष्प वर्गाचा भाग आहे तो, यांच्या मधल्या जागेंतील कांहीं वनस्पती सांपडल्यामुळें अपुष्पांपासून सपुष्पापर्यंतचा दुवा सांपडला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

स्था णु व र्गः—या वर्गांतील वनस्पती अतिशय नाजूक असल्यामुळें त्या अश्मीभूत स्थितींत जाण्याला अयोग्य आहेत. यामुळें त्यांच्यांतील कांहीं जातींचे अवशेष सांपडत नाहींत. पण यावरून त्या वनस्पती त्या वेळीं अस्तित्वांत नव्हत्या असें मात्र अनुमान काढतां यावयाचें नाहीं. अगदीं खालच्या सिलुरियन थरांत कांहीं पाणकेश सांपडतात. परंतु हे कोणत्या प्रकारचे आहेत, यांचा इतरांशीं कोणता संबंध आहे वगैरे ओळखतां येत नाहीं. सायफोनेल म्हणून हिरव्या पाणकेशांत एक प्रकार आहे त्यांपैकीं कांहीं वनस्पती अगदीं पहिल्यापासून सांपडतात. त्यानंतर कांहीं काळानें तांबड्या पाणकेशांतील सांपडतात. एकपेशीमय वनस्पतींत द्रव्वीवर वाळूचे कण असलेली त्वचा असते त्यामुळें त्या चांगल्या राहिल्या आहेत. त्यांपैकीं कांहीं तर हल्लीं अस्तित्वांत असलेल्या वनस्पतीपैकीं आहेत. यांचें थरचेथर "किसेलगूर" नांवाची माती म्हणून प्रसिद्ध आहे. त्यानंतर कांडशरीरिका पुष्कळ सांपडते. सूक्ष्मजंतू या वनस्पती बहुधा अगदीं प्रथम कालापासून कुजणाऱ्या सेंद्रिय पदार्थांवर असाव्या. कर्बजनक (Carboni ferous) कालापासून मात्र त्या दुसऱ्या वनस्पतींच्या अवशेषांत असलेल्या सांपडतात. अविभाजितालिंब व विभाजितालिंब वनस्पतीपैकींहि कांहीं त्या वेळेस होत्या व शिलावल्काचे अवशेषहि याच वेळेस सांपडतात.

शै वा ल व र्गः—यांतील अवशेष फार क्वचित् सांपडतात. जे कांहीं सांपडतात ते सर्व कर्बजनक कालापासून पुढें आहेत.

वा हि नी म य अ पु ष्प व र्गः—यांतील अवशेष अगदीं प्रथम कालापासून सांपडतात. पण कर्बजनककाळीं सर्व पृथ्वीवर जणूं कांहीं यांचेंच साम्राज्य होतें असें दिसतें. त्या वेळेस जेवढ्या वनस्पती जमीनीवर होत्या त्या सर्वांत यांची संख्या जास्त होती, व यांचा पूर्ण विकासहि याच वेळेस झाला होता. जसे जसे अनावृत्त व प्रच्छन्न बीजवर्ग ( Gymnosperms and Angiosperms ) अस्तित्वांत येऊं लागले तसें तसें यांचें महत्त्व कमी कमी होऊं लागलें.

( १ ) अश्वपुच्छें:—यांचीं हल्लीं एकच जात आहे पण त्या वेळीं यांच्या अनेक जाती होत्या. प्राणिपूर्वकाळापासून या सांपडतात. यांची रचना साधारणतः हल्लींच्या सारखीच होती. परंतु त्यांचा आकार फार मोठा असे. कित्येक तर १०० फुटापर्यंतहि वाढत. कांडाग्रावर लांब लांब फांद्या वर्तुळाकार येत असत व खोडावर एक त्वचा असून त्यांत उपवाढ होत असे. पानें लांब पातीसारखीं असून बुंधाशीं एकमेकांशीं चिकटून त्यांचें खोडावर आच्छादन होत असे. अगदीं पूर्वीच्या काळीं त्यांचे द्विपाद विभाग होत असत. तुऱ्यांतील रचना कांहींत हल्लींसारखीच होती पण पुष्कळांत जास्त भानगडीची असून दर दोन पानांमध्यें एक वल्कपर्ण ( Scale ) असे. निदान कांहींत तरी जननपेशी दोन प्रकारच्या होत्या.

( २ )मुद्गलकें.—यांतील पुष्कळ प्रकार प्राणिपूर्व काळापासून होते. यांनां फांद्या न फुटतां त्यांचीं खोडें खांबांप्रमाणें उंच व जाड वाढत असत. या वनस्पती कर्बजनक काळीं असत. यांनां लांब पानें असून तीं झडून गेल्यावर खोडांवर त्यांचे वण पडत. दुसऱ्या एका प्रकारांत त्यांनां द्विपाद फांद्या फुटत व त्यांची उंची १०० फुटांपर्यंत वाढे. यांनां दोन प्रकारच्या जननपेशी असत. यांशिवाय मुद्गलकें व अश्वपुच्छें यांच्या दरम्यान एक जात सांपडते. कांहींत बियांसारखा एक अवयव सांपडतो.

( ३ )नेचे.—कोळशांच्या काळीं यांचा पूर्ण विकास झाला होता. पाणनेच्यांपैकीं अमूलक जलवर्ती व पर्णगुच्छक स्थलवर्ती जाती खडूच्या काळापासून दिसतात.

मुद्गलकें व अश्वपुच्छें हे वाहिनीमय अपुष्पाचेच प्रकार खरे परंतु त्यांत त्यांचा जास्त विकास झाला नाहीं, नेच्यांत मात्र झाला. त्यांच्या पासून बीं उत्पन्न करणाऱ्या वनस्पती झाल्या. अगदीं पूर्वकालीन अनावृत बीजवर्ग आणि नेचे यांच्या मध्यें एक जात होती. ही कर्बजनक काळीं फार महत्त्वाची होती. तिची साधारण रहाणी व रचना नेच्यासारखी होती परंतु तिला दोन प्रकारच्या जननपेशी येत' स्त्री जननपेशी अनावृत बीजांतील सायकाडासी ( Cyeadaceae ) या जातीच्या बियांसारख्या असत परंतु त्या सायकाडासीप्रमाणें विशिष्ट फुलांत येत नसत. अशा तऱ्हेनें अपुष्प व सपुष्प वर्गांतील दुवे पूर्वीच्या काळच्या वनस्पतींत सांपडतात.

र. रा. देव.

अपेनाइन्सः—ही पर्वतांची रांग इटलीच्या मधोमध आहे. पूर्वी आपेनाइन्स हें नांव फक्त उत्तरेकडील ओळीसच देत असत परंतु अलीकडे यानें एकंदर रांगेचाच बोध होतो. अर्वाचीन भूगोलवेत्ते या पर्वताचे, उत्तर, मध्य, व दक्षिण अपेनाइन्स असे तीन भाग करतात.

उत्तर आपेनाइन्सचे पुन्हां लिग्युरियन, टस्कन व अंब्रियन असे तीन भाग आहेत. लिग्युरिअन लासिसाघाटापर्यंत, टस्कन तेथून पुढें टायबरच्या उगमस्थानापर्यंत व अंब्रियन पुन्हां काग्ली घाटापर्यंत. ही उत्तरेकडील ओळ प्रथम जिनोआच्या आखातास समांतर असें वळण घेऊन नंतर पूर्व व आग्नेय यांच्यामधील दिशेचें अवलंबन करून किनाऱ्यास समांतर अशी गेलेली आहे. अशा तऱ्हेनें ही पर्वतांची ओळ इटलींत आडवी पसरली आहे उत्तरेकडील लिग्युरियन ओळीपासून बऱ्याचशा नद्या पो नदीस मिळतात परंतु दक्षिणेकडील नद्या मुळींच महत्त्वाच्या नाहींत. टायबर नदीचा उगम अंब्रियन ओळींत आहे. लिग्युरियनचें मॉन्ट व्यू हें शिखर ५९१५ फूट उंच आहे. टस्कनचें शिखर मॉन्ट सिमोन (७१०३ फू. ) व अंब्रियनचें शिखर मॉन्ट नीरोन ( ५०१० फू. ). या ओळींमधून आगगाड्यांचे बरेच फांटे गेले आहेत. जिनोआपासून हॉन्कोच्या फांद्यावर एक ५ मैलांचा बोगदा आहे. टस्कनच्या रांगेंत पश्चिमेकडे खनिज व रसायनिक पदार्थ सांपडतात. हे याच्या इतर कोणत्याहि भागांत आढळून येत नाहींत.

मध्य अपेनाइन्स ही प्रमुख ओळ असून बरीच लांब आहे. शिखरें:—मॉ. व्हेटोर. ( ८१२८ फू. ), मॉं. व्हेलिनो ( ८१६० फू. ), मॉ. अॅमॅरो ( ९१७० फू. ). पश्चिमवाहिनी नद्यांत नीरा ही प्रमुख होय. रोमजवळील ज्वालामुखीपर्वत टायबर नदीच्या योगानें मध्यरांगेपासून तोडले गेले आहेत.

दक्षिण अपेनाइन्समध्यें लहान पर्वतांचे धरे मिळून तीन समांतर ओळी झाल्या आहेत. पूर्वेकडील मॉ. गॅर्गानो भूचिर व नेपल्सच्या आसपासचे ज्वालामुखी हे मुख्य रांगेपासून बरेच अलिप्त आहेत. मॉ. पोलिनो ( ७३२५ फू. ) हें सर्वांत उंच शिखर आहे. सिबारीच्या मैदानाजवळच चुनखडीचा भाग संपून ग्रानाइटच्या भागास सुरवात होते. कॅलेब्रिया पर्वत हें याचें नांव होय.

अपेनाइन्स पर्वतावर जंगल आहे. प्राचीनकाळीं हें फार दाट असून पाइन, ओक, बीचवुड वगैरेची येथें समृद्धि असे. लांडगे येथें बरेच सांपडतात परंतु अस्वलें दृष्टीस पडत नाहींत. अत्युच्च शिखरें सर्व वर्षभर हिममय असतात. खनिज पदार्थ जरी येथें उत्पन्न होत नाहींत तरी द्रवरूप खनिज पदार्थांचे व गरम पाण्याचे झरे हीं मोठ्या प्रमाणांत आढळतात.

आपेनाइन्स व आल्पस या दोन पर्वतांच्या ओळी संलग्न आहेत परंतु आल्प्सच्या कक्षेचा आपेनाइन्सशीं कांहींच संबंध दिसून येत नाहीं. ब्रेनकॉनेची कक्षा ( तेथील खडकांचें थर )जिनोआचे आखातापर्यंतच असल्याचें दिसून येतें.

आल्प्समध्यें ज्याप्रमाणें, ज्याच्या चिपा काढतां येतील असे पैलूदार खडक आहेत त्याप्रमाणें ते अपेनाइन्सच्या दक्षिणेकडील टोंकांखेरीज इतर कोठेंहि दिसून येत नाहींत. अपेनाइन्समध्यें मध्ययुगीन किंव द्वितीयावस्थाक (मेसोझोइक) व तृतीयावस्थाक (टर्शअरी) थरांचाच अधिक भरणा आहे. एप्युअन आल्प्स मधील प्राचीन खडकांच्या थरांचे अवशेष टस्कन किनाऱ्यावरील बेटांत, सिसरो भूशिरांत इ० ठिकाणीं सांपडतात. परंतु अपेनाइन्समध्यें त्यांचा पूर्ण अभाव आहे. दक्षिण अपेनाइन्समधील नवप्रभात (एओसीन) थरांवरून तृतीयावस्थाक थरांचे वेळीं पैलूदार खडकाच्या थरांची चांगली समृद्धि असली पाहिजे असें वाटतें. टिन्हेनियन समुद्राचे जागीं तृतीयावस्थाक काळीं असे खडकाचे थर असणारा डोंगराळ प्रदेश होता असें अनुमान निघतें.

कॅलेब्रिया खेरीजकरून अपेनाइन्समध्यें पुढील थरांचा समावेश होतो. त्रिस्तर ( ट्रिआसिक ), ज्युरीन ( ज्युरासिक ), सितोपल ( क्रेटॅसियस ), नवप्रभात ( एओसीन ) व नवपूर्व ( मिओसीन ). एओसीन थरांचे काळांत थरावर थर चढून पर्वताची रांग तयार झाली, समुद्र उथळ झाला व हे थर कॉंग्लोमरेटिक खवल्यांनीं असे बनले. अशा तऱ्हेनें थरावर थर चढून यांची उंची फारच वाढली व अनेक तळीं उत्पन्न झालीं. द्वितीयावस्थाक व तृतीयावस्थाक थर समुद्रांत गडप झाले. ह्या पर्वतावर वर्फाचे डोंगर नाहींत.

**अपोलोनिआ**—या नांवाचीं तीसाहून जास्त शहरें आहेत. त्यांत अतिशय महत्त्वाचें म्हणजे इलीरीया मधील अपोलोनिया होय. हें ऑस ( Aous ) च्या दक्षिण तीरावर असून कॉरिन्थिअनांनीं बांधलें आहे. मॅसिडोनच्या फिलिपशीं झालेल्या लढाईंत हें एक महत्त्वाचें लष्करी ठाणें होतें. या शहराची वाङ्मय आणि तत्त्वज्ञान या विषयांतहि बरीच ख्याती होती. रोमचा ऑगस्टस येथेंच शिकत असे. दुसरें एक याच नांवाचें शहर काळ्या समुद्राचे किनाऱ्यावर थ्रेशिआ प्रांतांत आहे. येथें एक अपोलोचा भव्य पुतळा आहे.

**अप्पय्यादीक्षित**—हा जातीचा द्रविड ब्राह्मण होता. कांची नगराच्या आग्नेयी दिशेस आदिमाल्यनामक अग्रहारांत हा रहात असे. याच्या बापाचें नांव नारायण दीक्षित असें कविचरित्रकारांनीं दिलें आहे. ( ऑफ्रेक्ट–कॅटलोगस कॅटलोगोरम रंगराज असें देतो. ) शालिवाहनाच्या पंधराव्या शतकांत विजयानगरच्या कृष्णदेव राजाच्या कारकीर्दींत हा होऊन गेला. याचा इतिहास असा आढळतो कीं यानें आपल्या वयाच्या बाराव्या वर्षी वेदाध्ययन संपवून शास्त्राभ्यासास आरंभ केला; व तें अध्ययन समाप्त झाल्यावर शांकर वेदांताचेंहि मनन केलें. हा खरा वेदशास्त्रसंपन्न, सदाचारशील आणि निर्मत्सर बुद्धीचा असल्यामुळें शैवांत व वैष्णवांत अत्यंत मान्य असे.

यास बायका तीन होत्या व तिघींचे मिळून ११ मुलगे होते. यानें आपल्या भर उमेदींत कित्येक सभांत जाऊन न्याय वगैरे विषयांत व मुख्यत्वेंकरून शिव आणि विष्णु यांच्या साम्यदर्शनांत महान् महान् पंडितांशीं वाद केला, आणि त्यांचें मत खंडित केलें, तेणेंकरून चंद्रगिरी येथील राजा व्यंकटपति रायलू याची यावर मोठी भक्ति बसली, व त्यानें याचें सर्व कुटुंब आणि विद्यार्थी यांच्या निर्वाहाकरितां यास मोठ्या उत्पन्नाची जमीन इनाम करून दिली. तिच्यावर हा स्वस्थपणानें निर्वाह करून विद्यार्थ्यांस पढवूं लागला.

पुढें यानें कित्येक ग्रंथ लिहिले ते येणेंप्रमाणें. तीस अध्यायांचीं शिवस्कंद चंद्रिका; वीस अध्यायांचा शिवतत्त्वविवेक; या जगतास परम कारण एक शिवच, अशा तात्पर्याची शिवमणिदीपिका; शिवकर्णामृत; पंचरात्रागममतखंडन; सत्तावीस पटलांचा वीरशैवनामक ग्रंथ; शतश्लोकी आत्मार्पण ग्रंथ; रामायण सारस्वत; आणि नामसंग्रहमाला व शब्दप्रकाश हे दोन कोश, यांत आरंभींचे तीन ग्रंथ कित्येक यज्ञ केल्यावर लिहिले असून बाकीचे सर्व मागून लिहिले आहेत.

आत्मार्पण ग्रंथाविषयीं असें सांगतात कीं, तो करण्यासाठीं यानें अगोदरपासून धोत्र्याच्या बिया खाण्याचा क्रम चालविला होता. कारण धर्माविषयीं विचार करण्यास अंतःकरण फार निर्मल पाहिजे व तें साफ राखण्याची शक्ति या वनस्पतीच्या अंगीं आहे, म्हणून तिच्या योगानें जें जें यास स्फुरलें तें तें यानें लागलीच चार लेखकांकडून लिहविलें ! या ग्रंथाविषयीं दक्षिण हिंदुस्थानांतील सर्व लोक पराकाष्ठेचें आश्चर्य करितात इतका तो उत्कृष्ट झाला आहे.

अप्पय्यादीक्षित त्रिचनापल्ली, तंजावर आणि मदुरा इत्यादि ठिकाणच्या राजांस भेटावयास गेला असतां तेथें त्यांनीं याची विद्वत्ता व बुद्धिमत्ता पाहून पुष्कळ बक्षिसें देऊन प्रोत्साहन दिलें. त्यावरून यानें वेदांत, न्याय व अलंकार इत्यादि विषयांवर ८४ ग्रंथ लिहिले. त्यांत कुवलयानंद व चित्रमीमांसा हे दोन अलंकार विषयावरील ग्रंथ उपलब्ध आहेत, " प्रबोध चंद्रोदय " हा ग्रंथ दीक्षितांचा नसावा असें आधुनिक ऑफ्रेक्टसारखे पंडित मानतात. " नीलकंठविजय " हें चंपूकाव्य दीक्षितांचा नातू नीलकंठ यानें लिहिलें ( डॉ. हुल्टझेस रिपोर्ट ऑन संस्कृत मॅनसक्रिप्ट्स् नं. २ पा. ८ ). वृत्तिवार्तिक, रत्नपरीक्षा व सिद्धांतलेश हे वेदांत विषयावरील याचे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. शिवाय मध्वमुखकपोलचपेटिका, मध्वमतकुठार, रामानुजमतविध्वंस, दशकुमारचरितसंक्षेप इत्यादि याचे अनेक ग्रंथ आहेत. " वसुमतिचित्रसेनविलास " नावाचें यानें जें नाटक रचिलें आहे तें व "वसुमतिचित्रसेनीय" एकच असावें. ( स्टेन कोनो–इंडियन ड्रामा ).

हा मोठा नैष्ठिक व स्वधर्मतत्पर असल्यामुळें यानें कावेरी नदीच्या तीरीं अनेक यज्ञ केले व पुनः विद्यार्थ्यांस पढवीत स्वस्थ राहिला. याकडे जो जो कोणी मनुष्य येई त्याजवळ हा शिवाचीच स्तुति करी व तद्विषयक सिद्धांत त्यास मोठ्या आल्हादानें सांगून जें वाक्य त्याजपुढें म्हणे तें असें:—

मुरारौच पुरारौच न भेदः पारमार्थिकः ॥
तथापि मामकी भक्तिश्चंद्रचूडे प्रधावति ॥ १ ॥

अर्थः—विष्णु आणि शिव या दोघांत वास्तविक दृष्ट्या कांहीं भेद नाहीं, तथापि माझी भक्ति चंद्रशेखर जो शिव त्यांच्याकडे धांवते.

याबद्दल एक आख्यायिका सांगतात कीं, हा एकदां विष्णुमंदिरीं दर्शनास गेला, व तेथें ' शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगं ॥ लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यं वंदेविष्णुं भवभयहरं सर्व लोकैकनाथं " असें ध्यान म्हणावयाचें विसरून " ज्ञातं पद्मासनस्थं शशधरमुकुटं पंचवक्त्रं त्रिनेत्रं शूलं वज्रंच खड्गं परशुमभयदं दक्षभागे वहंतं ॥ नागं पाशंच घंटां प्रलय हुतवहं सांकुशं वामभागे नानालंकारयुक्तं स्फटिकमणिनिभं पार्वतीशं नमामि" असें म्हटलें. तेणेंकरून देवळांतील विष्णुमूर्ति अदृश्य झाली व त्या जागीं शिवप्रतिमा प्रगटली. परंतु लोकांच्या दृष्टीस असें पडल्यावर, त्यांनीं ती गोष्ट येऊन यास कळविली. तेव्हां यानें विष्णूचें ध्यान पुनः म्हणून पूर्ववत विष्णुमूर्ति प्रकट केली. दुसरी एक आख्यायिका अशी आहे कीं, एकदां ताताचार्य नामक द्वैत वेदांती व वैष्णवपंथाचा एक मोठा गुरु व्यंकटपतिरायाच्या दरबारीं वाद करूं लागला असतां यानें त्याचा पराजय करून टाकला. त्यावरून ताताचार्यानें याशीं हाडवैर बांधून हा राजाच्या नगरांतून निघून आपल्या गांवीं चालला असतां मार्गांत यावर मारेकरी पाठविले. परंतु ते यास येऊन गांठतात, तों मध्येंच कोणी वीरपुरुष प्रकट होऊन त्यानें त्यांस पिटाळून लाविलें. व हा आपल्या घरीं येऊन सुखरूप पोहोंचला. ही गोष्ट राजास कळल्यावर त्यानें दीक्षितांचा अमूल्यवस्त्राभरणांनीं सत्कार करून ताताचार्याचा अतिशय धिक्कार केला.

कांहीं दिवसांनीं दीक्षित महायात्रेस गेले, व तेथें त्यांची जगन्नाथ राय पंडिताशीं गांठ झाली. त्रिस्थळीची यात्रा झाल्यावर परत गांवी आले असतां पुढें पारमार्थिक विषयावर त्यांनीं संस्कृतांत पदें लिहिलीं त्यांतील एक असें आहे.

ब्रह्मैवाहं किल सद्गुरोः कृपया ॥ ध्रु ॥ ब्रह्मैवाहं ब्रह्मैवाहं ॥ सत्यज्ञानानंत घनोहं ॥ दृश्यादृश्य भासातीतं ॥ हेतुविहीनं सुगम स्वरूपं ॥ ब्रह्मै० ॥ १ ॥ मायाऽविद्या जीवेश्वरयोः ॥ सर्वाधारं चाधिष्ठानं ॥ सर्वातीतं सर्वांतरयोः ॥ सच्चित्सुखमय पूर्ण स्वरूपं ॥ ब्रह्मै० ॥ २ ॥ भेदाभेदो भयविवर्जितं ॥ सर्वद्रष्टा साक्षिमयोहं ॥ भगवत्पादीय मिदं ज्ञानं दीक्षितसूनो र्गतमज्ञानं ॥ ब्रह्मैवाहं किल सद्गुरोः कृपया ॥ ३ ॥

या पदावरून भगवत्पूज्यपाद जे शंकराचार्य त्यांच्या सिद्धांताविषयीं याची खात्री झालेली कीती दृढ होती हें उघड दिसून येतें.

पुढें दीक्षित अक्षय्य काशीवास करण्याच्या हेतूनें तयारी करूं लागले. परंतु ग्रामस्थांनीं स्वदेश सोडून जाऊं नये असा आग्रह केल्यावरून मूळ आचार्यांची जन्मभूमि जें चिदंबरपूर तेथें जाऊन ते राहिले; व आपला सर्व काळ तेथें त्यांनीं स्वधर्माचरणांत घालविला. दीक्षितांजवळ स्फटिकाचीं पांच शिवलिंगें होतीं. त्यांतील त्यांनीं ब्राह्मणास २, पुतण्यास १, मुलास १ येणेप्रमाणें देऊन एकाची चिदंबर येथें स्थापना केली; पुढें थोड्याच काळानें ते आपल्या वयाच्या ९० व्या वर्षी चिदंबर येथें मरण पावले. [ आधार वाङ्मयः—कविचरित्र, अर्वाचीन कोश. ऑफ्रेक्टचा क्याटलाग वगैरे लेखांत दिलेलें. )

**अप्पर**—:हा विख्यात तामिळी गूढवादी कवि सातव्या शतकांत होऊन गेला. मरुलनीकियर हें त्याचें आईबापांनीं दिलेलें पाळण्यांतील नांव होतें. कुडलोर जिल्ह्यांत थिरुअमुर या गांवीं वेल्लाळ जातींत मरुलनीकियरचा जन्म झाला. थिलथवडियर नांवाची याला एक वडील वहीण होती. तिचें एका सुभेदारावरोवर लग्न ठरलें होतें पण लग्न होण्यापूर्वीच तो लढाईंत पडला. याच अवधींत तिचे आईबाप वारले. तेव्हां अतिशय दुःखी होऊन तिनें अग्निप्रवेश करण्याचा निश्चय केला पण भावाकडे—मरुलनीकियराकडे-लक्ष देऊन केवळ त्याला संभाळण्याकरितां ती मागें राहिली.

यावेळीं जैनसंप्रदायाची चढती कमान होती. मरुलनीकियर मोठा झाल्यावर त्याच्या मनांत अध्यात्माविषयीं विचार घोळूं लागले व त्यानें होऊन म्हणा किंवा कोणी जैनभिक्षूनें त्याला भुलविलें म्हणून म्हणा, त्यानें जैनधर्म अंगीकारला व त्याचा गहन अभ्यास केला; तो इतका कीं पाटलीपुत्रांत जैनांनीं त्याला आपला गुरु केलें.

ज्याकरितां आपण मृत्यूला दूर सारून पुन्हां संसारांत पडलों तो आपला भाऊ भ्रष्ट होऊन दूरदेशीं गेला हें पाहून थिलथवडियरच्या कोमल अंतःकरणास चरका बसला व ती आपलें गांव सोडून थिरुअथिकै ( कुडलोर जिल्हा ) या क्षेत्राला जाऊन राहिली. इकडे मरुलनीकियर पाटलीपुत्रांत मोठ्या आनंदांत होता. त्याला घरची किंवा बहिणीची आठवणहि होत नसे. पण एके दिवशीं त्याची, भयंकर पोटशूळ उठून, प्राणांतिक अवस्था झाली. त्याच्या जैन सहवास्यांनीं पुष्कळ ऊपाय केले पण व्यर्थ. शेवटीं आपण जगत नाहीं असें पाहून त्याला आपल्या बहिणीची आठवण झाली व तिला भेटण्याची इच्छा धरून त्यानें तिला दक्षिणेंत बोलावणें पाठविलें. पण या मानी वेल्लाळ कुमारीनें मी कोणत्याहि जैन मंदिरांत पाऊल घालणार नाहीं, किंवा जैनाचें तोंड पाहाणार नाहीं असा उलट निरोप धाडिला; तेव्हां मरुलनीकियर तसाच जैन परिवार, वस्त्रें, चिन्हें वगैरे फेंकून थिरु अथिकैला धांवत गेला व त्यानें आपल्या वहिणीचे पाय धरिले. पुढें अशा रीतीनें पुन्हां धर्मांतर केल्यावर त्याची व्याधि गेली व तो कट्टा शिवभक्त बनला.

त्यावेळच्या जैन पल्लवराजानें आपला जैन धर्म अप्परनें टाकून दिल्याचें ऐकून त्याचा आतोनात छळ चालविला. अप्पर या छळास न जुमानतां सदोदित शिवमहिमा गात असे. पुढें राजानें कंटाळून स्वतःच शिवदीक्षा घेतली. नंतर अप्पर यात्रेला निघाला. त्याला वाटेंत अप्पुधी, संवंदर वगैरे समकालीन ब्राह्मण साधु भेटले; त्यांनीं या वेळ्ळाळ संताला बरोबरीनें वागविलें. मदुरेच्या पांड्यराजाला जैन धर्मापासून परावृत्त करणारा त्यावेळचा सुश्लोक साधु संवंदर मक्तनीकियरला "अप्पर" ( तामिली अर्थ–पिता ) या नांवानें मोठ्या आदरानें संबोधित असे. त्यावरून याला "अप्पर" हें नांव पडलें. अप्पर बऱ्याच ठिकाणीं हिंडला व त्या त्या ठिकाणच्या देवतांना उद्देशून त्यानें अनेक स्तोत्रें लिहिलीं व शेवटीं पुंपुकलुर येथें कायमचा जाऊन राहिला. अंतकाळीं अप्परचें वय वरेंच होतें.

अप्परसंबंधीं बऱ्याच कथा प्रचलित आहेत. तो जवळ ( देवळांतील गवत काढण्याकरितां ) पावडें वाळगीत असे असें सांगतात व त्यामुळें सिलोन व दक्षिण हिंदुस्थान यांत सांपडणाऱ्या अप्परच्या अनेक मूर्तींत पावड्यासारखें कांहीं दाखविलें असतें. अप्पर हा एक तामिळ शेतकरी असल्यानें त्याच्या काव्यांत गूढवादाबरोवर सामान्य मजुराचें चित्रहि दृग्गोचर होतें. अप्परनें केलेल्या सुमारें तीनशें कविता आहेत. इतर तामिळी कवींच्या प्रमाणें अप्परच्या काव्यांतहि शिवनृत्य जागजागीं वर्णिलेलें आढळतें. दक्षिण हिंदुस्थानांत त्यावेळीं जो नवीन आस्तिक्यवादाचा पंथ उदयास येत होता त्याला अप्परच्या कवितांमुळें वरीच मदत झाली; त्याचप्रमाणें रहस्यमय धर्माचे बोल आपल्या कवितांच्या द्वारें अप्परनें लोकांना ऐकविले; व त्याचीं गाढ व व्यापक तत्त्वें त्यांच्या निदर्शनास आणिलीं.

**अप्पाशास्त्री**–यानें 'लवलीपरिणय', आणि 'सारस्वतादर्श' नांवाचीं नाटकें लिहिलीं. शिवाय "अप्पाशास्त्रीवादार्थ" आणि "चिल्लरवादाः" हे ग्रंथ लिहिल्याचे उल्लेख आढळतात [ Rice. P. 264,268, Oppert II. 3492; Burnell, 1209 ]

**अप्सराः**—या काल्पनिक भोग्य स्त्रिया स्वर्गांत वास करितात व देवादिकांना आणि पुण्यवंतांना सुख देतात असा सर्व धर्मीयांचा समज अनादिकालापासून आहे. मानवांना आदर्शभूत अशा देवादिकांनाहि परमपुण्याईनें मानवांनां प्राप्त होणाऱ्या स्वर्गांत या भोगांगना लागतात ही कल्पना सुखलोलुप मानवी डोक्यांतूनच निघाली असली पाहिजे. असो. कारणमीमांसा फारशी न देतां भारतीय व भारतीयेतर अप्सरांविषयीं कल्पना कडे वळूं.

**भारतीय**—अप्सरा हा शब्द वैदिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं आला असून तो नेहमीं गंधर्व या शब्दाशीं जोडून येतो. अप्सरा या स्त्रिया असून त्या देवांच्या उपभोगासाठीं असत त्यांचा एक कायमचा पति नसे. ऋग्वेदांत (१०, १२३, ५ ) 'आपल्या जारापुढें हंसतमुखानें येणारी' असें अप्सरेचें वर्णन आलें आहे. यजुर्वेदांतहि अशा प्रकारचें वर्णन आलेलें आहे. अथर्ववेदांत अप्सरांच्या संबंधीं जास्त माहिती आलेली आढळते. त्या जलांत क्रीडा करणाऱ्या असत या अर्थी अप्सरा या शब्दाची व्युत्पत्ति सायणांनीं ऋग्वेद भाष्यांत दिली आहे. अप्सरा कामविकारानें दुसऱ्यांनां मोह पाडणाऱ्या आहेत (अ.६.१३,१); अप्सरा नृत्य करणाऱ्या असत (अ४.३७,७);त्या नदींत विहार करणाऱ्या असत (४.३७,३ ); अशा प्रकारचे उल्लेख अथर्ववेदांत आले असून ज्या ठिकाणीं प्रेंख (झोंपाळे) आहेत तेथें अप्सरा जावोत (अ.४.३७,४); कृत्यांनीं युक्त अशा अप्सरा (अ.११.११,१५); असेहि उल्लेख आढळतात. यांसंबंधीं जास्त वैदिक माहिती वेदविद्या विभागांत ( पा. ३४१ ) सांपडेल. महाभारतांत अप्सरांचा उल्लेख अनेक ठिकाणीं आला आहे. देवर्षी कश्यपापासून प्राधेला रंभादि अप्सरा झाल्या असें संभवपर्वांत (म.भा,१.६५ ) सांगितलें आहे. यांची कामगिरी म्हणजे देवांच्या सभेंत नृत्य व गायन करणें आणि कोणी एखादा तपोनिष्ठ तीव्र तपाचरण करीत असेल तर त्याला शृंगार चेष्टांनीं मोहित करून त्याला तपाचरणापासून पराङ्मुख करावयाचें. अशा प्रकारें त्यांचें वर्णन महाभारतांत व इतर पुराणांत आलें आहे. अप्सरांचे अनेक गण आहेत त्यांमध्यें दैविक व लौकिक असे दोन भेद आहेत. दैविकामध्यें दहा व लौकिकामध्यें चवतीस अप्सरा आहेत असें एके ठिकाणीं म्हटलें आहे. उर्वशी, घृता ची, रंभा, तिलोत्तमा व मेनका या मुख्य अप्सरा होत. त्यांचें थोडक्यांत वर्णन असें:—

ऋग्वेदांत ज्या एकाच अप्सरेचें नांव आढळतें ती उर्वशी होय. पुरूरवा-उर्वशी प्रेमसंवाद दहाव्या मंडळांत आहे ( १०.९५.१०-१७ ). उर्वशीसंबंधीं गोष्ट भारतांत पुढील प्रमाणें आहे. इंद्राच्या सभेंत नारदानें केलेल्या पुरूरव्याच्या सौंदर्याचें व शौर्याचें वर्णन ऐकून तेथें असलेली उर्वशी मोहित झाली व पुरूरव्याशी तिनें समागम केला. परंतु उर्वशी निघून गेल्यामुळें इंद्रास सुख वाटेना म्हणून त्यानें गंधर्वांकडून उर्वशीनें पुरूरव्याशीं केलेल्या अटी मोडावयास भाग पाडून उर्वशीला परत इंद्राकडे आणिलें. मित्रावरुणापासून ऊर्वशीच्या ठिकाणीं वसिष्ठाचि उत्पत्ति झाली.

**घृताचीः**—एकदां भरद्वाज ऋषि नदीतीरावर स्नानार्थ गेले असतां त्या ठिकाणीं स्नान करीत असलेल्या व वाऱ्यानें जिचें वस्त्र उडत आहे अशा घृताची नामक अप्सरेला पाहून कामवासनेनें व्याकुल झाले. त्यांचें रेतरखलन झालें असतां तें त्यांनीं द्रोणांत धरलें व त्यापासून द्रोणाचार्य यांची उत्पत्ति झाली.

**रंभाः**—समुद्रमंथन केल्यावेळीं चौदा रत्नांमध्यें उत्पन्न झालेली ही अप्सरा सौंदर्याचें उपमान बनून राहिली आहे. इंद्रानें विश्वामित्राकडे हिला त्याच्या तपाचरणाचा भंग करण्याकरितां पाठविली असतां, विश्वामित्रानें, एक हजार वर्षेपर्यंत

तूं शिळा होऊन राहाशील, असा रंभेला शाप दिला. रामायणांत हिच्याविषयीं अशी गोष्ट सांगितली आहे कीं, एकदां रावण कैलासाला गेला असतां त्यानें हिला पहिली व तत्क्षणीं अत्यंत मोहित झाला. मी तुझ्या भावाचा ( कुबेराचा ) मुलगा जो (नलकूबर) त्याची पत्नी आहे असें रंभा सांगत असतांहि रावणानें तिला भ्रष्ट केली.

तिलोत्तमाः—शुंभनिशुंभ नामक असुरांपासून फार त्रास होऊं लागल्यामुळें त्यांच्या निवारणार्थ उपाययोजनेसाठीं देव ब्रह्मदेवाकडे गेले असतां ब्रह्मदेवानें विश्वकर्म्याला एक सुंदर स्त्री निर्माण करण्याची आज्ञा केली. त्या आज्ञेप्रमाणें विश्वकर्म्यानें अनेकविध रत्नांतील तिल तिल अंश घेऊन अत्यंत सुस्वरूप अशी स्त्री निर्माण केली. ब्रह्मदेवानें तिचें तिलोत्तमा असें नांव ठेवलें आणि तिला सुंदोपसुंदाकडे जाण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ती सुंदोपसुंदाकडे गेली असतां ही माझी स्त्री आहे असें ते दोघेहि तिला म्हणूं लागले व तें सिद्ध करण्यासाठीं आपआपसांत भांडूं लागले आणि त्यांत त्या दोघांचा अंत झाला. अशा प्रकारची तिलोत्तमेची हकीकत महाभारतांत ( आदिपर्व १३२. ) आली आहे.

मेनकाः—पांचाल नामक राजा पुत्रप्राप्तीसाठीं अरण्यांत राहून उग्र अशा प्रकारचें तप करीत असतां तेथें अत्यंत रूपसंपन्न व यौवनयुक्त अशी मेनका नामक अप्सरा आली. जितेंद्रिय अशा प्रकारचा तो पंचाल राजा असतां त्या मेनका नामक अप्सरेला पाहून मोहित झाला व तत्काल त्याचें रेतस्खलन पावलें. तें पाहून राजा अत्यंत लज्जित झाला आणि त्यानें तें रेत पायानेंच खालीं दाबलें असतां त्या रेतापासून एक पुत्र उत्पन्न झाला. त्याचें नांव द्रुपद असें ठेवलें. हा द्रुपद द्रौपदीचा पिता होय. ( म. भा. आदि. १५०, १० ).

एकदां विश्वामित्र दारुण तप करीत असतां त्याच्या तपाचरणानें आपलें इंद्रपद नष्ट होईल अशी इंद्राला भीति पडल्यामुळें विश्वामित्राच्या तपास विघ्न करण्यासाठीं मेनकेची योजना करण्याचें मनांत आणून त्याप्रमाणें त्यानें मेनकेस आज्ञा केली. परंतु विश्वामित्र आपल्या तपाच्या योगानें मला शापून भस्म करील यासाठीं मजबरोबर स्मर ( काम ) याला पाठवावें अशी तिनें विनंति केल्यावरून इंद्रानें तिजबरोबर स्मर यास पाठविलें. नंतर मेनकेनें विश्वामित्राच्या आश्रमांत जाऊन कामाच्या सहायानें तपोनिष्ठ अशा विश्वामित्राला मोहित करून त्याच्या तपश्चर्येचा भंग केला. पुढें विश्वामित्र मेनकेसह कालक्रमण करीत असतां मेनकेस विश्वामित्रापासून एक शकुंतला नामक कन्या झाली. ( म. भा. आदि. ९३,१५)

स्कंद पुराणांत एका अप्सरा कुंडाचा उल्लेख आला आहे. ब्रह्मदेवानें सर्व देवांच्या अंशानें निर्माण केलेली अप्सरा कैलास पर्वतावर गेली असतां शंकर तिला पाहून मोहित झाले परंतु जवळ असलेल्या पार्वतीला राग येईल म्हणून अप्सरेकडे पाहण्याचें धाडस शंकरास होईना. अप्सरा शंकरास प्रदक्षिणा करूं लागली असतां तिच्या मुखाकडे सतत पाहतां यावें यासाठीं शंकरांनीं आपणास चारीदिशेस चार तोंडें उत्पन्न केलीं. ही गोष्ट पार्वतीस नारदानें सांगितल्यावरून तिनें शंकराचे डोळे झांकले. तेव्हां जगांत प्रलय सुरू झाला. नारदानें पार्वतीस डोळे सोडण्यास विनंति केली, परंतु ती डोळे सोडीना. तेव्हां शंकरांनीं आपल्या कपाळावर तिसरा नेत्र उत्पन्न केला. पार्वतीनें 'तूं कुरूप हो' असा अप्सरेस शाप दिला. परंतु ब्रह्मदेवाच्या सांगण्यावरून तिनें अप्सरा कुंडांत स्नान केलें व त्यानें ती सुस्वरूप झाली. ( पद्मपुराण. )

नरनारायण ऋषि बदरिकाश्रमीं तपश्चर्या करित असतां त्यांस विघ्न करण्यासाठीं इंद्रानें अप्सरा पाठविल्या. नरनारायणास ही गोष्ट समजल्यावर त्या अप्सरांना लाजविणारी अशी एक अप्सरा त्यांनीं आंब्याच्या मोहोरापासून तयार केली. तिला पाहून सर्व अप्सरा लज्जित झाल्या व त्यांनीं ही हकीकत इंद्रास सांगितली. इंद्रानें त्या अप्सरेस आणून आपल्या जवळ ठेवलें व तिचें नांव उर्वशी ठेवलें अशी पद्म पुराणांत कथा आहे. ( अवंतिखंड. अध्याय ८ ).

मराठींत खेडवळांच्या भाषेंत जलदेवतांना आसरा म्हणतात. हा शब्द अप्सरा या शब्दापासूनच निघालेला असावा. ऊर्वशी ही पुरूरव्याला पुन्हा आढळली ती पाण्यांतच जलक्रीडा करीत असलेली आढळली यावरून जल हें अप्सरांचें आश्रयस्थान असतें ही कल्पना फार प्राचीन दिसते. सायणांनींहि भाष्यांत अप्सरा शब्दाची व्युत्पत्ति पाण्यांतून जन्मलेली अशी केली आहे. या आसरा सात असतात अशी कल्पना आहे व नदीच्या पात्रांतील एखाद्या मोठ्या धोंड्यास शेंदूर लावून तेथें बांगड्या वगैरे वाहून या आसरांची पूजा खेडवळ लोक अजून करतात. पुराणांतील नागकन्यांप्रमाणें या सुंदर तरुणांस विशेषतः राजपुत्रास पाण्यांत ओढून घेऊन गेल्यावद्दलच्या कथाहि खेडवळ लौकिक वाङ्मयांत आढळतात.

[ संदर्भग्रंथ—वेदसंहिता, ब्राह्मण, पुराणें. वेदविद्या—ज्ञानकोशविभाग २ रा. मॅकडोनेल-वेदिक माथॉलाजी. डौसन —हिंदु क्लासिकल डिक्शनरी. गोल्डस्टकरचा कोश ( अप्सरा ).]

मुसलमानांत अप्सरांना हौरी असें नांव आहे. या हौरी सुंदर कुमारी असून नंदनवनांत पुण्यवान् मुसुलमान माणसांच्या सेवेंत राहातात. फारसी "हूरी", आरबी "हवरा" ( कृष्णनेत्री कुमारी ) या शब्दापासून हौरी शब्दाची उत्पत्ति आहे.

यूरोपीयन कल्पना.—ग्रीक पुराणांतून यांना सामान्यतः निंफ्सस् असें नांव आहे. निंफ हा शब्द "आच्छादित" या अर्थाच्या एका धातूपासून बनलेला असून, पूर्वी नवरीला नवऱ्याच्या घरीं झांकून नेण्याची जी चाल असे तिला धरून हा शब्द तयार करण्यांत आला असावा; तेव्हां याचा शब्दशः अर्थ लग्न झालेली किंवा उपवर स्त्री असा

होईल. अप्सरांचे साधारणतः दोन वर्ग पाडतात; पाण्यांतल्या व जमीनीवरच्या. जमीनीवरच्या अप्सरांतील कांहीं अरण्यांच्या, कांहीं डोंगरपर्वतांच्या, तर कांहीं दऱ्याखोऱ्यांच्या स्वामिनी असतात. पाण्यांतल्या अप्सरा समुद्र, नद्या, ओढे, नाले, सरोवरें इत्यादि जलाशयांच्या अधिष्ठात्री असतात. कांहीं पुराणकारांच्या मतें या अप्सरा अमर असत तर कांहीं म्हणत कीं या अप्सरा मर्त्य असतात पण त्यांचें आयुष्य फार चिरकाल टिकतें. यांची संख्या पूर्णपणें माहीत नाहीं, पण हेसिअडच्यामतें त्या ३००० वर असाव्यात. प्राचीन लोक यांची पूजाअर्चा करीत पण श्रेष्ठ देवतांचा दर्जा यांना देत नसत. यांचीं कोठें देवळें नाहींत. तसेंच यांचा नैवेद्य म्हणजे दूध, मध, तेल आणि कधीं कधीं एखादें बकरें. अप्सरांचें वर्णन करितांना त्या तरुण, सुस्वरूप, अविवाहित, मध्यभागापर्यंत वस्त्रावगुंठित व कधीं कधीं हातांतील भांड्यांतून खालीं पाणी ओतीत असलेल्या अशा दाखवितात. भांड्याऐवजीं केव्हां केव्हां हातांत गवत, पानें किंवा शिंपा त्या धारण करतांना दिसतात. त्यांना नग्नस्थितींत पाहाणें फार अनिष्ट असें समजत; कारण त्यामुळें पाहणाराला उन्मादवायु होतो व वेड लागतें. अप्सरांना त्यांच्या स्थलनामांवरून संबोधित, त्यामुळें कोण कोणती हें ओळखण्यास बरें पडे; उदाहरणार्थ सिसिलीच्या अप्सरांना सिसिलाइडस् म्हणतात.

[संदर्भ ग्रंथ—वॅलेन्टाइन-सम् फेजेस् ऑफ दि कल्ट ऑफ दि निंफ्स. लॅंप्रिएरे—क्लासिकल डिक्शनरी ( निंफ ) ए. ब्रि. ( निंफ ). ए. रिलिजन अँड एथिक्स ( नेचर वरशिप—ग्रीक ). ]

**अफगाणिस्तान.**—अफगाणिस्तान हा मध्यआशियांतील एक देश आहे. अंदाजानें याचें क्षेत्रफळ ( वदकशान व काफरिस्तान मिळून ) २४५,००० चौरस मैल आहे. लोकसंख्या सुमारें ५०,००,००० आहे. याचे उत्तरेस रशियन तुर्कस्थान, पश्चिमेस इराण, व पूर्वेस व दक्षिणेस काश्मीर, हिंदुस्थानच्या वायव्यसरहद्दीवरील टोळ्यांचा प्रदेश व बलुचिस्तान. अर्वाचीन काळांत आशयांतील रशिया व ब्रिटिश हिंदुस्थान या दोन विरोधी राज्यांमधील एक देश या नात्यानें अफगाणिस्तानला महत्त्व आलें आहे. १९ व्या शतकाच्या शेवटच्या पंचवीस वर्षांत या देशासंबंधीं आपली माहिती बरीच वाढली व याच्या उत्तर, पूर्व व दक्षिण सरहद्दी बारकाईनें कायम करण्यांत आल्या. दुसऱ्या अफगाण युद्धामुळें या देशाची विस्तृत प्रमाणावर शास्त्रीयरीत्या भूगोलविषयक पाहणी करतां आली. १८८४–८६ मधील रुसो--अफगाण कमिशननें याची उत्तर सरहद्द निश्चित करून नकाशा काढला. १८९३ मधील डुरँड करारानें दक्षिण व पूर्व सरहद्दीवरील पठाण टोळ्या अलग करण्यांत आल्या. पामीर कमिशननें ( १८९५ ) याची ईशान्य सरहद्द ठरविली. अखेरीस १९०४–१९०५ मधील इराणी—बुचची कमिशननें याची पश्चिमेकडील सरहद्द ठरविली.

**प्रांत.**—या देशाचे चार प्रांत आहेत. (१) उत्तर अफगाणिस्तान अथवा काबूल. (२) दक्षिण अफगाणिस्तान अथवा कंदाहार, (३) हिरात, (४) अफगाणी तुर्कस्तान, व घिलजाई, हझारा, गिझनी, जलालाबाद, काफरिस्तान यांसहित. नद्यांच्या पात्रांमुळें हे विभाग ठरविलेले आहेत. या देशांत मुख्य चार नद्या आहेत. (१) काबूल, (२) हेल्मंड, (३) हरिरुड व (४) ऑक्सस. हा देश मुख्यत्वेंकरून डोंगराळ आहे, परंतु चांगली लागवड केलेलें व पाट बंधाऱ्यांचे पाणी दिलेले असे कांहीं प्रदेश आहेत. या भागांत इतकीं विपुल फळें होतात कीं तीं बाहेर देशीं रवाना करतात. अफगाण लोक फार कुशल शेतकरी आहेत व पाणी पुरवठ्याचा जितक्या म्हणून नैसर्गिक सोयी आहेत त्यांचा ते चांगला उपयोग करून घेतात. पाटबंधाऱ्यांच्या व्यावहारिक शास्त्रांत चिनी लोकच त्यांचेवर वरचढ करूं शकतात.

**पर्वतः**—या देशांतील मुख्य पर्वत हिंदुकुश, कोहिबावा व फिरोझ पठार हे होत. सफेत कोहचें सर्वांत उंच शिखर शिकराम हें १५६०० फूट उंच आहे.

**भूस्तर.**—सितोपल (क्रेटॅसियस) काळांत जेव्हां हिंदुस्थानचें द्वीपकल्प मादागास्कर व दक्षिण आफ्रिका यांचेशीं जमिनीच्या एका पट्ट्यानें जोडलेलें होतें तेव्हां बलुचिस्तान, अफगाणिस्तान व इराण हे देश एकसारखे समुद्राचे खालीं नव्हते परंतु कोठें जमीन कोठें पाणी असे फेरफार दाखवीत असत. या सितोपल ( क्रेटॅसियस ) काळाच्या अखेरीस बऱ्याच सृष्टिविषयक घडामोडी घडून आल्या. त्यामुळें हिमालय पर्वत वर उंच झाला. तृतीयावस्थाक काळाचा बराच काळ लोटल्यानंतर अफगाणिस्तानचा भूप्रदेश समुद्रसपाटीचेवर आला. यानंतर समुद्राचें पाणी हळूहळू मध्य आशियाच्या खांचखळग्यांत गेलें.

**रस्ते व घांट**—खैबर, कुरम व टोची हे मुख्य घांट आहेत. काबूल व जलालाबाद यांचेमध्यें दोनरस्ते आहेत. पहिला लाटाबंद घांट व दुसरा खुद्द काबूल घांट. पेशावर व काबूल यांचे मध्यें खैबर घांट आहे. गोमल घांट हा हिंदुस्थान व अफगाणिस्तान यांचेमधील मुख्य व्यापाराचा रस्ता आहे. हिरात, काबूल व कंदाहार यांचेमधील रस्ते हे देशांतर्गत दळणवळणाचे मार्ग आहेत.

**वृक्ष व वनस्पतीः**—आफगाणिस्तानांत ओक, फर, यू व सिडर जातींचीं झाडें आढळतात. तसेंच ज्या भागांत ओक झाडें आहेत तेथें बदाम अक्रोड वगैरे झाडें होतात.

सफेद कोह पर्वतावरहि अशींच अरण्यें आहेत. ६००० ते १०००० फूट उंचीवर नेचे (फर्न्स) व पुष्कळ शेवाळाचे प्रकार आढळतात. ३००० ते ६००० फूट उंचीवर जंगली आलिव्ह वगैरे अनेक झाडें होतात. हिरातच्या प्रदेशांत हिवर ( पॉलर ), वाळुंज ( विलो, ) तुती ( मलबेरी, ) अक्रोड, अप्रिकट सफरचंद, पिअर, पीच यांची लागवड करतात.

तसेंच द्राक्षांचे वेल पुष्कळ असतात. या शिवाय अनेक तऱ्हेचीं झाडें या प्रदेशांत वाढतात.

ओसाड मैदानांत झाडें फार दुर्मिळ आहेत. दूर अंतरा-अंतरावर झुडुपें मात्र दृष्टीस पडतात. वसंत ऋतूंत मात्र हा देखावा सर्व बदलून जातो व पूर्वींचे रूक्षप्रदेश लाल, पांढरे व पिवळे ट्युलिप, लिली, वगैरे फुलांचा गालिचा धरणीवर हंतरला जातो.

प्रा णी.—हरिरूड व मुर्घावच्या जंगलांत वाघ व चित्ते सांपडतात. लांडगा, तरस आणि कोल्हा सर्वत्र आढळतो. बहुतेक नद्यांत ओटर सांपडतात. कंदाहार व पश्चिम अफगाणिस्तान या प्रदेशांत रानटी गाढव व एका जातिचे हरीण ( gazelle ) मिळतात. पिंगट अस्वल आणि रानटी कुत्रा हे हिंदुकुश पर्वतांत असतात.

अफगाणिस्तानांत सर्वत्र सर्प विपूल आहेत. पुष्कळसे सर्प हिरव्या रंगाचे असून १॥ फूट लांब व बरेच जाड असतात. हे निरुपद्रवी असून पांढऱ्या मुंग्यांचा संहार करणारे आहेत; रेजिस्तानमध्यें एक जातीचा सर्प आढळतो तो फार विषारी असतो. उष्ण प्रदेशांत हिंदुस्थानांत सांपडणारे नाग पुष्कळ आहेत.

ह वा मा न.—अफगाणिस्तानची हवा उंचीच्या मानाप्रमाणें निरनिराळ्या प्रकारची आहे. ५००० फुटांवर हिवाळ्यांत थंडी फार दुःसह असते. गझनी येथें तीन महिने बर्फ पडत असतें व उष्णतामापक यंत्रामध्यें पारा शून्य अंशाखालीं १०–१५ अंश उतरतो. हझाराप्रांतामध्येंहि हिंवाळा तितकाच प्रखर असतो व काबूलमध्यें मात्र कांहीं अंशानें कमी असतो.

उन्हाळ्यांत उष्णताहि तितकीच प्रखर असते. काबूल जरी ५७८० फूट उचींवर आहे तरी तेथें उष्णतामान ९०° ते १००° अंशावर असतें. हिरात येथें उन्हाळा कमी असतो. उन्हाळ्यांत येथें पाउस क्वचितच पडतो.

पावसाचें सरासरी मान ११ इंच असतें व पुष्कळसा पाऊस मार्च व एप्रिल महिन्यांत पडतो. ज्यानुआरी महिन्यांत सरासरी ३१.°४′ मे महिन्यांत ६७.°४′ जुलै महिन्यांत ७२°२′ व नोव्हेंबर ५१.°२′ उष्णतामान असतें.

लो क व स्ती.—सध्याचें अफगाणिस्तान हे पारायन साम्राज्याचे एरिया, बॅक्ट्रिया, ड्रान्गीआना, आराकोशिया, परोपामिसस या प्रांतांचें झालेलें आहे. या सर्व प्रान्तांवर त्यावेळीं इराणी सुभेदार असत.

अफगाणिस्तानचे रहिवासी भिन्न राष्ट्रांचे व भिन्न जातींचे लोक असून त्यांचे हितसंबंध परस्परविरुद्ध व महत्त्वाकांक्षा परस्पर विघातक आहेत. फक्त ते एकाच मुसुलमानी धर्मांचे आहेत. तरीपण त्यांच्यांत शिया व सुनी असे दोन पंथ आहेत. येथील लोकसंख्या सुमारें ४५–५० लाख यांच्या दरम्यान असावी. यांचे पूर्वज तुर्कइराणी ( Turko-Iranian ) जातीचे असून यांत सेमेटिक रक्ताची थोडीशी भेसळ झाली असावी.

दुराणी लोक राज्यकर्ते आहेत. व ते व गिलचे मिळून १५ लाख असावेत. गिलच्यांची वस्ती विशेषतः कंदाहारच्या उत्तरे कडील पठारावर आहे.

ताजीक लोकांची संख्या सुमारें ९०००० आहे. त्यांच्या खालोखाल हजारा लोक होत. त्यांची वस्ती ५०००० आहे. उझबेग लोक ३००००० आहेत.

किझिबाशिस लोक ५०००० आहेत. हे पूर्वींचे तुर्क लोक असून ते पूर्णपणें पार्शियन बनले. हे लोक इ. स. १७३७ मध्यें नादीरशहाबरोबर अफगाणिस्तानांत आले.

हिंदी लोकांची संख्या सुमारें ३५००० आहेत. तसेंच साफि, काश्मिरी, सिंधी, लघमानि, अरब, सैय्यद, पराकास, आणि काफिर या लोकांची वस्तीहि थोडीथोडी आहे.

भा षा–अफगाण लोकांची भाषा पस्तु (Pashtu) अथवा पक्तु ही आहे व ती आर्यन इन्डोइराणि भाषेपासून झालेली असावी. यावरूनच अफगाण लोकांनां पठाण म्हणण्याचा प्रघात पडला.

पार्शियन ही कांहीं बाहेरील आलेल्या लोकांची भाषा आहे. पण सध्यां तीच सर्व लोकांची भाषा होऊं पाहते आहे व दरबारची भाषा तीच आहे. जलालाबाद जिल्ह्यामध्यें लघमानी भाषा बोलतात—अफगाण व बलुचिस्तानच्या सरहद्दी वरील मुलखांत बलुची भाषा चालते.

पस्तु भाषेंतील सर्वांत जुना ग्रंथ म्हटला म्हणजे युसुफझइ लोकांचा नायक शेक मली यानें लिहिलेला स्वतःच्या विजयाचा इतिहास होय.

अकबराचे कारकिर्दीत बयाझिद अन्सारी व अफगाण साधू अखुंद दर्वेझा यांनीं हि पस्तुभाषेंत ग्रंथ लिहिले आहेत. अबदुर रहमान हा फार प्रख्यात कवि होता. दुसरा कवि खुशाल खान हा होता. अहमद शहा राजा यानेंहि कविता केली होती. पोवाडे असंख्य आहेत.

स्व रू प व स्व भा व.—अफगाण लोक सशक्त, सुंदर, गौरवर्णी व दिसण्यांत सुरेख असतात. मरण ही त्यांच्या अंगवळणी पडलेली गोष्ट असते. ते हल्ला करण्यांत मोठे धाडसी असतात पण अपयशानें त्यांचा धीर तेव्हांच खचतो ते घातकी व खुनशी असतात. त्यांच्या बायका यहुदी लोकांच्या बायकांप्रमाणें सुंदर असतात व त्यांचे अवयवांची ठेवण यहुदी बायकांप्रमाणेंच असते. ते आदरातिथ्य उदारमनानें करतात. त्यांच्यांत एक असा नियम आहे कीं, शरण आलेल्यास मग तो आपला शत्रू कां असेना आपला जीव गमावून देखील जीवदान दिलें पाहिजे. पण हा नियम त्यांच्या आवाराच्या आंतच लागू असतो. एकदां तो इसम बाहेर पडला म्हणजे त्याचा संकटांतील मित्रच त्याला पहिल्यानें भोसकण्यास मागें पुढें पहात नाहीं.

ध र्म.—अफगाण लोकांनां त्यांच्या धर्माचें ज्ञान वेताचेंच असतें. ते त्याच्या मुल्लांच्या तावडींत विशेष असतात.

जादूटोणा, शकून, ज्योतिष वगैरेवर त्यांचा विश्वास फार असतो ते पिरांनां देव समजतात व त्यांनां संकटाचा परिहार करण्याची शक्ति असते असा त्यांचा पक्का विश्वास असतो.

अफगाण लोकांचा दफनविधि इतर मुसलमान लोकांच्याहून भिन्न नाहीं.

वि वा ह.—अफगाण लोकांत बायका विकत घेण्याची चाल आहे. त्यांच्या किंमतीचें प्रमाण नवऱ्याच्या सांपत्तिक स्थितीवर अवलंबून असतें. ह्या चालीचा परिणाम असा झाला आहे कीं, अफगाणी स्त्रियांस त्यांचे पति जरी चांगल्या रीतिनें वागवितात, तरी स्त्रिया ह्या कांहीं अंशीं पुरुषांच्या जंगम मालमत्तेप्रमाणें लेखिल्या जातात. पुरुषास आपल्या स्त्रीचा वाटेल तेव्हां आणि कांहीं एक कारण न सांगतां त्याग करितां येतो. परंतु स्त्रीला मात्र तसें करितां येत नाहीं. तिनें पाहिजे असल्यास त्या संबंधानें काजीकडे अर्जी करून आपली दाद मागावी. परंतु हा रिवाजहि फारसा दिसून येत नाहीं. नवरा आपल्या बायकोच्या पूर्वी मरण पावला, आणि त्याची विधवा स्त्री पुनर्विवाह करण्यास इच्छित असली, तर तिजसाठीं नवऱ्यानें लग्नसमयीं जें द्रव्य खर्चिलें असेल, तें नवऱ्याचे वारस तिजपासून परत घेतात; व तें तिनें दिल्यावर तिला पुनर्विवाह करण्याची मोकळीक होते. परंतु, इस्रायलांप्रमाणें अफगाण लोकांतहि गतभर्तृकेशीं तिच्या दिरास लग्न लावावें लागतें; आणि जर कोणी तिऱ्हाईत पुरुष दिराच्या सम्मतीवाचून त्याच्या गतभर्तृका भावजयीशीं लग्न लावील, तर त्यानें त्या दिराचा फार भयंकर गुन्हा केला असें समजतात. तत्रापि, कोणाहि विधवेस तिच्या मर्जीविरुद्ध, आणि जो पुरुष तिला आवडत नसेल त्याशीं लग्न लावण्याची फरज पाडीत नाहींत. उलट तिला संतती असून जर ती वैधव्यांत राहण्यास कबूल असेल, तर तिचें तसे करणें फार पसंत समजलें जातें.

वि वा ह का ल.—सर्व अफगाणिस्तानांत, अनुक्रमें विसावें आणि पंधरापासून सोळावें वर्ष हा मुलामुलींचा योग्य विवाहकाल समजला जातो. परंतु ज्याला स्त्री खरेदी करण्याचें सामर्थ्य नसतें, असा पुरुष वेळेनुसार चाळीस वर्षांचा होईपर्यंत देखील अविवाहित राहतो. तसेंच वर न मिळाल्यामुळें कधीं कधीं स्त्रियाहि पंचवीस वर्षांच्या होईपावेतों 'बेगम' राहतात. जे श्रीमान् आहेत, त्यांना द्रव्याची कमताई नसल्यानें ते आपलीं मुलें वयांत येण्यापूर्वीच त्यांना बायका करून देतात. शहरांत राहणाऱ्या लोकांमध्यें मुलगा पंधरा वर्षांचा आणि मुलगी बारा वर्षांची झाल्यावर, किंवा खर्चाचें सामर्थ्य असल्यास ह्या वयापूर्वींहि त्यांचीं लग्नें करण्यांत येतात. अफगाणिस्तानच्या पश्चिम भागांतील लोकांत मुलगा पूर्ण वयांत येऊन त्याची दाढी वाढल्याखेरीज त्याचा विवाह करीत नाहींत. गिलचे लोक तर ह्यापेक्षांहि उशीरां लग्नें करितात. तथापि, ठोकळ मानानें पाहूं जातां, एकंदर अफगाणांत पुरुषांचा विवाह हा त्याच्या अंगीं स्त्री संपादन करण्याचें व कुटुंब पोषण करण्याचें सामर्थ्य येण्यावर अवलंबून असतो.

श री र सं बं ध.—हे लोक शक्य असेल तेथपर्यंत आपापल्या जातींमध्यें शरीरसंबंध करितात. परंतु न जमल्यास पुरुष, इराण वगैरे अन्य देशांतून स्त्रिया करून आणितात; व तसें करण्यास त्यांना कोणताहि प्रत्यवाय नसतो. परंतु अफगाणांतील मुलगी परक्या देशांत देणें, हें मात्र फारच गौण समजलें जातें. सबब तद्देशीय संभावित गृहस्थ, किंबहुना कोणीहि दुराणी मनुष्य आपली मुलगी परदेशीं देण्यास कधींहि कबूल होत नाहीं !

सो य री क ज म वि ण्या ची री ति.—शहरांतून स्त्रिया पुरुषांच्या दृष्टीस मुळींच पडत नाहींत. त्यामुळें नागरिक अफगाणांचीं लग्नें बहुतकरून स्त्रीमध्यस्तांच्या द्वारें आणि युक्तिप्रयुक्तिनें जमविण्यांत येतात. अमुक एका गृहस्थाची मुलगी उपवर आहे असा एखाद्या अविवाहित पुरुषास सुगावा लागला, म्हणजे तो आपल्या नातलग स्त्रीस अथवा शेजारीण बाईस त्या मुलीच्या घरीं पाठवितो, व तिच्या मार्फत त्या बेगमेची एकंदर माहिती मिळवितो. त्या स्त्रीनें केलेल्या वर्णनावरून ती बेगम त्यास पसंत पडली, तर तो त्याच स्त्रीस आपलें लग्न जमवून देण्याबद्दल विनंति करितो. मग ती बाई मुलीच्या आईची भेट घेते; आणि मुलीचे वाडवडील तिला त्या मनुष्यास देण्यास कबूल होतील किंवा कसें, ह्याबद्दल खुलासा काढते. जर मुलीच्या वडिलांस ती गोष्ट मंजूर होईल असें कळलें, तर मग मध्यस्थ बाई त्यांजपाशीं उघड रीतीनें मुलीची मागणी करिते; आणि चारचौघांच्या विचारानें तें लग्न जमविण्याचा दिवस मुकरर करून परत येते. नंतर नेमिलेल्या दिवशीं मुलाचा बाप आपल्या कित्येक इष्टमित्रांसह मुलीच्या बापाकडे जातो. त्याचप्रमाणें मुलाची आईहि कित्येक स्त्रियांसह मुलीच्या आईकडे जाते; आणि तो वरपक्ष औपचारिक रीतीनें वधूची मागणी करितो. अर्थात् ती कबूल केली जाते. मग वरपक्षाकडून वधूला एक आंगठी, शाल, वगैरे वस्तूंचा नजराणा देण्यांत येतो; आणि वरपिता कन्यापित्याला मोठ्यानें परंतु विनयपूर्वक म्हणतो कीं, "माझा मुलगा मी आपल्या सेवेस हजर करितों त्याचा आपण स्वीकार करावा." ह्या त्याच्या म्हणण्यास कन्यापिता 'मुबारिक् बौषद्' म्हणजे "हा संबंध मंगलप्रद होवो !" अशा अर्थी आपला रुकार देतो. नंतर कुराणांतील फातेहा नामक कलमांचें पठण होऊन, व त्या भावी जोडप्याचें कल्याण होण्याविषयीं ईश्वराची प्रार्थना करून उभयपक्ष एकमेकांस मिठाई वांटितात; आणि मुलीचा बाप आपल्या भावी जामातास कांहीं किरकोळ वस्तूंचा नजराणा देतो. ह्या कृत्यानें उभयपक्षीं लग्न करण्याचा निश्चय झाला,

असें समजलें जातें, व तें झाल्यानंतर पुष्कळ दिवसांनीं लग्नसमारंभ करण्यांत येतो.

आंदण देण्याच्या वस्तू आणि उलट हुंडा—सगाई आणि शादी याच्या दरम्यान जी मुदत असते, तींत मुलीचा बाप मुलीबरोबर आंदण देण्याच्या संसारोपयोगी वस्तू तयार करून ठेवितो. ह्या वस्तू म्हणजे सतरंज्या, ताटें, धातूचीं भांडीं, अंगावर घालण्याचे कांहीं दागिने वगैरे होत. त्याचप्रमाणें तिकडे नवरा नवरीला देण्याच्या उलट हुंड्याची रकम जमवून ठेवीत असतो. अर्थात ही उलट हुंड्याची रकम म्हणजे नवरीच्या बापास नवरीबद्दल देण्याची किंमतच होय. ही किंमत त्यास आंदण मिळणाऱ्या वस्तूंच्या किंमतीपेक्षां कितीतरी पटीनें अधिक असते, हें सांगणें नकोच ! नवरीच्या किंमतीशिवाय, नवऱ्यास आपल्याला राहण्यासाठीं एखादें घर, आणि इतर आवश्यक वस्तूंचा संग्रह करावा लागतो. तो गरीब स्थितींत असला, तर त्या बिचाऱ्यास ही तयारी करण्यास एखादें दुसरें वर्षहि लागतें. परंतु श्रीमान् असल्यास अल्पावकाशांत सर्व सिद्धता होऊन नंतर मुसुलमानी रिवाजाप्रमाणें एकाद्या दिवशीं टोलेजंग लग्न समारंभ करण्यांत येतो. ! [ अलोनीकृत "लग्नविधि व सोहाळे." ]

मुसुलमानी कायदा एकापेक्षां जास्त बायका करण्यास आडकाठी करीत नाहीं. श्रीमंत लोक चार चार बायका करून शिवाय दासी व रखेल्या बाळगतात. कोणत्याहि बाईला एके वेळेस एकापेक्षां जास्त नवरे नसतात. गुलामगिरी अजिबात नाहींशी झाली आहे.

राहणी—अफगाण लोकांनां फार साध्या रीतीनें राहवें लागतें, व वर्षांतून सहा महिने ते फळावर राहतात. मक्केकडे तोंड करून प्रार्थना म्हणत मारलेल्या बकऱ्याच्या मांसाशिवाय ते दुसऱ्या मांसास शिवत नाहींत. श्रीमंत लोक गहूं व तांदूळ खातात. गरीब लोक क्रुट नांवाची खीर करून खातात.

पेशाख—अफगाण लोक आंत खमीस घालून वर चोगा घालतात. डोक्याला तांबडें किंवा निळें पागोटें असतें. श्रीमंत लोकांचे कपडे लोकर किंवा रेशीम यांचे असतात, बाकी तऱ्हा तीच असते. सध्यां सरदार व हुद्देदार लोक यांचेमध्यें यूरोपियन पेहराव करण्याची चाल वळावत चालली आहे.

घरें—घरें बांधण्याची पद्धत पूर्वापार चालत आलेली तीच आहे. घरें उन्हांत वाळविलेल्या विटांचीं असतात. तीं एक मजली असून घराच्या सभोंवार उंच भिंत असते.

करमणुकी:—या लोकांचें आवडतें करमणुकीचें साधन म्हणजे शिकार होय. ती कुत्रे बरोबर नेऊन पाठलाग करून करतात किंवा बंदुकीनें गोळी मारून चालते किंवा बहिरी ससाण्याच्या साह्यानें करण्यांत येते. शर्यतीचा प्रचार पुष्कळ आहे. तसेंच कुस्ती ( दंगल ) व इतर ताकतींचे खेळाबद्दल या लोकांस आवड आहे. एडक्याच्या किंवा उंटांच्या टकरा लावण्यांत येतात. सर्व प्रांतांत बुद्धिबळाचा डाव खेळतात. व गोट्या लहान मुलें तसेंच म्हातारेहि खेळतांना आढळतात.

रोगराई:—हवेच्या दोषामुळें पुष्कळ प्रकारच्या तापांच्या सांथी उद्भवतात. संधिवात व पडसें पुष्कळ लोकांना पीडा देत असतात.

तसेंच गरमी, गंडमाळा, मुतखडा, त्वचेचे व डोळ्यांचे रोग फार प्रचारांत आहेत. गेल्या २० वर्षांत तीन सांथी महामारीच्या उपद्रवाच्या आल्या होत्या.

जाती:—अर्वाचीन अफगाणिस्तानांत रहाणाऱ्या सर्व लोकांस हिंदुस्थानचे लोक पठाण असें म्हणतात; परंतु पुक्तु भाषा बोलणाऱ्या लोकांनाच अफगाणिस्तानचे लोक पठाण असें समजतात.

पॅक्टिअन अथवा पठाण:—पुक्तान या मूळ शब्दाचें हिंदुस्थानीभाषेंत पठाण असें रूपांतर झालें आहे. ग्रीक इतिहासकार ज्यांना पॅक्टिअन ( ऋग्वेदांत उल्लेखिलेले पक्थ हेच या पॅक्टिअन अथवा पठाणांचे पूर्वज होत. ) असें म्हणतात, ते पॅक्टिआन व हल्लींचे पक्तुन किंवा पुक्तुन हे एकच असावे. पॅक्तिया या शब्दांत बराच चमत्कार आहे. आरमेनिया प्रांतांत याच नांवाचा एक देश आहे असें हिरोडोटस म्हणतो. व हेंच नांव दक्षिण यूरोपांतील देशामध्यें शोधून काढणें अवघड नाहीं.

हिरोडोटसनें ज्याचा उल्लेख केला आहे तो पॅक्टिया प्रांत सिंधच्या सरहद्दीवर होता व त्याचें क्षेत्रफळ हल्लींच्या पुक्तुनख्वाच्या क्षेत्रफळाइतकेंच आहे. पुक्तुनख्वा यास रोह असेंहि म्हणत व रोह व कोह म्हणजे पर्वत हे एकाच अर्थाचे शद्ब असल्यामुळें तेथें रहाणाऱ्या लोकांना रोहिले असें म्हणतात.

पॅक्टियामध्यें गन्दारी वगैरे चार राष्ट्रें होतीं. या देशाला इराणी लोक आर्यावर्त, ग्रीकलोक अरिअन असें म्हणत; नंतर याला खुरासन व हल्लीं अफगाणिस्तान असें म्हणतात. बॅक्ट्रिआ, मारगिआना वगैरे याचे मुख्य भाग होते. बॅक्ट्रिआसच हिंदुलोक बाह्लीक म्हणत. सिंधूनदाचा वरचा भाग व ऑक्ससचा वरचा भाग यांमधील प्रदेशास बाह्लीक असें म्हणत असत.

हल्लींची सुलेमान पर्वताची ओळ आणि सुफेद कोह यांमध्येंच पॅक्टिआ प्रांत ( मुसलमान इतिहासकार याला रोह असें म्हणतात ) मोडत असे. पॅक्टिआसच हल्लीं पुक्तुनख्वा असें म्हणतात. व हेंच पठाण लोकांचें मूळ ठिकाण होय. अफगाण, घिलझी, वझीरी, काकर वगैरे लोकांची पुक्तुन किंवा पठाण लोकामध्येंच गणना केली जाते.

गन्धारी—गन्दारियन किंवा गन्धारी हे काबूल व सिंधुनद यांमधील प्रदेशांत रहात असत. गन्दारिया व सिंधू गन्धार हे प्रदेश पेशावर दरी व तिच्या सभोंवती असलेल्या टेकड्या यांमध्यें मोडतात.

पांचव्या किंवा सहाव्या शतकांत उत्तरेकडून पुष्कळ सिथिअन अथवा शक लोक आल्यामुळें, गन्दारिया किंवा गन्धारांत रहाणाऱ्या लोकांनीं देशत्याग केला व हेलमन्द नदीच्या

तीरावर वसाहत केली व एक शहर स्थापून त्यास त्यांनीं गन्धार असें नांव दिलें. हे लोक बौद्धधर्मी होते; त्यांनीं आपल्या धर्माचें पवित्र स्मारक म्हणून बुद्धाचें जलपात्र बरोबर नेलें. त्यांनीं सुमारें दोनशें वर्षेपर्यंत आपलें स्वातंत्र्य व धर्म यास धक्का लागूं दिला नाहीं.

या लोकांशिवाय त्या ठिकाणीं दुसऱ्या कित्येक जातींचे लोक रहात असत; परंतु त्या सर्वांमध्यें हे लोक प्रमुख होते. हे लोक येण्याच्या पूर्वींपासून तेथें पर्शियन, शक, तैमनी वगैरे जातींचे लोक रहात.

गन्धार किंवा कन्दाहार येथें अनेक हिंदु लोक रहात असत; परंतु कालावधीनें त्यांनीं इस्लाम धर्माचा स्वीकार केल्यामुळें त्यांचें राष्ट्रीयत्व नष्ट झालें. फक्त त्यांचीं आनुवंशिक नांवें कायम राहिलीं.

गन्दारियन अथवा गान्धार लोकांचे शेजारी अफगाण लोक यांनीं दक्षिण अफगाणिस्तानच्या रहिवाश्यांस जिंकून त्यांनां महमदी धर्म स्वीकारण्यास भाग पाडलें व ते बलाढ्य असल्यामुळें आपल्या प्रजेस त्यांनीं स्वतःचें नांव देऊन व विवाहद्वारा त्यांच्याशीं मिसळून आपली भाषा व आपल्या चालीरीती त्यांनीं तेथें सुरू केल्या. अफगाणिस्तानांतील निरनिराळ्या रहिवाशांस साधारणतः अफगाण असें म्हणतात.

पश्चात गन्दारियन लोकांचा अफगाण लोकांशीं एकजीव झाला व आतां त्यांस पक्के मुसुलमान असें समजलें जातें.

पंधराव्या शतकांत तैमूरचा नातू मिर्झाउलुख बेग हा काबूल येथें राज्यकारभार पहात असतां धर्मांतर केलेले बौद्ध व अफगाण झालेले गन्दारियन लोक हे सिंधु नदाजवळील आपल्या पूर्वींच्या प्रदेशांत परत आले. युसुफझी किंवा मन्दर व अफगाणांच्या महमन्द जातीचे लोक सुमारें चारशें वर्षांपूर्वी ध्वारा, मर्घा, तारनक व अर्घासन या नद्यांजवळ रहात होते. व तारीन जातींचे लोक पेशीनच्या दरींत रहात होते. परंतु तारीन लोकांचा प्रदेश सुपीक नसल्यामुळें, त्यांचीं मन्दर व महमंद लोकांशीं भांडणें होऊन, मन्दर व महमन्द लोकांनां आपल्या देशास मुकावें लागलें.

नंतर मन्दर व महमन्द लोक हे पेशावरच्या दरीकडे (प्राचीन गन्धार) गेले. नंग्रहार यासच हल्लीं जलालबादची दरी हें नांव आहे. त्याठिकाणीं या दोन्ही जातींचे लोक कांहीं दिवस राहिल्यानंतर ते निरनिराळ्या मार्गांनें पुढें गेले. युसुफझी किंवा मन्दर व मलोइ या जातींचे लोक पुर्शोर म्हणजे पेशावर येथें खैबरच्या मार्गानें गेले.

**दलाझक** —थोड्याच दिवसांनीं हे अफगाण लोक व तेथील रहिवाशी यांचें भांडण झालें. युसुफझी लोक या मूळच्या लोकांस दलाझक जातींपैकीं काफीर असे म्हणत. हे दलाझक सिथिअन जातींपैकीं असावेत. व ज्या वेळीं जाठ व कांहीं लोकांनीं पांचव्या किंवा सहाव्या शतकांत येथें येऊन गन्दारियन लोकांनां पिटाळून दिलें त्यावेळीं हे दलाझक लोक त्या ठिकाणीं आले असावेत. कारण दलाझक व जाठ या लोकांनीं एकत्र होऊन पेशावरची दरी व्यापून टाकिली होती. तेथील जाठ लोकास गुजर असें म्हणतात. जनावरें पाळणें, जमनीची लागवड करणें हे गुजर लोकांचे धंदे आहेत. सिंधु नदापासून जेव्हां दलाझक लोकांनां हांकून देण्यांत आलें तेव्हां पंजाबच्या जाठ लोकांनीं त्यास आश्रय दिला.

महमूदगझनीच्या वेळेपासून दलाझक मुसलमान झालेले आहेत. त्यांनीं पेशावरावर स्वारी करून तेथील लोकांस हांकून दिलें. तेथें त्यांचें प्रस्थ बरेंच वाढलें. परंतु अखेरीस मिर्झाउलघ बेगच्यावेळीं युसुफझी व महमन्द या लोकांनीं त्यांचा पराभव करून त्यास हुसकून दिलें.

सतत सहा वर्षेपर्यंत दलाझक लोकांशीं झगडून युसुफझी लोकांनीं त्यास पिटाळून दिलें व त्यांचा प्रदेश आपल्या अंमलाखालीं आणिला. नंतर गन्धारी, हिंदकी व गुजर या लोकांशीं लढून, त्यांनीं उत्तरेकडेहि आपला अंमल बसविला.

**युसुफझी.**—वीस वर्षांत युसुफझी लोकांनीं कांहीं लोकांचा समूळ नाश केला, कांहीं लोकांनां पिटाळून दिलें व कांहीं लोकांनां शरण येण्यास भाग पाडून व मुसुलमान धर्माची दीक्षा देववून त्यांस हिंदकी हें नांव दिलें. हे हिंदकी लोक पांचव्या शतकांत जाठ वगैरे लोकांनीं पादाक्रांत केलेल्या गन्धारी लोकांपैकीं असून अफगाण जेत्यांचे नातलग असावेत. हांकून दिलेले दलाझक लोक आपला मुलूख परत मिळविण्यासाठीं एकसारखे प्रयत्न करीत होते; यामुळें युसुफझी लोकांनां चैन पडत नसे. शेवटीं जहांगीर बादशहानें त्यांचा बंदोबस्त केला. पेशावर, कच्छ, पाकली, धोलपूर वगैरे ठिकाणीं कांहीं दलाझक लोक आढळतात. पेशावर येथें या लोकांच्या दोन पोटजाती होत्याः—गारी व गौमत.

मोठ्या युक्तीनें युसुफझी लोकांनीं स्वात देश जिंकिला; तेथील लोक डोंगराळ प्रदेशांत पळून गेले व त्यांनीं गनीमी काव्यानें लढाई चालविली. परंतु दुष्काळामुळें स्वाती लोकांस शरण यावें लागलें. या लोकांनीं मुसुलमानी धर्म स्वीकारिला परंतु त्यांनीं आपलीं पूर्वींचीं नांवें बदललीं नाहींत.

यावेळीं महमन्द लोक काबूल व स्वात व या नद्यांमधील डोंगराळ प्रदेश (गन्धार) काबीज करीत चालले होते. गन्धारी लोकांबरोबर त्यांनां लढावें लागलें. व या लढाईत महमन्द लोकांनां जय मिळून ते गन्धार येथें गेले.

नंतर त्यांनीं काबूल नदी ओलांडून डोंगराळ प्रदेशांत प्रवेश केला. महमन्द लोक फार रानटीपणानें वागल्यामुळें त्यांनीं जिंकलेल्या देशांतील लोकांनीं आपला देश सोडून दिला व काम आणि कतार (काफिरिस्तान) च्या किल्ल्यांत त्यांस आश्रय मिळाला.

कांहीं कालपर्यंत या गन्धारी लोकांनीं आपला धर्म सोडिला नाहीं; या लोकांनां मुसुलमान लोक काफिर असें

म्हणत. हळू हळू या लोकांनां मुसुलमानी धर्माचें वळण मिळालें. व कांहीं लोक पक्के मुसुलमान झाले; परंतु कांहीं लोक काफीरच राहिले. ग्रिअर्सनला बऱ्याच अलीकडे काफरिस्थानांत हिंदु लोक आढळले. धर्मांतर केलेल्या गन्धारी लोकांचे साफी व गन्धारी असे दोन भाग झाले. हे लोक व स्वात व बाजवर पासून लुघमान व तागोपर्यंत पसरलेले आहेत. विश्वासु व उत्तम शिपाई अशी या लोकांची गणना केली जाते. यांनीं धर्मांतर केल्यामुळें हे धर्मवेडे आहेत. यांच्यापैकीं पुष्कळ लोक मुसुलमानी धर्माचे धर्मोपदेशक आहेत. स्वातचा प्रसिद्ध आखुंद (राजा व साधू) हा गन्धारीच होता. प्रसिद्ध मुल्ला मुष्की आलम हाहि एक आखुंदजादा आहे. या परत आलेल्या गन्धारी लोकांनीं आपल्या पूर्वजांचा मुलूख परत मिळविण्यासाठीं जी लढाई केली ती लक्षांत ठेवण्यासारखी आहे. त्या वेळची या लोकांची स्थिति व हल्लीं ब्रिटिश अंमलाखालीं असलेली त्यांची स्थिति याचा तुलनात्मक दृष्टीनें विचार करणें बरेंच मनोरंजक आहे.

या अफगाण जातींच्या लोकांनां त्यांनीं केलेल्या स्वाऱ्यामध्यें कोणींहि विशेष अडथळा केला नाहीं. खैबर जवळील नापीक प्रदेशांत हे युसुफ्झी लोक कांहीं दिवस स्वस्थ राहिले. तेथील लोकाशीं यांचीं भांडणें होऊन युसुफ्झी लोकांची सरशी झाली. ते लोक जरी नास्तिक होते तरी त्यांचे अधिकारी मुसुलमान असल्यामुळें त्यांनीं युसुफ्झी लोकांस मदत केली व म्हणूनच त्यास जय मिळाला.

वीस वर्षांच्या अवधींत युसुफ्झी लोकांनीं तो देश पूर्णपणें जिंकिला. तो देश त्यांस फार सोईचा वाटला, परंतु बौद्ध अंमलाखालीं असलेली सुधारणा, व्यवस्था व भरभराट या वेळीं राहिली नाहीं. जुनींपुराणीं शहरें वगैरे या देशाच्या प्राचीन उत्कर्षाची साक्ष पटवितात. सावलधर, शाहरी, बहलोल वगैरे ठिकाणची खोदींव कामापासून बरीच माहिती उपलब्ध होते व हिंदु कारागिरांस ग्रीक लोकांपासून शिक्षण मिळालें असावें असें वाटतें. स्वात, बाजावर, बुनर वगैरे ठिकाणीं अनेक जुनीं स्मारकें आहेत व तीं प्राचीन उत्कर्षाचीं द्योतक आहेत. मुसुलमानी धर्म सुरू झाल्याबरोबर ती पहिली स्थिति पार बदलून गेली.

दहाव्या शतकाच्या शेवटीं व अकराव्या शतकाच्या प्रारंभीं तुर्क घराण्याचा पहिला सुलतान महमूद गझनी यानें तेरा चवदा स्वाऱ्या गन्धार देशावर केल्या. तो मूर्तिविध्वंसक होता. शहरें जाळणें व लोकांची कत्तल करणें हा त्याचा मुख्य धंदा होता. गन्धार देशाचा यानें पूर्णपणें नाश करून टाकिला. व सर्व देश ओस पडल्यामुळें, वन्य पशूंचें तें वसतिस्थान झालें.

पंधराव्या शतकांत मिर्झा उलुघ बेग हा काबूल येथें राज्यारूढ असतांना युसुफ्झी लोकांनीं जेव्हां तो देश जिंकण्याचें ठरविलें तेव्हां त्या देशाची स्थिति अशा प्रकारची होती. परंतु त्यांनीं तो देश सुधारून इतक्या भरभराटीस आणिला कीं सोळाव्या शतकामध्यें बाबर बादशहा जेव्हां दिल्लीस गेला त्यावेळीं त्या देशास बरेंच महत्त्व होतें. बाबर यानें त्या लोकांशीं तह करून त्यांच्या पुढाऱ्याच्या मुलीशीं लग्न करून त्यांचें कांहीं सैन्य आपल्याला मदत म्हणून आपल्या बरोबर घेतलें. बाबर यानें पेशावरच्या दरींतून जात असतांनां घडलेल्या कांहीं मनोरंजक गोष्टी लिहून ठेविल्या आहेत व वाघ वगैरे हिंस्र पशूंची शिकार केल्याची हकीकतहि दिली आहे.

कांहीं देशांस तेथें राहणाऱ्या प्राण्यांच्या नांवावरून नांवें पडलेलीं आढळतात. परंतु केवळ नांवावरून कोणतेंहि अनुमान काढणें हें धोक्याचें आहे. युसुफ्झी हे अफगाणांमध्यें आपली गणना करितात व ते आपल्याला बेनी इस्रायल असें म्हणवितात. त्यांच्या नांवाचा अर्थ "जोसेफचे वंशज" असा होतो. व त्यांच्या देशास इस्रायल नांवेंहि दिलेलीं आढळतात.

युसुफ्झी लोकांची लोकसंख्या बरीच वाढली व कांहीं ओसाड प्रदेशाची त्यांनीं लागवड केली. परंतु त्यांच्या शेजारीं राहणाऱ्या खत्तक जातीशीं त्यांचे तंटेबखेडे झाले. हे खत्तक लोक जरी पठाण होते तरी ते अफगाण नव्हते. खत्तक लोकांनीं बरेंच यश संपादिलें. परंतु अखेरीस युसुफ्झींच्या हल्ल्यांपासून आपला बचाव करण्यासाठीं त्यांस काबूल नदीच्या पलीकडे जावें लागलें; परंतु तेथेंहि त्यांचा बचाव न झाल्यामुळें त्यांनीं जमालगढी येथें आपलें ठाणें दिलें.

युसुफ्झी लोकांनीं शीख लोकाशीं बरीच टक्कर दिली. परंतु त्यांनां शेवटीं हार जावें लागलें. इ. स. १८४९ त पंजाब प्रांत इंग्लिशांनीं जिंकिला त्यावेळीं युसुफ्झी यांच्या ताब्यांत आले. त्यावेळेपासून त्यांच्या देशात पुष्कळ सुधारणा झाली आहे; जिकडे तिकडे उत्तम रस्ते केले आहेत व जो प्रदेश पूर्वी ओस होता त्या ठिकाणीं हल्लीं दाट वस्ती झाली आहे. व बराच भाग हल्लीं लागवडींत आणिला आहे व पूर्वीची युसुफ्झी लोकांची स्थिति आता अगदीं बदलून गेली आहे. पूर्वीप्रमाणें ते आतां त्रासदायक नाहींत. ते धनवान् व चैनी आहेत व ते ब्रिटिश सरकारशीं राजनिष्ठेनें वागतात. इतर लोकांप्रमाणेंच ब्रिटिश सरकारच्या अंमलापासून या लोकांचें कल्याण झालें आहे.

**आफ्रिडी.**—हिरोडोटसनें उल्लेखिलेल्या (३. ९१) अपारीटीचे आफ्रीडी हे हल्लींचे वंशज आहेत. त्या देशाच्या पूर्वीच्या मर्यादा व त्या लोकांचा स्वभाव यांमध्यें आतां बराच फरक पडलेला आहे. सुफेद कोहचा सर्व भाग व उत्तर व दक्षिणेकडील त्यांच्या पायथ्याकडचा सर्व प्रदेश यांमध्यें आफ्रिडी देशाचा समावेश पूर्वी होत असे.

ओराक्झी व बँगश या जाती हल्लींच्या आफ्रिडी लोकांपैकींच आहेत. अफगाण लोक या जातींच्या लोकांनां घुरघुष्ट जातीपैकीं समजतात. पुक्तुभाषा बोलणाऱ्या लोकांचा मूळपुरुष जो कैसचा तिसरा मुलगा, त्याच्या वंशजांपासून या घुरघुष्ट जातीची उत्पत्ति झालेली आहे.

आफ्रिडी, ओराक्झी, वंगश, तोरी, व झीरी वगैरे जातींचा तुर्कलान्री लोकांमध्यें समावेश होतो; व ते सुलेमानच्या उत्तरेकडे रहातात तुर्कलान्री लोकांनां काराराई किंवा कारालान्री असेंहि म्हणतात. खत्तक जातीपैकीं दोघे भाऊ एका लष्कराच्या छावणींत गेले असतां, एकास तेथें लोखंडी स्वयंपाकाचें भांडें सांपडलें; पुक्तुभाषेंत त्यास कर्न्हाई असें म्हणत व दुसऱ्या भावास एक अर्भक सांपडलें; त्या मुलाला कराराई असें नांव दिलें व नंतर त्या शब्दाचें करालान्री असें रूपांतर झालें. परकीयांनीं स्वारी करून या देशांत वसाहत केली होती असें या गोष्टीवरून व्यक्त होतें. तुर्क जातीच्या भिन्न भिन्न लोकांपासून या तुर्कलान्री लोकांची उत्पत्ति झाली असावी. या तुर्क जाती सबक्तगीन व तैमूर यांबरोबर त्या देशांत आल्या; व त्या लोकांशीं मिसळून गेल्या. कांहीं तुर्क लोक सुलेमान पर्वतापाशीं येऊन राहिले असावे. कारण आरब लोकांनां तुर्क लोकांपासून अडथळा झाल्याविषयीं इतिहासकार लिहितात. हा अडथळा ख्रिस्ती शकाच्या आठव्या शतकांत झाला.

ओराक्झी व बंगश यांनीं लवकरच स्थलांतर केलें; बंगश लोकांनीं कत्ती जवळ झुर्माल देशांत वसाहत केली. व तेथें ते फारमुली लोकांशीं भांडूं लागले; नंतर कालावधीनें घीलजी लोकांनीं त्यांस कुर्रामांत घालवून दिलें; तेथें तोरी लोकांशीं त्यांचे तंटे झालें व त्यामुळें त्यांनां मिरांझी व कोहात येथें जावें लागलें. नंतर कांहीं लोक हिंदुस्थानांत आले व ओराक्झी व बंगश यांनीं अनुक्रमें भोपाळ व फरुखाबाद येथें वसाहती केल्या. हल्लींचा फरुखाबादचा नबाब व भोपाळची बेगम याच जातींपैकीं आहेत.

आफ्रिडी देशांत अनेक तुर्क जाती आल्यामुळें तेथील लोकांस सुफेद कोह व सिंध यांमधील प्रदेशांत यावें लागलें. दक्षिणेकडील भागांत ओराक्झी राहिले व बँगश लोकांनीं मिरान्झी व कुर्राम या दऱ्या व्यापून टाकिल्या. कुर्राम दरींतील तोरी लोक सिंधच्या उत्तरेकडून आले असावे; सुमारें साडेसहाशें वर्षांपूर्वीं अपारीतीच्या आसपास रहाणारे लोक अपारीती देशांत येऊन त्यांनीं खत्तक हें नांव धारण केलें.

हल्लींच्या आफ्रिडी लोकांच्या ताब्यांत फारच थोडा मुलूख आहे. सुफेद कोहचा दक्षिण भाग घीलजी, शिनवारी वगैरे लोकांच्या ताब्यांत आहे. हे शिनवारी लोक नादीरशहाच्या वेळीं इराणी शिखांनांबरोबर आले असें म्हणतात. या लोकांनीं पठाणांची भाषा व चालीरीती यांचा स्वीकार केला आहे. हे लोक काबूल व पेशावर यांमधील प्रदेशांत वाहतुकीचें काम करितात. शिनवारी लोक उत्तम शिपाई व धूर्त लुटारू म्हणून प्रसिद्ध आहेत.

सुफेद कोहचा दक्षिण भाग हल्लीं तोरी व खोस्तवाल यांच्या ताब्यांत आहे व काबूल व कुर्राम नद्यांमधील प्रदेश खत्तक लोकांकडे आहे. या देशाच्या नैर्ऋत्येकडील भागांत झीमुख्त लोक रहातात, हे लोक लुटारूपणाबद्दल प्रसिद्ध आहेत.

सामल व गार या दोन विभागांत आफ्रिडी, ओराक्झी, बंगश वगैरे सर्व जातींचा समावेश होतो. हे लोक जेव्हां इस्लामचे अनुयायी झाले तेव्हांपासून हे दोन भाग अस्तित्वांत आले. बौद्धधर्मी लोक सामलच्या बाजूला मिळाले व त्यांचे प्रतिस्पर्धी, मेजियन धर्माचे लोक, यांनीं 'गार' हा पक्ष उचलिला.

उद्योगी, शांत, विचारी व लोकांस त्रास न देणारे असे जे बौद्ध लोक त्यांचे आफ्रिडी हे वंशज असावे अशी क्वचितच कल्पना होते.

आफ्रिडी हे जरी आपणांस मुसुलमान म्हणवितात तरी त्या धर्माचीं मतें त्यांस पूर्णपणें अवगत नाहींत; इतकेंच नाहीं तर आपला उद्देश सोडून त्या तत्त्वांप्रमाणें वागण्यासहि ते तयार नाहींत.

आफ्रिडी हे पूर्वी बौद्ध असोत किंवा अग्निपूजक असोत; परंतु हल्लीं ते रानटी स्थितीप्रत गेले आहेत. ते अगदीं अशिक्षित असून त्यांच्यावर कोणाचाहि अंमल नाहीं, ते लुटारू व गळेकापू आहेत, त्यांच्यापुढें कोणताहि उच्च हेतु नाहीं. हे बेइमानी व भयंकर शत्रू समजले जातात. खून व मारामाऱ्या करून लुटालूट करणें हेंच त्यांचें ध्येय आहे.

हे जरी मुसुलमान आहेत तरी मुसुलमानी धर्मोपदेशकांस ते मान देत नाहींत, यामुळें धर्मोपदेशक त्यांच्याकडे जाण्यास धजत नाहींत व अशा प्रकारें यांची स्थिति हास्यास्पद आहे. एका मुल्लानें त्या लोकांस धर्मविधि पाळल्यापासून होणारे सर्व फायदे समजावून सांगितले व यात्रा करून तेथील सत्पुरुषांस कांहीं बळी देण्यास सांगितलें. नंतर त्यांनीं त्या मुल्लासच बळी दिलें व झियारत उभारिली व अशा प्रकारें तिरा येथें एक पवित्र मूर्ति स्थापन झाली. त्या लोकांची एवढीच काय ती पवित्र जागा आहे. कारण त्यांस अशा प्रकारची भक्ति आवडत नाहीं.

एकदां पेशावर येथील एका बड्या अधिकाऱ्यानें कांहीं आफ्रिडी लोकांस आपल्या दरबारीं बोलाविलें होतें. या लोकांपैकीं एकजण दरबारांत प्रवेश करण्याच्या ठिकाणीं मोठ्या ऐटीनें येऊन बसला व तो अधिकारी आला असतां तो मनुष्य जाग्यावरून हालला सुद्धां नाहीं. तेव्हां त्या अधिकाऱ्यानें " मी कोण आहें हें तुला माहीत आहे कां", असें विचारिलें; तेव्हां त्यानें उत्तर दिलें कीं, " मीहि तुझ्याप्रमाणेंच ईश्वराचा एक प्राणी आहे." प्राणी या शब्दाचें

इराणी भाषेंत आफ्रिदा असें भाषांतर होतें. या वेळेपासून या लोकांस ‘ आफ्रिडी ’ हें नांव प्राप्त झालें.

आफ्रिडी लोकांचे आठ वर्ग आहेत ते येणेंप्रमाणेंः— कुकी खेल, मलिकदिन खेल, कंबर खेल कमार खेल, झक्का खेल ( हा संख्येनें अतिशय मोठा व आडदांड असा वर्ग आहे. ), सिपाह, अका खेऊ, आणि आदाम खेल. यांपैकीं पहिल्या सात जाती खायबर घाटाच्या आसपास रहात असून उन्हाळी महिन्यांत टिन्हाला प्रयाण करितात. अदाम खेल लोक (५९०० लढवय्ये लोक ) कोहट घाटाभोंवतीं राहतात व ते जास्त स्थायिक व कमी चंचल आहेत. दिसण्यांत आफ्रिडी सुरेख, उंच, तालिमबाज असून त्यांचें नाक व गालाचीं हाडें उंच असतात व रंगहि गोरा असतो. आपल्या डोंगराळ जाती सुद्धां आफ्रिडी जगांतील उत्कृष्ट लढवय्याप्रमाणें शौर्य दाखवीतात. हिंदी सैन्यांत हे पहिल्या प्रतीचे सैनिक ठरले आहेत; पण स्वदेशांतून दूर गेल्यास ते घरची खंत घेतात. यांचा स्वभाव क्रूर, लबाड व बेविश्वासी असतो अशी ख्याती आहे. आपला मुलगा पटाईत चोर व्हावा अशी आफ्रिडी आईची ईश्वराजवळ प्रार्थना असते असें म्हणतात. पण अठरा वर्षे खायबर घाटांत राहिलेल्या कर्नल सर रॉबर्ट वारवर्टनचें या लोकांबद्दल असें मत आहे कीं, “बाळपणापासूनच त्यांच्या परिस्थितीमुळें आफ्रिडी मुलगा सर्व मनुष्य जातीबद्दल अविश्वास बाळगण्यास शिकतो व पुष्कळ वेळां त्याचे जवळचे आप्त, त्यांच्या लहानशा उत्पन्नाचे कायदेशीर वारस त्यांचे कट्टे शत्रू होतात. तेव्हां मनुष्यजातीविषयीं बेविश्वास आणि स्वतःच्या जीवितरक्षणासाठीं पहिला घाव घालण्याची तयारी हे त्यांचे साहजिक सिद्धांत बनून जातात. आपण त्याचा अविश्वास घालविला व माया दाखविली म्हणजे तो आपणाविषयीं अतिशय भक्ति बाळगतो व शिव्याखेरीज करून कोणतीहि गोष्ट सहन करितो. ” आदरातिथ्य हा या लोकांत विशेष गुण आहे. बोलावलेल्या किंवा न बोलावलेल्यां पाहुण्याचा ते नेहमीं सत्कार करून त्याच्या सुरक्षिततेची काळजी घेतात. पण एकदां कां यजमानाच्या घरांतून बाहेर पाऊल टाकिलें म्हणजे मात्र पाहुण्यानें स्वतः विषयीं फार जपलें पाहिजे; कारण यजमान कांहीं सहनशीलता धारण करण्यास बांधला गेला नसतो. सारांश, या लोकांच्या ठिकाणीं पठाणांचे सर्व गुणदोष जास्त प्रमाणांत वास करितात. आफ्रिडी लोकांत २७००० लढवय्ये आहेत असें म्हणतात. पण त्यांच्या गांवांची संख्या व आकारमान पाहतां हा आंकडा फार मोठा वाटतो. खायबर व कोहाट मार्गावर यांचें वर्चस्व असल्याकारणानें यांना इतकें महत्व प्राप्त झालें आहे; व या दोन मार्गाच्या संबंधांतच ब्रिटिशांचा यांच्यांशीं संबंध आलेला आहे.

आफ्रिडी किंवा खैबारी यांनीं ब्रिटिशांनां फार त्रास दिलेला आहे. त्यांनीं केलेले खून, मारामाऱ्या व लुटारूपणा यांमुळें ब्रिटिशांच्या आफ्रिडी लोकांशीं अनेक चकमकी झाल्या; परंतु ब्रिटिशांच्या सहवासापासून त्यांच्यांत कांहींएक फरक झाला नाहीं; मात्र त्यांच्या सहवासामुळें सरहद्दीवरील इतर लोकांपेक्षां हे चांगले लढवय्ये झाले असून ब्रिटिशांचें संरक्षण करण्याची पात्रता यांच्या अंगीं आली आहे; परंतु या लोकांनां जिंकून यांचा मुलूख काबीज करणें ब्रिटिशांनां भाग आहे.

निरनिराळ्या आफ्रिडी जातींवर ब्रिटिशांनीं ज्या अनेक मोहिमी केल्या आहेत त्यांपैकीं कांहीं जाती पुढील होत्या. १८५० मध्यें आदामखेलावर; १८५५ अकाखेलवर; १८५३, १८७७–१८७८ त जोवकी आफ्रिडीवर; १८७८, १८७९, १९८० त झक्काखेलवर मोहीम व १८९७ मध्यें तिव्हा मोहीम.

खत्तक.—हिरोडोटस ज्या लोकांनां सत्तागिदी असें म्हणे त्यांसच अर्वाचीन इतिहासकार सत्तक, शत्तक, सेतक किंवा खत्तक असें म्हणतात. सुलेमान, कोह, सानवाल व सिंधु नद्याजवळील कांहीं प्रदेश ही त्यांची जन्मभूमि होय. वझीरी लोकांनीं खत्तक लोकांनां हांकून लाविलें; परंतु त्यांनां स्वतः खत्तक लोकांच्या डोंगराळ प्रदेशांत जावें लागलें; परंतु ही गोष्ट घडण्यापूर्वी इराणी लोकांनीं ( चाकमनी किंवा चामकनी ) खत्तक लोकांवर स्वारी केली व तेथें त्यांनीं आपलें ठाणें दिलें. हा सर्व देश हल्लीं वझीरी लोकांच्या अम्मलाखालीं आहे; तथापि मुकीम व कानीगोराम येथें चामकनी लोक आहेत.

इराणी इस्लमाईट लोकांपैकीं चामकनी ही एक जात असून ते लोक सरकारच्या त्रासामुळें आपल्या देशांतून पळून गेले. हे लोक मुसुलमानांच्या शियापंथीचे ( अल्ली इलाही ) होते. त्यांचे धर्मविधी फार चमत्कारिक आहेत. ते धर्मविधींच्या वेळीं एक दिवा लावून ठेवीत व कांहीं वेळानें तो मालवून टाकीत. पुरुष व स्त्रिया एकत्र जमून धर्मविधी करीत असत. त्यांनां चिराघकुश ( दिवा मालविणारे ) किंवा आरमूर ( अग्नि विझविणारे ) असें म्हणत. या लोकांच्या पुढाऱ्याचें नांव अमर लोबान असें होतें. त्यांच्या देशात दुष्काळ पडल्यामुळें कांहीं लोक लोगर दरींत जाऊन बारकीबरक येथें राहिले व कांहीं लोक पेशावरच्या दरींत जाऊन त्यांनीं आपल्या स्वतःच्या नांवावरून चामकनी हें गांव वसविलें. थोडे लोक हिंदुस्थानांत आले व तेथील लोकांशीं मिसळून गेले; परंतु पुष्कळ लोकांनीं आपलें जन्मस्थान सोडिलें नाहीं. त्यांच्या शेजारीं मांगल व खिताई या जातींचे लोक रहात असत. चामकनी लोक हे स्वभावानें शांत, उद्योगी, दुसऱ्यास त्रास न देणारे असे आहेत व गृहकलह व लुटारूपणा यांपासून अलिप्त राहणारे अशी त्यांची प्रसिध्दि आहे.

वझीरी लोकांनीं घालवून दिल्यामुळें खत्तक, हनी व मांगल हे लोक बन्नु प्रदेशांत जाऊन दोयाल ( सद्रावान् )

येथें राहिले; परंतु बलुची लोकांनीं त्यांस पिटाळून दिल्यामुळें ते कारबोघा, तेरी, चात्रा वगैरे ठिकाणीं गेले. इकडे तोरी लोकांनीं बंगश लोकांना कुर्रमांतून घालवून दिल्यामुळें ते ओराक्झी लोकांपाशीं येऊन भांडूं लागले. ही संधि साधून खत्तक लोक ओराक्झी लोकांचा मुलूख काबीज करूं लागले, व उत्तरेकडे आपला राज्यविस्तार करीत करीत त्यांनीं ओराक्झी व आफ्रिडींची पिछेहाट केली व युसुफझी लोकांच्या प्रदेशांत प्रवेश केला व बुलाक व तेरी जातींच्या लोकांचा त्यांनीं संहार केला.

खत्तक लोकांच्या चालीरीती, रूप, वर्ण वगैरे इतर पठाणांहून भिन्न आहेत. पूर्वेकडील पठाणांपैकीं फक्त खत्तक लोक पुश्तु भाषा बोलतात. हे स्वभावानें साधे असून धर्मोपदेशकांवर त्यांचा पूर्ण विश्वास असे.

एके दिवशीं नौघे भाऊ शिकारीसाठीं गेले असतांना त्यांनां चार तरुण मुली भेटल्या; त्यांच्याशीं लग्न करावें असें चौघांनीं ठरविलें; वडील भावानें आपल्या पसंतीप्रमाणें उत्तम पोशाख केलेल्या मुलीशीं लग्न लाविलें व इतर तिघांनीं चिंध्या टाकून वाकींच्या तिघींशीं विवाह केले. परंतु नंतर असें आढळून आलें कीं उत्तम वस्त्रें धारण केलेली मुलगी फार कुरूप असून इतर सुंदर होत्या. यामुळें वडीलभावाची इतरानीं थट्टा केली व "पा खत्ता लायें" म्हणजे 'तूं चिखलांत गेला आहेस किंवा चिखलांत पाय टाकिला आहेस' असें ते त्याला म्हणाले. या गोष्टीपासून खत्तक हें नांव निघालें असें म्हणतात. या गोष्टीचें कांहींसें बुद्धाच्या-पूर्वजकथेशीं साम्य आहे; ब्रिटिश अंमलाखालीं खत्तक लोकांची वागणूक फार चांगली असून ते राजनिष्ठ आहेत. काळाबाग येथील मिठाच्या खाणी यांच्या ताब्यांत आहेत व पेशावरची दरी व बदकशान यांमधील देशास हे लोक मीठ पुरवितात. यांच्या राजनिष्ठेचा व यांच्या कामगिरीचा मोबदला म्हणून, यांचा मुख्य ख्वाजा महंमदखान यास नाइट ऑफ दि आर्डर ऑफ दि स्टार ऑफ इंडिया ही बहुमानाची पदवी देण्यांत आली.

सुलेमान पर्वतापासून खत्तक लोकांनां ज्यांनीं पिटाळून लाविलें ते वझीरीलोक व मुसुलमान इतिहासकार ज्यांना वईर्सी असें म्हणतात हे एकच असावेत असें वाटतें. पांच सहाशें वर्षांपूर्वी वझीरी लोकांनीं पहिल्यानें खत्तक लोकांवर स्वारी केली. त्यांच्या एका पूर्वजाची पवित्र अशी एक मूर्ति, व त्यांच्या सोधाकी नांवाच्या पोटजातीच्या लोकांच्या जमीनी बर्मोल प्रांतांत आहेत. या बर्मोलांत राहून वझीरी लोकांनीं खत्तकांनां हांकून लाविलें व चामकनी लोकांस जिंकून सर्व खत्तक देश आपल्या ताब्यांत घेतला.

वझीरी लोक बलाढ्य असून स्वतंत्र आहेत. दिसण्यांत हे इतर पठाणजातींहून भिन्न दिसतात; हे लोक गुरांचे कळप घेऊन हिंडतात.

हिरोडोटसच्या मताप्रमाणें दरायसच्यां साम्राज्यांतील दादिसी (३. ९१; ७. ६६) हें चौथें व शेवटचें राष्ट्र होय. हल्लींच्या ताजिक लोकांचे दादिसी हे पूर्वज असावे असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे; परंतु हें सुसंगत दिसत नाहीं. गन्दारियनच्या उत्तरेकडे रहाणारे, दरद लोक हे यांचे पूर्वज असावे असेंहि कांहीं लोक म्हणतात; परंतु हीहि व्युत्पत्ति स्वाभाविक आहे असें वाटत नाहीं. काकर लोकांशीं मिसळून गेलेले दादीलोक हे दादिसींचे पूर्वज असावे हें अधिक संभवनीय आहे. काकर लोकांच्या ताब्यांत असलेला सर्व प्रदेश पूर्वी दादिसी किंवा दादी लोकांच्या ताब्यांत होता; परंतु हळू हळू त्यांची तेथून पिछेहाट झाली.

अफगाणिस्तानचे काकरलोक हे शक असून कच्छ व रावळपिंडी येथें रहाणाऱ्या गक्कर लोकांपैकींच आहेत. काकर हा घुरघुष्टचा नातू होता. घुरघुष्ट हा अफगाणांचा मूळपुरुष जो किश त्याचा पुत्र होय. किशचा वडील पुत्र सराबन यास शार्ज्यून व क्रश्यून असे दोन पुत्र होते. सुर्जन व कृशन या रजपूत नांवांपासून हीं वरील नांवें निघालीं असावीं; असुरी सार्गन या नांवाशीं याचा कांहीं संबंध आहे कीं काय हे निश्चयात्मक सांगतां येत नाहीं. व या नांवाचें मुसलमानींत शारफुद्दीन व खिरुद्दीन असें रूपांतर झालें असावें. अशाच प्रकारचें शब्दसादृश्य अफगाणांच्या सर्व वंशावळींत आढळतें. महाभारताच्या वेळीं पांडव हे पंजाब व अफगाणिस्तान येथें जाऊन त्यांनीं स्वतंत्र राज्यें स्थापिलीं ही गोष्ट लक्षांत ठेविली असतां वरील गोष्ट आपणांस पटतें. घुरघुष्ट हें सिर्घिञ्झ किंवा घिर्घिञ्झ यांचें रूपांतर असल्यामुळें तुर्कस्तानांतून हे लोक आले असावे असें वाटतें. प्राचीन दादीसीचा पुष्कळसा भाग जरी हल्लीं काकर लोकांच्या हातीं आहे, तरी मूळचे ते सर्व एक नव्हते. घुरघुष्टचे दुसरे नातू (दानीचे पुत्र) जे दादी, नाघर व पानी यांच्या चालीरीती व भाषा खऱ्या काकरहून भिन्न होत्या. नाघर लोकांनां रजपूत असें म्हणतात; यांचें पानी (पर्णी ?) लोकांशीं बरेंच साम्य आहे. नाघर व पानी हे शेखावती व हैदराबाद येथें रहातात व अगदीं थोडे लोक काकर देशांत रहातात. दादी हे काकर लोकांशीं पूर्णपणें मिसळून गेले व खोजन्दहून आलेल्या लोकांनीं केलेल्या वसाहतींत राहिले; यामुळें त्यांस खोजन्दी किंवा खुन्दी असें म्हणतात.

का क र.—महबानचे गद्न कछ या लोकांशीं आपला संबंध असल्याचें काकर लोक सांगतात व हे लोक आपल्याला काकर समजतात व कछ येथील एका वसाहतवाल्यास घुरघुष्ट असें म्हणतात. घोर पर्वताजवळील तैमनी चारायमाक लोकांशींहि आपला संबंध आहे असें काकर म्हणतात व हे लोकहि आपण काकर लोकांपैकीं आहोंत असें सांगतात. उत्तरेकडील इतर चारायमाकांहून आपणांस ते भिन्न समजतात. कारण यांच्या चालीरीती, भाषा व धर्म हीं

निराळीं आहेत. कॅपचाक व दार्झी असे तैमनीचे दोन भाग आहेत. दार्झी लोकांनां अफगाण म्हणतात.

काकर देशाच्या उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत एक पर्वताची रांग आहे व त्या ठिकाणीं कांहीं उत्तम व सुपीक दऱ्या आहेत. कंजोझी दरींत 'सन्न' जातीचे लोक व बोरी दरींत संजर व संमीरजातीचे लोक राहतात. काकर लोकांच्या अनेक जाती असून त्यांच्या भाषा व चालीरीती भिन्न भिन्न आहेत; परंतु त्या सर्वांना काकर पठाण असें म्हणतात.

काकर लोक हिंगाचा व्यापार करितात; परंतु कांहीं लोक गुरांचे कळप घेऊन हिंडतात व थोडे लोक जमिनीची लागवड करणारे आहेत. काकर देशाच्या दक्षिणेस काकर लोकांचे शत्रू बलुची लोक रहातात. शयूना दाघ या नांवाचें काकर लोकांचें एक प्रसिद्ध मैदान आहे. तोबा पर्वताच्या पश्चिमेस अनेक दऱ्या आहेत; त्यांपासून निघालेल्या लहान लहान प्रवाहापासून लोहर नदी झाली आहे. उन्हाळ्यांत हा प्रदेश राहण्यास फार चांगला आहे. कारण येथील हवा उत्तम आहे; परंतु हे लोक अज्ञानी, रानटी, पशुवृत्तीचे व लुटारू आहेत.

स्वकीय व परकीय अनेक भिन्न भिन्न जातींचा समावेश पठाण लोकांमध्यें होतो. पठाणांच्या देशांत प्रवेश होण्यापूर्वी काकर, वझीरी, तोरी वगैरे लोकांनां पुष्कळ धडपड करावी लागली. पठाणच्या रहिवाश्यांशिवाय अफगाणिस्तानचे अफगाण व घीलजी हे आपणांस पठाण म्हणवितात. कारण हे लोक पठाण देशाच्या हद्दींत राहतात व त्यांनीं पठाणांची भाषा व कायदे यांचा स्वीकार केला आहे.

पठाण लोकांनीं अनेक शतकेंपर्यंत आपलें स्वातंत्र्य कायम राखिलें होतें; परंतु सर्व देशांत ते स्वतंत्र नव्हते. कारण पंजाब जिल्ह्यापासून युसुफझी, खत्तक, बंगश वगैरे लोक ब्रिटिशांचे प्रजाजन आहेत. कुर्राम, दौर वगैरे लोकांस काबूल सरकारनें पादाक्रांत केलें होतें; परंतु युसुफझी, वझीरी, महमंद वगैरे लोक स्वतंत्र आहेत.

पॅक्तियन, पुक्तून किंवा पठाण राष्ट्रें भिन्न भिन्न परकीय लोकांशीं मिसळून गेलीं व असें होणें स्वाभाविक आहे.कारण तो देश इराण, तुर्क व हिंदुस्थान यांच्या हद्दीवर आहे. बौद्ध, ब्राह्मण व गाबर हे इस्लामचे अनुयायी झाल्यामुळें वरील गोष्ट घडून आली. महमूद गझनीनें हा धर्म स्वीकारण्यास लोकांस भाग पाडिलें; परंतु अशा प्रकारचें धर्मांतर हें टिकाऊ नव्हतें. महमूदच्या पश्चात् अनेक लोकांनीं आपला पूर्वीचा धर्म पुन्हां स्वीकारिला; परंतु बाराव्या शतकांत शहाबुद्दीन घोरीच्या वेळीं हिंदुस्थानांत मुसुलमानी धर्माचा पुन्हां प्रसार झाला. या वेळीं अरबी धर्मोपदेशक ( सय्यद ) व बाटलेले हिंदु ( शेख ) हे धर्मप्रसारासाठीं सर्व पुक्तून देशांत हिंडले. हे धर्मप्रसारक त्या लोकांशीं सौम्यपणानें वागले नाहींत. त्या अडाणी लोकांपासून बऱ्याच देणग्या यांनीं मिळविल्या. त्यांच्या मुलींशीं लग्नें लाविलीं व स्वर्ग मिळविण्याचा मार्गदर्शक म्हणून आपलें बरेंच वजन वाढविलें.

परंतु शिया व अल्लीइलाहि या पंथाचे धर्मोपदेशक सुनी धर्मोपदेशकांचे प्रतिस्पर्धि होते.

पण इराणचें वजन पुक्तुन देशांत नाहींसें झाल्यामुळें सुनी लोकांचें वर्चस्व झालें व शिया व अल्लीइलाहि किंवा चामकनी या पंथांच्या लोकांचें कांहीं चालेनासें झालें पठाण लोकांत कांहीं शियापंथाचे लोक अद्यापि आढळतात; परंतु अल्लीइलाहि किंवा चामकनी यांचा बराच छळ झाल्यामुळें ते सुनी झाले.

घिलजी.—जलालाबादपासून कलाती घिलजीपर्यंत घिलजी लोकांची बरीच वस्ती आहे. सियाबन्द पर्वताजवळ त्यांची जन्मभूमी असावी असें वाटतें.

अफगाणांचा मूळपुरुष, कइस किंवा किश याचा दुसरा मुलगा बतन हा सियाबन्द पर्वताजवळ रहात होता. त्याची धर्मावर फार श्रद्धा होती.त्याला साधू असें समजून लोकांनीं त्यास शेख ही पदवी अर्पण केली.

खलिफ वालिदच्या वेळीं खुरासान व घोर जिंकण्यासाठीं बगदादहून अरबी सैन्य आलें, त्या वेळीं घोर पर्वताजवळ बेनीइस्रायल व बेनीअफगाण हे लोक रहात होते. अरब लोक आल्याबरोबर तेथील अधिकारी पळून जाऊन त्यानें शेख बतन यांच्यापाशीं आश्रय मागितला. बतननें त्याचें उत्तम प्रकारें स्वागत करून त्यास ठेवून घेतलें. त्यानें बतनची मर्जी संपादिली, यामुळें दोघे एकमेकांवर विश्वास टाकूं लागले.

शेख बतन यास मत्तो या नांवाची एक सुंदर कन्या होती. शहाहुसेन ( नवीन आलेला पाहुणा ) व मत्तो यांची प्रीति जडली, ही गोष्ट बतन यास कळल्यावर त्यानें दोघांस फांशीं देण्याचें ठरविलें; परंतु बतनच्या पत्नीनें शहा हुसेन हा राजवंशापैकीं आहे किंवा नाहीं हें पाहण्याविषयीं बतन यास सुचविलें. घोरच्या उत्तरेस त्यांनीं एक विश्वासू मनुष्य पाठविला; तेव्हां हुसेन हा राजवंशी आहे असें त्यास समजलें. नंतर बतननें त्या दोघांचें लग्न करून टाकिलें.थोड्याच दिवसांनीं बिबी मत्तोस एक पुत्र झाला, त्याचें नांव बतननें घालझो म्हणजे चोराचा मुलगा असें ठेविलें. हें नांव पुढें सर्व जातीस मिळालें व त्याचें रूपांतर घिलझी असें झालें. घिलजी व घोर या जातींचें मिश्रण झालें असावें असें या गोष्टीवरून वाटतें.

बिबी मत्तोच्या दुसऱ्या पुत्राचें नांव इब्राहीम लो ( मोठा ) असें होतें. लो चा लोदी असा अपभ्रंश झाला. व हेंच नांव इब्राहीमच्या वंशजांनां मिळालें. व हेंच लोदी घराणें पंधराव्या शतकांत दिल्लीस राज्य करीत होतें. घोर घराण्यांतील लोदी व सूर राजे हे घिलजी जातीचे होते यांत संशय नाहीं. या शिवाय तुराम, तोलर, बुराण आणि पोलर असे बिबी मत्तोचे पुत्र होते. व हीं नांवें त्यांच्यापासून उत्पन्न झालेल्या जातींस

देण्यांत आलीं आहेत. तुराण पासून तोखी, व होतक व तुराणपासून अन्दर व तराकी या पोटजाती उत्पन्न झाल्या. हीं सर्व नांवें तुर्क आहेत. आठव्या शतकांत, ज्या वेळीं अरब लोक ट्रँसोक्षिआना (तुराण) पादाक्रांत करीत चालले होते त्यावेळीं कांहीं तुर्क लोकांनीं आपला देश सोडून देऊन ते घोर पर्वताजवळ येऊन राहिले, हें अफगाणांच्या इतिहासावरून स्पष्ट होतें.

खिलजी (तुर्क) घोर प्रातांत शिरले त्यावेळीं, होतक, तोखी, अन्दर, वगैरे जातींचा समावेश त्या लोकांत होत असे; त्यांनीं ज्यू, अफगाण, हिंदु वगैरे लोकांमध्यें आपली वसाहत केली. तेथें कांहीं दिवस राहून नंतर हल्लींच्या ठिकाणीं आले. खिलिची लोकांच्या देशाच्या पूर्वेस अफगाणिस्तानांतील घिलजी लोकांची वसाहत होती. या घिलजींच्या देशास तुराण असें म्हणत

खिलिची किंवा घिलजी हे तुरणांतून पूर्वेकडे गेले. लहान लहान जाती या घिलजी लोकांशीं मिसळून गेल्यामुळें घिलजींचा इतका विस्तार झाला. प्रमुख जातीच्या सत्तेखालीं ज्या नवीन नवीन जाती आल्या त्यांच्या नांवांमध्यें जो बदल झाला त्यावरून वरील विधानास पुष्टि मिळते.

या नवीन जातींचे लोक धर्मांतर केलेले पठाण होते, किंवा सबक्तगीन बरोबर आलेल्या तुर्कांचे हे नातलग होते हें अनिश्चित आहे. घिलजी लोकांनीं जिंकलेले लोक आपल्या जेत्यांशीं मिसळून गेल्यामुळें घिलजींची लोकसंख्या वाढली असावी हें संभवनीय आहे. चगताई तुर्क, घिलजींच्या संनिध रहात असूनहि ते फार भिन्न आहेत व त्यांच्याशीं संबंध असल्याचें त्यांस कांहीं एक माहित नाहीं. अशा लोकांपैकींच, तेराव्या व पंधराव्या शतकांतलि चंगीझ व तैमूर यांच्या स्वाऱ्यांबरोबर आलेले मोंगल व मागलचे चगताई तुर्क हे लोक आहेत; या लोकांच्या जन्मभाषेत व रंग रूपांत जरी बदल झाला आहे तरी ते त्यांचे शेजारी जे घिलजी त्यांपासून आपल्याला अगदीं निराळे समजतात. या अप्रसिद्ध लोकांचा इतिहास व उत्पत्ति शोधून काढणें महत्त्वाचें व मनोरंजक आहे.

अफगाणिस्तानच्या घिलजी लोकांना महमूद गझनीनें आपल्या बरोबर हिंदुस्तानच्या स्वाऱ्यांच्या वेळीं घेतल्यामुळें, त्या वेळेपासून हे प्रसिद्धीस आले. या स्वाऱ्या चालल्या असतांना घिलजी लोकांनीं आपला राज्यविस्तार केला. अफगाणिस्तानांत राहणाऱ्या सर्व लोकांत, गुरें घेऊन भटकणारे व लष्करी बाण्याचे लोक अशा प्रकारें हे घिलजी लोक प्रसिद्ध आहेत; व यामुळेंच मुलूख जिंकणें त्यांस अवघड गेलें नाहीं.

घिलजी लोकांची राज्यकारभारपद्धति व इतर चालीरीती अफगाणिस्तानांतील इतर लोकांपेक्षां अगदीं भिन्न आहेत. बहुतेक घिलजीलोक गुरांचे कळप घेऊन हिंडतात. ते सतरंज्या वगैरे तयार करितात. हे लुटारु व भांडखोर आहेत. धैर्य व शरीरसामर्थ्य या बाबतींत अफगाणिस्तानांतील दुसरे कोणतेहि लोक यांची बरोबरी करूं शकणार नाहींत. परंतु हे लोक रानटी व सूड घेणारे आहेत.

नासर खरोती वगैरे घिलजी लोक हिंदुस्तानांत व अफगाणिस्तानांत व्यापार करितात. त्यांच्या धंद्यावरून त्यांस पोविन्द व लवानी किंवा लोहानी असें म्हणतात.

गोमल व झोआब या घाटमार्गानें ते हिंदुस्तानांत येतात. दिल्लीपर्यंत ते आपल्या बरोबर उंट आणितात व पुढें आगगाडीनें किंवा पाय रस्त्यानें ते मोठमोठ्या शहरीं जातात. ते फळें, हिंग, लोकर वगैरे जिन्नस हिंदुस्तानांत आणितात व कापूस, चहा, रेशीम वगैरे माल ते आपल्या देशांत नेतात.

हिंवाळ्यांत हे लोक हिंदुस्तानांत येतात. या व्यापाऱ्यांचा पोशाख अव्यवस्थित व घाणेरडा असून त्यांचा आवाज मोठा व चालीरीती असभ्यपणाच्या आहेत. परंतु कांहीं श्रीमान् व्यापारी व्यवस्थितपणें व टापटिपीनें वागतात.

पोविन्द ही जरी खिलजी लोकांची पोटजात आहे तरी कांहीं गोष्टींत ते बरेच भिन्न आहेत. खरोनि व नासर लोकांचा आकार, व रूप रंग वगैरे सुलेमान, खेल व तुराण लोकांपेक्षां भिन्न आहेत.

अठराव्या शतकाच्या आरंभीं कंदाहारच्या इराण सरकारविरुद्ध घिलजी लोकांनीं बंड केलें. इराणी लोकांच्या जुलमास कंटाळून यांनीं अनेक विनंतिअर्ज केले; परंतु तिकडे कोणीहि लक्ष न दिल्यामुळें त्यांनीं मीरवेस यास शहापुढें आपल्या तक्रारी मांडण्यासाठीं पाठविलें; परंतु त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं; परंतु शहाचें दौर्बल्य मीरवेसच्या लक्षांत आलें.

परत आल्यावर सैन्य जमवून त्यानें इराणविरुद्ध बंड केलें; इराण सरकारचा पराभव होऊन इराणी सैन्यास पिटाळून लावण्यांत आलें. नंतर मीरवेस हा काबूल येथें स्वतंत्रपणें राज्यकारभार करूं लागला. त्यानें इराणी लोकांस तीनवेळां मागें हटविलें व आठवर्षें राज्य करून इ. स. १७१५ त तो मरण पावला. त्याचा पुत्र महमूद यानें १७२० त इराणावर स्वारी केली परंतु त्या स्वारींत त्याचा पराभव झाला.

दोन वर्षांनीं त्यानें पुन्हां स्वारी केली. त्यानें दक्षिण इराण पादाक्रांत केलें; व मोटमोठीं शहरें घेऊन त्यानें आपला दरारा बसविला. सरतेशेवटीं इराणचा शहा, शहा हुसेन यानें आपलें सर्व राज्य महमूदच्या स्वाधीन केलें. या जयामुळें तो गर्वानें फुगून जाऊन त्याची महत्त्वाकांक्षा अनावर झाली. तो सर्वप्रकारच्या सुखांत निमग्न झाल्यामुळें लवकरच वेडा व क्रूर झाला.

अनन्वित कृत्यांमुळें त्याच्याच लोकांनीं महमूदचा खून केला व त्याचा पुतण्या मीर अश्राफ यास गादीवर बसालिलें परंतु मीर अश्राफ यास लवकरच इराणच्या तामास्पचा

( शहा हुसेनचा वंशज ) सेनापति प्रसिद्ध नादीर यांच्याशीं तोंड द्यावें लागलें. अश्राफचा पराभव झाला; परंतु निराश न होतां अश्राफनें पुन्हां लढाईचां तयारी केली परंतु त्यास यश न आल्यामुळें तो कन्दाहारकडे पळून गेला; व एका बलुची सरदाराकडून मारला गेला. घिलजी लोकांचा अंमल इराणांत सातच वर्षें होता; परंतु तेवढ्या मुदतींत तेथें रक्तपात होऊन तो देश ओस पडला.

घिलजींनां इराणांतून घालवून दिल्यानंतर नादीरनें स्वतः गादी बळकाविली व तो हिंदुस्थान जिंकिण्यासाठीं निघाला. इ. स. १७३८ त कन्दाहार घेऊन तें उध्वस्त करून टाकिलें. काबूल येथें कांहीं मोगल इराणी लोक बंदोबस्तासाठीं ठेविले. हे लोक काबूल येथेंच राहिले. व ते ज्या भागांत रहात असत त्यास चांडौल असें म्हणतात. हे लोक शियापंथी आहेत. यांचें येथें बरेंच वजन आहे. हे ब्रिटिश अंमलास अनुकूल आहेत.

नादीरशहाच्या मरणानंतर अहमदशहाचा अंमल घिलजी लोकांनीं मान्य केला. परंतु अबदाली राजानंतर त्या लोकांत बराच असंतोष उत्पन्न झाला व शहा तैमूर बरोबर ते भांडूं लागले; परंतु इ. स. १८०९ त जल्दक येथें शहाझमान यानें घिलजी लोकांचा पराभव केला. त्यावेळेपासुन नष्ट झालेली सत्ता पुन्हां मिळविण्याची खटपट त्यांनीं केली नाहीं. परंतु त्यांचें महत्त्व कमी झालें असें मात्र नाहीं. दुराण्यांच्या दरबारांत यांचें पुष्कळ वजन आहे. परंतु ब्रिटिश सरकारचा हे व दुराणीलोक द्वेष करितात व त्यांच्याशीं विश्वासघातकीपणानें वागतात.

इ. स. १८३९ पासून १८४२ पर्यंतच्या ब्रिटिशांच्या स्वारींत त्यांनीं काबूल व कन्दाहार यांमधील दळणवळणास बराच अडथळा केला व १८४२ त त्यांच्या सैन्याशीं हे घिलजी लोक फार क्रूरतेनें वागले. परंतु हे बलाढ्य असे शत्रू नाहींत, इतकेंच नाहीं तर यांच्यांशीं सहज सलोखा करितां येईल.

ता जि क.—ताजिक किंवा पार्सीवान् हे अफगाणिस्तानच्या लोकांपैकींच आहेत; परंतु तेथील रहिवाश्यांच्या भाषेहून व चालीरीतींहून ताजिकांची भाषा व चालीरीती भिन्न आहेत. हे लोक पूर्वीच्या इराणी लोकांचे वंशज आहेत. ज्याप्रमाणें अफगाण लोक हिंदु लोकांत मिसळून गेले त्याचप्रमाणें अरब लोक इराणी लोकांत मिसळून जाऊन, मिश्र जातीस त्यांनीं आपलें पूर्वीचेंच नांव दिलें. अरब लोकाच्या पूर्वीच्या इराणी नांवावरून ताजिक हें नांव पडलें असावें. प्राचीन इराणी इतिहासकार आपल्या उत्तरेकडील शत्रूंस तुर्क व दक्षिणेकडील शत्रूंस ताज असें म्हणत; व यामुळेंच इराणांत अरबांनां ताज असें म्हणत असत. व त्यांच्या संबंधीं प्रत्येक वस्तूस ताजिक असें नांव पडलें. कांहीं काळानें इराणांतील आरबी वस्तूंसच ताजिक हें नांव मिळालें. ज्या अरब लोकांनीं इराणी लोकांशीं विवाह करून आपलें राष्ट्रीयत्व गमाविलें त्या लोकांस इराणी लोक ताजिक असें म्हणूं लागले चिनी, तावची व ताजिक हे एकच शब्द असावे असें म्हणतात; असें असेल तर ताजिक याचा अर्थ इराणी शेतकरी असा होतो. हिरातपासून खैबरपर्यंतच्या भागांत, कन्दाहार पासून ऑक्झसच्या भागांत व काश्गर प्रांतांत हे ताजिक लोक राहतात. परंतु हाझरा, अफगाण किंवा सय्यिद लोकांशिवाय इराणी भाषा बोलणाऱ्या लोकांस हल्लीं ताजिक असें म्हणतात. बदकशानच्या प्राचीन रहिवाशांनांहि ताजिक हें नांव आहे.

हे लोक अनेक शतकांपर्यंत स्वतंत्र होते परंतु हल्लीं ते काबूल सरकारचे प्रजाजन आहेत. ते मुसुलमानां शिया किंवा सुनी पंथाचे असून ते आपल्यास अलेक्झँडर दि ग्रेट याचे वंशज समजतात. सपाट प्रदेशांत राहणाऱ्या ताजिक लोकांत पोटभेद नाहींत. अफगाण, घिलजी व पठाण यांमध्यें ज्याप्रमाणें खेल व झाई असे विभाग आहेत तसे ताजिक लोकांत नाहींत. 'खेल' हा अरबी शब्द असून त्याचा अर्थ टोळी असा आहे. झाई हा इराणी शब्द असून त्याचा अर्थ 'जन्मलेला' असा आहे. परंतु हा शब्द खेल ( टोळी ) या शब्दाप्रमाणेंच समजला जातो, जसें—'मुसाझाई किंवा मुसाखेल' याचा अर्थ मोसेसची टोळी. ताजिक लोकांमध्यें कांहीं शेतकी काम करणारे आहेत, त्यांनां दिहवार किंवा दिहगान असें म्हणतात. सपाट देशांत रहाणारे ताजिक लोक धिप्पाड, सुंदर व सशक्त आहेत. ते स्वभावानें शांत, उद्योगी, काटकसरीनें रहाणारे व मनमिळाऊ असे आहेत. त्यांच्या देशांत त्यांचा उच्च दर्जा नसून राज्यकारभारांत त्यांनां कोणी विचारीतहि नाहीं. खेडेगांवांतील लोक शेतकी व बागबागाईत करितात; शहरांत रहाणारे लोक व्यापार धंदा करितात; हे लोक बुद्धिमान, राजनिष्ठ व उद्योगी आहेत; फार थोडे लोक लष्करी नोकरींत शिरतात. ब्रिटिश लोकांविषयीं या लोकांचें चांगलें मत आहे. घिलजी व पठाण या लोकांशिवाय दुराणी किंवा अफगाण हेच काय ते ब्रिटिशांचे शत्रू आहेत. या लोकांचा इतर सर्व लोक द्वेष करितात असें असूनहि ब्रिटिशविषयीं इतर सर्व लोकांचीं मनें कलुषित करण्यांत या लोकांनां यश येतें हें आश्चर्य आहे.

ह झा रा—अफगाणिस्तानांतील इतर सर्व लोकांहून हझारा हे लोक अगदीं भिन्न आहेत; व त्या देशाचा बराच भाग यांनीं व्यापून टाकिला आहे. पूर्वी ज्याला पॅरोपॅमिसस् असें म्हणत तो देश यांच्या ताब्यांत आहे. हा प्रदेश डोंगराळ आहे; परंतु येथें पुष्कळ सुपीक दऱ्या असून येथें पुष्कळ महत्त्वाच्या नद्या उगम पावतात.

या देशांत प्राचीन काळीं दाट वस्ती असून हा देश जिंकण्यास चंगीझखानास बरींच वर्षें लागलीं. त्यावेळीं तेथें पुष्कळ इराणी लोक रहात होते; व त्यांच्या ताब्यांत अनेक मजबूत किल्ले होते. हे फार आश्चर्यकारक असून हे मनुष्यांनीं बांधलेले नसावे असें तेथील हल्लींचे रहिवाशी सांगतात

येथें बुद्धाच्या वेळच्या पुष्कळ इमारती असून पुष्कळ जुनीं नाणींहि सांपडतात.

हझारा हे मोंगल लोकांपैकीं तातर लोक असावे असें त्यांच्या आकृतीवरून उघड होतें. परंतु निश्चित असें कांहींच सांगतां येत नाहीं. हझारा हा शब्द, इराणी शब्द हजार (सहस्र) यावरून निघाला असावा. तेराव्या शतकांत चेंगिझखानानें या लोकांच्या एक हजाराची एक, अशा दहा लष्करी वसाहती वसविल्यामुळें या लोकांना हझारा हें नांव प्राप्त झालें असावें.

परंतु हे लोक स्वतः आपल्याला हझारा असें म्हणवीत नाहींत. निरनिराळ्या जातींच्या नांवांवरून ते आपल्या देशांत प्रसिद्ध आहेत; जसें जाघुरी, बिसूद, दाही, झंगी, दाहीकुंदी, गौर वगैरे. दाही हे राष्ट्राचे नाव असावें; हे लोक आपल्याला काबुली, घिलजी किंवा आवधान असेहि म्हणतात. चार्येमाक, जमशेदी, तैमूनी वगैरे जातींना हे आपल्यापैकींच समजतात. ते आपली मातृभाषा विसरले असून इराणी भाषा व शिया पंथ यांचा त्यांनीं स्वीकार केला आहे. थोडे लोक सुनी पंथाचेहि आहेत.

सिंधुनदाच्या पूर्वेस हजारा या नांवाचा एक प्रांत आहे; तो मोंगललोकांच्या ताब्यांत होता. व तसेंच कुर्रामपासून काबूलपर्यंतच्या देशांतहि हझारा हें नांव प्रसिद्ध आहे. इराणांतून पळून आल्यावर इस्रेलाइट लोकांनां ज्या ठिकाणीं आश्रय मिळाला असें एसड्रास म्हणतो तोच हा हाजरा देश असावा असेहि कांहीं लोकांचें मत आहे.

तातर हे लोक साधेभोळे असून धर्मोपदेशकांच्या आज्ञेप्रमाणें वागणारे आहेत. हे अशिक्षित असून आपल्या जातींच्या पुढाऱ्यांच्या पूर्णपणें अंकित आहेत. हिंवाळ्यांत हे लोक उद्योगधंदा पाहण्यासाठीं पंजाबांत येतात. हे लोक शूर व कणखर आहेत. विश्वासु, उद्योगी व बुद्धिवान् अशी अफगाण लोकांमध्यें यांची प्रसिद्धि आहे. हे लोक पाखंडी असल्यामुळें सुनीपंथाचे अफगाण लोक यांनां आपले गुलाम असें समजतात.

हझारा हे लोक आफगणांचे कट्टे शत्रु आहेत; अफगाणिस्तानांतील युद्धांत हझारा लोकांनीं ब्रिटिशांस बरीच मदत केलेली आहे. या लोकांतील स्वतंत्र जातींच्या लोकांनीं काबूल सरकारास दाद दिली नाहीं. गुरखे लोकांप्रमाणे हे शूर आहेत. यांनां पाश्चिमेकडील गुरखे असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण यांची व गुरखे लोकांची जात एकच असून चेहऱ्यांतहि बरेंच साम्य आहे. हे लोक ब्रिटिशांच्या फार उपयोगी आहेत. हे ब्रिटिशांच्या पक्षाकडे सहज येतील व हे लोक देशाचें उत्तम प्रकारें संरक्षण करूं शकतील.

या लोकांची उत्पत्ति, चालीरीती व हितसंबंध भिन्न भिन्न असल्यामुळें, परकीय लोकांच्या मदतीशिवाय हे लोक एकछत्राखालीं शांततेनें राहूं शकले नाहींत. ब्रिटिशांचे प्रजाजन होण्याची या लोकांची मनापासून इच्छा आहे.

शे त की.—अफगाणिस्तानच्या बहुतेक भागांत वर्षांतून दोन पिकें काढतात. पहिलें गहूं, बाजरी वगैरेचें असतें. दुसऱ्या खेपेस भात (धान) मका व डाळ होतात.

जमीनीचे दोन भाग केलेले असतात. एक आबि व दुसरा ललमी. पहिलीला आपण बागाईत व दुसरीस जिराईत म्हणूं.

बहुतेक सर्व यूरोपियन शाकभाज्या येथें तयार होतात. हिरात, काबूल, कंदाहार व जलालाबाद ह्याठिकाणीं अफूची लागवड करतात. हिरातप्रांतांत कापूस मुबलक पिकतो; बदाम व एरंडीचीं झाडें पुष्कळ होतात व त्याच्या फळांपासून तेल काढतात. येथें फळें विपुल होतात व तीं चांगल्या प्रकारचीं असतात. सफरचंद, पीयर, बदाम, पीच, मनुका, डाळिंबें, द्राक्षें, अंजीर इत्यादि फळें सर्वत्र होतात.

अफगाणिस्तानांतलि शेतकरीवर्ग पाच तऱ्हेचा आहे. (१) स्वतःच्या मालकीची जमीन करणारे. (२) दुसऱ्याची जमीन भाडेपट्टीनें करणारे. (३) बाझगर, लहान शेतकरी (४) मोलानें शेतांत काम करणारे. (५) आपल्या धन्याची जमीन करणारे गुलाम.

मजुराचा रोज पोटास घालून ४॥ आणे असतो. कंदाहारामध्यें तो ६॥ आण्यापासून ७ आण्यापर्यंत असतो.

प्रा णी.—घोडे, उंट, गायी मेंढ्या व बकरी ही या लोकांची संपत्ति आहे. पूर्वी घोडे बाहेर देशीं पुष्कळ विकण्यास जात, परंतु अबदुल रहिमान खानानें त्याची निर्यात बंद केली. तेव्हांपासून ह्या व्यापारास आळा पडला आहे. उत्तम घोड्याची निपज करण्याकरिता इंग्लिश व अरब वळू आणून ठेविले आहेत व ह्या गोष्टीकडे अमीराचें फार लक्ष आहे.

बैलाचा नागराकडे व ओझीं वाहण्याकडे उपयोग होतो.

हिरात व कंदाहार येथून पुष्कळ लोंकर बाहेर देशीं रवाना होते.

अफगाणिस्तानामधील उंट जास्त राकट व बळकट असतो.

ख नि ज प दा र्थ.—अफगाणिस्तानामध्यें धातु पुष्कळ सांपडतात असा बोलवा आहे पण याला रसायनशास्त्राचें उत्तम ज्ञान असणाऱ्या लोकांचा पाठिंबा नाहीं. तरी पण पुष्कळ भागांत दगडी कोळसा सापडणें शक्य आहे.

ढोबा पठारावर "अन्टिमनी" सापडतो. कंदाहारच्या उत्तरेस सोन्याच्या खाणी लागूं शकतील. हिंदुकुश पर्वतामधील रुप्याच्या खाणी सर्वांनां प्रसिद्ध आहेत. शाह मकसुद डोंगरांत पूर्वी तांब्याच्या खाणी चालूं होत्या. तसेंच कंदहारच्या उत्तरेस ६० मैलावर "नेश" या ठिकाणीं तांब्याची अशुद्ध धातू सांपडते. शिसें घोरबंद भागांत व इतर ठिकाणीं निघतें. कंदाहार येथें सांपडणाऱ्या सोन्याच्या मातींत अशुद्ध निकल मिश्रित असतो. हिंदुकुश पर्वतामध्यें लोखंड विपुल आहे; तुरटी पुष्कळ तयार होते.

खानाबाद येथील खाणींत सोरमीठ पुष्कळ सांपडतें. कोटिअश्रु येथें पांढऱ्या संगमरवरी दगडांच्या खाणी लागल्या आहेत.

व्या पा र.—ओक्सर येथें चांगल्या जातीचें रेशीम तयार होतें. तें बुखारा व महोद येथें जाऊन त्याचें उत्तम कापड तयार होतें. हिरात व कंदाहार या ठिकाणीं पुष्कळ रेशीम होतें पण तें नितकें चांगलें नसतें. अफगाणचे गालिचे इराणमधासारखे चांगले होत नाहींत. पोस्टिन्स म्हणजे मेंढीच्या कमावलेल्या कातडीचे डगले सर्व देशांत होतात.

काश्म, बरक, कर्क हे विशेषतः हिरात येथें चांगले होतात. काश्म हे उंटाच्या केंसापासून तयार केलेलें कापड आहे. दुसरीं दोन मेंढी व बकरा यांच्या केसापासून तयार होतात. माळेचे मणी येथून मक्केला पुष्कळ जातात.

गेल्या २०–२५ वर्षांत हत्यारांचे कारखाने यूरोपियन लोकांच्या देखरेखीखालीं पुष्कळ उघडण्यांत आले आहेत.

सगळ्या अफगाणिस्तानचा व्यापार किती आहे हें सांगण्यास आंकडे दुर्मिळ आहेत. हिरात येथून रशियांत जाणारा माल पुष्कळ मोठ्या किमतीचा असतो. खोरासान व सिस्तन येथें जाणारा माल इ. स. १९०२ मध्यें साडे दहा लाखाचा गणला आहे. यांत शेंकडा ४० लोंकर असून ती रशिया, फ्रान्स व अमेरिका या देशांत जाते.

इ. स. १९०४ मध्यें हिंदुस्थानानें अफगाणिस्तानशीं दीडशें लाखांचा व्यापार केला. परंतु या मालावर जकात अति जबर असल्यामुळें व्यापार घटत चालला आहे. हिंदुस्थानांतून दोरा, चहा, नीळ, साखर व तयार कातडीं धाडलीं जातात. तसेंच तुकडें तुकडें कापड जाऊं लागलें आहे. बाहेरदेशीं जाणारे जिन्नसः—वाळविलेलीं व ताजीं फळें, तूप, रेशीम, लोंकर, "पोस्टिन्स" कातडी, संतरंज्या. हा सर्व व्यापार उंटाच्या पाठीवर चालतो.

व्या पा रा चे मु ख्य मा र्ग.—हिंदुस्थान ते काबुल, खैबरखिंड व जलालाबाद; कंदाहारला व गझनीला गोमलखिंड, अथवा क्वेटा, बदकशानपासून बाजवार आणि जलालाबाद चित्राल मार्गानें व दुसरेहि कांहीं आणखी मार्ग आहेत.

ट पा ल.—इ. स. १८७० मध्यें अमीरानें टपालाची पद्धत सुरू केली पण ती अजून बाल्यावस्थेंतच आहे. इ. स. १८७२ मध्यें तिकिटें काढण्यांत आलीं. १ शाही. (१ आणा), अबासि (½ काबुली रुपाया), २ अबासि व १ काबुली रुपाया, अशा किंमतीचीं तीं असत. १९०२ मध्यें तिकिटें सर्व संपलीं असून अमीराच्या मनांत यूरोपियन धर्तीवर तीं काढण्याचे आहे. त्यामुळें सध्यां तिकिटांशिवाय सर्व व्यवहार चालतो; हांशील प्रथम अगर पत्र घेणाराजवळून घेतात.

येथें दुष्काळ फारसे नसतात व असलेच तर त्यांची तीव्रताहि विशेष भासत नाहीं. मागील दुष्काळामध्यें अमीरानें परदेशांतून धान्य आणवून लोकांनां दिलें.

रा ज्य प द्ध ति व का य दे.—अफगाणिस्तानची राज्यपद्धति म्हणजे अमीराची अनियंत्रित राजसत्ता होय. या देशाचे काबुल, तुर्कस्थान, हिरात, कंदाहार व बदकशान असे पांच राजकीय विभाग केले आहेत. प्रत्येक विभागावर एक नायब म्हणजे गव्हर्नर नेमिलेला असतो. या नायबाच्या हाताखाली सरदारलोक व काजी हे न्याय देण्याचें काम करतात. राजाच्या दरबारांत अगर कौन्सिलांत बसणाऱ्या सरदार लोकांचे तीन वर्ग आहेत. ते असे—(१) सरदार (२) खान व (३) मुल्ला सरदार हे वंशपरंपरागत मोठे लोक असतात, खान हे लोकांचे प्रतिनिधी असतात व मुल्ला धर्माचे प्रतिनिधी असतात. या तीन प्रकारच्या प्रतिनिधींच्या दोन सभा आहेत; पहिली दरबारशाही अथवा बादशाही सभा व दुसरी खावानिन मुल्खी अथवा साधारण लोकांची सभा. मुल्लालोक आपल्या दर्जाप्रमाणें या दोहोंपैकीं एका सभेंत बसतात. अमिराच्या कार्यकारी अधिकाऱ्यांची खिल्वात नांवाची एक खास कमिटी आहे. ही संस्था प्रधानमंडळाच्या कौन्सिलप्रमाणें काम करते. विचारल्याशिवाय कोणाहि मंत्र्याला राजास सल्ला देण्याचा अधिकार नाहीं व कोणालाहि आपल्या खात्याच्या अधिकाराबाहेर सल्ला देतां येत नाहीं. अमीर हा मुख्य कार्यकारी अधिकारी असून शिवाय मुख्य न्यायाधीश व वरिष्ठ अपील कोर्ट आहे. अमीराकडे अपील करण्याचा प्रत्येकास अधिकार आहे. दोस्त महंमद व अबदुर रहमान या अमिरांकडे प्रजेचे अर्ज नेहमी जाऊं शकत. अमिरापेक्षां हलक्या प्रतीचें कोर्ट काझीचें होय व काझीपेक्षां कोतवाल हलक्या दर्जाचा असतो. मोठ्या प्रांतिक शहरांत व्यापारी तंट्यांचा निकाल लावण्याकरितां पंचायती असतात. मुल्की, जकात, डाक व लष्करी कामकाज यांचीं निरनिराळीं खातीं आहेत. अफगाणिस्तानांतील न्यायकचेऱ्यांतून इस्लामचा कायदा चालतो व अबदुल रहमान यानें केलेल्या सुधारणांसहित देशांतील चालीरीतीसंबंधीं कायदाहि पाळला जातो.

अमीर व हिंदुस्तान सरकार यांच्यामध्यें झालेल्या कराराप्रमाणें परदेशाशीं अफगाणिस्तानच्या राज्यकारणावर इंग्लिशांचा दाब आहे. बाकीच्या व्यवहारांत अमीर स्वतंत्र आहे. पूर्वीं अमीर फक्त काबुल व सभोंवारचा प्रदेश येथील राजा होता. व बाकीचे प्रांत राजघराण्यांतील लोकांच्या अधिकारात असत. पण ही पद्धत अबदुल रहिमानखानानें बदलून टाकिली आहे. सध्यां सर्व प्रांतांवरील स्वामित्व एकट्या अमिराच्या हातांत एकीभूत झालें आहे. सध्यां मुख्य कचेऱ्या काबुल येथें ठेवून त्यांवर अमिराचे नातलग मुख्य नेमलेले आहेत. तरी पण राज्यांतील कोणतीहि गोष्ट अमिराच्या सल्ल्यावांचून होऊं शकत नाहीं.

राज्यकारभाराकरितां अफगाणिस्तानचे सहा भाग करण्यांत आले आहेत ते असेः—अफगाण-तुर्कस्तान, बदकशान, हिरात, कंदाहार, फऱ्हा आणि काबुल. काबुल खुद्द

अमीराच्या हातांत आहे. बाकीच्या प्रांतांवर एकेक गव्हर्नर नेमलेला आहे. तो मुलकी व न्यायाचीं कामें पाहतो. त्याला "नायब-उल-हुकुमा" म्हणतात. या भागांचे पुनः लहान प्रांत व जिल्हे पाडलेले आहेत. त्यांवर हकीम नेमलेला असतो. त्याला दिवाणी व फौजदारी अधिकार असतात. त्याच्या कचेरीला महकम-इ-हकिम म्हणतात. अपील कोर्ट काबुल येथें असून अमीर स्वतः मुख्य न्यायाधीश असतो. हकीमाच्या खालच्या कोर्टांनां महकम-इ-शर अथवा काझीचें कोर्ट म्हणतात. काझीच्या मदतनिसास मुफ्ति म्हणतात. काझी व मुफ्ति यांच्यामध्यें जर एकाद्या मुद्यावर मतभेद झाला तर तो काबुल येथील खान-इ-मुल्ला याच्याकडे मताकरितां पाठविण्यांत येतो, व त्याच्यानें त्या प्रश्नाचा निकाल न झाल्यास अमीराकडे तो जातो. न्याय कोणच्या पद्धतीनें दिला जावा याबद्दल नियम अबदुलरहिमानखानच्या वेळेस ठरवून, छापून काढले आहेत. वरच्या न्यायकचेऱ्यांनां "किताब-इ-हुकूमति" असें नांव आहे व काझी वगैरे यांच्या कचेऱ्यांनां 'असास-उल्-कुक्झट' म्हणतात. यांत मुसुलमानी कायदा (शर) चालतो. राजद्रोह, बंड, सरकारी पैसा खाणें, खोटे दस्तैवज करणें, व राजसत्तेविरुद्ध सर्व अपराध यांचा निवाडा करणें अमीराच्या हातांत असतें. कोणासहि अमिराशिवाय मरणाची शिक्षा देतां येत नाहीं. व्यापाऱ्यांचे तंटे पंचायती मार्फत निकालांत येतात. सध्यां दिवाणी कज्यांत फिर्याद स्टांपावर मांडावी लागते.

ज मा बं दी.—अफगाणिस्तानचें उत्पन्न खालीं दिलेल्या बाबींतून होतें.—(१) जमीनींवरील कर. (२) आयात व निर्यात मालावरील जकात. (३) फळबागांवरील कर. (४) वनचराई ४० जनांवरापैकीं एक. (५) दस्तैवजाचे स्टांप कागद. (६) डोईपट्टी. (७) हिंदुस्थान सरकारकडून दरवर्षी मिळणारी १८ लाख रुपये खंडणी. इ. स. १८५६त राज्याचा वसूल ३० लाख होता तो सध्यां खंडणी धरून १२० ते १३० लाखांपर्यंत वाढला आहे. म्हणजे पूर्वीच्या चौपट झाला आहे. खर्च बेतांत ठेवला असून दर वर्षी पुष्कळ मोठ्या रकमेची बचत केली जाते. जमिनीचा सारा उत्पन्नाच्या रूपानें दिला जातो तो वर्षाच्या सरासरी उत्पन्नावर ठरविलेला असतो.

ज्यामानानें जमीनीला पाणी मिळत असेल त्यामानानें तो जास्त किंवा कमी असतो. साधारणपणें नदीच्या पाण्यावर केली जाणाऱ्या जमीनीवर उत्पन्नाच्या $\frac{1}{3}$ सारा असतो. ओढ्यांच्या किंवा झऱ्यांच्या पाण्यावर होणाऱ्या उत्पन्नावर $\frac{1}{4}$ असतो. जेथें कारेस मधून पाणी मिळत असेल व ते राज्याच्या मालकीचें नसतें तेव्हां त्या जमीनीवर उत्पन्नाच्या $\frac{1}{5}$ सारा द्यावा लागतो. पावसावर अवलंबून राहणाऱ्या जमीनीवर उत्पन्नाचा $\frac{1}{10}$ सारा द्यावा लागतो. मोठ्या शहरांजवळ असलेल्या मळ्यांतून किंवा फळबागांतून ३६०० चौ. गार्डावर ७॥ ते ९ रुपये सरकार घेणें असतें.

एवढेंच जर सरकारांत द्यावें लागत असतें तर शेतकरी वर्ग सुखी असता पण सैन्यांतील शिपाई व सरदारलोकांचे आश्रित त्यांनां खेड्यांतून लूट करून पोट भरण्याची परवानगी असते त्यामुळें शेतकऱ्याला जवळ जवळ दुप्पट मारा पडतो.

देशांत सोन्याचें नाणें मुळींच चालू नाहीं म्हटलें तरी चालेल. पण सध्यां एक टांकसाळ स्थापन झाली असून जुनें नाणें परत घेऊन त्याच्या जागीं नवें नाणें प्रसारांत येत आहे.

सै न्य.—अमीराजवळ सैन्य पुष्कळ मोठें असून यूरोपियन पद्धतीप्रमाणें त्यांत दर्जे ठरविलेले आहेत. सध्यां ३००००० लोकांनां पुरेल इतका दारूगोळा व हत्यारें अमीराजवळ आहेत. हिंदुस्थानच्या सैन्यांत अफगाण लोकांचा पुष्कळ भरणा आहे. ते लोक हिंदुस्थानांत येऊन आपणांस सैन्यांत दाखल करून घेतात.

सं र क्ष ण.—अफगाणसैन्य सरासरी ५०००० असावें. हें सैन्य हिरात, कंदाहार, काबूल, मझार-इ-शरिफ, जलालाबाद, व अस्मार या ठिकाणीं व हिंदुस्थानच्या बाजूस सरहद्दीवरील नाक्यांवर ठेविलेलें आहे. अबदुल रहमान म्हणत असें कीं, 'एका आठवड्याच्या आंत १००००० लोक रणांगणावर उभे करतां येतील परंतु मुख्य अडचण पैसा व नेण्या आणण्याचीं साधनें यांचा अभाव' ही होय. १८९६ मध्यें त्यानें अशी एक पद्धत सुरू केली होती कीं, प्रत्येक आठ माणसांतून एकानें (१८ व ७१ वर्षांच्या वयाच्या दरम्यान) लष्करी शिक्षण घेण्यास यावें. काबूलच्या दारूगोळ्याच्या कारखान्यांत दररोज २०००० काडतुसें व १५ बंदुका तयार होऊं शकतात व आठवड्यांतून दोन तोफा बनू शकतात. या देशांतील मुख्य किल्ले हिरात व देहडाडी हे होत. देहडाडी किल्ला क्रुप, हॉचकिस, नॉर्डेनफेल्ड व मॅक्झिम या जलदवारी तोफांनीं सज्ज केलेला आहे. या किल्ल्यांतील मुख्य छावणी बल्खपासून बारा मैलांवर मझार-इ-शरिफ येथें आहे.

प्रत्येक मोठ्या शहराला एकेक कोतवाल असतो. तुरुंगाचें कामहि त्याला पहावें लागतें. तसेंच सर्व पोलीस काम त्याच्याचकडे असतें.

शि क्ष ण.—शिक्षण केवळ प्राथमिक मिळतें व तें स्वतः बहुतेक अज्ञान अशा मुल्लांच्या हातीं आहे. मास्तर मुलांनां सांगतो व सर्व मुलें एकदम तें म्हणतात. शिक्षण लेखन, वाचन व थोडेसें गणित याच्याबाहेर जात नाहीं. कुराण हें शिक्षणाचें मुख्य अंग आहे. वरच्या प्रतीच्या शिक्षणसंस्था मुळींच नाहींत. परंतु सध्यांच्या अमीरानें शिक्षण सक्तीचें केलें असून काबूल येथें एक कॉलेज काढण्याचा विचार आहे. सध्यां अफगाणमध्यें इंग्लिश मुळींच नाहीं पण भावी विश्वविद्यालयाच्या अभ्यासक्रमांत त्याचा समावेश केला जाणार आहे.

अफगाणिस्तानच्या हकीमांनां शारीरशास्त्र व रोगनिदान

ज्ञान यांची माहिती मुळींच नसते व शस्त्रक्रियेचें ज्ञान जवळ जवळ तेवढेंच असतें असें एका डॉक्टरचें म्हणणं आहे.

प्राचीन अवशेष.—काबुल नदीच्या पात्रांत बुद्धधर्मकालीन वस्तूंचे अवशिष्टभाग बरेच आहेत. बमियनची भिंतींत कोरलेल्या आकृतींबद्दल प्रसिद्धि आहे व हैबक येथें बरेच चित्तवेधक बुद्ध लोकांच्या कामांचे अवशिष्ट भाग आहेत. काबूलच्या उत्तरेस कोह-दमन मध्यें जुन्या शहरांच्या जागा आहेत, पैकीं बेग्राम हें सर्वांत मोठें आहे. येथें कित्येक हजार नाणीं सांपडलीं. काबूलच्या जवळ व याच्या दक्षिणेस कांहीं मैलांवरील टेंकड्यांवर असंख्य स्तूप आहेत. जलालाबादच्या दरींत अशाच प्रकारचे अवशेष आहेत.

टार्नोक नदीच्या दरींत ( उलान रोबाट ) एका जुनाट शहराचे पडके भाग आहेत. हेंच पूर्वींचें आर्कोशिया शहर असें समजतात. हेल्मंडावरील गिरिष्कजवळ मोठे उंचवोटे व इमारतींचीं इतर चिन्हें आहेत, व सिस्टनच्या मैदानांत कित्येक मोठ्या शहरांचे अवशेष भाग आहेत. तसेच पुल्की, पेशावरन, व लाख येथें पुरातन ड्ठाम्नियानाचे स्मरणीय भाग आहेत. कंदाहार येथील एका मशिदींत राखून ठेविलेलें एक पुरातन दगडी भांडें हेंच पेशावर येथें पांचव्या शतकांत पुरलेलें शाक्य मुनीचें भिक्षापात्र होय. ग्रीको-बुद्धकाला ( यवन-बुद्धकाला ) नंतरच्या शिल्पकलाविषयक अवशेष भागासंबंधीं अफगाणिस्तानांत अभाव आहे. गिझनी येथें महमूदचे थडगें व दोन महत्त्वाचे विटांचे मनोरे खेरीज करून कांहींच शिल्लक राहिलेलें नाहीं. अफगाणिस्तान व त्याच्या आसमंतांतील भागांत पुष्कळ नाणीं सांपडलीं. जलालाबादपासून १० मैलांवर बसवल नांवाचें गांव आहे, तेथें व जलालाबादच्या दक्षिणेस ५ मैलावर आडा उर्फ हद्दा नांवाचें गांव आहे तेथें व खुद्द जलालाबाद येथें बुद्ध स्तूप व कोरीव लेणीं सांपडलीं. त्या कोरीव लेण्यांत वरील भाग कमानदार असून त्यापैकीं कांहींमध्यें बुद्धाच्या मूर्ती होत्या. मुसुलमान लोकांनीं हा प्रांत ज्यावेळेस जिंकला तेव्हां त्यांनीं हें सर्व कोरलेलें काम फोडून टाकून त्यावर दगडमाती लोटून दिली [ इं. अँ. ८. १९८-२०० ].

प्राचीन माहिती.—पाणिनीच्या व्याकरणावरून डॉ. भांडारकर अफगाणिस्तान या शब्दाबद्दल माहिती पुढील प्रमाणें देतात. हें राज्य प्राचीन ग्रीक व रोमन भूगोलवेत्त्यास कपिसेन या नांवानें ठाऊक होतें. ह्युएनत्संग हा यास 'किआ-पिशे. असें नांव देतो. पाणिनी यानें या राज्यास 'कापिषी' असें नांव दिलें आहे. ( ४.२,९९ ) : आणि यावरून त्यानें या देशांत होणाऱ्या मद्यास कापिषायनी असें म्हटलें आहे.

अर्कोसिआः—या राज्यास अरब भूगोलवेत्ते अर्खोज अथवा रोखोज असें म्हणत. ह्युएनत्संग यानें रौलूट असें या राज्याचें नांव धरून 'त्सौकूट' हा शब्द योजिला आहे. यूरोपीय प्राचीन शास्त्रवेत्त्यांनीं ( विल्सन-अॅरिआना अँटिका ) अर्कोटिस हें या राज्याचें अथवा नदीचें नांव झेंद शब्द 'हरकिति' या शब्दापासून निघालें आहे असें म्हटलें आहे. झेंद 'हरकिति' हा शब्द संस्कृत सरस्वती या शब्दाचें रूप आहे; परंतु सरस्वती ही सप्तसिंधूंपैकीं एक नदी असल्यामुळें ती सतलजच्या पूर्वेस असून दुसऱ्या सहा नद्यांपासून इतक्या दूर असणं शक्य नाहीं. तेव्हां अर्कोसिआ, अर्खोज अथवा रोखोज हीं नावें पाणिनीच्या भाष्यकारांनीं उल्लेख केलेल्या 'ऋक्षोद' पर्वताच्या नांवापासून निघालेलीं असावीं. येथील ब्राह्मणांस 'आर्क्षोदाः' असें म्हटलें आहे. हें नांव अपवादांमध्यें आहे ( पाणिनी ४.३,९१ ).

वने, वन्ने, वनुः—ह्युएनत्संग यानें उल्लेख केलेल्या फलनु या अफगाणिस्तानांतील प्रांतास अर्वाचीन ग्रंथकार वने, वन्ने अशीं नांवें देतात. कनिंगहॅम हा या प्रांतास बनु म्हणतो. या प्रांताचें संस्कृत नांव माहीत नाहीं; तथापि पाणिनी यानें कांहीं ठिकाणीं 'वरणु' या देशाचा उल्लेख केला आहे ( ४.२,१०२; ४. ३, ९३ ) आणि ह्याच ह्युएनत्संग यांचा फलनु देश असावा.

स्वातः—या काबूल नदीच्या शाखेचा 'सुवास्तु' या नांवानें पाणिनीनें उल्लेख केला आहे ( ४.२,७० ).

गंधारः—यांचा देश कच्छादि गणांत घातला आहे ( ४.२,१३३ ).

अओर्नोसः—हा किल्ला अलेक्झांडर यानें फार शौर्यानें घेतला. याचें संस्कृत नांव अद्याप माहीत नाहीं. प्रो. वुइल्सन हा यास 'आवरण' म्हणतो. याच्या पूर्वींचें नांव ग्रीक लोकांनीं गाळलें असावें. कनिंगहॅम हें नांव 'वर' = राजा याच्यापासून आलें असावें असें म्हणतो.

पाणिनी यानें 'वरणा' असें एका नगरीचें व तेथील लोकांचें नांव दिलें आहे, त्यावरून कदाचित् हें नांव निघालें असेल ( पाणिनी ४.२,८२ ). सिंधु नदीच्या उजव्या तीरावर अटकच्या समोर हल्लीं एक वरणस अथवा वरणस या नांवाचें गांव आहे असें म्हणतात.

ओर्तोसानः—या शहरास प्राचीन भूगोलवेत्त्यांनीं हल्लींचें काबूल म्हटलें आहे. याचें संस्कृत नांव सांपडत नाहीं. प्रो. वुइल्सन हे हा शब्द 'ऊर्द्ध्वस्थान' यापासून निघाला असें म्हणतात. परंतु ही निव्वळ कल्पना दिसते. कारण या नांवाचें गांव असल्याचा उल्लेख सांपडत नाहीं. ह्युएनत्संग यानें या प्रदेशास 'फो-लि-शि-स-तंग-न' असें म्हटलें आहे. हा शब्द पानिणीनें उल्लेख केलेल्या ( ९.३,११७ ) पर्शु या शब्दापासून पर्शुस्थान असा होऊन त्याशब्दापासून निघाला असावा.

पंजाबः—पाणिनी व पतंजलि यांनीं या प्रांतास 'बाह्लिक' म्हटलें आहे ( ४.२,११७: ५.३,११४ ). अलेक्झांडरचे इतिहासकार म्हणतात कीं, त्यानें हिड्रओट्स् ( रावी ) नदी ओलांडल्यावर पंजाबांतून जाऊन संगल शहर घेतलें.

यूरोपीय प्राचीन शास्त्रवेत्ते यास 'शाकल' असें संस्कृत नांव देतात; परंतु हें पाणिनीनें उल्लेख केलेले 'सांकल' ( ४.२,७५ ) असावें. हें शहर सांकल नांवाच्या पुरुषानें वसविलें होतें. शाकल ही मद्रांची राजधानी असून ती ह्युएत्संग याच्या वेळीं कायम होती; परंतु संगल या शहराचा अलेक्झांडर यानें नाश केला होता. (पाणिनी पहा)

पर्वतः—पंजाबच्या मध्यभागाचें नांव 'ह्युएनत्संग' यानें पर्वत या शब्दाचें मातृकान्तर करून 'पलफतो' असें दिलें आहे हें मातृकान्तर मॉ. जुलिअँ यांच्या आधारानें बरोबर आहे. कनिंगहॅम यानें हें सोवंत अथवा पर्वत याचें रूपान्तर असावें असें म्हटलें आहे; परंतु पाणिनीनें पर्वत हें देशाचें नांव दिलें आहे ( ४.२,१४३ ).

मल्लि व ऑक्सिड्रेकः—पाणिनीमध्यें एका नियमाचें उदाहरण म्हणून ( ५.३,११४ ) मालव आणि क्षुद्रक हे शब्द दिले असून हे पंजाबांतील लोक असून त्यांचें अनेकवचन 'मालव्याः' आणि 'क्षौद्रक्याः' असें होतें असें म्हटलें आहे. यावरून अलेक्झांडर यास पंजाबांत भेटलेले वरील मल्लि आणि ऑक्सिड्रेक हे मालव व क्षुद्रक असावे. कनिंगहॅम याच्या म्हणण्याप्रमाणें ऑक्सिड्रेक हा शब्द शूद्रक यापासून निघालेला दिसत नाहीं.

संब्रेसी अथवा सब्रेमीः—हे लोक कनिंगहॅम याच्या म्हणण्याप्रमाणें संवाग्री ( हा संस्कृत शब्दासारखा दिसत नाहीं ) नसून यौधेय गणांतील ( ५.३,११७ ) बौभ्रेय असावे ( रा. गो. भांडारकर ).

अर्वाचीन इतिहास.—अफगाण इतिहासकार या लोकांस बेनि इस्रायल(इस्रायलचीं मुलें)म्हणतात व साल राजा (मुसुलमान लोक याला तालात म्हणतात. ) पासून त्याचा मुलगा जेरेमिया, जेरेमियाचा मुलगा अफगाण व त्याच्यापासून आपण पैदा झालों असें हे लोक म्हणतात. असंख्य अफगाणी लोक नेबुकाडरेझरनें येथून दूर नेले; पण ते घोर व फेरोझाच्या पहाडांत नेले. महंमदानें आपला नवीन पंथ जाहीर केल्यानंतर नऊ वर्षांनीं त्यांनां या देवदूताची माहिती झाली व त्यांनीं कायस याचें नेतृत्वाखालीं एक मंडळ महंमदाचा शोध करण्याकरितां मदिनेला पाठविलें. या मंडळामधील लोक कट्टे भक्त बनले व परत आल्यावर त्यांनीं या सर्व लोकांचें धर्मांतर केलें. कायस व त्याचीं तीन मुलें यांपासून खरे अफगाण लोक आपण पैदा झालों असें म्हणतात.

ही गोष्ट निरनिराळया सविस्तर रीतींनीं अफगाण लोकांनीं कित्येक पुस्तकांत वर्णन केलेली आहे. यांपैकीं सर्वांत जुनें पुस्तक सोळाव्या शतकांतील आहे व यापेक्षां जास्त पुरातन काळीं या गोष्टीचा कांहींएक मागमूस आपणास माहीत नाहीं. मेजर रॅव्हर्टी यानें दिलेल्या भाषांतरांत सालोमान राजानें सुलेमान पर्वतांत, अफगाणमध्यें स्वतः वसती केली असें वर्णन आहे. नेबु काडरेझर किंवा घोर यांसंबंधीं उल्लेख नाहीं. फॅरोआच्या जातीच्या कॉप्टसच्या लोकांपासून अफगाण लोकांची उत्पत्ति झालेली आहे असें आपण वाचलें, असें फेरिस्ता नांवाच्या इतिहासकाराचें म्हणणें आहे. मि. बेलोनें आधार दिलेल्या इतिहासांपैकीं एका इतिहासांत असें लिहिलें आहे कीं, कायसचे वेळेपूर्वी बिलोबिझुवसचा बाप, ( उझबेगांचा पूर्वज ) उझबक व अफगाना हीं भावंडें होतीं.

इ. स. पूर्वी ३१० व्या वर्षी सेल्युकसनें हिंदुस्थानांतील सांड्रकोटस ( चंद्रगुप्त ) याला विवाहांतील ठरावान्वयें सिंधु नदाच्या पश्चिमेकडील हिंदु लोकांची वस्ती असलेला कांहीं प्रदेश दिला होता. यांत काबूल नदीच्या पात्राचा कांहीं भाग होता. यानंतर साठ वर्षांनीं बॅक्ट्रियामध्यें एक स्वतंत्र ग्रीक घराणें स्थापन झालें. याची सत्ता काबुलवर व केव्हां केव्हां सर्व अफगाणिस्तानावर पसरलेली होती. काश्मीरांतील जुनें शिल्पकाम, पंजाबांतील माणिक्याल येथील स्तूप व पेशावर दरींत सांपडलेलें बरेंच खोदीव काम यावरून ग्रीकवर्चस्वाची साक्ष पटते. बॅक्ट्रियावर सिथियन लोकांनीं स्वारी केली, या बाबतींत जुन्या व चिनी कथानकांत एकमत आहे. यांपैकींच एका मुख्य राष्ट्रानें--ज्याला चिनी लोकांनीं युएची म्हटलें आहे—सोग्डियाना व ऑक्सस येथें राज्य स्थापिलें. ख्रिस्ती शकाच्या सुमारास कुशन नांवाच्या यांच्यांपैकीं एका मुख्य नायकानें आपला राज्यविस्तार हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेकडील देश व सिंध व अफगाणिस्तान यांच्यावर केला. यालाच ग्रीक ग्रंथकार इंडो-सिथिया म्हणतात.

काबूल नदीचे पात्रांतील देशांत बुद्ध धर्माचें वर्चस्व अगोदरच बसलें होतें. जलालाबाद, पेशावरच्या मैदानांत व काबूलच्या आसपास या धर्माचीं चिन्हें सांपडतात. यानंतर एका मागून एक कित्येक घराणीं झालीं. त्यांपैकीं प्रख्यात राजा कनिष्क होता. बुद्ध ग्रंथांत याचा उल्लेख सांपडतो व अकराव्या शतकांतील मुसुलमान प्रवासी, तत्त्ववेत्ता, इतिहासकार व भूगोलकार अबु-इ-रैहान महंमद अल-बिरुनी यालाहि या राज्याची माहिती होती.

तुर्कोमन घराणींः—ह्युएनत्संगच्या वेळीं हिंदु व तुर्क राजे काबूलच्या दरींत राज्य करीत होते. व दहाव्या शतकाच्या अखेरीस काबूल येथील एका हिंदु राजाचें स्वामित्व नाहींसें होऊन सबक्तगीन नांवाच्या एका तुर्काच्या हातीं येथील सत्ता गेली. काबुलचें हिंदु घराणें नष्ट झालें तें अलबिरुनीनें म्हटल्याप्रमाणें सन १०१० ते १०२१ च्या दरम्यान केव्हां तरी झालें असलें पाहिजे. याविषयीं व्हिन्सेंट स्मिथनें लिहिलें आहे कीं, "शंकरवर्म्याच्या कारकीर्दीत ( सन ८८३ ते ९०२ ) कनिष्कचा वंशज व तुर्की घराण्याचा शेवटचा राजा, लल्लिय नामक ब्राह्मणाच्या हातून पराभव पावला. तेव्हां लल्लियानें तेथें आपलें घराणें स्थापन केलें व तें सन १०२१ पर्यंत तेथें नांदल्यावर मुसुलमानांनीं त्या सुमारास त्याचा उच्छेद केला." (प्राचीन भारतवर्षाचा इतिहास. तिसरी आवृत्ति पान ३७६ )...

त्याच्यामागून त्याचा मुलगा महमूद व इतर वंशज यांनीं बाराव्या शतकाच्या मध्यापर्यंत राज्य केलें व काबूल शहर हें आशियांतील एक भव्य शहर बनविलें. यानंतरच्या घराण्यांस सामान्यतः पहिलें अफगाण घराणें समजतात. याचा मूळपुरुष अल्लाउद्दिन घोरी हा होता. यानें काबूल उद्ध्वस्त केलें होतें. याचा पुतण्या शहाबुद्दीन घोरी यानें बनारसपर्यंत हिंदुस्थान काबीज केलें होतें. व याच्या बंधमुक्त गुलामांनीं १८५७ पर्यंत टिकून राहणारें हिंदुस्थानांतील मुसुलमानी राज्य स्थापिलें होतें. कांहीं काळपर्यंत अफगाण लोकांचा प्रदेश ख्वाझारिम येथील राजांच्या ताब्यांत होता व जलालुद्दीन ख्वाझारिमनें चेंगीझखानाची प्रगति थांबविली होती.

मोंगल घराणें:—तैमूरनें हे सर्व देश काबीज केले होते व ते त्याच्या वंशजांच्या ताब्यांत १५०१ पर्यंत होते. नंतर ते सुलतान बाबरच्या हातीं आले. यानें १५२२ मध्यें अर्घन लोकांपासून कंदाहार घेतलें व यानंतर मोंगल घराण्यानें दिल्ली येथें स्थापिलेल्या मुसुलमानी राज्याचे हे प्रांत बनले. कंदाहार हें कधीं मोंगल लोकांच्या हातीं असे व कधीं इराणांतील सूफी लोकांच्या स्वाधीन असे.

दुराणी घराणें:—१७३७–३८ मध्यें नादिरशहानें कंदाहार व काबूल घेतलें. नादिरशहाच्या सैन्यांत अहमदखान नांवाचा एक तरुण शिपाई होता. नादिरशहाच्या वधानंतर अफगाण लोकांनीं या अहमदखानाला राजा निवडिलें. यानें स्थापिलेलें दुराणी घराणें अद्याप राज्य करतें. यानें मराठे लोकांचा पानिपत (१७६१) येथें पूर्ण पराजय केला व आपल्या मरणानंतर आपल्या पाठीमागें अफगाणिस्तान, पंजाब, काश्मीर, आक्सस पर्यंत तुर्कस्थान, सिंध, बलुचिस्तान व खोरासान वगैरे प्रांतांचें बनलेलें राज्य आपला मुलगा तैमूर याच्या स्वाधीन केलें.

तैमूरनें राजधानी कंदाहारहून काबूलला आणली त्याच्या मरणानंतर त्याच्या तवीस मुलांमध्यें गादीबद्दल लढाया झाल्या. अखेरीस महमूदानें बरकझाई घराण्याच्या फत्तेखान नांवाच्या शूर सरदाराच्या मदतीनें गादी मिळविली. परंतु महमूदचा मुलगा कामरान यानें फत्तेखानाचा मत्सरानें खून केला.

बरकझाई बंधूंनीं फत्तेखानाबद्दल सूड उगविला व सादोझाई (महमूद व त्याचे वारस) लोकांनां काबूल, गिझनी, व कंदाहार येथून हांकून लाविलें. हिरात फक्त कामरानच्या ताब्यांत राहिलें व बाकीचें राज्य बरकझाई लोकांमध्यें वांटून देण्यांत आलें. अशा रीतीनें दोस्त महंमदाचे ताब्यांत काबूल आलें.

पहिली अफगाण लढाई:–[१८३८–४२] १८०९मध्यें नेपोलियननें इराणमध्यें कारस्थान सुरू केल्यामुळें माउंट स्टुअर्ट एल्फिन्स्टन यांस अफगाणिस्थानचा अमीर शहासुजा यांजकडे वकील म्हणून पाठविण्यांत आलें. १८३७ मध्यें इराणी लोकांनीं हिरातला वेढा दिला व रशियनलोकांच्या कारस्थानामुळें अस्वस्थता उत्पन्न झाली. या वेळीं बर्न्स यांस गव्हर्नर–जनरलनें अमीरच्या दरबारीं वकील म्हणून रवाना केलें. शहा सुजाला गादीवर बसविण्याचें ब्रिटिश सरकारनें ठरविलें. लढाई १८३८ मध्यें सुरू झाली. कंदाहार, गिझनी कांबीज करण्यांत आली, शहासुजाला गादीवर बसविलें, दोस्त महंमद शरण आला व त्याला हिंदुस्थानांत रवाना केलें. परतु परकी लोकांच्या तंत्रानें वागणारा राजा अफगाण लोकांनां फारसा पसंत नव्हता. दोन वर्षांनंतर १८४१ मध्यें काबूलमध्यें बंड झालें; याचा नायक दोस्त महंमदाचा मुलगा अकबरखान हा होता. बर्न्स, मकनॉटन व इतर अधिकारी यांचे खून झाले. ब्रिटिश शिबंदीनें काबूल सोडून जाण्याचें कबूल केलें. यांपैकीं फक्त डॉ. ब्रायडन हाच जलालाबाद येथें येऊन पोहोंचला. १८४२ मध्यें जनरल पोलॉक यानें जलालबादची सोडवणूक केली, काबूल घेतलें, व कैदी सोडवून घेऊन १८४२ मध्यें तो अफगाणिस्तान सोडून परत आला.

ब्रिटिश व रशियन संबंध:—अफगाणिस्तान स्वतंत्र व अविभक्त ठेवून रशियनराज्य व ब्रिटिश हिंदुस्थान यांच्या मध्यें एक प्रतिबंधक सरहद्द ठेवावी हेंच या वेळीं ब्रिटिश लोकांचें धोरण होतें. दोस्त महंमद इंग्लिश लोकांचा दोस्त बनला. १८६३ मध्यें तो मेल्यावर त्याचा मुलगा शेर अली १८६८ त अमीर बनला. १८६९ मध्यें शेर अली व व्हाईसरॉय लॉर्ड मेयो यांची अंबाला येथें मुलाखत झाली, व दोन्हीं राज्यांतील परस्परसंबंध जास्त दृढ करण्यांत आले.

१८७३ मध्यें रशियन लोकांनीं खिवा घेतलें. त्यामुळें अमिरास धास्ती उत्पन्न होऊन त्यानें ब्रिटिश सरकारची मदत मागितली, परंतु ती नाकारण्यांत आली. त्यामुळें तो नाराज होऊन त्यानें रशियन लोकांच्या दोस्तीचें बोलणें स्वीकारलें. १८७२ मध्यें वायव्येकडील अफगाणिस्तानची सरहद्द इंग्लंड व रशिया यांनीं ठरविली.

अफगाणिस्तानच्या पलीकडे रशियन लोक आपलें राज्य एकसारखें वाढवीत असल्यामुळें ब्रिटिश लोकांनीं अमिराशीं तहाचें बोलणें लाविलें परंतु त्यानें नाकारलें.

दुसरी अफगाण लढाई:—(१८७८–८०) रशियन सरकारानें कान्स्टांटिनोपलवर करावयाच्या हल्ल्यांत इंग्रज लोकांची ढवळाढवळ बंद करावी म्हणून काबूलला अमीराशीं तह करण्याकरितां एक वकील पाठविला. हिंदुस्थानांतून अमिराकडे एक मिशन रवाना करण्यांत आलें, परंतु तें अफगाण सरहद्दीवरूनच परत करण्यांत आलें, यामुळें व्हइसरॉयानें लढाई पुकारली. या लढाईंत डोनाल्ड स्टुअर्टनें कंदाहार घेतलें. दुसऱ्या एका सैन्यानें जलालाबाद व इतर ठाणीं घेतलीं. सर फ्रेडरिक रॉबर्ट्स, यानें अमिराचा पराभव पैवार कोटाल येथें केला

अमीर उत्तरेकडे पळाला व १८७९ मध्यें मझार–इ–शरीफ येथें मेला. आतां शेरअलीच्या गादीवर कोणाला बसवावें हा प्रश्न उद्भवला.

मध्यंतरीं याकूबखान यानें आपण गादीवर बसल्याचें पोलिटिकल एजंट मेजर कॅव्हेग्नेरि याजला कळविलें व त्याच्याशीं एक तह १८७९ मध्यें करण्यांत आला. या तहान्वयें अमीर इंग्रजांचा दोस्त बनला व परराष्ट्रीय कारभार त्यानें इंग्रजांच्या हवालीं केला. परंतु याच वर्षी सप्टेंबरमध्यें कॅव्हेग्नेरि व त्याचे लोक यांचा खून झाला व मोठें बंड झालें. रॉबर्टस् यानें अफगाण लोकांचा चॅरासिया येथें पराभव केला व काबूलमध्यें प्रवेश केला. याकूबखान शरण आला व त्याला हिंदुस्थानांत पाठविण्यांत आलें. डिसेंबर १८७९ पर्यंत ब्रिटिश सैन्यानें काबूल किल्ला आपल्या ताब्यांत ठेविला, परंतु अफगाणिस्तानांतील राजकीय स्थिति समाधानकारक नव्हती.

अबदुल रहमानची कारकीर्दः—अमीरशेर अलीच्या मोठ्या भावाचा मुलगा अबदुल रहमान हा शेरअलीविरुद्ध लढला होता, म्हणून त्याला दहा वर्षेपर्यंत रशियन लोकांजवळ ऑक्सस नदीपलीकडे बंदिवासांत रहावें लागलें. १८८०त तो परत आला व अफगाणिस्तानच्या उत्तरेकडील भागांत आपली सत्ता स्थापन करूं लागला. व्हाइसराय लॉर्ड लिटन यानें काबूल येथील अधिकाऱ्यांस त्याच्याशीं बोलणें सुरू करण्यास फर्मावलें. मोठ्या चतुराईनें अबदुल रहमानला इंग्रज लोकांनीं इतर कोणत्याहि परकी राष्ट्रांशीं संबंध न ठेवण्याचें कबूल करावयास लाविलें, याबद्दल ब्रिटिश लोकांनीं त्याला अमीर म्हणून कबूल केलें. काबूल राज्यापासून कंदाहार प्रांत अलग करून ब्रिटिश लोकांनीं त्याच्यावर बरकझाई घराण्यांतील शेर अलीखान नांवाच्या सरदारास स्वतंत्र राजा नेमिलें.

अफगाणप्रकरणाचा निकाल लागल्यासारखें वाटलें परंतु १८८० मध्यें शेरअलीचा धाकटा मुलगा अयुबखान यानें हिरातहून कंदाहारवर स्वारी केली. ब्रिटिश सैन्याचा मैवंड येथें पूर्ण पराभव केला व कंदाहारला वेढा दिला. सर फ्रेडरिक रॉबर्टस् यानें काबूलहून चाल केली, अयुबखानाच्या सैन्याचा पराभव करून दाणादाण उडविली. ब्रिटिश मंत्र्यांनीं कंदाहार सोडून देण्याचें ठरविलें व सरदार शेरअलीखान हा राज्य सोडून हिंदुस्थानांत गेला, यामुळें अमीरास या शहराचा ताबा घेण्याचें बोलावणें आलें. परंतु अयुबखान यानें जेव्हां ब्रिटिश फौज हिंदुस्थानांत परत गेल्याचें ऐकलें तेव्हां तो हिरातहून मोठें सैन्य घेऊन कंदाहारजवळ आला. त्याच्या लोकांनीं गिरिष्कचा किल्ला घेतला. अमिराच्या सैन्याचा पराभव झाला व अयुबखानानें कंदाहार घेतलें. अमीरानें सैन्य घेऊन चाल केली व अयुबचा पराभव करून त्याच्या तोफा घेतल्या तेव्हां अयुब पळाला. मध्यंतरीं अमीराच्या सरदारानें हिरात घेतलें; त्यामुळें अयुबखान इराणांत पळून गेला व अशा रीतीनें अमीराचें वर्चस्व स्थापित झालें.

१८८४ मध्यें ब्रिटिश व रशियन अधिकाऱ्यांच्या संयुक्त कमिशननें अफगाणिस्तानची उत्तरसरहद्द कायम करण्याचें ठरविलें व हें काम मोठ्या कारवाईनें संपविण्यांत आलें.

१८८० मध्यें गादीवर बसल्यानंतर पहिलीं दहा वर्षें अमीरानें सर्व देशावर आपली सत्ता मजबूत करण्याच्या कामीं घालविलीं. कांहीं स्थानिक बंडें व अयुबखान व अमीराचा चुलत भाऊ इशाकखान यांचे अमीरास पदच्युत करण्याचे यत्न मोठ्या क्रौर्यानें मोडण्यांत आले. १८९१ मध्यें अमिरानें आपली सत्ता सर्व अफगाणिस्तानभर स्थापन केली. १८९५ मध्यें अमीराच्या सैन्यानें काफरिस्तानांत शिरून तो प्रांत काबीज केला. मध्यंतरी, जेथें चिनी राज्यास अफगाण सरहद्द मिळते त्या टोंकापर्यंत उत्तरसरहद्द ठरविण्यांत आली, व हिंदुस्थानकडील अफगाणाची पूर्वसरहद्द ठरविण्यांत येऊन नकाशा काढण्यांत आला. याबद्दल अमीराला ब्रिटिश सरकाराकडून वार्षिक मोठी खंडणी मिळाली व युद्ध सामुग्रीहि बरीच मिळाली व हिंदुस्थानांत हत्यारें खरेदी करण्याचा हक्क मिळाला. यामुळें अमीराला देशांतील निरनिराळ्या टोळ्यांनां कमजोर करतां आलें, व यूरोपीयन शस्त्रायुधानीं सज्ज केलेलें शिस्तवार सैन्य ठेवितां आलें. व देशांत अनियंत्रित सत्ता स्थापन करतां आली. सर्वप्रकारचे जबर कर बसविण्यांत येऊन व्यवस्थित रीतीनें वसूल करण्यांत आले. याचा परिणाम असा झाला कीं, पूर्वी निरनिराळ्या टोळ्यांच्या नायकांना लढाई करितां सैन्य पुरविण्याबद्दल जमीनी देत असत, परंतु आतां उक्त पगार देऊन सैन्यभरती करण्यांत येऊं लागली. ज्यांच्या ज्यांच्या पासून अमीराला धोका वाटत असे त्या सर्वांनां त्यानें मारिलें अथवा हद्दपार केलें. त्याच्या शिक्षा फार कडक असत. परंतु ह्याच अमीरानें देशांतील बेबंदशाही मोडली, स्थानिक नायकांचा जुलूम नाहींसा केला, व कांहीं शांतता व व्यवस्था स्थापन केली. अफगाणिस्तानच्या इतिहासांत याच अमीरानें प्रथम सुयंत्रित राज्यव्यवस्था स्थापन केली. अंतरराष्ट्रीय कारभारांत कोणत्याहि प्रकारची परराष्ट्रीय ढवळाढवळ चालू द्यावयाची नाहीं हें त्याचें धोरण होतें. तो ब्रिटिश लोकांपासून खंडणी व युद्धोपयोगी सामान घेत असे, परंतु राज्यरक्षण अथवा व्यापारवृद्धि या कोणत्याहि सबबीवर त्यानें रेल्वे, तारायंत्रें वगैरे सुधारणा ब्रिटिश लोकांनां करूं दिल्या नाहींत.

हबिबुल्लाचें राज्यारोहणः—अबदुल रहमान १९०१ मध्यें मेला व त्यानंतर दोन दिवसांनीं त्याचा वडील मुलगा हबिबुल्ला त्याच्या गादीवर बसला. सैन्य, धार्मिक संस्था, टोळ्यांचे नायक व सर्व दर्जाचे लोक यांनीं याला कायदेशीर राजा म्हणून कबूल केलें. अमिराचें पहिलें काम म्हटलें म्हणजे आपली लोकप्रियता वाढविणें व अंतरराष्ट्रीय राज्यकारभारपद्धत सुधारणें हें होतें. विशेषतः अबदुलरहमान यानें प्रत्येक टोळीस कांहीं ठराविक लोक सैन्यांत काम करण्यास देणें

भाग पाडलें होतें. या बाबतींत कांहीं सुधारणा करण्याचें त्यानें योजिलें व या हेतूनें टोळ्यांचें कामकाज पाहण्याकरितां एक कौन्सिल नेमण्यांत आलें व या कौन्सिलांत प्रत्येक टोळीचा एक प्रतिनिधि असावा अशी योजना करण्यांत आली.

परराष्ट्रीय कारभाराच्या बाबतींत या अमीरानें आपल्या बापाचेंच धोरण स्वीकारलें. परराष्ट्रीय प्रकरणांत ब्रिटिशसरकारची सल्ला घेण्याची अट अमीरानें इमानानें पाळली आहे. हिंदुस्थान सरकार व अफगाण सरकार यांच्यामध्यें भिजत पडलेल्या कांहीं प्रकरणाच्या बाबतींत या अमिरानें आपल्या बापाचेंच धोरण स्वीकारलें. १८८० मध्यें ब्रिटिश सरकारनें दिलेलीं आश्वासनें वाढविणें अगर बदलणें या कामाकरितां सर लुईडेन यांच्या नेतृत्वाखालीं काबूलला एक मिशन पाठविण्यांत आलें. परंतु पूर्वीच्या करारापेक्षां कांहीं एक जास्त ठरविण्यांत आलें नाहीं. हा ठराव १९०५ मध्यें झाला. जानेवारी १९०७मध्यें व्हाईसरॉय लॉर्ड मिंटो यांची भेट अमिरानें हिंदुस्थानांत घेतली.

३१ आगस्ट सन१९०७ रोजीं आंग्लोरशियन तह झाला. या तहान्वयें अफगाणिस्तानची राजकीय स्थिति बदलण्याचा, त्याच्या आंतरराष्ट्रीय कारभारांत हात घालण्याचा किंवा या राज्यांतील मुलूख घेण्याचा इरादा ब्रिटिश सरकारानें सोडून दिला व रशियानें अफगाणिस्तान आपल्या वर्चस्वकक्षेच्या बाहेर असल्याचें जाहीर केलें.

अफगणिस्तानचे अमीर हबीबुल्लाखान यांनीं १९०७ मध्यें हिंदुस्थानला भेट दिली व त्या भेटींत ब्रिटिश अधिकारी व ॲंग्लो-इंडियन समाज यांच्याशीं त्यांचा जो परिचय झाला त्याचा परिणाम अमीर साहेबांच्या पुढील कारकीर्दीवर बराच झाला. ब्रिटिश सरकारशीं त्यांची दोस्ती वाढली. व त्याच सालीं रशियाबरोबर होऊं घातलेल्या व्यापारी सवलती व राजकारणांत शिरकाव देणाऱ्या करारनाम्याला संमति देण्याचें त्यांनीं अखेर नाकारलें. १९०८ ते १९१४ हा काल अफगाणिस्तानला शांततेचा जाऊन तेथें बऱ्याच मुलकी, आर्थिक व लष्करी सुधारणा करण्यांत आल्या. शाळा, कारखाने, दवाखाने, तारायंत्रें व टेलिफोन अधिक वाढविण्यांत आलें. सुधारलेले लष्करी शिक्षण देऊन सैन्यांत सुधारणा करण्याची व्यवस्था तुर्की अधिकारी नेमून करण्यांत आली. मोटारींनांहि योग्य अशा पक्क्या सडका बांधण्यांत आल्या. आणि हेलमंड, काबूल व अर्गेदाब या नद्यांचे कालवे काढून शेतकी सुधारण्यांत आली.

१९११ मध्यें इटाली व तुर्कस्तान यांत युद्ध सुरू झालें. त्यावेळीं अफगाण लोकांनीं आपल्या धर्मबांधवांनां सार्वजनिक फंड गोळा करून पैशाची मदत केली. १९१४ मध्यें जागतिक युद्ध सुरू होतांच हिंदुस्थान सरकारनें अमीर साहेबांनां बातमी कळवून अफगाणिस्तान तटस्थ राखण्याबद्दल कळविलें, आणि अमीरसाहेबानींहि अफगाणिस्तानच्या स्वातंत्र्याला धोका पोहोंचणार नाहीं तोंपर्यंत तटस्थ राहण्याचें कबूल केलें. १९१४ च्या नवंबरमध्यें तुर्कस्तान जर्मनीच्या बाजूनें युद्धांत सामील झाल्यावर पुन्हां हिंदुस्थानसरकारनें अमीरसाहेबांनां खलीता पाठवून युद्ध धार्मिक स्वरूपाचें नाहीं व अरबस्तानांतील इस्लामी पवित्र स्थानांवर हल्ला होणार नाहीं याबद्दल खातरजमा केली. उलटपक्षीं तुर्कस्तान युद्धांत शिरतांच अफगाण लोकांत बरीच चळवळ सुरू झाली व धर्मबांधव तुर्कांना मदत करून स्वतःचाहि फायदा करून घेण्याची विनंति अमीरांनां करण्यांत येऊं लागली. बाहेरून जर्मन सरकारनें जर्मन व तुर्की अधिकारी व त्यांच्याबरोबर हिंदु व मुसुलमान अशा हिंदी राजद्रोही इसमांनां देऊन एक मिशन अमीरसाहेब यांजकडे १९१५ मध्यें पाठविलें पण त्या सर्व गोष्टींकडे दुर्लक्ष करून अमीरांनीं आपलें तटस्थ राहण्याचें वचन पूर्णपणें पाळलें, इतकेंच नव्हे तर सरहद्दीवरील टोळ्यांत शांतता राखण्याच्या कामीं मदत केली; व त्यामुळें हिंदुस्थानसरकारला पुष्कळसें हिंदी सैन्य रणभूमीवर पाठवितां आलें. १९१८ नवंबर मध्यें जागतिक युद्ध थांबलें, पण अफगाणिस्तान मात्र शांततेच्या लाभाला लवकरच अंतरलें. १९१९ फेब्रुवारी मध्यें अमीर हबीबुल्लाखान यांनां रात्रीं अंथरुणांत असतांना गोळी झाडून ठार करण्यांत आलें. आणि त्याचा भाऊ नसरुल्लाखान आणि तिसरा मुलगा अमानुल्लाखान या दोघांनीं राजा म्हणून जाहीर केलें. पण लोकांनीं तिसऱ्या मुलाच्या हक्कालाच पाठिंबा दिल्यामुळें चुलता नसरुल्लाखान व इतर राजवंशीय पुरुष यांनीं त्याची सत्ता मान्य केली. अमानुल्लाखान यांनीं हिंदुस्थानसरकारला स्वराज्यारोहण जाहीर करून दोस्तीचें आश्वासन दिलें.पण या अमीरानीं लवकरच भलत्या लोकाच्या नादीं लागून पूर्ण स्वातंत्र्याचा जाहीरनामा काढला, व सोव्हिएट सरकारशीं स्नेहसंबंध जोडण्याकरितां मास्कोला मिशन पाठविलें. हिंदुस्थानांत व मेसापोटेमियांत ब्रिटिशांच्या जुलमी अंमलामुळें बंडें उद्भवलीं आहेत अशा कंड्या पिकविण्यांत येऊन हिंदुस्थानावर स्वारी करण्याची तयारी अफगाण सरकारनें केली. १९१९ मे मध्यें हिंदुस्थानकडे सैन्य रवाना झालें. पण ब्रिटिश सैन्यानें त्याला मागें हटवून डाक्का व स्पिन बलदक हा अफगाणांचा किल्ला सर केला. तेव्हां अमीरानें तहाचें बोलणें सुरू करून रावळपिंडीस ८ आगष्ट रोजीं युद्ध तहकुबीच्या तहनाम्यावर सह्या झाल्या व कायमचा तह मागाहून करण्याचें ठरलें. १९१९ मे पासून आगष्ट पर्यंत सरहद्दीवरील रानटी टोळ्यांनीं लहान लहान हल्ले व लुटालूट सुरू ठेविली होती.

या तहांतील महत्त्वाची गोष्ट म्हणजे यानें अफगणिस्तानला परराष्ट्रीय राजकारणांत पूर्ण स्वातंत्र्य देण्यांत आलें. पूर्वीच्या अमीरांबरोबर ब्रिटिशांच्या सल्ल्यानें चालण्यासंबंधाचें परराष्ट्रीय राजकारणाच्या बाबतीवर जें नियंत्रण होतें तें काढून टाकण्यांत आलें; आणि अंतर्गत व परराष्ट्रीय दोन्ही प्रकारच्या कारभारांत अफगाणिस्तानला पूर्ण स्वातंत्र्य मिळालें.

त्याबरोबरच हिंदुस्थान सरकारनें अमीरांना चालू असलेली वार्षिक खंडणी बंद केली, व हिंदुस्थानांतून दारू गोळा वगैरे युद्धोपयोगी सामान नेण्याची परवानगी रद्द केली.

१९२० जानेवारीमध्यें सोव्हिएट सरकारनें काबूलला आपलें मिशन पाठविलें व बोलणें चालणें होऊन १९२० आक्टोबरमध्यें तहनाम्यावर सोव्हिएट सरकारनें सही करून अमीराच्या संमतीकरितां तहनामा पाठविला. अमीरांना खंडणी द्यावयाचें व तज्ज्ञ पुरविण्याचें सोव्हिएट सरकारनें कबूल केलें आहे असें दिसतें. तथापि पूर्वी १९२१ नवंबरपर्यंत या अटी प्रसिद्ध झाल्या नव्हत्या. पूर्वीच्या कराराप्रमाणें कायमचा तह करण्यासंबंधानें हिंदुस्थान व अफगाण सरकारांमध्यें १९१९-२० मध्यें बराच पत्रव्यवहार चालू होता. पुढें १९२१ मध्यें सर हेनरी डॉब्सच्या नेतृत्वाखालीं ब्रिटिश वकील मंडळ काबूलला पाठविण्यांत आलें. १९२० नवंबर मध्यें तुर्की जनरल जेमलपाशाहि काबूलला आला होता.

गेल्या दोन वर्षांत अफगाणिस्तान विविध चळवळींचें केंद्र बनून राहिलें होतें. एकीकडून बोल्शेविक व दुसरीकडून ब्रिटिश यांनीं मुत्सद्दीगिरीचे आटोकाट प्रयत्न चालविले होते. डाब्स मिशननें अफगाणिस्तानांत दोन वर्षें राहून त्या देशाला फायदेशीर असा तह घडवून आणिला; या तहामुळें अफगाणिस्तानाला जास्त स्वतंत्रता मिळाली. बोल्शेविकांच्या भीतीमुळें ब्रिटिशांनीं अफगाणला सवलती दिल्या, बोल्शेविकांशीं झालेला तहनामा पुढें दिला आहे.

अ फ गा णि स्ता न व र शि या यां चा त ह.—रशिया व अफगाणिस्तान यांजमधील मित्रत्वाचें नातें दृढ करण्याकरितां ता. २८ फेब्रुवारी सन १९२१ इ. रोजीं मास्को येथें खालील तह झाला. तहाचें बोलणें करण्यास रशियाचे २ व अफगाणिस्तानचे ३ प्रतिनिधी मास्को येथें जमले होते. तहांतील २, ९ व १० हीं महत्त्वाचीं कलमें होत. पहिल्या कलमानें दोघांनीं एकमेकाचें स्वातंत्र्य कबूल करून तह करण्याचें ठरविलें. दुसऱ्या कलमानें एकानें दुसऱ्यास नुकसानकारक होईल असा कोणताहि लष्करी अगर राजकीय करार तिसऱ्याच देशाबरोबर करण्याची मनाई केली आहे. तिसऱ्या कलमानें अंतरराष्ट्रीय कायद्याप्रमाणें वकिलातीस जे जे हक्क अगर सवलती असतात, त्या त्या एकमेकांस दिल्या आहेत. आपलें निशाण उभारणें, वकिलातींतील सभासदास व वकिलातीच्या पत्रव्यवहारास असलेली सवलत, टेलिफोन अगर टेलिग्राफचे मार्ग खुले असणें, वकिलातींच्या इमारतीची देशांतील कोर्टाच्या अधिकारांतून मुक्तता वगैरे हे हक्क होत. एकमेकांच्या लष्करी एजंटांचाहि त्यांच्या त्यांच्या वकिलातींत समावेश करावयाचा. चवथ्या व पांचव्या कलमानें रशियानें अफगाणिस्तानांत ५ व अफगाणिस्तानानें रशियांत ७ ठिकाणीं वकिलाती उघडाव्या व त्या कोठें उघडाव्या हें सांगितलें आहे. याशिवाय जादा वकिलातहि एकमेकांच्या तंत्रानें उघडण्यास हरकत नाहीं. सहाव्या कलमानें अफगाणिस्तान रशियांत जो जो माल विकत घेईल तो तो कोणतीहि जकात न घेतां रशियाबाहेर जाऊं देण्याची रशियानें कबुली दिली आहे. सातव्या कलमानें पूर्वेकडील देशाचें स्वातंत्र्य कबूल करण्यांत येऊन आठव्या कलमानें बुखारा व खिवा या देशांस स्वातंत्र्य देऊन नवव्या कलमानें गेल्या शतकांत अफगाणिस्तानच्या मालकीचे पण आतां रशियाकडे असलेले प्रांत न्यायास व लोकमतास अनुसरून रशियानें अफगाणिस्तानास परत देण्याचें कबूल केलें आहे. दहाव्या कलमानें रशियानें अफगाणिस्तानास आर्थिक व इतर मदत देण्याचें कबूल केलें आहे. या कलमाप्रमाणें दरसाल अफगाणिस्तानास दहा लाख रूबलपर्यंत अगर त्या किंमतीची सोनें चांदीची मदत फुकट देणें, कुश्क, हिरात, कंदाहार, काबूल ही टेलिग्राफ लाईन बांधून देणें, तज्ज्ञ लोक पुरविणें वगैरे मदत रशियानें तह कायम झाल्यापासून दोन महिन्याच्या आंत करण्याचें कबूल केलें. अकराव्या कलमांत तह रशियन व पर्शियन या दोनहि भाषांत लिहिला असून दोनहि प्रती अस्सल आहेत असें नमूद आहे. दोनहि राष्ट्रांच्या सरकारांनीं मंजुरी दिल्यावर सदरहू तह पक्का व्हावा व त्यावर काबूल येथें शेवटचें शिक्कामोर्तब व्हावें असें बाराव्या कलमांत आहे.

प र रा ष्ट्री य धो र ण.—अफगाणिस्तानाचें परराष्ट्रीय धोरण तीन संबंधाकडे लक्ष ठेवून आखावें लागेल. ( १ ) इराणाशीं संबंध, ( २ ) बुखाऱ्याशीं संबंध, ( ३ ) ब्रिटिश व सोव्हिएट सरकार यांशीं संबंध. गेल्या तीन वर्षांत वरील संबंधांत पुढीलप्रमाणें फेरफार झाले.

बुखाराः—बुखारा येथें लोकसत्तात्मक पद्धतीवर राज्यव्यवस्था बनविण्याच्या कामीं अफगाणिस्तानचा हात होता हें विदितच आहे. तथापि बुखाऱ्याचा माजी अमीर अफगाणकडे आल्याबरोबर तेथील अमीरानें त्याला आश्रय दिला व त्याची गादी पुन्हां परत मिळवून देण्याची खटपट चालविली अशी कुणकुण आहे. अफगाणपत्रें याचा पूर्ण इनकार करीत आहेत.

इराणः—आक्टोबर १९२१ मध्यें इराणशीं असा तह झाला कीं, जर एक राष्ट्र तिऱ्हाईत राष्ट्राशीं युद्ध करण्यांत गुंतलें असेल तर दुसऱ्या राष्ट्रानें त्या तिऱ्हाईत राष्ट्राचा जय न होईल अशी मोठी खटपट करावी.

ब्रिटनः—१९१९ सालीं डाब्समिशननें असा तह घडवून आणला कीं, अफगाणिस्तानला पूर्ण अंतस्थ स्वातंत्र्य असावें; व त्या राष्ट्रानें बोल्शेविक वकीलात परत पाठवावी व कंदाहार आणि जलालाबाद येथें ब्रिटिशांचे वकील नेमावेत. सरहद्दीवरील टोळ्यांचें स्वातंत्र्य कोणी हिरावूं नये कारण त्या योगानें हिंदुस्थानला धोका पोचण्याचा संभव आहे.

सोव्हिएटः—वरील तहामुळें सोव्हिएट सरकारचे प्रयत्न थंड पडले असें कोणी समजूं नये. काबूल येथील सोव्हिएट

सरकारच्या वकीलानें अफगाणिस्तानाला पौरस्त्य राष्ट्रसंघाचा सभासद होण्याला विनवावें असा त्याला इषारा मिळाला. या संघांत रशिया, तुर्कस्तान,काकेशियन लोकसत्ताक राज्य, बुखारा, मोंगोलिया आणि इराण यांचा समावेश आहे.

आ धु नि क अं त स्थ सु धा र णा.—काबूल ते हिंदुस्थानपर्यंत तारायंत्रें सुरू केलीं आहेत. लोकहितासाठीं अमीराचा खाजगी खर्च बराच संपुष्टांत आणिला आहे. पुष्कळसे फ्रेंच पंडित बोलावण्यांत आले असून त्यांच्याकडे शिक्षण व संशोधन हीं कामें दिलीं आहेत.एक तज्ज्ञ इटालियन इंजिनियर नेमून भूगर्भाचें धातूंकरितां संशोधन चालविलें आहे; त्यानें प्रसिद्ध केलेल्या अहवालावरून कोळसा, तांबें, लोखंड, रुपें आणि गंधकित द्रव्यें हीं चांगलीं निघतील अ·। तर्क आहे. मालाची नेआण करण्याच्या बाबतींत अद्याप मोठी अडचण आहे. अफगाणिस्तानाच्या वेशीपर्यंत आगगाडी नेण्याचें ब्रिटिश पत्करीत आहेत व पुढें आपल्या हद्दींत अमीरानें फांटे न्यावेत असें कांहीं घाटत आहे असें म्हणतात. अफगाण सरकारनें सध्यां पोष्ट खातें सुरू केलें आहे व अंतरराष्ट्रीय टपालसंघांत तें सामील झालं आहे. १९२२ च्या उत्तरार्धांत मोटारनें होत असलेले टपालासुद्धां सर्व व्यवहार एका इटालियन कंपनीच्या स्वाधीन केले आहेत. काबूलचें "आमन-इ-अफगाण" आणि जलालाबादचें "इत्तिहद-इ-मशर्गी" हीं दोन राष्ट्रीय पत्रें देशाच्या सुधारलेल्या भावना व्यक्त करितात. याखेरीज दुसरींहि पत्रें आहेत.

हल्लींचे अफगाणचे अमीर अमानुल्ला फारच साधे असून स्वतः राज्यकारभार पाहतात. त्यांची टापटीप व व्यवहार मागील कोणत्याहि अमीराच्या अंगीं नव्हता. राज्यांत सुधारणा कशी करावी याकडे त्यांचें लक्ष असतें. मुलांप्रमाणें मुलींसहि शिक्षण मिळालें पाहिजे यावर त्यांचा मोठा कटाक्ष आहे. राज्यांतील बहुतेक शैक्षणिक कामें हिंदी गृहस्थाकडे आहेत. पेशावरपासून काबूलपर्यंत मोटाररस्ता करण्याची त्यांची मनीषा आहे. हिंदी लोकांनां खुष ठेवण्याबद्दल अमीर फार उत्सुक दिसतात असें अफगाणिस्तानांतून जाऊन आलेला डॉ. स्कार्पा नांवाचा एका इटालियन व्यापारीसंघाचा अध्यक्ष म्हणतो.

अ मी रा चें हिं दी लो कां शीं व र्त न.—अमीराचें हिंदी लोकांशीं वर्तन कोणत्या प्रकारचें आहे हें तीन वर्षांपूर्वी त्यांनीं काढलेल्या पुढील जाहीरनाम्यावरून दिसून येईल. आपल्या राज्यांतील हिंदु लोकांचे हाल होत आहेत असें अमीरांच्या कानीं येतांच त्यांनीं हिंदी लोकांनां आपली गाऱ्हाणीं नीटपणें पुढें मांडण्यास सांगितलें. नंतर आपल्या प्रजेला जो हुकूम सोडला त्यांतील कलमांचा गोषवारा येणेंप्रमाणें:—( १ ) इस्लामीधर्म स्वीकारण्याविषयीं कोणाहि हिंदूवर जुलूम होऊं नये. ( २ ) हिंदूंनीं आपल्या इच्छेप्रमाणें धार्मिक विधी आचरावेत व आपआपल्या मुलांना शिकवावींत. ( ३ ) हिंदी स्त्रियांनां वाटेल त्या ठिकाणीं बिनहरकत जातां यावें. ( ४ ) एखादी धर्मशाळा ओस पडली असेल तर त्या ठिकाणीं पुन्हां वस्ती व्हावी. ( ५ ) कोणतीहि रोगी गाय मारण्यांत येऊं नये; तिला आपोआप मरण येऊं द्यावें. ( ६ ) पाहिजे तो पोषाख हिंदूंनीं करावा. ( ७ ) अमीराच्या हिंदी प्रजेनें अफगाणिस्तानांत कोठेंहि जमीन खरेदी करावी. ( ८ ) मुसुलमानांच्या इतकाच हिंदूंनीं कर द्यावा. ( ९ ) जर एखादी स्त्री किंवा पुरुष मुसुलमान झाला तर त्याच्या बायकोवर किंवा तिच्या नवऱ्यावर नवीन धर्म स्वीकारण्याविषयीं बळजबरी होऊं नये. ( १० ) आपल्या बापाच्या हयातींत जर मुलगा मुसुलमान झाला तर फक्त त्याची स्वतःची मिळकत त्याला घेऊं द्यावी, बापाच्या मिळकतीवर त्याचा हक्क राहणार नाहीं. ( ११ ) बापाच्या मृत्यूनंतर जर मुलगा मुसुलमान धर्म स्वीकारील व जर बापाची मालमत्ता तोंपावेतों मुलांमध्यें वांटली गेली नसेल, तर मुसुलमान झालेल्या मुलाला कायद्याप्रमाणें त्याच्या वांट्याला येणारा हिस्सा मिळेल. पण जर बापाच्या हयातींत तो मुसुलमान धर्म स्वीकारील तर वडिलार्जित मिळकतीवर त्याचा वारसा राहणार नाहीं. ( १२ ) हिंदु लोकांनां अफगाणिस्तानांत येण्याची व बाहेर जाण्याची मोकळीक आहे. ( १३ ) सरकारी अधिकारी हिंदु मुसलमानांना सारखेच उपयोगी पडतील. अधिकारी लोक, एखाद्या मुसलमानाच्या घरीं चोरी झाली असतां तिचा तपास जितक्या कसोशीनें त्यांनीं लाविला असतां तितक्याच कसोशीनें हिंदूच्या चोरीचाहि तपास लावतील. ( १४ ) जलालाबाद, गझनी व कंदाहार येथून एक एक हिंदु प्रतिनिधि असेंब्लीकरितां निवडला जाईल.

गेल्या नोव्हेंबर महिन्यांत नवीन होणारी राजधानी जी दरुलमल तिचा पाया घालण्यांत आला. दोन व्यापारी कंपन्या सरकारी मदतीनें निघाल्या, त्यांपैकीं अमानिया अदर्स कंपनी विशेषतः लोंकर, सतरंज्या व गालीचे यांच्या व्यापाराकरितां स्थापन झाली आहे तर फ्रूट कंपनीनें काबूल आणि हिंदुस्थान यांमधील ताज्या व सुक्या फळांचा मोठ्या प्रमाणावरचा व्यापार हातीं घेतला आहे.

इंग्लंडांतील नुकत्या झालेल्या निवडणुकीनंतर अफगाण-हिंदुस्थान राजकारण जें बदललें याचें कारण सध्यां अधिकारावर असलेल्या पक्षाचा स्वसामर्थ्य वाढविण्याचा कदाचित् हा डाव असेल असें वाटतें कारण गुदस्ताच्या हिंदुस्थानविषयक सरकारी अहवालांत अमीरांची स्तुति व या दोन देशांतील अभंग स्नेह आढळतो; पण हा रिपोर्ट पार्लमेंटला सादर होऊन थोडे दिवस झाले नाहींत तोंच अमीरासंबंधीं ब्रिटन साशंक होतें.

डिसेंबर ( १९२३ ) महिन्यांत ब्रिटिश सरकारनें अफगाणिस्तानाला, मागील महिन्यांत ब्रिटिश अधिकाऱ्यांचे खून पाडणाऱ्या इसमांनां पकडून देण्याची जोरानें खटपट करण्याविषयीं कडक शब्दांत लिहिलें. महंमद तार्झी या परिस

येथील अफगाण वकिलानें या बाबतींत अफगाणिस्तानाला गुन्हेगार धरण्याबद्दल ब्रिटनला दोष दिला व ज्याअर्थी ब्रिटिश हद्दींत हे खून पडले, त्याअर्थी अफगाणिस्तानावर याची मुळींच जबाबदारी येत नाहीं असें निक्षून सांगितलें. सरहद्दीवरील ब्रिटिश मुलुखांतील टोळ्यांसंबंधांत अफगाण सरकार नेहमीं ढवळाढवळ करितें, अशी ब्रिटननें तक्रार पुढें करून वरील प्रश्नाचा समाधानकारक निकाल लागेपावेतों अफगाणिस्तानांत बाहेरून जाणारीं शस्त्रास्त्रें व दारूगोळा यांना मज्जाव करण्याचें ठरविलें. अफगाण मुलुखांत खुनी इसमांनां आश्रय मिळतो असें ब्रिटिशांचें म्हणणें पडलें, तेव्हां अमीरानें ११०० सैनिकांची एक टोळी तपासाकरितां पाठविली. जलालाबाद जिल्ह्यांतील मांडताई टोळीला जरब दिली. इकडे ब्रिटननें, काबूल येथील आपला वकील: परत बोलाविण्याचा, तिकडचे सर्व रस्ते बंद करण्याचा व व्यापार अडविण्याचा धाक घातला. अमीराला पुन्हां रशियाचा धाक आहेच. कारण बुखारा येथें बंडखोरांनां दडपून टाकण्याकरितां म्हणून जें मोठें सैन्य रशियन सरकारनें ठेविलें आहे, तें वास्तविक अफगाण सरकारला आपली दहशत बसावी म्हणून रशियानें मुद्दाम ठेविलें आहे असा तर्क करण्यांत येतो. रशिया व ब्रिटन यांचे आशियाखंडांतील हितसंबंध एक नाहींत. दोघेहि एकमेकाला हुसकून लावून खंडावर ताबा मिळविण्याच्या अनेक वर्षांपासून खटपटींत आहेत. अफगाणिस्तान हें एकच कायतें बफर स्टेट राहिलें आहे. त्यामुळें दोघेहि आळीपाळीनें त्याला खुष करण्यास तर कधीं धाक लावण्यास उद्युक्त होतात यांत नवल नाहीं.

[संदर्भग्रंथ.-इंपीरियल गॅझिटियर ऑफ इंडिया. अफगाणिस्तान आणि नेपाल १९०८; अकाउंटस् रिलेटिंग टु दि ट्रेड बाय लँड ऑफ दि ब्रिटिश इंडिया वुइथ फॉरेन कंट्रीज. अन्युअल कलकत्ता.—पार्लमेंटरी पेपर्स, अफगाणिस्तान १८७३-१८९९.—ट्रेड बिटवीन दि ब्रिटिश गव्हर्नमेंट अँड दि अमीर ऑफ अफगाणिस्तान, डेटेड मार्च २१-१९०५ लंडन १९०५ —दि सेकंड अफगाण वार १८७८-८०. प्रिपेअर्ड इन दि इंटेलिजन्स ब्रँच ऑफ दि इंडियन आर्मी हेडक्वार्टर्स. लंडन १९०८—बेल्यू( एच-डब्ल्यू )अफगाणिस्तान अँड दि अफगाणस्, लंडन, १८७९; अँड दि रेसिस ऑफ अफगाणिस्तान १८८०— कर्झन ( ऑ. जी. एन्. ); रशिया इन सेंट्रल एशिया ( कंटेन्स बिब्लिआग्राफि )लंडन १८८९.— डाली ( मिसेस केट ) एट इयर्स अमंग दि आफगाणस्. लंडन १९०५.—एल्फिन्स्टन ( ऑ. एम्. )ॲन अकाउंट ऑफ दि किंग्डम ऑफ काबूल अँड इटस् डिपेंडन्सीज्. लंडन १८१५. —फॉर्बेज ( ए. ) दि अफगाण वार्स, १८३९-४२ अँड १८७८-८० लंडन १८९२.— ग्रे. ( टी. ) ॲट दि कोर्ट ऑफ दि अमीर न्यू. एडि. लंडन १९०१.—हमिल्टन ( अंगस ) अफगाणिस्तान लंडन १९०६.—हॅना ( कर्नल एच. बी. ) दि सेकंड अफगाण वार वेस्टमिनिस्टर १८९९. —होल्डिच ( कर्नल सर टी. एच् )दि इंडियन बॉर्डर लँड १८८०-१९००; लंडन १९०१.—ला कोस्ट ( बी. डे ) अराउंड अफगाणिस्तान. लंडन १९०९.—मॅक माहन ( ए. एच् ) दि सदर्न बॉर्डरलँडस् ऑफ अफगाणिस्तान. लंडन १८९७. मॅलेसन ( जी. बी.) हिस्टरी ऑफ अफगाणिस्तान सेकंड एडि. १८७९. नोई ( एफ ) इंग्लंड, इंडिया अँड अफगाणिस्तान. लंडन १९०२ पेनेल ( पी. एल् ) अमंग दि वाइल्ड ट्राइब्स ऑफ अफगाण फ्रंटिअर लंडन १९११. —रॉबर्टस् ( फील्डमार्शल लार्ड) फॉर्टीनाइन इयर्स इन इंडिया लंडन १८९७.—रॉबर्टसन ( सर जी. एस्. ) दि काफीर ऑफ दि हिंदुकुश लंडन १८९६.—सेल ( जी. ) जर्नल ऑफ दि डिझास्टर्स इन अफगाणिस्तान, इन १८४१-४२ लंडन १८४३.—सुलतान महमदखान ( मिर मुनशी ) ( एडिटर ) दि लाइफ ऑफ अबदुल रहमान, अमीर ऑफ अफगाणिस्तान २ व्हा. लंडन १९००.—कान्स्टिट्यूशन अँड लॉज ऑफ अफगाणिस्तान, लंडन १९१०.—टेट (जी. पी.) दि किंग्डम ऑफ अफगाणिस्तान. बाम्बे १९११.—थॉनटन ( मि.व मिसेस ) लीव्हज् फ्रॉम अन अफगाण स्क्रॅप बुक, लंडन १९१०.—व्हीलर ( एस. इ. ) दि अमीर अबदुल रहमान, लंडन १८९५.—येट ( मेजर सी. इ ) नार्दर्न अफगाणिस्तान लंडन १८८८. इंडियन ईयर बुक ( टाइम्स ऑफ इंडिया. ); स्टेटमन्स ईयर बुक; ए. ब्रि. इत्यादि].

**अफगाण-तुर्कस्तान**—हें ऑक्सस नदीच्या खोऱ्यांतील अफगाणच्या ताब्यांत असलेल्या मुलुखास नुकतें पडलेलें नांव आहे. तेथील रहिवासी किंवा अफगाण लोक त्या प्रदेशाला नुसतें तुर्कस्तान या नांवानें ओळखतात. हैबक मझार-इ-शरीफ अकचा, शिबरघान सार-इ-पुल, मइमन, अण्डकुइ, डारायुसफ, कामरड, नाल्खआब, व सानजचरक इतके जिल्हे मिळून हा प्रांत झालेला आहे.

सीमा.— उत्तरेस बुखारा. पूर्वेस बदकशान पर्वत. दक्षिणेस याच पर्वतश्रेणीमुळें हा प्रांत व काबुल प्रांत हे विभक्त केले गेले आहेत. नैर्ऋत्येस काबूलपैकीं बामिआन व हिरातपैकीं कांहीं मुलूख.

शहरें.-अकचा, मेमन, मझार-इ-शरिफ, हैबक, शिबरघन, सार-इ-पुल, अण्डकुइ, खानाबाद. या सर्व शहरांचा विशेष हा आहे कीं, तीं फार मोठीं आहेत, कारण त्यांत व त्यांसभोंवतीं उपवनें व फळबाग पुष्कळ आहेत.

स्वभाविकरीत्या या देशाचे दोन भाग झाले आहेत. एक डोंगराळ मुलूख व दुसरा पर्वताच्या पायथ्यापासून ऑक्सस नदी पर्यंत सपाट प्रदेश. दक्षिण सीमेवरील प्रदेश सर्व डोंगराळ आहे. पूर्वेस हिंदुकुश पर्वत आकाशांत उंच गेलेले आहे. यांचाच एक फाटा, चंगूर कोह डोंगर, यानें बदकशान आणि खरा अफगाण तुर्कस्तान वेगळे केले गेले आहेत. या फाट्यापासून १४० मैल लांब व ८० मैल रुंद व ७०००

ते १०००० फूट उंचीचें एक पठार गेलेलें आहे. बल्खच्या दक्षिणेस हिंदुकुश पसरलेला आहे. याकवलंगपासून याचे तीन फांटे होतात. उत्तरेकडील फांटा वायव्येकडे जातो. याला पश्चिम भागांत बन्द्-इ तुर्कस्तान हें नांव आहे. याची उंची सुमारें ११००० फूट आहे. पूर्व फाट्यांची उंची १०००० ते १२००० फूट आहे. ऑक्सस नदीच्या वळणा प्रमाणें सपाट प्रदेशाची रुंदी कमीजास्त आहे. ऑक्सस नदीला मिळणाऱ्या नद्या कोक्च, सार-इ पल, अथवां सरखाब ह्या मुख्य आहेत.

हवामान.—हें स्थलमानाप्रमाणें बदलत जातें. हिंवाळ्यांत सपाट प्रदेशांत सुद्धां बरीच थंडी असते. वसंतऋतूंत पुष्कळ व जोराचे पाऊस पडतात. उन्हाळ्यांत हिंदुस्थानसारखा उन्हाळा सपाट प्रदेशांत असतो. डोंगराळ प्रदेशांत समशीतोष्ण व थंडगार हवा असते उन्हाळ्यांत एक प्रकारची त्रासदायक माशी दिसूं लागते. तिचा दंश अपायकारक असून कधीं कधीं त्यामुळें घोडे मरतात. तसेंच उंटांनाहि इजा पोहोंचते. पण विशेष प्रमाणांत होत नाहीं. ही सीस्तान प्रांतातल्या माशीप्रमाणें असते.

इतिहास.—प्राचीन बल्ख किंवा बॅक्ट्रिआ हें मध्यएशियांतील अति प्राचीन राजधानीचें शहर असावें. झरथुष्ट्रानें या शहरांत धर्मोपदेशक केला अशी पर्शियन लोकांची कल्पना आहे. बॅक्ट्रिया हा ॲकिमेनीअन साम्राज्याचा एक भाग असून येथें इराणी लोकांची वस्ती असावी. इ. स. पूर्वी २४६ वर्षे सेल्यूकिड घराण्याचा सुभेदार थिओडोटस स्वतंत्र झाला व एकेकाळीं जक्सार्टीझ पासून कच्छच्या आखातापर्यंत अंमल चालविणाऱ्या "ग्रीको बॅक्ट्रियन" घराण्याचा पाया यानें घातला. इ. स. पूर्वी १३० वर्षांच्या सुमारास ग्रीक सत्तेचा अस्त झाला व ऑक्सस नदीच्या प्रदेशांत पुष्कळ राज्यें उत्पन्न झालीं. त्यांचीं नांवें युएचि, क्षेयवंग, येथा, तुखार इत्यादि होतीं. याकाळीं बुद्धधर्माचा प्रसार या भागांत पुष्कळ झाला. बल्ख येथें एक जंगी बौद्ध मठ होता त्याचें नांव नवविहार. सध्यां याच नांवाचें एक खेडें असून तें बुद्धधर्माचें जुनें स्मृतिचिन्ह आहे.

मुसुलमान लोकांना हा प्रदेश तुखारिस्तान या नावानें माहीत होता. राजकीय परिस्थितींत येथें खोरासानप्रमाणें फेरबदल होत गेले. चेंगिझखानानें व त्यानंतरच्या सत्ताधीशांनीं केलेल्या कत्तली, जाळपोळ इत्यादिकांचा वाटा याच्याकडे सुद्धां आला होता, व त्या नासधुशीची नंतर पूर्णपणें दुरुस्ती कधींच झाली नाहीं. कांहीं कालपर्यंत हे प्रांत दिल्लीच्या मोंगल साम्राज्यांत सामील होते. इ. स. च्या १८ व्या शतकांत ते अहमदशहा दुराणींच्या हातांत गेले. परंतु त्याचा मुलगा तैमूर याच्या कारकिर्दीत ते उझबेग सरदारांच्या हातांत गेले. इ. स. १८५० तें १८८४ पर्यंत हे सर्व प्रांत अफगाण लोकांच्या हाताखालीं गेले.

क्षेत्रफळाच्या मानानें लोकवस्ती फार थोडी आहे. अर्धी लोकसंख्या उझबेग व तुर्कोमन लोकांची आहे, व बाकीचे अर्धे हझारा, ताजिक, अरब वगैरे आहेत.

विशेष महत्त्वाचे उद्योगधंदे येथें नाहींत. मैमन, मझार-इ-शरीफ, तशकुरघान व फैजाबाद ह्या व्यापाराच्या मुख्य पेठा आहेत. लोंकरीचें व जाडें भरडें सुती कापड करणें हे लोकांचे धंदे आहेत. बदकशान सोडल्यास इतरत्र खनिज संपत्ति फारशी नाहीं. शिश अलंगजवळ व कारकोहच्या उत्तरेस थोडासा कोळसा सांपडतो.

**अफजलखान**—अबदुल्ला भटारी अफजलखान हा आदिलशहाचा दासीपुत्र असावा असें वाई येथें सांपडलेल्या एका हुकूमनाम्यांत त्यास महंमदशाही हें विशेषण दिलेलें आहे त्यावरून रियासतकारांनीं अनुमान केलें होतें. परंतु किंकेड आणि पारसनीस यांच्या इतिहासांत तो महंमद आदिलशहाच्या बायकोच्या भावाचा मुलगा होता असें म्हटलें आहे. अफजलखानाच्या बापाकडे आदिलशहाच्या मुदपाकखान्यावर देखरेख करण्याचें काम होतें व म्हणूनच अफजलखानास भटारी असें म्हणूं लागले असावे. अफजलखान हा चांगला धिप्पाड पुरुष असून तो महंमद आदिलशहाच्याच कारकीर्दीत उदयास आला. महंमद आदिलशहाच्या कारकीर्दीच्या अखेरीस त्याची पहिल्या प्रतीच्या सरदारांत गणना होत होती. इ. स. १६४४ च्या सुमारास रणदुल्लाखान वारल्यावर त्याच्याकडे असलेली वाईची सुभेदारी अफजलखानास मिळाली व ती अखेरपर्यंत म्हणजे त्याचा वध होईपर्यंत त्याच्याकडेच होती. निंबच्या मठाची उत्पन्नें पूर्वीप्रमाणें चालविण्याबद्दल अफजलखानाच्या सक्त ताकीदी आहेत. त्यावरून या भागांतील इतर मुसुलमान अंमलदाराप्रमाणें तोहि आपल्या सुभेदारींत हिंदु देवस्थानांचीं उत्पन्नें कसोशीनें चालवीत होता असें दिसतें. १६४९ पासून अफजलखान व शिवाजी हे देशमुखदेशपांड्यांस आपआपल्या पक्षांस वळवीत होते असें त्यांच्या उपलब्ध असलेल्या पत्रांवरून दिसतें. शहाजीला विजापूरकरांकडून मिळालेला कर्नाटकांतील कनकगिरि किल्ला मुस्ताफाखानानें हस्तगत केला तो अफजलखानाच्याच चिथावणीवरून होय. या कामीं अफजलखानाकडून मुस्ताफाखानास प्रत्यक्ष मदतहि झाली असण्याचा संभव आहे. इ. स. १६५३ त आदिलशहाच्या कैदेंतून शहाजीची मुक्तता झाल्यावर, त्यानें आपला ज्येष्ठ पुत्र संभाजी यास मुस्ताफाखानापासून कनकगिरि घेण्यास पाठविलें असतां मुस्ताफाखानानें त्याचा विश्वासघातानें वध केल्यामुळें अफजलखान व शिवाजी याजमधील वैमनस्यांत आणखी एक कारणाची भर पडली. अफजलखानाची विजापूरच्या दरबारी शूर मुत्सद्द्यांत गणना होत असून तो बहलोलखान व रणदुल्लाखान यांच्या तोडीचा सरदार समजला जात असे. इ. स. १६५७ मध्यें औरंगजेबानें विजापूरवर स्वारी केली. तेव्हां त्याला तोंड देण्याकरितां ज्या दोन सर-

दारांची योजना झाली त्यांत अफजलखान हा होता. या स्वारींत तो मोठ्या शौर्यानें व चतुराईनें लढला. पण समरांगणांत या स्वारीचा कांहीं सोक्षमोक्ष होण्यापूर्वीच औरंगजेबास आपल्या बापाच्या आजारीपणाची बातमी लागून तो उत्तरेकडे जावयास निघाला.

अफजलखानाचें नांव महाराष्ट्रांत जें इतकें प्रसिद्ध आहे तें इ. स. १६५९ त विजापूरकरांनीं त्याच्या हाताखालीं सैन्य देऊन त्यास शिवाजीवर पाठविलें तेव्हां त्याचा शिवाजीशीं जो सामना झाला त्यामुळें होय. म्हणून त्या प्रसंगाची शिवदिग्विजय, शेडगांवकर, सभासद व चिटणीस बखरींवरून व अफजलखानाच्या पोवाड्यावरून निघणारी सविस्तर हकीकत पुढें दिली आहे. इ. स. १६५८ च्या नोव्हेंबरच्या सुमारास अफजलखान शिवाजीच्या वाई प्रांतात चालू असलेल्या उद्योगाची दरबारास खबर देऊन त्याच्या बंदोबस्ताचा विचार करण्यासाठीं विजापुरास गेला. तेथें बरीच वाटाघाट होऊन शेवटीं डोंगरांतील उंदीर शिवाजी यास जिवंत अगर मेलेला कसातरी पकडून आणतों अशी भर दरबारांत प्रतिज्ञा करून सुमारें बारा हजार निवडक फौज ( ग्रांटडफ ५००० स्वार व ७००० पायदळ म्हणतो ) व तोफा वगैरे सरंजाम बरोबर घेऊन सन १६५९ च्या सपटेंबर महिन्यांत अफजलखान शिवाजीवर येण्यास निघाला. तथापि अफजलखानास आरंभापासून उघड मैदानांत शिवाजीशीं लढून आपणास जय मिळेल अशी खात्री वाटत नसावी असें दिसतें. शिवाजीजवळ बरीच मोठी फौज आहे अशी विजापूरच्या दरबारी समजूत होती व विजापूरकरांनां तर अफजलखानाबरोबर जास्त सैन्य देण्यास सवड नव्हती. राजापूरच्या इंग्लिश वखारवाल्यांनीं सुरतेच्या कौन्सिलास १६५९ च्या आक्टोबरामध्यें एक पत्र लिहिलें त्यांत ते म्हणतात कीं, अफजलखानाच्या आतेनें आपल्या भाच्यास शिवाजीशीं वरकरणी स्नेहभाव दाखवूनच त्यास जाळ्यांत पकडण्याचा उपदेश केला होता. अफजलखान प्रथम विजापुराहून सरळ उत्तरेस तुळजापुराजवळ गेला. अफजलखान पोवाड्यावरून असें दिसतें कीं, येथील भवानीची विटंबना करण्याची त्याची इच्छा होती, पण तो येत आहेसें पाहून तेथील पुजाऱ्यांनीं तिला दुसरीकडे नेऊन लपवून ठेविल्यामुळें त्यानें एक गाय मारून तिच्या रक्ताचा भवानीच्या देवळांत सडा टाकून आपलें समाधान करून घेतलें. यानंतर त्यानें एकदम नैर्ऋत्येस वळून पंढरपुराजवळ भीमा ओलांडिली. तुळजापुराप्रमाणेंच येथेंहि त्यानें पंढरीचें देवालय भ्रष्ट केलें व पुंडलिकाची मूर्ति नदींत फेकून दिली. एवढें झाल्यावर तो माणकेश्वर, करकमभोसें. शंभुमहादेव, मलवडी, रहिमतपूर या रस्त्यानें वाईस आला. शिवाजीस युक्तीनें पकडून कैद करून त्यास आपण विजापुरास नेणार अशी तो नेहमीं बढाई मारीत असे, व वाईस आल्यावर तर त्यानें गमतीखातर शिवाजीला पकडल्यावर त्याला ठेवण्याकरितां म्हणून एक पिंजराहि बनवून ठेविला होता. अफजलखान आपल्यावर चालून येतोसें पाहून शिवाजी राजगडावर होता तो पुण्याच्या बाजूस अफजलखानानें येऊं नये म्हणून तिकडील बंदोबस्त करून पुरंदरावरून प्रतापगडावर आला.

राजवाडे खं. १५, लेख ३०२ मध्यें "अफजलखान वाईस राजश्री छत्रपति स्वामीवर चालून आले ते समयीं खंडोजी खोपडे [ रोहिडखोऱ्यांतील एक देशमुख ] पारख [ परकी ] होऊन अफजलखानास भेटले आणि स्वामीस धरून देतो म्हणऊन कबुलाती केली" असें जें लिहिलेलें सांपडतें त्यावरून दगाबाजीनेंहि शिवाजी हस्तगत होईल तर करावा अशी खानानें खटपट चालविली होती असें दिसतें. तथापि शिवाजीचा सरदार विश्वासराव नानाजी मुसेंखोरेकर हा फकिराच्या वेषानें वारंवार खानाच्या छावणींत जाऊन तेथील बातमी शिवाजीस देत होता. इकडे खानानें वाईस आल्यावर तेथील कुळकर्णी कृष्णाजी भास्कर यास शिवाजीकडे पाठवून त्यास आपल्या भेटीस बोलाविलें.

कृष्णाजी भास्करानें शिवाजीकडे येऊन त्यास खानाचा निरोप कळविला व सांगितलें कीं, खान विजापूरच्या दरबारीं आपलें वजन खर्च करून तुह्मांस माफी मिळवून देईल इतकेंच नव्हे तर हल्लीं तुमच्याकडे असलेला मुलूखहि रीतसरपणें तुमच्या नांवानें करून देईल. यावर शिवाजीनें एवढेंच उत्तर दिलें कीं, खानाप्रमाणेंच माझीहि खानाची भेट घेण्याची इच्छा आहे पण वाईपावेतों जाण्याचा मला धीर होत नसल्यामुळें खानानेंच जावळीस येऊन भेटीचा योग आणावा.

त्या रात्रीं कृष्णाजी भास्कराचा मुक्काम प्रतापगडावरच असल्यामुळें शिवाजीनें संधि साधून कृष्णाजीची गुप्तपणें भेट घेतली व त्यास शपथपूर्वक विचारलें कीं, खान सद्धेतूनें भेट घेण्यास येत आहे किंवा माझ्या हेराकडून मला कळलें त्याप्रमाणें त्याचा काहीं दगा करण्याचा हेतु आहे. तेव्हां कृष्णाजीनें कबूल केलें कीं, तुमची शंका बरोबर असून तुमची भेट घेण्यांत खानाचा तुह्मांस दगा करण्याशिवाय दुसरा तिसरा कांहींहि हेतु नाहीं. याप्रमाणें कृष्णाजीकडून खानाच्या उद्देशाबद्दल खात्रीलायक माहिती मिळतांच शिवाजीनें खान दगा करूं लागला तर त्याच्याच जाळ्यांत त्याला पकडून त्याचें पारिपत्य करण्याचा निश्चय केला. त्यानें पणतोजी गोपीनाथ नांवाचा आपला एक कारकून खानाकडे पाठवून त्याला भेटीकरितां एक पंधरवड्यानंतर प्रतापगडावर येण्याविषयीं रीतसर निमंत्रण केलें. मध्यंतरी त्यानें गांवकऱ्यांकडून जंगल तोडून वाईपासून रडतोंडीच्या घांटावरून प्रतापगडापर्यंत खानाच्या सैन्यासाठीं एक चांगला ऐसपैस रस्ता बनविला व मार्गांत जागजागीं धान्यादिकांचा पुरवठा करून खानाच्या सैन्याची उत्तम बरदास्त रहावी अशी व्यवस्था केली. शिवाय खानाच्या हालचालींवर नजर ठेवण्यासाठीं त्यानें जंगलांत सर्वत्र रस्त्यापासून दूर आपलीं माणसेंहि ठेविलीं होतीं.

इकडे कृष्णाजी भास्कर शिवाजीचा निरोप घेऊन पणतोजी गोपीनाथासह वांईस आला व त्यानें शिवाजीचा संदेश खानास कळवून वर आणखी असेंहि सांगितलें कीं शिवाजी भित्रा आहे, तथापि तुम्ही त्याच्या भेटीस प्रतापगडास गेला तर तुह्माला त्याचें मन वळवून त्यास आपल्याबरोबर विजापूरला नेतां येईल. खानास कृष्णाजीचा सल्ला पटला व त्याला आपल्या शक्तीची घमेंड असल्यामुळ त्यानें शिवाजीस निमंत्रणाप्रमाणें आपण प्रतापगडास येण्याला तयार आहोंत म्हणून कळविलें.

ठरल्याप्रमाणें अफजलखान वांईहून आपली छावणी उठवून शिवाजीनें तयार करून ठेवलेल्या वाटेनें रडतोंडीचा घांट उतरून कोयना खोऱ्यांत प्रतापगडाच्या पायथ्याशीं पार म्हणून एक लहान खेडें आहे तेथें त्यानें आपला तळ दिला. गडाच्या भिंतीपासून सुमारें पाव मैलावर असलेली एक जागा भेटीसाठीं मुकर करण्यांत येऊन तेथें दोघांनींहि दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं यावें असें ठरलें. भेटीच्या जागीं शिवाजीनें उंची कनाती असलेला एक भव्य शामियाना उभा करून तो उत्तम प्रकारें शृंगारला होता. सकाळीं शिवाजीनें नित्याप्रमाणें स्नानभोजनादि विधी उरकले व दुपारीं त्यानें थोडा वेळ वामकुक्षीहि केली. नंतर त्यानें भवानीच्या देवळांत जाऊन संकट समयीं आपणास साहाय्य करण्याविषयीं तिचा धावा केला. मग त्यानें तानाजी मालुसरे, मोरोपंत पिंगळे व नेताजी पालकर या आपल्या विश्वासू सरदारांस बोलवून, खानानें दगाबिगा करण्याचें मनांत आणलें तर त्याला परत जातां येऊं नये म्हणून त्याच्या सैन्याच्या पिछाडीस व दोहों बाजूस आपले लोक ठेवण्याचा हुकूम केला. गडावरून शिंग फुंकलें जातांच या लोकांनीं विजापूरच्या सैन्यावर हल्ला करावा असें ठरलें होतें. यानंतर त्यानें आपल्या मंडळीस जमवून, आपण मेल्यास आपल्या लोकांनीं संभाजीस गादीवर बसवून नेताजी पालकर याच्या सल्ल्यानें चालावें अशी आज्ञा केली. सरते शेवटीं तो आपल्या मातुश्रीचा निरोप घेण्यास गेला व तें काम उरकल्यावर तो खानाच्या मुलाखतीस जाण्याची तयारी करूं लागला. त्यानें अंगांत चिलखत घालून वर अंगरखा घातला व डोक्यास शिरस्त्राण घालून त्यावर एक लांब पागोटें गुंडाळलें. डाव्या हातांत त्यानें वाघनखें घातलीं व उजव्या हाताच्या बाहींत बिचवा लपविला. येणें प्रमाणें आत्मसंरक्षणाची तयारी करून शिवाजी हा जिवबा महाल, संभाजी कावजी व आणखी एक तिसरा इसम यांसह गडाखालीं उतरूं लागला. इकडे अफजलखानहि पालखींत बसून गड चढून येत होता. पालखीबरोबर कृष्णाजी भास्कर चालत असून मागें कित्येक सशस्त्र लोक होते. कृष्णाजी भास्कर खानास म्हणाला कीं तुमच्या मनांत शिवाजीस खरोखरच जाळ्यांत पकडावयाचें असेल तर तुम्ही आपल्याबरोबर आणलेले शिपाई मागेंच ठेविलेले बरे. खानानें ती गोष्ट कबूल केली व शिवाजीबरोबर जेवढे इसम होते तेवढेच बरोबर घेऊन तो पुढें आला. खानाबरोबरच्या इसमांत सय्यदबांडा नांवाचा एक धिप्पाड व शूर शिपाई होता. त्याला पाहून शिवाजीनें खानास निरोप पाठविला कीं, मला त्या इसमाची भीति वाटत असल्यामुळें तुम्हीं त्यास बरोबर आणूं नये व ही गोष्ट तुह्मास मंजूर असेल तर मीहि आपल्या बरोबरचा एक इसम कमी करतो. खानानें ही गोष्ट कबूल करतांच शिवाजी आपल्याबरोबरचा तिसरा इसम मागें ठेवून खान शामियान्यांत येत होता त्याला सामोरा आला. शिवाजी बाह्यतः निःशस्त्र दिसत होता, पण खानाच्या कमरेस मात्र एक तरवार लटकत होती. हें पाहून खानास वाटलें कीं, शिवाजीला पकडण्यास ही संधि बरी आहे. त्यानें शिवाजीस 'शामियान्यांत दिसत असलेलें वैभव तुझ्यासारख्या भिकारी खेडवळाजवळ कोठून आलें' असा उद्धट प्रश्न केला. यावर शिवाजीनें गरम होऊन 'हें वैभव आम्ही बाळगावयाचें नाहीं तर काय तुझ्यासारख्या भटाऱ्याच्या पोरानें बाळगावयाचें ' म्हणून प्रत्युत्तर केलें शिवाजीचें उत्तर खानाच्या मर्मी झोंबलें व त्यानें डाव्या हातानें शिवाजीचें मुंडकें आपल्या बगलेंत घट्ट आवळून धरलें व उजव्या हातानें तरवार उपसून ती शिवाजीच्या पोटांत खुपसण्याचा प्रयत्न केला. पण शिवाजीच्या अंगांत चिलखत असल्यामुळें खानाचा वार व्यर्थ गेला. खान दुसरा वार करण्यासाठीं आपला उजवा हात पुन्हां वर उचलतो तोंच शिवाजीनें प्रसंगावधान राखून डाव्या हातानें खानाच्या कमरेभोंवतीं घट्ट विळखा घातला व त्या हातांतील वाघनखें खानाच्या पोटांत खुपसलीं. त्यांच्या वेदनांनीं खान विवळावयास लागून त्याची मगरमिठी किंचीत् सैल होतांच शिवाजीनें आपला उजवा हात मोकळा करून खानाच्या पाठींत आपला बिचवा खुपसला. तेव्हां अफजलखान दूर झाला व त्यानें शिवाजीच्या डोक्यावर आपल्या तरवारीनें जोराचा वार केला. खानाच्या तरवारीनें शिवाजीचें शिरस्त्राण भेदून त्याच्या डोक्यास थोडीशी इजा केली, पण एकंदरींत शिवाजी सुरक्षितच होता त्यानें जिवबा महालाच्या कमरेस दोन तरवारी लटकत होत्या त्यांतून एक घेऊन खानाच्या खांद्यावर वार केला. तावडतोब खान खालीं पडला व धांवा धांवा म्हणून ओरडूं लागला. खानाचे शब्द ऐकून सय्यद बांडा व खानाचे दुसरे नौकरचाकर धांवून आले व त्यांनीं खानास पालखींत घालून पारला नेण्याचा प्रयत्न केला. परंतु शिवाजी व जिवबा महाले या दोघांनीं मिळून सय्यद बांड्याचा समाचार घेतला व संभाजी कावजीनें पालखीमागें धांवत जाऊन खानाचें मुंडकें कापून आणलें. यानंतर संभाजी कावजीनें शिंग फुंकलें व तें ऐकतांच सभोंवतालच्या जंगलांतून मराठ्यांनीं बाहेर पडून खानाच्या लोकांवर त्यांनां घोड्यावर स्वार होण्यास अवकाश मिळण्यापूर्वीच, छापा घालून त्यांची दाणादाण व कत्तल

केली. खानाचा मुलगा फजल महंमद हा खंडोजी खोपडे नांवाच्या इसमाच्या मदतीनें कसाबसा जीव बचावून निसटला, व त्यानें पुढें पन्हाळगडच्या वेढ्यांतून शिवाजी निसटला तेव्हां त्याचा पाठलाग करून आपल्या बापाच्या मरणाबद्दल सूड घेण्याचा प्रयत्न केला ( शिवाजी पहा ). अफजल खानाचें मुंडकें शिवाजीनें गडावर पुरून त्यावर एक बुरूज बांधला व त्यास अफजलबुरूज असें नांव दिलें. खानाची तरवार अद्यापपर्यंत शिवाजीच्या वंशजांनीं जतन करून ठेविली असून त्याच्या तंबूचा सोन्याची शाम असलेला खांब शिवाजीनें महाबळेश्वरच्या देवळास अर्पण केला तोहि अद्याप तेथें पहावयास मिळतो. खानाच्या शवाचें शिवाजीनें सत्कारपूर्वक दफन करून त्या जागीं जी कबर बांधली ती सुद्धां या प्रसंगाचें स्मारक म्हणून अद्याप गडाच्या उतरणीवर हयात आहे.

अफजलखान हा विजापूरच्या दरबारांतील प्रसिद्ध इसम असल्यामुळें व त्यावर मिळविलेला विजय मराठ्यांनां फार महत्त्वाचा वाटल्यामुळें त्याच्या वधासंबंधीं अनेक दंतकथा उद्भूत झालेल्या आहेत. उदाहरणार्थ, विजापुराजवळ अफजलपूर नामक गांव आहे तेथील लोकांत अशी दंतकथा आहे कीं, शिवाजीवरील मोहिमींत आपणास मृत्यु येणार असें अफजलखानास अगोदरपासूनच वाटत असून त्यानें आपल्यामागें आपल्या स्त्रियांवर पातिव्रत्यापासून भ्रष्ट होण्याचा प्रसंग येऊं नये म्हणून त्यानें निघण्यापूर्वीच आपल्या हातानें ठार करून त्यांचें स्वहस्ते दफन केलें. या ६३ स्त्रियांस ज्या कड्यावरून ज्या डोहांत ढकलण्यांत आलें तो कडा व तो डोह आणि त्या डोहांतून त्यांचीं प्रेतें बाहेर काढून त्यांचें दफन करून दफनभूमीवर नीट बांधण्यांत आलेल्या सारख्या आकाराच्या ६३ कबरी अद्यापहि या गांवचें लोक दाखवितात. उलटपक्षीं मराठी बखरींतूनहि, ( १ ) अफजलखान मोहिमीवर निघणार तोंच विजापूरदरबारचा फत्ते लष्कर नांवाचा सुप्रसिद्ध हत्ती मरण पावला ( अफजलखानाचा पोवाडा ), ( २ ) तो आपल्या काजीचा निरोप घ्यावयास गेला असतां काजीस आपल्या समोर एक शिरोविहीन धड उभें आहे असा भास होऊन तो दचकला ( शेडगांवकर बखर ), ( ३ ) अफजलखान रडतोंडीच्या घांटातून शिवाजीच्या भेटीस जात असतां बाहुटा असलेला त्याचा हत्ती अडून उभा राहिला तो हालेचना ( अफजलखानाचा पोवाडा ). इत्यादि पुढील संकटाचे सूचक अपशकुन त्यास अगोदरपासूनच होत होते असें वर्णन केलेलें आढळतें. ऐतिहासिक दृष्ट्या अशा दंतकथांस फारसें महत्त्व नसलें, तरी त्यांवरून उभयपक्षांतील लोकांच्या कल्पनाशक्तीस चालन देऊन तो प्रसंग चिरस्मरणीय करून ठेवण्याइतके अफजलखानाच्या वधास तत्कालीनांच्या दृष्ट्या किती महत्त्व होतें हें उत्तम प्रकारें व्यक्त होतें.

[संदर्भग्रंथ.—शेडगांवकर बखर; सभासद बखर; चिटणीस बखर; अफजलखानाचा पोवाडा; काफी खान; शिवदिग्विजय बखर; भावे–अफजलखानाचा वध; ]

**अफझलगड.**—संयुक्तप्रांतातील बिजनोर जिल्ह्यांत असलेल्या नजिना तहशीलींतील एक खेडें. बिजनोर शहरच्या पूर्वेस ३४ मैलांवर हें असून उत्तर अक्षांश २९° २४′ व पूर्व रेखांश ७८° ४१′ वर आहे. लोकसंख्या सुमारें सात हजार. अठराव्या शतकाच्या मध्यकालीं कोणी एका अफझलखान नांवाच्या माणसानें हें गांव वसविलें. हें फार सखल असून सभोंवारच्या दलदलीमुळें फार रोगट आहे. इ. स. १८५६ च्या २० व्या कायद्याप्रमाणें त्याची राज्यव्यवस्था चालते. त्याचें उत्पन्न सुमारें ११०० रुपये आहे. मुसुलमान कोष्टीलोक(जुलाहा) उत्तम प्रकारचें सुती कापड तयार करतात येथें एक मुलांची शाळा आहे ( इं. गॅ. ५ )

**अफसर.**—याला दुसरें नांव जफुरपुर. बंगालच्या गया जिल्ह्यांत नवडासुओ भागांतील एक खेडें. उत्तर अक्षांश २५° ४′ व पूर्व रेखांश ८५° ४०′ लोकसंख्या सुमारें एक हजार. गुप्त राजांच्या कालची वराह अवताराची एक विष्णूची धातूची मूर्ति सांपडली आहे. तो कारागिरीचा एक उत्कृष्ट नमुना आहे. याच ठिकाणीं गुप्त राजांची वंशावळ देणारा एक शिलालेख मिळाला. तसेंच जमिनींत गडप झालेलें एक गुप्तराजांच्या वेळचें मंदिर सांपडलें आहे. पुराणवस्तुसंशोधन दृष्ट्या हें अति महत्त्वाचें आहे व कारागिरीच्या दृष्टीनें बुद्धगयेच्या मंदिराच्या खालोखाल हें महत्त्वाचें आहे ( इं. गॅ. ५ ).

**अफू.**—अफूच्या झाडास लॅटिनमध्यें पॅपिव्हर सेमिफेरम इंग्रजींत ओपियम, संस्कृतमध्यें अहिफेन, गुजराथी अफीन, मराठींत अफू, कनार्डींत अफिमु, हिंदी अफिम् इत्यादि नांवें आहेत. अफूचें झाड ३–५ फूट उंच वाढतें. त्याचीं पानें कडेनें कातरल्यासारखी असतात. फळें येतात त्याला दोडा असें म्हणतात. दोड्यांतील बियास खसखस म्हणतात व बोंडांच्या त्वचेंतील रसास अफू म्हणतात. आफ्रिका, इराण, चीन वगैरे ठिकाणीं या पिकाची लागवड मोठ्या प्रमाणावर होते. हिंदुस्थानांत बंगाल, अयोध्या, व संयुक्तप्रांतांत, पंजाब, राजपुताना, बहार, पाटणा, गुजराथ, माळवाप्रांत वगैरे ठिकाणीं अफू होते. पैकीं बिहार, माळवा व पाटणा येथील अफू बाहेर देशीं रवाना होते. चिनी लोक अफू खातात व ओढतात. दरवर्षी हिंदुस्थानांतून सुमारें ८–९ कोट रुपयांची अफू बाहेर देशीं जाते व खसखस ६० ते ६५ लक्ष रुपयांची जाते. सरकारी कराचें उत्पन्न सुमारें सहा कोटी रुपयांचें होतें. हें पीक करण्याला सरकारची परवानगी लागते. यांत पांढऱ्या व तांबड्या फुलांची अशा दोन जाती आहेत. पांढऱ्या फुलांच्या जातींत ज्यास्त अफू व तांबड्या फुलांच्या जातींत ज्यास्त बीं असतें. हें पीक गोराडू जमिनींत फार चांगलें होतें.

बहुतकरून याची लागवड गांवाजवळील जमिनींत करितात. कारण या पिकाच्या लागवडीस जास्त मेहनत करावी लागते. हें पीक बहुतकरून सरसूच्या पिकामागून घेतात. गुजराथेंत या पिकासाठीं ८-१० हलक्या नांगरट्या व वरचेवर कुळवणी देऊन जमीन अगदीं भुसभुशीत व मऊ करतात. शेणखत दर एकरीं सुमारें १०-१५ गाड्या देतात.

अफूचा पेरा आक्टोबर, नोव्हेंबर महिन्यांत करतात. दरएकरीं बी ३-४ पौंड लागतें. पेरणी झाल्यावर लागलीच पाणि देतात. या पिकास तीन चार खुरपण्या द्याव्या लागतात दुसरें पाणी पेरणीनंतर तिसऱ्या दिवशीं देतात सुमारें आठ दिवसांनीं झाडें पातळ करून ती टीच टीच अंतरावर राखतात व तिसरें पाणी देतात. एक महिन्यानें पुन्हां झाडें पातळ करून तीं वितीवर राखतात. पुढें दर आठ दहा दिवसांनीं बोंडें टोचण्याजोगी होईपर्यंत पाणी द्यावें लागतें. फुलें दोन महिन्यांनीं येऊं लागतात. तिसरा महिना अखेर बोंडें चिरा पाडण्यास तयार होतात. या चिरा मार्च, एप्रिल महिन्यांत संध्याकाळीं दर बोंडास खालून वर अशा तीन चिरा पाडितात व त्या नाणा नांवाच्या लहान हत्यारानें पाडितात. त्यांत वरची कातडी मात्र चिरली जाते. या चिरांतून रात्रीं रस उतरून सकाळीं घट्ट होतो. दिवसां चांगलें ऊन व रात्रीं चांगलें दंव पडल्यास हा रस जास्त येतो, नाहींपेक्षां तो कमी पडतो. अशा तऱ्हेच्या चिरा प्रत्येक बोंडाला चार चार दिवसांच्या अंतरानें चार वेळां पाडतात. बाहेर निघून घट्ट झालेला रस शिंपीसारख्या लोखंडाच्या भांड्याला प्रथम तेल चोळून त्यांत दुसऱ्या दिवशीं सकाळीं खरडून घेतात. तो रस मडक्यांत किंवा चिनी मातीच्या भांड्यांत आंतील बाजूस तेल चोळून त्यांत सांठवितात. व त्यांत गोडें तेल आंत दाट रस बुडून राहील इतकें ओतितात. नाहींतर रस घट्ट माती सारखा होतो. सर्व रस गोळा झाल्यावर तो तेलांत घालून मळतात व त्याचे गोळे करून विकतात.

पहिल्या दोन वेळां केलेल्या चिरांतून जास्त रस निघतो व पुढें कमी कमी होत जातो. दर झाडापासून सुमारें चार मासे रस निघतो.

बोंडें झाडावर सुकलीं म्हणजे तीं खळ्यांत आणून पायांखालीं चिरडतात म्हणजे बीं बाहेर पडतें. त्याला खसखस असें म्हणतात.

दर एकरीं सरासरी उत्पन्न अफूचें २०-२५ पौंड; किंमत १०० रुपये. खसखस ४००-५०० पौंड; किंमत ४० रुपये इतकें होतें. कोंवळ्या पाल्याची भाजी करितात. फुलें व बोंडें उकळून पुष्कळ रोगांवर त्याचा शेक देतात. खसखस पौष्टिक आहे. तिचा पक्वान्नांत उपयोग करितात. बियांचें तेल काढितात, त्याचा साबु व मेणबत्त्या करण्याकडे उपयोग होतो. पेंड गुरांस खावयास देतात. अफू औषधी आहे व ती उत्तर हिंदुस्थानांत रोज खातात. तिनें गुंगी येते. महाराष्ट्रांत बीं तान्हीं मुलें फार रडवीं असतात त्यांस अफू देण्याची चाल आहे.

इतिहास.—बागेंत शोभेकरितां लावलेल्या व रानांत स्वैर वाढून सुंदर दिसणाऱ्या खसखशीच्या झाडाच्या निरनिराळ्या जातींचा होमर वगैरे ग्रीक लेखकांनीं उल्लेख केला आहे. यानंतरची ग्रीक लोकांची या झाडाविषयीं माहिती व ज्ञान क्रमशः खालीं दिल्या प्रमाणें आहे:—(१) याचें बीं खाणें व त्यापासून तेल काढणें. (२) बोंडांतील मादकपणाचा गुण व (३) बोंडांतून निघणारा दुधासारखा रस. (४) बोंडें, पानें, व दांडे यांपासून 'मेकोनिअम' नांवाचा अर्क काढणें; या अर्काचा झोंप आणणारें औषध म्हणून व पंजाबातील 'पोस्त' नांवाचा किंवा अकबरच्या वेळचा 'कुंकनार' नांवाचा मद्यार्कासारखा मद्यार्क काढण्यासाठीं यांचा उपयोग करीत. (५) शेवटीं जास्त गुणकारी व दाट रसाचा शोध लागला; याला ग्रीकलोक 'ओपिऑन' म्हणत. खसखशीचीं झाडें एशिआमायनरमध्यें बोंडांकरितां लावीत असत. यांच्या रसांतील उत्तेजक व उन्मादक गुणांचा ग्रीक लोकांनीं शोध लावण्यापूर्वी अरब लोकांनीं याची माहिती पूर्व गोलार्धांत चीनमध्यें देखील करून दिली होती. ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या शतकाच्या सुमारास ग्रीक लोकांच्या अफूच्या शोधाकडे लक्ष लागूं लागलें. थिओफ्रेस्टस, व्हर्जिल, प्लिनि, डिओस्कोराइडस वगैरे लेखकांनीं अफू व तिचे गुणधर्म व कृति याविषयीं उल्लेख प्रसंगविशेषीं केला आहे. रोमन साम्राज्याच्या वेळीं फक्त एशियामायनरमधीलच अफू माहीत होती.

ग्रीक लोकांनीं अफूचा शोध लावला. तथापि खसखशीचें झाड व त्याचा उपयोग या विषयींच्या माहितीचा अरब लोकांनींच प्रसार केला. हिंदुस्थान व चीन देश यांनीं इस्लामी पंथाचे अनुयांयानां अफूविषयीं माहिती करून दिली याविषयीं शंका घेण्याचें कारण दिसत नाहीं. कारण संस्कृत आणि इतर एतद्देशीय भाषेंत अफूला जीं नांवें आहेत तीं 'ओपोस' किंवा 'ओपिऑन' या शब्दाच्या 'अफ्युन' या अपभ्रंशापासून निघालेलीं आहेत. संस्कृत "अहिफेन" (म्हणजे सर्पाचें विष) हा शब्द अलीकडील असावा असें यूरोपियन पंडित म्हणतात. त्याचप्रमाणें चिनी भाषेंतील अफूचीं नांवें अरबी शब्दापासूनच निघालीं असावीं असें दिसतें.

८०० वर्षांपूर्वी लिहिलेल्या भावप्रकाशांत अफूचा उल्लेख आढळतो; परंतु इ. स. च्या १६ व्या शतकापूर्वीची अफूसंबंधी माहिती विशेष स्पष्ट रीतीनें मिळूं शकत नाहीं.

बिहार प्रांतीं खसखशीच्या झाडाच्या लागवडीस सरासरी दोन अडीचशें वर्षांपूर्वी सुरुवात झाली असावी असें दिसतें. परंतु 'पोस्त' आणि 'पुस्त' या अफूच्या नांवांचा आणि ग्रीक भाषेंतील नांवाचा मुळींच संबंध दिसत नाहीं. यावरून असें वाटतें कीं अफूविषयीं नसली तरी खसखशीच्या झाडा-

संबंधी येथील लोकांची माहिती जास्त पुरातन कालची म्हणजे दोन शतकांपूर्वीची आहे. संस्कृतांत या झाडाच्या बोंडांनां खाखस व बियांनां खरितल म्हणतात (दत्त-मटेरिया मेडिका). पण अफूला कांहीं नांव सांपडत नाहीं. तसेंच चीन देशांत या झाडाला जीं नांवें आहेत त्यांवरून असें वाटतें कीं, त्यांचीहि या विषयांची माहिती सातव्या शतकापासून असावी. हिंदुस्थानांतून चीन देशांत अफू जाण्यापूर्वी बरीच वर्षें अगोदर तेथें अफूची लागवड सुरू झाली होती यांत संशय नाहीं व हिच्यापासून तयार केलेल्या आमांशावरील फारच गुणकारी औषधाचें वंगशिह यानें तेराव्या शतकांत वर्णन केलें आहे.

'अलबुकर्क यानें आठ 'गुझ्झारेत' (गुजराथी) जहाजें पकडलीं व त्यांत अफू व इतर माल होता' असा जिओव्हानि डा एम्पोलि यानें (१५११ त) उल्लेख केला आहे. यावरून अफूचा व्यापार किती पुरातन आहे याविषयीं कल्पना येईल.

सोळाव्या शतकाच्या सुरुवातीस हिंदुस्थानांतून चीन देशांत अफूची निर्गत होत होती इतकेंच नव्हे, तर माळव्यांत अफूची लागवड व अफू बनविण्याचे कारखाने हे महत्त्वाचे धंदेच होऊन बसले होते. ब्रिटिश लोक येथें येण्यापूर्वी हिंदुस्थानांतून चीन देशाशीं चालणारा अफूचा व्यापार पोर्तुगीज लोकांच्या हातीं होता. मोंगल राजांनीं बिहार येथील अफूच्या लागवडीचा व विकण्याचा मक्ता आपल्या ताब्यांतच ठेवलेला होता. हा मक्ता मोंगल राजांपासून व पूर्वीच्या पोर्तुगीज व्यापाऱ्यांपासून प्लासीच्या (१७५७) लढाईनंतर लवकरच ब्रिटिशांच्या स्वाधीन करण्यांत आला. अफू कशी करावी हें येथील लोकांनां माहीत होण्यापूर्वीच चिनी लोकांस अवगत होतें. तिची लागवड व तयार करण्याची कृति १५व्या शतकाच्या मध्यकाळापासूनच त्यांनां माहीत होती.

चीन देशांत पूर्वी अफूचा उपयोग औषधासाठीं करीत असत, परंतु मिंग घराण्याच्या शेवटीं शेवटीं सुमारें १६५० मध्यें लोकांना अफू ओढण्याची संवय लागली व ती पुढें जास्त जास्त वाढत गेली. याचें कारण देशांतील लागवड व आयात बंद करण्याविषयीं चिनी अधिकाऱ्यांची हयगय, हेंच असावें.

**खुल्या व्यापाराची पद्धत.**—१८ व्या शतकाच्या मध्यकालीं बिहार प्रांतांत उत्तम प्रकारची व सर्वांत जास्त अफू होत असे. रामचंद्र पंडित यानें खालीं दिल्याप्रमाणें त्यावेळच्या अफूच्या व्यापाराचें वर्णन केलें आहे. "त्यावेळीं पाटणा येथें राहणाऱ्या अफूच्या व्यापाऱ्यांचा एक वर्ग असे. हे व्यापारी शेतकऱ्यांनां अगाऊ पैसे देत व हंगामावर त्यांच्याजवळून त्या पैशांबद्दल अफू घेत व ती घरीं नेऊन निर्गत करणाऱ्या व्यापारांनां ती जशी लागेल त्याप्रमाणें तयार करून देत. पाटणाच्या व्यापाऱ्यांना दिल्यानंतर उरलेली अफू शेतकरी लोक येथें विकीत व त्यामुळें अर्थातच ती जास्त किंमतीस विकली जात असे. पाटणाचे व्यापारी अक्टोबर महिन्यांत तयार केलेली अफू ठरलेल्या दरानें पहिल्यांदा डच व्यापाऱ्यांनां विकीत. जवळ जवळ ५०० मण अफू असली तर ते डच व्यापाऱ्यांनां त्यापैकीं दोनशें मण देत असत. त्यानंतर दोनशें मणांपैकीं कांहीं अफू इंग्लिश व्यापाऱ्यांना जास्त भावानें व शेवटीं फ्रेंच व्यापाऱ्यांनां त्याहून जास्त भावानें विकीत असत. त्यानंतर म्हणजे नोव्हेंबर महिन्यांत डच व्यापारी पुन्हां अफूच्या व्यापाऱ्यांशीं मागल्यापेक्षां जास्त किंमत देण्याचा करार करीत असत. अफूची नेहमींची किंमत मणाला शंभर ते दीडशें रुपये असे व कधीं कधीं जास्तहि होत असे.

वर दिलेल्या पद्धतीप्रमाणें व्यापार चालू झाल्यावर शेतकरी व व्यापारी लोक जास्त जास्त लबाडी करूं लागले यांत मोठेसें नवल नाहीं. यामुळें याप्रकारच्या व्यापारावर कोणत्या तरी प्रकारचा दाब असावा अशी गरज भासूं लागली. १७७३ सालीं वारन हेस्टिंग्ज् साहेबांनें ईस्ट इंडिया कंपनीच्या कारभाराचीं सूत्रें जेव्हां आपल्या हातीं घेतलीं तेव्हां त्यानें डेन्स, डच व फ्रेंच व्यापाऱ्यांनां दरवर्षी ठरीव वजनाची अफू पुरविण्याचा करार केला. १७७३ पासून १७८१ पर्यंत दरवर्षी व १७८१ पासून १७९७ पर्यंत दर चार वर्षांनीं कंपनीकरितां अफू तयार करून देण्याचा हक्क सरकारनें खाजगी लोकांस विकण्यास सुरुवात केली. १७८५ त या हक्काचा लिलांव होत असे व यांत सर्व लोकांना सामील होण्याची मोकळीक असे. शेतकऱ्यांच्या बचावासाठीं ठेकेदारांनां कांहीं ठरलेल्या अटींवर ठेका देण्यांत येत असे. शेतकऱ्यांनीं पिकवलेल्या अफूपैकीं कांहीं ठेवल्यास, किंवा कांहीं भेसळ करून ती बट्ट्यानें विकल्यास त्यांनां दंड होत असे; सरकारी मक्तयाविरुद्ध कोणी बेकायदेशीर वागल्यास त्याला गुन्हेगार मानण्यांत येत असे. परंतु इतके कायदे केले तरीहि ही ठेक्याची पद्धत त्रासदायकच होऊं लागली. शेतकऱ्यांनीं नुसती अफूच पिकवावी म्हणून ठेकेदार लोक त्यांनां त्रास देऊं लागले, याचा परिणाम असा झाला कीं अफू तयार करण्यासाठीं बोर्ड ऑफ डायरेक्टरांना ठेक्याची पद्धत सोडून दुसरी युक्ति काढावी लागली.

खुल्या व्यापाराची व ठेके देण्याची पद्धत सदोष असल्यामुळें सरकारी मक्त्याची पद्धत सुरू केली. या पद्धतीमुळें अफूच्या व्यापारांत होणारा नफा व्यापारी खात्याकडे जमा न होतां मुलकी खात्याकडे जमा होऊं लागला व हीच पद्धत शेवटीं सर्वांत चांगली ठरली.

**चीनमधील अफू.**—चीन देशांत खपणाऱ्या अफूपैकीं बरीच अफू तेथेंच तयार होते. चीनमध्यें साडेचार लक्ष लोकसंख्येपैकीं तीन लक्ष लोक अफू ओढतात. देशांत होणारा माल हळूहळू बाहेरून येणाऱ्या मालाची जागा बळकावीत आहे. युनान प्रांतांतून चीनच्या इतर भागांतहि अफूचा पुरवठा होऊं लागला आहे. चीन देशांत जरी हिंदु-

स्थानांतून जाणारी अफू बंद झाली तरीहि तेथील लोकांच्या व्यसनाला विशेष आळा बसण्याचा संभव नाहीं.

लागवड.—खसखशीच्या झाडाच्या जातीपैकीं कोणत्या जातीच्या झाडांची लागवड करणें श्रेयस्कर होईल हा अजून एक मोठा प्रश्नच आहे. निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या जातीची लागवड येणेंप्रमाणें करितात.

बंगालः—मुख्यत्वेंकरून पांढऱ्या फुलाच्या जातीपैकीं कोणत्या तरी एका जातीची पण विशेषेंकरून जिला फिक्या रंगाचीं बोंडें येतात ती जात लावतात.

माळवाः—बहुधा जांभळ्या फुलांचीं झाडें विशेष आढळतात.

हिमालयः—क्वचित चित्रविचित्र रंगाच्या फुलांचीं झाडें दिसतात.

यूरोपांत एशिया मायनरमधील अफू औषधासाठीं वापरीत असत व हल्लींहि वापरतात. परंतु हिंदुस्थानात औषधांकरितां उपयोगात आणलेली अफू हिंदुस्थानातच 'अल्बा' नांवाच्या जातीच्या झाडापासून तयार करितात व त्यांची लागवडहि येथेंच होते. या दोहोंतील रासायनिक गुणधर्म कांहीं बाबतींत अगदीं भिन्न दिसतात. पण हिंदुस्थानांतील वैद्य लोकांचें असें म्हणणें आहे कीं, औषधांत सारख्या प्रमाणांत ती टाकल्यास हिंदुस्थानांतील अफू यूरोपांतून येणाऱ्या अफूपेक्षां कोणत्याहि बाबतींत कमी दर्जाची ठरत नाहीं.

लागवडीचें क्षेत्रफळ व उत्पन्न.—हल्लीं जिला बंगाली अफू म्हणतात ती पाटणा आणि गाझीपूर येथील कारखान्यांत तयार होते व तिची लागवड बंगाल, आग्रा आणि अयोध्या या प्रांतांत होते. 'माळवी अफू', मध्य हिंदुस्थान, राजपुताना, आणि कांहीं इतर संस्थानें यांत लावतात. बंगाली अफूची निर्गत कलकत्त्याहून व माळवी अफूची निर्गत मुंबईहून होते. बंगाली अफूच्या लागवडीनें किती क्षेत्रफळ व्यापिलें आहे हें निश्चितपणें सांगतां येतें. तिची लागवड खुद्द सरकारच्या ताब्यांत आहे. माळवी अफूची लागवड किती क्षेत्रफळ जमीनींत होते हें केवळ अजमासानेंच सांगता येईल, कारण तिच्या लागवडीचा कमजास्तपणा फक्त निर्गतीच्या जकातीवरूनच काढावा लागतो.

१८७२ पासून १८९२ पर्यंत ब्रिटिश मुलुखांत सरासरी ५,१५,००० एकर जमिनींत बंगाली अफूचें पीक होत असे. पीक करून हातीं लागलें नाहीं अशी जमीन वगळली तर गंगेच्या खोऱ्यांत १९०२-३ सालीं ५,८२,८०७ एकर व १९०५-६ सालीं ६,५४,९२८ एकर जमीनींत अफूची लागवड झाली होती. १९०६-७ सालीं हिंदुस्थान सरकारनें लागवडीचें क्षेत्रफळ कमी करून सरासरी ५,६२,५०० एकर जमीनीतच लागवड करावयाचें ठरविलें होतें. एतद्देशीय संस्थानांत सरासरी ७०,०००एकर; ब्रिटिश मुलुखापैकीं बंगाल्यांत अजमासें २,००,००० एकर; तितकीच आग्र्यांत; व त्यापेक्षां थोडी कमी अयोध्येंत जमीन अफूच्या लागवडीखालीं असते. या शिवाय इतर ठिकाणची लागवड महत्त्वाची नाहीं. उदाहरणार्थ, पंजाब, अजमीर-मेरवाड आणि वरचा ब्रह्मदेश या सर्व ठिकाणीं मिळून सरासरी ६००० ते ७००० एकर जमीन अफूकडे असते. माळवी अफूपैकीं, ग्वालेर संस्थानांत ३६,३७८ एकर; टोंक ९,७३३ एकर; कोटा ३१,१६६एकर; आणि जयपूर ३,०७७ एकर जमीन १९०४-५ सालीं अफूच्या लागवडीखालीं होती. बडोदा, इंदोर वगैरे ठिकाणाहून माहिती मिळत नाहीं.

एतद्देशीय संस्थानें अफूची लागवड वगैरेच्या बाबतींत ब्रिटिश सरकारच्याच धोरणाचें अनुकरण करितात व बेकायशीर व्यापार थांबविण्याचा प्रयत्न करितात, तरी देखील बराच चोरटा व्यापार चालतो. इंग्रजांच्या राज्यव्यवस्थेप्रमाणें एतद्देशीय संस्थानांतून चीन देशांत जाणाऱ्या मालावर संस्थानें बरीच जकात वसूल करतात व त्या अफूवर ब्रिटिश सरकारहि जकात घेतें. चीन देशांत अफू उत्पन्न होऊं लागल्यामुळें माळव्यातील हलक्या दर्जाच्या अफूचा खप कमी झाला. तेथें आता बंगालमधील उत्तम व स्वच्छ अफू खपते. याप्रमाणें लागवडीच्या आणि अफू तयार करण्याच्या प्रत्येक व्यवस्थेंत सरकारची देखरेख असते. सरकारनें जर व्यापारावर इतकीं बंधनें व कायदे केले नसते तर शेतकऱ्यांनां कितीतरी जास्त किंमत मिळाली असती. प्रत्येक एकरीं ६ ते ८ शेर अफू होत असावी. म्हणजे सध्या इतर पिकापासून त्याला जो फायदा मिळाला असता त्याहून जास्त फायदा मिळत नाहीं. सरकारी अफूचा स्थानिक खप इतर ठिकाणच्या खपापेक्षां कमी असतो. याचें कारण असें सांगतात कीं शेतकरी लोक स्वतःच्या व इतर मित्रमंडळीच्या साठीं अफू काढून ठेवीत असावेत. यावरून एकरीं ९ शेर पीक होत असावें हा अंदाज कांहीं चुकीचा होणार नाहीं. डब्ल्यू. बी. जॉनसन यानें यासंबंधीं लिहितांना असें म्हटलें आहे कीं अफूचें पीक एकरी १५ शेर होतें.

बंगालांतील आणि संयुक्त प्रांतांतील लागवड.—हिच्या लागवडीचें वर्ष सप्टेंबर पासून सुरू होतें. खरीपाचें पीक काढल्यानंतर या पिकासाठीं जमीन तयार करावयास सुरवात करतात. आक्टोबरच्या मध्यापर्यंत दहा दहा दिवसांच्या अंतरानें जमीन नांगरून, नंतर पेरणीस सुरवात करतात व ती नोव्हेंबरच्या मध्यापर्यंत चालते. याला वाळूमिश्रित चिकण मातीची काळी व कसदार जमीन लागते. म्हणून गांवाच्या लगत असेल तीच जमीन बहुतेक तयार करितात. बहुधा १५० ते २०० मण खत घालतात. शेतांत मेंढरें वगैरे बसवून त्यांचें खत घेण्याची पद्धत फारच चांगली असते. पालाशनत्रित (नैट्रेट आफ पोट्याश) याचाहि खताकरितां उपयोग करणें चांगलें असतें. नंतर सहा किंवा आठ फूट लांब आणि चार फूट रुंद असे वाफे तयार करितात. हे वाफे बेणण्यास व पाणी देण्यास सोईचे असतात. सर्वांत मोठ्या आकाराचें किंवा सर्वांत जास्त माल उत्पन्न

करणारें बोंड बियासाठीं निवडतात किंवा दुसऱ्या ठिकाणच्या बियाशीं अदलाबदल करतात.

पेरणी करतात त्याच दिवशीं शेताला भरपूर पाणी देऊन, त्यांतील ढेंकळें फोडतात. बिघ्यागणीक ६ पौंड बीं पुरतें. बीं पेरण्याच्या आदले दिवशीं रात्रीं तें पाण्यांत भिजवून ठेवितात व कांहीं शेतकरी त्यांत पातळ खत घालतात. एक आठवड्यानंतर रोपें वर येतात. तीं सरासरी ६ इंच वाढलीं म्हणजे बेणणी करून रोपें दाट झालीं असल्यास तीं विरळ करतात. फक्त जोरदार रोपेंच ठेवतात व त्यांची पूर्ण वाढ झाली म्हणजे तीं ७–८ इंचांहून जास्त जवळ राहूं देत नाहींत.

रोपें येण्यास सुरवात होतांच पाणी देऊं लागतात आणि पीक बिघडण्याचीं चिन्हें दिसल्यास पुन्हा पेरणी करितात. बोंडें पक्व होईपर्यंत सारख्या कालानें पाणी देणें चालू ठेवावें लागतें. या पाण्यांत झाडें न बुडण्याविषयीं किंवा तें सांचूं न देण्याविषयीं खबरदारी घेतली पाहिजे. जेथें जमीनींत ओलावा असतो तेथें दिसेंबरपर्यंत पाणी देत नाहींत व कांहीं ठिकाणीं पाणी देण्याची मुळींच अवश्यकता नसते.

फुलांचा बहार येण्याला ७५–८० दिवस लागतात. फुलाला चार पाकळ्या असतात व त्या फुलें आल्यांवर तिसरे दिवशीं तोडून, नीट राखून ठेवितात. कारण 'पुरवठ्याची अफू ' पेट्यांत बंद करितांना त्या लागतात. पाकळ्या तोडल्यानंतर ८–१० दिवसांनीं बोंडें तयार होतात.बंगालमध्ये जानेवारीच्या शेवटीं प्रथम अफू गोळा करण्यास सुरवात होते. व हें काम मार्च मध्यापर्यंत चालू असतें. संयुक्तप्रांतांत हंगामास उशीरा सुरुवात होते. येथें साधारणपणें मार्च महिन्यापासून फुलें येऊं लागतात. साधारणतः एप्रिल महिन्यांत व डोंगराळ ठिकाणीं जूनपासून अफू गोळा करण्यांत होते. अफूचें पीक काढल्यानंतर खरीपाचा हंगाम येईपर्यंत जमीन नेहमीं पडीत ठेवितात व नंतर त्यांत इतर पिकें किंवा, कधीं कधीं भरपूर खत देऊन, पुन्हां अफूचेंच पीक करतात.

**मा ळ वा, पं जा ब व गै रे ठि का ण ची ला ग व ड.**— सौम्य हवा, विपुल पाटाचें पाणी, उत्तम कसदार जमीन व सतत उद्योग हीं माळवी अफूला अवश्य लागतात असें म्हणतात. काळी कपाशीची जमीन भरपूर खत दिल्याशिवाय या पिकाच्या उपयोगी पडत नाहीं. बडोद्यांत बाजरी नंतर खसखशीचें पीक करतात. माळवा अफू खालीं दिलेल्या ठिकाणीं पिकतेः—

मध्यहिंदुस्थानः—इंदोर, ग्वालेर, भोपाळ, बुंदेलखंड, बाघेलखंड, माळवा आणि भोपावर.

राजपुतान्यांतः—मेवाड, जयपूर, हरौति आणि टोंक, पर्व व पश्चिम राजपुतान्यांतील संस्थानें, कोटा, अलवार आणि बिकानेर.

पंजाबांतः—शाहपूर. येथून लाहोर आणि अमृतसर या ठिकाणीं पुरवठा होतो.

**ख स ख शी च्या झा डा पा सू न त या र हो णा रा मा ल.**—या झाडापासून निरनिराळे आणि उपयुक्त पदार्थ उत्पन्न होतातः—

अशुद्ध बंगाली अफूः—ही अफू काढण्यासाठीं कच्च्या बोंडांनां ओरखाडे पाडावे लागतात. ओरखाडे पाडण्याचें काम फार कसबाचें असतें. हें काम ' नस्तरानें ' करतात. या नश्तराला चार पातीं असतात व हीं पातीं मधून कापूस घालून एकेठिकाणीं ( सरासरी एक तिसांश इंच अंतरावर ) बांधलेलीं असतात. बोंडाच्या वरील सालीलाच फक्त ओरखाडे पाडले पाहिजेत; पण ते देखील वरवर नसले पाहिजेत. ओरखाडे बोंडाच्या खालून वर पाडीत नेतात व हें काम संध्याकाळीं करितात. हें काम भर उन्हांत करावें व रेघा तिरक्या पाडाव्या असें जॉनसन साहेबाचें म्हणणें आहे. दोन किंवा तीन दिवस मध्यें जाऊं देऊन याप्रमाणें बोंडांनां तीन किंवा चार वेळ रेघा पाडाव्या लागतात. कधीं कधीं एकदा ओरखाडून काम भागतें. उत्तम बोंड असल्यास त्यांतून आठ किंवा दहावेळ देखील रस निघतो. पहिल्या लागवडीचा रस पातळ असतो आणि नंतरच्या लागवडीचा थोडा असून घट्ट असतो. काम सुरक्षितपणें व व्यवस्थेशीर रीतीनें व्हावें म्हणून शेताचे कांहीं भाग करून रोज एका भागांतील बोंडांनां ओरखाडे पाडितात.

ओरखाडे पाडल्यानंतर दुसरे दिवशीं हा रस ' सेतवा ' नांवाच्या थापीसारख्या चमच्यानें ओरपून किंवा खरडून गोळा करितात व तो एका खापराच्या पसरट्या भाड्यांत सांठवितात व तें भांडें वांकडें ठेवितात म्हणजे दाट रस राहून पातळ रस निघून जातो. या पातळ रसाला ' पसेवा ' असें म्हणतात. बनारसमधील उत्तम प्रकारच्या अशुद्ध अफूंत शेंकडा दाट अफू सत्तर आणि पातळ अफू तीस, असें प्रमाण असतें. सर्व पसेवा निघून जाईपर्यंत रस वेळोवेळीं एका भांड्यांतून दुसऱ्या भांड्यांत ओततात. बंगालमध्यें रसांतील अफूचें प्रमाण शेंकडा पंचाहत्तर असतें व तो काढण्यासाठीं मडक्याच्या तोंडावर फडकें बांधून त्या फडक्यावर रस ओतून तो वाळवतात. या फडक्याला अफू चिकटते म्हणून हीं फडकीं देखील विकलीं जातात. या फडक्यांनां ' कफा ' असें म्हणतात. ओरखाडे पाडल्यावर प्रत्येक वेळीं प्रत्येक झाडापासून सरासरी दहा ग्रेन अफू निघते.

पसेवाः—अशुद्ध अफू वाळवितांना त्यांतून जो पातळ पदार्थ वेगळा निघतो त्याला ' पसेवा ' म्हणतात. हें वर सांगितलेंच आहे. हा पदार्थ काळा, काफीच्या रंगासारखा असतो व हा अफूंत राहिल्यानें ती काळी व पातळ होते. याला चमत्कारिक वास येतो व तो अतिशय आंबट असतो. याशिवाय यांत मेकॉनिक ॲसिड, रेझिन, मॉरफिआ आणि नारकोटिन हीं द्रव्यें असतात.

पानें व पाकळ्याः—जानेवारीपासून मार्च महिन्यापर्यंत फुलांचा मोसम असतो. फुलांची पुरती वाढ होण्यापूर्वी जर तीं तोडलीं तर बोंडांतून रस कमी निघतो. म्हणून फुलें तोडतांना फार काळजी घ्यावी लागते. फूल बुडाशीं बाहेरून हातीं धरून हळूच मूठ मिटावी व ती उचलावी म्हणजे फूल पुरतें वाळलें असल्यास पाकळ्या निघून येतात. एरव्हीं येत नाहींत. पाकळ्या तोडण्यासाठीं कोरडी हवा चांगली असते. नाहींतर पाकळ्यांचा रंग वाईट होतो. पाकळ्यांच्या पत्रावळी करतात. मंदाग्नीवर तवा ठेऊन त्यावर थोड्या पाकळ्या पसराव्या व त्या पसरलेल्या पाकळ्यांवर ओलसर फडकें पसरून त्या दाबाव्यात म्हणजे फडक्यांतील वाफेनें त्या एकमेकांवर चिकटतात व त्यांची पोळी किंवा पत्रावळ बनते ही तव्यावर उलटवून दुसऱ्या बाजूनेंहि तसेंच करावें म्हणजे त्या बाजूनेंहि पाकळ्या एकमेकांस चिकटतात. या पत्रावळींनां मधुर वास असतो व अफूच्या पेट्या बंद करतांना या पत्रावळी अफूवर झांकण म्हणून घालतात. या पत्रावळींची मणाला ५ पासून १० रुपये पर्यंत किंमत येते.

भुकटीः—देंठ, पानें वगैरे पासून ही तयार करितात. अफू पेट्यांतून बंद करतांना हिचाहि उपयोग होतो.

लेवाः— ही हलकी अफू व 'पसेवा' यापासून तयार केलेली एक प्रकारची चिक्की असते. हिचा देखील अफूच्या पेट्या भरतांनां उपयोग करतात.

बीं आणि तेलः—ज्या बोंडांना ओरखाडे पाडलेले नसतात त्यांतून उत्तम खसखस निघते. खसखशीचें गोड तेल निघतें व तें खातात. याच्या अंगीं अफूच्या मादकपणाचा मुळीं लेशहि नसतो. अबकारी अफू तयार करतांना हें तेल तिला लावितात म्हणजे वर गुंडाळलेला कागद तिला चिकटत नाहीं.

माळवी अफू तयार करण्याची कृतिः—माळव्यांतील व हिंदुस्थानाच्या इतर भागांतील कृतींत नस्तरांतील पात्यांची संख्या व बोंडांना ओरखाडे पाडणें, अफू गोळा करणें व सुखविणें या पद्धती वेगवेगळ्या आहेत. लबाडी करावयाची असल्यास बोंडांवरून अफू काढतांना बोंडांच्या टरफलाचा वरील भाग खरवडून घेतात म्हणजे सहज भेसळ अफू निघते. एकपट चीक व दुप्पट तेल या प्रमाणानें गोळा केलेला चीक एका अळशीचें तेल असलेल्या भांड्यांत ठेवितात. रसाची वाफ होऊन उडून जाऊं नये म्हणून असें करणें एका दृष्टीनें ठीक असतें पण वास्तविक ही एक भेसळ करण्याची रीत आहे. एका एकरांत ३५ ते ५० शेर चीक (रस) निघतो व त्याची २०० पासून ६०० रुपये किंमत येते.

तेलांत टाकलेला चीक नंतर दुहेरी थैलींत टाकून बंद व अंधाराच्या खोलींत वर टांगून ठेवितात म्हणजे एक महिन्यांत सर्व तेल गळून जातें. मग जून किंवा जुलै महिन्याच्या सुमारास थैलीतील अफू एका लांबोड्या मोठ्या पिपांत टाकतात व त्याला सारखा रंग व दाटपणा येईपर्यंत त्यांतच ठेवितात. नंतर त्याचे आठ किंवा दहा औंसांचे गोळे वळून ते गोळे बोंडांच्या टरफलापासून तयार केलेल्या व टोपलींत ठेवलेल्या भुश्यांत टाकतात. मग पानांचा व देंठांचा भुसा जमीनीवर पसरून त्यांवर ते वाळविण्यासाठीं पसरतात. वाळले म्हणजे सरासरी १५० वड्यांची एक पेटी याप्रमाणें पेट्या तयार करतात व आक्टोबर किंवा नोव्हेंबर महिन्यांत विकावयास बाहेर पाठवितात.

बंगाली अफू करण्याची कृति.—शेतकऱ्याजवळून घेतलेली अफू शुद्ध व कोणत्या प्रकारची आहे हें समजण्यासाठीं पहिल्यानें तिची पारख करतात व नंतर दहा हंड्रेडवेट अफू मावेल एवढ्या मोठ्या पेटींत ती सांठवून ठेवितात. याप्रमाणें हवेंत आणि उजेडांत ठेवल्यावर तिचा रंग अधिकाधिक गर्द होत जातो. मोठ्या पेटींतून रोज तयार करावयाची असेल तेवढी अफू काढून घेतात व तिचे निवडून वेगळाले नमुने तयार करितात. नंतर ती मळून पेट्यांत भरतात. या पेट्यांपैकीं कांहींची वरील प्रमाणें पुन्हां पारख करितात म्हणजे अफू सारखी होते. तिच्या दुसरे दिवशीं वड्या करतात. वड्या करण्याची कृति येणेंप्रमाणें आहेः— वड्या करणारा एक पितळेचा पेला हातीं घेतो व त्यांत पाकळ्यांच्या पत्रावळी व लेवा (चिक्की) टाकून अर्धा इंच जाडीचें 'शुल' तयार करतो व त्यांत वडी टाकून ती वरून व बाजूनें पत्रावळी व लेवा टाकून बंद करतो. नंतर ती पेल्यांतून काढून घेऊन भुकटींत टाकतो व भुकटींतून काढून खापराच्या पेल्यांत ठेवून उन्हांत तीन दिवस वाळवितो. या प्रत्येक वडीचें वजन सरासरी ४ पौंड ३॥ औंस असतें. पण त्यांतील अर्धे वजन वरील 'शुल' चेंच असतें.

शेंकडा नव्वद हें प्रमाण येईपर्यंत व मेणासारखी दाट दिसेंपर्यंत अबकारी अफू वाळवितात. नंतर तिच्या दोन पौंडांची एक याप्रमाणें चौकोनी विटा तयार करितात. नंतर या विटा तेलांत बुडविलेल्या नेपाळी कागदांत गुंडाळून पेट्यांतून बंद करतात.

अफूचा व्यापार.–हिंदुस्थानांत होणारी अफू दोन निरनिराळ्या प्रकारची असते. जिला बंगाली अफू म्हणतात ती बंगाल, बहार व संयुक्त प्रांतामध्यें खसखसीच्या झाडापासून तयार केलेली असते. दुसरी माळव्यांतील अफू ही राजपुताना व मध्यहिंदुस्थानांतील कित्येक संस्थानें यांमध्यें तयार होते.

बंगाली अफूः— खसखसीच्या झाडांची लागवड करण्यास परवाना काढावा लागतो. लागवड करणारांना सरकार बिनव्याजी आगाऊ पैसे देतें व नंतर मालकांनां तयार केलेली सर्व अफू गाझीपूर येथील ओपियम फॅक्टरीला सरकारनें ठरविलेल्या दरानें विकत द्यावी लागते. ७०° अफूचा दर शेरास ७८ रुपये असा भाव हल्लीं आहे. अलीकडे हिं[illegible] संस्थानसरकार व ब्रिटिश सरकार यांच्यामध्यें करारमदार होऊन

अफूच्या लागवडीचें क्षेत्र बरेंच कमी करण्यांत आलें असून फक्त संयुक्त प्रांतांतच लागवड होत असते. जेवढ्या भागांत लागवड होते त्याचें क्षेत्रफळ (१९१७-१८ साली) व पिकाचे आंकडे पुढील प्रमाणें आहेत. पिकाची जमीन ३,३१,२१६ बिघे; एकंदर पीक ३२,३२१ मण; तयार केलेल्या पेट्या २५१४६. फॅक्टरीमध्यें अफूचे दोन वर्ग करतातः—

(१) "प्रोव्हिजन" अथवा निर्गती अफू ही परदेशीं पाठविण्याकरितां असते. ह्या अफूच्या गोळ्या किंवा वड्या करतात. प्रत्येक गोळी किंवा वडी ३.५ पौंड वजनाची असते व अशा ७० वड्या १४० $\frac{5}{8}$ पौंड वजनाच्या एका पेटींत असतात.

(२) "एक्साईज" अथवा स्थानिक उपयोगाची अफू हिंदुस्थानांतील ब्रिटिश मुलुखांतल्या खपाकरतां असते. हिच्या एकेक शेर वजनाच्या चौकोनी वड्या करतात व त्या एका पेटींत ६० असतात. ही अफू 'प्रोव्हिजन' अफूपेक्षां अधिक चांगल्या प्रकारची असते.

"प्रोव्हिजन" अफू कलकत्ता शहरांत जाहीर लिलावानें विकली जाते; पण ती विकण्यासंबंधींचे परिमाण सरकार ठरवितें. चीनबरोबर ठराव झाल्यामुळें अलीकडे या अफूची विक्री बरीच कमी झालेली आहे. १९११ मध्यें १५,४४० पेट्या विकल्या गेल्या, पण १९१२ मध्यें ६७०० पेट्यांचीच फक्त विक्री झाली. १९१३ सालापासून चीनमध्यें अफू जाणें अजीबातच बंद झालें आहे.

माळवी अफू:—माळवी अफू ज्या खसखसीच्या झाडांपासून करतात त्यांची लागवड इंदूर, ग्वालेर, भोपाळ, जावरा, धार, रतलाम, मेवाड व कोटा या देशी संस्थानांत मुख्यतः होते. ही खसखशीची लागवड किंवा अफूची निपज यांशीं सरकारचा कांहीं एक संबंध नसतो; परंतु चीनला अफू पाठविण्याचें बंद होण्याच्या पूर्वी माळवी अफू ब्रिटिश मुलुखांत येऊं देतांना व ब्रिटिश मुलुखांतून परदेशीं जातांना त्यावर सरकार नियंत्रण घालीत असे. माळवी अफूचें मुख्य गिऱ्हाईक चीनदेश असल्यामुळें आणि ज्या संस्थानांत अफू तयार होते त्यांना ब्रिटिश हद्दींतील बंदरातूनच ती परदेशी पाठविणें भाग पडत असल्यामुळें माळवी अफू मुंबई बंदरातून चीनला रवाना होण्याच्या वेळीं ब्रिटिश सरकार तिच्यावर कर बसवून तो वसूल करीत असे.

संस्थानांमध्यें होणाऱ्या या लागवडीचे किंवा निपजीसंबंधींचे आंकडे उपलब्ध नाहींत. खसखशीची पेरणी नवंबर महिन्यांत करतात. त्या झाडांना फेब्रुवारींत फुलें येतात आणि मार्चमध्यें शेतकरी सर्व पीक गोळा करून ती कच्ची किंवा शुद्ध अफू गांवांतल्या सावकारांनां विकतात. सावकारांपासून घाउक व्यापारी ती खरेदी करतात व तिचे सुमारें बाराबारा औंसांचे गोळे बनवून सांठवून ठेवतात व पुढें सप्टेंबर, आक्टोबर महिन्यांत परदेशीं पाठविण्यांत येते. ९०° ते ९५° चीहि अफू असून ती निम्या आकाराच्या पेट्यांत भरतात. मुंबईस पोहोंचेपर्यंत ही नवी अफू बरीच वाळून जाते.

१९१३ जानेवारीपासून चीनमध्यें माळवी अफू पाठविण्याचें बंद झालें व त्या वर्षाच्या डिसेंबर ता. १७ रोजीं जीं अफूचीं जहाजें चीनला रवाना झालीं तीं शेवटचीं असून तेव्हांपासूनच ही निर्गत पूर्णपणें बंद झालेली आहे. तोंपर्यंत मुंबईस जाणारी सर्व माळवी अफू चीनला जात असे. स्ट्रेट्स सेटलमेंट्स मध्यें या अफूचा खप मुळींच नाहीं. झांझीबारला या अफूच्या कांहीं पेट्या जातात.

सरकारी उत्पन्नः— हिंदुस्थानसरकारच्या अलीकडील सालांतल्या अफूच्या कांहीं उत्पन्नाचे आंकडे पुढील प्रमाणें आहेतः—

| सन | पौंड |
|---|---|
| १९१५-१६... ... ... ... | ...१, ९१३, ५१४ |
| १९१६-१७... ... ... ... | ...३, १६०, ००५ |
| १९१७-१८... ... ... ... | ...३, ०७८, ९०३ |
| १९१८-१९... ... ... ... | ...३, २२९, ००० |
| १९१९-२० (बजेटांतील अंदाज) | ...३, ०५६, २०० |

१९१९-२० सालचा अंदाजी खर्च १०,४६,१०० पौंड आहे.

चीन सरकारनें इसवी सन १८२९ मध्यें स्वदेशांत आयातीस बंदी केली; तथापि त्यानंतर अफूचा चोरटा व्यापर चीनशीं मोठ्या प्रमाणावर चालू होताच. चीननें अफू बंद केल्यास गोऱ्या व्यापाऱ्यांचें नुकसान होतें म्हणून चीनच्या घशांत अफू कोंबली पाहिजे व ती कोंबण्यासाठीं पुढें चीन व इंग्लंड यामध्यें युद्ध झालें. या बेशरम युद्धांत इंग्लंडाला फ्रान्सची मदत होती. हें युद्ध १८४२ मध्यें थांबून पुढें १८५८ मधील टीन्टसिनच्या तहानें इंग्लंडनें चीनला अफूचा व्यापार पूर्ववत् चालू ठेवण्यास भाग पाडलें. १८७६ मध्यें या बाबतींत कांहीं नवे नियम करण्यांत आले. १८५० मध्यें इंग्लंड व युनैटेड स्टेट्समध्यें अफूच्या सेवनास सुरवात झाली आणि आजची स्थिति अशी आहे कीं या दोन्ही देशांतील बहुतेक मोठाल्या शहरांत अफूबाज लोक थोडे बहुत आढळून येतात. अगदीं अलीकडे अफूच्या सेवनाविरुद्ध चळवळ विशेषतः इंग्लंडमध्यें सुरू झालेली आहे. चीन सरकारनेंहि परदेशची अफू येण्याचें बंद करण्याकरितां व स्वदेशांतहि अफूची निपज न होऊं देण्याविषयीं जोरानें उपाय योजिले (नवंबर १९०६). अफूच्या एकंदर निपजेपैकीं मोठा भाग नियमितपणें अफू ओढणारे व पिणारे सहा कोटी चिनी लोक खपवीत असतात; पण चीनच्या एकंदर लोकसंख्येपैकीं निम्मे लोक कमी अधिक प्रमाणांत अफूबाज आहेत असा अंदाज आहे.

आंकडे विषयक माहितीः—चीनमधील अफूचें पीक दरसाल वीस हजार ते तीस हजार पेट्या होतें; व पूर्वे हिंदुस्थानांत म्हणजे बंगाल व बहार प्रांतांत ६३,५८,४९५

किलोग्रॅम अफू उत्पन्न होते व त्यापैकीं ६१, ४४, १३२ किलोग्रॅम चीनमध्यें जाते ( १८७३-७४ ). आशिया मायनरमध्यें तीन लक्ष किलोग्रॅम अफू दरसाल पिकते. चीन सरकारचें देशी अफूचें उत्पन्न १९००-१ मध्यें १५०५५८० डॉलर झालें; १९०५-६ मध्यें ५,७६,००० डॉलर व परदेशी अफूवरचें उत्पन्न छत्तीस लक्ष झालें. १८८० मध्यें हिंदुस्थान सरकारच्या एकंदर उत्पन्नापैकीं १४ टक्के उत्पन्न अफूचें होतें, तेंच १९०६ मध्यें ७ टक्के झालें.

वरील आंकडे लक्षांत घेतां अफूच्या व्यापाराच्या बाबतींत अत्यंत पापी वर्तन इंग्लंडच्या हातून होत आहे, असें सिद्ध होतें. अफूच्या आयातीविरुद्ध चिनी सरकारनें पुष्कळ तक्रारी केल्या. कारण या व्यसनाचे चिनी प्रजेवर होणारे घातक परिणाम त्या सरकारला पूर्ण कळले आहेत. तुर्क लोक अफू खाणारांचा व ओढणारांचा तिरस्कार करितात. या मनोवृत्तीवरून अफूच्या व्यसनामुळें शरीरावर, मनावर व आचरणावर किती वाईट परिणाम होतात ही गोष्ट पौरस्त्य लोकांना चांगली माहित आहे असें स्पष्ट होतें. आणि इंग्लंड मध्येंहि एक पक्ष हिंदुस्थान सरकारनें चालविलेल्या अफूच्या व्यापाराविरुद्ध ओरड करीत आलेला आहे; आणि या पक्षाच्या प्रयत्नास यश येऊं लागलें आहे, ही गोष्ट अलीकडील अफूच्या उतरत्या उत्पन्नावरून दिसून येते.

ची न ब रो ब र चा क रा र.—अफूच्या उत्पन्नामध्यें जो चढउतार दिसून येतो तो अफूच्या निर्गतीवरील नियंत्रणामुळें उत्पन्न होणारा आहे. चिनी लोकांचें अफूचें व्यसन नाहींसें करण्यासंबंधाच्या चिनी सरकारच्या प्रयत्नांतील प्रामाणिकपणाबद्दल १९०७ सालीं हिंदुस्थान सरकारची खात्री पटल्यामुळें हिंदुस्थानांतून चीनमध्यें होणारी अफूची निर्गत हळूहळू कमी करून चिनी सरकारशीं सहकार्य करण्याचें हिंदुस्थान सरकारनें ठरविलें. या बाबतींत १९०८ सालीं करार करून, दरसाल सर्व साधारणपणें ६७,००० पेटया चीनला जात. त्यापैकीं दरसाल ५,१०० पेटया कमी कमी पाठविण्याचें हिंदुस्थान सरकारनें ठरविलें. त्यानंतर चीन मध्यें होणारी देशी अफूची निपज बंद करण्याबाबतचा चीन सरकारकडून खात्रीलायक पुरावा मिळाल्यावर १९११ सालीं आणखी नवा करार करून हिंदुस्थान सरकारनें माळवी अफूची निर्गत अधिक मोठ्या प्रमाणांत कमी करण्याचें ठरविलें. परंतु अफूची निर्गत कमी झाल्यामुळें तिकडे चिनमध्यें तिची किंमत वाढली व त्याबरोबर हिंदुस्थानांतील अफूच्या लिलावांचे दरहि वाढले. परंतु त्याच सुमारास मध्यवर्ती चिनी सरकाराच्या सूचनांकडे दुर्लक्ष करून चिनी प्रांतिक गव्हर्नरांनीं हिंदुस्थानांतील अफूच्या आयातीवर व विक्रीवर प्रतिबंध घातले व त्यामुळें १९१२ सालीं चीनबरोबर अफूचा व्यापार पूर्णपणें बंद झाल्यासारखा झाला. शांघाय व हांगकांग बंदरांत अफूचा सांठा फार वाढला आणि १९१२ डिसेंबरमध्यें तेथील परिस्थिति इतकी बिकट झाली कीं, अफूची विक्री बंद ठेवण्याबद्दल हिंदुस्थान सरकारकडे जोराची मागणी करण्यांत आली. तदनुसार बंगाली व माळवी अफूची विक्री पुढें ढकलण्यांत आली,इतकेंच नव्हे तर माळवी अफूच्या व्यापाऱ्यांचें नुकसान होऊं नये म्हणून १९१३ मध्यें चीनला पाठवावयाच्या माळवी अफूच्या ११२५३ पेटया हिंदुस्थान सरकारनें स्वतः खरेदी केल्या. त्यानंतर अलीकडे १९१३ सालापासून चीन बरोबरचा अफूचा निर्गत व्यापार पूर्णपणें बंद झाला आहे. १९१७-१८ सालीं अफूची खासगी निर्गत १२,००० हंड्रेडवेट झाली, तिची किंमत २४० लाख रुपये आली. इंडोचायना, सयाम, जपान, हांगकांग व स्ट्रेट्स सेटलमेंट इतक्या देशांत अफू जात असे.

[ वाङ्मयः—वॉट दि कमर्शिअल प्रॉडक्स ऑफ इंडिया. रिपोर्ट—रॉयल कमि. ऑन. ओपियम १८९४. ए. ब्रि. मॉरल अँड मटीरियल प्रोग्रेस ऑफ इंडिया १९०५-०६ पेपर्स रिलेटिंग टु कन्झम्शन ऑफ ओपियम इन. ब्रि. बर्मा १८८१. इंडियन ईयर बुक. फार्मास्युटिकल जर्नल. रिपोर्ट ऑन माळवा ओपियम ( मुंबई १८४८ ). दि फ्रेंड ऑफ चायना. ( १८८३ ) कर्मशिअल आर्गानिक ॲनॅलिसिस पु. ३ फ्रँक ब्रौन—रिपोर्ट ऑन ओपियम ( हांककांग १९०८ ). चीनचा इतिहास ( ए. ब्रि. ). इंपीरियल गॅझेटीयर ऑफ इंडिया पु. ४].

**अबकारी खातें**:—हिंदुस्थानांत इंग्रज सरकारचीं जीं अनेक खातीं आहेत त्यांत शेतसाऱ्याच्या खालोखाल उत्पन्नाच्या बाबतींत दुसरा नंबर लागणारें, अबकारी खातें आहे. त्यामुळें तें महत्त्वाचें असें समजलें जातें. अबकारी खात्याच्या वसुलाच्या खालीं दिलेल्या बाबी आहेत.

( १ ) दारू गाळणें ( ताडी, व इतर देशी दारू तयार करणें ) व दारू विक्री ( देशी व परदेशी दारू विकणें )

( २ ) अफू तयार करणें व विक्री करणें.

( ३ ) गांजा, भांग, चरस, माजूम इत्यादि अमली पदार्थांची विक्री.

मादक पदार्थ सेवनकरण्याचा प्रघात सर्व देशांत थोड्या बहुत प्रमाणानें फार प्राचीन काळापासून आहे. हिंदुस्थानांतहि दारू पिण्याचें व्यसन फार पुरातन काळापासून अस्तित्वांत आहे. त्यासंबंधीं सविस्तर वर्णन ' दारू ' या सदराखालीं सांपडेल. तसेंच भांग, गांजा, अफू यांचें सेवनहि ब्रिटिश अमलाच्या पूर्वीपासून लोक करीत आहेत. सर्व मादक पदार्थांवर कर घेण्याची पद्धत पूर्वीच्या कारकीर्दींतहि असे. हा कर घेण्याची पद्धत तक्रार न येईल अशा रीतीनें ठरविण्यास फार अडचण पडते. कारण त्या कामीं प्रश्न फार भानगडीचे उपस्थित होतात. देशवैचित्र्य, मादक पदार्थ करण्याच्या मूळपदार्थांची विपुलता, किंवा कमी पुरवठा, व्यसनी लोकांची सांपत्तिक व सामाजिक स्थिति इत्यादि कारणांनीं निरनिराळ्या पद्धती योजाव्या लागतात व

विनपरवान्यानें हे पदार्थ तयार करणें किंवा दस्तुरी चुकवून नेणें यासंबंधीं किल्येकस्थळीं बंदोबस्तहि फार सावधगिरीनें करावा लागतो. ब्रिटिश सरकारनें या पदार्थांच्या बाबतींत खालीं लिहिलेल्या तत्त्वानुसार नियम केले आहेत.—

( १ ) मादक पदार्थ व पेयें ह्यांजवर जबर कर असावा.

( २ ) त्या पदार्थांचा व्यापार सरकारी बंदोबस्ताखालीं असावा.

( ३ ) हे पदार्थ विकण्याच्या दुकानांची संख्या गरजेच्या मानानें असावी.

( ४ ) ह्या अमली पदार्थांच्या विक्रीसंबंधानें लोकमत काय आहे त्याचा तपास करून तदनुरूप व्यवस्था करण्याचा शक्य तितका प्रयत्न करावा.

ह्या पदार्थांवरील जबर करामुळें सेवनास प्रतिबंध व्हावा असा जरी हेतु असला तरी फार सक्ती झाल्यास व्यसनपरिहार न होतां अन्य मार्गानें हे पदार्थ प्राप्त करून घेण्याकडे व्यसनी लोकांची प्रवृत्ति होते. तेव्हां अशी प्रवृत्ति होईल इतका जबरहि कर नसावा. एकंदरींत अगदीं थोडा माल खपून जितका जास्त वसूल वाढेल तितका वाढावा असा सरकारचा हेतु दिसतो. सर्व मादक पदार्थ विकण्याचा अधिकार सरकारचा आहे असें ठरविण्यांत आल्यामुळें ते तयार करण्याचा व विकण्याचा परवाना कांहीं फी घेऊन देण्यांत येतो.

प्रत्येक दुकानाच्या विक्रीच्या मानानें सालीना कांहीं रक्कम घेऊन परदेशी दारू विक्रीचे परवाने दिले जातात. देशी दारूविक्रीच्या वहिवाटींत दोन वर्ग करता येतील.

( १ ) मध्य ठिकाणीं दारू तयार करून ती तेथून बाहेर विक्रीस नेतांना तिजवर नियमाप्रमाणें दस्तुरी घेण्यांत येते.

( २ ) कर वसूल करणें, तो तयार झालेल्या दारूवर न घेतां, मूळ दारू तयार करण्याचा व विकण्याचा हक्कच लिलांव करून देण्यांत येतो. व लिलांवांत आलेले पैसे तो लिलावदार पुढें तयार करील त्या दारूवरील कर समजला जातो.

पहिल्या पद्धतीस सेंट्रल डिस्टिलरि सिस्टिम ( मध्यठिकाणीं भट्टी ठेवण्याची पद्धति ) असें म्हणतात. दुसऱ्या पद्धतीस आउट स्टिल पद्धति ( बाहेरील भट्टयांची पद्धति ) असें म्हणतात. या पद्धति प्रांतिक ठिकाणांच्या मानानें निरनिराळ्या प्रकारानें अमलांत आणल्या जातात. पहिली पद्धत हिंदुस्थान सरकारास विशेष पसंत असून ती बहुतेक प्रांतीं व भरवस्तीच्या शहरांत व मोठमोठ्या गांवीं चालू आहे. परंतु लहान खेड्यापाड्यांत व मोठाल्या रस्त्यापासून लांब असलेल्या गावांत दारूचा खप होण्याकरितां मध्यवर्ती भट्टींतून माल पुरविणें अतिशय खर्चाचें असल्यामुळें असल्या भागांत ठिकठिकाणीं दारू तयार करून विक्री करण्याचे परवाने देण्यांत येतात. आतां बंगाल्या प्रांतांतल्या पद्धतीचे नियम देऊं:—

( १ ) सेंट्रल डिस्टिलरी पद्धतीप्रमाणें सरकार एक मध्यवर्ती दारू तयार करण्याचा कारखाना काढतें व त्या ठिकाणीं त्यांनीं पसंत केलेल्या योग्य इसमास सरकारी अमलदाराच्या देखरेखीखालीं दारू तयार करण्यास परवाना मिळतो, व दारू तयार झाल्यावर भट्टींतून जी दारू बाहेर विकण्यास नेण्यांत येईल तीवर नियमाप्रमाणें दस्तुरी घेण्यांत येते. अशा भट्ट्यांत दारू तयार करण्याचा हक्क मक्त्यानें देत नाहींत. तसेंच दारू करण्याचा व विक्रीचा हक्क वेगळा ठेवितात. ही पद्धत खालचा बंगाल, वायव्य व अयोध्याप्रांत व पंजाब येथें चालू आहे. ब्रह्मदेशांत यूरोपीय पद्धतीवर जी दारू तयार करण्यांत येते तीवर याच पद्धतीनें कर घेण्यांत येतो. मध्यप्रांतांत हीच रीत आहे, परंतु त्यांत इतकाच फरक आहे कीं, या प्रांतांत दस्तुरी तयार झालेल्या दारूवर न घेतां दारू तयार करण्यास जो मालमसाला लावण्यांत येतो त्याजवर घेण्यांत येते.

तसेंच दुकानें किती असावींत व कोठें घालावीं हें जिल्ह्याचे अधिकारी ठरवितात. व ते या दुकानांत दारू विक्रीचे परवाने देतात. व त्याबद्दल फी घेतात. ही फी कांहीं ठिकाणीं महिन्याच्या, व कांहीं ठिकाणीं वर्षाच्या मुदतीनें ठरविण्यांत येते. तिची रक्कम कांहीं ठिकाणीं लिलांव करून व कांहीं ठिकाणीं टेंडरें ( मागणीचे अर्ज )मागवून ठरवितात.

१९०५–६ सालीं अबकारी कमिटी भरली होती. तिनें शिफारस केल्यावरून कांहीं नवीन सुधारणा अमलांत आल्या आहेत. त्यांपैकीं मुख्य म्हणजे पूर्वीच्या पद्धतीच्या जागीं मक्त्याची पद्धत सुरू करणें ही होय. या पद्धतीप्रमाणें निरनिराळ्या जिल्ह्यांकरितां दारू गाळण्याचा हक्क मक्त्यानें दिला जातो व विक्री करण्याचा मक्ता दुसऱ्या माणसास दिला जातो.

१९१५।१६ सालीं हिंदुस्थानांत १०० माणसांमागें ५·४० ग्यालन देशी दारूच्या खपाचें सरासरीनें प्रमाण होतें. पंजाबांत हें प्रमाण १६.९६ ग्यालन म्हणजे सर्वांत इतर प्रांतांपेक्षां अधिक व ब्रह्मदेशांत फक्त ·७६ होतें.

मद्रास व मुंबई इलाख्यांत ताडांच्या किंवा माडांच्या रसापासून दारू काढल्यास तीस ताडी किंवा माडी म्हणतात. ताड व माड या झाडावर कर घेण्यांत येतो व शिवाय तयार झालेल्या दारूवरहि कर घेतात.

१९१४ सालीं जर्मनीबरोबर लढाई सुरू झाल्यापासून ब्रांडी, व्हिस्की, रम, बीर वगैरे यूरोपियन तऱ्हेची दारू हिंदुस्थानांत तयार होऊं लागली आहे. त्यांपैकीं कांहीं कारखाने पंजाबांत आहेत; व एक बडोद्यास आहे.

मा द क द्र व्यें, अफू.—हिंदुस्थानांत होणारी अफू बहुतेक चीन देशास जात असे व कांहीं थोडी स्ट्रेट्स् सेटलमेंटमध्यें जाते, याविषयीं जास्त माहिती "अफू" या सदराखालीं सांपडेल. 'हिंदुस्थानसरकारनें अफूच्या मक्त्यांत पडणें नीतीस विरुद्ध व मादक पदार्थांच्या प्रसारास उत्तेजक आहे' वगैरे

आक्षेप घेण्यांत येतात. अफूपासून उत्पन्नाचे दोन प्रकार आहेत.

(१) हिंदुस्थानांतच खप होण्याकरितां जी अफू विकली जाते तिच्यावर घेतला जाणारा कर. ह्या कराची रक्कम फार नसते. (२) परदेशांत अफू जाते तिजवरील कराच्या उत्पन्नाची रक्कम मात्र मोठी असते.

गांजा, भांग, चरस.–ह्या अमली पदार्थांचा हिंदुस्थानांत बराच खप आहे. यासंबंधीं सरकारी निर्बंध खालीं लिहिल्या प्रमाणें आहेत.—(१) सरकारी देखरेखीखालीं ह्या झाडांची लागवड. (२) किती एकर लागवड करावयाची हें ठरविण्याचा सरकारास हक्क. (३) माल तयार झाल्यावर सरकारी गोदामांतच सांठविला पाहिजे. (४) जितका माल होईल त्याच्या वजनाप्रमाणें जकात. (५) फुटकळ विक्रीकरितां परवाने घेण्याची जरूरी. (६) खाजगी माणसास किती वजनापर्यंत हे जिन्नस घरांत स्वतःच्या उपयोगाकरितां ठेवितां येतील त्याची मर्यादा.

लोकमत.–आतां या विषयाच्या संबंधानें लोकमत काय आहे ह्याचाही विचार करणें जरूर आहे. मक्त्याच्या पद्धतीपासून व्यसनांचा प्रसार वाढत आहे व लोक निर्धन होतात अशा तक्रारी लोकांच्या आहेत, व सरकारनें हीं व्यसनें व विशेषेंकरून मद्यपान अगदीं बंद करावें असे लोकांच्या पुढाऱ्यांचे अलीकडे फार जोराचे प्रयत्न चालले आहेत, व त्याकरितां स्वयंसेवक नेमून त्यांनीं पिकेटिंगची मोहीम जारीनें सुरू केली आहे. त्या स्वयंसेवकांत कांहीं स्त्रियाहि आहेत ही गोष्ट फार महत्त्वाची आहे,

पुणें येथील सरकारी अबकारी कमिटीनें जानेवारी १९२२ मध्यें कांहीं शिफारशी केल्या आहेत त्यावरून याकामीं लोकमत काय आहे हें स्पष्ट होतें:—

(१) ग्याझिटमध्यें प्रसिद्ध होणाऱ्या सर्व सार्वजनिक सुट्यांच्या दिवशीं सर्व गुत्ते बंद ठेवावेत.

(२) सर्व देशी गुत्यांवर ६० "अंडरप्रूफ" चीच दारू विकण्यांत यावी.

(३) कोणत्याहि गुत्यांतून दारू विकत घेऊन बाहेर नेण्यास परवानगी नसावी.

(४) अबकारी कमिटीच्या सर्व सभासदांस दारूचे गुत्ते तपासण्याचा अधिकार असावा.

(५) दारू पिण्यास येणाऱ्या लोकांनां उपदेश करण्याकरितां सरकारनें गुत्यावर उपदेशक नेमावे.

(६) गुत्ते उघडण्याची वेळ हल्लीं सकाळीं ६॥ आहे. ती सायंकाळीं ४ वाजण्याची करण्यांत यावी व बंद करण्याची वेळ हल्लीं सहा महिने ७-३० आहे ती ७ करण्यांत येऊन दुसऱ्या साहामाहींत ८ आहे ती ७-३० करण्यांत यावी. या वेळा देशी व विदेशी दारूच्या दुकानांनां सारख्याच लागू असाव्यात.

सन १९१९।२० सालीं सरकारास अफूचें उत्पन्न ३,०५६,२०० पौंड किंवा सुमारें ४॥ कोट रुपये झाले व दारू गांजा वगैरे मादक पदार्थांचें उत्पन्न १९२०—२१ सालीं १२,९४,८००० पौंड किंवा सुमारें १९ कोट रुपये झालें.

मादक द्रव्यांवरील कर:— अबकारीला इंग्रजी प्रतिशब्द "एक्साईज" हा योजतात; पण त्याचा अर्थ इकडल्याप्रमाणें केवळ मादक पदार्थांवरील कर असा नसून, सामान्यतः 'देशांत होणाऱ्या मालावर कर' हा आहे. तेव्हां 'एक्साईज' खात्याचा व्यवहार या लेखांत आढळणार नाहीं हें उघड आहे. मादक द्रव्यांच्या प्रसारास आळा बसावा व सरकारलाहि एक उत्पन्नाचें साधन व्हावें म्हणून त्यांवर कर बसविण्याची पद्धत आहे; व त्याच्या व्यवस्थेकरितां एक स्वतंत्र सरकारी खातें असतें. त्याला अबकारी खातें म्हणतात. याचा प्राचीन इतिहास पाहतां महाभारतकाळीं या सरकारी उत्पन्नाच्या बाबी असलेल्या दिसत नाहींत. पूर्व काळीं अफू उत्पन्न होत होती किंवा नाहीं याचीच शंका आहे. अफू बाहेर निर्यात होत असल्याचें कोठेंच वर्णन नाहीं. अबकारीवर सरकारी कर होता असें दिसत नाहीं. दारूवरील कराविषयीं कोठें उल्लेख नाहीं. दारूचीं दुकानें राजानें बंद करावीं असें शांतिपर्वांत लिहिलें आहे (शां. अ. ८८). "क्षत्रिय लोकांशिवाय इतर लोक पूर्वकाळीं दारू पीत नसत व क्षत्रिय लोकांसाठीं व राजेलोकांसाठीं बहुधा घरीं दारू उत्पन्न करीत असत. त्यामुळें दारूवर कर नसावा. अनार्य लोकांचीं कांहीं दारूचीं दुकानें असावीं, परंतु त्यांवर सरकारी सक्त नजर असे व होतां होईतों तीं दुकानें बंद केलीं जात." असें चिंतामणराव वैद्य लिहितात (महाभारत–उपसंहार पृ. ३०५). कौटिलीय अर्थशास्त्रावरून पाहतां त्याकाळीं मौर्यराज्यांत इतर खात्यांवर जसे अधिकारी नेमलेले असत त्याप्रमाणें मादक पेयांच्या व्यापारावर देखरेख व त्याचें नियंत्रण करणारा एक अधिकारी असे. दारूचीं दुकानें कोठें असावींत, ती कोणाला विकावी, ती कोणत्या प्रकारची असावी व तीवर कर काय असावा वगैरे गोष्टी हा अधिकारी ठरवीत असे. मुसुलमानी अमदानींत अबकारी उत्पन्न काय असे व त्याची व्यवस्था कशा प्रकारची असे यांसंबंधीं विशेष माहिती नाहीं. तथापि दारूचा खप कमी करावा या विषयीं झटणारा एकटा अवरंगजेब बादशहाच कायतो दिसतो. त्याला मुसुलमानांनीं दारू घेतलेली खपत नसे पण त्या काळची मुसुलमानांची चैनी स्यालीखुशालीकडे असलेली प्रवृत्ति पाहतां दारूवर फारशी नियंत्रणा असेलसें वाटत नाहीं.

मराठ्यांच्या अमदानींतील अबकारी.—मराठेशाहींत दारूपासून सरकारला मोठेंसें उत्पन्न होतें असें मुळींच नसून उलट प्रजेंतील दारूबाजी अजीबात बंद करावी अशी सरकारची खटपट असे. पेशवाईंत विशिष्ट हद्दींत दारू

गाळण्याचा मक्ता लिलांवानें देण्यांत येई व ज्यानें मक्ता घेतला असेल तो आपल्या हद्दींत दारूच्या भट्या लावून सरकारकडून कांहीं हरकत न घेतां दारू विकीत असे. कलालांनां लागणारे जिन्नस पुरविण्याचाहि मक्ता दिला जात असे. उदाहरणार्थ इ. स. १७४९-५० सालीं कसबें पुणें व पेटा कसबें येथील कलालास गूळ व माहो विकण्याचा मक्ता तीन वर्षांपुरता ६०१ रुपयांस महादशेट वीरकर यास देण्यांत आला. याच्या मागच्या वर्षी हा मक्ता ५०० रुपयांस दिला होता. यानंतर इ. स. १७५२-५३ मध्यें महादशेटाची तीन वर्षें भरल्यानंतर पुन्हां त्यालाच मक्ता देण्यांत आला पण दर मात्र वाढविला. सालाचे १५०१ रुपये व शिवाय तीन साल मिळून नजर रुपये ५०० असा त्याच्याशीं सरकारांतून करार झाला ( वाड संपादित बाळाजी बाजीराव पेशवे यांची रोजनिशी पु. १.). यावरून असें वाटतें कीं, वरील सालांत दारूचा खप वाढला व तीवरील निर्बंध कमी झाला. पण पिण्याखेरीज दुसऱ्या कारणाकरितांहि दारू लागत असेल. मराठी साम्राज्य त्याकाळीं अति विस्तृत होऊन सत्तेच्या शिखरास पोंचलें होतें, तेव्हां मोठें अवाढव्य सैन्य व सामुग्री असणारच. युद्ध सामुग्रीला दारू लागत असे व सैन्यांतील शिपायावर दारू न पिण्यासंबंधांत फारशी करडी नजर नसे, अर्थातच दारूचा खप वाढला यांत नवल नाहीं. या खेरीज जनावरांच्या औषधाकरितां दारू लागत असे.

सवाई माधवरावाच्या कारकीर्दींत ( १७७५-९५ ) दारूची विशेष बंदी करण्यांत आली व त्याप्रमाणें राज्यांत हुकूमहि सुटले ( सवाई माधवराव पेशवे यांची रोजनिशी पु. २ पा. ३०० ). तथापि बाळाजी बाजीरावाच्या अमदानीपासून फिरंग्यांनां दारू मिळावी अशी तजवीज केलेली असे. त्यांच्या रोजनिशींतील पुढील उतारा ध्यानांत घेतल्यास त्याचें कारण कळून येणार आहे.

"प्रांत फिर्गाण येथें दारूसरा होत होता, तो न करावा म्हणून सरकारांतून मना केला होता. त्यास फिर्गाण प्रांतीची रयत भंडारी व कोळी खलक वगैरे यांची उपजीविका दारूसऱ्यावर होती, ते बंद झाली, तेव्हां परांगदा होणार आणि सरकारचे जमाबंदीस फार नुकसान येणार म्हणून विदीत झालें. त्याजवरून हें ध्यानांत आणून पूर्ववत् प्रमाणें करार केला असे. तरी भंडारी यांणीं माड ताड वाहावे. सऱ्याच्या भट्या लावून सरा रयेत खलकास विकावा. चाकरमाने लोकांस विकत न द्यावा. व जाजती सरा द्यावयाचा अधिकार नाहीं. ब्राह्मण, प्रभु, शेणवी, त्यास सरा विकत न द्यावा. व फुकट न द्यावा. येणें प्रमाणें परिछिन्न कैद चालविणें. यांत अंतर जालीया पारिपत्य होईल म्हणून पत्रें"–( वसई, साष्टी, बेलापूर व जंजीरा रेवदंडा येथील प्रांताधिकाऱ्यास ).

याचप्रमाणें इ. स. १७८५-८६ मध्यें राघो विश्वनाथाच्या हाताखालीं सयद अहमदखान नांवाचा जो गार्दी होता त्याच्या 'चाकरीस फिरंगी गोरे व किरस्ताव' ठेविले होते. 'त्यास दारू फुलसरा नेहेमीं पाहिजे याकरितां फिरंग्यांनां आपले खपापुरतीं दारू करण्यास मोकळीक दिली,' असें रोजनिशींत सांपडतें. पण जेव्हां विजयदुर्गाच्या अधिकाऱ्यानें दारूबंदीमुळें वहिवाटीस वसूल कमी येतो अशी गाऱ्हाणीं करून बंदी उठविण्याविषयीं हुकूम विचारला तेव्हां त्याला बंदी कायम ठेवण्याविषयीं चोख उत्तर मिळालें. या गोष्टीवरून त्यावेळीं उत्पन्नाकडे लक्ष न देतां प्रजेची सुधारणा करण्याकरितां सरकार कसें झटत असे हें दिसून येईल.

पेशवाईच्या अंतकाळीं जरी अंदाधुंदी व अनीति माजली होती तरी दारूचा खप वाढला नव्हता. एलफिन्स्टननें जेव्हां पेशव्यांचा मुलख ताब्यांत घेतला तेव्हां त्याला पुण्यांत व इतर ठिकाणीं खालच्या दर्जाच्या लोकांतसुद्धां उच्च नैतिक आचरण आढळून येऊन फार आश्चर्य वाटलें. इंग्रजी राज्याच्या सुरुवातीस सुद्धां अबकारी खातें मोठें उत्पन्नाचें म्हणून गणलें जात होतें; पण सबंध पेशवाईत या खात्याचा वसूल १०,००० रुपयांवर गेला नाहीं हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. महाराष्ट्रांत तरी दारूबंदीचें धोरण ठेवावें असें एलफिन्स्टनसारख्या मुत्सद्यानें त्यावेळीं सुचविलें होतें हें विशेष होय.

मराठी साम्राज्याच्या केंद्रस्थानीं म्हणजे पुणें जिल्ह्यांत दारूच्या व्यापारावर उपजीविका करून राहणारी एखादी जुनी जात मुळींच आढळून येत नाहीं. १८८१ इतक्या पुढील सालांतहि या जिल्ह्यांत भंडारी व कलाल या दारू गाळणाऱ्या जातीचे लोक अनुक्रमें १३२ व ७२ होते. या जाती परप्रांतांतून इंग्रजांच्या अमदानींत इकडे आल्या अशी मुं. गॅझेटियरकार कबूली देतात. भंडारी व कलाल या खेरीज दारूवर उपजीविका करणारा तिसरा वर्ग म्हणजे पारश्यांचा. पेशवाईत अबकारीचा मक्ता बहुधा यांच्याकडेसच असे. पण महाराष्ट्राच्या दृष्टीनें विचार केल्यास पारशी हे पुण्याबाहेरचे म्हणतां येईल.

[ संदर्भ ग्रंथ—पेशव्यांच्या रोजनिशी, डेक्कन व्हर्नाक्युलर ट्रान्सलेशन सोसायटीनें प्रसिद्ध केलेल्या. केळकर—मराठे व इंग्रज. अभ्यंकर—अबकारी अंडर दि मराठाज ( मॉडर्नरिव्ह्यू पु. ३४ अं. २ ].

**ॲबट.**—यूरोपांत मठाध्यक्षास ॲबट असें म्हणण्याची चाल आहे. ही चाल पूर्वी सिरियांत होती, तेथून ती यूरोपभर पसरली. मठाध्यक्ष नेमण्याचा अधिकार राजास व धर्मगुरूंना (पोपनां)आहे. अधिकारदानाचा समारंभ मोठ्या थाटाचा होतो; त्यावेळीं अध्यक्षास अधिकारदंड मिळतो. मठनिवासी लोकांवर अध्यक्षाची सत्ता पूर्वी अनियंत्रित होती. ती आतां हळू हळू कमी झाली आहे. ही जागा फार मानमरातबाची आहे. मठाध्यक्षांनीं आपला पूर्वीचा साधेपणा पुढें सोडून दिला व ते ऐषआरामी बनले. पूर्वी शिक्षण प्रसार करण्यास यांची फार मदत झाली.

**अॅबट, लीमन**—हा अमेरिकन धर्मोपदेशक व लेखक रॉक्सबरो येथें जन्मला ( १८३५ ). उच्च शिक्षण पूर्ण झाल्यावर यानें कायद्याचा अभ्यास केला. तो. "हार्पर्स मॅगेझीन" "इलस्ट्रेटेड ख्रिश्चन वुइक्ली" वगैरे नियतकालिकांचा सहसंपादक व "दि ख्रिश्चन यूनियन," "दि आउट लुक" वगैरेंचा मुख्य संपादक होता.

याच्या लेखांवरून सामाजिक सुधारणा, धर्मशास्त्र, उदारमतवाद, ख्रिस्तानें मनुष्यत्व व एकात्मकेश्वरवाद वगैरे विषयांतील त्याचे विचार दिसून येतात. "ख्रिश्चॅनिटी अॅण्ड सोशल प्रॉब्लेम्स (१८९७), दिराइट्स् ऑफ मॅन (१९०५), हे त्यानें लिहिलेल्या ग्रंथांपैकीं कांहीं प्रमुख ग्रंथ होत.

**अबट्टाबाद,त ह शी ल.**—वायव्य सरहद्दीवरील हजारा जिल्ह्यांत ही एक तहशील आहे. ही उत्तर अक्षांश ३३°,४९' ते ३४°२२ ' व पूर्व रेखांश ७२°५५' ते ७३°३१' ह्यांमध्यें असून एकंदर क्षेत्रफळ ७१५ चौरस मैल आहे. याच्या उत्तरेस झेलम नदी आहे. या तहशिलींत डोर व हरोह या नद्यांच्या खोऱ्यांतील पुष्कळ मुलूख येत असून पूर्वेकडील डोंगराळ प्रदेशाचा यांत समावेश होतो. उत्तर व ईशान्येकडील टेंकड्यांवर इमारती लांकूड पुष्कळ होतें. लोकसंख्या सुमारें दोन लक्ष. यांत अबट्टाबाद शहर, तहशील व मुख्य ठिकाण व नौशहर आणि ३५९ गांवें आहेत. इ. स. १९०३–०४ मध्यें या तहशिलींचें उत्पन्न रुपये. ९७००० होतें [ इं. गॅ. ५ ].

**अबट्टाबाद, श ह र.**—हझारा जिल्हा व अबट्टाबाद या तहशिलींचें मुख्य ठाणें. उत्तर अक्षांश ३४°९' व पूर्व रेखांश ७३°१३ ' मध्यें असून लोकसंख्या सुमारें आठ हजार. हें इ. स. १८५३ त मुख्य ठाणें झालें इ. स. १८४०–५३ मध्यें हझारा येथें असलेले डेप्युटी कमिशनर मेजर जोन्स अॅबट यांच्या नांवावरून त्यास वरील नांव देण्यांत आलें. हें शहर समुद्रसपाटीपासून ४१२० फूट उंचीवर आहे. येथें गुरखे लोकांच्या चार पलटणी व ४ देशी बातेऱ्या एवढें सैन्य असतें. इ. स. १८६७ मध्यें येथें म्युनिसिपालिटी स्थापन करण्यांत आली. इ. स. १९०२–०३ सालीं येथील उत्पन्न सुमारें. १४९००होतें तें इ. स. १९०३–०४मध्यें अबकारीच्या उत्पन्नाची भर पडल्यामुळें ४००० रुपयांनीं वाढलें. येथें सरकारी दवाखाना आहे. नॉर्थ वेस्टर्न रेल्वेवरील हॅवेलियन स्टेशनवर उतरून टांग्यानें या शहरास येतां येतें. येथें दोन हायस्कुलें आहेत ( अलबर्ट व्हिक्टोरिया हायस्कूल व अबट्टाबाद गव्हर्मेंट हायस्कूल ). येथें कोणताहि माल तयार होत नाहीं. गांवांत सागवानी लांकडाचे कांहीं मोठे व्यापारी आहेत. ( अर्नोल्ड–इंडियन गाइड १९२० इं. गॅ. ).

**अबदल.**(पंजाब)—हे लोक कांग्रा व होशियारपूर जिल्हे व विलासपूर, चंबा, मंडी व सुकेत या संस्थानांत आढळतात. हे भिक्षा मागत, गाणीं गात, एका गांवांहून दुसऱ्या गांवाला भटकतात. विशेषतः ते रजपूत लोकांच्या लग्नसमारंभाच्या व अंत्यविधीच्या वेळीं गाण्याचें काम करतात. याच नांवाचे दुसरे मुसुलमान फकीर आहेत. परंतु त्यांचा व अबदल लोकांचा कांहीं एक संबंध नाहीं. या मुसुलमानांची एकंदर हिंदुस्थानांतील लोकसंख्या ५४७९ ( सन १९११ ) आहे; पैकीं बंगालमध्येंच ४९६० लोक आहेत.

**अबदल लतिफ.**—हा एक प्रख्यात वैद्य, प्रवासी, व लेखक सुमारें बाराव्या शतकांत बगदाद येथें होऊन गेला. याचा जन्म बगदाद येथें इ. स. ११६१ मध्यें झाला. वैद्यकीचें ज्ञान संपादण्यासाठीं वयाच्या २८ व्या वर्षी तो बगदाद सोडून दूरदेशीं निघाला. मोसल, आणि दमास्कस येथें कांहीं दिवस काढल्यावर तो इजिप्तला गेला; तेथें मोठमोठे लोक त्याच्याशीं स्नेहसंबंध करण्यास एकमेकांशीं स्पर्धा करूं लागले. नंतर तो अलेप्पोला गेला. ग्रीसमध्यें त्यानें बरींच वर्षे काढिलीं. त्यानें एकंदर १५० ग्रंथ लिहिले असें म्हणतात. त्यांपैकीं "हिस्टॉरी ईजिप्ती कॉम्पेन्डियम" हाच शिल्लक आहे. हा आपल्या वयाच्या ६५ व्या वर्षी बगदाद येथें वारला.

**अबदागिरी**—पौरस्त्य देशांमध्यें अतिप्राचीन कालापासून वैभवाचें व सत्तेचें चिन्ह म्हणून अबदागिरी वापरीत असत. प्राचीन निनेव्हे व इजिप्त यांच्या शिलावशेषांमध्यें मिरवणुकींत राजे व दरबारी यांच्या डोक्यावर अशा अबदागिरी धरलेल्या दिसतात. सयाम, ब्रह्मदेशांतहि ही अबदागिरीची चाल अद्याप दृष्टीस पडते.

हिंदुस्थान देशामध्येंहि आबदागिरी फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहेत. देवाच्या मूर्तींच्या डोक्यावर किंवा पालखींवर धरण्यास, किंवा राजेरजवाडे, जहागिरदार व संस्थानिक यांच्या डोक्यावर, अथवा लग्नकार्यांत नवरा, नवरी, विहीणी वगैरे मंडळींवर मिरवणुकीच्या वेळेस अबदागिरी धरण्याचा प्रघात आहे.

अबदागिरी तयार करण्यास अगदीं सरळ अशी दांडी घ्यावी लागते. ती धायपताच्या दांड्याची, बांबूची किंवा सागवानी लांकडाची तयार करितात. दांडी चांगली तासून व गुळगुळीत करून नंतर तीस निरनिराळ्या तऱ्हेचे लाखेचे रंग देतात व तीवर वेलबुट्टी काढतात. दांडी तयार झाल्यावर तिच्या शेंड्यास एक वेताचें किंवा लोखंडाचें २ते २॥ हात व्यासाचें वर्तुलाकृति कडें बसवितात. अर्थात हीं दांडी या कड्याचा व्यास होते. नंतर त्या वर्तुलाकार कड्याच्या दोहीं बाजूंकडून एक किंवा दोन रंगाचें सुती अगर रेशमी कापड लावून शिवून घेतात. त्यावर जरीची वेलबुट्टी वगैरेहि काढलेली आढळते. मग त्या कड्याभोंवतीं निऱ्या घातल्याप्रमाणें दोन रंगी पागोट्याची झालर शिवून घेतात. आणि त्या दांडीच्या शेंड्यास चांदीचा कळस बसवितात. म्हणजे अबदागिरी पुरी होते.

पेशवाईंत छत्र्या नव्हत्या. उष्णनिवारणासाठीं अबदागिरी होत्या. पण तो सरकारी बहुमान असल्यानें ज्यास पराक्रम वगैरे योग्यतेबद्दल सरकारांतून अबदागिरी मिळेल त्यानेंच ती वापरावी, इतर कोणीं श्रीमंतीच्या जोरावर अबदागिरी वापरीन म्हणेल तर त्यास तत्काल शेणमार व्हावयाचा! सरकारांतून ज्यास अबदागिरी मिळे, त्यास अबदागिरी धरणाऱ्या गड्याचा पगार व दर तीन वर्षांनीं अबदागिरीचें नवें सामान हा खर्च सरकारांतून मिळे. बाकी सर्व आबालवृद्ध लोक उन्हांतूनच फिरत. लग्नकार्य वगैरे समारंभांतून ज्यांची अबदागिरी असेल, त्याजकडून ती कामापुरती मागून आणून निर्वाह चालवीत. राष्ट्रांतील लोकांत तेज जागृत रहावें, गांवलौकिकाचीं कृत्यें करण्यास लोकांत नेहमीं हुरूप असावा, यासाठीं निशाण, चौघडा, अर्धे आसन, मांडीस मांडी लावून बसण्याचा मान, पालखी, हत्ती, अबदागिरी, मशाल वगैरे बहुमान देण्याची त्या वेळच्या सरकारची युक्ति होती ! [ हरिवंशाची बखर ].

**अबदुल अझीझ**—( १ ) यानें " तारिख-इ-हुसैनी " नांवाचा ग्रंथ लिहून, तो दुसऱ्या अहमदशाह बहामनीला अर्पण केला. या ग्रंथांत, गुलबुर्गा येथें पुरलेल्या शहाबुद्दीन मुहम्मद हुसैनी गेसू दराझ नांवाच्या प्रख्यात पुरुषाचें चरित्र आलेलें आहे.

( २ ) दिल्लीचा मुसुलमान पंडित. " तफसीर फथुल अझीझ " नांवाची कुराणावरील फारसी टीका व दुसरे अनेक ग्रंथ यानें लिहिले आहेत. हा इ. स. १८२४ त वारला.

( ३ ) अकबरच्या वेळचा एक विद्वान मनुष्य. बदाऊननें याची प्रशंसा केली आहे.

( ४ ) अवरंगजेबाच्या अमदानींत हा ७०० घोडेस्वारांचा मनसबदार होता. या कवीचें टोपण नांव " इझ्झत " असें होतें. " साकीनाम " नांवाचें याचें एक काव्य आहे मृत्यु इ. स. १६८०.

( ५ ) ( १८३०-७६ ) हा दुसऱ्या सुलतान महंमदाचा मुलगा. १८६१ त तुर्कस्तानचा सुलतान झाला. यानें देशांतील पैसा निरुपयोगी इमारती बांधण्यांत व इतर गोष्टींत खर्च केला व राष्ट्र कर्जबाजारी करून सोडलें. इजिप्तच्या खेदीवाला वंशपरंपरेची गादी व इतर हक्क देऊन त्याच्याकडून बराच पैसा उकळला. १८६७ मध्यें हा यूरोपांत गेला. त्यावेळीं यूरोपांत पाऊल टाकणारा पहिला सुलतान म्हणून त्याचा तेथें बराच आदरसत्कार झाला. त्याच्याहि राज्यांत यूरोपचे बरेच राजे रजवाडे येऊन गेले. याच्या कारकीर्दींत बादशहा सातवे एडवर्ड दोनदां कान्स्टँटिनोपल येथे आले होते. याच्या वाईट कारभारामुळें व आर्थिक परिस्थितीमुळें मुसुलमानांत असंतोष वाढून बंडाळी सुरू झाली व अझीझला गादीस मुकावें लागलें ( १८७६ ). थोड्याच दिवसांनीं पुढें हा बंदींत ठेवलेल्या राजवाड्यांत मरून पडलेला आढळला.

( ६ ) ( १८८०-१९०८ ).—हा चवथा लहानपणींच मारोक्कोचा सुलतान झाला ( १८९४ ). याच्या मनांत आपल्या देशाची व्यवस्था यूरोपियन धर्तीवर ठेवण्याचें फार होतें; पण योग्य सल्ला न मिळाल्यानें त्याचा पैसा मात्र व्यर्थ खर्च झाला. त्याच्या प्रजेला त्याचें यूरोपियन लोकांचें अनुकरण आवडेनासें झालें. त्यांनीं त्याला पदच्युत करून त्याच्या भावास गादीवर बसविलें ( १९०७ ). यानें पुन्हां गादी मिळविण्याविषयीं कांहीं खटपट केली पण व्यर्थ. तेव्हां यानें मरेपर्यंत टँजियर येथें नव्या सुलतानचा पेनशनर म्हणून त्यांतच समाधान मानून दिवस कंठले. हा फार हुषार व सुधारणावादी होता पण त्याच्या धर्मवेड्या प्रजेला याचा सद्धेतु न कळून त्याला गादीला मुकावें लागलें.

**अबदुल करीम**, ( १ ).—१४४१ च्या सुमारास सिंधचा रहिवासी अब्दुल करीम, हा उदयास आला. तो महमूद गवानच्या पदरीं दाक्षिणेंत नोकर असून त्यानें "तारीख-ई-महमूद शाही" या नांवाचा दुसऱ्या महमूदशाह बहामनीचा इतिहास लिहिला आहे.

( २ ).—हा दिल्लीचा राहणारा असून नादिरशहाबरोबर इराणला गेला. तेथें यानें "बयान-इ-वाकी" नांवाचा नादिरशहाचा इतिहास लिहिला ( १७५४ ).

( ३ )—बुखाराचा रहिवासी. यानें अफगाणिस्तान व तुर्कस्तान देशांचा इतिहास लिहिला ( १७४७ ). या इतिहासाचें भाषांतर सी. श्रेफरनें पॅरिस येथें १८७६ मध्यें केलेलें आढळतें. हा ग्रंथकार १८३० मध्यें कॉन्स्टँटिनोपल येथें वारला.

( ४ ).—मुनशी "तारीख-इ-अहमद" (अहमदशहा दुराणीचा इतिहास )"मुहारब-इ-काबुल-ओ कंदाहार" (दोस्त महमदचा मुलगा अकबरखान याचीं शूर कृत्यें यांत वर्णिलीं आहेत ) व " तारीख इ-पंजाब तुहफतन लिल अहबाब" ( शीखयुद्धांवर ग्रंथ. ) हे याचे प्रसिद्ध ग्रंथ होत. हा गेल्या शतकाच्या मध्यांत वारला. [ बीलचा कोश ]

**अबदुल कादिर** ( १ ) ( १८०७-१८८३ ).—हा अमीर १८३२ मध्यें तक्तावर बसला. फ्रेंच लोकांची सत्ता अलजीरियांतून नाहींशी करण्याकरितां त्यानें फ्रेंच लोकांबरोबर १५ वर्षें युद्ध केलें. पण त्यांत त्याला अखेर फ्रेंचांनां शरण जावें लागलें ( १८४७ ). फ्रेंचांशीं लढतांनां त्याच्या अंगचें उपजत शौर्य, बुद्धिमत्ता, राष्ट्रधुरीणता, वगैरे गुण दिसून आले. हा कट्टा इस्लामधर्मानुयायी असल्यामुळें फ्रेंचांविरुद्ध अरबांशीं सहकार्य करण्याला तयार होईना व त्यामुळेंच याला अपयश आलें. पुढें फ्रेंचांशीं तो सलोख्यानें राहिला व त्याच्याविरुद्ध एकदोनदां मुसुलमानांनीं केलेल्या बंडांत हा मुळींच सामील झाला नाहीं. उलट क्रिश्चन लोकांचे त्यानें जीव वांचविले यामुळें फ्रेंचदरबारीं याला मोठा मान

असे. १८७९मध्यें अल्जेरियन लोकांनीं फ्रेंचांविरुद्ध स्वातंत्र्याकरितां बंड केलें असतां अबदुल कादिरनें त्यांनां तसें न करण्याचा उपदेश केला. फ्रेंचांनां शरण गेल्यापासून मरेपर्यंत त्यानें आपला काळ ईश्वरज्ञान व तत्त्वज्ञान यांत घालविला. याच्या एका तत्त्वज्ञान विषयक ग्रंथाचें फ्रेंच भाषांतर १८५८ त प्रसिद्ध झालेलें आहे. आरबी घोड्यावरहि यानें एक पुस्तक लिहिलें आहे. दमास्कस शहरीं २६ मे १८८३ रोजीं याचा अंत झाला.

(२).—हा लखनौ प्रांतांतील देवी गांवचा राहणारा. १८२३ च्या मे महिन्यांत मेजर हर्बर्टच्या विनंतीवरून "जामी–उत् तवारिख" या रशीदउद्दीनच्या ग्रंथांतून सोप्या पर्शियन भाषेंत पतंजली ग्रंथ असें ज्याला म्हणतात त्या भागाचें भाषांतर यानें केलें. यांत सर्व शास्त्रें आलीं असून, हिंदुस्थानांतील मोठ्या अमूल्य ग्रंथांपैकीं हा एक आहे. निरनिराळ्या पंथांची माहिती, प्राचीन राजांचा इतिहास आणि शाक्यमुनीचें चरित्र यांत आहे.

**अबदुल कादिर जीलानी किंवा जीली, (शेख).**—याची आणखी नांवें पीर–इ–दस्तगीर व घउस–उल–अझम मुहिय–उद–दीन हीं आहेत. हा साधु होता व यानें आपल्या आयुष्यांत अनेक चमत्कार केले असें सांगतात. हा इराणांत गीलान किंवा जिलान येथें इ.स. १०७८ त जन्मला. याची थोर विद्वत्ता, धर्मनिष्ठा व सद्वर्तन यामुळें याला मोठा मान असे. २२ फेब्रुवारी ११६६ या दिवशीं तो बगदाद येथें मरण पावला. बगदादला तो अबूहनीफाच्या कबरीवर देखरेख करीत असे. ज्या दरवेशांच्या पंथाला याच्यावरून कादिरी असें नांव पडलें ते अबदुल कादिरला आपला संस्थापक मानितात. मुसुलमानांत याच्या कबरीला मोठा मान देतात. गूढ ईश्वरज्ञानावर त्यानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं "फुतूह–उल–घैब" "मलफूझाट–इ–कादिरी हे आरबी ग्रंथ होत. "घुन्यत–उत् तालिबीन" हा व्यवहार शास्त्रावरील ग्रंथ, "बहजत्–उल–अस्तार" हा सुफीपंथाचा ग्रंथ आणि "दिवान–इ–घौस –उल–आझम हा स्तोत्रग्रंथ हे याचेच होत.

कोणी म्हणतात हा बगदादजवळच्या जील गांवीं जन्मला म्हणून याला जीली असें नामाभिधान असावें.

अबदुल कादिरच्या पंथाला कादिरीय असें नांव असून त्याच्या शाखा डच, ईस्ट इंडीज आणि चिनी युन्नानपर्यंत पोंचल्या आहेत. हिंदुस्थानांत अनेक प्रकारचे कादिरीय आहेत; पैकीं कादिरीय अकबरीय हा एक विशिष्ट पंथ आहे. अरबस्तानांत कादिरीय पंथ सत्ताधीश आहे. कान्स्टँटिनोपल मध्यें याचे चाळीस तक्ये आहेत. इजिप्तमध्यें नाईल खोऱ्याच्या बाजूनें याचा बराच प्रसार झाला आहे. त्रिपोली, अल्जेरिया आणि मोरोक्को प्रांतांत या पंथाचे बरेच अनुयायी आहेत. नुसत्या अल्जेरियामध्यें या पंथाच्या अनुयायांची संख्या २४००० वर आहे. पुष्कळसे पंथ कादिरी पंथापासून फुटून निघाले आहेत, उदा० अकबरीय, रिफाईय इ. [बीलचा कोश. एनसायक्लो रिलिजन.]

**अबदुल गफूर**—अब्दुर्रहमान जामीचा शिष्य; लाहोरचा राहणारा हा फारशी ग्रंथकार १५०६ मध्यें मरण पावला.

(२).—शहा अबदुल गफूरला 'बाबा कपूर' असें नेहमीं म्हणत. हा काल्पीचा राहणारा असून शहा मदारचा एक शिष्य होता. १५७१ त याचा अंत झाला. या साधूची कबर ग्वाल्हेरला आहे. [बीलचा कोश]

**अबदुल–जलिल** (१) (मीर किंवा सय्यद).—हा अयोध्येंतील बिलग्रामचा राहणारा. हा मोठा पंडित व प्रतिभाशाली कवि होता, त्याची कविता 'वासिटी' या टोपणनांवाखालीं आहे. इ. स. १६९९त औरंगजेबाचा तळ विजापुरास असतांना मिर्झा अलि बेग नांवाच्या बादशाहीबातमीदारानें त्याला बादशहाकडे नेलें; तेव्हां बादशहानें त्याला मनसब व जहागीर देऊन,बक्षी (पगार देणारा) व गुजराथचा वृत्तलेखक या संयुक्त हुद्यावर नेमिलें. तेथून त्याची सिंधला बदली केली. दरबारच्या कांहीं कारस्थानामुळें फरुखशियरच्या कारकीर्दींत इ. स. १७१४ त त्याला सिंधहून परत बोलविण्यांत आलें; पण सर्व उलगडा झाल्यानंतर त्याचा मोठा बडेजाव करून, प्रतिनिधिद्वारें काम पाहण्याची त्याला सवलत दिली. १७२१ पर्यंत तो दिल्लीस राहिल्यावर त्यानें आपला मुलगा मीर सय्यद महमद याच्या नांवानें अधिकार करून दिला.

(२) बिलग्रामच्या सय्यद अहमदचा मुलगा. याचा जन्म २ जून १६६१; व मृत्यु २८ डिसेंबर १७२४ या दिवशीं झाला. बिलग्राम येथें याची कबर याच्या बापाच्या कबरीशेजारी आहे. यानें अनेक ग्रंथ लिहिले असून, त्यांत पर्शियन भाषेंत लिहिलेलीं पत्रें आहेत. याच्या ग्रंथाचें नांव "आदब–उल–मुर्सिलीन" असें आहे. [बीलचा कोश]

**अबदुल मजिद** (१) (१८२३–१८६१)—तुर्कस्तानचा सुलतान. इजिप्तमधील मुख्य अधिकारी जो महमद अली त्यानें अबदुल मजिदच्या बापाच्या मरणाच्या वेळीं तुर्कांचा नेझीब येथें पूर्ण पराभव करून तुर्की आरमारहि आपल्याकडे सामील करून घेतलें. त्यावेळीं यूरोपियन राष्ट्रें मध्यें पडलीं म्हणूनच अबदुल मजिद हा सुलतान झाला. त्यानें १८३९ मध्यें हट–इ–शेरिफ नांवाचें आज्ञापत्र प्रसिद्ध केलें. त्याअन्वयें सुलतानच्या सर्व प्रजेस जीव व जिंदगीच्या सुरक्षितपणाचे सर्वांस सारखे अधिकार प्राप्त झाले. सर्वांवर सारखे कर ठेविले व न्याय मिळण्याची व्यवस्था चांगली केली. त्यानें लष्करी व शिक्षण खात्याची पुनर्घटना केली, गुलामांचा व्यापार बंद केला व व्यापाराची सुधारणा केली. हा १८६१ मध्यें मरण पावला. यानेंच परकीय राष्ट्रांकडून कर्ज घेण्याची पद्धत प्रथम सुरू केली. क्रिमियाचें युद्ध याच्या अमदानींत झालें.

(२).—हा फारसी पंडित शहाजहानच्या काळीं उदयास आला. यानें "शहाजहाननामा" नांवाचा शहाजहानाचा इतिहास लिहिला आहे. [ बीलचा कोश ]

**अबदुल मलिक.**—हा प्रख्यात अरबी वैद्य झुर याचा मुलगा होता. याला यूरोपियन लोक अव्हेंझूर ( इब्न झूरचा अपभ्रंश ) असें म्हणत असत. अबदुल मलिक याचें पूर्ण नांव 'अबू मारवान अबदुल मलिक इब्न झुर' असें होतें. हा अकराव्या शतकाच्या अखेरीस आणि बाराव्या शतकाच्या प्रारंभीं उदयास आला. हा कुलीन घराण्यांत जन्मला होता. याचा जन्म अंडलूशियाची राजधानी सेव्हिल येथें झाला; व तेथें त्यानें उत्कृष्ट रीतीनें आपला धंदा चालविला. त्याचे वडील व आजा हे दोघेहि उत्तम वैद्य होते. त्यानें वैद्यकीचा धंदा विसाव्या वर्षी करण्यास सुरवात केली असें म्हणतात. त्याची प्रकृति शेवटपर्यंत उत्कृष्ट राहिल्यानें सर्वांपेक्षां त्यानें अधिक वर्षें वैद्यकीचा धंदा केला. तो १३५ वर्षांचा होऊन मेला असें म्हणतात. त्याचा मुलगा इब्न सूर यानेंहि वैद्यकीचा धंदा केला. हा मोरोक्कोचा बादशहा अल् मनसुर याच्या फार मर्जींतला होता. यानेंहि वैद्यकशास्त्रावर पुष्कळ ग्रंथ लिहिले. अव्हेंझूरनें 'तय्सूर फिल मुदावात वत तद्बीर' या नांवाचा एक प्रसिद्ध ग्रंथ लिहिला. याचें १२८० मध्यें हिब्रूंत भाषांतर झालें आणि पॅरिव्हशियसनें त्याचें लॅटिनमध्यें भाषांतर केलें. या लॅटिन भाषांतराच्या पुष्कळ आवृत्त्या निघाल्या. या ग्रंथाला अबदुल मलिकनें जामि अथवा संग्रह या नांवाखालीं एक पुरवणी जोडली. याशिवाय त्यानें 'फिल अद्रियत वल अघजियत' नांवाचा औषधिशास्त्र व अन्न या संबंधीं ग्रंथ लिहिला. या ग्रंथांत औषधांचे व अन्नाचे गुणधर्म त्यानें सांगितलेले आहेत. इब्नझूर हा इब्नरशीद ( अव्हरोज ) याचा समकालीन होता. अव्हरोजनें इब्नझूरची एके ठिकाणीं फारच स्तुति केली आहे. त्यानें त्याला गेलेनपासून आपल्यां काळापर्यंतचा प्रख्यात वैद्य व ज्ञानसागर असें म्हटलेलें आहे. [ बीलचा कोश ]

**अबदुल रहमान**( १ )पहिला ( ७५६–७८८ ).—स्पेन देशांत कारडोव्हा येथें अबदुल रहमान या नांवाचे उमईद घराण्यांतले पांच राजे होऊन गेले; त्यांपैकीं दोघे तर फारच कर्तृत्ववान् होते.

या घराण्याचा मूळपुरुष अबदुल रहमान हा होता. यानेंच कारडोव्हा येथें राज्याची स्थापना केली आणि स्वतः खलीफ ही पदवी धारण केली. उमईदांचा जेव्हां अंबासि घराण्यांतील पुरुषांनीं पूर्ण पराभव केला, तेव्हां यास आपला जीव बचावण्याकरितां बेदुइन अरबांचा आश्रय घ्यावा लागला. वाटेंत याचा भाऊ मारला गेला. तो प्रथम आपल्या अनुयायांबरोबर सिरियांत व नंतर इजिप्त देशांत गेला व तेथेंहि जेव्हां त्यास आपल्या जिवास धोका आहे असें समजलें. तेव्हां तो रस्ते शेवटीं स्पेन देशांत गेला. त्या वेळीं एल व्हीरा म्हणजे सध्याचा ग्रेनेडा येथें यूसफ नांवाचा एक कमकुवत व नालायक राजा होता, त्यामुळें त्याच्या राज्यांत दुफळ्या माजल्या होत्या. यूसफनें याच्या उमईद सरदाराचा फार अपमान केला, तेव्हां तडजोड बाजूला राहून दोन्ही पक्ष लढाईस तयार झाले. त्यांत यूसफचा पराभव झाला, व अबदुल रहमानास त्याचें राज्य मिळालें. या लढाईचे वेळीं अबदुल रहमानाच्या सैन्याची इतकी निकृष्टावस्था होती कीं, निशाण तयार करण्याकरतां त्यानें डोकीचें पागोटें फाडलें व तें भाल्यास बांधलें. यामुळें भाला व पागोटें स्पेनमध्यें मुसुलमानांचें ध्वजाचिन्ह होऊन बसलें. याचें सर्व आयुष्य बंडखोर बर्बर व अरबी सरदारांस आपल्या अमलाखालीं आणण्यांत गेलें. म्हातारपणीं यास फार दुःख झालें व हा फार क्रूर होता. यानें स्थापिलेली राजसत्ता सुमारें तीन शतकें टिकली.

( २ ).—हा लोकप्रिय कवि पेशावरचा राहणारा होता. त्याची कविता फार जोरदार व ओजस्वी आहे. त्यामुळें वीरवृत्तीच्या लोकांनां ती फार आवडते. पण ओजाबरोबरच सहजताहि भरलेली असल्यामुळें काव्यलोलुपांनांहि ही फार आवडते. पेशावर पासून जवळच हजारखान नांवाच्या त्याच्या जन्मस्थानाच्या रस्त्यावर त्याचें थडगें बांधलेलें आहे.

**अबदुल रहमानखान**(१) (१८४४–१९०१).—अफगाणिस्तानचा अमीर. दोस्त महंमदखानानें बरकझइ घराण्याची सत्ता अफगाणिस्तानांत स्थापिली. त्या घराण्यांतील अबदुल रहमानखान हा तिसरा पुरुष होय. दोस्त महंमदानें अजिमखान व अफझुलखान या दोघां मुलांस वगळून आपला तिसरा मुलगा शेरअली यास अमीर केलें. तेव्हां शेरअली व अबदुल रहमानचा बाप अफझुलखान यांमध्यें तंटे उत्पन्न झाले. हें युद्ध सुमारें पांच वर्षें चालू होतें. यांत अबदुल रहमानच्या अंगचा धाडसीपणा व कर्तृत्व हे गुण दृष्टोत्पत्तीस आले. लवकरच दोघां भावांमध्यें तडजोड झाली, पण अबदुलरहमानच्या वर्तनाचा शेरअलीस संशय आला, म्हणून त्यानें त्याच्या बापास कैदेंत टाकलें. बापास सोडविण्याकरितां अबदुलरहमान व त्याचा चुलता अजिमखान यांनीं बंड उभारून, काबूल शहर घेतलें. तेथें शेरअलीची व त्यांची मोठी लढाई होऊन, शेरअलीच्या पक्षाचा पूर्ण पराभव झाला. नंतर अबदुलरहमाननें आपल्या बापास कैदेंतून सोडवून अफगाणिस्तानच्या गादीवर अमीर म्हणून बसविलें. पण १८६९ या सालीं शेरअलीनें पुन्हा परत येऊन त्या बापलेकांचा तीनहाखान येथें पराभव केला, व यामुळें त्यांना इराणच्या शहाच्या आश्रयास जावें लागलें. तेथून पुढें तो समरकंद येथें रशियन सरकारच्या आश्रयास गेला. अजिम इराणमध्यें १८६९ सालीं आक्टोबर महिन्यांत मरण पावला.

अबदुलरहमानानें अज्ञातवासांत ११ वर्षे काढलीं पण पुढें १८७९ मध्यें शेरअली मरण पावला. तेव्हां ताशकंद येथील रशियन सेनापतीनें अबदुलरहमानास बोलावणें पाठवून पुन्हां एकदां अफगाणिस्तानची गादी मिळविण्याचा प्रयत्न करण्याविषयीं आग्रह चालविला. कारण शेरअली मरण्यापूर्वीच इंग्रजांचें सैन्य अफगाणिस्तानांत शिरलें असून तें आल्याचें ऐकून शेरअली काबुल सोडून पळाला होता. १८८० च्या मार्च महिन्यांत अबदुल रहमान अफगाणिस्तानांत परत आला असल्याची बातमी हिंदुस्तानांत कळली. तेव्हां हिंदुस्थानचे व्हाइसराय लॉर्ड लिटन यांनीं त्याच्याशीं बोलणें लावून असें ठरविलें कीं, हिंदुस्थानसरकारानें त्यास गादी मिळवून देण्याकरितां पैशाची व लढाईच्या सामुग्रीची मदत करावी. अबदुल रहमान यास कंदाहार व त्यासभोंवतीचा कांहीं मुलूख खेरीज करून अफगाणिस्तानचा अमीर कबूल करावें, व शेरअलीशीं लढण्याकरितां काबुल येथें पाठविलेलें सैन्य परत बोलवावें. उलटपक्षीं अमीरानेंहि परराष्ट्रीय राजकारणांत इंग्रजांच्या सल्ल्यानें चालावें. या सर्व अटी अबदुल रहमान यानें मान्य केल्या. तेव्हां इंग्रजी सैन्य अफगाणिस्तान सोडून गेलें व पुढें १८८१ मध्यें त्यांनीं कंदाहारहि अमीराच्या स्वाधीन केलें. पण इंग्रजी सैन्य परत गेलें नाहीं तोंच शेरअलीच्या अयुबखान नामक मुलानें हिरातहून कंदाहारवर चाल करून अबदुल रहमानच्या लोकांचा पराभव केला. या पराभवानें न डगमगतां, अबदुल रहमाननें काबुलाहून शेरअलीच्या मुलावर स्वारी केली व त्याचा पूर्ण मोड करून स्वतः अमीर झाला ( सन १८८१ ). अबदुल रहमाननें पुढील पांच सहा वर्षें स्थानिक बंडें मोडून आपली सत्ता दृढ करण्यांत घालविलीं. १८९५ सालीं महाराणी व्हिक्टोरिया हिनें त्यास आपल्या भेटीस विलायतेस बोलाविलें. पण त्यास प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें जातां आलें नाहीं. त्यास "स्टार ऑफ इंडिया" ही सर्वांत बहुमानाची पदवी देण्यांत आली होती. हा १९०१ सालीं मरण पावला. याचीं पहिलीं २० वर्षें लढण्यांत गेलीं. त्यांत याच्या अंगचा धाडसीपणा संकटांवर तोड काढण्याचें चातुर्य व त्यांस तोंड देण्याची हिंमत, प्रतिस्पर्ध्यांची कारस्थानें निष्फळ करण्यास लागणारी चिकाटी वगैरे गुण दिसून आले बंडें मोडतांना क्वचित् प्रसंगीं त्यास अतिशय कडक उपाय अंमलांत आणावे लागले. रशियाची सरहद्द ठरवितांना, त्याच्याशीं वितुष्ट न येऊं देण्यांत तर अबदुल रहमानच्या चातुर्याची कमालच झाली. अबदुल रहमाननें ब्रिटिश सरकारचा किंवा रशियाचा हात अफगाणिस्तानच्या राज्यकारभारांत केव्हांच शिरूं दिला नाहीं यानेंच प्रथम अफगाणिस्तानांतील बंडाळी मोडून जिकडे तिकडे शांतता केली.

याची ऊंची मध्यम होती. तोंडावरून याच्या हुशारीची कल्पना करतां येत होती. याची वागणूक फार सभ्यपणाची असून याच्या दूरदर्शीपणाबद्दल व आकलनशक्तीबद्दल, सर लेपेल ग्रिफिन व सर हेनरी डयूरांड यांनीं फारच तारिफ केली आहे.

(२) झज्जरचा नबाब १८५७ च्या बंडांत दोषी ठरून त्यास दिल्ली येथें २३ डिसेंबर रोजीं फांशी दिलें. हा नजाबत अलीखान याचा वंशज असून सर जार्ज बार्लो यानें १८०६ मध्यें त्याला झज्जर, बदली, करौंद इत्यादि १२॥ लाखांची जहागीर दिली. याशिवाय ४०० घोडेस्वार ठेवण्याकरितां म्हणून बडवान आणि दद्रि हे गांव देण्यांत आले. १८५७ च्या मे पर्यंत तो ब्रिटिशांचा कट्टा दोस्त समजला जात असे. पण बंड उपस्थित होतांच त्यानें मागील दोस्ती तोडून बंडवाल्याची बाजू घेतली.

**अबदुल रहिमखान.**—जहांगीरच्या विरुद्ध बंड करण्यामध्यें खुशरूस ज्या अनेक सरदारांनीं सहाय्य केलें त्यांमध्यें अबदुल रहिमान हा एक होता. त्याला खुशरूबरोबरच पकडण्यांत येऊन लाहोरमध्यें बादशहासमोर उभें करण्यांत आलें. पुढें त्याला शिक्षा म्हणून गाढवाच्या ओल्या कातड्यानें घट्ट शिवण्यांत येऊन तें कातडें नेहमीं ओलें ठेवण्याची व्यवस्था केली. अशा वाईट स्थितीमध्यें २४ तास ठेवल्यावर मग त्याला सोडून देण्यांत आलें.

**अबदुल रहीमखान.**—हा अकबर बादशहाच्या पहिल्या मुख्य प्रधानाचा मुलगा. हा 'खान मिर्झा' ह्या टोपण नांवानें प्रसिद्ध होता. याचा जन्म १० डिसेंबर १५५६ रोजीं झाला. बापाच्या खुनाच्या वेळीं हा फक्त चार वर्षांचा होता. वयांत आल्यानंतर यास बादशहाच्या फौजेंत नौकरी मिळाली. १५८४ मध्यें गुजराथेंत स्वारीस गेलेल्या सैन्याच्या एका भागाचा हा मुख्य होता. तेथून आल्यावर हा बादशहाचा मुख्य सेनापति झाला व १५८९ मध्यें तोडरमलच्या मृत्यूनंतर हा मुख्य प्रधान झाला. याच्या मुलीचें लग्न राजपुत्र दानिअलशीं झालें होतें. यानें बाबरनें तुर्की भाषेंत लिहिलेल्या आठवणींचें पर्शियन भाषेंत भाषांतर केलें. अकबरच्या मृत्यूनंतर यानें जहांगिराची २१ वर्षे नौकरी केली. मोहबत खानाच्या बंडानंतर हा लवकरच म्हणजे इ. स. १६२७ मध्यें ७२ वर्षांचा होऊन मरण पावला. याची कबर दिल्ली नजीक दर्ग्यांत आहे. [ बीलचा कोश. ]

**अबदुल हक्क ( शेख ).**—हा दिल्लीचा राहणारा. सादुल्ला तुर्कचा पुत्र सैफ-उद्दीन अबदुलचा पिता. तैमुरलंगाचा एक अनुयायी तैमुरबरोबर परत न जातां दिल्लीसच राहिला. अबदुल हा त्याचा वंशज होय. यानें इ. स. १५९६ मध्यें "तारीख इ-हक्की" किंवा "तारीख-इ-अबदुल-हक्क" नांवाचा ग्रंथ लिहिला. यात्रेकरितां मक्का व मदिना येथें जाऊन तो फार दिवस राहिला. तेथें त्यानें प्रवास, धर्म, इतिहास वगैरे निरनिराळ्या विषयांवर शंभरांवर ग्रंथ लिहिले.

यांपैकीं अतिप्रख्यात म्हणजे "मदीना सकीना", "मत्ल उल-अनवार", "मदरिज-उन-नुबुवत" "जज्ब-उल-कुलुब", "अखबार-उल-अखयार" हे ग्रंथ होत. हा ग्रंथकार १५५१ च्या जानेवारी महिन्यांत जन्मला. वयाच्या नव्वदाव्या वर्षींहि त्याची प्रतिभा कमी झाली नाहीं. इ. स. १६४२ त अबदुल मरण पावला. दिल्लीस हौझ शम्सीच्या तीरावर त्याची कबर आहे. हिंदुस्थानांतलि साधुपुरुषांत याची गणना होते. याच्या शेखनूर-उल-हक नांवाच्या मुलानें "झुबदुत-उत-तवारीख" नांवाचा ग्रंथ लिहिला आहे. [ बीलचा कोश ].

अबदुल हमिद.—( १ ) ( १७२५-८९ ) हा १७७३ सालीं तुर्कस्तानचा सुलतान झाला. हा स्वभावानें फार शांत व देवभीरु होता. १७७४त त्याला रशियाशीं लढाई करणें भाग पडलें त्यांत त्याचा पराभव होऊन तह करावा लागला. त्या तहाचे परिणाम तुर्क लोकांस फार घातक झाले. याच्यावेळीं तुर्कस्तानची सांपत्तिक स्थिति फार वाईट होती १७८७ मध्यें रशियाशीं पुन्हां युद्ध सुरू झालें त्यावेळीं आस्ट्रिया रशियाला मिळाला. या युद्धांत पुन्हां रशिया विजयी होण्याचें चिन्ह दिसूं लागलें तोंच इकडे सुलतानचा वृद्धापकालामुळें अंत झाला.

( २ ).—सुलतान अबदुल मजिदचा पुत्र जन्म १८४२ अबदुल हामिद हा १८७६ रांत तुर्कस्तानचा सुलतान झाला. गादीवर बसतांना पार्लमेंटप्रमाणें राज्यव्यवस्था करण्याचें अश्वासन दिल्यामुळें लोकांनां तो उदारमतवादी आहे असें वाटत असे. तो सुलतान झाला त्या वेळीं तुर्कस्तानची स्थिति फार खालावलेली होती. सरकारी खजिन्यांत शिल्लक नव्हती; जिकडे तिकडे बंडाळी माजली होती. यूरोपियन राष्ट्रांशीं तुर्कांचें वरें नव्हतें कारण त्यांनीं कळविलेल्या सुधारणा त्यानें करण्याचें नाकारिलें रशियावरोबरच्या युद्धांत त्यास तह करणें भाग पडलें. व इंग्रजांनीं इजिप्त देशांत आपली सत्ता दृढ केली म्हणून त्यानें ब्रिटिश सरकारास सोडून जर्मनीची मैत्री संपादिली व सैन्यांत सुधारणा केली. जर्मनीला बगदाद रेल्वे करण्याकरितां सवलती मिळावयाच्या होत्या. त्यानें सर्व सत्ता प्रधानांच्या हातांतून आपल्याकडे घेतली. बंडें मोडण्याकरितां त्यानें फार लोकांची कत्तल केली मॅसिडोनियाच्या प्रकरणांत तुर्कस्तानचा झालेला पाणउतारा व सैन्यांतील असंतोष, या सर्व गोष्टींचा फायदा घेऊन "तरुण तुर्क सभेचे" पुढारी निओझी बे व एनव्हर बे यांनीं राज्यक्रांति केली (१९०८) आणि सुलतानास पदच्युत करून त्याच्या भावास म्हणजे रशिद एफेंडि (पांचवा महंमद) यास गादीवर बसविलें ( १९०९).

अबदुल्ला--(१)मुसुलमानांचा धर्मगुरु जो महंमद पैगंबर त्याचा अबदुल्ला हा बाप होय. हा हाशीमचा मुलगा अबदुल मुत्तालीब याचा कनिष्ठ मुलगा होता. तो अप्रतिम रूपवान् होता तो साधा सारवान असून देखील त्याच्या अंगीं इतके श्रेष्ठ गुण भरलेले होते कीं, त्याच्या जातींतील अतिशय सुंदर व सद्गुणी अशा बायकांनीं त्याच्या बरोबर लग्न लावण्याची इच्छा प्रदर्शित केली. त्याच्यावर सर्वांचें अतोनात प्रेम होतें. त्याचें ज्या दिवशीं अमीनाशीं लग्न झालें त्या रात्रीं शंभर तरुणींनीं निराशेनें जीव दिला असें म्हणतात !!! त्याच्या बायकोला लग्न झाल्यावर फार वर्षांनीं मूल झालें. तें मूल म्हणजेच महंमद होय. महंमद जन्मल्यावर आठच दिवसांनंतर ( कोणाच्या मतें आठ वर्षांनीं ) आपल्या बापाच्या हयातींतच अबदुल्ला मरण पावला ( इ. स. ५७१ ). अबदुल्लाच्या मागें त्याच्या बायकोची व मुलाची फार वाईट स्थिति झाली. नंतर अबदुल मुत्तालीबनें सुनेचें व नातवाचें संगोपन केलें; व मरतेसमयीं त्यांनां आपला थोरला मुलगा अबूतालीब याच्या हवालीं केलें. [ बीलचा कोश. ]

( २ ) महंमदचा मुलगा जो अब्बास त्याचा हा मुलगा होता. तो कुराण फारच चांगल्या रीतीनें शिकवीत असे अशी त्याची ख्याति आहे. दहा वर्षांचा होण्यापूर्वीच त्याला गेब्रिएल नांवाच्या एका देवदूतापासून स्फूर्ति मिळाली असें म्हणतात. हा सन ६१९ मध्यें जन्मला. खलीफ अलीनें त्याला बसरा येथील अधिकारी नेमलें. तो कांहीं काळपर्यंत त्या जागेवर राहिला व नंतर हैजाजला परत आला. तो मक्केपासून पूर्वेकडे ६० मैलांवर असलेल्या ताईफ नांवाच्या शहरीं सन ६८७ सालीं मरण पावला. त्याची आई अम्मा अल्फज्ल ही मेमूना नांवाच्या महंमदाच्या एका बायकोची बहीण होती [ बीलचा कोश ].

( ३ ) हा महंमदानंतरचा दुसरा खलीफा जो उमर त्याचा मुलगा होता. हा महंमदाच्या समकालीन असलेल्या जाड्या पंडितापैकीं एक होता. हा इ. स. ६९२ सालीं मेला. याची उदारपणाबद्दल फार ख्याति आहे.

अबदुल्ला कुतब शहा ( १६११-१६५८ ).—दक्षिण हैदराबादमधील गोवळकोंड्याच्या प्राचीन कुतुबशाही घराण्यामधील सहावा सुलतान. हा महंमद कुतुबशहाचा पुत्र असून त्याच्या नंतर तो गादीवर बसला. शहाजहानानें अहंमदनगरचें राज्य बुडवून विजापूरच्या राजापासून खंडणी घेण्याचा ठराव केला. तेव्हां यानेंहि खंडणी देण्याचें कबूल केल्यामुळें ( १६३६ ) शहाजहानाशीं त्याचा स्नेह कायम राहिला. पण १६५६ मध्यें त्यानें शहाजहान बादशहाला दुखविल्यामुळें त्यावर आपत्ति आली. अबदुल्लाचा मुख्य वजीर मीर जुम्ला हा होता. एकदां मीर जुम्ला तैलंगणांत गेला असतां मीर जुम्लाचा दुर्वर्तनी पुत्र महंमद अमीन यानें कुतुबशहास राग येण्याजोगें कृत्य केल्यामुळें कुतुबशहानें त्यास पकडून कैदेंत टाकिलें. मीर जुम्लानें परत आल्यावर आपल्या मुलास सोडविण्याविषयीं पुष्कळ खटपट केली. पण ती व्यर्थ गेल्यामुळें मीर जुम्ला अवरंगजेबास जाऊन मिळाला. अवरंगजेबास दक्षिणेंतील राज्यांत हात घालण्यास कांहीं तरी सबब पाहिजेच होती. त्यानें आपल्या बापाकडून

महंमद अमीन यास मुक्त करण्याविषयींचा हुकूम आणून तो कुतुबशहाकडे पाठविला. या गोष्टीनें आपल्या स्वातंत्र्यावर घाला आला असें पाहून कुतुबशहास अधिकच क्रोध आला व त्यानें महंमद अमीनाची कैद अधिकच सक्त करून मीर जुम्लाची सर्व संपत्ति जप्त केली. तेव्हां शहाजहानानें सक्तीनें अबदुल्ला यास वठणीस आणण्याविषयीं आपला मुलगा अवरंगजेब दक्षिणेंत होता त्यास आज्ञा केली. वडिलांची आज्ञा हातीं पडतांच अवरंगजेबानें आपला भाऊ शहाजादा सुजा बंगालचा सुभेदार होता त्याच्या मुलीशीं आपला मुलगा सुलतान महंमद याचें लग्न करण्याचें मिष करून त्यास बरोबर इतमाम देऊन रवाना केलें. मार्गांत सुलतान महंमदाचा मुक्काम हैदराबाद नजीक पडला तेव्हां अबदुल्ला आपणांस मेजवानी देण्याच्या, गडबडीत आहे असें पाहून महंमद एकाएकी हैदराबादवर चालून गेला. अबदुल्ला गैरसावध असल्यामुळें त्यास आपला बचाव करतां आला नाहीं. तो कसा बसा गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत पळून गेला. इकडे हैदराबाद मोंगलांच्या हातीं पडून लष्कर शरण जाईपर्यंत तें अर्धें अधिक लुटलें गेलें. मागाहून अवरंगजेब आणखी फौज जमा करून आपल्या मुलाच्या मदतीस आला. अबदुल्लानें गोवळकोंड्याच्या किल्ल्यांत जाण्यापूर्वीच महंमद अमीन यास मुक्त करून मीर जुम्ला याचा जप्त केलेला ऐवज परत केला होता. परंतु अवरंगजेबाचें तेवढ्यानें समाधान होण्यासारखें नव्हतें. अबदुल्ला यानें विजापूरकरांची मदत मागून पाहिली; पण तिकडून कुमक येण्याची आशा दिसेना. तेव्हां त्यानें अवरंगजेबाच्या सर्व अटी मान्य करून त्याशीं तह केला. त्यानें मोंगलांस मागील बाकी फेडून दरसाल एक कोट रुपये खंडणी देण्याचें कबूल केलें. इतकेंच नव्हे तर सुलतान महंमदास आपली मुलगी देऊन कांहीं मुलूख व द्रव्यहि आंदण म्हणून दिलें. यापैकीं पैक्यासंबंधीं जे करार होते त्यांत पुढें पुष्कळ सूट मिळाली. अबदुल्ला हा १६५८ सालीं मरण पावला. याच्या मागून याचा जांवई अबू हसन कुतुबशहा यास गादी मिळाली.

[ संदर्भ ग्रंथ.—मोडककृत दक्षिणेंतील मुसुलमानी राज्यांचा इतिहास; बीलचा कोश. मुसुलमानी रियासत; काफीखान; इ. ]

**अबदुल्लाखान सय्यद.**—हा बान्हा येथें येऊन राहिलेल्या महंमद पैगंबराच्या एका वंशजाच्या कुलांत जन्मला असून याचा बाप सय्यद अबदुल्लाखान उर्फ सय्यद मिया हा अवरंगजेबाच्या कारकीर्दींत कांहीं दिवस विजापूर व पुढें अजमीर या प्रांतांचा सुभेदार होता. अबदुल्लाखानास पुष्कळ पुत्र होते, पण हसन अली व हुसेन अली हे दोघेच कायते सय्यद बंधू म्हणून प्रसिद्धीस आले. यांपैकीं पहिला हसन अली हा अबदुल्लाखान कुतुब-उल्मुल्क यानांवानें प्रसिद्ध आहे. याचें वय १७१२ सालीं सुमारें ४६ वर्षांचें होतें. तो १६९७-९८ मध्यें खानदेश, बागलाण, औरंगाबाद इत्यादि ठिकाणीं फौजदारीवर होता.

इ. स. १७११ मध्यें बहादुरशहानें यास अलाहाबादची सुभेदारी दिली. या सय्यदांच्याच साहाय्यानें फर्रुख सेयर हा १७१३ मध्यें दिल्लीच्या गादीवर बसला. राज्यारोहण प्रसंगीं यानें अबदुल्लाखानाला आपला प्रधान नेमलें व त्याला कुतुबउल्मुल्क ही पदवी अर्पण केली. या दोघां भावांनीं पुढील सातवर्षें बादशहांनां केवळ बाहुली बनवून दिल्ली येथें अत्यंत अरेरावीनें कारभार केला. शेवटीं १७२० सालीं महंमदशहा बादशहाच्या चिथावणीवरून याचा भाऊ हुसेन अली याचा खून होऊन याचें आणि बादशहाचें खूप वांकडें आलें आणि १४ नोव्हेंबर १७२० रोजीं यमुनेकांठीं हसनपूर येथें बादशहाच्या सैन्याशीं याची लढाई होऊन हा कैद झाला. पुढें दोन वर्षांनीं ता. ११ आक्टोबर १७२२ रोजीं [३० जिल्हेज ११३५-बील ] अबदुल्लाचा खून झाला. सय्यद बंधूंच्या दिल्ली येथील कारभाराची विशेष हकीकत सय्यद बंधू या सदराखालीं दिली आहे. [ संदर्भग्रंथ; मराठी रियासत मध्यविभाग; बीलचाकोश. डौसन ].

**अबदुल्ला बिनअल्ही.**—यानें फारसी भाषेमधील ग्रंथाचें उर्दूमध्यें भाषांतर करून 'सिरुअ अल हिंद' नांवाचा ग्रंथ लिहिला. हा ग्रंथ मूळचा फारसी भाषेंतील नसून संस्कृत ग्रंथाचें फारसींत भाषांतर करून हा लिहिलेला होता. [ बीलचा कोश ].

**अबदुल्ला बिन अली बिन अबसुब अलहलवी**—यानें हदसी आणि इमामियापंथाच्या प्रमाणग्रंथावर ग्रंथ लिहिले. याचा आजा अबू शुवा यानें इमाम हसन आणि हुसेन यांच्या वेळच्या सर्व दंतकथा जमा केल्या होत्या असें म्हणतात. अबदुल्लानें या सर्व कथा लिहून काढून तो ग्रंथ इमाम जाफर सादिक याला नजर केला; व इमाम जाफरनें त्यांत दुरुस्त्या केल्या व तो तपासून पाहिला असें म्हणतात [ बीलचाकोश ].

**अबरडीन**—हें सनदीगांव (रॉयलबरो) अबरडीनशायरचें मुख्य शहर असून उत्तरस्कॉटलंड मधील मुख्य बंदर आहे. लोकसंख्या, उद्योग धंदे, व संपत्ति या बाबतींत स्कॉटलंड मध्यें याचा चवथा नंबर लागतो. हें शहर डॉन व डी या नद्यांच्या मुखांमध्यें उत्तरसमुद्राच्या एका उपसागरावर वसलेलें आहे. जुन्या अबरडीन शहराचा इतिहास वगैरे सर्व गोष्टी अगदींच वेगळ्या होत्या. परंतु सांप्रत नवें व जुनें अबरडीन यांत भेद दाखवितां येत नाहीं. या शहरांत ग्रॅनाईट दगडांच्या बऱ्याच इमारती असल्यामुळें याला 'ग्रॅनाईट सिटी' हें टोपण नांव होतें. या शहराला पार्लमेंटचे दोन सभासद निवडण्याचा हक्क आहे. हें शहर स्कॉटलंड मधील निरोगी शहरांपैकीं एक आहे.

येथील 'युनिअन स्ट्रीट' हा सर्व ब्रिटिश बेटांत फारच चांग ल्यापैकीं एक रस्ता आहे. या रस्त्यावरच्या मुख्य इमारती

म्हणजे शहर व काउंटी पेढी, गायनाचा दिवाणखाना, ट्रिनिटी दिवाणखाना, 'अबरडीन फ्री प्रेस' या वजनदार वर्तमान पत्राची कचेरी व स्कॉटलंडची राष्ट्रीय पेढी, या होत. याशिवाय येथें म्युनिसिपालटी व काउंटी यांच्या इमारती, नगर भवन, मुक्तिफौजेची इमारत, यंत्र व शिल्पशाळा चित्रसंग्रहालय, पदार्थसंग्रहालय मॅकडोनेलहॉल ( यांत चित्रें ठेविलीं आहेत ) व ग्रंथसंग्रहालय या इमारती आहेत. येथें पुष्कळ प्रार्थनामंदिरें आहेत.

अबरडीन विश्वविद्यालयाला किंग (१४९४) व, मॅरिसकल हीं दोन विद्यालयें जोडलेलीं आहेत. विश्वविद्यालयांत ८०० हून जास्त विद्यार्थी असतात. या विद्यालयाच्या इमारती भव्य आहेत व तेथील ग्रंथसंग्रहांत १,००,००० वर ग्रंथ आहेत. अबरडीन व ग्लासगो हीं विश्वविद्यालयें मिळून पार्लमेंटासाठीं एक सभासद निवडतात. येथें दुसऱ्या बऱ्याच शिक्षणसंस्था आहेत.

या शहरांत अनाथ व, निराश्रित, आंधळे व मुके यांच्यासाठीं संस्था असून बरींच रुग्णालयें आहेत. येथें 'डूथी' नांवाचा मोठा बगीचा आहे. 'युनिअन टेरेस' बागेंत सरविल्यम वालेस याचा ब्राँझचा भव्य पुतळा आहे. त्याचप्रमाणें गॉर्डन विद्यालयासमोर सेनापति गॉर्डन याचा पुतळा आहे. शहराचा कारभार नगरसभा पाहते; तींत ३४ सभासद असून दोन सभासद पार्लमेंटाकरितां निवडले जातात.

येथील बंदर उथळ असून त्याच्या तोंडाशीं वाळू आहे. परंतु अलीकडे त्यांत सुधारणा करण्यांत आली आहे. त्यामुळें या शहराचा व्यापार बराच वाढला आहे. कानडामधून गुरें ढोरें भरून आलेलीं जहाजें थेट बंदरांत यावीं म्हणून बंदरांत शिरणारा कालवा खोल करण्याची योजना सध्यां अमलांत आणली जात आहे. या योजनेमध्येंच गोदीची सुधारणा येत असून एकंदर खर्च अजमासें दीड कोट रुपये येईल. बंदराच्या मुखाशीं तीन बातेऱ्या असून त्यांवर एक्कोणीस तोफा ठेविल्या आहेत.

अबरडीन येथें अनेक महत्त्वाचे धंदे असल्यामुळें हें शहर फार भरभराटीस चढलें आहे. येथें ८ बँका आहेत. सुमारें तीनशें वर्षांपासून येथें ग्रॅनाईट दगडाच्या खाणी चालू आहेत. या दगडाचें नक्षीदार सामान जगांतील सर्व भागांत जातें. सध्यां येथें मासे पकडण्याचा धंदा फारच भरभराटीस आला आहे. येथून माशांनीं भरलेल्या गाड्या रोज लंडनला जातात. येथें लोंकर, ताग व सुताचे कारखाने आहेत. येथील कागदाचे कारखाने फार प्रसिद्ध व जुने आहेत. शिवाय येथें तारा, कंगवे, फण्या, ओतीवकाम, दारू, रासायनिक द्रव्यें व जहाजें हीं होतात.

अबरडीन हें १२ व्या शतकांत महत्त्वाचें ठिकाण होतें. इ. स. १३३६ त हें तिसऱ्या एडवर्डनें जाळलें. येथील धरोंचें दप्तर स्कॉटलंडमध्यें सर्वांत जुनें आहे. बरीच शतकेंपर्यंत शेजारच्या सरदारांचे या शहरावर वारंवार हल्ले होत असत्यामुळें या शहरास तटबंदी केली होती. इ. स. १७१५ त येथें 'वृद्ध तोतया' च्या नांवानें द्वाही फिरविण्यांत आली इ.स. १३९६ त येथील लोकसंख्या सुमारें ३००० होती. नंतर इ. स. १९०१ मध्यें १५३५०३; १९११ सालीं १६३८९१ व १९२१ मध्यें १५८९६९ होती.

'हें शहर फारच स्वच्छ व सुंदर आहे. सव इमारती दगडी व डौलदार असून बाजारहि भपकेदार आहे. येथील स्मशान भूमी तर फार रमणीय व सुशोभित दिसते. या गांवीं हेरिंग नांवाचे मासे पुष्कळ सांपडत असल्यानें ते धरण्याचा धंदा येथें फार मोठ्या प्रमाणांवर चालतो.' असें मुजुमदार आपल्या 'यूरोपचा प्रवास' या पुस्तकांत लिहितात.

**अबाझइ.**—हिंदुस्थानच्या वायव्य सरहद्दीवरील पेशावर जिल्ह्यांतील चारसद तहशिलींत अबाझइ नांवाचा किल्ला व त्याच नांवाचें खेडेगांव आहे. स्वात नदीच्या उगमस्थानापासून सुमारें एक मैलावर त्या नदीच्या पश्चिम तीरावर हा गांव वसलेला असून, पेशावर शहरापासून तो २४ मैल आहे. अबाझइचा किल्ला इ. स. १८५२ मध्यें बांधण्यांत आला व तेव्हांपासून ब्रिटिश मुलुखाचा उटमान व मोहमंड लोकांच्या स्वाऱ्यांपासून बचाव झाला आहे. ह्या ठिकाणीं तीस शिपाई ठेवण्यांत आले आहेत. सध्यां याचें महत्त्व म्हणजे स्वात नदीच्या कालव्याच्या कामाचें जें मुख्य ठिकाण आहे त्याला हें गांव अगदीं नजीक आहे.

**अबाना आणि फारपर**—अबाना आणि फारपर हीं दमास्कस प्रांतांतील दोन प्राचीन नद्यांचीं नांवें आहेत. त्या आधुनिक बारदा ( थंड ) आणि आवाज ( वक्र ) या नद्या असाव्यात असा तर्क आहे. जुन्या कराराचा अरेबिक अर्थ बरोबर धरला तर त्याप्रमाणें दमास्कस म्हणजे नुसतें शहरच समजलें तर फारपर ही आधुनिक टारा होईल. ह्या दोन्ही नद्या पश्चिमेकडून पूर्वेकडे दमास्कसच्या मैदानांतून जातात. याचमुळें येथील प्रदेश सुपीक समजला जातो.

**अबानो पिट्रो**—प्राचीन काळचा प्रख्यात वैद्य व तत्त्ववेत्ता. याचा जन्म १२४६ च्या सुमारास इटलींत अबानो येथें झाला. १३१६ सालीं मृत्यु. यानें आपल्या ग्रंथांत अरबी वैद्यकाचें व तत्त्वज्ञानाचें समर्थन व विवरण केलें आहे.

**प्र सि द्ध ग्रं थ.**—यानें केलेले प्रसिद्ध ग्रंथ म्हणजे 'कान्सिलिएटर डिफरेन्शिअरम क्वे इंटर फिलॉसॉफॉस एट मेडिकॉस व्हर्संटुर' ( मांटुआ, १४७२, व्हेनिस, १३७६ ) आणि 'डि व्हेनेनिस एओरुम्क्वे रेमेडिइस' ( १४७२ ). यांपैकीं दुसऱ्याचें १५९३ मध्यें लिऑन्स येथें फ्रेंच भाषांतर प्रसिद्ध झालेलें आहे.

**अबाब्दा.**—अफ्रिकेंतील "अरबी" म्हणविणारी एक जात. हिचें वसतिस्थान नाईल नदीच्या पूर्वेस इजिप्तच्या दक्षिण भागांत आहे.

**जा त.**—ब्लेमिज नांवाची ग्रंथांत उल्लेखिलेली जात ती हीच. असें तेथील अवशेषांवरून व परंपरेवरून दिसतें. हे

लोक जरी आपणांस अरब लोकांचे वंशज म्हणवितात, तरी यांच्यामध्यें इजिप्तमधील शेतकरी लोकांच्या रक्ताची भेसळ झाली आहे.

रा ह ण्या ची त ऱ्हा.—नेहमीं फिरते असतात. पोषाख इजिप्तमधील शेतकऱ्यांप्रमाणें असतो.

उ प जी वि का.—हे लोक आपली उपजीविका मांस व दुधावर करितात.

**अबिंग्डन.**—अबिंग्डन ही बाजारी पेठ इंग्लंडच्या बर्कशायरमधील म्युनिसिपल बरो आहे व रॅडलेहून येणाऱ्या ग्रेट वेस्टर्न रेल्वेच्या शाखेचें स्टेशन असून आक्सफोर्ड येथून दक्षिणेस ६ मैलांवर आहे. लोकसंख्या सुमारें सात हजार आहे. ज्या ठिकाणीं ऑक नांवाची लहानशी नदी थेम्सला मिळते, त्या ठिकाणीं पश्चिम तीरावर थेम्सच्या सपाट खोऱ्यांत हें शहर आहे. नदीजवळ सेंट हेलेन्सचें प्रार्थनामंदिर असून याचा पुरातन इंग्लिश मनोरा पाहण्यालायक आहे. थेम्सवरील अरुंद कमानीचा पूल इ. स १४१६ पासूनचा आहे. ग्रामरस्कूल, ख्राइस्ट दवाखाना, नगरभवन वगैरे इतर इमारती आहेत. कापड व सतरंज्या बनविणें व शेतकी हे येथील धंदे आहेत. हा बरो एक मेयर, चार आल्डरमेन व बारा सभासद यांच्या देखरेखीखालीं आहे.

**अबिडॉस (१)**—इजिप्तमधील अति प्राचीन शहरांपैकीं हें असून नाईल नदीच्या पश्चिमेस सुमारें सात मैलांवर २६°१०' उत्तर अक्षांशांत वसलेलें होतें. याचें इजिप्शियन नांव अब्दु 'अवशेषाचा डोंगर' असें असून, हा नांवांत दिग्दर्शित केलेला अवशेष ऑसिरिसच्या पवित्र शीर्षाचा होता. ग्रीक लोकांनीं याला अबिडॉस हें नांव दिलें. याचें सध्याचें अरबी नांव 'आरबेट एल मडफुन्हे' असें आहे. या शहराच्या इतिहासाला इतिहासपूर्वकालाच्या उत्तरार्धांत सुरुवात होते. मेनाईटच्या आधींच्या राजांनीं याची स्थापना केलेली दिसते. कारण त्यांचें देऊळ व थडगीं सांपडलीं आहेत. पहिल्या व दुसऱ्या घराण्यांतील कांहीं राजांनां येथें पुरलें होतें. त्या राजांनीं येथील देवस्थान सुधारून मोठें केलें. दुसऱ्या घराण्यांतल्या तीन राजांनीं शहराच्या मागील वाळवंटांत मोठे किल्ले बांधले. विसाव्या घराण्याच्या काळापर्यंत हें देवस्थान व शहर मधून मधून पुन्हां पुन्हां बांधिलें जाई व येथील श्मशानभूमीहि एकसारखी वापरली जात असे. एकोणिसाव्या घराण्यांतील पहिल्या सेतीनें पूर्वजांच्या स्मरणार्थ शहराच्या दक्षिणेस एक मोठें नवें देऊळ बांधण्यास सुरुवात केली. दुसऱ्या रामेसीसनें तें पुरें केलें. अगदीं शेवटची इमारत म्हणजे तिसाव्या घराण्यांतील नेक्तानेबचें नवें देऊळ होय. टॉलेमाईक काळापासून हें स्थान ओस पडूं लागलें व पुढील काळची एकहि गोष्ट आढळण्यांत नाहीं.

पहिल्या ते बाराव्या घराण्याच्या काळापर्यंत येथें शृगाल देवता 'उपुआउट' हिची व पुढें ऑसिरिसची उपासना मोठ्या प्रमाणांत चाले. इ. स. पूर्व. ५५००–५०० या अवधींत एकाच जागेवर एकामागून एक बांधिलेलीं अशीं नऊ दहा देवळें या ठिकाणीं आहेत. या देवळांच्या दक्षिणभागीं पहिल्या सेतीचें देऊळ आहे. याच देवळाला 'अबिडॉसचें देऊळ' असें नांव आहे. प्रमुख घराण्यांतील राजांची एक लांबलचक नामावळी याच्या एका भिंतीवर कोरलेली आहे. तिला 'अबिडॉसचा तक्ता' असें म्हणतात.

(२). आशियामायनरमधील मायसिया प्रांतांतील प्राचीन शहर. हेलेस्पांटवर नागारा शिखरावर हें वसलेलें होतें. पूर्वीं हें थ्रेशियन शहर असून नंतर मिलेसियन लोकांनीं येथें वसाहत केली असावी. क्सर्क्सीझनें ग्रीसवर स्वारी केली त्यावेळेस त्यानें ह्याच ठिकाणीं होड्यांचा पूल बांधून खाडी ओलांडली. मॅसिडोनचा राजा पांचवा फिलिप (इ. स. पूर्वी २००) याला विरोध केल्यामुळें हें शहर प्रसिद्धीस आलें. हीरो व लियांडर यांच्या प्रणयकथांमुळें या शहराची प्रसिद्धि आहे. बिझान्शियमच्या अमदानीपर्यंत हें हेलेस्पांटवरील जकातीचें ठाणें होतें. दुसरा सुलतान महंमद यानें 'जुने किल्ले' बांधल्यामुळें ह्या शहराचें महत्त्व दार्दानेलिसला आलें.

**अबिपोन.**—दक्षिण अमेरिकन इंडियनांची ही एक जात होती. यांची संख्या १७८० च्या सुमारास अजमासें ५००० होती पण हल्लीं वडूवे, पायाग्वा, लेंग्वा इत्यादि तत्सम जातींप्रमाणें ही नामशेष झाली असें म्हणतात. या जातीसंबंधीं याच्यामध्यें सात वर्षें राहिलेला एक जेसुइट मिशनरी (मार्टिन डोब्रिझोफर) खालीं दिलेली जी थोडीशी माहिती देतो तेवढीच काय ती उपलब्ध आहे. 'अबिपोन हे उंच व बांधेसूद असून त्यांचा पेशा परिभ्रमणवृत्ति शिकारी लोक याच्याप्रमाणें असे, ते अंगभर वस्त्रें वापरीत व त्यांनां अलंकार घालण्याची व स्वतःला रंगवून घेण्याची हौस असे. काट्यानें अंग टोंचून व रक्तस्राव होत असलेल्या त्या जखमा राखेनें माखून स्त्रीपुरुष दोघेंहि गोंदून घेत. पुरुष कपाळावर गोंदून घेत व स्त्रिया चेहरा, वक्षस्थल आणि बाहू या भागांवर फुल्या व इतर दुरेख आकृती काढून घेत. मुलींनां वयांत यावयाच्या वेळीं नवरा मिळण्याकरितां त्या सुंदर दिसाव्या म्हणून व त्याचप्रमाणें त्यांच्या धैर्याची परीक्षा पाहण्याकरितां अशा तऱ्हेनें गोंदवीत. सात वर्षांच्या पुढील पुरुष ओष्ठालंकार घालीत. मोठमोठ्या लोकांकरितां अति उत्तम असा हा ओष्ठालंकार पितळेचा किंवा एक प्रकारच्या गोंदाचा करीत. हे अलंकार छातीपावेतों लोंबत. स्त्रीपुरुष दोघेंहि आपल्या कानाचीं पाळीं इतकीं ताणीत कीं तीं बहुतेक खांद्याला लागत. यांची नीतिमत्ता फार उत्तम असे असें डोब्रिझोफर म्हणतो. त्यांचें पतिपत्नीविषयक वर्तन नांवाजण्याजोगें असून पेहराव, आविर्भाव आणि संभाषण यांत विनय व सभ्यपणा दिसून येई. त्यांचें वर्तन नेहमीं शिष्टाचारास धरून असे. कैद्यांनां देखील ममतेनें वागवून त्यांचा छळ करवीत नसत. विजयाबद्दल सांवत्सरिक समारंभ

हंसून खेळून व मद्यपान करून साजरे करण्यांत येत. मद्यपान हाच काय तो त्यांच्यांत दुर्गुण होता. त्यांचा स्वभाव कांहींसा धिमा असे व अंगीं शौर्य असतांना देखील ते लढाईंत फारसे साहस करीत नसत.

त्यांची शरीरप्रकृति उत्कृष्ट असण्याचें कारण पुष्कळ अंशीं असगोत्र-विवाहपद्धति असूं शकेल. बालविवाह मुळींच नसून पुरुषाच्या तिसाव्या वर्षी व स्त्रीच्या विसाव्या वर्षी लग्नें होत.मूल होण्याच्या वेळीं बापाला प्रसूतिसंस्काराचें अनुकरण करावें लागे. भ्रूणहत्या आणि गर्भपात यांच्यांत फार होत. प्रत्येक स्त्री दोन मुलें शिल्लक ठेवून बाकीच्यांनां मारून टाकी. तीन वर्षें मूल अंगावर पीत असल्यानें ही भ्रूणहत्येची चाल वाढत गेली. कारण त्या अवधींत नवऱ्याला स्त्री-सुख घेण्याची बंदी असे व म्हणून तो पुन्हा लग्न करी. लग्न मोडणें त्याच्या मर्जीवर अवलंबून असे. तथापि अनेक बायका करण्याची चाल फार क्वचित् दिसून येई व सवती-सवतींनां एकत्र रहावें लागत नसे. स्त्रीपुरुषधर्म उत्तम रीतीनें पाळण्यांत येई. भ्रूणहत्येमध्यें आश्चर्याची गोष्ट ही कीं पुरुष संततीपेक्षां स्त्रीसंततीचे बळी कमी घेत, कारण लग्नांत कन्येच्या पित्याला मोठा हुंडा मिळे व वराला वधूच्या पित्याच्या पदरांत मोठी रक्कम ओतावी लागे.

उपासनेसंबंधीं पाहूं जातां अबिपोन लोकांना चिंतन, विवेचन यांची फारशी आवड नसे. ईश्वर या अर्थी शब्दच त्यांच्या भाषेंत नसे. ते एका क्षुद्र देवतेची उपासना करीत. या देवतेचें नांव "अहरै गिची" किंवा कीवेट होतें. अहरैगिची म्हणजे कृत्तिका नक्षत्र. जेव्हां हें नक्षत्र क्षितिजावर दिसत नसे तेव्हां तें आजारी असून अत्यवस्थेंत आहे असें अबिपोन समजत. ह्याचा उदय झाला असतां नाच, गाणें, खाणेंपिणें इत्यादि गोष्टींनीं त्याचा सत्कार करीत. अहरैगिचीनें ज्यांनां अमानुष शक्ति दिली आहे अशी समजूत होती ते कीवेट नांवाचे उपाध्ये हा धर्मसंप्रदाय चालवीत. कीवेटांनां लोक फार भीत कारण ते रागावले असतां व्याघ्ररूप धारण करीत अशी त्यांची समजूत असे. कीवेटांच्या द्वेषामुळें मृत्यु येतो असें अबिपोन मानतात. गडगडाट व वीज म्हणजे मृत कीवेटांचीं और्ध्वदेहिकें होत असें ते समजत; त्यांनां व धूमकेतु आणि ग्रहणें यांनांहि हे लोक फार भीत.

मृतमाणसाचें काळीज व जीभ उकळून कुत्र्याला खावयास घालीत. याविषयीं त्यांची समजूत अशी होती कीं त्यांतील कीवेटचा नाश व्हावा. मृतांचे आप्त आणि स्नेही डोक्याची श्मश्रू करवीत आणि बायका ९ दिवस अहोरात्र रडत. रडण्याकरितां मुद्दाम बोलावलेल्या माणसांनीं फक्त रात्रींच रडावें असा निर्बंध असे. स्त्रीनें आठवण होईल तेव्हां रडावें व इतर बायकांनीं तिचें रडणें ऐकून आपणहि त्यांत भाग घ्यावा असें असे. मृताचें नांव अजीबात घेत नसत, त्याचें घर उध्वस्त करण्यांत येऊन त्याचे आप्तइष्ट आपलीं नांवें बदलीत. मुलें लहान लहान बदकांत प्रवेश करून रात्रीचे जमाव करून एक प्रकारच्या करुण स्वरानें ओरडतात असें मानीत. थडग्यावर पाण्याचें भांडें, वस्त्र, शस्त्रें आणि गाई, घोडे यांचीं शरीरें ठेवीत; हे गाई घोडे मृताच्या अंतकाळीं मारलेले असत. पूर्वजांच्या समाधींना मान देण्यांत येत असे आणि त्यांचीं हाडें उकरून एका जागेवरून दुसऱ्या जागीं हालवीत व शेवटीं घरच्या स्मशानांत पुरून टाकीत. [एम. डोब्रिझोफर्स-हिस्टोरिआ डि अबिपोनिबस; सारा कूलिज अकाउंट ऑफ दि अबिपोन्स ३ व्हॉ. लंडन १८२२].

**अबिरामम्**—मद्रास इलाख्यांत मदुरा जिल्ह्यांत रामनाद जहागिरींत हें एक शहर आहे. हें उत्तर अक्षांश ९° २९' व पू. रे. ७८° २७' यांवर आहे. लोकसंख्या साडेसात हजार व त्या पैकीं शेंकडा सुमारें ५० लब्बई जातीचे मुसुलमान व्यापारी आहेत. येथें मुख्य धंदा म्हणजे हातमागावरील कापड. पण धान्य, कापूस, कपडा, यांचाहि व्यापार पुष्कळ चालतो. या शहराला पिण्याच्या तसेंच शेतकीस उपयोगीं पडणाऱ्या पाण्याचा पुरवठा चांगला आहे. येथें एक अशी समजूत प्रचलित आहे कीं, या गांवापासून दोन मैलांत सापाचें विष बाधत नाहीं.

**अबिला**, (१)—हें प्राचीन सिरियामधील एक शहर असून, अबिलिनच्या लहानश्या राज्याची राजधानी होती. दुसऱ्या ह्याच नांवाच्या शहराशीं याचा घोंटाळा होऊं नये म्हणून याला लिसानि याचें अबिला असें म्हणतात. दमास्कसहून हेलिओपोलिस (बाआलबेक) ला जाणाऱ्या राजमार्गावरील हें एक महत्वाचें शहर होतें. पडक्या देवळांचे अवशेष व बारदा नदीच्या कांठांवर सुकवाडी बारदा या गांवीं असलेले शिलालेख यांवरून हें शहर कोठें होतें याचा तपास लागतो· अबेल व अबिला या नांवांच्या सारखे· पणावरून, या ठिकाणीं अबेलला पुरलें होतें अशी दंतकथा आहे. अबिलिन हें जोसेफसच्या मताप्रमाणें इ. स. ३७ पर्यंत वेगळें इटुरियन राज्य होतें. नंतर कलिगुलानें हें पहिल्या अग्रिपाला दिलें. इ. स. ५२ त क्लॉडिअसनें हें राज्य दुसऱ्या अग्रिपाला दिलें.

(२) अबिला हें शहर पेरिआ (याला सांप्रत अबिल-एझ-झैस म्हणतात) मध्यें आहे.

**अबिसीनिया** यास पूर्वीं इथिओपिया असें म्हणत असत. ईशान्य आफ्रिकेंतील एक अन्तर्भागांतील देश व साम्राज्य. हा देश ५° आणि १५° उत्तर अक्षांश व ३५° आणि ४२° पूर्वरेखांश यांच्या दरम्यान आहे. अबिसीनियाच्या उत्तरेस इरीट्रिआ (इटालियन), पश्चिमेस आंग्ल-इजिप्शियन सूदन, दक्षिणेस ब्रिटिश ईस्ट आफ्रिका, पूर्वेस व आग्नेयीस सोमालीलँड व तांबडा समुद्र यांमधील ग्रेटब्रिटन, फ्रान्स व इटाली यांचा मुलूख आहे. फक्त ईशान्य सरहद्द कायती समुद्राला लागून आहे. बाकीच्या सर्व बाजूंनीं यूरोपीय राष्ट्रांनीं अबिसीनियाला घेरला असल्यानें तो समुद्रापासून विभक्त आहे. या देशाचे

खुद्द अबिसीनिया व मध्यसोमालीलँड (हारार धरून) असे दोन भाग आहेत. एकंदर देशाचें क्षेत्रफळ ३५०००० चौरस मैल आहे.

नैसर्गिक रचना.—अबिसीनिया देश पठारें व पर्वतमय आहे असें म्हटल्यास चालेल. डोंगरांचा देखावा फार भव्य दिसतो. १०° आणि १५° या उत्तर अक्षांशांच्या मधील डोंगरांचा भाग, समुद्रसपाटीवर ७००० ते ७५०० फूट आहे व त्साना सरोवरांतील जलानें या डोंगरांमधील खळगा तुडुंब भरलेला असतो. अबिसीनियांतील बहुतेक डोंगरांचा उतार वायव्येकडे असल्यामुळें जवळ जवळ सर्व मोठ्या नद्या त्या दिशेनें नाईलला जाऊन मिळतात. या नद्यांपैकीं कांहीं मुख्य नद्या म्हटल्या म्हणजे टकाझी, आबाई व सोबाट ह्या होत.

अबिसीनियांतील मुख्य सरोवरें म्हटलीं म्हणजे स्टीफानी व रूडॉल्फ हीं होत. रूडॉल्फ सरोवर हें अबिसीनियांतील सर्वांत मोठें सरोवर आहे. अबिसीनियामध्यें उष्ण पाण्याचे झरे विपुल आहेत. या ठिकाणीं भूकंप नेहमीं होत असतात.

भूस्तर.—अबिसीनियामध्यें अग्न्युत्पन्न व ज्युरॅन (जुरासिक) जातींचे विपुल खडक दृष्टीस पडतात. सॅंडाईन नामक पदार्थानें झालेले ट्राचिटिक व लोखंडासारख्या काळ्या रंगाचे व वाटोळ्या आकाराचे अष्टपैलु अथवा षट्पैलु (बसाल्ट) खडकहि येथें दृष्टीस पडतात.

हवामान.—खुद्द अबिसीनिया व तेथील मांडलिक प्रांत या दोहोंतील हवेंत फार तफावत आहे. सोमाली लँडमधील हवा फार उष्ण व रुक्ष आहे. पण खुद्द अबिसीनियांतील हवा फार आरोग्यकारक व समशीतोष्ण आहे. आक्टोबरपासून फेब्रुवारीपर्यंत हिंवाळा, पुढें जूनच्या मध्यापर्यंत उन्हाळा आणि तेथून पुढें पावसाळा असतो. सामान्यतः वर्षाच्या प्रत्येक महिन्यांत पाऊस पडत असतो.

वनस्पती व प्राणी.— दक्षिणेंतील डोंगर वनस्पतींनीं समृद्ध आहेत. खजूर, अंजीर, पाईन, नारिंग इत्यादिकांचीं त्याचप्रमाणें इमारतीच्या लांकडांचीं झाडें या ठिकाणीं विपुल आहेत. काफा प्रांतांत कॉफीचीं झाडें फार असून हा प्रांत अनेक प्रकारचें गवत व रंगीबेरंगी फुलें यांनीं फुललेला असतो.

येथील जंगलांत प्राणीहि विविध प्रकारचे सांपडतात. हत्ती, गेंडे, मगर, सिंह, चित्ते, तरस, लांडगे, कोल्हे, रानडुकरें, काळवीट इत्यादि अनेक प्रकारच्या प्राण्यांनीं येथील जंगल भरलेलें आहे. त्याचप्रमाणें अनेकविध पक्षीहि येथे सांपडतात. गरुडपक्षी, गिधाड, बहिरीससाणे, बदकें, खबुतरें, चिमण्या, शहामृग इत्यादि पक्षी जंगलांत वावरतात. सर्प तर असंख्यात आहेत.

प्रांत.—राज्यकारभाराच्या सोयीकरितां अबिसीनियाचे प्रांत व मांडलिक संस्थानें असे विभाग केलेले आहेत. त्यांत खालील प्रांत मुख्य आहेतः—टायग्रे हा अबिसीनियाच्या ईशान्येस आहे. अम्हारा अथवा गोंडार हा मध्यभागीं आहे. गोजाम हा अबाई नदीच्या प्रचंड अर्धवर्तुलाकार वांकणानें वेष्टिलेला आणि शोआ हा अबाई नदीच्या पूर्वेस व अम्हारा प्रांताच्या दक्षिणेस आहे. हे प्राचीन प्रांत खेरीज करून, गोजामच्या नैर्ऋत्येकडील 'वालेगा' प्रदेश, पूर्वेकडील हारार प्रांत, शोआच्या दक्षिणेकडील व नैर्ऋत्येकडील काफा व गाला हे प्रांत आणि सोमालीलँण्डचा मध्यभाग इत्यादिकांचाहि अबिसीनियाच्या साम्राज्यांत समावेश होतो.

शहरें.—अबिसीनियामध्यें फारशीं मोठीं शहरें नाहींत. टायग्रे प्रांतांतील आक्सम शहर ही प्राचीन राजधानी होय. मध्ययुगांत गोंडार राजधानी होती व १८९२ सालापासून शोआ प्रांतांतलि ॲडिस आबाबा ही अबिसीनियाची राजधानी आहे.

दळणवळणाचीं साधनें.— रेल्वे, सडका, तारायंत्रें, संदेश-वाहक यंत्रें, इत्यादि येथें दळणवळणाचीं साधनें आहेत.

शेती.— येथील जमीन फारच सुपीक आहे, तेव्हां शेतीचा धंदा विस्तृत प्रमाणांत चालतो. हा धंदा विशेषेंकरून गाला लोक करतात. अबिसीनियन लोक आळशी असल्यामुळें कृषिकर्मांत ते कुशल नाहींत. मका, ज्वारी, गहूं, जव, राय, वाटाणे, कापूस, ऊंस, भुईमूग इत्यादि जिन्नस येथें उत्पन्न करण्यांत येतात. कॉफी हें येथील महत्त्वाचें उत्पन्न होय; कृषिकर्माचीं अवजारें जुनींच वापरण्यांत येतात.

शेत नांगरण्याचें काम बैलांकडून करवून घेण्यांत येतें अबिसीनियन लोक मेंढ्या व बकरींहि बाळगितात. देश लोक बकऱ्याचें मांस मोठ्या आवडीनें खातात. सामानाची नेआण करण्याच्या कामीं खेंचरें फार उपयोगी पडतात व या कामाकरितां घोड्यापेक्षां त्यांचाच अधिक उपयोग करण्यांत येतो.

खनिज पदार्थ.— दक्षिण आणि नैर्ऋत्य प्रांतांत सोन्याच्या खाणी आहेत. या खाणींवरहि गाला लोकच काम करितात. शोआ प्रांताच्या दक्षिणेंतहि सोन्याच्या खाणी आहेत. याशिवाय, चांदी, लोखंड, कोळसा, व इतर खनिज पदार्थहि अबिसीनियांत सांपडतात.

व्यापार.—अबिसीनियाला स्वतःचें बंदर नसल्यामुळें देशाचा बहिर्व्यापार मसावा (इतालिअन); जीबुटी (फ्रेंच); झैला व बर्बेरा (ब्रिटिश) या परकीय बंदरांच्या द्वारें चालतो. कॉफी, कातडीं, हस्तिदंत, शहामृगाचीं पिसें, गोंद, सोनें, इत्यादि निर्गत व्यापाराच्या मुख्य वस्तू होत. कापड, शस्त्रें, दारूगोळा, तांदळ, साखर, सतरंज्या, व साहेबी टोप्या ह्या आयात व्यापाराच्या मुख्य वस्तू होत.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीपर्यंत येथें मराया थेरीसा 'डॉलर' सर्वत्र प्रचलित असे. १८९४ सालीं मेनेलेक डॉलर अथवा 'तलारी' हें दोन शिलिंग किंमतीचें नाणें उपयोगांत आलें. १९०५ सालीं अबिसीनियामध्यें एक

बँक स्थापन करण्यांत आली. या बँकेजवळ ५००००० पौंडांचें भांडवल असून तिला नाणीं वगैरे पाडण्याचा अधिकार आहे.

शा स न व्य व स्था.—आपापल्या प्रांतांत राजेलोक जवळ जवळ बादशाही सत्ता गाजवितात. अबिसीनियाच्या बादशहाची पदवी 'नेगस नेगुस्ती' (राजांचा राजा) अशी आहे. बादशहाला मधून मधून सल्ला देण्याकरितां म्हणून एक राजमंडळ आहे. १९०७ सालीं यूरोपीय धर्तीवर एक कॅबिनेट स्थापन करण्यांत आलें व परराष्ट्रीय राजकारण, लढाई, व्यापार, न्याय व जमाबंदी इत्यादि खात्यांवर प्रधान नेमण्यांत आले. जस्टीनिअनच्या कायदेसंग्रहाप्रमाणें न्याय वगैरे देण्यांत येतो. न्यायाधीशांच्या निकालांवर बादशहाकडे विनंतिअर्ज अथवा अपील करितां येतें. मुख्य न्यायाधिकाऱ्यास 'आफा-नेगस' असें म्हणतात. जमीनीवर बादशहाचा किंवा धर्मगुरूंचा ताबा असतो. प्राथमिक शिक्षण पाद्री लोक देतात. १९०७ सालीं सक्तीच्या शिक्षणाचा कायदा पास करण्यांत आला. १२ वर्षांच्या वरील सर्व मुलांनां हा कायदा लागू करण्यांत येतो.

लो क सं ख्या, भा षा व स्व भा व.—अबिसीनियाच्या साम्राज्याची लोकसंख्या पसतीस ते पन्नास लक्ष आहे. साम्राज्यांत मुख्यतः अबिसीनियन, गाला व सोमाली हे लोक राहतात.त्याचप्रमाणें आफ्रिकेच्या बाहेरील लोकहि येथें येऊन राहिले आहेत; उदाहरणार्थ; आर्मेनिअन, हिंदी, यहुदी व ग्रीक लोक. ब्रिटिश, फ्रेंच, इटालियन व रशियन लोक यांचीहि येथें एक छोटीशी वसाहत आहे.

हॅमिटिक वंशाच्या पूर्वेकडील शाखेंतील लोक अबिसीनियांत प्रथम रहात असावेत असा तज्ज्ञांचा तर्क आहे. तथापि आजमितीस वरिष्ठ दर्जाच्या लोकांत सेमिटिक संस्कृतीचा जास्त प्रसार झालेला दिसतो. मध्यप्रांतांतील लोकांचा वर्ण पिंवळा जर्द आहे. उत्तर भागांतील लोकांचा तपकिरी आहे. दक्षिणेकडे काळाकुट्ट व काजळी रंगाच्या लोकांचा भरणा जास्त. पुष्कळ लोक नीग्रो वळणाचे, जाड ओंठांचे, बसक्या नाकाचे, आणि काळ्या व कुरळ्या केंसांचे आहेत. तथापि एकंदर रहिवाश्यांपैकीं बहुसंख्याकांचें वर्णन 'संमिश्र हॅमिटी सेमिटिक लोक'. असेंच करणें जास्त सयुक्तिक होईल. शोआ आणि अम्हारा या प्रांतांमधील वोलो जिल्ह्यांत 'गाला' लोक बरेच दृष्टीस पडतात. राजदरबारची व वरिष्ठ दर्जाच्या लोकांची भाषा सेमिटिक भाषेसारखी आहे. मूळच्या मूर्तिपूजक व प्राचीन सेमिटिक कल्पना ज्यांच्या रोमरोमांत भिनल्या आहेत अशा लोकांवर एकाएकीं ख्रिस्ती संप्रदायाचें जूं लादण्यांत आलें, व ख्रिस्ती संप्रदाय राजधर्म झाला. यामुळें या जुन्या कल्पना अबिसीनियन लोकांच्या मनांतून जाऊं शकल्या नाहींत. अजूनहि अपराधी शोधून काढण्याकरितां स्वप्नांकडे धांव घेण्यांत येते. असा प्रसंग आला असतां प्रथम उपाध्यायाला बोलावून आणतात. त्याच्या शापवाणीचा व प्रार्थनेचा गुन्हेगार शोधून काढण्याच्या कामीं जेव्हां कांहींच उपयोग होत नाहीं, तेव्हां एका लहान मुलाला गुंगीचें औषध देतात व त्याच्या स्वप्नांत जो मनुष्य येईल त्याला गुन्हेगार समजण्यांत येतें. उपाध्यायानें योजिलेला मनुष्य जर मुलानें स्वप्नांत पाहिला नाहीं तर तसा मनुष्य स्वप्नांत पाहीपर्यंत त्या मुलाला गुंगींतच ठेवण्यांत येतें.

अबिसीनियन लोकांत खून व फांशीसारखे प्रकार नेहमीं दिसतात. तथापि क्रूरपणा हा कांहीं यांच्या स्वभावाचा विशेष नव्हे. लढाईंतील कैद्यांनां ते बहुतकरून ठार करीत नाहींत. खुनी माणसाला मयत इसमाच्या भाईबंदांच्या स्वाधीन करण्यांत येतें. त्यांनीं वाटल्यास त्याला देहांत प्रायश्चित्त द्यावें. अथवा कांहीं मोबदला घेऊन सोडून द्यावें; हा त्यांच्या खुषीचा प्रश्न असतो. मयत इसमाला कोणी भाऊबंद नसल्यास खुनी इसमावर सूड उगविण्याचें काम उपाध्यायाकडे सोंपवितात. अबिसीनियन लोक जात्याच आळशी असल्यामुळें भीक मागत दारोदार फिरण्यांत त्यांनां कमीपणा वाटत नाहीं. मोठा मानी अबिसीनियनहि 'वाणी ही ईश्वरानें भीक माणण्याकरितां दिलेली आहे' असें म्हणून आपल्या दोषावर पांघरूण घालतो असें सांगतात. हे लोक गर्विष्ठ, आपमतलबी, पण बुद्धिमान आहेत. उत्सवप्रसंगीं गाय मारण्याचा यांच्यांत प्रघात आहे. हे लोक फार खादाड आहेत, व मीठ हें यांच्यांत चैनीचें खाद्य समजलें जातें. या लोकांचीं नीतिबंधनें फार शिथिल असतात. विवाहबन्धन नवऱ्याला अथवा बायकोला वाटेल त्यावेळीं तोडतां येतें. एका बापाचीं पण वेगळाल्या आयांचीं मुलें एकमेकांनां शत्रूप्रमाणें लेखितात.

इ ति हा स.—प्राचीनांना इथिओपिया म्हणून माहीत असलेल्या देशाच्या टापूत पूर्वी अबिसीनियाचा अथवा निदान त्याच्या उत्तर भागाचा समावेश होत असे. मिसर व इथिओपिया या दोन देशांत प्राचीनकाळीं दाट मैत्री असे व क्वचित् काळीं या दोन्ही देशांवर एकच राजा राज्य करीत असे. हिब्रू लोकांचा देखील त्याकाळीं इथिओपियाशीं व्यापारी संबंध असे. इजिप्तच्या टॉलेमी राजांच्या आमदानींत इथिओपियामध्यें ग्रीक वसाहती स्थापन करण्यांत आल्या. या ग्रीक वसाहतींमधूनच पुढें 'आक्झुमाईट' राज्याचा उदय झाला असावा असें इतिहासवेत्त्यांचें मत आहे. ख्रिस्तोत्तर पहिल्या शतकापासून तों सातव्या शतकापर्यंत या राज्याची भरभराट होती, व एकेकाळीं खास अबिसीनिया व हें राज्य यांचा विस्तार सारखाच होता.

इ. स. ३३० च्या सुमारास इथिओपियामध्यें ख्रिस्ति संप्रदायाचा प्रवेश झाला. प्रथम प्रथम या नूतन संप्रदायाचा प्रसार देशांत फारसा होऊं शकला नाहीं. तथापि पांचव्या शतकाच्या अखेरीपासून या संप्रदायाचें प्रस्थान देशांत चांगलें बसूं लागलें, ऑक्झमच्या राजानें (५२५ इ.)

अरबस्तानांतील येमेन जिंकलें. अरबस्तानांतील अतिशय सुपीक असा भाग याप्रमाणें इथिओपियनांच्या ताब्यांत गेला. पण इजिप्त देश मुसुलमानांनीं जिंकल्यावर इथिओपीयनांनां अरबस्तानचा मोह सोडणें भाग पडलें. मुसुलमानांची विजयी सत्ता जसजशी अधिकाधिक प्रसार पावूं लागली तसतसें इथिओपियाचें सुधारलेल्या राष्ट्रांशीं दळणवळण बंद पडूं लागून त्यांनां बाहेरील जगाची विस्मृति पडली.

इ. स. १००० च्या सुमारास ज्युडिथ नामक एका यहुदी राजकन्येनें राजवंशाचा समूळ उच्छेद करण्याचा कट रचला. याचा सुगावा अगोदरच लागल्यामुळें बालराजास शोआ येथें पळविण्यांत येऊन तेथें त्याची सत्ता स्थापन करण्यांत आली. बाकीच्या राज्यावर ज्युडिथनें ४० वर्षे पर्यंत राज्य केलें. इ. स. १२६८ त मूळच्या राजघराण्याकडे पूर्वीप्रमाणें राज्य सोंपविण्यांत आलें.

१५ व्या शतकाच्या अखेरीस अबिसीनियामधील पोर्तुगीजांच्या मिशनरी कार्यास सुरुवात झाली. पेड्रो डी कोव्हिलहॅम हा इ. स. १४९० त अबिसीनियांत येऊन पोंचला, व पोर्तुगालच्या राजाकडून आणलेलीं पत्रें त्यानें बादशहाच्या स्वाधीन केलीं. १५०० सालीं बादशहानें मुसुलमानाविरुद्ध पोर्तुगालच्या राजाची मदत मागितली. या विनंतीबरहुकूम पोर्तुगीज आरमारानें १५२० सालीं तांबड्या समुद्रांत प्रवेश केला. १५२८ व १५४० च्या दरम्यान विख्यात सेनानायक महमद ग्रॅन याचे शूर मुसलमान सैनिक देशांत शिरले व त्यांनीं बादशहाला पर्वतांत दडून बसावयास भाग पाडिलें. तेव्हां फिरून पोर्तुगीजांकडे मदत मागण्यांत आली. १५४१ त पोर्तुगीज व अबिसीनियन सैन्याची व मुसुलमानांची चकमक झडून त्यांत मुसुलमानच विजयी झाले. तथापि १५४३ त महंमद ग्रॅन हा एका चकमकींत पडल्यामुळें त्याच्या सैन्याचा सहज मोड झाला व अबिसीनियांत पोर्तुगीजांचें प्राबल्य माजलें. आक्झुमाईट राजे अद्याप पावतों ख्रिस्ती झाले नव्हते. बादशहानें उघड उघड ख्रिस्ती संप्रदायाचा स्वीकार करावा असा आतां पोर्तुगीज लोक आग्रह करूं लागले. १७ व्या शतच्या सुरुवातीस फादर पेड्रो पाएझ या पाद्र्यानें बादशहाचें मन वळवून त्याला ख्रिस्ती संप्रदायाची दीक्षा दिली. तथापि याच्या नंतरचा गृहस्थ मेंडेझ याच्या अदूरदर्शीपणामुळें लोकांचीं मनें पोर्तुगीजांविरुद्ध बिथरून गेलीं. व १६३३ च्या सुमारास त्यांनां अबिसीनियामधून आपलें चंबुगबाळें उचलावें लागलें.

अबिसीनियन साम्राज्यांतील घटकावयव जे प्रांत त्यांचा व मध्यवर्ती सरकारचा संबंध काय याचा येथें थोडा विचार केला पाहिजे. टायग्रे, अम्हारा व शोआ हे अबिसीनियांतील मुख्य प्रांत होत. मध्यवर्ती सरकार बहुतेक अम्हारा येथें असतें व तेथील राजा आपल्याला बादशहा अथवा 'राजाधिराज' ( नेगस नेगुस्ती ) असें म्हणवितो. मोठाल्या प्रांतांतील कित्येक राजेहि आपणास नेगस अथवा राजा असें म्हणवितात. बादशहाच्या मनगटांत सामर्थ्य असल्यास तो इतर प्रांतांपासून खंडणी वसूल करतो. अबिसीनियाचा सर्व इतिहास खून, मारामाऱ्या, लुटालूट, अंदाधुंदी इत्यादिकांनीं रंगविलेला आहे. देशांत क्वचित् चांगले व उदारधी राजेहि होऊन गेले, नाहीं असें नाहीं; पण ते फार थोडे. १८ व्या शतकांतील विख्यात व दयाळू राजे खालील होते; ( १ ) गोंडार येथील येसू राजा ( मृत्यु १७२० ); ( २ ) शोआ येथील सेबास्टी (१७०३–१७१८); (३) अम्हाराचा टेक्ला जी आर्डिस (१७७०–१७९८); व (४) शोआचा अस्फनासेन ( १७७४–१८०७ ). १८०५ सालीं अबिसीनियाशीं तह घडवून आणण्याकरितां व तांबड्या समुद्रावर बंदर मिळविण्याकरितां एक ब्रिटिश शिष्टमंडळ येथें आलें. या मंडळाच्या मागून यूरोपीय व्यापारी, प्रवाशी व मिशनरीलोक यांचे थवेच्याथवे अबिसीनियामध्यें लोटूं लागले. हा क्रम थिओडोर बादशहाच्या अमदानीपर्यंत अबाधितपणें चालू होता. १९ साव्या शतकाच्या आरंभीं अबिसीनियामध्यें गोंडार व टायग्रे या दोन प्रांतांच्या राज्यकर्त्यांत सत्तेविषयीं सारखा झगडा चाललेला होता. त्या झगड्यांत शेवटीं टायग्रे प्रांताचा राजा वोल्डा सेलासी याला जय मिळून सर्व अबिसीनियाचें स्वामित्व त्यालाच मिळालें म्हटलें तरी चालेल. इ. स. १८१६ त वोल्डा सिलासी मरण पावला व आगामीचा सागावादिस याला राज्य मिळालें. यानें इंग्रजांशीं सख्य जोडल्यामुळें अम्हाराचा राजा मेरी यानें याच्यावर स्वारी केली. व १८३१ सालीं जान्युआरी महिन्यांत झालेल्या लढाईंत सागाबादिस व मेरी दोघेहि मरण पावले. मेरीच्या मागून अम्हाराच्या गादीवर अली विराजमान झाला. हा मुसुलमान होता. पण सायमेनचा सुभेदार युबी यानें अलीवर स्वारी करून त्याला पराभूत केलें व टायग्रे येथील गादी बळकाविली या वेळीं उत्तर अबिसीनियामध्यें दोन तट झालेले होते. अम्हारा प्रांताचा पराभूत राजा अली हा ब्रिटिश प्रॉटेस्टंट लोकांच्या आश्रयास होता व टायग्रे व युबी हे फ्रेंच रोमनकॅथोलिकांच्या आश्रयास गेलेले होते. दोन तटांमधील हा अन्तर्गत कलहाग्नि बराच वेळ पावेतों आंतल्याआंत धुमसत होता; तो, कासा अथवा थीओडोर बादशहाच्या अमदानींत एकाएकीं भडकला व त्याच्या ज्वाला अंतरिक्षांत जाऊं लागल्या.

कासा याचा जन्म १८१८ सालीं पश्चिम अम्हारा प्रांतांतील क्वारा नामक जिल्ह्यांत झाला. चुलत्याच्या मरणामुळें क्वारा जिल्ह्याची मालकी कासाला मिळाली. १८४१–१८४७ च्या दरम्यान यानें रासअलीविरुद्ध बंडाचें निशाण उभारलें व पुढें लवकरच स्वातंत्र्य पुकारलें. रासअली व युबी यांच्या संयुक्त सैन्याचा यानें १८५३ त गोंगोरा येथें पराभव

केला. कासानें आतां देशांतील इतर भागांकडे मोर्चा वळवून गोजम आणि टायग्रे येथील राजांचा पराभव केला व तिसरा थीओडोर या नांवाखालीं बादशहातीवर आरोहण केलें.

थीओडोरच्या साम्राज्यसत्तेच्या आड आतां फक्त शोआ प्रांत कायतो उरला होता व त्यावर स्वारी करण्याचें थीओडार निमित्तच शोधीत होता. शोआचा राजा मेलीकॉथ यानें १८५० त रास अलीशीं तह केल्यामुळें आयतेंच निमित्त सांपडून त्यानें शोआ प्रांतावर स्वारी केली. मेलीकॉथ युद्ध चालू असतांच मरण पावला व बाल राजा मेनेलेक याला हस्तगत करून विजयी होत्साता थीओडोर गोंडार येथें परतला.

यानंतर थीओडोर हा बोलोगाला लोकांवर विजय मिळविण्याकरितां निघाला. त्यांचा देश लुटून त्यानें मॅगडाला शहर घेतलें, व आपली सत्ता तेथें स्थापन केली.

थीओडोर व ग्रेटब्रिटन यांच्यांत क्षुल्लक कारणामुळें भांडण उपस्थित झालें. थीओडोरनें इंग्लंडच्या राणीसाहेबांस पाठविलेल्या पत्रास लवकर उत्तर येईना म्हणून त्यानें ब्रिटिश वकील कॅप्टन कॅमेरॉन व त्याचे इतर सोबती यांनां तुरुंगांत टाकिलें. दुसऱ्या एका पत्रांत त्यानें राणीसाहेबांनां आपल्याकडे कांहीं यूरोपियन मजूर व यंत्रसामुग्री पाठवून देण्याची विनंति केली. राणीसाहेबांनीं त्याप्रमाणें कांहीं मजूर व यंत्रसामुग्री पाठविली व कैद्यांची सुटका करण्यास थिओडोरला सांगितलें. परंतु याचा बादशहाच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं व अबिसीनिया आणि ग्रेटब्रिटन यांच्यांत युद्ध जुंपलें. पहिली चकमक अरोगीच्या मैदानावर झडली. तींत थीओडोरच्या सैन्याला आपलें पाऊल मागें घ्यावें लागलें. बादशहानें तहाची इच्छा प्रदर्शित करून सर्व यूरोपियन कैद्यांची सुटका केली, तथापि ब्रिटिशांची इतक्यांनीच युद्ध थांबविण्याची इच्छा नसल्यामुळें त्यांनीं मॅगडाला घेतलें पण शहरांत जाऊन पाहतात तों त्यांनां थीओडोरच्या मृत शरीराचें दर्शन झालें. त्याचा मुलगा अलमायाहू याला त्याच्या बापाच्या इच्छेनुसार इंग्लंडला नेण्यांत आलें. सर्वत्र स्थिरस्थावर करण्यांत आल्यावर इंग्रजी सैन्यानें १८६८ च्या मे महिन्यांत अबिसीनिया देश सोडिला.

शोआ प्रांताच्या राजाचा मुलगा मेनेलेक हा थीओडोरच्या देखरेखीखालीं त्याच्या ताब्यांत काळ कंठीत होता हें मागें सांगितलेंच आहे. थीओडोरच्या अडचणींचा फायदा घेऊन यानें बोलोगाला लोकांच्या राणीकडे पलायन केलें. या राणीचा मुलगा थीओडोरकडे ओलीस ठेवलेला होता. मेनेलेकला आपल्या स्वाधीन न केल्यास त्या मुलास जिवें मारण्याची थीओडोरनें राणीस धमकी दिली. परंतु या शूर राणीनें आपल्या राज्याची व स्वतःच्या लाडक्या मुलाच्या प्राणाची किंमत देऊन मेनेलेकचें संरक्षण केलें. मेनेलेक सुरक्षितपणें शोआ येथें पोंचला व तेथील राज्यावर आरुढ झाला.

डीजाज कासा नामक तद्देशीयसरदारानें ब्रिटिशांस थिओडोर विरुद्ध बरीच मदत केली असल्यामुळें त्यांनीं त्याला शस्त्रास्त्रें व दारूगोळा देऊन गौरविलें होतें. या साधनांच्या जोरावर त्यानें टायग्रे, अम्हारा व गोंडार येथील राजांचा पराभव करून जॉन या नांवाखालीं 'बादशहातीवर' आरोहण केलें. १८७२ सालीं इजिप्तनें बोगास काबीज केल्यामुळें त्यानें इजिप्शियन सैन्यावर चाल करून गुंडेट येथें १३ नोव्हेंबर १८७५ रोजीं त्यांचा पुरा मोड केला. २५ मार्च १८७६ रोजीं त्यानें दुसऱ्यांदां आलेल्या इजिप्शियन सैन्याचाहि पराभव केला व आपल्या विजयी सैन्यासह शोआ प्रांताकडे मोर्चा वळविला. यावेळीं शोआ येथें नुसती बजबजपुरी माजून राहिली होती. यामुळें जॉन बादशहाला मेनेलेकच्या सैन्यावर मात करणें सोपें झालें. शोआच्या स्वातंत्र्याचा अस्त होऊन तो परवशतेच्या काळोखांत खितपत पडला.

अबिसीनियाच्या राजकारणाच्या रंगभूमीवर यापुढें इटाली हें पात्र दिसावयाला लागलें, असावबेच्या उत्तरेकडील बैलूल बंदर इटालीनें १८८५ मध्यें काबीज केल्यामुळें जॉन व मेनेलेक या दोघांनांहि संताप चढला. इजिप्तपासून इटालीनें मसावा घेतल्यामुळें तर या त्यांच्या संतापांत अधिकच भर पडली. १८८७ च्या जान्युआरींत युद्धास तोंड लागलें पण त्यांतून निश्चित असें कांहींच निष्पन्न झालें नाहीं. इकडे जॉन व माहदीच्या लोकांत वितुष्ट उत्पन्न होऊन माहदीच्या सैन्यानें गोंडार घेतलें. जॉन व माहदीच्या लोकांत गालाबाट येथें मोठी लढाई होऊन तींत माहदीच्या सैन्याचा पराभव झाला, पण जॉनच्या शरीरांत गोळी शिरल्यामुळें तो मरण पावला. जॉनच्या मृत्यूची वार्ता ऐकतांच मेनेलेकनें बादशाहत काबीज केली व जॉनचा मुलगा मांगाश याला आपली सत्ता मान्य करण्यास भाग पाडिलें. २मे १८८९ रोजीं इटालीनें मांगाशशीं मित्रत्वाचा तह केला याला युक्कीअल्ली तह म्हणतात. कांहीं कालानंतर इटलीनें संधान बांधण्यास सुरुवात केली, हें पाहतांच मेनेलेक खडबडून जागा झाला व त्यानें इटालीस याचा जाब विचारला. इकडे मांगाश यानेंहि इटालीविरुद्ध माहदीच्या अनुयायांशीं कारस्थान सुरू करून मोठ्या सैन्यानिशीं इटालियन मुलुखावर स्वारी केली. १८९५ मध्यें इटालियन सैन्यानें त्याचा पाडाव केला. परंतु मांगाशच्या साहाय्यार्थ मेनेलेक धांवून आल्यामुळें इटालीला मागें पाऊल घेणें भाग पडलें ( १८९५–९६ ).

सैन्याची पुनः जमवाजमव करून इटालीयनांनीं अबिसीनियाशीं अॅडावा येथें सामना दिला पण त्यांतहि त्यांचा इतका जबरदस्त पराभव झाला कीं, त्यांनां फिरून तोंड वर करतां आलें नाहीं. अखेरीस युक्कीअली तह रद्द करण्यांत येऊन अबिसीनियाचें स्वातंत्र्य मान्य करण्यांत आलें. मेनेलेकच्या बादशाही सत्तेविरुद्ध मांगाश फिरून बंड करण्याच्या विचारांत आहे असें दिसून आल्यावरून १८९८

साली मेनेलेकनें त्याच्यावर स्वारी करून त्याला शरण येण्यास भाग पाडलें. १९०२ साली इंग्लंड व अबिसीनिया यांच्यांत तह होऊन सूदन व अबिसीनिया यांच्यांतील सरहद्द आंखण्यांत आली. १९०७ साली अबिसीनिया व ब्रिटिश ईस्ट आफ्रिका आणि युगांडा यांच्यांतील सरहद्दी आंखण्यांत आल्या.

१८९९ साली हाजी महमद अबदुल्ला यानें ब्रिटिश सोमालीलँडच्या सरहद्दीवर बंड उभारलें. बंडाचा मोड करण्याच्या कामीं अबिसीनियननांनीं ब्रिटिशांस शेवटपर्यंत मदत केली. १९०३–०४ सालांपर्यंत हें बंड चाललें होतें, तरीहि त्याचा मोड झाला नाहीं.

यावेळी मेनेलेकचें वैभव अगदीं शिखरास पोंचलें होतें. बहुतेक यूरोपियन राष्ट्रांनीं आपले प्रतिनिधी त्याच्या दरबारीं ठेविले. १९०३ मध्यें युनायटेडस्टेट्स व अबिसीनिया यांच्यांत व्यापारी तह करण्यांत आला १९०५ मध्यें जर्मनीनेंहि अबिसीनियाशीं व्यापारी तह केला.

१९०६ सालीं रास माकोनेन व मागांश हे दोन जवळचे वारस मरण पावल्यामुळें देशांत राज्यलोभी दूरच्या वारसांत तंटेबखेडे होण्याचीं चिन्हें दृग्गोचर होऊं लागलीं. विनाकारण होणारा रक्तपात टाळतां यावा म्हणून मेनेलेकनें १९०८ सालीं लिजयासु नामक आपल्या नातवाला आपला वारस नेमिलें.

१९१० मध्यें तो कांहीं रोगामुळें राज्यकारभार पाहण्यास असमर्थ झाला तरी १९१३ डिसेंबर मध्यें तो मरेतों लोक त्याला सर्वश्रेष्ठ सत्ताधीश म्हणून मानीत असत. मेनेलेकचा नातू लिजयासु यास १९१० मध्यें रीजंट नेमण्यांत आलें, व तोच गादीचा वारस ठरलेला होता. पण मेनेलेकची राणी तैतु हिनें विरोध करून सत्ता आपल्या हातीं घेतली. परंतु एक वर्षानंतर राजवाड्यांतच क्रांति होऊन तिच्या हातून सत्ता काढून घेण्यांत आली. त्यानंतर तिनें राज्यकारभारांत अखेरपर्यंत ढवळाढवळ केली नाहीं. ती १९१८ फेब्रुवारीमध्यें मरण पावली.

१९११ पासुन लिजयासूच्या हातीं पूर्ण सत्ता आली व मेनेलेकच्या मरणानंतर त्याला बादशहा म्हणून सर्वांनीं मान्य केलें. तथापि लिजयासु याचें वर्तन अनीतीचें असून कारभार जुलमी होता. शिवाय कोट—सव्वाकोट लोकसंख्येपैकीं पांच लक्ष लोकांचें त्यानें खडें सैन्य ठेविलें होतें. हे सैन्यांतले लोकच लुटालूट करून उपजीविका करीत. या त्रासामुळें प्रजेंत असंतोष माजत चालला.

१९१० ते १९२१ याच्या दरम्यान अबीसिनियाच्या आंतरराष्ट्रीय दर्जांत कोणताहि फरक झाला नाहीं. स्पॅनिश प्रोटेक्टरेट्स वगळल्यास अबीसीनिया हा आफ्रिकेंतील एकच देश गेल्या जागतिक युद्धांत पूर्ण तटस्थ राहिला होता.

१९१४ मध्यें जिबुतीपासून हवाशनदीपर्यंत रेल्वे झाली होती व यूरोपांतील मालाची आवड लोकांत वाढत चालली होती. अशा सुमारास १९१४ मध्यें जागतिक युद्ध सुरू झालें. लिजयासु याजवर जर्मन व तुर्क यांचें वजन बरेंच होतें. अबिसीनियन लोक ख्रिस्ती असून लिजयासु ख्रिस्ताचार नीट पाळीत नसल्यामुळें त्याची प्रजा नाखूष होत चालली होती. लवकरच लिजयासूनें उघडपणेंच इस्लामी धर्म स्वीकारला व आपल्या साम्राज्यांतील सर्व मुसुलमान एकत्र करून तुर्कजर्मनांना मिळण्याची तयारी करूं लागला. त्यानें आपल्या सत्तेखालील मुसुलमान संस्थानिकांच्या मुलींशीं लग्नें लावलीं. १९१६ मध्यें तुर्कस्तानचा सुलतान हा खलीफ म्हणजे धर्मगुरू म्हणून मानण्याचें त्यानें सरकारीरीत्या जाहीर केलें.

शिवाय त्यानें आपल्या मुसुलमान अनुयायांनां असें कळविलें कीं, जर्मनी व आस्ट्रिया यांनीं इस्लामीधर्म स्वीकारला असून फ्रान्समध्यें तो धर्म प्रस्थापित करण्याचें काम चालू आहे. एखादा मोठा विजय जर्मनीला मिळतांच दोस्तराष्ट्रांविरुद्ध युद्धांत सामील व्हावयाचें असेंहि त्यानें प्रसिद्ध केलें.

लिजयासूच्या या ख्रिस्तविरोधी वर्तनामुळें त्याचा नाश झाला. दोस्तांचे अडिसअबाबा येथील प्रतिनिधी विशेषतः ब्रिटिश मिनिस्टर दि ऑनरेबल डब्ल्यू. जी. थेसिगेर, यांनीं तुर्कजर्मन पक्षातर्फेची चळवळ हाणून पाडण्याची फार खटपट केली व तिला यश येऊन २७ सप्टेंबर १९१६ रोजीं धर्मांतराच्या कारणास्तव लिजयासूला पदच्युत करण्यांत आलें. त्याची आत्या प्रिन्सेस झौडितु ( जुडिथ ) हिला बादशाहीण म्हणून जाहीर करण्यांत आलें, व या गोष्टीस सर्व प्रजेची मान्यता मिळाली. लिजयासु हारार येथें सैन्य जमवीत होता. त्याला ही बातमी कळतांच इस्लामी धर्माचा त्याग केल्याचें त्यानें जाहीर केलें. पण त्यावर कोणाचा विश्वास बसला नाहीं. उलट त्याच्या मनाचा दुबळेपणा मात्र व्यक्त झाला. लवकरच उभयपक्षांत युद्ध सुरू झालें. त्यांत लिजयासूला हारार सोडून पळून जावें लागलें. पण लिजयासूचा बाप रासमिकेल यानें सैन्य जमवून लढाई दिली. १९१६ आक्टोबर मध्यें शेनो येथें निकराची लढाई होऊन त्यांत मिकेलच्या सैन्याचा पराभव झाला व तो स्वतः कैद केला गेला. १९१७ मध्यें सैन्य जमवून पुन्हां लिजयासूनें लढाई सुरू केली. पण त्यांतहि त्याचाच पराभव झाला, व तो डनकिल व सोमाली लोकांत भटकत दिवस काढूं लागला. १९१८ मध्यें अरबस्तानांतील तुर्कांची मदत मिळविण्याचा प्रयत्न त्यानें केला आणि अखेर १९२१मध्यें याला सरकारी सैन्यानें कैद केलें.

झौडितु बादशाहीण दोस्तांच्या बाजूची होती. तिनें १९१९ मध्यें लंडन, पॅरिस, रोम, ब्रूसेल्स, व वॉशिंगटन येथें मिशनें पाठवून विजयाबद्दल दोस्तराष्ट्रांचें अभिनंदन केलें. या मिशनांमार्फत गुलामगिरी बंद करण्याचा व शेतकी व व्यापार वाढविण्याचा सदुपदेश दोस्त सरकारांनीं अबिसीनियाच्या सरकारला केला.

या देशाची आर्थिक उन्नति होण्यास मुख्य दोन अडचणी आहेत, त्या अंतर्गत अशांतता व दळणावळणाच्या

साधनांचा अभाव. जागतिक युद्धानंतर व एडनच्या आखाता पासून अडिसअबाबापर्यंत रेल्वे पुरी झाली असल्यामुळें आतां सुधारणा होईलसें वाटतें. १९२० मध्यें एकंदर व्यापार ३५-४० लाख पौंडांचा झाला. निर्गत व्यापाराचा मुख्य माल म्हणजे कातडीं, काफी व मधमाशांचें मेण हा होय. मुख्य आयात माल कापसाचें कापड. येथील पुष्कळसा व्यापार ग्रीक, सीरियन व अरबलोकांच्या हातीं आहे. येथें शेतकी सुधारलेली नाहीं, खनिज संपत्तीलाहि हात लागलेला नाहीं. तसेंच जलशक्तीचाहि उपयोग करून घेण्याचा उपक्रम झालेला नाहीं.

सन १९२३ च्या पूर्वार्धांत अबिसीनियामधील गुलामगिरी विषयीं एक ब्रिटिश सरकारचा "व्हाईट पेपर" प्रसिद्ध झाला त्यांत हिजाजच्या किनाऱ्याजवळ एक २६ गुलाम असलेलें गलबत आढळलें आणि ते गुलाम अबिसीनियामध्यें खरेदी केले होते आणि ते अरबस्तानांत विकण्यासाठीं जात होते, अशा प्रकारचा मजकूर होता. अबिसीनियाच्या रीजंटनें अशी खातरजमा दिली कीं, त्याचें सरकार गुलामाच्या व्यापाऱ्यांनां पकडून शिक्षा करण्यास उत्सुक आहे. त्यावेळीं अशीहि धास्ती पडली होती कीं, अबिसीनियांतील गुलाम पकडण्याचे प्रदेश निर्जन होत गेले म्हणजे अबिसीनियांतील या व्यापाराचे नाईक आपलें लक्ष केनियांतील देश्य लोकांकडे वळवितील आणि तेथील वसाहतीचा सहज पराभव करतील. १९२३ च्या सप्टेंबरमध्यें अबिसीनियाचा प्रवेश राष्ट्रसंघात झाला. त्यावेळेस त्याला स्वीकारावें किंवा नाहीं, यासंबंधानें राष्ट्रसंघास विचारच पडला आणि तो विचार पडण्याचें कारण आस्ट्रेलियानें अबिसीनियात गुलामांचा व्यापार अजन आहे, असें कारण किंवा समजूत घेण्यास आक्षेप म्हणून दिलें होतें.

**अबीर ( बुक्का ).**—ह्या पदार्थाचा तसेंच गुलालाचा खप सर्व हिंदुस्थानात होतो. बुक्याचा खप पंढरपूर, अळंदी, देहू वगैरे वारकरी पंथातील क्षेत्रात पुष्कळ होतो. हरिकीर्तन, पुराण, वगैरे प्रसंगींहि याचा उपयोग करण्याचा प्रघात आहे. यासाठीं व्यापारी दृष्टीनें बुका करण्याच्या कांहीं ठळक कृती खालीं दिलेल्या आहेत.

**पांढऱ्या रंगाचा अबीर करण्याची कृति.**—कृति नं. (१) वाळा, चंदन, कापूरकाचरी, नाचणीचें पीठ, यांच्या मिश्रणानें पांढऱ्या रंगाचा बुका होतो. कृति नं. (२) देवदार, लवंगा, दवणा, गवलाकचरा, वेलची यांच्या मिश्रणानेंहि पांढरा बुका तयार करतात. याचा प्रघात बंगाल्यांत विशेषेंकरून आहे.

**काळ्या रंगाचा अबीर.**—कृति नं(१), चंदन, नागरमोथे, गवलाकचरा वगैरे जिनसांपैकीं ज्या जिनसांचा बुका करणें असेल तो जिन्नस चांगला प्रथम उन्हांत वाळवून मुसळानें अगर पहारीनें बारीक कुटावा अगर दळून काढावा. नंतर त्यास काळेपणा येण्यासाठीं त्यांत कोळशाची पूड घालून दळावें. वस्त्रगाळ केल्यानंतर चोथा राहील तो पुन्हां कुटावा. बुक्याचा उपयोग उदबत्त्या तयार करण्याकडेहि होतो. कृति नं. (२), सफेदचंदन २०, गुलाबकळी २०, पाच २०, बकुळीचींफुलें १०, कृष्णागरु १०, जटामांसी ३, वाळा ५, लोबान ५, नागरमोथा ५, दवणा ५, मरवा ५, चंदनीतेल ४. हे पदार्थ वर सांगितलेल्या प्रमाणांत चंदनीतेल खेरीजकरून बाकी सर्व कुटून वस्त्रगाळ करावे. नंतर मसाल्यास केशरी पाण्याचा व चंदनी तेलाचा हात द्यावा म्हणजे फार उंची जातीचा अबीर होतो.

**फिकट रंगाचा अबीर.**—जैन लोकांचा फिकट रंगाचा अबीर (वसक्षेप) करतात तो करण्याची कृति-चंदन, केशर, कापूर, कस्तुरी, यांच्या मिश्रणानें हा अबीर करतात. तो फार सुवासिक असून किंमतीनेंहि महाग पडतो.

**अबुल आला उल माआरी.**—(९७३-१०५७) हा एक प्रसिद्ध अरबी कवि व पत्रलेखक होऊन गेला. त्याचा सिरियामध्यें जन्म झाला; अगदीं लहानपणींच त्याचा बाप वारला व पुढें चार वर्षांचा असतांना देवीमुळें त्याचे डोळे गेले. असें असतांना देखील अलेप्पो, अँटिऑक, आणि ट्रिपोली येथील सुप्रसिद्ध पंडितांपासून ज्ञान मिळविण्याच्या कामांत त्याला अडथळा आला नाहीं. २१ व्या वर्षी तो परत मारा येथें आला. १००७ मध्यें तो बगदादला गेला. तेथें त्याची पंडितात गणना होऊं लागली. दोन वर्षांनीं परत मारा येथें येऊन त्यानें मरेपर्यंत लेखनांत व अध्यापनांत आपलें आयुष्य वेंचिलें.

त्याच्या ग्रंथापैकीं प्रमुख म्हणजे, दोन काव्यसंहिता व दोन पत्रसंहिता होत. "सक्त उझझंद" आणि" लुझूमियात" हीं त्याच्या काव्यसंग्रहांचीं नावें आहेत.

**अबुल फजल**— अबुल फजल उर्फ अल्लामी (१५५१-१६०२) हा शेख मुबारिक याचा मुलगा आग्र्याजवळ १४ जानेवारी १५५१ रोजीं जन्मला. हा अस्सल अरबी कुटुंबांत जन्मला होता. या कुटुंबाचा पूर्वज शेख मुसा हा अरबस्तानांत रहात होता. ९ व्या शतकांत हें कुटुंब सिंधप्रांतांत राहिलें होतें. तेथून मुबारिकचा बाप शेख खिज हा साधुवृत्तीनें फिरत फिरत अजमीरनजीक नागोर येथें येऊन राहिला व तेथें शेख मुबारिक जन्मला. मुबारिकच्या लहानपणींच ह्या कुटुंबाची दुष्काळांत वाताहात झाली; पण सुदैवानें मुबारिक बचावला. तो त्या काळांतील विद्यापीठांतल्या एका अध्यापकाजवळ राहून चांगली विद्या शिकला. पुढें तो पुष्कळ वर्षे अहमदाबादेस राहून नंतर आग्र्याजवळ यमुनाकाठीं एका साधूजवळ राहिला, व तेथें त्यानें अध्यापकाचें काम सुरू केलें. मुबारिक फार विद्वान व स्वतंत्र विचाराचा होता. तो जुन्या ग्रंथांवर विश्वास न ठेवतां खऱ्याखोट्याचा निर्णय स्वतः स्वतंत्र बुद्धीनें करीत असे. त्यावेळीं सुनी, शिया व सूफी असे तीन वेगवेगळे पंथ मुसुलमानांत झाले होते. मुबारिक सुनी पंथांत वाढलेला, पण पुढें शियापंथ

स्वीकारून यूरोपांतील लूथरप्रमाणें तत्कालीन धार्मिक सुधारणेच्या चळवळींचा तो पुढारी बनला. आग्रा येथेंच त्याचा वडील मुलगा अबुलफैजी व धाकटा अबुलफजल हे दोघे जन्मले व त्यांनां त्यानें चांगलें शिक्षण देऊन स्वतःचे धार्मिक विचार शिकविले. दिल्लीच्या बादशहानें मुबारिक यास जमीनीची नेमणूक करून दिली होती. परंतु जुन्या पंथाच्या उलेमांनीं अकबरास मुबारिक पतित असल्याचें कळविलें व त्याला पकडण्याचा हुकूम मिळविला; तेव्हां मुलांनां आग्र्यासच ठेवून मुबारिक पळून गेला. मागें दोघे मुलगे मोठ्या योग्यतेस चढले. वडील मुलगा सूफीपंथी कवि होता तो सदैव विचारांत मग्न असे, सुरेख कवनें करी व भक्तिपुरःसर ईश्वराचा स्तव करी. तीं कवनें पाहून अकबरानें त्यास आश्रय दिला. तेव्हांपासून या कुटुंबाचा छळ बंद होऊन त्याचें दैव उघडलें (स. १५६८). धाकटा अबुल फजल याची बुद्धि विशाल व महत्त्वाकांक्षा जबर होती, व तो त्या वेळच्या सर्व विद्यांत निपुण होता. वीस वर्षांच्या वयांतच बहुतेक सर्व ग्रंथ वाचून तो बापाप्रमाणें लोकांस पढविण्याचें काम करूं लागला. पुढेंहि संन्यस्तवृत्तीनें राहून तिबेटच्या लामांची, पोतुर्गालच्या पाद्र्यांची व पारशी झेंदावेस्ता पंडिताची गांठ घेऊन त्यांच्याजवळ धार्मिक चर्चा करावी असें त्याच्या मनांत होतें. परंतु अकबरानें फैजीचा जो सत्कार केला त्यामुळें हा सर्व बेत बदलला. दरबारी व समयोचित वर्तन ठेवून स्तुतिपाठकाचें काम करण्यांतहि त्याचा हातखंडा होता. सन १५७४ मध्यें वडील भावाच्या शिफारसीनें त्याची बादशहाशीं ओळख झाली. तो अकबरास परम दैवत समजून त्याला देवाप्रमाणें नमन करून भजूं लागला. अकबरहि स्तुतिप्रिय असल्यानें दोघांचा स्नेह जमण्यास मुळींच उशीर लागला नाहीं. हा स्नेह जमला त्या सुमारास अकबर मोठ्या कचाट्यांत सांपडलेला होता. सर्व लोकांस सारख्या प्रेमानें वागवावयाचें असा त्याचा निर्धार असल्यामुळें, पुष्कळ लोकांस शियापंथ स्वीकारल्याबद्दल व स्वतंत्र विचार प्रकट केल्याबद्दल आग्र्याच्या सरन्यायाधीशानें सांगितलेल्या देहान्तशिक्षा अमलांत आणण्यास त्याचें मन धजत नव्हतें. परंतु उलट कुराणधर्मनिष्ठ उलेमांनां दुखविण्याचीहि त्याची तयारी नव्हती. उलेमा हे अभिमानानें फुगलेले व हेकेखोर होते. आरबी भाषा व कुराण ह्यांपलीकडे त्यांची विद्वत्ता नव्हती. फैजी व फजल या दोघा भावांची चलती पाहून व त्यांची बादशहावर छाप बसलेली पाहून उलेमांस अत्यंत वाईट वाटे. बापास छळल्याबद्दल त्यांचा पाडाव करून सूड घ्यावा असें अबुल फजलच्याहि मनांत होतें. इतक्यांत सर्व धार्मिक प्रश्नांचा वादविवाद उलेमांनीं आपल्या देखत करावा, म्हणजे खऱ्याखोट्याचा निकाल सहज करतां येईल असा अकबरानें हुकूम सोडला. या बाबतींत अबुल फजलच्या बुद्धिमत्तेचा व विद्वत्तेचा फायदा करून घेऊन उलेमांचा शिरजोरपणा कमी करून धर्मच्छळ बंद करावा असा अकबराचा हेतु होता. या योजनेप्रमाणें इ. स. १६७६ पासून दर गुरुवारीं सभा भरून शिया, सुनी, सूफी, ब्राह्मण बौद्ध, ख्रिस्ती, यहुदी, पारशी, व इतर पंथांचे विद्वान् जमून वादविवाद निर्भीडपणें व मोठ्या आवेशानें होऊं लागले. अबुल फजल प्रश्न विचारण्याचें व अभिप्राय मागविण्याचें काम करी; बादशहा फक्त ऐकून अखेर निकाल देई. या सभांत अखेर उलेमांचा पाडाव होऊन कुराणास अनुसरून नवीन फेरफार करण्याचा अधिकार बादशहास आहे, अशी कबुली उलेमांस द्यावी लागली. याचें बहुतेक श्रेय अबुल फजलला होतें, त्यामुळें त्याच्याबद्दल बादशहाला फारच आदर वाटूं लागला. जानेवारी १५९० (हिजरी सन ९९८) त अबुल फजलची आई मरण पावली. त्याप्रसंगीं बादशहा स्वतः शांतवनार्थ त्याच्या घरीं गेला होता. अबुल फजल हा सदैव बादशहाच्या सान्निध राहूं लागला व स्वारींत बरोबर जात असे. त्याच्या सल्ल्यानें बादशहानें नवीन धर्म स्थापन केला. यामुळें फजल मुसुलमानास अगदींच दुःसह झाला. त्याचा पाडाव करण्याकरितां विरुद्ध पक्षानें मोठा कट केला व त्यांत राजपुत्र सलीमहि मिळाला. असें सांगतात कीं, सलीम एकदा अबुल फजलच्या घरीं एकाएकीं गेला. तेव्हां तेथें चाळीस लेखक कुराणाच्या एका मोठ्या टीकेच्या प्रती उतरून घेत होते. ती टीका फजलच्या बापानें लिहिलेली होती; पण ते सर्व कागद अकबरास दाखवून 'फजलची भक्ति कुराणावरच आहे; पण तो फक्त तुमच्याजवळ बाह्यात्कारी नवीन धर्माची बढाई मारतो' अशी सलीमनें समजूत करून दिली. तें ऐकून अकबराची फजलवर थोडीशी इतराजी झाली; परंतु फजलच्या वैऱ्याचें हें कारस्थान आहे, असें समजून आल्यावर कांहीं दिवसांनीं अकबर व फजल यांचें पूर्ववत् प्रेम जुळलें; पण सलीमचा स्वभाव दुष्ट होता आणि त्यानें बापाविरुद्ध केलेल्या बंडांत फजल सामील होत नव्हता म्हणून त्याला जगातून नाहींसा करण्याचा विचार सलीमनें ठरविला. अबुल फजल उज्जनीहून आग्र्याकडे येत असतां वाटेंत ओर्च्छा संस्थानच्या जंगलांत सलीमाचा साहाय्यक ओर्च्छाचा राजा वीरसिंहदेव याच्या लोकांनीं त्याजवर छापा घालून १२ आगष्ट १६०२ रोजीं त्याला ठार मारलें. त्याचें डोकें अलाहाबादेस पाठविलें, तें सलीमनें गलिच्छ जागीं टाकून दिलें. त्याच्या धडावर अंत्री येथें बांधलेलें लहानसें थडगें अबुल फजलचें म्हणून अद्याप दाखविण्यांत येतें. ही बातमी कळतांच अकबर एकदम मोठ्यानें ओरडून बेशुद्ध पडला व पुढें मरेपर्यंत या दुःखानें तो अत्यंत विव्हल असे. तथापि मुलानें खून केला ही खात्री असून त्यानें त्याला शिक्षा केली नाहीं. उलटपक्षीं कांहींच्या मतें फलजच्या खुनांत सलीमचें कितपत अंग आहे हें बादशहास अखेरपर्यंत कळलें नव्हतें. वीरसिंहाचा मात्र छळ करून त्यानें आपल्या मनाचें समाधान करून घेतलें.

अबुल फजलची योग्यता बाप व भाऊ ह्या दोघांच्याहि पेक्षां श्रेष्ठ होती. त्यानें किती लेखनकार्य केलें, हें त्याच्या ग्रंथांवरून दिसून येतें. त्याची भाषा साधी व विचार थोर होते. खोडसाळपणाचा त्यास अत्यंत तिटकारा होता. त्याच्या लेखांत अपशब्द बिलकूल सांपडत नाहीं. ‘अकबर नामा’ हा अबुल फजलचा सर्वांत मोठा ग्रंथ होय. यांत उलेमांच्या कृत्यांची भरपूर चर्चा आहे; पण प्रतिपक्षावर द्वेषमूलक शब्दांचा वर्षाव केलेला त्यांत कोठेंहि नाहीं. या ग्रंथाचे तीन भाग असून तिसरा भाग ‘ऐन इ-अकबरी’ म्हणून प्रसिद्ध आहे. पहिल्या भागांत तैमूरपासून हुमायूनपर्यंतचा इतिहास दिला आहे. दुसऱ्या भागांत अकबराच्या कारकीर्दींतील एकंदर महत्त्वाच्या गोष्टींचें वर्णन दिलें आहे. तिसरा भाग ‘ऐन इ-अकबरी’ याचे पांच विभाग असून त्यांपैकीं पहिल्यांत बादशहा, त्याचें कुटुंब, दरबार इत्यादिकांचें वर्णन; दुसऱ्यांत दिवाणी, लष्करी व दरबारी नोकर, त्यांचीं नावें, कामें व पगार यांचें वर्णन, तिसऱ्या विभागांत न्याय व जमाबंदी या खात्यांचें विवेचन; चवथ्यांत लोकांच्या विशेषतः हिंदूंच्या सामाजिक व बौद्धिक स्थितीचें वर्णन आणि शेवटल्या विभागांत थोर पुरुषांच्या व कवींच्या उक्ती, म्हणी व स्फुटवचनें यांचा संग्रह केलेला आहे. हा तिसरा विभाग इ. स. १५९८ त पुरा झाला. या ‘ऐन इ-अकबरी’चें हल्लीं ब्लॉकमन व गॅरेट यांनीं अस्सल प्रतीवरून इंग्रजींत केलेलें भाषांतर उपलब्ध आहे. ब्लॉकमनचा अबुल फजलविषयीं अभिप्राय येणेंप्रमाणेंः-

“अबुल फजलची सत्यप्रीति, परमतसहिष्णुता, त्याचा दरबारचा फार दिवसांचा अनुभव, त्याची सुंदर भाषा व बादशहाचा त्याजवरील भरंवसा यामुळें त्याच्या ग्रंथास विशेष किंमत आली आहे. हें त्यानें आपल्या बादशहाच्या थोरपणाचें व स्वतःच्या विद्वत्तेचें एक प्रकारचें कायमचें स्मारकच करून ठेविलें आहे.”

वरील ग्रंथांशिवाय इतर अनेक विषयांवर त्यानें लिहिलेलीं स्वतंत्र पुस्तकें व अकबरास लिहिलेल्या पत्रांचा संग्रहहि उपलब्ध आहे. त्याला शेख अबदुर्रहमान अफझलखान नांवाचा मुलगा होता. अबुल फजलचें वैर मनांत न ठेवतां जहांगीरनें या मुलाला बहारप्रांताचा कारभार दिला होता. हा इ. स. १६१३ त मरण पावला.

**अबुल फराज** ( ८९७-९६७ )—हा अरब पुरुष कुरेश जातींत उमईदांच्या घराण्यांत जन्मला. हा एक मोठा विद्वान् व कवि होता. उमईद हे स्पेनमध्यें कांहीं काळ राजे होते व त्या उमईद खलिपांपैकीं शेवटचा जो मरवान त्याचा अबुल फराज हा वंशज होता. तो इस्पाहान येथें जन्मला होता, तरी त्यानें आपलें तारुण्य बगदाद येथें घालविलें. प्राचीन अरबी वाङ्मयाबद्दल याची ख्याति असे. यानें आपल्या आयुष्याचा उत्तरार्ध महंमदी जगांत हिंडण्यांत घालविला. शेवटीं तो भ्रमिष्ट बनला. हा शियापंथी होता. त्याच्या काव्यांपैकीं “किताब उल अघानी” हा ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**अबुल फिदा** ( १२७३-१३३१ )—हा अरबी इतिहास-भुगोलकार दमास्कस येथें जन्मला. वयाच्या १२ व्या वर्षापासून ख्रिस्ती धर्मयोध्यांविरुद्ध यानें चंग बांधला व त्यांच्याशीं झालेल्या लढाईत फिदानें बरेंच शौर्य गाजविलें होतें. १३१० मध्यें त्याला हाम्हाचा सुभेदार करण्यांत आलें व पुढें दोन वर्षांनीं तो राजा झाला. त्याचा राज्यकारभार फार व्यवस्थित असे. आपल्या दरबारीं येणाऱ्या पंडितांची तो चांगली संभावना करी. सुलतान मलिक उल-मुय्यद हा त्याचा किताब असे. त्याचा प्रमुख ऐतिहासिक ग्रंथ “मानवजातीचा संक्षिप्त इतिहास” हा होय; त्यांत सृष्ट्युत्पत्तीपासून १३२९ पर्यंतची माहिती आहे. त्याच्या “भूगोल” या ग्रंथांत जगांतील प्रमुख स्थळें कोष्टकरूपानें आलीं आहेत. प्रत्येक स्थलनामापुढें त्याचे अक्षांशरेखांश, हवामान व प्राचीन उल्लेख दिले आहेत. याच्या कांहीं ग्रंथांचीं लॅटिनमध्यें भाषांतरेंहि आहेत.

**अबुल फैजी**—अकबराच्या दरबारांतील सुप्रसिद्ध सुफीपंथी कवि. हा नागोरच्या शेख मुबारकचा पुत्र असून अबुल फजल याचा वडील भाऊ होता ( अबुल फजल पहा ). याचा जन्म ता. १६ सप्टेंबर सन १५४७ ( १ शाबान ९५४ ) रोजीं आग्रा येथें झाला. फैजीची व अकबराची प्रथम भेट अकबराच्या कारकीर्दीच्या १२ व्या वर्षी झाली. यावेळीं फैजीच्या बापावर अकबराच्या दरबारांतील मुसुलमानी पंडितांनीं बालंट आणल्यामुळें तो आपल्या मुलांनां आग्र्यासच ठेवून अज्ञातवासांत गेला होता. फैजीचीं कवनें वाचून अकबरास समाधान वाटलें आणि चितोडच्या वेढ्याचें काम चालू असतां त्यानें फैजीस भेटीस बोलाविलें. त्यास शिक्षा करण्याकरितां बादशहानें हें पाचारण केलें, अशी प्रथम उलेमांची समजूत होऊन त्यांस आनंदाच्या उकळ्या फुटूं लागल्या. फौजेच्या अधिकाऱ्यानें मुबारिकच्या घरीं जाऊन त्यास वाटेल तसा त्रासहि दिला. फैजीला पकडून त्यानें बादशहासमोर नेलें. तेथें बादशहानें फैजीचा सत्कार केला, तेव्हां त्याच्या जीवांत जीव आला.

फैजी ह्याजकडे कांहीं दिवस शहाजादा मुराद ह्यास पढविण्याचें काम होतें. पुढें त्याची आग्र्याच्या ‘सदरच्या’ जागीं नेमणूक झाली. सन १५८८ त त्यास ‘कविराज’ ह्या अर्थाचा किताब मिळाला. हिंदुस्थानांत दोनच मोठे उत्कृष्ट फारशी कवी होऊन गेले, पहिला अमीर खुश्रु व दुसरा फैजी. इतिहास, तत्त्वज्ञान, वैद्यकी, पत्रव्यवहार व कवित्व या विषयांत त्याचा हात धरणारा कोणी नव्हता. त्याच्या पूर्वीच्या कवितांत फैजी असें कव्यांचें नांव आहे; परंतु मृत्यूच्या अगोदर एक दोन महिने तो फैजीच्या ऐवजीं फैयाजी असें नांव घालूं लागला होता. बादशहाच्या आज्ञेवरून त्यानें महाभारतांतील नलदमयंती आख्यानावर फारशीमध्यें काव्य

केलें होतें. हिंदु वाङ्मयाचा व शास्त्राचा काळजीपूर्वक अभ्यास करणारा पहिला मुसुलमान फैजी हाच होता. संस्कृतमधील काव्य व तत्त्वज्ञानग्रंथांशिवाय त्यानें भास्कराचार्यांच्या बीजगणित व लीलावती या ग्रंथांचींहि भाषांतरें केलीं होतीं. त्याची स्वतंत्र कविताहि बरीच असून दुसरींहि कित्येक पुस्तकें त्यानें फारशीमध्यें लिहिलेलीं आहेत. त्यानें फारशी मूळाक्षरांतील २८ अक्षरांपैकीं टिंबें नसलेल्या १३ अक्षरांचाच फक्त उपयोग करून कुराणावर सवात–उल–इलहाम नांवाची एक विस्तृत टीका लिहिली होती. त्यानें एकंदर १०१ ग्रंथ रचले होते असें म्हणतात. त्याची वकील म्हणूनहि कधीं कधीं नेमणूक होत असे. उदाहरणार्थ, तो इ. स. १५९२ च्या सुमारास दक्षिणेंत होता व येथूनच त्यानें राजाच्या इतराजींत असलेल्या बदाउनी नामक इतिहासकारास पत्र लिहिलें होतें.

आगष्ट सन १५९३ (जिल्काद १००१) त शेख मुबारिक मरण पावला, तेव्हां त्याच्या दोघांहि मुलांस अत्यंत दुःख झालें. मुबारिकला जरी पुष्कळ शत्रू होते, तरी त्याच्या विद्वत्तेबद्दल सर्व लोकांत मोठा आदर होता. स्वतः फैजी यास दम्याचा विकार होता. तो बापाच्या पश्चात् अवघ्या दोन वर्षांनींच आग्रा येथें मरण पावला (शनिवार ता. ४ (५ ?) आक्टोबर सन १५९५). मरणापूर्वीं थोडा वेळ बादशहा अकबर आपला विद्वान हकीम बरोबर घेऊन फैजीच्या समाचारास गेला असतां फैजीचें बोलणें बंद झालें होतें. बादशहा बोलला, 'शेखजी, माझे हकीम औषध द्यायला आणिले आहेत, औषध घ्या.' त्यावर कांहींच उत्तर आलें नाहीं, असें पाहून बादशहाला अत्यंत कळवळा आला. असें म्हणतात कीं, त्यानें त्यावेळीं वैतागानें डोकीचें पागोटें काढून जमिनीवर आपटलें आणि बराच वेळ बसून अत्यंत शोक केला. [ सं द र्भ ग्रंथ.—ऐनइ अकबरी, मुसुलमानी रियासत; बीलचा कोश ].

**अबू**—अर् बुद्ध म्हणजे ज्ञानाची टेंकडी अशी याची व्युत्पत्ति सांगितलेली आहे. राजपुतान्यांतील शिरोही संस्थानांत दक्षिणेस हा एक प्रसिद्ध पर्वत आहे. हा राजपुताना माळवा रेल्वेच्या अबुरोड स्टेशनपासून १७ मैलांवर व मुंबईपासून ४४२ मैल उत्तरेस आहे. उ. अ. २४°३६' व पू. रे. ७२°४३'. ही अरवली पर्वताची एक शाखा समजली जाते तरी त्यापासून अगदीं तुटक आहे. याचा आकार लांब व अरुंद आहे परंतु याचा माथा एक निसर्गरमणीय पठार आहे. हें समुद्रसपाटीपासून ४००० फुटांवर असून लांबी १२ मैल व रुंदी २ ते ३ मैल आहे याचें मुख्य शिखर "गुरु शिखर" हें समुद्रसपाटीपासून ५६५० फूट उंचीवर आहे. हवा साधारण सर्व वर्षभर सुखावह व आरोग्यदायक असते. जानेवारी महिन्यांत येथील उष्णतामान ५९° फ. अंशावर असतें ते उन्हाळ्यांत मे महिन्यांत ७९° फ. अंशावर येतें. येथील प्रेक्षणीय भाग नयनमनोहर असून पश्चिम व उत्तर बाजू एकदम उतरणीच्या आहेत. पूर्व व दक्षिण या बाजूंनां पुष्कळ फांटे फुटलेले असून त्यांच्यामध्यें खोल दऱ्या आहेत.

अरवली पर्वत व सपाट मैदानें यांमध्यें अढळणाऱ्या झाडांनीं अबूचा पायथा व उतरणी गच्च भरून गेल्या आहेत. अबूवर पाऊस फार पडत असल्यामुळें सर्व राजपुतान्यापेक्षां येथें झाडी फार आहे. येथें पांढऱ्या गुलाबाचे ताटवेच्याताटवे लागलेले असतात व करवंदीच्या फुलांचा वास हवेमध्यें दरवळून गेलेला असतो. कार नांवाचें एक झाड येथें उगवतें, तें दिसण्यांत अति सुंदर असून जेव्हां सहा सात वर्षांनीं त्याला फुलें येतात तेव्हां त्यांचा निळा जांभळा रंग एकंदर सृष्टिसौंदर्यांत पुष्कळच भर टाकतो.

अबूच्या कँपांत पोंचण्यापूर्वी सुमारें एक मैल अलीकडे दिलवाड्यास जाणाऱ्या मंडळीस उतरावें लागतें. उतारूंनां कँपांत घेण्यापूर्वी डॉक्टरांची तपासणी होते. कँपमध्यें बाजार व लोकवस्ती आहे. हे राजपुताना सरकारचें ग्रीष्म ऋतूंतील वसतिस्थान आहे. इ. स. १८४० पर्यंत हें हवेचें ठिकाण ठरलें नव्हतें. जोधपूर पलटणीचे ऑफिसर्स व सिरोहीचा पोलिटिकल सुपरिन्टेंडेंट हे उन्हाळ्यांत हवा खाण्यास येत असत. इ. स. १८४५ मध्यें सिरोहीच्या राजानें येथें आरोग्यगृह बांधण्याकरितां कांहीं जमीन गाई न मारण्याच्या व गाईचें मांस वर न नेण्याच्या अटीवर दिली. तेव्हां येथें आजारी यूरोपियनांकरितां खोल्या बांधण्यांत आल्या. सध्यां येथें लष्करी व मुलकी असे दोन भाग आहेत. त्यांची वस्ती स्वाभाविकपणें नेहमीं कमीजास्त होत असते. लोकसंख्या सुमारें साडेतीन हजार आहे. डोंगरांत एकमेकांपासून अलग अशीं भिल्लांचीं १८ गावें आहेत. त्यांची लोकसंख्या सुमारें दोन हजार आहे. अबूला एक म्युनिसिपालिटी असून तेथील मॅजिस्ट्रेट हाच तिचा सेक्रेटरी असतो. म्युनिसिपालिटीचें उत्पन्न सरासरी वर्षास ११००० रु. असतें. येथील स्मालकॉज कोर्ट व डिस्ट्रिक्ट कोर्टच्या न्यायाधीशाचें काम मॅजिस्ट्रेटच पाहतो. गांवांत शेट नागरदास रणछोडदास यांची मोठी पेढी आहे. सरकारचे हेच खजिनदार होत; अबूवर प्रवाश्यांनां राहण्यासारखी कांहींहि सोय नाहीं.

येथें तीन शाळा आहेत व त्यांमध्यें सुमारें अडीचशें विद्यार्थ्यांची शिकण्याची सोय आहे. यांपैकीं "अबू लॉरेन्स स्कूल" नांवाची शाळा यूरोपियन शिपायांच्या पोरक्या मुलांकरितां असून त्या शाळेसाठीं दरवर्षी ३०००० रु. खर्च केला जातो.

दं त क था.—हें प्राचीनकाळीं देवांचें राहण्याचें आवडतें ठिकाण होतें. येथें वसिष्ठादि मुनी तपाचरण करीत. त्यावेळीं या जागीं पर्वत मुळींच नसून फक्त जमीनींत एक विवर असे. त्यांत एकदां वसिष्ठ मुनीची कामधेनू पडली असतां ती मोठ्या चमत्कारानें पाण्याच्या उद्गमाबरोबर एकदम वर आली. असे अपघात नेहमीं घडूं नयेत म्हणून ऋषींनें

कैलासनाथाची प्रार्थना केली. शंकरानें हिमाचलपुत्रांनां या कामावर नेमिलें. हिमाचलाच्या एका पुत्रानें तें विवर बुजवून टाकण्यासाठीं अर्बुदसर्पावर बसून त्या जागीं उडी घेतली. पण आंत तक्षक चळवळ करूं लागल्यामुळें वसिष्ठानें शंकराला स्तविलें. तेव्हां शंकरानें पाताळांतून आपला पायाचा आंगठा वर काढून तें स्थान स्थिर केलें. तेव्हांपासून "अचलेश्वर" ही तेथील देवता झाली अशी एक कथा आहे. या पर्वतासंबंधीं निरनिराळ्या पुराणांत निरनिराळ्या कथा आहेत. कोणी अर्बुद हा हिमालयपुत्र होता तर कोणी तो नाग होता असें म्हणतात (स्कंद पुराण–अर्बुदाचल महात्म्य; महाभारत, वनपर्व अध्याय ८२; विष्णुपुराण इ.). यासंबंधीं दुसरी एक कथा अग्निकुलोत्पत्तीची आहे. जेव्हां दैत्य विश्वामित्राच्या धर्मकृत्यांत व्यत्यय आणूं लागले तेव्हां त्या ऋषींनें देवांच्या मदतीची याचना केली. तेव्हां त्यांनीं अग्निकुंडांतून चव्हाण, परिहार, सोळंकी आणि परमार अशीं चार "अग्निकुलें" निर्माण केलीं. या रजपूत कुलांनीं दैत्यांचा विध्वंस केला. या दोनहि कथांवरून प्राचीन कालीं जातीजातींत कांहीं शत्रुत्व असावें असें दिसतें.

ऐ ति हा सि क.—वेन राजाच्या वंशांतील केयो नांवाचा भिल्ल अर्बुदावर प्रथम राज्य करीत होता; त्याच्याच वंशांत गूह होऊन गेला. हा गूह शेवटचा भिल्ल राजा असून त्याचा संबंध रामायणांतील रामाला गंगापार करणाऱ्या गूहाशीं जोडतात. अर्वाचीन इतिहासावरून परमार राजे अर्बुदावर राज्य करीत अशी माहिती मिळते. यांच्या कारकीर्दीतच (१०३२ त) अबूवर आदिनाथाचें देवालय बांधलें गेलें. इ. स. १२१२ त चव्हाण घराणें अर्बुदावर आलें. पुढें हल्लींच्या शिरोहीच्या रजपूत घराण्यांतील रावरंभानें १२९६ मध्यें अर्बुद जिंकून घेतलें तें अद्याप या घराण्याकडे आहे.

अर्बुदावर निरनिराळ्या संप्रदायांचें प्राबल्य निरनिराळ्या काळीं होतें असें तेथील अवशेषांवरून दिसतें. अगदीं जुना शिलालेख संवत ७२७ (इ. स ६७१) चा आहे. त्यांत शैव मताचें वर्चस्व नजरेस येतें. येथें १०३२–१३२० पर्यंत जैनांचें प्राबल्य होतें, त्या अवधींत जैन देवालयें बांधिलीं गेलीं. यानंतर पुन्हां शैवांचा अधिकार चालू झालासें दिसतें. पुढें १५ व्या शतकापासून १७५२ पर्यंत जैन धर्म बळावला पण त्यानंतर शैवधर्म जो येथें स्थिर झाला तो कायमचा. इ. स. १८२१ त शिरोहीचे राजे माधवसिंग यांनीं बऱ्याच हिंदु देवालयांचा जीर्णोद्धार केला हे तेथील शिलालेखांवरून उघड होतें. इ. स. १८२२ त राजस्थानचे विख्यात् इतिहासकार कर्नल टॉड यांनीं अबूला भेट दिली (वि. विस्तार पु. ३८. १).

येथील प्रेक्षणीय स्थळें म्हटलीं म्हणजे मुख्यत्वेंकरून दिलवारा येथील नामांकित जैनमंदिरें, अर्बुददेवी, अचलगड, अचलेश्वर, महादेव, वसिष्ठाश्रम, गौतमाश्रम, गुरुशिखर, सनसेट पॉइन्ट, गोपीचंदाचीगुंफा, भर्तृहरीचीगुंफा रामगुंफा, परशुरामकुंड, कनकतीर्थ, भृगूचा आश्रम अग्निकुंड, सूर्यकुंड, कपिलातीर्थ, 'नागतीर्थ, इत्यादि आहेत.

या पर्वताचे कडे ठिकठिकाणीं तुटून भयंकर दऱ्या झालेल्या आहेत. तेथें श्वापदांच्या गुहा असून आसपास योगसाधनांत गुंतलेले तपस्वी, महंत, ऋषी यांच्या गुंफा आहेत. या गुंफा इतक्या बिकट जागीं आहेत कीं, येथें जाणें तर जीवाची आशा सोडूनच निघालें पाहिजे. परमार्थ आणि मोक्षसाधन करण्यासाठीं सर्वसंगपरित्याग करून तपश्चर्या करणाऱ्या लोकांसाठीं अगदीं एकांताचें नैसर्गिक व मोहकस्थान यादृष्टीनें हा पर्वत सर्वथैव योग्य असल्याकारणानें हें प्राचीन काळापासून अशा लोकांचें वसति-स्थान झालें असावें.

अ बू व री ल प्रे क्ष णी य स्थ ळें —दिलवाडा किंवा देऊळवाडा–हें स्थान कँपाच्या उत्तरेस दीड मैलावर आहे. जैनधर्मीय लोकांचीं सुप्रसिद्ध मंदिरें येथें आहेत. ह्या मंदिरांत प्रवेश करण्याकरितां सव्वा रुपया देऊन पास काढावा लागतो. हा पास दिलवाडा, अर्बुददेवी व अचलगड येथें दाखवावा लागतो. हीं मंदिरें स्फटिकाच्या सुबक कोरींव कामामुळें अत्यंत प्रेक्षणीय झालीं आहेत. श्वेतांबरी पंथाचे आदिनाथ व नेमिनाथ यांच्या मंदिरांच्या भिंती, खांब, गाभारे, घुमट वगैरेंवर इतकें सुबक कलाकौशल्याचें कोरींव काम केलें आहे कीं, तसें चित्तवृत्ति तल्लीन करून सोडणारें काम नांवाजलेल्या ताजमहालसारख्या स्थलींहि दिसून येत नाहीं. एक मंदिर विमलशानें इ. स. १०३२ मध्यें अठरा कोट रुपये खर्च करून बांधलें व दुसरें तेजपाल व वस्तुपाल या बंधुद्वयानें इ. स. ११९७–१२४७ या अवधींत बांधलें. दोन्ही मंदिरांत आदिनाथ–नेमिनाथांच्या पंचधातूंच्या प्रचंड मूर्ती आहेत. त्या हिरे, माणिक, पाच, मोतीं इत्यादि रत्नांनीं सजविलेल्या आहेत. देवळाच्या भिंतींवर, खांबांवर व सभोंवतालीं हिंदूंच्या नाना देवतांच्या कथानकांतील कृष्णलीला, रासक्रीडा, लग्नसोहळा, दशावतार, युद्धांचे देखावे, गंधर्वगायन वगैरे कोरीव कामें फारच चतुराईनें केलेलीं दृष्टीस पडतात. दोन्ही देवालयांत संगमरवरी हत्तींचे हत्तीखाने आहेत. आदिनाथाच्या देवळांत समोरच घोड्यावर विमलशाची मूर्ति बसविलेली आहे. देवालयाच्या घुमटाखालील भागांत छतावर कमलाच्या उमललेल्या फुलाप्रमाणें स्फटिकाच्या पाकळ्या अशा कांहीं मनोहर रीतीनें कोरल्या आहेत कीं, जणूं काय एखादा झुंबरच टांगला असावा असें वाटतें. जवळच अंबिकामातेची एक मूर्ति आहे. या देवीनें विमलशास येथें देवालयें बांधण्यास प्रोत्साहन दिल्यामुळें तिच्या कृपेनें हीं मंदिरें बांधण्यांत आलीं, म्हणून जैन लोक ह्या देवीचें पूजन श्रद्धापूर्वक करतात. देऊळवाड्याबाहेर जैनयात्रेकरूंनां राहण्यास

धर्मशाळा आहेत. त्याशिवाय दुसरींहि दिगंबरी पंथाचीं दोनचार देवळें आहेत.

अर्बुददेवीः—ह्या देवीचें स्थान कँपाच्या रस्त्यापासून दीड मैलावर डोंगरावर आहे. ह्या देवीस अधरदेवी असेंहि म्हणतात. डोंगरावर अर्ध्या रस्त्यांत एक दरी लागते तेथें दूधबावडी नांवाचें कुंड आहे. तेथें प्राचीनकाळीं दूध असे, व तें पिऊन ऋषी रहात असत, असें म्हणतात. सध्यां येथील पाणी पांढऱ्या रंगाचें परंतु पाचक असें आहे. येथें एक महंताचा आश्रम आहे. त्यांत अलखबुवा राहतो. जागा एकांताची असल्यानें हिंस्र पशूंचें भय वाटतें. यापुढें सुमारें ओबडधोबड तीनशें पायऱ्या चढून गेल्यावर शिखरावर एक प्रचंड गुहा लागते. ह्या गुहेंत दुर्गादेवी व चौसष्ट योगिनींच्या कोरींव मूर्ती आहेत. या गुहेंतच दुसरी एक अरुंद तोंडाची पण आंत मोठी अशी गुंफा आहे. तींत अर्बुददेवीची भव्य मूर्ति उभी आहे. या गुहेंत सतत तुपाचे दिवे जळत असतात. देवीच्या उजव्या बाजूला एक लहान बोगदा आहे. त्यांतून देवी नखी—सरोवरावर रोज स्नानास जाते, अशी भाविकांची समजूत आहे. ह्या गुंफेवर एक घुमट बांधलेला आहे. तो स्टेशनवरून शोभायमान दिसतो. चैत्री पौर्णिमेस व आश्विन शुद्ध दशमीस येथें मोठी यात्रा भरते. येथून दिलवाडा येथें जातांनां एक मैलावर कोटेश्वर महादेवाचें देवालय व कुंड आहे, व खालच्या बाजूला शुक्लतीर्थ म्हणून एक कुंड आहे.

अचलगडः—दिलवाड्याहून सुमारें तीन चार मैलांवर डोंगराळ वाटेनें अचलगडाला जातां येतें. अचलगड हा एक परमारकुलाच्या राज्यांतील डोंगराळ किल्ला होता. आतां हा किल्ला जीर्ण स्थितींत आहे. ह्याच्या पायथ्याशीं मंदाकिनी नामक एक सुंदर सरोवर आहे, आणि त्याच्या घाटावर तीन संगमरवरी दगडाचे टोणगे उभे केले असून एक आदिपाल रजपूत राजाची मूर्तीहि हातांत धनुष्यबाण घेऊन उभी आहे. ह्या कुंडाची आख्यायिका अशी आहे, कीं, पूर्वी ऋषी येथें तपश्चर्या करीत असत, आणि ह्या कुंडांत घृत भरून त्याच्या आहुती देत. तें घृत तीन महिषासुर दैत्य नित्य पिऊन त्यांत घाण करून तपश्चर्येमध्यें विघ्न करीत. तेव्हां सर्व ऋषींनीं तपश्चर्येच्या सामर्थ्यामुळें एक रजपूत राजा उत्पन्न करून त्याच्या हस्तें ह्या दैत्यांनां मोक्ष दिला. त्याचें स्मारक म्हणून त्या महिषासुरांच्या आणि आदिपालाची अशा मूर्ति येथें उभ्या केल्या आहेत. ह्या कुंडाला अग्निकुंड हें नांव मागाहून पडलें. येथें जवळच रेवतीकुंड आहे. येथून पूर्वेकडे एक मैलावर भृगुऋषीचा आश्रम आहे. दुसऱ्या एका कुंडांत गोमुखांतून निर्मल पाणी सोडलें आहे. मंदाकिनी सरोवरापासून शंभर पावलांवर एका टेकडीवर भर्तृहरीची गुंफा आहे. गुंफेचें तोंड फारच लहान आहे. परंतु निजून आंत गेलें असतां मध्यें मोठें आवार असून एक धुनीची जागा व एक आसनाप्रमाणें उंचवटा केलेला दिसतो. ह्या गुंफेंत उजेड येण्याला वर भोकें पाडलीं आहेत. मंदाकिनी सरोवराजवळ वाड्याप्रमाणें आवारांत श्रीअचलेश्वर महादेवाचें मुख्य स्वयंभू देवालय आहे. हें देवालय फारच जुनें म्हणजे इ. स. ८१० मध्यें बांधलेलें असून आंत नाना प्रकारच्या देवता कोरलेल्या दिसतात. देवालयांत एक मोठी पिंडी असून लिंगाच्या ठिकाणीं खाडा आहे. खाड्यांत हात घालून पाहिलें असतां डाव्या बाजूला हुबेहुब पायाच्या आंगठ्याप्रमाणें लहान लिंग आहे. मंदिरासमोर एक मोठा पितळेचा नंदी आहे. या अचलेश्वर महादेवासंबंधानें अशी कथा आहे कीं, वसिष्ठमुनीनें शंकराची आराधना केल्यावर श्रीमहादेवानें आंगठा जमीनींत रोवतांच अबू निर्माण केला तोच हा आंगठा होय. तेव्हां अर्बुद पर्वत ज्यानें उत्पन्न झाला त्याचें आदिस्थान अचलेश्वर आहे. येथें देवळासभोंवतीं उंचउंच प्रचंड पिंपळ व चाफ्यांचीं झाडें असून त्यांच्या फुलांच्या परिमळामुळें दाही दिशा दरवळून गेलेल्या असतात. या देवळाच्या आजूबाजूस फार जुनी व मोडकळीस आलेलीं गणपति, देवी, लक्ष्मीनारायण, राम वगैरे देवांचीं उपमंदिरें आहेत. लक्ष्मीनारायणाच्या मंदिराच्या आंतील गाभाऱ्यांतील देवतांच्या मूर्ती फार कुशलतेनें कोरलेल्या दिसतात. त्यांत शेषशायी नारायण पहुडलेले असून लक्ष्मी पादसेवन करीत आहे, नाभिकमलांतून ब्रह्मा वर आला आहे, गंधर्व गायन करीत आहेत हें दृश्य आहे. मंदिरासमोर एक प्रचंड लोहत्रिशूल उभारलेला आहे. तेथें एक महंत रहात असून शिरोही संस्थानानें दिलेल्या गांवावर त्याचा चरितार्थ चालतो. अचलेश्वराच्या उजवीकडे डोंगरावर जैन मंदिरें आहेत. येथेंहि तीर्थंकरांच्या शेंकडो लहानमोठ्या मूर्ती देवालयांत बसविलेल्या दिसतात. मुख्य आदिनाथाच्या देवालयांत चारी बाजूंनीं दर्शन होण्याकरितां मूर्ती बसविलेल्या असून वर एक मजलाहि आहे, व तेथेंहि मूर्ति आहे. वरील गच्चीवरून सभोंवतालचा फार लांबचा प्रदेश दृग्गोचर होतो. समोरच गुरुशिखर स्पष्ट दिसतें. हीं देवालयें मागें टाकून पुढें डोंगर चढून गेलें कीं, श्रावण व भाद्रपद या नांवांचीं दोन सरोवरें लागतात. त्यांच्या घांटावर एक चामुंडा देवीचें देवालय आहे. या शिखरावर चांगली सपाटी आहे. येथें उभें राहून राणा अजितसिंहाचा अगदीं जीर्ण महाल दिसतो. या शिखराच्या उत्तरेस अगदीं कड्यावरून फक्त एकाच माणसास जातां येण्यासारख्या विकट पायवाटेनें गोपीचंदाच्या गुंफेकडे जातां येतें. ही वाट अशी कांहीं भयंकर आहे कीं, खालीं नजर टाकल्यास घेरी येते, व किल्ल्यासभोंवारच्या तटाप्रमाणें अति खोल वाटतें. गोपीचंदाची गुंफा दुमजली असून अबूच्या पहाडावरील सर्व गुंफांपेक्षां उत्तम व सोयीस्कर आहे. या गुंफेंत दोन खोल्यांसारख्या दोन लहान गुंफा आहेत. मधोमध एक धुनीची जागा आणि बसण्याकरितां



दिलवाडा जैनमंदिर.

[ २८६ व्या पृष्ठासमोर.]

## अबूवरील देखावे.



दिलवाडा मंदिराचा मुख्य दरवाजा, अबू.



अबूच्या पहाडावरील मार्केट.



नक्षी सरोवर, अबू.

चौथरे केलेले आहेत. वरच्या मजल्यास दोन खिडक्या आहेत. तेथूनहि दूरवरचा डोंगराळ प्रदेश दिसतो. दिलवाड्याहून अचलगडाला जातांना मार्गांत 'ओरीआ' नामक गांव लागतो. तेथें रात्रीं मुक्काम करून प्रातःकाळीं तीन चार मैल उंच डोंगर चढून 'गुरु–शिखर'चीं भेट घेतां येते. हा रस्ता सबंध जंगलांतून डोंगराच्या कड्यावरून असून हिंस्र पशूंच्या वसतीमुळें फारच भयंकर झाला आहे. येथें वाटाड्या अवश्य लागतो. गुरु–शिखर हें फारच उंच असून सृष्टि सौंदर्याचें प्रदर्शन पाहण्यास योग्य स्थल आहे. येथें महंत राहतात. या रमणीय स्थानाजवळच श्रीदत्ताच्या पादुका, गणपति वगैरेंचीं जीर्ण मंदिरें आहेत. बद्रिनाथ, केदारनाथ, वगैरे देवांचीं देवालयें आणि कुंडें, गुंफा वगैरे थोड्याथोड्या अंतरावर आहेत. या शिखरावरून सपाटीवरील शेतें, अबू कँप, नदी वगैरे रांगोळीनें रंगवली काढल्याप्रमाणें मनोरम दिसतात.

वसिष्ठाश्रमाचामार्गः–अबू कँपपासून सुमारें पांच मैलाच्या अंतरावर अति डोंगराळ पायवाटेनें सुमारें दोनतीन डोंगर चढउतर करून व नंतर हजारांपेक्षां अधिक नैसर्गिक ओबडधोबड पायऱ्या उतरून चांफा, आम्रवृक्ष यांच्या अतिरम्य गर्द छायेंतून वसिष्ठाश्रमाला जातां येतें. हा रस्ता फार एकांताचा असून त्यांत हिंस्र पशूंचें भय असल्यानें एकट्यानें जाणें जोखमीचें आहे. डोंगर उतरतांच खालीं स्फटिकाच्या गोमुखांतून स्वच्छ निर्झराचें पाणी सोडून केलेलें एक कुंड आढळतें. हें कुंड आम्र व चांफा वगैरे झाडांच्या गर्द छायेनें आच्छादित असल्यानें फार मनोरम व गार वाटतें.

वसिष्ठाश्रम.— येथून सुमारें पंचवीस तीस पावलांवर वसिष्ठाश्रम आहे. या आश्रमाभोंवतीं एक किल्ल्याच्या तटाप्रमाणें बांधलेली भिंत असून सभोंवतालीं शेट नागरदास यांनीं धर्मशाळा बांधली आहे. तींत महंत राहतात. येथें येणाऱ्या मंडळींचा ते योग्य परामर्ष घेतात. पुढें श्री वसिष्ठजींचें मंदिर लागतें. येथें पूर्वीच्या आश्रमाच्या जागीं एक मोठें देवालय बांधलेलें आहे, आणि आंत वसिष्ठ ऋषींची मोठी मूर्ति दोन्ही हातांनीं रामलक्ष्मणांनां धरलेली अशी उभी आहे. जवळच वसिष्ठपत्नी अरुंधती हिची मूर्ति व दुसऱ्याहि बऱ्याच मूर्ती आहेत. देवालयाच्या बाहेर एक कामधेनूची मोठी मूर्ति व इंद्राची पितळेची मोठी मूर्ति आहे. दुसरीं चारपांच देवळें आजूबाजूस आहेत व पाठीमागें एक अग्निकुंड आहे. तेथें पूर्वी ऋषी हवन वगैरे करीत असत, असें म्हणतात. देवळांत हिंदूंच्या नाना देवता, वराह–अवतार, अर्बुदसर्पावर नंदिवर्धन बसलेला वगैरे कोरींव मूर्ती आहेत. या आवारांत व बाहेर द्राक्षांच्या वेलांचे मंडप, व पिच फळांचीं झाडें, जंगली केळीं, साखरलिंबू, डाळिंबें वगैरे फळझाडें, व केतकी, चांफा, कण्हेर वगैरे फुलझाडांचे गर्द रानाप्रमाणें बनलेले कुंज आहेत. येथून सुमारें दोनतीन मैलांवर गौतमाश्रम आहे. तेथें फार बिकट डोंगराळ मार्गानें जावें लागतें. गौतमाश्रम हें मनास, शांति व आल्हाद देणारें स्थळ आहे. तेथें शंकराचीं जीर्ण देवालयें, कुंडें, गुंफा वगैरे बऱ्याच आहेत. एकंदरींत येथील डोंगराळ रस्त्यानें जातांनां थोडासा त्रास व श्रम सोसावे लागतात, परंतु त्या मानानें हीं स्थानें पाहून फारच आनंद व शांति वाटतें.

सनसेट पॉइंट.—कँपपासून सुमारें दीड मैल चांगल्या सडकेनें सनसेट पॉइंटवर जातां येतें; किंवा रामकुंडाच्या बाजूनें 'वेलीस वॉक' म्हणून एकांताचा व डोंगराच्या कड्यावरून रस्ता आहे, त्यानें गेलें असतां वनश्री पाहून आनंद वाटतो. या कड्यावर मंडळींनां बसण्याकरितां चुन्याचे चौथरे व दगडी बांक बांधलेले आहेत. तेथें स्वस्थपणें बसून फार लांबचा प्रदेश पाहण्यास मिळतो. येथें पश्चिम क्षितिजाकडे भगवान् सहस्ररश्मि अस्ताला जातांना फारच हृदयंगम देखावा दिसतो. खालील विस्तीर्ण सपाटीमध्यें बनास नदीचे निर्मळ पाट सर्पाकृति वाहतात. येथें उत्तम सुवासिक जंगली फुलझाडें आहेत. त्याचप्रमाणें बुलबुल, चंडोलादि पक्षी शीळ घालून पाहुण्यांचें मन रंजवितात.

नखी सरोवर.—हें सुंदर व शीतलोदकानें परिपूर्ण असें सरोवर कँपला लागूनच आहे. चारी बाजूंनीं उंच डोंगर असल्यामुळें हें मोठें रमणीय दिसतें. सरोवरासभोंवतालीं पक्की सडक बांधलेली असल्यानें फिरण्यास निघालेल्या मंडळींस सरोवराला प्रदक्षिणा घातली म्हणजे चांगला व्यायाम घडतो. सरोवरामध्यें लहान लहान खडक आहेत. येथें शिकार करण्यास बंदी असल्यानें ह्या प्राण्यांनां मनुष्यापासून मुळींच भीति वाटत नाहीं. ह्या सरोवराचें नांव नखी पडण्याचें कारण, पूर्वी ऋषींनीं हें नखांनीं कोरून काढलें होतें, असें म्हणतात. सरोवरावर श्रीरघुनाथजींचें एक मंदिर आहे. त्यांत महंत मध्यम वर्गाच्या हिंदुधर्मीय मुसाफरांनां तात्पुरतें रहाण्यास जागा देतात. येथेंहि द्राक्षांचे मंडप व लहानशी फुलझाडांची बाग आहे. सरोवराच्या उत्तरेस डोंगरावर परशुरामकुंड, रामगुंफा, हाथीगुंफा व हनुमानगुंफा या पाहण्यासारख्या आहेत. कँपांतील विहिरी फार खोल असल्यामुळें बागबगीच्यासाठीं बैलावर पखालींत पाणी भरणारांची सांजसकाळीं सरोवरावर बरीच गर्दी दिसते.

कँ प चा बा जा र.—हा बाजार लहानसा आहे. येथें सर्व कांहीं मिळतें. दूध, दहीं सुबलक मिळतें. प्रवाशानें रहाण्यास जागेची सोय केली असतां कांहीं अडचण पडत नाहीं.

[ संदर्भग्रंथ इं. गॅ. ५–१९०८; ए. वि. ए; मा. मनोरंजन वर्ष २६; वि. विस्तार पु. ३८; इं. अँ. १८७५. टॉः–राजस्थान; फर्ग्यूसन—हिस्टरी ऑफ इंडियन अँड ईस्टर्न आर्किटेक्चर. राजपुताना गॅ. पु. ३. १८८० ].

अबूकीर.–हें भूमध्यसमुद्राच्या इजिप्तच्या किनाऱ्यावरील एक खेडं, अलेक्झँड्रिआपासून रेल्वेनें $14\frac{1}{2}$ मैल ईशान्येस आहे. येथील दुर्गाचा मेहमत अलीनें राजकीय बंदिगृहाप्रमाणें उपयोग केला होता. येथून जवळच रोमन, ग्रीक व इजिप्-

मधील लोकांच्या इमारतींचा पडित भाग आहे व या खेड्याच्या आग्नेय दिशेस सुमारें २ मैलांवर कॅनोपसच्या आसपासच्या भागाचे कांहीं अवशेष सांपडतात व पुढें कांहीं अंतरावर पूर्वेस नाइलच्या कॅनोपस शाखेचें भूमध्यसमुद्रास मिळण्याचें स्थान आहे. पूर्वेकडे नाइलच्या रोसेटा मुखापर्यंत पसरत गेलेला अबूकीरचा अफाट उपसागर आहे. यांत १७९८ च्या आगस्टच्या १ ल्या तारखेस नेलसन नेपोलियिनच्या नाविक दलाशीं नाईल (अबूकीर) ची लढाई खेळला पुढें १७९९ च्या जुलै महिन्याच्या २५ व्या तारखेस तुर्क व फ्रेंच मध्यें झटापट झाली. १८०१ च्या मार्च महिन्याच्या ८ व्या तारखेस सर ऑर. ॲबरक्रॉंबीच्या नेतृत्वाखालील इंग्रजी फौज अबूकीरजवळ फ्रेंचाच्या जबरदस्त अडथळ्यास तोंड देऊन उतरली.

**अबू-तालिब कलिम.**—इराणांतील हमदानचा हा प्रसिद्ध कवि जहांगीरबादशहाच्या कारकीर्दींत प्रथम हिंदुस्थानांत आला, व १६१९ मध्यें परत इराणला गेला. नंतर पुन्हां एकदां शहाजहानच्या वेळीं इकडे आला. बादशहानें त्याला पदरीं ठेवून "मलिक-उश-शुआरा" (राजकवि) अशी पदवी अर्पण केली. त्याची दोनदां सुवर्णरौप्य तुला करण्यांत येऊन, तें सोनेंरुपें त्याला बक्षीस देण्यात आलें. १९ नव्हेंबर १६५१ रोजीं हा दिवंगत झाला. "झफर-नामा-इ-शहाजहान" हें त्याचें एक शहाजहानपरचें काव्य आहे.

**अबू-तालिब खान (मिर्झा).**—हा हाजी महंमद बेगखानचा मुलगा लखनौ येथें १७५२ त जन्मला. नवाब असफउद्दौल्याच्या दिवाणानें १७७५ त त्याला इटवा व गंगायमुना नद्यांमधील दुसरे अनेक जिल्हे यांवरचा अंमलदार नेमिलें. या हुद्द्यावर त्यानें दोन वर्षें काम केलें. पण पुढें दिवाणाच्या मृत्यूमुळें त्याची बढती थांबली व तो लखनौला परत आला. नवाबानें त्याला खर्चासाठीं साठ हजाराचें पर्यासन करून दिलें. पुढें एक वर्ष गेल्यानंतर, कर्नल अलेक्झांडर हॅनें हा गोरखपूरचा कलेक्टर असतां त्यानें याला आपला दुय्यम म्हणून नबाबापासून मागून घेतलें. कर्नलच्या हाताखालीं तालीबखानानें तीन वर्षें काम केलें. नंतर लखनौच्या रेसिडेंटनें राजा बलभद्रसिंगाचा पाडाव करण्याच्या कामावर त्याला नेमिलें. राजा बलभद्रसिंगाच्या वधानंतर कांहीं वर्षें अबू-तालिब संकटांत सांपडला होता. त्यावेळीं तो एका ब्रिटिश अधिकाऱ्याबरोबर यूरोपला गेला (१७९९). इराणी राजपुत्र म्हणून तिकडे तो ओळखिला जाई. प्रवासांत असतां त्यानें रोजच्या हकीकतीची नोंद करून, ही रोजनिशी कलकत्त्यास परत आल्यावर प्रसिद्ध केली (१८०३). तिचें नांव "मआसिर-उत्-तालिबी फी बिलादि-इफ्रंजी." चार्लस स्टुअर्टनें याचें इंग्रजी भाषांतर करून लंडन येथें प्रसिद्ध केलें (१८१४). अबूतालिब १८०६ च्या सुमारास वारला. "खुलासत-उल-अफकार" हा याचाच ग्रंथ आहे.

**अबू-तालीब हुसैनी.**—यानें "तुझुक-इ-तैमूरी" नांवाचा ग्रंथ लिहिला. तैमूरलंगानें चघताइ तुर्की भाषेमध्यें आपल्या पहिल्या सत्तेचाळीस वर्षांची माहिती असलेला जो ग्रंथ लिहिला त्या ग्रंथाचें फारशी भाषांतर म्हणजे वरील तालीबचा ग्रंथ होय. हा ग्रंथ त्यानें शहाजहानला अर्पण केला. या ग्रंथाचें भाषांतर मेजर चार्लस स्टुअर्ट यानें इंग्रजीमध्यें केलेलें आहे.

**अबूबकर सिद्दिक.**—आयेषेचा बाप व महंमद पैगंबराचा सासरा. याचा जन्म इ. स. ५७३ मध्यें कुरेश जातींत मक्का येथें झाला. हा फार श्रीमंत असून याचें लोकांत दांडगें वजन होतें. यानें मुसुलमानी धर्माची दीक्षा घेतल्यावर आपलें नांव बदललें. याची महंमद पैगंबरावर अचल श्रद्धा होती. महंमदाच्या हिजऱ्यापासून मृत्यूपर्यंत तो त्याच्या अगदीं संनिध होता. महंमदहि याला फार मान देत असे. यानें याला 'सिद्दिक' म्ह. 'खरें बोलणारा' ही पदवी दिली होती. जून ६३२ मध्यें पैगंबराच्या मृत्यूनंतर याला खलीफा निवडलें. ह्यानें महंमदाच्या नवीन धर्मास चांगलीच चालना दिली; त्यानें प्रथम जे अरब लोक हा नवीन धर्म सोडून पुन्हा पूर्वीच्या धर्मांत शिरूं पहात होते त्यांना वठणीस आणलें. नंतर त्यानें आपली दृष्टि इतर राष्ट्राकडे वळविली; व आपल्या शूर सेनापतीच्या साहाय्यानें ग्रीक सम्राट हरक्युलिस यानें सिरिया उध्वस्त करण्याकरितां पाठविलेल्या सैन्याचा पराजय केला. याच्या सेनापतींनी इराण व सिरिया हे देश काबीज केले. परंतु याला आपण मिळवलेल्या यशाचा फार दिवस उपभोग घेता आला नाहीं. तापानें त्याची शरीरप्रकृति क्षीण होत जाऊन ज्या दिवशीं दमास्कस शहर त्याच्या हातीं आलें त्याच दिवशीं म्हणजे २३ ऑगस्ट इ. स. ६३४ मध्यें तो मृत्यु पावला. याची कबर मदिना येथें महंमदाच्या कबरीशेजारीं आहे. यानें महंमदाचीं वचनें लिहून काढलीं होतीं. [ बील्चा कोश ]

**अबू रोड.**—याचें दुसरें नांव खरारि. हें राजपुतान्यांत सिरोहि संस्थानात उत्तर अक्षांश २४° २९' व पूर्व रेखांश ७२° २७' ह्यावर बनास नदीच्या पश्चिम तीरावर वसलेलें आहे. राजपुताना माळवा रेल्वेचें हें एक स्टेशन असून मुंबईपासून ४२५ मैल व दिल्लीपासून ४६५ मैल दूर आहे. अबूला जातांनां हें शेवटचें स्टेशन लागतें. येथील लोकसंख्या सुमारें सात हजार आहे. व्यापाराची पेठ म्हणून हें फार महत्त्वाचें आहे. कारण, दांता, इंदर व मेवाड या संस्थानांत लागणारा माल येथून पुरवला जातो. येथें टपाल व तार ऑफिस असून एक दवाखानाहि आहे. यूरोपियन व यूरेशियन मुलांच्याकरितां रेल्वेची एक शाळा आहे. तसेंच सरकारच्या मदतीनें चाललेली एक इंग्रजी शाळा आहे. रेल्वेनें आपल्या नोकराकरितां एक दवाखाना ठेवला आहे. अबूरोडपासून अबूला जाण्यास महाबळेश्वरासारखी

नागमोडी पक्की सडक डोंगराच्या कड्यावर बांधलेली आहे. तेथें जाण्याला सध्यां मोटार सर्व्हिस सुरू आहे

**अबूसिंबेल.**—ह्या नांवाची खडकांतील कोरीव देवालयें आफ्रिकेंत नाइल नदीच्या कांठावर न्युबिया देशांत आहेत. ही देवालयें एकंदर तीन आहेत. हा खडक वाळूचा बनलेला आहे. हीं सूर्याचीं देवालयें आहेत. ह्यांतील मूर्ती ६५ फूट उंचीच्या आहेत. दुसरा रामेसीस या नांवाच्या राजाच्या कारकीर्दीतील लढाईचे देखावेहि येथें कोरिले आहेत.

**अबू हसन कुतुबशहा** ( इ. स. १६५८–१६८७ )— गोवळकोंड्याच्या कुतुबशाही घराण्यांतील शेवटचा सुलतान. हा मागील सुलतान अबदुल्ला कुतुबशहा याचा जांवई असून त्याच्या पश्चात तो गोवळकोंड्याच्या तख्तावर बसला. हा आळशी व विलासी होता. तरी राज्य चांगलें चालवून रयतेस सुख देण्याच्या कामीं तो नेहमीं तत्पर असे, त्यामुळें त्याजवर लोकांची प्रीति होती. त्यानें मदनपंत नामक एका ब्राह्मणास आपली वजिरी दिली. मदनपंतानें महसुलाचा व इतर बाबतींचा बंदोबस्त फार चांगला ठेविला. शहाचा त्याजवर पूर्ण विश्वास असे. त्याच्या विरुद्ध मुसुलमानांनीं केलेल्या कागाळ्या शहा ऐकत नसे, या मत्सरी मंडळींत शहाचा सेनापतीहि सामील होता. त्यास मदनपंताचें दरबारांतलें वजन सहन होईना. इकडे स. १६८३ त अवरंगजेबानें दक्षिणेवर स्वारी केली. त्यावेळीं संभाजी भोंसल्याबरोबर कुतुबशहानें परस्परांच्या संरक्षणाकरितां एक तह केला. त्याजवरून अवरंगजेबास राग येऊन, त्यानें आपला मुलगा मुअज्जम व खानजहान यांच्या अधिपत्याखालीं गोवळकोंड्यावर फौज पाठविली. ही फौज आली, तेव्हां सेनापति इब्राहिमखान विश्वासघात करून मोंगलाला जाऊन मिळाला. त्यावेळीं शहरांत जी गडबड झाली तींत मदनपंत मारला गेला. अबू हसननें दोन कोट रुपये खंडणी व पुष्कळ द्रव्य देऊन मोंगलांशीं तह केला ( स. १६८६ ) पण हा तह फार दिवस टिकला नाहीं. विजापूरचें राज्य रसातळास गेल्यावर अवरंगजेब हा जिसुदुराज साधूच्या कबरेचें दर्शन घेण्यासाठीं म्हणून गुलबर्ग्यास जाण्यास निघाला. विचारा अबू हसन अवरंगजेबाची मर्जी प्रसन्न करण्यासाठीं नाना तऱ्हा करीत होता. नजीक आल्यावर अवरंगजेबानें कुतुबशहास कळविलें कीं, 'तुम्ही ब्राम्हण दिवाण नेमिला, परधर्मी संभाजी राजाशीं दोस्ती केली, आणि स्वतः बदफैली वर्तन सुरु ठेविलें, म्हणून आम्ही तुम्हांशीं लढाई करणार.'

कुतुबशहाचे कामदार अवरंगजेबानें फितूर केले आणि गोवळकोंड्यास वेढा घातला. सात महिने कुतुबशहानें टिकाव धरला. पुढें सन १६८७ त अवरंगजेबानें अबू हसनास पदच्युत करून दौलताबादच्या किल्ल्यावर ठेविलें; आणि त्याचें सर्व राज्य खालसा करून आपल्या राज्यास जोडिलें. अबू हसनासाठीं त्याची प्रजा हळहळली. त्याच्या दैन्याच्या व शौर्याच्या शेंकडो गोष्टी लोकांच्या तोंडीं अद्यापि त्या प्रांतीं ऐकूं येतात. त्यास कवितेचा मोठा नाद होता.

[ संदर्भग्रंथ.–सरकार–हिस्टरी ऑफ अवरंगजेब; मुसुलमानी रियासत; टेलर–हिस्टरी ऑफ इंडिया. ]

**अबू हानिफ** ( ६९९–७६७ )—हा मुसुलमान लोकांमध्यें एक कायदेपंडित व धर्मशास्त्रलेखक म्हणून प्रसिद्ध आहे. ह्यानें धर्मशास्त्रावर कुफा येथें व्याख्यानें दिलीं. हा इ. स. ७६७ मध्यें मरण पावला. याचे प्रमुख ग्रंथ म्हणजे "मसनद" ( यांत मुसुलमानी धर्मांतील तत्त्वें प्रतिपादिलीं आहेत, )"फिक्कलाम", आणि "मुआल्लिम–उल–इस्लाम".

**अबेओकुटा.**—हें गांव ब्रिटिश पश्चिम आफ्रिकेंत एगबा प्रांतांत आहे. येथील लोकसंख्या साठ हजार आहे हें गांव फार सुधारलेलें आहे. येथें न्यायकचेऱ्या, तुरुंग, व सरकारी कामाच्या इमारती दृष्टीस पडतात. या गांवाभोंवतीं १८ मैल लांबीचा एक तट आहे. अबेओकुटा याचा अर्थ "खडका खालीं" असा होतो. हें सुमारें १८२५ मध्यें वसलें.

**अबेव्हील.**—हें गांव फ्रान्स देशांत सोमनदीवर तिच्या मुखापासून बारा मैलांवर आहे. हें नदीच्या दोन्ही तीरांवर व बेटावर वसलेलें आहे. याची उद्योगधंद्याबद्दल व व्यापाराबद्दल प्रसिद्धि आहे. येथील संट व्हल्फ्रानचें चर्च ( प्रार्थनामंदीर) व जुन्या इमारती फार प्रेक्षणीय आहेत.

**अबेस**—यूरोपांत मठाच्या अध्यक्षिणीस अबेस असें म्हणतात. ही जागा निवडणूक करून भरतात. मठवासिनींचीं गुप्तपणें मतें घेऊन त्यांच्यापैकींच एकीला निवडतात. त्यावेळीं मोठा धार्मिक समारंभ होऊन तिला एक दंड व क्रूस अर्पण करितात. ही जागा गैरवर्तनामुळें काढून टाकण्यांत आली नाहीं तर तहाहयात असते. चाळीस वय व आठ वर्षांचा अनुभव अबेसला पाहिजे. मठनिवासीनींनां तिचे हुकूम पाळावे लागतात. तिला त्यांनां शिस्त लावण्याचा पूर्ण अधिकार असतो. तथापि स्त्री असल्यामुळें अबेटचे धार्मिक अधिकार तिला नसतात. जर्मनींत ही जागा मोठ्या मानाची आहे. केव्हां केव्हां राजकन्यादेखील मठाच्या अध्यक्षिणी होत असत.

**अबोमे**—हें पुरातन डाहोमे ( पश्चिम आफ्रिका ) राज्याच्या राजधानीचें शहर आहे. आतां याचा समावेश याच नांवाच्या फ्रेंच वसाहतींत होतो. हें कोटोनु बंदराच्या उत्तरेस रेल्वेनें ७० मैलांवर आहे, व याची लोकसंख्या सुमारें १५००० आहे. हें शहर समुद्रसपाटीपासून ८०० फूट उंचीवर एका मैदानावर वसलेलें आहे. याच्या सभोंवार मातीची भिंत असून तिला सहा वेशी होत्या. शिवाय काटेरी बाभळीची दाट झाडी असलेला ५ फूट खोल खंदक होता. या भिंतीचा परिघ सहा मैल होता व यांत अनेक खेडीं होतीं व किल्लेक राजवाडे, बाजार व लष्करी चाळी असलेला एक मोठा चौक होता. १८९२ मध्यें फ्रेंचांनीं डाहोमेचा राजा बेहान्झिन याचा पराभव केला तेव्हां अबोमेला आग लावून तो उत्तरेस

पळून गेला. फ्रेंच कारकिर्दीत हें शहर पुन्हा बांधण्यांत आलें ( १९०५ ). हें समुद्रकिनाऱ्याशीं रेल्वेनें जोडलें गेलें, व कृत्रिम कारंजाच्या विहिरी खणून येथें विपुल पाणीपुरवठा करण्यांत आला.

**अबोर ( अबोर–मिरि. )**—अबोर हा शब्द आसामी असून त्याचा अर्थ 'रानटी' किंवा 'स्वतंत्र' असा होतो; पण 'सरहद्दीवरील टोळ्या' या अर्थानें अबोरचा उपयोग करण्यांत येतो. अबोर या नांवाची एक पर्वतश्रेणी ( हिमालयाची एक शाखा ) आसामच्या उत्तर सरहद्दीवर आहे. या डोंगरावर कांहीं अबोर लोक राहतात. मुख्यतः आसामांतील दिहांग नदीच्या दोन्ही तीरांवर अबोर लोक राहतात. बहुतेक अबोर ब्रिटिश हद्दीबाहेर तिबेटांत राहतात. १९०१ व १९११ सालच्या खानेसुमारींत अनुक्रमें ३२१ व ८५६ अबोर ब्रिटिशप्रजाजन म्हणून नोंदले गेले. यांपैकीं बहुतेक सर्व वन्य होते. मिरींपैकीं अनुक्रमें ४६,७२० व ५७,७९२ ब्रिटिश हद्दींत होते; व त्यांच्यांत अर्धे हिंदु व अर्धे वन्य आढळले. यांच्या पूर्वपश्चिमेला राहणाऱ्या मिश्मी व उफला जातींप्रमाणें हिंदु किंवा बौद्ध धर्माचा यांच्यावर फारसा पगडा बसलेला नाहीं. जेव्हां अबोरांचीं मुलें हरवतात, तेव्हां तें वनदेवतांनीं तीं नेलीं असें मानतात. प्रत्येक रोगाची एकेक देवता आहे असा त्यांचा समज असल्याकारणानें रोग्याला कांहीं औषध न देतां फक्त त्या रोगदेवतेला बळी अर्पण करून स्वस्थ बसतात. या देवता "रिगम" नांवाच्या पर्वतावर राहतात व त्या ठिकाणीं एकदां गेल्यास कोणालाहि परत येतां येत नाहीं असें मानण्यांत येत असल्यानें, त्या पर्वताचें रहस्य उघडकीला कधींच येत नाहीं. एक सर्व–श्रेष्ठ देव जगच्चालक आहे; परलोक असून, "जम" ( यम ) नांवाचा एक मर्त्यांचा न्यायाधीश तेथें आहे, असें हिंदुप्रमाणें हे लोक मानितात. अशुभ देवतांत "अपोम" किंवा "एपोम" देवता मुख्य असून तिची उपासना करणें हें यांच्या धर्मांतील मुख्य तत्त्व आहे. पोम्सा, उरोम, किल्लु–दले निपाँग इत्यादि दुसऱ्याहि निरनिराळ्या रोगांच्या देवता आहेत. देवतांनां द्यावयाचे बळी वृद्ध आणि अशक्त लोकांखेरीज कोणीं खावयाचे नाहींत असा नियम आहे. यांच्यांत वंशपरंपरागत उपाध्याय नसतो, तर "देवदार" नांवानें ओळखिले जाणारे कांहीं शकुन सांगणारे लोक संस्कार चालवितात. मिरी लोकांच्या समजुती अबोरांप्रमाणेंच आहेत.

हे लोक दिसण्यांत ओबडधोबड व आळशी असतात. यांच्या बायका रंगरूपांत कांहींशा चिनीबायकांप्रमाणें दिसतात. पुरुषांचा पेहराव म्हणजे उद्दालवृक्षाच्या सालीचें कमरेला धोतर, डोक्याला गवती टोपी, लोकरीचा किंवा कातडी कोट व गळ्यांत निळ्या मण्यांच्या माळा. बायका कमरेभोंवतीं एक फडकें गुंडाळतात व दुसऱ्या एका फडक्यानें वक्षस्थळ झांकतात; हें दुसरें फडकें नसलें तरी चालतें, कारण वक्षस्थल उघडें ठेवणें हें असभ्यतेचें लक्षण समजत नाहींत. गळ्यांत कमरेपावेतों लोंबणाऱ्या माळा व कानांत भली मोठीं कुंडलें अडकवितात. पायांत वेताचीं नूपुरें घट्ट करकोचे पडेपावेतों आवळून घालतात; व तरुण बायका मूल होईपर्यंत कमरेला काशाच्या गोंडेदार तबकड्यांची सांखळी अंतर्वस्त्राऐवजीं वापरतात. पुरुष व बायका दोघेंहि आपले केस डोक्याबरोबर कापून घेतात व अंगावर गोंदून घेतात. भाले, लांब तरवारी, खंजीर, धनुष्यबाण हीं अबोर योद्ध्यांचीं हत्यारें होत. अबोर अधिपतीला वंदन करणें म्हणजे कोंबड्यासारखा एक कर्कश शब्द करणें होय.

यांचा स्वभाव वाघासारखा क्रूर असतो असें म्हणतात, तो इतका कीं, त्यांनां एकमेकांशेजारीं शांततेनें मुळींच राहतां येत नाहीं; म्हणून त्यांचीं घरें त्यांच्या राहत्या डोंगरांत इकडे तिकडे पसरलेलीं दृष्टीस पडतात. यांची शेतकी सपाटीवर असून, तांदूळ, कापूस, तंबाखू, मका, सुंठ, मिरची, ऊंस, हीं पिकें काढण्यांत येतात. शेतकामांत यांनां बायकांची मदत होते. यांच्यांत बायकांनां चांगल्या तऱ्हेनें वागविण्यांत येतें. यांच्यांत बहुभर्तृकता व बहुपत्नीकत्व दिसून येतें पण फार क्वचित्. लग्नें वडील माणसें जुळवितात तरी तरुण तरुणींनां बरीच मोकळीक असते. अबोर बायका बऱ्याच धीट असतात. पातिव्रत्य हा त्यांच्यांत सद्गुण समजत नाहींत

पूर्वी हे लोक आसामांत छापे घालीत, म्हणून त्यांस शासन करण्याकरितां ( १८९३–१८९४ ) इंग्रज सरकारनें त्यांच्यावर एक दोन स्वाऱ्या केल्या.

पहिल्या खेपेस ६०० शिपायांची तुकडी पाठविली. अबोरलोकांनीं इंग्रजांचे कांहीं लष्करी शिपाई ठार केले, म्हणून यांचीं घरेंदारें ह्या तुकडीनें जाळिलीं.

दुसऱ्या खेपेस अबोर लोकांनीं इंग्रज चौकीवरील शिपायांस विश्वासघात करून ठार मारिलें, म्हणून १०० लोकांची तुकडी पाठवून यांचें चांगलेंच पारिपत्य केलें, व सुमारें सहा वर्षें यांची नाकेबंदी केली.

सन १९११–१२ मध्यें त्यांनीं केलेल्या थोड्या दांडगाईमुळें त्यांच्यावर ब्रिटिशांनीं स्वारी केली होती. ह्यांचीं पुष्कळ निरनिराळीं घराणीं आहेत, परंतु सर्वराष्ट्रीय कल्याणाच्या गोष्टींत ते एकजुटीनें वागतात.

[ संदर्भ ग्रंथ.—रौनै—वाइल्ड ट्राइब्स ऑफ इंडिया. डाल्टन–एथ्नालॉजी ऑफ बेंगाल. सेन्सस ऑफ इंडिया(पु. ३ १९११ ). इंपीरियल गॅझेटियर–अबोर हिल्स. ए. ब्रि. ( अबोर हिल्स ). एन्सायक्लोपीडिया ऑफ रिलिजन अँड एथिक्स–( अबोर ). गेट, ॲलन–सेन्सस रिपोर्ट आसाम १८९१ व १९०१ जे. ए. एस्. बी. १४, १८ व ४१ डाल्टन, राबिन्सन, हॉडसन, व पील यांचे लेख ].

**अब्–इ–इस्ताद.**—गझनीच्या दक्षिणेस ६५ मैलांवर उत्तर अक्षांश ३२°३०' व पूर्व रेखांश ६७°५०' यामध्यें अफगाणिस्तानमधील तराकि गिलझइ प्रदेशांतील हें एक

सरोवर आहे. हें १७ मैल लांब व १५ मैल रुंद असून अतिशय उथळ आहे. तें इतकें कीं याची अगदीं मध्यावर खोली फक्त बारा फूट आहे. याच्या कांठावर झाड किंवा एखादी गवताची काडी देखील उगवत नाहीं. याचें पाणी खारट व कडू आहे व कांठावर मिठाचे थर सांचून राहतात. हें सरोवर इतकें खारट आहे कीं, येथें गझनी नदींतून आलेले मासे जिवंत राहूं शकत नाहींत. भोंवतालचा प्रदेश रुक्ष व ओसाड असल्यामुळें येथें स्थानिक वस्ती मुळींच नाहीं. फक्त उन्हाळ्यामध्यें गिलझइ लोक येथें गुरें चारण्यास आणतात. या सरोवरांतून पाणी बाहेर वहात जात नाहीं. फक्त जें पाणी झिरपून जातें त्यापासून अर्घस्तान लोरा ही नदी निघते. [ इं. गॅ. ५ ].

**अब्जदि.**—मीर महंमद इस्माइलखान या कवीचें हें टोपण नांव होतें. हा कवि कर्नाटकचा नबाब उमदत उल उमरा याचा शिक्षक होता. या नबाबानें आपला बाप नबाब अनवरखान याचा इतिहास लिहिण्याबद्दल ६७०० रुपये यास बक्षीस दिले. हा इतिहास ‘ अनवरनामा ’ म्हणून प्रसिद्ध आहे. हा ग्रंथ १७६० मध्यें समाप्त झाला व नंतर या कवीला १७७४ मध्यें ‘ मलिक-उष-शु. अरा ’ हा किताब नबाबानें दिला. या ग्रंथामध्यें मेजर लॉरेन्सचे पराक्रम वर्णन केले असून त्याशिवाय इंग्रज व फ्रेंच यांमधील हिंदुस्थानामध्यें झालेल्या पहिल्या पहिल्या लढायांचें वर्णन आहे. [ बीलचा कोश ].

**अब्बासी बंदर**—बंदर अब्बासी हें इराणांतील शहर असून इराणी आखाताच्या उत्तर किनाऱ्यावर उ. अ. २७°११′ व पू. रे. ५६°१७′ यांचे दरम्यान “ इराणी आखातांतील बंदरांचा प्रांत ” याचा एक भाग आहे. येथील लोकसंख्या सुमारें १०,००० असून हवा रोगट आहे व पाणी खराब आहे.

बंदर अब्बासी याला १६२२ पर्यंत गोम्ब्रुन म्हणत असत ( पोर्तुगीज लेखक याला गोंब्रून, गमारून, कॅम्पराव, कोमोराव म्हणत ). यानंतर याला बंदर अब्बास असें नांव प्राप्त झालें. कारण पहिला अब्बास यानें १६१४ मध्यें पोर्तुगीज लोकांनां येथून हांकून लाविलें होतें व १६१२ मध्यें त्यांनीं बांधलेला किल्ला पाडून टाकला. याच शहाच्या स्मरणार्थ याला हें नांव पडलें होतें. इंग्लिश लोकांनां येथें वखार घालण्यास परवानगी मिळाली होती व १६२० मध्यें डचलोकांनांहि हा हक्क मिळाला. १६२२ मध्यें इंग्लिश व इराणीलोक यांनीं हॉरमझ ( ऑरमझ ) चें बेट काबीज केल्यापासून त्यांचा बराचसा व्यापार बंदर अब्बासी येथून चालूं लागला. १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत व्यापार फारच वाढला. परंतु १८ व्या शतकांत भरभराट कमी झाली व बराच व्यापार बुशायर येथून चालूं लागला. १७५९ मध्यें फ्रेंच लोकांनीं ब्रिटिश वखारीचा नाश केला व पुढें जरी ती फिरून बांधण्यांत आली तरी ती बराच काळपर्यंत टाकून देण्यांत आली होती. १७४० च्या सुमारास नादिरशहानें कांहीं वार्षिक खंड घेऊन हें शहर शामिळच्या किल्ल्यासहित हा जिल्हा, मिनाब शहर, किशम, हॉर्मझ, व लारक हीं बेटें बेनि मैनी येथील अरब लोकांच्या टोळीला दिलीं. सुमारें चाळीस वर्षांनंतर इराणी लोकांच्या जुलमी राज्यपद्धतीविरुद्ध मदत मागितल्यावरून सुलतान बिन अहमद ( मस्कतचा राजा ) यानें हें शहर घेतलें व पुढें त्यालाच, कांहीं हजार तोमान खंड देण्याच्या करारावर, ह्या शहराचा ताबा इराणी सरकारच्या फर्मानावरून मिळाला. हीं बेटें मस्कतच्या ताब्यांतील समजलीं जात. १८५२ मध्यें इराणी लोकांनीं मस्कतच्या अधिकाऱ्यांनां तेथून हांकून लाविलें. परंतु जेव्हां मस्कतच्या राजानें जास्त खंड देण्याचें कबूल केलें तेव्हां इराणी लोक परत गेले. १८५६ मध्यें इराण व मस्कत यांच्यामध्यें झालेल्या तहान्वयें असें ठरविण्यांत आलें कीं, बंदर अब्बासी हें शहर, जिल्हा व बेटें हीं इराणी राज्याचा मुलूख समजलीं जावींत व १४००० तोमान ( ६००० पौंड ) वार्षिक खंड घेऊन हीं मस्कतला पट्टयानें द्यावींत. हा तह वीस वर्षेपर्यंत चालू रहावयाचा होता, पण १८६६ मध्यें मस्कतचा सुलतान सय्यद थुवैनि मारला गेल्यामुळें इराणी लोकांनीं २०,००० तोमान खंड देण्याचें कबूल करणाऱ्या एका भलत्याच माणसास बंदर अब्बासी शहर व जिल्हा यांचा गव्हर्नर नेमिलें. इराण व मस्कत यांच्यामध्यें पुढें तंटे उपस्थित झाले. सुलतानाजवळ जबरदस्त आरमार असल्यामुळें इराणी लोकांनीं ब्रिटिशांची मदत मागितली व ३०,००० तोमान खंड देण्याच्या करारावर तो पट्टा फिरून आठ वर्षेंपर्यंत वाढविण्यांत आला. ही गोष्ट १८६८ मध्यें झाली. याच वर्षीं मस्कतच्या सुलतानाला विजयी बंडखोरांनीं हांकून लाविलें. ‘ जर कोणी जेता मस्कतचा ताबा मिळवील तर पट्टा रद्द समजला जाईल’ अशा एका कलमान्वयें इराणी सरकारनें बंदर अब्बासी येथें आपल्या वतीचा एक गव्हर्नर नेमिला व ह्या वेळेपासून हें शहर यांच्याच ताब्यांत आहे.

बंदर अब्बासी येथें बराच व्यापार चालतो, येथून मध्य व आग्नेयीकडील इराणांतलि पदार्थ बाहेरदेशीं रवाना होतात व या प्रांतांनां व खोरासानला बाहेर देशांहून आलेल्या मालाचा पुरवठा तेथूनच होतो. तेथें टपाल व तारआफिसें आहेत व ब्रिटिश इंडिया स्टीम नॅव्हिगेशन कंपनीच्या टपालबोटी येथें दर आठवड्याला येतात. येथें ग्रेटब्रिटन व रशिया यांचे वकील असतात.

**अब्बिगेरी.**—मुंबई इलाखा धारवाड जिल्हा. रोनच्या दक्षिणेस हें गांव आहे. येथें ईश्वरदेव आणि ज्योतिर्लिंग देव यांचीं देवळें असून प्रत्येक देवळांत शिलालेख आहे. लोकसंख्या सुमारें तीन हजार.

**अब्राहाम**—हा इस्रायल लोकांचा पूर्वज व बायबल मध्यें उल्लेख केलेल्या मूळपुरुषांपैकीं पहिला होय. याच्या संबंधानें निरनिराळ्या काळच्या परस्परविरोधी अशा पुष्कळ दंतकथा व आख्यायिका सांगितल्या आहेत.

एका ... मतें हा टेरेहाच्या तीन मुलांपैकीं एक होता. टेरेहा हा खाल्डी लोकांच्या "उर" शहराहून मेसापोटेमियांत आला असें म्हणतात तेथून अब्राहाम, त्याची बायको सारा व पुतण्या लाट हीं सगळीं कॅनान देशांत गेलीं. तेथून ईश्वराच्या आज्ञेवरून व ईश्वरानें त्यास "तूं राष्ट्रनिर्माणकर्ता होशील" असें सांगितल्यावरून, अब्राहामनें आपल्या मंडळासह पुढें प्रयाण केला. बेथेल येथें त्याच्या व लाटच्या गुराख्यांमध्यें भांडण झालें, म्हणून तो त्यापासून वेगळा झाला व पुढें इजिप्त देशांत गेला. अब्राहामला त्याच्या बायकोच्या दासीपासून आयझाक नांवाचा मुलगा झाला.

पुढें ईश्वराचा त्यास असा साक्षात्कार झाला कीं, तुझी संतति इजिप्त देशात वसाहत करील.

या प्रसंगाची आठवण राहण्याकरितां त्यानें आपलें व आपल्या बायकोचें नांव बदललें व आपल्या मुलाची सुंता केली. ईश्वरानें त्यास आपला मुलगा बळी देण्यास आज्ञा केली ती तो अक्षरशः पाळणार होता इतक्यांत एका देवदूतानें त्यास तसें करण्याची मनाई केली. या आज्ञा पाळण्याच्या तयारीबद्दल ईश्वर त्यास प्रसन्न झाला व त्यानें 'तुला पुष्कळ मुलें होतील' असा आशीर्वाद दिला. त्यानें आपल्या दुसऱ्या दासीपुत्रांस वगळून आपली सर्व जिंदगी आयझाक यास दिली. तो व त्याची बायको, हीं फार वृद्ध होऊन मरण पावलीं.

अब्राहामच्या चरित्राचें ऐतिहासिकदृष्ट्या फारसें महत्त्व नाहीं. परंतु ख्रिस्ती धर्मशास्त्रांतील जुन्या कराराचा अभ्यास करणाऱ्यास तें फार उपयोगी आहे. हिब्रू लोकांनां अब्राहाम म्हणजे आपल्या ध्येयांचें मूर्त स्वरूप आहे असें वाटतें. ते त्यास राष्ट्रनिर्माणकर्ता पुरुष म्हणून अग्रस्थानीं लेखितात व ईश्वरानें त्यास वरचेवर आभिवचन देऊन व त्याच्याशीं करार करून त्याजवरील आपलें प्रेम व्यक्त केलें, म्हणून त्यास फार पूज्य मानितात. धर्मसंस्थापनकर्ता, मूळपुरुष व संकटसमयीं ईश्वर नेहमीं त्याचा पाठिराखा असे या समजुतीमुळें हिब्रू लोकांच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व फारच आहे.

**अब्राहामाइट**—हा पंथ १८ व्या शतकांत बोहिमियांत अस्तित्वांत होता. ह्या पंथाचे लोक ईश्वरवादी होते. हे आपणांस आब्राहामनें सुंता करण्यापूर्वींचे त्याचे अनुयायी म्हणवीत असत. जगांत एकच ईश्वर आहे, असें यांचें मत होतें यांनीं ख्रिस्ती किंवा यहुदी या दोन्ही पंथांत आपली गणना करून घेण्याचें नाकारिलें, म्हणून या पंथास उपासनास्वातंत्र्याच्या कायद्यांतून दुसऱ्या जोसेफ बादशहानें वगळिलें व हद्दपार केलें.

**अब्रूनुकसानी**—एखाद्या गृहस्थाची अब्रूनुकसानी करणें म्हणजे लेखांनीं किंवा भाषणांनीं किंवा खुणांनीं किंवा चिन्हांनीं त्याची इज्जत घेणें होय. बऱ्याच प्राचीन कायद्यांच्या ग्रंथांतून अब्रूनुकसानीस फौजदारी गुन्ह्याचें स्वरूप दिलेलें आढळून येतें. यावरून द्रव्याच्या मोबदल्यानें अब्रूनुकसानीच्या गुन्ह्याचें परिमार्जन करितां येतें ही कल्पना प्राचीन काळीं प्रचलित नव्हती असें दिसतें. प्राचीन काळच्या रोमन कायद्याप्रमाणें अपशब्दात्मक गाणीं रचणारास व सार्वजनिकस्थळीं मोठ्यानें अपमानास्पद भाषण करणारांस देहान्त शिक्षा सांगितलेली होती. त्याहून सौम्य स्वरूपाच्या बेअब्रूच्या व अपमानाच्या अपराधांस शिक्षाहि त्याच प्रमाणांत सौम्य सांगण्यांत येत असे. त्यानंतर ज्या रोमन न्यायतत्त्वशास्त्रावर हल्लीं प्रचलित असलेल्या इतर पाश्चात्य देशांतील कायद्याची उभारणी केली आहे त्यांत भाषणांनीं केलेल्या बेअब्रूचा विचार दोन प्रकरणांत केलेला आहे. पहिल्या प्रकरणांत सार्वजनिकरीत्या केलेल्या बेअब्रूचा विचार केलेला असून दुसऱ्यांत खाजगी रीतीनें केलेल्या बेइज्जतीचें विवेचन आहे. बेअब्रू करणाऱ्या विधानाची सत्यता सिद्ध करून आरोपीस आपली सुटका करून घेतां येत होती इतकेंच नव्हे तर त्याकाळीं आपलें विधान सत्य आहे अशी आरोपीची समजुत असल्यासहि तो दोषमुक्त होत असे. भाषणांनीं केलेल्या बेअब्रूच्या गुन्ह्यास रोमन लोकांत द्रव्यदंडाची शिक्षा करण्याची चाल असे. परंतु पुढें त्या प्रकारच्या गुन्ह्यास अधिक कडक शासन करण्यांत येऊं लागलें.

हिं दु स्था नां ती ल प्रा ची न का य दा.—या विषयाची हिंदुस्थानासंबंधीं माहिती दोन कालविभाग पाडून दिली पाहिजे. यांपैकीं पहिला प्राचीन संस्कृत ग्रंथांतील कायद्याचा काळ होय. हिंदूंचे सुप्रसिद्ध कायदे ग्रंथ मनुस्मृति, याज्ञवल्क्यस्मृति इत्यादि होत. या स्मृतिग्रंथांत अब्रूनुकसानीसंबंधींचा जो कायदा दिलेला आढळतो तो हिंदुस्थानांत दोन हजार वर्षांहूनहि अधिक वर्षें प्रचलित असावा व तोच ब्रिटिश अमलाखालीं पीनल कोडाचा कायदा अंमलांत येईपर्यंत चालू होता. या जुन्या हिंदु कायद्याचें स्वरूप प्रथम पाहूं.

शब्दांनीं दुसऱ्याची अब्रू खराब करणें हा विषय आपल्या स्मृतिग्रंथांत 'वाक्पारुष्य' या सदराखालीं दिलेला असतो. वाक्पारुष्याचें लक्षण नारदस्मृतींत येणेंप्रमाणें दिलें आहे.

देशजातिकुलादीनामाक्रोशं न्यंगसंयुतम् ।
यद्वचः प्रतिकूलार्थं वाक्पारुष्यं तदुच्यते ॥

म्हणजे देश, जाति, किंवा कुल याला उद्देशून प्रतिकूल अर्थ असलेले शब्द अंगविक्षेप करून मोठ्यानें बोलणें याला वाक्पारुष्य असें म्हणतात. अशा अपशब्दांचे किंवा

आक्रोशाचे तीन प्रकार केले आहेतः देशाक्रोश, जात्याक्रोश, व कुलाक्रोश. "गौड लोक कलहप्रिय आहेत" असें म्हणणें हा देशाक्रोशाचा गुन्हा होय. "ब्राम्हण लोक अत्यंत लोभी असतात" असें म्हणणें हें जात्याक्रोशाचें आणि "वैश्वामित्र म्हणजे विश्वमित्र कुलांतले लोक क्रूर कर्मे करणारे असतात," हें कुलाक्रोशाचें उदाहरण होय. शिवाय एखाद्या व्यक्तीच्या विद्येची किंवा कारागिराच्या कौशल्याची वगैरे निंदा करणें हाहि वाक्पारुष्याचाच प्रकार होय. या अपराधाला दण्ड ठरवितांना त्याचे पुढीलप्रमाणें आणखी भेद केले आहेत.

निष्ठुराश्लील तीव्रत्वादपि तत्रिविधं स्मृतम्।
गौरवाउक्रमात्तस्य दण्डोऽपि स्यात्क्रमाद्गुरुः॥

म्हणजे अपशब्दांचे निष्ठुर, अश्लील व तीव्र असे तीन भेद असून त्या भेदानुसार शिक्षा अधिकाधिक मोठी सांगितलेली आहे. धिङ्मूर्खे, जालम इत्यादि निष्ठुर अपशब्दांचें: भगिन्यादि गमनविषयक शब्द अश्लील अपशब्दांचें; आणि सुरापी इत्यादि तीव्र अपशब्दांचें उदाहरण आहे. शिवाय दण्डाचें कमजास्त मान व्यक्तींच्या वर्ण व जाति यांच्या उच्चनीचत्वावरहि अवलंबून होतें. त्याविषयीं याज्ञवल्क्यस्मृतींत पुढील वाक्य आहे.

दण्डप्रणयनं कार्यं वर्णजात्युत्तराधरैः (याज्ञ. १८. २०६)

उदाहरणार्थः— ब्राम्हणाला क्षत्रिय अपशब्द बोलल्यास दण्ड १०० पण, वैश्य बोलल्यास २०० आणि शूद्र बोलल्यास जिव्हाछेदादि शारीरिक शिक्षा; उलट पक्षीं ब्राम्हण क्षत्रियाला अपशब्द बोलल्यास दण्ड ५० पण, वैश्याला बोलल्यास २५ पण आणि शूद्राला बोलल्यास कांहींच शिक्षा नाहीं, असा फरक केलेला आहे. शिवाय जुन्या स्मृतिग्रंथांतील कायद्यांत आणि आलीकडील ब्रिटिश अमलांतील दिवाणी अपकृत्यांच्या कायद्यांत (टॉर्ट) दोन महत्त्वाचे फरक आहेत. पहिला फरक हा कीं, उच्चारलेले अपशब्द यथार्थ असले म्हणजे ते उद्दिष्ट व्यक्तीला पूर्ण लागू पडत असले तरी त्या अपराधाबद्दल शिक्षा स्मृतिग्रंथांत सांगितली आहे.

काणं वाप्यथवा खञ्जमन्यं वापि तथाविधं॥
तथ्येनापि ब्रुवन् दाप्यो दण्डं कार्षापणावरम्॥ मनु ८.२७४

म्हणजे काणा, लंगडा वगैरे शब्द तशा माणसाला जरी उद्देशून वापरले तरी अब्रूनुकसानीबद्दल बोलणाराला दण्ड करण्यांत यावा असा स्मृतिग्रंथांतील कायदा आहे. उलटपक्षीं हल्लींच्या अपकृत्यविषयक कायद्याप्रमाणें बोललेले शब्द सत्य असले तर तो अपराध होत नाहीं. दुसरा महत्त्वाचा फरक म्हणजे हल्लींच्या कायद्यांत अब्रूनुकसानी हा अपराध 'अपकृत्य' (टॉर्ट) आणि 'गुन्हा' (क्राईम) या दोन्ही सदराखालीं घालतां येतो. म्हणजे अपशब्दाबद्दल केवळ नुकसानभरपाई म्हणून योग्य रक्कम वादीला प्रतिवादीकडून दिवाणी कोर्टमार्फत मिळवितां येते. आणि तेच अपशब्द फौजदारी गुन्हा ठरवून अपराध्याला दण्ड, शिक्षाहि मॅजिस्ट्रेटकडून देववितां येते. अशा तऱ्हेची दुहेरी व्यवस्था जुन्या हिंदु कायद्यांत नाहीं.

इंग्रजी कायदा.—या विषयावरील इंग्रजी कायदा मूळांत कसा होता हें स्पष्टपणें सांगतां येण्यासारखें नाहीं. साधारणपणें पहिल्या एडवर्डच्या कारकीर्दीपासून दिवाणी कोर्टांतील द्रव्यमोबदल्याचा मार्ग खुला झाला होता. त्यावेळीं भाषणांनीं व लेखांनीं केलेल्या बेअब्रूच्या गुन्ह्यांत फारसा फरक करण्यांत येत नव्हता. बेअब्रूच्या अपराधास फौजदारी गुन्ह्याचें स्वरूप पहिल्या जेम्सच्या कारकीर्दींत देण्यांत आलें आणि त्या वेळेपासून इंग्लंडांत बेअब्रूच्या गुन्ह्यास दिवाणी व फौजदारी असे दोन्ही उपाय अंमलांत आले आतां आपण या दोन्ही उपायांचें स्वतंत्र रीतीनें अवलोकन करूं.

दिवाणी कायदा.—यांत प्रथम लेखांनीं व भाषणांनीं केलेल्या बेअब्रूचा विचार करून त्यांत फरक केला जातो. भाषणांनीं उत्पन्न होणाऱ्या अब्रूनुकसानीचें परिमार्जन करण्याला मर्यादित उपाय असतात यांत प्रत्येक अपशब्दात्मक किंवा निंदाव्यंजक शब्द विचारांत घेण्यांत येतो असें नाहीं. प्रतिवादीच्या बेअब्रूकारक भाषणानें वादीचें अमुक सांपत्तिक नुकसान झालें किंवा अमुक सांपत्तिक नुकसान हटकून होण्यासारखें आहे हें सिद्ध करावें लागतें. वादीची बदनामी झाली, त्याच्या समाजांत त्याची मानहानी झाली किंवा बेअब्रूकारक विधानामुळें त्याच्या मनाला धक्का बसून तो बेमार झाला इतकें दाखवून भागत नाहीं. ज्या वेळेस वादीला आपलें सांपत्तिक नुकसान झालें असें सिद्ध करतां येत नाहीं, तेव्हां कांहीं कांहीं बाबतींतच फक्त अब्रूनुकसानीची फिर्याद करण्याचा हक्क असतो. उदाहरणार्थ प्रतिवादीनें सजा होईल अशा तऱ्हेचा गुन्हा केल्याचा त्याच्यावर आरोप केला असेल तर किंवा त्याला सांसर्गिक रोग झाला आहे असा प्रतिवादीनें त्याच्यावर आरोप केला असेल तर, प्रतिवादीच्या भाषणांनीं वादीचा वारसाहक्क बुडण्याचा संभव असेल तर, प्रतिवादीनें वादी-स्त्रीवर व्यभिचाराचा आरोप केला असेल तर आणि प्रतिवादीच्या भाषणांनीं वादीच्या धंद्यांत नुकसान होण्याचा संभव असेल तर वादीला दिवाणींत अब्रूनुकसानीचा दावा लावतां येतो.

लेखांनीं केलेल्या बदनामीच्या बाबतींत प्रतिवादीला इतक्या सवलती देण्यांत येत नाहींत. कारण लेख लिहिणाराला अधिक सवड असल्यामुळें त्याचें लिहिणें जाणून बुजून व द्वेषमूलक असलें पाहिजे असें गृहीत धरण्यांत येतें. या कारणानें लेखी बदनामीच्या दाव्यांत वादीचें नुकसान झालें किंवा त्याच्या धंद्यांत त्याजकडे कमीपणा आला वगैरे गोष्टी सिद्ध कराव्या लागत नाहींत. हा बेअब्रूकारक मजकूर तिऱ्हाइताच्या नजरेस पडेल अशा रीतीनें प्रसिद्ध केला असला पाहिजे. हें प्रसिद्धीकरण प्रतिवादीकडून अगदीं निष्काळजीपणानें झालें असलें तरी तेवढ्यानें तो दोषमुक्त होत

नाहीं. बेअब्रूकारक मजकुराबद्दल लेखक प्रकाशक व मुद्रक या तिघांवर जबाबदारी असते व नुकसानभरपाईच्या दृष्टीनेंच फक्त प्रसिद्धीकरणाच्या क्षेत्राबद्दल विचार करण्यांत येतो. बदनामीकारक लेखांतील निंदा उघड उघड नसून प्रच्छन्न आहे असें म्हणून प्रतिवादीला आपलें संरक्षण करितां येत नाहीं.

लेखांतील किंवा भाषणांतील बेअब्रूकारक मजकुराला जर सत्याचा आधार असेल तर त्यानें प्रतिवादीला आपलें रक्षण करितां येतें परंतु त्या मजकुरांत सत्य आहे हें सिद्ध करण्याचा बोजा मात्र त्याजवर असतो. कांहीं बाबतींत मात्र प्रतिवादीवर तसला बोजा नसतो कारण कायद्यानेंच तशाप्रकारचीं विधानें क्षम्य समजण्यांत येतात. उदाहरणार्थ, एखाद्या प्रतिवादीनें जर न्यायकचेरींतील एखाद्या कज्ज्यांत अवश्य लागणारी माहिती दिली व ती माहिती देतांना त्याला वादीची बदनामी होईल असा मजकूर सांगावा लागला तर त्याबद्दल प्रतिवादीवर अब्रू-नुकसानीचा दावा लावतां येत नाहीं. त्याचप्रमाणें पार्लमेंटांत केलेल्या विधानांबद्दल किंवा तीं प्रसिद्ध केल्याबद्दल दावा करितां येत नाहीं. वृत्तपत्रकारांसहि सत्य विधानांबद्दल व सार्वजनिक हिताच्या मजकुराबद्दल जबाबदार धरतां येत नाहीं.

खाजगी आयुष्यक्रमांत एकानें दुसऱ्याशीं विश्वासानें केलेलीं विधानेंहि कायद्यानें क्षम्य मानलीं आहेत. नैतिक, सामाजिक व कायदेशीर कर्तव्य करीत असतां जर त्या कर्तव्यासंबंधीं एकानें दुसऱ्याजवळ कांहीं विधानें केलीं तर तीं विधानें दुसऱ्यानें पृच्छा केल्यानंतर त्यास प्रामाणिकपणानें दिलेली माहितीः उदाहरण, नोकराच्या वर्तणुकीबद्दल दिलेली माहिती, एखाद्या व्यापाऱ्याच्या लायकीबद्दल दिलेली माहिती, स्नेह्यास दिलेली इशारत किंवा ज्या एका धंद्यांत दोघांचें हित निगडित झालें आहे त्यासंबंधीं एका भागीदारानें दुसऱ्या भागीदारास दिलेली माहिती वगैरे सर्व कायद्याच्या दृष्टीनें क्षम्य आहेत.

फौजदारी कायदा.—बदनामी करणाऱ्या लेखांत किंवा भाषणांत निंदापर, अनीतीपर व राजद्रोहपर मजकुराचा समावेश होतो. साधारणपणें दिवाणी व फौजदारी कायद्यांत सामान्य तत्त्वांसंबंधीं फारसा फरक नाहीं.

एकोणिसाव्या शतकांत इंग्लंडांत जे अब्रूनुकसानीचे खटले झाले त्यांत पंचांच्या अधिकारासंबंधीं बराच मनोरंजक व महत्त्वाचा वाद झाला. हा वाद काय होता हें ज्यांनीं मेकॉलेचा 'सात बिशपसंबंधीं निबंध' वाचला असेल त्यांस विस्तारानें सांगण्याची गरज नाहीं. परंतु ज्यांत हा वाद विशेष निकरानें चालविण्यांत आला व ज्यांत त्याचा समाधानकारक रीतीनें निकाल लागला असे खटले म्हटले म्हणजे. वुडफॉल व विल्कीज वगैरेवर झालेले व डीन ऑफ सेंट असाफ याजवर झालेला खटला हे होत. या खटल्यांत लॉर्ड आर्स्किन यानें मोठ्या चातुर्यानें व निकरानें काम चालवून वादाचा निकाल लावून घेतला. पंचांनीं पुराव्यांत दाखल केलेल्या गोष्टींचाच तेवढा विचार करावयाचा कीं, आक्षेपित मजकूर बेअब्रूकारक आहे कीं नाहीं यावद्दल व लेखकाचा हेतु काय होता याचाहि विचार करून आपला अभिप्राय द्यावयाचा हा वादाचा मुख्य प्रश्न होता. अखेर दोषी किंवा निर्दोषी असा निकाल देणें हा अधिकार पंचांकडे होता ही गोष्ट खरी. तथापि त्यांनीं न्यायाधीशानें केलेल्या समारोपाचें नीट मनन करावें व निकाल देतांना कोणत्या गोष्टी विचारांत घेण्याविषयीं न्यायाधीशानें त्यांस सांगितलें तेंहि त्यांनीं ध्यानांत ठेवावें असें कायद्याचें सामान्य तत्त्व आहे. या सामान्य तत्त्वास अनुसरून सदर खटल्यांतील आक्षेपित मजकूर "बेअब्रूकारक" या सदरांत पडतो किंवा नाहीं व कायद्याच्या दृष्टीनें तो मजकूर द्वेषमूलक ठरवितां येतो किंवा नाहीं हें पहावयाचें काम न्यायाधीशाचें असून पंचांनीं त्याचा विचार करण्याचें कारण नाहीं असें त्यांस सांगण्यांत आलें. फौजदारी कायद्याच्या वरील सामान्य तत्त्वासंबंधीं वाद नव्हता आणि वरील खटले जर अब्रूनुकसानीच्या खाजगी स्वरूपाचे असते तर त्या वादाला विशेष महत्त्व आलें नसतें. प्रस्तुत खटल्यांत राजकीय विषयाच्या चर्चेला किती स्वतंत्रता असावी हा मुख्य वादाचा विषय होता. सार्वजनिक हिताच्या प्रश्नाच्या विवेचनस्वातंत्र्याचा हल्लीं ज्याप्रमाणें व्यापक दृष्टीनें विचार करतात त्याप्रमाणें जर त्यावेळीं विचार करण्यांत आला असता तर वादच उपस्थित झाला नसता. लेखकानें आपला लेख सद्धेतूनें लिहिला कीं असद्धेतूनें लिहिला हें ठरविण्याचा हक्क पंचांचा आहे असें अर्स्किनचें म्हणणें होतें आणि त्याच्या म्हणण्याप्रमाणेंच प्रस्तुत इंग्लंडचा कायदा आहे.

हिंदुस्थानांतील अर्वाचीन कायदा.—वर सांगितल्याप्रमाणें अब्रूनुकसानी हा विषय अपकृत्यांचा कायदा ( लॉ ऑफ टॉर्टस ) आणि फौजदारी गुन्ह्याचा कायदा (पीनल कोड ) या दोन्ही ठिकाणीं येतो. या दोन्ही प्रकारचा हिंदुस्थानांतील कायदा मूळ इंग्रजी कायद्याच्या आधारें तयार झाला असल्यामुळें त्याचें सामान्य स्वरूप वर दिलेल्या इंग्रजी कायद्याच्या माहितीवरून लक्षांत येईल. तथापि कांहीं बाबतींत इंग्रजी व हिंदुस्थानांतील कायद्यांत फरक आहे. भाषणांनीं केलेल्या बेअब्रूबद्दल प्रत्यक्ष सांपत्तिक नुकसान झाल्याचा पुरावा असल्याशिवाय नुकसानीबद्दल दावा चालत नाहीं असा इंग्रजी कायद्याचा सामान्य नियम आहे, पण मद्रास हायकोर्टानें हा इंग्रजी कायद्याचा नियम अयोग्य ठरवून अशा बेअब्रूनें सांपत्तिक नुकसान झालें नसलें तरी दुःख व त्रास झाल्याबद्दल वादीस नुकसानभरपाई द्यावी असें ठरविलें आहे [८ मद्रास १७५ (१८८४)]. मुंबई व अलाहाबाद हायकोर्टें याच मताचें आहे. कलकत्ता हायकोर्ट मात्र इंग्रजी कायद्याच्या मताचें आहे. बेअब्रूकारक

लेख प्रसिद्ध करण्यास मनाई हुकूम (इन्जंक्शन) करण्याचा अधिकार स्पेसिफिक रिलीफ ॲक्टाच्या कलम ५४ (इ) पोटसदराप्रमाणें हिंदुस्थानांतील कोर्टांनां दिलेला आहे. इंग्रजी कायद्याप्रमाणें साक्षीदारानें आपल्या जबानींत केलेल्या बेअब्रूकारक विधानाबद्दल दावा करतां येत नाहीं. हिंदुस्थानांत प्रिव्हि कौन्सिलनें व मुंबई हायकोर्टानें याच नियमाला संमति दिली आहे. पण कलकत्ता व अलाहाबाद हायकोर्टांनीं अप्रस्तुत विधानें बेअब्रूकारक असल्यास नुकसानभरपाई मिळावी असें मत दिलें आहे. फिर्याद व कैफियत अर्जांतील अप्रस्तुत बेअब्रूकारक विधानाबद्दलहि असाच निर्णय या हायकोर्टांनीं दिलेला आहे.

अब्रूनुकसानी या फौजदारी गुन्ह्याची व्याख्या व स्वरूप इंडियन पीनल कोडांतील ४९९ कलम व त्याला जोडलेलीं चार स्पष्टीकरणें व दहा अपवाद यांत दिलें आहे. सामान्यतः ही व्याख्या इंग्रजी कायद्याप्रमाणेंच आहे. पण दोहोंत मुख्य फरक असा आहे कीं, लिहिलेल्या शब्दांप्रमाणें तोंडानें बोललेले शब्दहि या गुन्ह्याखालीं पीनल कोडाप्रमाणें येऊं शकतात. पण इंग्रजी कायद्यांत केवळ तोंडचे शब्द (ते कितीहि बेअब्रूकारक असले तरी,) फौजदारी गुन्हा म्हणून मानले जात नाहींत, त्याबद्दल दिवाणी कोर्टामार्फत फक्त नुकसानभरपाई मिळूं शकते. तोंडी अपशब्दांपेक्षां लेखी अपशब्द लोकांत अधिक पसरतात व अधिक काळ टिकतात, असें या फरकाचें कारण इंग्रजी कायद्यांत दिलें आहे. पण तोंडी अपवादच लोकांत अधिक फैलावतात असा पुष्कळ वेळां अनुभव येतो व असत्या अपवादांचें निराकरण करणेंहि फार कठिण असतें. म्हणून पीनल कोडच्या व्याख्येंत लेखी बेअब्रूप्रमाणें तोंडी बेअब्रूहि गुन्हा मानला आहे. दुसरा महत्त्वाचा फरक हा आहे कीं, इंग्रजी कायद्यांत अशा लेखी, छापील, खोदिव वगैरे अपशब्दांनीं मनुष्य शांतताभंगास म्हणजे अत्याचारास प्रवृत्त होईल किंवा काय हें पाहिलें जातें; अत्याचारास प्रवृत्त करण्याइतके कडक ते अपशब्द नसल्यास ते गुन्हा मानीत नाहींत. पीनल कोडांत ही अट नाहीं. ज्या अपशब्दामुळें मनुष्य इतरांकडून नैतिक किंवा बौद्धिकदृष्ट्या कमी दर्जाचा लेखला जाईल, किंवा त्याला त्याच्या जातींत किंवा धंद्यांत कमी योग्यतेचा मानतील, किंवा त्याची पत कमी होईल, किंवा तो शारीरिक दृष्ट्या संसर्गास अयोग्य मानण्यांत येईल असे अपशब्द या गुन्ह्याखालीं येतात (कलम ४९९, स्पष्टीकरण ४ थें). पीनल कोडच्या व्याख्येप्रमाणें बेअब्रूकारक शब्द प्रसिद्ध केले गेले पाहिजेत, म्हणजे उद्दिष्ट व्यक्तीखेरीज एका तरी इसमास ते कळले पाहिजेत. फक्त उद्दिष्ट व्यक्तीसच ते ज्ञात केले गेल्यास तो गुन्हा मानला जात नाहीं. इंग्रजी कायद्यांत ही अट नाहीं. आक्षेपित मजकुराची पुनरावृत्ति करणें हाहि पीनल कोडाप्रमाणें स्वतंत्र गुन्हा मानला जातो, व त्याला शिक्षा तितकीच कडक असते. तसेंच मृत मनुष्याबद्दल बेअब्रूकारक शब्द बोलणें गुन्हा आहे (स्पष्टीकरण १ लें); पण त्याबद्दल दिवाणी कोर्टामार्फत नुकसानभरपाई मात्र मागतां येत नाहीं असा कायदा आहे. शिवाय व्यक्तीप्रमाणें कंपन्या, संस्था वगैरेंनांहि बेअब्रूच्या गुन्ह्याबद्दल काम चालवितां येते (स्पष्टीकरण २ रें).

पीनल कोडांत बेअब्रूच्या गुन्ह्याच्या व्याख्येला जोडलेले अपवादहि महत्त्वाचे आहेत. बेअब्रूकारक शब्द सत्य असून ते सार्वजनिक हित साधण्याकरितां व जरूर तितक्याच प्रमाणांत व लोकांत प्रसिद्ध केल्यास तो गुन्हा होत नाहीं (अपवाद १ ला). म्हणजे बेअब्रूकारक शब्द सत्य आहेत एवढ्यानें अपराधी बचावत नाहीं (दिवाणी खटल्यांत बचावतो,), तर त्याची प्रसिद्धि सार्वजनिक हिताकरितां व योग्य प्रमाणांत केली गेली असली पाहिजे. तसेंच सरकारी नोकरांच्या सार्वजनिक कृत्यांवर, कोणाहि व्यक्तीच्या सार्वजनिक कृत्यांवर, कोर्टांतील साक्षीदारांच्या व खटल्याशीं संबंध असलेल्या इतर व्यक्तींच्या खटल्याबाबत वर्तनावर, कोर्टानें निर्णय दिलेल्या खटल्यावर, नाटक, जलसे वगैरेंच्या सार्वजनिक प्रयोगांवर, पुस्तक-वर्तमानपत्रांदिकांवर वगैरे बाबतींत सद्धेतुपूर्वक टीका करणें हा गुन्हा होत नाहीं. तसेंच स्वतःच्या अधिकाराखालील व्यक्तीबद्दल म्हणजे आईबापांनीं मुलांबद्दल, शिक्षकानें विद्यार्थ्यांबद्दल, धन्यानें चाकरांबद्दल, वगैरे अपशब्दात्मक भाषा वापरली—मात्र ती सद्धेतुपूर्वक असली पाहिजे—तर तो गुन्हा होत नाहीं.

आक्षेपित शब्दांचें सत्यत्व तपासावयाचें म्हणजे त्यापैकीं प्रत्येक शब्द खरा असला पाहिजे असें नाहीं तर आनुषंगिक गोष्टींची व परिस्थितीची माहिती शक्य तितकी मिळवून साधारण अक्कलहुषारीचा माणूस जें अनुमानें काढील तशा प्रकारची टीका असली म्हणजे ती सद्धेतुपूर्वक केलेली आहे असें कोर्ट मानतें व तो गुन्हा होत नाहीं. तसेंच कोणत्याहि माणसाच्या सार्वजनिक कृत्यांवर योग्य ती टीका करणें हें सार्वजनिक हिताचें आहे असें कोर्ट मानतें. मात्र गैरसमज उत्पन्न करणारीं चुकीचीं विधानें बुद्धिपुरःसर केलेलीं असतां कामा नये. अशा प्रकारचें अब्रूनुकसानीसंबंधींच्या हिंदुस्थानांतील कायद्याचें स्वरूप आहे.

**अब्लुर**—(मुंबई इलाखा, धारवाड जिल्हा.) कोडच्या पश्चिमेस दोन मैलांवर असलेलें खेडें. लोकसंख्या सुमारें आठशें. येथें बसप्पा आणि सोमनाथ यांचीं देवालयें आहेत. बसप्पाच्या देवळांत इ. स. ११००, १११९, ११४४ अशा सालचे तीन शिलालेख असून सोमनाथाच्या देवळांत मूर्तीच्या उजवीकडे सन ११६८ चा एक शिलालेख आहे. [धारवाड. गॅ.]

**अभंग**—अभंग शब्दाचा अर्थ अजून स्पष्ट नाहीं आणि अभंगाची पूर्वपीठिका सांपडत नाहीं. प्राकृत पिंगलांत याचें पूर्वस्वरूप दिसत नाहीं. हृदयांतील उत्कट भावना

जशीच्या तशीच थोड्या शब्दांत व्यक्त करण्यासाठीं सोपें वृत्त तेवढें चांगलें आणि या दृष्टीनें ओवी आणि अभंग यांचें महत्त्व आहे.

भक्तिमार्गांतील ज्ञानेश्वरादि नेत्यांनीं अभंगवृत्तांतच आपलें हृद्गत ओतलें असून आज हजारों प्रेमळ भगवद्भक्त त्या अभंगांचा टाहो फोडीत आहेत. कमी शिकलेल्या किंबहुना अगदीं अडाणी लोकांनांहि हे अभंग कळण्यासारखे असल्यामुळें ते म्हणतांना त्यांतील अर्थाशीं त्यांनां पूर्ण समरस होतां येतें.

"अभंग हें वृत्त असें आहे कीं, याला धरबंध अगदीं थोडा आहे. त्याच्या लांबीला तर अगदींच सीमा नाहीं. दोनपासून दोनशें चौकाहि एकाच अभंगांत येऊं शकतील. चौक म्हणण्याचें कारण असें कीं, अभंगाच्या एका ओळींत चार चरण असतात व या चार चरणांचा एक चौक होतो. पण या चरणांचा अक्षरांचा, मात्रांचा किंवा गणांचा नोटसा एकहि नियम लागू पडत नाहीं." असें महाराष्ट्र-सारस्वतकार अभंगरचनासौकर्य दिग्दर्शित करण्याकरितां लिहितात. पण हें सौकर्यच अभंगाचा सार्वत्रिक प्रसार करण्यास व सामान्य जनांस भक्तिमार्गाकडे ओढण्यास कारणीभूत झालेलें आहे; यानेंच मुक्ताबाई-जनाबाईसारख्या अप्रबुद्ध अबलांनां हृदयांतील वैराग्यपर विचार व्यक्त करण्यास संधि दिली व नामदेव तुकोबासारख्या बेताचें शिक्षण असलेल्या ब्राह्मणेतरांनांहि कवित्व करण्याची संधि दिली.

**अभंग वृत्ताचे प्रकार.**—हे दोन प्रकारचे असतात. लहान व मोठा. चरण चार असून त्यांत अक्षरें तीन पासून आठ पर्यंत असतात. यमक कोणत्या चरणाच्या शेवटीं असावें याविषयीं नियम नाहीं. (विज्ञानेतिहास मराठी वृत्तें पृ. १५४ पहा).

**अभंगकर्ते मुख्य कवी, मुकुंदराजः**— मराठी भाषेचा आदिकवि ज्ञानदेव कीं मुकुंदराज हा निर्णय ठरेपर्यंत, पहिला अभंगकार यांपैकीं कोण हें ठरवितां येणार नाहीं. मुकुंदराजाचे कांहीं अभंग उपलब्ध आहेत; त्यांतील मराठी वाणी बरीच शुद्ध दिसते व रचनाहि सुबोध आहे.

दृष्टीचें अग्र शून्याचें तें सार ।
तेंची दशमद्वार पाहीं बापा ॥
तेथें मधुकर नित्य खेळे आतां ।
सूक्ष्म पाहतां अतिलीन ॥
लीन होऊनिया भुंगिचीये परी ।
जिताचि ओवरी प्रासियेली ॥
म्हणे मुकुंदराज अवघाचि गोविंद ।
गो नामें तो शब्द लीन तेथें ॥

मराठींतील पहिली अभंगरचना या दृष्टीनें वरील अभंगाकडे पाहिल्यास स्वभाषाभिमानांत कमीपणा तर मुळींच येत नाहीं; उलट दोनचार शतकांनंतरच्या मराठी भाषेंतील जो हिणकसपणा व फारसी भाषेच्या सहवासानें आलेला गढूळपणा तो त्यांत नाहीं हें पाहून मनाला आनंद होतो. विशेषतः ज्ञानेश्वरींतल्या सारखी क्लिष्ट व कंटाळवाणी भाषा यांत नाहीं. तेव्हां सामान्य लोकांच्याहि आवडीला मुकुंदरायाचे अभंग उतरतील यांत शंका नाहीं. या अभंगकाराविषयीं फारशी ऐतिहासिक माहिती नाहीं. यांचे संस्कृत व मराठी मिळून पांच सहा ग्रंथ उपलब्ध आहेत.

**ज्ञानेश्वरः**—ज्ञानेश्वरी, अमृतानुभव, योगवासिष्ठ, वगैरे ग्रंथांचा कर्ता ज्ञानेश्वर व अभंगकार ज्ञानेश्वर एकच कीं काय असा जो वाद उत्पन्न होतो त्याला कारण ज्ञानेश्वराच्या नांवानें प्रसिद्ध असलेल्या अभंगांतील भाषेचें अर्वाचीन स्वरूप होय. ज्ञानेश्वरींतील भाषा फार जुनी व दुर्बोध आहे; ती वाचणाराला पूर्वाभ्यास अवश्य लागतो; तसें ज्ञानेश्वराच्या अभंगांचें नाहीं. आपणाला अभंगकार ज्ञानेश्वराशीं कर्तव्य असल्यानें वरील वादाकडे या ठिकाणीं लक्ष पुरविणें अनवश्यक होईल. तेव्हां एकदम अभंगावलोकनाला सुरुवात करूं.

ज्ञानेश्वराच्या अभंगांचें विठ्ठलपर, नामपर, उपदेशपर, संतपर, योगपर, सगुणपर, अद्वैतपर, व स्फुट अभंग या प्रकारचें वर्गीकरण करितां येईल. एक हजारापर्यंत अभंग ज्ञानेश्वराचे म्हणून प्रसिद्ध आहे.

विठ्ठलभक्तीमध्यें कवि किती विलिन होतो हें पुढील नांदीसारख्या अभंगांवरून दिसून येईल.

रंगा येईं वो ये रंगा येईं वो ये ।
विठाई किटाई माझेकृष्णाई कान्हाई ॥ ध्रु. ॥
वैकुंठवासिनी वो जगत्रजननी ।
तुझा वेधु ये मनीं ॥ १ ॥
कटीं कर विराजित मुगुट रत्नजडित ।
पीतांबरू कासिका तैसा येई का धांवत ॥ २ ॥
विश्वरूप विश्वंभरे । कमळ नयने कमळाकरे वो ।
तुझे ध्यान लागो बाप रखुमादेवीवरे वो ॥३॥

भक्त ईश्वराला सगुणरूप मानून त्याच्याशीं जो लडिवाळपणा करितो तें पाहून मोठें कौतुक वाटतें.

पांचा दामांचा घोंगडा नेसेन ।
उरली मोट ते मी जेवीन गे बाईये ॥ १ ॥
कामारी ( दासी ) होऊन ।
या गोपाळाचें घर रिघेन गे बाई ये ॥ ध्रु ॥
त्याचा उंबरा उसिसा करीन ।
वरि येर झार सारीन गे बाईये ॥ २ ॥
निवृत्ति ज्ञानदेव पुसतिल वर्म ।
त्यासि कामिण पुरेन गे बाईये ॥ ३ ॥

स्वतःला ईश्वराची स्त्री किंवा दासी कल्पून लिहिलेले दुसरे पुष्कळ अभंग सांपडतात.

कांहीं अद्वैतपर अभंग गूढ अर्थाचे आहेत पण चांगले अलंकारिकहि आहेत.

इवलेसें रोप लावियेलें द्वारीं ।
त्याचा वेल गेला गगनावरी ॥ १ ॥
मोगरा फुलला मोगरा फुलला ।
फुलें वेंचितां वेंचितां अति भारु कळियासी आला ॥ध्रु॥
मनाचे गुगुतीं गुंफिला शेला ।
बाप रखुमादेवीवरीं विठ्ठलीं अर्पिला ॥ २ ॥

× × +

उजव्या आंगें भ्रतार व्याली ।
डाव्या आंगें कळवळ पाळी ॥

× × ×

पति जन्मला माझे उदरीं । मी जालें तयाची नोवरी॥

यांसारखे अभंग मोठे मनोवेधक वाटतात. स्फुट अभंगांत—विरहिणी, हमामा, घोंगडी, आंधळा, पांगळा, गाय, चवाळें, ऋण, पाळणा, कापडी, वऱ्हाड, पाइक, बाळछंद, वासुदेव, डौर, हरिपाठ, मंथन, सौरी, फुगडी व टिपरी या प्रकारचे विषय आहेत. पुढील फुगडी मोठी मौजेची आहे:—

फुगडी फू गे बाई फुगडी फू ।
निजब्रह्म तूं गे बाई परब्रह्म तूं ॥ ध्रु ॥
मन चित्त धू । विषयावरी थू ॥ १ ॥

घोंगडी,—काळें ना सांवळें धवळे ना पिवळें ।
घोंगडें निराळें लाधलें मी ॥ १ ॥
मागील रगडें सांडिलें आतां । पंढरीनाथाजवळीं ॥ध्रु॥
नवें नव धड होतां आलें ।
दृष्टी पाहे तंव मन हारपलें ॥ २ ॥
सहस्रफुली वरी गोंडा थोरू ।
धडुतें दानी रखुमादेवीवरु ॥ ३ ॥

विरहिणीची काय अवस्था होते, तिला चंदनाची उटणी फुलांची शेज व कोकिळकूजित कशीं तापदायक वाटतात हें काव्यांतून जसें वर्णिलें असतें तसेंच ज्ञानदेवानें पुढील विरहिणीच्या अभंगांत घातलें आहे.

घनु वाजे घुणघुणा वारा वाजे रुणझुणा ।
भवतारकु हा कान्हा वेगीं भेटवा कां ॥ १ ॥
चांदवो चांदणें चापे वो चंदन ।
देवकीनंदनें विण नावडे वो ॥ ध्रु. ॥
चंदनाची चोळी माझें सर्व अंग पोळी ।
कान्हो वनमाळी वेगीं भेटवा कां ॥ २ ॥
सुमनाची सेज सीतळ वो निकी ।
वोळे आगी सारिखी वेगीं विझवा कां ॥ ३ ॥
तुम्ही गातसां सुस्वरें ऐकों नेदावीं उत्तरें ।
कोकिळे वर्जावें तुम्ही बाइयानो ॥ ४ ॥
दर्पणीं पाहतां रूप न दिसे वो आपुलें ।
बाप रखुमादेवीवर विठ्ठलें मज ऐसें केलें ॥ ५ ॥

"देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी ।"
"संताचे संगती मनोमार्गगती ।"
"काळवेळ नाम उच्चारिता नाहीं ।"
"रूप पाहतां लोचनीं ।"

या सारखे ज्ञानेश्वराचे अभंग सर्वश्रुत आहेत. ज्ञानेश्वर अभंगरचनेंत नामदेव, तुकारामासारखा प्रख्यात नाहीं पण त्याची बहीण जी मुक्ताबाई हिचे अभंग मात्र चटका लावून सोडण्यासारखे आहेत. वयाच्या सोळाव्या वर्षी मुक्ताबाई कौमार्यावस्थेंतच वारली असल्यानें एवढ्या लहान वयांत संसाराचा कांहीं अनुभव नसतां इतकें उत्कृष्ट व हृदयस्पर्शी वाङ्मय प्रसवली ही गोष्ट खरोखरीच महाराष्ट्राला विशेषतः महाराष्ट्र अंगनाजनांनां भूषणावह आहे. हिचे "ताटीचे अभंग" सुप्रसिद्धच आहेत. एके दिवशीं तिचा भाऊ ज्ञानदेव लोकांच्या टवाळीनें खिन्न होऊन अंगणाची ताटी (दार) लावून खोलींत बसला असतां मुक्ताबाई तेथें आली व ताटी उघडण्यास विनवूं लागली:—

मजवरी दया करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
संत जेणें व्हावें । जग बोलणें सोसावें ॥
तरीच आंगीं थोरपण । जया नाहीं अभिमान ॥
थोरपण जेथें वसे । तेथ भूतदया असे ॥
रागें भरावें कवणाशीं । आपण ब्रह्म सर्व देशीं ॥
ऐशी समदृष्टी करा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
योगी पावन मनाचा । साहे अपराध जनाचा ॥
विश्व झालिया वन्ही । संतमुखें व्हावें पाणी ॥
शब्दशस्त्रें झाले क्लेश । संतीं मानावा उपदेश ॥
विश्व परब्रह्म दोरा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥
लडिवाळ मुक्ताबाई । बीज मुद्दल ठायीं ठायीं ॥
तुम्ही तरोन विश्व तारा । ताटी उघडा ज्ञानेश्वरा ॥

ही मुक्ताबाईची अभंगवाणी किती प्रौढ व भेदक आहे!!

चांगदेव:— यानंतरचा अभंगकार चांगदेव. पण याचे पांच पंचवीसच अभंग कायते उपलब्ध आहेत. पण ते बऱ्यापैकीं आहेत. उदाहरणार्थ:—

बा सखीये सांगातिणी । कांडू दोघी जणी ॥
बारा सोळा जणी । मिळोनिया ॥
देह हें उखळ । मन हें मुसळ ॥
कांडिले तांदुळ । विवेकाचे ॥
प्रकृति हांडी । आधण ठेविलें ॥
ईंधण जाळीलें । काम क्रोध ॥
नदनाचा कढ । येतो वेळोवेळा ॥
चट्ट होतो । जवळी सबधीर ॥
अमृताचे ताट । करूनिया चोखट ॥
पाहुणा बरवंट । आत्माराम ॥
चांगदेव म्हणे । भली वो मुक्ताबाई ॥
ज्ञानाचिये खूण । दाखविली ॥

नामदेव:— याच्या वेळेपर्यंत अभंग हें छंदःवृत्त नसून केवळ एक सोपें कवितावृत्त म्हणून गणलें जाई व म्हणूनच या छंदांत फारसें वाङ्मय उपलब्ध नाहीं. पण नामदेवानें विठ्ठल

भक्तीचा आपला संप्रदाय या सुगम छंदाच्या द्वारें प्रसृत करून काव्यरचनेची एक नवीन तऱ्हा उपयोगांत आणिली. नामदेवोत्तर बरींच भक्तिप्रधान कवनें अभंगछंदांत झालीं. अभंगवाङ्मयाचा काल वास्तविक नामदेवापासून तुकारामापर्यंतचा धरण्यास हरकत नाहीं.

नामदेव, विसोबा खेचरापासून अभंग करण्याचें शिकला असें दिसतेंः—

अभंगाची कळा । कांहीं मी नेणत ॥
त्वरा केली प्रीत । केशीराजें ॥
अक्षरांची संख्या । बोलिलों उदंड ॥
मेरुतो प्रचंड । शर आदीं ॥
सहा साडेतीन । चरण जाणावे ॥
अक्षरें मोजावे । चौक चारी ॥
पहिल्या पासूनी । तीसऱ्या पर्यंत ॥
अठरा गणीत । मेज आली ॥
चौक चारी आदी । बोलिलो मातृका ॥
साविसांची संख्या । शेवटील ॥
दीडं चरणाची । दीर्घ तीं अक्षरें ॥
सूक्ष्म विचारें । बोध केलें ॥
नामा म्हणे एक । शून्य दिलें हरी ॥
प्रीतीनें खेचरी । आज्ञा केली ॥

यांत नामदेवाच्या सहा अक्षरी अभंगांची रचना दिली आहे. नामानें बरीच मोठी अभंगरचना केली आहेः-

" करीन मी तुझे ।ःशतकोटी अभंग ॥ ... नामा म्हणे । नामा म्हणे जरी.न होती संपूर्ण।जिव्हा उतरून ठेवीन मी" ॥

ही प्रतिज्ञा जरी पुरी झाली नसली तरी तीवरून त्याचा अभंगरचनेचा सतत व्यवसाय दिसून येतो. तोच एकटा अभंग करीत असे असें नव्हे तर त्याचें सारें घरदार अभंग रचूं लागलें होतें.

पिता दामशेटी । अभंग दोन कोटी ॥
भक्तिभावें तार्टी । निवेदी देवा ॥
तीन कोटी अभंग । गोणाईचा वाद ॥
स्वात्मसुखबोध । सुखाचा तो ॥
तीन कोटी अभंग । नारोबाची कविता ॥
उगवी स्वात्महिता । दिवस रजनी ॥
तीन कोटी अभंग । विठाचा झगडा ॥
प्रेमरस गोडा । प्रेमाचा तो ॥
महादा आणि गोंदा । अडीच अडीच कोटी ॥
प्रेमरस पोटीं । प्रेमळ तो ॥
एक कोटी अभंग । लक्ष वरती सोळा ॥
प्रेमरस जिव्हाळा । आऊबाईचा ॥
चौऱ्याण्णव लक्ष । रंगाईची वाणी ॥
प्रेमें चक्रपाणी । आळवीलें ॥
दोन कोटी अभंग । राजाईची करुणा ॥
प्रेमें नारायणा । आळवीलें ॥
लाडाई गोडाई । येसा साखराई ॥
कवित्व हें पाहीं । दीड दीड कोटी ॥
एक कोटी देव । पन्नास लक्ष रुक्मिणी ॥
कोटि दासी जनी । साडेबारा ॥
एकूण ह्त्तर लक्ष । चौपन्न कोटी ॥
कविता गोमटी । नामयाची ॥

हें अचाट अभंगकर्तृत्व कितपत खरें आहे. याविषयीं येथें चर्चा करण्याचें कारण नाहीं. " दासी जनी " हिचा स्वतंत्र उल्लेख करणें अवश्य आहे.

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥
चरण न सोडीं सर्वथा । तुझी आण पंढरीनाथा ॥
वदनीं तुझें मंगलनाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥
नामा म्हणे केशवराजा । केला नेम चालवी माझा ॥

हा अभंग सर्वांच्या तोंडीं असतो. यांतील पांडुरंगसमागमाची आवड व त्याविषयीं इष्ट पुढील अभंगांत जास्त बळावून,

"तूं आकाश मी भूमिका । तूं लिंग मी शाळुंका ॥
तूं समुद्र मी चंद्रिका । स्वयें दोन्ही ॥
तूं वृंदावन मी चिरी । तूं तुळशी मी मंजिरी ॥
तूं पावा मी मोहरी । स्वयें दोन्ही ॥
तूं चांद मी चांदणी । तूं नाग मी पद्मिणी ॥
तूं कृष्ण मी रुक्मिणी । स्वयें दोन्ही ॥
तूं नदी मी थडी । तूं तारु मी सांगडी ॥
तूं धनुष्य मी भातडी । स्वयें दोन्ही ॥
नामा म्हणे पुरुषोत्तमा । स्वयें जडलों तुझीया प्रेमा ॥
मी कुडी तूं आत्मा । स्वयें दोन्ही ॥"

असे उद्गार निघाले. वरील अभंगांतील उपमा किती सुंदर व यथातथ्य आहेत, हें रसिक नसणाऱ्यालाहि सहज पटेल.

अभंगवृत्तांत अशी एक मजा आहे कीं, इतर वृत्तांत बोललेले शब्द जसे कृत्रिम वाटतात व बोलणारा अशा छंदोबद्ध भाषेंत बोलला असेल हें असंभाव्य दिसतें, तसें अभंगांत गोंविलेल्या शब्दांबद्दल वाटत नाहीं. कारण मनुष्य जसें बोलतो तसेच शब्द अभंगांत उतरतां येतात व त्यामुळें हृदयाला पिळून काढल्यासारखी अभंगाची भाषा या कवींच्या तोंडून निघते. उदाहरणार्थ—

माझी कोण गती सांगा पंढरीनाथा ।
तारीसि अनाथा केव्हां मज ॥
मनापासूनियां सांगा मजप्रती ।
पुसें काकुळती जीवाचिया ॥
न बोलसी कां रे धरीला अबोला ।
कोणासी विठ्ठला शरण जाऊं ॥
कोणासी सांकडें घालावें हें सांग ।
नको धरूं राग दीनावरी ॥
बाळकासी जैसी एकची ते माय ।

तैसे तुझे पाय मजलागीं ॥
नामा म्हणे देवा अनाथाच्या नाथा।
कृपाळूवा कांता रखुमाईच्या ॥

नामदेवाच्या वायकोचे व आईचे अभंगहि फार हृदयस्पर्शी आहेत. राजाई आपल्या नवऱ्याची संसारविरक्ति पाहून म्हणतेः—

घरधन्यांनीं केला गुरू। वाई मी आतां काय करूं ॥
असून नाहीं ह्या संसारू। चमत्कारू कृपेचा ॥
धांत्र पाव गे मेसाई। कवणाचेंहि न चले कांई ॥
सत्यपण तूझिये ठायीं। असून नाहींसें करीं हें ॥
मंत्र घेतलासे जैसा। घरीं संताचा वोळसा ॥
वोस पडे या हरिदासां। गेले न येती मागुती ॥
काय सांगूं यांच्या रिती। सोसें पायवणी पिती ॥
अवघे भांवरभुतें होती। नाचताती आनंदें ॥
एकमेकांच्या पडती पायां। लौकिकांतुन गेले वाया ॥
म्हणती ये गा पंढरिराया। ब्रह्मानंदें डुल्लती ॥
भोळी सासु गोणावाई। पांढरा स्फटिक व्याली काई ॥
त्यानें जोडला शेषशायी। म्हणे राजाई काय करूं ॥

यांत हरिदासांचें चित्र कसें हुबेहुब काढलें आहे! पुन्हां राजाई आपल्या नवऱ्यावद्दल विठोबाजवळ रदबदली करण्यास रुक्मिणीला काकुळतीनें विनवीत आहेः—

अहो रखुमावाई विठोबासी सांगा।
भ्रतारासी कां गा वेडें केलें ॥
वस्त्रपात्र नाहीं खाया जेवायासी।
नाचे अहर्निशी निर्लज्जसा ॥
चवदा मनुष्यें आहेत माझे घरीं।
हिंडतीं दारोदारीं अन्नासाठीं ॥
वरा मार्ग तुम्ही उमजोनी सांगा।
नामयाची राजा भली नव्हे ॥

नामदेवाप्रमाणें संसाराची फिकीर न बाळगणाऱ्या नवऱ्याबद्दल कोणती स्त्री अशा प्रकारें गाऱ्हाणें करणार नाहीं?

नामदेवाच्या अभंगांची योग्यता फार मोठी आहे. एरवीं त्यांनां परकीयांच्या धर्मग्रंथांत स्थान मिळालें नसतें. शीखांचा वेदतुल्य आदिग्रंथ—ग्रंथसाहेब यांत नामदेवाचे अभंग बरेच आलेले आहेत व ते शीख लोक मोठ्या भक्तिभावानें गुरुमुखीभाषेंतून म्हणत असतात, ते एकून कोणा महाराष्ट्रीयाचें हृदय उचंबळून येणार नाहीं? आपलें शुद्ध मराठी अभंगवृत्त, त्यांतून आपल्या नाम्याचे अभंग व ते शीखांसारख्या राकट लोकांनीं मोठ्या प्रेमानें गावेत, यापेक्षां दुसरी मोठी अभिमानाची गोष्ट ती काय असणार?

जनाबाईः—ही नामदेवाच्या घरांतील दासी म्हणून समजतात व नामाहि हिला "दासी जनी" असें उल्लेखितो. नामदेवाच्या कुटुंबांतील इतर मंडळींप्रमाणें हीहि अभंग रचूं लागली. हिचे अभंग सर्व स्त्री-कवयित्रींच्या कवनांहून सरस आहेत. हिची वाणी रसाळ व अत्यंत गोड आहे. जनाबाईचे अभंग अद्यापहि भाविक मंडळी मोठ्या प्रेमानें गात असतात.

"येरे येरे माझ्या रामा। मनमोहन मेघःश्यामा ॥"

हा अभंग गोंधळी तालसुरावर गातांनां ऐकून हृदय भरून येतें, असा अनुभव पुष्कळांनां असेलच. रवींद्रनाथांच्या गीतांजलींत ईश्वराशीं गुजगोष्टी केलेल्या जशा आढळतात, तशाच प्रकारची ईश्वरभक्ति जनीच्या अभंगांत आढळते.

कोणे एके दिवशीं। विठोबा गेला जनीपाशीं ॥
हळूच मागतो खायासी। काय देऊं बा मी तुसी ॥
हातीं धरून नेला आंत। वाढी पंचामृत भात ॥
प्रेमसुखाचा ढेंकर दिला। जनी म्हणे विठो धाला ॥
जेवीं जेवीं बा मुरारी। तुज वाढिली शिदोरी ॥
कनकाचें तार्टी। रत्नजडित ठेविली वाटी ॥

ईश्वर आपल्याकरितां किती कष्ट घेत आहे, मजुरासारखा रावत आहे, तेव्हां आतां जगून संसार करणें नको, ही भक्ताची कल्पना फार थोड्यांनां शिवली असेल.

आतां पुरे हा संसार। कोठें फेडूं उपकार ॥
सांडुनियां थोरपण। करी दळणकांडण ॥
नारीरूप होउनि हरी। माझें न्हाणें धुणें करी।
रानां जाये वेची शेणी। शेखीं वाहे हरी पाणी ॥
ठाव मागें पायांपाशीं। म्हणे नामयाची दासी ॥

जनीसारखी चौदाव्या शतकांतली एक शूद्र स्त्री वेदांतपर अभंग जेव्हां रचिते तेव्हां तो काळ आजच्यापेक्षांहि स्त्रीशिक्षणांत पुढें होता कीं, काय अशी शंका येऊं लागते!

नामदेवकालीन अभंगकार.—नामदेवाच्या काळीं संतकवींत ज्यांचे अभंग विशेष लक्षणीय आहेत असे पुरुष म्हणजे विठोबाखेचर, परसा भागवत, चोखामेळा, गोराकुंभार, जगमैत्र नागा, नरहरी सोनार, जोगा परमानंद, वत्सरा इत्यादि होत. विसा खेचर व्यापारी असल्यानें तो साहजिकच नंदभाषेंत अभंगरचना करी, व "मुलु वदनाचा। आंगलू हाताचा। उदाणू नेत्राचा। स्वामी माझा" असें म्हणे. नरहरी सोनार प्रथम कट्टा शिवभक्त व विष्णुद्वेष्टा असे; पण जेव्हां भागवतधर्माची मशाल ज्ञानदेव नामदेवादि संतांनीं महाराष्ट्रभर फिरविली तेव्हां नरहरीच्या हृदयांत उजेड पडून "शिव आणि विष्णु। एकचि प्रतिमा। ऐसा ज्याचा प्रेमा। सदोदित ॥ धन्य ते संसारी। नर आणि नारी। वाचें हर आणि हरी। उच्चारिती"॥ असें बोलूं लागला. या नामदेवकालीन अभंगकारांचें कवित्व फार थोडें उपलब्ध आहे. यांची काव्यरचना भक्तिभावानें ओथंबलेली व सात्त्विक मनोवृत्ति जागृत करणारी अशी आहे. हे कवि सर्वच श्रेष्ठवर्णाचे होते असें नाहीं. गोरा कुंभार, सांवतां माळ्यासारखे शूद्र, चोखामेळा यासारखे महार अस्खलित अभंग रात्रंदिवस रचीत. चोखा महाराची बायको सुद्धां,

"पुढें ठेवियलें पान। वाढी कुटुंबी भोजन ॥
तुम्हा योग्य नाहीं देवा। गोड करोनिया घेवा ॥

द्रौपदीच्या पाना । भूललेती नारायणा ॥
येथें नाहीं ऐसी परी । बोले चोखयाची नारी ॥ ”

असें सुसंस्कृत वाणीनें दैवास बजाविते. येथें असें सांगितलें पाहिजे कीं, अभंगकार स्वतः स्वतःचे अभंग लिहित नसे. ज्ञानदेवाचे सच्चिदानंद बावा, मुक्ताबाईचे ज्ञानदेव, चांगदेवाचे शामा कासार, चोखामेळ्याचे अनंतभट यांप्रमाणें एक दुसऱ्याचे अभंग-आख्यानें लिहि.

एकनाथ—ज्ञानदेवानें मराठीचा पाया घातला ही गोष्ट खरी पण तिला व्यवस्थेशीर व सर्वांगसुंदर बनविण्याचें काम एकनाथानें केलें. आपणाला येथें एकनाथाचा एक अभंगकार या दृष्टीनें विचार कर्तव्य आहे. तेव्हां त्याचें इतर कर्तृत्व बाजूला ठेवून त्याचे अभंग पाहूं. नाथाचे अभंग फारसे नाहींत व प्रख्यातहि नाहींत. मात्र या अभंगांवरून एकनाथाची प्रौढ मराठी भाषा चटकन् ध्यानांत येतेः—

बोधुभानु तया नाहीं माध्यान्ह ।
सायंप्रातर नाहीं तेथें कैचा अस्तमान ॥
कर्मेचि खुंटलें करणेंचि हारपलें ।
अस्तमान गेलें अस्तमाना ॥
जिकडे पाहें तिकडे उदयोचि दीसे ।
पूर्वपश्चिम तेथें कैची भासे ॥
एकाजनार्दनीं नित्यप्रकाशा ।
कर्माकर्म जाले दिवसा चंद्र तैसा ॥

पुढील अभंगांत वेदांती व वारकरी एकनाथ दृष्टीस पडतो.

काया ही पंढरी आत्मा हा विठ्ठल ।
नांदतो केवळ पांडुरंग ॥
भावभक्ति भीमा उदक तें वाहें ।
बरवा शोभताहे पांडुरंग ॥
दयाक्षमाशांति हेचि वाळुवंट ।
मिळालासे थाट वैष्णवांचा ॥
ज्ञानध्यान पूजा विवेक आनंद ।
हाचि वेणुनाद शोभनसे ॥
दश इंद्रियांचा एक मेळा केला ।
ऐसा गोपाळकाला होत असे ॥
देही देखिली पंढरी जनीं वनीं ।
एकाजनार्दनी वारी करी ॥

एकनाथकालीन अभंगकारः—एकनाथकालीन अभंगकार फारसे नाहींत. या काळांत प्रौढ मराठी लिहिण्याची घाटणी पडून, आख्यानें लिहिण्यांत येऊं लागलीं बहुतेक सर्व आख्यानें ओवीवृत्तांतच आहेत. मुक्तेश्वरासारख्या महाकवीनें आपलीं बहुतेक सर्व आख्यानें ओवीवृत्तांत सुंदर व अलंकारिक भाषेंतच लिहिलीं. ओवी व अभंग हीं दोन शुद्ध मराठी वृत्तें एकमेकांपासून फारशीं निराळीं नाहींत. ओवीवृत्त अभंगापेक्षां जास्त स्वैर असल्यानें मोठमोठीं कथानकें व वर्णनें यांतच रचणें सुलभ व सोयीचें जातें. सोळाव्या शतकांतील-ख्रिस्ती मराठी कवि स्टिफेन्स आपल्या ख्रिस्त-पुराणांतील ओवीवृत्ताला अभंगच म्हणतो असें आधारार्थ वाक्योद्धार न करतां रामभाऊ जोशी सांगतात ( मराठी भाषेची घटना पृ. २५५ ). त्याच्या अभंगाचा मासला येणेंप्रमाणें:—

जैसी हरळामाजी रत्नकुइला । कीं रत्नामाजी हिरा निळा ॥
तैसी भाषांमर्ज्ञी चोखळा । भाषा मराठी ॥
जैसी पुष्पामाजी पुष्प मोगरी । कीं परिमळांमाजी कस्तुरी ॥
तैसी भाषामाजी साजिरी । मराठिया ॥
पाखियांमध्यें मयोरू । वृखियांमध्यें कल्पतरू ॥
भाषामध्यें मानू थोरू । मराठियेसी ॥
तारांमध्यें बारा राशी । सप्तवारांमध्यें रवी शशी ॥
या द्वीपीचिया भाषांमध्यें तैसी मराठिया. ॥

एका ख्रिस्ती मनुष्याचें केवढें हें मराठीवरील प्रभुत्व ! त्यानें आपणांपूर्वी होऊन गेलेल्या ज्ञानदेव-नामदेव-एकनाथ यांच्या काव्यांचें दांडगें अध्ययन केलें असलें पाहिजे. या काळांतील दुसरा नांव घेण्यासारखा अभंगकार म्हणजे विष्णुदास नामा. यानें सबंध महाभारतावर ओवी छंदांत रचना केली आहे. अभंग फारच थोडे आढळतात त्यांपैकीं पुढील एक आहेः—

कुश्चळ भूमिसी । उगवली तूळसी ॥
अपवित्र तियेसी । म्हणूं नये ॥
काकविष्टेमाजी । उगवला पिंपळ ॥
तयासी अमंगळ । म्हणूं नये ॥
लोखंडाचा खिळा ॥ परिसा लागला ॥
मागलीया मोला । मागूं नये ॥
दासियाचा पुत्रा । राज्यपद आलें ॥
पहिलिया बोला । बोलूं नये ॥
विष्णुदास नामा । विठ्ठलीं मिळाला ॥
शिंपी शिंपी त्याला । म्हणूं नये ॥

तुकारामः—भागवतधर्माची पताका अखिल महाराष्ट्रभर, किंबहुना हिंदुस्थानभर फिरविणारा भक्ताग्रणी व महाराष्ट्रसंत जो तुकाराम त्याच्याविषयीं फार लिहिणें नकोच. त्याच्या संप्रदायाइतका दुसरा मोठा संप्रदाय नाहीं. त्याचे अभंग हजारों लहानमोठे, सुशिक्षित-अशिक्षित, भाविक-अभाविक गेलीं तनिशें वर्षें अहोरात्र घोकीत आहेत. मराठी बोलणाऱ्याच्या तोंडांत कळत-न कळत त्याचा अभंग म्हणी रूपानें येत नाहीं असें होतच नाहीं. आपल्या म्हणण्याला आधार म्हणून चटकन् तुकारामाच्या अभंगांतील चरण बायकापोरेंसुद्धां म्हणतात. उदाः—जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे ।; सुख पाहतां जवापाडे दुःख पर्वताएवढें ।;आधि होता वाघ्या...मूळ स्वभाव जाईना...इत्यादि. ज्याप्रमाणें जुन्या मताचे वारकरी याचे अभंग वेदतुल्य मानतात त्याचप्रमाणें प्रौढ सुधारक प्रार्थनासमाजादि कार्यांत तुकारामाची मदत घेत असतात. अभंगाची भाषा घरींदारीं साधारण माणसें

बोलतात तीच व्यावहारिक भाषा असल्यानें त्यांतील आशय सहज पटतो.

तुकारामानें वैराग्य, ज्ञान, भक्ति, नीति, वगैरे अनेक विषयांवर हजारों अभंग रचिले आहेत. त्यांपैकीं पांच सहा हजार प्रसिद्ध आहेत. 'अभंगवाणी प्रसिद्ध तुकयाची' हें खोटें नाहीं. नामदेव आणि तुकाराम यांमध्यें अग्रस्थान कोणाला द्यावें याविषयीं मोठा विचारच पडेल. तथापि तुकारामाचा अखंड चालत आलेला लौकिक व त्याच्या अभंगकाव्याला प्राप्त झालेलें थोर महत्त्व हीं लक्षांत आणल्यास अभंगाचा सर्वश्रेष्ठ कवि तुकारामच ठरेल यांत शंका नाहीं. अंतःकरणाला जाऊन भिडणारीं तुक्याचीं वचनें व त्या वचनांतील सडेतोडपणा नाम्याच्या अभंगाला मागें टाकितो. तुकारामाचा स्पष्टवक्तेपणा कधीं कधीं सभ्य भाषेची मर्यादा ओलांडून पार दूर जाई.

नाम न वदे ज्याची वाचा । तो लेक दो बापाचा ॥
हेचि ओळख तयाची । खूण जाणा अभक्ताची ॥
ज्यासी विठ्ठल नाहीं ठावा । त्याचा संग न करावा ॥
नाम न म्हणे ज्याचें तोंड । तेंचि चर्मकाचें कुंड ॥
तुका म्हणे त्याचे दिवशीं । रांड गेली महारापाशीं ॥

तुकारामाच्या अभंगाची भाषा वरीच जुनी व सध्यां न समजण्याजोगी आहे. गाथांतून. किंवा पुस्तकांतून आढळणारे अभंग तुकारामाच्या अस्सल भाषेचे नमुने नव्हत. त्यांनां तुकारामशिष्यांनीं झिलई दिलेली आहे, म्हणून ते समजण्यास जड जात नाहींत. रा. वि. ल. भावे यांनीं "तुकारामबुवांचा अस्सल गाथा" प्रसिद्ध केला आहे (शके १८४१, आर्यभूषण प्रेस) त्यांतील अभंग वाचण्यास क्लिष्ट वाटतीलः—

अषंड मुडतर । सासुरवास करव.र ॥ १ ॥ घृ ॥
याची जाली बोळवण । आतां नेदषों ती सीण ॥ छ ॥
बहुतांची दासी । तये घरी सासुरवासी ॥ २ ॥
तुका म्हणे मुळें । षंड जाला येका वेळे ॥३॥ छ॥ छ ॥

बुधीहीना जडां जीवां । नको देवा उपेक्षु ॥ १ ॥ धृ ॥
परीसाची वीश्रापणा । आम्हा दासां दीनाचीं ॥ छ ॥
चींतुनीयां आलो पाये । त्यासी काय वंचने ॥ २ ॥
तुका म्हणे पुरुशतमा । करी क्षेमा अपराध ॥ ३ ॥

ही मात्र खरी तुकारामाची कुळंवाऊ भाषा दिसते. असल्या अस्सल भाषेंतील अभंग आपल्या सुशिक्षित कानांनां रुचणार नाहींत हें खरें. तुकाराम सोसायटी म्हणून पुण्यांत एक संघ होता आणि त्यानें तुकारामाच्या अभंगांत निश्चितपणें त्याचे कोणते हें ठरविण्यासाठीं प्रयत्न केला असें म्हणतात. पण त्या प्रयत्नाचें फल अगर स्वरूप चवाट्यावर आलें नाहीं.

तुकाराम, प्रचारांत असलेल्या गोष्टींचा आपल्या अभंगांत उपयोग करून आपलें म्हणणें नीट पटवून देत असेः—

वाघें उपदेशिला कोल्हा । सुखें खाऊं द्यावें मजला ॥
अंतीं मरसी तें न चुके । मजही मारितोसी मुके ॥
येरू म्हणे भला भला । निवाड तुझ्या तोंडें झाला ॥
देह तंव जाणार । घडेल पर-उपकार ॥
येरू म्हणे मनीं । ऐसें जावें समजोनी ॥
गांठ पडली ठकाठका । त्यांचा धर्म बोले तुका ॥

एक श्रोता पुराणाच्या वेळीं स्फुंदून रडत असे तें पाहून पुराणिकाला वाटे कीं आपल्या सांगण्याच्या हातोटीमुळें याला प्रेमाचा गहिंवर येतो. एके दिवशीं सहज त्याला प्रश्न करितां, आपल्या नुकत्याच मृत झालेल्या बोकडांत व पुराणिकांत दाढी वगैरेंचें साम्य पाहून आठवण होते व दुःखाचा उमाळा येतो अशी खरी हकीगत त्यानें सांगितली.

वरीस गोष्टीवर तुकारामाचा अभंग पुढीलप्रमाणें:—

देषो(खो) नी पुराणीकाची दाढी । रडे फुंदे नाक ओढी ॥धृ॥
प्रेम ष (ख) रें । दीसे जना॥
भींन (भिन्न) अंतरीं भावना ॥छ॥
आवरीतां नावरे । षु (खु) र आठवी नेवरें ॥ २ ॥
बोल न ये मुषा (खा) वाठा । म्हणे होतां व्यांचा तोटा ॥३॥
दोन्ही सींगें च्याऱ्ही पाये । षु (खु) यां दावी म्हणे हाये ॥४॥
मना आणितां बोकड । मेला त्याची चरफड ॥५॥
होता भाव पोटी । मुषा (खा) आला तो सेवटी ॥ ६ ॥
तुका म्हणे कुडें । कळो येतें तें रोकडें ॥ ७ ॥

तुकारामाच्या अभंगांतून तत्कालीन स्थिति चांगली चित्रित केलेली आहे. त्यानें सरसहा सर्व वाईट गोष्टींवर तडाखे ओढले आहेत. (१) गुरु-शिष्यांचें ढोंग, (२) वाटेल त्या देवतांचें पूजन, (३) तीर्थयात्रा, (४) जशास तसें; (५) अस्पृश्यता इत्यादि समाजव्यंगांवर त्याचे पुढील प्रमाणें अभंग आहेत.

(१) गुरु आला वेशीद्वारीं । शिष्य पळतो खिडारीं ॥
कशासाठीं झालें येणें । त्याचें आलें वर्षासन ॥
तुका म्हणे चेला । गुरु दोघे नरकाला ॥

वर्षासन मागण्याकरितां शिष्यांकडे जाणारे गुरू व ते आले असतां दडी मारून बसणारे शिष्य यांत वर्णिले आहेत.

(२) रंडी चंडी शक्ति । मद्य मांसाते भक्षिती ॥
बहिरव खंडेराव । रोटी सुटी साठीं देव ॥
गणोबा विक्राळ । लाडु मोदकाचा काळ ॥
मुंजा म्हैसासुरें । हे तो कोण लेखी पोरें ॥
वेताळें फेनाळें । जळो त्यांचें तोंड काळें ॥

किती निर्भीड उक्ति ही !!

(३)जाउनियां तीर्था काय तुवां केलें । चर्म प्रक्षाळिलें वरीवरी॥
अंतरीचें शुद्ध कासयानें झालें । भूषण त्वां केलें आपणया ॥
वृंदावन-फळ घोळिलें साकरा । भीतरील थारा मोडेचिना ॥
तुका म्हणे नाहीं शांति क्षमा दया । तोंवरीं कासया फुंदां तुम्ही ॥

(४) पाया जाला नारू । तेथें बांधला कापूरू ॥
तेथें बिबव्याचें काम । अधमासि तों अधम ॥
रुसला गुलाम । धणी करीतो सलाम ॥
तेथें चाकराचें काम । अधमासि तो अधम ॥
रुसली घरची दासी । धणी समजावी तियेसी ॥
तेथें बटकीचें काम । अधमासि तो अधम ॥
देव्हाऱ्यावरि विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ॥
तेथें पैजारेचें काम । अधमासि तों अधम ॥
तुका म्हणे जाती । जातीसाठीं खाती माती ॥

(५) महारासी शिवे । कोपे ब्राह्मण तो नव्हे ॥
तया प्रायश्चित्त कांहीं । देहत्याग करितां नाहीं ॥
नातळे चांडाळ । त्याचा अंतरीं विटाळ ॥
ज्याचा संग चित्तीं । तुका म्हणे तो त्या याती ॥

ईश्वराच्या ठिकाणीं तुकारामाची असलेली अलोट भक्ति दाखविणारे अभंग अनेक आहेत कांहीं अभंग तर मोठ्या कळवळ्यानें म्हटलेले दिसतातः

भेटीलागीं जीवा लागलीसे आस।पाहे रात्र-दिवस वाट तुझी॥
पूर्णिमेचा चंद्र चकोरा जीवन । तैसें माझें मन वाट पाहे ॥
दिवाळीच्या मुळा लेंकी आसावली।पाहतसे वाटुली पंढरीची॥
भूकेलिया बाळ अतिशोक करी । वाट पाहे परि माउलीची ॥
तुका म्हणे मज लागलीसे भूक।धांवूनी श्री-मुख दावीं देवा॥

यांतील उपमा किती हृदयंगम व रोजच्या अनुभवांतल्या आहेत! कांहीं अभंगांतून मार्मिक विनोद दिसून येतोः—

एक ब्रह्मचारी गाढवा झोंबता । हाणोनियां लाता पळालें तें ॥
गाढवही गेलें ब्रह्मचर्य गेलें । तोंड काळें झालें जगामाजी ॥

कानडी बायको व मराठा नवरा यांची गंमत पुढील अभंगांत दिली आहेः

कानडीनें केला मऱ्हाटा भ्रतार । एकाचें उत्तर एका नये ॥
तिनें पाचारिलें इल बा म्हणोन। येरू पळे आण जाइली आतां॥

तुकारामाचे अभंग नित्य परिपाठांतले असल्यानें येथें जास्त उदाहरणें देणें अप्रस्तुत होईल, तेव्हां कांहीं म्हणी-प्रमाणें रूढ असलेल्या अभंगांचे चरण देऊन तुकारामाच्या अभंगांचें तात्पुरतें परीक्षण पुरें करूं.

(१) अधिकार तैसा करूं उपदेश. (२) आंधळ्यासि जन अवघेची आंधळे. (३) आलें देवाचिया मना । तेथें कोणाचें चालेना. (४) आपणांसारिखे करिती तात्काळ. (५) आधी होता वाघ्या । दैवयोगें झाला पाग्या. (६) उंच वाढला एरंड. (७) कन्या सासुऱ्यासि जाये । मागें परतोनी पाहे. (८) जे का रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले. (९) जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती. (१०) जन हें सुखाचें दिल्या घेतल्याचें. (११) दया तिचें नांव भूतांचें पाळण. (१२) दया क्षमा शांति । तेथें देवाची वसति. (१३) नाहीं निर्मळ जीवन । काय करील सावण. (१४) लिंबाचिया झाडा साकरेचें आळें. (१५) पायींची वहाण पायीं बरी. (१६) बीजा ऐसीं फळें. (१७) बोले तैसा चाले. (१८) नवसें कन्या पुत्र होती. । तरी कां करणे लागे पती. (१९) शुद्ध बीजा पोटीं । फळें रसाळ गोमटीं. (२०) सुख पाहतां जवा पाडें । दुःख पर्वताएवढें. (२१) क्षमा शस्त्र जया नराचिया हातीं. (२२) कोणी निंदा कोणी वंदा. (२३) बरें झालीयाचे अवघे सांगाती. (२४) साकरेच्या गोण्या बैलाचिये पाठी. (२५) जावें त्याच्या वंशा तेव्हां कळे.

तुकाराम कालीन अभंगकारः—निंबराज, सेना न्हावी, मोरया गोसावी, गणेशनाथ, शेख महंमद इत्यादि कवी व तुकारामाचे शिष्य यांचे कांहीं अभंग आहेत; पण तुकारामाच्या अभंगकर्तृत्वापुढें त्यांची रचना कांहींच नव्हे. सेना न्हावी हा तुकारामाच्या मागील काळचा दिसतो. त्याचे सुमारें १५० ते २०० अभंग उपलब्ध आहेत. वारकरी लोक याचें अभंग प्रेमानें गातात. पुढील अभंग प्रसिद्ध आहे.

आम्ही जातीचे वारीक । काम करणें बारीक ॥
गुरु डोळा दर्पण दावूं । भावार्थाचा चिमटा घेऊं ॥
ईषामनीषा बगला झाडूं । कामक्रोध नखें काढूं ॥
बादशहाचे द्वारीं । सेना न्हावी काम करी ॥

शेखमहंमदः—हा मुसुलमान जातीचा मराठी कवि असून त्याचे वेदांतपर मराठी ग्रंथ आहेत. मुलाण्याचें काम करतांनां याला उपरति झाली व तेव्हांपासून तो ईश्वरभजन करूं लागला.

मी जातीचा मळीण वंश । संस्कार नेणें मऱ्हाटीस ॥
नाहीं पाहिलें शास्त्र पुराण।वोलों नाहीं शिकलों साळसूद वचन

असें असतांनासुद्धां याची अभंगवाणी बरी आहे.

कांटे केतकीच्या झाडा । आंत जन्मला केवडा ॥
फणसा अंगें करड काटे । आंत साखरेचे गोटे ॥
ऊंस सर्वांआंगीं काळा । आंत अमृतजिव्हाळा ॥
नारळ वरी तो कठीण । आंत सांठवे जीवन ॥
काळी कस्तुरी दिसती । आंत सुगंध सुटती ॥
मधमाशांची घोंगाणी । आंत अमृताची खाणी ॥
शेख महंमद विलासी । झाला हरिभक्तीचा रहिवासी॥

याप्रमाणें शेख महंमद हरिभक्त बनला. याच्या रेणुका तेलीण नांवाच्या भक्तिणीनेंहि कांहीं अभंग केले आहेत.

निळोबाः—तुकारामाच्या चौदा टाळकरी शिष्यांपैकीं निळोबा हा एक असून त्याचीच कायती कविता प्रसिद्ध आहे. याच्या अभंगांची भाषा अगदीं सुलभ व प्रचलित असून त्यांत विचारस्वारस्य अधिक आहे. पुढील अभंगांत पांडुरंगाचें वर्णन दिलें आहे तें मोठें काव्यमय वाटेल.

अचळ धरा तैसें पीठ । पायातळीं मिरवे वीट ॥
दोन्ही पाउलें समान । जैसे योगीयाचे नयन ॥
जानु जंघ ते स्वयंभ । जैसे कर्दळीचे स्तंभ ॥
कसीयले पीत वसन । झळके विद्युल्लतेसमान ॥
शेष बैसला वेटाळा । तैसा कटिबंध मेखळा ॥
उदर त्रिवळिये विशाळ । तैसें नाभीचें मंडळ ॥

तुळशी मंजरिया गळां । जैशा सुटल्या मेघमाळा ॥
दिग्गजाचे शुंडादंड । तैसे कटीं कर प्रचंड ॥
पूर्णिमेचा उदो केला । तैसा मुखचंद्र शोभला ॥
जैशीं नक्षत्रें चमकती । तैसीं कुंडलें चमकती ॥
सूर्य मिरवे नभमंडळा । तैसा केशराचा टिळा ॥
क्षीराब्धीचे चंचल मीन । तैसे नेत्री अवलोकन ॥
जैसें मेरूचें शिखर । तैसा माथां मुगुट स्थिर ॥
इंदु प्रकाशें वेढिला । तैसा क्षीरोदकें वेष्टिला ॥
तृषीलागीं चातकपक्षी । निळा तैसा ध्यान लक्षी ॥

रामदासः—रामदासस्वामी व त्यांच्या संप्रदायांतील मंडळी यांनींहि पुष्कळ स्फुट अभंग रचिले आहेत. सुखाचे सांगाती सर्वही मीळती । ; साधू–संगें साधू भोंदू–संगें भोंदू; वाळक जाणेना मातेसी । ; ऐसे कैसें रे सोवळें । ; वाजे पाऊलु आपुलें । ; इत्यादि समर्थांचे अभंग रोजच्या पाठांतले आहेत.

आतां कोठें धरूं भाव । बहुसाल झाले देव ॥
एकाहुनी एक थोर । मुख्य पूजा पारंपर ॥
माझे कुळींचीं दैवतें । सांगों जातां असंख्यातें ॥
रामदास देव एक । येर सर्वही मायिक ॥

हा अभंग अनेक देवांनां कंटाळून म्हटलेला दिसतो. "अन्न पंचकां" तील अभंग रामदासांचेच दिसतात.

उत्तरकालीन अभंगकार.—तुकारामनंतरच्या म्हणजे १८ व्या शतकांत कांहीं थोडे अभंगकार होऊन गेले. त्यांत दिनकर गोसावी, शिवदिन केसरी परंपरा, महीपति, शहामुनी हे कवि जरा प्रख्यात असे होते. म्हणून त्यांच्या अभंगांकडे वळूं. महाराष्ट्र कवींमध्यें बहुतेकांनीं अभंग केले आहेत. पण अभंगाविषयीं प्रख्यात् असे नामदेव, तुकारामासारखे कवी थोडेच, तेव्हां सर्वांचा परामर्ष येथें आपणांस घेतां येणार नाहीं; म्हणून कांहीं निवडक अभंगकारांवरच लिहावें लागणार. दिनकर गोसावी समर्थ शिष्य असून त्यांचें बहिणाजी असें दुसरें नांव आहे. "स्वानुभव दिनकर" हा ग्रंथ यांचाच आहे. यांचे चार पांचशे अभंग उपलब्ध आहेत. शिवदिन हे नाथपंथी स्वामी असून यांची गुरुशिष्य परंपरा मोठी आहे; बहुतेक गुरुंची कविता, (विशेषतः अभंग) संशोधिली गेली आहे. या गुरुपरंपरेंतील गुप्तनाथ ही एक बालविधवा ब्राह्मण स्त्री असून हिच्या अभंगांची वही डॉ. विल्सन साहेबांस सांपडली होती, त्यांतलि एक अभंग असाः—

माता पिता त्राता अरि पुत्र भ्राता ।
गुरूवीण आतां नाहीं दुजा ॥
पशुपक्ष याती गुरुरूप भासती ।
ऐशी ज्याची स्थिति तोचि जाणें ॥
वृक्षवल्ली पाही अणुरेणु तेही ।
गुरुविण नाहीं रितें कोठें ॥
ऐसा गुरुराज भज पूर्णव्यापक ।
गुप्त बोले रंक राज सम ॥

शिवदिनाचा पुत्र नरहरि हाहि अभंग करी.

महाराष्ट्र काव्यांत महीपतीची रचना विपुल व हृदयंगम अशी आहे. याचा भक्तिविजय ग्रंथ प्रसिद्ध आहे. यानें बहुतेक संतांचीं चरित्रें लिहिलीं. त्यापैकीं जीं कांहीं अभंग वृत्तांत आहेत तीं येणेंप्रमाणें:—

| नांव | | अभंग | नांव | | अभंग |
|---|---|---|---|---|---|
| नामदेव | चरित्र | ६२ | जगमित्र नागा | चरित्र | ६३ |
| हरिपाळ | ,, | ५८ | माणकोजीबोधले | ,, | ६७ |
| कमाल | ,, | ६७ | संतोबा पवार | ,, | १०२ |
| नरसिंह मेहता | ,, | ५२ | चोखामेळा | ,, | ४७ |
| राका कुंभार | ,, | ४७ | | | |

इतर फुटकळ अभंग बरेच आहेत. त्यांपैकीं सुमारें ४० स्फुट अभंग रा. शालिग्राम यांनीं संपादन केले आहेत. इतर पद्यांप्रमाणें महिपतीचे अभंगहि प्रेमरसानें परिपूर्ण आहेत.

उपेक्षितां माये कोठें जावें तान्हें ।
सांगावें गाऱ्हाणें कोणापाशीं ॥
पितयानें कन्या विकली वृद्धासी ।
आडवा तयासी न ये कोणी ॥
रायें लुटविलें आपुलें नगर ।
वर्जिता साचार नाहीं कोणी. ॥
तैसें देवा तुम्ही मोकलियावरी ।
आमुचा कैवारी कोण आहे ॥
महिपती म्हणे करितो विचार ।
सत्कीर्ति साचार वाढे जेणें ॥

सिद्धांतबोधाचा कर्ता शहामुनि यानेंहि कांहीं अभंग केले आहेत असें दिसतें. त्याच्या शिष्यांचे "गुरु किल्लीचे अभंग" प्रश्नोत्तर रूपांत आहेत.

मोरोपंतः—यांची बहुतेक काव्यरचना आर्यावृत्तांत असली तरी त्यांनीं इतर वृत्तांचाहि मधून मधून स्वीकार केलेला आहे. त्यांमध्यें अभंग येत असून त्यांचें "सीता गीत" या वृत्तांतच आहे. या आख्यानांत १७० अभंग अगदीं सोप्या भाषेंत लिहिलेले आहेत.

लक्ष्मण भावोजी मागें पुढें स्वामी ।
मज आहे धामी ऐसें वाटे ॥
न बाधोचि मज उष्ण क्षुधा तृषा ।
तुह्मापाशीं मृषा न बोलावें ॥
जेव्हां कांहीं वाटे चालतां मी मागें ।
मुरडोनि मागें विलोकीती ॥
बाई काय सांगो स्वामीची ती दृष्टी ।
अमृताची वृष्टी मज होय ॥

अर्वाचीन कवी अभंगवृत्तांत फारशी रचना करीत नाहींत. मात्र कांहीं आपलें म्हणणें मान्य होण्यासाठीं तुकारामासारखे अभंग करून शेवटीं 'तुका म्हणे' असें दडपून देतात. अभंगाचा दर्जा धार्मिक वाङ्मयांत श्रेष्ठ मानला जात

असला तरी महाराष्ट्रकाव्यांत त्याला मोठेसें महत्व अर्वाचीन सुशिक्षित देत नाहींत यांचें कारण ते भक्तिपर आहेत हें होय. अभंगवाङ्मयाचा अभ्यास कोणी पंडित फारसे करीत असतील असें वाटत नाहीं.

[ संदर्भ ग्रंथ —भावे-तुकाराम बुवांचा अस्सल गाथा. आजगांवकर--महाराष्ट्र-कविचरित्र. म्याकानिकल-साम्स ऑफ मराठा सेंटस्. गोडबोले—नवनीत. ज्ञानेश्वराच्या अभंगांची गाथा. तुकारामाच्या अभंगांची गाथा. वागळे—महाराष्ट्र काव्यमकरन्द. भावे—महाराष्ट्रसारस्वत. रानडे-राईज ऑफ दि मराठा पॉवर. रा. भि. जोशी- मराठी भाषेची घटना. महाराष्ट्रसाहित्यमासिक, वर्ष तीन अंक ११. प्रो. पटवर्धन—विल्सन फायलॉलॉजिकल लेक्चर्स ( फर्ग्यूसन कॉलेज मॅगॅझीन. ). भांडारकर—वैष्णविझम, शैविझम अँड मायनर रिलिजियस सिस्टिम्स. विल्सन-प्रिफेस टु मोल्सवर्थ्स् मराठी डिक्शनरी. किंकेड-टेल्स ऑफ दि सेंटस् ऑफ पंढरपूर. महाराष्ट्र वाङ्मयसूचि—उत्तर पहा. ]

**अभयगिरि**—सिंहलद्वीपाची प्राचीन राजधानी जी अनुराधपुर, तेथील एका प्रख्यात् मठाचें हें नांव आहे. राजा वट्टगामिनीनें स्तूपाशेजारीं हा मठ बांधिला. वट्टगामिनीचें एक नांव अभय असें असल्यामुळें याला अभयगिरि असें नांव पडलें. या मठवाश्यांमध्यें व त्याहून २१७ वर्षांनीं प्राचीन असलेल्या महाविहार मठांतील भिक्षूंमध्यें बरीच स्पर्धा असे. प्रथम वैयक्तिक व नंतर धार्मिक मतांत स्पर्धा सुरू झाली. तथापि तिचें स्वरूप नक्की माहीत नाही. एकदां महासेन ( इ. स. २७५-३०२ ) राजाच्या कारकीर्दीत महाविहार मोडून त्यांतलि माल अभयगिरीला दिला. पण नंतर लगेच महाविहार पूर्वीच्या योग्यतेला चढून त्यानें सिंहलद्वीपाच्या इतिहासांत आपली श्रेष्ठ पदवी कायम राखिली. [ ए. रि. ए.—अभयगिरि. केव्ह-रुइंड सिटीज् ऑफ सिलोन. सिलोन अर्किऑलॉजिकल रिपोर्टस् १८६८-१९०७ नॉक्स-हिस्टारिकल रिलेशन ऑफ दि आयलंड ऑफ सिलोन ].

**अभयदेवसूरि**—(१)हा बृहत् खरतरगच्छाचा संस्थापक होता. ३ ते ११ या नऊ अंगांवर त्यानें टीका लिहिल्या म्हणून त्यास सामान्येंकरून नवांगवृत्ति असें म्हणतात. तो ' धारा ' येथें जन्मला. त्याच्या बापाचें नांव धन व आईचें नांव धनदेवी होतें. त्याचा बाप धारा येथील एक व्यापारी होता. दीक्षा घेण्यापूर्वी त्याचें नांव अभयकुमार असें होतें. वयाच्या १६ व्या वर्षी त्यानें आचार्यपद संपादन केलें. वर्धमानसूरीच्या विनंतीवरून संवत् १०८८ सालीं जिनेश्वरसूरीनें त्यास सूरि केलें. संवत् ११३५ सालीं गुजराथेंत कप्पडवणिज ग्रामांत तो मरण पावला. दुसऱ्या प्रमाणभूत ग्रंथकारान्वयें त्याचा मृत्युकाल संवत ११३९ आहे. वर्धमान, जिनेश्वर, जिनचंद्र व प्रस्तुतचा अभयदेव ( जिनचंद्राचा लघुगुरु भ्रातर ) हे अनुक्रमें ३९, ४० ४१ व ४२ असे क्ल्याटनें पट्टावलींतील क्रमांत दिले आहेत.

ग्रं थ.—अभयदेवानें खालीं दिलेले ग्रंथ लिहिले असें सर्वश्रुत आहेः–

( १ ) स्थानांगावरील टीका संवत् ११२० मध्यें. अभयदेवानें वरील टीका अनहिलपट्टण येथें अच्छुप्त नामक व्यापाऱ्याच्या घरीं द्रोणाचार्यांच्या नेतृत्वाखालीं भरलेल्या पंडितांच्या सभेकरितां तयार केली. अजितसिंहाचार्यांचा शिष्य यशोदेवगणि यानें त्याला मदत केली.

( २ ) समवायांगावर टीका. वर निर्दिष्ट केलेल्या स्थळीं व त्याचवर्षी लिहिली.

( ३ ) भगवतीसूत्रावर टीका. अच्छुप्त व्यापाऱ्याच्या घरीं अनहिपट्टण येथें संवत ११२८ सालीं अभयदेवानें वरील टीका लिहिली.

( ४ ) ' ज्ञाताधर्मकथांगा ' वर टीका. संवत ११२० च्या दसऱ्याला वरील टीका अभयदेवानें लिहून संपविली.

( ५ ) उपासकदश, अंतकृद्दश, व अनुत्तरौपपातिका, ( ७ वें ८ वें व ९ वें अंग ) यांवर टीका. यावर कर्त्याचें नाव नाहीं तरी अभयदेवानें त्या लिहिल्या असाव्या असें मानण्याला आधार आहे. अभयदेवाची सहाव्या अंगावरील टीका व ७,८,९ या अंगावरील टीका एका हस्तलिखित ग्रंथांत एकत्र केलेल्या आहेत. शिवाय १० व ११ अंगावरील अभयदेवाच्या टीका व ७, ८, ९ अंगावरील अनामिक टीका मिळून एक ग्रंथ झाला आहे. त्याचे कर्तृत्व अभयदेवाकडे येतें. नवव्या अंगारील टीके ( संवत ११८४ त लिहिली ) च्या हस्तलिखित प्रतींत २ श्लोक आहेत. ते प्रिन्सेपच्या आवृत्तींत सापडतात, परंतु बर्लिन येथील हस्तलिखित प्रतींत आढळत नाहींत. ह्यावरून ते त्या आवृत्तींत प्रक्षिप्त असावे असें पीटर्सन अनुमान काढतो.

( ६ ) ' प्रश्नव्याकरणांगा ' वर टीका. अभयदेव असें विधान करितो कीं, वर जी एक पंडिताची सभा द्रोणाचार्यांच्या नेतृत्वाखालीं भरली होती म्हणून उल्लेख आलेला आहे त्या सभेकडे वरील टीका परीक्षणाकरिता पाठविली होती.

( ७ ) विपाकसूत्रनामक ११ व्या अंगावर टीका.

( ८ ) उववाइ सूत्रावर टीका. द्रोणाचार्यांच्या नेतृत्वाखालीं भरलेल्या पंडितांच्या सभेचा उल्लेख पुन्हां हींत केलेला आहे.

( ९ ) आराहणपगरण ( आराधन प्रकरण ).

( १० ) हरिभद्राच्या पंचाशक ग्रंथावर टीका. विचारामृतसंग्रहांत अभयदेवानें टीका लिहिली आहे असा निर्देश केलेला आहे. ही टीका धवलक्कपूर ( धोलका ) येथें संवत ११२४ सालीं अभयदेवानें लिहिली. पीटरसन यानें अहवालाच्या परिशिष्ट ३ पान ४५ मध्यें याच नांवाचा एक निराळा ग्रंथ हरिभद्राचा आहे असें लिहिलें आहे. पण तो ग्रंथ म्हणजे अभयदेवाच्या टीकेची नक्कल असली पाहिजे, असें तोच म्हणतो. विचारामृतसंग्रहावरून वेबर यानें एक उतारा घेतलेला आहे त्यावरून असें दिसतें कीं,

प्रकरणसमूहाला पंचाशक असें नांव पडण्याचें कारण प्रत्येक प्रकरणांत ५० गाथा आहेत हें होय. प्रकरणांची संख्या १९ आहे.

(११) जयतिहुयणस्तोत्र (पार्श्वनाथस्तुति) संवत् ११११ मध्यें लिहिले.

(१२) जिनचंद्रगणीच्या नवतत्त्वपगरणावर टीका.

(१३) निगोडषट्त्रिंशिका. हें पुस्तक अभयदेवसूरीनें केलेलें नाहीं असेंहि कांहींचें मत आहे.

(१४) पंचनिग्रंथ विचारसंग्रहणी.

(१५) पुद्गलषट्त्रिंशिका.

(१६) पण्णवनाच्या (चौथें उपांग) तिसऱ्या पदावर संग्रहणी.

(१७) जिनभद्राच्या विशेषावश्यक भाष्यावर टीका.

(१८) हरिभद्रकृत षोडशकावर टीका.

(१९) देवेंद्रकृत सत्तरीवर (सत्तरिक प्रकरण अथवा सप्ततिका) गाथाबद्ध टीका.

(२) गुजराथचा राजा (सं. ११२०–५०) कर्ण यापासून याला मलधारिन् ही पदवी मिळाली, म्हणून त्याला मलधारिन् असें म्हणत असत. सुराष्ट्रा( सोरठ )च्या खेंगर राजावर त्याचें फार वजन होतें असा उल्लेख आहे. अभयदेवसूरीनें खेंगर राजाला जैन दीक्षा दिली. अभयदेवसूरींच्या सांगण्यावरून गिरनारच्या यात्रेकरूंवर बसविलेले कर खेंगर राजानें माफ केले. हा अभयदेवसूरि प्रश्नवाहन कुलांतला, कोटिगगाच्या मध्यम शाखेच्या स्थूलिभद्रमुनींच्या वंशांतला व हर्षपुरीयगच्छाचा होता. संवत् ११७० सालीं हेमचंद्रसूरीनें भवभावना ग्रंथ रचिला. त्याचा अभयदेवसूरि गुरु असून जयसिंहसूरीचा हा शिष्य होता. हजाराहून अधिक ब्राह्मणांनां जैन दीक्षा दिल्यावर व कडमड नांवाच्या यक्षाला जैन केल्यावर मदेरा शहरीं (अजमीर जवळ) त्यानें एक महावीराचें देवालय बांधविलें.

(३) विजयचंद्रसूरींचा (विजयेंदु) शिष्य व देवभद्रसूरीचा गुरु होता. जिनशेखरापासून अभयदेवसूरि हा पट्टावलींतील तिसरा पुरुष होता (जिनशेखर, पद्मचंद्र, विजयचंद्र, अभयदेव). संवत् १२०४ सालीं हा होऊन गेला अशी प्रसिद्धि आहे. याला दुसरा अभयसूरि हें नांव दिलें. हा दुसरा अभयसूरि पहिल्यापेक्षां कमी प्रतीचा नव्हता. याच्या आधिपत्याखालीं रुद्रपल्लीयगच्छ महत्त्वाला चढला. "संवत् १२०४ त रुद्रपल्ली येथें जिनशेखराचार्योनीं रुद्रपल्लीयखरतरशाखा स्थापिली. हा दुसरा गच्छभेद होता." काशीच्या राजानें याला वादीसिंह अशी पदवी दिली होती असा उल्लेख आहे. 'जयंतविजयकाव्य' नांवाचा ग्रंथ यानें संवत् १२७८ सालीं लिहिला.

(४) हा गुणाकरसूरीचा समकालीन होता. संवत् १४२६ सालीं गुणाकरसूरीनें सरस्वतीपट्टण येथें भक्तामरस्तोत्र टीका लिहिली. ह्या वर्षी या टीकेची नक्कल सरकारनें विकत घेतली आहे. क्लटचें म्हणणें आहे कीं, याच अभयदेवसूरीनें संवत् १४५१ सालीं तिज्जयपहुत्तस्तोत्र रचिलें आहे.

(५) अभयदेवसूरि हा राजगच्छांतील प्रद्युम्नसूरीचा शिष्य व अनुगामी होता. अजितसेनाच्या चारित्रांत याचा उल्लेख आलला आहे. नैय्यायिक ग्रंथकाननांत स्वैर केसरीप्रमाणें संचार करीत असल्याबद्दल याचें वर्णन केलेलें आहे. अनेक परस्परविरुद्ध मतांनीं सन्मार्गाचा नाश होऊं नये ह्या उद्देशानें अभयदेवानें वादमहार्णव ग्रंथ रचिला. याच्यानंतर जिनेश्वर अधिकारी झाला. १२७६ त पार्श्वनाथ चरित्राचा कर्ता माणिक्यचंद्र हा 'अभयदेवसूरीपासून मी नववा उत्तराधिकारी आहे' असें म्हणतो. सिद्धसेनसूरि त्याचा उल्लेख आपला ९ वा पूर्वाधिकारी म्हणून करितो. सिद्धसेनसूरीनें सं. १२४२ त ग्रंथ लिहिले आहेत. ह्या अधिकारवंशावलीप्रमाणें अभयदेवानंतर धनेश्वरसूरि झाला. धनेश्वरसूरि मुंजराजाचा समकालीन होता. याच अभयदेवानें संम्मतिसूत्रावर टीका लिहिली असून तिचें नांव तत्त्वबोधविधायिनी असें ठेविलें आहे. क्लटनें जिचा उल्लेख केला आहे ती 'कतिपय सूत्र व्याख्या' कदाचित तत्त्वबोधविधायिनीहून निराळी नसावी. शांतिसूरी (मृत्यु सं. १०९६) च्या दोन अध्यापकांपैकीं अभयदेवसूरि हें नांव असलेला 'जगप्रसिद्ध' सूरि व प्रस्तुतचा अभयदेवसूरि हे दोघे एक असावेत.

[सं. ग्रं.— पीटर्सनस रिपोर्ट ४ था (बॉ. ब्रॅ. रा. ए. सो. १८९४). भांडारकर रिपोर्ट १८८३–८४. वेबर इंडिश्चे स्टुडियां १६. क्लाट—इं. अँ. पु. ११ किलहार्न रिपोर्ट. फोर्ब्स–रासमाला.]

**अभयसिंह** (इ. स. १७२५–१७५०).—जोधपूरचा राजा. यानें आपला बाप अजितसिंह याचा खून करून राज्य मिळविलें (संवत् १७८१). तो गादीवर आला त्याच सालीं त्यानें मंदोडच्या रावइंद्राकडून नागोर घेऊन तें आपला भाऊ वखत याच्या स्वाधीन केलें. संवत १७८२ म्ह. इ. स. १७२६ मध्यें तो आपल्या पश्चिम सरहद्दीवर भूम्या लोकांचीं बंडें मोडण्यांत गुंतला होता. सं. १७८२ मध्यें अभयसिंहास दिल्लीहून बादशहाचें बोलावणें आलें. सं. १७८४ म्ह. इ स. १७२७ मध्यें तो दिल्लीस जाऊन पोहोंचला. व शहाजादा जुंगली[?]याचें बंड मोडण्यास पाठविलें असतां गुजराथ बळकावून बसलेल्या सर बुलंदखानाचा पराभव करण्याचा विडा उचलून त्यानें बादशहाकडून गुजराथची सुभेदारी मिळविली.(टॉड) १७३० च्या जून महिन्यांत अभयसिंह दिल्ली सोडून अजमीरला आला व त्या प्रांताची त्याला सुभेदारी मिळाली असल्यामुळें त्यानें तेथें आपले लोक नेमिले. यानंतर तो मेडत्यावरून जोधपूरला आला, व सरबुलंदखानावर चालून जाण्याकरितां त्यानें आपलें सर्व सैन्य गोळा केलें. संवत् १७८६ (इ. स. १७३१ ?) च्या चैत्र शुद्ध १० स अभयसिंह जोधपुराहून निघून सिरोहीवर चालून आला. तेव्हां तेथील राजानें लढाईच्या भानगडींत न पडतां आपली

पुतणी (मानसिंहाची मुलगी) अभयसिंहास देऊन त्यास संतुष्ट केलें. हिच्याच पोटीं पुढें दहा महिन्यांनीं, अभयसिंहाच्या मागून मारवाडच्या गादीवर बसलेला, रामसिंह जन्मास आला. यानंतर अभयसिंहानें पालनपूर, सिद्धपूर मार्गानें अहमदाबादेवर चाल करून जाऊन त्या शहरास वेढा घातला, व सं. १७८७ (इ. स. १७३१) सालच्या आश्विन शुद्ध १० स अहमदाबाद सर होऊन सरबुलंदखान शरण आला.

अभयसिंहाचा भाऊ बखतसिंह हा मोठा पराक्रमी होता. गुजराथेवरील स्वारींत त्यानें बरेंच शौर्य दाखविलें होतें. बखतसिंहाच्या शौर्यामुळे अभयसिंहास त्याची फार भीति वाटत होती व स्वतः बखतसिंहहि आपल्यावर अभयसिंहाचा विश्वास नाहीं हें समजून चुकला होता. या भावाभावांतील चुरशीमुळें अंबरच्या जयसिंहाची जोधपूरवर स्वारी घडून आली. बिकानेर येथें जोधपूरच्या राठोडवंशी रजपुतांची एक स्वतंत्र पण कनिष्ठ शाखा राज्य करीत होती. बिकानेरच्या राजानें अभयसिंहाचा कांहीं क्षुल्लक गोष्टींत अपमान केल्यामुळें त्यानें बिकानेरवर स्वारी करून त्या शहरास वेढा घातला. परंतु अभयसिंहाच्या सैन्यांतील लोकांस या आपआपसांतील भांडणांत उत्साह न वाटल्यामुळें बिकानेरचा वेढा कित्येक दिवस रेंगाळत राहिला. ही संधि साधून बखतसिंहानें बिकानेरच्या वकीलास अंबरच्या जयसिंहाची मदत मागण्याचा सल्ला दिला. बिकानेरच्या वकीलाच्या विनंतीवरून जयसिंहानें अभयसिंहास बिकानेरचा वेढा उठविण्याविषयीं लिहिलें. अभयसिंहास जयसिंहाची ही लुडबुड आवडली नाहीं. त्यानें जयसिंहास आपण वेढा उठविण्यास तयार नाहीं म्हणून खडखडीत जबाब पाठविला. तेव्हां हा आपला अपमान झाला असें वाटून जयसिंह जोधपूरच्या राज्यावर चालून आला; हें पाहून अभयसिंहहि बिकानेरचा वेढा उठवून जयसिंहास तोंड देण्यास आला. आपल्या कारस्थानाचें अशा रीतीनें राष्ट्रीय लढ्यांत पर्यवसान झालेलें पाहून स्वतः बखतसिंहच जयसिंहाशीं लढण्यास पुढें आला. या दोन्ही सैन्यांची जोधपूरच्या सरहद्दीवर गंगवणी येथें लढाई झाली व तींत जयसिंहाच्या सैन्यानें माघार घेऊन स्वदेशीं गमन केलें. अभयसिंह सं. १८०६ (इ. स. १७५०) मध्यें मरण पावला.

वरील हकीकत टॉडच्या राजस्थानाप्रमाणें दिली आहे. टॉडनें ज्या कर्णनामक भाटाच्या काव्यावरून आपली हकीकत घेतली आहे त्यानें बरीच एकतर्फी हकीकत दिली आहे. त्यानें अभयसिंहाच्या पितृवधाची गोष्ट आपल्या हकीकतींतून वगळली असून अभयसिंह व बखतसिंह यांच्या परस्पर संबंधाविषयींहि बराच लपवालपवीचा प्रकार केलेला दिसतो. रिसायतकार म्हणतात कीं, अभयसिंह हा दुष्ट, व्यसनी व विलासी असून त्याची कारकीर्द त्याचा भाऊ बखतसिंह याशीं लढण्यांत गेली. बील म्हणतो कीं, अजितसिंहानंतर जोधपूर येथें बखतसिंहानें राज्य केलें. पण बखतसिंहास जोधपूरची गादी अभयसिंहाच्या मरणानंतर मिळाली. बीलनें अभयसिंह व बखतसिंह यांच्यामध्यें घोंटाळा केलेला दिसतो. कारण, ज्याचा इ. स. १७५२मध्यें विषप्रयोगानें खून झाला व ज्याच्यामागून त्याचा पुत्र विजयसिंह गादीवर बसला म्हणून तो म्हणतो तो अभयसिंह नसून बखतसिंह होय. अजितसिंहाच्या वधाचा सन रिसायतकारांनीं इ. स. १७३१ दिला आहे.

[संदर्भग्रंथ.—टॉडचें राजस्थान; मुसुलमानी रियासत; बील-ऑरिएंटल बायाग्रॉफिकल डिक्शनरी].

**अभिजित्.**—ज्योतिषांत अभिजित् हें एका नक्षत्राचें नांव असून आकाशांत त्यायोगें ज्यास इंग्रजींत लायरा म्हणतात त्या तारकापुंजाचा बोध होतो. याची गणना नक्षत्रांत करण्यांत येते तरी त्याचा क्रांतिवृत्ताशीं वस्तुतः कांहीं संबंध नाहीं. हें फारच उत्तरेस आहे. सूर्य, ब्रह्मगुप्त, द्वितीय आर्यभट व सार्वभौम या सिद्धांताच्या मतें या नक्षत्राचा योगतारा जो व्हीगा त्याचे कदंबाभिमुख शर अनुक्रमें ५९° ५८', ६१°५६', ६२° व ६२°१४' उ. हे आहेत. या सिद्धांतांत या ताऱ्याचे कदंबाभिमुख भोग अनुक्रमें २६४° १०', २६०° ४६', २५३° व २६२° १०,' दिलेले आहेत. १९०५च्या आरंभीं या ताऱ्याचे विषुवांश २८° ३३' ४३".३ व क्रांति ३८°४१' ४१".८ उ.होती.व वर्षगति अनुक्रमें + २".०१ व २".९ आहे. वैदिक ग्रंथात या नक्षत्राचा उल्लेख मैत्रायणी संहिता २. १३'.२०; तैत्तिरीय ब्राह्मण १.५,१; अथर्वसंहिता १९.७ या ठिकाणीं दिलेल्या नक्षत्रांच्या याद्यांत आढळतो. परंतु उलटपक्षीं तैत्तिरीय संहितेंत किंवा काठक संहितेंत जेथें नक्षत्रांचीं नांवें आलीं आहेत. तेथें हें नक्षत्र नाहीं. अभिजित् शब्दाचा प्रयोग या सर्व ठिकाणीं एकवचनांतच आढळत असल्यामुळें त्या वेळीं त्या नक्षत्रांत एकच तारा अंतर्भूत करण्यांत येत होता हें उघड आहे. तथापि वृद्धगार्गीय संहिता, खंडखाद्यक, लल्लकृत रत्नकोश, शाकल्यब्रह्मसिद्धांत, श्रीपतिकृत रत्नमाला, मुहूर्ततत्त्व, मुहूर्तचिंतामणी या उत्तरकालीन ग्रंथांत या नक्षत्रांतील तारकांची संख्या तीन दिलेली आढळते.

लायरा असें जें या तारकापुंजास इंग्रजींत नांव आहे त्याचा अर्थ स्वरमंडल किंवा सारंगी असा आहे. याचा ख्रि. पू. ४ थ्या शतकांत होऊन गेलेला युडॉक्सस व ख्रि. पू. ३ ऱ्या शतकांत झालेला आरेटस यांनीं उल्लेख केलेला आहे. या नक्षत्रांत टॉलेमीनें १० ताऱ्यांची, टायकोब्राहीनें ११ ताऱ्यांची व हेवेलियसनें १७ ताऱ्यांची नोंद केली होती (विज्ञानेतिहास ८ वें प्रकरण पहा.). या तारकापुंजांतील लायरी उर्फ व्हीगा ही तारा पहिल्या प्रतीची असुन तेजस्वीपणांत त्याला उत्तरगोलार्धांत दुसरें स्थान आहे. या ताऱ्याचें वैशिष्ट्य म्हणजे त्याच्या प्रकाशाची शुभ्रता हें असून ही शुभ्रता सूर्यप्रकाशाच्या शंभरपट आहे. व्हीगा हें नांव 'पडणारा गरुड' ('वेगि' म्हणजे पडणारा) या अरबी नांवाचें

अपभ्रष्ट रूप आहे व तशाच प्रकारचा अपभ्रंश होऊन आल्टेर (व आक्किली = श्रवण) म्हणजे 'उडणारा गरुड' हें दुसऱ्या एका ताऱ्याचें नांव बनलेलें आहे. ६ लायरी हा एक तारकागुच्छ असून त्यांत नुसत्या डोळ्यांनींहि किंवा फार झालें तर एकाद्या लहानशा दुर्बिणीच्या साहाय्यानें दोन तारका दिसूं शकतात; तीन-इंची दुर्बीण घेतली तर यांपैकीं प्रत्येक पुन्हा दोन तारका दिसूं लागतात, व याहूनहि अधिक सूक्ष्म (चार-इंची) दुर्बिणीनें या दोन जोड्यांमध्यें तीन बारीक बारीक तारका दृग्गोचर होतात बीटा लायरी व आर् लायरी या अल्पावधींच्या रूपविकारी तारका आहेत. याच तारकापुंजांत एम् ५७लायरी हा सुप्रसिद्ध वलयाकार तेजोमेघ असून त्याच्या मध्यभागीं असलेली अंधुक तारका प्रकाशलेखनानें दृग्गोचर होऊं शकते. एप्रिलमध्यें दिसणाऱ्या लायरिड नामक उल्कावृष्टीचें उद्गमस्थानहि याच तारकापुंजांत आहे.

पंचांगांत २१ व्या नक्षत्राचा चतुर्थपाद व २२ व्या नक्षत्राचा पंधरावा भाग मिळून होणाऱ्या १९ दंडाइतक्या काळास अभिजित् हें नांव असून त्यास २८ वें नक्षत्र मानण्यांत येतें. अभिजिन्मुहूर्त हें दिवसाच्या आठव्या मुहूर्ताचें मध्यान्हपूर्व एक घटका व मध्यान्होत्तर एक घटकाया कालाचें नांव आहे.

[संदर्भग्रंथ.—ज्योतिर्विलास, भारतीय ज्योतिषशास्त्र ब्रिटानिका लायरावरील लेख. मोलस्वर्थकृत कोश.]

**अभिधम्म**—तिपिटक या पाली धर्मग्रंथसमूहांतील एक पिटक. अभिधम्म म्हणजे 'श्रेष्ठ धर्म' किंवा 'श्रेष्ठ धर्म तत्वें' म्हणजे अध्यात्म किंवा इंग्रजींत ज्याला मेटॅफिजिक्स ह्मणतात तें. पण नांवाप्रमाणें या पिटकांतला विषय नाहीं. मेटॅफिजिक्स किंवा अध्यात्मज्ञान हें या ग्रंथसमूहाचें वैशिष्ट्य नसून, रुक्ष व पांडित्यदर्शक भाषेंत लिहिलेलें व मानसशास्त्र, दृष्ट्या विवेचिलेलें नीतितत्त्वज्ञान यांत भरलेलें आहे. हें पिटक अस्तित्वांत नसतें तरीसुद्धां बौद्धतत्त्वज्ञानांत कमीपणा आला नसता असें मिसेस ऱ्हीसडेव्हिड्स् सारखी बौद्ध वाङ्मयाची चहाती ह्मणते. अभिधम्मांत सात ग्रंथ येतात; पुग्गल पञ्ञत्ति, धातुकथा, धम्मसंगणि; विभंग; पट्ठान पकरण; कथावत्थु व यमक. पाली टेक्स्ट सोसायटीनें हे सारे ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत. या पिटकाचा काळ दुसऱ्या दोन पिटकांपेक्षां निःसंशय अलीकडील असला पाहिजे; म्हणजे सुमारें इ. स. पू. ४००—२५० यांच्या दरम्यान याची रचना झालेली दिसते. सात ग्रंथांपैकीं धम्मसंगणि सर्वांत जुना व कथावत्थु सर्वांत नवा असा कांहीं पंडित तर्क करितात. सर्वास्तिवादीपंथांमध्यें हे सातहि ग्रंथ संस्कृत भाषेंत उद्धृत केलेले होते. पण हिंदुस्थानांत ते नामशेष झाले असून त्यांचीं चिनी भाषांतरें मात्र आढळतात. पुढील काळीं हे ग्रंथ मागें पडून नवीन अध्यात्मज्ञानाचे ग्रंथ तयार झाले. महायानपंथाच्या एका शाखेंत अध्यात्माचा नवीन अभ्यास सुरू झाला होता तरी 'अभिधम्म' हा शब्द त्या शाखेंत योजला गेला नाहीं हें लक्षांत घेण्याजोगें आहे. तथापि, मूळचीं अभिधम्माचीं सात पुस्तकें ज्या शाखांतून अद्याप चालतात, त्यांत तो शब्द वापरला जातो. अभिधम्माच्या अभ्यासकांनां अभिधम्मिक असें नांव आहे. त्यांचा दर्जा बौद्धभिक्षूमध्यें मोठा होता असें मिहिंतल येथाली शिलालेखावरून दिसतें. या विषयाची आणखी माहिती ज्ञानकोश-प्रस्तावनाखंडांतील 'बुद्धोत्तरजग'' या विभागांत (पान. २३६ पासून पुढें) सांपडेल.

[संदर्भग्रंथ.—कॅरोलिन-ऱ्हीस डेव्हिडस्-बुद्धिस्ट सायकॉलॉजी. टी डब्ल्यू ऱ्हीस डेव्हिडस्-स्कूल्स ऑफ बुद्धिस्ट बिलीफ्स (जे. आर्. ए. एस. १८९२). प्रो. ताकाकुसू-"ऑन दि अभिधम्म बुक्स ऑफ सर्वास्तिवादिन्स" (जे. पी. टी एस.१९०५).ए. ब्रि.—अभिधम्म. ए. रि. ए.—अभिधम्म. विंटरनिझ.—हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर. पु. २. बुद्धोत्तरजग (ज्ञानकोश-प्रस्तावनाखंड.)].

**अभिधम्मत्थसंगह**—ब्रह्मदेश हें अभिधम्माच्या अध्ययनाचें केन्द्रस्थान आहे. बौद्ध लोकांच्या मानसशास्त्रावरील व नीतिशास्त्रावरील अभिधम्मत्थसंगह हें छोटें पुस्तक अत्यंत महत्त्वाचें आहे. याचा कर्ता अनुरुद्ध हा असून तें बहुधा बाराव्या शतकांत लिहिलें गेलें असावें. सिलोन व ब्रह्मदेश या देशांत हें पुस्तक अद्यापि आधारभूत असून दुसऱ्या कोणत्याहि अभिधम्मग्रंथापेक्षां या पुस्तकावर वारंवार अधिक टीका लिहिल्या जातात; व ब्रह्मी भाषेंत भाषान्तरें केलीं जातात.

या ग्रंथाचें प्रकाशन टी. डब्ल्यू. ऱ्हीसडेव्हिड्स् यानें १८८४ मध्यें केलें. मिसेस ऱ्हीसडेव्हिड्स् बाईनीं याच्या भाषांतराची आवृत्ति १९१० मध्यें प्रसिद्ध केली.

अभिधम्मांतील सात प्रकरणांत ज्या पदार्थांचा उहापोह केला आहे, त्यांतील प्रधानभूत पदार्थांचा संग्रह अनुरुद्धाचार्यांनीं अभिधम्मत्थसंग्रह प्रकरणांत केला आहे. अभिधम्मांतील जे अर्थ म्हणजे पदार्थ, त्यांचा संग्रह असा ह्या प्रकरणाच्या नांवाचा अर्थ आहे. पहिल्या परिच्छेदांत चित्ताचे ८९ किंवा १२१ विभाग कसे होतात ह्याचा संग्रह आहे. दुसऱ्या परिच्छेदांत प्रत्येक चित्तांत कोणकोणत्या चित्तवृत्ती असतात, किंवा असूं शकतात, ह्याचा विचार केला आहे. तिसऱ्यांत चित्तचेतसिकधर्म वेदना, हेतु, कृत्य, द्वार, आलम्बन इत्यादिकांच्या योगें कसे अस्तित्वांत येतात ह्याचें विवेचन आहे. चवथा वीथिसंग्रह ह्यांत रूपरसादिक विषयांशीं व प्रवृत्तींशीं मनाचा संबंध आला असतां कशाप्रकारें व्यापार घडून येतो ह्याचा फारच चांगला विचार केला आहे. पांचव्यांत पूर्वजन्मापासून इहजन्मीं प्राण्याची त्या त्या उत्तमाधम लोकांत कशी उत्पत्ति होते, हें दर्शविलें आहे. सहाव्यांत जड सृष्टीचे विभाग पाडून कर्म, चित्त, ऋतु, आहार ह्यांच्या योगानें शरीराचा जड भाग पालटत

असतो हें दाखविलें आहे. शेवटीं थोडक्यांत निर्वाणाचें वर्णन आहे. सातव्या समुच्चयसंग्रहांत कुशलाकुशल आणि अव्याकृत पदार्थांचें अभिधर्मांत भिन्न भिन्न ठिकाणीं जें वर्गीकरण केलें आहे त्याचा संग्रह आहे. आठव्यांत प्रतीत्यसमुत्पादरूपानें वर्णिलेल्या व पट्ठान–प्रकरणांत वर्णिलेल्या प्रत्ययांचा (कारणांचा) संग्रह आहे; व नवव्यांत समाधींचे जे निरनिराळे प्रकार आहेत ते दाखविले आहेत. हें प्रकरण सिंहलद्वीप आणि ब्रह्मदेश येथें फारच लोकप्रिय आहे. त्याच्यावर प्राचीन आणि अर्वाचीन अशा बऱ्याच टीका उपलब्ध आहेत.

अनुरुद्धाचार्यांच्या बाबतींत सांपडणारी माहिती अपुरी असून कित्येक ठिकाणीं परस्परविरोधी आहे तरी हे आचार्य कांचीपुर (आधुनिक कांजीवर) शहरांत किंवा त्याच्या आसपास इ. स. ११ व्या शतकाच्या अखेरीस किंवा १२ व्या शतकाच्या आरंभीं झाले असले पाहिजेत, एवढें अनुमान करतां येतें. सिंहलद्वीपांत प्रख्यात पराक्रमबाहूच्या कारकीर्दीला सुरवात इ. स. ११६४ सालीं झाली, व त्यानंतर त्यानें ३३ वर्षें एकछत्री राज्य केलें. आपल्या कारकीर्दींत बौद्धधर्माच्या उन्नतीसाठीं त्यानें अनेक कामें केलीं. त्यांत, आपली राजधानी पुलत्थिपुर (सिंहल= पोलोन्नरुवा) ह्याच्या शेजारीं जेतवन नांवाचा मोठा विहार बांधून तेथें सारिपुत्त नांवाच्या महास्थविरास निवासस्थान करून दिलें, असें वर्णन महावंशांत सांपडतें. ह्या सारिपुत्त स्थविरानें अनेक ग्रंथ लिहिले आहेत. त्यांत सिंहली भाषेंत लिहिलेली अभिधम्मत्थसंगहाची टीकाहि आहे. तिच्याच आधारें त्याच्या सुमंगलस्थविर नांवाच्या शिष्यानें विभावनी टीका पाली भाषेंत लिहिली. अर्थात् अनुरुद्धाचार्यांचा काल सारिपुत्तस्थविरापूर्वी निदान ५० वर्षें तरी असला पाहिजे. [वि. विस्तार वर्ष ५४. अं. ७].

**अभिधर्मकोश**—हा नितिशास्त्र, मानसशास्त्र, व अध्यात्मशास्त्र या विषयांची चर्चा करणारा सूत्रकारिकाबद्ध हीनयान पंथाचा वसुबंधुकृत ग्रंथ आहे. या कोशाची मूळ संस्कृत आवृत्ति नष्ट झाली असून फक्त चिनी व जपानी प्रती हयात आहेत. त्यांपैकीं चिनी प्रती सर्वांत जुन्या आहेत. त्यांतील पहिली प्रत परमार्थ नांवाच्या हिंदू भिक्षूनें (इ. स. ५६३–५६७) केली व दुसरी, पहिलीचीच सुधारलेली भाषांतरित आवृत्ति ह्युएनत्संग यानें इ. स. ६५१–६५४ मध्यें रचिली. या कोशाचा कर्ता प्रसिद्ध, बौद्ध पंडित वसुबंधु असून, इ. स. च्या ५ व्या शतकाच्या शेवटीं याचा काल धरतात. या कोशांत ६०२ कारिका व त्यावर वृत्ति असे दोन भाग आहेत; व धातु, इंद्रियें, लोक, अनुशय, आर्यपुद्गल, ज्ञान, समाधि आणि पुद्गल असे आठ विषय मांडिले आहेत. वसुबंधु सर्वास्तिवादीपंथाचा होता, तरी त्याचा कोश सर्व बौद्ध पंथांनां प्रमाणभूत असा आहे. कोशावरचा प्रसिद्ध असा टीकात्मक ग्रंथ "अभिधर्मकोशव्याख्या" हा होय. अभिधर्मकोशव्याख्येचा कर्ता यशोमित्र सौत्रान्तिक असून चिनी व जपानी लोकांनीं त्याचा ग्रंथ मूळ वचनग्रंथ म्हणून सर्वदां अभ्यासिलेला आहे. अभिधर्मकोशावर बरेंचसें साहित्य झालेलें आहे. यशोमित्रापूर्वी हिंदुस्थानांत स्थिरमति, गुणमति आणि वसुमित्र यांनीं या कोशावर टीका लिहिल्या असून, त्यांच्या तिबेटी प्रती अद्याप आढळतात. ह्युएनत्संगाच्या शिष्यांनीं कांहीं टीका लिहिल्या आहेत. या कोशावरील वाङ्मयानें सर्व ग्रंथसंग्रहालय भरणें हल्लीं सोपें जाईल. या कोशाला जी इतकी मान्यता मिळाली त्याचें कारण त्याच्या कर्त्याच्या ठिकाणीं असलेले अलौकिक गुण होत. वसुबंधूनें सर्व पंथांतील गहन तत्त्वांचें विशदीकरण करून, फार उत्तम रीतीनें सर्वमान्य बौद्धमतें एकत्र प्रतिपादिलीं आहेत.

[संदर्भग्रंथ.—ए. रि. ए. (अभिधर्मकोश व्याख्या). विंटरनिझ—हिस्टरी ऑफ इंडियन लिटरेचर. पु. २. बुद्धोत्तरजग (ज्ञानकोश)].

**अभिनंद**—योगवासिष्ठकथासार व कादंबरीकथासार या ग्रंथांचा कर्ता गौडकवि, अभिनंद, याचा काल इ. स. ८४० हा असावा. कारण त्याच्यामागील ४ थ्या पिढींतील पूर्वज (खापरपणजा) शक्तिस्वामिन् हा काश्मीरच्या मुक्तापीडाच्या अमदानींत (इ. स. ७२६) होता. अभिनंदाचा जन्म काशी येथें झाला होता. परंतु तो गौड (बंगाल) येथें राहिला होता असें दिसतें. धर्मपालाच्या वंशांतील विक्रमशीलाचा मुलगा युवराज हारवर्ष हा त्याचा आश्रयदाता होता.

याला गौडाभिनंद असेंहि म्हणत. काश्मीरच्या मुक्तापीड कर्कोटवंशजांचा दिवाण शक्तिस्वामी, त्याचा मुलगा कल्याण स्वामी, त्याचा मुलगा कांत, व त्याचा मुलगा जो भट्ट जयंत तो अभिनंदाचा पिता होय. क्षेमेंद्रानें आपल्या सुवृत्ततिलकांत (२. १६, २९) याचा उतारा दिला आहे. श्रीधरदासकृत सूक्तिकर्णामृतांत (३. ५२) उद्धृत केलेल्या याच्या एका श्लोकांत आपला समकालीन म्हणून राजशेखराची स्तुति यानें केली आहे. याच ग्रंथांत उद्धृत केलेल्या दुसऱ्या एका श्लोकांत (५. १२९) भवभूति, बाण, कमलायुध, केशट वाक्पतिराज यांचा नामनिर्देश अभिनंदानें केला आहे. रामचरितमहाकाव्याचा कर्ता जो अभिनंद तो निराळा असावा असें ऑफ्रेक्ट सूचीवरून दिसतें[आफ्रेट सूची]

**अभिनय**—ज्याचें रूप घेतलें असेल त्याचें वेष, भाषण चेष्टा, मनोविकार इत्यादि सर्व गोष्टींत अनुकरण करणें यास अभिनय म्हणतात. अभिनय या शब्दाचा यौगिक अर्थ "जवळ नेणें" असा होतो; म्हणजे कवीच्या भावार्थाजवळ प्रेक्षकांनां नेणें. तेव्हां प्रेक्षकांनां कवीच्या भावार्थाचें ज्ञान करून देण्याचा जो प्रयत्न केला जातो त्यास अभिनय म्हणतात. रूपकरससिद्धि सर्वस्वीं अभिनयावर अवलंबून असते. आपले म्हणजे स्वाभाविक अभिनय नाट्यनृत्यप्रयोगांत

जास्त प्रमाणांत व्हावे लागतात. सिनेमादृश्यांत तर त्याहूनहि जास्त प्रमाणांत पाहिजेत; कारण केवल अभिनयावरूनच त्यांतील भावार्थ समजून घ्यावयाचा असतो. मूकदृश्यांत अभिनयाला पहिलें स्थान जें दिलें जातें तें यामुळेंच. पॅथे-सारख्या जगविख्यात् सिनेमाफिल्म तयार करणाऱ्या कंपनींत जे मोठ्या पगाराचे नटनटी काम करितात व त्यांचीं नांवें सिनेमाप्रेक्षकांच्या तोंडीं जीं अक्षय राहतात त्याचें कारण या नटांचा सर्वोत्कृष्ट व हृदयंगम अभिनय हें होय. नाट्य व नृत्यकलांतून अभिनय कशा प्रकारचा असावा याविषयीं बऱ्याच संस्कृत ग्रंथांतून विवेचन आढळतें. भरत मुनिकृत नाट्यशास्त्रांत नाट्याभिनय विवेचिला आहे. नंदिकेश्वराचा "अभिनयदर्पण" नांवाचा जो ग्रंथ आहे त्यांत विशेषतः नृत्यकलेंत उपयोगी पडणाऱ्या अभिनयाचे नियम फार विस्तारानें दिले आहेत.

ना ट्या भि न य.—नाटकांत निरनिराळ्या अवयवांच्या क्रिया व हालचाली विशेष महत्त्वाच्या आहेत. या हालचालींच्या क्रियेस नाट्य किंवा अभिनय म्हणतात. ज्याची भूमिका घेतली असेल त्याचें बोलण्या चालण्यांत हुबेहुब अनुकरण करणें याचें नांव अभिनय. (भ. ८.-९. इ. सा. द. ६२); अभिनय चार प्रकारचे सांगितले आहेत ते असेः— आंगिक, वाचिक, आहार्य व सात्त्विक. आहार्य अभिनय पोषाखासंबंधीं असतो. सात्त्विक अभिनयांत निरनिराळ्या भावना व मनाच्या अवस्था व्यक्त करण्याच्या स्वाभाविक पद्धतींचा अंतर्भाव होतो. वाचिक अभिनयाशीं भाषा व वाचा यांचा संबंध असतो. निरनिराळ्या भावना व मनाच्या अवस्था कशा व्यक्त कराव्या हें सांगतांना भरतानें आपल्या ग्रंथाच्या सहाव्या व सातव्या अध्यायांत वरील दोन प्रकारांसंबंधानें नियम दिले आहेत.

निरनिराळ्या मानसिक अवस्था व भाव व्यक्त करून तदनुरूप रस प्रेक्षकांमध्यें उत्पन्न करणें हा शास्त्रकारांच्या मतानें नाटकाचा उद्देश असल्यामुळें त्या मानसिक अवस्था व भाव यांचें पृथक्करण करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला आहे. त्या पृथक्करणाचें सविस्तर विवेचन करणें हा वास्तविक काव्यशास्त्राचा भाग असल्यामुळें त्याची केवळ त्रोटक हकीकत मात्र येथें देणें शक्य आहे. ज्या मूळ कारणांपासून निरनिराळ्या मानसिक अवस्था व भाव उत्पन्न होतात त्यांस विभाव म्हणतात व सदर अवस्था व भाव यांपासून जे परिणाम घडून येतात त्यांस अनुभाव असें म्हणतात. या भावांपैकीं कांहीं भाव असे असतात कीं, त्यांचा अंमल मनुष्यांवर बराचकाळपर्यंत चालू राहतो आणि म्हणून त्यांस 'स्थायीभाव" असें म्हणतात. भरताच्या मताप्रमाणें रति, हास, शोक, क्रोध, उत्साह, भय, जुगुप्सा व विस्मय हे ते स्थायीभाव होत. भरताच्या नंतर झालेल्या शास्त्रकारांच्या मतानें त्या स्थायीभावांत "निर्वेद" याचाहि अंतर्भाव होतो. परंतु अल्पकाल टिकणाऱ्या व स्थायीभावाबरोबर असणाऱ्या भावांतच भरतानें "निर्वेदाचा" उल्लेख केला आहे. विभाव, अनुभाव या योगानें घडलेल्या गोष्टी दर्शविल्या जात नाहींत, परंतु त्यांचें रंगभूमीवर आविष्करण झालें म्हणजे प्रेक्षकांच्या मनांत रस उत्पन्न करण्याकडे त्यांचा उपयोग होतो. रस म्हणजे प्रेक्षकांच्या मनांत पडलेलें नाट्यभावनांचें प्रतिबिंब आणि त्यामुळें त्या भावना प्रेक्षकांच्या मनांत वासनास्वरूपांत राहतात. तदनंतर त्या त्या भावनांस अनुरूप अशा निरनिराळ्या मानसिक अवस्था उत्पन्न होतात. जसें:—शृंगार, हास्य, करुण, रौद्र, वीर, भयानक, बीभत्स व अद्भुत आणि नन्तर जोडण्यांत आलेली शांत अवस्था या प्रत्येक मानसिक अवस्थेस (भ. ६-४२ इ.) यांत एकेक विशिष्ट रंग सांगितला आहे. जसें शृंगारास श्याम, हास्यास सित, करुणास कापोत, रौद्रास रक्त, वीरास गौर, भयानकास कृष्ण, बीभत्सास नील व अद्भुतास पीत.

निरनिराळ्या भावना कशा व्यक्त कराव्या, हें भरतानें आपल्या ग्रंथाच्या ७ व्या अध्यायांत सांगितलें आहे. जसें, प्रेमळ भाषणानें व अंगविक्षेपांनीं प्रेम, स्मित हास्य किंवा दीर्घ हास्य यांनीं आनंद आणि रडणें, शोक करणें, विलाप करणें, फिकट होणें, आवाज फाटणें, पडणें, आक्रोश करणें, सुस्कारे टाकणें इत्यादिकांनीं दुःख व्यक्त करावें. सहाव्या अध्यायांत रसांसंबंधानेंहि असेच नियम दिले आहेत.

निरनिराळे अंगविक्षेप किंवा आंगिक अभिनय यासंबंधानें भरतानें (भ. अध्याय ८-९) अधिक सविस्तर नियम सांगितले आहेत. हे नियम अर्थात् मुग्ध नाटकांतील विशिष्ट कलासंबंधीं आहेत. भरतानें हे नियम प्राचीन नटसूत्रावरून रचले असले पाहिजेत हें उघड आहे. निरनिराळे अंगविक्षेप सांगतांना त्यावरून कसले बोध होतात हेंहि सांगितलें आहे. कंप थोडा असला तर त्यास "अकंपित" म्हणतात; तोच जलद असला तर "कंपित" म्हणतात. याप्रमाणें प्रत्येक हालचालीचा अर्थहि सांगितला आहे. प्रत्येक भावनेगणिक नेत्रविक्षेपांत फरक पडतो. निरनिराळ्या भावना व मानसिक अवस्था व्यक्त करण्याकरितां नेत्रांतील तारका निरनिराळ्या तऱ्हेनें फिरवितात. यास्तव भुवया, नाक, गाल, ओंठ, हनुवटी व मान यांच्या हालचालींसंबंधानें अनेक नियम दिले आहेत. त्याचप्रमाणें हाताच्या हालचालींसंबंधानेंहि सविस्तर नियम दिले आहेत (भ. ९). जर हाताचा आंगठा वांकवून बाकीचीं चार बोटें लांब केलीं तर त्यास पताका म्हणतात. कपाळाला हात लावून धरला तर ठोसे. इजा, आपत्ति, आनंद किंवा दर्प इत्यादिकांचा बोध. होतो. हात तसाच धरला, परंतु बोटें अलग केलीं व हलविलीं तर अग्नि, पर्जन्य किंवा पुष्पवृष्टि दृष्टीस पडत आहे असा बोध होतो. हाताच्या त्याच स्थितींत जर आंगठीचें बोट (अनामिका, विशेषतः डाव्या हाताची) वाकविलें तर तसें करणारा कांहींतरी आणीत आहे किंवा देत आहे, खालीं जात आहे किंवा आंत येत

आहे असा बोध होतो. अशा प्रकारचे हाताच्या ठेवणीचे चोविसांहून अधिक प्रकार असून त्यांचे तेरा निरनिराळे संयोग असल्याचें वर्णन आहे. त्याचप्रमाणें त्यांच्यापासून काय बोध होतो, तेंहि सांगितलें आहे. या रीतीनें निरनिराळ्या कृती व पदार्थ अंगविक्षेपांच्या योगानें दाखविनां येतात. शिवाय वक्ष, कुक्षी, उदर, जघन, ऊरु, पद इत्यादिकांसंबंधानेंहि नियम सांगितले आहेत. पायाच्या व त्यास अनुसरून हाताच्या निरनिराळ्या ठेवणींचें व हालचालींचें वर्णन करण्याकरितां सबंध दहावा अध्याय खर्ची घातला आहे. अकराव्या अध्यायांत भिन्न भिन्न पदक्रमांचीं मंडलें सांगितलीं असून बाराव्यांत चालण्याच्या विविध गती दिल्या आहेत.

निरनिराळ्या लोकांच्या चालण्याच्या गती निरनिराळ्या असतात आणि प्रत्येकाच्या अवस्थेप्रमाणेंहि त्याच्या चालण्याच्या गतींत फरक पडतो.

स्त्रिया व कनिष्ठ वर्गीतील लोक आपले अवयव एकत्र गोळा करून अवयव व ओठ थरथर कांपवून आणि दांत करकर वाजवून शीत व पर्जन्य यांचा बोध करतात; डोळे व पाय वर करून रथारोहण सुचवितात; पाय उंच करून व पावलें लांब टाकून राजगृहाधिरोहण दाखवितात, वस्त्रें वर उचलून धरण्यानें पाण्यांतून चालण्याचा आणि पाणी खोल असेल तर हाताला ताण देण्यानें त्यांतून जाण्याचा बोध करतात. हत्ती व घोडे असल्याबद्दलची साक्ष अनुक्रमें अंकुश व लगाम यांच्यायोगानें पटवितात आणि रश्मी पकडून धरण्यानें रथ असल्याबद्दल ज्ञान करून देतात.

येणेंप्रमाणें खुणा व हावभाव करून अनेक गोष्टींचा बोध करण्यांत येतो आणि यांसंबंधानें भरतानें आपल्या ग्रंथाच्या पंचविसाव्या अध्यायांत अनेक नियम दिले आहेत. अलीकडील नाटकांतहि नट आपल्या मनांतील पुष्कळ गोष्टींचें दिग्दर्शन केवळ हावभावांनीं करून दाखवितो ( नाट्यति ), तसेंच तो कांहीं गोष्टी मोठ्यानें बोलतो ( प्रकाशम् ), कांहीं मनांतल्या मनांत बोलतो ( स्वगतम्, आत्मगतम् ), कांहीं बाजूला तोंड करून बोलतो ( अपवारितम् ) कांहीं तिसऱ्याला ऐकूं जाणार नाहीं अशा रीतीनें (एक) दुसऱ्याशीं बोलतो ( जनांतिकम् ) आणि कांहीं कोणी तरी आहे अशी कल्पना करून बोलतो ( आकाशे ).

याप्रमाणें अनेक युक्त्या करून साधनसामुग्रीची उणीव दूर करण्यांत येत होती. ज्याअर्थी भरतानें इतके विस्तृत नियम दिले आहेत, त्याअर्थी त्याच्या वेळेस नाट्यकला बरीच प्रगल्भ झाली असली पाहिजे हें उघड आहे. तथापि ती नाट्यकला अलीकडील रंगभूमीप्रमाणें नसून प्राचीन नृत्य व मूकप्रहसनांच्या काळांतील होती. यावरून भरतानें आपले नियम त्यावेळीं प्रचलित असलेल्या अन्य नाट्यशास्त्रविषयक ग्रंथांवरून घेतले असले पाहिजेत असें दिसतें.

नृत्याभिनय.—नंदी हा नृत्यकलेंत प्रवीण आहे अशी कल्पना करून त्याच्यापासून अभिनयाचे धडे घेण्याची "अभिनयदर्पणा" च्या कर्त्यास इच्छा झाली. नंदिकेश्वर हें कर्त्याचें नांव खरें आहे कीं टोपण आहे याविषयीं शंका आहे.

नंदिकेश्वराचें अभिनयदर्पण.—याला सुरुवात, इंद्र कैलासांत राहणाऱ्या नंदिकेश्वराकडे येऊन, त्याच्या नृत्यासंबंधींच्या भरतार्णवाचें विवेचन करण्याविषयीं त्याची प्रार्थना करितो व नंदिकेश्वर भरतार्णवाचें या "दर्पणा" च्या रूपानें थोडक्यांत सार सांगतो, अशा पद्धतीनें झाली आहे. प्रथम नाट्य, नृत्त व नृत्य यांमधील भेद सांगून, सभागृहाचें वर्णन दिलें आहे. रंगभूमीवरील पात्र कसें असावें हें खालीलप्रमाणें विवेचिलें आहे.

पात्रानें रंगभूमीच्या मध्यभागीं उभें राहावें व नर्तकीच्या शेजारीं नटानें असावें; उजव्या बाजूला तालधारी व कोठल्या तरी बाजूला मृदंग्या असावा व गीतकार त्यांच्या मध्यें, आणि श्रुतिकार जरा मागें असा थाट असावा.

नर्तकीः—अतिशय सुरूप, तरुणी पूर्णवर्तुळस्तनांची आत्मविश्वासी, मोहक, प्रिय, गृह–मोक्षामध्यें ( भाव दर्शविण्यामध्यें )कुशल, पाद व ताल यांत वाकबगार, रंगभूमीवर सहजरीतीनें काम करणारी, हात व अंग यांच्या विक्षेपामध्यें तरबेज, अभिनयांत सुरेख, डोळे पूर्ण उघडे ठेवणारी, गान, वाद्य आणि ताल यांनां अनुसरणारी, मौल्यवान अलंकार धारण करणारी, कमलासारखें सुंदर मुख असणारी फार स्थूल किंवा फार कृश नव्हे अशी, फार उंच किंवा फार ठेंगणी नसणारी नर्तकी असावी. जिचे डोळे फुलासारखे पांढरे आहेत, जिला थोडे केंस आहेत, जिचे ओंठ जाड व स्तन लोंबत आहेत, जी फार स्थूल किंवा फार कृश, फार उंच किंवा फार ठेंगणी आहे, जिला कुबड आहे किंवा जिचा आवाज मधुर नाहीं अशी वेश्या वर्ज करावी.

नटः—नट सुंदर, मधुरभाषणी, विद्वान, कार्यक्षम, वक्ता, कुलीन, शास्त्रकलांमध्यें पारंगत, मधुरस्वनी, गायनवादननर्तनपटु, आत्मश्रद्धावान व चतुर असावा.

अभिनयः—अभिनय तीन प्रकारचे आहेत. आंगिक, वाचिक व आहार्य ( अलंकारित ). यांशिवाय सात्त्विक, राजस व तामस असे भेद आहेत. या ठिकाणीं फक्त आंगिकाभिनयाचा विचार कर्तव्य आहे. अंग, प्रत्यंग व उपांग असे आंगिकाभिनयाचे तीन प्रकार पडतात. अंगाभिनयांत डोकें, हात, कांखा, कुशी, कंबर आणि पाय हीं सहा अंगें मानलीं जातात कोणी कोणी मान हें एक अंग धरतात. प्रत्यंगाभिनयांत खांदे, खांद्यांच्या मागील फरे, बाहू, पाठ, पोट, मांड्या आणि पोटऱ्या हीं येतात मनगटें, गुडघे आणि कोंपरें हींहि प्रत्यंगें होत असें कांहींचें म्हणणें आहे. उपांगाभिनयांत डोळे, पापण्या, बुबुळें, गाल, नाक, जबडा, ओंठ, दांत, जीभ, हनुवटी आणि चेहरा अशीं

अकरा उपांगें गणलीं जातात. याखेरीज टांच, घोटे, बोटें, आणि आंगठे व तळहात यांसारखीं साह्यकारी उपांगें आहेत. नृत्यामध्यें जेवढीं उपयोगी तेवढींच वर्णिली आहेत.

डोकें हालवण्याचे नऊ प्रकारः—सम,उद्वाहित, अधोमुख, आलोलित, धूत, कंपित, परावृत्त, उत्क्षिप्त आणि परिवाहित. (१) सम—डोकें खालीं वाकलेलें किंवा उचललेलें किंवा हलत नसलेलें. उपयोगः नृत्यारंभ, प्रार्थना, अधिकारयुक्त भाषण, समाधान, राग, बेपर्वाई किंवा क्रियाशून्यता. (२) उद्वाहित—डोकें वर उचलून स्थिर ठेवणें. उपयोगः पताका, चंद्र, आकाश, पर्वत, हवेंत उडणारे पदार्थ कोणतीहि उंच वस्तु.(३)अधोमुख—डोकें खालीं वांकविलेलें असणें. उपयोगः विनय, दुःख, नमन, एखादी गोष्ट हिडिस मानणें, मूर्च्छा, जमिनीवर पडलेले पदार्थ, स्नान. (४) आलोलित—डोकें वर्तुलांत फिरविणें. उपयोगः निद्रावस्था, पर्याकुलावस्था, उन्माद, मूर्च्छना, घेरी येणें, कावूं करणें, हंसणें इत्यादि. (५) धूत—उजवीकडून डावीकडे व डावीकडून उजवीकडे डोकें वळविणें. उपयोगः नकार, पुनःपुन्हां पाहणें, सहानुभूति, आश्चर्य, निराशा, बेपर्वाई, थंडी, आग, भीति, मद्य पिण्याच्या वेळचा पहिला क्षण, युद्धाची तयारी, अव्हेर,आतुरता आपल्या अवयवाकडे नजर टाकणें, दोन्ही बाजूला हाक मारणें.(६)कंपित—खालीं वर डोकें हालविणें. उपयोगः क्रोध, 'थांब' म्हणणें, पृच्छा, हांक, भीति घालणें इत्यादि. (७) परावृत्त ( वळलेले )—डोकें एका बाजूला करणें. उपयोगः "हें कर" असें सांगणें, तिटकारा, नम्रता, कांपणें, आंग चोरणें, अनादर करणें, इत्यादि. (८) उत्क्षिप्त —डोकें एका बाजूला वर करणें. उपयोगः 'हें घे' इत्यादि म्हणणें, खून करणें, प्रतिपाळ करणें, मान्यता देणें. (९) परिवाहित—एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे पंख्याप्रमाणें डोकें हालविणें. उपयोगः प्रेमी बनणें, प्रियकरिणीकरितां झुरणें, सुख, आनंद, विचार.

भरताचार्य आणि इतर मुनींनीं चोवीस डोक्यांचे प्रकार सांगितले आहेत ते असेः धूत विधूत, अवधूत, कंपित, अकंपित, उद्वाहित, परिवाहित, अंचित, निहंकित परावृत्त, उत्क्षिप्त, अधोमुख, लोलित, निर्योन्नतान्त, स्कंधानत, आरात्रिक, सम, पार्श्वाभिमुख, सौम्य, अवलोकित, तिरश्चीन, प्रकंपित, सौंदर्य.

अष्टदृष्टिः—भरत-शास्त्रांत दृष्टीचे आठ प्रकार सांगितले आहेतः सम, आलोकित, साचि, प्रलोकित, निमीलित, उल्लिखित, अनवृत्त, अवलोकित. (१)सम—देवांच्या स्त्रियांप्रमाणें डोळे न हालवितां बघणें. उपयोगः नृत्यारंभ, तागडी, इतर कांहीं गोष्टीविषयीं विचार, आश्चर्य, देवमूर्ति. (२) आलोकित—तीक्ष्ण कटाक्षांनीं जलद डोळे फिरविणें.उपयोगः कुंभाराचें फिरतें चाक, एकूण एक वस्तू दाखविणें, इच्छा.(३) साचि (काना डोळा)—डोकें न हालवितां डोळ्यांच्या कोंपऱ्यांतून पाहणें, उपयोगः इंगित, मिशाला पीळ घालणें,आत्मविश्वास, बाणाचा नेम धरणें, खूण करणें आणि कुलटा नाट्यामध्यें. (४) प्रलोकित—एका बाजूकडून दुसऱ्या बाजूकडे फिरविणें. उपयोगः दोन्ही बाजूच्या वस्तू पाहणें, खूण करणें, हालणें, अस्वस्थ मन. (५) निमीलित (झांकलेलें)—डोळे अर्धवट झांकलेले अर्धवट उघडलेले. उपयोगः ऋषीसारखा आविर्भाव, दुसऱ्याच्या मर्जीप्रमाणें वागणें, जप, ध्यान, नमस्कार, वेड, सूक्ष्मदृष्टि. (६) उल्लिखित—सूक्ष्म रीतीनें वर व बाजूला कटाक्ष टाकणें. उपयोगः ध्वजाचा अग्र, गोपूर, देवमंडप, पूर्वजन्म, उंची, चंद्रिका. (७) अनवृत्त—झटदिशीं खालीं वर बघणें. उपयोगः रागिट मुद्रा, स्नेहयुक्त आमंत्रण. (८) अवलोकित—खालीं बघणें. उपयोगः छायेकडे बघणें, विचार, शय्या, अभ्यास, आपल्या अंगाकडे बघणें.

पुढील दृष्टी इतर ठिकाणीं वर्णिलेल्या आहेत. सम, प्रलोकित,स्निग्ध, शृंगार, उल्लिखित, अद्भुत,करुण, विस्मय, तृप्त, विषण्ण, भयानक, साचि, दृत, वीर, रौद्र, दूर, इंगित, विलोकित, वितर्कित, शंकित, अभितप्त, अवलोकित, शून्य, हृष्ट, उग्र, विभ्रांत, शांत, मीलित, सूचन, लज्जित, मलिन, त्रस्त, म्लान, मुकुल, कुंचित, आकाश, अर्धमुकुल, अनुवृत्त, विप्लुत, जिम्ह, विकोश, मदिर, हृदय, ललित.

भ्रुकुटि.—दुसऱ्या एका ग्रंथांत भुंवया हालविण्याचे सहा प्रकार सांगितले आहेतः सहज, पतित, उत्क्षिप्त, चतुर, रेचित, कुंचित.

(१) सहज—नेहमींच्या चेहऱ्यांतील भुंवई ही नैसर्गिक स्थिति दर्शविते. (२) पतित— स्थिर असलेल्या भुंवया चढविणें. उपयोगः अरुचि, आश्चर्य, मत्सर. (३) उत्क्षिप्त—एक किंवा दोन्ही भुंवया वर उचलणें. उपयोगः स्त्रीचा राग, खरें बोलणें, शृंगारभाव, लीला. (४) चतुर—भुंवया मिळवून थोड्या हालविणें. उपयोगः एकमेकांचे चेहरे मिळविणें. हस्तसौख्य, आवेग. (५) रेचित—सुंदर व मधुर रीतीनें एक भुंवई अकुंचित करणें. उपयोगः एखादें गुह्य ऐकणें, 'साध' असें म्हणणें, एखाद्या स्थळाकडे बघणें. (६) कुंचित—एक किंवा दोन्ही भुंवया कमानदार करणें. उपयोगः प्रियकर हजर नसतांना त्याची आठवण करून दिल्यामुळें झालेला आनंद (मोट्टाइत), खोटाराग (कुट्टमित), विलास, किलकिंचित.

मान.—भावज्ञांनीं मान हालविण्याचे चार प्रकार सांगितले आहेत. सुंदरि, तिरश्चीन, परिवर्तित, प्रकंपित.

(१) सुंदरि-मान क्षितिजसमांतर अशी इकडे तिकडे फिरविणें (तिर्यङ्‌ प्रचलित). उपयोगः प्रणयप्रारंभ, परीक्षा घेणें, शाबास असें म्हणणें, आठवण, थट्टेचें भाषण, सहानुभूतीचें सुख. (२) तिरश्चीन—सापाच्या चालीप्रमाणें दोन्ही बाजूंनां मान वर करणें, उपयोगः तरवार पाजळणें, सर्पाकार गति. (३) परिवर्तित—अर्धचंद्राप्रमाणें उजव्या व डाव्या बाजूला मान वळविणें. उपयोगः शृंगारनर्तन, कपोलचुंबनप्रसंगीं.

( ४ ) प्रकंपित—कपोताप्रमाणें पाठीमागें व पुढें मान फिरविणें. उपयोगः 'तू आणि मी' असें सांगणें, विशेषतः देशी नाच्यांत, गणना, झोके.

हस्त.—हात हालविण्याचे प्रकार बारा आहेत. प्रसारण, कुंचित, रेचित, पुंखित, अपवेष्टित, प्रेरित, उद्वेष्टित, व्यावृत्त, परिवृत्त संकेत, चिन्ह, पदार्थटीक.

( १ ) प्रसारण ( उघडलेला ) बोटें ताठ करून ( २ ) कुंचित—बोटें वाकवून. ( ३ ) रेचित—बोटें पसरून. ( ४ ) पुंखित—हात पुढें, बोटें ताठ वांकलेलीं किंवा पसरलेलीं. (५) अपवेष्टित—हात खालीं केलेला असा. (६ )प्रेरित—हात पाठीमागें वळविलेला व बोटें ताठ, वांकलेली किंवा पसरलेलीं. (७) उद्वेष्टित—तळहात वर धरलेला. (८) व्यावृत्त—हात बाजूनें पुढें रोखलेला. (९) परिवृत्त—हात बाजूकडून पुढें केलेला. (१०) संकेत—शब्दाशिवाय कल्पना देणें. (११) चिन्ह—ज्या गोष्टी पुढें आहेत व ज्या अदृश्य आहेत त्यांच्या खुणा निरनिराळ्या चिन्हांनीं दाखविणें. (१२) पदार्थटीक—शब्दाचे अर्थ समजावून देणें.

हस्तभेदः—हातांनीं अभिनय करण्याचे दोन प्रकार आहेत. एक, एक हाताचा ( असम्युत्त ) व दुसरा जोड हाताचा ( सम्युत्त ). असम्युत्त हात २८ आहेत ते असेः पताका, त्रिपताका, अर्धपताका, कर्तरीमुख, मयूर, अर्धचंद्र, अराल, शुकतुंडक, मुष्टि, शिखर, कपित्थ, कटकमुख, सूचि, चंद्रकला ( पद्म ), कोश, सर्पशीर्ष, मृगशीर्ष, सिंहमुख, लांगूल, सोलपद्म, चतुर, भ्रमर, हंसास्य, हंसपक्ष, समदंश, मुकुल, ताम्रचूड आणि त्रिशूल.

(१) पताका—आंगठा इतर बोटांनां चिकटून बोटें ताठ करणें. उपयोगः नृत्यारंभ, ढग, अरण्य, मनाई करणें, हृदय, रात्र, नदी, देवलोक, घोडा, कापणें, वारा, कलणें, चालणें, बल, चांदणें, इत्यादि. (२) त्रिपताका—हाताचें तिसरें बोट वांकविणें. उपयोगः मुगुट, झाड, वज्र, वज्रधारी ( इंद्र ), गाल, स्त्रीपुरुषसंयोग इत्यादि. (३) अर्धपताका—त्रिपताका हस्तांतील करंगळी वांकविणें. उपयोगः पल्लव, फलक, नदीतीर, चाकू, गोपूर, शृंग, 'दोन' असें म्हणणें. (४) कर्तरीमुख-वरील हाताची करंगळी व तर्जनी पसरणें. उपयोगः पुरुष व स्त्री यांचा वियोग, विरोध, चोरणें, डोळ्याचा कोपरा, मृत्यु, बेकी, वीज, एकटें निजणें, पडणें. ( ५ ) मयूर-कर्तरीमुख हस्तांतलि तिसरें बोट आंगठ्याला जोडणें व इतर बोटें ताठ ठेवणें. उपयोगः मयूरचंचु, लता, शकुन पक्षी, ओकणें, कपाल, केंसावर थोपटणें, अश्रू पुसणें इत्यादि. (६) अर्धचंद्र—पताका हस्तांतील आंगठा पसरणें. उपयोगः वद्य अष्टमीचा चंद्र, गळा धरणारा हात, भाला, उत्पत्ति, कंबर, काळजी, आपण स्वतः, अवयवस्पर्श, साधारण लोकांचा आदर करणें. (७) अराल—पताका हस्तांतील पहिलें बोट वांकलेलें असणें. उपयोगः विषपान, अमृतपान इत्यादि ( ८ ) शुकतुंडक—अराल हस्तांतील तिसरें बोट मिटणें. उपयोगः बाण सोडणें, भाला फेंकणें, मर्म, क्रौर्य. ( ९ ) मुष्टि—चारी बोटें तळहातावर मिटवून वरती आंगठा ठेवणें. उपयोगः स्थैर्य, केस धरणें, कुस्ती खेळणें. (१० )शिखर—वरील हाताचा आंगठा वर उचलणें. उपयोगः मदन, खांब, शांतता, पति, दांत, प्रवेश, प्रश्न, नाहीं म्हणणें, अभिनयांतर, कंबरपट्टा सोडणें, आलिंगन, प्रियकर, घंटानाद, कुटणें. (११) कपित्थशिखर हस्ताची तर्जनी आंगठ्याच्या टोंकावर ठेवणें. उपयोगः लक्ष्मी, सरस्वती, गाईची धार काढणें, डोलेमध्यें फूल धरणें, साडीचें टोंक धरणें,डोक्यावर पदर धरणें इत्यादि.(१२)कटकमुख—तर्जनी व मध्यमिका आंगठ्याला लावणें. उपयोगः फुलें तोडणें, माला धारण करणें, हळू हळू धनुष्य सज्ज करणें, तांबूल देणें, कस्तुरी–अत्तर वगैरे लावणें इत्यादि. (१३) सूचि—कटकमुख हस्तांतील तर्जनी वर उचलणें.उपयोगः एक, परब्रह्म, एक शेंकडा,सूर्य,शहर, 'असें किंवा कसें' म्हणणें, 'तो,' पंखा, छुरणें, वेणी, छत्री, नगारा वाजविणें. (१४) चंद्रकला-सूची हस्तांतील आंगठा मोकळा सोडणें. उपयोगः चंद्राची कोर दाखविणें. (१५) पद्मकोश—बोटें वेगवेगळीं करून जरा वांकविणें व तळहात थोडा खोलगट करणें. उपयोगः फळ, रतन, फुलांचा गोटा, फराळ, कळी, आंबा, फुलांचा पाऊस, घंटेचा आकार इ. (१६) सर्पशीर्ष—पताका हस्ताचा मध्य खोलगट करणें. उपयोगः चंदनाची उटी, साप, हळूपणा, देव व देवर्षी यांनां पाणी देणें, हत्तीच्या कानांचें फडफडणें, मल्लाचें मर्दन. (१७) मृगशीर्ष—वरच्या साराखाच हात करून आंगठा व करंगळी पसरणें. उपयोगः स्त्रिया, गाल, क्रममर्यादा, भीति, नेपथ्य, त्रिपुंड्र, पदमर्दन, छत्रधारण, इत्यादि. पुढील हस्तविस्ताराचें वर्णन विस्तारपूर्वक केलेलें नाहीं, त्यांचा नामनिर्देश पूर्वी केलाच आहे. याशिवाय उणनाभा; बाण; अर्धसूचिक या तीन हस्तलक्षणांचा कांहीं ठिकाणीं उल्लेख आलेला आहे.

जोडलेले हातः—( संयुक्त हस्त ) चोवीस प्रकारचे जोडलेले हात पुढीलप्रमाणें होत. अंजली,कपोत, कर्कट,स्वस्तिक, दोल, पुष्पपुट, उत्संग, शिवलिंग,कटकवर्धन,कर्तरी, स्वास्तिक शकट, शंख, चक्र, संपुट, पाश कीलक, मत्स्य, कूर्म, वराह, गरुड, नागबंध, खट्व, भेरुंड, अवहित्थ.

नात दाखविणाऱ्या हातांचे अकरा प्रकार पुढलि प्रमाणेः—

( १ ) दंपती ( नवराबायको )—डावा हात शिखर व उजवा हात मृगशीर्ष स्त्रीपुरुषदर्शक आहे. ( २ ) मातृ ( आई )—डावा हात अर्धचंद्र, उजवा हात संदंश करून, डावा हात पोटावर ठेवावा; मातृ किंवा कन्या दर्शक. ( ३ ) पितृ ( बाप )—मागल्याप्रमाणें हात केल्यावर उजवा हात शिखराप्रमाणें धरावा; पितृ किंवा श्वशुरदर्शक. (४)श्वश्रू ( सासू )— उजवा हात हंसास्य आणि संदंशप्रमाणें गळ्याशीं धरून नंतर डावा हात स्त्रीहस्ताप्रमाणें पोटावर ठेवावा. ( ५ ) श्वशुर ( सासरा ).- मागल्याप्रमाणें हात ठेवून

उजवा हात शिखराप्रमाणें दाखवावा.( ६ ) भर्तृ-भ्रातृ (दीर) —डावा हात शिखर व उजवा हात बाजूला कर्तरीमुखाप्रमाणें ठेवावा (७)ननांद (नणंद)—भर्तृ-भ्रातृ हात केल्यावर डावा हात स्त्रीहस्त करावा. ( ८ ) ज्येष्ठ, कनिष्ठ भ्रातृ ( वडील किंवा धाकटा भाऊ)—मयूरहस्त पुढें आणि मागें दाखवावा ( ९ ) स्नुषा (सून )—पाठीमागला हात केल्यानंतर उजवा स्त्रीहस्त करावा. ( १० ) भर्तृ ( नवरा )—हंसास्य आणि शिखर हात हे गळ्याशीं धरावे ( ११ ) सपत्नी ( सवत )—प्रथम पाशहस्त दाखवून नंतर दोन्ही हात स्त्रीहस्ताप्रमाणें करावे.

देवांचीं कृत्यें व स्वभाव यांशीं जुळणारे आविर्भाव दाखविणारे हात. ते पुढीलप्रमाणें दिले आहेतः—

ब्रह्मा-डावा हात चतुर, उजवा हंसास्य. शंभू-डावा हात मृगशीर्ष, उजवा हात त्रिपताका. विष्णु-दोन्ही हातांनीं त्रिपताका.सरस्वती-डावा हात अर्धचंद्र,उजवा हात सूचि.पार्वती-दोन्ही हातांनीं अर्धचंद्र करून डावा हात वर व उजवा हात खालती अभय व वरद दर्शक असा ठेवावा. लक्ष्मी-खांद्याशीं दोन्ही कपित्थ हात करावे. मन्मथ-डावा हात शिखर,उजवा हात कटक. इंद्र—त्रिपताका हात एकमेकांवर आडवे ठेवणें. यम-डावा हात पाश, उजवा हात सूचि. सूर्य-सोलपद्म आणि कपित्थ हात खांद्यावर धरणें. चंद्र-डावा हात सोलपद्म उजवा हात पताका. बृहस्पति-जानवें धरलें आहे असें दाखविण्याकरितां दोन्ही हात शिखर करावे. दशावताराचे हस्तहि वर्णिले आहेत.

चातुर्वर्ण्यदर्शक हात. ब्राह्मणः—जानवें धरलें आहे असें दाखविण्याकरितां दोन्ही हात शिखर करून उजवा हात इकडून तिकडे हालविणें. क्षत्रिय—डावा हात शिखर करून पुढें मागें हालविणें व उजवा पताकाहस्त करणें. वैश्य—डावा हात हंसास्य, उजवा हात कटक. शूद्र—डावा हात शिखर, उजवा हात सूचि. यांखेरीज आणखी अठरा जातींचे हात त्यांच्या त्यांच्या कर्मावरून दाखविण्यांत येतात, त्याचप्रमाणें निरनिराळ्या देशांच्या लोकांचे हातहि त्यांची खूण पटविण्याजोगे कसे दाखवावे तें सांगितलें आहे.

प्रसिद्ध सम्राटांचे हातः—हरिश्चंद्र—शुकतुंड; नल—मयूर; पुरुकुत्स—अलपद्म; पुरूरवस्—मुष्टि; सगर—डोक्यावर अलपद्म; दिलीप—पताका; अंबरीष—कर्तरि; शिबि—कपित्थहस्त पुढें हालवावयाचा; कार्तवीर्य—देवविभावनामधील दोन पताकाहस्त खांद्याशीं धरणें; रावण—मागील प्रमाणेंच हात पण बोटें मात्र फाकणें; धर्मराज—दंडाजवळ हात हालवीत ठेवणें; अर्जुन—त्रिपताकाहस्त पुन्हां पुन्हां पुढें करणें; भीम—मुष्टि हस्त पुढें हालवीत ठेवणें; नकुल—कटक; सहदेव—शिखरहस्त इत्यादि.

सातसमुद्रांचे हातः— लवण-मुकुलहस्त खालीवर करणें; इक्षु-अलपद्म हात तसेच हालविणें; सुर-संकीर्ण आणि पताकाहस्त पूर्वीप्रमाणेंच हालविणें; सर्पि-चतुरहस्त; दधि—त्रिपताकाहस्त; क्षीर—सर्पशीर्ष; शुद्धोदक—पताका हस्त.

प्रसिद्ध नद्या दाखविणारे हात.—खालींवर हात हालविण्यानें एखादी नदी दर्शविली जाते. कोणत्याहि नदीकरितां पताकाहस्ताची योजना करितात गंगा-ताम्रचूड; यमुना-रेखा; कृष्णा-सिंहमुख; कावेरी-चतुर; सरस्वती-पताका आणि चतुर; नर्मदा-अर्धपताका; चंद्रभागा-सुसता हात हालविणें; इत्यादि. ज्यांच्याकरितां विशिष्ट हात सांगितले नाहींत त्या पताकाहस्तानें दर्शविण्यांत येतात. यानंतर निरनिराळ्या वृक्षवनस्पती, पशुपक्षी, जलचर वगैरेंचे हातांनीं दाखविण्याचे प्रकार सांगितले आहेत.

हा अभिनयदर्पण सिंडामंगलमच्या तिरुवेंकटाचारींनीं संपादित केला आहे. त्याचें कुमारस्वामी यांनीं " दि मिरर ऑफ जेश्चर " हें इंग्रजी भाषांतर केलें आहे.

अलीकडे वरील ग्रंथाप्रमाणें शास्त्रीय नर्तन क्वचितच पहावयास सांपडेल. हिंदुस्थानांत नर्तन हें असभ्य गणलें जाऊं लागल्यामुळें सुशिक्षित व कुलीन समाजांतून त्यास अजीबात फाटा मिळाला व ती कला बहुतेक वेश्यांच्या हातात गेली. कलावती या शब्दाचें मराठी रूपांतर कलावंतीण आहे. पण कलावंतीण या शब्दाचा रूढार्थ वेश्या असा आहे. दक्षिणेकडे कांहीं देवळांतून वर्षासनें देऊन नर्तकी ठेवलेल्या आहेत, त्यामुळें दक्षिणेंत पूर्वीच्या पद्धतीचें नर्तन थोड्या फार प्रमाणांत आढळून येतें. पाश्चात्य देशांत नर्तन ही कला सर्व स्त्रीपुरुषांस ठाऊक असणें अवश्य समजलें जात असल्यामुळें नर्तनाबरोबर अभिनयाचीहि वाढ तितक्या स्वैर गतीनें व फार झपाट्यानें झालेली आहे व अलीकडे सिनेमामुळें तर ही कला फारच उच्च दर्जाला पोंचली आहे. भारतीय चित्रपट पाश्चात्य चित्रपटांपुढें जे टाकाऊ वाटतात त्याचें मुख्य कारण अभिनयानभिज्ञता होय. तथापि महाराष्ट्रीय नाटकांतून आपणांस विशेषतः पुरुषपात्रांच्या कामांत अभिनयनैपुण्याचीं कांहीं उदाहरणें पहावयास सांपडतात.

**अभिनव कालिदास**-(१)हा काश्यपगोत्रोत्पन्न होता. यानें ' शृंगारकोश भाण ' लिहिलें.

[२] यानें " अभिनव भारतचंपू " व " भागवतचंपू " हीं काव्यें लिहिलीं.

**अभिनव गुप्त**—हा काश्मीरचा शैव पंडित इ. स. च्या दहाव्या शतकांत होऊन गेला. यानें आपल्या बृहत्प्रत्यभिज्ञानविमर्शिनींत —इति " नवतितमेऽस्मिन्वत्सरेऽन्त्ये युगांशे । तिथिशशिजलधिस्थे मार्गशीर्षावसाने" ॥—असें जें म्हटलें आहे या वरून त्याच्या कालाचें अनुमान करितां येतें. याचा बाप चुखल, आजा वराहगुप्त, भाऊ मनोरथगुप्त व गुरु उत्पलदेव, इंदुराज आणि तौत हे असून क्षेमराजाचा गुरु जो सोमानंद त्याचा हा प्रशिष्य होता. भट्ट नारायण, भट्ट दिवाकर वत्साचा विवेकांजन ग्रंथ, विद्यापति, सोमानंदाचा शिवदृष्टि-

सार ग्रंथ, संक्षेपविमर्शाधिरोह यांचा गुप्तानें आपल्या बृहत्प्रत्यभिज्ञानविमर्शिनींत उल्लेख केला आहे. आणि क्षेमेंद्र, मम्मट, माधवाचार्य, शार्ङ्गदेव व इतर यांनीं आपल्या ग्रंथांतून गुप्ताचा उल्लेख केला आहे. ईश्वरप्रत्यभिज्ञानविमर्शिनी, घटकर्परकुलवृत्ति, तन्त्रसार, तन्त्रालोक, ध्वन्यालोक लोचन (काव्यालोक टीका), परमार्थसंग्रह, परमार्थसार (आधानकारिका), परात्रिंशिकातत्वविवरण, बिंब प्रतिबिंबवाद, बोधपंचदशिका, भगवद्गीतार्थसंग्रह, भेदवादविदारण, भैरवस्तव, शक्तिभाष्य, स्पंद इत्यादि ग्रंथ यानें रचिले आहेत. ही मोठी ग्रंथरचना इ. स. ९९३-१०१५ पर्यंत झाली असावी.

**अभिनव गुप्ताचार्य.**—ही ऐतिहासिक किंवा बहुतकरून काल्पनिक व्यक्ति माधवाचार्यांच्या शंकर दिग्विजयाच्या सोळाव्या सर्गांत आणली आहे. आचार्यांनीं वादांत त्याचा पराभव केला, व शंकराचार्यांस भगंदर रोग झाला होता तो याच्या मांत्रिक करणीनें झाला, त्याच्या उपचारासाठीं मांत्रिक करणी पद्मपादनामक शिष्यानें केली तेव्हां तो रोग बरा झाला आणि अभिनवगुप्त मेला, असें त्या काव्यांत वर्णिलें आहे.

**अभिनवबाण.**—(वामनभट्ट बाण) हा कोंडुवीडूच्या वेम नांवाच्या रड्डीवंशीय राजाच्या (१४ व्या शतकाचा शेवट अगर पंधराव्याचा आरंभ) पदरीं राजकवि होता. यानें 'वीर नारायणचरित' नाटक लिहिलें. तसेंच यानें 'पार्वतीपरिणय' हें नाटक लिहिलें. हें नाटक हर्षाच्या पदरीं असलेल्या बाणानें लिहिलेलें आहे व तें कुमारसंभवाच्या आधारें रचलेलें आहे, अशा समजुतीनें तें फार लोकप्रिय झालें. कृष्णम्माचारियर यानें हें नाटक अभिनवबाणाचें आहे असें सिद्ध केलें आहे. यानें 'शृंगारभूषणभाव' आणि कदाचित् 'शर्वचरित' लिहिलें असावें. पार्वतीपरिणयनाटकांत शिवपार्वतीविवाह व मदनदहनाची कथा यानें वर्णन केली आहे.

**अभिमन्यु.**—(१) सहावा चाक्षुषमनु याच्या पुत्रांतील एक.

(२) सोमवंशी पुरुकुलोत्पन्न अजमीढ राजा. त्याच्या वंशांत जन्मलेल्या कुरुपुत्र जन्हु राजाच्या कुलांतील पंडुपुत्र जो अर्जुन, त्याचा पुत्र. हा अष्टवसूंतील सोमनामक वसूचा पुत्र वर्चस्, त्याच्या अंशानें कृष्णभगिनी सुभद्रा, हिचे पोटीं अर्जुनापासून झाला होता. (भार. आदि. अ. ६७). हा जन्मला त्या वेळींच दीर्घबाहु, वीर आणि महाक्रोधी असा दिसला म्हणून याचें अभिमन्यु हें नांव ठेविलें होतें.

यानें अर्जुनापासून दशविध धनुर्वेद, तशीच मानुष आणि दिव्य अस्त्रविद्या संपादिली होती. तींत हा इतका प्रवीण होता कीं, बलरामानेंहि त्याचें हस्तचापल्य आणि अस्त्रयोजना परिज्ञान हीं पाहून संतुष्ट होऊन यास रौद्रनामक उत्तम धनुष्य दिलें होतें. याचा बसण्याचा रथ परमभव्य असे व त्यास हा कपिल वर्णाचे पिंगट अश्व जोडी, याच्या रथाचा ध्वज शार्ङ्गपक्षाचा असून रथ हांकण्यांत परम कुशल, असा याचा सारथि सुमित्र नांवाचा होता (भार. द्रोण. अ. २३).

हा अर्जुनाप्रमाणेंच पराक्रमी होता. कुरुयुद्धांत द्रोणाचार्य सेनापति असतां दुर्योधनाच्या आज्ञेवरून त्यांनीं चक्रव्यूहाची रचना करून युद्धास आरंभ केला. संशप्तकाकडे अर्जुन गुंतल्यामुळें युद्धाचा भार धर्मभीमादिकांवरच पडला, त्यांना चक्रव्यूह भेदण्याचें ज्ञान नसल्यामुळें ते विचारांत पडले असतां अभिमन्यु व्यूहभेदाच्या कार्यास तयार झाला. व्यूहभेदाचें ज्ञान त्याला होतें. धर्मानें संमति दिल्यावर अभिमन्यु युद्धास प्रवृत्त होऊन त्यानें द्रोणाचार्य, कर्ण यांसारख्या योद्ध्यांस तोंड देऊन व्यूहांत प्रवेश केला. तो व्यूहांत शिरला असें पाहून कर्णादिकांनीं त्याच्या साहाय्यकांस विरोध केला. अभिमन्यूनें बरेंच शौर्य गाजविलें; परंतु तो एकटा व त्याच्याविरुद्ध द्रोण, कर्ण, कृप, अश्वत्थामा, दुर्योधनपुत्र लक्ष्मण, जयद्रथ व दुःशासन पुत्र हे त्याच्यावर एकदम उठल्यामुळें तो बेशुद्ध पडला व सावध होऊन उठणार तोंच दुःशासनपुत्रानें त्याच्या मस्तकांत गदा घातली. त्या घावानें अभिमन्यूचें मस्तक चूर्ण होऊन त्याचा मृतदेह जमीनीवर पडला.

अभिमन्यूची आकृति, त्याचा मातुल जो कृष्ण, त्याप्रमाणेंच असून, वीर्य, आणि शौर्यहि तसेंच होतें, याशिवाय हा कृष्णास जितका प्रिय असे, तितकाच किंबहुना कांहीं अधिक बलरामासही प्रिय होता, यास स्त्रिया दोन होत्या, त्यांत पहिली वत्सला, ही बलरामाची कन्या, व दुसरी उत्तरा विराट राजाची कन्या. हा मरण पावला, त्यावेळेस उत्तरा गर्भवती असून, तिला जो पुढें पुत्र झाला, तोच परीक्षित् राजा प्रख्यात आहे. [भार० द्रोण० अ० ३५-४९].

**अभिषेक.**—हा शब्द अथर्ववेदांत सांपडतो पण ऋग्वेद व सामवेद यांत आढळून येत नाहीं. अथर्ववेदांत देखील याचा अर्थ एखादा निश्चित संस्कार असा नाहीं. शुक्लयजुर्वेद आणि कृष्णयजुर्वेदाच्या तीन संहिता, त्याचप्रमाणें चारहि वेदांचीं ब्राह्मणें आणि श्रौतवाङ्मय यांत 'अभिषेचनीय' हें नांव राजसूयांतील एक विधि या अर्थीं आलेलें आहे; व ऐतरेय ब्राह्मणाच्या शेवटच्या पंचिकेंत बहुतेक अभिषेक हाच मुख्य प्रतिपाद्य विषय आहे. प्रथम अशा प्रकारचा संस्कार कोठें कोठें करण्यांत आला होता हें सांगून, नंतर अभिषेक, वाजपेय व राजसूय संस्कार यांसंबंधींचे विधी वगैरे खालीं दिले आहेत.

संस्करणीय व्यक्ति.—अभिषिक्त पुरुष सार्वभौम असत. ऐतरेय ब्राह्मणांत असें सांगितलें आहे कीं, हा विधि सार्वभौम सत्ता मिळविण्यासाठीं करावयाचा असतो; या सत्तेलाच साम्राज्य, भौज्य, स्वाराज्य, वैराज्य, पारमेष्ठ्य, राज्य, माहाराज्य व आधिपत्य हीं समानार्थक नांवें त्यांत दिलीं आहेत; व अशा प्रकारच्या राजांची यादीहि दिली आहे.

(ऐ. ब्रा. ८. २१-२३). महाभारतांत राजा युधिष्ठिराचे दोन अभिषेक वर्णिले आहेत; पहिला (सभापर्व) दिग्विजय केल्यानंतर मांडलिक राजांना बोलावून राजसूय यज्ञ केला त्यावेळीं व दुसरा (शांतिपर्व) महायुद्धानंतर. अशोकानें गादीवर आल्यावरोबर अभिषेक करून न घेतां पुढें चार वर्षांनीं तलवार गाजवून मग राज्याभिषेक समारंभ केला. उज्जनीच्या हर्ष शिलादित्यानेंहि असेंच केलें. रघुवंशाच्या दुसऱ्या सर्गांत अभिषेकाचें वर्णन आहे. तसेंच बृहत्कथेंत (क्षेमेंद्र १७; सोमदेव १५, ११०, विशेषतः ५, ८९) नरवाहनदत्ताचा अभिषेक आला आहे.

सामान्य राजांच्या बाबतींत ही अभिषेकाची चाल फारशी दिसून येत नाहीं. पण जोंपर्यंत त्यांनां कांहींतरी स्वतंत्रता असे तोंपर्यंत त्यांनां सुद्धां अभिषेक होत असे, असें समजण्यास हरकत नाहीं. कारण प्रथम राजे व सम्राट वेगळे काढणें कठिण आहे, व ऐतरेय ब्राह्मणांत (८. १४) नुसत्या राजांनांहि अभिषेक होत असल्याबद्दल स्पष्ट वचन आहे. दुसरें असें कीं, अथर्ववेदाच्या कौशिक सूत्रांत (१७. ११-१३) सामान्य राजांच्या (एकराजांच्या) अभिषेकाहून उच्च दर्जाच्या राजाचा (वर्षीयांचा) अभिषेक निराळा कल्पिला आहे. महाभारतांत (शांतिपर्व ५. २४९६) राजाभिषेचनविधि देशाला अत्यंत आवश्यक असल्याबद्दल लिहिलें आहे. हर्ष शिलादित्याचा पिता प्रभाकरवर्धन सार्वभौम नव्हता तरी अभिषिक्त होता.

अथर्ववेदांत एक राजसूय सूक्त (४. ८) आहे. एखाद्या युवराजाला त्याच्या पित्यानें केलेला अभिषेक आर्ष काव्यांतून वर्णिलेला असतो.

रामायणांत अयोध्याकांड व युद्धकांड यांतून सविस्तर वर्णिलेला रामराज्याभिषेक दोन दृष्टींनीं महत्त्वाचा आहे. एकतर, त्याला युवराजाभिषेकापासून सुरुवात होऊन अखेरीस राज्यारोहणानंतर याची समाप्ति झाली व दुसरें, पुष्याभिषेकाचें हें एक उदाहरण होय. पुष्याभिषेकाचें सविस्तर वर्णन अथर्ववेद परिशिष्ट (४ थें), वराहमिहिराची बृहत्संहिता व कालिकापुराण यांतून आढळतें. या विधीचें वैशिष्ट्य म्हणजे चंद्र आणि पुष्यनक्षत्र यांच्या युतींत हा विधि पार पाडला. असें सांगतात कीं, याच कालीं पूर्वी इंद्रानें असुरांनां जिंकलें. बौद्ध समजुतीप्रमाणें याच वेळीं बोधिसत्त्वाचा यौवराज्याभिषेक व अभिनिष्क्रमण हीं घडून आलीं. ही वेळ रामायणांत अनेक ठिकाणीं उल्लेखिली आहे. उदाहरणार्थ २. २, १२; २. ३, ४१; २. ४, २२; २. १४, ४२. रामायणत निर्णयसागर आवृत्ति स. १९१५.

कालिकापुराण व बृहत्संहिता यांतील पुष्याभिषेक किंवा पुष्यस्नानविधि केवळ राज्याभिषेकाचा नसून मानवेतिहास संशोधनालाहि त्याचा उपयोग होणार आहे.

कांहीं राजमंत्र्यांनांहि अभिषेक करीत. हर्षचरितांत 'मूर्धाभिषिक्ता अमात्या राजानः'। असें वाक्य आहे. पुरोहिताकरितां बृहस्पतिसव नांवाचा वाजपेयाशीं कांहीं संबद्ध असा विधि असे. ऐतरेय ब्राह्मणांत (८. २४ पासून पुढें) व कौशिक सूत्रांत (१७. ३० पासून पुढें) अभिषेकानंतरच्या पुरोहितप्रशस्तींत अभिषेचनाचा उल्लेख नाहीं. सेनापतींसंबंधानें महाभारतांत (शल्यपर्व अध्याय ४६) व इतर ठिकाणीं माहिती आहे.

प्रतिष्ठेच्या वेळीं सणावारीं, प्रसंगविशेषीं किंवा नित्य मूर्त्यभिषेक करण्याची भारतांतील हिंदूलोकांत व नेपाळांतील बौद्धलोकांत अजून चाल आहे. त्याविषयीं पूजाविधि, प्रतिष्ठाविधि या ग्रंथांत नियम दिले आहेत. यापूर्वींचा उल्लेख हवा असल्यास हर्षचरितांत सांपडेल. या विधींत योजण्यांत येत असलेलें मुख्य द्रव्य म्हणजे दूध; पण निरनिराळ्या ठिकाणचें पाणी, गोमय, वारुळाची मृत्तिका इत्यादि दुसरे अनेक पदार्थहि यांत योजतात.

बौद्धलोक अभिषेकभूमि हें नांव त्यांच्या दहा भूमींतील किंवा पूर्णतेच्या आवस्थांतील शेवटच्यास लावितात. (महावस्तु, १. १२४, २०). त्याचप्रमाणें, अभिषेक हा शब्द पवित्र तलाव, ओढा वगैरे ठिकाणीं कांहीं संस्काराच्या वेळीं हिंदु लोक जें स्नान करितात त्यासहि योजतात.

सं स्का र क र्म.—महाभारत (शांतिपर्व अध्याय ४०) रामायण, अग्निपुराण आणि मानसार यांतून अभिषेकासंबंधीं माहिती आली आहे. वरील ग्रंथांत या विधींतील पौरोहित्याची अथवा तंत्राची बाजू फारशी वृद्धिंगत झालेली दिसत नसली तरी या ग्रंथाच्या रचनाकालीं वैदिक विधींत बराच फरक पडला होता हें चांगलें दिसून येतें. पौराणिक कालांतील अभिषेकविधींचें वैदिक विधीशीं फारसें साम्य नाहीं. त्यांतील कार्यक्रमाची बरीचशी उभारणी उत्तरकालीन कल्पनांवर झालेली दिसते. ऐतरेय ब्राह्मणांतील संस्काराला मूलभूत ज्या कल्पना त्यांच्याशीं यांचा फार थोडा संबंध दृष्टीस पडतो. या तफावतीचीं कांहीं विशिष्ट कारणें साहजिकच असणार. उदाहरणार्थ, प्राचीन श्रौतकर्माविषयीं अनास्था किंवा क्षत्रिय विधींनां अपात्र अशा अधिपतींसाठीं नवीन संस्कार अंमलांत आणण्याची आवश्यकता वगैरे.

या संस्कारांतलि सर्वसाधारण गोष्टी खालील दिसतातः— विधीपूर्वी (म्हणजे आधल्या दिवशीं) राजा स्नान वगैरेंनीं शुद्ध होतो. आवश्यक गोष्टी म्हणजे (१) अभिषेकाच्या पूर्वी किंवा त्यावेळीं निरनिराळे राजमंत्री निवडणें (२) राज्ञी, गज, श्वेताश्व, श्वेतवृषभ, श्वेत छत्र, श्वेतचामर इत्यादि राजरत्नांची निवड; [३] व्याघ्रचर्माच्छादित सुवर्णसिंहासन; (४) निरनिराळें-उदाहरणार्थ, सप्तसमुद्राचें-पाणी, मध, दूध, दही, इत्यादि वस्तूंनीं भरलेलीं एक किंवा अनेक सुवर्णपात्रें.

प्रत्यक्ष संस्काराच्या वेळीं राजा पत्नीसमवेत सिंहासनावर बसतो, व एकटा पुरोहितच नव्हे तर इतर ब्राह्मण, मंत्री,

आप्त व प्रजाजन त्याला अभिषेक करितात. युधिष्ठिराला प्रथम कृष्णानें (कदाचित् ऐतरेय ब्राह्मणांत सांगितलेल्या राजकर्तृ या नात्यानें) अभिषेक केला असें महाभारतांत लिहिलें आहे. इंद्राचें स्तवन करून किंवा ऐंद्रमहाभिषेकाला अनुसरून हा विधि केला जातो. विधीनंतर राजा अहेर करतो व उपाध्यायांनां दक्षिणा अर्पण करतो. अग्निपुराण व मानसार यांत असें सांगितलें आहे कीं शहराभोंवतीं एक प्रदक्षिणा करून या विधीची समाप्ति करण्यांत येते. इतर आनंददायक प्रसंगांप्रमाणें या वेळींहि कैद्यांनां मुक्त करितात.

आतां यासंबंधींच्या वाङ्मयाकडे वळूं. फक्त एकच वैदिक ग्रंथ अशा राज्याभिषेकासंबंधीं नियम देतो व तो ग्रंथ म्हणजे ऐतरेय ब्राह्मण होय. त्यांत दोन स्वतंत्र अभिषेक दिले आहेत; एक पुनराभिषेक (८. ५–११) आणि दुसरा ऐंद्रमहाभिषेक (८. १२–२०). पहिला अभिषेक यज्ञानंतर करावयाचा असून त्याचा राज्याभिषेकाशीं कांहींहि संबंध नाहीं.

ऐंद्रमहाभिषेक म्हणण्याचें कारण इंद्राच्या राज्याभिषेकांतील विधी यांत अनुसरले आहेत. तेव्हां ज्या आचार्याला आपला राजा सर्वजेता व सार्वभौम असावा अशी इच्छा असेल त्यानें त्या महत्त्वाकांक्षी क्षत्रियाला या ऐंद्रमहाभिषेकानें अभिषेक करावा. महत्त्वाकांक्षी म्हणण्याचें कारण अभिषेकेच्छु क्षत्रियाची अशी इच्छा असावी लागते कीः—

"अहं सर्वा जितीर्जयेयमहं सर्वांल्लोकान्विन्देयमहं सर्वेषां राज्ञां श्रैष्ठ्यमतिष्ठां परमतां गच्छेयं साम्राज्यं भौज्यं स्वाराज्यं वैराज्यं पारमेष्ठ्यं राज्यं माहाराज्यमाधिपत्यमहं समन्तपर्यायीस्यां सार्वभौमः सार्वायुष आऽन्तादापरार्धात्पृथिव्यै समुद्रपर्यन्ताया एकराट्।" (ऐ. ब्रा. ८. १४).

अभिषेकसंस्काराची सामुग्री म्हणजे (१) न्यग्रोध, उदुंबर, अश्वत्थ आणि प्लक्ष लांकडांचीं पात्रें; (२) प्रियंगु आणि यव धान्याच्या ओंब्या; (३) उदुंबराचा एक मंचक (आसंदी), एक चमस व त्याचीच एक फांदी; (४) दहीं मध, तूप आणि उन्ह पडलें असतां पडलेल्या पर्जन्याचें उदक. आसंदी आभिमंत्रण केल्यावर राजा तीवर आरोहण करतो. आणि राजकर्ते त्याची मोव्यानें द्वाही फिरवितात. नंतर पुरोहित ज्यांत वरुणाचा सम्राज् इत्यादि नांवांनीं उल्लेख केला आहे असा मंत्र म्हणतो व राजाच्या मस्तकावर उदुंबर शाखा आणि सुवर्ण पवित्र ठेऊन दधिप्रभृतींच्या योगानें त्याला मार्जन करितो. राजाकडून दक्षिणा मिळाल्यानंतर पुरोहित त्याला पिण्याकरितां सुरायुक्त पात्र देतो; सुरा ही सोमरूप आहे असें तो सांगतो नंतर पुढील शांतिमंत्रांचा पाठ ऋत्विज राजाकडून करवून घेतोः "नाना हिवां देवहितं सदस्कृतं मा संसृक्षाथां परमे व्योमनि। सुरा त्वमसि शुष्मिणी सोमएष राजा मैनं हिंसिष्टं स्वां योनिमाविशन्तावीति।" (हा मंत्र ऐंद्रमहाभिषेकांत नसून पुनरभिषेकांत आहे).

अभिषेक विधीनंतर ऐतरेयब्राह्मणांत याप्रमाणें आभिषिक्त असलेल्या प्राचीन विख्यात् राजांची व अभिषेक करणाऱ्या ऋत्विजांची यादी दिली आहे; ती अशीः—

| राजा. | ऋत्विज. |
|---|---|
| १ जनमेजय पारिक्षित. | तुरकावषेय. |
| २ शार्यात मानव. | च्यवन भार्गव. |
| ३ शतानीक सात्राजित. | सोमशुष्म वाजरत्नायन. |
| ४ आंबाष्ठ्य. | पर्वत व नारद. |
| ५ युधांश्रौष्टि औग्रसन्य. | पर्वत व नारद. |
| ६ विश्वकर्मा भौवन. | कश्यप. |
| ७ सुदास पैजवन. | वसिष्ठ. |
| ८ मरुत्त आविक्षित. | संवर्त आंगिरस. |
| ९ अंग. | उदमय आत्रेय. |
| १० भरत दौष्यन्ति | दीर्घतमा मामतेय. |

खालील पुरुष राजे नसून केवळ अभिषेकज्ञानामुळें दिग्विजयी झालेः

| | | |
|---|---|---|
| ११ दुर्मुख पांचाल. | उपदेशक | बृहदुक्थ. |
| १२ अत्यराति जानंतपि. | ,, | वासिष्ठ सात्यहव्य. |

आतां राजसूयाकडे वळण्यापूर्वी ऐतरेय ब्राह्मणांतील (८ ५–११) पुनरभिषेक संस्कारासंबंधीं थोडा विचार करूं.

**पुनरभिषेक.**–हें नांवच असें दर्शवितें कीं, हा संस्कार ज्यावर करावयाचा ती व्यक्ति पूर्वीच अभिषिक्त असून, या संस्काराचा उद्देश त्याचें राजबलवर्धन करण्याचा असतो. या योगानें राजसत्तेला चालन मिळतें ("सूयते ह्वा अस्य क्षत्रं यो दीक्षते क्षत्रियः सन्" ऐ.ब्रा.) आणि यागामुळें ज्या अनेक शक्ती राजामधून निघून गेलेल्या असतात त्या पुन्हां आणण्याकरितां निरनिराळ्या वस्तू या संस्कारांत योजतात ("ब्रह्मक्षत्रेऊर्गन्नाद्यमपामोषधीनां रसो ब्रह्मवर्चसमिरा पुष्टिः प्रजातिः") व या कारणाकरितांच "देवस्य त्वा सवितुः प्रसवे" इत्यादि मंत्रांनीं सवित्याला आव्हान करण्यांत येतें. ऐंद्रमहाभिषेक व राजसूय यांतहि पुन्हां हा मंत्र म्हणतात.

यांतील विधी ऐंद्रमहाभिषेक विधीप्रमाणेंच बहुतेक असतात. अभिषेकाचीं साधनें म्हणजेः (१) व्याघ्रचर्मानें आच्छादिलेला एक उदुंबराचा मंचक; (२) उदुंबराचा एक चमस व शाखा; (३) दही, मध, तूप उन्ह पडलें असतां पडलेल्या पर्जन्याचें उदक, तृणांकुर, सुरा आणि दुर्वा हे पदार्थ मिळविलेलें अभिषेक द्रव्य. स्फ्य (तरवारीसारखें काष्ठनिर्मित यज्ञायुध) संज्ञक आयुधानें वेदी आंखून, आसंदी अर्धी वेदीमध्यें व अर्धी वेदीबाहेर ठेवतात. वेदीमागें बसून, उजवा गुडघा जमीनीला टेंकून (वीरासन घालून) राजा दोन्ही हातानें आसंदी धरितो व देवांनां तीवर आरूढ होण्याकरितां पाचारण करितो व नंतर आपण आधिपत्याकरितां, स्वराज्याकरितां, स्वामित्वाकरितां व दुसऱ्या अनेक गोष्टींकरितां तीवर आरूढ होतो; मग ऋत्विज अभिषेकद्रव्यें अभिमंत्रित

करून, व राजाच्या डोक्यावर उदुंबराची शाखा ठेऊन त्यांनीं मार्जन करितो व नंतर त्याला सुरापात्र देतो. राजा त्यांतील सुरा पिऊन अवशिष्ट आपल्या मित्राला देतो. यापुढें राजा उदुंबरशाखेवर पाय ठेऊन आसंदीखालीं उतरतो व पूर्वाभिमुख बसून 'नमो ब्रह्मणे०' हा मंत्र तीनदां म्हणतो. नंतर विजयाची इच्छा दर्शवून ऋत्विजाला दक्षिणा अर्पण करितो व उठून अग्नीमध्यें समिधा टाकतो. मग हातांत समिधा घेऊन ईशान्येस विजय व योगक्षेम यांची इच्छा धरून तीन पावलें टाकितो. सरतेशेवटीं राजा घरीं जाऊन, गृह्याग्नीच्या मागें बसतो व ऋत्विज आज्यपात्रांतून आहुती देतो व राजाच्या कल्यागार्थ मंत्र म्हणतो.

रा ज सू य य ज्ञां ती ल अ भि षे क वि धि.—राजसूयाचा मोठा विधि सार्वभौमत्वाची इच्छा करणाऱ्या क्षत्रिय राजाकरितां आहे. पाहिला राजा जो वरुण त्याच्याशीं याचा संबंध जोडल्यामुळें याला वरुणसव असेंहि म्हणतात. पुनर्राभेषकाप्रमाणेंच हा विधि पूर्वी अभिषिक्त असलेल्या राजाकरितांच असे. दोहोंत मोठा फरक म्हणजे अभिषेक हें राज्यांतील एक अवश्यक कृत्य असून त्यांत पौरोहित्य येत असे, तर राजसूय हा कांहीं हेतूनें केलेला एक ऐच्छिक धर्मविधि असून यांत अभिषेक हा संस्कार येई. हा यज्ञ केल्याबद्दल राजांनां मोठा अभिमान वाटे व ते वाजपेय, अश्वमेध इत्यादिकांवरोवर याचाहि गौरवानें उल्लेख करीत, हें संस्कृत अंकितलेखांवरून दिसून येतें.

राजसूय यज्ञांत मुख्य सात यागदिन असतात ते म्हणजे पवित्र किंवा अभ्यारोहणीय, अभिषेचनीय, दशपेय, केशवपनीय, व्युष्टि, द्विरात्र व क्षत्रधृति हे होत. कोणी दशपेय किंवा क्षत्रधृति यापुढें आणखी एक आठवा सौत्रामणी नांवाचा याग जोडतात. पवित्र नामक प्रथम याग फाल्गुनांत सुरू होऊन एक वर्षभर चाले. ही आग्रयणेष्टि पावसाळ्यांत होई असें मानवमत होतें. केशवपनीयांत राजाचे केंस कापीत, कारण अभिषेचनीयानंतर वर्षभर त्याची श्मश्रू होत नसे. या यागांत फक्त अभिषेचनीय व दशपेय कायते आपणाला मजेचे वाटतील असे आहेत. दुसऱ्या वर्षाच्या फाल्गुनांत पहिल्या दिवसापासून कांहीं प्रास्ताविक विधींनां सुरुवात होते. ते विधी म्हणजे शुनासीरीय, पञ्चवातीय, इंद्रतुरीय, अपामार्गहोम, त्रिषंयुक्त, रत्नहवींषि हे होत. यांपैकीं शेवटचे व अतिशय महत्त्वाचे असे राजरत्नांच्या घरीं एकसारखे १२ दिवस करावयाचे याग होत. अभिषेचनीय चैत्रप्रतिपदेला सुरू होऊन पांच दिवसांत संपतो. आठ देवसुहवींषि संपल्यानंतर अध्वर्यु यजमानाचा उजवा हात धरून, सवितृ, अग्नि, बृहस्पति, सोम, इंद्र, वरुण इत्यादिकांनां उल्लेखून मंत्र म्हणतो. नंतर १७ अभिषेकद्रव्यांपैकीं १३ निरनिराळ्या प्रकारचीं उदकें व मध, दूध, तूप व गोउल्व्य ( प्रसवणाऱ्या गाईच्या गर्भाभोंवतालचें पाणी ), हीं चार वेगवेगळ्या उदुंबरपात्रांत ठेविलेलीं असतात तीं एका पात्रांत करून व दुसरीं चार ( पलाश, उदुंबर, न्यग्रोध व अश्वत्थ लांकडांचीं पात्रें ) घेऊन हीं सर्व एका वेदीपुढें ठेवतात. दुसऱ्या दिवशीं त्या चार पात्रांत अभिषेकद्रव्य ओतून त्यांपुढें व्याघ्रचर्म पसरण्यांत येतें. राजा समारंभाचा पोषाख करून हातांत धनुष्यबाण घेतो. अरिष्टें टाळण्याकरितां जवळच असणाऱ्या क्लीब पुरुषाच्या तोंडांत एक तांब्याचा तुकडा घालतो. नंतर चारी दिशांकडे पावलें टाकून व ऊर्ध्वदिशाहि पायाखालीं घालून ( सार्वभौमत्व दर्शविण्यसाठीं ) व्याघ्रचर्मावर ठेवलेला शिशाचा तुकडा पायानें उडवितो व चर्मावर आरोहण करितो. त्याच्या पायाखालीं सोनें ठेवितात व तसेंच त्याच्या डोक्यावर १०० किंवा ९ भोकें असलेलें सोनें ठेवितात; नंतर पूर्वेकडे तोंड करून राजा हात वर करितो व अध्वर्यु एक नातेवाईक ( भाऊ ), एक क्षत्रियस्नेही आणि एक वैश्य असे चौघे अभिषेकपात्रांतील उदकानें सिंचन करितात. या ठिकाणीं त्याला शुनःशेपाची कथा सांगतात असें कांहींचें म्हणणें आहे. नंतर राजा अभिषेक द्रव्य आपल्या अंगाला चोळतो व व्याघ्रचर्मावर तीन पावलें टाकतो ( विष्णूच्या त्रिविक्रमाचें द्योतक म्हणून ). अवशिष्ट अभिषेकाचें पाणी पलाशचमसांत ओतून तें आपल्या प्रिय मुलाला अर्पण करितो. तें त्याच्या कडून घेऊन अध्वर्यु अग्नींत ओततो. यानंतर ( १ ) गोहरण; ह्म. राजाच्या एका नातेवाईकाची एक गाय ( शंभर गायींपैकीं ) हरण करण्यांत आल्यावर राजा रथारूढ होऊन चाल करून जातो व शेवटीं यज्ञगृहीं परत येऊन डुकराच्या कातड्याचा जोडा पायांत घालून रथाखालीं उतरतो; ( २ ) खदिरमंचकारोहण; ( ३ ) राजाला पांच फांसे देऊन अध्वर्यु त्याला काठ्यांनीं मारतो, उद्देश हा कीं त्याच्यांतील पापें निघून जावीत; मग त्याला ब्रह्मन्, सवितृ, इंद्र, आणि रुद्र यां नांवांनीं संबोधितात; ( ४ ) राजा, त्याचा भाऊ, सू किंवा स्थपति, ग्रामणी आणि एक नातेवाईक यांच्यामधील फांशाचा खेळ, (५) इतर किरकोळ गोष्टी. चैत्रांतील सप्तमीला दशपेय समारंभ होतो; त्यांत राजासकट १०० लोक, दहाजणांची एक पंगत करून दहा पेल्यांनीं सुरापान करितात. यांत प्रत्येकाची वंशपरिक्षा घेण्यांत यई; म्हणजे प्रत्येकाला आपल्या दहा सोमपी पूर्वजांचीं नांवें सागतां आलीं पाहिजेत. पुढें एक वर्षानें केशवपनीय वगैरे याग येतात.

राजसूय यज्ञाचा विधि शतपथब्राह्मण, कात्यायनश्रौतसूत्र आश्वलायन श्रौतसूत्र वगैरेंतून आढळतो. त्यांतील कांहीं भाग प्राचीन असावा. उदुंबरवृक्ष व उन्हांत पडलेल्या पावसाचें पाणी, या संस्कारानें राजसामर्थ्य वृद्धिंगत होतें ही कल्पना, व शुनःशेपाच्या कथेंतील नरमेधाचा अवशेष या गोष्टी मानवेतिहासाच्या दृष्टीनें महत्त्वाच्या आहेत.

वाजपेयाचा उल्लेख अथर्ववेदांत ( ९. ७, ७ ) व ऐतरेय ब्राह्मणांत ( ८. ४१, १ ) असून, वेदांच्या सूत्रवाङ्मयांत तर तो विस्तारानें वर्णिला आहे. या यज्ञांत अभिषेकाचें एक

स्वरूप दृष्टीस पडतें. आतां सुरुवातीला एक प्रश्न पडतो कीं, वाजपेय कशाकरितां करीत असत ? आश्वलायन श्रौत-सूत्र ( ९. ९ ) जो आधिपत्यकामी असेल त्यानें हा करावा असें सांगतें. उलट, शांखायन अन्नाद्यानें ( पुष्कळ अन्नाची इच्छा असणाऱ्यानें ) हा करावा, कारण वाजपेय म्हणजे "अन्न व पेय " होय असें म्हणतो, लाट्यायनांत " यं ब्राह्मणा राजानश्च पुरस्कुर्वीरन् स वाजपेयेन यजेत । असें सांगून, वाजपेययाजीनें अवाजपेयाला उत्थापन देणें अभिवादन करणें वगैरे गोष्टी करावयाच्या नाहींत असा निर्बंध घातला आहे. शुक्ल यजुर्वेदाच्या सूत्रांत जो वाजपेय याग करितो तो प्रजापतीला जिंकतो म्हणजे सर्व गोष्टी जिंकतो, असें विधान केलें आहे. आश्वलायनाप्रमाणें पाहतां ( ९. ९, ) हा फक्त राजांकरितां व ब्राह्मणांकरितां आहे; शांखायनाच्या मतें ( १६. १७, १-४ ) फक्त तीन उच्च वर्णीनीं हा करावा; व यानंतर ब्राह्मणानें बृहस्पतिसव करावा. यापूर्वी व नंतर बृहस्पतिसव करावा असें लाट्यायन सांगतो ( ८. ११, १२ ), तर कात्यायन ( १४. १, १ ) फक्त क्षत्रियानें व वैश्यानें हा करावा व या यागापूर्वी व नंतर बृहस्पतिसव झाला पाहिजे असें म्हणतो शतपथब्राह्मणाच्या मतें ( ५. १, १ ), इंद्र आणि बृहस्पति यांच्यापासून हा याग उत्पन्न झाला; या दोघांनीं सविताची मदत घेऊन प्रजापति जिंकला. या विधीचा दर्जाहि निराळा गणिला आहे, राजांकरितां जो राजसूय किंवा पुरोहिताकरितां बृहस्पतिसव करावयाचा त्या पूर्वी वाजपेय करावा असें आश्वलायन सांगतो ( ९ ९, १९ ); पण इकडे शुक्ल यजुर्वेद वाजपेयानंतर राजसूय करूं नये असें निश्चितपणें म्हणतो व त्याला कारण असें दाखवितो कीं, राजसूयानें राजा अभिषिक्त होतो तर वाजपेयानें सम्राट् अभिषेकिला जातो. तेव्हां राजसूय कमी दर्जाचा आहे.

एगलिंग व हिलेब्रँट यांच्या मतें या वादाचा वाजवी निकाल म्हणजे, मूळ वाजपेय सर्व दर्जाच्या लोकांनां सामान्य असा होता. राजसूय बृहस्पतिसव, स्थपतिसव, ग्रामणीसव इत्यादि निराळे विशिष्ट विधी अनेक होते, केवळ वाजपेयाच्या स्वरूपावरून पाहतां, तो एक लोकप्रिय विजयोत्सव असावा असें दिसतें.

या विधींतील विशेष प्रमुख गोष्टी म्हणजे ( १ ) आजि = एक शर्यतीचा खेळ ( २ ) रोह = यूपारोहण व ( ३ ) संख्येची पुनरावृत्ति.

वाजपेय पावसाळ्यांत ( शरत्काली ) करितात. प्रथम दीक्षा, सोमक्रय वगैरे प्रकार होतात. १७ सोमाचे व १७ सुरेचे चमस तयार ठेवतात; अध्वर्यूला दान करावयाच्या यादींत १७०० गायी १७ दासी १७ हत्ती व इतर जिन्नस असतात. शेवटच्या दिवशीं दुपारीं माध्यन्दिनसवनांत यज्ञक्षेत्रांत शर्यतीचा रथ फिरवितात. त्याला चार घोडे जोडलेले असतात; त्यांच्याकरितां मुद्दाम निराळें अन्न तयार केलेलें असतें. बाहेर दुसरे सोळा रथ तयार ठेवलेले असतात त्यावेळीं १७ दुंदुभी वाजवितात; आगा ( शर्यतीचें मैदान ) १७ बाणांनीं मर्यादित केलेलें असतें व एक औदुंबराची शाखा अवसानभूमींत ( लक्ष्य म्हणून ) पुरतात. नंतर शर्यत सुरू होऊन यजमान विजयी होतो; व सर्व घोड्यांनां खाऊं घातल्यानंतर रथ व घोडे अध्वर्यूनां अर्पण करण्यांत येतात. कांहीं हवी दिल्यानंतर यजमानपत्नीला बोलाविण्यांत येतें; तिनें विशेष प्रकारचें वस्त्र (कौश) परिधान केलेलें असतें; यज्ञयूपाला एक शिडी लाविलेली असते; तीवर यजमान " जाये, चल आपण स्वर्गारोहण करूं " असें पत्नीला म्हणून डोकें यूपाच्या वर जाईपर्यंत चढतो. तेथें पोंचल्यावर सर्व दिशांकडे पाहातो व त्यानंतर तो पृथिवीला वंदन करितो व खालीं उतरतो. जमिनीवर पाय ठेवतांना सुवर्णावर किंवा अजचर्मावर पाय ठेवतो. दुसरा पुरोहित उदुंबराच्या केलेल्या आसंदीवर अजचर्म पसरतो व यजमानाचा दंड धरून त्याला " हें तुझें राज्य " असें म्हणून त्यावर बसवितो. उदुंबरचमसांत दूध व पाणी मिसळून त्याच्या आहुती देतात. आहुती देणाऱ्याला राहिलेल्या हविर्द्रव्यानें प्रोक्षण करण्यांत येतें व त्रिवार "हा पुरुष सम्राट् आहे" असें जाहीर करितात; यानंतर १७ विजयमंत्र ( उज्जीति ) म्हणण्यांत येतात.

[ संदर्भ ग्रंथ]—अभिषेक ऐतरेय-ब्राह्मण (८.५पुढील); महाभारत सभापर्व अध्याय ३३-४५; शांतिपर्व अ. ४०; रामायण, अयोध्याकांड सर्ग १-१५, युद्धकांड सर्ग. ११२; अग्निपुराण अध्याय २०९; नीतिमयूख इत्यादि.

राजसूयः—वाससनेयी संहिता(९.३५;१०.३४), काठक सं. (१५,१-१३); मैत्रायणी सं. (२.६,१-१३;४.३,१-४;१०); तैत्तिरीय सं. ( १.८,१-२१ ); शतपथ ब्राह्मण ( ५,२,२-५; ५ ); तैत्तिरीय ब्रा. ( १.६,१-८;१० ); तांड्य ब्रा. ( १८. ८-११ ); आश्वलायन श्रौतसूत्र ( ९.३, व पुढें ) शांखायन ( १५.१२-२७;१६.१८ ); लाट्यायन ( ९.१-३ ); कात्यायन ( १५.१-१० ); आपस्तंब ( १८ ); वैतानसूत्र ( ३६. १-१३); कौशिकसूत्र ( १७ ) इत्यादि.

वाजपेयः—वाज. सं. ( ९.१-३४ ); काठक सं. ( १३. १४; १४. १० ); मैत्रायणी सं. ( १. ११, १-१० ); तैत्तिरीय सं. ( १. ७, ७-१२ ); शतपथ ब्रा. ( ५. १, १-२,२ ); तैत्तिरीय ब्रा. ( १. ३,२-९ ); तांड्य ब्राह्मण ( १८,६-७ ); आश्वलायन श्रौ. सू. ( ९-९ ); शांखायन ( १५.१;१६.१७ ); लाट्यायन श्रौ. सू. ( ८.११ व १२;५.१२,८-२५); कात्यायन श्रौत.सू. ( १४.१ व पुढें); आपस्तंब श्रौ. सू. १८.१-७ ); वैतानसूत्र (२७) इत्यादि. ]

**अभिसरण**—अभिसरण हा एक पदार्थविज्ञानशास्त्र आणि रसायनशास्त्र यांतील विशिष्ट क्रिया दर्शक असा पारिभाषिक शब्द आहे. दोन द्रवरूपी पदार्थांचें जें एकमेकांत मिश्रण होतें त्या क्रियेस अभिसरण असें म्हणतात;

परंतु द्रवरूपी पदार्थांच्याच संमिश्रणास हा शब्द लावावा आणि घन किंवा वायुरूपी पदार्थांच्या बाबतींत हा लावूं नये असा निर्बंध नाहीं. जेव्हां दोन वायूंचें एकमेकांत अभिसरण होतें तेव्हां अभिसरणाची क्रिया लवकरच पूर्ण होते; परंतु दोन द्रवांचें अभिसरण पूर्ण होण्यास बराच काल लागतो. दोन वायूंचें अभिसरण होऊन दोहोंचा एक मिश्र वायु होतो व त्या मिश्रणाच्या घटकावयवांचें प्रमाण वायुपात्रांत सर्वत्र अ दीं सारखेंच असतें; परंतु वायूखेरीज दुसऱ्या क े दे बाबतींत या प्रकारें होणाऱ्या संमिश्रणास कांहीं मर्यादा असते. पाणी आणि हवा यांचें उदाहरण घेतल्यास असें दिसून येईल कीं, हवेचे कण पाण्यांत आणि पाण्याचे हवेंत शिरतील या प्रकारें हवा व पाणी यांच्या योगें झालेली संस्थिति (सिस्टीम) एखाद्या पात्रांत बंद केलेली असल्यास हवेंतील कण पाण्यांत शिरण्याची सीमा होऊन हें अभिसरण बंद होईल; त्याप्रमाणेंच पाण्यांतील कण हवेंत जाण्याचे बंद होतील व पाणी आणि हवा यांच्या दरम्यान एक पृष्ठभाग राहील. या प्रकारें विभाग करणारा पृष्ठभाग ज्या दोन पदार्थांच्या दरम्यान असूं शकत नाहीं ते दोन पदार्थ एकमेकांत वाटेल त्या प्रमाणांत संमिश्रित होऊं शकतात. जर ते दोन पदार्थ वाटेल त्या प्रमाणांत संमिश्रित होत नसतील तर त्या दोन पदार्थांचें मिश्रण होत असतांना त्या दोन पदार्थांच्या दरम्यानच्या प्रदेशांत घडामोडी झाल्या पाहिजेत आणि त्या योगानें विभाग करणारा पृष्ठभाग उत्पन्न होईल.

अभिसरणामध्यें पुढील गोष्टी दिसून येतातः– (१) ज्या दोन पदार्थांत संमिश्रण होत असतें त्या पदार्थांचें एकमेकांच्या प्रदेशांत गमन होतें; यालाच अभिसरण असें म्हणतात. (२) ज्या ठिकाणीं विभाग करणारा पृष्ठभाग असतो त्या ठिकाणीं संमिश्रित होणाऱ्या पदार्थांचे अंश एकीकडून दुसरीकडे जातात. विभाग करणाऱ्या पृष्ठभागांतून पदार्थांचे याप्रमाणें अंश जाण्याच्या क्रियेला शास्त्रांत निरनिराळीं नांवें आहेत.

अभिसरणाची क्रिया घनपदार्थांच्या अंतर्भागीं होऊं शकते; म्हणजे ज्या प्रदेशांत घनपदार्थ असतात त्या प्रदेशांत अभिसरणाची क्रिया घडूं शकते. एखाद्या पातळ पडद्याच्या योगानें एखाद्या पात्राचे दोन विभाग केले आणि नंतर त्या दोन विभागांत पाण्यांत तयार केलेलीं निरनिराळ्या क्षारांचीं दोन द्रावणें घातलीं, तर पडद्याच्या अंतर्गत भागांत अभिसरणाची क्रिया घडून येते. जर क्षाराच्या विद्रावणास चर्मतलाच्या (पार्चमेंटच्या) पडद्याच्या योगानें शुद्ध पाण्यापासून वेगळें केलें तर त्या पडद्यांतून क्षाराचे कण शुद्ध पाण्यांत जातात. याहीपेक्षां मौजेचे प्रकार वायूच्या बाबतींत घडतात. प्लातिनच्या (प्लाटिनमच्या) किंवा पलादच्या (पालाडिअमच्या) तप्त पडद्यांतून उज्ज (हायड्रोजन) वायु जाऊं शकतो. ज्या वेळस पडद्यांतून एकीकडून दुसरीकडे पाण्यांत असलेला एखादा क्षार किंवा दुसरा एखादा पदार्थ जातो, तेव्हां त्या प्रकारास जलाभिसरण असें नांव देतात.

अभिसरणाच्या साध्या साध्या बाबतींत गुणविशिष्ट स्वरूपाचें सहज रीतीनें अवलोकन करतां येतें. एकाद्या कांचेच्या पात्रांत सुमारें अर्ध्याइतकें पाणी घालावें. नंतर एखाद्या रंगित क्षाराचें द्रावण तयार करून तें एखाद्या लांब नळीच्या नरसाळ्यानें हळूच त्या पात्राच्या तळाशीं सोडून द्यावें. क्षाराचें द्रावण पाण्यापेक्षां बहुधा जड असतें, त्यामुळें तें तळाशींच राहतें याप्रमाणें दोन निरनिराळ्या रंगांचीं द्रावणें एकावर एक असलीं म्हणजे त्यांच्या भिन्न रंगांवरून तीं तेव्हांच ओळखतां येतात. अशा रीतीनें हीं दोन द्रावणें अभिसरणाच्या योगानें एकमेकांत मिसळूं लागलीं म्हणजे त्यांच्या मिश्रणाची गति त्यांच्या रंगावरून सहजच कळते. एका कांचपात्रांत अम्नच्या (अमोनियाच्या) द्रवाचे एक दोन थेंब सोडावेत आणि दुसऱ्या पात्रांत उद्हराम्लाचे (हायड्रो क्लोरिक असिडाचे) एकदोन थेंब सोडावेत. ही भांडीं तोंडास तोंड लावून उभीं केलीं असतां अम्न आणि उद्हरिद या वायूंचें परस्परांत अभिसरण होऊन अम्नहरिद (अमोनिअम् क्लोराइड) नांवाचा वायु उत्पन्न होतो. यावरून वायूचें अभिसरण पाहतां येतें. विद्राव्य [सोल्युबल] पदार्थांचें पाण्यांत द्रावण तयार करितात व असल्या दोन द्रावणांत अभिसरणाचें कार्य लवकर घडून यावें म्हणून दोन्ही द्रावणें हलवून एकमेकांत मिसळतात; या योगानें अभिसरणाचें कार्य घडण्यास जास्त मोठा पृष्ठभाग प्राप्त होतो; व जास्त मोठा पृष्ठभाग मिळाल्यानें अभिसरणाचें कार्य फार लवकर घडतें. असें आहे तरी अभिसरण आणि हलवून केलेलें द्रावणीय मिश्रण यांत तत्वतः फरक आहे; हलविण्याच्या योगानें द्रावणाचे लहान लहान तुकडे होतात आणि नंतर अभिसरणानें त्यांचा एकजीव होतो; परंतु नुसत्या हलविण्यानें कार्यभाग होत नाहीं. फक्त कार्य लवकर घडून येतें कारण पृष्ठभाग जास्त मोठा झाल्यानें कार्य घडण्याचें क्षेत्र मोठें होतें. वायु आणि जल यांचें मिश्रण हलविल्यानें फार लवकर होतें. पाण्यावर जे बुडबुडे येतात त्या बुडबुड्यांच्या केशाकर्षणाच्या (कॅपिलरी ॲक्शन) योगानें वायु पाण्यांत फार लवकर विरघळतो.

अभिसरणाची क्रिया प्रवाही पदार्थांत घडत असतांना योग्य रीतीनें निरीक्षण करण्याकरितां प्रवाही द्रव्यान्तर्गत उपप्रवाहाचा उपसर्ग अभिसरणास न लागूं देण्याची काळजी घेतली पाहिजे. उदाहरणार्थ पृष्ठभागावरील पाण्यानें वायूचें अपशोषण केलें व जर पाण्याचें घनत्व त्या योगानें वाढलें तर पाण्याचा वरचा भाग खालीं जाईल आणि खालील पाणी वर येईल. याप्रमाणें प्रापण (कन्व्हेक्शन करंट) सुरू झाल्यास अभिसरणाच्या गतीसंबंधानें काढलेलें अनुमान दूषित होईल; डायटोम्यासी नांवाच्या सूक्ष्म वनस्पती आहेत; या वनस्पतींची हालचाल होत असते. या हालचाली कशानें होत असाव्यात याबद्दल शास्त्रज्ञ मंडळींत अनेक मतें आहेत;

या वनस्पतीपासून प्राणवायु ( आक्सिजन ) निघत असतो. त्याच्या बुडबुड्याच्या योगानें किंवा त्या प्राणवायूमुळें जड होऊन उत्पन्न झालेल्या प्रवाहानें त्या वनस्पतीस गति प्राप्त होत असावी असें मत आहे.

आतां आपण अभिसरणाची प्रगति परिमाण विशिष्ट पद्धतीनें मोजण्याच्या प्रकाराकडे लक्ष देऊं. एखाद्या पात्रांत अभिसरण घडत असतां त्या पात्राच्या निरनिराळ्या भागांतील पदार्थ थोडथोडे काढून घेऊन त्यांचें पृथक्करण करून पहातात; परंतु या पद्धतींत एक दोष आहे तो हा कीं, याप्रमाणें अभिसरण चालत असतांना अभिसरणयुक्त पदार्थांतील कांहीं अंश काढून घेतल्यानें अभिसरणाच्या क्रियेस कमीजास्त प्रमाणांत चालन मिळतें किंवा अवरोध होतो, त्यामुळें अभिसरणाचें योग्य प्रकारें परिमाण करतां येत नाहीं. हा दोष टाळण्याकरितां लार्ड केल्व्हिननें पुढील युक्ति योजिली. साधारणपणें सारख्या विशिष्ट गुरुत्वाच्या कांचेचे पोकळ मणी तयार करवून त्यांचें विशिष्ट गुरुत्व अगदीं कसोशीनें मोजून काढलें; नंतर ते मणी अभिसरणयुक्त द्रवांत टाकले तर जसजसें अभिसरण होऊन द्रवास निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळे घनत्व प्राप्त होतें, तसतसे निरनिराळ्या विशिष्ट गुरुत्वाचे मणी निरनिराळ्या भागांत तरंगूं लागतात. यावरून अभिसरणाचें परिमाण ठरवितां येतें. या पद्धतींत एक दोष आहे; तो हा कीं, मण्यास वायूचे बारीक बारीक बुडबुडे चिकटून त्याचें विशिष्ट-गुरुत्व बदलतें व यायोगानें अभिसरणाची योग्य ती गणना होऊं शकत नाहीं. आणखी एक तिसरी पद्धत असून ती बहुतेक निर्दोष आहे. हिला प्रकाशाची पद्धत असें नांव देतां येईल या पद्धतीचे तीन प्रकार आहेतः—( अ ) क्षितिजाशीं समांतर पातळींत वक्रीभवन करण्याची पद्धत, ( ब ) उर्ध्व पातळींत वक्रिभवन करण्याची पद्धत आणि ( क ) शर्करायंत्राची पद्धत (दि मेथड ऑफ सॅकरीमीटर ); अशा तीन पद्धती आहेत. पहिल्या दोन पद्धतींचें विशेष वर्णन करण्याची आवश्यकता नाहीं. शर्करायंत्रानें प्रकाशाच्या ध्रुवीभवनाचें आवर्तन काढतां येतें. ज्या ज्या प्रमाणांत पाण्यांत साखर विरघळली असेल, त्या त्या प्रमाणांत प्रकाशाच्या ध्रुवीभवनाचें आवर्तन होतें. यामुळें पाण्यांत किंवा दुसऱ्या एखाद्या प्रवाही पदार्थांत अभिसरणाची काय गति होते याची गणना करतां येते. साखरेप्रमाणेंच दुसऱ्या कांहीं पदार्थांच्या द्रावणाच्या अंगीं प्रकाशाच्या ध्रुवीभवनाचे अवर्तन करण्याची शक्ति आहे. अर्थात् त्यांचाहि अभिसरणाची गणना करण्यास शर्करायंत्राचा उपयोग करितां येतो.

अभिसरणाचा शास्त्रांत काय उपयोग करण्यांत आला आहे, याविषयीं थोडेसें विवेचन करूं. अभिसरणाच्या योगानें वायूंतील अणु (मॉलीक्यूल) ची गति मोजण्याचा प्रयत्न झाला आहे. शास्त्रज्ञांनीं गणिताच्या आधारें निरनिराळ्या वायूंची जी गति काढली आहे ती पुढें दिली आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| उज्ज ( हायड्रोजन ) | १८५९०० सेंटिमीटर दर सेकंड | | |
| नत्र ( नैट्रोजन ) | ४९२०० | ,, | ,, ,, |
| प्राण ( आक्सिजन ) | ४६५०० | ,, | ,, ,, |
| कर्बद्विप्राणिद ( कार्बन डाय आक्साईड ) | ३९६०० | ,, | ,, ,, |

**अभिसार**.—देश व लोक. हा डोंगराळ प्रदेश काश्मीरच्या दक्षिणेस व पश्चिमेस लागून होता. हल्लीं काश्मीर संस्थानांत त्याचा अंतर्भाव होतो. बृहत्संहिता [ १४. २९; ३२. १९. ), महाभारत ( ७. ९३; ८. ७३ ); विष्णुपुराण (२.३ इत्यादि पुराणग्रंथांतून अभिसाराचे उल्लेख आढळतात. भारतीय युद्धांत दुर्योधनाच्या तर्फेनें अर्जुनाशीं हे लोक लढत होते. ग्रीक लोकांनां 'अबिसारींचें राज्य' म्हणून हा प्रदेश माहीत होता ( प्रो. विल्सन—ॲरिआना ॲंटिका. पा. १९० मॅकक्रिंडल—इन्व्हेजन ऑफ इंडिया बाय अलेक्झांडर दि ग्रेट पा. ६९ टीप ३ ]'दार्वाभिसार' असा संयुक्त शब्द बहुतेक ठिकाणीं आढळत असल्यानें, अभिसार व दार्व हे शेजारी शेजारी रहात असत असें दिसतें ( लासेन—इंडिश आल्टरथुम्सकुंडे, पु. २, पान १३८; पु. २ परिशिष्ट पान ३९--४०; आशियाटिक रिसर्चेस, पु. १५, पान ११५ ). हिंदुस्थानांत शिरतांना अलेक्झांडरनें जेव्हां अप्नॉस शहर काबीज केलें तेव्हां तेथील लोक हायडॅस्पीझ ( झेलम ) व अकेसिनीस ( चिनाव--चंद्रभागा ) या नद्यांमधील अभिसार देशांत आश्रयासाठीं गेले ( स्मिथ--अर्ली--हिस्टरी ऑफ इंडिया पा. ५९ ); त्यावेळीं तक्षिला व अभिसार यांमध्यें युद्ध चालू होतें. अलेक्झांडर तक्षिला येथें असतांना अभिसाराच्या राजाकडून, पोरसला अलेक्झांडरशीं लढण्याच्या कामीं मदत करण्याची त्याची खरी इच्छा असूनहि ( डायोडोरस, १७. ८७ ) आपण शरण आल्याबद्दल अलेक्झांडरला निरोप आला होता. परत जातांना अलेक्झांडरनें अभिसाराच्या राजाला आपला सुभेदार नेमून उरसाच्या राजाला त्याचा मांडलिक केलें. ह्युएनसंगाच्या वेळीं काश्मीरच्या साम्राज्यपदामध्यें जीं कांहीं संस्थानें होतीं त्यात राजपुरी किंवा राजौरी म्हणून एक होतें. तेंच प्राचीन अभिसार होय. असें व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो.

**अभ्रक**.—हें निरनिराळ्या खडकांत सांपडणारें खनिज द्रव्य पृथ्वीवर पुष्कळ ठिकाणीं आढळतें. याच्या मुख्य चार जाती आहेत. ( १ ) बायोटिट् ( २ ) मस्कोविट् ( ३ ) फ्लोगोपिट् ( ४ ) लेपिडोलिट्. याचे फाडून पातळ पत्रे करितां येतात. व ते लवचीक परंतु ताठ असतात. याचे बहुधा समद्विभुज चोकोनी (ऱ्हॉंबोहेड्रल) स्फटिक आढळतात. सुईच्या बोथट अग्रानें अभ्रकाच्या स्फटिकावर जोरानें आघात केला असतां त्यावर सहा रेघांची ताऱ्याच्या आकाराची भेग पडते. दोन रेघांमधील कोन साधारणपणें ६०° अंशांचा असतो. त्याच सुईनें जरा जास्त जोरानें दाबल्यास स्फटिकावर तारा देखील उमटतात.

अभ्रकानें प्रकाशवक्रीभवन फार : होत नाहीं. याचा वक्रीभवन गुणक ( इंडेक्स ऑफ रिफ्रॅक्शन ) १.५८ते १.६ असतो. परंतु द्विवक्रीभवन फार होतें. दृगक्षां ( ऑप्टिक-अॅक्सिस ) मधील कोन कांहीं जातींत ५०° त ७०° असतो व पहिल्या व तिसऱ्या जातींत १०° असतो. दुसऱ्या जातीचे अभ्रक रंगरहित व पारदर्शक असतात, व चवथ्या जातीचे काळे व अपारदर्शक असतात. याशिवाय पिंवळा, हिरवा, तांबडा व पिंगट, असेहि याचे स्फटिक सांपडतात. याचे वि. गु. २.७ ते ३.१ असतें. अभ्रक विद्युद्रोधक व उष्णतारोधक आहे व यामुळेंच त्याचा उपयोग यंत्रकलांत फार होतो.

यांत बहुधा इतर पदार्थांचें मिश्रण असते. टूर्मेलिन् व कुरुंद हे तर नेहमीं यांत सांपडतात.

याची रासायनिक घटना [ केमिकल कांपोझिशन ] फार घोंटाळ्याची असते. हे स्फट्, सिंधु, पालाश, यांची शैलितें आहेत. यांत उज्जवायूहि असतो व मग्न, लोह, कुम व भार हे धातूहि यांत सांपडतात. उदाहरणार्थ वर दिलेल्या चार जातींचीं सूत्रें खालीं दिलीं आहेत.

( १ ) मस्कोविट्...उ$_२$ पा स्फ$_३$ ( शै अ$_४$ )$_३$.
(२ ) लेपिडोल्ट...पालि[ स्फ ( अ उ फ )$_२$ ].स्फ ( शै अ$_३$ )$_३$
(३)वायओटिट्...( उ पा )$_२$ (म लो)$_२$ (स्फ लो )$_२$(शै अ$_४$)$_३$
( ४ ) फ्लोगोपिट्...[ उ, पा, ( मफ ) ]$_३$ म$_३$ स्फ ( शै अ$_४$ )

हवा व पाणी यांच्या योगानें शैलितांमध्यें कांहीं फरक होऊन हे बनलेले असतात. गाळाचे बनलेले जे खडक असतात त्यांत याचा चुरा सांपडतो. व ज्या दगडांवर विस्तवाची ठिणगी पाडतां येते अशा खडकांत हे बहुधा आढळतात.

हिंदुस्थानांत बहुधां मस्कोविट अभ्रक सांपडतो. कानडा व सिंहलद्वीप यांत फ्लोगोपिट अभ्रक सांपडतो. शिवाय अमेरिका, युनायटेडस्टेटस् ब्रेझिल येथेंहि अभ्रक आढळतो. हिंदुस्थानांत मुख्य खाणी १७. पैकीं बंगालमध्यें (हजारी बाग) १, मद्रासमध्यें ( नेलोर ) २ व बिहार ओरिसा प्रांतांमध्यें १४ आहेत. बंगालांतील अभ्रक तांबडा व मद्रासमधील हिरवा असतो. नेलोर येथें १० फूट × १५ फूट येवढे मोठाले अभ्रकाचे तुकडे सांपडले आहेत.

हिंदुस्थानांतील खाणींतून पुष्कळ अभ्रक काढण्यांत येतो. परंतु काढण्याची रीत जुनीच असल्यामुळें अभ्रकाची फार खराबी होते. त्याचे एकावर एक थर असतात. यामुळें प्रथम सरळ खालीं व खूप खोल खणून नंतर आडवें खणल्यास नासाडी कमी होईल. खाणींतून काढल्यानंतर त्याचे कात्रीनें कापून चांगले तुकडे बाजूला काढतात व नंतर आकार व रंगरूप पाहून त्याचे निरनिराळे गठ्ठे बांधून पाठवितात. कापून टाकलेला चुरा कुटून, त्याची पूड करून विकतात. अभ्राकाची किंमत साधारणपणें ६ रु. शेर असते. परंतु मोठ्या तुकड्यांची किंमत ४० रु. पौंडापर्यंतहि येते.

हिंदुस्थानांत प्रतिवर्षी अभ्रक किती निघतो व त्याची किंमत काय असते, या विषयीं जी माहिती प्रसिद्ध होते ती विश्वसनीय नसते. कारण, ही माहिती निर्गत मालावरून दिलेली असते. निर्गत मालाशिवाय जो माल येथें राहतो त्याचे आंकडे प्रसिद्ध होत नाहींत.

१८९७-९८ पासून १९०२-०३ पर्यंत दरवर्षी सरासरी ११९७३ हंड्रेडवेट माल हिंदुस्थानाबाहेर जात असे व त्याची किंमत सुमारें ७७६१३ पौंड येत असे. याच वर्षांत बंगालामधून १२२८२ हंड्रेडवेट, ( किंमत ५२२७२ पौंड ); व मद्रासमधून ६८७२ हंड्रेडवेट, ( किंमत २५२४१ पौंड ), माल बाहेर गेला. या मालापैकीं बराच माल युनायटेडकिंगडममध्यें व थोडा-बहुत युनायटेडस्टेट्समध्यें गेला. १९०१ मार्चपासून १९०७ मार्चपर्यंत बाहेर गेलेला माल येणें प्रमाणें:—

| सन | वजन ( हंड्रेडवेट ) | किंमत ( रुपये ) |
|---|---|---|
| १९०१-०२ | १६२९८ | १०५०५११ |
| १९०२-०३ | २०४१२ | १३१३९०९ |
| १९०३-०४ | २१५४८ | १२९४४५३ |
| १९०४-०५ | १९५७५ | १४६८९८६ |
| १९०५-०६ | ३१५५४ | २३९४४१३ |
| १९०६-०७ | ५१४२६ | ३८२४९८८ |

सन १९१७ त सुमारें $\frac{३}{४}$ कोट रुपये किंमतीचा अभ्रक हिंदुस्थानांतून बाहेर गेला त्याचें वजन सुमारें २००० टन होतें.

उपयोग.—हा पारदर्शक, उष्णतारोधक व विद्युद्रोधक आहे. म्हणून कंदील, चुले ( स्टोव्हज् ) यांत कांचांऐवजी उपयोग करितात.भट्ट्यांतून पाहण्याकरितां जीं भोकें ठेवितात त्यांवर अभ्रक बसवितात. प्राचीनकाळीं खिडक्यांची तावदानें याचींच करीत असत व याचा उपयोग देवघरें सुशोभित करण्याकरीतां करीत. भिंतीला चिकटविण्याचे कागद व नाटकी सामान रंगविण्याकरितां अभ्रकाच्या भुकटीचा उपयोग करितात. रंग, रंगीत कागद, ओंगण वगैरेकरितांहि अभ्रकाच्या भुकटीचा उपयोग करितात. कंदिलाच्या बाजूस लावण्याकरितां, छाया चित्रकलेचे चित्रपट( फिल्मस ) ठेवण्याकरितां, चित्रांवर कांचेप्रमाणे लावण्याकरिता, पदार्थविज्ञानशास्त्रांतील यंत्रावर बारीक आरसे लावण्याकरितां व वाफेच्या नळ्यांवर बांधण्याकरिता अभ्रकाचा उपयोग करितात.

हल्लीं याचा उपयोग विजेच्या कारखान्यांत फार होतो. विद्युदुत्पादक यंत्राचें (डायनामो)संरक्षक (आर्मेचर) याचेंच करतात. इतर ठिकाणीं याच्या भुकटीच्या लाखेंत भिजवून केलेल्या कागदांचा उपयोग करितात. याच देशी औषधांत व खतांत उपयोग होतो.अभ्रकभस्म हें अत्यंत मेहनतीनें तयार करून मोठ्या असाध्य अशा क्षयासारख्या रोगांवर देतात.

[ संदर्भग्रंथ.—ए. ग्रि. (मायका); थॅकरेज डिरेक्टरी ऑफ इंडिया १९१९. जिऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया १९०२, ३४ फायनॅन्शियल अँड कमर्शिअल स्टॅटिस्टिक्स ऑफ दि गव्हर्न्मेंट ऑफ इंडिया. सेनगुप्त—आयुर्वेदिक सिस्टिम ऑफ मेडिसिन. वॅट—दि कमर्शिअल प्रॉडक्ट्स ऑफ इंडिया. ]

**अमझेर**—[जिल्हा] मध्य हिंदुस्थान—ग्वालेर संस्थानातील एक जिल्हा. उ. अ. २२° ५' ते २२° ५९' व पू. रे. ७४° ४०' ते ७५° ४६' यांच्या दरम्यान. क्षेत्रफळ १३०१ चौरस मैल. हा जिल्हा भिल्लांच्या प्रदेशांत वसलेला असून या भागांत जंगल फार आहे. लागवडीयोग्य जमीन फार कमी आहे. लोकसंख्या सुमारें एक लाख. या जिल्ह्यात एकंदर ४६४ खेडीं आहेत. यांत अमझेर व बाकानेर हे दोन परगणे आहेत. जमीन महसूल. १५१००० रुपये.

(गांव).—हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण असून समुद्रसपाटी-पासून १८९० फूट उंचीवर आहे. उ. अ. २२° ३४' व पू. रे. ७५° ८'. धारच्या पश्चिमेस हें गांव १२ मैलावर असून लोकवस्ती सुमारें तीनहजार आहे. सोळाव्या शतकांत जोधपूरचा राजा मालदेव राठोड याचा पुत्र राजा रामसिंग यानें हा गांव वसविला असें म्हणतात. याचें पुढें लहानसे संस्थान होऊन अठराव्या शतकांत तें ग्वाल्हेरचें मांडलिक झालें. इ. स. १८५७ सालीं राजा बखतावरसिंग यानें बंड केल्यामुळें त्याचा इंदूर येथें शिरच्छेद करण्यांत आला व संस्थान शिंद्यांच्या हवालीं केलें. हें मध्यहिंदुस्थानांत ग्वाल्हेर संस्थानांतील एक जिल्ह्याचें गांव आहे.

**अमडापूर**—तालुका चिखली, जिल्हा बुलढाणा. खामगांव रस्त्यावर चिखलीच्या पश्चिमेस १४ मैलावर हें एक भरमराटीचें खेडेंगांव असून याची लोकसंख्या सुमारें तीन चार हजार आहे. येथें उर्दू आणि मराठी शाळा असून आठवड्याचा बाजार दर बुधवारीं भरतो. गांवाच्या दक्षिणेस जवळच एका टेंकडीवर एक अर्वाचीन पण सुंदर भवानीचें देवालय आहे. मूर्ति फार विशाल होती ती हल्लीं फुटून पडली आहे. त्या देवळांत एक संस्कृत लेख असून तो बार्शी-टाकळीच्या लेखाप्रमाणेंच महत्त्वाचा आहे. तो शके ११३३ [इ. स. १२११] मधील असून "श्रीमत्प्रतापचक्रवर्ति सिंघणदेव" म्हणजे देवगिरीच्या प्रख्यात सिंघण यादवाच्या वेळेचा आहे. पदुमनशेटी नांवाच्या सावकारानें हें देऊळ बांधलें असा उल्लेख आहे. हल्लींचें देऊळ पेशव्यांचा अमडापूर येथील कमावीसदार खंडोबल्लाळ यानें बांधलें असून त्या देवीस "बल्लाळी देवी" असेंहि म्हणतात. लेखांत अमडापूरचें नांव "अन्वरापूर" असें दिलें आहे. [ या. म. काळे—वऱ्हाडचा इतिहास. ]

देवळाजवळच दोन भव्य व उंच मूर्तींचे तुकडे आहेत. त्यांवरून त्या मूर्ती निदान ५० फूट उंच असाव्या असें वाटतें. येथें सांपडणाऱ्या अवशेषांवरून, हेमाडपंती तऱ्हेचें येथें पूर्वी एक देवालय असावें असें वाटतें; व येथें त्या प्रकारची दंतकथाहि प्रचलित आहे.

येथें लोकलबोर्ड शाळा, पी. डब्ल्यू. डी. बंगला, तपासणी अधिकाऱ्याकरतां एक बंगला, सबरजिस्ट्रारची कचेरी, पोलिस कचेरी, वगैरे आहेत (बुलढाणा डिस्ट्रिक्ट गॅ. १९१०).

**अमदुल**—सचिन संस्थानांतील दक्षिणेकडे असलेलें संपत्तिमान् आणि सर्वांत मोठें गांव. क्षेत्रफळ १५६८ एकर. लोकसंख्या सुमारें पांचशें.

**अमनेर**—मेळघाट तालुक्यांतील अमनेर परगण्याचें हें एकेवेळीं मुख्य ठिकाण होतें. हल्लीं हें खेडेंगांव जवळ जवळ ओसाडच आहे. परंतु येथें एक जिल्पि अमनेर या नांवाचा छोटासा किल्ला आहे. अगदीं अलीकडे झालेल्या लढायांमुळें याला थोडेसें महत्त्व आहे. गर्गा आणि तापी यांच्या संगमावर हें एक लहानसें उंचवट्याचें ठिकाण आहे. ही एक लहानशी वीटमातीची चौकोनी इमारत आहे. भिंतीला चार बुरूज असून आंत साधारण एक एकर जागा आहे. पश्चिमेकडील कोंपऱ्यांत एक मशीद आहे. आंत जाण्यास तापीनदीच्या डाव्यातीरावर वायव्येकडून एकच रस्ता आहे. मुख्य दरवाजा आणि तटाचा कांहीं भाग याचा इ. स. १८५८ सालीं नाश करण्यांत आला. आंत असलेल्या चारपांच तोफा याच वेळीं काढून नेण्यांत आल्या. १८५७ सालच्या बंडानंतर तात्याटोपे याच मार्गानें परत फिरला होता. आणि ज्यावेळीं तंट्याभिल्ल आजूबाजूच्या प्रदेशास फार त्रास देत होता तेव्हां राजे कुमारसिंग यांस कांहीं पोलिस देऊन बंदोबस्त करण्याकरतां येथेंच ठेवलें होतें.

(२) तालुका मोर्शी. घरें ३०९. लोकसंख्या १५५२. नागपूर जिल्ह्यांतील जलालखेड गांवाच्या समोरच वर्धा नदीवर हें खेडेंगांव आहे. हल्लीं यांस मुळींच महत्त्व नाहीं. परंतु पूर्वी हें बऱ्याच महत्त्वाचें होतें. येथें पडकीं देवळें, मशिदी वगैरे बरींच दिसतात, त्यांवरून पूर्वीच्या वैभवाची थोडीशी कल्पना येते. या ठिकाणीं कलावतु, जर, रेशिम वगैरेंचा मोठा व्यापार चालत असे. आणि जत्रेंत हत्ती, घोडे, मोतीं, वगैरेंची देवघेव होत असे. या ठिकाणीं भोंसले आणि निजाम यांची लढाई झाली होती. इ. स. १८२६ सालीं मोहरम आणि गणेशचतुर्थी एकाच दिवशीं आली होती. त्यावेळीं येथील हिंदुमुसुलमानांत बराच तंटा झाला होता. हल्लीं बहुतेक मुसुलमानांचीच वस्ती आहे.

येथें नदीतीरावर एक जुनें महादेवाचें देवालय आहे. हें एक फारच जागृत देवस्थान आहे असें म्हणतात. या देवळाजवळच एक तळें आहे. त्याची खोली किती आहे हें सांगतां येत नाहीं असें म्हणतात. नदीचें पाणी अगदीं निर्मळ झालें म्हणजे त्यांत देऊळ दिसतें असें म्हणतात. या देवळासंबंधीं एक आख्यायिका आहे ती अशीः— कोणीहि ब्राह्मणानें तेथें रात्रीं जाऊन स्वयंपाकाच्या सांभ्यांविषयीं प्रार्थना केली म्हणजे त्यास तीं तेथें

सकाळीं मिळत. परंतु काम झाल्यावर तीं भांडीं नदीस समर्पण करायचीं असें होतें. एकदां एका लोभी ब्राह्मणानें बऱ्याच भांड्यांविषयीं मागणी केली. त्यास तीं मिळालीं. परंतु त्यानें तीं परत न करतां सर्व विकून टाकलीं. त्या वेळेपासून पुन्हां कधींहि अशीं भांडीं कोणास मिळालीं नाहींत. येथें लालखान पठाणाची मकबरा दोनशें वर्षांची जुनी असून तीवर एक लेख आहे.

**अमरकंटक**—मध्यहिंदुस्थान. रेवा संस्थानांतील मैकल डोंगरावरील एक खेडें.२२°४१' उत्तर अक्षांश व ८१°४१' पूर्व रेखांश. लोकसंख्या सुमारें दोन तीनशें आहे. येथूनच नर्मदा नदीचा उगम असल्यामुळें हें खेडें फार पवित्र मानण्यांत येतें. यात्रेकरू येथें आले म्हणजे जवळपास असलेल्या अकरा स्थानांचें दर्शन घेतात. त्यांत नर्मदेचा उगम, कपिलधारा, धबधबा व शोणनदीचा उगम हीं प्रमुख आहेत. नर्मदाबाईचें देऊळ फार प्राचीन असावें असें वाटतें. परंतु वारंवार चुना लावीत असल्यामुळें त्याची पूर्ण परीक्षा करणें आतां अशक्य झालें आहे. याची समुद्रसपाटीपासून उंची ३५०० फूट आहे. येथील हवापाणी चांगलें आहे. हा गांव कलिंग देशांत असल्याबद्दल मत्स्यपुराणांत वर्णन आहे (अ. ११३). त्यावरून या प्रदेशावर कलिंगांची सत्ता एकाकाळीं होती असें वाटतें.

**अमरकोश**—हा अमरसिंहाचा कोशग्रंथ सध्यां उपलब्ध असणारा अतिशय प्राचीन असा कोश आहे. याचा कर्ता बुद्धानुयायी असूनहि ब्राह्मण व जैन लोकांनां तो अत्यंत आदरणीय झाला आहे हें त्यांनीं या ग्रंथावर केलेल्या टीकांवरून दिसून येतें. सुभूतिचंद्रासारखे बौद्ध, आशाधर पंडित आणि नाचिराज यांच्यासारखे जैन व क्षीरस्वामी, मल्लीनाथ आणि अप्पयादीक्षित यांसारखे ब्राह्मण, अमरकोश-टीकाकार आहेत. यावरून प्रत्येक वर्गाच्या संस्कृत अभ्यासकांनां या कोशाचें किती महत्त्व वाटत असे हें दिसून येईल. चिनी व तिबेटी भाषांतर नुकतेंच संशोधिलें गेलें आहे. सहाव्या शतकांत उज्जनीच्या गुणाराटानें अमरकोशाचें चिनींत रूपांतर केलें असें म्हणतात. अमरकोशाच्या अनेक टीकांपैकीं अति प्रसिद्ध टीका म्हणजे एक महेश्वराची व दुसरी भानुजी दीक्षितांची व्याख्यासुधा नांवाची टीका. पण हल्लीं उपलब्ध असणारी सर्वांत जुनी व महत्त्वाची टीका क्षीरस्वामींची अमरकोशोद्‌घाटन ही होय. उपाध्याय, गौड व भोज हे क्षीरस्वामींच्या आधींचे टीकाकार होत; व नंतरच्या टीकाकारांपैकीं रामाश्रम, रायमुकुट, भरतमाल, नीलकंठ, भानुजी दीक्षित, रुद्रभट, नारायण चक्रवर्ति, मथुरेश पंडित, महादेवभट्ट वेदांती यांचीं नांवें सांगतां येतील. अमरकोशाचा कांहीं भाग रोम येथें १७९८ मध्यें तामिळी लिपींत प्रसिद्ध झाला. १८०८ मध्यें श्रीरामपूर येथें संपूर्ण अमरकोश छापला गेला, त्याला कोलब्रुक साहेबांनीं इंग्रजी टीपा जोडल्या होत्या. पुढें १८३९ त याचें फ्रेंचमध्यें भाषांतर होऊन तें पॅरिस येथें प्रसिद्ध झालें.

अमरकोश तीन कांडांत लिहिला असून त्यांत जवळ जवळ १०,००० शब्द आहेत. पहिल्या कांडांत स्वर्वर्ग, व्योमदिग्वर्ग, कालवर्ग, धीवर्ग, शब्दादिवर्ग, नाट्यवर्ग, पातालभोगिवर्ग, नरकवर्ग व वारिवर्ग; दुसऱ्यांत भूमिवर्ग, पुरवर्ग, शैलवर्ग, वनौषधिवर्ग, सिंहादिवर्ग, नृवर्ग, ब्रह्मवर्ग, क्षत्रियवर्ग, वैश्यवर्ग, शूद्रवर्ग; व तिसऱ्यांत विशेष्यनिघ्नवर्ग, संकीर्णवर्ग नानार्थवर्ग, अव्ययवर्ग, लिंगसंग्रहवर्ग इतके वर्ग आहेत. अमरकोशाला त्रिकांड व नामलिंगानुशासन अशींहि नांवें आहेत.

**अमरगड निजामत**—(पंजाब) पतियाळा संस्थानांतील तील निजामत किंवा जिल्हा. उ. अ. ३०°१७' ते ३०°५९' व पू. रे. ७५°३९' ते ७६°४२'. क्षेत्रफळ ८५८ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें तीन लक्ष सत्तर हजार. यांत तीन गांवें (बसी, पैल, सरहिंद) व ६०५ खेडीं आहेत. सन १९०३-०४ सालीं जमीनीचें एकंदर उत्पन्न नऊ पूर्णांक एक दशांश लाख रु. झालें.

यांत तीन तहशिली आहेत. त्यांचीं नांवें—फत्तेगड, साहिबगड अथवा पैल आणि अमरगड.

**तहशील**.—३०°१७' ते ३०°३७' उत्तर अ. व ७५°३९' ते ७६°१२' पूर्व रे. याचें क्षेत्रफळ ३३७ चौरस मैल. लोकसंख्या सव्वा लक्ष; खेडीं. १६१, उत्पन्न (१९०३-४) ३-४ लाख रुपये.

**अमरगोल**—(मुंबई) धारवाड जिल्हा. धारवाड-हुबळी रस्त्यावरील हुबळीच्या वायव्येस ५ मैलांवरील खेडें. लोकसंख्या सुमारें दोन हजार. गांवांत शंकरलिंगाचें देऊळ साधारण मोडकळीस आलेल्या स्थितींत आहे. हें देऊळ बांधण्याविषयींच्या दोन आख्यायिका आहेत. जखनाचार्यानें हें देऊळ बांधलें असून हा पूर्वी क्षत्रिय राजा होता व ब्रह्महत्येमुळें झालेल्या पापक्षालनार्थ यानें देवळें बांधलीं अशी एक आख्याइका आहे; त्याचप्रमाणें विश्वकर्म्याचा कोणी पांचाल जातीचा एक शिष्य होता, त्यानें आपलें कसब दाखविण्याकरतां जीं देवळें बांधलीं त्यांतील हें एक आहे अशी दुसरी आख्यायिका आहे. जवळच बनशंकरी देवीचें देऊळ आहे. शंकरलिंगदेवळाच्या समोर एक शिलालेख आहे. शिला फुटल्यामुळें व लेख पुसट झाल्यामुळें तो वाचतां येत नाहीं. हें रेल्वेचें स्टेशन आहे.

**अमरचंद्र**—जिनेंद्रचरित्राचा कर्ता. जिनेंद्रचरित्राला 'पद्मानंदकाव्य' असेंहि म्हणतात. हा जिनदत्तसूरीचा शिष्य होता. अमरचंद्राचा मित्र अरिसिंह यानें काव्यकल्पलता नांवाचा ग्रंथ अर्धाच लिहिला होता. तो अमरचंद्रानें पूर्ण करून त्या साग्र ग्रंथावर टीका लिहिली. त्या पुस्तकाचें नांव कविशिक्षावृत्ति असें ठेविलें. शिवाय त्यानें छंदोरत्नावली, कलाकलाप, व बालभारत हीं पुस्तकें लिहिलीं.

"अरिसिंह व अमरचंद्र सहाध्यायी होते. राजशेखरानें दिलेल्या हकीगतीवरून समजतें कीं ते वीसलदेवाच्या काळीं असावेत. परंतु वीसलदेवाला पट्टनचें तख्त मिळण्यापूर्वी म्हणजे १३व्या शतकाच्या सुमारें मध्यकालीं ते प्रबंध चतुर्विंशतींत रहात होते." [ भांडारकर ].

**अमरचिंत अथवा अत्माकुर**—हैदराबाद संस्थान. रायचूर जिल्ह्यांतील एक मांडलिक संस्थान. यांत खेडीं ६९ व क्षेत्रफळ १९० चौरस मैल. लोकवस्ती सुमारें पस्तीस हजार. एकंदर उत्पन्न १.४ लाख रुपये. निजामास खंडणी ६३६३ रुपये.

हें जुनें संस्थान आहे तरी कागदोपत्रीं याचा पूर्व इतिहास उपलब्ध नाहीं. राजाचें राहण्याचें ठिकाण अत्माकुर किल्ला असून तो अद्यापि सुस्थितींत आहे. हें संस्थान व गडवाल संस्थान यांत कृष्णानदी वाहात आहे. येथें उत्तम मलमल, धोतरें, पागोटीं तयार होतात.

**अमरदास** ( १५०९-१५७४ )—तिसरा शीख गुरु. याचा जन्म १५०९ त व राज्याधिकार १५५२त. दुसरा शीख गुरु अंगद उर्फ अंगदशहा यानेंहि गुरु नानकाप्रमाणें आपल्या मुलांचा गादीवर हक्क न ठेवतां आपला विश्वासू शिष्य अमरदास याला आपल्यामागून गुरु नेमिलें. क्षमा आणि सहनशीलता धारण करण्याविषयीं अमरदासाचा सर्वांनां उपदेश असे. त्यानें जातिभेद मोडण्याचा गुरु नानकाचा प्रयत्न पुढें चालविला. तो आपले सर्व शीख अनुयायी व आपल्याकडे येणारे पाहुणे यांनां एकाच पंक्तींत वसवून जेवण्यास भाग पाडी. "कोणालाहि आपल्या जातीचा अभिमान असूं नये, कारण आत्माभिमान हा अनेक पापांच्या मुळाशीं असतो, ब्रह्म जाणणारा तो ब्राह्मण. प्रत्येक जण चातुर्वर्ण्याविषयीं बडबड करीत असतो पण सर्वजण ब्रह्मबीजापासूनच उत्पन्न झालेले आहेत, अखिल विश्व एकाच मातीचें घडलेलें असून त्याच्या कुंभारानें पात्रांस निरनिराळे आकार दिले आहेत एवढेंच." अशी अमरदासाची शिकवण असे. त्याच्या वेळीं शिखांमध्यें अशी एक प्रसिद्ध म्हण होती कीं, "कोणी तुम्हांला वाईट रीतीनें वागविलें तर तें सहन करा; तुम्हीं तीनदां अशा रीतीनें सहन केल्यास ईश्वर तुमचा पाठिराखा होईल आणि तुमच्या शत्रूंचा पाडाव करील." अमरदासानें सतीची चालहि बंद पाडण्याचा प्रयत्न केला. तो असें म्हणे कीं, प्रेताबरोबर आपणाला जाळून घेणाऱ्या सतीच नव्हत. जी पतीचा वियोग झाल्याबरोबर त्याच्या दुःखानें मरण पावते तीच खरी सती. शिवाय ज्या आपल्या पतीचें स्मरण ठेवून समाधानवृत्तीनें राहतात व दानधर्मांत काळ घालवितात त्याहि सतीच होत. अमरदासानें कजरावळ नांवाचा किल्ला बांधला. त्याच्या मनांत स्वतंत्र राज्य स्थापन करावयाचें होतें. परंतु राज्यप्राप्तीच्या नादास लागल्यानें धर्म बुडतो असें वाटून त्याच्या पुष्कळ अनुयायांनीं त्यास सोडिलें आणि त गुरु नानकाचा नातू धर्मचंद याला भजूं लागले. या नवीन शीख शाखेला उदासी व निर्मल अशीं नांवें आहेत. हा इ. स. १५७४ त मृत्यु पावला.

**अमरप्रभसूरि**—मानतुंगसूरीच्या 'भक्तामरस्तोत्रावर' अमरप्रभसूरीनें "वाचनाचार्य देवसुंदर" याच्या विनंतीवरून एक टीका लिहिली. कुमुदचंद्राच्या कल्याणमंदिरस्तोत्रावरील टीकेचा कर्ता जो गुणसागर त्यानें पूर्वपीठिका अशी दिली आहे कीं प्रथम देवसूरि, नंतर अमरप्रभ, नंतर सागरेंदु ( सागरचंद्र ) नंतर गुणसागर. ह्या क्रमानें पट्टधर अधिकारी झाले अशी सूरिपरंपरा होती. हा अमरप्रभ बहुधा तोच असावा संवत् १३९६ सालीं अमरप्रभाचा गुरु देवसुंदर जन्मला. व त्यानें महेश्वरग्रामीं संवत् १४०४ सालीं दीक्षा घेतली आणि नंतर संवत् १४२० त अनहिलपट्टण येथें तो सूरि झाला. ( क्लॅट-इं. अँटिक्वेरी ११. पान २५५. वेबर-२, पान ९३८ टीप २ ).

**अमरपूर, पोट विभाग.**—अपर वर्मा. मंडालें जिल्ह्याचा नैर्ऋत्येकडील विभाग. यांत अमरपुरा व पथेंगी ह्या दोन तहशिली (टाऊनशिप्स) आहेत.

तहशील.–२१° ४७'ते२२° १'उत्तर अक्षांश. ९६° ०'ते ९६° १५' पूर्व रेखांश यांच्या दरम्यान. लोकसंख्या सुमारें ४० । ५० हजार.

यांत एक गांव व२२७खेडीं आहेत. कांहीं खेड्यांत मुसुलमानांची वस्ती असून दक्षिणेकडे प्रत्येक झोंपडींत लोक रेशमी वस्त्रें विणीत असलेले आढळतात. यांत आंबराया विपुल आहेत. दक्षिणेस व पश्चिमेस जमीन सखल असल्यामुळें पावसाळ्यांत पूर येतो. इ. स. १९०३-४ सालीं लागवडीखालील क्षेत्र ४३ चौ. मैल असून एकंदर उत्पन्न १४०००० रुपये होतें.

गांव.—२१°५४' उत्तर अक्षांश व ९६° ३' पूर्वरेखांशावर व इरावती नदी व तुंगथमन तलाव यांमधील असलेल्या जमीनीवर हा गांव वसला आहे. तलावाच्या उत्तरेस प्राचीन काळचें शहर होतें. परंतु त्यापैकीं फार थोडा भाग शिल्लक राहिला आहे. हल्लींचें शहर इ. स.१७८३ सालीं बोडवप यानें वसविलें. येथेंच त्या राजानें ब्रिटिश वकिलाची प्रथम गांठ घेतली. इ. स. १८२२ सालीं बग्यिदा यानें आवा ही राजधानी केली. परंतु इ. स. १८३७ सालीं त्याचा भाऊ थरावदी यानें पुन्हा हेंच राजधानीचें शहर केलें. परंतु इ. स. १८५७ सालीं मिंडन राजानें मंडालें शहर वसविलें व राजधानी तिकडे नेली.येथें चिंचेचे वृक्ष व आंबराया विपुल आहेत. आसपास बौद्धांचीं देवळें विपुल आहेत. लोकसंख्या सुमारें दहाहजार आहे. मुख्य धंदा रेशमी व सुती कापड तयार करणें. जुनी शहराची भिंत हल्लीं पडित असून तीवर जंगल वाढलेलें आहे. अवशेषांवरून ती चौरस व प्रत्येक बाजू पाऊण मैल लांबीची अशी असावी असें दिसतें; प्रत्येक कोंपऱ्यावर १०० फूट उंचीचें एक एक विटांचें देऊळ होतें.

विशेष स्मरणीय इमारत म्हणजे २५० खांबांचें मोठें बुद्धाचें देवालय होय. त्यांत पंचरसी धातूची प्रचंड बुद्धमूर्ति आहे. ब्रह्मी राजांचा प्राचीन राजवाडा अद्याप शहराच्या मध्यभागीं दिसतो. अमरपुरच्या भरभराटीच्या कालीं त्याच्या संरक्षणाकरितां एक मोठा चौकोनी तटबंदी किल्ला असून त्याच्या भोंवतीं रुंद खंदक होता. हल्लीं रंगून-मंडालें रेल्वेवरचें हें स्टेशन असून जंक्शनहि आहे.

**अमरसिंह.**(१)—विक्रमादित्याच्या सभेंतील नऊ रत्नांपैकीं अमरसिंह हा एक होता. ह्युएनत्संगाच्या उल्लेखावरून या अमरसिंहाचा आश्रयदाता विक्रमादित्य, हा चंद्रगुप्त विक्रमादित्य असला पाहिजे असें दिसून येतें. सिंह या उपपदावरून हा क्षत्रिय असावा असें वाटतें,पण अमरकोशांतील पहिल्या श्लोकांत त्याचा जैनसंप्रदाय व्यक्त होतो; कारण, तें मंगलाचरण जैनसंप्रदायाला अनुसरून आहे. याचा अमरकोश सर्वश्रुत व सर्वमान्य आहे. त्याचीं भाषांतरें भारतीयेतर भाषांतून देखील झालेलीं आहेत. एकाक्षरनाममाला हा याचाच ग्रंथ आहे. यानें अनेक ग्रंथ लिहिले होते असें म्हणतात, पण ५ व्या शतकांत ब्राह्मणी संस्कृतीच्या अमदानींत ते नष्ट झाले. अमरसिंहाच्या कालासंबंधीं एकमत नाहीं. त्याला कोणी पहिल्या शतकांत, कोणी चवथ्यांत, तर कोणी पांचव्यांत घालतात. रियासतकारांनीं कोणत्याशा ग्रंथाच्या आधारें तो गुजराथच्या भीमदेव भोळ्याच्या ( इ. स. ११७९--१२१५ ) दरबारीं होता असें म्हटलें आहे. तथापि तो इ. स. ३७५ च्या सुमारास होऊन गेला असें पुढील पुराव्यांवरून दिसतें.

“द्वौ द्वौ माघादिमासौ स्यादृतुस्तैरयनं त्रिभिः।” या अमरकोशाच्या कालवर्गांतील ओळीवरून त्या काळीं माघ महिन्यांत उत्तरायणाला सुरुवात होत असावी. हा काळ१५ किंवा १६ शतकांपूर्वीचा आहे. अमरसिंह पाणिनीनंतरचा असावा हें त्यानें उचललेल्या पाणिनीच्या व्याकरणपद्धतीवरून व्यक्त होतें. तसेंच तो चंद्रगोमी( ५ वें शतक )च्या पूर्वी होऊन गेला असावा.

“क्षेत्रज्ञ आत्मा पुरुषः प्रधानं प्रकृतिः स्त्रियाम्।” ( कालवर्ग ) या शब्दयोजनेवरून कपिलाच्या सांख्य तत्त्वज्ञानाकडे अमरसिंहाचा बराच कल असावा असें वाटतें. ईश्वरकृष्णानें सांख्य तत्त्वांत जी सुधारणा केली ती अमरसिंहाला अवगत नसावी; कारण “ अन्तराभवसत्त्वेऽश्वे गन्धर्वो दिव्यगायने।” ( नानार्थवर्ग ) यांतील अन्तराभव देहाची कल्पना ईश्वरकृष्णानें ( यालाच विन्ध्यवासी असें दुसरें नांव आहे ) अमान्य केली आहे. तेव्हां अमरसिंह ईश्वरकृष्णापूर्वीचा म्हणजे ४ थ्या शतकांतला असावा असें उघड होतें ( अमरकोश पहा ).

( २ ). काशीचा राहणारा; याचें टोपण नांव “ खुषगो ” असें होतें. कोएल जिल्ह्यांत याला सरकारी नोकरी होती. यानें अकबराचा राजवाडा व आग्र्याचा ताजमहाल यांचा संक्षिप्त इतिहास लिहिला असून शिवाय, बहार दानिशचें पद्यांत रूपांतर केलें. या पद्याला “ तर्जुमा बहार दानिश ” म्हणतात. हा प्रबंध पळनारच्या मुल्लाज्ञादानें लिहिलेल्या उर्दू इझारदानिशहून निराळा आहे.

( ३ ) राठोड घराण्यांतील गजसिंह नांवाच्या जोधपूरच्या राजाचा वडील पुत्र. हा बादशाही फौजेंत नोकर होता. तो उद्दामपणें वागे. एकदां रजा घेतल्याशिवाय हा पंधरा दिवस कोठें बाहेर राहिला म्हणून बादशहानें याला दंड केला; व तो वसूल करण्यास सलाबतखान मीरबक्षी याला सांगितलें अमरसिंह बक्षीला आपल्या पुढें येऊं देईना, तेव्हां त्याला दरबारांत बोलावलें. तेथें त्यानें शहाजहान बादशहाच्या देखत सलाबतखान मीरबक्षी याला ठार मारिलें( इ. स. १६४४ ). म्हणून बादशहाच्या हुकुमानें त्याचा पाठलाग करण्यांत येऊन आग्रा किल्ल्याच्या एका दरवाजाशीं झालेल्या चकमकींत तो पडला. मरतांना तो मोठ्या शौर्यानें लढला. आग्रा किल्ल्याच्या त्या दरवाजाला अद्याप ‘ अमरसिंह दरवाजा ’ असें म्हणतात. अमरसिंहाच्या तेरा बायका त्याच्या शवाबरोबर सती गेल्या [ टॉड—राजस्थान. सरदेसाई—मु. रि. बीलचा कोश ].

( ४ ) पहिला ( इ. स. १५९७–१६२१ ).—हा प्रतापसिंहाचा ज्येष्ठ पुत्र असून विक्रम संवत् १६५३ (इ. स. १५९७ ) मध्यें मेवाडच्या गादीवर बसला. हा आपल्या वयाच्या आठव्या वर्षापासून वडिलांच्या मृत्यूपर्यंत नेहमीं वडिलांबरोबर राहिल्यामुळें त्याला संकटांचा चांगला सराव झाला होता. अमरसिंह राज्यारूढ झाल्यानंतर अकबर आठ वर्षें हयात होता; परंतु यापुढें तो आपल्या हयातींत मेवाडच्या कधीं वाटेस गेला नाहीं. इकडे अमरसिंहानें हा काळ राज्यकारभारांतील निरनिराळ्या बाबींची फेरतपासणी करून त्यांची पुनर्घटना करण्यांत घालविला. त्यानें नवीन जमाबंदी केली. व सरंजामांची पुन्हां वाटणी करून जहागीरदारांचीं कर्तव्यें ठरविलीं. त्यानें जे त्यावेळीं निरनिराळ्या सरदारांचे दर्जे ठरविले ते तसेच त्याच्यापुढें चालत राहिले. त्यानें खर्चवेंचादि कित्येक बाबतींत नियम ठरवून पगडी कशी बांधावयाची हें देखील ठरवून टाकलें. त्याची अमरशाही पगडी अद्याप प्रसिद्ध आहे. यांपैकीं पुष्कळ नियम देशाच्या निरनिराळ्या भागांत शिलास्तंभांवर कोरून ठेविलेले अजून दृष्टीस पडतात.

अमरसिंहास शांतता लाभल्यामुळें प्रतापसिंहानें मरते वेळीं केलेलें भाकीत मात्र खरें ठरण्याची वेळ आली (प्रतापसिंह पहा ). त्यानें आपल्या बापाच्या मरतेवेळींच्या शब्दाकडे दुर्लक्ष करून तळ्याकांठीं अमरमहाल नांवाचा एक लहानसा बांडा बांधला. जहांगिरचीं पहिलीं चार वर्षे अंतःकलहांचा बंदोबस्त करण्यांत गेलीं. परंतु तें काम संपतांच त्यानें मेवाडच्या राण्यास मोंगल बादशहाचें अंकित करण्याचें आपल्या बापाच्या हातून पार न पडलेलें काम आपण

स्वतः तडीस नेण्याचा निश्चय केला. मोंगलांचें सैन्य मेवाड-वर चालून आलें तेव्हां ऐषआरामास लालचावलेल्या अमरसिंहास जहांगिराशीं तह करावा किंवा युद्ध करावें असा संमोह उत्पन्न झाला. बादशाही फर्मान स्वीकारून सुखानें काळ कंठावा असा सल्ला देणाऱ्यांनीहि अमरसिंहाच्या प्रभावळींत वाण नव्हती. परंतु राण्याच्या चोंडावत कारभाऱ्यानें प्रतापसिंहाच्या मरतेवेळच्या शब्दाची राण्यास आठवण देऊन त्याला हात देऊन गादीवरून उठविलें व 'वीरहो, चला, रिकिबींत पाय ठेवा, व प्रतापसिंहाच्या मुलाच्या नांवास कलंक लागूं देऊं नका' अशी हाताखालच्या सरदारांस इशारत देऊन तावडतोब शत्रूस तोंड देण्याची तयारी केली. राण्यास प्रथम आपल्या कारभाऱ्याच्या वर्तनाचा राग आला; परंतु लवकरच तो मानावर आला. त्यानें आपल्या कारभाऱ्याचे आभार मानिले व मिशास पीळ देऊन तो मोठ्या वीरश्रीनें आपल्या सरदारांसह शत्रूस तोंड देण्यास निघाला. अमरसिंह व मोंगल सैन्य यांची देवैर येथें गांठ पडली. मोंगल सैन्याचें आधिपत्य खानखानाच्या भावाकडे होतें. घांटाच्या तोंडाशीं मोंगल व रजपूत यांची बराच वेळपावेतों निकराची लढाई होऊन तींत रजपुतांनीं मोंगलांचा पराभव केला (वि. सं. १६६४ इ. स. १६०८). या लढाईनंतर दोन्ही पक्षांत तह झाला, पण तो फार दिवस टिकला नाहीं. सं. १६६६ (इ. स. १६१०) च्या वसंत ऋतूंत मोंगल व रजपूत यांच्या सैन्यांत दुसरी निकराची लढाई झाली. ही लढाई रानपूरच्या घांटांत झाली. तींत मोंगल सैन्याचें आधिपत्य अबदुल्ला नामक इसमाकडे होतें. या लढाईतहि मोंगलांचाच पराजय होऊन अबदुल्लाच्या सैन्यांतील बहुतेक लोक मारले गेले. तथापि अमरसिंहाच्या बाजूचेहि अनेक उत्तम उत्तम वीर ह्या प्रसंगीं कामास आले.

या विजयामुळें रजपूत लोकांस आनंदीआनंद झाला. मेवाडचें किरमिजी निशाण पुन्हां एकवार गोदवाड प्रांतांत फडकूं लागलें. रजपुतांस एकामागून एक विजय मिळालेले पाहून त्यांच्यामध्यें फूट पाडण्याकरितां जहांगिरानें एक निराळीच युक्ति शोधून काढिली. अमरसिंहाचा चुलता सागर हा कित्येक वर्षांपूर्वी प्रतापसिंहास सोडून मोंगलास मिळाला होता. त्याला आतां जहांगिरानें मेवाडचा राजा बनवून फौज देऊन चितोडास रवाना केलें. सागर यानें सात[?] वर्षेपर्यंत चितोडांत अंमल केला; पण त्यास कोणीहि सरदार अनुकूल झाला नाहीं. सरतेशेवटीं त्याचेंच मन त्यास खाऊं लागल्यामुळें तो चितोड अमरसिंहाच्या स्वाधीन करून तेथून निघून गेला. चितोडाबरोबर मेवाडांतील दुसरे ८० किल्ले राण्याच्या हातीं आले.

रानपूरच्या पराभवानंतर जहांगिरानें आपला पुत्र पर्वीझ याच्या हाताखालीं सैन्य देऊन त्यास मेवाडच्या मोहिमीवर पाठविलें. पण अमरसिंहाच्या लोकांनीं या सैन्याचा खामनोरच्या घांटांत पराजय करून त्यास अजमीरकडे पिटाळून लाविलें (इ. स. १६११). जहांगिरास हें वर्तमान समजतांच त्यानें पर्वीझ यास परत बोलावून त्याच्या जागीं मोहबतखानास बरोबर देऊन पर्वीझच्या मुलाची योजना केली. परंतु त्याचीहि पर्वीझप्रमाणेंच अवस्था होऊन तो मारला गेला. प्रतापसिंहाच्या मृत्यूनंतर अमरसिंहानें मोंगलाशीं सतरा लढाया केल्या. त्या प्रत्येक लढाईंत रजपुतांचीं कांहींनां कांहीं प्राणहानि होऊन त्यांची संख्या कमी कमी होत होती. उलटपक्षीं शत्रु मात्र दर वेळेस अधिकाधिक सैन्य घेऊन मेवाडांत येऊं लागला सरतेशेवटीं हिजरी सन १०२२ (इ. स. १६१३) मध्यें जहांगिरानें आपला पुत्र खुर्रम उर्फ शहाजहान यास मोठ्या फौजेसह मेवाडांत पाठविलें. राणा व त्याचा पुत्र कर्ण यांनीं आपल्या डोंगरांतील लोकांची जमवाजमव करण्याचा प्रयत्न केला. परंतु फारच थोडे लोक त्यांच्या निशाणाखालीं जमा झाले. यामुळें खुर्रम यास मेवाडांतील अनेक स्थळें एकामागून एक विशेष प्रयासावांचून काबीज करतां आलीं. त्यानें राण्याचे अठरा हत्ती काबीज करून ते आपल्या बापाकडे नजर म्हणून रवाना केले. वारा, ऊन, पाऊस वगैरे कशासहि न जुमानतां मोंगल सर्व प्रदेश उध्वस्त करीत चालले. अशा स्थितींत शत्रूचा प्रतिकार करणें अशक्य होऊन राण्यानें जहांगिरास युद्ध बंद करण्याविषयीं विनंति केली (इ. स. १६१४). राणा शरण आल्यावर शहाजादा खुर्रम यानें त्याच्याशीं फार उदारपणाचें वर्तन ठेवलें. अकबराच्या वेळेपासून जितका मुलूख जिंकून घेतलेला होता तितका सारा त्याला परत देऊन [कर्नल म्यालेसन; गोडबोले] त्याचा पुत्र कर्ण यास पांच हजारांची मनसब देऊन आपल्या पदरच्या जहागिरदारांत मोठ्या पदवीस चढविलें. सामंत या नात्यानें मेवाडच्या राज्याच्या हजार लोकांच्या तुकडीनें बादशाही सैन्यांत चाकरी करावी अशी या तहांत अट होती. पण स्वतः अमरसिंह राण्यास बादशहाच्या दरबारीं हजर राहण्याचा कधींच आग्रह करण्यांत आला नाहीं. मेवाडच्या राण्याबद्दलची आदरबुद्धि व्यक्त करण्याकरितां बादशहानें पुढें राण्याचा व त्याच्या मुलाचा एक असे दोन संगमरवरी दगडाचे पूर्ण आकारचे पुतळे अजमीरहून तयार करवून आणून ते आग्र्यास बागेमध्यें झरोक्याखालीं ठेविले. अमरसिंहानें जहांगिराशीं तह केला खरा, परंतु आपल्या कारकीर्दींत उदेपूरच्या राजघराण्याची सर्वस्वी मानहानि झालेली पाहून त्याचें चित्त उद्विग्न झालें. सं. १६७२ (इ. स. १६१६–डौसन हा या गोष्टीचा काल सं. १६६९ = इ. स. १६१३ देतो.) मध्यें तो आपलें सर्वस्व पुत्राच्या स्वाधीन करून उदेपूर शहराबाहेर नोचौकी वाड्यांत जो एकदांचा शिरला तो आमरण उंबरठ्याबाहेर आला नाहीं. येथें तो इ. स. १६२१ त मरण पावला. जहांगिरास त्याच्या निधनाची खबर १७ रबी उल्अवल = हिजरी सन १०२९ रोजीं कळली.

[संदर्भ ग्रंथ.—टॉडचें राजस्थान. कर्नल म्यालेसन कृत एतद्देशीय संस्थानिकांचा इतिहास].

(५) दुसरा, (इसवी सन १७००–१७१६)— मेवाडचा राणा. हा जयसिंह याचा पुत्र असून त्याला वि. सं. १७५६ (इ. स. १७००) मध्यें मेवाडची गादी मिळाली. पहिल्या अमरसिंहाप्रमाणें हा देखील शूर व तडफी स्वभावाचा होता; परंतु तो गादीवर येण्यापूर्वी त्याचें त्याच्या वडिलांशीं जें भांडण झालें त्यामुळें मेवाडचें नैतिक सामर्थ्य तितकें कमी होऊन त्याला मोंगल सत्तेच्या -हासांचा पाहिजे तितका फायदा घेतां आला नाहीं. अवरंगजेबाच्या मुलांमध्यें आपसांत तंटे असलेले याच्या नजरेस आले तेव्हां त्यांचा फायदा घेण्यासाठीं अमरसिंहानें सिंधुनदीच्या पश्चिमेकडील प्रांतांत मोहिमीवर असलेल्या राजपुत्र मुअज्जमाशीं एक गुप्त तह केला. या तहांत (१) शहाजहानाच्या कारकीर्दींतल्याप्रमाणें चितोडच्या गादीची व्यवस्था चालावी, (२) गोवध बंद केला जावा, (३) शहाजहानानंतर जो प्रांत खालसा करण्यांत आला तो पुन्हां परत मिळावा, (४) अकबराच्या कारकीर्दीप्रमाणें उपासनास्वातंत्र्य असावें, (५) राण्यानें बडतर्फ केलेल्या इसमास राजानें आश्रय देऊं नये आणि (६) दक्षिणच्या मोहिमीसाठीं मेवाडांतून सैन्याची मागणी होऊं नये अशी सहा कलमें होतीं. सिंधच्या पश्चिमकडील मोहिमींत शहाजाद्याच्या मदतीस मेवाडचें पथक गेलें असून त्यानें अनेक लढायांत मोठमोठे पराक्रम गाजविले होते. तथापि अमरसिंहास लवकरच मोंगलाविरुद्ध शस्त्र उपसण्याचा प्रसंग आला. चंबळा नदीवरील रामपुऱ्या–मानपुऱ्याची जहागीर उपभोगणाऱ्या उदेपूरच्या राजघराण्याच्या चंद्रावत नामक शाखेंतील रावगोपाळ म्हणून इसम आपलें पथक घेऊन दक्षिणच्या मोहिमेंत अवरंगजेबास मदत करीत असतां त्याचा मुलगा घरीं राहून जहागिरीची व्यवस्था पहात होता. त्यानें जहागिरीचा वसूल बापाकडे न पाठवितां आपणच बळकविण्याचा उपक्रम केला. रावगोपाळानें याबद्दल अवरंगजेबाकडे तक्रार केली; परंतु त्याच्या मुलानें मुसुलमानीधर्म स्वीकारून अवरंगजेबाची मर्जी संपादल्यामुळें अवरंगजेबानें ह्या तक्रारीकडे लक्ष दिलें नाहीं. अवरंगजेबाच्या या अन्यायाच्या वर्तणुकीनें रावगोपाळास राग येऊन त्यानें आपल्या मुलापासून आपली जहागीर सोडवून घेण्याचा प्रयत्न केला; पण त्यांत त्यास यश आलें नाहीं; तेव्हां रावगोपाळानें अमरसिंहाचा आश्रय घेतला. अवरंगजेबास राण्याचें हें कृत्य बंडखोरपणाचें वाटून त्यानें शहाजादा अझिम यास राण्याच्या हालचालीवर नजर ठेवण्यासाठीं माळव्यांत पाठविलें. तेव्हां राण्यानेंहि आपल्याकडून लढण्याची सर्व तयारी केली व या कामीं त्यास माळव्याच्या लोकांची मदत मिळाली. इतक्यांत मराठ्यांचा सरदार निमाजी शिंदे हा नर्मदा ओलांडून माळव्यांत शिरल्यामुळें (इ. स. १७०६-०७) अवरंगजेबास शहाजादा अझिम याच्या मदतीस राजा जयसिंगाचीहि आणखी रवानगी करावी लागली.

परंतु ज्याच्या अविचारी वर्तनामुळें हें प्रकरण उपस्थित झालें तो अवरंगजेबच इ. स. १७०७ च्या आरंभास मरण पावल्याकारणानें तें पुढें विकोपास गेलें नाहीं. अवरंगजेबाच्या मरणानंतर शहाजादा मुअज्जम यानें काबूल मधून हिंदुस्थानांत येऊन जाजवच्या लढाईंत शहाजादा अझिम याचा पराभव केला. तेव्हां पश्चिम राजवाड्यांतील इतर संस्थानिकांप्रमाणें मेवाडचेंहि पथक त्याच्या कुमकेस होतें. मुअज्जम उर्फ शहाअलम (बहादुरशहा) यास सिंहासन मिळवून देण्याच्या कामीं रजपुतांनीं मदत केली तरी तो बादशहा झाल्यावर मात्र त्यास रजपुतांचें सहाय्य राहिलें नाहीं. स्वतः बहादुरशहा हा स्वभावानें पुष्कळ चांगला होता; परंतु अवरंगजेबाच्या वर्तनामुळें मुसुलमानांवरील रजपुतांचा विश्वास इतका उडून गेला होता कीं, इ. स. १७०९–१० मध्यें मारवाड व अंबर येथील राजे मोंगलांच्या छावणींतून बादशहाची परवानगी न घेतांच बाहेर पडले व मेवाडच्या राण्याकडे जाऊन त्यांनीं आपल्या तिघांचा एक संघ स्थापन केला. आपल्या घराण्यातील मुलींच्या संततीस वारस नेमण्याची अट घालून मेवाडच्या राण्यांनीं इतर रजपुतांशीं लग्नव्यवहार सुरू केला, तो याच प्रसंगीं होय (प्रतापसिंह पहा). परंतु ज्येष्ठ पुत्राकडून याप्रमाणें वारसाचा हक्क काढून घेण्यात रजपुतांची फार मोठी चूक झाली. कारण यामुळें भावाभावात तंटे उपस्थित होऊन रजपुतांच्या खासगी कारभारात हात घालण्याची मराठ्यांनां संधि मिळाली.

जयपूर, जोधपूर व उदेपूर येथील सैन्यांनीं एकत्र जमून शत्रूशीं टक्कर देण्याचा प्रसंग प्रथमतः बहादुरशहाच्या कारकीर्दीच्या तिसऱ्या वर्षी आला. त्याचें कारण बहादुरशहानें वेडेपणानें रामपुऱ्याच्या बाटग्या जहागिरदारास मदत केली हें होय. राण्यानें हिंमतसिंगाचा पक्ष घेऊन रामपुऱ्यावर स्वारी केली, परंतु रतनसिंग उर्फ राजा मुस्लिमखान यानें त्याचें कांहीं चालू दिलें नाहीं. ह्या पराक्रमाबद्दल बादशहानें मुस्लिमखानाची चांगली संभावना केली. परंतु त्याच जासुदाकडून बादशहास अशी एक बातमी कळली कीं, अमरसिंहानें आपलीं गांवें उध्वस्त करून आपण स्वतः डोंगरांचा आश्रय करण्याचें ठरविलें आहे. ही बातमी येऊन थोडे दिवस गेले न गेले तोंच राण्याचा सरदार सावळदास यानें पुरमंडळाचा सुभेदार फिरोजखान यावर हल्ला केला असून फिरोजखानाच्या सैन्याची बरीच प्राणहानि होऊन त्याला अजमीरपावेतों मागें हटत यावें लागलें अशी दुसरी बातमी बादशहाच्या कानीं आली. या प्रसंगीं सुप्रसिद्ध जयमल्लाचा वंशज सावळदास हा मरण पावला. अमरसिंहानें सावळदासाचा पुत्र रायसिंग यास 'तुमची स्वतःचीं गांवें व त्याच्या आसमंतांतील मुलूख तुम्ही बंदिराख करून

टाका, तुमच्या कुटुंबाच्या वास्तव्यासाठीं दुसरीं गांवें देण्यांत येतील ' असा हुकून केलेला टॉडला उदेपूर दप्तरांत सांपडला होता. याच सुमारास शहाजादा अकबरास दक्षिणेंत सुखरूप पोंचवून येणारा शूर दुर्गादास, त्याचा धनी त्याचें संरक्षण करण्यास असमर्थ असल्यामुळें अमरसिंहाच्या आसऱ्यास आला व अमरसिंहानेंहि मोठ्या उदारपणानें रोजचे पांचशें रुपये देऊन त्यास आपल्या पदरीं ठेऊन घेतलें. तथापि इ. स. १७१२ त शहा अलम बादशहास विषप्रयोग केला जाऊन त्याच्या जागीं फर्रुखसेयर तख्तनशीन होईपर्यंत त्या रजपूतसंघाच्या हातून कोणतीहि व्यक्त कामगिरी झालेली दिसत नाहीं. त्यानंतर मात्र त्यांनीं पूर्वीचा सहनशीलपणा पार झुगारून देऊन जशास तसें म्हणुण मुसुलमानांनीं आपल्या राज्यांतील देवळें पाडून त्यांच्या जागेवर ज्या मशिदी बांधल्या होत्या त्या जमीनदोस्त करण्याचा उपक्रम केला. राजस्थानात असा एकहि मोठा गांव नव्हता कीं, जेथें मुसुलमानाचे मुल्ला व काजी हे अधिकारी नव्हते. ह्या अधिकाऱ्यास आता जिकडे तिकडे अपमानकारक रीतीनें वागविण्यात येऊं लागलें. शूर राठोडांनीं तर जसवंतसिंगाच्या मृत्यूनंतर एकसारखी खटपट करून संबंध मारवाडात आता औषधास देखील मोंगल राहूं दिला नव्हता. याच प्रसंगीं जयपूर, जोधपूर व उदेपूर येथील राण्याच्या फौजा सांभरच्या तलावावर एकत्र मवून त्यांनीं तो तलाव ही आपली तिघांची सरहद्द ठरविली व त्या तलावाचें उत्पन्न आपसांत सारखें वांटून घेतलें.

परंतु या तीन राज्यांमधील दोस्ती फार दिवस टिकली नाहीं. रजपुताचें हें बंडखोरपणाचें वर्तन पाहून सय्यद बंधूंपैकीं अमीर-उल-उमरा हुसेन अली हा मारवाडच्या राजा अजितसिंह याजवर चालून आला. फर्रुखसेयर यास सय्यद बंधूंचें नियंत्रण असह्य झालें असल्यामुळें त्यानें अजितसिंगास एक गुप्त निरोप पाठवून हुसेन अलीचें पारिपत्य करण्याविषयीं इच्छा प्रदर्शित केली. पण यामुळें अजितसिंग व सय्यदबंधू याच्यामध्यें दोस्ती होण्यास मदतच होऊन सय्यद बंधूंनीं राठोडाना दिल्लीच्या राज्यकारभारांत बराचसा वांटा द्यावा व उलटपक्षीं अजितसिंगानें बादशहाच प्रभुत्व मान्य करून त्यास आपली मुलगी द्यावी असें त्या दोघांत ठरलें. त्याप्रमाणें इ. स. १७१५ च्या सप्टेंबर महिन्यांत फर्रुखसेयराचें अजितसिंगाच्या मुलीशीं लग्न झालें. या लग्नानें रजपूत व मोंगल यांच्यामध्यें दिलसफाइ होईल अशी जर कोणाची अटकळ असली तर ती साफ चुकीची होती. कारण लग्न होऊन थोडे दिवस झाले नाहींत, तोंच बादशहाचा दिवाण एनायत उल्लाखान यानें हिंदूवर पुन्हां जिझिया कर बसविला. हा कर पूर्वीपेक्षां बराच सौम्य होता हें खरें. (त्याचीं रक्कम सालीना प्रासविर पुरी पाऊण टक्का ( २००० रुपयांवर १३ रुपये ) देखील नसून लंगडे, आंधळे व अतिशय गरीब लोकांनां तो माफ होता.) परंतु हिंदू लोकांनां ह्या कराबद्दल इतका तिटकारा उत्पन्न झाला होता कीं, त्याच्या पुनरुज्जीवनामुळें त्यांचीं मनें मुसुलमानांविरुद्ध पूर्णपणें विटून गेलीं.

मोंगलांशीं सख्य करून अजितसिंगानें संघांतून आपलें अंग काढून घेतलें तरी राणा अमरसिंह हताश झाला नाहीं. उलट स्वतःचें राज्य व त्याबरोबर सर्व रजपूत राष्ट्र स्वतंत्र करण्याचे प्रयत्न त्यानें दुप्पट जोरानें सुरू केले. बादशहाशीं त्यानें जो तह केला त्यावरून स्वातंत्र्याप्रीत्यर्थ त्याची कशी धडपड चालली होती हें दिसून येतें. या तहाचें दुसरेंच कलम जिझिया कर उठवावा म्हणून होतें. या सर्व तहाचें बारकाईनें पृथक्करण केलें तर गेल्या कांहीं वर्षांत दोन्ही पक्षांच्या स्थितींत किती बदल झाला होता हें चांगलें ध्यानात येऊं शकतें. तहाचा मथळाच मुळीं विनंत्यांचीं यादी असा असून त्यावरून रजपुताच्या अधिपतीवरील बादशहाचें प्रभुत्व व्यक्त होतें. परंतु नुसतें नांव सोडून दिलें तर आठव्या कलमाची भाषा राणा हा बादशहाचा जणूं काय रक्षणकर्तोच आहे अशी दिसून येते. आरंभींच्या कलमात राण्यानें ७००० ची मनसब स्वीकारल्याचें वाचून दुसऱ्याचें प्रभुत्व स्वीकारण्याचा प्रसंग आला असता राज्यत्याग पतकरणाऱ्या थोरल्या अमरसिंहाची आठवण होते. परंतु मध्यंतरींच्या काळांत रजपूत संस्थानिकाच्या आपआपसातील संबंधांत व त्याबरोबरच लोकमतात जो फरक झाला होता तो ध्यानात घेतला पाहिजे. ह्या अवधींत भौतिक सत्तेच्या बाबतींत दुसरीं कित्येक संस्थानें मेवाडच्या बरोबरीस आलीं असून सर्वच संस्थानिक मोंगल बादशहाकडून मानसन्मान मिळविण्यांत भूषण मानूं लागले होते. इतर कलमांतील महत्त्वाच्या गोष्टी म्हटल्या म्हणजे जिझिया कर काढून टाकण्यात आला, धार्मिक स्वातंत्र्य मिळालें, मेवाडच्या राज्यांतील जुने ठाकूर व जहागिरदार पुन्हां राण्याच्या सत्तेखालीं आले व मध्यंतरी हातातून गेलेला सर्व मुलूख राण्याचा राण्यास परत मिळाला.

वरील तह हें राण्याच्या आयुष्यांतील शेवटचेंच कृत्य होतें. तो इ. स. १७१६ त मरण पावला. तो मोठा तडफदार व उदार अंतःकरणाचा राणा होता अशी त्याची ख्याति आहे. त्यानें त्या वेळच्या धामधुमीच्या काळातहि आपल्या राज्याचा मोठेपणा कायम राखून तें भरभराटीस आणिलें. त्यानें स्तंभावर जे लेख कोरवून ठेविले आहेत त्यांवरून त्यानें शेतकीस कसें प्रोत्साहन दिलें व उद्योगधंद्यांचें कसें संरक्षण केलें हें चांगलें व्यक्त होतें. मेवाडच्या लोकांत त्याच्या नांवाबद्दल अद्यापहि आदर वसत आहे. त्याच्या नंतर संग्रामसिंह मेवाडचा राणा झाला.

[ संदर्भग्रंथ.—टॉडचें राजस्थान. ]

**अमरापूर.** (१)–रेवाकाठांतील पांडु मेहवाच्या वारीया-वर्गात हें संस्थान येतें. गोमा आणि मही नदी यांच्या संगमामुळें जो कोन तयार होतो त्यांत हें वसलें आहे. क्षेत्रफळ २ चौरस मैल.

(२) काठेवाडमधील एक लहान संस्थान. लोकसंख्या सुमारें दीड हजार. येथील मुसुलमान तालुकदारांनां शेट आणि मलिक म्हणतात. हे पूर्वी राठोड रजपूत होते; परंतु धर्मांतर करून ते मुसुलमान झाले. जवळच अमरापूर नावांची ७७५ फूट उंचीची एक टेंकडी आहे.

**अमराबाद.**—हैदराबाद संस्थानांतील महबूबनगर जिल्ह्यांतील एक तालुका. याचें क्षेत्रफळ ७२७ चौरस मैल व लोकसंख्या (यांतील जहागिरी धरून) १९११ सालीं २०,८८० होती. या तालुक्यांत ४६ गांवें आहेत, त्यांपैकीं ९ जहागिरी गांवें आहेत. अमराबाद गांव (लो. सं. २,२६७) हें तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. जमीनवसुली [१९०१ सालची] २५००० रुपये होती. एका पठारावर हा तालुका वसला असल्यामुळें त्यांत मोठें जंगल आहे व सभोंवतालचा प्रदेश फार डोंगराळ आहे. १९०५ सालीं या तालुक्याची मर्यादा वाढविण्यांत आली; हल्लीं यांत ६७ खालसा गांवें येतात (इं. गॅ. १९०८). या मुलुखासंबंधानें पेशवे व निजाम यांमध्यें वांधा होता. सन १७९५ जुलै मध्यें गोविंद कृष्ण मु॥ भागानगर यानें रावसाहेब पेशवे यांस पत्र लिहिलें कीं, असद अल्लीखान यांजकडे अमराबाद व इतर चौदा लक्षांचे (मुलूख) सांगून जमीयतस्वार अडीच हजार व पायदळ दोन हजार घेऊन मोहरम होतांच हजर व्हावें, असा करार केला. (रा. खं. ५-५५-५७).

**अमरावती.**—इंद्राची स्वर्गांतील नगरी. महाभारतांत (वनपर्व अध्याय ४३) अर्जुन इंद्राच्या अमरावतीला ज्या वेळीं गेला त्या वेळचें वर्णन दिलें आहे. त्या ठिकाणीं सिद्ध व चारण यांची वस्ती होती व प्रत्येक ऋतूंत पुष्पें येणारे अनेक वृक्ष होते. तेथील नंदनवनांत अप्सरा विहार करीत होत्या व देवविमानें इच्छेनुरूप संचरत होतीं. "ज्यांनीं तपश्चर्या केलेली नाहीं अथवा अग्न्याधान केलेलें नाहीं त्यांस व संग्रामांत पराङ्मुख होणारे, यज्ञ अथवा व्रतें न करणारे, वेदश्रवणशून्य असलेले, तीर्थामध्यें स्नान करणारे, यज्ञ आणि दान यांचा अधिकार नसलेले आणि यज्ञाला विघात करणारे क्षुद्र लोक यांस या नगरीचें दर्शन कधींहि होत नाहीं" असें म्हटलें आहे. (महाभारत ३.४३).

[२] मद्रास इलाखा, गंतूर जिल्हा, सत्तनपल्ली तालुक्यांतील १६° ३४' उत्तर अक्षांश व ८०° २२' पूर्व रेखांश यांवर वसलेलें. सुमारें दोन हजार लोकवस्तीचें खेडें.

या खेड्याच्या थोडें उत्तरेस धारणीकोट नांवाची पूर्वी एक नगरी होती. ती बौद्ध आंध्र राजांची राजधानी होती. येथें बौद्धांचा एक प्रेक्षणीय स्तूप आहे त्यामुळें हें खेडें सर्वत्र प्रसिद्ध आहे. हा स्तूप पूर्वी येथील स्थायिक राजाचे नोकर इमारतीसामान शोधीत असतां त्यांस सांपडला. त्या वेळीं ही एक मातीची टेंकडी होती. त्या नोकरांनीं या टेंकडीच्या मधोमध खणलें तेव्हां त्यांनां संगजिऱ्याच्या पेटींत एक मोती व कांहीं अवशेष मिळाले. पुढें विशेष शोध करतां आंतील संगमरवरी काम सांपडलें; परंतु त्या खेडवळ लोकांनीं त्याचा वाटेल तसा उपयोग केला. कांहीं दगड देवळाच्या कामास लावले व कांहीं तलावाच्या कामास लावले. इ. स. १७९७ व १८०७ सालीं कॅ. मॅकेन्झी यानें दोन वेळां याची पहाणी केली. १८०७ सालीं त्यानें लिहिलेलें पुस्तक व त्या स्तूपाचे नकाशे हे इंडिया ऑफिसमध्यें ठेवून दिले आहेत. पुढें सन १८४० सालीं सर वाल्टर इलियटनें आणखी कांहीं भाग खणून कांहीं संगमरवरी दगडांचे नमुने मद्रासेस पाठविले. व पुढें कांहीं इंग्लंडमध्येंहि पाठविण्यांत आले. इ. स. १८८० सालीं सरकारनें सर्व भाग उघडा करण्याचा हुकूम केला. या स्तूपाची जरी पुष्कळ नासधूस झाली आहे, तरी हा सर्वांत उत्तम स्तूप आहे, अशी पुष्कळांची समजूत आहे. ब्रह्मी लिपींत पुष्कळ शिलालेख येथें आहेत. कांहींचें डॉ. बर्जेस यांनीं भाषांतर केलें आहे. मद्रास म्युझियममध्यें येथील बरेच नक्षीदार काम ठेवलें आहे.

स्तू प व र्ण न.—मुख्य स्तूप संगमरवरी विटांनीं आच्छादिलेला असून त्याभोंवतीं दोन प्राकार (कठडे) आहेत. बाहेरचा जास्त प्राचीन असून त्याची उंची जमिनीपासून १३।१४ फूट आहे; आंतील प्राकार मागाहूनचा असावा असें दिसतें; तो ६ फूट उंचीचा आहे. स्तूपावरील विटा व दोनहि प्राकारांचे सर्व दगड (जोतें व मुंडेरी धरून) उठावदार नक्षीनें भरलेले होते. स्तूपाचा व्यास १३८ फूट, आंतल्या कठड्याचा परिघ ५२१ फूट व बाहेरील कठड्याचा परिघ ८०३ फूट होता. बाहेरच्या कठड्यावरील तांत्रिक आकृती बारा चौदा हजार असल्या पाहिजेत असा अंदाज आहे. आंतल्यावरील तर याहूनहि जास्त व अधिक सुंदर असाव्यात. बाहेरच्या कठड्याला उभे दगड असून ते तीन तीन आडव्या दगडांनीं जोडले आहेत. उभ्या दगडाखालीं जोतें असून वर २$\frac{3}{4}$ फूट उंचीची मुंडेरी आहे. उभ्या दगडांवर बाहेरच्या अंगाला मध्यभागीं एक सबंध वर्तुळ (आकृति) व त्याच्या दोन्ही कडांनां (खालीं व वर) एक एक अर्धवर्तुळ आहे; मध्यंतरीं कांहीं नक्षीकाम आहे. आडव्या दगडांवर अशाच तऱ्हेचीं पण निरनिराळ्या प्रकारचीं वर्तुळें असून मुंडेरीवर नागमोडीनें चाललेली एक मोठी माळ माणसांनीं उचलून धरलेली आहे. रिकाम्या जागेवर दुसरीं कांहीं चित्रें आहेत. व जोत्यावर गमतीदार प्राण्यांचीं व मुलांचीं चित्रें आहेत. आंतल्या बाजूंनांहि नक्षी आहे.

हे अमरावतीचे कठडे या प्रकारच्या शिल्प विभागांतील अत्युत्कृष्ट नमुने असून सध्यांच्या त्यांच्या अवनतावस्थेंत सुद्धां ते धर्म व कला यांच्या इतिहासांतील अमूल्य साधनें

होत यांत संशय नाहीं. बाहेरचा कठडा दुसऱ्या शतकाच्या अखेरीस बसविला असावा, हें पुलुमायी (इ. स. १३०–१७०) आणि यज्ञश्री ( इ. स. १८४–२१३ ) या आंध्र राजांच्या कारकीर्दींतील अर्पणलेखांवरून उघड होतें. महान् बौद्ध-धर्मप्रवर्तक नागार्जुन यानें धनश्रीद्वीप किंवा धान्यकटक येथील महाचैत्याभोंवतीं एक भिंत बांधली असें जें तारानाथ लिहितो त्यावरून या स्तूपाचा काल ठाडतां येतो. आंतील कठडा इ. स. ३०० च्या नंतरचा असावा. मुख्य स्तूपाच्या कांहीं प्राचीन शिल्पावशेषांवरून तो इ. स. पू. २०० या कालांतला असावासें दिसतें.

हिंदुस्थानांतील उठावदार नक्षीकाम अलेक्झांड्रिआ आणि आशियामायनर या दोन मुख्य उगमापासून अवतीर्ण झालेलें आहे असें व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो. कलेतिहासकाराला अमरावतीच्या शिल्पाचें एक विशेष महत्त्व हें आहे कीं या दोन उगमांनां जोडणारी ती एक सांखळी म्हणतां येईल. येथील पाषाणशिल्पांचा काल सांची आणि गंधार यांच्या मधील आहे असें धार्मिक व कलाविषयक दृष्टीनें म्हणतां येतें. पूर्वी बुद्धमूर्ति कोरीत नसून फक्त कांहीं चिन्हांनीं त्याचें अस्तित्त्व दर्शवीत पण गंधारकलेनें बुद्धाला पुराणांतील प्रसंगानुसार वाटेल तसें रंगविलेलें चित्रांतून दृष्टीस पडतें. अमरावतीच्या शिल्पांत सांची व भर्हुत यातील बुद्धचिन्हें व त्याचप्रमाणें गंधारकलेंतील बुद्धमूर्ती काढलेल्या आहेत. ग्रीक पोशाखांत एकटाच उभा राहिलेला किंवा बसलेला बुद्ध कठड्यांवर पुष्कळदा दृष्टीस पडतो. पण बुद्ध कांहीं करीत आहे असे प्रसंग अमरावतीस फारच थोडे आहेत.

सांची आणि अमरावतीचे कारागीर अनुकरणकारी किंवा ग्रीक कलाभ्यासक मुळींच नव्हते. ग्रीक जेथून ही कला शिकले तेथूनच ते शिकले पण हिंदुस्थानांतील वातावरणामध्यें ही भारतीय-आर्यकला स्वतंत्र व ग्रीकांहून निराळी बनली इतकेंच कायतें. [ संदर्भ ग्रंथ.—इ. गं. हॅवेल–हँडबुक ऑफ इंडियन आर्ट; ए. रि. ए. ]

**अमरुराजा.**—परकायाप्रवेशकाळीं शंकराचार्यांनीं ज्या मृत झालेल्या राजाच्या देहांत प्रवेश केला होता तो आनंद-गिरीकृत शंकरविजयांतील ५८ व्या प्रकरणांत याची हकीगत आहे.

**अमरु शतक.**—अमरु राजाच्या शरीरांत शंकराचार्य प्रविशिले असतां तेथें त्यांनीं कामशास्त्र विषयावर जो ग्रंथ केला, त्याचें हें नांव. या ग्रंथाला आधार वात्स्यायनाचीं सूत्रें होय. यालाच शृंगारशतक असेंहि नांव आहे. यांत शंभर पद्यखंडें आहेत. या ग्रंथाचें जर्मन व फ्रेंच भाषांतर अनुक्रमें रुकर्ट आणि अपुडी यांनीं केलेलें आहे.

**अमरेळी,** प्रां त.—(काठेवाड) बडोदें संस्थानांतील एक प्रांत. क्षेत्रफळ १२४५ चौरसमैल. या प्रांताचे एकंदर १७ भाग आहेत; व संबंध प्रांत दोन मुख्य भागांत विभागला गेला आहे.

( १ ) ओखामंडल (उखामंडल) २२° ५' ते २२°३५' उत्तर अ. व ६९° ५' ते ६९°२०' पूर्व रे. यांच्या दरम्यान आहे, उत्तरेस कच्छचें आखात; पश्चिमेस अरबी समुद्र; पूर्वेस आणि दक्षिणेस कच्छचे रण व पलीकडे नवानगर.

( २ ) यांत अमरेळी, धारी, खांभा, कोडिनार, दामनगर आणि शिआनगर हे तालुके. २०° ४५ ते २२° ४' उत्तर अ. व ७०°४२' ते ७१° ५५ 'पूर्व रे. यांचे दरम्यान आहेत. कोडिनार शिवाय बाकीचे भाग एकमेकांलगत असून त्यांच्या उत्तरेस आणि पश्चिमेस जेतपूर आणि जुनागड आणि पूर्वेस आणि पश्चिमेस गोहेलवार कोडिनार तालुका, समुद्र व गीर टेंकड्या यांमध्यें असून दुसऱ्या दोन्ही बाजूंस जुनागड संस्थान ओखामंडल हा खडाळ प्रदेश असून इतर प्रांत सपाट आहे. धारी तालुक्यांत कांहीं डोंगर आढळतात.

इ ति हा स.—गायकवाडांच्या काठेवाड मधील सत्तेची तीन सरदाराखालीं विभागणी करतां येते ती येणेंप्रमाणें.—

( १ ) मुलुखगिरी, ( २ ) ब्रिटिशसरकारच्या देखरेखी-खालील येथील गायकवाडची सत्ता व ( ३ ) खालसामहा-लाखेरीज करून इतर भागांतरील ब्रिटिश सत्ता.

काठेवाडांत मुलुखगिरीला सुरुवात पेशव्यांचे सेनापति खंडेराव दाभाडे व दमाजी गायकवाड यांनीं केली. दुसऱ्या दमाजीनें ( १७३२ ) काठेवाडच्या बहुतेक भागांवर खंडणी बसविली. १८ व्या शतकाच्या अखेर पर्यंत गायक-वाड व पेशवे यांचीं सैन्यें मिळून खंडणी वसूल करीत. परंतु १७९९ ते १८१४ पर्यंत फक्त गायकवाडचेंच सैन्य खंडणी जमवून पेशव्यांचा भाग त्यांनां देत असे. मुलुखगिरींत शिव-राम गारदी व बाबाजी अप्पाजी हे फार प्रवीण असत. गाय-कवाड सरकारकडून जेव्हां खंडणी वसूल करण्याचें काम बरोबर होईना तेव्हां ब्रिटिशांच्या मदतीनें त्यानें निर-निराळ्या स्थानिक सरदारांशीं खंडणीबद्दल कायमचे ठराव करून काठेवाडांत या कामावर विठ्ठलराव देवाजी व एक दुय्यम अधिकारी नेमला. ही व्यवस्था १८२० पर्यंत चालली. परंतु मध्यंतरी पेशव्यांचा भाग त्यांनां बरोबर न मिळाल्यामुळें त्यांनीं काठेवाडांत वसुलीकरितां स्वतंत्र सैन्य पाठविण्यास सुरुवात केली. यामुळें काठेवाडांत दुहेरी सत्ता सुरू झाली व याच सुमारास दुष्काळामुळें लोक फार हवाल-दील झाल्यामुळें सर्व बाजूंनीं लोकांवर संकटें आलीं. परंतु १८१८ त पेशवाईचा शेवट होऊन १८२० त सयाजीराव गायकवाडाशीं ब्रिटिशांनीं केलेल्या तहाच्या अटींनीं काठेवाड वरील संकटें नाहींशीं झालीं. या तहांत गायकवाडानें ब्रिटि-शांच्या हुकुमाशिवाय काठेवाडांत सैन्य पाठवूं नये असें ठरलें. अशा रीतीनें हळूहळू गायकवाडची सत्ता काठेवाडांत कमी होत जाऊन ब्रिटिशांची सत्ता वाढली. १८१७ च्या तहानें ब्रिटिशांनीं ओखामंडळच्या वाघेर लोकांचा पराभव केल्यावर त्यांचा प्रदेश गायकवाडकडे आला. या लोकांनीं

## अजंठा-अमरावती चित्रसंग्रहांत.



एक सुंदर घोडेस्वाराचें चित्र.



अमरावती येथील कोरीव काम.

स्त्रियांचा पोषाख दाखविणारें चित्र.

( श्री. पंत प्रतिनिधि यांच्या कृपेनें )

[ १६० व्या पृष्ठासमोर.



कुबेर.



अमरावती येथील स्त्री-चित्र.

( श्री. पंत प्रतिनिधि यांच्या कृपेनें )

पुढें १८६७ पर्यंत मधून मधून त्रास देणें चालू ठेविलें होतें. १८६१ त खंडेराव गायकवाडेंन महालांच्या राज्यव्यवस्थेंत बऱ्याच सुधारणा घडवून आणिल्या. फौजदारी व मुलकी अशीं दोन निरनिराळीं खातीं करून त्यांच्यावर स्वतंत्र अधिकारी नेमले. १८६३ त पहिलें पोष्ट ऑफीस सुरू करण्यांत आलें. खंडेरावाच्या कारकीर्दीच्या अखेरीस लोकांवर कांहीं पट्टया बसविण्यांत आल्या व मल्हाररावाच्या राज्यारोहणानिमित्त बसविलेला कर लोकांनां मुळींच पसंत पडला नाहीं. मल्हार-रावाला गादीवरून काढून टाकल्यावर बडोद्याच्या राज्यकार-भारांत जेव्हां सुधारणा करण्यांत आली तेव्हां महालच्या कारभारांतहि सुधारणा घडून आल्या. अमेरळी प्रांतांत शेंकडा ९६ लोक गुजराथी भाषा बोलतात.

येथील मुख्य पिकें ज्वारी, बाजरी, गहूं, उडीद, मूग, मठ, हरभरा, तीळ, कापूस, ऊंस, तांदूळ, इ. गीर जातीच्या गाई व म्हशी प्रसिद्ध आहेत.

येथें व्यापार कमीच आहे. या प्रांतांत कोडिनार, द्वारका, व बेट हीं बंदरें आहेत. जमीनमहसूल ५. ६ लाख होता पण १९०४-०५ सालीं दुष्काळामुळें फक्त५७,००० रुपये वसूल झाले.

या प्रांतांत सहा गांवीं म्युनसिपालिट्या आहेत. त्यांचीं नांवें—अमरेळी, दामनगर, धारी, कोडिनार, द्वारका आणि बेट. अमरेळी तालुक्यांत शिक्षण सक्तीचें आहे.

तालुका.–बडोदे संस्थानांत अमरेळी नांवाचा तालुका. २१° २०' ते २१° ३७' उत्तर अ. व ७१°२' ते ७१°२१' पूर्व रे. यांच्या दरम्यान. क्षेत्रफळ २२८चौरस मैल. लोकसंख्या सुमारें पंचावन हजार. या तालुक्यांत ५८ खेडीं आहेत. प्रदेश सपाट व सुपीक असून ज्वारी, बाजरी, गहू, कापूस वगैरे पिकें होतात.

गांव.—२१° ३६' उत्तर अक्षांश. ७१°१५'पूर्व रेखांश यांवर बडोदें शहाराच्या नैर्ऋत्येस १३९ मैलांवर असून भावनगर-पोरबंदर रेल्वेचें एक स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें अठरा हजार. थेवी नांवाच्या नदीकांठीं हा गांव असून सभोंवती पडका तट आहे. येथें एक 'जुना कोट' आहे. त्याचा उपयोग हल्लीं तुरुंगाकडे करतात. अमरेळी प्रांताचें हें मुख्य ठिकाण असल्यामुळें येथें सर्व कचेऱ्या आहेत. इ. स. १९०५ सालीं येथें म्युनसिपालिटी स्थापन झाली. हातमागावर कापड काढण्याचा धंदा येथें भरभराटीस आला आहे. काठेवाडांतील कापसाच्या बाजाराचें हें एक महत्त्वाचें गांव आहे. बडोद्याच्या रेसिडेंटच्या हाताखालचा एक काम-गार अमरेळी येथें असतो.

नागनाथाच्या देवळांतील अंकितलेखावरून याचें प्राचीन नांव अमरवल्ली असावें असें वाटतें. १८ व्या शतकांत आधु-निक अमरेळीच्या पश्चिमेकडे व दक्षिणेकडे फक्त वस्ती असून तिला जुनी अमरेळी म्हणतात. अलीकडील वस्ती १७९३ त झाली. नवीन वस्ती वाढविल्याचें व पुष्कळ सुधारणा केल्याचें श्रेय काठेवाडचा सरसुभा विठ्ठलराव देवाजी (१८१०-१५) याजकडे आहे. जुन्या किल्ल्यांत बाबाजी अप्पाजीच्या वेळच्या (१८०३-०७) बंदुका व गोळया आहेत.

**अमरोहा तहशील**–(संयुक्त प्रांत) मुरादाबाद जिल्ह्यांतील एक तहशील. २८° ४६' ते २९°९' उ. अक्षांश व ७८° २०' ते ७८° ४३' पूर्व रेखांश यांचे दरम्यान असून क्षेत्रफळ ३८३ चौरस मैल आहे. लोकसंख्या सुमारें दोन लक्ष वीसहजार. या तहशिलींत दोन गांवें व ५०८खेडीं आहेत. इ. स. १९०३-४ सालीं जमीन महसूल १३४००० रुपये व इतर कर ४६००० रुपये इतकें उत्पन्न होतें. दर चौरस मैलीं लोकवस्तीचें प्रमाण ५३९ आहे. तहशिलींचा पूर्वेकडील प्रदेश रेताड आहे.

गांव.—२८°५४' उत्तर अक्षांश व ७७° २८'पूर्व रेखांश यांवर हा गांव औंध रोहिलखंड रेल्वेचें स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें साडेचेचाळीस हजार. हा गांव हस्तिनापुरच्या राजानें वसविला असें कांहींचें म्हणणें असून कांहीं पृथ्वीराजाच्या बहिणीनें हा गांव वसविला असें म्हणतात. कटेर येथील बंड मोडण्याकरतां घियासुद्दीन बलबन हा इ.स.१२६६ सालीं येथें आला होता. इ.स. १३०४ सालीं मोंगलांनीं हिंदुस्थानावर स्वारी केली होती तींत त्यांचा पराजय या गांवाजवळच झाला. चवदाव्या शतकाच्या प्रारंभीं प्रसिद्ध फकीर शरफु-द्दिन किंवा शहा विलायत हा येथें येऊन राहिला होता; व हल्लीं येथें राहणारे पुष्कळ सय्यद लोक यास आपला मूळ-पुरुष समजतात. यावेळेपासून या शहराचें महत्त्व कमी होऊन सांभळ गांवानें याची जागा पटकावली. मुरादाबादपासून गाझीबादला जाणाऱ्या ईस्ट इंडिया रेल्वेच्या फांट्यावर हें गांव आहे. कापड व नक्षीदार भांडीं येथें तयार होतात. पाऊस सरासरी ३८° ८२" पडतो.

हा गांव सखल जागीं वसलेला असून सभोंवार पुष्कळ आंबराई आहे. गांवाचा भव्य दरवाजा व प्राचीन तट गांवास शोभा आणितात. हिंदूंचे प्राचीन अवशेष खेरीज करून मुसुलमानांच्या १०० पेक्षां अधिक मशिदी आहेत. यापैकीं जामा मशीद ही फार प्राचीन आहे. पूर्वी ही मशीद म्हणजे एक हिंदु देऊळ होतें परंतु त्याची तेराव्या शत-कांत मशीद बनविण्यांत आली.

इ.स.१८७०सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. इ.स. १९०३-४ सालीं उत्पन्न ३२००० व खर्च ३५००० होता. येथें स्थानिक व्यापार बराच असून कापड व मातीचीं रंगीत भांडीं तयार करण्याचे कारखाने येथें आहेत.

जून १९२१ मध्यें सोत नदीवरील पूल पुरानें पडल्या-मुळें मोठा अपघात झाला. हल्लीं नवीन पूल बांधला आहे. [इं. गॅ.५. अर्नोल्ड--ई. गाइड]

**अमर्षण**—इक्ष्वाकुकुलोत्पन्न रामचंद्रपुत्र कुश, त्याचा प्रपौत्र नभ याच्या वंशांत जन्मलेल्या संधि राजाचा पुत्र. याचा पुत्र महस्वान् नांवाचा राजा होता. याचा महाभारतांत

उल्लेख नाहीं. भागवतांत नवमस्कंधांत (अध्याय १२ वा) पुढील वंशावळी दिलेली आहे. राम—कुश—आतिथि—निषध—नभ—पुंडरीक—क्षेमधन्वा—देवानीक—अनीह—पारियात्र—बल—स्थल—वज्रनाभ—खगण—विधृति—हिरण्यनाभ—पुष्प—ध्रुवसंधि—सुदर्शन—अग्निवर्ण—शीघ्र—मरु—प्रसुश्रुत—संधि—अमर्षण.

**अमलानंद** (१).—अमलानंद (व्यासाश्रम) हा कृष्ण यादवाच्या दरबारीं उदयास आला (१२५०). वाचस्पति मिश्राच्या "भामती" नांवाच्या ग्रंथावर यानें "वेदांत कल्पतरु" या नांवाची टीका लिहिली आहे. शिवाय याचा "शास्त्रदर्पण" (ब्रह्मसूत्रभाष्य) ग्रंथ आहे. हा अनुभवानंदाचा शिष्य होता.

(२) पंचपादिकादर्पण या वेदांत ग्रंथाचा कर्ता.

**अमलापुर**, तालुका.—मद्रास इलाखा. गोदावरी जिल्ह्यांतील तालुका. १६° २५' ते १६° ५६' उत्तर अ. व ८१° ४३' ते ८२° २१' पूर्व रे. यांचे दरम्यान. क्षेत्रफळ ५०६चौरस मैल असून लोकसंख्या सुमारें दोनलक्ष ऐंशीहजार आहे. या तालुक्यांत खेडीं १६९ आहेत. जमीनीचें एकंदर उत्पन्न इ. स. १९०३–०४ सालीं ९४७०००रु. होतें.

गांव.—तालुक्याचें मुख्य ठिकाण. १६° ३४' उत्तर अक्षांश व ८२° १' पूर्व रेखांश यांवर आहे. लोकसंख्या सुमारें दहाहजार; स्थानिक कामें पंचाइतीमार्फत चालतात.

**अमलोह**—(पंजाब). नाभा संस्थानांतील एक निझामत अथवा जिल्हा. ३०° १५' ते ३०° ४२' उत्तर अक्षांश व ७५° ५७' ते ७६° २४' पूर्व रेखांश यांचे दरम्यान. क्षेत्रफळ २९१ चौ. मैल. लोकसंख्या सुमारें एकलक्ष पंधराहजार. या निझामतींत नाभा संस्थानची राजधानी व २२८ खेडीं आहेत. इ. स. १९०३-४ सालीं हिचें एकंदर उत्पन्न ३.३ लाख रुपये होतें. या भागांत जंगल बरेंच आहे. पाणी फार जवळ सांपडत असल्यामुळें हवा रोगट आहे. आणि सरहिंद कालवा सुरू झाल्यापासून हिंवताप या बाजूस फार वाढला आहे.

**अमवा खास**.—(संयुक्त प्रांत) गोरखपुर जिल्ह्यांतील पद्रौना तहशिलींतील एक खेडें. २६° ५१' उत्तर अक्षांश व ८४° १३' पूर्व रेखांश यांवर. लोकसंख्या सुमारें नऊहजार मोठ्या गंडकी नदीच्या जुन्या पात्राजवळ गोरखपूर शहराच्या पूर्वेस २८ मैलांवर हें खेडें आहे.

**ॲमहर्स्ट** (इ. स. १७७३–१८५७)—हिंदुस्थानचा गव्हर्नर-जनरल लॉर्ड ॲमहर्स्ट हा लेफ्टनंट-जनरल विल्यम ॲमहर्स्ट व इलिझाबेथ पॅटर्सन यांचा ज्येष्ठ पुत्र १७७३ मध्यें बाथ येथें जन्मला. ॲमहर्स्ट परगणा इंग्लंडच्या उत्तरेकडील रम्य प्रदेशांत असून ॲमहर्स्ट घराणें बरेंच पुरातन व प्रसिद्ध आहे. १२१५ पासून या नांवाच्या घराण्यांतील पुरुषांचा उल्लेख आलेला आढळतो. इंग्लंडांत क्रॉमवेलच्या अमदानीच्या वेळीं रेव्हरंड जेफ्रे ॲमहर्स्ट नांवाचा एक पूर्वज हॉर्समोंडेन गांवीं रेक्टरच्या हुद्यावर होता. या रेव्हरंड ॲमहर्स्टचा मुलगा, नातू व पणतू हे ओळीनें तीन पिढ्यांतील पुरुष ग्रेज इन नामक कोर्टांत बॅरिस्टर व न्यायाधीश या हुद्यांवर चढले होते. यांपैकीं तिसरा पुरुष रिव्हरहेड येथें राहत असे. त्याला जेफ्रे व विल्यम असे दोन मुलगे होते. पैकीं जेफ्रेला डॉर्सेटच्या ड्यूकच्या शिफारसीनें सैन्यांत प्रथम निशाणदाराची नोकरी मिळाली. लवकरच त्याला यूरोपखंडांतल्या युद्धांत भाग घ्यावा लागला व त्यामुळें मोठमोठ्या कॅप्टन वगैरे हुद्यांवरील सैन्यांतल्या अधिकाऱ्यांशीं त्याचा परिचय होऊन त्याला युद्धकलेचें चांगलें ज्ञान व अनुभव मिळाला. पुढें अमेरिकेनें इंग्लंडबरोबर स्वातंत्र्याकरितां युद्ध सुरू केलें. त्यांत जेफ्रेला मोठ्या हुद्द्याची जागा मिळून त्यानें लुईबर्ग टिकॉंडेरोगो, मॉंट्रील वगैरे ठिकाणीं जय मिळविले; त्यांबद्दल जनरल जेफ्रे ॲमहर्स्टला ब्रिटिश नॉर्थ अमेरिकेचा गव्हर्नर-जनरल नेमलें. तिकडून परत आल्यावर त्याला लॉर्ड बनविण्यांत आलें व तो पुढें मरेपर्यंत (१७९७) रिव्हरहेड येथें राहिला. याचाच धाकटा भाऊ विल्यम ॲमहर्स्ट जेफ्रेबरोबर कानडांत लढाईवर गेला होता. या दोघांहि बंधूंना वनस्पतिशास्त्राची आवड असल्यामुळें त्यांनीं अमेरिकेंतील बरीच नव्या जातींचीं फुलफळझाडें इंग्लंडांत आणून रिव्हरहेड येथें लावलीं होतीं. धाकट्या विल्यमचें लग्न १७६६ मध्यें इलिझाबेथ पॅटरसन बरोबर झालें. या दांपत्याचाच सदरहू लॉर्ड ॲमहर्स्ट हा ज्येष्ठ पुत्र होय. पुढें आई व बाप दोघेहि लवकरच वारल्यामुळें हा मुलगा भावंडांसह आपला चुलता जेफ्रे ॲमहर्स्ट याच्या घरीं राहूं लागला. त्याचें प्राथमिक शिक्षण वेस्टमिन्स्टर शाळेंत होऊन पुढें ऑक्सफोर्ड येथील ख्राइस्ट चर्च कालेजमध्यें शिकून त्यानें १७९७ मध्यें एम्. ए. ची पदवी मिळविली. त्या वेळच्या पद्धतीप्रमाणें त्यानें १७९३ मध्यें यूरोपखंडभर प्रवास करून फ्रेंच, इटालियन वगैरे भाषांचा अभ्यास केला. या प्रवासांतच रोम येथें प्लिमथचा अर्ल व कौंटेस याच्याशीं १७९४ मध्यें त्याची ओळख झाली. पुढें अर्ल वारल्यानंतर त्याच्या विधवा कौंटेसबरोबर १८०० मध्यें त्यानें लग्न केलें व या विवाहापासून ॲमहर्स्टला चांगलें सुख लागलें. शिवाय १७९७ मध्यें जेफ्रे पहिला लॉर्ड ॲमहर्स्ट निपुत्रिक वारल्यामुळें त्याच्या या पुतण्यालाच लॉर्ड ही पदवी मिळाली, त्याचा दरबारांत प्रवेश झाला आणि १८०२ ते १८०४ पर्यंत ३ऱ्या जॉर्ज राजाचा तो बेडचेंबरचा (शयनगृहांतील कंचुकी) लॉर्ड झाला. १८०९ मध्यें सिसिलीमध्यें परराष्ट्रवकील म्हणून तो नेमला गेला व १८१५ मध्यें त्याला प्रिव्ही कौन्सिलर नेमण्यांत आलें. या सर्व हुद्द्यांचीं कामें लॉर्ड ॲमहर्स्टनें प्रामाणिकपणानें केल्यामुळें लवकरच त्याची नेमणूक एका मोठ्या जबाबदारीच्या राजकीय कामगिरीवर झाली. ग्रेट ब्रिटन व चीन देश यांचे व्यापारविषयक संबंध नीट समाधानकारक रीतीनें जुळवून आणण्याकरितां लॉर्ड ॲमहर्स्टला चीनच्या दरबाराकडे पाठ-

विण्यांत आलें. परंतु पेइहो येथें पोहोंचल्यावर त्याला असें कळविण्यांत आलें कीं, चीनच्या बादशहाचे मांडलिक जसा मुजरा करतात तसा इंग्रज वकीलानें केला तरच त्याला बादशहाच्या दरबारांत प्रवेश मिळेल. बरोबरचा दुसरा कमिशनर सर जॉर्ज टी. स्टौन्टन याच्या सल्ल्यावरून लॉर्ड ॲमहर्स्टनें, चीनचे वकील इंग्लंडच्या बादशहास तसा मुजरा करण्याचें कबूल करीत असल्यास आपणहि त्या गोष्टीस तयार आहों अशी अट घातली. ती अट मान्य न करतां चीनच्या दरबारनें ॲमहर्स्टला भेट न घेतां परत पाठविलें. याप्रमाणें उद्दिष्ट कार्य साध्य न होतां ॲमहर्स्ट वाटेंत सेंट हेलिना येथें नेपोलियनची भेट घेऊन १८१७ ऑगस्ट १६ रोजीं इंग्लंडला परत आला.

पुढें लवकरच १८२३ मध्यें हिंदुस्थानचा गव्हर्नर-जनरल लॉर्ड हेस्टिंग्ज यानें राजीनामा दिला व त्या जागेवर मिस्टर कॅनिंग याची नेमणूकहि झाली. परंतु इतक्यांत लार्ड लंडनडेरी वारल्यामुळें परराष्ट्रमंत्र्याच्या जागीं कॅनिंग नेमला गेला. तेव्हां हिंदुस्थानच्या गव्हर्नर-जनरलच्या जागेकरितां मद्रासचा माजी गव्हर्नर विल्यम बेंटिंक व लॉर्ड ॲमहर्स्ट हीं नांवें पुढें आलीं व अखेर ॲमहर्स्टची नेमणूक कायम होऊन तो पत्नी व मुलगा जेफ्रे आणि मुलगी सारा यांच्यासह जुपिटर नांवाच्या बोटीनें १८ जुलै १८२३ रोजीं मद्रास येथें येऊन उतरला. तेव्हां कंपनीसरकारतर्फें, तसेंच कर्नाटकच्या नबाबाकडून त्याचें मोठें स्वागत करण्यांत आलें. नंतर १ आगस्ट रोजीं कलकत्त्यास जाऊन तो आपल्या गव्हर्नर-जनरलच्या जागेवर रुजू झाला. हिंदुस्थानांत असतांना लेडी ॲमहर्स्टनें खाजगी स्वरूपाच्या अनेक गोष्टी–हिंदूंच्या विवाहादि धार्मिक विधींतील मिरवणुकी, मिशनरी लोकांची हिंदूंकडून होणारी टवाळी, कलकत्त्यास काल्यानें गुदरलेला अनर्थ, पेन्शनर दुसरा बाजीराव पेशवा याची दिनचर्या, कैदेंत असलेल्या ब्रह्मी राजकन्येचें गुणवर्णन, एखाद्या हिंदु संन्याशाचीं गव्हर्नर-जनरलशीं मुलाखत या गोष्टी आपल्या रोजनिशीमध्यें लिहून ठेविलेल्या आहेत.

लॉर्ड ॲमहर्स्टनें कारभार हातीं घेतला तेव्हां मुद्रणस्वातंत्र्याचा एक बिकट प्रश्न उपस्थित झालेला होता. माजी गव्हर्नर-जनरल हेस्टिंग्ज यानें बरेंच उदारपणाचें धोरण स्वीकारलें होतें. परंतु मध्यंतरीं तात्पुरतें गव्हर्नर-जनरलचें काम करणारा मिस्टर जॉन ॲडॅम् यानें " कलकत्ता जर्नल ' नांवाच्या प्रसिद्ध पत्राच्या बकिंगहॅम नांवाच्या संपादकाला सरकारी अधिकाऱ्यांवर कडक टीका केल्याबद्दल हद्दपार केलें होतें. लॉर्ड ॲमहर्स्ट व पुढला गव्हर्नर-जनरल बेंटिंक यांनीं सरकारच्या टीकाकारांवर नियंत्रण पाहिजे, हें तत्त्वतः मान्य करूनहि प्रत्यक्ष व्यवहारांत वर्तमानपत्रकारांनां पुष्कळ सवलत दिली. सामान्यतः लॉर्ड ॲमहर्स्ट शांतताप्रिय अधिकारी होता; तथापि येथें येतांच त्याला ब्रह्मदेशाच्या राजाबरोबर युद्ध सुरू करावें लागलें. तंटा सरहद्दीबद्दल असल्यामुळें कमिशन नेमून शांततेच्या मार्गानें तडजोड करण्याचा मार्ग ॲमहर्स्टनें सुचविला; पण ब्रह्मी सरकारनें तो मान्य न केल्यामुळें युद्धाला सुरवात होऊन (१८२४–२६) त्यांत सर्वस्वीं यश मिळाल्यामुळें अखेर कंपनीसरकारला फायदेशीर असा तह लॉर्ड ॲमहर्स्टनें घडवून आणला. या युद्धाबद्दल १३ कोट रुपये खर्च झाल्यामुळें प्रथम ॲमहर्स्टला इंग्लंडांत दोष देण्यांत आला; परंतु या युद्धापासून आरंभ होऊन अखेर चहाकरितां सुप्रसिद्ध असलेला आसाम व तांदुळाकरितां प्रसिद्ध असलेला आराकान असे सुपीक प्रांत मिळाल्यामुळें आतां ॲमहर्स्टच्या धोरणाची इंग्रज लोकांकडून प्रशंसाच होत असते. दुसरी महत्त्वाची राजकीय गोष्ट म्हणजे भरतपूरच्या वेढ्यांत मिळालेला विजय. ब्रह्मी राजाबरोबर युद्ध चालू असतांना हें प्रकरण उपस्थित करण्यांत आल्यामुळें ॲमहर्स्ट प्रथम याच्या विरुद्ध होता. शिवाय हा किल्ला घेण्याचा पूर्वी एक प्रयत्न फसला असल्यामुळें हिंदी लोकांनां तो अजिंक्य वाटत होता. अशा स्थितींत कंपनीसरकारचा दरारा कायम राहावा म्हणून अखेर ॲमहर्स्टनें संमति देऊन किल्ला सर करविला. तथापि या विजयाचें श्रेय तत्कालीन इंग्रज सेनापतींनां आहे, ॲमहर्स्टला नाहीं; कारण त्याच्या अंगीं उपजत लष्करी गुण नव्हते किंवा त्याला लष्करी शिक्षणहि चांगलेंसें मिळालेलें नव्हतें. लॉर्ड ॲमहर्स्टच्या शांतताप्रिय व न्यायी धोरणाला डाग लावणारी एक गोष्ट घडली, ती बराकपुर येथील बंगाली शिपायांचें बंड ही होय. ब्रह्मी युद्धावर जाण्यापूर्वी या शिपायांनीं पगारवाढ व युद्धसामुग्रीकरितां वाहनें यांची योग्य रीतीनें अर्जाद्वारा मागणी केली. ती फेटाळल्यामुळें शिपाई युद्धावर जाण्याचें नाकारूं लागले. यालाच बंडाचें नांव देऊन युरोपियन सैनिकांकडून त्यांची नाहक्क व क्रूरपणानें कत्तल करण्यांत आली. लष्करी शिस्तीच्या गोष्टींत लागणारें हुषारीचें धोरण अंगीं असतें तर लॉर्ड ॲमहर्स्टला हा प्रसंग टाळतां आला असता.

लॉर्ड ॲमहर्स्टनें सहकुटुंब अलाहाबाद, आग्रा, मथुरा वृंदावन, दिल्ली, शिमला वगैरे ठिकाणीं प्रवास केला. सिमल्याचा मुक्काम तर त्या सर्वांनां फारच सुखकर वाटला. तेथें जाऊन राहणारा हाच पहिला गव्हर्नर जनरल होय; व तेव्हांपासूनच सिमला हें हिंदुस्थान सरकारचें उन्हाळयांतील मुक्कामाचें ठिकाण होऊन बसलें. वरील प्रवास उरकून आल्यावर लवकरच राजीनामा देऊन लॉर्ड ॲमहर्स्ट कुटुंबासह ८ मार्च १८२८ रोजीं हेरल्ड नांवाच्या बोटीनें इंग्लंडकडे परत जाण्यास निघाला. या प्रवासांत बरींच संकटें आलीं. समुद्रांत वादळें झालीं, व एकदां एका अमेरिकन जहाजाबरोबर लहानशी चकमक झाली तथापि २२ जुलै १८२८ रोजीं सर्व मंडळी स्पिथहेड बंदरांत सुरक्षित येऊन उतरली.

परत आल्यावर पुन्हां १८२९ ते १८३७ पर्यंत तो ४ था जॉर्ज व ४ था विल्यम यांच्या बेडचेंबरचा लॉर्ड या हुद्यावर होता. १८३५ मध्यें त्याची कानडाच्या गव्हर्नर जनरलच्या जागीं नेमणूक झाली होती, पण तेथें त्या सुमारास अधिकारीमंडळांत बदल झाल्यामुळें तो प्रत्यक्ष कामावर रुजू झालाच नाहीं. १८३७ मध्यें त्याची पहिली बायको मारली. म्हणून १८३९ मध्यें त्यानें ह्मिमथच्या ६ व्या अर्लच्या विधवेशीं लग्न लावलें. फुलझाडें, फळझाडें तयार करण्याकडे तो बरेंच लक्ष देत असे. याचा स्वभाव शांत, मनमिळाऊ व उदार असल्यामुळें त्याची मित्रमंडळी पुष्कळ होती. याप्रमाणें सुखसमाधानांत इतर पूर्वजांप्रमाणें बरींच वर्षे घालवून तो १३ मार्च १८५७ रोजीं वयाच्या चौऱ्यायशींव्या वर्षी मरण पावला. ॲमहर्स्ट विशेष बुद्धिमान् नसल्यामुळें तो गव्हर्नर-जनरल सारख्या मोठ्या हुद्याला लायक नव्हता; व म्हणून त्या जागीं त्याची नेमणूक न करणेंच योग्य झालें असतें. तथापि ब्रह्मी युद्ध व भरतपूरचा वेढा यांत विजय मिळाल्यामुळें पार्लमेंटनें आपल्या नेहमींच्या उदार धोरणास अनुसरून ॲमहर्स्टनें केलेल्या चुकीऱ्या गोष्टीकडे कानाडोळा करून वरील विजयाबद्दल त्याचे मोठे आभार मानले. ब्रह्मी युद्धामध्यें प्रथम वाफेच्या बोटीचा उपयोग करण्यांत येऊन डायाना नामक जहाजानें रंगून येथें चांगली कामगिरी बजावली. ब्रह्मी युद्धांतील विजयाबद्दल अर्ल ऑफ आराकान अशी ॲमहर्स्टला पदवी देण्यांत आली होती.

**अमहर्स्ट**, जि ल्हा.– लोअर बर्मा. तेनासरीम भागांतील एक जिल्हा. १४° ५६' ते १७°. २' उत्तर अ. व ९७° २७' ते ९८° ५१' पूर्व रे. यांच्या दरम्यान. क्षेत्रफळ ७०६२ चौ. मैल. उत्तरेस थेटन जिल्हा, पूर्वेस दावना डोंगर व सयाम संस्थानचा प्रदेश; दक्षिणेस महल्वे डोंगर आणि पश्चिमेस मार्ताबानचें आखात. या जिल्ह्यांत सालवीन, ग्यांग. अतरन या मुख्य नद्या होत. या नद्यांच्या मुखाच्या दक्षिणेकडे आणि पूर्वेकडे या जिल्ह्यांतील प्रदेश आहे. जिल्ह्यांतील मुख्य डोंगर दावना हा होय. त्याची सर्वांत जास्त उंची ५५०० फूट आहे. वर सांगितलेल्या नद्या जलमार्गांनें व्यापार करण्यायोग्य नाहींत. एकंदरींत बहुतेक प्रदेश डोंगराळ आहे. येथें उन्हाळीं पुष्कळ आहेत. टांम्रिओ डोंगरांत शिशाची खाण सांपडली आहे.

जं ग ल.—येथें सागवान फार आहे. त्याचप्रमाणें दाणी ताड व बांबू हेहि विपुल आहेत.

येथें वन्य प्राणी वाघ, चित्ता, गवा, डुकरें, गेंडा इ. असून नद्याकांठचा व किनाऱ्यावरील प्रदेश उष्ण आहे. परंतु आंतील डोंगराळ प्रदेश बराच थंड आहे. या भागांत पाऊस फार पडतो. उदाहरणार्थ–मोलमेन १८८ इंच; अमहर्स्ट २१३ इंच. या भागांत वादळें क्वचित होतात. परंतु अतिवृष्टींमुळें पूर येतात व त्यामुळें पिकांचें नुकसान वारंवार होतें.

इ ति हा स.—प्राचीन काळीं अमहर्स्ट हा तलैंग अथवा मॉन राज्याचा भाग होता. या भागाबद्दल मॉन व सयामी लोक यांचीं कित्येक शतकें भांडणें चाललीं होतीं. तेराव्या शतकांत ज्यावेळीं ब्रह्मी राज्याचा विस्तार झाला त्यावेळीं सालवीन नदीपर्यंत आल्यावर त्याची वाढ खुंटली व त्या नदीच्या पश्चिमतीरावर मार्ताबान हें शहर वसविलें गेलें. नदीच्या पूर्वतीरावर सयामी राज्याचा अधिकार होता. तेराव्या शतकाच्या अखेरीस मार्ताबानचें राज्य सयामचा दोस्त वरीयु यानें स्थापलें. पण नंतर लवकरच तें राज्य पेगूच्या राज्यांत समाविष्ट झालें. सतराव्या शतकांत व अठराव्या शतकाच्या प्रारंभीं सयामी लोकांनीं या जिल्ह्यांत पाय रोवला होता. परंतु अलांगपया यानें त्यांस हांकून दिलें. हा ब्रह्मी असून सयामवरील मोहीम करून आल्यावर मार्ताबानपासून दुसऱ्या टप्याच्या आंतच इ. स. १७६० सालीं मरण पावला. इ. स. १८२६ साली यंदाबो तहान्वयें हा मुलूख ब्रिटिश सरकारच्या ताब्यांत आला. पहिल्या ब्रह्मीयुद्धांत येथें कांहीं गडबड नव्हती. पूर्वी अमहर्स्ट हें जिल्ह्याचें मुख्य ठिकाण होतें. पण इ. स. १८२६ सालानंतर लवकरच ब्रिटिशांनीं मोलमेन हें मुख्य ठिकाण केलें. कारण अमहर्स्ट जवळील मार्ताबान त्यावेळीं ब्रह्मी राज्यांत होतें.

मोलमेनच्या पश्चिमेस एका मैलावर असलेल्या बिलुग्युन बेटावर फार प्राचीन अशीं मानलेलीं ६० बौद्ध देवळें आहेत. त्यांतील कांहीं बुद्धाच्या केंसांवर बांधलीं आहेत असें म्हणतात. लोकसंख्या ( १९२१ ) ४१७२१०.

या जिल्ह्यांतील पांचषष्ठांश लोक बौद्धधर्मीचे आहेत. इ. स. १९०१ सालीं शेतकीवर उपजीविका करणारे शेंकडा ६३ लोक होते.

या जिल्ह्यांतील सखल जमीनींत भात उत्तम पिकतें कांहीं ठिकाणीं ऊंस देखील पिकतो. अतरन नदीकांठच्या बागांत संत्र्यांची लागवड होते. त्याचप्रमाणें सुपारी, नारळ केळीं हीं देखील पुष्कळ पिकतात. इ. स. १९०३–४ सालीं ५७१ चौरस मैल जमीन लागवडीखाली होती.

या प्रांतांतील गाई व म्हशी यांच्या अवलादी जरा चांगल्या प्रतीच्या आहेत. जिल्ह्यामध्यें मासळी मारण्याचीं ठिकाणें नाहींत.

व्या पा र.—मोलमेन येथें सोन्याचांदीचें काम व हस्तिदंती काम चांगलें होतें.

या भागाचा जलमार्गाचा व्यापार मोलमेन बंदरांतून होतो. तांदूळ व इमारती लांकूड या बंदरांतून रवाना होतें. या भागाचा सयामशीं व्यापार बराच चालतो. या जिल्ह्यांत अद्यापि रेल्वे नाहीं.

या जिल्ह्याचे विभाग व टाऊनशिप पुढें दिल्याप्रमाणें आहेत:—

| विभाग | टाऊनशिप |
|---|---|
| मोलमेन ………………………… | मोलमेन |
| कॉकरेक ………………………… | कॉकरेक<br>कैकमरा |
| आमहर्स्ट ………………………… | चौंगझोन<br>मुडन<br>कैकमी<br>येलामेंग |

याचें एकंदर उत्पन्न इ. स. १९०३–०४ सालीं १४ ते १५ लाख रुपये होतें. मोलमेन येथें फक्त म्युनिसिपालिटी आहे.

**ॲमहर्स्ट पे टा**—युनायटेड स्टेट्स, मॅसॅच्युसेट्समधील ॲमहर्स्ट पेठ्यांचें गांव. नॉर्दम्प्टनपासून ईशान्येस हें सात मैल लांब आहे. हें गांव शिक्षणाकरितां नांवाजलेलें असून सुंदरहि आहे. येथें प्रख्यात ॲमहर्स्ट कॉलेज आहे; तें १८२१ मध्यें स्थापन झालें. याच्या बऱ्याच शाखा व इमारती आहेत. याखेरीज एक शेतकी कॉलेजहि या ठिकाणीं वसलें आहे.

हा पेटा १७३१ सालीं वसला गेला. जनरल जेफ्रे ॲमहर्स्ट (१७१७—१७९७) च्या स्मरणार्थ याला सध्यांचें नांव दिलें. प्रसिद्ध कोशकार नोहा वेबस्टर या ठिकाणीं १८१२—२२ पर्यंत कोश संपादण्याचें काम करीत राहिला होता. एमिली डिकिन्सन व हेलेन फिस्के (पुढें नांवाजलेली हेलेन हंट-जॅक्सन) हिचा जन्म या गांवीं झाला.

**अमळनेर, ता लु का.**—(मुंबई इलाखा.) पूर्व खानदेश जिल्ह्यांतील एक तालुका. यांत पारोळा पेठ्याचाहि समावेश होतो. २०°४२' ते २१°१३' उत्तर अ. व ७४°५२' ते ७५°१४' पूर्व रे. यांच्या दरम्यान. क्षेत्रफळ ५२८ चौरस मैल. यांत अमळनेर व पारोळा हीं दोन मोठीं गांवें व २२८ खेडीं आहेत. लोकसंख्या सुमारें सवालक्ष. सन १९०३–०४ सालीं जमीन महसूल ३.४ लाख व इतर कर २३००० रु.

येथील जमीन सपाट आहे. हवा निरोगी असून पावसाची सरासरी २३ इंच आहे.

**गां व.**—धुळयाच्या उत्तरेस २१ मैलांवर आग्रारोडच्या पूर्वेस एक मैलावर बोरी नदीच्या कांठी उ. अक्षांश २१°३' व पूर्व रेखांश ७५°१' यांवर सुमारें पंधरा हजार लोकवस्तीचा हा गांव असून अमळनेर तालुक्याचें मुख्य ठिकाण आहे. शहरांत दोन तीन मुख्य रस्ते असून दुतर्फा दुमजली घरें आहेत. त्यांपैकीं कांहींवर लांकडी नक्षीकाम उत्तम आहे. येथें धान्याचा वगैरे बराच व्यापार चालतो. मे महिन्यांत सखारामबोवा साधूंच्या पुण्यतिथीनिमित्त वाळवंटांत मोठी जत्रा भरते. येथें मामलेदार कचेरी व एक शाळा आहे.

येथें एक किल्ला असून तो दोनशें चौरस फूट आहे. याच्या तिन्ही बाजूंस गांव असून चवथ्या बाजूस नदी आहे. याच्या भोंवतीं दगडी तट असून गांवाभोंवतीहि एक भिंत होती. हा १८१८ मध्यें माधवराव राजे बहादूर यानें ब्रिटिशांच्या स्वाधीन केला.

तप्तीव्हॅली रेल्वे झाल्यापासून या गांवाचें महत्त्व बरेंच वाढलें आहे. येथें जी. आय. पी. व तप्तीव्हॅली रेल्वे यांचें जंक्शन आहे. येथें एक कापडाची गिरणी स्थापन झाली आहे खानदेश एज्युकेशन सोसायटी नांवाची शिक्षणसंस्था स्थापन झाली असून तिचें एक हायस्कूल व बोर्डिंग आहे. ही संस्था राष्ट्रीय झाली होती तिनें वाङ्मय, कला, वैद्यक व शास्त्र शिकण्याकरितां महाविद्यालयहि काढलें होतें. पण ती पुन्हां सरकारी मदत घेऊं लागली आहे व कॉलेज काढण्याच्या तयारींत आहे. येथें एक फिलॉसॉफिकल सोसायटी स्थापन झाली असून कांहीं अभ्यासकांस वृत्ति देऊन आश्रय देते. संस्थेचें एक त्रैमासिक चालू आहे. एकंदरींत खानदेशांत शिक्षणाकरितां अमळनेर प्रसिद्ध आहे.

**अमात्य**—हा अष्ट प्रधानांतील एक अधिकारी. याचा हुद्दा पंत प्रधानाच्या खालोखाल असून शिवाजीच्या वेळेला यास बारा हजार होन वार्षिक वेतन होतें. आरंभीं या अधिकाऱ्यास मुजमुदार हें फारशी नांव होतें. पण शिवाजीनें पुढें तें बदलून त्यास पंत अमात्य हें संस्कृत नांव दिलें [ अष्ट प्रधान पहा. ]. अमात्य या संस्कृत शब्दाचा वस्तुतः अमा म्हणजे राजाच्या सान्निध रहातो तो एवढाच आहे. अमात्य यांनीं सर्व राज्यांतील जमाखर्चांवर देखरेख ठेवावी, राज्यांतील दफ्तरदार व फडणीस त्यांच्याच स्वाधीन राहतील, खालून जे हिशोब येतील ते त्यांनीं तपासून पहात जावे, फडनिसी व चिटनिसी पत्रांवर त्यांनीं आपलें निशाण करावें व युद्धप्रसंग करून प्रांत स्वाधीन होईल त्याचें रक्षण करावें, अशी शिवाजीनें आपल्या जाबत्यांत अमात्याचीं कामें सांगितलीं आहेत [ इतिहास आणि ऐतिहासिक वर्ष १ लें. ] आरंभीं बाळकृष्णपंत हणमंते हा शहाजीचा कारकून शिवाजीजवळ अमात्य म्हणून होता. इ. स. १६४७ च्या सुमारास तें काम शिवाजीनें सोनोपंत डबीर याचा पुत्र निळो सोनदेव यास सांगितलें. शिवाजीच्या राज्याची हिशोबी पद्धत निळोपंताच्या हातची आहे. १६७२ त निळो सोनदेव मरण पावल्यावर तें काम त्याचा पुत्र नारोपंत याजकडे आलें. पण नारोपंत हा स्वतः साधुवृत्तीचा असल्यामुळें कच्चें काम त्याचा भाऊ रामचंद्रपंतच पहात असे. संभाजीच्या कारकीर्दींत रामचंद्रपंत हाच अमात्यपदावर होता. राजारामाच्या वेळीं जिंजीस घालमेली झाल्या त्यांत रामचंद्रपंतास 'हुकमत पन्हा' हा हुद्दा मिळून अमात्यपद जनार्दन रघुनाथ हणमंते यांजकडे आलें. पुढें रामचंद्रपंत कोल्हापुराकडे कायमचा राहिल्यामुळें शाहूनें अमात्याची जागा अंबूराव नामक स्वतःच्या उपयोगी पडलेल्या एका हणमंते घराण्यांतील इसमास दिली. तथापि अमात्याचें काम वस्तुतः

बाळाजी विश्वनाथ ह्याच पद्दात होता. पेशव्यांच्यां अमदानींत अष्टप्रधानांचें महत्व कमी होऊन अमात्याचें पद केवळ नामधारी होऊन बसलें.

[ मराठी रिसायत; इतिहास आणि ऐतिहासिक; राजवाडे खंड ८; बावडेकर घराण्याचा इतिहास. ]

**अमानी गंज, हाट**—(पूर्व बंगाल व असाम) माल्दा जिल्ह्यांतील नाणावलेला रेशमाचा बाजार. येथें वस्ती नाहीं. परंतु हंगामाच्या दिवसांत मुर्शिदाबाद आणि राजशाही जिल्ह्यांतील व्यापारी रेशमाचे कोशे खरेदी करण्यास येतात. एखाद्या दिवशीं एक लाख रुपयांची देखील खरेदी होते. कोशांच्या विक्रीचा दर ठराविक असतो.

**अमॉय**—चीनमधील फूहकीन प्रांतांतील एक बंदर. हें हियामेन नांवाच्या लहानशा नापीक बेटाच्या दक्षिण किनाऱ्यावर, उत्तर अक्षांश २४°२८' आणि पूर्व रेखांश ११८°१०' मध्यें वसलेलें आहे. हें शहर फार अवाढव्य आणि अतिशय घाणेरडें असें आहे. याचा परिघ सुमारें ९ मैलांचा असून शहराच्या आंतील व बाहेरचा असे दोन भाग, मधील डोंगरामुळें विभागले गेले आहेत. या डोंगरावर एक अतिशय भक्कम किल्ला आहे. शहराच्या वरील प्रत्येक भागांत एक मोठें व प्रशस्त बोटी येण्याजाण्याचें ठिकाण आहे. अंतस्थ शहराचें किंवा मुख्य शहराचें बंदर भोंवताली भिंती घालून मजबूत केलेलें आहे. येथें निर्जल गोद्या व गलबतें नांगरण्याचीं ठिकाणें चांगलीं आहेत. चंगचौ या आंतल्या बाजूस असणाऱ्या शहराचें अमॉय हें बंदर म्हणतां येईल. त्या शहराशीं मोठा व्यापार नदीच्या द्वारें चालतो. येथून बाहेर जाणारा मुख्य माल म्हणजे चहा,चिनी मातीचीं भांडीं आणि कागद आणि आयात माल म्हणजे तांदूळ, कापूस, अफू, कापड, लोखंडी माल, आणि यूरोपांत तयार केलेल्या इतर वस्तू होत. चिनी नांवांच्या द्वारें चालणारा व्यापार फार मोठा असून सबंध चीनमध्यें येथील व्यापारी वर्ग फार सधन व उद्यमशील असल्याची ख्याति आहे. अमॉय येथून चहाची निर्गत फार होत असल्याकारणानें एखाद्या वर्षी चहाला मागणी कमी आली तर उत्पन्नहि कमी होतें. येथील देश्य लोकांची संख्या सुमारें तीन लाख आहे. शेजारी असणाऱ्या फोर्मोसा या जपानी बेटाशीं अमॉयचा बराच मोठा व्यापार आहे. इ. स. १८४१ मध्यें ब्रिटिशांनीं मोठ्या निकरानें लढून अमॉय काबीज केलें होतें. १८४२ त घडलेल्या तहान्वयें ब्रिटिश व्यापाराला खुल्या असणाऱ्या पांच बंदरांपैकीं हें एक आहे. हल्लीं वाटेल त्या राष्ट्रांचीं जहाजें या बंदरांत येतात.

**अमाल**—(मुंबई इलाखा)डांगमधील छोटें संस्थान. याचें क्षेत्रफळ २०० चौरस मैल व लोकसंख्या सुमारें ४७०० (१८८० सालीं) असून वार्षिक उत्पन्न ३००० रुपये आहे. याच्या उत्तरेस शेवड्याची बारी आणि जामन दगड, पूर्वेस बिलंद, राहोटे घांट, आणि दुलमंदर, दक्षिणेस जामदार आणि वासुर्णे डांग, आणि पश्चिमेस पलाशविहीर आणि पिंपरी आहेत. येथील संस्थानिक भिल्ल आहे.

**अमावसु**—पितरांपैकीं एक. हा मोठा इंद्रियनिग्रही होता. याविषयीं अशी कथा आहे कीं, कोणी एका पितराची मानसकन्या अच्छोदा, हिला याच्याविषयीं एके कालीं कामवासना उत्पन्न झाली असतां हा तिला वश झाला नाहीं. हें वर्तमान इतर पितरांस कळून त्यांनीं याची स्तुति केली व प्रसन्नांतःकरणानें, ज्या तिथीस हा ब्रह्मचर्यापासून ढळला नाहीं, ती तिथी सर्व पितरांस प्रिय होईल असा आशीर्वाद देऊन, याच्याच नांवावरून त्या तिथीचें नांव अमावास्या ठेवलें. अच्छोदेस तूं मृत्युलोकीं पतन पावशील असा शाप दिल्यानें पुढें ती पतन पावून, मत्स्यगंधा (सत्यवती,) अशा नांवानें भूमीवर जन्मास आली. ती सांप्रत स्वर्गांत अष्टका नांवाच्या देवतेच्या स्थानीं आहे असें मानतात. ( मत्स्य पु. अ. १४ ) [ प्रा. को. ].

( २ ) पुरूरवा राजाला उर्वशीपासून सहा पुत्र झाले होते, त्यांपैकीं एक अमावसु हा होता. [ महाभारत आदिपर्व अ. ७५ ].

**अमितगति**—हा जैनधर्मी दिगंबर पंथापैकीं एक प्रसिद्ध साधु असून नामांकित कवि व धर्मग्रंथकारहि होता. ज्यावेळीं मालव मण्डलाधीश्वर प्रतापशाली राजा मुंजराज राज्य करीत होता. त्यावेळीं हा जैनयति होऊन गेला. मुंजराज हा मोठा चतुर , ज्ञानसंपन्न, स्वतः कवि व गुणग्राही असल्यामुळें त्यानें आपल्या सभेंत अनेक विद्वान व गुणी लोकांस आश्रय देऊन त्यांचा मोठा सन्मान केला होता. अमितगति, धनपाल कवि (तिलकमंजरी ग्रंथाचा कर्ता), पद्मगुप्त, धनंजय ( दशरूपकाचा कर्ता ), हलायुध इत्यादि अनेक विद्वन्मुकुटमणी त्याच्या सभेंत चकाकत होते. त्या सर्वांत श्रेष्ठत्वाचा मान अमितगति, धनंजय व धनपाल यांनाच असावा असें त्यांच्या उपलब्ध असलेल्या उत्कृष्ट ग्रंथावरून वाटतें. अमितगति हा आपल्या नांवाप्रमाणें विशाल व खोल बुद्धीचा कवि असावा असें दिसतें. धर्मपरीक्षा व श्रावकाचार या दोन ग्रंथांमुळें याची धार्मिक वाङ्मयांत उत्तम प्रसिद्धि आहे. त्याचे सर्व ग्रंथ जरी उपलब्ध नसते, तरी व धर्मपरीक्षा हाच ग्रंथ उपलब्ध असता याची प्रसिद्धी जैनवाङ्मयांतून कधींच नष्ट झाली नसती!

जैनधर्मीय माथुरसंघांतल्या श्रेष्ठ, संयमी व विद्वान आचार्यांमध्यें अमितगति हा होऊन गेला. अर्थात याच्या ठिकाणीं असलेल्या बुद्धिमत्तेमुळें याचीहि आचार्यांत गणना झाली. माथुरसंघातल्या शांत वीरसेन सूरिश्रेष्ठानंतर त्यांचे शिष्य नेमिषेण हे होऊन गेले. त्यांचे पश्चात् त्यांचे शिष्य महात्मे माधवसेनसूरि सकलवंद्य असे होऊन गेले व त्यांचे पश्चात् अमितगति हाच त्या माथुरसंघांत आचार्य बनला. त्याचा गुरु माधवसेनमुनि. वीरसेन–देवसेन–अमितगति ( गणनाथ )—नेमिषेण — माधवसेन — अमितगति

( चरित्रनायक ) अशी परंपरा पीटर्सनच्या ४ थ्या रिपोर्टांत आढळते ( ब्रॉ. ब्रँ रा. ए. सो.१८९४ ) दिगंबर जैनांचे चार संघः—(१) काष्ठासंघ; (२)मूलसंघ; (३) माथुरसंघ व(४)गोप्य-संघ हे होत. माथुरसंघाच्या नांवावरून हा संघ गुजराथेंतील असावा असें दिसतें.

अमितगति यतीनें आपला 'सुभाषितरत्नसंदोह' हा ग्रंथ विक्रमसंवत् १०५० पौष शुद्ध पंचमीला पूर्ण केल्याचा उल्लेख आम्ही पुढें दिला आहे. म्हणजे इ. स. ९९४ मध्यें हा ग्रंथ रचिला गेला. धर्मपरीक्षाग्रंथाच्या शेवटीं तो ग्रंथ संवत् १०७० मध्यें म्हणजे इ.स. १०१४ मध्यें रचिल्याचा उल्लेख केला आहे. व मुंज हा इ. स. ९८० ते सन १०२२ पावेतों राज्यारूढ असल्याचें अनुमान आहे. यावरून हा कवि मुंजाच्यावेळीं म्हणजे दहाव्या शतकाच्या उत्तरार्धांत व अकराव्याच्या पूर्वार्धांत होऊन गेला हें ठरतें.

याचा जन्म कोठला व केव्हांचा, याच्या जन्मदात्या मातापित्याचें नांव काय, काय म्हणून यानें दीक्षा घे.ली, याचा आयुःक्रम दीक्षेपूर्वी कसा व्यतीत झाला, निधन कोठें झालें, वगैरे गोष्टी समजण्यास आज कांहींच साधन उपलब्ध नाहीं. जी कांहीं माहिती काढावयाची ती सर्व पुढील तीन ग्रंथावरून, व या ग्रंथांत माहिती तर कर्त्यांचे नांव एवढीच !

या यतीनें एकंदर किती ग्रंथ रचिले याचा अद्याप नीट शोध लागत नाहीं. पण आज उपलब्ध असलेले श्रावकाचार ( उपासकाचार ), सुभाषितरत्नसंदोह व धर्मपरीक्षा हे तीन अमोल काव्यात्मक धर्मग्रंथ मात्र पाहण्यांत आहेत. तेव्हां त्यांसंबंधानें आपण येथें थोडा ऊहापोह करूं.

श्रा व का चा र.—हा ग्रंथ यानें विक्रम सं. १०५० मध्यें रचिल्याचा उल्लेख श्रीयुत हिराचंद नेमचंद (सोलापूर) यांनीं महाराष्ट्र भाषेंत भाषांतर केलेल्या श्रीमान् सामंतभद्र आचार्यांच्या रत्नकरंड श्रावकाचार पुस्तकाच्या प्रस्तावनेंत केला आहे. परंतु ग्रंथाच्या शेवटीं (पांगळ यांच्या जवळच्या प्रतींत) तशा तऱ्हेचा उल्लेख मुळींच आढळत नाहीं. शिवाय त्याच वर्षांत सुभाषितरत्नसंदोह पूर्ण केल्याचा उल्लेख स्वतः कवीनेंच त्या ग्रंथाच्या अंतीं केला आहे. तेव्हां हा घोंटाळा काय आहे हें समजण्यास नीट मार्ग नाहीं. किंवा या कवीची बुद्धि अति तीक्ष्ण असल्यामुळें कदाचित् या कवीनें त्याच वर्षांत दोन्हीहि ग्रंथ पूर्ण केले असतील ! हा ग्रंथ केवळ धर्मविषयक आहे. यांत जैनानें ( श्रावकानें ) पाळावयाचा आचार अथपासून इतिपर्यंत वर्णिलेला आहे. यांत उपदेशाचा क्रम पूर्वीच्या सामंतभद्र, वसुनंदी, चामुंडरायप्रभृति आचार्यांच्या पद्धतीला अनुसरूनच वर्णिला आहे. याचा विस्तार बराच आहे. याचे एकंदर पंधरा परिच्छेद असून त्यांतील श्लोकसंख्या सुमारें साडे तेराशें आहे. या ग्रंथाची रचना सुबोध, रूपकबद्ध व इतकी सोपी आहे कीं, संस्कृत भाषेचें साधारण ज्ञान असणाऱ्याला तो सहज समजेल.

पहिल्या दोन परिच्छेदांत नरजन्म व धर्ममाहात्म्य सांगून तिसऱ्यांत धर्माचें मूल जें सम्यक्त्व त्याचें सप्ततत्त्वांसहित विवेचन केलें आहे.

तिसऱ्या परिच्छेदांत एकांतमतवादी जे जीवाचें अस्तिक्य कबूल करीत नाहींत, जे परलोक आहे असें मानीत नाहींत, जे सर्वज्ञ वीतरागावाचून लोभी, मांसभक्षक, मद्यपानासक्त ( शाक्त वगैरे ) यांच्या ठिकाणीं देवत्वाची योजना करतात, जे क्षुद्रदेवाला पूजितात, अशांचें अगदीं संक्षेपतः खंडन केलें आहे. चौथ्यांत मद्य, मांस, मध, रात्रिभोजन हीं निंद्य आहेत म्हणून त्यांचा त्याग करण्यास सांगितलें आहे. पांचव्यांत पंचाणुव्रतें–अहिंसा, सत्य, अचौर्य, परस्त्रीत्याग व परिग्रहप्रमाण; तीन गुणव्रतें–दिग्व्रत, अनर्थदंड व भोगोपभोग परिणाम; चार शिक्षाव्रतें–देशावकाशिक, सामायिक, प्रोषधोपवास व वैयावृत्य; यांचें वर्णन केलें आहे. सहाव्यांत व्रतमाहात्म्य. सातव्यांत अकरा प्रतिमा; आठव्यात षडावश्यकाचें वर्णन व नवव्यांत दान, पूजा, शील, उपवास, यांचें स्वरूप; आणि सत्पात्र कोणतें व अपात्र कोणतें, तसेंच दान कोणास द्यावें यांचें विवेचन; दहाव्यांत अभयदान व करुणदान यांचें वर्णन; व बाकीच्यांत जिनेश्वराचें व सिद्धांचें वर्णन, बारा अनुप्रेक्षा, समाधि,मरण इत्यादिकांचें वर्णन आहे. याप्रमाणें हा ग्रंथ केवळ धर्मविषयकच आहे.

सु भा षि त र त्न सं दो हः—हा ग्रंथ कवीनें विक्रम सं. १०५० ( इ. स. ९९४ ) मध्यें शरदृतूंत पौषशुद्ध पंचमीला संपूर्ण केल्याचा कवीनें याच ग्रंथाच्या शेवटीं उल्लेख केला आहे. सुभाषितरत्नसंदोह हा रत्न नांवाप्रमाणेच सुभाषितश्लोकरूपी रत्नांनीं रत्नाकराप्रमाणें ओतप्रोत भरलेला असून त्यांत आत्म्याला ( जीवाला ) दुर्गतीला नेणारे जे मनोविकार– कोप, माया, अहंकार, लोभ, शोक, व पंचेंद्रियें; तसेंच जीवाची अवनति करणारे–दुर्जन, मद्य, मांस, मधु, काम, वेश्यासंग, द्यूत, यांचें–हे किती नीच आहेत यासंबंधानें दृष्टांत व रूपकबद्ध अशा काव्य वाणीनें वर्णन करून त्यांची संगति या जीवानें सोडावी म्हणून त्याविकारांचें खंडण केलें आहे; सांसारिक विषय किती क्षुल्लक आहेत हें दर्शवून जीवाचे हितकारी जे मित्र सज्जन, दान, देव, गुरु, धर्म, चारित्र्य यांचें वर्णन केलें आहे व शेवटीं श्रावकधर्माचें निरूपण केलें आहे.

ध र्म प री क्षा—ह्या ग्रंथाची समाप्ति संवत् १०७० मध्यें केल्याचा उल्लेख कवीनें केला आहे.

संवत्सराणां विगते सहस्रे ससप्ततौ विक्रम पार्थिवस्य ।
इदं निषिद्धान्यमतं समाप्तं जिनेंद्र धर्ममिति युक्तिशास्त्रम् ॥

हा ग्रंथ एकूण सुमारें दोन हजार श्लोकांचा ( १९४१ ) आहे, व एवढा मोठा थोरला काव्यात्मक ग्रंथ या कवीनें अवघ्या दोन महिन्यांत संपविला असें त्यानें केलेल्या उल्लेखावरून दिसतें.

[ संदर्भ ग्रंथ.—तात्या नेमिनाथ पांगळ, विविधज्ञानविस्तार पुस्तक ३९, ३. पीटर्सन्स रिपोर्ट पुस्तक ४. भांडारकर रिपोर्ट १८८२-८३. वेबर-धर्म परीक्षेवर विवेचन (१. पा. १८२ व १११० ).

**अमितायु**—अमितायु किंवा अपरिमितायु हें एक हिंदुस्थानांतील बौद्ध संप्रदायाच्या उत्तरकालीन सगुणोपासनेंतील बुद्धाचें रूप आहे. मध्ययुगांत हिंदुस्थानांत त्याची उपासना बरीच वाढली असूनहि आतांपर्यंत त्याच्याकडे कोणाचें लक्ष गेलें नव्हतें. वॅडेल याला मध्यहिंदुस्थानांत मध्ययुगांतील बौद्धदेवालयावशेषांत त्याची मूर्ति अनेक ठिकाणीं सांपडल्याचे उल्लेख आहेत. तिबेटमध्यें अशाच प्रकारच्या दीर्घायु मुनींची उपासना फार दिवस चालू असून आयुर्वर्धनफलप्रदत्तेमुळें भक्तांस ती फार प्रिय आहे. तिबेटांत प्रत्येक देवळांतून याची मूर्ति दिसते. मंत्रतंत्रांत त्याचा उपयोग करितात, व रस्त्यावरील बाजूच्या दगडांवरहि याची प्रतिमा कोरतात. प्रत्येक दिशेला फडकणाऱ्या प्रार्थनाध्वजावर त्याला आव्हान केलेलें असतें. सुखावती नांवाच्या स्वर्गांत बसलेल्या ध्यानस्थ अमिताभ बुद्धाचा हा अवतार आहे असें मानतात. त्याची प्रतिमा अमिताभाप्रमाणेंच काढतात पण जोगीवृत्तींत न ठेवतां १३ अलंकारांनीं त्याला भूषवून त्याच्या हातांत अमृत पात्र देत.त. हें पात्र प्राचीन हिंदुस्थानांतील अष्टमांगल्यापैकीं एक असून तिबेटांत पवित्र जलाचें पात्र म्हणून हें वेदीवर ठेवलेलें असतें.

**अमिदिनें**—सेंद्रिय रसायनशास्त्रांत अमिदिनें ( ॲमिडाइन्स ). या नांवानें ओळखले जाणारे पदार्थ मू. कः (नउ). नउ$_{२}$ या घटनेचे असतात. हीं अमिदिनें, अम्ल अमिदांतील प्राणपरमाणूच्या जागीं द्विमूल्यसंघ = नउ हा आदिष्ट होऊन झालेलीं असतात असें समजण्यास कांहीं हरकत नाहीं. इमिद ( इमाइड ) हरिदें किंवा गंधकिल अमिदें यांवर अम्न ( अमोनिया ) किंवा अमिनें ( अमाइन्स ) यांची क्रिया केली म्हणजे अमिदिनें तयार होतात. त्याच प्रमाणें:—( १ ) नत्रिलांवर ( नायट्राइल्स ) अम्नेनिहरिद किंवा अमिनउद्धरिदांची क्रिया, ( २ ) अमिनें आणि अमिदें यांचे स्फुरत्रिहरिदाच्या ( फास्फोरस ट्रायक्लोराइड ) सान्निध्यांत घनीकरण, ( ३ ) अम्ल-अमिदांवर उद्धराम्लाची क्रिया आणि: ( ४ ) इमिन इथें ( इमिनो ईथर्स ) यांजवर अमिनें किंवा अम्न ( अमोनिया ) यांची क्रिया, या चार क्रियांनीं अमिदिनें तयार होतात.

अमिदिनें हीं एकाम्लक अनाम्लें ( मोनॅसिड बेसेस ) आहेत. हीं फार स्थिर ( स्टेबल ) नसतात. हीं अमिदिनें अल्क किंवा अम्ल यांबरोबर उकळलीं असतां पाण्याचे अणू तात्काळ शोषण करितात, आणि अमिदें व अम्न या स्थितींत रूपांतर पावतात. अमिदिनांचें निर्जल शुष्क पातन ( ड्राय डिस्टिलेशन ) केलें म्हणजे त्यांपासून नत्रिलें व अम्न तयार होतात. उज्जगंधकिदांबरोबर अमिदिनें उष्ण केलीं म्हणजे त्यांच्यापासून गंधकिल अमिदें ( थिओ अमाइडस् ) तयार होतात तीं खालीं दाखविल्याप्रमाणें:—

मू. कः ( नउ ). नउ मू+उ$_{२}$ गं = मू. क ( नउ$_{२}$ ) ( गउ ) नउमू = मू. कग नउ$_{२}$ + नउ$_{२}$. गू किंवा मूकग. नउमू +नउ$_{३}$ व कितनसंयुक्त इथें ( केटॅनिक ईस्टर्स ) च्या उप्र(कउ$_{३}$) कः कउ. कप्र$_{२}$. मू. योगानें अमिदिनांपासून प्राण ( प्र ) तिग्म इमिदिनें ( ऑक्सि पायरिमिडाइन्स ) तयार होतात.

पुत्तिक अमिदिन उकः ( नउ ) नउ$_{२}$ ( फार्मअमिडाइन ) हें फक्त क्षाराच्या रूपांत माहीत आहे. पुत्तिक इमिद-इथिल इथ [ फार्म इमिडो एथिल ईथर ]च्या उद्धरिदावर अम्नची क्रिया केली म्हणजे दार्व-अमिदिनचा उद्धरिद बनतो.

**दार्व-अमिदिन.**—कउ$_{३}$कः (नउ). नउ$_{२}$( ॲसिट ॲमिडाइन ) याची प्रतिक्रिया अल्कीय असते. अम्लाबरोबर उष्ण केला असतां तात्काळ याचें पृथक्करण होऊन अम्न व दार्वम्ल असंयुक्त होतात. दार्व-अमिदिन उद्धरिद १६३° श उष्णमानावर रसरूप होतो. याचे अल्कहलाच्या योगानें निर्वर्ण चतुरस्र चपटे व आर्द्रताशोषक असे स्फटिक होतात. दार्व अनुज्जिदानें [ ॲसेटिक अनहायड्राईड ] या अनाम्ला[ बेस ]चे दार्व भिन द्वि मथिल तिग्म इमिदिनांत ( असिट अमिनो-डायमेथिल पायरिमिडाइन ) रूपांतर होतें व त्याबरोबर दार्वम्ल आणि दार्वमिद सुद्धां तयार होतात.

**उदिल अमिदिन.**—क$_{६}$ उ$_{५}$. कः (नउ). नउ$_{२}$ (बेन्झ अमिडाइन ) याचे निर्वर्ण स्फटिक असतात. ते ७५-८०° श वर रसरूप होतात. हे स्फटिक उष्ण केले म्हणजे ते पृथग्भूत होऊन अम्न आणि कनभानिन ( सायन फेनाइन ) (एस् त्रिभानिल-त्र्यजीवीन = एस्.ट्रायफेनिल ट्रायअझाइन ) तयार होतात. उदिलअमिदिन याचें दारु अनुज्जिदानें घनीकरण होऊन त्यापासून मथिल द्विभानिल त्रिअजिवीन [ मेथिल डाय फेनिल ट्राय अझाइन ] तयार होऊन शिवाय दार्वमिद देखिल तयार होतें; दारिल-दारन( ॲसिटिल ॲसिटोन )च्या योगानें घनीकरण केलें म्हणजे द्विमथिल भानिल तिग्म इमिदिन ( डायमेथिल फेनिल पायरिमिडाइन ) आणि त्रिमथिलीन स्तंभिदा ( ट्रायमेथिलीन ब्रोमाइड ) च्या योगानें घनीकरण केलें म्हणजे भानिल चतुर उज्ज ( द ) तिग्म इमिदिन ( फेनिल टेट्रा हायड्रो पायरिमिडाईन ) तयार होतो.

**अमिनदीवि बेटें.**—लखदीव बेटाच्या उत्तरेकडील द्वीपसमूहास हें नांव आहे. हीं बेटें मद्रास इलाख्याच्या दक्षिण कानडा जिल्ह्यास जोडलेलीं आहेत. हीं पांच बेटें असून त्यांचें क्षेत्रफळ ३ चौरस मैल आहे. पोंवळ्याच्या खडकावर हीं बेटें वसलीं असून समुद्रसपाटीपासून तीं फार तर १०।१५ फूट उंचीवर आहेत.

सुमारें दोन शतकेंपर्यंत हीं बेटें कन्नानोरच्या जमीनदाराच्या अमलाखालीं होतीं; परंतु इ. स. १७८६ सालीं तेथील रहिवाशांनीं बंड उभारून. म्हैसूरचें प्रभुत्व कबूल केलें. इ. स. १७९९ सालीं ज्यावेळीं कंपनीसरकारनें दक्षिण कानडा जिंकला त्या वेळीं त्या जिल्ह्यांत या बेटांचा अंतर्भाव होत नव्हता. त्या वेळीं कन्नानोरच्या बिबीस नुकसानभरपाई म्हणून ५२५० रुपये देण्यांत येऊन बेटें कंपनीच्या मुलुखास जोडण्यांत आलीं. येथें नेमलेल्या अधिकाऱ्यास ' मोनेगर ' असें म्हणतात व त्यास तिसऱ्या वर्गाच्या मॅजिस्ट्रेटचे अधिकार असतात. येथें पंचायत असून खटल्यांचे निकाल यांच्या मदतीनें मोनेगर पाहतो. लोकसंख्या सुमारें चार हजार आहे.

येथें सध्यां वस्ती मुसुलमानांची आहे पण हे पूर्वी हिंदु होते. ते अशुद्ध मलयालम भाषा बोलत असल्यामुळें ते मलबारांतून येथें आले असावे हें स्पष्ट आहे. येथील रहिवाशी येथें नारळाची लागवड व काथ्याचे दोर तयार करतात. इ. स. १९०३–४ सालीं केवळ उत्पन्न २३८७ रुपये होतें; परंतु यांत कन्नानोरच्या बिबीस देण्यांत येणारा ५२५० रुपये पेशकाश हिशेबांत घेतलेला नव्हता.

अमिनें—रसायनशास्त्रांत अमिनें ( अमाइन्स ) म्हणजे अम्न ( अमोनिया ) मधील एक किंवा अधिक उज्ज परमाणू उत्कर्बिल ( आल्किल ) किंवा गंधिल ( ॲरिल ) मूलकानें निःसारित होऊन झालेला आदिष्ट पदार्थ होय. एक उत्कर्बिल किंवा गंधिल मूलकानें एक उज्ज परमाणु निःसारित झाला असल्यास प्राथमिक अमिनें होतात. दोन मूलकांनीं दोन उज्ज परमाणू निःसारित झाले असल्यास द्वितीयक अमिनें आणि तीन मूलकांनीं तीन उज्ज परमाणू निःसारित झाले असल्यास तृतीयक अमिनें तयार होतात. तृतीयक अमिनांच्या अंगीं एक अणुप्रमाण उत्कर्बिल अदिदां( आल्किल आयोडाइड )शीं संयोग होण्याचा धर्म असून चतुष्क ( क्वाटर्नरी ) अमोनिक्षार ( अमोनियम साल्ट्स ) होण्याचाहि धर्म आहे. या संयुक्त पदार्थांच्या रचनेंतील संबंध खालीं दिलेल्या सारण्यावरून ध्यानांत येईल:—

अम्न = नउ$_3$;

प्राथमिक अमिन = नउ$_2$ ( मू )

द्वितीयक अमिन = नउ ( मू )$_2$

तृतीयक अमिन = न ( मू )$_3$

चातुर्थिक अमोनि अदिद = नमू$_4$ द

तै ल व सा व र्गी ती ल ( ॲलिफॅटिक ) अ मि नें.— या संयुक्त पदार्थांचे धर्म (अम्न धर्म) समान आहेत. या वर्गीतील जे हलके म्हणजे कमी भारांकांचे संयुक्त पदार्थ आहेत, ते सहज्वलनीय वायुरूप असून पाण्यांत सहज विद्रुत होतात. यापेक्षां जे भारदार आहेत ते रसरूप असून त्यांचे उत्क्वथनांक कमी असतात व तेहि पाण्यांत सहज विद्राव्य असतात; परंतु अणूंमध्यें कर्बचें प्रमाण जसजसें वाढतें तसतशी त्यांची विद्राव्यता व बाष्पीभवनशक्ति ( व्होलॅटिलिटि ) कमी कमी होत जाऊन व अगदीं शेवटचे म्हणजे अतिभारांकांचे पदार्थ तर निर्गंध घनपदार्थ असून त्यांचा उत्क्वथनांक फार उच्च असतो व ते पाण्यांत अविद्राव्य असतात. ते अति तीव्र अल्क असतात. त्यांचे खनिजाम्लांशीं त्वरित क्षार होतात आणि स्वर्ण, प्लातिन व पारद यांच्या हरिदांशीं द्वित्व क्षार होतात. जलद्रवांमध्यें अम्नपेक्षां या अमिनांचें वैद्युदण्वीभवन ( आयोनाइझेशन ) फार होतें, त्यांत चातुर्थिक अमोनि अनाम्लांचें वैद्युदण्वीभवन तर अतिशयित होतें; द्वितीयक अनाम्लें यांचें वैद्युदण्वीभवन प्राथमिक किंवा तृतीयक अनाम्लांपेक्षां अति शीघ्र व तीव्र होतें.

हें अमिन तयार करण्याच्या पुष्कळ रीती आहेत. पहिलें अमिन इ. स. १८४९ मध्यें ए. वुर्टझ यानें दाहकसिंधु बरोबर मथिलतुल्य कनित ( मेथिल इसोसायनेट ) उकळून तयार केलें, तें असें:—

$$\underset{\text{कप्रन. कउ}_3}{\text{मथिलतुल्यकनित}} + \underset{\text{२धु प्रउ}}{\text{दाहक्षीसधु}} = \underset{\text{कउ}_3\text{नउ}_2}{\text{मथिनअमिन}} + \underset{\text{धु}_2\text{ क प्र}_3}{\text{सिंधुकर्बित}}$$

प्राथमिक अमिनें खालील रीतीनें तयार करतां येतातः–

( १ ) उत्कर्बिल आदिदें अम्नबरोबर उष्ण करून, ( २ ) अल्कहल आणि सिंधु याच्यायोगानें नत्रायिलांचे (नायट्राइल्स) सोज्जिकरण करून,( ३ ) नत्राम्लांचीं संयुक्त इथें ही अल्कहल्युक्त अम्न ( अमोनिया) शीं १००°श उष्णमानावर उष्ण केल्यानें, ( ४ ) नत्रिल अस्नेहिन ( नायट्रो पॅराफिन्स ) वर सोज्जिकारकां ( रिडयुसिंग एजंट्स )चें कार्य केल्यानें, ( ५ ) प्रायोज्जिद अम्नवर ( आल्डि हाईड अमोनिया ) उद्धराम्ल व जशद यांचें कार्य केल्यानें वगैरे.

द्वितीयक अमिनें हीं प्राथमिक व तृतीयक अमिनांबरोबर तयार होतात व मुख्यत्वें हीं अमिनें उत्कर्बिल अदिदांवर अम्नचें कार्य केलें म्हणजे तयार होतात. या तिन्हीं अमिनांबरोबर चातुर्थिक अमोनिक्षारहि तयार होतात. या मिश्रणांतून हीं अमिनें निरनिराळीं करणें हें फार कठिण काम आहे. या कामीं ए. डब्ल्यू. हाफमन ज्या रीतीचा उपयोग करतो. ती अशी.—

हें सर्वमिश्रण दाहक पालाश मिळवून पातन करावें म्हणजे प्राथमिक, द्वितीयक व तृतीयक अमिनांचा पात होतो आणि चातुर्थिक अमोनिक्षार अविकृत असा मागें राहतो. अमिनांचा पात होऊन जो जलयुक्त द्रव आलेला असतो त्यांत द्विइथिल काष्ठित ( डाय एथिल ऑक्झलेट) घालून तें मिश्रण चांगलें हलवावें म्हणजे प्राथमिक अमिन संयुक्त होऊन त्याचें स्फटिकरूप द्विउत्कर्बिल काष्ठामिदांत ( ऑक्झमाइड ) रूपांतर होतें आणि द्वितीयक अमिनाचा अद्राव्य असा इथिल द्विउत्कर्बिल काष्ठमित ( एथिल डाय आल्किल ऑक्समेट ) घटनेचा द्रव तयार होतो आणि तृतीयक अमिन अविकृत स्थितींत राहतें. याचें पातन केलें म्हणजे तृतीयक अमि-

नाचा पात होतो. जीं अमिनें शेष राहतात तीं गलन क्रियेनें पृथक् करितात. नंतर त्यांवर दाहक अल्कची क्रिया केली म्हणजे विवक्षित अमिन निराळें होतें.

प्राथमिक, द्वितीयक व तृतीयक अमिनें हीं एकमेकांपासून ओळखण्याच्या पुष्कळ रीती आहेत.

प्रा थ मि क अ मि नें.— अल्कहलयुक्त दाहक पालाश व हरपुत्तिक ( क्लोरोफॉर्म ) यांशीं उष्ण केलें म्हणजे तुल्य नत्रा-विल ( इसोनायट्राइल ) तयार होतें व हें त्याच्या दुर्गंधीवरून ओळखतां येतें. द्वितीयक आणि तृतीयक अमिनांवर अशी क्रिया घडत नाहीं. नत्रसाम्ल ( नायट्स ॲसिड )ची क्रिया केल्यास प्राथमिक अमिनांचें रूपांतर अल्कहलांत होतें द्वितीयक अमिनाचें रूपांतर नत्रल अमिनांत ( नायट्रोसोअमाइन्स) होतें व तृतीयक अमिन अविकृत राहतें. या रासायनिक क्रिया खालीं दाखविल्या आहेतः—



प्राथमिकअमिन (मू. नउ$_2$) + नत्रसाम्ल (उन प्र$_2$) = अल्कहल (मू.प्रउ) + नत्र (न$_2$) + पाणी (उ$_2$ प्र)

द्वितीयक अमिन (मू$_2$ नउ.) + नत्रसाम्ल (उन प्र$_2$) = नत्रल अमिन (मू$_2$ न.नप्र) + पाणी (उ$_2$ प्र.)

मथिल अमिन ( मेथिल अमाइन ) कउ$_3$. नऊ$_2$ हें अमिन ( मर्क्युरिआलिस पेरेन्निस ), अस्थितैल (बोन ऑईल ) आणि समुद्रांतील हेरिंग माशाच्या क्षार जलांत असतें. पुष्कळ अल्कोदांचे पृथक्करणापासून जे पदार्थ उत्पन्न होतात त्यामध्येंहि हे अमिन असतें. साधारण उष्णमानावर मथिल अमिन वायुरूप असतें; परंतु शीतता व दाब यांच्या योगानें हें रसरुप होतें. हा रस—६° श उष्णमानावर उकळतो. यास तीव्र अम्नगंध असतो, हा शीघ्र ज्वालाग्राही असून पाण्यांत अत्यंत विद्राव्य असतो. याचें स्थित्यंतरदर्शक उष्णतामान १५५°श स्थित्यंतर भार ७२(वातावरणाच्या ७२ पट दाब ) आहे.

द्विमथिल अमिन ( डाय मेथिल अमाइन ) [कउ$_3$] २नउ हा पेरु देशांतील पक्षांच्या मलांत (पेरुव्हिअन ग्वानो) असतो. हा फार जडवायुरूप आहे. त्याचा ७° श उष्णमानावर रस होतो. यास माशासारखा वास असतो म्हणून यास मत्स्य-गंध वायू असेंहि म्हणतात.

त्रिमथिल अमिन ( ट्रायमेथिल अमाइन ) ( कउ )$_3$ न याचें द्विमथिल आमिनाशीं पुष्कळ साधर्म्य आहे. रसरूप त्रिमथिल अमिन ३.२°–३.८° श वर उकळतो. बीट नांवाच्या मुळ्यांपासून साखर काढून घेतल्यावर जो शेष राहतो त्याजवर विपाकक्रिया ( फरमेन्टेशन ) करून अल्कहल काढून घेतात. या विपाकशेषापासून हा अमिन तयार करितात. व या अमिनाचा उपयोग सॉल्व्हेच्या रीतिनें मिठापासून पालाशद्विकर्बित ( पोटयाशिअम बाय कार्बोनेट ) तयार करण्याकडे करितात.

द्वि अ मि नें.—द्विअमिनांमध्यें दोन अम्रिल मूलकें (संघ) असतात. प्राथमिक एकामिनाचा आणि प्राथमिक अल्कहलाचा जो संबंध आहे तोच संबंध द्विअमिनें व स्वकल( ग्लाय कोल्स ) यांच्यामध्यें आहे. द्विअमिनें फार महत्त्वाचे पदार्थ आहेत कारण यांची उच्च समपदें ( हायर होमोलोग्ज ) हीं पुष्कळ बाबतींत, बीलिन ( आल्बुमिन ) नांवाचे जे पदार्थ आहेत त्यांवर सूक्ष्मजंतूंची क्रिया होऊन कोथक्रिया उत्पन्न होते व त्यापासून जे कोथज पदार्थ तयार होतात त्यांत असतात.

गं धा मि नें (ॲरोमॅटिक अमाइन्स):—गंधामिनांचें पुष्कळ बाबतींत तैलामिनें ( उत्कर्बिल अमिनें ) यांशीं साम्य आहे. कारण तीं अम्लांशीं संयुक्त होऊन त्यांचे क्षार होतात प्लाटिन हरिदांशीं त्यांचे संयुक्त क्षार होतात त्याचप्रमाणें पृथक्करण न होतां त्यांचें पातन होतें. परंतु दुसऱ्या पक्षीं गंधामिनें हीं उत्कर्बिल अमिनापेक्षां कमी अनाम्ल ( बेसिक ) धर्मी आहेत, कारण त्यांची क्षारांवर जलद्रवांत उदकप्रक्रिया अतिशय ( हायड्रोलायटिक डिससोसिएशन ) होतें.

प्राथमिक गंधामिनें हीं नत्रिल गंधिल उत्कर्बिलां ( नायट्रो ॲरोमॅटिक हायड्रो कार्बन )पासून सोज्जिकरणानें ( रिडक्शनं) तयार करतात यासाठीं सोज्जिकरणानें मुख्यत्वेंकरून [ १ ] अल्कहलयुक्त अमोनि गंधकिद, [ २ ] जशद आणि उद्धराम्ल, ( ३ ) उद्धराम्लयुक्त वंगस हरिद ( स्टॅन्नस क्लोराइड ) याचा अल्कहलांत केलेला द्रव, ( ४ ) वंग व उद्धराम्ल किंवा मोठ्या उत्पादन प्रमाणावर लोह आणि उद्धराम्ल याचा उपयोग करितात. याशिवाय नत्रस संयुक्त पदार्थ ( नायट्रोसो कांपाउंड्स ) उन्नत्र उन्नत्रिन ( हायड्राझोन्स ) यांचें सोज्जीकरण करून किंवा भानलों (फिनोल्स)चें जशदहरिदा ( झिंकक्लोराईड ) बरोबर पातन केलें म्हणजे हीं गंधामिनें ( ॲरोमॅटिक ) तयार होतात.

हीं प्राथमिक गंधामिनें निर्वर्ण, रसरूप किंवा घनस्फटिक रूप असून पाण्यांत अविद्राव्य असतात. परंतु सेन्द्रिय द्रावकांत हीं सहज विद्राव्य असतात. हीं अमिनें उत्कर्बिल किंवा गंधिल अदिदांशीं उष्ण केलीं असतां तीं द्वितीयक आणि तृतीयक अमिनांत रूपांतर पावतात. यांवर तीव्र नत्राम्लाचें जोराचें व बलवत्तर कार्य होतें, व पुष्कळ प्रकारचे प्राणिदीकरण युक्त पदार्थ उत्पन्न होतात. परंतु ही नत्रीकरणाची क्रिया करण्यापूर्वी दारिलीकरण ( ॲसिटिलेटेड ) करून जर अम्निल संघाचें संरक्षण केलें तर नत्रिलसंयुक्त पदार्थ तयार होतात. निर्जल गंधकाम्लाशीं हीं अमिनें कांहीं वेळ उष्ण केलीं म्हणजे त्यांचें गंधकिलीकरण ( सल्फोनेशन ) होतें. प्रायोज्जिदां( अल्डिहाइड्स )शीं यांचें घनीकरण (कंडेन्सेशन) होऊन तज्जन्य पदार्थ(प्रॉडक्टस)तयार होतात. नीलीन ( अनिलीन ) आणि उदिल प्रायोज्जिद ( बेंझाल्डिहाइड ) यांपासून उदिलिदिन नीलिन ( बेंझिलिडीन अनिलीन ) क$_6$ उ$_5$ न. कउ क$_6$ उ$_5$ तयार होतें;

अम्लांबरोबर हीं उष्ण केलीं असतां त्यांपासून नीलीदें ( अनिलाइड्स ) तयार होतात. हरपुत्तिक आणि दाहक अल्क यांशीं हीं उष्ण केलीं असतां तुल्य नत्रायिल क्रिया देतात; आणि कर्ब द्विगंधकिदाचा अल्कहलांत द्रव करून त्यांशीं उष्ण केलीं असतां उत्कर्विल गंधकीय मौत्रकें ( आल्किल थिओ युरीआज ) तयार होतात. नत्रसाम्लाच्या द्रवावरोवर उष्ण केलीं असतां त्यांचें भानलांत ( फिनोल्स ) रूपांतर होतें. परंतु प्राथमिक अमिनाचा अम्लांत द्रव करून फाजील अम्ल ठेवलें व तो द्रव०° श उष्ण मानावर ठेऊन जर नत्रसाम्ल त्यांत मिळविलें तर द्विअजीवी क्षार ( डाय अझो नियम ) तयार होतो; अम्लाचा अंश फाजील नसेल तर द्विअजीवी अमीन तयार होतें.

द्वि ती य क अ मि नें—हीं दोन प्रकारचीं आहेत.एक शुद्ध गंधिल अमिनें ( अॅरोमॅटिक अमाइन्स ) आणि दुसरीं मिश्र द्वितीयक अमिनें-यांत गंधिल शेष ( अॅरोमॅटिक रेसिड्यु ) आणि उत्कर्विल संघ हीं असतात. शुद्ध गंधिल अमिनें हीं प्राथमिक अमिनें त्यांच्या हरिदांशीं उष्ण केलीं म्हणजे तयार होतात. याशिवाय कांहीं प्रसंगीं प्राथमिक अमिनें आणि निरुद जशद हरिद यांचें मिश्रण भानल ( फिनोल ) बरोबर उष्ण केलें म्हणजे तयार होतात.

मिश्र द्वितीयक अमिनें पुढें दिलेल्या रीतीनें तयार होतातः—

( १ ) उत्कर्विल अदिदांची क्रिया प्राथमिक अमिनांवर केली असतां किंवा ( २ ) प्राथमिक अमिनांचे क्षार हे दाबाखालीं अल्कहलांशीं उष्ण केले असतां.

मिश्र द्वितीयक अमिनांचे अंगीं अनाम्ल धर्म असतात. परंतु शुद्ध गंधिल द्वितीयक अमिनें हीं फार कमजोर अनाम्लें आहेत. या दोन्ही वर्गांतील इमिद उज्ज (इमाइड हायड्रोजन) अम्ल मूलकांच्या योगें सहज निःसृत होतो; आणि नत्रसाम्लाच्या योगानें नत्रल अमिन क्रिया होते. द्वितीयक अमिनें तुल्य नत्रायिल ( इसो नायट्राइल ) क्रिया देत नाहीं.

तृतीयक अमिनांचेहि दोन प्रकार आहेतः ( १ ) शुद्ध गंधिल अमिनें आणि ( २ ) मिश्र अमिनें.

मिश्र तृतीयक अमिनें हीं प्राथमिक अमिनांवर उत्कर्विल हरसंधिदांची ( आल्किल इलाइड्स ) क्रिया केली असतां तयार होतात.

साधा गंधिल तृतीयक अमिन म्ह. त्रिभानिल(ट्रायफेनिल-अमाइन ) होय. सिंधुद्विभानल अमिन ( सोडिअम डायफेनिल अमाइन ) वर स्तंभ उदीन ( ब्रोमबेंझिन )ची क्रिया केली म्हणजे त्रिभानल अमिन तयार होतो.

अगदीं साधा गंधिल एकामिन ( मोनमाइन ) म्हटला म्हणजे नीलीन ( अनिलीन ) आहे तो पाहूणें. साधीं मिश्र अमिनें म्हटलीं म्हणजे एक आणि द्विमथिल नीलीन ( डायमेथिल अनिलीन ) होत. या पदार्थांचें वर्णन नीलिन( अनीलीन ) शब्दाखालीं येईल.

गंधिल अमिनापैकीं चर्वी वर्गांतील उत्कर्विल अमिनांशीं साम्य पावणारा अमिन म्हटला म्हणजे उदील अमिन ( बेंझिल अमाइन ) क$_६$ उ$_५$ उ$_५$ कउ$_२$ हा आहे. उदील नत्रायिल ( बेंझो नायट्राइल )चा अल्कहलांत द्रव करून त्याचें जशद आणि दार्वम्ल किंवा सिंधुधातु यांच्या योगें सोज्जिकरण केलें म्हणजे उदिल अमिन तयार होतो. उदिल हरिदांवर ( बेंझिल लोराइड ) अम्न ( अमोनिया )ची क्रिया केली म्हणजे हा अमिन तयार होतो. परंतु त्याच्याबरोबर द्वि आणि त्रि उदील आमिनें तयार होतात. उदील आमिन हा द्रव रस रूप असून त्याचा उत्क्कथनांक १८३° श आहे. तो पाणी, अल्कहल व इथ्र ( ईथर ) यांत सर्व प्रमाणांत विद्राव्य आहे. हा अनाम्ल ( बेसिक ) धर्मी असून त्याची फार तीव्र अल्कक्रिया असते.

द्विभानिल अमिन ( क$_६$ उ$_५$ )$_२$ नउ$_२$ हा खऱ्या गंधिल द्वितीयक अमिन वर्गाचा द्योतक आहे. नीलीन ( अनीलीन ) आणि नीलीनहरिद हे कांहीं तास २१०° ते २४०° श उष्णमानावर उष्ण केले म्हणजे द्विभानिल अमिन तयार होतो. याचे पांढरे चपटे स्फटिक होतात. हे ४५° श वर वितळतात व ३०२° श वर उकळतात. हे स्फटिक पाण्यांत बहुतेक अविद्राव्य आहेत परंतु वाफेबरोबर हे सुलभ पातन पावतात.

गं धि ल द्वि अ मि नें.—नत्रिल नीलीने (नायट्रानिलाइन) किंवा द्विनत्रिल उत्कर्विल यांचें सोज्जिकरण केलें म्हणजे गंधिल द्विअमिनें तयार होतात. यांचे चपटे स्फटिक होतात व हीं बहुतेक पृथक्करण न होतां पातन पावतात. आसन्न भानिलीन द्विअमिन क$_६$ उ$_४$ ( नउ$_२$ )$_२$ याचे जलद्रवापासून चपटे स्फटिक होतात. याचा रसांक १०२-° १०३° असून उत्क्कथनांक २५६°–२५८° श असतो. शेंकडा १० भाग उद्धराम्लाबरोबर १८०° श उष्णमानावर हा अमिन उष्ण केला म्हणजे त्याचें तिग्म क्वाथिन ( पायरो कॅटेचिन ) मध्यें रूपांतर होतें. आसन्न द्विअमिनांचे मुख्य लक्षण हें आहे कीं घनीकरणाच्या योगें त्यापासून निरनिराळे अनेक पदार्थ तयार होतात. मितभानिलीन द्विअमिन ( मेटाफेनिलीन डाय अमाइन ) चे चतुरस्र चपटे स्फटिक असून ते ६३° श वर वितळतात व २८७° श वर उकळतात. हा अमिन पाण्यांत व अल्कहलांत सहज विद्राव्य आहे. शेंकडा १० भाग उद्धराम्लाबरोबर १८०° श उष्णमानावर हा अमिन उष्ण केला म्हणजे त्याचें रूपांवर शिलावल्करालिन ( रिसॉर्सिन ) मध्यें होतें. परभानिलिन द्विअमिन ( पॅराफॅनिलीन डाय अमाइन ) वर सांगितलेल्या रीतीनेंच तयार होतो. याचे चपटे स्फटिक असून त्यांचा रसांक १४०° श व उत्क्कथनांक २६७°श असतो. शेंकडा १० प्रमाणाच्या उद्धराम्लाबरोबर १८०°श उष्णमानावर हा अमिन उष्ण केला असतां त्याचे रूपांतर उदक्विनन ( हायड्रो क्विनोन ) मध्यें होतें. मंगलद्विप्राणिद ( मँगनीज डायऑक्साइड ) आणि पातळ गंधकाम्ल

यांच्या योगानें याचें प्राणिदीकरण होऊन किनन (क्विनोन) मध्यें रूपांतर होतें.

अमिनांचे हे तिन्ही वर्ग एकमेकांपासून नत्रसाम्लाच्या योगानें ओळखतां येतात. आसन्न संयुक्त (ऑर्थोकांपाउन्डस) अमिनांचें घनीकरण होऊन अजीवीमिद उदिन (अॅझइमिडो बेन्झिन) तयार होतो. मितसंयुक्त (मेटा कांपाउंड्स) अमिनांपासून पुष्कळ रंग-अजीवी-रंग (अझोडाइज) तयार होतात. आणि परसंयुक्त (पॅराकांपाउन्डस) अमिनांपासून द्वियजीवी (बिस डाय अॅझो) संयुक्त पदार्थ क्षन$_२$.क$_६$ उ$_४$ न$_२$क्ष या घटनेचे तयार होतात.

**अमिल अल्कहल.**—अमिल अल्कहल यास पंचिल अल्कहल असेंहि म्हणतात. याची घटना क$_५$उ$_{११}$ अशी आहे. या अल्कहलाचीं समघटक आठ रूपें आहेत; त्यांची घटनासारणी अशीः—

(१) क उ$_३$. (क उ$_२$)$_४$.प्रउ; (२) (क उ$_३$)$_२$. कउ. कउ$_२$. कउ$_२$. प्रउ; (३) (कउ$_३$) (क$_२$ उ$_५$) : कउ. कउ$_२$ प्रउ; (४) (कउ$_३$)$_३$ क. कउ$_२$. प्रउ; (५) (क$_२$ उ$_५$)$_२$ कउ. प्रउ; (६) (कउ$_३$. कउ$_२$. कउ$_२$.) (कउ$_३$): कउ. प्रउ; (७) (कउ$_३$)$_२$:कउ (कउ$_३$): कउ प्रउ; (८) (कउ$_३$)$_२$. (क$_२$ उ$_५$): क. प्रउ.

या सर्वांत अतिमहत्त्वांचा(२) पंचिल अल्कहल आहे. यास समघटक प्राथमिक पंचिल अल्कहल (इं. इसोब्युटिल कार्बिनोल) किंवा अक्रिय पंचिल अल्कहल असें म्हणतात. हा असरकाचा (फ्यूझेल तेलाचा) मुख्य घटक असतो. विपाक क्रियेनें जो कच्चा मद्यार्क तयार होतो त्यांतून साधा अल्कहल याचा म्हणजे इथिल अल्कहलाचा बहुतेक अंश वेगळा काढल्यावर जो उच्च उष्णमानावर कढणारा भाग मागें राहतो, तो समघटक प्राथमिक पंचिल अल्कहल व द्वितीयक पंचिल अल्कहल यांच्या मिश्रणाचा मुख्यत्वेंकरून बनलेला असतो.

धान्य, बटाटे किंवा द्राक्षांचा रस यांपासून पिण्याची दारु काढतांना इथिल (एथिल) अल्कहलाबरोबर एक तिखट तेलकट द्रव निघतो यासच असरक (फ्यूझेल ऑइल) तेल असें म्हणतात. यास इथिल अल्कहलापासून अगदीं वेगळे काढण्यास फार प्रयास पडतात पातनाच्या अखेरीस हा तेलकट द्रवच फार निघतो. त्यास निराळें धरून त्यांत पुष्कळ वेळां पाणी मिसळून ढवळलें म्हणजे त्यांतील इथिल अल्कहल जातो व शेष राहिलेल्या द्रवाचें पुनःपातन केलें म्हणजे जो द्रव मिळतो त्यांत दोन पंचिल अल्कहल असतात. परंतु यांस केवळ पातनविधीनें वेगळें करितां येत नाहीं. तथापि यांस एकमेकांपासून सहज ओळखतां येतें. कारण समघटक प्राथमिक अल्कहलाचें प्रकाशावर कांहीं कार्य घडत नाहीं. म्हणून अक्रिय किंवा क्रियाशून्य (इनॲक्टिव्ह) हें विशेषण यास लावतात. आणि हा दुसऱ्या द्वितीयक अमिल अल्कहल ध्रुवीभूतप्रकाशकिरणाच्या पातळीस वामावर्ती वळवितो. या धर्मावरून यास दुसऱ्या सर्व अल्कहलापासूनहि ओळखतां येतें.

यांस वेगळें काढण्याची एक रीत आहेः विपाकक्रियेंत जे या दोन अमिल अल्कहलांचें मिश्रण मिळतें त्यांत तेवढ्याच वजनाचें गंधकाम्ल सावकाश मिळविलें व मिश्रण तसेंच ठेविलें म्हणजे दोहोंची दोन पंचिल गंधकाम्लें बनतात. यांचे जे भार (बेरिअम चे) क्षार बनतात त्यांची विद्राव्यता भिन्न असते व त्यांच्या स्फटिकांचीं रूपें भिन्न असतात. समघटक पंचिल अल्कहलाचा क्षार कमी विद्राव्य असतो व द्वितीयक पंचिल अल्कहलाचा क्षार याच्या २॥ पट अधिक विद्राव्य असतो. यामुळें पहिला क्षार स्फटिकरूपानें प्रथम वेगळा होतो व दुसरा द्रवांत राहतो. यास्तव वर जे पंचिल गंधकाम्लाचें मिश्रण तयार झालें त्यांत भारकर्बित(बेरियम कार्बोनेट)चा द्रव मिळवून मिश्रणास निर्गुण करावें नंतर या पंचिल भार गंधकितांच्या मिश्रद्रवाचें स्फटिकीभवन करावें, म्हणजे अधिक विद्राव्य द्वितीयक पंचिल (अमिल) अल्कहलाचा क्षार विद्रुतस्थितींत मागें राहून समघटकपंचिल (अमिल अल्कहल) स्फटिकरूपांनें वेगळा होतो. नंतर दोहोंच्या द्रवांत गंधकाम्ल मिळवून भार यास वेगळें काढिलें व पाण्याबरोबर पातन केलें म्हणजे दोन्हीं अल्कहल मिळतात. जसेंः–

(क$_५$ उ$_{११}$. ग प्र$_४$)$_२$ भा +$_२$ उ$_२$ प्र = २ क$_५$उ$_{११}$उ प्र + भाग प्र$_४$ + उ$_२$ ग प्र.

धर्मः—समघटक प्राथमिक पंचिल अल्कहल याचें प्रकाशावर कार्य घडत नाहीं. हा १३१° श वर उकळतो व २०° श वर याचें वि गु. ०. ८१०४ असतें. १३° श उष्णमानावर ५० पट पाण्यांत मात्र हा विद्रुत होतो. साधारणतः हा पाण्यावर तेलाप्रमाणें तरतो. साधा अल्कहल इथ्र (ईथर) व बाष्पभावी तेल यांत विद्रुत होतात. याचा हरिद (क्लोराइड) १००° श वर स्तंभिद (ब्रोमाइड) १२०° श वर आणि अदिद आयोडाइड १४८° श वर कढतात. याचें प्राणिदीकरण केलें तर बलकाम्ल (व्हॅलेरिक अॅसिड) बनतें व याचेंहि सूर्य प्रकाशावर कार्य घडत नाहीं.

**अमिल नत्रायित.**—(पंचिल नत्रायित)–पंचिल नत्रायित (समघटक प्राथमिक पंचिल अल्कहल) याचा नत्रायित अॅमिल (नायट्राइट) क$_५$ उ$_{११}$. प्रनप्र. हा रसरूप पदार्थ आहे. नत्रसाम्लाच्या वाफे (नायट्रस फ्यूम्स) ची क्रिया पंचिल अल्कहलावर (समघटक प्राथमिक पंचिल अल्कहल) केली म्हणजे हा पदार्थ तयार होतो. यासाठीं नत्रसाम्लाची वाफ करण्याची ती पिष्ठसत्वावर (स्टार्च) नत्राम्लाची क्रिया करून करावी. किंवा २६ भाग पालाश नत्रायित १५ भाग पाण्यांत विद्रुत करून ३० भाग पंचिल अल्कहलांत घालावें. या मिश्रणांत ३० भाग गंधकाम्ल ओतून या सर्वांचें पातन (डिस्टिलेशन) करावें. पंचिल नत्रायित पिंवळ्या रंगाचा रस असून त्याचें वि. गु. ०. ८७७ असतें. याचा उत्क्वथनांक ९५°—९६° असतो. यास फार चमत्कारिक वास येतो आणि याची वाफ

हुंगल्यानें किंवा श्वासावरोबर घेतल्यानें रक्तवाहिन्या फुगतात. व आंखडलेले स्नायू शिथिल होतात. पंचिल नत्रायित अविद्राव्य असतो परंतु अल्कहल इथ्र स्फटिकित दार्वम्ल( ग्लेशिअल असेटिक ॲसिड ) हरपुत्तिक आणि उदिन यांत सहजविद्राव्य आहे. याची वाफ उष्ण केल्यावर बार होतो. मथिल. अल्कहलावरोबर उष्ण केल्यास मथिल नत्रायित(मेथिनायट्राइट) व पंचिल अल्कहल होतो. नवजात उज्जाची क्रिया त्यावर झाली म्हणजे अम्न (अमोनिया) व समघटक पंचिल अल्कहल तयार होतो. दाहक सिंधु अगर पालाशनें त्यावर उदक प्रक्रिया केली म्हणजे सिंधु नत्रायित व पंचिल अल्कहल होतात. वितळलेल्या दाहक पालाशवर ( फ्यूज्ड कॉस्टिक पोट्याश)रसरूप पंचिल नत्रायित(लिक्विड) टाकलें असतां त्याचें पालाश वलकित (पोट्याशिअम व्हॅलरेट) होतें. पंचिल नत्रायिताचा उपयोग औषधात होतो. जहाज लागणें वगैरे समुद्रांतील पर्यटनामुळें उद्भवणाऱ्या आजारावर हा उत्तम उपाय असून हरपुत्तिक (क्लोरोफॉर्मच्या) वाफेच्या विषारी परिणामावर व हृदयविकृतीच्या (हार्टडिसिईज) कांहीं प्रकारावर हा उत्तम उपाय आहे. पंचिल नत्रायिताचा महत्त्वाचा उपयोग म्हटला म्हणजे निर्जल द्विअजोविक्षार ( डायअझोनियम ) सॉल्स्ट तयार करण्याकडे होतो.

अमीन —(१) स्थानेश्वराच्या आग्नेयीस ५ मैलांवर अमीन नावाचा उंचवटा आहे. हा अभिमन्यु ह्या नांवाच संक्षेप असें तेथील ब्राह्मण सागतात. ह्यास चक्रव्यूह असेंहि नांव आहे. येथें जयद्रथानें अभिमन्यूस लाथ मारिली. येथें आदिति ही पुत्राकरिता तपश्चर्या करीत होती, तिला सूर्य हा पुत्र झाला. असें सागतात. हा उंचवटा उत्तर–दक्षिण २००० फुट लाब, ८०० फूट रुंद आणि २५।३० फूट उंच आहे. त्याच्या शिखरावर अमीन नांवाचें खेडें आहे, तेथें गौड ब्राह्मण राहतात. आदितिचें एक देवालय आहे. पूर्वभागीं सूर्यकुंड आहे व पश्चिमभागीं सूर्याचें एक देवालय आहे. सूर्यकुंडाच्या जागीं सूर्य जन्मला. ज्या स्त्रियांस पुत्रप्राप्तीची इच्छा असेल त्या रविवारी अदितीचें दर्शन घेतात, आणि सूर्यकुंडांत स्नान करितात.

(२) एक हुद्दा. मोल्स्वर्थ हा अमीन शब्दाचे (१) कज्जाचा निवाडा करण्याकरितां सरकारकडून नेमलेला अधिकारी, (२) हल्लींच्या मुनसफच्या तोडीचा न्यायखात्यांतील अधिकारी किंवा (३) सामान्यतः देखरेख ठेवणारा कोणताहि कामगार असे अर्थ देतो. शिवाय (४) अमीनी शब्दाचा त्यानें शेतकऱ्याकडून प्रत्यक्ष कर वसूल करणाऱ्या सरकारच्या अधिकाऱ्याचें काम, असा निराळा अर्थ दिला आहे. मोंगल बादशहांच्या आमदानींतील सुभ्यांतील दिवाणाच्या हाताखालील मुलकी अधिकाऱ्यांसहि अमीन म्हणत असत. अमीनाशिवाय तहसीलदारांच्या वेगळ्या जागा असून प्रत्यक्ष वसूल गोळा करणें हें या तहसीलदारांचें काम होतें. मराठेशाहींत अमीन हा मुलकी अधिकाऱ्याचा हुद्दा दिसत नाहीं. कज्जा तोडण्यासाठीं सरकारकडून नेमलेल्या अधिकाऱ्याकरितां मात्र अमीन शब्द उपयोजिलेला आढळतो. उ० " विष्णु अनंत घाटे यांणीं आपल्यावर मुतें घालून मारे केले, त्यावरून सुभाहून पडथळे नेमून देऊन अमीन दिला, त्याचे विद्यमानें थलीं उभयतांचा निवाडा जाला " हा सवाई माधवराव पेशव्यांच्या रोजनिशींतील उल्लेख पहा ( ८.१११४ ). टिपू सुलतानच्या राज्यांत मात्र अमीन हा पेशवाईतील मामलेदाराच्या तोडीच्या मुलकी अधिकाऱ्याचा हुद्दा होता असें त्याच पेशव्यांच्या रोजनिशींतील इतर ठिकाणीं आलेल्या उल्लेखावरून स्पष्ट होतें ( ५. ३८९ ). सारांश, पेशवाईत अमीन हा शब्द मोल्स्वर्थच्या पहिल्या अर्थी व मुसुलमानी राज्यांत चौथ्या अर्थी प्रचारांत होता. इंदूर संस्थानांत अद्यापहि अमीन हा शब्द ज्यांस मध्यप्रांतांत तहसीलदार किंवा महाराष्ट्रांत मामलेदार म्हणतात त्या अधिकाऱ्याच्या हुद्यासाठीं प्रचारांत आहे.

मोंगल बादशहांच्या कारकीर्दींत अधिकाऱ्यांच्या कामांचे नियम देणाऱ्या पुस्तकांत अमीनाचें जें काम दिलेलें असतें त्यावरून आरंभीं तो निव्वळ मुलकी अधिकारी होता हें स्पष्ट होतें." अमीनास नियम ( जाविता ) पूर्ण अवगत असावे व त्यानें साऱ्याची आकारणी नियमानुसार करावी. अमीनाचें काम राज्यांतील जमीन लागवडीखालीं आणणें हें आहे. त्यानें पेरणीच्या मोसमापूर्वी कानुनगोपासून गांवच्या साऱ्याची आकारणी व लागवडीखालीं असलेली जमीन दाखविणारे मागील दहा वर्षांचे कागद मागून घेऊन क्रोडी, चौधरी, कानुनगो, जमीनदार यांच्यासह प्रत्येक गांवीं जावें व तेथें लागवडीखालीं जमीन किती आहे व गांवांत नांगर किती आहेत याची चौकशी करावी. चौकशींत जमीन कमी किंवा जास्त आढळून आल्यास ती बरोबर कां दाखविण्यांत आली नाहीं म्हणून कानुगोस व खोटी माहिती कां दिली म्हणून गांवच्या पाटलास जबाब विचारावा. गांवांत असलेले नांगर जमीनीच्या लागवडीस पुरेसे नसल्यास जमीनीच्या मानानें शेतकऱ्यांस बैल व बियाणा घेण्यासाठीं योग्य तें कागदपत्र करून घेऊन पुढील सालच्या तोजीच्या पहिल्या हप्त्याबरोबर वसूल करून घेण्याच्या करारावर तकावी कर्ज द्यावें" अमीनाच्या नेमणुकीच्या सनदेंत त्याच्यावर जी आणखी जबाबदारी घातलेली आढळते ती येणेंप्रमाणें:— " वसूल झाल्यापैकीं कांहीं तोजी पोतदारानें खजिन्यांत भरणा न करतां आपल्या जवळ ठेवली तर त्याबद्दल तुह्मी जबाबदार धरले जाल. क्रोडीकडून त्याच्या जमाबंदीप्रमाणें वसूल करवून घेऊन तो त्याजकडून पोतदारापाशीं भरणा करवा. रयतेनें पोतदारापाशीं वसूल आणून देतांच तिला पोतदाराच्या सहीची व स्वतःच्या शिक्क्याची हातचिठ्ठी द्या व मागून बेबाकी होईल तेव्हां या हातचिठ्ठ्यांवरून हिशोब करा. दरती, तहसीलदारी यांसारखे कोणतेहि

अबवाब रयतेकडून तुह्मी स्वतः घेऊं नका व कानुनगो व चौधरी यांनांहि ते न घेण्याविषयीं समज द्या. " [ सरकारचें मुघल ॲडमिनिस्ट्रेशन. ]

**अमीनगड**—(मुंबई इलाखा.) विजापूर जिल्हा. हुनगुंद तालुक्यांतील एक गांव. १६° ३' उत्तर अक्षांश ७६° पूर्व रेखांश यांवर, हुनगुंदच्या पश्चिमेस सुमारें ९ मैलांवर हा ७७३४ ( इ. स. १९०१ ) लोकवस्तीचा गांव आहे. येथें गुरांचा मोठा बाजार भरतो. तसेंच कोंकणचे नारळ व तांदूळ यांचा मोठा व्यापार आहे.

**अमीनभावी**—(मुंबई इलाखा.) धारवाड जिल्हा. धारवाडच्या ईशान्येस सुमारें सात मैलांवर अजमासें साडे तीन हजार लोकवस्तीचा गांव. पेशव्यांच्या वेळीं हें आठ गांवांच्या समतेचें (समत) मुख्य ठिकाण होतें. गांवाच्या उत्तरेस नेमिनाथाचें जैन देवालय आहे. कलमेश्वर व मल्लिकार्जुन अशीं आणखीं दोन लहान देवळें आहेत. येथें एकंदर सहा शिलालेख सांपडले आहेत. (फ्लीट्स कॅनरीज डिनॅस्टीज )

**अमीना**—अबदुल्लाची पत्नी व प्रख्यात मुसुलमान धर्मसंस्थापक महंमदाची माता. अबदुल मनाफचा पुत्र वहाब याची ही कन्या होती. सौंदर्य, शहाणपण व सद्वर्तन यांविषयीं तिची फार ख्याति असून अबदुल्लासारख्या असाधारण पुरुषाची पत्नी होण्यास ती सर्वस्वी लायक होती. महंमदाच्या जन्मानंतर सहा वर्षांनीं इ. स. ५७७ च्या सुमारास ती वारली. तिची कबर अबवा येथें आहे असें म्हणतात [ बील, ओरिएंटल बायॉग्राफिकल डिक्शनरी ].

**अमीरखान**.—हा मुरादाबाद जिल्ह्यांतील संबळ गांवचा राहणारा. याचा बाप मुल्ला असून तो थोडा जमीन जुमला बाळगून होता. अमीरखान आणि त्याचा धाकटा भाऊ करीमउद्दीन यांनीं जेव्हां उत्तर हिंदुस्थान सोडलें तेव्हां अमीर वीस वर्षांचा होता. त्याच्या गांवांत त्याचें थोडेसें वजन होतें हें त्याच्यापाशीं दहा विश्वासू अनुयायी होते यावरून सिद्ध होतें. यांच्यासह तो अहिरवाडमधील राणादच्या जमीनदाराच्या पदरीं राहिला. पुढें माळव्यामधील पेशव्यांच्या एका मराठा सरदारानें त्याला आपल्याजवळ ठेविलें. येथून तो दुसऱ्या एका सरदाराच्या पदरीं राहिला. वरील सर्व नोकऱ्यांत अमीरखान आणि त्याचे अनुयायी शिबंदी म्हणून ठेविलेले असत; व त्यांच्यापैकीं प्रत्येकास दरमहा सरासरी तीन चार रुपये व त्यांच्या मुख्याला दहा पंधरा रुपये पगार मिळे. लवकरच अमीरखानाला चांगले दिवस आले. भोपाळच्या दरबारीं तेथील छुट्टाखान नांवाच्या दिवाणाचा अंत झाल्यावर दुफळी माजून प्रत्येक पक्ष आपल्या तैनातींत माणसें भरती करूं लागला. तेव्हां अमीरखान हा आपल्या हाताखालचे सहा घोडेस्वार व ६० पायदळ शिपाई यांच्यासह भोपाळ येथील हियात महंमदखान याच्याकडे नोकरीस राहिला. त्या ठिकाणीं वर्षभर राहिल्यावर तो दुर्जनलाल आणि जयसिंग या राघवगडच्या संस्थानिकांच्या तैनातीस राहिला. या संस्थानिकांनां दौलतराव शिंद्यानें त्यांच्या राज्यांतून हांकून दिलें तेव्हां ते स्वतःच्याच लोकांनीं लागवड केलेली जमीन लुटून कालक्रमणा करूं लागले.

या रजपूत संस्थानिकांचा आणि मराठ्यांचा जेव्हां तंटा झाडूं लागला त्या वेळेस अमीरखानानें आपली मर्दुमकी गाजवून दाखविली. त्यामुळें त्याला पांचशें लोकांचें अधिपत्य मिळून शिवाय पालखीचा मान मिळाला व पंधरा हजार पेंढारी सैन्यामध्यें त्याला महत्त्वाचा दर्जा प्राप्त झाला. पण रजपुतांशीं भांडण झाल्यामुळें त्याची पुढील बढती थांबली. या भांडणांत त्याला दगडांचा इतका मार खावा लागला कीं सिरोंज येथें तो तीन महिने अंथरुणावर पडून होता. या प्रसंगामुळें दुर्जनलालची नोकरी सोडून तो बलराम इंगळे नांवाच्या मराठा सरदाराच्या जवळ राहिला. इंगळे यावेळीं भोपाळच्या धामधुमींत गुंतला होता.

बलराम इंगळ्यानें अमीरखानाचा दर्जा पंधराशें माणसांच्या मनसबदाराइतका वाढवून फत्तेगडचा किल्ला त्याच्या हवालीं केला. पण तो लवकरच त्याला सोडावा लागला. तथापि त्यामुळें त्याचें नुकसान न होतां उलट त्याची यशवंतराव होळकराशीं मैत्री जडून त्याच्या उत्कर्षास प्रारंभ झाला.

यशवंतराव होळकर आणि अमीरखान यांचा प्रथम संबंध आला तेव्हां त्यांचें नातें बरोबरीचें होतें. पण यशवंतरावाचा दर्जा एका मोठ्या संस्थानाचा अधिपति व तडफदार योद्धा म्हणून चढत जाऊन त्यांच्यामधील नातें पुढें राजा आणि आश्रित असें बनलें. तथापि यशवंतराव अमीरखानास नेहमीं आपला भाऊ म्हणून संबोधी, आणि आपल्या इतर सरदारांपेक्षां त्याचा बडेजाव जास्त राखी. इ. स. १८०२ च्या नोव्हेंबरच्या सुमारास सुवर्णदुर्गाच्या आसमंतांत हा आला असल्याचें ऐकून बाजीराव तेथून पळाला. यावरून त्याचें त्यापूर्वीच यशवंतराव होळकराशीं सख्य झालें असावें असें दिसतें. ( ग्रांटडफ. पु. तिसरें पृ. १९५ व २१० ). अमीरखान हा आपल्या सैन्याचा स्वतंत्र अधिकारी असून तो आपल्या इच्छेप्रमाणें कोणालाहि नेमूं किंवा काढूं शकत असे. परंतु याप्रमाणें तो अगदीं स्वतंत्र होता तरी त्याची स्थिति फारशी चांगली नव्हती. त्याचे सैनिक संख्येनें त्याच्या ऐपतीपेक्षां जास्त असून ते नेहमीं बंडाळी माजवीत व दरवर्षीं सहा महिन्यावर आपल्या मुख्याला अटकेंत ठेवीत. आपल्या बंडखोर सैनिकांच्या त्रासामुळें व त्यांच्या वेतनाची तरतूद करण्याच्या आवश्यकतेमुळें त्याला ठराविक असें कांहींच धोरण ठेवतां येत नसे याचें उदाहरण म्हणजे सागर येथें त्याच्या पठाणांचा अतिरेक व त्याहूनहि जास्त म्हणजे पुण्यास घडलेला प्रसंग होय (इ. स. १८०३ ). त्या वेळीं त्यांनीं त्याला पकडून बेदम मारलें इतकेंच नव्हे तर त्याच्या पागोट्याचा फांस त्याच्या गळ्याला लावून ते

त्याचा जीव घेण्याच्या बेतांत होते. यशवंतरावानें ही बंडाळी मोडून बंडखोरांनां शिक्षा ठोठावल्या; तरी त्यांचा समूळ नायनाट करण्यास अमीरखान कबूल होईना. कारण पुढें मागें ते आपला सूड उगवतील अशी त्याला भीति वाटत होती. प्रत्यक्ष पुण्याच्या शेजारीं सुद्धां गोहत्या करून अमीरखानाचे शिपाई हिंदूंनां चिडवीत. पण त्याबद्दल त्यांनां शिक्षा होत नसे, ही एकच गोष्ट ते इतर वेळीं किती उद्दामपणानें वागत असतील याची कल्पना येण्यास पुरेशी आहे. यशवंतराव त्यांनां नेहमीं कोठें तरी दूरच्या मोहिमीवर गुंतवून ठेवीत असे. तो त्यांनां लुटारूपेक्षां अधीक महत्त्व देत नसे, व त्यांचा उपयोग त्यांच्या पुढाऱ्याशींच फक्त संबंध ठेवून करून घेतां येण्यासारखा आहे हें तो जाणून होता. उलटपक्षीं हे पेंढारीहि एका प्रमुख संस्थानिकाच्या वतीनें लुटालूट करण्यांत केवढा फायदा आहे हें जाणून होते. व अमीरखानास त्यांचा पुढारी होण्याचें श्रेय केवळ होळकर घराण्याशीं त्याचा संबंध असण्यावरच अवलंबून होतें.

यशवंतराव व अमीरखान विभक्त होईपर्यंत अमीरखानाचा इतिहास यशवंतरावाच्या इतिहासाशीं संबद्ध आहे. मराठ्यांच्या इतिहासांत त्याचा उल्लेख कित्येक ठिकाणीं येतो. इ. स. १८०३ च्या एप्रिल महिन्याच्या सुमारास फत्तेसिंग माने व अमीरखानाची कांहीं फौज यांची कृष्णा व भीमा नद्यांच्या दरम्यान लुटालूट चालली होती. जनरल वेलस्ली आल्यावर त्यानें ह्यांनां लुटालूट बंद करण्यास सांगतांच फत्तेसिंग माने परत फिरला. पण तो भीमा नदी ओलांडून गेला नसेल तोंच अमीरखानास फत्तेसिंग बाजीरावास जाऊन मिळतो कीं काय अशी शंका येऊन त्यानें त्याला पकडून त्याचे लोक उधळून लावण्याचा प्रयत्न केला (ग्रांट-डफ पु. ति. पृ. २३०). पुढें १८०४ सालीं होळकर व इंग्रज यांच्या दरम्यान युद्ध चाललें असतां, अमीरखानानें बुंदेलखंडांतील एका किल्लेदाराच्या मदतीस जाऊन तो किल्ला सर करण्यास आलेल्या इंग्रजांच्या सैन्यांतील तोफखाना हस्तगत केला. व तोफखान्यावरील पन्नास एक लोक व पायदळाचे दोन कंपु कापून काढले. यानंतर त्यानें काल्पीवर हल्ला केला पुढें कित्येक दिवसपर्यंत त्यानें बुंदेलखंडांत इंग्रजांशीं गनिमी काव्यानें लढणें चालू ठेविलें (कित्ता पृ. २७७). १८०५ सालीं इंग्रजांनीं भरतपुरास वेढा दिला तेव्हां अमरिखान हा वेढा देऊन बसलेल्या सैन्यास त्रास देण्याकरितां बुंदेलखंडांतून परत आला, व वेढ्यांतील शत्रूचें कांहीं सैन्य दुसरीकडे काढून घेण्याकरितां रोहिलखंडांत जाऊन तेथें तो लुटालूट करूं लागला. इंग्रजांचें सैन्य पाठीवर असतांहि कांहीं दिवस त्यानें हें काम चालू ठेविलें, पण पुढें जेव्हां इंग्रजांच्या सैन्यानें त्यास गांठून त्याचा पराभव केला व लोकहि त्याचा प्रतिकार करण्यास सज्ज झाले तेव्हां तो पुन्हां भरतपुरास होळकरांच्या सैन्यास येऊन मिळाला (कित्ता पृ. २९४-९७).

१८०५ च्या डिसेंबरांत सेनापति लेक याजबरोबर तह करून यशवंतराव होळकर उत्तर हिंदुस्थानांतून परत फिरल्यावर अमीरखान व होळकर यांचा संबंध फार दिवस राहिला नाहीं. जयपूर व जोधपूर येथील राजे उदेपूरच्या राजकन्येसाठीं आपसांत लढत असतां जयपूरच्या राजानें होळकरापाशीं मदत मागितल्यावरून होळकरानें अमीरखान यास त्याच्या पठाणांसह जयपुराकडे रवाना केलें (इ. स. १८०८). जयपूर व जोधपूरमधील सदरहू भांडणाचा अमीरखानाच्या चरित्राशीं विशेष संबंध असल्यामुळें त्यासंबंधीं सविस्तर हकीगत मालकमच्या 'मेमोयर्स ऑफ सेंट्रल इंडिया' या ग्रंथावरून पुढें दिली आहे.

जयपूरचा राजा जगत्सिंग याचा जोधपूरच्या राजाशीं उदेपूरच्या राजकन्येच्या विवाहाबद्दल तंटा होता. सर्व रजपुतांत उदेपूरचें राजघराणें श्रेष्ठ मानीत व त्याच्याशीं संबंध जडणें हा अतिशय मोठा मान समजून सर्व रजपूत राजांमध्यें तो घडून येण्याबद्दल अहमहमिका लागे. उदेपूरची राजकन्या कृष्णाकुमारी ही आपल्या उच्च कुलाच्या जोडीस आणखी अद्वितीय सौंदर्य घेऊन अवतरली होती. जोधपूरचा माजी राजा भीमसिंग याच्याशीं तिचा विवाह निश्चित झाला होता. त्याच्या मरणानंतर त्याचा दूरचा नातेवाईक मानसिंग गादीवर बसला. पण दोन वर्षांनीं भीमसिंगाचा दिवाण सवाईसिंग यानें कोणीतरी एक खराखोटा राजपुत्र पुढें करून त्याला गादीवर स्थापण्याकरितां एक पक्ष तयार केला व आपला हेतु तडीस नेण्याकरितां जोधपूर आणि जयपूर येथील राजांमध्यें हाडवैर उत्पन्न करण्याचा आटोकाट प्रयत्न केला. मानसिंग उदेपूरच्या राजकन्येशीं लग्न लावण्याची आशा धरून आहे हें कळतांच त्यानें जयपूरचा राजा जगत्सिंग याला तिच्यासाठीं मागणी घालण्याची भर दिली. कृष्णाकुमारीच्या अप्रतिम सौंदर्याला हुरळून जगत्सिंगानें तिच्यासाठीं उदेपूरच्या राण्याकडे मागणी घातली व एक वेळीं हें लग्न निश्चित झाल्यासारखेंहि झालें होतें. पण जयपूरच्या राजाला कृष्णाकुमारी देण्याचें ठरलेलें ऐकून जोधपूरचा राजा आपला पहिला हक्क सांगूं लागला व तिचा आपल्या प्रतिस्पर्ध्याशीं विवाह होऊं नये म्हणून तो वाटेल तें करण्यास सिद्ध झाला. अशा रीतीनें रजपूत राजांमध्यें कलहाग्नि पेटतांच दोन्हीहि पक्षांनीं आसपासच्या संस्थानिकांस आपल्या मदतीस येण्याविषयीं विनंति केली. तेव्हां शिंद्यानें बापूजी शिंदे आणि सर्जेराव घाटगे या दोन क्रूर सरदारांनां आणि होळकरानें अमीरखानास या रजपूत राजांच्या मदतीस रवाना केलें. या भांडणामुळें दोनहि संस्थानांचें अतोनात नुकसान झालें. जयपूरला या शोकपर्यवसायी युद्धासाठीं कमींत कमी एक कोट वीसलाख रुपये तरी खर्च आला असावा.

मानसिंग या लढाईंत गुंतला आहे असें पाहून सवाईसिंगानें धोकुलसिंग या बाप वारल्यावर जन्मलेल्या राज-

पुत्राला गादीवर बसविण्याविषयीं जोरानें खटपट चालविली. यावेळीं मौनसिंगाला मदतीची अत्यंत जरूर होती. परंतु सवाईसिंग केवळ आपण एकटाच त्याची बाजू सोडून गेला नाहीं, तर इतर सरदारांनां सुद्धां त्यानें फोडलें. यामुळें मौनसिंगाचा पराभव होऊन थोड्या अनुयायांसह त्याला पळ काढावा लागला. यावर जगत्‌सिंगानें व त्याच्या पक्षाच्या मंडळींनीं जोधपूरची छावणी लुटून जोधपूरपर्यंत मौनसिंगाचा पाठलाग केला. तेव्हां ही संधि साधून इकडे जोधपुरांत धोकुलसिंग याला गादीवर बसविण्यांत येऊन बहुतेक सर्व राठोड वीरांनीं त्याच्याशीं इमान राखण्याविषयीं शपथ घेतली.

अशा रीतीनें हें भांडण बंद पडल्यासारखें वाटलें; पण मौनसिंग कच खाणारा माणूस नव्हता. त्यानें प्रथमपासूनच शत्रुपक्षांत दुफळी करण्याचें काम चालविलें होतें, व बरेंच दिवसपर्यंत लांबलेल्या वेढ्यामुळें त्याला जरा जोर आला. अमीरखानानें त्याचें म्हणणें ऐकिलें आणि पगार थकल्याचा बहाणा करून वेढा देणाऱ्या सैन्यापासून तो फुटून निघाला, व जोधपूर आणि जयपूर हद्दींतून लुटालूट करूं लागला. जयपूरच्या प्रत्येक सरदाराला त्याच्या लुटालुटीमुळें बरेंच नुकसान पोंचून त्यांनीं जगत्‌सिंगाकडे ओरड केली, तेव्हां त्यानें अमीरखानावर एक तुकडी पाठवून दिली. प्रथम अमीरखान टोंकपर्यंत मागें हटला, पण लवकरच त्याला तोफा व सैन्य यांची मदत मिळून त्यानें जयपूरच्या सैन्यावर हल्ला करून त्याचा सपशेल पराभव केला. आतां अमीरखान जयपुरांत प्रवेश करतो असें वाटून तेथील लोक मोठे हवालदिल झाले. पण दुसऱ्या कित्येक प्रसंगाप्रमाणेंच यावेळींहि अमीरखानानें जें वर्तन केलें त्यावरून त्याची लुटारू लोकांचा नायक होण्यापेक्षां कांहींच अधिक महत्त्वाकांक्षा नव्हती असें लोकांच्या निदर्शनास आलें. जयाचें मोठें बक्षीस सोडून तो जयपूरच्या आसमंतांत केवळ लूटालूट करण्यांतच समाधान मानून राहिला.

जयपूरच्या सैन्याच्या पराभवाची वार्ता समजतांच वेढा घालणाऱ्या सैन्यांत मोठा गोंधळ उडाला आणि जगत्‌सिंगानें राजधानीला परत फिरण्याचा बेत करून शिंद्याकडील मदतीस आलेल्या लोकांनां आपल्याला तेथपर्यंत सुरक्षित पोंचविण्याबद्दल मोठी रक्कम देऊं केली. पहिल्या लढाईंत जिंकून घेतलेला तोफखाना व लूट जयपूरचा राजा परत घेऊन जाऊं लागला तेव्हां जोधपूरच्या इमानी राठोड वीरांनीं त्याच्यावर हल्ला करून ती परत मिळविली व अमीरखानास मिळून ते मोठ्या समारंभानें जोधपुरांत प्रवेश करते झाले.

अशा रीतीनें मौनसिंगाचें गेलेलें वैभव पुन्हां त्याला परत मिळालें. पण त्याचा शत्रु सवाईसिंग जिवंत असे पावेतों त्याला मोठी धास्ती होती. सवाईसिंगानें नागोरचा आश्रय घेतला होता. मौनसिंगानें अमीरखानाला त्याच्यावर चाल करून जाण्यास सांगितलें व त्याबद्दल आगाऊ दोन लाख रुपये व काम फत्ते झाल्यावर मोठें बक्षीस देऊं केलें. खानानें हें काम हातीं घेतलें, पण शक्तीपेक्षां युक्तीचाच अवलंब करण्याचें त्यानें ठरविलें. मौनसिंगाच्या कृतघ्नपणाविषयीं संशय येऊन आपण इकडे आलों आहों असा बहाणा करून तो नागोरपासून थोड्या मैलांवर उतरला व सवाईसिंगाशीं त्यानें सख्याचें बोलणें सुरू केलें. सवाईसिंगाला यांत कांहीं कपट असावें असा संशय आला, पण अमीरखानानें त्याजकडे पाठविलेल्या वकिलानें अमीरखानाच्या सचोटीबद्दल हमी भरून सवाईसिंगाकडून अमीरखानाला भेटावयास येण्याचें वचन घेतलें. वचन पुरें करण्याची वेळ आली तेव्हां सवाईसिंग कचरूं लागला पण अमीरखान स्वतः त्याला भेटावयास गेला व शपथा वगैरेंनीं त्याचें मन वळवून त्यानें त्याचा विश्वास संपादन केला परंतु अखेरीस सवाईसिंग अमीरखानाच्या भेटीस आला तेव्हां अमीरखानानें आपलें खरें रूप प्रगट करून सवाईसिंग व त्याच्याबरोबर आलेले अनुयायी या सर्वांस कंठस्नान घातलें. सवाईसिंग या बक्षिसाला कितीहि पात्र असला तरी अमीरखानाचा भयंकर गुन्हा त्यामुळें कमी होत नाहीं. त्याच्या अंगीं माणुसकी किंवा नीतिमत्ता बिलकुल वास करीत नव्हती हें यावरून उघड सिद्ध होतें.

वरील गोष्टी घडत असतांना इकडे यशवंतरावास वेड लागून त्याला अटकेंत ठेवण्याची आवश्यकता दिसूं लागली. हें ऐकून अमीरखान नागोर उध्वस्त केल्यावर रामपुरा येथें आला. तेथें असें ठरलें कीं अमीरखान यानें तुळसीबाईच्या नांवावर होळकराचा सर्व राज्यकारभार चालवावा (इ. स. १८०८-ग्रांटडफ पु. ति. पृ. ३२१). यानंतर अमीरखान होळकर आणि नागपूरचे भोंसले या दोघांत कांहीं हक्कासंबंधीं तंटे होते ते मिटविण्याचा बहाणा करून नागपूरकर भोंसल्यांच्या मुलुखांत शिरला [इ. स. १८०९]. पण वास्तविक त्याचा हेतु केवळ लुटालूट करण्याचाच होता. अमीरखान आपला तोफखाना आणि पायदळ जोधपूर येथें महंमदशहा खानाच्या स्वाधीन करून आला होता, तरी त्याच्या बाजूस सर्व पेंढारी आणि भोपाळचा नवाब मिळाल्या कारणानें त्याचें सामर्थ्य बरेंच वाढलें होतें. भोपाळच्या नवाबाचें रघूजी भोंसल्याशीं वांकडें असल्याकारणानें तो या प्रसंगीं अमीरखानास येऊन मिळाला होता. परंतु अमीरखानास आपलें लुटालुटीचें कार्य अप्रतिबंधपणें करावयास मिळालें नाहीं. इंग्रजांनीं मध्यें पडून त्यास रघूजीच्या मुलुखांतून नर्मदापार हांकून लाविलें (ग्रांटडफ पु. ति. पृ. ३२५).

यावेळीं होळकराच्या संस्थानांत माजलेली बंडाळी, शिंद्याच्या राज्यांत असणारी अस्वस्थता, निजामाच्या प्रजेंत शिरलेलें राजद्रोहाचें वारें, आणि अमीरखानाच्या हाताखालीं असलेलें अवाढव्य सैन्य यांचा विचार करतां अमीरखानास मुसुलमानी सत्ता पुन्हां प्रस्थापित करण्यास

ही वेळ अतिशय अनुकूल होती यांत संशय नाहीं. पण त्याचा तशा प्रकारचा केव्हांहि उद्देश नव्हता असें मानण्याला बरीच जागा आहे. त्याचे पठाण अनुयायी नेहमीं म्हणत कीं, हा दिल्लीचा बादशहा होईल हें एका फकिरानें केलेलें भविष्य बहुतेक खरें ठरणार आहे. पण अमीरखानानें स्वतः कधीं तशी इच्छा मनांत धरली नाहीं किंवा तसें त्यानें बोलूनहि दाखविलें नाहीं. तो स्वतःस केवळ होळकराचा आश्रित मानीत असे. इतकेंच नव्हे तर लुटारू सैन्याचा अधिपति होण्यापलीकडे राज्य स्थापण्याच्या दिशेनें त्यानें कोणताच प्रयत्न केलेला नाहीं.

नागोरहून परत आल्यावर आणि यशवंतराव व त्याचें कुटुंब यांची धर्मकुंवरपासून मुक्तता केल्यावर अमीरखान एका शोकपर्यवसायी नाटकांतील मुख्य नट बनला. जयपूर आणि जोधपूर येथील राजांत समेट घडवून आणण्याचें धोरण शहाणपणाचें व सुरसहागिरिचें होतें व तें तडीस नेण्याचें काम अमीरखानानें आपल्याकडे घेतलें. ही गोष्ट दुहेरी लग्नानें साधावयाची होती. म्हणजे जगत्‌सिंगाला मौनसिंगाची मुलगी आणि मौनसिंगाला जगत्‌सिंगाची बहीण देऊन ह्या दोन घराण्यांचा संबंध दृढ करावयाचा होता. हीं दोन लग्नें साधण्याकरितां तंट्याचें मूळ जी उदेपूरची राजकन्या कृष्णाकुमारी तिला नाहींसें करणें अवश्यक आहे असें अमीरखानाला वाटून त्यानें उदेपूरच्या मंत्र्यांनां आपला विचार पटवून देण्याचा प्रयत्न केला (इ.स.१८१० ). भांडणाचें मूळ जिवंत असतांना हिंदुस्थानांतील बलाढ्य रजपूत संस्थानांतून शांति नांदणें शक्य नाहीं. एकाला मुलगी देणें म्हणजे दुसऱ्याला दुखविणें होय. बरें शेवटचा उपाय म्हणून मुलगी अविवाहित ठेवावी तर ती रजपूत कुळाला बट्टा लावणारी गोष्ट होय असा बुद्धिवाद लढवून अमीरखानानें आपली बाजू त्या लोकांपुढें मांडली. कृष्णाकुमारीच्या बापाला ही गोष्ट (म्हणजे प्रत्यक्ष पोटच्या गोळ्याचा जीव घेणें किंवा तिला आत्महत्या करण्याला उद्युक्त करणें ) आवडली नाहीं; पण राण्याची बहीण चांदबाई हिनें हें दुष्कर्म अंगावर घेतलें व कृष्णाकुमारीला आपल्या बापाची, घराण्याची व राष्ट्राची अब्रू वांचवण्याचा उपदेश करून तिच्यापुढें विषाचा प्याला केला. कृष्णाकुमारी शहाणी होती. तिनें सर्वांवरचीं संकटें दूर सारण्यासाठीं म्हणून आत्महत्या करण्याचें खुषीनें कबूल केलें, व एकामागून एक असें तीन प्याले विष गट्ट केले. शेवटचा प्याला घेण्यापूर्वी "हेंच लग्न माझ्या नशिबीं वाढून ठेवलें होतें" असे तिनें हृदयद्रावक उद्‌गार काढिले. राजवाड्यांत काय चाललें आहे याची सर्वांनां जाणीव होती. तिच्या अप्रतिम लावण्यामुळें व तारुण्यामुळें सर्वांच्या मनावर फारच परिणाम झाला. उदेपूर शहरांत तिच्या मृत्यूची बातमी पसरतांच जिकडे तिकडे हाहाःकार उडाला व अशा अबलेचा बळी घेऊन ज्यांनीं सौख्य संपादन केलें त्यांच्या नामर्दपणाविषयीं छीः थूः होऊं लागली. लवकरच कृष्णाकुमारीची आई मुलीच्या शोकानें गतप्राण झाली. अमीरखानाचा या कृत्यांतील हस्तक जो अजितसिंग नांवाचा उदेपूरच्या थोर कुलांतील सरदार त्यानें उदेपूरला आणलेली नामोशी सुगवानसिंग (करंधरच्या संस्थानिक) यानें आपल्या मानी वर्तननें स्वच्छ केली असें म्हणण्यास हरकत नाहीं. कृष्णाकुमारीचा अशा रीतीनें अंत झालेला ऐकतांच तो महाराण्याच्या दरबारीं येऊन आपल्या कमरेची तलवार त्याच्या पायापाशीं ठेवून शांत पण करारी मुद्रेनें म्हणाला. "राणाजी माझ्या पूर्वजांनीं तीस पिढ्यांच्यावर आपली चाकरी केलेली आहे. तुमच्या विषयीं मला काय वाटतें हें बोलून दाखवितां येत नाहीं, पण आजपासून माझें शस्त्र आपल्या करितां कधींहि उचललें जावयाचें नाहीं." यानंतर अजितसिंगाकडे वळून तो म्हणाला "रजपुतांच्या नांवाला तूं बट्टा लावला आहेस. तूं सतीर्तहा होऊन मरशील." सुगवानसिंग शेवटपर्यंत बोलल्याप्रमाणें वागला, व इकडे अजितसिंगहि संततिहीन होऊन शेवटीं तुच्छतेप्रत पावला.

इ. स. १८११ च्या आक्टोबरांत यशवंतराव होळकर मृत्यु पावला व तुळशीबाईनें मल्हारराव होळकरास दत्तक घेतलें. अमीरखान हा पुढें लवकरच राजपुतान्यांत गेला. परंतु रामपुऱ्याहून निघण्यापूर्वी त्यानें गफूरखान नामक आपल्या एका नातलगास तुळसीबाईकडून जहागीर देववून त्याला आपला प्रतिनिधि म्हणून तिजपाशीं ठेविलें (ग्रांट डफ पु. ति. पृ. ३२१).

उदेपूरचें प्रकरण आटोपल्यावर अमीरखान जोधपुरास गेला. जयपूर आणि उदेपूर यांच्यांतील भांडणें मिटल्यापासून त्याच्या सैन्याच्या मुसुलमानी तुकड्या लुटालुटीकरितां संबंध राजपुतानाभर हिंडत असत (१८१२–१३). कधीं कधीं सैन्यांत बंडाळी होऊन किंवा सरदारामध्यें भांडणें होऊन किंवा चांगल्या तटबंदी प्रदेशांचा त्यांनां पुष्कळ विरोध होऊन त्यांचे लुटालुटीचे प्रसंग कांहीं काळ बंद पडत [१८१४–१५ ].

थोड्या वर्षांतच, जोधपूरचें राज्य खालावत चाललेलें पाहून दिवाण इंदुराज आणि राजगुरु देवनाथ यांनीं देशांतील विध्वंसक माणसें दूर करण्याचें ठरविलें. त्यांनीं अमीरखानाला राज्य सोडून जावयास सांगितलें व तोहि तसें करण्यास कबूल झाला. पण आपली सर्व बाकी ताबडतोब चुकती करण्याविषयीं त्यानें आग्रह धरला. संस्थानानें आपल्या शक्त्यनुसार त्याची फेड केली व आतां सर्व कारभार सुरळीत चालेल असें सर्वांनां वाटलें. त्याप्रमाणें अमीरखानानें जोधपूर सोडलें व त्याचें थोडें सैन्य मात्र कांहीं बाकी वसूल करण्यासाठीं पाठीमागें राहिलें होतें. या सैन्यानें इंदुराजाला पेचांत धरलें व कांहीं बोलाचाली होऊन इंद्रराज आणि राजगुरु देवनाथ हे दोघेहि मारले गेले. अमीरखानानें 'आपला यांत

कांहीं संबंध नव्हता व सैन्याच्या उद्दामवृत्तीमुळें ही गोष्ट घडून आली' असें वरकरणी दाखविलें. तरी त्याच्या हुकुमावरून व त्याला माहीत असतांना हा प्रकार घडला असें म्हणण्यास बरींच कारणें आहेत असें मालकम ह्मणतो. देवनाथावर मौनसिंगाची फार भक्ति असल्यामुळें त्याला मोठा जबरदस्त धक्का बसून त्यानें ताबडतोब वैराग्यवृत्ति धारण केली. त्यानें लोकांशीं संभाषण करणें सोडलें, श्मश्रू करविण्याचें बंद करून दाढीचे केंस वाढूं दिले आणि अशा स्थितींत तो केवळ मेल्याप्रमाणें आयुष्य कंठूं लागला. तेव्हां त्याचा मुलगा चतुरसिंग यानें राज्यकारभार हातीं घेऊन तो आपल्या मरणापर्यंत ( १८२२ ) चालविला. त्याच्या मृत्यूनंतर मात्र मौनसिंगानें आपलें वेड टाकून देऊन पुन्हां तो पूर्ववत राज्यकारभार पाहूं लागला.

अमीरखान परत जोधपूरला गेला नाहीं. पुढील दोन वर्षें तो जयपूर लुटण्यांत गुंतला होता. माधवराजपूरच्या किल्ल्याला त्यानें नऊ महिने वेढा दिला होता, व तो आपल्या बंडखोर सैन्याच्या मदतीनें तो घेणार इतक्यांत सर डेव्हिड ऑक्टरलोनी पेंढाऱ्यांचा नायनाट करण्यासाठीं राजपुतान्यांत उतरला. अमीरखानाला जेव्हां दिसून आलें कीं, आपणांस या इंग्रज सेनापतीशीं विरोध करण्यांत यश येणार नाहीं, तेव्हां तो ब्रिटिशांनीं सांगितलेल्या अटीवर आपला लुटारूपणा सोडण्यास तयार झाला. या अटीमुळें त्याला जरी आपलें लुटारू सैन्य सोडून द्यावें लागलें तरी त्याला स्वतःला संस्थानिकासारखी जहागिरी मिळाली; अर्थात् या तहानें त्याचें स्वतःचें कांहींच वाईट झालें नाहीं. उलट होळकरांच्या राज्यांतील त्याच्याकडे असलेला जवळ जवळ पंधरा लक्षांचा मुलुख त्याच्या कडेच ठेवण्यांत येऊन शिवाय बक्षिसादाखल म्हणून इंग्रज सरकारनें रामपूर जिल्हाहि त्यास दिला. या तहावर अमीरखानातर्फे त्याच्या हस्तकानें दिल्ली येथें ता. ९ नोव्हेंबर सन १८१७ रोजीं सही केली होती. पण स्वतः अमीरखानानें या तहास आपली संमति देण्यास थोडी दिरंगाई केली. कारण अमीरखानाच्या छावणींत यावेळीं पेशव्यांचा वकील आला असून शिवाय त्याची पुणें व नागपूर दरबारच्या राजकारणावरहि बारीक नजर होती.

अमीरखानानें ज्या कांहीं आशा मनांत बाळगल्या होत्या त्या सर्व विलयास गेल्या. त्यामुळें आणि बेकार झालेल्या त्याच्या अनुयायांच्या शिव्याशापामुळें तह केल्यावरहि कांहीं दिवस त्याचें मन अस्वस्थच होतें. पण गव्हर्नर जनरलच्या उदारपणामुळें त्याला स्वस्थता लाभली. तो फार धोरणी असून कधीं कधीं त्यामुळें त्याच्या शौर्याबद्दल संशय उत्पन्न होई. व अर्ध्या हिंदुस्थानांतील पेंढारी लोक आपल्या हुकुमतींत ठेवण्याची शक्ति ज्याच्या अंगीं होती त्यानें ब्रिटिश सरकारशीं वैर टाकून देशांत स्वस्थता कशी नांदूं दिली यांचेंहि आश्चर्य वाटतें. त्याच्या सत्तेचा लगाम म्हणजे त्याचा दरारा, तो अजीवात मावळतांच तो अगदीं निर्माल्यवत होऊन राहिला. होळकरदरबार, त्याजकडे ज्यामुळें तो उदयास आला त्या संस्थानचे लचकेतोडणारा मनुष्य, अशा दृष्टीनें पहात असे. मंडलेश्वराच्या तहापूर्वी व नंतर इंग्रज सरकार आणि होळकर यांच्यामध्यें मध्यस्थी करण्याची जेव्हां त्यानें आपली इच्छा दर्शविली तेव्हां सर्वच पक्षांनीं त्याला शत्रुसमान लेखल्याचें उघड दिसून आलें. तथापि अमीरखानांत जर कांहीं सद्‌गुण असेल तर तो मित्रप्रेम हा असून यशवंतराव होळकराशीं त्यानें अखंड मित्रत्वाचेंच वर्तन ठेविलें होतें. यशवंतरावाच्या दुष्ट संवयी घालविण्याचा त्यानें जो आटोकाट प्रयत्न केला त्याचें कारण तरी हेंच. सादरीजवळ धर्मकुंवराशीं जें युद्ध झालें त्यांत अमीरखानानें आपल्या जिवाकडे न पाहतां मित्राची बाजू संभाळिली. त्याचे कट्टे दुष्मनहि त्याचा हा गुण कबूल करितात.

[ संदर्भ ग्रंथ.—मालकमकृत मेमॉयर्स ऑफ सेंट्रल इंडिया ग्रांटडफ].

**अमूदर्या किंवा ऑक्सस**— मध्य आशियांतील मोठ्या नद्यांपैकीं एक नदी. हिला संस्कृत व बौद्ध ग्रंथांत वंक्षु असें म्हटलें आहे.

१८८५ मध्यें रशिया–अफगाण सरहद्द ठरविण्याकरितां नेमलेल्या कमिशनची बैठक होईपर्यंत उत्तर ऑक्सस प्रदेशाची माहिती फार कमी होती व या नदीचा प्रवाह कसा जातो याची रूपरेखाहि स्पष्ट नव्हती रशियन संशोधक व टेहळणी करण्यांत वाकबगार असे हिंदी लोक यांनीं बरीच मेहनत घेऊन या नदीचा प्रवाह व त्याला मिळणाऱ्या सर्व नद्या शोधून काढिल्या. पामीरमधील व्हिक्टोरिया सरोवरापासून अफगाण तुर्कस्थानच्या अंधुकी जिल्ह्याच्या कांठावर असलेल्या खमिआबपर्यंतच्या सुमारें ६८० मैलांच्या प्रदेशाची ही ऑक्सस नदी अफगाणिस्तान व तुर्कस्तान यांच्यामधील सरहद्द होऊं शकते. खमिआबच्या खालीं आणखी ५५० मैल हिचा प्रवाह स्वैर व शिथिल असा होत जाऊन शेवटीं आरल समुद्रांत तो गडप होतो. चर्जुयी ( खमिआबच्या खालीं १५० मैल ) येथें हिच्यावर लांकडी पूल बांधला असून मर्व्हपासून समरकंदपर्यंतची रशियन रेल्वे यावरून गेली आहे.

पुष्कळ वर्षेंपर्यंत ऑक्ससच्या उगमाबद्दल एक मोठा मनोरंजक भौगोलिक वाद माजून राहिला होता व या वादापासून कांहीं राजकीय महत्त्वाची बाबहि उपस्थित झाली होती. कारण रशिया–अफगाण सरहद्दीवर या उगमाचा संबंध प्रत्येकाला मान्य होता.

**अमृत**—ज्या सुखासाठीं सर्व जग धडपडत असतें त्या सुखाची राखरांगोळी करणारा मृत्यु कोणास प्रिय वाटेल? तेव्हां अशा मृत्युपासून सुटका करून घेण्यासाठीं जगदुत्पत्तीपासून मनुष्य कांहीं किमया शोधण्याच्या मार्गांत आहे. देव मनुष्यापेक्षां श्रेष्ठ, तेव्हां ते साहजिकच मरणाधीन नसणार.

ते अमर असण्याचें कारण एक अमर करणारा पदार्थ त्यांच्याजवळ आहे अशी प्राचीन भावना. अमृत हा शब्द वैदिक वाङ्मयांत अनेक ठिकाणीं आलेला आहे. परंतु तो अ+मृत=मरणरहित या अर्थानें व उदक या अर्थानें आलेला आहे;एखादें गोड पेय अशा अर्थानें हा शब्द वैदिक वाङ्मयांत आलेला आढळत नाहीं.

पुराणांत उल्लेखिलेल्या अमृताची हकीकत भागवतांत ( स्कंध ८ अध्याय ६–११ ) पुढीलप्रमाणें आली आहे. एकदां ऐरावतावर बसलेल्या इंद्रास पाहून संतुष्ट झालेल्या दुर्वास ऋषींनीं आपल्या गळ्यांतील माळ काढून प्रसाद म्हणून इंद्रास अर्पण केली..परंतु इंद्रानें तत्काल तिचा स्वीकार न केल्यामुळें ती माला खालीं पडली व ऐरावताच्या पायाखालीं तुडवली गेली. ही मालेची अवस्था पाहून अत्यंत क्रुद्ध झालेल्या दुर्वासांनीं, 'तुझें ऐश्वर्य व इंद्रपद नष्ट होईल' असा त्याला शाप दिला. त्यामुळें इंद्र व सर्व देव यांचें सर्व ऐश्वर्य नष्ट झालें व अशा प्रकारें हतवीर्य झालेल्या देवांचा दैत्य–दानवांकडून वारंवार पराभव होऊं लागला. महाभारतांत समुद्रमंथनाची जी कथा आहे (आदिपर्व अ.१७-१९ त्यांत वरील कारण दिलेलें नाहीं. बाकीची सर्व कथा आहे.) नंतर ब्रह्मदेवासह सर्व देव विष्णूला शरण गेले असतां तुम्ही दैत्यांशीं सलोखा करून त्यांच्या मदतीनें समुद्रमंथन करून त्यांतून अमृत काढा म्हणजे त्याच्या प्राशनानें तुम्हीं दैत्याकडून पराभव पावणार नाहीं असें विष्णूनें सांगितलें. विष्णूची ही युक्ति देवांस पसंत पडून ते दैत्याकडे गेले आणि त्यांनीं समुद्रमंथनाची कल्पना दैत्यांनां सांगितली. दैत्यांनींहि समुद्रांतून निघणारें अमृत अर्धें आम्हांसहि मिळालें पाहिजे या अटीवर समुद्रमंथनास येण्याचें कबूल केलें. नंतर देव व दैत्य यांनीं मिळून मंथनासाठीं मंदर नांवाचा पर्वत उचलून क्षीरसमुद्राजवळ आणला, व दोरीसाठीं वासुकीला अमृताचा वांटा देण्याचें कबूल करून आणिलें व त्याचा मंदराचलाला वेढा दिला आणि शेपटीकडील बाजू देवांनीं आणि तोंडाकडील बाजू दैत्यांनीं धरून मंथनास सुरवात केली. परंतु त्या मंदराचलाला खालीं आधार नसल्यामुळें तो खालीं जाऊं लागला. तेव्हां विष्णूनें कासवाचें रूप धारण करून मंदराखालीं आधार दिला. त्यामुळें मंथनाचें काम सुरळीत चालू झालें. समुद्रांतून दुसऱ्या अनेक वस्तू निघाल्यावर हातांत अमृताचा एक कलश घेतलेला मनुष्य समुद्रांतून बाहेर निघाला. त्याला पाहतांच दैत्यांनीं अमृतकलश त्या मनुष्याच्या हातांतून हिसकावून घेतला व ते पळून गेले. देवांनीं हें पाहतांच ते अत्यंत दुःखी होऊन विष्णूकडे गेले आणि अमृतासंबंधीं घडलेली हकीकत सांगितली. ती हकीकत ऐकून 'तुम्ही स्वस्थ रहा, तुमचें संकट मी निवारण करतों' असें विष्णूनें सांगितलें आणि मोहिनीचें रूप धारण करून तो दैत्यांच्या जवळ गेला असतां त्या मोहिनी रूपाला मोहित झालेले दैत्य अमृताला विसरून त्या मोहिनीच्याच मागें लागले, व तूंच हें अमृत आम्हां सर्वांनां वाढून देऊन आमच्यावर अनुग्रह कर असें म्हणूं लागले. मोहिनीनेंहि मी करीन तें सर्वांनीं कबूल केलें पाहिजे या अटीवर कबूल करून देवांनां व दैत्यानां ओळीनें बसविलें व देव हे अल्पधीर आहेत यासाठीं प्रथम त्यांची कटकट संपवून सर्व अमृत तुम्हांलाच वाढीन असें सांगून देवांनां प्रथम अमृत वाढण्यास सुरवात केली. देवांनां अमृत वाढल्यावर पुढें आपणांस अमृत मिळेल किंवा नाहीं असा संशय येऊन राहू नामक दैत्य गुप्तरूपानें देवांमध्यें येऊन बसला. हें त्यांचें कपट चंद्र व सूर्य यांनां समजल्यामुळें त्यांनीं विष्णूजवळ चहाडी केली. विष्णूनें तत्काल आपल्या चक्रानें त्याचें शिर उडविलें. परंतु त्याच्या तोंडांत अमृत पडल्यामुळें धड निर्जीव झालें परंतु शिर सजीव राहिलें व तोच केतु नामक असुर झाला व चंद्रसूर्यांनीं त्याच्याबद्दल चहाडी केल्यामुळें तो त्यांनां उपद्रव देऊं लागला. पुढें मोहिनीनें वाढीत असतां देवांमध्येंच सर्व अमृत संपविलें आणि दैत्यांनां कांहींच अमृत शिल्लक राहिलें नाहीं. त्यामुळें देवदैत्यांचें पुन्हां युद्ध सुरू झालें व मोहिनी गुप्त झाली. याप्रमाणें अमृताच्या उत्पत्तीसंबंधीं हकीकत आहे.

चंद्र अमृतमय असून त्यांतील अमृत देव कृष्ण पक्षांत प्राशन करितात व शेवटीं दोन कला अवशिष्ट राहिल्यावर पितर हे चंद्रासमीप त्याच्या पृष्ठभागाकडून जातात व अमावास्येच्या दिवशीं चंद्राच्या किरणांतून निघालेलें सुखकारक अमृत प्राशन करून एक महिनाभर तृप्ति पावतात; असें विष्णुपुराणांत सांगितलें आहे ( अं. २ अ. १२ ).

पाश्चात्यांमध्यें अमरत्व देणारें जें खाद्यपेय कल्पिलें आहे त्याला 'अँब्रोशिया' किंवा 'नेक्टर' असें नांव आहे. अँब्रोशिया हें खाद्य व नेक्टर हें पेय असा बहुधा अर्थ घेतात, पण पुष्कळदां हीं दोन्हीं नांवें अमर करणाऱ्या खायाला व पेयाला दिलेलीं आढळतात. कोणी म्हणतात कीं, हे दोन्ही पदार्थ मधाच्या जातीचे असल्यामुळें त्यांच्या अंगीं साहजिकच मधाप्रमाणेंच शरीर शुद्ध करणारे व आरोग्य देणारे गुण वास करितात. तेव्हां हे अमरत्व देऊं शकतात यांत नवल नाहीं ( रॉश्चर–नेक्टर अँड अँब्रोशिया ). यांचा उटण्यांप्रमाणें उपयोगहि करीत असें होमरवरून दिसतें ( ईलियड १४. १७०; १९. ३८ ).हे पदार्थ सुवासिक असल्यामुळें वासाच्या कामीं वापरावेत असेच असत. देव आपल्या केसांनां हे लावीत असें ग्रीक पुराणांतून वर्णन आहे.

टॉलेमी सोटरची पत्नी बेरेनाइस हिनें व्हीनसनें दिलेला अँब्रोशिया खाल्ला तेव्हांच ती मृत्यूच्या तडाक्यांतून सुटली; अँब्रोशिया खाऊन टिनोनस अमर झाला; यांसारख्या कथा पुष्कळ आहेत. जखमा बऱ्या करण्याचा गुण अँब्रोशियाच्या अंगीं आहे म्हणून व्हर्जिलच्या इनीअडमध्यें व्हीनस इ

पदार्थ लावून आपल्या मुलांच्या जखमा बऱ्या करीत असल्याचें दिसतें.

[ संदर्भग्रंथ—ए. ब्रि. ( अँब्रोशिया; नेक्टर ); लेंप्रेरे—क्लासिकल डिक्शनरी. होमर–ईलियड; व्हर्जिल– निअड. पिंडार. थिओक्रिटस. ओव्हिड. कटलस. रॉश्वर–नेक्टर अँड अँब्रोशिया; लेग्झिकॉन डर मायथॉलॉजी. )

**अमृतचंद्रसूरि**—कुंदकुंदाचार्यांच्या समयसार ग्रंथावर यानें टीका लिहिली आहे. या टीकेचें नांव आत्मख्याति असें आहे. अमरचंद्रसूरि संवत, ९६२ त हयात होता व त्यानें खालील ग्रंथ लिहिलेः—

(१)समयसार टीका,(२)प्रवचनसारटीका,( ३) पंचास्तिकाय टीका, (४) तत्त्वार्थसार, (५) पुरुषार्थ सिध्द्युपाय आणि (६) तत्त्वदीपिका.

**अमृत बाजार**-(बंगाल). जेसोर जिल्ह्यांतील एक खेडें. २३° ९' उत्तर अक्षांश व ८९° ४' पूर्व रेखांश यांवर. लोकसंख्या सुमारें बाराशें. याच ठिकाणीं प्रथम अमृत बझार पत्रिका नांवाचें सुप्रसिद्ध वर्तमानपत्र सुरू झालें. हल्लीं तें कलकत्ता येथें प्रसिद्ध होत असतें हें इ. स. १८६७ मध्यें शिशिरकुमार व मोतीलाल घोष या दोघां तरुणांनीं सुरू केलें. त्यांच्या आईचें नांव अमृतमयी असून तिच्या स्मरणार्थ त्यांनीं लांकडी हात छापखान्यावर स्वतःच खिळे जुळवून व शाई लावून हें पत्र मोठ्या निस्पृहतेनें चालविलें होतें. पुढें त्यांनीं तें कलकत्त्यास नेलें. लॉर्ड लिटनच्या कारकीर्दींत एतद्देशीय वर्तमानपत्राचा कायदा झाल्यावर पत्रिका इंग्रजींत निघूं लागली. पत्रिकेचा आरंभापासूनच सरकारावर वचक असे. तिच्या खोंचदार, सत्य व स्पष्ट भाषेमुळें व गुप्त सरकारी व इतर माहिती अचानक प्रसिद्ध करण्याच्या धाडसामुळें लोकांनां हें पत्र म्हणजे आपला पाठिराखा व सरकारला आणि अरेरावी संस्थानिकांनां तें शत्रूसारखें भासल्यास नवल नाहीं. शिशिरकुमारानंतर मोतीलालजींनीं परवांपर्यंत तें उत्तम रीतीनें चालविलें. त्यांच्या मृत्यूनंतरहि तें जोमानें चालेल अशी अपेक्षा आहे.

**अमृतराय**—धुंडिराज माळुकृत " भक्त कथामृत " ग्रंथांत अमृतराय हे विसामोरो यांचे आश्रित होते असें लिहिलें आहे.

विसामोरो हे अवरंगाबादेस कोणी मुत्सद्दी होते. अमृतरायाचा जन्म शके १६२०व मृत्यु शके १६७५ असें ओकांच्या आधारें आजगांवकर लिहितात.

ध्रुवचरित्रांत " माता उमा परम शंकर तात झाला " अशी अमृतराय स्वतःविषयीं माहिती देतात. मध्वमुनीश्वरांच्या उपदेशानें अमृतराय ईश्वरभक्तीकडे वळले अशी आख्यायिका आहे.

"अविनाशसंदेहहरण" नामक ग्रंथांत अमृतरायांनीं आपल्या गुरूचें नांव अंबिकासरस्वती असें दिलें आहे. व तेंच नांव दुसऱ्या कित्येक पदांत उल्लेखिलेलें आढळतें. तथापि त्यांच्या कवितासंग्रहांत " श्री गुरु मध्वनाथपर अमृतराय बलहारी " असेंहि आढळतें. शिवाय " अमृत-म्हणे तुम्हि भजा निरंतर श्रीधर गुरुचे पाय " असाहि उल्लेख आहे. या गुरुत्रयीवरून अनेक अमृतराय झाले असावेत कीं काय अशी शंका आजगांवकर काढतात. अमृतरायांचे शिष्य पुष्कळ होते. त्यांपैकीं माधव व ब्रह्मगिरी हे कवी असून त्यांनीं आपल्या कवितेंत रायजींचा उल्लेख केला आहे.

अ मृ त रा या चीं का व्यें.—१ गणपतिवर्णन, २ जगदंबावर्णन, ३ ध्रुवचरित्र. ४ शुकचरित्र, ५ सुदामचरित्र, ६ नारदी, ७ कृष्णचरित्र, ८ द्रौपदीवस्त्रहरण, ९ रामचंद्रवर्णन, १० कृष्णवर्णन, ११ राधावर्णन, १२ कृष्णध्यान, १३ मृत्तिकाभक्षण, १४ वत्सलाहरण, १५ रासक्रीडा, १६ कुंजवन विहार, १७ कृष्णलीला, १८ चंद्रावळी, १९ दुर्वासयात्रा, २० पारिजातकाख्यान, २१ जविदशावर्णन, २२ उपदेश, २३ पूतनावध, इ.

याशिवाय ३४ प्रकरणें व १५० पदें छापलीं आहेत. ' दामाजीची रसद ' हें काव्य अमृतरायांचे नसून शिष्य ब्रह्मगिरी यांनीं केलें आहे.

अमृतरायांची वर्णनशैली फार अप्रतिम आहे. सुदामचरित्रांत कृष्णाच्या अपरिमित ऐश्वर्याचें वर्णन, द्रौपदीवस्त्रहरणांत अनेक वस्त्रांची व त्याकरितां प्रसिद्ध असणाऱ्या पेठांचीं नांवें, भोजनांतील पदार्थ, रासक्रीडेंत राग रागिण्या वगैरे पाहिल्यास या म्हणण्याचें प्रत्यंतर येईल. अमृतरायांची कविता कटावबद्ध असल्यानें ती वर्णनास फार साजेशी आहे. कीर्तनकार नेहमीं आपल्या कीर्तनांत रंग भरण्यास अमृतरायांचे कटाव म्हणतात. " कीर्तनसुखार्थ झाला अवतारचि अमृतराय जीवाचा। " असें कविवर्य मोरोपंतांनीं सन्मणिमाळेंत जें म्हटलें तें यथार्थच होय.

अमृतरायांची भाषा साधी, सरस व प्रौढ आहे. त्यांनां हिंदी भाषाहि चांगली अवगत असून तींत त्यांनीं मराठी सारखीं कवनें केलीं आहेत. काव्यांत भक्तिरस व वैराग्य ओतप्रोत दिसत असून प्रसंगविशेषीं शृंगारवीरादि रसहि अंगभूत आहेत.

अमृतरायांच्या कवितेसंबंधीं कांहींशी कल्पना येण्यासाठीं पुढील वेंचे देत आहों:

शुकचरित्रांतील वसंतवर्णनः—वसंत संतत सुलता प्रसवी, कंदर्पाची सत्ता बसवी, समीर दर्पहि वायु सूचवी, पुष्प वाटिका रम्य नेटका, टाकटीका विस्तीर्ण चेटका, वस्ति खेटका, मंत्रें समान सूत्रें साधुनि, कळा कुसरि, निबीड दरी शातिळ छाई, विकसित जाई जुई शेवंती, चमेलीचंपा-गंधमालिती, मंदाराच्या सगळ्या पंक्ती, कोरांटी बहु रंग रंगिती, आराटीची नाहीं जाती, फुलें मोगरे पिंवळी जाती, गोकर्णी गोकर्ण आकृती, एक सुकृतीं तुळशी नवती,

मैसे चेंडू फुलले झेंडू, गेंद शेंदरे लोक आदरे कानिं खोविती, तुरे लाविती, घंट फुलांचे वट्ट मोगरे, द्वार पांगरे निंघ कळीचे कळवळती, मळमळीत फुलले, मल्लिकांच्या दीर्घवल्लिका, कलिका फुलल्या, अपार तेथें पारिजात, जाळें वारिजात, कर तरंगते, भातभातचे वात त्यांत बहुमात करीतों, वनस्पतींचा गुण शिखरीतो, खेड दुपारीं फुलें दुपारीं सरळ सुपारी, गगन चुंबिती, द्राक्ष घडांतें पक्षि भक्षिती, क्षितींवरावर शीतळ नीतळ सपाट वाहति पाट जळाचे, थाट दाट तत्प्रफुल्ल वृक्षीं फाट नसे, परि वाटेमाधिं चोहाटे वांधिले, रत्नशिळा लखलखाट, त्यांच्या कळा फांकति, मधुर शब्द कोकिळा गुंजती, गुंजारवती सकळांमध्यें, बकुळाच्यासम कुळांभोवतें, अलीकुळांचे वृंद हिंडती, मंद मारुतें वृक्ष झुलती, नागकुळें परिसळें झुलती, शुक शुकातें स्पष्ट वोलती, 'अरिष्ट तुज हें आले' म्हणती, धारिष्टानें हरूं पाहती, मुख्य अघाती श्रीरागानें गीत गाती, ऐशी विवशी तुज खायाशी, वश्य कराया लक्ष लाविती, दक्ष मुनी तो अक्ष:कपाटे अक्षय देउनि, क्षेमरूपें सुक्षित जेणें, शमदमसमाधि सादर हृदयीं भरिला ॥ १० ॥

सुदामचरित्रांतील जेवण—'मांडुनि स्वस्तिक सुवर्ण पाट, अडणीवर सोन्याचें ताट, भंवता फल शाखांचा थाट, कांठीं वरण पिंवळें दाट, मीठ मिरें वरि आलें लिंबू, तुतिया खोबरें, किसून कोशिंबीर सुंदर, आम्ल रायतें, रुचिर आयतें कोमळ अंगीं, सगळीं वांगीं. शुभ्र कारलीं, मेथी, पोथी वोथी केळं, कोथिंबीर हळदीसह काथी ताथी साथी चरुसह चाकवत चुका, चवळी पिवळी, कवळ्या शेंगा, चिमकुरादळ चिरुनी, चांगली चमचमीत फोडणी देउनि चरारित चारोळी सांभारें, मउ चिमणी वोंडें, चिंचपान चिंचोळीं तोंडें, कोहळा काशीफळें, कांकडि कुहिरिया, कमळकंद कोंवळी काचरी, दूध भोपळे, दिव्य दोडके, दाळ दिंड शेवाळ वाळकें, ... सुरण अरुवार परवरें, पडवळी तोंडली, कोंडली कंदमूल फळ फूल पत्र तरु वेलमाल घृतपाचिक शाका, वडे नसति वावडे, सार आवडे, तिखट तिळवडे सारविज वडे, सहित पापडे, कथिक वडे, आणिक कोरवडे, शिऱ्यासगटगट पुऱ्या, बऱ्या गुरवळ्या, फाचोऱ्या सांजोऱ्या, मालत्या बोटवे, शुभ्र देटवे, सायसहित शेवाया, शर्करा पायस लुचया, मांडे पांडुरवर्ण पूर्ण पोळिया, घृतें घोळिल्या द्विजें गिळील्या, दुरडी भरुनि घिरडीं, भाजुक साजुक नाजुक राजसवाणे, कानवल्यासी मानवले, साखरफेण्या घिवर घारगे, मोतीचूर जिलेबी दळिया, बारिक ओदन दे अनुमोदन, घमघमाट तो अमोद न राहे, भात केशरी परम कुसरी, दहीं दूध घृत मधु साखर, निंवू घन राब चांबभर पन्हें फुटांचें, मठ्ठा मिठ्ठा, मटमटा बहु मधुर लापसी, लोणकढें थिजलें गाईचें धूप मधुर सुवासिक महा चंगाळ, थोर घंगाळ, वाटीभर एकएक घरांचें, सोळा हजार पदार्थ आले निजभाग्यें भोजनीं, अन्न ब्रह्मरसानुभवानें विप्र जेविला.... इत्यादि.

[संदर्भग्रंथ—आजगांवकर—महाराष्ट्रकविचारित्र भाग पहिला. ओक—काव्यसंग्रह. मोल्स्वर्थ—कँडीकोश—प्रस्तावना. धुंडिराज मालु—भक्तकथामृत. लेंढे—अमृतराय (वि. विस्तार ३२. ८; ३३. ७). सं. क. का. सूची. भरत खंडाचा अर्वाचीन कोश. महाराष्ट्र सारस्वत वाङ्मयसूचि पृ. ३५५].

**अमृतराव**—राघोबादादाचा दत्तक पुत्र. हा गोपाळराव भुसकुटे याचा औरस पुत्र असून इ. स. १७६८ त याला राघोबादादानें दत्तक घेतलें. याचें दत्तविधान झाल्यावर पुढें कांहीं वर्षांनीं राघोबादादास दुसरा बाजीराव व चिमणाजीआप्पा असे दोन औरस पुत्र झाले. त्यामुळें अमृतराव यास पेशवाईचा अधिकार प्राप्त होण्याचा योग आला नाहीं. अमृतराव हा बहुतकरुन राघोबादादाच्या जवळ असे. ज्या वेळीं आनंदीबाई, बाजीराव व चिमणाजीआप्पा हे पेशव्यांच्या प्रतिबंधांत होते त्या वेळीं अमृतरावहि त्यांच्या बरोबरच होता. अमृतरावाचें लग्न राघोबादादानें इ. स. १७७१ मध्यें टोंकें मुक्कामीं मोठ्या थाटानें केलें. अमृतराव हा इ. स. १७९४ पर्यंत नाशकाजवळ आनंदवल्ली येथें होता. तेथून पुढें तो बाजीराव व चिमणाजी आप्पा यांच्याबरोबर शिवनेरी येथील किल्ल्यांत नाना फडणविसाच्या प्रतिबंधांत होता.

इ.स. १७९५ मध्यें सवाई माधवराव मृत्यु पावल्यानंतर परशुरामभाऊ पटवर्धन बाजीरावाला पुण्यास नेण्याकरितां शिवनेरीस आला तेव्हां यानें शिंद्याची वाट पाहून त्याच्या बरोबर पुण्यास जाण्याविषयीं बाजीरावास उपदेश केला, पण बाजीरावानें तिकडे लक्ष दिलें नाहीं. परशुरामभाऊ बाजीरावास घेऊन शिवनेरीहून निघाला तेव्हां याला परशुरामभाऊच्या हुकुमानें तेथेंच अटकेंत ठेवण्यांत आलें (इ. स. १७९६). मागून शिंद्याचा दिवाण बाळोबा तात्या शिवनेरीस आला तेव्हां त्यास अमृतरावाकडून सर्व हकिकत समजली. त्यानें अमृतरावास शिवनेरीहून काढून जांब गांवास आणलें परंतु त्यास बंधमुक्त केलें नाहीं.

पुढें सन १७९६ सालच्या नोव्हेंबर महिन्यांत नानाफडनविसानें बाजीरावास मसनदीवर बसविण्याकरितां पुण्यास आणलें तेव्हां अमृतरावाची कैदेंतून सुटका करण्यांत आली. बाजीराव यास आबाजी कृष्ण शेलूकर याच्या मार्फत साताऱ्याच्या छत्रपतीकडून त्या महिन्याच्या ५ व्या तारखेस पेशवाईचीं वस्त्रें मिळालीं, त्या वेळीं छत्रपतीकडून अमृतराव यासहि बहुमानाचा पोषाख मिळाल्याचा दाखला सांपडतो. या पोषाखाची किंमत रु.११८२॥= होती. याच समयीं बाजीरावानें अमृतराव याच्या खर्चाकरितां परगणे अरुण, परगणे खुटवाड, शहाडौरा इत्यादि सहा महाल नेमून दिले व ते कांहीं दिवस त्याच्याकडे चालू होते. सन १७९७ सालच्या डिसेंबर महिन्यांत नाना फडनविसास कैद करण्याकरितां बाजीरावानें जो कट केला त्यांत अमृतराव सामील होता. त्या महिन्याच्या शेवटच्या दिवशीं नानास कैद

करण्यांत आल्यावर अमृतरावास बाजीरावानें आपला मुख्य कारभारी नेमून गोविंदराव काळे व शिवराम नारायण थत्ते यांनां त्याचे मदतनीस म्हणून ठेविलें. अमृतरावास राघोबादादाबरोबर इंग्रज सैन्याची शिस्त व टापटीप पाहण्याचे अनेक प्रसंग आल्यामुळें त्यानें बाजीरावास सूचना करून इंग्रज सेनापतीच्या हाताखालीं कांहीं कवायती फौज तयार करण्याकरितां पुणें येथें मि. टोन नांवाच्या एका यूरोपीय सरदारास नेमिलें होतें.

बाजीरावानें अमृतरावाच्या तंत्रानें राज्यकारभार चालविला असता तरी देखील त्याचें पुष्कळ हित झालें असतें पण त्यानें दौलतराव शिंद्याशीं सख्य करून अमृतरावाशीं विरोध मांडला. सन १७९८ सालीं घाटगे यानें पुण्यांतील लोकांपासून पैसे उकळण्याकरितां त्या शहरांत जे अत्याचार केले त्यानें अमृतरावास फार चीड आली. ही आपल्या बंधूचीच पैसे गोळा करण्याची युक्ति आहे याची त्या बिचाऱ्यास कल्पनाहि नव्हती व दौलतराव भेटीस आला असता त्याला पकडून कैद करावें असा त्यानें आपल्या भावास सल्ला दिला. दौलतरावाचा काटा मार्गांतून काढून टाकण्यास बाजीराव उत्सुक असल्यामुळें त्यानेंहि लागलीच ह्या गोष्टीस आपली संमति दिली, त्याप्रमाणें अमृतरावानें आबा काळे नांवाच्या पेशव्याच्या एका पलटणीवरील सरदारास शिंद्याला कैद करण्यास तयार केल्यावर बाजीरावानें दौलतरावास भेटीस येण्याविषयीं आज्ञा केली. परंतु तो आल्यावर त्याला पकडण्याचा संकेताप्रमाणें इषारा देऊं कां ? असें जेव्हां अमृतरावानें बाजीरावास विचारलें तेव्हां 'मात्र 'होय' म्हणण्यास बाजीरावाचा धीर झाला नाहीं. इतकेंच नाहीं तर अमृतरावानें तुम्हांस पकडण्याचा कट केला होता करितां त्याच्यापासुन सावध रहा, असें देखील त्यानें पुढें दौलतरावास सांगितलें.

त्याच सालीं घाटगे शिंद्याच्या बायांनां पकडण्याची खटपट करीत असतां अमृतरावानें त्यांना आपल्या छावणींत आश्रय दिला व पुढें जून महिन्याच्या ७ व्या तारखेस रात्रीं शिंद्याच्या पलटणी याच्या छावणीवर अचानक छापा घालण्यास आल्या असतां त्यांच्यावर हल्ला करून यानें त्यांनां पिटाळून लाविलें. शिंद्यानें बाई जेथें राहूं इच्छितील तेथें आपण त्यांच्या खर्चाची व्यवस्था लावून देऊं असे अभिवचन दिल्यामुळें अमृतराव पुण्यास येऊन शिंद्याच्या छावणीजवळ खडकीच्या पुलानजीक तळ देऊन राहिला व शिंद्याच्या बायांनीं विठ्ठलवाडींत मुक्काम केला. अशा रीतीनें तो बेसावध असतां ता. २६ जून रोजीं नदींत ताबूत बुडविण्याकरितां आलेल्या मिरवणुकीच्या व्यवस्थेकरितां म्हणून घाटग्यानें तोफा व पलटणी आणून याच्या छावणीवर आकस्मात् हल्ला करून ती लुटली.

बाजीरावाचें अशा प्रकारचें वर्तन पाहून अमृतराव पुणें सोडून जुन्नर येथें जाऊन राहिला. पुढें बाजीरावानें पुणें येथें अनन्वित कृत्यें केलीं व विठोजी होळकरास हत्तीच्या पायीं देऊन ठार मारलें. या गोष्टीचा सूड घेण्याकरितां यशवंतराव होळकरानें पुण्यावर चाल केली. तारीख २५ आक्टोबर सन १८०२ रोजीं पुण्यास होळकराची शिंदे व पेशवे यांच्या सैन्याशीं लढाई होऊन तींत शिंद्याच्या व पेशव्यांच्या सैन्याचा पराभव झाला, व बाजीराव पुण्याहून पळून सिंहगडास गेला. प्रथमतः यशवंतरावानें बाजीरावास पुण्याला परत आणण्याचा पुष्कळ प्रयत्न केला; परंतु त्यात त्याला यश आलें नाहीं. तेव्हां त्यानें अमृतरावास जुन्नराहून पुण्याला येऊन पेशवाईचा कारभार हातीं घेण्याविषयीं विनंति केली. अमृतरावानें प्रथम बरेच आढेवेढे घेतले. पण शेवटीं तारीख १२ नोव्हेंबर रोजीं तो पुण्यास आला व पुण्याजवळ भांबुर्डें म्हणून गाव आहे तेथें तंबूत तो आपला दरबार भरवूं लागला. या वेळीं होळकराकडून पैशाकरिता पुण्याच्या लोकांचा जो छळ झाला त्याचा बराचसा दोष अमृतरावाकडेहि येतो. तो स्वतः पेशव्याच्या मसनदीवर बसला नाहीं किंवा होळकरानें सुचविल्याप्रमाणें तो आपला पुत्र विनायकराव यासहि मसनदीवर बसवूं देईना. परंतु बाजीराव महाड सोडून इंग्रजांच्या आश्रयास जाताच बाजीरावानें आपल्या पेशवाई पदावर पाणी सोडलें असाच त्याचा अर्थ होत असल्याचें दाखवून त्यानें विनायकरावास मसनदीवर बसविण्याच्या होळकराच्या सूचनेस संमति दिली. होळकरानें त्याप्रमाणें सातारच्या छत्रपतीकडून १८०२ सालीं पेशवाईचीं वस्त्रें आणून तीं विनायकरावास अर्पण केलीं. परंतु या वस्त्राचा उपभोग अमृतरावाच्या मुलास अवघे दोन महिनेहि घेता आला नाहीं. कारण इकडे बाजीरावानें महाडाहून इंग्रजांशीं तहाचें बोलणें लावून ता. ३१ डिसेंबर १८०२ रोजीं वसई येथें तहनामा ठरवून इंग्रजांच्या साहाय्यानें पेशवाईचीं वस्त्रें पुन्हा मिळविण्याची सिद्धता केली. ता. २० एप्रिल सन १८०३ रोजीं वेलस्ली बाजीरावासह पुण्यास येऊन दाखल झाला. त्यापूर्वीं बरेच तास अगोदर अमृतराव पुणें सोडून निघून गेला होता. पुण्याहून निघाल्यावर तो मार्गांतील गावें व खेडीं लुटीत संगमनेरास गेला व नंतर नाशिककडे वळून त्यानें बाजीरावाच्या पक्षाच्या राजे बहादूराच्या फौजेच्या एका टोळीवर हल्ला करून तिचा पराभव केला. पुढें त्यानें नाशिकास जाऊन तें शहरहि लुटलें. हें शहर लुटीत असतां तेथें पुण्याइतकेच माणुसकीस न शोभण्यासारखे प्रकार झाले. यानंतर कांहीं दिवसपर्यंत अमृतराव नाशिकच्या आसमंतांतच होता.

अमृतरावानें अगोदर बाजीरावाशीं समेट करण्याचा बराच प्रयत्न केला. परंतु तो निष्फळ झाल्यावर त्यानें जनरल वेलस्ली याशीं बोलणें लावून पुढें झालेल्या लढायांत तो आपल्या पथकासह इंग्रजांच्या फौजेंत सामील झाला. त्यामुळें इंग्रजांकडून त्याला आठ लक्ष रुपयांचें वार्षिक वेतन

करून देण्यांत आलें. तेव्हां अमृतरावानें आपल्यास राहण्या करितां काशीक्षेत्र पसंत करून तो तेथें जाऊन राहिला.

अमृतराव हा काशी येथें इ. स. १८२४ मध्यें निवर्तला. काशी येथें त्यानें पुष्कळ दानधर्म करून मोठी कीर्ति मिळविली. तेथें त्यानें घाट व देवालयें बांधिलीं व कित्येक अन्नसत्रें स्थापिलीं. अमृतराव पेशव्याच्या दानधर्माचा काशी येथें अद्यापि मोठा लौकिक आहे.

अमृतराव यास विनायकराव उर्फ बापूसाहेब या नांवाचा मुलगा होता. तो त्याच्या पश्चात् त्याच्या जहागिरीचा मालक झाला. अमृतराव यास जें आठ लक्ष रुपयांचें पेनशन होतें. त्यामध्यें एक लक्ष रुपये त्याच्या आश्रयास येणाऱ्या सरदार लोकांसाठीं म्हणून होते; परंतु तसे सरदार कोणी त्याच्याबरोबर उत्तर हिंदुस्थानांत गेले नाहींत. म्हणून ब्रिटिश सरकारनें विनायकराव यास आठ लक्षांऐवजीं फक्त सात लक्षच पेनशन चालू केलें. विनायकराव हा इ. स. १८२९ मध्यें चित्रकूटाजवळ कारवी या नांवाचें एक गांव आहे, तेथें राहण्यास गेला. हें ठिकाण बांदेवाले नवाब समशेर बहादूर यांची राजधानी जें बांदा शहर, त्याच्या पूर्वेस ४५ मैल अंतरावर आहे. येथें विनायकराव यानें आपली राजधानी केली, असें म्हटलें तरी चालेल. येथून चित्रकूट हें रामायणप्रसिद्ध क्षेत्र अगदीं समीप असून तेथें प्रतिवर्षी मोठी यात्रा भरत असते. ह्या स्थलास विनायकराव पेशव्याच्या सान्निध्यानें विशेष महत्त्व व ऐश्वर्य प्राप्त होऊन त्याची महाराष्ट्रांत विशेष प्रसिद्धि झाली. विनायकराव यास व याच्या वंशजास 'चित्रकूटवाले पेशवे' असें नांव प्राप्त झालें व तें अद्यापि प्रसिद्ध आहे.

विनायकराव यानें कारवी येथें मोठा विस्तीर्ण भव्य वाडा बांधिला. त्याचप्रमाणें तेथें पिंवळी कोठी, कोठी तलाव, जंगली बाग, कठोरा तलाव इत्यादि अनेक मंदिरें, तलाव व बगीचे वगैरे बांधिले. त्यामुळें त्याच्या राजधानीस विशेष ऐश्वर्य प्राप्त होऊन तेथें दक्षिणी लोकांची पुष्कळ वस्ती झाली. विनायकराव यानें 'गणेशबाग' या नांवाचें जें उत्कृष्ट व रमणीय उद्यान बांधिलें, त्याचा कांहीं भाग अद्यापि अस्तित्वांत असून तो त्याच्या भव्यपणाची अद्यापि साक्ष देत आहे. विनायकराव यास औरस पुत्रसंतति नसून फक्त काशीबाई या नांवाची एक मुलगी होती. ती जोग ह्यांच्या घराण्यांत दिली होती. विनायकराव हा इ. स. १८५३ सालीं निवर्तला. त्यानें नारायणराव व माधवराव असे दोन मुलगे दत्तक घेतले होते. ते अज्ञान असल्यामुळें त्यांची सर्व व्यवस्था रामचंद्र राम पेंडसे या नांवाचा एक गृहस्थ हिंदुस्थान सरकारच्या देखरेखीखालीं पहात असे. विनायकराव पेशव्याची संपत्ति अपार असून खुद्द ब्रिटिश गव्हर्नमेंटलाहि त्यानें पांच लाख रुपये कर्जाऊ दिले होते व त्याचें व्याज ४ रुपये शेंकड्याप्रमाणें दरसाल २०,००० रुपये काशी येथील देवस्थानाच्या खर्चास वेगळें लावून दिलें होतें. तें इंग्रज सरकारकडून इ. स. १८५६ पर्यंत नियमानें मिळत असत.

इ. स. १८५७ सालीं उत्तर हिंदुस्थानांत बंड उद्भवलें व ब्रह्मावर्त येथील बाजीराव पेशव्यांचा मुलगा नानासाहेब व त्याचा भाऊ हे त्यांत सामील झाले आणि कानपूर, ग्वाल्हेर, झांशी, बांदा वगैरे ठिकाणीं बंडाचा प्रादुर्भाव झाला. त्या वेळीं कारवी येथेंहि कांहीं चलविचल झाली व तेथील जॉइन्ट मॅजिस्ट्रेट मिस्टर कॉकरेल ह्याच्यावर संकट आलें. त्यानंतर कारवी येथें आठ महिनेपर्यंत अस्वस्थता होती. कोणी म्हणतात कीं, नारायणराव स्वतःस स्वतंत्र पेशवा मानून कारवीचा राज्यकारभार चालवीत होता. इ. स. १८५८ च्या जून महिन्यामध्यें सर ह्यू रोज यानें झांशी, काल्पी वगैरे ठिकाणें घेऊन ग्वाल्हेर हस्तगत केलें व बंडवाल्यांचा अगदीं पराभव केला. त्याच वेळीं जनरल व्हिटलॉक यानें बांदें शहरावर चाल करून तें हस्तगत केलें व कारवीवर ता. २ जून १८५८ रोजीं मोर्चा वळविला. कारवी येथें बिलकूल लढाई न होतां माधवराव व नारायणराव पेशवे हे व्हिटलॉक साहेबांस शरण आले. जनरल व्हिटलॉक यानें ते बंडांत सामील असल्याचा संशय धरून त्यांस आपल्या लष्करांत कैदेंत ठेविलें. जनरल व्हिटलॉक याच्या सैन्यानें ता. ७ जून इ. स. १८५८ रोजीं कारवी येथील पेशव्यांचा वाडा वगैरे लुटून अगणित संपत्ति हस्तगत केली. ती पुढें विजयाचें बक्षीस म्हणून इंग्रज सैन्यास देण्यांत आली. यासंबंधानें इंग्रज सेनापति सर ह्यू रोज व जनरल व्हिटलॉक ह्यांच्यामध्यें वादविवाद होऊन इग्लंडमध्यें "कारवी आणि बांदा प्राईज मनी" म्हणून मोठा दावा चालला होता. त्यांत जनरल व्हिटलॉक यास यश येऊन त्यास व त्याच्या सैनिकांस ९,००,००० पौंड मिळाले.

वस्तुतः कारवी येथील पेशव्यांचा बंडाशीं कांहीं संबंध नसून त्यांची इंग्रज सरकाराविषयींची राजनिष्ठा कायम होती असें पुढें सिद्ध झालें. नारायणराव यांस इंग्रज सरकारनें ७०० रुपये दरमहा तैनात देऊन हजारीबाग येथें ठेवलें. तेथें तो इ. स. १८६० मध्यें मृत्यु पावला. त्याचा भाऊ माधवराव यास इंग्रज सरकारानें रायबरेली येथें दरसाल २५,००० रुपयांची नेमणूक करून देऊन ठेविलें; तो तेथेंच कायम राहिला. अर्थात् इ स. १८५७–५८ च्या बंडामुळें कारवी येथील पेशव्यांच्या घराण्याचें अतोनात नुकसान झालें. इंग्रज सरकारानें माधवराव यास नेमणूक करून देऊन बरेली येथें ठेविलें, हें वर सांगितलेंच आहे. त्याप्रमाणें त्यांनीं विनायकराव याच्या मुलीचा दत्तकपुत्र बळवंतराव हरी जोग यास, विनायकराव पेशव्याचीं दोन तीन गांवें जहागीर देऊन त्याचा वंश कारवी येथें कायम ठेविला आहे. बळवंतराव जोग यानें इंग्रज अधिकाऱ्यांस बंडाच्या वेळीं विशेष साहाय्य केलें व आपली राजनिष्ठा चांगल्या रीतीनें दाखविली म्हणून बांद्याचा मॅजिस्ट्रेट एफ. ओमेन याच्या शिफारसीवरून

ब्रिटिश सरकारानें त्याकडे 'श्रीमंतराव' ही पदवी कायम ठेवून त्याचा मानमरातब त्याच्या दर्जास शोभेल या रीतीनें तसाच चालविला. बळवंतराव हा इ. स. १९०२ मध्यें आपल्या वयाच्या ७४ व्या वर्षी मृत्यु पावला. त्यानें मोरेश्वरराव या नांवाचा दत्तकपुत्र घेतला. त्याच्याकडे इंग्रज सरकारानें तीन जहागीर गांवें व 'श्रीमंतराव' हा किताब अद्यापि चालविला आहे. हा कारवी येथें सांप्रत वास करीत आहे. कारवी येथील श्रीमंत अमृतराव व विनायकराव पेशव्याचें पूर्ववैभव आतां विलयास गेलें आहे, तथापि या शेष राहिलेल्या घराण्याच्या योगानें त्याचें नांव येथें अस्तित्वांत आहे. कारवी येथील श्रीमंत मोरेश्वरराव ह्याच्या जहागिरीचें उत्पन्न सालीना अजमासें साडे दहा हजार रुपये आहे असें समजतें. [संदर्भ ग्रंथ.—इतिहाससंग्रह. पुस्तक ५ वें, अंक ४-५-६; ग्रँडडफ. ]

**अमृतवेल**—कुंडलच्या ईशान्येस ६ मैलावरील एक ठिकाण (काठेवाड). हें अनवरशहा नांवाच्या एका बुखारी सय्यदाच्या ताब्यात होतें. या सय्यदाच्या नोकरीत एक बलाल नांवाचा सिद्दी होता. एके दिवशीं निशानिया विहिरीवर एक सुंदर ब्राम्हणाची बाई पाणी ओढीत असता सिद्द्याच्या मनात पापवासना उत्पन्न होऊन त्यानें तिजवर बळजवरी केली व तिचा नवरा जेव्हां गवगवा करूं लागला तेव्हा सिद्द्यानें त्याला ठार केलें. ती ब्राम्हणाची बाई मग सती गेली. त्या जागेवर अद्याप तिचें स्मारक दिसतें. त्यावर शनिवार भाद्रपद शुद्ध (दशमी) संवत् १०४२ अशी मिति आहे. वरील अत्याचाराचा सूड म्हणून जुना सावरवाल्यानीं हें गांव जाळून उध्वस्त केलें व सिद्दी आणि सय्यद या दोघांनाहि ठार मारिलें. नंतर १५ व्या शतकांत खुमान लोकांनीं येथें वस्ती करून त्याला आतांचें अमृतवेल हें नांव दिलें.

**अमृतसर** जिल्हा.—पंजाब लाहोर भागांतील जिल्हा. ३१°१०' ते ३२°३' उत्तर अक्षांश व ७४°३०'ते७५°२४' पूर्व रेखांश ' क्षेत्रफळ १६०१ चौरस मैल. हा प्रदेश रावी आणि बिआस या दोन नद्यांमध्यें वसलेला असून बहुतेक सपाट आहे. सर्व जमीन मळईची असल्यामुळें खनिज पदार्थ या तालुक्यांत मुळींच सांपडत नाहींत. या जिल्ह्यांत बोर, जांभूळ व आंबे यांची मोठ्या प्रमाणावर लागवड केलेली आढळते.

**वन्य प्राणी**—लांडगे क्वचित् दृष्टीस पडतात. याशिवाय नीलगाई व काळवीट कुठें कुठें पहावयास सांपडतात.

जवळपास डोंगर असल्यामुळें व कालव्याचें वहातें पाणी या जिल्ह्यांत खेळत असल्याकारणानें लाहोरपेक्षां या भागांत हिंवतापाची साथ बहुतेक नेहमीं असते. पाऊस साधारणपणें १६ इंचापासून २४ इंचपर्यंत पडतो.

**इतिहास.**—फार प्राचीन काळचा इतिहास या जिल्ह्याविषयीं उपलब्ध नाहीं. शीख लोकांचा उदय होऊं लागल्यापासून या जिल्ह्याचा इतिहास सांपडतो. गुरुनानक याच्या मागें त्याच्या पीठावर आलेला अंगड हा या जिल्ह्याच्या दक्षिणेस बिआस नदीजवळ खादुर नांवाच्या खेड्यांत येऊन राहिला होता. तेथेंच तो इ. स. १५५२ मध्यें मरण पावला. पीठावरील तिसरा गुरु अंबादास हा जवळच गोविंदवाल येथें रहात असे व हा इ. स. १५७४ सालीं मरण पावल्यावर त्याचा जांवई रामदास हा गुरु झाला. यानें अकबर बादशहानें इनाम दिलेल्या जागेवर अमृतसर शहराचा पाया घातला. हा इ. स. १५८१ सालीं मरण पावला. केकय देशाची राजधानी जें गिरिव्रज शहर त्याच्या जवळच हें वसलेलं आहे असें अर्वाचीन कोशकर म्हणतात.

रामदासानें अमृतसरस नांवाचा तलाव खोदला व मध्यभागाच्या बेटावर शिखांचें पवित्र देऊळ बांधण्यास सुरवात केली. रामदासाचा पुत्र अर्जुन हा पांचवा गुरु होय. यानें तें देऊळ बांधण्याचें काम पुरें केलें व याच्या हयातींत अमृतसर शहराची पुष्कळ भरभराट झाली. परंतु लाहोर येथील सुभेदार व अर्जुन या दोघांचें कांहीं भांडण झाल्यामुळें अर्जुनास लाहोरशहरीं तो कैद असतांनाच इ. स. १६०६ सालीं मरण आलें. अर्जुनानंतर त्याचा पुत्र हरगोविंद हा गुरु झाला. याच्या अमदानींत प्रथम शिखांनीं मोंगली सत्तेस विरोध केला. आपणाविरुद्ध पाठविलेल्या मोंगल सैन्याचा पराभव हरगोविंदानें केला. परंतु त्यास पुढें पंजाब सोडणें भाग पडलें व त्यास त्याच स्थितींत इ. स. १६४४-५ सालीं मृत्यु आला. नानक नंतरचा दहावा गुरु गुरुगोविंद होय. यानें या धर्मास धार्मिक व लष्करी स्वरूप दिलें व त्या धर्मांतील प्रत्येकास सारखे अधिकार असावे व सर्व लढवय्ये असावे असें ठरविलें. इ. स. १७०८ सालीं या गुरु गोविंदानंतर झालेला गुरु बंदा हा परत अमृतसर येथें आला व त्यानें मुसुलमानाशीं धर्म राखण्याकरतां लढाई करावी असा उपदेश सुरू केला. त्यावेळेपासून अमृतसर हें त्या धर्माचें मुख्य ठिकाण झालें. नादीरशहाच्या स्वारीनंतर यांनीं अमृतसर येथें रामरावणी किल्ला बांधला व पंजाबचा सुभेदार मीर मन्नु यास विरोध केला. शिखांचा त्यावेळीं पराभव झाला. परंतु अहमदशहाच्या दुसऱ्या स्वारीचा फायदा घेऊन त्यांनीं अमृतसर व त्याच्या आसपासचा प्रदेश आपल्या ताब्यांत घेण्याचा प्रयत्न केला. त्यावेळीं जरी अदीना बेग यानें त्यांचा पराभव केला तरी त्यांनीं अमृतसराचा किल्ला पुन्हां बांधला. हा किल्ला तैमूरनें पुन्हां जमीनदोस्त केला व त्या पवित्र तलावांत तो टाकला. परंतु शीख लोक स्वस्थ बसले नव्हते; त्यांची बंडाळी चालूच होती. इ. स. १७६२ सालीं अहमदशहा परत आपल्या देशीं जात असतांना त्यानें शिखांचा पतिआळा संस्थानांतलि बर्नाळा येथें पूर्ण पराजय केला. त्यावेळीं त्यानें अमृतसर शहराचा फार नाश करून शिखांचें पवित्र देऊळ उडवून दिलें व त्या पवित्र जागीं गाईची कत्तल करून ती जागा विटाळिली. परंतु अहमदशहा

आपल्या देशीं गेल्यावरोबर त्यांनीं पुन्हां इ. स. १७६३सालीं उचल केली व सरहिंदच्या लढाईंत त्यांनीं आपलें स्वातंत्र्य पुन्हां प्रस्थापित केलें. त्या पवित्र देवळाची पुन्हां नीट व्यवस्था लावली. कांहीं काल अमृतसर त्या प्रांताच्या राजधानीचें शहर होतें. यावेळीं अमृतसर शहरांत त्या-वेळच्या प्रत्येक राजकर्त्या संस्थेचें (कान्फिडेटरीचें) ठाणें होतें. पुढें इ. स. १७९९ सालीं रणजितसिंगानें लाहोरचा तावा मिळविला व त्यानें हळूहळू आसपासचा सर्व प्रदेश आपल्या अमलाखालीं आणला व इ स.१८०१ सालीं सर्व जिल्हा रणजितसिंगाच्या पूर्णपणें ताब्यांत आला.

इ. स. १८४९ सालीं दुसरें शीख युद्ध झाल्यावर पंजाव वरोबर अमृतसर जिल्हाहि ब्रिटिश राज्यांत सामील करण्यांत आला. प्रथमतः नारोवाल तहशिलीचा यांत अंतर्भाव केला होता. परंतु इ. स. १८६७ सालीं ती तहशील सियालकोट जिल्ह्यांत घालण्यांत आली. त्याचप्रमाणें कांहीं फेरफार वेळोवेळीं करण्यांत आले आहेत.

इ. स. १८५७ च्या बंडाच्या वेळीं येथील अधिकाऱ्यांस फार काळजी वाटत होती, कारण अमृतसर जवळील गोविंद गड किल्ल्यांत ठेवलेल्या देशी सैन्यावद्दल इंग्रजास मोठी धास्ती होती. शहरांत मात्र शांतता होती. परंतु लवकरच योग्य मदत आल्याकारणानें संकट टळलें.

मुसुलमानी अमलाच्या वेळचीं हल्लीं दिसत असलेलीं स्मारकें म्हटलीं म्हणजे फत्तेहवाद, सुरुद्दीन आणि अमानत-खान येथील सरायांचे [धर्मशाळांचे] पडके दरवाजे होत. शीख लोकांच्या वेळचीं कामें ‘अमृतसर शहर’ आणि ‘तरन तारण’ यावरील लेख पहा.

या जिल्ह्यांत पांच मोठीं गांवें व १०४२ खेडीं असून त्यांची लोकसंख्या [१९२१] ९,२९,३७४ होती. या जिल्ह्यांत अमृतसर, तरनतारण व अजनाळ या तीन तहशिली आहेत.

या जिल्ह्यांत पंजावी भाषा बोलतात. येथें सहसा दुष्काळ पडत नाहीं. मुख्य पीक--गहूं, हरभरा, मका इत्यादि.

गुरांची पैदास कमीच होते कारण चराउरान फार कमी आहे. अमृतसर येथें दिवाळींत व वैशाखांत जत्रा भरतात, त्यावेळीं शेतकरी गुरें विकत घेतात. त्याचवेळीं घोडेहि येतात. येथें म्हशीचा उपयोग विहिरीचें पाणी काढण्याकरतां करतात.

पूर्वी अमृतसर येथें उत्तम शाली तयार होत असत. परंतु फ्रँको–जर्मन लढाईनंतर या धंद्यास उतरती कळा लागली आहे. हल्लीं येथें हातमागावर सत्रंज्या व गालीचे पुष्कळ तयार होतात. अमृतसर हें पंजाबांतील व्यापाराचें मुख्य ठिकाण आहे. नॉर्थ वेस्टर्न रेल्वे या जिल्ह्यांतून जाते.

वारी दोआब कालवा बांधण्यापूर्वी या भागांत पंजाबां-तील इतर भागांप्रमाणें दुष्काळ पडत असे.

जिल्ह्याचा अधिकारी डेप्युटी कमिशनर असतो. या जिल्ह्यांत अमृतसर, मजीथा, जंडियाला गुरु, आणि तरन-तारण या चार गांवीं म्युनिसिपालिट्या आहेत.

या जिल्ह्याचें १९०३–४ सालीं एकंदर उत्पन्न तेवीस लक्ष शहात्तर हजार होतें, त्यांपैकीं जमीन महसूल दहा लक्ष अठ्यायशीं हजार होता.

त ह शी ल.—अमृतसर जिल्ह्याची तहशील. ३१°२९′ ते ३१°५१′ उत्तर अ. व ७४°४२′ ते७५°२८′ पूर्व रे. याचें क्षेत्रफळ ५४५ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें पांच लक्ष.

या तहशिलींत अमृतसर, मजिठा आणि जंडियाला हीं गांवें असून ३७३ खेडीं आहेत. इ. स. १९०३–४ सालीं एकंदर उत्पन्न ६२२००० रुपये होतें.

श ह र.—अमृतसर जिल्ह्याचें मुख्य ठिकाण व शीखांचें पवित्रस्थान. ३१°३८′ उत्तर अ. व ७४°५३′ पूर्व रे. यांवर लाहोरच्या पूर्वेस ३३ मैलांवर हें नॉर्थवेस्टर्न रेल्वेचें स्टेशन आहे. लोकसंख्या सुमारें एक लक्ष बासष्ट हजार.

इ ति हा स.—[अमृतसर जिल्हा पहा]. इ. स. १८०२ सालीं रणजितसिंगानें अमृतसर सर केलें. रणजितसिंग कट्टा शीखधर्मी असल्यामुळें त्यानें येथील शिखांच्या देवळांकरितां हजारों रुपये खर्च केले.

रणजितसिंगाच्या वेळेपासून या शहरास व्यापारी महत्त्व येत चाललें. देवळाच्या कीर्तीमुळें पुष्कळ लोक यात्रेसाठीं इकडे येऊं लागले. याच सुमारास वैशाखी व दिवाळी जत्रा सुरू करण्यांत आल्या. जत्रा जरी धार्मिक दृष्टीनें भरतात तरी त्यावेळीं थोडावहुत व्यापार होतोच. इ. स. १८३३ च्या सुमारास येथील शालींच्या धंद्यास बरेंच उत्तेजन मिळालें; कारण या वर्षीं काश्मीरांतील पुष्कळ विणकरी आपला दुष्काळग्रस्त देश सोडून अमृतसर शहरांत कायमची वस्ती करून राहिले. ब्रिटिश सरकारांत हा भाग खालसा झाल्यावर सुमारें ४००० हातमाग या अमृतसर शहरांत काम करीत होते असें म्हणतात. पण पुढें यूरोपियन लोक शाली वापरीनासे झाल्यामुळें हा धंदा कमी होत चालला आहे. परंतु त्यामुळें या शहराचा एकंदर व्यापार बसला नाहीं. गालीचे तयार करण्याचा धंदा हल्लीं येथें भरभराटीस येत चालला आहे. येथें बोखारा, कावूल, व हिंदुस्थानांतील दूरदूरचे व्यापारी व्यापार करण्यास येतात.

शीख लोकांच्या सुवर्णदेवालयास ‘दरबार साहेब’ असें म्हणतात. देवळास घुमट असून तो तांब्याच्या पत्र्यानें मढविलेला आहे असें म्हणतात. देवळाच्या भिंती संगमरवरी दगडाच्या असून त्यांतील बरेच दगड जहांगीरचें थडगें व इतर मुसुलमानी इमारती यांच्यापैकीं आहेत. घुमटामध्यें एका रेशमी झालरीखालीं शिखांचा पवित्र ग्रंथ—ग्रंथसाहेब–याची स्थापना केलेली असून तेथील पुजारी सांजसकाळ त्यांतील भाग वाचीत असतात. देवळाभोंवतीं तलाव असून तलावाकांठीं येण्यास रस्ता आहे. कांठावर पुष्कळ इमारती आहेत. यांपैकीं

अकालबुंगा नामक इमारतींत देवळाचा जामदारखाना आहे. गुरु हरगोविंद याच्या पुत्राच्या स्मरणार्थ सुमारें एक शतकापूर्वी बांधलेला बाबाअतल नांवाचा सात मजली मनोरा आहे. शहराच्या वायव्येस गोविंदगड नांवाचा किल्ला इ. स. १८०५–९ च्या दरम्यान रणजितसिंगानें बांधला. त्याचप्रमाणें शहरच्या वायव्येस रामबाग असून तींतहि लाहोर येथील मुसुलमानी वस्तुशिल्पांचे नमुने ठेविलेले आहेत.

इ. स. १८६७ सालीं येथें म्युनिसिपालिटी स्थापन झाली. तिचें इ. स. १९०३–४ सालचें उत्पन्न ११.९ लक्ष रुपये व खर्च ११.४ लक्ष होता. येथें लष्कर असतें. येथें चार हॉस्पिटलें, सहा हायस्कुलें, एक कॉलेज, दोन व्यापारी शाळा व इतर कांहीं प्राथमिक शाळा आहेत. सहा वर्तमानपत्रें व मासिकें निघतात. पांच बँका आहेत. कापसाचे व विणण्याचे कारखाने, दारू गाळण्याचा एक कारखाना, चार पिठाच्या गिरण्या व तांदूळ सडण्याच्या, लाकूड कापण्याच्या, साखरेच्या, बर्फाच्या वगैरे दुसऱ्याहि गिरण्या आहेत. येथें १९१९ सालीं रौलट ॲक्टाबद्दलच्या हरताळामुळें बराच दंगा होऊन प्रसिद्ध जालियनवाला बागेंतील निरपराधी लोकांची कत्तल झाली. यासंबंधीं माहिती ज्ञानकोशाच्या पहिल्या विभागांतील परिशिष्टांत दिली आहे. १९१९ मध्यें येथें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन झालें.

सु व र्ण मं दि र.—हें मंदिर प्रख्यात अमृत सरोवरांत असून त्याच्या मध्यभागीं ७५॥ चौरस फूट अशा एका लहान द्वीपावर तें बांधलें आहे. हें सरोवर बहुतेक चौकोनी असून त्याची प्रत्येक बाजू वरल्या अंगास ५१० फूट लांब भरते. बारीदोआब कालव्यांतून त्याला पाणी मिळतें. मंदिराच्या पश्चिम भागीं २२७ फूट लांब व १८फूट रुंद असा सेतु आहे. मध्य देवस्थानाला हरमंदिर असें नांव असून तें ४०॥ फुटांची एक एक बाजू असलेलें एक गृह असून त्याच्या प्रत्येक बाजूला एक एक दरवाजा आहे. बाहेरील भिंतीचा खालचा भाग आग्र्याच्या ताजमहालाप्रमाणें संगमरवरी दगडांनीं मढविलेला असून वरच्या भिंती आणि छप्पर सोनेरी मुलामा केलेल्या तांब्याच्या पत्र्यांनीं आच्छादलेलें आहे. त्यावरून त्याला सुवर्णमंदिर हें नांव पडलें. शीख लोक या देवस्थानाला व त्याच्या आसमंतांतील भागाला दरबार साहेब म्हणतात याचें कारण असें असावें कीं, शीख लोक आपल्या पवित्र ग्रंथाला मोठा माणस समजून त्याचा रोज त्या ठिकाणीं दरबार भरत असतो असें मानतात. रोज सकाळीं अकाली बुंगांतून मोठ्या थाटानें सेतुमार्गानें देवळांत ग्रंथ आणतात आणि तशाच थाटानें रात्रीं तो परत पोंचवितात. देवळामध्यें एका छत्राखालीं त्याला ठेवतात व ग्रंथी त्याच्या पाठीमागें बसून त्यावर दिवसभर चौरी वारीत असतो. त्याच्या दक्षिणेला पुजारी बसतात आणि उत्तरेला मुसुलमानी गवयी ( रागी किंवा रबाबी ) बसून वाद्यांच्या तालावर ग्रंथांतील सूक्तें गातात. ग्रंथाच्या पुढें एक वस्त्र असून त्यावर भावीक लोक कांहीं देणग्या ठेवतात. १८९८ सालापासून देवळाची बाहेरील बाजू विजेच्या दिव्यांनीं प्रकाशित होत आहे, तरी मुख्य देवळांत मेणबत्त्या किंवा तुपाचे दिवे असतात. देवळाच्या आवारांत जोडे घालून येणें व विडी ओढणें निषिद्ध मानलें आहे. ग्रंथ सदोदित जमीनीवर स्थापन केलेला असल्याकारणानें देवळाच्या आवारांत खुर्चीवर किंवा उंचावर बसणें अयोग्य समजतात.

सरोवराच्या चारी बाजूंनीं ३० फूट रुंदीचा एक फरसबंदी रस्ता आहे. त्याला परिक्रम म्हणतात. त्या ठिकाणीं अनेक लोक जमतात. आग्नेयीच्या कोंपऱ्याला सरोवरांतून जेथें बाहेर पाणी पडतें, त्या ठिकाणीं हलक्या दर्जाचे शीख लोक स्नान करतात. इतर शीख त्यांना ( मझबीनांना ) आपल्या बरोबरीचे समजत नाहींत व त्यांना आपल्या धर्मांत मिसळूं देत नाहींत. या रस्त्याच्या सभोंवती बुंग नांवाच्या अनेक सुंदर इमारती असून शीख संस्थानिकांनीं अमृतसरला आलें असतां आपणांस राहण्याकरितां १८ व्या शतकाच्या अखेरीस त्या बांधिल्या. त्यांपैकीं रामगढिय सरदारांचा बुंग सर्वांत मोठा दिसतो. त्याला दोन उंच शिखरें असून तो लांबूनहि ओळखतां येतो.

मुख्य देवस्थानाला जोडलेल्या खालील तीन संस्था शिखांच्या दृष्टीनें फार महत्त्वाच्या आहेत. पहिली अकालबुंग, मुख्य देवस्थानाला लागूनच सेतूच्या पश्चिम बाजूला आहे. हें अकाली किंवा निहंग शिखांचें मुख्य ठिकाण समजतात. रात्रीच्या वेळीं ग्रंथसाहेब येथें ठेवण्यांत येतो. शिवाय गुरु हरगोविंद आणि इतर शीख गुरु यांचीं हत्यारें येथें ठेविलीं आहेत. अकालबुंगाच्या पुढल्या अंगणांत " पहुल " किंवा शीख धर्माची दीक्षा देण्याचें स्थान आहे. येथें दरवर्षी सुमारें बाराशें लोकांना शीख धर्माची दीक्षा देण्यांत येतें. दुसरी संस्था म्हणजे बाबाअतलचें देवस्थान होय. हें हरमंदिराच्या आग्नेयीस कांहीं अंतरावर असून त्याला एक कळस आहे. गुरु हरगोविंदचा धाकटा मुलगा बाबाअतल याच्या स्मरणार्थ १७२९ सालीं हें मंदिर बांधण्यास सुरुवात झाली. बाबाअतलसंबंधानें अशी गोष्ट सांगतात कीं, त्याचा एक आवडता खेळगडी मोहन नांवाचा होता. एके दिवशीं सकाळीं आपल्या मित्राच्या घरीं खेळण्यास तो आला. तेव्हां रात्रीं मोहन सर्पदंशानें मेलेला अतलच्या दृष्टीस पडला अतलनें आपला हात त्याच्या प्रेतावर टाकतांच तो पुन्हां जिवंत झाला. हें पाहून सर्व मंडळी स्तंभित झाली आणि त्या सात वर्षें वयाच्या पोरापुढें गुडघे टेंकून त्याची आराधना करूं लागले. पण त्याचा बाप हरगोविंद याला बातमी समजतांच, तो त्रासून अतलला म्हणाला कीं, पवित्र आयुष्य आणि शुद्ध तत्त्वें यांच्या प्रीत्यर्थच केवळ गुरूंनीं आपलें सामर्थ्य प्रगट करावयाचें असतें. अतलला हें बोलणें इतकें लागलें कीं, तो एका सरोवरावर गेला आणि तेथें त्यानें आपला अंत करून

घेतला. तिसरी संस्था तरनतारण देवालय होय. हें अमृतसरच्या दक्षिणेस १३ मैलांवर असून ५ वा गुरु अर्जुन यानें त्याची स्थापना केली. हें देऊळ एका मोठ्या सरोवरांतील बेटावर बांधलें आहे. दर महिन्याला त्या ठिकाणीं जत्रा भरते. अमृतसरच्या देवळाचीहि दिवाळी आणि वैशाख अशा दोन वेळीं मोठी जत्रा भरत असते.

सुवर्णमंदिराची इमारत आणि त्याचा परिकर यांचा खर्च त्याला असलेल्या जहागिरींतून चालतो. ग्रंथसाहेब वाचणारे तीन ग्रंथी यांचा उदरनिर्वाह भाविकांकडून त्यांनां मिळणाऱ्या देणग्यांवर चालतो. पुजाऱ्यांनां, त्याचप्रमाणें गवई व इतर नोकरचाकर यांनां देवस्थान देणगींतील कांहीं भाग मिळतो. मुख्य देवस्थान आणि त्याला जोडून असणाऱ्या संस्था यांच्यावर देखरेख करण्याकरितां पूर्वी सरकारनें नेमिलेला एक शीख व्यवस्थापक असे; हल्लीं गुरुद्वार प्रबंधक कमिटी हें काम पाहते.

**अमृतसिद्धि योग**—आदित्यवारापासून क्रमानें प्रत्येक वारीं हस्त, श्रवण, अश्विनी, अनुराधा, पुष्य, रेवती व रोहिणी या नक्षत्रांचा योग झालेला असतो, त्याला अमृतसिद्धियोग म्हणतात. हा काल फार शुभ गणिला आहे ( आपटेकृत मराठी भाषेचे संप्रदाय व म्हणी ). या संबंधीं ज्योतिषग्रंथांत पुढील प्रमाणें श्लोक आढळतोः—

आदित्ये हस्ते, गुरुपुष्य योगे, बुधानुराधा, शनि रोहिणीच । सोमेच श्रवणं ( सौम्यं ) भृगुरेवतीच भौमाश्विनी चामृतसिद्धियोगाः ॥

म्हणजे, रविवारीं हस्त, गुरुवारीं पुष्य, बुधवारीं अनुराधा; शनिवारीं रोहिणी, सोमवारीं श्रवण ( मृग ), शुक्रवारीं रेवती आणि मंगळवारीं अश्विनी याप्रमाणें वार व नक्षत्रें यांचा योग आला असतां त्याला अमृतसिद्धि योग म्हणतात.

**अमेझॉन**—हें स्त्रीयोद्धयांचें एक दंतकथात्मक प्राचीन राष्ट्र होतें. युक्झाईन समुद्राच्या किनाऱ्याजवळ पाँटसमध्यें या बायका राहात असून, तेथें त्यांनीं एका राणीच्या नेतृत्वाखालीं एक स्वतंत्र राष्ट्र बनविलें होतें. त्याची राजधानी थर्मोडॉन नदीच्या तीरावर असलेल्या थेमिसिरा गांवीं होती. या ठिकाणाहून त्यांनीं सिथिया, थ्रेस, आशियामायनरचा किनारा आणि एजियन बेटें यांवर बऱ्याच स्वाऱ्या केल्या. अरबस्तान, सिरिया आणि इजिप्तपर्यंत देखील त्यांची मजल गेली होती. स्मर्ना, एफेसस, सिनोम, पाफोस इत्यादि शहरें त्यांनींच वसविलीं असें सांगतात. या बायका मूळ पॅलस मेओटिस–अझोव्हचा समुद्र–कडून थर्मोडॉन येथें आल्या असें कोणी सांगतात. त्यांच्या राज्यांत कोणाहि पुरुषाला राहण्याची परवानगी नसे; पण फक्त वर्षांतून एकदां आपला वंश नष्ट होऊं नये म्हणून त्या शेजारच्या गार्गारिअन लोकांकडे जाऊन येत. या भेटीपासून होणारी पुरुष संतति त्या मारून टाकीत किंवा त्यांच्या बापाकडे परत पाठवीत; मुलींनां त्यांच्या आया नीट सांभाळीत व कृषिकर्म, पारध व युद्धकला यांचें शिक्षण देत. धनुष्य सज्ज करण्यास कांहीं एक व्यत्यय येऊं नये म्हणून त्यांचे उजवे स्तन कापण्यांत किंवा जाळण्यांत येत असें म्हणतात; व म्हणून अॅमेझॉन हा शब्द ग्रीक अमाझोव्हज म्ह. स्तनरहित या शब्दापासून बनविला आहे; असें कोणी मानितात. पण चित्रांतून ही चाल दिसून येत नाहीं; चित्रांत अॅमेझॉन बायकांनां दोनहि स्तन असलेले दाखवितात; तथापि उजवा स्तन बहुधा झांकलेला असतो. दुसऱ्या कांहीं सुचविण्यांत आलेल्या व्युत्पत्ती म्हणजेः "पुष्टस्तनी" ( ए = नास्तास्तन ) 'पुरुषास्पर्शी' ( ए = अभाव, स्पर्श ) या होत. मॅझा या सर्कॅशियन शब्दाचा अर्थ "चंद्र" असा आहे, यावरून चंद्रोपासनेशीं त्यांचा कांहीं संबंध असावा असेंहि म्हणतात. ग्रीक देवता डायना ही चंद्रदेवता असून ती शिकारीमध्यें दंग असे व तिच्या उपासक कुमारीहि शिकारी पेशा स्वीकारून अविवाहित रहात असत.

अनेक ग्रीक दंतकथांतूत अमेझॉन स्त्रियांचा उल्लेख आढळतो. होमरच्या काव्यांत यांचा उल्लेख आहे. अलेक्झांडर दि ग्रेटच्या काळींहि या दिसतात. त्यावेळची त्यांची थालेस्ट्रिस नांवाची राणी अलेक्झांडरला भेटली व त्याच्यापासून गरोदर राहिली; मिथ्राडेटीझ याच्या सैन्यामध्यें पाँपेनें त्यांनां पाहिलें होतें असें म्हणतात. अल्बेरूनीच्या मतें अॅमेझॉन म्हणजे ज्यांच्यामध्यें कोणीहि पुरुष सहा महिन्यांपेक्षां जास्त काळ राहूं शकतात नाहीं त्या स्त्रिया.

या अमेझॉन वगैरेंच्या गोष्टींचें मूळ कशांत आहे हा प्रश्न अद्याप वादांत आहे. कोणी त्यांनां निवळ काल्पनिक लोक समजतात तर कोणी ऐतिहासिक समजतात यांच्या उपास्य देवता ग्रीक नसून आशियाखंडांतील देवतांसारख्या होत्या. असा एक समज आहे कीं, अमेझॉन बाया मूळच्या सुरळ्या किंवा देवीच्या पुजारिणी असाव्यात व देहदंड म्हणून त्या स्तननाश करीत असतील. दुसरी एक कल्पना अशी कीं, भौगोलिक ज्ञान ज्याकाळीं वाढलें, तेव्हां प्रवाश्यांनीं कांहीं स्त्रीशासित जातींविषयींच्या बातम्या आणल्या, त्या अशा कीं, कांहीं जातींतून आपल्याकडे जो कारभार पुरुष पहातात तो त्यांच्यांत स्त्रियाच पहातात, मातृकन्यापरंपरेची चाल त्यांच्यांत आहे व तेथें स्त्रिया सत्ताधीश आहेत. यावरून अमेझॉन वगैरेंच्या संबंधीं गोष्टींवर लोकांचा साहजीकच विश्वास बसला. अशा तऱ्हेनें विश्वास बसल्यावर, काव्य व कला यांतून त्यांनां गोवण्यांत आलें व त्यांचीं निरनिराळ्या प्रकारांनीं वर्णनें करण्यांत आलीं.

या ग्रीक अमेझॉनसारखी एक गोष्ट बोहेमियाच्या इतिहासांत आढळते. आठव्या शतकांत एका बायकांच्या मोठ्या तुकडीनें बोहेमियाच्या ड्यूकबरोबर युद्ध केलें व त्यांच्या हातीं सांपडलेल्या सर्व पुरुषांनां कैद केलें किंवा ठार मारलें. १६ व्या शतकांत ओरेलाना नांवाच्या स्पॅनिश शोधकानें असें खात्रीपूर्वक लिहिलें आहे कीं, एकदां मॅरॅनॉन नदीवर

दक्षिण अमेरिकेमध्यें त्याची लढवय्या स्त्रियांशीं झुंझ लागली होती; त्या स्त्रियांवरून या नदीला अॅमेझॉन असें नांव पडलें. कोणी म्हणतात हें नांव अॅमॅसोना (नौका-नाशक), या अमेरिकन-इंडियन शब्दावरून पडलें. हल्लीं अॅमेझॉन हें नांव (लढवय्या स्त्रिया या अर्थी ) डाहोमेच्या सैन्यांत अस्तित्वांत आहे हें निःसंशय.पण डाहोमे फ्रेंचांच्या ताब्यांत (फ्रेंच प्रोटेक्टोरेट) असतांना या स्त्रिया नाश पावल्या असें म्हणतात. दुसऱ्या शूर बायकांचीं व्यक्तिशः उदाहरणें पुष्कळ आहेत.

महाभारतांतहि एका स्त्रीराज्याचें वर्णन आहे तेथील प्रमिला राणीनें पांडवांचा अश्वमेधीय घोडा अडवून त्यांच्यावरोबर घोर संग्राम केला वगैरे वर्णन आहे. बृहत्संहितेंत स्त्रीराज्याचें वर्णन आहे (१४. २२; १६. १६); तें या ग्रीक स्त्रियांच्या वर्णनांशीं कांहीं जुळतें. या दोन राष्ट्रांतील कल्पना परस्परसंबद्ध आहेत कीं स्वतंत्र आहेत हें संशोधकांनीं पहावें पुष्कळशा आपल्या पौराणिक कथा व ग्रीक कथा सारख्या आहेत असें दिसून येतें.

तिबेटमध्येंहि (ज्ञानकोश—हिंदुस्थान आणि जग पृ. २३९) स्त्रीराज्य असल्याबद्दल वर्णन आढळतें. चीनच्या पूर्वेकडेहि एक स्त्रीराज्य असल्याचें वर्णन आढळतें. त्याचें वर्णन असें:—

नू क्वो ह किं वा स्त्रि यां चें रा ज्य.—मात्वान लिन हा आपल्या ग्रंथांत या स्त्रीराज्याबद्दल शामन हुवुइ शिन याच्या आधारावरून लिहितोः—" हें राज्य फु-संगच्या पूर्वेस एक हजार ली आहे. येथील रहिवाशांची वागणूक व चालीरीती गंभीरपणाच्या व पद्धतशीर आहेत. यांचा वर्ण फारच शुभ्र व स्वच्छ आहे. त्यांचीं शरीरें फार केंसाळ असून डोक्याचे केंस जमीनीवर लोळतात. वसंत ऋतूंत येथील स्त्रिया जलक्रीडेंत फार मग्न होतात व तेथेंच त्या गर्भवती होतात. हिंवाळ्यांत मुलें जन्माला येतात. या पुरुषी स्त्रियांच्या उरःप्रदेशावर स्तन नसतात. त्यांच्या मानेच्या पृष्ठभागावर केंसांचीं मुळें असतात. व पांढऱ्या केंसांच्या मुळांतून एक प्रकारचा रस बाहेर पडतांना आढळतो. मुलांनां तीं शंभर दिवसांचीं होईपर्यंत अंगावर पाजण्यांत येतें व इतक्या वयांतच तीं चालूं लागतात. चवथ्या वर्षी त्यांची पूर्ण वाढ होते. पुरुष दृष्टीस पडतांच त्या दूर पळून जाऊन लपून बसतात. कारण नवरा करून घेण्याची त्यांनां भीति वाटते. त्या मसाला घातलेला एक प्रकारचा पाला खाऊन राहतात. त्याचा वास चांगला असतो व चव खारट असते.

इ. स. ५०८ मध्यें लिअंग घराण्यांतील वू-टी राजाच्या कारकीर्दींत त्सिन-ग्गन येथून एक इसम समुद्रांतून जात असतां वादळांत सांपडला व वाहात जाऊन एका बेटाला लागला. बेटांत शिरल्यावर त्याला तेथें वस्ती असल्याचें आढळलें. तेथील स्त्रिया चिनी स्त्रियांप्रमाणेंच होत्या. पण त्यांची भाषा त्यास समजण्यासारखी नव्हती. पुरुषांचीं शरीरें मानवप्राण्यासारखीं होती पण त्यांचीं मस्तकें मात्र कुत्र्यांसारखीं होती व त्यांचा शब्द कुत्र्यांच्या भुंकण्यासारखा होता. त्यांचें अन्न एका लहान द्विदल धान्याचें असे व त्यांचीं वस्त्रें कापसासारखीं असत.त्यांच्या घराच्या भिंती कच्च्या विटांच्या व वाटोळ्या आकाराच्या असत व प्रवेशद्वारें गुहेच्या द्वारासारखीं असत.

मार्को पोलोवरील कर्नल यूलेनें लिहिलेल्या पुस्तकांत ( आवृत्ति सन १८७१, व्हाल्यूम २ रा. पृष्ठ ३३८–३४० ) पूर्व आशियांत अनेक कालीं प्रचलित असलेल्या या कल्पित स्त्रीराज्याविषयींच्या प्रचलित असलेल्या अनेक दंतकथा दिल्या आहेत व त्याचा उद्देश " स्त्री व पुरुष " या नांवाच्या दोन बेटांबद्दल व्हेनेशियननें जें प्रसिद्ध केलें आहे त्यावर प्रकाश पाडण्याचा आहे. यानेंच उत्तम प्रकारें संपादित केलेल्या 'कँथे अँड दि वे थिदर' ( कँथे व तिकडे जाण्याचा मार्ग ) या नांवाच्या पुस्तकांत सुमात्रांतील स्त्रियांनीं चालविलेल्या राज्याविषयीं मॅरिग्नोलीच्या इ. स. १३३० च्या सुमारास दिलेल्या माहितीचा उल्लेख केला आहे. ह्या बहुकेसाळ लोकांचा प्रदेश क्युराईल बेटांच्या बाजूला असावा, व त्यांची तुलना अलास्कांतील कुचिन इंडियन नांवाच्या रहिवाश्यांशीं करण्यासारखी आहे, असें शामन हुवुइ-शिनच्या लेखावरून वाटतें.

या कल्पित प्रदेशाबद्दल चौकशी करण्यांत अधिक वेळ दवडण्यांत अर्थ नाहीं असें वाटलें असतें; पण ही चर्चा केल्यास फुसंग हा अमेरिकेचा एक भाग आहे असें ठरविण्यास मदत होईल अशी कल्पना एस. वेलिस विल्यम्स यानें प्रदर्शित केली आहे ( ज. अ. ओ. सो. ग्रं. ११. पृ. ८९ ).

[ इ त र सं द र्भ ग्रं थ.—ए. ब्रि. ; ए. रि. ए. होमरचें ईलियड. महाभारत. बृहत्संहिता. व्हर्जिल–इनिअड हिरोडोटस. लाकौर—ला अमेझॉन्स ( १९०१ ). ]

( २ ) दक्षिण अमेरिकेंतील सर्व जगांत मोठी नदी.

**अमेट**–(राजपुताना) उदेपूर संस्थानांतील त्याच नांवाच्या जमीनदारीचें मुख्य गांव. २५° १८' उत्तर अ० व ७३°५६' पूर्व रेखांश यांवर उदेपूर शहराच्या ईशान्येस ५० मैलांवर चंद्रभागा नदीच्या दक्षिणतीरावर हा गांव आहे. गांवाभोंवती तट असून लोकवस्ती सुमारें साडेतीन हजार आहे. जमीनदारास राऊत असें ह्मणतात. सालीना उत्पन्न २८००° रुपये असून उदेपूर दरबारास २७०० रुपये खंडणी द्यावी लागते. अमेटचा राऊत हा शिसोदिया वंशांतील चोंडावत घराण्यापैकीं आहे. याच घराण्यापैकीं पट्टा नांवाचा एक वीरपुरुष इ. स. १५६७ सालीं अकबराविरुद्ध चितोडचा किल्ला लढत असतांना रामपोल दरवाजाशीं मारला गेला.

**अमेथी**–(संयुक्त प्रांत) सुलतानपूर जिल्ह्याची नैर्ऋत्येकडील तहशील. परगणे–असल आणि अमेथी. २६° ९' ते २६°२०' उत्तर अ. व ८१° ३७' ते ८२° ४' पूर्व रे. यांचे दरम्यान. क्षेत्रफळ ३६६ चौरस मैल. लोकसंख्या सुमारें दोनलक्ष वीस हजार. खेडीं ४५५; मोठा गांव एकहि नाहीं. स. १९०३-४ त

जर्मीन महसूल ३१९०००. व कर वसूल ५१०००रु. यांत क्षार आलेली (ऊसर) व दलदलीची जमीन पुष्कळ आहे. इ. स. १९०३-४ सालीं १९१ चौ. मैल जमीन लागवडीखालीं असून पैकीं ९८ चौ. मैल बागाईत होती.

( २ )( संयुक्त प्रांत. ) लखनौ जिल्ह्याच्या मोहनलालगंज तहशिलींतील एक गांव. २६° ४५' उत्तर अक्षांश व ८१° १२' पूर्व रेखांश यांवर. लोकसंख्या सुमारें साडेसहा हजार. गांव फार पुरातन असून सैयद सालारच्या अधिकाऱ्यांनीं हा जिंकला होता. पुढें तो अमेथिया रजपुतांकडे होता. परंतु इ. स. १५५० च्या सुमारास शेख लोकांनीं जिंकला. या ठिकाणीं पुष्कळ मुसुलमानी फकीरांचा जन्म झाला आहे. वाजीद अली शहाच्या कारकीर्दींत मौलवी अमीर अलीनें अयोध्येच्या प्रसिद्ध देवळा (हनुमानगढी) वर मोहीम केली होती. परंतु त्यांत त्याचा पराभव होऊन तो मारला गेला. येथें कापडाचा व्यापार चालतो.

अमेरिका—ज्यामध्यें विविध देशांचा समावेश होतो, व ज्यांत तीव्रतर थंडीपासून तो प्रखर उष्णतेपर्यंत सर्वप्रकारचें हवामान आढळतें, आणि जेथें कोठें अतिवृष्टि तर कोठें अगदीं अनावृष्टि, कांहीं भागीं शेंकडों मैल पसरलेलें घनघोर अरण्य तर कित्येक ठिकाणीं मैलचेमैल असलेला रुक्ष प्रदेश; ज्याचा दक्षिणोत्तर विस्तार सर्वांत अधिक; असे अनेक सृष्टिचमत्कार जर कोणत्या भूभागांत पहावयास मिळतील तर ते अमेरिकाखंडांतच होय. एका नांवाखालीं येणारा एवढा मोठा विस्तृत प्रदेश पृथ्वीच्या पाटीवर दुसरा कोणताहि नाहीं. यावरून या खंडास अमेरिका हें प्रथम नांव देण्यात कांहीं तरी सयुक्तिक कारण असेल, असें अनुमान करणें जितकें साहजिक आहे, तितकें तें चूकहि आहे, हें विसरतां कामा नये.

[ ] अर्वाचीन भूस्तरशास्त्रवेत्ते मात्र 'या दोन खंडास एक नांव दिलें आहे तें बरोबर आहे व शास्त्रीय दृष्ट्या सकारण आहे' असें अलीकडे प्रतिपादन करूं लागले आहेत. त्यांच्या मतें आरंभीं पृथ्वी म्हणजे सूर्यासारखा एक वायुरूप तप्त गोल होता व तो थंड होत असतांना, त्याचे कवच आकुंचन पावूं लागलें, पण हें आकुंचन सर्व ठिकाणीं सारखें होत गेलें नाहीं. त्यायोगानें सध्यां जे भूमिभाग दृष्टीस पडतात ते खरोखर चतुष्कोनघनाकृति फलक होत. या विधानास प्रत्यक्ष दृश्य पुरावा म्हणजे अमेरिका खंडाचा त्रिकोणाकृति आकार होय. या त्रिकोणाची एक भुजा म्हणजे उत्तर अमेरिकेच्या आर्तिक किनाऱ्याची विषम रेषा व त्याच खंडाचे पूर्वेकडे व पश्चिमेकडे समुद्रांत दूरवर गेलेली टोकें हेच दोन कोन होत. दक्षिण अमेरिकेचा अंतार्तिक महासागराकडे वळलेला अगदीं चिंचोळा भाग हाच या त्रिकोणाचा तिसरा कोन होय.

या खंडाच्या उत्तर व दक्षिण विभागांतील पृष्ठभागाकडे सूक्ष्म रीतीनें अवलोकन केलें असतां, त्याचें पर्वत, नद्या व सपाट प्रदेश यामधील साम्य दिसून येईल. पण इतकें असूनहि प्रत्येक खंडाच्या रचनेंत कांहीं विशिष्टपणा असतो या तत्त्वास कांहीं बाध येत नाहीं. ज्यांत उघड साम्य दिसतें, त्यांपैकीं ( १ )ईशान्येकडील मूलभूत प्रस्तराचाभाग,(२)नैर्ऋत्येचे उंचवट्याचे प्रदेश, ( ३ ) पश्चिमेकडे पसरलेले पर्वत व ( ४ ) सखल प्रदेश व त्यांतील नद्या हीं मुख्य आहेत. उत्तर अमेरिका एकंदरींत शीत तर दक्षिण अमेरिका उष्ण. आहे हा एक मोठा फरक दृष्टीस पडतो. यूरोप व आशिया खंडांतील अगदीं उत्तरेकडील प्रदेशांत आढळणारे प्राणी व वनस्पती उत्तर अमेरिकेच्या उत्तर भागांत सांपडतात. पण असलें साम्य दक्षिण अमेरिका व इतर खंडाचे दक्षिणदेश यांत मुळींच दिसत नाहीं, हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.

अमेरिका (उत्तर व दक्षिण मिळून) खंडाचें एकंदर क्षेत्रफळ १४,८००,००० चौरस मैल असून, लोकसंख्या १५,८०,००००० आहे. रेड इंडियन २,३०,००००० आहेत. धर्मानुसार वर्गीकरण केल्यास १३,९३,००००० ख्रिस्ती, २०,३०,००० ज्यू, २,१०,००० हिंदु, १,००००० बौद्ध व २५००० मुसुलमान आढळून येतील.

ब्रिटिश साम्राज्याखालीं असणारा अमेरिकेचा भाग.—कानडा, न्यूफाऊंडलंड आणि लॅब्राडोर, ब्रिटिश हॉंडुरस, ब्रिटिश ग्वायाना, बर्म्युडा, वेस्ट इंडीज बेटें, (बहामाज, टर्क्स आणि काइकोज बेटें, जमेका, केमन बेटें, बार्बाडोज, विंडवर्ड आणि लीवर्डबेटें, ट्रिनिदाद आणि टोबॅगो) आणि फाकलंड बेटें. याचें एकंदर क्षेत्रफळ ४०,१०,२१६ चौरसमैल व लोकसंख्या [ १९१७-१८ सालीं ] १,०८,३४००० होती.

फ्रान्सच्या वसाहती.—सेंट पिएरे आणि मिकेलॉन, ग्वाडेलोउपे, मार्टिनिक आणि ग्वायाना. यांचें क्षेत्रफळ ३३,२०० चौरस मैल व लोकसंख्या ४,५९,०८२ आहे.

नेदलँडच्या वसाहती.—सुरिनाम किंवा डच ग्वायाना आणि कुरॅशाओ. क्षेत्रफळ ४६४६३ चौरस मैल व लोकसंख्या अजमासें दीड लाख आहे.

याठिकाणीं अमेरिकेची सामान्य माहिती दिली. सविस्तर माहिती या खंडांतील निरनिराळ्या देशांखालीं येणार असल्यानें ती येथें गाळली आहे. अमेरिकेचा यूरोपीय लोकांस परिचय, तेथील भाषा, तेथील मानवजाति, तेथील संस्कृति व तेथील लोकांवर यूरोपियांचें वर्चस्व इत्यादि माहिती ज्ञानकोश प्रस्तावनाखंड विभाग चवथा प्रकरण २३ मध्यें दिली आहे. आतां हिंदुस्थान व अमेरिका यांच्या संबंधाकडे थोडें लक्ष देऊं.

हिंदुस्थान व अमेरिका.—ज्ञानकोश-प्रस्तावनाखंड विभाग १ ला ( हिंदुस्थान आणि जग, प्र. ९ ) यांत हिंदी लोकांच्या अमेरिकेंतील वसाहतींविषयीं सविस्तर विवेचन दिलें आहे. तें प्रस्तुत विषयाला फार उपयुक्त वाटेल. अमेरिकेंत बहुधा पॅसिफिक किनाऱ्यावरच हिंदी लोक राहतात.

डॉ. रजनीकांत दास यांनीं अमेरिकन संयुक्त संस्थानांच्या लेबर डिपार्टमेंटनें सांगितल्यावरून जो पॅसिफिक किनाऱ्यावरील हिंदी लोकांसंबंधीं रिपोर्ट तयार केला त्याचा सारांश पुढें दिला आहे.

पॅसिफिक किनाऱ्यावरील हिंदुस्थानी लोकः—ज्या ठिकाणीं हिंदी लोक प्रथम उतरले तीं अतिशय महत्त्वाचीं दोन बंदरें म्हणजे सॅनफ्रॅन्सिस्को व व्हॅंकुवर हीं होत. या दोन केंद्रांतून ते हळू हळू दक्षिण, पूर्व आणि उत्तर या दिशांकडे पसरले व कालांतरानें पॅसिफिक किनाऱ्याच्या निरनिराळ्या भागीं ते पोंचले.

१९१० च्या खानेसुमारीवरून पाहतां संयुक्त संस्थानांतील हिंदी लोक पुढें दिल्याप्रमाणें विखुरलेले दिसतात.

| | |
|---|---|
| कॅलिफोर्निया ... ... ... ... | २,७४२ |
| वाशिंग्टन ... ... ... ... | १,४१४ |
| न्यूयॉर्क ... ... ... ... | ४९२ |
| ऑरेगॉन ... ... ... ... | २०८ |
| न्यू जर्सें ... ... ... ... | १३१ |
| मिसौरी ... ... ... ... | ११९ |
| इतर ... ... ... ... | ११८ |
| एकंदर सं. संस्थानांत ... ... | ५,२२४ |
| हवाई ... ... | ३६२ |
| एकंदर ... ... | ५,५८६ |

वरील कोष्टकावरून असें दिसून येतें कीं, ब्रिटिश कोलंबिया म्हणजे जेथें १९०५–९ या चार वर्षांत ५,१७९ हिंदुस्थानी आले, त्यांच्या खालोखाल कॅलिफोर्नियांत देशांतर केलेले हिंदुस्थानी लोक होते. यांच्या खालचा नंबर वाशिंग्टनचा लागतो. तेथें १,४१४ हिंदुस्थानी होते; त्यांपैकीं पुष्कळसे ब्रिटिश कोलंबियामधून आलेले होते. ऑरेगॉनमधील बहुतेक हिंदुस्थानी लोक मालगिरण्यांतील कामकरी आढळले. न्यूयॉर्क संस्थानांतील ४९२ हिंदी लोकांपैकीं न्यूयॉर्क शहरांतच त्यांची मोठी संख्या होती. त्या ठिकाणीं ते बहुतेक खलाशी म्हणून आलेले होते, तर कांहीं थोडे व्यापारार्थ येऊन राहिले होते. हीच गोष्ट न्यू जर्सी व मिसौरी संस्थानांतील हिंदवासीयांची आहे.

मागील कांहीं वर्षांच्या अवधींत संयुक्त संस्थानांतील हिंदी लोकवस्तीच्या वांटणींत बराच फरक पडलेला आहे. हल्लीं पुष्कळसे हिंदुस्थानी खालील जागीं वस्ती करून राहिलेले आहेतः—

सॅन जोआकिन खोरें:—हें मोठें खोरें सॅन फ्रॅन्सिस्कोच्या दक्षिणेस सुमारें ७५ मैलांवर आहे व त्यांत कॅलिफोर्नियांतील कांहीं समृद्ध जिल्हे आहेत. येथील जमीन साधारणपणें वाळू व चिकणमाती यांची बनलेली असून वानस्पत्य–अन्नांतील सर्व खनिज द्रव्यें हींत सांपडतात. पाऊस सरासरी दहा इंच पडत असून मे पासून सप्टेंबरपर्यंतचा काळ कोरडा जातो. उन्हाळ्यांत उष्णमान ८२° अंशांपर्यंत चढत जाऊन हिंवाळ्यांत ते ४७° अंशांपर्यंत खालीं उतरतें. द्राक्षें, पीच, अप्रिकॉट, बदाम, ऑलिव्ह, अंजीर, संत्रीं, बटाटे, टमाटे, धान्य आणि भाजी इत्यादि या खोऱ्यांत पीक येतें.

ही कृषिसंपत्ति सोडून दिली तरी हें नुसतें खोरेंच अति सुंदर व मनोरम दिसतें. सहज पाहुणारालाहि येथील सृष्टिसौंदर्य मोहून टाकितें, मग येथें वस्ती करून राहण्याची इच्छा बाळगणाऱ्याला, यहुद्यांनां ज्याप्रमाणें पॅलेस्टाइन ही ईश्वरदत्तभूमि ( प्रॉमिस्ड लॅंड ) वाटते, त्याप्रमाणें वाटावी यांत नवल नाहीं.

अमेरिकेंत पाऊल टाकल्यावर लवकरच हिंदी लोकांनां या खोऱ्याची महति कळली. रेल्वेवर काम करीत असतांना त्यांनां प्रवास करून या समृद्ध प्रदेशाची माहिती करून घेण्याची संधि लाभली व तेथील " रँच " ( गोस्थाना )मध्यें नोकरी मिळविण्याची इच्छा तेव्हांपासून उत्पन्न झाली. १९०७ मध्यें प्रथमच या हिंदी लोकांची एक वसाहत सॅन जोआकिन खोऱ्यांत झाली. नंतर हळू हळू त्यांच्यापैकीं पुष्कळसे स्टॉक्टन, फ्रेस्नो व बेकर्सफील्ड यांच्या आसमंतांतून राहिले व तेव्हांपासून हीं तीन शहरें सॅन जोआकिन खोऱ्यांतील हिंदी कामकऱ्यांचे मुख्य अड्डे बनले.

या तीन अड्ड्यांपैकीं स्टॉक्टन हें साहजिकपणें प्रमुख बनलें. हिंदुस्थानी लोकांची बरीच मोठी संख्या स्टॉक्टनच्या सभोंवतालच्या शेतांतून काम करीत असे व एका शेतांतून दुसऱ्या शेतांत कामासाठीं जातांना स्टॉक्टन येथेंच आपलें ठाणें करणें त्यांना सोयीचें पडे.

सध्या स्टॉक्टनभोंवतालच्या ज्या इतर महत्त्वाच्या गांवीं हिंदी लोक राहिले आहेत तीं गावें म्हणजे होल्ट, लोदी व सँडो हीं होत.

या खोऱ्यांतील त्यांचा दुसरा मोठा अड्डा फ्रेस्नो परगणा होय. पॅसिफिक किनाऱ्यांवरील याच ठिकाणीं सर्वांत जास्त हिंदी वसाहतवाले आढळतील. लोनस्टार, फॉलेजो, क्लोव्हिस मॅंदेश व इतर कांहीं जागीं यांची वस्ती पसरलेली आहे.

सॅक्रॅमेंटो खोरें:—सॅक्रॅमेंटो खोरें हा उत्तर कॅलिफोर्नियाचा दुसरा सक समृद्ध भाग आहे. भौतिक परिस्थिति सॅन जोआकिन खोऱ्याहून फारशी भिन्न नाहीं; पण एका महत्त्वाच्या बाबींत मात्र भिन्नता दृष्टीस पडते. ती म्हणजे या खोऱ्यांत तांदूळ पिकविण्यास योग्य अशी दलदलीची मोठी जमीन आहे.

सॅन जोआकिनो खोऱ्यांत हिंदुस्थानी ज्या वेळीं शिरले त्याच सुमारास या ठिकाणींहि ते आले. पुढें लवकरच सॅक्रॅमेंटो शहर त्यांचें एक मुख्य ठिकाण बनलें. फ्रेस्नो शहराप्रमाणें सॅक्रॅमेंटो शहरहि फिरत्या हिंदी मजुरांचें विराम-

स्थान आहे. उत्तर कॅलिफोर्नियांतील भातशेतांतील व पश्चिम आणि दक्षिण भागांतील जागांतील काम करण्याचा हंगाम संपला म्हणजे तो सुरू होईपावेतों हिंदी मजूर या शहरीं विसाव्याला राहतात व आपल्या सामाजिक चळवळींमध्यें पडतात.

सॅक्रॅमेंटो खोऱ्यामध्यें या शहराखेरीज दोन निराळ्या भागांत हिंदी लोकसंघ आढळतात. पहिला फोलसोम, ऑरेंजव्हिले, ल्युमिस आणि न्यू कॅसल हा फळें पिकणारा भाग व दुसरा मेरिसव्हिले, कोल्युसो, ट्यूडर, विलोज, चिको, युबेशहर, नेल्सन, ब्रिडले आणि ब्रिग्स हा भात पिकणाऱ्या जिल्ह्यांचा भाग. या दुसऱ्या भागांत हिंदी लोक मोठे यशस्वी व्यापारी बनले असून कॅलिफोर्नियांतील भातपिकाचा मोठा हिस्सा यांच्या हातांत आहे.

इंपीरियल ( बादशाही ) खोरें.—दक्षिण कॅलिफोर्नियांत मेक्सिकोच्या सरहद्दीवर हें खोरें आहे. या खोऱ्याचा मोठा भाग समुद्रसपाटीच्या खालीं आहे. याची लांबीरुंदी अनुक्रमें ६० व ४५ मैल असून १९२० सालीं लोकसंख्या अजमासें ४३,००० होती. पाऊस एक इंचापेक्षां जास्त पडत नाहीं. हवा नेहमीं कोरडी असते. उष्णमान हिंवाळ्यांत २४ अंशांखालीं व उन्हाळ्यांत ११५ च्यावर जातें. जमीन चांगली समृद्ध असून शेतकी पाटबंधाऱ्यांवर चालते. या खोऱ्यांतील मुख्य पीक म्हणजे द्राक्षें, कापूस, अलफालफा, मिलो, बार्ली आणि कँटेलौप्स.

हिंदी लोक या ठिकाणीं १९१० सालापासून दिसूं लागले; पण त्या वेळीं हा प्रदेश मुळींच सुधारलेला नव्हता. कडक उन्हाळ्यामुळें फारसे अमेरिकन येथें वस्तीस येत नाहींत. या ठिकाणीं हिंदी लोकांनां औद्योगिक चळवळी करण्यास चांगला वाव मिळाला. १९१९ मध्यें या खोऱ्यांत त्यांची संख्या सुमारें ३०० होती व कापसाचें पीक बुडाल्यामुळें पुष्कळजण जरी बाहेर गेले तथापि एलसेंट्रो, कॅलेग्झिको, होल्टव्हिले आणि ब्राले यांसारख्या शहरानजीक शेतकींत गुंतलेले २०० तरी हिंदी अद्याप सांपडतील.

ब्रिटिश कोलंबियाः—पॅसिफिक महासागराच्या किनाऱ्यावरच्या कॅनडियन मुलुखांतील अति समृद्ध प्रांतांपैकीं ब्रिटिश कोलंबिया हा एक असून त्याचें क्षेत्रफळ ३,७२,६३० चौरस मैल आहे. हा प्रदेश डोंगराळ असला तरी किनाऱ्यालगतची व खोऱ्यांतील जमीन चांगली सुपिक आहे. हवा समशीतोष्ण व पावसाळी आहे. फळांच्या लागवडीला हा भाग हितावह असल्यानें जगांतील कोणत्याहि भागांत होणारीं फळें येथें उत्कृष्ट प्रकारें होतात. सोनें, चांदी, तांबें, जस्त, पारा, कोळसा व लोखंड यांसारखे खनिज पदार्थ खाणींतून निघतात. मासेहि खोल पाण्यांत वें नदींत सांपडतात. जंगलतोड हा एक महत्त्वाचा धंदा आहे. व्हँकुवर बेटांत खाणींतून सोनें काढण्याचा मोठा व्यापार आहे. वीस वर्षांपूर्वी येथें येणाऱ्या हिंदुस्थानी लोकांनां हे निरनिराळे उद्योगधंदे चांगले लाभदायक होते.

व्हँकुवर हें तेव्हांपासून पॅसिफिक किनाऱ्यावरील हिंदी लोकांच्या सामाजिक, धार्मिक व औद्योगिक चळवळींचें मोठें केंद्र बनलें आहे. कानडा किंवा संयुक्तसंस्थानें यांतील कोणत्याहि शहरांत येथल्या इतके हिंदू सांपडणार नाहींत. हिंदूंमध्यें शिखांचा भरणा विशेष आहे. व्हँकुवर येथून हिंदी लोक सर्वत्र पसरले व हल्लीं ते न्यूवेस्टमिन्स्टर, फ्रेझरमिल्स, डंकन, कूंब्स, आणि ओशन फाल्स येथें आढळतात.

किरकोळः—वर उल्लेखिलेल्या केंद्रांखेरीज इतर पुष्कळ संस्थानांत व शहरांत थोडे फार हिंदुस्थानी सांपडतात.

संस्थानें:—हिंदुस्थानी लोकांनां आमिष दाखविणाऱ्या इतर संस्थानांमध्यें ऑरेगॉन याचा विशेष प्रामुख्यानें उल्लेख केला पाहिजे. ॲक्टोरिया, लिंटन आणि ब्रायडल व्हेल या ठिकाणीं असलेल्या लांकडाच्या कारखान्यांत पुष्कळसे हिंदी नोकरीस आहेत. दहा वर्षांपूर्वी ऑरेगॉनमध्यें २०० वर हिंदी होते पण लांकूडतोडीचा धंदा कमी झाल्यामुळें व हे लोक इकडे येण्याचेच कमी झाल्यामुळें हल्लीं त्यांची संख्या सुमारें शंभर भरेल.

वाशिंग्टन संस्थानांत बेलिंगहॅम आणि टॅकोमासारख्या ठिकाणीं असलेल्या निरनिराळ्या लांकूडकारखान्यांतून कांहीं हिंदुस्थानी पूर्वी नोकरीस होते पण हल्लीं त्यांची संख्या फारच कमी दिसते. याचें एक कारण कांहीं राजकारणी लोकांनीं व मजूर पुढाऱ्यांनीं हिंदूंविरुद्ध सुरू केलेली मोहीम होय.

उटाह, ॲरिझोना, नेव्हाडा आणि साउथ डाकोटा या संस्थानांतून देखील पुष्कळ हिंदी आहेत. गेल्या महायुद्धांत गव्हाचा भाव जेव्हां फार चढला तेव्हां यांच्यापैकीं कांहींनीं ॲरिझोनामधील चँडलरजवळ जमीन खरेदी करून गहूं पिकविला. त्याचप्रमाणें उटाहांत बऱ्याच जणांनीं शेतकी आरंभिली. तेथील ब्रिगहॅम शहराजवळ सुमारें १५ हिंदुस्थानी शेतकी करतात.

शहरें:—व्हँकुवर, व्हिक्टोरिया, सॅक्रॅमेंटो या शहरांखेरीज पॅसिफिक किनाऱ्यावर अन्यत्र क्वचितच औद्योगिक चळवळींत पडलेले हिंदी सांपडतील. पण ॲटलांटिक किनाऱ्यावरील पुष्कळ शहरांतून निरनिराळ्या उद्योगधंद्यांत पडलेले पुष्कळ हिंदुस्थानी दिसतात. शिकागो येथें सुमारें ५०, डेट्राइट २०, बफेलो २५, न्यू आर्लियन्स ३५, चार्लस्टन ३० व कांहीं थोडे ॲसबरी पार्क येथें असल्याची माहिती मिळते. बोस्टन, न्यूयॉर्क, फिलाडेल्फिया आणि बाल्टिमोर यासारख्या महत्त्वाच्या बंदरीं किती हिंदुस्थानी आहेत याची मोजदाद करणें फार कठीण आहे.

**अमेशस्पेंत**—झरथुष्ट्र धर्मामध्यें वरिष्ठ देवदूतांच्या जातीस हें नामाभिधान आहे. याचा शब्दशः अर्थ म्हणजे "अमर असे उपकारी लोक;" अवेस्ता शब्द "अमेश"

(अमेरेत) म्हणजे अमर आणि "स्पेंत" म्हणजे हितकारी, (सू = वाढणें फायदा करणें या धातूपासून); पह्लवी भाषेंत याचें आम्हस्पंद व फारसीमध्यें आमशस्पंद अशीं रूपें होतात. छंदोबद्ध गाथांमध्यें जातिवाचक नांव म्हणून अमेशस्पेंत हा शब्द येत नाहीं. तथापि स्वतंत्र किंवा संयुक्त असा नेहमीं उल्लेख केलेला आढळतो. यस्न हप्तंघइति (यस्न ३९. ३) या गद्यगाथेमध्यें हें जातिनाम म्हणून आढळतें. उत्तरकालीन अवेस्ता वाङ्मयांत तर अशा अर्थाचे अनेक उल्लेख येतात.

अहुरमज्द या देवाधिदेवाचे म्हणजे श्रेष्ठ ईश्वराचे ते सेवक होत (योष्त इ फ्रयानो २. ५५-५९ बहमन यश्त ३. ३१). अहुरमज्दासुद्धां तो एक सातांचा संघ होतो. स्रओष ही देवताहि त्या संघात कित्येक वेळां अंतर्भूत करतात (यश्त २. १-३; १९. १६ = १३.८३; १०. १३९; ३.१. यस्न ५७. १२; बुन्दहिश्न ३३.२९). उत्तरकालीन ग्रंथांत आमशस्पंद हें नांव व्यापक अर्थानें योजिलें असून देवदूतहि या नांवानेंच संबोधिले जातात. त्यांच्या संघांत मिळणाऱ्या स्रओषशिवाय, आतर, अहुरमज्दाचा अग्नि, हाहि आमशस्पंद म्हणून उल्लेखिला जातो (यस्न १.२). गोश्उर्वन, (आद्य वृषभाचा आत्मा,) बहुतेक नेहमीं देवदूत म्हणून उल्लेखिला जातो, तरी शायस्त लाशायस्त (२२. १४) मध्यें त्यालाहि आमशस्पंद म्हटलें आहे. कस्ती मंत्रांत सुद्धां "सी उ से" म्हणजे ३३ आमशस्पंद सांगितले आहेत. त्यांचे स्वभाव म्हणजे मूर्तिमंत सद्‌गुण आणि शुद्ध विकार होत. त्यांचीं नांवें अशीं:—वोहुमनः (चांगला विचार), अषवहिश्त (पूर्ण नीतिमत्ता), क्षथ्र वइर्य (ईप्सित राज्य), स्पेन्त अर्मैति (पवित्र ऐक्य) हौर्वतात आणि अमेरेतात (आरोग्य रक्षण आणि अमरत्व). इ. स. च्या पहिल्या शतकांतील प्लूटार्क या ग्रीक विद्वानानें सहा देवता असा त्यांचा उल्लेख करून त्यांचीं ग्रीक नांवें दिलीं आहेत. त्यापूर्वी एक शतक आधीं स्ट्रेबोनें (९. ८-४; १५. ३—१५.) वोहुमनाचा स्पष्ट निर्देश केला आहे. त्यावरून असें सिद्ध होतें कीं त्याकाळीं यांविषयीं कल्पना बरीच जुनी व प्रसिद्ध होती. व ही गोष्ट झरथुश्त्र संप्रदायामधील अमेशस्पेंतांची कल्पना अर्वाचीन आहे असें डार्मेस्टेटरचें म्हणणें खोडून टाकण्यास पुरेशी आहे. झरथुश्त्र संप्रदायांतील धार्मिक ग्रंथांतून अमेशस्पेंतांचा स्वभाव व वागणूक यांविषयीं जें वर्णन आहे तें त्यांच्या काल्पनिक आत्मिक गुणांशीं बरोबर जुळतें, हें अवेस्ताकडे दृष्टी फेंकल्यास कळून येणार आहे (यस्न ३९. ३ विस्पेरेद ९. ४; ११.१२; यस्न ४. ४; २४.९; ५८. ५; यस्न १३. ८२—८४). वोहु (चांगले, ), वहिस्त (सर्वोत्तम), वैर्य (इष्ट), स्पेंता (पवित्र), हीं प्राचीन काळचीं पहिल्या चार अमेशस्पेंतांचीं अगदीं नेहमींचीं उपपदें होत. तीं उत्तरकाळीं गुणांची व्याख्या करण्याकरितां अत्यावश्यक अशीं प्रमाणभूत विशेषणें होऊन बसलीं आहेत. हौर्वतात आणि अमेरेतात हे दोन शेवटचे अमेशस्पेंत विशिष्ट उपपदाखेरीज आहेत. त्यांचा बहुधा संयुक्त उल्लेख येतो. अमेशस्पेंत ही अहुरमज्दानें निर्माण केलेली स्वतःची सृष्टि आहे (यश्त १. २५) आणि त्यांचें काम म्हणजे विश्वाला मार्ग दाखविण्याच्या कामीं त्याला मदत करण्याचें आहे (यश्त १९.१६; १. २५; २. १-१५; वेन्दिदाद १९—९; बुन्दहिश्न १०२३ ते २८). ते अमर व अदृश्य आहेत, ते चांगले शास्ते कल्याणदायी आणि उदार दाते आहेत (यस्न २४. ९). त्यांनां स्वतःच्या फ्रवशी असून त्यांनाहि केव्हां केव्हां आव्हान केलें जातें (यस्न १३. ८२). यज्ञात त्यांची स्वतंत्र पूजा होते व प्रकाशमार्गानें हवींकडे ते खालीं येतात (यश्त १३. ८४; १९. १७). ते नंदनवनांत रहातात व त्या ठिकाणीं निदान त्यांच्यापैकीं एक वोहुमनः हा सुवर्णसिंहासनावर बसतो. (वेन्दिदाद १९—३२). पण त्यांचा मालक जो अहुरमज्द याच्याप्रमाणें ते अनंत व अपरिमेय नाहींत. अहुरमज्दाच्या सृष्टीचें रक्षण करणें, तीव्र देखरेख करणें, घडवणें, शासन करणें इत्यादि गोष्टी त्यांच्याकडे आहेत असें म्हटलें आहे (यश्त १९. १८). याकरितां प्रत्येकाकडे सृष्टींतील कांहीं विशिष्ट वस्तूंची राखण सोंपविली असते, वोहुमनच्या ताब्यांत उपयुक्त प्राणी, अशवहिष्टाच्या ताब्यात अग्नि, क्षथ्रवैर्यांच्या धातु, स्पेंत आर्मैतिच्या देखरेखेखालीं पृथ्वी आणि हौर्वतात व अमेरेतात यांच्या संरक्षणाखालीं जल आणि वनस्पती आहेत (शायस्त ला शायस्त १५. ५). प्रत्येक अमेशस्पेंताचा विशिष्ट महिना असतो (बुन्दहिश्न २५. २०). प्रत्येकाचा निराळा एक पवित्र दिवस असतो (सिरोझा १. १-७) प्रत्येकाचें एक विशिष्ट फूल असतें; उदाहरणार्थ वोहुमनाची पांढरी जाई, स्पेंत अर्मैतिची कस्तुरी, इत्यादि (बुन्दहिश्न २७. २४). पहिले तीन अमेशस्पेंत पुरुष (व्याकरणांत त्यांचें लिंग नपुंसक आहे.) आणि शेवटले तीन स्त्रिया आहेत. त्यांनां नेहमीं सहा मुख्य दैत्यांकडून विरोध होतो. हे अमेशस्पेंतांचे शत्रू म्हणजे आकमनः, इंद्र, सौरु, नाओङ्गहइथ्य, तौरु, आणि झैरी हे होत. (वेन्दिदाद १०. ९—१०; १९.४३; यश्त १९. ९६). तथापि पुनरुथ्थापनाच्या वेळीं हे आमशस्पंद आपल्या शत्रूंचा पराभव करतील (यश्त १९. ९६; बुन्दहिश्न ३३.२९) असें म्हटलें आहे.

सामान्य देवतांपेक्षां श्रेष्ठ आणि अहुरमज्दापेक्षां कनिष्ठ अशा या अमेशस्पेंतांची कांहीं पंडित बायबलमधील वरिष्ठ देवदूतांशीं (आर्चेंजलशीं) तुलना करितात, तर कोणी आदित्यांशीं त्यांचें साम्य दाखवूं पाहतात. हें साम्य एकाची कल्पना दुसऱ्यानें उचलल्यामुळें किंवा दोन्ही कल्पनांच्या सामान्य एकाच उगमामुळें किंवा स्वाभाविक वाढीमुळें उत्पन्न झालें किंवा कसें, यावर अभ्यासकांचें अद्यापि एकमत नाहीं. झरथुश्त्र संप्रदायाचा इतर संप्रदायांवर परिणाम किंवा त्यांचीं नातीं काय हा मोठा प्रश्न अद्याप सुटला नसल्यामुळें

या बारीक प्रश्नाचा इतक्यांत निकाल देणें घाईचें होईल.

**अमोघवर्ष** (८१४-८७८)—राष्ट्रकूट राजघराण्यांत चार अमोघवर्ष नांवाचे राजे होऊन गेले, त्यांपैकीं पहिला प्रसिद्ध आहे. आपला पिता तिसरा गोविंद (जगत्तुंग) याच्यामागून हा गादीवर आला (इ. स. ८१४ किंवा ८१५). यानें धारण केलेल्या अनेक बिरुदांपैकीं 'नृपतुंग,' व 'महाराज-शर्व' हीं विशेष होत. याला 'महाराज-षंड' व 'अतिशयधवल' अशींहि नांवें होतीं यांखेरीज त्याच्या दस्तरीं 'महाराजाधिराज' 'परमेश्वर' 'भटार' 'परमभट्टारक' व 'पृथिवीवल्लभ' यांसारख्या पदव्या आढळतात. शिरूर येथील लेखांत अमोघवर्षाचें जें वर्णन आढळतें त्यांत तीन शुभ्र छत्रें, शंख, पालिध्वज, व ओक-केतु असलेला; रट्टकुळांत जन्मलेला, गरुड चिन्हांकित तुरा धारण केलेला; टिविळी वाद्याच्या आवाजावरून ज्याचें आगमन सूचित होतें असा, व 'लट्टलूर-पुर-परमेश्वर' अशी वंशपरंपरागत पदवी असलेला, अशा शब्दांनीं त्याला गौरविलें आहे. सूडीच्या पश्चिम गंगराजांनीं दिलेल्या दानपत्रावरून याला अब्बलब्बे नांवाची मुलगी होती असें ध्वनित होतें (ए. इं. पु. ३).

अमोघवर्षाला सुखासमाधानानें गादी मिळाली नाहीं असें दिसतें. गुजराथच्या सुवर्णवर्ष-कर्कराजानें त्याला राज्य जिंकून घेण्यांत मदत केली (ए. इं. पु. १ पा. ५३; इं. अँ. पु. १४ पा २०१). पण एकदां गादीवर बसल्यानंतर त्यानें आपल्या बापाइतकाच अधिकार मिळविला व आपलें राज्य मोठें विस्तृत केलें. शिरूरच्या लेखांत म्हटलें आहे कीं अंग, वंग, मगध, मालव, आणि वेंगी येथील राजे त्याच्या सेवेला होते पण हें केवळ अतिप्रशंसा करण्याकरितांच लिहिलें असेल. याच्या अमदानींत एकसारखीं युद्धें चालत होतीं हें खरें. इ. ९९३ च्या सांगली दानपत्रांत अमोघवर्षानें विंगवल्ली येथें चालुक्यांनां जिंकलें असें लिहिलें आहे. इ. स ९७२ च्या कऱ्हाड दानपत्रांत व ९०० च्या देओली दानपत्रांत मान्यखेत (आधुनिक मालखेड-निझामचें राज्य) शहर त्यानें वसविल्याचें वर्णन आहे. अमोघवर्षाच्या वेळची बरीच माहिती करून देणारे शिलालेख, ताम्रपट वगैरे उपलब्ध आहेत. अतिशय म्हातारपण झाल्यामुळें अमोघवर्षानें राज्यत्याग केला व आपला मुलगा कृष्ण (दुसरा) यास गादी दिली (भांडारकर-दख्खनचा इतिहास).

हा जैनधर्मीय होता असें दिसतें. गुणभद्राच्या उत्तर पुराणांतील एका परिशिष्टांत, आदिपुराणकर्ता जिनसेन याचा तो उपासक होता असें म्हटलें आहे. वीराचार्याच्या सारसंग्रह नामक गणितग्रंथांत प्रस्तावनेमध्यें अमोघवर्ष जैनधर्मानुयायी होता असें एक विधान आहे. "प्रश्नोत्तर-रत्नमालिका" नांवाचा लहानसा नीतिग्रंथ अमोघवर्षानेंच राज्यत्यागानंतर लिहिला असें दिगंबर जैन म्हणतात. 'विवेकात्यक्तराज्येन राज्ञेयं रत्नमालिका। रचितामोघवर्षेण सुधियां सदलंकृतिः' ॥ (भांडारकर रिपोर्ट १८८३-८४) या ग्रंथाच्या जैन प्रतींत वरील श्लोक आढळतो. याच्या तिबेटी भाषांतरांतहि ग्रंथकर्तृत्व अमोघवर्षाकडे दिलें आहे. राष्ट्रकूट घराण्यांत कांहीं अमोघवर्ष नांवाचे राजे होऊन गेले पण त्यांपैकीं कोणीं हा ग्रंथ रचिला असेल हें संभवत नाहीं. [इं अँ. पु. ५;१२-१४ केव्हेंटपल इन्स्क्रिप्शन्स. ए. इं.१,३. भांडारकर-अर्ली हिस्टरी ऑफ दि डेक्कन. इ.]

**अम्पिअर अन्द्रे मेरी**—हा एक फ्रेंच शास्त्रज्ञ होऊन गेला. याचा जन्म ता. २२ जानेवारी १७७५ रोजीं लिऑन्स शहराजवळच्या एका गांवीं झाला. अगदीं अल्प वयापासून याला ज्ञानाची फार आवड होती; व त्यास आंकडे ओळख होण्यापूर्वीच त्यानें दगड आणि पावाचे तुकडे यांचा उपयोग करून अंकगणितांतील कांहीं प्रश्न सोडवून पाहिले. त्याच्या बापानें त्याला लॅटिन शिकविण्यास सुरुवात केली, परंतु त्याच्या बापास जेव्हां असें दिसून आलें कीं, आपल्या मुलास गणिताची फार आवड आहे, तेव्हां त्यानें लॅटिन शिकविण्याचें कांहीं काळ बंद केलें. युलर आणि बरनोली यांचे गणितावरील ग्रंथ आपणास वाचतां यावेत म्हणून अम्पिअर यानें लॅटिनचे आपले पाठ फिरून सुरू केले. आपल्या आयुष्याच्या उत्तरार्धांत तो असें म्हणत असे कीं, "आपण अठरा वर्षांचे असतांना गणिताचें जें ज्ञान संपादन केलें त्यापेक्षां गणिताचें जास्त ज्ञान पुढील आयुष्यांत आपणास मिळालें नाहीं." त्यानें इतिहास, प्रवासवृत्त, काव्य, तत्त्वज्ञान आणि भौतिकशास्त्रें यांवरील ग्रंथ वाचले होते. जेव्हां सन १७९३ सालीं कन्व्हेन्शनच्या सैन्यानें लिऑन्स शहर काबीज केलें तेव्हां त्या सैन्यानें त्याच्या बापास कैद करून तुरुंगांत टाकलें व कांहीं दिवसांनीं त्याचा बाप तेथें मरण पावला. या गोष्टीचा त्याच्या मनावर खिन्नतोत्पादक दृढ परिणाम झाला. यानंतर त्याला वनस्पतिशास्त्रासंबंधानें अभिरुचि उत्पन्न झाली. पुढें कांहीं काळपर्यंत तो काव्यें लिहीत होता असें दिसतें. सन १७९६ सालीं त्याची जुली कारान नांवाच्या स्त्रीबरोबर ओळख झाली व या ओळखीचा परिणाम त्या दोन व्यक्तींनां विवाहशृंखलेनें बद्ध करण्यांत झाला (सन १७९९). लिऑन्स शहरीं आपली बायको ठेवून बोर्ग येथें पदार्थविज्ञान आणि रसायनशास्त्र यांचा प्रोफेसर म्हणून तो गेला. इकडे त्याची बायको वारली व त्या गोष्टीचा त्याच्या मनावर बराच परिणाम झाला. पुढें कांहीं दिवस लिऑन्स शहरीं प्रोफेसरचें काम केल्यानंतर त्याला पॅरिस शहरीं प्रोफेसर नेमण्यांत आलें.

त्यानें विद्युच्छास्त्र आणि चुंबकशास्त्र यांत जे शोध लावले आहेत त्यांमुळें त्याची प्रसिद्धि झाली आहे. इ. स. १८२० सालच्या सप्टेंबरच्या ११ व्या तारखेस त्यानें असें ऐकलें कीं, एच. सी. ओएर्स्टेड यानें विद्युत् आणि चलचुंबकसूचि (मॅग्नेटिक नीडल) यांच्या दरम्यान कांहीं संबंध आहे असें दाखविलें आहे. त्याच महिन्याच्या १८ व्या तारखेस

त्यानें फ्रेंच अकॅडेमीस एक लेख सादर केला; या लेखांत त्यानें चलचुंबक आणि विद्युत् यांच्या परस्परसंबंधाच्या पुष्कळच गोष्टींचा उलगडा केला होता; व तत्सदृश दुसऱ्या कित्येक गोष्टींचेंहि त्यानें स्पष्टीकरण दिलें होतें. शास्त्रीय शोधास हें जें नवीन क्षेत्र उपलब्ध झालें त्याचा त्यानें उत्तम प्रकारें शोध केला. त्यानें या नवीन क्षेत्रांत गणिताचा उपयोग केला व गणिताच्या साह्याय्यानें नवीन शोधांविषयीं भविष्यें करून ठेवलीं; त्यांतील बहुतेक सारीं खरीं ठरलीं आहेत.

यानें गणितशास्त्राच्या शून्यलब्धि भागावर कांहीं महत्त्वाचे लेख लिहिले आहेत. याचा मृत्यु तारीख १० जून १८३६ रोजीं मार्सेलिस येथें झाला.

**अम्मपत्तम्**—(मद्रास इलाखा). तंजावर जिल्ह्याच्या पत्तुक्कोत्तइ तालुक्यांतलि बंदर. १०°१' उत्तर अक्षांश व ७९°१५' पूर्व रेखांश यांवर. लोकसंख्या सुमारें चार हजार. याचा सिलोनशीं मोठा व्यापार चालतो, येथून तांदूळ व गुरें तिकडे पाठविलीं जातात. सिलोन येथील चहाच्या मळ्यांवर काम करणारे मजूर या बंदरांतून दर आठवड्यांतून दोनदां जातात.

**अम्मालआचार्य अथवा वरदाचार्य**—हा घटितशत सुदर्शनाचार्य यांचा मुलगा असून कानेईचा वैष्णव आचार्य होता. हा १७ व्या शतकाच्या उत्तरार्धांत अथवा १८ व्या शतकाच्या आरंभीं झाला असावा. यानें रामानुजाचीं तत्त्वें व त्याचा दिग्विजय यांसंबंधीं सहा अंकी अन्योक्तिपर असें यतिराजविजय अथवा वेदांत विलास नांवाचें नाटक लिहिलें. तसेंच चोलभाण, वसंततिलकाभाण अशीं नाटकें लिहिलीं.

**अम्लशास्त्र**—अम्लांसंबंधीं सर्वसामान्य उपपत्ति,अम्लांची उत्पत्ति त्यांचे गुणधर्म वगैरे रसायन शास्त्रांतर्गत जे सिद्धान्त त्यासंबंधीं व इतर गोष्टींच्या विवेचनास अम्लशास्त्र असें नांव देतां येईल. प्रस्तुत लेखामध्यें अम्लें, अनाम्लें, अल्क व क्षार यांच्या संबंधीं विवेचन केलें आहे.

**अम्लें.**—प्राचीन भारतीयांस "अम्ल" हा पदार्थ माहीत होता एवढेंच नव्हे तर याचे सेंन्द्रिय अम्लें व खनिज-अम्लें असे दोन भेद केलेले आढळतात. सेंद्रिय अम्लांत उत्तम कोणतें हेंहि स्पष्ट केलेलें आहे असें "चाणकाम्लश्च सर्वेषां एक एव प्रशस्यते—अम्लवेतससमेकं वा सर्वेषामुत्तमोत्तमम्" या रसरत्नसमुच्चयांतील उताऱ्यावरूच दिसून येईल( विज्ञानेतिहास पृ. ४५८ पहा ).

सेंद्रिय अम्लांशिवाय खनिज अम्लेंहि प्राचीन भारतीय लोकांस माहीत होती. सांप्रत ज्यास ॲक्वारेजिया म्हणतात तें जलराज अम्ल तयार करण्याकरितां मुख्यत्वें "विड" या मिश्रणाचा उपयोग केलेला दिसतो. तसेंच गंधकाम्ल, नत्राम्ल, व उद्हराम्ल सुद्धां तयार करण्याचें त्यांस माहीत होतें. (विज्ञानेतिहास पृ. ४५९ पहा )

"अम्ल" या संज्ञेनें ज्या पदार्थांचा बोध होतो त्या पदार्थांत "अम्लत्व = आंबटपणा" हा गुण प्राधान्यें करून असल्यानें त्या आंबट पदार्थांस "अम्ल ही यथायोग्य संज्ञा देण्यांत आली. पाश्चात्यांत "ॲसिड" हा भारतीय अम्ल शब्दाच्या ऐवजीं वापरण्यांत येतो. त्याचाहि धात्वर्थ अम्ल पदार्थ असाच आहे. व व्यवहारांत "अम्ल" व "ॲसिड" या शब्दांनीं भारतीयांत व पाश्चात्यांत कोणताहि आंबट पदार्थ असाच अर्थ घेतला जातो. यामुळें नेहमींच्या व्यावहारिक भाषेंत "अम्ल" हा शब्द कोणत्याहि आंबट पदार्थास लावण्यांत येतो. प्राचीनांस—पौरस्त्य व पाश्चात्य या दोघांसहि—यासंबंधानें जास्त ज्ञान असल्याचें दिसून येत नाहीं.

पदार्थांस अम्लत्व आणण्यास कोणता घटक कारणीभूत आहे. याची उपपत्ति प्रथम लाव्होझिए यानें पुढें आणिली. वातावरणांतील प्राणवायु ( ऑक्सिजन ) हा घटक ज्वलनक्रियेस आवश्यक आहे हें आज सिद्ध करण्याची आवश्यकता नाहीं. लाव्होझिए यानें गंधक हा पदार्थ हवेंत जाळून "गंधक" व हवेंतील "प्राण" यांच्या संयोगीकरणानें जो पदार्थ "गंधक प्राणिद" तयार होतो त्या पदार्थाच्या अंगीं "अम्लत्व" असतें असें सिद्ध केलें. त्याचप्रमाणें गंधकासारखीं जीं मूलद्रव्यें "स्फुर" ( फॉस्फरस ) व "कर्ब" हींहि हवेंत जाळलीं असतां त्यांच्यापासून जे प्राणसंयुक्त पदार्थ "स्फुर प्राणिद", "कर्ब प्राणिद" तयार होतात त्यांच्याहि अंगीं हें "अम्लत्व" असतें असें त्यानें सिद्ध केलें व यावरून "अम्लत्व" आणण्यास "प्राण" वायु हा अवश्यक घटक आहे असें त्यानें प्रतिपादिलें व यावरून 'प्राण' वायूस "ऑक्सिजन" म्हणजे "अम्लजन" असें नांव दिलें; व हे "अम्ल" पदार्थ अधातुमूलद्रव्यें म्हणजे "प्राण" वायूशीं संयोग होऊन जे त्या अधातूंचे "प्राणिद" तयार होतात तेच होत, असेंहि प्रतिपादण्यांत आलें. कारण या अधातुमूलद्रव्यांच्या प्राणिदांचें पाण्यावर कार्य झालें म्हणजे अम्ल तयार होतें. जसें:—गंधक व प्राण यांच्या संयोगानें गप्र$_2$ हा गंधकाचा प्राणिद तयार होतो; जसें ग+प्र$_2$ = गप्र$_2$ या गंधक प्राणिदावर पाण्याचें कार्य केलें म्हणजे अम्ल तयार होतें जसें:—



$$\underset{\text{ग प्र}_2}{\text{गंधक प्राणिद}} + \underset{\text{उ}_2\text{प्र}}{\text{पाणी}} = \underset{\text{उ}_2\text{गप्र}_3}{\text{गंधकसाम्ल}}$$

अम्लजननास प्राण हा आवश्यक घटक असला पाहिजे ही कल्पना बरेच दिवस प्रचलित होती. परंतु पुढें "डेव्हि", "गेल्यूझाक" आणि "थेनॉर्ड" यांनीं संशोधन करून असें सिद्ध केलें कीं, अधातुरूप मूलद्रव्यांचा संयोग "उज्ज" वायूशीं ( हायड्रोजन ) झाला तरीहि त्यांच्या संयोगिकरणापासून होणारे पदार्थ "अम्ल" असतात व यावरून "अम्ल" चा आवश्यक घटक "प्राण"हाच असला पाहिजे असें नाहीं. याच्या सिद्धयर्थ "उज्ज" व "हर"

यांच्या संयोगीकरणापासून झालेला जो पदार्थ "उद्–हराम्ल" (हायड्रोक्लोरिक ॲसिड) याचें उदाहरण पुढें मांडलें. पुढें "गेल्झाक" यानें "उज्ज" व "कन" (कर्बनत्र)–(सायनोजन) यांच्या संयोगापासून "उद्–कनाम्ल" (हायड्रो सायनिक ॲसिड) होतें हें सिद्ध केल्यावर "अम्लत्वास" प्राणघटक आवश्यक असला पाहिजे ही समजूत नाहिशी झाली; व अम्लत्वास आवश्यक घटक उज्जच असला पाहिजे ही समजूत ठाम झाली. याचीं आज अनेक उदाहरणें आहेत जसें:— "उज्ज" व "अद" यांपासून तयार होणारें "उद्–अदाम्ल"; "उज्ज" व "स्तंभ" यांपासून "उत् स्तंभाम्ल" वगैरे असून एखादा पदार्थ "अम्ल" आहे किंवा नाहीं हें ठरविण्याकरितां त्यावर धातुरूप मूलद्रव्याचें कार्य करण्यांत येतें आणि त्यांतून "उज्ज" वायु असंयुक्त होऊन निघाला तर तो पदार्थ "अम्ल" आहे असें निश्चित समजावें.

यावरून "उज्ज' वायु 'अम्लत्वा' चा आवश्यक घटक आहे व तोच अम्लत्वजनक असल्यानें "प्राण" वायूस पाश्चात्य नांव "ऑक्सिजन" म्हणजे "अम्लजन" जें आहे तें अन्वर्थक नाहीं असें पाश्चात्य रसायनपंडितांस वाटूं लागलें आहे व त्याप्रमाणें त्यास (ऑक्सिजनाय) अन्वर्थक नामाभिधान देण्याची त्यांची योजना चालू आहे. यावरून भारतीय नांव "प्राण" हें अधिक अन्वर्थक असून निदान सांप्रत तरी त्याचें नवीन नामाभिधान करण्याचा प्रसंग येणार नाहीं.

अम्लांचे धर्मः—"अम्ल" पदार्थ रुचीला आंबट असतात, परंतु "अम्ल" समजले जाणारे सर्वच पदार्थ आंबट असतात असें नाहीं. यामुळें आंबटपणा हा 'अम्ला' चा लाक्षणिक धर्म समजण्यांत येत नाहीं. याशिवाय "अम्लांच्या" अंगीं सेंद्रिय रंगांस विवक्षित रंग आणण्याचा धर्म आहे. सेंद्रिय निळे रंग अम्लांच्या संसर्गानें लाल होतात. याकरितां रसायनशाळेंत अम्लत्वाची परीक्षा करण्याकरितां "ब्ल्यू लिटमस पेपर" वापरण्यांत येतात. ते वनस्पतिजन्य "लिटमस" नांवाच्या निळ्या रंगाचेच असतात. अम्लाच्या संसर्गानें वनस्पतिजन्य पिवळा रंग (उदाहरणार्थ हळद) विवर्ण होत नाहीं; तो पिवळाच राहतो.

बहुतेक अम्लें पाण्यांत विद्राव्य असतात. सर्व अम्लांत "उज्ज" हा आवश्यक घटक असतो. हा "उज्ज" अधिक ऋण मूलद्रव्यांशीं किंवा संयुक्त मूलकां(रॅडिकल्स)शीं संयुक्त असतो, व बहुधा "प्राण" यांशीं संयुक्त असतो. "अम्लें" धातूंशीं किंवा धातूंच्या प्राणिदांशीं संयोग पावतात व त्यापासून "क्षार" हा पदार्थ तयार होतो. धातूंशीं संयोग पावतांना अम्लांतील उज्ज निःसृत होतो हें खालील समीकरणानें ध्यानीं येईलः—




अम्लाशीं धातूचा प्राणिद संयुक्त होतानां अम्लांतील उज्जप्राणिदांतील प्राण याशीं संयुक्त होऊन पाणी तयार होतें ते असें:—




धातूचा उद्–प्राणिद (हायड्रॉक्साइड) किंवा उज्जित (हायड्रेट) अम्लाशीं संयुक्त झाला म्हणजेहि पाणी तयार होतें जसें:—




अम्लांचे भेद.—अम्लांत प्राणवायु हा जरी आवश्यक घटक नसतो तरी प्राण हा बहुतेक अम्लांत असतो. अशा प्राणयुक्त अम्लांस प्राणाम्लें (ऑक्सिॲसिड्स) असें म्हणतात. ज्या अम्लांत प्राणवायु नसतो त्यांस उद्+अम्लें =उदम्लें (हॉयड्र ॲसिड्स) असें म्हणतात. उद्–हराम्ल, उद–अदाम्ल वगैरे अम्लें उदम्लांचीं उदाहरणें आहेत. यांचे आणखी निरुद अम्लें व सोद (हायड्रेटेड ॲसिड) अम्लें असे भेद आहेत. निरुदअम्लें हीं जलविरहित अम्लें होत; व सोद अम्लें ही जलयुक्त अम्लें होत. उदम्लें म्हणजे उज्जयुक्त अम्लें व सोद अम्लें म्हणजे जलयुक्त अम्लें हे लक्षांत ठेवावें. सांप्रतच्या प्रचलित असलेल्या उपपत्तीनें पाहतां सर्व अम्लें उदम्लें आहेत. शिवाय खनिज अम्लें व सेंद्रिय (उद्भिज्ज) अम्लें असेहि भेद आहेत. खनिज (मिनरल) अम्लें खनिज पदार्थांपासून झालेलीं असतात; सेंद्रियअम्लें (ऑरगॅनिक अम्लें) किंवा उद्भिज्ज अम्लें सेंद्रिय पदार्थांपासून झालेलीं असतात.

प्राणाम्लें (ऑक्सि ॲसिड्स) म्हणून जीं अम्लें समजण्यांत येतात त्यांतील धातुनिःसार्य उज्ज (ज्याची जागा धातू घेतात असा हायड्रोजन) हा "प्राणाशीं" संयुक्त असून प्रउ या उत्प्राणिल रूपांत असतो. अम्लांतील उत्प्राणिल रूपांत असलेला उज्ज हा धातु निःसार्य असतो. परंतु प्राणाशीं संयुक्त नसलेला उज्ज हा धातु निःसार्य नसतो. यावरून प्राणाम्लें हीं अधातुरूपमूलद्रव्याचीं उज्जितें किंवा उत्प्राणिदें समजलीं जातात. अधातुरूप मूलद्रव्याच्या ऐवजीं अधातुरूप मूलें द्रव्यांचा संघ किंवा ज्या संघामध्यें अधातुरूपमूलद्रव्यांचें प्राधान्य आहे त्यांच्या उत्प्राणिदांस किंवा उज्जितांस प्राणाम्लेंच समजण्यांत येतें.

सेंद्रिय अम्लें.—सेंद्रिय अम्लांचें विशिष्ट लक्षण हें आहे कीं त्यांच्या घटकांत—कप्र.प्रउ हा संघ असतो. हा संघ एकमूल्य (मोनोव्हॅलंट) असून त्यास कर्बप्राणिल असें नांव आहे. या कर्बप्राणिल एकमूल्य संघांतील उज्ज हा धातु निःसार्य आहे, व उज्ज निःसृत झाला म्हणजे क्षार

होतो. हा कर्बप्राणिल उज्ज त्याचप्रमाणें व उज्ज उत्कर्बिल ( आल्किल ) मूलकाच्या योगानेंहि निःसार्य होतो व त्याच्या पासून संयुक्त इथ्रें होतात. सेंद्रिय अम्लांची अनाम्लता ( बेसिसिटि ) ही त्यांत असलेल्या कर्बप्राणिल संघाच्या संख्येवरून ठरविली जाते. प्राणाम्लें हीं कर्बप्राणिलाम्लें ( कॅबाक्सिलीक ॲसिड ) आहेत. यांत सुद्धां उत्प्राणिल संघ असतो. त्याचप्रमाणें प्रायोज्जिद अम्लें, कितनअम्लें इत्यादि असतात.

संज्ञा—अम्लांस नांवें खालील नियमान्वयें दिलीं आहेत. अम्लांतील जो मुख्य घटक, म्हणजे ज्या मुख्य पदार्थापासून अम्लें झालेली आहेत त्या मुख्य घटकाचें किंवा पदार्थाचें नांव त्या अम्लास दिलें आहे. हे नांव विशेषण करून "अम्ल" शब्दास लाविलें आहे. मुख्य अम्लाचा बोध होण्याकरितां मुख्य घटकावरून जें विशेषण "अम्ल" शब्दापाठिमागें लाविलें आहे त्यास इंग्रजीप्रमाणें ("इक = आयसी' वगैरे) कांहीं प्रत्यय लाविलेला नाहीं. मुख्य घटकाचेंच नांव प्रत्यय लाविल्याशिवाय मुख्य अम्लाचा बोध होण्याकरितां कायम ठेविलें आहे. याच्या स्पष्टीकरणार्थ गंधकाम्लाचें ( सल्फ्युरिक ॲसिड ) उदाहरण घेतलें आहे. 'गंधक" यापासून निघालेल्या अम्लांपैकीं जें मुख्य अम्ल त्यास "गंधकाम्ल" $उ_2गप्र_4$ हे नांव योजिलें आहे. "नत्र"( नायट्रोजन ) पासून झालेल्या मुख्य अम्लास'नत्राम्ल' ($उनप्र_3$)कर्बपासून निघालेलें अम्ल "कर्बाम्ल' $उ_2कप्र_3$ इ. अशी नांवें दिलीं आहेत.

अम्लांतील मुख्य घटकापासून एकापेक्षां अधिक अम्लें झालीं असल्यास त्यांत "प्राण" वायूचें प्रमाण ज्यांत जास्त असेल त्यांचीं नांवें वरील प्रमाणें दिलीं आहेत.यापेक्षां कमी प्रमाणानें "प्राणाचे" प्रमाण ज्या अम्लांत असेल त्या अम्लाचें नांव—मुख्य अम्लाच्या मुख्य घटकनांवाच्या पुढें "स" हा प्रत्यय लावून त्यास "अम्ल" हा शब्द लावला आहे. एखाद्या द्रव्यापासून अनेक अम्लें झालीं असल्यास त्यांच्या नांवांसहि हेंच: धोरण लागू करावे जसें:—गंधकाचे मुख्य अम्ल $उ_2गप्र_4$ याचे नांव गंधकाम्ल होय. गंधकापासून दुसरें अम्ल $उ_2गप्र_3$ या घटनेचें होतें त्यांत $उ_2गप्र_4$ यांतील प्राणाच्या प्रमाणापेक्षां कमी "प्राणाचे" प्रमाण आहे. म्हणून यास ( $उ_2गप्र_3$ )"गंधकसाम्ल" हें नांव दिलें आहे. त्याचप्रमाणें $उनप्र_3$ हें "नत्राम्ल" व "$उन प्र_2$" हें "नत्रसाम्ल" होय.

गंधकापासून निघालेलें तिसरें एक अम्ल $उ_2गप्र_2$ या घटनेचें आहे. यांत प्राणाचें प्रमाण "गंधकसाम्ला"—$उ_2गप्र_3$— पेक्षांहि कमी आहे. यास "उपगंधकसाम्ल" हें नांव दिलें आहे. यावरून हें ध्यानांत येईल कीं "स" प्रत्यय ज्या अम्लाच्या नांवाचा दर्शक आहे. त्यापेक्षां प्राणाचें प्रमाण कमी असलेले अम्लाचें नांव "उप" या उपसर्गानें व "स" या प्रत्ययानें संबोधिलें आहे.

मुख्य अम्लामध्यें जें प्राणाचें प्रमाण आहे त्यापेक्षांहि जास्त प्राणाचें प्रमाण असलेलीं अशीं कांहीं अम्लें आहेत. या अम्लांचीं नांवें "परि" या उपसर्गानें व पुढें कांहीं प्रत्यय न लावतां दिलीं आहेत. उदाहरणार्थ "हर" (क्लोरिन) चें एक अम्ल आहे त्यांत 'हराम्ल' $उहप्र_3$ यांत जें प्राणाचें प्रमाण आहे त्यापेक्षां जास्त प्राणाचें प्रमाण आहे म्हणून त्यास "परिहराम्ल" ( परक्लोरिक ॲसिड ) हें नांव दिलें आहे. याचें जास्त स्पष्टीकरण "हर" (क्लोरिन) चीं चार अम्लें आहेत त्यांतलि प्राणाच्या प्रमाणावरून वरील नियमानें नांवें दिलीं आहेत त्यांवरून होईलः—

(१) मुख्य अम्ल—हरम्ल = उ ह प्र ३ (क्लोरिक ॲसिड)

(२)याहून कमी प्राणाचे प्रमाण असलेलें अम्ल—हरसाम्ल $= उहप्र_2$( क्लोरस ॲसिड ).

(३) याहूनहि कमी प्राणाचें प्रमाण असलेलें अम्ल—उप हरसाम्ल = उहप्र ( हायपो क्लोरस ॲसिड ).

४ मुख्य अम्लापेक्षां जास्त प्राणाचे प्रमाण असलेलें अम्ल परिहराम्ल = $उ ह प्र_4$ ( परक्लोरिक ॲसिड ).

हे जे वर नियम दिले आहेत ते प्राणाम्लांच्या ( ऑक्सि ॲसिड्स ) नांवा संबंधानें मुख्यतः आहेत. परंतु यांशिवाय मुख्य मूलद्रव्याशीं "उज्ज" साक्षात् संयुक्त होऊन झालेलीं अशीं अम्लें आहेत. त्यांस "उद–अम्ल" ( हायड्र ॲसिड्स् ) असें म्हणतात. यांचीं नांवें दर्शविण्याकरितां "उद" हा उपसर्ग लाविला असून पुढें प्रत्यय लाविलेला नाहीं. या जातीचीं कांहीं अम्लें उदाहरणाकरितां दिलीं आहेत.

"उद्–हराम्ल" "उह" ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ).

"उद् स्तंभाम्ल" "उस्त" ( हायड्रो ब्रोमिक ॲसिड ).

"उद् गंधकाम्ल" $उ_2$ ग ( हायड्रो सल्फ्युरिक ॲसिड ).

"उद् अदाम्ल" "उद" ( हायड्र आयोडि ॲसिड ).

"उद् प्लवास्ल" "उप्ल" ( हायड्रोफ्ल्युओरिक ॲसिड ).

या नांवें देण्याच्या नियमाखालीं बहुतेक सर्व अम्लें येतील. परंतु अशीं कांहीं अम्लें आहेत कीं, त्यांचा समावेश या नियमाखालीं होऊं शकणार नाहीं. यांचे विवक्षित व खास धर्म असल्यानें त्यांस प्रसंगानुरूप नांवें देण्यांत येतील.

अम्लांच्या नांवांचीं उदाहरणें वर बरींच येऊन गेलीं आहेत. त्यांवरून अम्लांस नांवें देण्याचे नियम चांगलें ध्यानांत येतील.परंतु ही मराठी रासायनिक परिभाषा सांप्रत महाराष्ट्रीयांस विशेष परिचयाची नसल्यानें आणखी कांहीं अम्लांच्या नांवांचीं उदाहरणें खालीं दिलीं आहेतः—

"आदाम्ल" "उद" ( हायड्र आयोडिक ॲसिड ).

"उप अदसाम्ल" "उदप्र" ( हायपो आयोडस ॲसिड ).

"अदाम्ल" $उद प्र_3$ ( आयोडिक ॲसिड )

"परि अदाम्ल" $उद प्र_4$ ( पर आयोडिक ॲसिड ).

"उद् स्तंभाम्ल" = उस्त = ( हायड्रो ब्रोमिक ॲसिड ).

"उप स्तंभसाम्ल" = उस्त प्र = (हायपो ब्रोमस ॲसिड)

"स्तंभसाम्ल" = उस्तप्र$_{२}$ = ब्रोमस ॲसिड.

"स्तंभाम्ल" 'उस्तप्र$_{३}$' = ब्रोमिक ॲसिड.

"उद कर्ब नत्राम्ल"उकन = हायड्रो सायनिक ॲसिड.

"कर्बनत्राम्ल = उप्रकन = सायनिक ॲसिड.

उदलोहस कर्बनत्राम्ल = उ$_{४}$ लो (कन)$_{६}$ = हायड्रो फेरो सायनिक ॲसिड.

उद लोहकर्बनत्राम्ल = उ$_{३}$लो (कन)$_{६}$ = हायड्रो फेरि सायनाइड.

कर्बनत्र मूत्रकाम्ल = उ$_{२}$ क$_{३}$ न$_{३}$ प्र$_{३}$ = सायन् यूरिक ॲसिड.

द्राक्षाम्ल = टार्टरिक ॲसिड = हें अम्ल मुख्यत्वें द्राक्षापासून निघतें म्हणून द्राक्षावरून त्या अम्लास हें नांव दिलें आहे.

जंबीराम्ल = सायट्रिक ॲसिड = लिंबापैकीं जंबीर हें मुख्य असल्यानें लिंबांतून निघणाऱ्या अम्लास "जंबीराम्ल" हें नांव दिलें आहे.

दार्वाम्ल = असेटिक ॲसिड = हें अम्ल लांकडाच्या निर्जल ऊर्ध्वपातनापासून मुख्यत्वें तयार होतें व लांकूड यास संस्कृत नांव "दारु" असल्यानें असेटिक ॲसिड यास दार्वाम्ल हें नांव दिलें आहे.

काष्ठाम्ल = ऑक्झॅलिक ॲसिड = हें अम्ल पुष्कळ रीतीनें तयार होतें त्यांत लांकडाचा भुसा हें मुख्य द्रव्य असल्यानें व लांकूड यास काष्ठ हें संस्कृत नांव असल्यानें ऑक्झॅलिक ॲसिड यास काष्ठाम्ल असें नांव दिलें आहे.

अ ना म्लें.—अम्लांत उज्ज हा अवश्यक घटक असून तो धातुनिःसार्य असतो हें वर आलेलेंच आहे. धातूच्या योगानें अम्लांतील उज्ज हा सर्वस्वीं निःसार्य झाला व अम्ल पूर्ण निर्गुण (न्यूट्रल) झालें म्हणजे जो पदार्थ तयार होतो त्यास क्षार म्हणतात. उलटपक्षीं अम्लास निर्गुणत्व आणणारा जो पदार्थ त्यास अल्क (अल्कली) किंवा अनाम्ल (बेस) असें म्हणतात. पण अल्क किंवा अनाम्ल याची क्रिया अम्लां वर केल्यास अम्लांतून उज्ज निःसार्य होऊन पाणी बनतें जसें:—



खट प्राणिद (खप्र) + उदहराम्ल (उह$_{२}$) = खटहरिद (खह$_{२}$) + पाणी (उ$_{२}$प्र)

जशद प्राणिद (जप्र) + गंधकाम्ल (उ$_{२}$गप्र$_{४}$) = जशदगंधकित (जग प्र$_{४}$) + पाणी (उ$_{२}$प्र)

सिंधुउत्प्राणिद (सोडि.हायड्रॉक्साइड) (धुप्रउ) + उदहराम्ल (उह) = सिंधुहरिद (धुह) मीठ + पाणी (उ$_{२}$प्र)

अधातुरूपमूलद्रव्यांचें प्राणिद किंवा उत्प्राणिद यांचे पाण्याच्या संयोगानें अम्ल होतें हें अम्लाची उपपत्ति सांगतांना वर आलेलेंच आहे. परंतु धातुरूपमूलद्रव्यांचे प्राणिद किंवा उत्प्राणिद यांवर पाण्याचें कार्य झालें म्हणजे अल्क किंवा अनाम्लें तयार होतात. या पदार्थांचे धर्म अम्लाच्या विरुद्ध असतात. हा धातूंचा धर्म इतका महत्त्वाचा आहे कीं, यांस धातु हें नांव योजण्याऐवजीं कधीं कधीं अनाम्लजनक (बेस फॉर्मिंग) मूलद्रव्यें असें नांव देण्यांत येतें. रासायनिकदृष्ट्या अनाम्लाचे धर्म अम्लाच्या विरुद्ध असतात. व त्यांचा विशिष्ट धर्म म्हटला म्हणजे अनाम्लाचें कार्य अम्लावर झालें म्हणजे अनाम्लें अम्लाशीं संयोग पावून क्षार व पाणी हे पदार्थ तयार होतात.

सर्व अनाम्लामध्यें (बेसेस) सिंधु उत्प्राणिद, किंवा सिंधु उज्जित = धुप्रउ, पालाश उत्प्राणिद. किंवा पालाश उज्जित पाप्रउ; खट उत्प्राणिद, किंवा खट उज्जित ख(प्रउ$_{२}$) आणि खटप्राणिद (चुनकळी). ख प्र, हे फार प्रचारांतले आहेत. जे अनाम्ल पाण्यांत विरघळतात त्यांस अल्क हें नांव दिलें आहे. अल्क वर्गांतील मुख्य अल्क सिंधु व पालाश धातूंचे उत्प्राणिद किंवा उज्जित हे होत. अम्न (नउ$_{३}$) वायूचा प्रवाह पाण्यांत सोडला म्हणजे नउ$_{४}$ प्रउ या घटनेचा संयुक्त पदार्थ बहुत करून तयार होतो (अमोनि या पहा). हा पदार्थ सिंधु व पालाश यांच्या उज्जिताप्रमाणेंच सर्व दृष्टीनें कार्यकारी आहे म्हणून यास अमोनि उज्जित असें म्हणतात. यांत न = उ$_{४}$ हा जो संघ आहे त्याची धातुप्रमाणेंच रसायन क्रिया घडते. अल्क वर्गांतील हे सर्व साधारण व अत्युपयोगी अल्क आहेत.

या वरील विवेचनावरून हें ध्यानांत येईल कीं अनाम्ल शब्दाच्या अर्थाची व्याप्ति अल्क शब्दाच्या अर्थव्याप्तीपेक्षां अधिक आहे. धातूचे प्राणिद किंवा उत्प्राणिद हे अनाम्ल आहेत कारण ते अम्लास अनाम्ल करितात. व त्यापासून क्षार व पाणी हे पदार्थ तयार होतात. परंतु या धातूंचे कांहीं प्राणिद व उत्प्राणिद असे आहेत कीं, ते पाण्यांत विरघळत नाहींत. उदाहरणार्थ, जशद प्राणिद, जप्र; सीस प्राणिद, सप्र इ० यांचें अम्लावर कार्य होऊन क्षार व पाणी हे पदार्थ तयार होतात. परंतु हे सिंधु उत्प्राणिद, पालाश उत्प्राणिद या प्रमाणें पाण्यांत विरघळत नाहींत. यामुळें यांचा समावेश अल्क वर्गांत होत नाहीं; परंतु अनाम्ल या वर्गांत यांचा समावेश होतो, तात्पर्य इंग्रजींत 'बेस' या शब्दानें जो बोध होतो तोच बोध होण्यासाठीं अनाम्ल हा शब्द या परिभाषेंत योजला आहे.

सं ज्ञा.—इंग्रजी रासायनिक परिभाषेंतील बेस व अल्क यांस मराठी रासायनिक अन्वर्थक नांव काय द्यावें याविषयीं तज्ज्ञांत एकमत असल्याचें दिसून येत नाहीं.

प्रो. रानडे "अल्कली" शब्दासंबंधानें म्हणतातः—

'व्युत्पत्तीनें ह्याचा अर्थ कलिभस्म (ॲशेस ऑफ कली) असा होतो, कित्येक लोक "अल्कली" याला "कल्याब" हा मराठी शब्द सुचवितात. परंतु याचा अर्थ विद्यार्थ्यांना सुलभ होणार नाहीं. म्हणून आम्ही कांहीं स्थळीं अल्कली

हाच शब्द कायम ठेविला आहे'(कोश पृ. ५१). आम्हांसहि कल्याब हा शब्द अल्कली या अर्थी पसंत नाहीं.

याच्याच पुढें पृ. ५२ वर एन. बी. या लक्षवेधक टीपेंत म्हटलें आहे. 'बडोद्यांतील कलाभुवन पाठशाळेंत अल्कलीला कल्याब (ऑन दि अनॉलजी ऑफ तेजाब)'बेस' = 'भस्म' वापरतात' असें लिहिलें आहे. तेजाब हा पदार्थ पाण्यासारखा पातळ असतो. परंतु अल्कलीज जसें सिंधु उत्प्राणिद ( सोडिअम हायड्रॉक्साइड) पालाश उज्जित (पोट्याशिअम हायड्रेट), खट प्राणिद ( कॅलशिअम ऑक्साइड) इ०. हे पदार्थ पातळ पाण्यासारखे नसतात, ते घन असतात, हें सर्वांस माहीत आहे. तेव्हां 'ऑन दि ॲनालजी आफ तेजाब' या सादृश्यावर 'कल्याब' शब्द अन्वर्थक नाहीं हें सहज दिसून येईल.

प्रो. रॉय यांनीं अल्कली यास क्षार शब्द वापरला आहे. व प्रो. गज्जर यांनीं यास 'क्षार' व 'कल्याव' वापरून बेस यास 'भस्म' शब्द वापरला आहे असें म्हटलें आहे. कल्याब शब्द कसा अन्वर्थक नाहीं हें वर सांगितलेंच आहे.

'अल्कली' यास 'क्षार' हा शब्द बरोबर नाहीं असे प्रो. मोडकांचें मत आहे (सेंद्रिय रसायनशास्त्र, पूर्वार्ध भा २ रा, परिशिष्ट पृ. ५६२ पहा). तसेंच 'बेस'यास भस्म शोभेल परंतु त्या शब्दानें अडचणी येतात. याकरितां 'बेस' हाच शब्द ठेवावा असें वाटतें,असें प्रोफेसर मोडक यांचें मत आहे.हिंदी वैज्ञानिककोश व सयाजीवैज्ञानिकशब्दसंग्रह यांत 'बेस' यास भस्म शब्द दिला आहे. व अल्कली यास क्षार व खार हे शब्द (हिं. वै. को.) दिले आहेत. अल्कली हा शब्द सयाजी वैज्ञानिक कोशांत मुळीं दिलाच नाहीं.

अल्कली यास क्षार व बेस यास भस्म हें प्रो. मोडकांच्या मतांप्रमाणें आम्हांसहि पसंत नसून अन्वर्थक दिसत नाहीं. आम्ही " अल्कली " यास " अल्क " व " बेस " यास " अनाम्ल " हे शब्द योजिले आहेत. याचें समर्थन खालीं केलें आहे:—

" अल्क " या संस्कृत शब्दाचा अर्थ एक प्रकारचें झाड असा आहे. ( आपटे डिक्शनरी पान १५७ ) व झाडाच्या राखेपासून निघणारा क्षार यास अल्क हें नांव देऊन त्यावरून " अल्क "हा शब्द इंग्रजी " अल्कली " या शब्दाच्या अर्थी वर्गवाचक योजण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. यावरून " अल्क " शब्दाची व्युत्पत्ति संस्कृत शब्दापासून ठरते.

" अल्क ":—प्रो. रानडे कोश. पृ. ३१८ नियम ७ यांत " इंग्रजी नांवांच्या लॅटिन किंवा ग्रीक धातूंना संस्कृत वर्णोच्चार रूप देऊन तेच धातुशब्द कायम करून क्रुम, कर्ब आणि रद " हे शब्द ज्या तत्वावर योजण्यांत आले आहेत त्याच तत्वावर " अल्कली " शब्दावरून " अल्क " हा शब्द योजला आहे.

त्याचप्रमाणें इंग्रजी शब्दांस मराठी शब्द योजण्यासंबंधानें प्रो. मोडकांचें असें मत आहे:-" हे शब्द इंग्रजी शब्दांशीं सदृश असे मराठी भाषेस शोभणारे व मराठी पेहराव दिलेले असे आहेत. ही गोष्ट जरी शब्द व्युत्पत्तिशास्त्रास संमत नसली तरी असे शब्द योजणें फार सोईचें व सयुक्तिक आहे व तसे केल्यावांचून चालण्याजोगें नाहीं" ( सेन्द्रि० र. पू. भा. २ प्रस्तावना पृ. ९ पहा ). पाश्चात्य रसायनं शास्त्राच्या वाढीबरोबर असंख्य रासायनिक नवे नवे शब्द फारच सूक्ष्म अर्थांचे प्रचारांत आलेले आहेत. या सर्वांस अन्वर्थक असे संस्कृत शब्द सांपडणें कठिण आहे. याकरितां " इंग्रजी शब्दास सदृश असे मराठी भाषेस शोभणारे व मराठी पेहेराव दिलेले शब्द " व्युत्पत्तिशास्त्रास संमत नसले तरी या मार्गाचें अवलंबन केल्याशिवाय चालण्याजोगें नसल्यानें प्रस्तुत रासायनिक परिभाषेंत या तत्त्वावर पुष्कळ शब्द योजल्याचें आढळून येईल.व याच आधारावर "अल्कली शब्दावरून " अल्क " हा शब्द योजला आहे.

" अनाम्ल " :—" बेस " यास " अनाम्ल " हा शब्द आम्ही खालील आधारावर योजला आहे.

" बेस " या शब्दाची व्याख्या ( १ ) वेब्स्टर्स कॉलिजिएट डिक्शनरी, ( २ ) कनसाइज ऑक्सफोर्ड डिक्शनरी, ( ३ ) एनसायक्लोपीडिया ब्रिटानिका आवृत्ति ११ वगैरे इंग्रजी कोशांतून पहातां असें दिसून येईल की, ( १ ) नॉन ॲसिड कांपोनंट आफ् ए साल्ट, ( २ ) कोरिलेटिव्ह ऑफ ॲसिडस्, ( ३ ) ॲंटिथेटिकल टु ॲसिडस् वगैरे अम्लघ्न, अम्लहर, अनाम्ल वगैरे सूचक विशेषणात्मक वाक्पादानें "बेस" याच्या अर्थाची फोड केलेली आहे.परंतु "अल्कली" संबंधानें या अर्थाचीं विशेषणें योजलेलीं नाहींत. यावरून "बेस " यास " नॉन ॲसिड कांपोनंट " " कोरिलेटिव्ह टु ॲसिड्स् " " ॲंटिथेटिकल टु ॲसिड्स् " या अर्थाचाच मराठी शब्द वापरणें इष्ट दिसतें. " अम्ल" हा शब्द " ॲसिड " या अर्थी रूढच आहे तेव्हां यावरून वरील अर्थसूचक अम्लघ्न, अम्लहर, अनाम्ल, वगैरे शब्द होतात व यापैकीं " अनाम्ल " हा शब्द विशेष योग्य वाटल्यानें "बेस" यास " अनाम्ल " ( नाम व वि. ) शब्द योजिला आहे व यासंबंधीं या सर्वांचें मतैक्य होईल अशी आशा आहे.

" अल्कली " यास " अल्क " व " बेस " यास " अनाम्ल " हे शब्द याप्रमाणें निश्चित केल्यावर त्यांच्या व्याख्या देणें इष्ट आहे. करितां त्या खालीं दिल्या आहेत.

" अल्क":—रासायनिक मूळ द्रव्यांपैकीं धातुरूप मूळ द्रव्यांचे प्राणिद ( ऑक्साइड्स् ), उत्प्राणिद ( हायड्रॉक्साइड्स् ) वगैरे संयुक्त पदार्थ, दाहक सिंधु ( कॉस्टिक सोडा ), दाहक पालाश ( कॉस्टिक पोटॅश ), अम्न ( अमोनियाँ ) इ० यांच्या प्रमाणें पाण्यांत अति विद्राव्य आहेत. ज्यांचे जलद्रव दाहक असतात, जे तीव्र अम्लांस निर्गुण ( न्युट्रल ) करतात, व ज्यांच्या संसर्गानें उद्भिज्ज पिवळे रंग लाल किंवा तांबूस होतात, उद्भिज्ज लाल रंग निळे होतात व उद्भिज्ज आंबले

रंग हिरवे होतात अशा पदार्थांस " अल्क " म्हणावें. अल्क हे " अनाम्ल " आहेत.

" अनाम्ल ":—अनाम्लें हीं घनधुवीमूलद्रव्य, अधातुरूपमूलद्रव्य किंवा मूलक यांचे प्राणिद किंवा उत्प्राणिद ( हायड्रॉक्साईड्स ) असतात. तीं अम्लांस निर्गुण करून त्यांपासून क्षार व पाणी हे तयार होतात. अनाम्लें अम्लांस निर्गुण करतात. तीं अल्काप्रमाणें तीव्र व पाण्यांत द्राव्य नसतात. अल्काप्रमाणें अनाम्लें उद्भिज्ज रंगास विवर्ण क्वचितच करतात. अम्ल तीव्र असलें तर तें निर्बल अनाम्लांनीं पूर्ण निर्गुण होत नाहीं.

निर्गुणीकरणः— उद्भिज्ज लिटमस नांवाचा रंग असतो त्याच्या निर्गुणद्रवाचा रंग निळा असतो. अम्लांच्या द्रवांच्या अंगीं या निळ्या रंगास लाल करण्याचा धर्म आहे, व अनाम्लांच्या पाण्यांत केलेल्या द्रवांच्या अंगीं या लाल रंगास पूर्ववत् निळा रंग आणण्याचा धर्म असतो उदाहरणार्थ, लिटमसच्या निर्गुण द्रवांत उत्–हराम्लाचे एक दोन थेंब मिळविले तर द्रवास लाल रंग येईल. आतां या लाल द्रवांत सिंधु उत्प्राणिदाच्या ( सोडियम हायड्रेट ) पाण्यांत केलेल्या द्रवाचे थोडेसे थेंब मिळविले तर मूळचा निळा रंग त्या लाल द्रवास पुनः प्राप्त होईल. यांत पुनः अम्ल मिळविल्यास या द्रवास पुनः लाल रंग येतो. ज्यावेळीं द्रवास लाल रंग प्राप्त होतो त्यावेळीं त्यास अम्ल प्रतिक्रिया म्हणतात; व ज्या वेळीं द्रवास निळा रंग प्राप्त होतो त्यावेळीं त्यास अल्क प्रतिक्रिया म्हणतात. जर निळ्या रंगाच्या द्रवांत अम्ल विशेष काळजीपूर्वक मिळवीत राहिलें तर निळा रंग कमी कमी स्पष्ट होत जातो व अशी स्थिति येते कीं द्रवास निळसर रंग असून त्यांत थोडीशी तांबूस रंगाची छटा असते. या स्थितींतील द्रवास किंवा या स्थितीच्या अगदीं जवळ जवळ द्रवाची स्थिति आली म्हणजे द्रव निर्गुण असतो म्हणजे तो अम्लहि नसतो व अल्कहि नसतो. अम्ल आणि अल्क यांनीं एकमेकांचे धर्म निर्गुण किंवा नाहींसे केलेले असतात. अम्ल आणि अनाम्ल यांची एकमेकांवर प्रतिक्रिया करून अम्ल आणि अनाम्ल धर्म निर्गुण किंवा नाहींसे करण्याची जी रीत त्या रीतीला निर्गुणीकरण असें म्हणतात.

यापुढें असा प्रश्न उपस्थित होतो कीं, अनाम्लाचें एक निश्चित प्रमाण घेतलें तर त्यास निर्गुण करण्यास अम्लाचेंहि निश्चित प्रमाण लागतें काय ? याचें सप्रमाण उत्तर प्रत्यक्ष प्रयोगानेंच मिळण्यासारखें आहे. याकरितां अम्लाचे व अनाम्लाचे द्रव उदाहरणार्थ, उद्धराम्ला ( हायड्रोक्लोरिक ॲसिड ) चा आणि सिंधु उत्प्राणिदाचा असे दोन द्रव तयार करावेत. एका कांचपात्रांत किंवा पेल्यांत अम्लद्रवाचें प्रमाण बरोबर मोजून घालावें व त्यांत " लिटमसच्या " द्रवाचे दोन तीन थेंब घालावेत. नंतर सिंधु उत्प्राणिदाचा द्रव एका अंशांकित ( ग्रॅज्वेटेड ) कांचनलिकेंत घालून तींतून सिंधु उत्प्राणिदाचा द्रव कांचपात्रांतलि अम्ल द्रवांत थेंब थेंब घालीत रहावें हीं क्रिया द्रवास निर्गुण स्थिति ( निर्गुणत्व ) येई पर्यंत सुरू ठेवावी. द्रव निर्गुण झाला किंवा नाहीं हें अल्कच्या शेवटच्या थेंबानें द्रवास निळसर रंग येतांच दिसेल. अम्ल द्रव निर्गुण होण्यास अल्कचा किती द्रव लागला हे अंशांकित नलिकेंत काळजीपूर्वक पाहून टिपून ठेवावें. याच द्रवांचें निरनिराळें प्रमाण घेऊन हे प्रयोग वरेच वेळां केले तर असें आढळून येईल कीं, अम्लद्रवाच्या निश्चित प्रमाणास निर्गुण करण्यास अल्कच्या द्रवाचें तेंच प्रमाण प्रत्येक वेळीं लागेल. उलटपक्षीं अल्कच्या निश्चित प्रमाणास अम्लचें तेंच निश्चित प्रमाण लागेल. असले असंख्य प्रयोग करून असें सिद्ध झालें आहे कीं, सर्व अम्लें व सर्व अल्क यांस हाच नियम लागू आहे.

क्षार.—वरील अम्लद्रव आणि अल्कद्रव निर्गुण करून तयार झालेला द्रव जर बाष्पक ( इव्हॅपोरेटिंग ) पात्रांत ओतला आणि त्यांतील पाणी बाष्परूपानें उडवून टाकलें तर बाष्पकांत एक पांढरा पदार्थ राहील; तो जिभेवर ठेवून त्याची रुचि घेतली तर तो ताबडतोब ओळखतां येईल. हा पदार्थ सिंधु हरिद ( सोडियम क्लोराइड ) म्हणजे नेहमीच्या खाण्यांतले मीठ होय. यांत रासायनिकक्रिया प्रतिक्रिया काय झाल्या आहेत त्या खालील समीकरणानें दाखावेल्या आहेतः—

सिंधु उत्प्राणिद (सोडि. हायड्रेट.) धुप्रउ + उद्धराम्ल (हायड्रोक्लो. ॲ.) उह = सिंधुहरिद मीठ धुह + पाणी उप्र$_2$

या पदार्थाचें लिटमस द्रवावर कोणतेंहि कार्य होत नाहीं, किंवा कोणत्याहि तऱ्हेनें त्यांत अम्ल किंवा अल्क धर्म असल्याचें दृष्टोत्पत्तीस येत नाहीं; दुसऱ्या शब्दांनीं सांगावयाचें म्हणजे अम्लद्रव व अल्कद्रव एकत्र होऊन त्यांचे अम्ल व अल्क धर्म हे पूर्णपणें नाहींसे झालेले किंवा निर्गुण झालेले आहेत. मीठ हा पदार्थ क्षार वर्गाचा आदर्शरूप आहे. अम्लांतील निःसार्य उज्जच्या ऐवजीं आनाम्लांतील धातुरूप घटक येऊन तयार झालेले जे पदार्थ त्यांस क्षार म्हणतात.

हे क्षार दोन प्रकारचे आहेत. एकांत " प्राण " हा घटक असतो व दुसऱ्यांत प्राण हा घटक नसतो. मीठ या क्षारांत प्राण हा घटक नाहीं. परंतु निर्गुणीकरणाच्या प्रयोगांत पालाश उत्प्राणिद ( पोट्याशियम हायड्रेट ) व गंधकाम्ल यांच्या द्रवांचा उपयोग केला आणि निर्गुण झालेला द्रव आटविला तर बाष्पक पात्रांत एक पांढरा निर्गुण क्षार आढळेल. हा क्षार पालाश गंधकित ( पोट्याशिअम सल्फेट ) असून तो खालील समीकरणानें तयार झाल :—

गंधकाम्ल (सल्फ्युरिकॲ.) उ$_2$गप्र$_4$ + पालाशउत्प्राणिद (पोट्याशियम हायड्रेट) $_2$पा प्र उ = पालाशगंधकित (पोट्याशि.सल्फेट) पा$_2$ गप्र$_4$ + पाणी २ उ$_2$ प्र

या बाबतींत वरील समीकरणावरून असें दिसून येईल

कीं या क्षारांत—पालाश गंधकितांत—प्राण हा घटक आहे, व वरील मीठ या क्षारांत प्राण हा घटक नाहीं.

साधारणतः क्षारांचे निर्गुण धर्म असतात म्हणजे त्यांची प्रतिक्रिया अम्ल किंवा अल्कधर्मीय नसते. परंतु हा नियम सर्वव्यापी नाहीं. तीव्र ( स्ट्रॉंग ) अम्लाची क्रिया निर्बल अनाम्लावर ( बेस) केली असतां तयार झालेला क्षार अम्ल धर्मी असूं शकेल. उदाहरणार्थ—पारद नात्रित—मरक्युरिकनायट्रेट ); तसेंच निर्बल अम्लाची क्रिया तीव्र अनाम्लां ( बेस ) वर केली तर तयार झालेला क्षार अल्कधर्मीय असूं शकेल. उदाहरणार्थ सिंधुकर्बित ( सोडियम कार्बोनेट ) हा क्षार सिंधु उत्प्राणिद हें तीव्र अनाम्ल व कर्बाम्ल ( कॅरबॉनिक ॲसिड ) हे निर्बल अम्ल मिळून तयार झालेला क्षार आहे. हा अल्कधर्मी आहे कारण याची प्रतिक्रिया लिटमसावर अल्कीय असते. हें लक्षांत ठेवणे जरूर आहे कीं ज्या वेळीं अनाम्ल व अम्ल यांची एकमेकांवर रासायनिक क्रिया होते. त्यावेळीं क्षार व पाणी हे पदार्थ होतात, अनाम्लांऐवजी धातूरूप मूलद्रव्यें योजूनहि क्षार तयार होतात. परंतु या प्रसंगीं पाणी तयार न होतां उज्ज वायु तयार होतो जसें:—




( यासंबंधीं जास्त माहिती "क्षार" शब्दाखालीं पहा)

**अम्ल अमिदें** (ॲसिड् अमाइड्स):—अम्ल आमिदें हे रासायनिक संयुक्त पदार्थ आहेत. हे पदार्थ अम्ल ( अमोनिया नउ$_{३}$ ) मधील उज्जनिःसारित होऊन त्या जागीं अम्लमूलकें जाऊन झालेले असतात. अम्ल मधील उज्जचा एक परमाणु, दोन परमाणु आणि तीन परमाणु निःसारित होऊन जीं अम्ल अमिदें बनतात त्यांस अनुक्रमें आद्य, द्वितीयक आणि तृतीयक अमिदें म्हणतात. यापैकीं मू. क. प्र. नउ$_{२}$ या घटनेचीं आद्य अमिदें फार महत्त्वाचीं आहेत. हीं अमिदें तयार करण्याच्या रीती खालीं दिल्या आहेत.

(१) अम्लाचा ( अमोनि अमोनियम ) क्षार निर्जल करून त्याचे शुष्कपातन करावें.

(२) ( नत्रिलांची (नायट्राइल्स) आंशिक (पार्शल) उदकप्रक्रिया ( हायड्रॉलिसिस ) करावी.

(३) अम्ल हरिदांवर (ॲसिड क्लोराइड्स) अम्नची किंवा अमोनि कर्बिताची क्रिया करावी;

(४) अनुजिदांवर ( अन हायड्राइड्स ) अम्नची किंवा अमोनि कर्बिताची क्रिया करावी.

(५) किंवा संयुक्त इथें ( ईस्टर्स ) अम्न बरोबर उष्ण करावींत म्हणजे आद्य अमिदें तयार होतात.

अमिदें घन, स्फटिकरूप संयुक्त पदार्थ आहेत. ( पुत्तिकामिद = फार्म अमाइडचा अपवाद करून ) हीं अमिदें प्रथम पाण्यांत विद्राव्य असतात; हीं विद्राव्यता—अणूंमधील कर्बचें प्रमाण जसें वाढत जाईल त्या मानानें कमी कमी होत जाते. यांची उदकप्रक्रिया (हायड्रालिसिस) सहज होते; अल्कें किंवा अम्लें यांबरोबर अमिदें उकळिलीं असतां त्यांचे घटक असंयुक्त होतात. अमिदांचा इथ्रांमध्यें द्रव करून त्या इथ्रद्रवांत उद्धराम्ल वायु घातला असतां उद्धराम्लाशीं आमिदें संयुक्त होतात; परंतु हें संयुक्तपदार्थ अति अस्थिर असतात, कारण पाण्याच्या योगानें त्यांचें त्वरित पृथक्करण होतें.

दुसऱ्यापक्षीं अमिदें किंचित् अम्लधर्मी असतात कारण अमिल मूलकांतील ( ॲमिडो ग्रुप ) उज्ज हा धातु निःसारणीय असतो व त्यापासून पारद दारिल आमिद (कउ$_{३}$ कप्रनउ )$_{२}$ रा, या घटनेचे पदार्थ बनतात. नत्रसाम्लाची क्रिया अमिदांवर केली म्हणजे ते पृथग्भुत होतात. त्यांतुन नत्र असंयुक्त होतो व अनुरूप ( कारेस्पॉन्डिंग ) अम्ल तयार होतें तें असें:—

आमिद + नत्रसाम्ल = अनुरूपअम्ल + नत्र पाणी
मू.कप्र.नउ$_{२}$ + प्रनप्रउ = (मू.कप्रप्रउ) + न + उ$_{२}$प्र

स्फुर अनुज्जिदांबरांवर त्यांचें पातन केलें म्हणजे त्यांच्यापासून नात्रिलें तयार होतात. अमिदांवर, स्तंभ व अल्कहल द्रवित दाहक पालाश क्रिया केली म्हणजे अमिनें तयार होतात. परंतु त्यांत मूळ आमिदांपेक्षां एक कर्ब परमाणु कमी असतो. ही प्रतिक्रिया उपपत्तिदृष्ट्या फार महत्त्वाची आहे. ही प्रतिक्रिया खालीं दाखविली आहे.

मू. क प्र न उ$_{२}$ ——> मू.कप्रउस्त——>
——> मू.नउ$_{२}$ + पा$_{२}$कप्र$_{३}$ + पास्त + उ$_{२}$प्र

पुत्तिकामिद, उ.कप्रनउ$_{२}$, रसरूप असून सहज जल विद्राव्य आहे. याचा उत्क्वथनांक १९५° श असून त्याचें अंशमात्र पृथक्करण होतें. दार्वमिद कउ$_{३}$ कप्रनउ$_{२}$, निर्वर्ण स्फटिक रूप आर्द्रता शोषक घन पदार्थ आहे. याचा रसांक ८२°–८३° श असून उत्क्वथनांक २२२° श असतो. अमोनि दारिताचें शुष्क पातन करून हा आमिद बहुधां तयार करितात. दार्वमिद पाण्यांत व अल्कहलांत सहज विद्राव्य असतो. परंतु इथ्रांत अविद्राव्य असतो.

उदामिद, क$_{६}$उ$_{५}$ कप्रनउ$_{२}$ याचे पर्णाकार स्फटिक होतात व ते १३०° श वर वितळतात. अमोनि कर्बिताची क्रिया उदायिल हारिदांवर क$_{६}$उ$_{५}$कप्रह केली म्हणजे उदामिद तयार होतो. याचा रजत क्षार इथिल अदिदाशी संयुक्त केला म्हणजे उदइमिद इथिल इथ्र. क.$_{६}$उ$_{५}$कः (नउ). प्रक$_{२}$उ$_{५}$ ( बेन्झ इमिडो एथिल इथर ) तयार होतो. यावरून हा रजतक्षार पाशविपर्यस्त . इमिद उदाम्लां क$_{६}$उ$_{५}$कः ( नउ ). प्रउपासुन निघाला असावा असें सिद्ध होतें.

( मूकप्र )$_{२}$ नउ आणि ( मूक प्र)$_{३}$ न या घटनेचीं द्वितीयक आणि तृतयिक आमिदें, आद्य आमिदें किंवा नात्रिलें यापासून २००° श उष्णमानावर अम्लें किंवा

अनुज्जिदें ( अनहायड्राइड्स ) यांबरोबर उष्ण केली म्हणजे तयार होतात.

मू.कग नउ$_3$ या घटनेची गंधकिल आमिदें ( थिआमाइड्स ) हीं नत्रिलांवर उज्जगंधकिदाची ( सल्फ्युरेटेड हायड्रोजन ) क्रिया केली किंवा अम्ल अमिदांवर स्फुरपंचगंधकिदाची क्रिया केली म्हणजे तयार होतात. उष्णतेनें त्यांचें सहज पृथक्करण होतें आणि अल्कांच्या योगें त्यांजवर उदकप्रक्रिया ( हायड्रोलिसिस ) होते. अम्ल आदिदांपेक्षां या अमिदांच्या अंगीं अधिक अम्लधर्म आहे.

आम्लपित्त—हा स्वतंत्र रोग नसून अग्निमांद्य अगर दीर्घकालीन अपचन या रोगांच्या अनेक लक्षणांपैकीं हें एक लक्षण आहे. जेवण न पचल्यामुळें वरचेवर आंबट ढेकरा येणें, व नंतर अतिशय आम्ल झालेल्या अन्नाची वांति होण्याकडे प्रवृत्ति असणें हा ह्या लक्षणाचा विशेष होय. स्वभावतः जठररस फाजील उत्पन्न होणें अगर पचनक्रियेच्या दुर्बलतेमुळें फार वेळ जठरांत राहिल्यानें अन्न कुजून ब्यूटिरिक, ल्याक्टिक ही ॲसिडें उत्पन्न होऊन त्यांच्या पीडेमुळें दांत आंबतील इतकी अम्ल वांति होते. चमचा दोन चमचे सोडा बायकार्बनेटची पूड पेलाभर पाण्यांत प्याल्यानें या पीडेचें शमन चांगलें होतें. याविषयीं अग्निमांद्य या सदराखालीं अधिक माहिती सांपडेल.

अग्निमांद्य नसूनहि वाचन अगर बारीक काम करण्यामुळें दृष्टीस ताण बसून त्यामुळें वांतीची व मस्तकशूळाची खोड लागते. अशा वेळीं चष्मा वापरण्यासाठीं अगर कांचबिंदु हा नेत्ररोग झाला आहे किंवा काय हें कळण्यासाठीं डोळे तपासून घ्यावेत; कारण कांचबिंदु हा रोग होतांना त्याचें पूर्व स्वरूप म्हणून हें लक्षण मस्तकशूळ या लक्षणासह असतें. आयुर्वेदामध्यें यासंबंधीं पुढील माहिती आढळते:— आमाशय, कंठ, व तोंड यांत दाह करीत आंबट रसाचा द्रव पदार्थ ओकून पडण्याची संवय होते त्यास अम्लपित्त म्हणतात. केव्हां केव्हां हा अंबट द्रवपदार्थ ( त्यासच पित्त म्हणतात ) गुदद्वारानेंहि बाहेर पडतो. त्यास अधोगत अम्लपित्त म्हणतात व पहिल्यास ऊर्ध्वगत अम्लपित्त म्हणतात. पैकीं पहिला उर्ध्वगत म्हणजे तोंडांतून पडणारा अम्लपित्ताचाच विकार फार पाहण्यांत येतो.

या रोगांत रोगी जें खातोपितो त्याचें सर्व पित्तच बनतें यामुळें तें प्रमाणापेक्षां जास्त झाल्यामुळें विकृत होऊन दाह, तहान, इत्यादि विकार करितें व शेवटीं शरीराच्या बाहेर निघून जातें. तें पित्त क्वचित प्रसंगीं कडू व तिखटहि असतें परंतु पुष्कळ वेळां तें आंबटच असल्यामुळें या रोगास अम्लपित्तच म्हणतात.

वैद्यशास्त्राच्या नियमांविरुद्ध अन्न खाणें, आंबट जास्त खाणें, विदाही पदार्थ खाणें, पित्तप्रकोपकारक सर्व अन्न व पान हीं अम्लपित्ताचीं कारणें आहेत.

अन्न पचन न होणें, थकवा येणें, मळमळणें, जडपणा, कडू किंवा आंबट ढेंकर, हृदय व गळा यांचा दाह, आणि अरुचि हीं अम्लपित्ताचीं मुख्य लक्षणें आहेत.

यांपैकीं अधोगामी आम्लपित्तांत तहान, दाह, बेशुद्धि, भोंवळ, अग्निमांद्य, अंगावर गांधी उठणें, रोमांच उभे राहणें, घाम येणें व अंग पिंवळें होणें हीं लक्षणें होतात.

उर्ध्वगामी अम्लपित्तांत ओकारी होते. ती ओकारी हिरवी, पिंवळी, निळ्या रंगाची किंवा रक्ताचीहि होते. ती फारच आंबट असते. मांस धुतलेल्या पाण्यासारखी अतिशय बुळबुळीत, कफयुक्त व निरनिराळ्या खारट, तिखट इत्यादि रसांची ओकारी होते. भोजन झाल्यावरोबर अथवा तें पचत असतां अथवा जेवणाच्या पूर्वींहि केव्हां केव्हां कडू व आंबट ओकारी होते व त्याच रसाची ढेंकरहि येते व कंठ, हृदय, कुशी, यांचा दाह होतो व डोकें दुखतें.

हातपाय जास्त ऊन असणें व त्यांची आग होणें अतिशय अरुचि, ताप, खोकला, कंड सुटणें, गांधी उठणें, पुळ्या उठणें, हीं लक्षणें उर्ध्वगामी अम्लपित्ताचीं आहेत. हा पित्ताधिक्याचा जरी रोग आहे तरी वायु व कफ यांचाहि संबंध यांत येतो. त्यावेळीं त्या दोहोंचीं लक्षणेंहि होतात. उर्ध्वगामी असतां ओकारी व अधोगामी असतां अतिसार या रोगांचा संशय वैद्यास येतो, याकरितां वैद्यानें नीट लक्षणें पाहून या रोगाचें निदान करावें, नाहींतर फसण्याचा संभव आहे. यांत वायूचा संबंध असतां, कंप, बडबडणें, बेशुद्धी अंगास चुणचुण सुटणें, अंग गळणें व पोट दुखणें, डोळ्यापुढें अंधाऱ्या येणें, भोंवळ, रोमांच उभे राहणें हीं लक्षणें होतात.

कफाचा संबंध असतां कफ पडणें, जडपणा, अरुचि, थंडी, गळल्यासारखें वाटणें, ओकारी, तोंड चिकट असणें, शक्ती कमी होणें, अग्नि मंद होणें; कंड सुटणें व झोंप जास्त येणें हीं लक्षणें होतात.

हा अम्लपित्त रोग नवीन असेल तर फार प्रयत्नानें बरा होतो व एक वर्षापेक्षां अधिक दिवसांचा झाला म्हणजे बरा होत नाहीं. कदाचित एखाद्याचा कष्टानें बरा होतो. वाग्भट, चरक, सुश्रुत, या ग्रंथकारांनीं या रोगाचें स्वतंत्र निदान लिहिलें नाहीं. याचा अंतर्भाव पित्तजन्य अजीर्णांत केला आहे. परंतु याचीं कारणें, लक्षणें, चिकित्सा निराळीं असल्यामुळें माधवकारानें त्याचें स्वतंत्र निदान लिहिलें आहे.

अम्लपित्तामुळें छातीपासून घशापर्यंत फार जळजळ लागून रोग्यास जेव्हां तीव्र वेदना होऊं लागतात तेव्हां त्यांचें तात्काल निरसन होण्यासाठीं तो, पुष्कळदां, वैद्याकडे धांव घेतो. अशा स्थितींत त्यास अम्लरस ( आसिट्रस, शंखद्रव वगैरे ) कधींहि देऊं नये. त्या स्थितींत मोठ्या प्रमाणांत कांहीं क्षार ( अल्कली:—वज्रक्षार , जवखार, सज्जिखार, मीठ, सोडा, इ. ) दिला असतां तात्काल बरें वाटतें. पुष्कळदां, अम्लपित्ताचा कोठ्यामध्यें अतिशय संचय झाल्या-

मुळें त्याच्या अंगच्या अम्लधर्मांचें पूर्णपणें निरसन होण्यासाठीं क्षाराचें प्रमाण, ठराविक प्रमाणापेक्षां पुष्कळपटीनें अधिक द्यावें लागतें. असें अधिक प्रमाण देतांच आंबण्याची क्रिया बंद होते. दोन ड्राम ( दहा आणे भार ) पर्यंत सुद्धां बायकारबोनेट ऑफ सोडा अथवा पोटॅश देणें केव्हां केव्हां भाग पडतें. नुसता सोडा घेण्यापेक्षां तो पाण्यांत विद्रुत करून त्यांत थोडा लिंबाचा रस अथवा टारटरिक ॲसिड मिश्र करून तो फसफसूं लागला असतांना प्याल्यापासून विशेष उपयोग होतो. ह्या उपायापासून आराम न पडल्यास उलटीचें औषध देऊन कोठ्यांतील अम्लपित्ताचा संचय बाहेर काढावा. क्षार देऊन मागून उलटीचें औषध देण्यापेक्षां आरंभींच तें देणें अधिक प्रशस्त होय.

नेहमीं क्षार देणें अथवा त्याची संवय लावून घेणें चांगलें नाहीं, कारण अशामुळें कोठ्याच्या श्लेष्मलत्वचेस इजा पोंचून कायमचें नुकसान होण्याचा संभव असतो. तथापि मधून मधून जरूर तेव्हां ते मोठ्या प्रमाणांत देण्यास मागें पाहण्याचें कारण नाहीं. शंखवटी, शंखभस्म, प्रवाळ, मौक्तिक इत्यादिकापासूनहि अम्लपित्तास बराच उपयोग होतो. सूतशेखरमात्रा दोनतीन गुंजांपर्यंत भोजना नंतर घेतल्यापासूनहि बऱ्याच रोग्यांस उपयोग होतो. इंग्रजी लॅक्टोपेपटीन, पपाईन, हीं औषधें दिल्यानेंहि अम्लपित्तास चांगला उपयोग होतो. फार दिवसाच्या अथवा जीर्ण अम्लपित्तांत किंवा जेव्हां कोठ्याच्या रचनेंत कायमचा विघाड झालेला असतो ( जसें कोठ्याचें आतड्याच्या बाजूचें तोंड बंद होणें, श्लेष्मलत्वचेस क्षत पडणें ) तेव्हां उपचाराची कांहीं एक मात्रा चालत नाहीं असें कधीं कधीं दृष्टीस पडतें. कारण पूर्वीच्या आंबलेल्या अन्नाचा अंश कोठ्यांत आहे तोंच दुसरें अन्न पोटांत पडून तेंहि आंबण्याची क्रिया सुरू होते, अशा रीतीनें चोवीस तास अन्न आंबून तें पृथकरण पावण्याचा क्रम पोटांत चालूच राहतो. अशा स्थितींत कांहीं सौम्य व शोधक औषध ( कांडीझ फ्लुईड, क्रियासोट ) मिश्र उदकानें कोठा अगदीं स्वच्छ धुवून टाकिला असतां चांगला उपयोग होतो. दुसऱ्या उपायांची जेथें कांहींएक मात्रा चालत नाहीं तेथेंहि हा उपाय फायदेशीर होतो. ह्यापासून पोट दुखणें व आंबट पाणी पडणें हीं तेव्हांच कायमचीं बंद होतात. ह्याप्रमाणें घाईचीं लक्षणें दूर केल्यानंतर आंबण्याची क्रिया मुळींच न होऊं देणारी चिकित्स करावी. ह्या कामीं इंग्रजी औषध क्रियासोट हें फार उपयोगीं पडतें. ह्याच्या प्रत्येकींत दोन थेंब असलेल्या तयार गोळ्या मिळतात. त्यांपैकीं प्रत्येक जेवणानंतर एक तासानें एक गोळी घेत जावी.

याशिवाय क्यार्बालिक ॲसिडचाहि त्याच प्रमाणांत उपयोग करितात. पेपरमिंटाचें तेल ३–५ थेंब दिल्यानें उत्तम उपयोग होतो. पेपरमिंटाचें तेल हें जबरदस्त शोधक ( ॲन्टीसेपटीक ) असून अगदीं निरुपद्रविक आहे. त्याचप्रमाणें ओंव्याच्या फुलाचाहि चांगला उपयोग होतो. कोरड्या कोळश्याची पूड दिली असतां आंबण्याच्या क्रियेपासून उत्पन्न होणारा वायु त्यांत शोषला जाऊन त्याच्यापासून होणारी रोग्याची पीडाहि दूर होते.

ह्याप्रमाणें करून तीव्र लक्षणें दूर झाल्यावर वैद्यानें कोठ्याच्या श्लेष्मलत्वचेची विघडलेली स्थिति दूर करण्याकडे लक्ष द्यावें, कारण अम्लपित्ताच्या विकृतीचें मुख्य कारण तेंच होय. विसमथ, म्यागनिशिया, पपाईन, इत्यादि औषधांपासून कोठ्याच्या श्लेष्मलत्वचेची स्थिति सुधारण्यास चांगला उपयोग होतो. ह्याच्या मागून कांहीं पौष्टिक वनस्पति ( काढे चिराईत, कुचला, क्यालंबा क्वाशिया, इ. ) द्यावी.

ज्यापासून अम्लपित्त वाढतें असें अन्न रोग्यानें खाऊं नये, त्यास अनुभवानें कोणतें अन्न वर्ज करावें हें सहज समजून येतें. दहीं, ताक, वगैरे आंबट पदार्थ वर्ज करावेत. गोड पदार्थहि बेतानें खावे. तांदूळ, जोंधळा, ह्यांपासून आंबण्याची क्रिया उत्तेजन पावते, करितां त्यांचा बेतानें उपयोग करून गहूं खात जावा. एकंदरींत खाणें सात्विक असून नियमित असावें. रोज नेमानें मोकळ्या हवेंत होईल तेवढा व्यायाम करावा.

**ॲम्स्टरडॅम**—हॉलंडचें राजधानीचें शहर. हें उत्तर हॉलंड प्रांतांत असून उत्तर अ. ५२° २२' आणि पूर्व रे. ४°५३' यांवर आहे. तें विजेच्या ट्रामगाड्यांनीं एडम, पुरमेरेंड, आलकमार आणि हिलव्हरझम या शहरांशीं जोडलें आहे. ॲमस्टरडॅम म्हणजे ॲमस्टेल नदीचें धरण हें नांव याला ॲमस्टेल नदीवरून पडलें आहे. शहराची तटबंदी सध्यां पडली असून त्याठिकाणीं आतां बगीचे व घरें दृष्टीस पडतात. शहरांत आणि शहराला वेढून पुष्कळसे कालवे असून यांतील एकाच्या टोंकाला शोकस्तम्भ आहे. पूर्वीं येथून लोक आपल्या आप्तेष्टांनां दुःखित अंतःकरणानें रजा देत म्हणून याला हें नांव पडलें असें म्हणतात. 'प्रिन्सेन ग्रथाट' या नांवाच्या कालव्याच्या उत्तरेस डी. जॉरडम नांवाचा नँटीजचें फर्मान–प्रॉटेस्टंटाविरुद्ध–( एडिक्ट ऑफ न्याटिज) मुळें पळून आलेल्या फ्रेंच लोकांनीं वसविलेला प्रांत आहे. शहरच्या अगदीं जुन्या भागांतील रस्ते अरुंद व ओबडधोबड आहेत. परंतु नवीन भागांतील रस्ते रुंद असून त्यांच्या दुतर्फा झाडें लावलेलीं आहेत. या भागाच्या अगदीं मधोमध व्हॉंडेल पार्क म्हणून एक आरामस्थल असून त्यांत जस्ट व्हॉन डेन व्हॉंडेल या राष्ट्रीय कवीचा पुतळा आहे. शहराच्या जुन्या भागांत प्राणिशास्त्रविषयक व वनस्पतिशास्त्रविषय बगीचे आहेत.

ॲमस्टेल नदीचें धरण हें फार महत्त्वाचें ठिकाण असून या ठिकाणीं सर्व ट्रामगाडीचे रस्ते येऊन मिळतात. या धरणाच्या मध्यभागीं १८३० च्या बेलजिअन राज्यक्रांतींत धारातीर्थीं पतन पावलेल्या योद्ध्यांचें स्मारक आहे. त्याला 'मेटल क्रॉस' असें म्हणतात. ॲम्स्टरडॅम येथें जो राजवाडा

आहे, त्यासंबंधीं लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हणजे त्याला खांबांचा बिलकूल आधार नाहीं. येथील प्रार्थनामंदिर गॉथिक पद्धतीनें बांधलेलें असून तेथें हॉलंडच्या राजांना राज्याभिषेक होत असे. या शहरांत पुष्कळ पाहण्याजोगीं पदार्थसंग्रहालयें व चित्रगृहें असून त्यांत 'रीक्स म्यूझिअम'चा पहिला नंबर लागतो.

ॲम्स्टरडॅम येथें दोन विश्वविद्यालयें आहेत. ॲम्स्टरडॅमच्या विश्वविद्यालयांत १,००,००० ग्रंथ आहेत. शिक्षक शाळा, उद्योगधंदे शिकविणाऱ्या शाळा व शिल्पशाळा इत्यादि निरनिराळ्या धंदशिक्षणाच्या संस्था आहेत आणि या सर्व संस्था विशेषतः लोकांच्या सहाय्यानें चालल्या आहेत. येथें 'सर्व जनहितसाधक मंडळ' म्हणून शिक्षणप्रसाराकरितां स्थापिलेली एक संस्था आहे.

येथील मुख्य मुख्य आयात मालाच्या वस्तू म्हणजे इमारतीचें लाकूड, कोळसा, धान्य, अशुद्ध खनिज पदार्थ व पेट्रोलिअम ह्या होत. तंबाखू, चहा, कॉफी, साखर इत्यादि पदार्थ येथें वसाहतींतून येतात. हिऱ्याचे पैलू पाडण्याचा धंदा येथें बऱ्याच मोठ्या प्रमाणावर चालतो. साबू, तेलें, लोखंड इत्यादि विषयक धंदेहि चालतात.

ज्याला सध्यां ॲम्स्टरडॅम म्हणतात तें स्थळ पूर्वी ॲम्स्टेलच्या अमीरउमरावांच्या ताब्यांत होतें. तें १२९६ त त्यांच्यापासून गॉय ऑफ हॅनॉल्ट याला मिळालें. वेस्ट फॅलीआच्या तहानें या शहराला बरेंच महत्त्व प्राप्त झालें. प्रथम प्रथम ॲम्स्टरडॅम हें विल्यमच्या घराण्याचा द्वेष करीत असे. पण पुढें तें तिसऱ्या विल्यमचें कट्टें पुरस्कर्तें बनलें. १७९५ त फ्रेंचांनीं तें काबीज केलें व पुढें कांहीं काळानें हॉलंडच्या राज्याच्या राजधानीचें शहर बनलें.

हॉलंड देशांत गुल्डेन नांवाचें नाणें चालू असून त्याची किंमत सव्वारुपाया आहे. शंभर सेंटिमचा एक गुल्डेन होतो. येथील जुन्या राजवाड्याचा हल्लीं टौन हालसारखा उपयोग होतो. राजवाड्यांतील जमीनीस, भिंतीस सर्व ठिकाणीं पांढरा दगड बसविला असल्यानें आंतील काम प्रेक्षणीय झालें आहे. न्याशनल म्यूझियम फार जुनाट म्हणजे सन १६०० तलें असून तींतील चित्रें चांगलीं आहेत. हें पाहण्यास तीन तास लागतात. नव्या वस्तींत क्रिस्टल पॅलेस (स्फटिकमंदिर) म्हणून एक नाटकगृहाची मोठी जागा आहे. पॅलेसमध्यें पाहण्यासारखें फारसें कांहीं नाहीं. या भागांतील वस्ती चांगली असून रस्तेहि उत्तम आहेत. गांवांत समुद्राचे अनेक लहान लहान कालवे असल्यानें या शहरास "छोटें व्हेनिस" म्हणतात. कालव्यांच्या कांठांनीं गाड्या जातील इतके रुंद रस्ते केले आहेत (यूरोपचा प्रवास मुजुमदार १९१५).

**अम्हारा**—अबिसीनिया देशामधील मध्यप्रांत. गोंडार हें या प्रांताचें मुख्य शहर होय. मध्ययुगापासून १८५४ सालापर्यंत अबिसीनियाच्या बादशहांचें गोंडार हें निवासस्थान होतें. येथील रहिवाशांची भाषा अम्हारिक—ही अबिसीनियांतील राजदरबारची भाषा होय.

**अयन.**—या शब्दांत गत्यर्थी 'इ' हा संस्कृत धातु असून ज्योतिषशास्त्रांत त्या शब्दाचा सूर्याचें उत्तर किंवा दक्षिण दिशेनें गमन असा अर्थ आहे. अयनें दोन आहेत. सायन मकरारंभापासून सायन कर्कारंभापर्यंत सूर्य कोणत्याहि दिवशीं विवक्षित वेळीं आधल्या दिवसाच्या त्याच्या जागेच्या उत्तरेस गेलेला दिसतो म्हणून त्या काळास उदगयन, व सायन कर्कारंभापासून सायन मकरारंभापर्यंत तो कोणत्याहि दिवशीं विवक्षित वेळीं त्याच्या आधल्या दिवसाच्या जागेच्या दक्षिणेस गेलेला दिसतो म्हणून त्या काळास दक्षिणायन म्हणतात.

प्रा ची न अ र्थ.—ज्योतिषसिद्धान्त ग्रंथांत उदगयन व दक्षिणायन या शब्दांचा हाच अर्थ असून तोच सांप्रतहि रूढ आहे. परंतु प्राचीन काळीं या शब्दांचा निराळा अर्थ होता असें दिसतें. ऋग्वेदांत, वाजसनेयि संहितेंत किंवा शतपथ ब्राह्मणांत उदगयन व दक्षिणायन असे प्रत्यक्ष शब्द नाहींत. तथापि या दोनहि ग्रंथांत (उ. ऋग्वेद १. ७२, ७; १०. १८, १ व वाजसनेयि संहितेत १९.४,७) देवयान व पितृयाण हे दोन शब्द आले असून शतपथ ब्राह्मणांत (२. १, ३) 'सूर्य जेथें उत्तरेस आवर्ततो तेथें देवांमध्यें, व दक्षिणेस आवर्ततो तेथें पितरांमध्यें असतो, आणि वसंत, ग्रीष्म व वर्षा हे देवांचे व शरद, हेमंत व शिशिर हे पितरांचे ऋतू आहेत असें म्हटलें आहे. यावरून, देवयान व पितृयाण हे शब्द हल्लीं आपण समजतों त्याप्रमाणेंच त्यावेळींहि उदगयन व दक्षिणायन याअर्थी असावेत. पण उदगयनार्थी देवयान या शब्दानें सूर्य विषुववृत्ताच्या उत्तरेस असतो तो काळ व दक्षिणायनार्थी पितृयाण या शब्दानें सूर्य विषुववृत्ताच्या दक्षिणेस असतो तो काळ दर्शविला जात असावा असें अनुमान करतां येतें. बृहदारण्यक (६. २, १५) व छांदोग्य (४. १५,५) उपनिषदांत तर देवयान व पितृयाण यांची तशी स्पष्ट व्याख्या केली आहे व पुढें गीतेंत ८.२४ मध्यें तीच कल्पना निराळ्या शब्दांत देऊन देवयानाच्या काळास उत्तरायण व पितृयाणाच्या काळास दक्षिणायन अशीं आधुनिक नांवें योजिलेलीं आहेत. शिवाय तैत्तिरीय संहिता ६. ५, ३ येथील "सूर्य सहा महिने दक्षिणेस जातो व सहा महिने उत्तरेस जातो" या अर्थी वाक्यांत उत्तरायणाची व दक्षिणायनाची कल्पना आढळते, व नारायणीय उपनिषद् अनुवाक ८० या ठिकाणीं देवयान व पितृयाण हे शब्द ह्या ग्रंथाच्या रचनाकालीं उदगयन व दक्षिणायन या शब्दांच्या समानार्थीच होते असें दिसतें. उत्तरायण व दक्षिणायन यांचा जुना अर्थ बदलून त्याच्या जागीं अनुक्रमें उत्तर दिशेनें व दक्षिण दिशेनें गमन हा नवा अर्थ नक्की केव्हां रूढ झाला हें सांगतां येत नाहीं. तथापि वसंतसंपात कृत्तिकांमध्यें

येण्याच्या ( म्हणजे. अजमासें ख्रि. पू. ३००० च्या ) बराच काळ अगोदर व संवत्सरांचा म्हणजे सांवत्सरिक यज्ञांचा आरंभ वसंतसंपाती होता तो बदलून शिशिर अयनीं आणला गेला असावा व हा फेरफार झाल्यावर कालांतरानें उत्तरायण याचा अर्थ या नवीन वर्षाचे पहिले सहा महिने म्हणजे शिशिर अयनापासून ग्रीष्म अयनापर्यंतचा काळ-असा प्रचारांत आला असावा. तथापि लो. टिळकांच्या मतें प्राचीनकाळीं उत्तरायण किंवा उदगयन व दक्षिणायन हे सांप्रत रूढ असलेले शब्द प्रत्यक्ष प्रचारांत नसावे, तर त्या शब्दांची कल्पना केवळ देवयान किंवा देवलोक व पितृयाण किंवा पितृलोक या शब्दांनींच व्यक्त केली जात असावी ( ओरायन, पृ. २६-२७ पहा ).

**कालबिंदुवाचक अर्थ.**—उदगयन व दक्षिणायन या शब्दांचा ज्योतिषांत आणखीहि एक अर्थ होतो. हे शब्द सूर्याच्या उत्तरेकडे व दक्षिणेकडे वळण्यानें वर्षाचे जे दोन भाग होतात त्यांना ज्याप्रमाणें लावण्यांत येतात त्याचप्रमाणें ते आतां ज्यावेळीं सूर्य उत्तरेकडे व दक्षिणेकडे वळतो त्या कालासाठींहि अनुक्रमें उपयोजिण्यांत येऊं लागले आहेत. अर्थात् क्रांतिवृत्तांतील ज्या बिंदूपासून तो उत्तरेकडे व दक्षिणेकडे वळतो त्या बिंदूंना उदगयनबिंदु व दक्षिणायनबिंदु अशीं नांवें देतां येतील.

**अयनांच्या कालांत वस्थलांत पडत गेलेला सूक्ष्म फरक.**—या उदगयनांचा व दक्षिणायनांचा काळ वैदिक कालापासून आजपर्यंत एकसारखा बदलत आला आहे. वेदांग ज्योतिषकालीं उदगयन धनिष्ठांच्या ( श्रविष्ठांच्या ) आरंभीं होत असे असें त्या ग्रंथांतील उल्लेखावरून दिसतें ( प्रपद्येते श्रविष्ठादौ सूर्याचांद्रमसावुदक्। सार्पार्धे दक्षिणार्कस्तु माघश्रावणयोः सदा ॥ वे. ज्यो. ) म.भा. आदिपर्व, अ. ७१ येथें 'चकारान्यंच लोकं वै क्रुद्धो नक्षत्रसंपदा। प्रतिश्रवणपूर्वाणि नक्षत्राणि चकारयः ॥ ३४ ॥ अशीं जी विश्वामित्रानें प्रतिसृष्टि निर्माण केली तीसंबंधीं वर्णनांतील वाक्यें आहेत त्यांवरून त्या काळीं उदगयन श्रवणावर होत असे असें दिसतें. कारण येथें व पुढें अश्वमेधपर्व, अ. ४४ श्लो. २ येथें श्रवणारंभीं उदगयन होतें असें जरी म्हटलेलें नाहीं तरी 'नक्षत्रें श्रवणादि" म्हणण्याचें दुसरें कारण कांहीं नाहीं. उत्तराषाढांच्या दुसऱ्या चरणीं उदगयन होत असे असें वराहमिहिरानें सांगितलें आहे, व सांप्रत तें मूळांच्या तिसऱ्या चरणामध्यें होतें. अयनांच्या या गतीस अयनचलन असें म्हणतात ( संपातचलन पहा ). अयनें स्थूलमानानें प्रत्येक २६००० वर्षांनीं ३५० अंश म्हणजे २७ नक्षत्रें मागें जातात. अर्थात् उपर्युक्त ग्रंथांतील अयनांच्या उल्लेखांवरून आपणांस त्या ग्रंथांचे काळ स्थूलमानानें ठरवितां येतात.

**हल्लींच्या पंचांगांतील दिली जाणारी चुकीची अयनें.**—उपर्युक्त अयनांची गति फार थोडी म्हणजे वर्षांत सुमारें ५० विकला आहे. अर्थात् तितकीच गति संपाताची म्हणजे सूर्य ज्या ठिकाणीं विषुववृत्तास ओलांडून उत्तरेकडे किंवा दक्षिणेकडे जातो त्या बिंदूंची आहे. आपल्या प्राचीन ज्योतिषग्रंथांतील वर्षाचें मान ८ विपळांनीं अधिक आहे. अर्थात् तितक्या कालांत संपातगति सुमारें ५९ विकला होते. असें असतां त्या ग्रंथांत तीं ६० विकला मानली आहे. आपली जुनी पंचांगपद्धति निरयन-म्हणजे एका ऋतूस आरंभ झाल्यापासून पुन्हां त्याच ऋतुस आरंभ होईपर्यंत एक वर्ष न धरतां सूर्य तारकात्मक एका नक्षत्रांत शिरल्यापासून पुन्हां त्याच नक्षत्रांत शिरेपर्यंत एक वर्ष मानणारी आहे, ती जर शुद्ध निरयन असती तर तिचें वर्ष दर वर्षी खऱ्या म्हणजे सायन वर्षाहून संपातनक्षत्रांत दर वर्षी जितका मागें जातो तितकें अंतर चालण्यास सूर्यास जितका काळ लागेल तितक्या अधिक उशीरां सुरू झालें असावें. परंतु वर सांगितल्याप्रमाणें आपल्या जुन्या पंचांगांतील नाक्षत्रवर्ष खऱ्या नाक्षत्रवर्षाहून सुमारें ८ पळें अधिक धरलें गेलें असल्यामुळें आपल्या जुन्या पंचांगांतील वर्ष खऱ्या वर्षाहून दर वर्षी तितकें आणखी अधिक उशीरां सुरू होतें. या सर्वांचा संकलित परिणाम म्हटला म्हणजे आपल्या जुन्या पंचांगांतील ग्रहांची स्थिति सांगण्याचें आरंभस्थान शके ४४४ च्या सुमारास संपातांत होतें तें तेव्हांपासून दरवर्षी सुमारें ५९ ( ५१+८ ) विकला मागें मागें पडत आतां ( शके १८४४ ) वसंतसंपाताच्या सुमारें २३° [ (१४००×५९) ÷ (६०×६०) ] गेलें आहे; व त्यामुळें त्या काळीं मकरसंक्रमण बरोबर उदगयनाच्या वेळीं म्हणजे सूर्य जेव्हां उत्तरेकडे जाण्यास वळतो तेव्हां ( डिसेंबर २२ ) होत असे, तें आतां अजमासें २३ दिवस मागाहून ( जानेवारी १३ । १४ च्या सुमारास ) होतें.

वरील विवेचनावरून एक गोष्ट स्पष्ट होते कीं, आपल्या जुन्या ज्योतिषग्रंथकारांनीं आपलें वर्ष ठरविण्यांत अयनगति विचारांत घेतली नसल्यामुळें त्यांच्या ग्रंथावरून केलीं जाणारीं आजचीं पंचांगें शुद्ध सायन तर नसतातच, पण त्यांचें नाक्षत्र वर्ष ८ पळें मोठें धरलें गेल्यामुळें तीं शुद्ध निरयनहि नसतात. याचा परिणाम असा होतो कीं, हल्लींच्या पंचांगांत दिलेल्या मकरसंक्रमणाच्या किंवा उदगयनाच्या दिवशीं सूर्य सायन मकर राशींत संक्रमण किंवा उत्तरेकडे गमन करण्यास आरंभ तर करीत नाहींच; पण आपल्या प्राचीन ज्योतिषग्रंथकारांच्या काळीं सूर्य त्या दिवशीं ज्या तारकात्मक नक्षत्रांत येत असे त्या नक्षत्रांतहि येत नाहीं. तेव्हां आपणास शुद्ध सायनमान स्वीकारावयाचें असेल तर जुनी परंपरा बाजूस ठेवून डिसेंबर २२ च्या सुमारास आपली मकरसंक्रांत केली पाहिजे किंवा आपणास जुनी परंपरा कायम ठेवण्यासाठीं निरयन मानच चालू ठेवावयाचें असेल, व आपले पूर्वज ज्या तारात्मक नक्षत्रीं सूर्य आला असतां मकरसंक्रमणकालचे व इतर धार्मिक विधी करीत असत त्याच तारात्मक नक्षत्रीं तो आला असतां ते आपणास आतांहि करावयाचे असतील, तर प्रथम आपणांस

प्रत्येक नक्षत्र बिनचूक कळण्यासाठीं आपल्या प्राचीन ज्योतिषग्रंथकारांचें आरंभस्थान कोणतें होतें तें नक्की शोधून काढलें पाहिजे व वर्षमान, अयनगति वगैरेसंबंधीं गणित करतांना अर्वाचीन सूक्ष्म वेधांवरून निश्चित केलेल्या आकड्यांचा उपयोग केला पाहिजे.

पंचांग संशोधनाच्या मार्गांतील अडचण.— तथापि जुन्या पंचांगांची सुधारणा करण्याच्या मार्गांतील मुख्य अडचण म्हटली म्हणजे प्राचीन ज्योतिषग्रंथकारांचें आरंभस्थान कोणतें होतें, हें अ.ज आपणांस नक्की ठरवितां येत नाहीं ही होय. कारण या जुन्या ग्रंथकारांनीं आपल्या आरंभस्थानाचा आपल्या ग्रंथांत कोठेंहि प्रत्यक्ष उल्लेख केलेला आढळून येत नाहीं; तथापि ज्योतिषग्रंथांतील दुसऱ्या कांहीं उल्लेखांवरून आपणांस आरंभस्थान स्थूलमानानें निश्चित करतां येतें. उदाहरणार्थ, सूर्यसिद्धांतांत अयनांश काढण्याची जी रीत दिली आहे तिजवरून शके ४२१ हें शून्यायनांशाचें वर्ष येतें, म्हणजे या वर्षी संपातबिंदु नक्षत्रांत ज्या ठिकाणीं होता त्यास सूर्यसिद्धांतकार आरंभस्थान समजतात. सूर्यसिद्धांतांत सूर्याचा भोग काढण्याची जी रीत दिली आहे, तिजवरूनहि आपणांस आरंभस्थान ठरवितां येतें. कारण भोग म्हणजे सूर्याचें आरंभस्थानापासून अंतर व हा भोग ० असतांना आकाशांत सूर्य क्रांतिवृत्तावर ज्या ठिकाणीं दिसेल तें आरंभस्थान होय. सूर्यसिद्धांतकाळीं सिद्धांतकारांनीं प्रत्यक्ष वेध घेऊन कोणत्या तरी कालाचा सूर्याचा भोग निश्चित केला असला पाहिजे व त्यावर सूर्याच्या गणिताचा पाया रचला असला पाहिजे व हें गणित त्या काळीं प्रत्यक्ष अनुभवाशीं जमत असलें पाहिजे. हिशोब करून पाहतां शके ४४४ या वर्षी सूर्यसिद्धांताप्रमाणें स्पष्ट मेषसंक्रांतीच्या वेळीं येणारा सूर्याचा ० भोग व प्रत्यक्ष सूर्याची नेमकी संपातबिंदूंत येण्याची स्थिति हीं अगदीं बरोबर जमतात. तेव्हां यावरून शके ४४४ हें शून्यायनांशाचें वर्ष निघतें. वराहमिहिराच्या पंचसिद्धांतिका ग्रंथांत ज्या प्राचीन पांच सिद्धांतांचा समावेश केलेला आहे, त्याप्रमाणेंहि शून्यायनांश शके ४४४ च येतें व त्यापुढील बऱ्याच ग्रंथकारांनीं शके ४४४ किंवा ४४५ हेंच शून्यायनांशाचें वर्ष धरलें आहे. सूर्यसिद्धांतांत नक्षत्रांच्या योगतारांचे जे भोग व शर दिले आहेत, त्यांवरूनहि आपणांस शून्यायनांश वर्ष काढतां येतें. योगताऱ्यांचे ध्रुवाभिमुख भोग सर्वदा तेच रहात नसल्यामुळें पूर्वाचार्यांनीं सूर्याकरितां ध्रुवसूत्रांत आणलेले भोग व स्पष्ट शर सांगितले आहेत, ते भास्कराचार्यांच्या मतें अयनांश शून्य असण्याच्या वेळचे आहेत. रेवतीयोगतारेचा भोग सूर्यसिद्धांतांत ३५९° ५०′ व शर ० दिला आहे व पुढील ज्योतिषग्रंथकारांनीं तर तिचा भोग पुरे ३६० अंशच दिला आहे. तेव्हां ही तारा कोणती व संपाती केव्हां होती हें काढलें म्हणजे शून्यायनांश वर्ष कळेल. रेवती योगतारेचा शर ज्याअर्थी शून्य दिला आहे, त्याअर्थी ती नुसत्या डोळ्यांनीं न अजमावितां येण्याइतकी क्रांतिवृत्ताच्या जवळ असली पाहिजे. रेवती विभागांतील क्रांतिवृत्ताच्या अत्यंत जवळ असलेली तारा म्हणजे 'झीटापिशियम' ही होय व ती संपातबिंदूपाशीं असण्याचें वर्ष शके ४९४ येतें. अर्थात् या तिसऱ्या रीतीनें शके ४९४ हें शून्यायनांश वर्ष येतें व रेवती योगतारा म्हणजे झीटापिशियम हें आरंभस्थान ठरतें. वर दिलेल्या तीन रीतींनीं शून्यायनांशकालाचीं तीन भिन्न वर्षें निघण्याचें मुख्य कारण प्राचीन ज्योतिषग्रंथकारांच्या गणितांतील स्थूलपणा हें होय. शके ४४४ शून्यायनांश वर्ष मानणें व रेवती योगतारा आरंभीं मानणें या दोनहि गोष्टी प्राचीन ग्रंथांत दिसून येण्याचें कारण शके ४४४ व ४९४ यांमधील काळांत रेवती योगतारांचें संपातापासून अंतर सुमारें ४० कलापेक्षां केव्हांहि अधिक नव्हतें व हें सूक्ष्म अंतर नुसत्या डोळ्यांनां भासमान होत नसल्यामुळें किंवा उपेक्षणीय वाटत असल्यामुळें या दोनहि गोष्टी एकसमयावच्छेदें करून स्वीकारण्यांत आल्या.

पंचांगसंशोधनाचे आपल्या महाराष्ट्रांत जे प्रयत्न झाले, त्यांची हकीकत प्रस्तावनाखंडांत ज्योतिषशास्त्राचा इतिहास देतांना दिलीच आहे. शके ४४४ पासून शके १८४५ पावेतों सुमारें १४०० वर्षांत रेवती योगतारेपासून संपातबिंदु दरवर्षी सुमारें ५०.१विकलांप्रमाणें १८ अंश ४८ कला मागें पडला असल्यामुळें हल्लीं सायन मेषसंक्रमणानंतर म्हणजे वसंतसंपातानंतर सुमारें १८–१९ दिवसांनीं सूर्य रेवती योगतारेपाशीं येतो. अर्थात् शुद्ध निरयन पंचांगांतील मेष व इतर संक्रमणें सायन संक्रमणानंतर १८–१९ दिवसांनीं पडतात; परंतु जुन्या पंचांगांतील आरंभस्थान, वर्ष मोठें धरलें गेल्यामुळें संपातबिंदूपासून दरवर्षी सुमारें ८ विकला अधिक पुढें सरकत जाऊन आज तें वास्तविक आरंभस्थानाच्या म्हणजे रेवती योगतारेच्या ( अजमासें $\frac{८}{६०}$ = ) ३ अंश अधिक पुढें सरकलें आहे म्हणून त्यांतील संक्रमणें शुद्ध निरयन संक्रमणानंतर सुमारें तीन चार दिवसांनीं व सायन संक्रमणानंतर सुमारें १९–२० दिवसांनीं येतात.

**अयनांश**—निरयनगणनेचें आरंभस्थान जी निःशररेवती योगतारा ( झीटापीशियम ), तिजपासून सायन मेषसंपातापर्यंतचें क्रांतिवृत्तीय अंशादि अंतर. हे अयनांश सूर्यसिद्धांताप्रमाणें व दुसऱ्या कांहीं सिद्धांतकारांच्या मताप्रमाणें २७ अंशांपेक्षां जास्त कधींहि होत नाहींत. कारण ते संपाताची पूर्ण प्रदक्षिणा मानीत नाहींत. निःशर रेवतीयोगताऱ्यापासून पूर्वेस व पश्चिमेस २७ अंशांपर्यंत संपात जातो, असें ते मानितात. परंतु अर्वाचीन शास्त्रवेत्त्यांच्या मतानें संपाताची पूर्ण प्रदक्षिणा होते असें निश्चित झालेलें आहे हें प्रसिद्धच आहे.

शून्यायनांश.—श्रीमत् गणेश दैवज्ञ यांच्या मतानें ४४४ शकामध्यें संपात रेवतीयोगताऱ्यानर ( झीटापीशियम ) वर होता व त्याची गति दरसाल ६० विकला त्यांनीं

धरली आहे. राजमृगांक, करणप्रकाश, करणकुतूहल ह्या ग्रंथामध्यें शके ४४५ मध्यें संपात झीटापीशियमवर होता असें दिलेलें आहे. भास्वतीकरण ग्रंथामध्यें शके ४५० या वर्षी द्वितीय आर्यसिद्धांतांत शके ५२७ या वर्षी व पराशर मतानें शके ५३२ सालीं संपात रेवतीवर होता. संपात रेवतीवर आला असतांच शून्य अयनांश होतात. कित्येक ग्रंथकार अयनांशांचें लक्षण असें देतात कीं, ग्रंथागत रवि व प्रत्यक्ष वेधानें आलेला सूर्य यांच्यामध्यें जें अंतर ते अयनांश. या लक्षणामध्यें दोष आहे तो असाः—

ग्रंथगत रवि जर चुकीचा असला तर अयनांश चुकतील. जर अगोदर ग्रंथगत रवीमध्यें किती चूक पडते हें ठरवून ठेविलें तर मात्र तें लक्षण उपयोगी पडेल. कारण, तरच त्याचा आरंभीं दिलेल्या लक्षणाशीं मेळ बसेल.

भा र ती य ज्यो ति ष ग्रं थ ग त व शु द्ध अ य नां श.— पाश्चात्य गणितावरून पाहिलें असतां शके ४९६ सालीं संपात रेवतीयोगताऱ्यावर होता असें दिसतें. तसेंच पाश्चात्य शोधावरून संपातगति सुमारें ५०.२ विकला आहे. प्राचीन लोकांनीं ६० विकला धरिली आहे. तन्मध्यें फरक वि.९.८ विकला दरसाल पडतो. ह्या चुकीच्या गतीमुळें शके ४९६ पासून दरसाल मेषसंक्रांतीमध्यें ९.८ विकलांची चूक पडत गेलेली आहे. प्राचीन मतानें शके १८४० सालीं १८४० उणें ४४४ = १३९६ गतवर्षें झालीं. तेव्हां दरसाल ६० विकला म्हणजे एक कला संपातगति धरली तर त्या सालीं १३९६ कला म्हणजे २३ अंश १६ कला इतके अयनांश येतात. पण आधुनिक शोधाप्रमाणें अयनगति दरसाल ५०-२ विकला धरली असतां शके १८४०–४९६ = १३४४ या गतवर्षांवरून शके १८४० सालीं अयनांश १८ अंश ४४ कला इतके येतात. तेव्हां प्राचीन अयनांश २३°१६′— अर्वाचीन सूक्ष्म अयनांश १८°४४′ = ४°३२′ इतकें अंतर शके १८४० सालीं असल्यामुळें प्राचीन संक्रांती व निरयन ग्रह ४ अंश ३२ कला एवढ्यानें अंतरित होतात. याप्रमाणें आजपर्यंत होत आलेली चूक नाहींशी केली तरच पुढील पंचांगें शुद्ध निघतील. सांगलीसंमेलनांतील ठरावानुसार आज जें टिळक पंचांग प्रसिद्ध होत आहे त्यांत ही चूक दुरुस्त केली आहे.

अ य न ग ती च्या ज्ञा ना चा आ ग म.—यूरोप खंडांत संपातगतीचा म्हणजे जिच्यामुळें अयनांश धरावे लागतात त्या अयनगतीचा शोध प्रथम हिपार्कस यानें खि. पू. १२५ च्या सुमारास लाविला. त्यानें आपले वेध व आपल्यापूर्वी सुमारें १७० वर्षें टिमोकेरिस यानें केलेले वेध यांवरून हा शोध लाविला. त्याच्या मागाहून सुमारें ३०० वर्षांनीं टॉलमीनें संपातास गति आहे ही गोष्ट निश्चयानें स्थापित केली. त्याचा ग्रंथ सिंटाक्स याच्या सातव्या भागांत ह्या गोष्टीचें विवेचन आहे. तो म्हणतो कीं, हिपार्कसच्या वेळेपासून आजपर्यंत, २६७ वर्षांत तारांचे भोग २ अंश, ४० कला वाढले आहेत. यावरून १०० वर्षांत एक अंश म्हणजे वर्षास ३६ विकला संपातगति त्यानें ठरविली. टायकोब्राही यानें संपाताची वार्षिक गति ५१ विकला ठरविली. आणि पुढें लालांडी यानें ५०.५ विकला आणि डिलांबर यानें ५०.१ विकला ठरविली. आमच्या प्राचीन ग्रंथांत जशा वार्षिक संपातगती निरनिराळ्या दिलेल्या आहेत त्याचप्रमाणें वरील गती भिन्न भिन्न आहेत. अरब लोकांतील अलबटानि नामक प्रख्यात ज्योतिष्यानें ६६ वर्षांत एक अंश म्हणजे वर्षास सुमारें ५५.५ विकला संपात गति ठरविली, ती सूर्यसिद्धांताशीं बरीच जुळते. हल्लीं पाश्चात्यांनी संपातगति ५०.२ विकला निश्चित केलेली आहे. प्राचीन भारतीय ग्रंथकारांप्रमाणें अरब ज्योतिषीहि संपातास पूर्वपश्चिम आंदोलनगति मानीत होते.

**अयीन उद्दीन ( शेख )**—हा विजापूरचा रहिवाशी. 'मुल्हीकत' आणि 'किताब–ऊल–अनवर' या ग्रंथांचा कर्ता होय. हिंदुस्थानांतील सर्व मुसलमानी साधूंचीं चरित्रें त्याच्या या ग्रंथांत आहेत. सुलतान अल्लाउद्दीन हसन बहामनी याच्या कारकीर्दींत तो उदयास आला.

**अयीन–उल–मुल्क ( ख्वाजा )**—दिल्लीचा सुलतान महंमदशहा तघलक आणि फिरोझशहा बारबक यांच्या पदरचा एक प्रख्यात सरदार. यानें बरेच ग्रंथ लिहिले आहेत. त्यांपैकीं 'तरसील अयीन–उल–मुल्क' हा एक होय. सुलतान अला–उद्दीन शिकंदर सानी ( १२९६--१३१६ ) यानें संपादलेल्या विजयाचा इतिहास ज्यांत आहे तो 'फत्ते नामा' ग्रंथ यानें लिहिला असावा.

**अयुथिया**—सयाममधील एक शहर. उत्तर अक्षांश १४° २१ आणि पूर्व रेखांश १००° ३२′ यांवर. हल्लीं हें शहर "क्रुंग कावो" ( जुनी राजधानी ) नांवानें सयामांत ओळखलें जातें. मेनाम नदीनें परिवेष्टिलेल्या एका मोठ्या बेटावर या प्रसिद्ध शहराचे अवशेष आढळतात. चार शतकांपेक्षां जास्त काल ही सयामची राजधानी होती. बहुतेक रहिवाशी तरत्या घरांतून राहतात, या जुन्या शहराचे अवशेष पुराणवस्तुसंशोधनशास्त्राच्या दृष्टीनें फार महत्त्वाचे वाटतात म्हणून पुष्कळसे स्थानिक पदार्थसंग्रहालयांत ठेवलेले आढळतात. गांवाबाहेर हत्ती धरण्याकरतां एक प्राचीन जागा आहे. तिचा अद्यापिहि त्या कामीं उपयोग करितात. अयुथिया हें रेल्वेनें बँकॉकपासून४२ मैलांवर आहे. दरवर्षी येथून बँकाकला आगगाडीनें व जलमार्गानें पुष्कळ भात जातें व उलट तिकडून शेतकऱ्यांना उपयोगी अशा वस्त्रप्रावरणादि वस्तू येतात. येथें दुसरा कोणताहि व्यापार नाहीं.हें सयामच्या संपत्तिमान् प्रांतामधील एक मोठें शहर आहे. हाय कमिशनर येथें राहतो. पूर्वी राजेलोकांनीं उन्हाळ्याकरितां बांधलेल्या इमारतींतून हल्लीं सरकारी कचेऱ्या आहेत.

ऐतिहासिक दृष्टीनें सयाममध्यें अयुथियासारखें दुसरें मनोरंजक स्थान नाहीं. ऐतिहासिक अवशेषांतून पडके

राजवाडे, देवळें, किल्ले, तट वगैरे प्राचीन वैभवाचीं चिन्हें सांपडतात. प्रारंभींच्या यूरोपियन प्रवाशांनीं पाश्चिमात्य राष्ट्रांनां सयामचें ज्ञान या अवशेषांवरून करून देऊन ह्लींच्या परकीय व्यापाराचा व दळणवळणाचा पाया घालून दिला. ब्रह्मी लोकांनीं हें शहर दोनदां उध्वस्त केलें; एकदां १५५५ मध्यें व दुसऱ्यांदां १७६७ मध्यें. दुसऱ्या स्वारीपासून येथून सयामची राजधानी हलविण्यांत आली.

**अयुबखान**—हा अफगाण राजपुत्र शेर अल्लीचा मुलगा आणि अमीर अबदुल रहमान याचा चुलत भाऊ. इ. स. १८५५ च्या सुमारास जन्मला. याचा बाप गादीवर असतांना याच्याविषयीं फारशी माहिती नव्हती. पण इंग्रजांनीं शेरअल्लीला काबुलांतून हांकून दिल्यावर व इ.स.१८७९च्या जानेवारीमध्यें त्याचा अंत झाल्यावर अयुबनें हिरात घेऊन १८८१ च्या जून महिन्यापर्यंत त्याच ठिकाणीं दिवस काढले. त्या सालीं मात्र त्यानें राज्य मिळविण्याकरितां विशेषतः इंग्रजांकडून कंदाहारचा ताबा घेण्याकरितां अफगाणिस्तानावर स्वारी केली. मध्यंतरीं २७ जुलै रोजीं मैवंद येथें जनरल बरोजच्या नेतृत्वाखालीं असलेल्या ब्रिटिश सैन्याशीं त्याची गांठ पडून त्याला विजय प्राप्त झाला. तथापि त्याचा विजयानंद फार दिवस टिकला नाहीं. कंदाहारवर छापा घालावा कीं नाहीं अशा विचारांत तो असतां सर फेड्रिक रॉबर्टनें त्याच्यावर हल्ला चढवून त्याचा पूर्ण पराभव केला ( २० सप्टेंबर १८८० ). तेव्हां तो हिरातला परत जाऊन कांहीं दिवस तेथें स्वस्थ राहिला, व पुन्हां १८८१ च्या उन्हाळ्यांत अफगाणिस्तानावर चाल करून जाऊन मैवंदच्या लढाईच्या वर्ष दिवशींच त्यानें अबदुल रहिमानच्या सेनापतीवर विजय मिळविला. तेव्हां कंदाहार त्याच्या हातांत आलें. पण अबदुल रहिमानानें जातीनिशीं लढाईंत येऊन अयुबखानाला हिरातहून घालवून दिलें. अयुब पुढें कांहीं दिवस इराणांत आश्रयास जाऊन राहिला होता. १८८७ मध्यें अफगाणिस्तानांत अंतःकलह चालू असतां पुन्हां गादी बळकावण्याचा त्यानें प्रयत्न केला पण तो फुकट जाऊन त्याला हद्दपार व्हावें लागलें. कांहीं दिवस इराणांत काढल्यावर मेशेद येथें तो ब्रिटिश एजंटाच्या स्वाधीन झाला. राजकीय कैदी म्हणून हिंदुस्थानांत राहण्याकरितां त्याला पाठवून देण्यांत आलें.

**अयोध्या प्रांत**—संयुक्त प्रांतांतील एक ब्रिटिश भाग. क्षेत्रफळ २३,९६६ चौ. मैल. २५° ३४' ते २८° ४२' उत्तर अक्षांश आणि ७९°४१' ते ८३° ८' पूर्वरेखांश. लोकसंख्या (१९२१ सालीं ) १,२१,६६,६४२ होती.

**मर्यादा**:—उत्तरेस नेपाळ संस्थान व आग्रा प्रांत. पूर्वेस गोरखपूर व बनारस विभाग, पश्चिमेस बरेली व आग्रा विभाग, व दक्षिणेस अलाहाबाद विभाग. भागीरथी नदी ह्या प्रान्ताच्या नैर्ऋत्य सरहद्दीवरून वहात जाते. उत्तरेकडील तीन जिल्हे ( खेरी, बाहरैच व गोंडा ) हे हिमालयाच्या पायथ्याशीं असून उरलेला सर्व प्रान्त गंगेच्या सपाट प्रदेशांत आहे. तराईच्या भागांत जास्त पाऊस पडतो. त्यामुळें तेथील हवा सर्द असते. जिल्ह्याच्या उत्तर भागांत बरेंच जंगल आहे. नद्यांच्या रेतींतून सुवर्णाचे कण सांपडतात. येथें मीठ तयार करीत पण सध्यां सरकारनें त्यास बंदी केली आहे. ह्या प्रदेशास वायव्य आग्नेय उतार आहे. या प्रदेशांतील मुख्य नद्या म्हटल्या म्हणजे गंगा, गोग्रा(शरयू,) राप्ती, गोमती, सई व शारदा या होत. शिवाय दाहर नांवाचा एक तलावहि या भागांत आहे.

**इतिहास, प्राचीनः**—अयोध्या हें शहर कोसल देशाच्या राजधानीचें शहर होतें. रामचंद्राचा पिता सूर्यवंशीय दशरथ हा येथील राजा होता. अयोध्या प्रांतांतील बऱ्याच ठिकाणीं यात्रेकरू भाविक दृष्टीनें दर्शनास जातात. रामाच्या मृत्यूनंतर राज्याचे उत्तरकोसल व दक्षिणकोसल असे दोन विभाग त्याचे पुत्र लव व कुश या दोघांमध्यें झाले. रामायणाच्या कथानकाचा अजून बरोबर कालनिर्णय करतां येत नाहीं.

**बुद्धकालः**—बौद्ध वाङ्मयांत गौतमबुद्ध हा बरींच वर्षें पर्यंत श्रावस्ती येथें राहिला होता असें लिहिलेलें आढळतें. श्रावस्तीच्या स्थलनिर्णयाविषयीं अजून वाद आहे. पण एवढें मात्र खरें कीं हें ज्या राज्याच्या राजधानीचें शहर होतें, त्यांत गोग्रा नदीच्या उत्तरेकडील अयोध्या प्रदेशाचा समावेश होत असे.

ह्या प्रान्तांत अद्यापहि बौद्धकालीन अवशेष सांपडतात. गोंडामधील साहेत माहेत येथें सांपडलेल्या १२ व्या व १३ व्या शतकातलि लेखावरून हें सिद्ध होतें.

**गुप्तकालः**—नंतर मगधदेशाच्या गुप्त राजांचा उदय होईपावेतों ह्या देशाचा इतिहास अज्ञात आहे. गुप्त राजांनीं साकेत किंवा अयोध्या हें शहर घेतलें असें पुराणांतरीं लिहिलेलें आढळतें. बहुधा समुद्रगुप्ताच्या बापाच्या कारकीर्दीपासूनच तें व श्रावस्ती हीं दोनहि शहरें गुप्तांच्या राज्यांत मोडत असावींत. पांचव्या शतकात पाटलिपुत्रापेक्षां अयोध्या हेंच गुप्तांच्या राज्यातील अधिक महत्त्वाचें शहर होतें असें मानण्यास जागा आहे. अयोध्या हें पाटलिपुत्रापेक्षां अधिक मध्यवर्ती होतें व तें समुद्रगुप्ताच्या व त्याच्या मुलाच्या कारकीर्दींत कांहीं कालपर्यंत त्या राजधानीचें ठिकाण झालें असावें.समुद्रगुप्ताच्या पुत्राची अयोध्येस ताब्याचीं नाणीं पाडण्याची एक टांकसाळ असावी असें वाटतें. दक्षिणेंतील चालुक्यांच्या उत्तरकालीन शिलालेखात आपण अयोध्येच्या राजांचे वंशज आहोंत असें त्यांनीं म्हटलेलें आढळतें.

**मुसुलमानांच्या स्वाऱ्या.**—या कालानंतर पुढील कित्येक शतकांचा अयोध्येचा इतिहास उपलब्ध नाहीं. तथापि इ. स. १०५० पर्यंत हा प्रांत पाटणा आणि कनोज येथील राजांच्या ताब्यांत होता असें स्थूलमानानें म्हटलें तरी चालेल. या समयास भार नामक लोकांनीं ( त्यांचे वंशज

अद्यापि फैजाबाद व सुलतानपूर जिल्ह्यांमध्यें आहेत. ) बंड करून कनोजची राज्यसत्ता झुगारून दिली. त्यांच्यापैकीं बाल व दाल या दोन पुरुषांच्या संयुक्त कारकीर्दीत त्यांच्या राज्यसत्तेचा चांगला अभ्युदय होऊन तिचा प्रसार माळवा प्रांतापर्यंत झाला. यांच्या ताब्यामध्यें कडा व कलिंजर हे किल्ले होते.

अयोध्या प्रांतावर मुसुलमानांची पहिली स्वारी गझनीचा प्रसिद्ध सुलतान महमूद याचा भाचा सय्यद सालर मसाऊद गाझी यानें केली. खुद्द सुलतान महमूद कनोजपर्यंत स्वाऱ्या करूनआला होता. परंतु अयोध्या प्रांत त्याच्या ताब्यांत आला नाहीं. म्हणून त्यानें पुढें आपल्या मेहुण्याचा मुलगा सय्यद सालर यास अयोध्याप्रांत सर करण्यास पाठविलें. तेव्हां अयोध्याप्रांतांतील संस्थानिक व सय्यद सालर यांच्या दरम्यान अनेक लढाया झाल्या. अखेर साहेत माहेत येथील शेवटचा सोमवंशी राजा सोहलदेव यानें त्याशीं निकराचें युद्ध करून त्यास ता. २० रजब ४२४ हिजरी, म्हणजे ता. १४ जून इ. स. १०३३ रोजीं ठार केलें. व त्याच्या खाशा सैन्याचा फन्ना उडविला. या युद्धामध्यें अयोध्येच्या हिंदु राजास यश आल्यामुळें कांहीं कालपर्यंत हा प्रांत स्वतंत्र राहिला. परंतु पुढें शहाबुद्दीन घोरी यानें इ. स. ११९३ मध्यें अयोध्याप्रांत पादाक्रांत करून मुसुलमानी सत्तेखालीं आणला.

अफगाणांचा अंमलः—इ. स. १२२६ मध्यें मलीक नासिरुद्दीन हा अयोध्येचा अधिपति असून त्यानें भार लोकांचें वर्चस्व कमी करून त्यांनां दाबांत ठेविलें होतें

इ. स. १२४३ मध्यें दिल्लीपति अल्लाउद्दीन यानें आपला चुलता नासिरुद्दीन यास अयोध्या प्रांतांतील बाहरैच येथील सुभेदार नेमिलें.त्याच्या कारकीर्दीत बाहरैच प्रांताचा चांगला उत्कर्ष झाला. हाच नासिरुद्दीन पुढें दिल्लीचा बादशहा झाला व त्यानें दाल व बाल या भार लोकांच्या अधिपतींचा इ. स. १२४६ मध्यें पराभव करून भार सत्तेचा समूळ नाश केला. तथापि इ. स. १३५० पर्यंत अयोध्येमध्यें मुसुलमानांचें विशेष प्राबल्य नव्हतें. यानंतर उत्तरेकडून येणाऱ्या आर्विधसत्तेच्या लाटांबरोबर मुसुलमानांची वस्ती वाढत जाऊन विशेषेंकरून हरदुई, लखनौ, बाराबंकी व फैजाबाद येथें त्यांचा भरणा विशेष झाला.

अयोध्या, बाहरैच, सांडिल व माणिकपूर येथें दिल्लीपतीचे राजप्रतिनिधी होते. १३९४ मध्यें ख्वाजाजहान हा कनोज, अयोध्या, कडा व जोनपूरचा अधिकारी नेमला गेला. पण लवकरच तो स्वतंत्र झाला.

सुमारें ८० वर्षे पर्यंत किंवा त्याहूनहि आधिक काल हा प्रान्त जानपूरच्या शरकी राज्यांत मोडत असे. जानपूरचें राज्य१४७८मध्यें लयास गेलें. नैर्ऋत्येकडील भागांत (बियास) रजपुतांचा मुख्य तिलोकचंद हा बराच प्रसिद्धीस आला. त्याच्या मालकीच्या प्रदेशास 'बेसवाडा' म्हणत असत.

मोंगलांची सत्ताः—१५२६ मध्यें पानिपतच्या युद्धानंतर बाबरला दिल्ली व आग्रा ह्या प्रदेशांचा ताबा मिळाला. पण लोदी घराण्यांतील राजांची मध्यदुआब, अयोध्या व संयुक्त प्रान्ताच्या पूर्वेकडील जिल्हे या भागांवर सत्ता होती. १५२७ मध्यें बाबरनें त्यांचा दक्षिणअयोध्येमध्यें कनोजनजीक पराभव केला व तेथून अयोध्येस जाऊन तेथें १५२८ मध्यें मशीद बांधिली. १५३१ मध्यें अफगाण लोकांचा हुमायूननें लखनौ नजीक पराभव केला पण अफगाण लोकांचा नूतन सेनापति शेरखान ह्यानें १५४० मध्यें हुमायूनचा पराभव करून त्यास हिंदुस्थानाबाहेर पळवून लाविलें. पुढें ५ वर्षे पर्यंत ह्या प्रदेशांत शांतता होती. पण १५४५ मध्यें शीरशहा वारल्यावर अफगाण सत्तेचा ऱ्हास होऊं लागला व१५५५ मध्यें हुमायूननें पुन्हां आपली सत्ता प्रस्थापित केली. यानंतर पुन्हां १५६५ त अयोध्येचा जहागिरदार इस्कंदरखान व जोनपूरचा खानजमान यांनीं बंड करून लखनौ घेतलें पण त्यांचा लवकरच पराजय करण्यांत आला.

अकबराच्या कारकीर्दीत साम्राज्याचे प्रान्तवारी भाग पाडण्यांत आले. तेव्हां अयोध्या प्रान्ताचा एक वेगळा सुभा बनविण्यांत आला[इ. स. १५९०].ह्या सुभ्यांत ५ सरकारांचा व ३८ परगण्यांचा समावेश होत असे. ह्या सुभ्याकरितां ७६४० घोडे स्वार, १,६८,२५० पायदळ व ५९ हत्ती ठेवलेले होते. त्यावेळीं अयोध्या हें एक हिंदुस्थानांतील प्रमुख क्षेत्राचें स्थान असून लखनौ शहरहि उदयास येत चाललें होतें. राजा तोडरमल हा अयोध्या प्रान्तांतील रहिवासी होता.

पुढील मोंगल कारकीर्दीत १५० वर्षेपर्यंत महत्त्वाचें असें कांहीं घडलें नाहीं. या राजांच्या अमदानींत या प्रान्ताच्या वसुली उत्पन्नाचा आंकडा ५० लाखांवरून ८३ लाखांपर्यंत चढला. ह्यावरून हा प्रान्त मोठ्या भरभराटींत होता असें अनुमान काढतां येतें. या प्रान्ताचें क्षेत्रफळ सुमारें दुपटीनें वाढलें होतें. शहाजहान व अवरंगजेबाच्या वेळीं गादीसंबंधीं जीं भांडणें झालीं त्यांत अयोध्या प्रान्ताच्या बऱ्याचशा भागास उपसर्ग झाला नाहीं.

सादतखान ( १७२४–१७३९ ):—अवरंगजेब बादशहा मृत्यु पावल्यानंतर दिल्लीची पातशाही कमजोर झाली तेव्हां, अयोध्याप्रांत स्वतंत्र झाला. १७२४ मध्यें महंमद अमीन उर्फ सादतखान यास अयोध्येचा सुभा नेमण्यांत आलें. फैजाबाद शहर ह्यानेंच वसविलें पण त्याचा बहुतेक काळ मराठ्यांशीं व नादिरशहाशीं झगडण्यांतच गेला.अयोध्येचा व अलाहाबादचा कारभार त्याचे प्रतिनिधी पहात असत [ सादतखान पहा ].

सफदरजंग (१७३९–१७५४):—त्याच्यानंतर १७३९ मध्यें त्याचा पुतण्या व जांवई सफदरजंग हा अयोध्या प्रांताचा कारभार पाहूं लागला. याच्या कारकीर्दीत प्रान्ताची भरभराट असून यानें बरींच लोकहिताचीं कामें केलीं. यानें फैजाबाद हें आपल्या राजधानीचें शहर केलें. याच्या

कारकीर्दीतील महत्त्वाच्या गोष्टी म्हटल्या म्हणजे रोहिल्यांचा उत्कर्ष व त्यांच्याशीं युद्धें, अहमदशहा अवदाली अथवा दुराणी याच्या उत्तरेकडील स्वाऱ्या व फरुकाबादच्या पठाण नबाबांचे पुंडावे व त्यांशीं युद्ध या होत. सदर रोहले पठाणांशीं झालेल्या युद्धांत एकदां तर सफदरजंगाचा अयोध्या प्रांत त्याच्या ताब्यांतून गेला व त्यामुळें त्याला मराठ्यांची मदत घेऊन तो परत मिळवावा लागला. मराठ्यांचा रोहिलखंडांत प्रवेश होण्याचें हेंच कारण होय. सफदरजंगानें १७४८ पासून सुमारें सहा वर्षें दिल्लीच्या बादशहाच्या वजिरातीचें काम केलें [ सफदरजंग पहा ].

सुजाउद्दौला(१७५४-१७७५):—इ. स. १७५४ सालीं सफदरजंग मरण पावला व त्याचा पुत्र सुजाउद्दौला हा गादीवर आला. त्यानें आपली राजधानी लखनौ येथें आणली. त्यानें-नवीन वजीर गाजीउद्दीन यानें मराठ्यांस मदतीस बोलाविलें होतें त्यांस रोहिल्यांच्या मदतीनें हांकून लावलें. वजीर गाजीउद्दीन याच्या छळामुळें जेव्हां राजपुत्र अली गोहर (हाच पुढें शहाअलम दुसरा झाला.) हा इ. स. १७५८ मध्यें दिल्लीहून सुजाउद्दौल्याकडे पळून आला तेव्हां त्यास सुजाउद्दौल्यानें बंगालवर स्वारी करण्याची सल्ला दिली. १७६१ मधील पानिपतच्या लढाईंत सुजाउद्दौला हा मुसुलमानांच्या वतीनें लढला. शहाअलम बंगाल घेण्याचा प्रयत्न सोडून लवकरच सुजाउद्दौल्याकडे परत आला. त्याचवेळीं दिल्लीपतीच्या वजिरातीचें काम सुजाउद्दौल्यास वंशपरंपरा मिळालें. १७६३ मधील पाटणाच्या कत्तलीनंतर मीरकासीम व त्याचा सेनापति सुमरू हे अयोध्येस पळून आले तेव्हां तेथें त्यास सुजाउद्दौल्याची व पादशहाची मदत मिळाली. पण या सर्वांचा ब्रिटिशांनीं १७६४ मध्यें बक्सार येथें पराभव केला. तथापि शहाअलम त्यानें या लढाईंत कांहींहि अंग ठेवलें नसल्यामुळें या पराभवानंतर तो ब्रिटिशांस जाऊन मिळाला. इकडे सुजाउद्दौला हा बरेलीस पळून गेला, व त्यानें पुन्हां पठाणांच्या व मराठ्यांच्या मदतीनें १७६५ मध्यें जाजमऊ येथ ब्रिटिशांशीं टक्कर दिली. पण तेथेंहि त्याचा पराजयच झाला. या मुळें सुजाउद्दौला व इंग्रज यांच्या दरम्यान तह होऊन सुजाउद्दौल्यानें इंग्रजांस लढाईच्या खर्चाबद्दल ५० लाख रुपये देण्याचें कबूल केलें.

त्याच समयीं सुजाउद्दौल्यानें आपली राजधानी फैजाबादेस आणून तेथें किल्ला बांधिला. १७७१ मध्यें मराठ्यांनीं उत्तर हिंदुस्थानांत बरेच विजय मिळवून पानपतच्या पराभवामुळें नष्ट झालेली सत्ता पुन्हां प्रस्थापित केली. दिल्लीचा बादशहा त्यांस जाऊन मिळाला. यामुळें अयोध्येस व ब्रिटिशांस जबर धोका आहे हें उघड उघड दिसत होतें. ही संधि साधून इंग्रजांनीं सुजाउद्दौल्याशीं तह घडवून आणला. या तहान्वयें सुजाउद्दौल्यानें इंग्रजांस दरसाल सरहद्दरक्षण करण्याकरितां २५ लाख रुपये देण्याचें कबूल केलें, तावडतोब ५० लाख रुपये दिले व आपल्या दरबारीं ब्रिटिश रेसिडेंट ठेवून घेतला.

१७७२ सालीं मराठ्यांविरुद्ध सुजाउद्दौल्यानें रोहिल्यांस मदत केली होती. तिजबद्दल रोहिल्यांनीं देऊं केलेली रक्कम त्यांनीं आतां देण्याचें नाकारल्यावरून सुजाउद्दौल्यानें त्यांस शिक्षा लावण्याचा विचार कायम केला व इंग्रजांच्या-मदतीनें १७७४ मध्यें रामपूर संस्थान खेरीज सर्व रोहिलखंड आपल्या घशांत उतरविला. इ. स. १७७५ सालीं सुजाउद्दौला मरण पवला. (सुजाउद्दौला पहा.)

असफउद्दौलाः—( १७७५—१७९७ ) सुजाउद्दौल्याच्या नंतर त्याचा वडील पुत्र मिर्झा अमानी हा असफउद्दौला हें नांव धारण करून गादीवर बसला. असफउद्दौला अधिकारारूढ झाल्यावर अयोध्येच्या रेसिडेंटानें पूर्वीचा दोस्तीचा तह रद्द करून जो नवीन तह नबाबाकडून मान्य करवून घेतला ( २१ मे १७७५ ) त्यांतील मुख्य अटी म्हटल्या म्हणजे.—( १ ) कोरा व अलाहाबाद हे जिल्हे कंपनीनें नबाबाच्या अंमलाखालीं द्यावेत, (२) बनारस जोनपूर, गाझीपूर आणि चेतसिंग राजाच्या ताब्यांतील सर्व मुलूख मिळून २३ लक्षांचा प्रांत नबाबानें कंपनीस द्यावा; (३) नबाबानें मागील बाकी फेडून इंग्रज सैन्याच्या खर्चासाठीं दरमहा २,६०,००० रुपये द्यावे; व इंग्रजांनीं नबाबाच्या प्रांतांचें संरक्षण करावें. असफउद्दौला गादीवर बसल्यावर ब्रिटिश रेसिडेंटानें संस्थानची सर्व संपत्ति असफउद्दौल्याच्या स्वाधीन करण्याऐवजीं त्याच्या आईस देऊन तिला एक मोठी स्वतंत्र जहागीर तोडून दिली. यामुळें मातापुत्रांमध्यें वांकडें येऊन असफउद्दौल्यानें आईजवळून ६२ लक्ष रुपये घेतले. पण पुढें इंग्रजी रेसिडेंटाच्या मध्यस्थीमुळें असफउद्दौल्यानें अतःपर आपण आपल्या आईस त्रास देणार नाहीं असा कौलनामा लिहून दिला (१५ आक्टो १७७९). या वादापासून असफउद्दौल्यानें फैजाबाद सोडून लखनौ हें आपलें राहण्याचें ठिकाण केलें व तेथेंच आपली राजधानी आणली. यानंतर सहा वर्षेंपर्यंत लखनौचा राज्यकारभार असफउद्दौल्यानें सुरळीत रीतीनें चालविण्याचा प्रयत्न केला. परंतु इकडे नबाबाच्या लष्करामध्यें यूरोपीय अधिकाऱ्यांचा भरणा करून व मन मानेल त्याप्रमाणें नबाबाच्या सैन्यांत ढवळाढवळ करून इंग्रज रेसिडेंटानें अयोध्येंत गोंधळ उडवून दिला. स्वेच्छाचारी यूरोपीय लोकांचा अयोध्येमध्यें सुळसुळाट होऊन ते जमीनदार लोकांकडून वाटेल तसा पैसा घेऊं लागले. त्यांनीं व्यापार सुरू केला व जकातीचा वसूलहि ते आपणच करूं लागले (आयर्व्हिन व हेनरी लॉरेन्स). यामुळें एतद्देशीय सैन्य बेदिल होऊन त्यांनीं बंड केलें. या सगळ्या भानगडींत सैन्याचा खर्च वाढून कंपनीची बाकी तुंबत चालली. या वेळीं कंपनीच्या खजिन्याची स्थिति अत्यंत वाईट असल्यामुळें वॉरन हेस्टिंग्ज यानें नबाबाकडे वाटेल त्या तऱ्हेनें ५५ लक्ष रुपये रोख व २० लक्ष रुपयांची रक्कम कांहीं

दिवसांनीं देण्याबद्दल मागणें केलें. हेस्टिंग्जनें काशीच्या चेतसिंग राजाशीं अत्यंत जुलुमाचें वर्तन केल्यामुळें काशी येथें १७८१ च्या आगस्ट मध्यें बंड झालें. या बंडांत अयोध्येच्या बेगमांचें अंग आहे असा खोटा पुरावा हेस्टिंग्जनें आपला मित्र इम्पे याच्या साहाय्यानें तयार करून त्यांच्या जहागिरी व संपत्ति खुद्द असफउद्दौल्याच्या इच्छेविरुद्ध जप्त करण्याचें काम सुरू केलें. लखनौचा रेसिडेंट मिडल्टन व हेस्टिंग्जच्या कृपेनें प्रधानपद धारण केलेला सरदार हैदरबेगखान यांनीं त्या पडदानशीन स्त्रियांवर व त्यांच्या वृद्ध द्वारसंरक्षकांवर अतिशय जुल्म करून त्यांच्याकडून ७५ लक्ष रुपये काढले (मि. मिलचा इतिहास पहा). ही गोष्ट १७८२ सालीं घडली. अशा रीतीनें हेस्टिंग्जच्या कारकीर्दीत अयोध्येच्या राज्यकारभाराची अव्यवस्था होऊन सर्वत्र हाहाःकार उडाला. कॅप्टन एडवर्ड्स यानें असें म्हटलें आहे कीं १७७४ सालीं सुजाउद्दौल्याच्या कारकीर्दींत अयोध्या प्रांत अतिशय भरभराटीमध्यें होता. तो १७८३ मध्यें उध्वस्त व उच्छिन्न बनला. आपला निभाव लागत नाहीं असें पाहून असफउद्दौल्यानें गव्हर्नरजनरलकडे आपल्या तक्रारी पाठविण्याचा क्रम एकसारखा सुरू ठेवला. तेव्हां १७८४ मध्यें सैन्याची एक तुकडी कमी करून जप्त केलेल्या जहागिरींचा कांहीं भाग खुला केला. पुढें १७८७ मध्यें कॉर्नवालिसनें यूरोपिय लोकांचा निरनिराळा खर्च मिळून नबाबास दरसाल ८४ लक्ष रुपये द्यावे लागत होते तो खर्च कमी करून लष्करी खर्च ५० लक्षांवर मुकर केला व रेसिडेंटानें संस्थानच्या अंतर्गत कारभारांत बिलकुल हात घालूं नये असें ठरविलें. यानंतर पुन्हां पुढच्या वर्षी लखनौ येथें गव्हर्नरजनरलचा एजंट म्हणून सालीना दहा लक्ष रुपये नेमणुकीचा एक अधिकारी होता ती जागा कमी केली व कंपनीच्या नांवाखालीं कित्येक यूरोपीय व्यापाऱ्यांनां अयोध्येमध्यें जे हक्क प्राप्त झाले होते ते सर्व काढून घेतले.

नबाब असफउद्दौला याजबरोबर कॉर्नवालिस यानें जो तह केला. त्या तहाप्रमाणें बरेंच दिवस सुरळीत राज्यव्यवस्था चालली व नबाबानें टिकायतराय व झौलाल या हिंदू मुत्सद्यांच्या मदतीनें बरींच लोकोपयोगी कामें करून प्रजेचा असंतोष नाहींसा करण्याचा प्रयत्न केला. परंतु पुढें १७९५ मध्यें कॉर्नवालिस जाऊन त्याच्या जागीं सर जॉन शोअर गव्हर्नरजनरल होऊन आला तेव्हां त्यानें अयोध्येवर इंग्रज सैन्याप्रीत्यर्थ पुन्हां ५॥ लक्षांचा अधिक लष्करी खर्च लादला व तफझुल हुसेन नामक इसमास नबाबाच्या इच्छेविरुद्ध त्याचा दिवाण केलें. यामुळें नबाबाच्या मनास धक्का बसून तो आजारी पडला व त्यानें औषधपाणी वगैरे न घेतल्यामुळें तो अखेरीस २१ सप्टंबर १७९७ रोजीं मरण पावला. असफउद्दौला हा फार चैनी, विषयासक्त पण दानशूर म्हणून प्रसिद्ध आहे. त्यानें लखनौ शहराचें वैभव बरेंच वाढविलें.

सादतअली (१७९८--१८१४) :—असफउद्दौला मरण पावल्यानंतर त्याचा औरस पुत्र वजीरअली यास गादीवर बसविण्यांत आलें. परंतु असफ उद्दौल्याच्या कारकीर्दीत गव्हर्नर जनरलनें नेमलेला दिवाण अफझुल हुसेन हा पूर्वी सुजाउद्दौल्याचा दुसरा पुत्र सादतअली याचा शिक्षक असल्यामुळें त्यानें वजीरअलीवर नाना प्रकारचे असत्य आरोप आणून गव्हर्नरजनरलाकडून आपला जुना शिष्य असफउद्दौल्याचा सावत्र बंधु जो सादतअलीखान त्यास गादीवर बसविलें (इ. स. १७९८). यानें इंग्रजांशीं नवीन तह करून त्यास अलाहाबादचा व फत्तेगडचा असे दोन बळकट किल्ले दिले व ७६ लाख रुपये सालिना देण्याचें कबूल करून शिवाय उपर्युक्त किल्ल्यांच्या दुरुस्तीकरितां ११ लक्ष व स्वतःच्या राज्यारोहणाप्रीत्यर्थ १२ लक्ष रुपये दिले. उलट ब्रिटिशांनीं अयोध्या प्रान्ताचें रक्षण करण्याची जबाबदारी आपल्या शिरावर घेतली. चार वर्षांनंतर जमानशहा दुराणी स्वारी करणार ह्या भीतीनें रोहिलखंडांत व अयोध्या प्रान्तांत मोठी खळबळ उडाली- व ही संधि साधून शिंदे कदाचित् त्या प्रान्तावर स्वारी करतील अशी इंग्रजांस भिती वाटत होती. म्हणून इंग्रजांनीं १८०१ सालीं नबाबाकडून एक नवीन तह करवून घेऊन त्याजकडून सैन्याच्या खर्चाकरितां गोरखपूर, अलाहाबाद, अजीमगड, फत्तेगड, कानपूर, इटावा, मैनापुरी, फरुकाबाद, बास्ती वगैरे जिल्हे मिळून एक कोट पस्तीस लक्ष रुपये वसुलाचा प्रांत सर्व हक्कांसह तोडून घेतला. व बाकीचा प्रान्त सादतअलीकडे वंशपरंपरा चालविला जाईल असें ठरविलें. तेव्हां त्याकडे फक्त ब्रिटिश राज्यवेष्टित अयोध्येचा प्रदेश राहिला. सादतअली १८१४ सालीं मरण पावला. त्याच्या कारकीर्दीसंबंधानें कर्नल मॅकॲन्ड्रयू यानें असें लिहिलें आहे कीं, याच्या राज्यव्यवस्थेमुळें लोक फार सुखी व संतुष्ट झाले. राज्यांतील पडित जमिनीची लागवड झाली. आणि दाट वस्तीच्या प्रांतांतून जमीन महसूल द्रव्यरूपानें घेण्याची पद्धति अमलांत आली. एकंदरीनें सादतअलीनें आपल्या पश्चात रयतेचा मित्र अशी कीर्ति मिळवून राज्याचा खाजिना पूर्ण भरून ठेविला. याच्या मरणकालीं याच्या खाजिन्यांत १४ क्रोड रुपयांची शिल्लक होती.

गाजीउद्दीन हैदर (१८१४--१८२७) :—१८१४ मध्यें सादतअलीखानाचा पुत्र गाजीउद्दीनहैदर हा गादीवर आला. त्यानें पहिल्यानेंच आपल्या नांवाचें नाणें पाडिलें. इ. स. १८१४ सालीं नेपाळच्या लढाईच्या प्रसंगीं यानें इंग्रजांचा नेपाळच्या पायथ्याचा मुलूख व खैरागड जिल्हा गहाण ठेवून त्यांनां दोन कोट रुपये सहा टक्के व्याजानें कर्जाऊ दिले. १८१९ मध्यें दिल्लीचा बादशहा इंग्रजांविषयीं अराजनिष्ठ आहे असें वाटल्यावरून, त्याची बादशहात कमी करून लखनौच्या नबाबास "बादशहा" हें पद लार्ड हेस्टिंग्जनें दिलें. पण दिल्लीच्या गादीचा हा अपमान मुसुलमानांस न खपल्यामुळें हें पदांतर कोणी मानलें नाहीं. पुढें १८२५ मध्यें

ब्रह्मदेशाच्या लढाईच्या प्रसंगीं यानें आणखी दीड कोट रुपये इंग्रजांस कर्जाऊ दिले. गाजी उद्दिनानें इंग्रजांस पैशाची व सैन्याची जी वेळोवेळीं मदत केली तिच्यामुळें त्याजवर इंग्रजांची फार मर्जी होती. हा १८२७ सालीं मरण पावला.

नासिरउद्दीन हैदर ( १८२७--१८३७ ):—गाजी-उद्दिनच्या मागून त्याचा बदफैली पुत्र नासिरुद्दीन अधिकारारूढ झाला. त्यानें इंग्रजी चालीरीतींचें अनुकरण करण्यांत बराच पैसा उधळला. याच्या दुर्वर्तनामुळें कंपनी सरकार याला पदच्युत करून राज्यव्यवस्था आपल्या हातीं घेणार तोंच ७ जुलै १८३७ रोजीं हा विषप्रयोग होऊन एकाएकीं मृत्यु पावला. याच्या मरणासमयीं खजिन्यांत १४ कोटी पैकीं फक्त ७० लाख रुपयेच शिल्लक राहिले होते.

महमदअल्लीशहा ( १८३७-१८४२ ):—नासिरुद्दीनच्या नंतर त्याचा एक औरस पण अप्रिय पुत्र मुन्नाजान यास नासीरउद्दिनच्या आईनें गादीवर बसविण्याचा प्रयत्न केला परंतु नासिरउद्दिनानें आपल्या दुलारी नामक धारांगनेच्या खानजहा नांवाच्या पुत्रास गादी देवविण्याच्या इच्छेनें मुन्नाजान हा माझा औरस पुत्र नाहीं असें रेसिडेंटास कळवून ठेविलें असल्यामुळें रेसिडेंटानें मध्यें पडून नासिरउद्दीनाचा चुलता नासिरउद्दौला यास महमदअल्लीशहा हें पद देऊन गादीवर बसविलें. यास गादीवर बसवितांना इंग्रजांनीं १८०१ सालच्या तहाविरुद्ध अयोध्येवर १६ लक्ष रुपयांचा नवीन लष्करी खर्च लादण्याचा आपला हेतु साध्य करून घेतला. महमदअल्लीशहा हा १८४२ मध्यें मरण पावला.

अमजदअल्लीशहा ( १८४२--१८४७ ):—महमद अल्ली शहानंतर त्याचा पुत्र अमजदअल्ली गादीवर येऊन त्यानें १८४७ पावेतों राज्य केलें. हा विषयासक्त निघाल्यामुळें याच्या कारकीर्दीत अयोध्येची स्थिति फार बिघडली. याच्या कारकीर्दीतील सार्वजनिक महत्त्वाच्या गोष्टी म्हणजे गोमती नदीवरील लोखंडी पूल व कानपूरलखनौ रस्ता या होत.

वाजिदअल्लीशहा ( १८४७--१८५६ ):—अमजदअल्ली शहानंतर त्याचा पुत्र वाजिदअल्लीशहा गादीवर बसला. आज पर्यंत हिंदुस्थानांत जे दुर्व्यसनी, दुर्वृत्त, विषयासक्त आणि कर्तव्यशून्य राजे झाले त्यांतील प्रमुखांमध्यें वाजिदअल्लीची गणना करण्यास हरकत नाहीं. नवाबाचें राज्यकारभाराकडे दुर्लक्ष झाल्यामुळें सर्व अयोध्या प्रांतांत अंदाधुंदी माजली व प्रांतोप्रांतींचे अधिकारी स्वेच्छाचारी होऊन प्रजेवर जुलूम करूं लागले. इ. स. १८५१ सालीं अयोध्येचा रेसिडेंट कर्नल औट्राम यानें अयोध्येच्या राज्यकारभारासंबंधीं जो रिपोर्ट सादर केला त्यावरून असें कळतें कीं, १८५३–५४ सालचा एकंदर वसूल एककोट वीस लक्ष रुपये जमा असतां त्यापैकीं फक्त तीसचाळीस लक्षच लखनौस आले, व बाकी सर्व प्रांतोप्रांतीच्या अधिकाऱ्यांनीं गिळंकृत केलें. अयोध्या प्रान्तांतील एकंदर न्यायखात्याचा खर्च अवघा १६,००० रुपये होता. आणि सैन्याची संख्या ६०,००० असून त्याचा वार्षिक खर्च ४२ लक्ष रुपये होता. आपल्या राज्याच्या कारभारांत सुधारणा करण्याविषयीं वारंवार सूचना केल्या असतांहि जेव्हां सुधारणा होईना तेव्हां अखेर ता.४ फेब्रुवारी सन १८५६ रोजीं वाजिदअल्लीशहास अयोध्येचा बादशहा हा किताब, दिलखुष आणि बिबियापुर या दोन ठिकाणांचें स्वामित्व व १२ लक्ष रुपयांची वंशपरंपरा सालिना नेमणूक एवढें त्याच्याकडे ठेवून त्याचें राज्य खालसा करण्याचा कंपनीसरकारचा उद्देश कळविण्यांत आला. परंतु नबाबानें या नवीन तहावर सही करण्याचें नाकारल्यामुळें ता. ७ फेब्रुवारी रोजीं त्यास पदच्युत करण्यांत येऊन कैद करून कलकत्त्यास पाठविण्यांत आलें.

इंग्रजीअंमल.—इ. स. १८५९ पासून नवाबास १२ लाख रुपयांची नेमणूक करून देण्यांत आली, व वजिदअल्लीशहास त्याच्या मरणकालापावेतों ( १८८७ ) अयोध्येचा बादशहा म्हणवून घेण्याची परवानगी दिली गेली. पण वाजिदअल्लीशहाच्या मरणानंतर ती पदवी काढून घेतली गेली व नेमणूकहि कमी करण्यांत आली. १८५६ मध्यें ब्रिटिश राज्यास जोडल्यावर अयोध्येच्या प्रान्ताची एक चीफ कमिशनरशिप निर्माण करण्यांत आली, व लखनौ, सितापूर, फैजाबाद व सुलतानपूर येथें सैन्य ठेवण्यांत आलें

हा प्रान्त ब्रिटिश राज्यास जोडल्यामुळें खानदानीच्या लोकांत बराच असंतोष माजला. तालुकदारांस काम करण्यास भीति वाटूं लागली. मीरत येथें बंडाचा पुकारा होतांच १५ दिवसांच्या आंतच अयोध्या प्रांतांत बंड झालें. मार्च १८५७ मध्यें हेनरी लॉरेन्स यानें लखनौ येथें कामाचा चार्ज घेतला. व मेच्या ३० तारखेस हिंदू शिपायांनीं बंड केलें. बंडांत पहिल्यानें तालुकदारांचें कांहींहि अंग नव्हतें. जुलैच्या आरंभीं लखनौ येथील ब्रिटिश सैनिकांस बंडखोरांनीं गराडा घातला, व ४ जुलैस हेनरी लॉरेन्स तोफेचा गोळा लागून मरण पावला. औटराम व हॅवेलॉक हे सप्टेंबरच्या २५ व्या तारखेस या सैन्याच्या मदतीस आले, पण सैन्यबल फार नसल्यामुळें नोव्हेंबर मध्यांत कॉलिन कँपबेल मदतीस येईपर्यंत त्यांची खरी मुक्तता झाली नाहीं. नोव्हेंबरच्या २३ व्या तारखेस इंग्रजांनीं लखनौ सोडून बायकामुलांस कानपुरास पोहोंचवून दिलें. इतक्यांत नेपाळच्या प्रधानाकडून मदत मिळाल्यामुळें ८००० गुरखे लोकांच्या साहाय्यानें बंडखोरांचा बींमोड करण्यांत आला. १८५८ च्या फेब्रुवारी महिन्याच्या शेवटीं कॅम्पबेल साहेब गंगापार होऊन लखनौवर चाल करून गेला. त्यानें लखनौ शहर बऱ्याच प्रयासानें हस्तगत केलें, व दिलखुष वाडा आपल्या ताब्यांत घेतला. जूनमध्यें बेगमच्या सैन्याचा बींमोड करण्यांत आला. या कामांत कपुरथळ्याचा राजा रणधीरसिंग याच्या सैन्याकडून बरीच मदत झाली. १८५८ च्या नोव्हेंबरांत बंडाचा पूर्णपणें मोड झाला.

प्राचीन अवशेष व इमारती.—गोंडामध्यें साहेत माहेत येथें बरेच बौद्ध व जैन प्राचीन अवशेष आहेत. येथेंच प्राचीन श्रावस्ती शहर असावें. अयोध्येंतील सर्व देवालयें अर्वाचीन कालांतील आहेत. बाहरैच येथें सय्यद सालारचें थडगें आहे. अयोध्या येथें बावरची कबर व सुरी पठाणांनीं बांधलेल्या इमारती आहेत. फैजाबाद व लखनौ येथें अयोध्येच्या नबाबांनीं व राजांनीं बांधलेल्या इमारती आहेत.

लोकवर्णन.—येथील लोकवस्ती जगांतील कोणत्याहि भागाहून अधिक दाट आहे. लखनौ जिल्ह्यांत एका चौ. मैलांत सरासरी ८२८ लोक राहतात. यामुळें आतां आसामांत व वसाहतींत लोक जाऊं लागले आहेत. या प्रांतांत लखनौ, फैजाबाद ( अयोध्या ), बाहरैच, सीतापूर, शहाबाद, इत्यादि मोठीं शहरें आहेत. या प्रांतांत जवळजवळ अर्धे लोक मुसलमान धर्माचे व अर्धे हिंदु धर्माचे आहेत. हरदोई जिल्ह्यांत पश्चिम हिंदुस्थानी भाषा व इतरत्र अयोध्यी भाषा बोलतात. ह्या प्रांतांत ब्राह्मण व रजपूत लोक नांगरास हात लावीत नाहींत.

अलाहाबाद ते फैजाबाद व लखनौ ते फैजाबाद रस्ते तयार करण्यांत आले आहेत. 'औध व रोहिलखंड स्टेट रेल्वे' हा मुख्य लोहमार्ग असून शिवाय इतर लोहमार्ग चालू आहेत.

शासनपद्धति.—१८५६मध्यें अयोध्येचें राज्य खालसा करण्यांत आल्यापासून १८७७ पावेतों अयोध्या प्रांताचा कारभार वेगळा पाहिला जात असे. पण त्या वर्षी अयोध्येच्या चीफ कमिशनरची व 'वायव्य प्रांता'च्या लेफ्टेनंट गव्हर्नरची जागा एक करण्यांत येऊन येथील अधिकाऱ्यास वायव्यप्रांताचा लेफ्टेनंट गव्हर्नर व अयोध्येचा चीफ कमिशनर असें संयुक्त नांव देण्यांत आलें. पुढें १९०२ सालीं चीफ कमिशनर हें नांव वगळण्यांत येऊन सर्व प्रांतास आग्रा अयोध्येचा संयुक्त प्रांत असें नांव मिळालें. १९२१ मध्यें नवीन सुधारलेला कायदा अमलांत आला तेव्हां संयुक्त प्रांताचा लेफ्टेनंट ग्व्हर्नर हा गव्हर्नर झाला.

एकंदर ३६,७२१ खेड्यांपैकीं २३,५४३ खेडीं प्रथमतः या प्रांतांतील तालुकदारांकडे होतीं. १८५६ मध्यें २३,५४३ खेड्यांपैकीं ३५ लाख उत्पन्न येणाऱ्या फक्त १३,६४० खेड्यांच्या तालुकदारांचे हक्क मानण्यांत आले, पण १८५८ मध्यें जिकडे तिकडे शांतता झाल्यानंतर सर्व योजना बदलून टाकण्यांत आली; मालकीचे सर्व हक्क काढून घेण्यांत आले. फक्त पांचच तालुकदार राजनिष्ठ आढळून आल्यावरून त्यांचे मालकीहक्क कायम ठेवण्यांत आले. त्यांची धाराबंदी कायमची ठरविण्यांत येऊन त्यांस आणखी देणग्या देण्यांत आल्या. इतर जे तालुकदार शरण आले त्यांस क्षमा करण्यांत आली. १८५९ मध्यें २२,६५८ खेडीं तालुकदारांच्या स्वाधीन करण्यांत आलीं. ह्या तालुकदारांपैकीं पुष्कळ जण खानदानीचे गृहस्थ नव्हते. नबाब सादतअलीखानाचा कर्तृत्ववान प्रधान अलमासअली ह्यानें सर्व तालुकदारांस आपल्या वर्चस्वाखालीं आणिलें होतें. १८५९ मध्यें ज्यांनां कायमचे तालुककदार बनविण्यांत आलें त्यांस त्याप्रमाणें सनदा देण्यांत आल्या व १८६९ मध्यें 'औध इस्टेट्स् ॲक्ट' पास करण्यांत आला. कांहीं इस्टेटींत अव्यवस्था व कर्ज झालें होतें त्याच्याकरितां 'म्यानेजर' नेमण्यांत आले, व त्यांच्याविरुद्ध डिक्री किंवा दिवाणी दावे चालविण्याचें बंद केलें गेलें व व्याजाचा दर सहा किंवा सहापेक्षां कमी करण्यांत आला. १८७३ मध्यें ब्रिटिश सरकारनें ह्या तालुकदारांस ५ रु. व्याजानें वीस वर्षांच्या करारानें कर्ज देऊं केलें.

शेतकऱ्यांची स्थिति.—अयोध्या प्रांतांत जमीनदार व सरकार आणि जमीनदार व त्यांचीं कुळें यांमधील संबंधाचा प्रश्न बराच भानगडीचा झाला आहे. १८५७च्या बंडानंतर इंग्रज सरकारनें या प्रांतांतील जमीनदारांस सरकार तुमच्या जमिनीवर कुळांनां वहिवाटीचा हक्क सांगूं देणार नाहीं असें अभिवचन देऊन ठेविलें होतें. या अभिवचनापासून उत्पन्न होणारे दुष्परिणाम टाळण्याकरितां इ. स. १८८६ सालीं 'औध रेंट ॲक्ट' म्हणून एक कायदा पसार करण्यांत आला. त्यानें जमीनदारांनां आपल्या जमीनीचा खंड दर सात वर्षांनीं रुपयास एक आण्याहून अधिक वाढवितां येईनासा झाला. उत्तरअयोध्या प्रांतांत लोकवस्ती विरळ आहे. तेथें हा सुरळीतपणें अंमलांत आला. पण दक्षिण अयोध्या प्रांतांत लोकवस्ती दाट असल्यामुळें तेथें जमीनीकरितां मागणी अतिशय असते. १८८५ च्या कायद्यानें जमीनदारास आपल्या जमीनीच्या खंडांत योग्य तेवढी वाढ करतां येईना. पण त्यास सात वर्षांच्या अखेर अगाऊ सूचना देऊन आपल्या कुळांकडून जमीन काढून घेतां येत असल्याकारणानें तो जुन्या कुळांकडे जमीन कायम ठेवण्याबद्दल किंवा नवीन कुळांस जमीन देण्याबद्दल त्यांच्याकडून नजराणा घेऊं लागला. याचा परिणाम असा झाला कीं, अनेक कुळांच्या जमीनी जाऊन त्यांनां दारोदार भीक मागण्याची पाळी आली व कित्येकांनां अवाच्या सवा व्याज देऊन पैसे कर्जाऊ काढावे लागले. ह्या त्रास दूर करून घेण्यास १९२० च्या पावसाळयांत प्रतापगड जिल्ह्यांत प्रथम 'किसान सभा' स्थापन झाली व तेथून ती चळवळ पुढें रायबरेली ताळुक्यांत व इतरत्र ठिकाणीं पसरून १९२१ च्या जानेवारी व मार्च महिन्यांत रायबरेली व फैजाबाद जिल्ह्यांत दंगे झाले. तेव्हां एकपक्षी जमीनदारांनां आपल्या कुळांकडून इच्छेस येईल तेव्हां जमीनी काढून घेतां येऊं नयेत किंवा नजराण्याच्या रूपानें मोठमोठ्या रकमा उकळतां येऊं नयेत तर दुसऱ्या पक्षीं जमीनदारांनांहि आपल्या कुळांकडून जमीनीबद्दल योग्य तो खंडहि घेतां यावा म्हणून १९२१ सालीं

संयुक्त प्रांताच्या कायदेकौन्सिलांत मागील कायद्यांत सुधारणा करणारा एक ठराव मांडण्यांत आला.

१९०५ मध्यें जुडिशिअल कमिशनरच्या मदतीस एक मदतनीस ज्युडिशिअल कमिशनर नेमण्यांत आला व पांच वर्षांपूर्वी लखनौ येथें एक स्वतंत्र विद्यापीठ स्थापण्यांत आलें.

[संदर्भ ग्रंथ.—स्लीमन, जर्नी थ्रू औध; आयर्व्हिन, गार्डन ऑफ इंडिया; पारसनीस, अयोध्येचे नबाव; पेपर्स रिलेटिंग टु अंडर प्रोप्रायटरी राइट्स ऑफ दि कल्टिव्हेटर्स इन औध; कंडिशन्स ऑफ टेनन्सी अँड वर्किंग ऑफ रेंट लॉ इन औध; अॅडमिनिस्ट्रेशन रिपोर्ट युनायटेड प्रॉव्हिन्सेस (१९२१–२२) इंपिरियल गॅझेटियर]

ता लु क दा री.—अयोध्या या तालुकदारीचें क्षेत्र फैजाबाद, गोंडा, सुलतानपूर, बाराबांकी व लखनौ या जिल्ह्यांत पसरलें आहे. हिचें क्षेत्रफळ ७६२ चौरस मैल आहे. हिला ब्रिटिश सरकारास ५.९ लाख रुपये खंडणी द्यावी लागत असून हिचें एकंदर उत्पन्न इं. गॅ. मध्यें सुमारें ११ लाख दिलें आहे. बखतावर सिंग हा या तालुकदारीचा संस्थापक होय. हा अयोध्येचा नबाव सादतअल्लीखानाजवळ घोडेस्वार म्हणून चाकरीस राहिला. याची बढती फार त्वरेनें झाली व महमदअली शहानें त्यास राजा हा किताब दिला व फैजाबाद जिल्ह्यांतील माहदोना जमीनदारी बहाल केली. अयोध्या संस्थानांत बखतावरसिंग हा पहिल्या प्रतीचा मानकरी झाला व इ. स. १८४९ सालीं सर विल्यम स्लीमन यानें ज्या वेळीं अयोध्या संस्थानाची पहाणी केली त्यावेळीं हाच त्याजबरोबर होता. याचा धाकटा भाऊ दर्शनसिंग हाहि मोठ्या पदवीस चढला होता. तो इ. स. १८४४ सालीं मरण पावला. त्याच्या तीन पुत्रांपैकीं सर्वांत धाकटा मानसिंग यानेंहि अयोध्या दरबारची महत्त्वाची कामगिरी केली. इ. स. १८५५ सालीं बखतावर सिंग निपुत्रिक मरण पावला. त्यामुळें सर्व मालमत्ता मानसिंगासच मिळाली. पुढें अयोध्या संस्थान खालसा झाल्यामुळें मानसिंगाची बहुतेक सर्व इस्टेट काढून घेण्यांत आली व ज्या वेळीं १८५७ सालचें बंड झालें त्यावेळीं मानसिंग फैजाबाद येथें अटकेंत होता. परंतु पुढें यूरोपियन स्त्रिया व मुलें यांना सुरक्षित जागीं पोंचविण्याची त्यास कामगिरी देऊन त्यास मोकळें केलें. त्यानें ती कामगिरी बजावल्यावर तो पुन्हां बंडखोरांस मिळाला. परंतु औट्रॅम साहेब रणांगणावर आल्याबरोबर त्यानें आपलें अंग काढून घेतलें आणि पुन्हां त्यानें गोऱ्या स्त्रिया व मुलें यांच्या जीवितांचें रक्षण करून प्रांतांत स्थिरस्थावर करण्याकरतां बहुमोल मदत दिली. इ. स. १८५८ मध्यें त्याची जमीनदारी त्यास परत देण्यांत आली व त्यानें दिलेल्या मदतीदाखल त्यास महाराजा हा किताब व गोंडा राजाची जप्त केलेली इस्टेट बहाल केली. हा इ. स. १८७० सालीं मरण पावला. याच्यामागून याचा नातु सर प्रताप नारायणसिंग यास ही तालुकदारी मिळाली यानें इंपीरियल आणि प्राव्हिन्शियल कौन्सिलमध्यें चांगलें काम केलें हा इ. स. १९०७ सालीं मरण पावला.

श ह र.—हें संयुक्त प्रांतांतील फैजाबाद जिल्ह्यांत आहे. तें २६° ४८' उत्तर अक्षांशांवर आणि ८२° १२' पूर्व रेखांशावर आहे. हा गांव गोग्रा (शरयू) नदीच्या दक्षिण तीरावर असून औध रोहिलखंड रेल्वेचें एक स्टेशन आहे. लोकसंख्या सन १९०१ सालीं सुमारें २१५८४.

प्राचीन इतिहासः—हें अति प्राचीन शहर आहे. हल्लीं प्राचीन शहराचे अवशेष अस्तित्वांत नाहींत. कांहीं उंच भाग प्राचीन शहराची पूर्वीची जागा म्हणून दाखवितात.

प्राचीन काळीं अयोध्या हें फार मोठें वैभवशाली शहर होतें. ही नगरी मूळ वैवस्वत मनूनें (ख्रि. पू. १३६६ या वर्षी) राहण्यासाठीं स्थापिली असें म्हणतात. ग्रंथांतरीं जरी ही कोसल देशाची राजधानी होती इतकाच केवळ उल्लेख आहे, तरी इंद्रप्रस्थाच्या पूर्वेस दिशाभेदानें दोन कोसल देश आहेत त्यांतील आग्नेय कोसलाचीच ही राजधानी होय. सूर्यवंशांतील ५६ वा राजा दशरथ याच्या वेळेस ही नगरी बारा योजनें लांब व तीन योजनें रुंद होती असें वाल्मिकी रामायणांत म्हटलें आहे (बाल कांड सर्ग ५). याच ग्रंथांत पुढें (उत्तरकांड स. १११) असें वर्णन आहे. कीं, दशरथाच्या मरणानंतर या नगरींत दाशरथी रामानें अकरा सहस्र वर्षे राज्य केलें व निजधामास जातांना हिच्यांतील प्राणिमात्रास त्यानें आपल्या समागमें नेले त्यामुळें ही नगरी बहुत कालपर्यंत शून्य पडून राहिली होती; परंतु पुढें सूर्यवंशीय ऋषभ नामक राजानें हींत पुन्हां वसति केली. रामायणाच्या प्रारंभीं या शहराचें प्राचीन वैभव वर्णिलेलें आहे, सूर्यवंशांतील शेवटचा म्हणजे ११३ वा राजा सुमित्र याचा काल झाल्यावर अयोध्या शहर ओसाड पडलें व राजघराण्याची वाताहात झाली. याच राजघराण्यांतील पुरुषांपासून उदेपूर, जयपूर इत्यादि घराणीं निघालीं असें या घराण्यांचें म्हणणें आहे. अयोध्येस पुन्हां ऊर्जितावस्थेस पुढें उज्जनीचा राजा विक्रमादित्य यानें आणलें अशी दंतकथा आहे. परंतु हा विक्रमादित्य कोणता व केव्हां झाला हें निश्चित सांगतां येत नाहीं. बौद्धकालीं अयोध्या शहरास फारसें महत्त्व नसून त्यावेळीं कोसलांची राजधानी साकेत व श्रावस्ति -[सावत्थि] साकेतच्या उत्तरेस ४५ मैलांवर (विनय २.१४७)-हीं शहरें होतीं. साकेत शहर कोठें वसलेलें होतें याची नक्की जागा अजून संशोधकांनां सापडली नाहीं. तथापि प्राचीन अयोध्या शहराच्या भागावरच हें शहर वसलेले असावें असा कांहींचा अजमास आहे. पण बुद्धाच्या काळीं हीं दोनहि शहरें अस्तित्वांत असल्याचे उल्लेख असल्यामुळें तीं शेजारीं शेजारीं असण्याचाच जास्त संभव आहे. ख्रिस्ती शकाच्या प्रारंभीं अयोध्येंत व अयोध्येच्या आसपास एका स्वतंत्र राजघराण्याचा अंमल चालू होता असें भूम्यंतर्गत सांपडलेल्या नाणक पुराव्यावरून कळतें.

अकबर बादशहाच्या वेळीं अयोध्या हें सुभ्याचें मुख्य ठिकाण होतें. अठराव्या शतकांत कांहीं काळ अयोध्येच्या नबाबाची राजधानी येथें होती. इ. स. १७६५ सालीं सुजा-उद्दौल्यानें फैजाबाद हें आपलें राहण्याचें मुख्य ठिकाण केलें. त्यामुळें अयोध्या शहराचें राजकीय महत्त्व नष्ट झालें. हल्लीं या गांवास फक्त धार्मिकदृष्ट्या महत्त्व आहे.

वर्णन.—ज्या ठिकाणीं श्रीरामचंद्र जन्मास आला तें ठिकाण रामकोट म्हणून प्रसिद्ध असलेल्या उंचवट्याच्या एका कोपऱ्यावर दाखविण्यांत येतें. तेथील बराचसा भाग बाबरनें बांधलेल्या मशीदीनें व्यापलेला आहे. बाहेरच्या बाजूस एका लहानशा चबुतऱ्यावर रामाची मूर्ति व एक देऊळ असून हें त्याचें जन्मस्थान आहे असें समजतात. जवळच याहून कांहींसें मोठें एक देऊळ आहे. त्याठिकाणीं सीतेचें स्वयंपाकघर होतें असें म्हणतात. गोप्रेवर ज्या ठिकाणीं लक्ष्मण स्नान करीत असे तेथें एक मोठें देऊळ आहे. गांवांत हनुमान गढींत हनुमानाचें देऊळ आहे. तें लहान आहे तरी त्याचें बांधकाम सर्वोत्कृष्ट असून त्यात हनुमंताची प्रचंड मूर्ति आहे. देवालयाच्या पुढील भागात राम, लक्ष्मण व सीता यांच्या लहान लहान मूर्ती असून त्याचे मंदिरहि अगदीं लहान आहे. गढींत जाण्याकरितां पुष्कळ पायऱ्या चढाव्या लागतात. याशिवाय अलीकडे अठराव्या एकोणिसाव्या शतकांत बांधलेलीं पुष्कळ देवळें येथें आहेत. यापैकीं मुख्य मुख्य म्हटलीं म्हणजे टीकमगडच्या राणीनें बांधलेली कनक भवन नांवाची सुंदर इमारत, नागेश्वरनाथाचें देऊळ, दर्शनसिंहाचें देऊळ व अयोध्येच्या महाराजांनीं बांधलेलें एक लहानसें संगमवरी देऊळ हीं होत. येथें जैनांचीं देखील कित्येक देवळें आहेत. यापैकीं पाच देवळें पांच तीर्थंकरांच्या जन्मभूमीच्या चिरस्मरणार्थ १८ व्या शतकांत बांधण्यांत आलीं. ज्या ठिकाणीं रामाचा अवतार समाप्त झाला त्या ठिकाणीं बांधलेल्या स्वर्गद्वार नांवाच्या देवळावर अवरंगजेब बादशहानें एक मशीद बांधली होती ती हल्लीं मोडकळीस आली आहे. दुसऱ्या एका त्रेता–का–ठाकुर नांवाच्या देवळावर अशीच एक त्याच बादशहानें मशीद बांधली आहे, तींत कनोजचा शेवटचा राजा जयचंद याचा एक शिलालेख सापडला आहे. या देवळाच्या जागेवर रामानें यज्ञ केला होता अशी दंतकथा आहे. शिवाय मुसुलमान ज्यांना पूज्य मानतात अशा नोह, सेथ आणि जोब यांच्या तीन कबरी असून त्यांपैकीं शेवटच्या दोन कबरींचा ऐनी–अकबरींत उल्लेख आहे. जवळच मणिपर्वत म्हणून एक मातीचा ढीग दिसतो. मारुतीनें हिमालयाचा कांहीं भाग उचलून येथें आणून टाकला व त्यास मणिपर्वत नांव मिळालें अशी दंतकथा आहे; तसेंच रामकोट ज्या वेळीं बांधला त्या वेळीं मजूर लोकांनीं आपल्या टोपल्या झाडल्या त्या झाडतांना जी माती पडली तिचा हा मणिपर्वत झाला अशी दुसरी दंतकथा आहे. बहुधा हा एखाद्या स्तूपाचा अवशेष असावा असें वाटतें.

फैजाबाद म्युनसिपालिटीच अयोध्येची व्यवस्था पाहते. येथें व्यापार मुळींच नाहीं असें म्हटलें तरी चालेल. येथें दर वर्षी तीन वेळा मार्च–एप्रिल, जुलै–आगष्ट, आक्टोबर–नवंबर या महिन्यांत मोठ्या जत्रा भरतात. [ इं. गॅ. ]

**अय्याकोंडा तिरुमलाय**–(मद्रास): त्रिचनापल्ली जिल्हा व तालुक्यांतील एक गांव. त्रिचनापल्ली शहरापासून पश्चिमेस ३ मैलांवर असून लोकं सं. ( १९०१ ) १५५० होती. याठिकाणीं एक पुरातन देवालय असून त्यांत पुष्कळसे शिलालेख आहेत गांवाला तटबंदी आहे. टेंकडीला लहान लहान नाजुकशीं गोमुखें असून गोमुखाच्या वरच्या अंगाला गोळी जाण्याकरितां द्वारें ठेवलेलीं आहेत. पूर्वेच्या बाजूस तोफांचे गोळे अजून नजरेस पडतात. १७५३त नबाव व इंग्रज यांच्या दरम्यान युद्ध सुरू असतां या देवालयाचा आश्रय मधून मधून घ्यावा लागे. इतिहासकार ऑर्म हा याला वेकोंडा हें नांव देतो. म्हैसूरच्या युद्धात त्रिचनापल्लीवर तोफांचा भडीमार करून कप्तान डालटननें एक रात्र देवालयांत विश्रांति घेतली व दुसरे दिवशीं शहर घेतलें.

**अय्यंगार, कस्तुरिरंग**—हिंदी वृत्तपत्रकार. हे मद्रासचे राहाणार. उच्च इंग्रजी शिक्षण घेतल्यानंतर यांनीं रजिस्ट्रेशन खात्यांत नोकरी धरली; पण लवकरच ती सोडून कायद्याच्या अभ्यासाकडे ते वळले व कोइंबतुर येथें वकिलीला सुरवात केली पुढें कांहीं दिवसांनीं ते मद्रासच्या हायकोर्टांत वकिली करूं लागले. तेव्हांपासूनच त्यांच्या सामाजिक व राजकीय आयुष्याला प्रारंभ झाला. यानंतर त्यांचा 'हिंदु' पत्राच्या चालकाशीं संबंध येऊन त्यांनीं वकिली सोडून संपादकाचा पेशा पत्करिला. 'हिंदु' पत्र स्वतःच्या मालकीचें करून त्यांनीं तें वसिवर्षेपर्यंत मोठ्या मान्यतेनें व भारदस्तपणें चालविलें. 'हिंदु' हें मद्रासचें दैनिक पत्र असून, अय्यंगारांच्या हातचीं तीं जणूं काय एक वासवी शक्तीच असा तिचा लौकिक होता. दक्षिण हिंदुस्थानचें ते एक मुख बनलें असून त्याला जी सर्वमान्यता प्राप्त झाली आहे व तें टाइम्स सारख्या आंग्लोइंडियन पत्राच्या तोडीचें जें बनलें आहे त्याचें कारण अय्यंगारांचें कर्तृत्व होय. १९१७ सालीं ॲनी बेझंटबाईनीं स्थापिलेल्या होमरूल लीगमध्यें त्यांनीं पुढाकार घेतला. गेल्या महायुद्धांत युद्धक्षेत्राचें निरीक्षण करण्यासाठीं जे हिंदी वर्तमानपत्राचे प्रतिनिधी यूरोपांत हिंदुस्थानसरकारनें पाठविले त्यापैकीं अय्यंगार एक होते. १९२० मधील असहकारितेच्या चळवळीला त्यांनीं 'हिंदु' द्वारें मोठी मदत केली. गेलीं कांहीं वर्षें कॉंग्रेसमध्यें यांचें बरेंच वजन असे. कॉंग्रेसनें नेमलेल्या कायदे–भंग कमीटीचे सभासद म्हणून ते १९२२ सालीं हिंदुस्थानभर साक्षीपुरावा घेत फिरले; त्यामुळें प्रकृति बिघडून त्यांतच त्यांचा अंत झाला. ( १२ डिसेंबर १९२३ ). मरणसमयीं त्याचें वय ६४ वर्षांचें होतें. मरणपूर्वीं थोडे दिवस मुंबईच्या इंडियन जर्नलिस्ट

असोसिएशनच्या अध्यक्षस्थानीं त्यांची योजना करण्यांत आली होती.

**अय्यर, सर शेषाद्री** ( १८४५—१९०१ ).—म्हैसूरचे एक दिवाण. हे मलबार प्रांतांत पालघाट येथें राहणाऱ्या एका ब्राह्मणाचे चिरंजीव असून यांचें शिक्षण कालिकत येथील शाळेंत व मद्रासच्या प्रेसिडेन्सी कॉलेजांत झालें. नंतर भाषांतरकार म्हणून सरकारी नोकरींत ते शिरले. १८६८सालीं रंगा चार्लू दिवाणांच्या हाताखालीं त्यांची म्हैसूर येथें बदली झाली. तेथें १३ वर्षें निरनिराळ्या जागांवर काम केल्यानंतर १८८१ मध्यें संस्थान जेव्हां प्रत्यक्ष राजाच्या ताब्यांत आलें तेव्हां शेषाद्री अय्यर रंगाचार्लू दिवाणांचे दुय्यम झाले. १८८५ सालीं त्यांनां दिवाणीची जागा मिळाली. पुढील १७ वर्षें संस्थानाची आर्थिक व औद्योगिक उन्नति करण्याकरितां ते फार झटले व महाराज चामराजेंद्र यांचे कर्ते सहकारी होऊन राहिले. त्यांनीं आगगाडीचे रस्ते, कालवे, पाटबंधारे आणि खाणींचीं कामें यांच्यायोगानें संस्थानच्या संपत्तींत बरीच मोठी भर घालून, त्याची वसूली चांगली व्यवस्थेशीर बांधून टाकिली. १९०० मध्यें त्यांनीं काम सोडलें. १८९३ मध्यें त्यांनां के. सी. आय. ई ही पदवी ब्रिटिश सरकारनें दिली. १३ सप्टेंबर १९०१ रोजीं शेषाद्री अय्यर स्वर्गवासी झाले. म्हैसूर संस्थानांत यांचें नांव मोठ्या आदरानें उच्चारिलें जातें व यांचें स्मारकहि राजधानींत बांधलें आहे.

**अय्यर, सर तिरुवरुर मुथुस्वामी**(१८३२–१८९५)-मद्रास हायकोर्टांतील एक हिंदु न्यायाधीश. तंजावर नजीक वुचुवाडी गांवीं गरीब आईबापांच्या पोटीं २८ जानेवारी १८३२ रोजीं यांचा जन्म झाला. गरीबीमुळें यांच्या गतभर्तृक मातोश्रीला मुथुस्वामी व दुसरा मुलगा यांसह तिरुवरुर येथें राहणें भाग पडलें. तिरुवरुर येथें मुथुस्वामी तामिळ शिकून, गांवच्या हिशेबनीसाजवळ दरमहा एक रुपयावर नोकरीस राहिला. या सुमारास त्याची आई वारली. कामानिमित्त त्याला तहशीलदार नायकेन साहेब यांच्याकडे जावें लागे. त्यामुळें साहेबांच्या लक्ष्यांत याची अलौकिक हुशारी व मेहनत चटकन भरली. तिरुवरुर येथें एक इंग्रजी शाळा होती तींत मुथुस्वामी थोडीशी इंग्रजी भाषा शिकला. नंतर नायकेननीं त्याला आपल्या पुतण्याचा सहाध्यायी म्हणून मद्रासच्या सर हेन्री मॉंटगॉमेरी शाळेंत पाठविलें. या शाळेंत त्यानें दरवर्षाला बक्षिसें व शिष्यवृत्त्या मिळविण्याचा सपाटा चालविला.इ. स. १८५४ त त्यानें मद्रास इलाख्यांतील विद्यार्थ्यांकरितां शिक्षणमंडळानें सर्वोत्कृष्ट इंग्रजी निबंधाबद्दल ठेविलेलें ५०० रुपयांचें बक्षीस मिळविलें. व त्यामुळें सर अलेक्झांडर अर्बथनॉट व जस्टिस हॉलोवे यांच्या डोळ्यांत तो भरला. इंग्लंडला जाऊन सिव्हिल सर्व्हिसची परिक्षा त्यानें द्यावी म्हणून मदत आली असतांहि त्यानें परदेशगमन करण्याचें नाकारलें, कारण त्याचा ब्राह्मण धर्म व वैवाहिक स्थिति त्याच्या आड आली. तेव्हां तो खालच्या दर्जाच्या सरकारी नोकरींत शिरला; शाळामास्तर, तंजावर येथें दप्तरदार, दुय्यम शाळातपासनीस ( १८५६ ) यांसारख्या अनेक जागांवर त्याला नेमण्यांत आलें. याच वेळीं मद्राससरकारनें वकीलीची परीक्षा घेण्यास सुरुवात केली. पहिल्याच परीक्षेंत मुथुस्वामी पहिला आला व त्यानें सर टी. माधवराव सारख्या पुष्कळ वर्षांच्या जुन्या माणसासहि मागें टाकिलें. नंतर मुथुस्वामी एकामागून एक—याकेबार येथें जिल्हा मुनसफ, तंजावर येथें डेप्युटी कलेक्टर ( १८५९ ), दक्षिण कानडाचे सबजज्ज ( १८६५ ) आणि मद्रासमध्यें पोलीस मॅजिस्ट्रेट ( १८६८ ), अशा हुद्यांवर गेले. शेवटच्या हुद्यांवर असतां त्यांनीं मद्रास विश्वविद्यालयाची वकीलीची ( बी एल्. ची ) परीक्षा दिली. पुढें त्यांनां मद्रासच्या स्माल कॉझेस कोर्टाचे न्यायाधीश नेमण्यांत आलें. या जागेवरून १८७८ मध्यें त्यांनां हायकोर्टांत बेंचमध्यें घेण्यांत आलें. पंधरा वर्षांवर त्यांनीं हायकोर्टाचे न्यायाधीश, व कधीं कधीं मुख्य न्यायाधीश, म्हणून मोठा लौकिक मिळविला. १८७७ त व्हाईसरायांच्या निमंत्रणावरून ते दिल्लीस दरबारला गेले. पुढील वर्षी त्यांनां " सी. आय, ई " चा व १८९३ सालीं " के. सी. आय्. ई " चा मान मिळाला. पण हें ऐश्वर्य भोगण्यास ते फार दिवस जगले नाहींत. १८९५ त एकाएकी त्यांचें देहावसान झालें.

आपल्या अधिकाराचीं कामें करण्यांत सदोदित ते गर्क असल्यानें दुसऱ्या कोणत्याहि उद्योगांत त्यांनां लक्ष घालतां आलें नाहीं. तथापि मद्रास विश्वविद्यालयाच्या कारभारांत ते बराच भाग घेत. या विश्वविद्यालयाचे १८७२ त सरकारनें नेमलेले फेलो व १८७७ त सिंडिक असून, इंग्रजी कायदा, वाङ्मय व तत्वज्ञान यांत ते पारंगत असत. शेवटपर्यंत ते कर्मठ ब्राह्मण राहिले. त्यांचा स्वभाव मनमिळाऊ असे. हिंदुस्थानीय प्राचीन संगीत, वेदाभ्यास व संस्कृत वाङ्मयाच्या इतर शाखा यांची त्यांनां आवड असे.

**अय्यल राजू रामभद्र**—हा नियोगी ब्राह्मण कडापा प्रांतातील वोंटीमिट्टा येथील राहणारा होय. मि. जी. आर. सुब्रह्मण्य पंतुळु ह्यांनीं वोंटीमिट्टा ह्याला अक्षलीनगर म्हटलें आहे. परंतु शिलालेखावरून व प्रतापरुद्रीय ग्रंथावरून असें कळतें कीं, अक्षलीनगर किंवा यक्षीलानगर असें निझाम संस्थानांतील वरंगळ ह्यास म्हणतात; तेव्हां कडापा प्रांतांतील वोंटीमिट्टा हें निझामशाहींतील अक्षलीनगर समजूं नये असें रा. शं. सा. परशा आपल्या तेलगू वाङ्मयांत म्हणतात. ही जागा प्रसिद्ध आहे, कारण कीं, तेलगू भागवताचा कर्ता बोम्मेरा पोतराज याची ही जन्मभूमि होय. रामभद्र हा सुमाडी वरदाचारी याचा शिष्य असल्यामुळें हा वैष्णव होता. हा अक्कय्याचा मुलगा व पर्वतय्याचा नातू होय. यानें लहानपणीं वीरराघवस्वामी नामक

देवालयावर रघुवीरशतक नामक शतक रचिलें. हा विजयानगर येथें कृष्णरायाच्या शेवटील कालांत गेला आणि त्याला रायानें सकलकथासारसंग्रह याचें तेलगूमध्यें कविताबद्ध भाषांतर करण्यास सांगितलें; परंतु हें काव्य पुरें होण्यापूर्वीच कृष्णराया मरण पावला. ह्यामुळें कवीनें त्या काव्याच्या प्रस्तावनेंत नुसता उल्लेख केला आहे कीं, हें काव्य माजी राजाच्या विनंतीवरून लिहिलें आहे. ह्या काव्याचे नऊ भाग केले आहेत. श्रीराम, पुरूरवा इत्यादिकांच्या कुटुंबाची हकीकत लिहिली आहे. या काव्यावरून त्या कवीची मार्मिकता, उत्तम प्रकारची वर्णनशैली वगैरे गुण दिसून येतात. ह्या काव्यांत कित्येक ठिकाणीं थोडेसें व्याकरणविरुद्ध व छंदःशास्त्रविरुद्ध काव्य आढळतें. हें काव्य ह्यानें इ. स. १५३० मध्यें लिहिण्यास सुरवात केली असावी असें वाटतें.

हा फार गरीब असल्यामुळें आणि याला सुमारें बारा अपत्यें असल्याकारणानें हा पिल्लला (मुलें) रामभद्रय्या या नांवानें प्रसिद्ध होता. रामराजूभुषणम् व हा समकालीन असल्याबद्दल कांहीं आख्यायिका प्रसिद्ध आहेत [शं. सा. परशा—तेलगू वाङ्मय].

**अय्याशास्त्री**—रामशास्त्री यांच्या मागून झालेले पुण्याचे न्यायाधीश. सवाईमाधवरावांच्या कारकीर्दींत पुण्यास अय्याशास्त्री प्रसिद्धीस आले. प्रामण्यांचे निवाडे करण्याचें काम त्यांच्याकडे पुष्कळ वेळां सोंपविण्यांत येई. हे द्रविड ब्राह्मण होते. श्रावणमासीं दक्षिणा देण्यसाठीं रमण्याच्या एका दरवाज्यावर हे बसत. ह्या दक्षिणा वांटण्याचा मान फक्त कांहीं थोड्या थोर व्यक्तींनांच मिळे.

**अरख**—ही उत्तर हिंदुस्थानांतील शेतकऱ्यांची जात द्राविड वंशांतील दिसते. १९०१ च्या खानेसुमारींत यांची संख्या ७६,४३६ भरली. यांपैकीं बहुतेकजण संयुक्त प्रांतांत आढळले. १९११ च्या खानेसुमारींत मध्यहिंदुस्थानांत २,५२९ अरख होते. मध्यप्रांत व वऱ्हाडमध्यें १,९९९ व संयुक्त प्रांतांत ८४,५९१ हिंदु अरख आणि ६५ मुसुलमान अरख सांपडले. हे आपल्याला हिंदु असें जरी म्हणवितात तरी त्यांचा धर्म म्हणजे वास्तविक वन्यधर्मांचेंच एक स्वरूप आहे असें म्हणतां येईल. त्यांची कुलदेवता देवी असून तिला ते बोकड बळी देतात व या वेळचा संस्कार हलक्या दर्जाच्या ब्राह्मणाकडून करविला जातो. ते सामान्यतः हिंदुसण पाळतात. कर्वाचौथ या सणाच्या दिवशीं त्यांच्या बायका कर्वा घातलेल्या मातीच्या भांड्यांतील पाणी जमीनीवर ओतून चंद्राची पूजा करितात. मध्यहिंदुस्थानांत ब्राह्मण त्यांच्या घरीं पूजेला जात नाहींत. ते करतल देव नांवाच्या सर्पदेवतेची प्रमुखत्वानें उपासना करितात.

म ध्य प्रां तां ती ल अ र ख.—चांदा जिल्हा व वऱ्हाड यांत हे बरेच आढळतात. हे आपली उत्पत्ति परशुरामास एकदां जळू चावली असतां निघालेल्या रक्तापासून झाली असें म्हणतात व युद्धांत त्याला मदत केली नाहीं म्हणून अथवा त्याच्या पश्चात त्याच्या धनुष्यानें शिकार केली म्हणून शाप दिल्यामुळें याच्यांत दोन भेद झाले असें म्हणतात. एका पोटभेदाचें नांव पासी व दुसऱ्याचें अरख असें पडलें. हे लोक पक्षी धरतात आणि शिकारहि करतात. हे हिंदु पद्धतीनें लग्नें करीत नाहींत. हे डुकरें पाळतात. मद्यमांस यथेच्छ खातात, पण चांभारास शिवत नाहींत. चांद्यांतील अरख गोंडांचे अगदीं जवळचे भाईबंद दिसतात. ते सगोत्रविवाह करीत नाहींत. हे कुलाचाराप्रमाणें ३, ४, ५, ६, ७, ८, आणि १२ देवतांची पूजा करितात आणि समान संख्येच्या देवांची पूजा करणारीं घराणीं परस्पर विवाहसंबंध करीत नाहींत. यांस माटिया, तेखाम, तेसली, गोदाम, मडई, सयाम अशीं आडनांवें देवांच्या संख्येवरून पडलीं आहेत. हे लोक गोंड आणि पासी यांच्या संबंधापासून झालेले असावे असें रसेल व हिरालाल आपल्या ग्रंथांत म्हणतात. यांच्या सामाजिक चालीरीती कनिष्ठ हिंदुजातीप्रमाणें आहेत. लग्नें मातृतीच्या देवळासमोर अगर आदल्या वर्षी होळी जाळली असेल त्या जागेवर होतात. मुलीचें शुल्क २५ ते ४० रुपये असतें. विधवेच्या विवाहांत वर तिच्या घरीं जातो. तेथें वधूवरांस स्नान घालतात. त्यांस पाटावर बसवितात आणि जवळ कपाशीचें झाड लावितात. नवरा ५ दोऱ्यांचें पोतीचें मंगळसूत्र वधूच्या गळ्यांत बांधतो. मृताचें अशौच १ दिवस पाळतात. [सेन्सस रिपोर्ट; रसेल आणि हिरालाल—कास्ट अँड ट्राइब्स इन सी. पी. ए. रि. ए.]

**अरग**—(म्हैसूर संस्थान) शिमोगा जिल्ह्याच्या तीर्थहल्ली तालुक्यांतील (इ. स. १९०१) ५७६ लोकवस्तीचें एक खेडें. हा गांव पूर्वी मले-राज्याचा (डोंगरी राज्य) राजधानीचा गांव होता. चालुक्यांचा अंमल असतां हुमचाचे सांतर राजे या भागावर राज्य करीत होते. चौदाव्या शतकांत व नंतर विजयानगरच्या अमदानींत या राज्यांत तीन शहरें व १८ परगणे होते. इ. स. १७६३ सालीं हैदरानें घालवून देईपर्यंत केलदी राजे येथें राज्य करीत होते.

**अरंग**—(मध्यप्रांत.) रायपुर जिल्हा. रायपुर तहशिलींत हा गांव रायपुर गांवापासून २२ मैलांवर आहे. २१° १२' उत्तर अक्षांश व ८१° ५९' पूर्व रेखांश. लोकसंख्या सुमारें सात हजार. गांवाभोंवतीं तळीं व आंबराया पुष्कळ असून आसपास जुनाट देवळें पुष्कळ आहेत. पुष्कळ यात्रेकरू जगन्नाथपुरीची यात्रा करावयास निघाले असतां येथील बागेश्वराचें दर्शन घेतात. येथें थोडा फार व्यापारहि चालतो.

**अरणीसुत**—शुकाचार्यांचें हें नामांतर आहे. हें नांव पडण्याचें कारण महाभारत शांतिपर्व अध्याय ३२४ येथें असें सांगितलें आहे कीं, एकदां व्यास अग्नि उत्पन्न करण्यासाठीं दोन मिथुनस्वरूपी अरणी एकमेकांवर घांशीत असतां घृताची नांवाची अप्सरा त्या ठिकाणीं आली. तिला पाहतांच व्यास कामविव्हल झाले; तेव्हां घृताची मैनेचें रूप घेऊन

त्यांसमीप आली. तथापि व्यासांचा कामविकार शांत होईना. त्यांनीं तो दाबण्याचा पुष्कळ प्रयत्न केला पण व्यर्थ. शेवटीं नकळत अरणीवर त्यांचें रेतस्खलन झालें व त्यांपासून शुकाचार्यांचा जन्म झाला. म्हणून त्यांनां अरणीसुत असें नांव आहे.

**अरदोइ**—काठेवाडांतील एक खेडें. लोकसंख्या (१८८१) १११२. कोनासांगानी जहागिरीचा मूळपुरुष सांगोजी याला हें १६५४–५५ त गोंडल कडून जहागीर मिळालें. या पूर्वी तें गोंडलराजाच्या राजधानीचें ठिकाण होतें, पुढें गोंडल राजधानी झाली. येथील जमीन चांगली आहे. हें खेडें राजकोट–गोंडलरस्त्याच्या पूर्वेस २ मैलांवर आहे.

**अरलाइ**—धरमपूरच्या (मुं. इ.सुरत) दक्षिणेस सुमारें ९ मैलांवरील ठिकाण. येथें गरम पाण्याचा झरा असून चैत्र पौर्णिमेला जत्रा भरते.

**अरंतांगी**—(मद्रास इलाखा). तंजावर जिल्हा. पत्तुकोट्टई तालुक्यांतील एक गांव. साउथ इंडियन रेल्वेवर असून डिस्ट्रिक्ट बोर्ड रेल्वे या गांवांपर्यंत आली आहे. इ.स.१९०१ मध्यें लोक सं.२९२६होती. येथें दरवर्षी अजमासें ३४·२६' पाऊस पडतो. येथें प्रवाश्यांकरितां डिस्ट्रिक्ट बोर्डानें बांधलेलें एक छत्र आहे. उत्तम प्रकारचें भात, तंबाखू, भुइमुगाच्या शेंगा हीं मुख्य पिकें असून, सुती, रेशमी, व जरतारी कापड तयार होतें. रंगविण्याचें कामहि मोठ्या प्रमाणांत चालतें.

आसपास लॅटेराइट नांवाचा दगड पुष्कळ सांपडतो. त्याचा इमारतीकामाकरितां उपयोग करतात. पंधराव्या शतकांत पांड्य राजांचा सेनापति रामनदचा राजा यानें तंजावरच्या राजापासून हा गांव जिंकून घेतला व पांड्य राज्यास जोडला. सतराव्या शतकांत हा गांव तंजावरकडे होता परंतु इ. स. १६४६ सालीं पुन्हां रामनदचा राजा रघुनाथ तेवन यानें जिंकून घेतला. परंतु झालेल्या तहान्वयें पुन्हां हा गांव तंजावरकडे गेला. यानंतर इ. स. १६९८ सालीं जी लढाई झाली तींत रामनदनें पुन्हां हा गांव जिंकला. याप्रमाणें कधीं तंजावरकडे व कधीं रामनदकडे हा गांव असे. अखेरीस इ. स. १७४९ पासून तंजावरकडे हा गांव आहे. येथील किल्ल्यांत व शिवाच्या देवळांत प्राचीन शिलालेख आहेत.

**अरपल्ली**—हा जिल्हा चांद्यांतील मूलतहसीलींत एक परगणा आहे. तो मूलच्या आग्नेय दिशेला असून त्याचें क्षेत्रफळ ४४० चौरस मैल आहे. हा पहाडी परगणा असून याच्यांत अनेक नदीनाले आहेत व जंगल पुष्कळ आहे. यांत ८१ गांवें आहेत. पैकीं घोट हें मुख्य गांव आहे. या गांवांत उंसाची लागवड फार होते. वैनगंगेच्या व प्रणीतेच्या कांठावर जीं गांवें आहेत तीं मात्र चांगलीं आहेत. बाकीचीं सर्व गांवें जंगल तोडून वसविलेलीं खेडीं असून त्यांत मारिया लोक शेतकरी आहेत.

**अरबस्तान**—हें द्वीपकल्प आशियाखंडाच्या नैर्ऋत्येस असून पश्चिमेस तांबडा समुद्र, दक्षिणेस एडनचें आखात आणि हिंदीमहासागर, पूर्वेस ओमनचें आखात आणि इराणचें आखात हीं आहेत.

पोर्टसय्यदपासून एडनपर्यंतच्या पश्चिम बाजूची लांबी १५०० मैल आहे; बाबेल माण्डेबच्या सामुद्रधुनीपासून रासेलहद्द पर्यंतचें लांबी १३०० मैल असून उत्तरबाजू पोर्टसय्यदपासून युफ्रेटीस नदीपर्यंत ६०० मैल आहे. क्षेत्रफळ सरासरी १२,००,००० चौरस मैल आहे.

**भू व र्ण न.**—अरबस्तान हा एक उंचवट्याचा प्रदेश आहे. तो नैर्ऋत्यदिशेच्या बाजूला अतिशय उंच असून ईशान्य दिशेकडे सखल होत गेला आहे. या देशांत मोठमोठे पर्वत नसल्यामुळें बाष्पपूर्ण वाऱ्यांनां अडथळा होत नाहीं. त्यामुळें बहुतेक पाऊस पडत नाहीं; अर्थात सरोवरें व नद्या नाहींत. ज्या कांहीं नद्या म्हणून गणल्या जातात त्या पुष्कळ पाऊस पडला तरच नदी या संज्ञेस पात्र होतात.

**वि भा गः**— साधारणतः अरबस्तानचे उत्तर, मध्य, व दक्षिण असे तीन भाग केले जातात. पहिला भाग बहुतेक वाळवंटानें व्यापिला आहे. येथील लोकवस्ती बहुतेक मेंढपाळांची असून ते सारखे हिंडत असतात. मध्यभागांत अर्धी जमीन शेतकीला योग्य असून ह्याच ठिकाणीं कांहीं वस्ती करून राहिलेले लोक दिसतात.

दक्षिण भाग मात्र चांगला सुपीक आहे. ह्या ठिकाणीं पाऊस पुरेसा पडून शेती उत्तम होते. या ठिकाणीं घरंदाज लोक राहतात, व बरीच भरभराटींत असलेलीं खेडीं दिसतात. परंतु ही स्थिति फक्त किनाऱ्यावर दिसून येते. अंतर्देश वाळवंटानें व्याप्त आहे. ह्या देशाच्या बहुतेक सर्व उत्तर भागाचा शोध लागलेला आहे. परंतु दक्षिणेकडील भागाचा शोध लावणें तेथील वाळवंटाच्या योगानें अतिशय कठिण काम असल्यामुळें समुद्र किनाऱ्यापासून १०० मैल आंत कोणीहि प्रवासी गेलेला नाहीं. त्यांतील विस्तीर्ण वाळवंटास डाह्ना असें नांव आहे.

**ह वा मा न.**—सामान्येंकरून अरबस्तान हा प्रदेश सर्व जगांत उष्ण म्हणून प्रसिद्ध आहे. ह्याचें प्रत्यंतर इराणचें आखात आणि तांबड्यासमुद्राकडील दक्षिण भाग येथें येतें. उत्तर आणि मध्यभाग दिवसा अतिशय उष्ण असून रात्रीं लवकर थंड होतो. दक्षिण प्रांत त्या मानानें थंड आहे.

**प्राणीः**—हरिण, ससे, रानटी बकरे, चित्ते, लांडगे इत्यादि प्राणी बऱ्याच अंशीं सांपडतात. पाळीव जनावरें म्हणजे उंट आणि घोडा हीं होत. अरब लोकांनां उंटाचा उपयोग फार होतो.

**वृ क्ष, व न स्प ती व पि कें.**—अरबस्तानांतील वृक्षवनस्पतींकडे पाहतां त्यांची जात दक्षिण आशियांतील नसून आफ्रिकन असावीसें वाटतें. उंचावर असणाऱ्या भागांतून अंजीर चिंच, या जातींचीं झाडें फार आढळतात. असुरच्या प्रद-

शांत बरेंच मोठें अरण्य आहे. द्राक्षें, अप्रिकॉट, पीच, सफरचंद, अंजीर, केळीं हीं फळें उंच डोंगराळ प्रदेशांत, व खजूर सखल प्रदेशांत पिकतो. मेदीना येथें शंभर प्रकारचा खजूर तयार होतो असें ह्मणतात.कांकड्या वगैरे पुष्कळ पिकतात. पिकांमध्यें विशेष पीक कॉफीचें आहे. ही इ. स. ६ व्या शतकांत ॲबिसिनियांतून येथें आली असें सांगतात.

दळणवळण.—१९०८ पर्यंत अरबस्तानांत रेल्वेमार्ग मुळींच नव्हते. पूर्वी मोठमोठ्या सडका निरनिराळ्या शहरांतून मक्केकडे येत असत. प्रत्येक सडकेवर कांहीं कांहीं अंतरानें विहिरी व धर्मशाळा वगैरे बांधलेल्या असत. १९०८ नंतर दमास्कस पासून मक्केकडे जाणारी एक रेल्वे मदिना पर्यंत तयार करण्यांत आली. हल्लीं तांबड्यासमुद्राला फार महत्त्व प्राप्त झालें आहे. इराणचें आखात व तांबडा समुद्र यांवरील बहुतेक बंदरांचा संबंध हिंदुस्थानशीं आला आहे. १९२० पर्यंत हेजाझ रेल्वे लाईन खेरीज अरबस्तानांत दुसऱ्या कोठेंहि रेल्वे नव्हती. हीच लाईन मादिना ते मक्कापर्यंत व माआन ते आकाबापर्यंत वाढविण्याचा विचार अलीकडे चालू आहे. १९१८–१९ मध्यें एडनपासून लाहेजच्या बाजूला सुमारें पंचवीस मैलांचा लष्करी रेल्वेचा फांटा तयार करण्यांत आला असून तो लष्करी काम नसेल तेव्हां इतर वाहतुकीलाहि लावतात. होदीदा ते सानाया १७३ मैल रस्त्याखेरीज इतर सडका नाहींत. जुने कारवानांचे रस्तेच अद्याप प्रचारांत असून गेल्या युद्धकाळांत यांचीच दुरुस्ती करून मोटारीरस्ते बनविण्यांत आले होते. तारायंत्राचे फांटे जेद्दा—मक्का; जेद्दा—राबुघमेदिना, होदीदा–साना, होदीदा–मोका–शेखसय्यद; होदीदा–लोहीआ–मिदी; व मोकातय्यझ–येरिम–साना हे आहेत.

पाहणी व मर्यादा निश्चय.—या द्वीपकल्पाची उत्तर सरहद्द, तसेंच अन्तर्भागांतील अनेक स्वतंत्र संस्थानें यांच्या हद्दी अद्याप निश्चित झालेल्या नाहींत. १९२० च्या फ्रँको-ब्रिटिश कन्व्हेन्शननें सीरिया, पॅलेस्टाईन व मेसापोटेमिया या बाजूच्या सीमा मात्र ठरल्या गेल्या आहेत. १९१४ पर्यंत अरबस्तानबद्दलची माहिती अगदींच त्रोटक होती, तेव्हांपासून अलीकडे प्रवाशांनीं लावलेल्या शोधांमुळें व युद्धानिमित्त झालेल्या हालचालींमुळें बरीच माहिती उपलब्ध झाली आहे. त्यावरोबरच अरबस्तानचा सविस्तर नकाशा तयार करण्याचें काम चालू असून देशाच्या उत्तरार्धाचा नकाशा प्रसिद्धहि झाला आहे. उपर्युक्त प्रवाशी संशोधकांमध्यें फिल्बी, शेक्सपीयर व बेल हे प्रमुख आहेत. फिल्बीनें इराणी आखातावरील ओक्वार बंदरापासून निघून मध्य अरबस्तान सर्व ओलांडून थेट तांबड्यासमुद्रावरील जेद्दा बंदरापर्यंत प्रवास पुरा केला. त्यानें दुसरी सफर नेज्दच्या राज्यांतून केली व रियाध व डाम या दोन शहरांमधील मुलुखाची पाहाणी केली. १९१३–१४ मध्यें मिस गर्टरूड लोथियन बेल हिनें फक्त देश्य वाटाडे बरोबर घेऊन एकटीनें प्रवास केला. दमास्कसपासून निघून ती टीमापर्यंत गेली, नंतर पूर्वेकडे वळून हेलला जाऊन नंतर लोका व नेजेफवरून बगदादला पोहोंचली व तिनें या अज्ञात भागाची बरीच माहिती मिळवून दिली. जागतिक युद्धापूर्वी हेजाझ रेल्वे लाईनवरील सर्व स्टेशनांचीं नांवेंसुद्धां प्रसिद्ध नव्हतीं; पण त्या युद्धांत तुर्कांविरुद्ध चढाई करून जातांना हेजाझ, तसेंच असिर व येमेन या प्रांतांची माहिती मिळाली. तसेंच युद्धकाळीं तांबड्यासमुद्रावर पहारा करणाऱ्या ब्रिटिश बोटींनीं अकाबपासून एडनपर्यंतच्या सर्व अरबी किनाऱ्यांची बारकाईनें पाहणी करून त्याचे नकाशे तयार केले आहेत.

उद्योगधंदे—येथील लोकांचा मुख्य धंदा उंटांची पैदास करणें हा होय. उंटांच्या व्यापाराचीं मुख्य ठिकाणें दमास्कस व बगदाद हीं होत. तेथील सर्व लोकांजवळ मिळून उंटांची संख्या साधारणपणें ७ लक्ष २० हजार असते असें म्हणतात. घोड्यांची पैदास हा दुसरा धंदा असून येथून घोडे मेसापोटेमियांत व सीरियांत जातात. पांढऱ्या रंगाच्या व मोठ्या हाडपेराच्या गाढवाची पैदासहि करतात व तीं ईजिप्तला पाठवितात. येथें मोत्यांचा व मासे पकडण्याचा धंदा मोठ्या प्रमाणांत चालतो. बहुतेक बंदरीगांवांत मासे खारवण्याचा उद्योग पुष्कळ लोक करतात. कामाराननजीक बऱ्याच मिठाच्या खाणी चालू होत्या; पण १९२० पासून त्या बंद पडल्या आहेत.

व्यापार—आरबस्तानांतून बाहेर जाणारा माल म्हणजे मोतीं, खजूर, काफी व कातडीं; यांशिवाय दुसरा कांहींच नाहीं. आयात मालः—कापड, तांदूळ, कणिक, साखर, चहा व इतर खाद्यपदार्थ हा होय. एडन शिवाय करून मस्कत, मानामा व कुवैत हींच कायतीं व्यापाराचीं मुख्य ठिकाणें होत. यांपैकीं पहिल्यांचा व्यापार यूरोपबरोबर व बाकीच्यांचा हिंदुस्थान व इतर प्राच्य देशांबरोबर चालतो. जेद्दा येथें मोठा व्यापार फक्त यात्रांच्या वेळीं होतो. याशिवाय होदीदा, जीझन मोका व माकाला हीं व्यापारी बंदरें आहेत. अरबस्तानांतील व्यापारी वर्गांत मुख्य भरणा हिंदी लोकांचा व त्यांच्या खालोखाल इटालियन लोकांचा आहे. अन्तर्भागांत मुख्य व्यापाराचीं ठिकाणें टीमा व खैबर ( हेजाझ ), मुहैल व खमिस मुशीत ( असुर ); साना ( येमेन ); लाहेज (एडन); रोस्तक व निझ्दा ( ओमन ); रियाध बोरीडा व हेल ( मध्य अरबस्तान ) आणि होफूफ ( एलहासा ) हीं असून येथें धान्य व बाहेरून आलेला तयार माल यांची देवघेव मुख्यतः चालते.

अरब लोक.—सेमिटिक महावंशाची जी शाखा, प्राचीन ऐतिहासिक कालापासून अरबस्तानच्या द्वीपकल्पांत रहात आहे, तिला अरब असें नांव आहे. हल्लीं अरब लोक अरबस्तानाशिवाय मेसापोटेमिया, तांबड्यासमुद्राचा पश्चिम किनारा, इराणच्या आखाताचा पूर्व किनारा व उत्तर आफ्रिका

या ठिकाणीं राहतात. खरे अरब लोक हे अरबस्तानचे मूळचे रहिवासी होते.

अरब लोकांचे चेहरे लांबट, डोळे काळेभोर व खोलगट, नाक लांब व कपाळ सरळ पण फारसें उंच नसतें, अरबलोक शरीरानें सडपातळ परंतु पीळदार असून त्यांची रहाणी स्वच्छ असते. ते ह्यातारपणींसुद्धां निरोगी असतात. शारीरिक बाबतींत जगांतील लोकांमध्यें यांचा अनुक्रमांक बराच वर लागेल व बौद्धिकदृष्टयाहि ते कमी आहेत असें नाहीं. कोणतेंहि काम एकजुटीनें करण्याला ते नालायक आहेत म्हणून त्यांची सुधारणा होत नाहीं. ते सुस्वभावी, सभ्य व शूर परंतु दुष्ट खुनशी, अविश्वासी व वेडगळ समजुतींचे आहेत 'आपला जीव सुद्धां धोक्यांत घालून जेव्हां अरब मनुष्य आपल्या पाहुण्यांचे रक्षण करितो व मोठ्या समाधानवृत्तीनें निराशा, संकटें आणि नशीबाचे फेरे सहन करितो, त्यावेळींच त्याचा खरा मर्दानी स्वभाव दृष्टोत्पत्तीस येतो. दया व कृतज्ञता या गुणांमुळें तो तुर्क मनुष्याहून निराळा वाटतो. तुर्क हा जात्या निष्ठुर असतो; पण अरब पहावा तर जास्त दयाळु अंतःकरणाचा, गरीबांनां मदत करणारा व शत्रूचे सुद्धां उपकार न विसरणारा असा असतो' असें बर्कहार्ट लिहितो ( ट्रॅव्हल्स इन अरेबिया, लंडन १८२९ ).

गहूं, भाजीपाला, खारका व फळें हें त्यांचें मुख्य खाद्य असून श्रीमंत लोकांत मांसाहारहि करतात, हे लोणी फार खातात व कॉफी पिण्याची चाल या लोकांत फार आहे.

अरब लोकांत गुलामगिरीची चाल आहे. गुरें राखणें. अथवा घरगुती कामें करणें याकडे गुलामांचा उपयोग केला जातो. आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील प्रदेशांतून गुलामांचा पुरवठा होत असे; परंतु १९ व्या शतकाच्या शेवटीं हा ओघ थांबविण्यांत आला. गुलामानें महंमदीधर्माची दीक्षा घेतल्यानंतर सात वर्षांनीं त्याला गुलामगिरींतून मुक्त करण्याची चाल अरब लोकांत आहे.

अरब लोक उत्तम शिपाई आहेत; परंतु त्यांच्यामध्यें सेनानायकाच्या कामाला लायक माणसें फार थोडीं असतात. धैर्य, नातलगांचा वियोग सहन करण्याची संवय व मरणाविषयीं बेफिकिरी हे गुण अरब सैनिकांत आढळतात. तुर्क लोकांपेक्षां अरब लोक अधिक दयार्द्र अंतःकरणाचे असतात. ते आपलें वचन कधींहि मोडीत नाहींत; त्यांचा स्वभाव शांत असतो.

अरब लोक आदरातिथ्य करण्याबद्दल प्रख्यात आहेत. ( 'आतिथ्य' पहा ).

अरब स्त्रिया पुरुषांप्रमाणेंच शूर असतात; अरब इतिहासांत अरब स्त्रियांच्या अधिपत्याखालीं झालेल्या पुष्कळ लढायांचा उल्लेख आहे.

अरब लोकांत शिक्षणाचा फार थोडा प्रसार झाला आहे. वडील मंडळींच्या सहवासांत बराच काल घालवावा लागतो म्हणून अरबमुलांचें धैर्य, आचार वगैरे बाबतींत शिक्षण घरींच होतें.

अरबांत मुख्य जाती दोन आहेत. अरब आणि बेदुइन. पैकीं पहिली शेतकरी आहे आणि दुसरी मेंढपाळ आहे. येमेन, हाद्रामत आणि ओमन या प्रदेशांत अरब लोकांची वस्ती आहे व हेजाझ, नेज्द, एलहास, सीरियाचें वाळवंट आणि मेसापोटेमिया ह्या प्रांतांत बेदुइन लोक राहतात. या लोकांची समाजव्यवस्था जातिविशिष्ट असते. प्रत्येक जातींतील मुख्य मनुष्याला शेख असें म्हणतात. त्याच्याकडेच सर्व वादग्रस्त प्रश्न येतात व त्याच्या निर्णयाप्रमाणें सर्व कामें चालतात.

वरील दोन जातींशिवाय हेजाझ आणि दक्षिण अरबस्तान ह्या प्रांतांत शरीफ अथवा सय्यद ह्या नांवाची एक जात आहे. हे आपणांस महंमदाचे वंशज म्हणवितात. या वर्गाची धर्माकडे जास्त प्रवृत्ति दिसून येते. याखेरीज मजूरवर्ग, गुलाम वगैरे भेद आहेत. दक्षिण अरबस्तानांत सिद्दी लोकांचा भरणा फार आहे.

वि वा ह.—अरब लोकांच्या कांहीं जातींत लग्नरीति, अगदीं साधी असते; व कांहीं जातींत ती अतिशय डामडौलाची असते. बेदुइन जातीचा फिरस्ता अरब एका वकऱ्याचा गळा कापून त्याचें रक्त आपल्या भावी सासऱ्याच्या तंबूपुढील वाळवंटावर शिंपडतो, आणि बिनपडद्याच्या बेदुइन बेगमेशीं राजरोस शादी करितो. मक्केंतील नगरवासी अरब असतात ते मात्र लग्नाच्या बाबतींत मुसुलमानी रिवाजाप्रमाणें सोहळ्यांचा अतिरेक करितात! आणि हिरवी पगडी घालणाऱ्या व सर्व मुसुलमानी आचार तंतोतंत पाळणाऱ्या शेखांच्या पडदानशीन बेगमांशीं शादी करितात.

लग्नासाठीं वधूवें प्रस्थानः—अरब वधूवरें बहुतकरून एकमेकांपासून लांब राहाणारीं असतात नवऱ्याला नवरीच्या गांवीं जावें लागत नाहीं. आपल्याला माळ घालण्यासाठीं गृहलक्ष्मी जितक्या लांबच्या पल्ल्यावरून आपल्या घरीं चालत येईल तितकें अरब गृहस्थ आपलें भाग्य अधिक समजतो. नगरवासी अरब आपलीं मुलें लहान असतांच त्यांनां दूर अंतरावर बेदुइन अरबांच्या तंबूंत राहण्यासाठीं पाठवितात. कारण तेथें तीं बेदुइन मुलांसंगतीं लहानाचीं मोठीं होऊन शरीरानें त्यांच्याप्रमाणेंच काटक निपजावींत, अशी नागरिक मातापितरांची इच्छा असते.तेथें तो मुलगा चांगला वयांत येईपर्यंत राहतो. पुढें तो आपल्या घरीं परत आल्यावर त्याला स्वतःला व त्याच्या आप्तांनांहि त्यानें लग्न करावें असें वाटतें. त्याचें मन पूर्वपरिचित बेदुइन कुमारिकेवर बहुधा जडलेलें असतें तेव्हां बायको करीन तर तीच करीन अशी

त्यानें गांठ बांधून ठेवलेली असते. त्याच्या नागरिक मातापितरांनांहि सशक्त अशा बेदुइन कुमारिकेशीं आपल्या मुलाचा शरीरसंबंध होणें फार हितावह आणि चांगलें वाटतें. सबब ते बहुतकरून आपल्या मुलाचा कल पाहून त्याच्या आवडत्या बेदुइन बेगमेलाच लग्नाचें मागणें घालितात. मुलीकडे तिजबद्दलची मागणी जाण्याचा अवकाश कीं लागलीच ती मुलगी मोठ्या डौलानें आपल्या वरातीच्या उंटावर बसून नवरी होऊनच येते!

वधूप्रस्थानाच्या मिरवणुकीचें वर्णनः—उंटाच्या पाठीवर एक डोली चढविलेली असते, व तिच्यावरून एक बुरखा घातलेला असतो. बुरख्याचें कापड रेशमी असून त्यावर कलाबतूनें कशीदा काढलेला असतो. मधून मधून सोनेरी जरीनें कुराणांतील वाक्यें काढलेलीं असतात. कशियांत लहान लहान भिंगें अथवा टिकल्या बसविलेल्या असतात. तसेंच बुरख्याला ठिकठिकाणीं गोंडे लाविलेले असतात. उंटाच्या नाकावर शहामृगाच्या पिसांचा एक ऐटदार तुरा लाविलेला असतो. त्याची वांकडी आणि लांबलचक मान मेंदीनें लालभडक रंगविलेली असते; आणि त्याच्या चोहोंबाजूस लहान लहान आरशा लाविलेल्या असतात, त्या सूर्य किरणांनीं सारख्या चमकत असतात. त्यांच्या गर्दीमध्यें उंटाचे डोळे अगदींच फिके पडून ते केवळ अपारदर्शक स्फटिकांसारखे दिसतात! त्या प्राण्याच्या ओबडधोबड शरीरावरून पायांपर्यंत लोंबणारी एक फुलकरीची झूल घातलेली असते. डोलीमध्यें नवरीसमागमें तिची एखादी मैत्रीण असते. रस्त्यानें नवरीला सांभाळून नेण्याकरितां तिच्या बरोबर कांहीं पुरुषमाणसें दिलेलीं असतात. तीं नवरीच्या मागें पुढें साध्या झुली घातलेल्या उंटावर बसून मार्ग क्रमीत असतात. त्यांच्या उंटांवर नवरीला आंदण दिलेल्या वस्तू—वस्त्रें, पात्रें, रोकड रकम, वगैरे—लादलेल्या असतात ह्या वधूप्रस्थानाच्या मिरवणुकीमागें उष्ट्रारूढ होऊन कांहीं नगारजी चाललेले असतात. ते आपले नगारे रस्त्यानें सारखे बडवीत जातात. नगारे म्हटले तर फारसे मोठे नसतात, परंतु त्यांचा आवाज मात्र कानठळी बसविण्याइतका कर्कश असतो!

लग्न आणि स्नानसोहळ्याची मिरवणूकः—ह्याप्रमाणें वधू आपल्या गांवाहून मिरवत मिरवत वराच्या गांवीं आल्यावर तिचें तिच्या सवंगड्यावरोबर मुसुलमानी रिवाजाप्रमाणें लग्न होतें. लग्नानंतर नवरा स्नानसोहळ्यासाठीं वाजत गाजत स्नानागाराकडे जात असतो. त्यावेळच्या मिरवणुकीपुढें एक दोन पोरें अगदीं जुन्या पद्धतीचीं डफडीं वाजवीत आणि त्यांच्या तालावर नाचत चालतात. त्यांच्या मागून कित्येक मंडळी बंदुका उडवीत जातात, आणि शेवटीं इष्टमित्रांच्या समुदायाबरोबर नवरा मिरवत जातो.

बहुपत्नीकत्व, पत्नीत्याग वगैरेः—अरबांनां अनेक स्त्रिया करण्याला परवानगी आहे. परंतु श्रीमान् लोकांवेरीज फार करून बहुपत्नीक नसतात. जे पुष्कळ बायका करितात, ते लोकचर्चेला पात्र होतात. वास्तविक पाहतां जरी बहुपत्नीकत्वाची चाल पडली आहे, तरी अरब लोक ती प्रशस्त न मानितां उलटी त्रासदायक समजतात. बायकोचा त्याग करितां येतो; परंतु तो क्षुल्लक बाबतींवरून कोणीहि करीत नाहीं. विवाहित स्त्रीपुरुषांचे सर्व हक्क कुराणांत सांगितल्याप्रमाणें पाळण्यांत येतात.

अरब अबलांचें प्राबल्य, आणि अरबी समाजांतील नीतीचें मानः—अरब लोकांत स्त्रियांचें प्राबल्य विशेष असतें. पुष्कळ प्रसंगीं त्या आपल्या इच्छेनुरूप नवरे पसंत करून त्यांच्याशीं लग्नानंतर अनेक प्रकारच्या व्यक्तिस्वातंत्र्याचा खुशाल उपभोग घेतात. नागरिक,अथवा तंबूतून राहणारीं ग्राम्य वधूवरें एकमेकांशीं शुद्धाचरणानें वागण्याबद्दल लग्नामध्यें उघडपणें वचन देतात. परंतु पुढें उभयतांकडूनहि तीं वचनें 'पुराणांतील वांगीं पुराणांत' ह्या न्यायानेंच पाळलीं जातात! आपलें वचन कडकडीत रीतीनें पाळण्याविषयीं आपण खरोखरी बांधिले गेलों आहों, अथवा आपली बायको तरी बांधली गेली आहे, असें अरब गृहस्थ मुळींच समजत नाहीं! उलट जर कोणी पुरुष आपल्या बायकोच्या अनीतीबद्दल चिडीस जाऊन तिचा सूड घेण्यास प्रवृत्त झाला, तर तो लोकांत निंदेला व तिरस्काराला पात्र होतो! सबब अरब लोक आपल्या बायकांच्या अनीतीचा बंदोबस्त करण्याच्या भानगडींतच पडत नाहींत. त्यांनां त्या बाबींकडे कानाडोळा करणें भाग असतें. कारण, स्त्रियांप्रमाणें त्यांची स्वतःची नीतिमत्ताहि बेतावाताचीच असते। (अलोनी—लग्नविधि सोहळे).

अ र ब लो कां चा ध र्म.—अरबस्तानांतले लोक मुसुलमान धर्माचे आहेत असा साधारण समज आहे. पण इश्मेल (इस्माएल) च्या मूळ रहिवाश्यांच्या ज्या जाती आहेत त्यांमध्यें मुसुलमानी महिने व त्यांचा पवित्रपणा मानला जात नाहीं. अरबस्तानांतील 'बडावी' नांवाचे जे लोक आहेत ते मक्केस जाणाऱ्या मुसुलमान यात्रेकरूंचे सर्वांत मोठे शत्रू आहेत. ते खुद्द तुर्की सुलतानापासून करभार घेण्यास कमी करीत नाहींत. ते मुसुलमानी धर्म मानीत नाहींत इतकेंच नाहीं तर त्यांच्यांत दुसरा एखादा जुना धर्म-मूर्तिपूजेचा एखादा प्रकार-असावा असें दिसतें. यावरून मुसुलमानी धर्माचा पवित्र प्रांत जो मक्का व सर्व अरबस्तान येथील खरे मालक जे 'बडावी' ते मुळींच मुसुलमान नाहींत उलट त्या धर्माचे शत्रू आहेत असें उघड होतें (इं. अँ. पु. १५ पा. ३१२-३१६).

हिं दु स्था नां ती ल अ र ब—प्राचीन काळापासून हिंदु व अरब लोक यांचा संबंध येत गेला आहे. हा संबंध विशेषतः व्यापारार्थ असे. खलीफ उमरच्या वेळेस (इ. स. ६३७) अरबांची एक टोळी ठाणें येथें आली होती. पुढें समुद्र मार्गानें महलब नांवाचा सरदार इ. स. ६६४ त मुलतानपर्यंत येऊन

गेला. यानंतर ७११ मधील महंमद कासीमची सिंध प्रांतावरील स्वारी होय. त्यानें सिंधमधील देवलबंदर काबीज करून दाहिर राजावर स्वारी केली; दाहिर रणांत गारद होऊन त्याचें राज्य अरबांचें मांडलिक बनलें. कासीमबरोबर आलेल्या अरबांनीं मुलतान वगैरे ठिकाणीं आपल्या वसाहती स्थापिल्या. त्यांचा व हिंदूंचा स्नेहभाव जमला. तथापि कुरेष जातीच्या अरबांनीं सिंधमधील हिंदूंच्या इमारती, देवळें वगैरे उध्वस्त करून त्यांचें सामान आपल्या नवीन इमारतींस लाविलें.

अलप्तगिनानें गझनी येथें स्थापिलेल्या स्वतंत्र राज्याची पूर्व सरहद्द पंजाव प्रांतास लागून होती. त्यामुळें पंजावचा जयपाळ व अलप्तगीन यांच्यांत वितुष्ट उत्पन्न झालें. नंतर गझनीच्या गादीवर सवक्तगीन आला त्यावेळीं रजपुत राजसंघानें त्याच्या हद्दींत शिरून लढाई दिली. पण सवक्तगिनाचा मुलगा प्रख्यात महंमद यानें रजपुतांचा पराभव केला. महंमदानें मुलतान पद धारण केलें तेव्हां हिंदुस्थानच्या सरहद्दीवरच तुर्की बादशाही स्थापन झाल्यासारखें झालें. महंमदाच्या हिंदुस्थानावरील स्वाऱ्या प्रख्यात आहेतच. त्यावेळेपासून आजतागाईत अव्याहत अरबांचा निकट संबंध येत गेला; तो इतिहासांत नमूद आहेच.

मराठे शाहींतील अरबः—मुसुलमानांशिवाय अरब व हिंदुस्थानी म्हणजे परदेशी पुरभय्ये वगैरे लोकांचा भरणा मराठी पायदळांत विशेष असे. सरदार लोक किंवा श्रीमंत सावकारहि शरीरसंरक्षणार्थ किंवा खजिना वगैरे संभळण्यास शिपाई ठेवावयाचे ते अरब किंवा परदेशीच ठेवित. हे परके शिपाई आपला मुलूख व घरदार सोडून दूरदेशीं नोकरीच्या मागें आल्यामुळें व त्यांचे ऋणानुबंध इकडे नसल्यामुळें अष्टौप्रहर नोकरीशिवाय त्यांनां दुसरें व्यवधानच नसे. परदेशी शिपाई नोकरीस ठेवण्याची मराठ्यांची ही चाल पुढें पुढें इतकी बळावली कीं, थोरामोठ्यांच्या खास नोकरींत मराठे शिपाई दिसेनासे झाले. प्रत्येक श्रीमंताच्या देवडीवर पहारा अरबांचा. नाना फडणीस बाजीरावशाहींत महाडास जीव बचावण्याकरितां पळून गेला तो अरबांच्याच भिस्तीवर. बडोद्यास तर अरबांचें प्रस्थ इतकें माजलें होतें कीं, त्यांचें बंड मोडून त्यांच्या पाशांतून गायकवाडांनां मुक्त करण्यास इंग्रजांनां सक्त श्रम करावे लागले. गायकवाड सरकारास कर्ज लागलें असतां संस्थानच्या वसुलाचीहि हमी दिलेली पुरत नसे; पण अरब सरदाराच्या शब्दाची जामिनकी पुरे होई! याला ' बहादरी ' म्हणत व गायकवाडी कारभारांतील तें एक प्रकरणच होऊन राहिलें होतें. दुसरा बाजीराव पळत असतां अखेर उत्तरहिंदुस्थानांत त्याच्याजवळ जें सैन्य उरलें त्यांत अरब हेच प्रमुख होते. पण बाजीराव जेव्हां इंग्रजांच्या स्वाधीन झाला तेव्हां आपल्या पगाराच्या बाकीबद्दल त्यांनीं बंड करून बाजीरावास कैदेंत ठेवलें व जनरल स्मिथ यानें मध्यस्थी केली नसती तर ते त्या वेळीं त्याचा प्राणहि घेते! नागपूरच्या आप्पासाहेब भोंसल्यास पदच्युत केल्यावर शांतता प्रस्थापित करण्याच्या वेळीं तेथील अरब सैन्य काढून लावण्याचीच मुष्कील पडली. अद्यापीहि दक्षिण हैद्रावादेस सामान्य देशी मुसुलमानांपेक्षां अरबांचेंच प्राबल्य शिपाइगिरीच्या कामीं अधिक दिसून येतें ( मराठे आणि इंग्रज ).

भोंसल्याच्या सैन्यांतील शिपायांच्या वंशजाचें जनरल हिस्लापनें ' समरी ऑफ दि मराठा अँड पेंढारी कँपेन्स ' मध्यें फार चांगलें वर्णन केलें आहे. हे लोक फार शूर व काटक असत. १८१७ च्या नोव्हेंबर महिन्यांत नागपूरच्या लढाईंत यांनीं फार मोठी मर्दुमकी गाजविली. नागपुरास कॅप्टन डोव्हटनबरोबर यांनीं निकरानें युद्ध केलें. मालेगांवास महिनाभर लढून यांनीं आपली कीर्ति ठेविली. अमळनेरास यांनीं आपल्या स्वामीकरितां, प्रामाणिकपणानें लढून शत्रूकडील लांचाचा मोह झुगारून दिला. अशीरगडासमोर यांचें इंग्रजांबरोबर चांगलें युद्ध झालें. यांची संख्या ६००० पेक्षां कधींच जास्त नव्हती.

अर्वाचीनः—नागपुराकडे यांनीं इतर मुसुलमानांच्या चालीरीतीचा स्वीकार केला आहे. यांचीं लग्नें निका पद्धतीनें होतात व फक्त एकच जेवणावळ असते. कारण फातिमा म्हणून महंमदाची मुलगी होती तिच्या लग्नांत फक्त एकच जेवणावळ झाली होती. घरांत कोणी मेलें तर हे महंमदाच्या सांगण्याप्रमाणें शोक करीत नाहींत. हे लोक इतर सुन्नी मुसुलमानांबरोबर लग्नें करतात. सिताबर्डी या लढाईंत यांची युद्धारोळी 'दीन दीन महंमद' अशी होती.

१९११ सालीं पंजाबांत असणाऱ्या ९६९ अरबांपैकीं ९५८ भावलपूर संस्थानांत आढळले. आपण भिकु व शादिखान या दोन अरबस्तानांतुन आलेल्या मुसुलमानांचे वंशज आहोंत असें ते म्हणतात. यांच्यांत ज्ञातिविवाह रूढ आहे. परंतु कधीं कधीं निरुपायास्तव ते जाटांशीं बेटीव्यवहार करितात. त्यांच्या लग्नाच्या चालीरीती जाटांच्या सारख्या आहेत.

अ र बी वा ङ्‌ म य का व्यें.—आरबी वाङ्मयाचा आरंभ हा महंमदापूर्वी जे अरब लोक होते त्यांच्या काव्यांपासून व कथांपासून होतो. हीं काव्यें प्रथम तोंडींच असत व परंपरेनें पुढें चालत. प्रथम अर्धवट गद्य असून नंतर हळू हळू यमकें प्रास वगैरेंचा प्रवेश झाला. प्रथम या काव्यांचें स्थल म्हणजे लष्करची छावणी व विषय मृतवीरांची स्तुति व नंतर कवीची प्रणयकथा याप्रमाणें असत. पुढें पुढें कवितेचा सार्वलौकिक विषय आढळून येऊं लागला. तो म्हटला म्हणजे कवि याचना करावयास गेला आहे अशा एखाद्या थोर अथवा श्रीमान् मनुष्याची स्तुति हा होय.

महंमदीय कालापूर्वी कवींनां फार मान असे. स्तुति व व्याजोक्ति हीं यांचीं मुख्य शस्त्रें असत. वर सांगितलेल्या कालोद्भव काव्यांची संहिता ८ व्या शतकापासून १० व्या शत-

काव्यां दरम्यान तयार झाली. तोंपर्यंत असा एकीकरणाचा कोणीं प्रयत्न केला नव्हता. पूर्वकालीन काव्यांचें रक्षण व एकीकरण करण्यास साहित्य उपलब्ध होतें ? यांपैकीं पुष्कळशीं, व्याकरण वगैरे विषयांत उदाहरणादाखल दिलेलीं असत, तेथून जमा करण्यांत आलीं. वर सांगितलेलीं काव्यें शुद्ध स्थितींत मात्र मिळालीं नाहींत. मध्यंतरी महंमदी धर्माचा प्रसार झाल्यामुळें यांपैकीं कांहींची छाटाछाट झालेली आढळून येते. व हीं ताडीं परंपरेनें आल्यामुळें मूळामध्यें पुष्कळसा फरकहि पडत गेला असेल.

यांची भाषा मध्य अरबस्तानांतील होती. त्यामुळें शहरांतील लोकांस समजण्याकरितां भाषेचा अभ्यास वगैरे करण्याकरितां त्यांवर पुष्कळ टीका तयार झाल्या. या कालचे सहा मोठे कवी होते, शिवाय एक यहुदी व एक ख्रिस्ती होता.

महंमद हा या कवींचा द्वेष करीत असे. कारण, त्यांचें अरब लोकांवर फार वजन असे व ते पूर्वीच्या धर्माचीच स्तुति गात असत. जेव्हां या कवींनां महमदीयांपासून त्रास होऊं लागला तेव्हां कांहीं कवी पगडी फिरवून महंमदीय मताची स्तुति गाऊं लागले.

पहिले चार खलीफ जरा धार्मिक व साधे असत, त्यामुळें काव्याची बरीच गळचेपी झाली व फक्त धार्मिक काव्यांनांच प्रोत्साहन मिळालें. परंतु उमईद खलीफ गादीवर आल्यावर त्यानें जरी महंमदी मताचा बाह्यात्कारीं पूर्ण स्वीकार केला होता तरी अरबांच्या जुन्या चाली व ख्रिस्ति संप्रदाय यास पूर्ण मुभा दिली.

या कालीं कवींनां राजदरबारी व सरदार यांजकडूनच मुख्यतः आश्रय मिळत असल्यामुळें काव्यांचेंहि स्थलांतर अरण्यापासून शहराकडे झालें व त्यामुळें काव्यांत कृत्रिमतेचा प्रवेश झाला. हळू हळू काव्यांस जास्त स्वातंत्र्य प्राप्त होऊन पूर्वीचे नियम सैल होत जातां जातां अजीबात नाहींसे झाले. या सुमारास फारसी वाङ्मयाचाहि परिणाम बराच झालेला दिसून येतो. कवितेचा विषयहि 'आपल्या राष्ट्र जातीची थोरवी' हा जाऊन त्या जागीं साध्या आयुष्यांतील गोष्टी येऊं लागल्या. यानंतर स्पेन, सिसिली वगैरे देशांतहि मोठमोठे अरबी कवी होऊन गेले. सुमारें आठव्या शतकापासून कांहीं काव्यांचे संग्रह केलेले आढळतात. हे संग्रह निरनिराळ्या उद्देशानें केलेले आढळतात. उदाहरणार्थ, व्याकरणदृष्ट्या शब्दांचा उपयोग दर्शविणें, चालीरीतींबद्दल माहिती देणें किंवा केवळ या कवितांनां स्थैर्य देणें इ.

यमकयुक्त गद्याचा उपयोग प्रथम महंमदानें केला. परंतु पुढें दहाव्या शतकापर्यंत त्याचें कोणी अनुकरण केलें नाहीं. दहाव्या शतकानंतर मात्र या वाङ्मयाचा प्रसार बराच झालेला दिसतो. या वाङ्मयाचा उपयोग फक्त भाषासौंदर्याच्याच कामीं होत असे. याच कालीं नैतिक शिक्षण व सर्वसाधारण सभ्य गृहस्थास लागणारें शिक्षण देणारें एक वाङ्मय तयार होत होतें. याला 'अदब' वाङ्मय म्हणत. हें गोष्टी व कविता यांच्या रूपानें असे. आपल्यांला 'इब्न-कुतैबा' याच्या 'उयुन उल अखबार' या ग्रंथांत राज्यकारभार, युद्ध, मैत्री, नीति, इत्यादि विषयांचीं नांवें आढळतात. आठव्या शतकांत 'इब्न मुकाफा' हा मझ्द धर्म सोडून म्लेंच्छ झाला व त्यानें पंचतंत्राचें 'बिदपै' यानें पल्हवींत केलेलें भाषांतर 'कलिल व दिम्न' या नांवानें अरबींत आणलें. याची भाषा फार शुद्ध असल्यामुळें व याची लेखनशैली चांगली असल्यामुळें हें एक आदर्शपुस्तक होऊन बसलें आहे.

इतिहास.—अरबी भाषेंतील इतिहास म्हणजे प्रत्यक्ष पाहणाऱ्यांनीं घडलेल्या गोष्टी दुसऱ्यास सांगितल्यावर त्या परंपरेनें ग्रंथकारापर्यंत येऊन त्यानें लिहून ठेवलेली हकीगत होय. याचेंच एक दुसरें स्वरूप असें असे कीं, ग्रंथकार निरनिराळ्या प्रसंगांबद्दल निरनिराळ्या हकीकती एकत्र ग्रथित करीत असे. प्रथमपासून गोष्टी व काव्यें यांचे विषय वीरांचीं शूर कृत्यें व इराण आणि कान्स्टांटिनोपल येथील राजांचें वैभव हे असत. परंतु महंमदाचा उदय व अरबांनीं नंतर अर्ध्या जगावर मिळविलेलें स्वामित्व या दोन गोष्टींनीं या काव्यांस व गोष्टींस एक पुष्कळ दिवस पुरणारा विषय करून दिला. परंतु गोष्टींचें टांचण करून ठेवणें त्यावेळीं अधर्म मानला जात असे. तरीहि अशीं टांचणें पुष्कळ होऊं लागलीं. हल्लीं उपलब्ध असलेला सर्वांत जुना इतिहास म्हटला म्हणजे 'इब्न इषाक' याचें महंमदाचें चरित्र होय. हें बरेंच विश्वसनीय आहे. याची मूळ प्रत उपलब्ध नसून नक्कल आहे (इब्नहिषाम कृत). यांत सर्वांत मोठा इतिहास म्हटला म्हणजे तावरीचा होय. या कालाबद्दल कांहीं ऐतिहासिक अद्भुत कथाहि उपलब्ध आहेत. यावेळीं कांहीं बनावट इतिहासहि तयार झाले होते व त्यावरूनहि कांहीं अद्भुत काव्यें व गोष्टी तयार झाल्या होत्या. परंतु हिजरी सनाच्या ६ व्या शतकांत हीं अद्भुत काव्यें व गोष्टी आधारादाखल घेतल्यामुळें पुष्कळ खोट्या गोष्टी इतिहासांत शिरल्या.

भूगोलः—महंमदी संप्रदायाच्या विस्ताराबरोबर भूगोलाचें ज्ञान वाढत जाऊन ९ व्या शतकांत पहिलें पुस्तक बाहेर पडलें. टॉलेमीच्या भूगोलाच्या अध्ययनानें या विषयावरील ग्रंथांस चालन मिळालें. याशिवाय जुन्या काव्यांतून निर्देश केलेल्या स्थळांसंबंधीं माहिती देणारे ग्रंथ असत.

व्याकरण व शब्दशास्त्रः—पहिलें अरबी व्याकरण ७ व्या शतकांत अबुल असवद-उद-दुअलि यानें लिहिलें. परंतु खरा व्याकरणास आरंभ ८ व्या शतकांत होतो. खलीफ इब्न अहमद यानें प्रथम छंदःशास्त्राचे नियम लिहिले व एक कोश तयार केला. याचा शिष्य सिबावैहि (इराणी) यानें एक व्याकरण लिहिलें तें अद्याप आदर्शग्रंथ मानलें जातें. वरील ग्रंथकार बसऱ्याकडील होत. कुफाकडील ग्रंथकार बेदुइन लोक जी भाषा बोलत तिजकडे लक्ष्य देत व त्यांचें

व्याकरणाच्या नियमपेक्षां प्रचलित भाषेकडेच जास्त लक्ष्य असे. यांपैकीं हरुन अल् रशीद याच्या पुत्राचा शिक्षक किझाइ हा प्रमुख असे. ४ थ्या शतकामध्यें या दोन्ही संप्रदायांचा अस्त होत गेला. बगदाद येथील भाषावेत्त्यांचा संप्रदाय पुढें आला. १० व्या शतकांत कांहीं इराणी ग्रंथकार अरबी भाषेचें अध्ययन करूं लागले. एकानें ( हमधानी ) पर्यायशब्दकोश व दुसऱ्या एकानें ( जौहरी ) एक शब्दकोश ( सहाह ) तयार केला. परंतु महत्त्वाचे असे अरबी शब्दकोश यानंतरच तयार झाले. 'इब्न मनझुर' याचा 'लिसान उल अरब' हा ग्रंथ, १२३२-१३११ व 'मुर्तदा-उद-झबिदी' याच्या 'कामुस' या ग्रंथाधारें 'फैरुझाबादी' यानें लिहिलेला 'ताअ उल आरुस' हा ग्रंथ, हे नंतर तयार झाले.

शास्त्रीयः—प्रथम ग्रीक ग्रंथांचें भाषांतर होऊन अरबी शास्त्रीय ग्रंथांचा आरंभ झाला. यांपैकीं बरेचसे ग्रंथ सिरीअक भाषेंतून आले. संस्कृत भाषेंतूनहि बराच भाग घेतलेला आढळतो. विशेषकरून ज्योतिषशास्त्र संस्कृतामधून हिंदुस्थानाकडूनच आलें. यांनीं हिंदुस्थान व ग्रीस या देशांपासून मिळविलेल्या गणितशास्त्राची चांगली वाढ केली व हेच पुढें यूरोपचे शिक्षक बनले. वैद्यकीचें ज्ञान गॅलेनच्या ग्रंथांपासून व गांदिसपुर येथील वैद्यक संप्रदायाकडून मिळालें. पुष्कळसे अरबी तत्त्ववेत्ते वैद्य असत. वास्तविक यांस रसायनशास्त्र माहीत नव्हतें. परंतु यांचेंच किमयेबद्दलचें ज्ञान पुढें रसायनशास्त्राची जननी ठरलें. प्राणिशास्त्राची तशीच गोष्ट आहे. भुस्तरशास्त्राबद्दलचें ज्ञान शास्त्रीय नसून व्यावहारिक होतें.

अ र बी त त्त्व ज्ञा न.—अरबी तत्त्वज्ञानामध्यें वास्तविक अरबी असें नांव व भाषा यांशिवाय कांहीं नाहीं. ही मूळची ग्रीक विचारपद्धति असून तिचें या भाषेंत भाषांतर होऊन तिच्यावर थोडासा प्राच्य संस्कृतीचा परिणाम झाला आहे. जे राजे उदारमतवादी झाले, त्यांनीं तत्त्ववेत्त्यांस वेळोवेळीं प्रोत्साहन दिलें,परंतु साधारणतः लोकांचा या लोकांवर विश्वास नसे. कालांतरानें सेमिटिक व महमदी पद्धतीचा झालेला विकार निघून जाऊन पुढच्या सॅरॅसन तत्त्ववेत्त्यांनीं फक्त ॲरिस्टाटल याच्याच पद्धतीचा अंगीकार केला.

महमदी धर्माचीहि एक तत्त्वज्ञानपद्धति होती; परंतु ही पारमार्थिक होती; तीपासून 'कलाम' व 'मुताकल्लिमून' हे शब्द प्रचारांत आले. ही पद्धति मध्ययुगीन 'स्कूलमेन'च्या पद्धतीसारखी होती. हे तत्त्ववेत्ते आपल्या पारमार्थिक तत्त्वांनां ही लावीत असत, पुढें ग्रीक तत्त्वज्ञानपद्धति जेव्हां खलीफाच्या कारकीर्दींत प्रचारांत आली तेव्हां ते स्वतःच्या तत्त्वांनां आधारभूत म्हणून त्या पद्धतींतील कांहीं तत्त्वें घेऊं लागले.

अरबी तत्त्वज्ञानाला त्याच्या आरंभकालींच ( ९ व्या शतकांत ) या ग्रीक तत्त्वज्ञानाचा फार मोठा लाभ झाला. हेंच लॅटिन भाषेंत येण्यास १२ व्या शतकापर्यंत काळ जावा लागला. प्रथम सिरियामधील तत्त्ववेत्त्यांनीं प्लेटोच्या मतांचा सर्वत्र( पूर्वेकडे ) प्रसार केला होता परंतु हळूहळू 'निओप्लेटॉनिक' पद्धति प्रचारांत आली व त्यांनीं ॲरिस्टॉटल याच्या मतांचा इतका जोरानें प्रसार केला कीं हींच मतें पुढें 'ईस्टर्न-चर्च' पद्धतीचा मुख्य भाग झालीं ( ६ वें-७ वें शतक ). परंतु ही विचारपद्धति पुढें अधीन वाढत जाऊन तिची पारमार्थिक बाजू अजीबात सुटली. सरतेशेवटीं झेनो बादशहानें नेस्टोरिअन तत्त्ववेत्त्यांनां एडेस्सा येथून इ. स. ४८९ मध्यें इराणांत हांकून दिलें. तेथें त्यांनां ससनिद राजांनीं आश्रय दिला. तेव्हां त्यांनीं 'निसीबिस' येथें एक शाळा स्थापन केली. गांदिसपूर अथवा निशापूर येथें एक ग्रीक वैद्यकीची शाळा प्रथम सुरू झाली व वैद्यकाबरोबरच ग्रीक तत्त्वज्ञानाचाहि सर्व इराणभर प्रसार झाला. यांच्या वैद्यकीच्या ज्ञानामुळें यांनां समाजांत फार मान असे. त्यामुळें महंमदी संप्रदायाचा प्रसार झाल्यानंतरहि यांनां या पद्धतीचा प्रसार बगदाद येथें व आसपास करण्यास सांपडला. व लवकरच ॲरिस्टाटलच्या ग्रंथांचें प्रथम सीरियक व नंतर अरबी भाषांत भाषांतर झालें.

लौकिक तत्त्वज्ञानाचा प्रसार अब्बासि खलीफ गादीवर असताना झाला. हे राजे इराणाकडील असल्यामुळें पुष्कळशी इराणी संस्कृति यावेळीं महंमदी संप्रदायांत शिरली. या तत्त्वज्ञानालाहि साधारण जनतेपेक्षां राजाचाच आश्रय जास्त असे. आणि या राजाश्रयामुळेंच बगदाद व निशापूर येथील शाळांकडे विद्वान लोक लोटले.

अरबी तत्त्वज्ञानपद्धति प्रथम चार नांवाखालीं लॅटिन स्कूलमेन यांनां माहीत होती. ती म्हणजे अलकिंडिअस, अलफॅरॅबिअस, अव्हिसेन्ना व अल गाझेल यांची. यांपैकीं अव्हिसेन्ना हा फार प्रख्यात होऊन गेला.

अव्हिसेन्ना यानें पारमार्थिक व लौकिक तत्त्वज्ञानाची सांगड घालण्याचा प्रयत्न केला. परंतु याचा सांप्रदायिक गूढें तर्कपद्धतीनें सिद्ध करण्याचा प्रयत्न पुष्कळदां चुकीचा ठरलेला आहे. ही त्याची चूक घाशोलि यानें प्रथम स्पष्ट करून दाखविली. घाशोलि यानें लौकिक तत्त्वज्ञानाचा अभ्यास विशेष केल्यामुळें त्याची परमार्थाकडून दृष्टि पार वळली. यानें निरनिराळ्या तत्त्वज्ञानपद्धतींचा छाननी केली. याचा ग्रंथ ( तत्त्वज्ञान्यांचा नाश ) उपलब्ध आहे. या काळापासून अरबी तत्त्वज्ञानाच्या ऱ्हासास आरंभ झाला. जनताहि तत्त्ववेत्त्यांस नेहमीं पाखंडी समजत असे. व तुर्कांचा अमल जारी झाला व इराणचें वर्चस्व महंमदी संप्रदायामुळें पुढें कमी झालें तेव्हां तत्त्वज्ञानाचाहि अंत झाला. खलीफ मोस्तनजिद यानें एक वाचनालय ११५० मध्यें जाळल्याचा उल्लेख आहे व ११९२ मध्यें एका वैद्यास कैद करून त्याचीं पुस्तकें जाळल्याचेंहि आढळतें.

स्पेनमध्येंहि महंमदी अमलाखालीं याच प्रकाराची पुनरावृत्ति आढळून येते. मात्र येथील तत्ववेत्त्यांचें युग फार लहान झालें. पण त्यांच्या तत्त्वज्ञानाची उच्चता फार मोठी असून वाढहि फार झपाट्यानें झाली. येथील तत्त्वज्ञानाच्या शाळा अँदालुशिया व कार्डोवा येथें होत्या. या कालांतील मुख्य तत्त्ववेत्ते अव्हेंपेस, अबुबेसर व अव्हेरोस हे होते. यांपैकीं अव्हेरोस हा फार प्रख्यात झाला. याला मुसुलमानांनीं सोडल्यावर ज्यू लोकांनीं याच्या तत्त्वांनां कांहीं दिवस आश्रय दिला. पुढें हीं तत्त्वें लॅटिन ' स्कूलमेन ' यांस माहीत झालीं. पुढें पुढें अंधश्रद्धेचा पगडा कमी झाल्यावर १२ व्या शतकांत पॅरिसमध्यें या तत्त्वज्ञानाचे भक्त निघाले. रॉजर बेकन हा देखील यास मान देत असे. १४ व्या शतकांत जॉन बेकनथॉर्प आणि वॉल्टर वर्ले हे अव्हरोसचे भक्त होते. सरतेशेवटीं पदुआ व त्याच्या आसपासचा प्रदेश हें या तत्त्वज्ञानपद्धतीचें कायमचें स्थान झालें. परंतु हा सर्वकाल ही तत्त्वज्ञानपद्धति पाखंड समजली जात होती.

याच वेळीं ग्रीक भाषेंतून मूळ ॲरिस्टाटलचे ग्रंथ भाषांतर रूपानें लॅटिन भाषेंत आल्यामुळें, अव्हेरोस हा मागें पडला. यावेळीं चर्चसुद्धां एकदम जागें होऊन ॲरिस्टाटलच्या ग्रंथांच्या पाठीस लागलें, परंतु दिवसेंदिवस विचाराची दिशा बदलत जाऊन तींच मतें प्रमाण होऊन बसलीं.

अरबी तत्त्वज्ञानानें मुख्यतः पाश्चात्त्य देशांत जी कामगिरी बजाविली तीमुळें ॲरिस्टाटला व त्याच्या मूळच्या ग्रीक भाषेंतील ग्रंथांकडे स्कूलमेननां लक्ष वळवावें लागलें.

अ र बां चें शा स्त्र ज्ञा न.—ज्योतिष, वैद्यक, व गणित या शास्त्रांत प्राचीन अरबांची बरीच गति असे. यासंबंधीं थोडेंसें विवेचन ज्ञानकोश विभाग ५–विज्ञानेतिहास यांत त्या त्या शास्त्राखालीं आलेंच आहे. याठिकाणीं अरबांचें ज्योतिषविषयक ज्ञान कितपत होतें हें सविस्तर दिलें आहे. प्राचीन अरबांचें ज्योतिषाचें ज्ञान थेलीझपूर्वीच्या ग्रीकांच्या ज्ञानापेक्षां जास्त नसावें. अब्बासि खलीफांच्या वेळेपासून अरब ज्योतिषाचा विशेष अभ्यास करूं लागले. प्रसिद्ध अलनमसूर उर्फ अबूजाफर ( राज्यारोहण हि. स. १३६ इ. स. ७५४ ) याच्या कारकीर्दींत बौद्धिक विचारांत क्रांति होऊन शास्त्रीय अभ्यासास उत्तेजन मिळालें. अलमनसूर हा स्वतः ज्योतिषाचा अभ्यास करीत असे. याच्यानंतर हरून अलरशीद व त्याचा मुलगा महंमद अल अमीन यांनीं वरील संक्रमणास उत्तेजन दिलें. हरूनचा दुसरा पुत्र खलीफ अल मामून अबदल्ला( राज्यारोहण हि. स. १९८, इ. स. ८१३-१४ ) याचें नांव सर्वांत प्रामुख्यानें पुढें येतें. हा विद्येचा मोठा पुरस्कर्ता होता. याच्यावेळेपासून शास्त्रें व विशेषतः ज्योतिषशास्त्र यांचा अरबांनीं जबर व्यासंग केला. अल्माजेस्ट आणि अलेक्झांड्रा येथील ग्रीक ग्रंथ यांचीं भाषांतरें झालीं. बगदादच्या ज्योतिष्यांनीं वेध घेऊन टॉलेमीपेक्षां अधिक बिनचूक सूर्य चंद्रांचीं कोष्टकें तयार केलीं. सायन वर्षाचें मान त्यांनीं हिपार्कसपेक्षां जास्त सूक्ष्म काढलें; पृथ्वीचा आकार ठरविण्यासाठीं त्यांनीं मेसापोटेमियांत याम्योत्तर वृत्ताच्या एका अंशाचें मापन केलें.

अलमामूनच्या कारकीर्दींत व नंतर बरेच ज्योतिषी उदयास आले.त्या सर्वांत महंमद बिन जाफर हा विशेष प्रसिद्ध असून तो आलबाटेग्निअस ( आलबटानी ) या नांवानें यूरोपांत प्रसिद्ध आहे. हा इ. स. ८८० च्या सुमारास प्रसिद्धीस आला असावा. तो जातीनें सेबियन असून नक्षत्रोपासक होता. या वेळीं बगदाद दरबारांत परधर्मसहिष्णुता असून विद्येस मान असे. आलबाटेग्निअस हा सिरियाच्या सुभेदारीच्या जागीं असून त्याचा विशेष भर ज्योतिःशास्त्रावर होता. यानें बहुतेक वेध अँटायोक अथवा मेसापोटेमियांतील रक्का शहरीं घेतले.

आलबाटेग्निअसनें टॉलेमीची पद्धति व शोध घेऊन त्यांत कांहीं ठिकाणीं फरक केला व कित्येक स्वतःचे शोध लावले. स्थिरतारकांच्या गतीसंबंधानें आलबाटेग्निअसचे शोध त्याच्या पूर्वीच्या लोकांपेक्षां जास्त बरोबर होते. टॉलेमीच्या मतें त्यांनां एका शतकांत १ अंश गति आहे. पण आलबाटेग्निअसच्या मतें ही गति ७० अंश असून आधुनिक ज्योतिष्यांच्या मतेंहि ती सुमारें ७२ अंशांच आहे. टॉलेमीच्या वेधांशीं तुलना करून यानें जें ३६५ दिवस ५ तास ४५ मि. २४ से. वर्षमान ठरविलें त्यांत फक्त २॥ मिनिटांचीच चूक होती. याच्या पूर्वी चंद्रोच्च अचल, काल्पनिक व नक्षत्रापलीकडे आहे असा समज होता. यानें इतर अचलतारे व हा बिंदु यांत फरक दाखवून जरा जलद गति असल्याचें दाखविलें. या शोधानें हीच गति इतर ग्रहांसहि असावी असें त्याला वाटलें व तें सांप्रत खरेंहि ठरलें आहे. चंद्र व इतर ग्रहांबद्दल टॉलेमीच्या कांहीं चुका यानें सुधारल्या. यानें नवीन कोष्टकें केलीं व तीं टॉलेमीपेक्षां सरस ठरलीं. याच्या ' झिजसाबी ' नांवाच्या ग्रंथाचें लॅटिन भाषेंत रूपांतर झालें पण तें चुकीचें होतें. मूळ ग्रंथ व्हॅटिकन ग्रंथालयांत असावा. हा प्रसिद्ध पुरुष हि. स. १३७ (इ. स. ९२९)मध्यें मरण पावला [ विज्ञानेतिहास पृ. २८९ पहा ].

अरब ज्योतिष्यांनीं ग्रीकांचें अनुकरण करून फारच थोडी प्रगति केली असा यूरोपमध्यें समज होता. १८०४ मध्यें कॉसिननें इब्न युनीसच्या ग्रंथाच्या कांहीं भागांचें रूपांतर केलें. त्यांत ग्रहण व ग्रहांच्या युती यांसंबंधीं जी माहिती होती तिजवरून तर वरील कल्पना अधिकच दृढ झाली. जे. जे. सेदिलो यानें इब्न युनीसच्या ग्रंथाच्या राहिलेल्या भागाचें रूपांतर करून शिवाय त्याला इब्न शाथिरच्या ग्रंथांत याचे आणखी भाग सांपडले; तेहि त्यानें प्रसिद्ध केले. यांत कांहीं नवीन रीती असून त्या सांप्रतच्या त्रिकोणमितीशीं जुळतात. इब्न युनीसचा समकालीन बगदाद येथें १०० व्या शतकांत असलेला अबल–वोल्फा याच्या अल्माजेस्ट ग्रंथांत स्पर्शज्यां व कोटिस्पर्शज्या यांच्या सारण्या असून त्यांचा उपयोग

सध्यांच्या त्रिकोण मितीच्या कोष्टकाप्रमाणें करावयाचा असे. अशा रीतीनें यानें गणितशास्त्रांत क्रांति घडवून आणली. वरील शोधांनीं हुरूप येऊन सेदीलोनें आणखी शोध सुरू केले. त्याच्यामतें उलुघबेगची यांदी स्वतंत्र असून बाकीच्यांनीं केवळ सेलोमीची नक्कल केली असावी. मेनेलॉसनें हिपार्कसवरून व टॉलेमीनें मेनेलॉसवरून नक्कल केली. वरील सेदीलोच्या प्रयत्नानें बरीच नवीन माहिती उपलब्ध झाली.

ग्रीकांच्या शंकुयंत्राप्रमाणें अरबांचीं यंत्रें उपलब्ध नाहींत असा समज होता. आलबाटेग्निअसच्या ग्रंथावरून अरबांनीं टॉलेमीच्या पुढें मजल मारली नव्हती असें दिसतें. सेदीलोनें अवलहसन अलीच्या ग्रंथाचें भाषांतर केलें. यांत शंकुयंत्राचें फारच चांगलें वर्णन आहे. हा १३ व्या शतकांत झाला. याच्या ग्रंथांत अरबांच्या शोधांबद्दल आणखी माहिती आढळते. विशेषतः स्पेनमध्यें अरबांनीं शास्त्रीय विषयांत प्राविण्य मिळविलें होतें व तेथील मुख्य शहरीं मोठालीं ग्रंथालयें असत.

अरबांच्या ज्योतिषग्रंथांत फलज्योतिषहि येतें. त्यांनीं बीजगणिताचा शोध लावला असें म्हणतात. परंतु त्यांनीं दशमानात्मक संख्यालेखन पद्धति, इतर गणितविषयक शोध व बीजगणित हिंदूंपासूनच घेतलें असावें. धर्मयुद्धामुळें पौरस्त्यांच्या बऱ्याच कल्पना यूरोपांत पसरल्या. बगदादच्या ज्योतिष्यांनीं अलेक्झांड्रा येथील ज्योतिष संप्रदायावर ताण केली होती यांत शंका नाहीं. अबुल वोकानें काढलेल्या विचारपद्धतीनें अरबांच्या ग्रंथासंबंधीं उत्सुकता उत्पन्न झाली परंतु त्यांच्या यंत्रसामुग्रीकडे कोणीहि लक्ष्य पुरविलें नाहीं.

वे ध यं त्रें.—अरबांच्याजवळ नक्षत्रयंत्र, षष्ठांशयंत्र ( सेक्स्टंट ) व इतर यंत्रें असून त्यांनीं यंत्रकलेंत बरीच प्रगति केली होती. हरूनअलरशीदनें शार्लेमेनला एक घड्याळ नजर पाठविलें होतें. त्यांच्याजवळ घटीयंत्र, वाळूचीं घड्याळें व चाकावर चालणारीं घड्याळें असत. दमास्कस येथील मोठ्या घड्याळाचें वर्णन सिल्व्हेस्ट्रेड सॅसीनें केलें आहे. अरब धातूचे खगोल तयार करीत. इराणी वाङ्मयाचा नाश झाल्यामुळें प्राचीन इराणी लोकांचे परिश्रम कळण्यास मार्ग नाहीं. खलिफाच्या सत्तेपासून मुक्त झाल्यावर इराणी ज्योतिषी चमकूं लागले. त्यांच्यापैकीं एकानें पंचांग सुधारून एक दिवस वाढविला. १३ व्या शतकांत होलगू-इलेकूखाननें ज्योतिष्यांनां उत्तेजन दिलें व त्याच्यानंतर झालेला उलुघखान स्वतः वेध घेण्यांत फार तरबेज होता. यानें १४७७मध्यें रवीची परमक्रांति म्हणजे क्रान्तिवृत्ताचें तिर्यक्त्व मोजून जंत्र्या तयार केल्या. यांहून जास्त बरोबर जंत्र्या पुढें टायकोब्राही पर्यंत कोणी केल्या नाहींत. अरबी ग्रंथांत यंत्रांसंबंधीं दोनच पुस्तकें असून त्यांचें रूपांतर सेदीलो या पितापुत्र द्वयांनीं केलें आहे.

मुल्लाफिरुझ ग्रंथालयांत ज्योतिष, गणित वगैरे सदरांखालीं ९३ हस्तलिखितें आहेत. यांतील 'नझत-अलहदैक' नांवाच्या ग्रंथांत त्याचा कर्ता जमशीद बिन मसुद अलतबीब अलकाशी उर्फ घयास हा 'तवकअल मनाटेक' ( क्रान्तिवृत्तीय तबकडी ) नांवाच्या यंत्राचें वर्णन देतो. नं. ५९ च्या हस्तलिखितांत वरीच माहिती असून त्यांत विशेषतः कंकण, नक्षत्रयंत्र व शंकु यांचें वर्णन आहे. नं. ७२ च्या हस्तलिखिताचा कर्ता इब्न काशेफ अलदिन महंमद काजी असून यांत मुलालिद अल-सद्वात-वलआंझ या यंत्राचें वर्णन आहे. सर्वांत महत्वाचा ग्रंथ नं. २१ चा असून त्यांतील बरेंच वर्णन दुर्बोध आहे. पण त्यांत यंत्रांच्या प्रतिकृति दिल्या आहेत.

याच ग्रंथांत अबुरैहान अलबेरुणीचें एक तुरीय यंत्र ( क्वाड्रंट ) असून त्याच्या योगानें खस्वस्तिकापासून क्रांतिवृत्त ज्याठिकाणीं क्षितिजास छेदतें तितकी उंची काढतां येते. दुसऱ्या एका जुन्या यंत्रावरून रवीची परम क्रांति काढतां येते. याच यंत्रांवरून बहुधा सध्यांच्या लघुभाग मापकाची ( व्हर्निअरची ) कल्पना निघाली असावी. सूर्याचें अथवा चंद्राचें ग्रहण मोजण्याचें एक यंत्र असे. 'द्विपाद' अथवा अलरूवयन या यंत्राच्या साहाय्यानें एकाच वेळीं दोन वेध घेतां येतात. अंशात्मक विभाग पाडलेल्या यंत्राच्या साहाय्याखेरीज मोजण्याचेंहि एक यंत्र होतें.

याशिवाय या ग्रंथांत ( नं. २१ ) आणखी बऱ्याच यंत्रांचीं चित्रें व वर्णनें असून त्यांत अनबुया नांवाच्या पोकळ नळ्या असलेल्या एका यंत्राचीं चित्रें आहेत. नक्षत्रयंत्र पितळेचें करीत असून तें सहज वाहून नेतां येण्याइतकें सुटसुटीत होतें.

इ ति हा स.—अरबस्तान हें सेमाइट लोकांचें वसतिस्थान होतें असें म्हणतात, परंतु ह्याबद्दल खात्रीलायक पुरावा मिळत नाहीं. अरबस्तानचा खरा इतिहास, देशांतील जातीजातींमधील तंटे सुरू झाले तेव्हांपासून लिहिलेला आहे.

१९ व्या शतकापर्यंत अरबस्तानच्या पुरातन इतिहासाचें साधन म्हणजे अरब लोकांमधील दंतकथा होत. परंतु वरील शतकांत बरेच शिलालेख सांपडल्यामुळें ख्रिस्तपूर्व दहा किंवा अधिक शतकांचा इतिहास ज्ञात झाला आहे.

ह्या शिलालेखांवरून असें अनुमान काढण्यांत आलें आहे कीं, त्यावेळीं मैन, साब, हाद्रमत आणि कतबन्नू अशीं थोडीशीं सुसंस्कृत राष्ट्रें होतीं. पैकीं शेवटल्या दोन राष्ट्रांविषयीं फारशी माहिती मिळालेली नाहीं. फक्त हाद्रमत हें राष्ट्र इ. स. ३०० च्या सुमारास इथिओपियन लोकांनीं जिंकलें एवढी माहिती सांपडते.

साबियन राष्ट्रांत ख्रिस्तपूर्व ११५ वर्षें पावेतों सेबियन राजे राज्य करीत होते; नंतर हिमिअराइट ह्या जातीचे लोक तेथें राज्य करूं लागले. हिंदुस्थान आणि इजिप्त ह्यांमधील व्यापार ह्या राष्ट्रामार्फतच होत असल्यामुळें हें राष्ट्र त्यावेळीं

उर्जितावस्थेस पोंचलें होतें, परंतु टॉलेमी राजांनीं अलेक्झां-ड्रियापर्यंत जमिनीवरून मार्ग शोधून काढल्यामुळें ह्या देशाचा व्यापार बंद होऊन पुष्कळ साबियन लोकांनां स्थानत्याग करावा लागला.

मिनाई हें राज्य दक्षिण अरबस्तानांतील जाफपर्यंत पसरलें होतें. या राज्यांत जवळ जवळ २५ राजे होऊन गेले अशी माहिती शिलालेखांवरून सांपडते. त्यावरून हें राष्ट्र बरेंच पुरातन असावें असा अंदाज आहे. ह्यांतील मुख्य शहरें कर्नो, मैन आणि याथिल हीं होत.

ख्रिस्तपूर्व ११५ च्या सुमारास साबिअन लोकांची दक्षिण अरबस्तानवरील सत्ता हिमिअराइट लोकांच्या हातीं गेली असा उल्लेख वर आलाच आहे. ह्याच सुमारास कतबनिया राष्ट्राचाहि लय झाला. हिमिअराइट राजांनीं साबा आणि रैदान ह्या राष्ट्रांचे राजे असें नामाभिधान धारण केलें. ह्यांचे २६ राजे होऊन गेले असें वाटतें. ह्यांच्या कारकीर्दींत रोमन लोकांनीं अरबस्तानवर स्वारी केली परंतु वाळवंटामध्यें त्यांच्या सैन्याचा नाश झाला. नंतर आफ्रिकेच्या किनाऱ्यावर जे अबिसीनियन लोक गेले होते ते परत आले व दक्षिण अरबस्तानांत राहून आपलें वर्चस्व वाढवून इ. स. ३०० च्या सुमारास हिमिअराइट राजांनां जमीनदोस्त करून त्यांनीं गादी बळकाविली आणि साबा, रैदान, हाद्रमत आणि येमेन ह्या राष्ट्रांचे राजे असें नांव धारण केलें. परंतु हिमिअराइट लोकांनीं ज्यू धर्माचे अनुयायी बनून पुनः आपला राजा गादीवर बसविला. हिमिअराइट आणि अबिसीनियन लोकांमधील युद्ध म्हणजे ज्यूधर्म आणि ख्रिस्तधर्म ह्यांमधील युद्ध होय. म्हणून ख्रिस्तानुयायी राष्ट्रांचें साहाय्य मिळून अबिसीनियन लोक विजयी झाले. परंतु लगेच इ. स. ५७५ त इराणच्या राजाच्या मदतीनें येमेन येथें ज्यू धर्माच्या अनुयायांनीं आपलें राज्य स्थापिलें.

वरील राष्ट्रांशिवाय हीरा, घसान, आणि किण्डा हीं तीन बलाढ्य राष्ट्रें होतीं. हीरा येथें लखमीद नांवाचें घराणें इ. स. ६०२ पर्यंत राज्य करीत होतें. परंतु हें राष्ट्र स्वतंत्र नसून इराणच्या हुकमतीखालीं होतें. इ. स. ६०२ नंतर हें घराणें नष्ट झाल्यामुळें इराणतर्फे एक गव्हर्नर नेमण्यांत आला.

घसान हें संस्थान अरबस्तानाच्या वायव्येस असून जाफनिद ह्या नांवाचें घराणें तेथें राज्य करीत असे. ह्या घराण्याची रोमबरोबर मैत्री असल्यामुळें इराण किंवा हीरा ह्या राष्ट्रांबरोबर त्यांचें सतत युद्ध सुरू असे. परंतु ५८३ मध्यें घसनीद राज्याचे तुकडे होऊन कांहीं भाग इराणच्या अमलाखालीं तर कांहीं रोमच्या सत्तेखालीं गेला.

५ व्या शतकाच्या सुमारास किण्डा हें राष्ट्र उदयास आलें. हें राष्ट्र येमेनच्या राजाच्या सत्तेखालीं होतें. ह्या राष्ट्रानें एकवेळ हीरा राष्ट्रावर देखील आधिपत्य मिळविलें होतें.

वरील राष्ट्रांशिवाय इसवी सनाच्या ६ व्या शतकाच्या सुमारास बेहरीन, ओमन, जुलन्द, आणि हेजाझ अशीं लहानमोठीं राष्ट्रें होतीं.

वरील राष्ट्रांचा इतिहास दिला आहे तो महंमदाच्या उदयकालापर्यंतचा दिला आहे. त्याच्या उदयकालानंतरचा चवदाव्या शतकापर्यंतचा इतिहास चवथ्या विभागांतील तेराव्या व सतराव्या प्रकरणांत दिला आहे. [ बुद्धोत्तर जग पहा ]

खलीफतीचा इतिहासहि त्या विभागांत ( प्र. १७ ) आलेला आहे. खलीफाच्यानंतर उमईद घराण्यांतील पुरुष खलीफ म्हणवूं लागले. ह्यांच्या कारकीर्दीचीं आरंभींचीं वर्षे दंगधोपे नाहींसे करण्यांत गेलीं. ह्या घराण्याचा मुख्य शत्रु म्हणजे खारिजित लोक होत. अल्ली यानें ६५८ त त्यांचा मोड केला, परंतु ह्यावेळीं बरेच लोक पळून गेले व सर्वत्र अशांतता उत्पन्न झाली. अल्लीच्या निधनानंतर हसन आणि हुसेन असे त्याचे दोघे पुत्र होते. परंतु हुसेन यानें याझिद हा खलीफ कबूल न केल्यामुळें ६८० सालीं कर्बेला येथें तो मारला गेला. त्याबरोबर अब्दल्ला हा हुसेन घराण्यातर्फे याझिद ह्याचा सूड घेण्याकरितां तयार झाला. युद्ध सुरू होऊन मक्का व मदिना ह्या पवित्र स्थानांस याझिद ह्यानें वेढा दिला, परंतु कांहीं दिवसांनीं तो मरण पावल्यामुळें, अरबस्तान, इजिप्त व सिरियाचा कांहीं भाग या ठिकाणीं अबदल्ला हा खलीफ मानला गेला. परंतु खारिजित लोकांचा अग्रणी अबदुलमलीक ह्याच्याकडून ६९२ मध्यें अबदुल्ला मारला गेल्यानंतरचा इतिहास लुप्तप्राय आहे.

ह्यानंतर अब्बासी घराणें उदय पावलें. त्यांची कारकीर्द ९ व्या शतकापर्यंत चालू होती. परंतु अरबस्तानला महत्त्वाची अशी एकहि गोष्ट तींत घडून आली नाहीं.

इ. स. १००० पूर्वी ओमन ह्या राष्ट्रानें खलिफची सत्ता झुगारून देऊन तें स्वतंत्र झालें होतें. नंतर एक शतक इमाम लोक राज्य करीत होते. पुढें बानीनेभान हें घराणें ११५४ ते १४०६ पर्यंत अधिकारावर होतें. १४३५ मध्यें बानी नेभान घराण्याविरुद्ध बंड होऊन इमामी कारकीर्द सुरू झाली. १५०८ मध्यें पोर्तुगीज लोकांनीं ओमनच्या पूर्व किनाऱ्यावरील बराच भाग हस्तगत केला. परंतु १६२४ मध्यें एक नवीन घराणें उदयास येऊन पोर्तुगीज लोकांचें वर्चस्व कमी करण्यांत आलें व १६५१ मध्यें पोर्तुगीज लोकांनां मस्कत सोडून देणें भाग पडलें.

अरबस्तानच्या अर्वाचीन इतिहासाला वाहाबी चळवळीपासून सुरुवात झाली आहे. ह्या चळवळीचा प्रवर्तक महमद इब्न अदुबल वहाब हा होता. मुसुलमान लोकांच्या वेडगळ धर्मसमजुती, आणि त्यांपासून होणारे दुष्परिणाम दूर करावे ह्या उद्देशानें अबदुल ह्यानें प्रयत्न चालविले. १७४२ मध्यें दरैयाचा शेख महमद सौद हा अबदुलचा

अनुयायी झाला. आणि १७६५ पर्यंत नेज्द आणि एलहास ह्या ठिकाणीं त्यांनीं तरवारीच्या जोरावर नवीन धर्माची स्थापना केली. १७६५ त त्याचा मुलगा अबदुल अझीझ हा गादीवर बसला. त्यानेंहि आपल्या पित्याचा कित्ता गिरविल्यामुळें तुर्कस्तानचा सुलतान देखील त्याचा वैरी झाला. परंतु अझीझच्यापुढें सुलतानाला हात टेंकावे लागले, ह्यामुळें वाहाबींचें बरेंच प्रस्थ माजून बहुतेक अरबस्तान पादाक्रांत करण्यांत आला. १८०२ मध्यें अझीझ वारला व त्याचा मुलगा सौद अमीर झाला. परंतु देवळें पाडणें, लोकांचा छळ करणें इत्यादि घोर कृत्यांमुळें लोकांच्या आणि इतर मुसुलमान राष्ट्रांच्या मनांत द्वेषाग्नि भडकून अमीर घराणें जमीनदोस्त करण्याचा कट झाला. ह्या कटांत तुर्कस्तान देखील सामील झाला. परंतु ह्यावेळीं तुर्कस्तान यूरोपांतील भानगडींत गुंतल्यामुळें इजिप्तचा पाशा महमद-अल्ली ह्याकडे ही कामगिरी सोंपविण्यांत आली. ह्याप्रमाणें १८११ मध्यें महमद अल्लीचा मुलगा तसनपाशा हा सौदवर चाल करून आला. परंतु सौद ह्याच्यापुढें त्याचें कांहीं न चालल्यामुळें महमदअल्ली स्वतः आला, परंतु व्यर्थ. १८१४ मध्यें सौद वारल्यानंतर त्याचा मुलगा अब्दुल्ला ह्यानें तह केला. परंतु इजिप्तचें सैन्य निघून गेल्यानंतर त्यानें तहाच्या अटी नाकबूल केल्या. परंतु पुन्हां सैन्य घेऊन १८१८ मध्यें अबदुल्ला शरण आला व त्याचा कॉन्स्टान्टिनोपल येथें वध करण्यांत आला.

इ. स. १८२४ त अबदुल्लाचा मुलगा तुर्की ह्यानें इजिप्तचें स्वामित्व कबूल करून व खंडणी देऊन १० वर्षांच्या आंत आपल्या राज्याला बळकटी आणली. १८३४ मध्यें याचा खून झाला व त्याचा मुलगा फेसल हा अमीर झाला. परंतु १८३६ मध्यें त्यानें खंडणी देण्याचें नाकारल्यामुळें त्याला पकडून कैरो येथें ठेवण्यांत आलें. कांहीं दिवसांनीं तुर्कस्तान आणि इजिप्त ह्यांमध्यें राजकीय भानगड उपस्थित होऊन अरबस्तानकडे दुर्लक्ष्य झालें. ही संधी साधून फेसल १८४२ त पळून आला, आणि ओमन व येमेन शिवाय सर्व अरबस्तानानें त्याला अमीर ह्मणून कबूल केलें.

इ. स. १८३४ मध्यें एलहासच्या स्वारींत फेसलबरोबर शामर कुळांतील अबदुल्ला नांवाचा एक गृहस्थ होता. बापाचा खून करणारा मशारा ह्याला धरण्यांत फेसल ह्याला ह्या गृहस्थानें साहाय्य केल्यामुळें अबदुल्ला हा जेबेल शामर येथील गव्हर्नर झाला. परंतु फेसल ह्याला कैरो येथें नेऊन ठेवल्यावर अबदुल्ला ह्यानें आपली सत्ता वाढविली. १८४३ त अबदुल्लाचा मुलगा तलाल हा गादीवर बसला. हा मोठा कारस्थानी आणि मतलबी असून यानें आपल्याबद्दल कोणालाहि संशय येऊं न देतां राज्याची मजबुती, प्रगति, व वाढ केली. त्याचप्रमाणें इजिप्तबरोबर देखील ह्यानें संधान बांधलें होतें.

तलालच्या नंतर त्याचा भाऊ मताब हा १८६८ मध्यें गादीवर बसला. परंतु तो लवकरच मारला गेल्यामुळें त्याचा पुतण्या बन्दर हा अमीर झाला. त्याच्या मागून थोडक्याच दिवसांत अबदुल्लाचा तिसरा मुलगा महंमद अमीर झाला. कांहीं कारणामुळें फेसल याचे वंशज आणि महमद ह्यांच्यामध्यें लढाई होऊन महंमद विजयी झाला. ह्या जयामुळें उत्तर आणि मध्य अरबस्तानचा १८९१ मध्यें महंमद स्वामी झाला.

१८९७ मध्यें अबदुल अझीझ,महमदचा पुतण्या गादीवर बसला. ह्याच्या कारकीर्दींत कुवेत येथें एक नवीनच संघ तयार झाला. ह्या प्रांतांतील बंदरावर तुर्कस्तानचा डोळा होता. परंतु आयत्या वेळीं कुवेत येथील शेख मुबारक ह्यानें इंग्रजांचें साहाय्य मिळविल्यामुळें तुर्कस्तानचा बेत फसला. आणि १९०३ मध्यें कुवेत येथील इंग्रज लोक हे राजे मानण्यांत येऊं लागले.

हा बेत फसला असें पाहून तुर्कस्ताननें स्वतः नाहीं तरी दुसऱ्या मार्फत आपला डाव साधण्याचा प्रयत्न केला. परंतु याहि डावांत तुर्कस्तानला यश आले नाहीं आणि तह करावा लागला.

यू रो पी य व र्च स्वा चा इ ति हा स.—प्रथम पोर्तुगीज लोक अरबस्तानांत आले. १५०६ मध्यें त्यांनीं होर्मझ हें ठाणें घेतलें. नंतर १६५० त मस्कत हें शहर घेतलें. पोर्तुगीज लोकांनंतर ओमन येथें इराणचें वर्चस्व होतें. नंतर १७५९ मध्यें घफरी घराण्यांतील अहमद इब्न सय्यद ह्यानें इराणी लोकांना हांकून लाविलें. नंतर १७९८ मध्यें त्याचा मुलगा ओमनच्या गादीवर बसला. ह्याच्या मनमिळाऊ-पणामुळें आणि सात्विक धोरणामुळें राज्याला बळकटी येऊन बराच विस्तार झाला. ह्याचे साहाय्यकर्ते इंग्रज होते.

१८५६ त हा वारल्यानंतर त्याच्या मुलांमध्यें गादी-विषयीं तंटे उपस्थित झाले. शेवटीं थुवेनी हा इंग्रजांच्या मदतीनें विजयी झाला, व फ्रेंच आणि इंग्रज यांच्यामध्यें करार होऊन ओमनच्या सुलतानची स्वतंत्रता प्रस्थापित झाली. १८६६ त तो वारल्यावर त्याचा मुलगा सय्यद तुर्की ह्यानें १८८८ पर्यंत गादी संभाळली. नंतर फीसल (सय्यदचा मुलगा) गादीवर आला. इंग्रजांच्या संमती-शिवाय ह्यानें परराष्ट्रीय कारभार कांहीं करूं नये ह्मणून हिंदुस्थानच्या तिजोरींतून त्यास खंडणी देण्यांत येऊं लागली.

१८३९ त इंग्रजांनीं एडन घेतलें. १८५७ पासून पेरीम बेट इंग्रजांच्या ताब्यांत आहे. तुर्कस्तान व इंग्रज यांची अरबस्तानांतील सरहद्द कायम करण्याकरितां एका मंडळाची योजना झाली व १९०५ मधील रिपोर्टाप्रमाणें बहुतेक सर्व दक्षिण अरबस्तान इंग्रजांच्या सत्तेखालीं आला.

हेजाझ आणि येमेन हे प्रांत तुर्कस्तानच्या ताब्यांत होते. येमेन येथें १९०४ च्या सुमारास बंड उपस्थित

झालें होतें, परंतु लवकरच त्याचा तुर्की शिपायांनीं मोड केला.

अ ली क डी ल इ ति हा स.—जागतिक युद्धापूर्वी खलीफ या नात्यानें सुलतानाची धार्मिक सत्ता असल्यामुळें अरबस्तान हा ऑटोमन साम्राज्याचा एक भाग म्हणून गणला जात असे. तथापि वस्तुस्थिति अशी होती कीं, अरबस्तानांत पुष्कळ लहान लहान स्वतंत्र राज्यें होतीं व त्यांपैकीं कांहीं खलीफाची आधिसत्ता अंशतः मान्य करीत असत. दुसरीं कित्येक ब्रिटिश संरक्षणाखालीं आलीं होतीं. तुर्कांचा प्रत्यक्ष अम्मल हेजाझ प्रांत, मक्का, मदीना हीं पवित्र शहरें, असीर व येमेन या प्रांतांतील कांहीं शहरें व बंदरें वगैरे भागावर मात्र होती हेजाझ रेल्वे ही तुर्कांची सत्ता अरबस्तानावर दृढ बसविण्याकरितांच बांधण्यांत आली होती; पण ही लाईन एकतृतीयांश भागावरच होती व तेवढीहि नीट चालविणें तुर्कांकडून झालें नाहीं व बाकीचा भाग सुधारण्याचें काम तुर्कांकडून झालें नाहीं, जागतिक युद्धानंतर तुर्कांची अरबस्तानावरील सत्ता सर्वस्वी नाहींशी झाली आणि १९२१ मध्यें पुढील स्वायत्त राज्यकर्ते प्रस्थापित झालेले आहेतः—हेजाझचा राजा, नेज्द व एलहासचा अमीर, जेबेलशामरचा अमीर, असिरमधील साबियाचा संस्थानिक, येमेनचा इमाम, ओमनमधील मस्कतचा सुलतान, हाद्रामौतचा सुलतान, कुवैतचा शेख, कातारचा शेख वगैरे.

हेजाझचें राज्यः—जागतिक युद्धाच्या वेळीं जर्मनपक्षानें तुर्कस्तानाकरितांच धर्मयुद्ध चालू आहे, अशी चिथावणी अरबी मुसुलमानांमध्यें सुरू केल्यामुळें ग्रेटब्रिटन व दोस्त राष्ट्रें यांनां अरबस्तानांत कांहीं संकटांनां तोंड द्यावें लागलें. तांबडा समुद्र तुर्कांच्या ताब्यांत गेल्यास पूर्वेकडील दळणवळणाचा सुवेझमार्ग बंद होईल, अशी भीति पडल्यामुळें ग्रेट ब्रिटननें मक्केच्या शेरीफाकडे वळण बांधलें. शेरीफचें धार्मिक वजन मोठें असल्यामुळें त्यानें युद्ध धार्मिकस्वरूपाचें नाहीं, असें ठरवून युद्धांत पडण्यास मनाई केली तर अरबी मुसुलमान ऐकतील असा भरंवसा होता, व त्या मक्केच्या शेरीफला उर्फ अमीराला हेजाझच्या ऑटोमन सत्तेंतून मोकळे होण्याचीहि इच्छा होती. इ. स. १९१५ मध्यें मक्केच्या या शेरीफ हुसेननें बंड करून स्वतंत्र होण्याची इच्छा दोस्त राष्ट्रांस जाहीर केली. तेव्हां दोस्तांनीं त्याला द्रव्य व दारूगोळा वगैरे युद्धसामुग्री पुरविण्याचें कबूल केलें. १९१६ मध्यें शेरीफनें बंड उभारून आपल्या स्वातंत्र्याचा जाहीरनामा काढला. त्याच्याविरुद्ध धाडण्यास तुर्कांजवळ मोठें सैन्य रिकामें नसल्यामुळें शेरीफला 'अरबांचा सुलतान' म्हणून आसपासच्या बऱ्याचशा संस्थानिकांनीं मान्यता दिली. नंतर त्यानें लवकरच 'हेजाझचा राजा' ही पदवी धारण केली व त्या गोष्टीला ग्रेटब्रिटन, फ्रान्स व इटाली यांनीं मान्यता दिली. युद्धसमाप्तीनंतरच्या तहपरिषदेंत हेजाझच्या राज्याचा स्वतंत्र प्रतिनिधीहि घेण्यांत आला व १९२० मध्यें राष्ट्रसंघामध्यें हेजाझ राज्याला प्रतिनिधित्वाचा हक्क मिळाला. तुर्कस्तानबरोबरच्या तहांत तुर्कांनीं अरबस्तानावरील सर्व सत्ता सोडून दिली.

१९२० मध्यें हेजाझच्या हुसेन राजाचा नेज्दच्या अमीराबरोबर सरहद्दीबाबत तंटा होऊन लढायाहि झाल्या व १९२१ मध्येंहि हें भांडण मिटलें नव्हतें.

म ध्य अ र ब स्ता नां ती ल रा ज्यें.—मध्यभागांत नेज्द ( राजधानी रियाध ) व जेबेल शामर ( राजधानी हेल) हीं दोन राज्यें आहेत. नेज्दच्या अमीरानें १९१४ मध्यें ब्रिटिश सरकारशीं दोस्तीचा करार केला व तो युद्धांत शेवटपर्यंत पाळला. उलटपक्षीं जेबेल शामरचा अमीर तुर्कांनां मिळाला होता. त्यामुळें या दोघां अमीरांमध्यें लढाया झाल्या. त्यांत यशस्वी होऊन नेज्दच्या अमीरानें मध्य अरबस्तानांत आपली सत्ता पूर्णपणें प्रस्थापित केली. नेज्दचा अमीर हेजाझच्या राजाची धार्मिक किंवा राजकीय कोणतीहि अधिसत्ता मान्य करीत नाहीं.

'जेबेल शामर'च्या अमीरानें जागतिक युद्धांत तुर्कांच्या बाजूला मिळून त्यांना उंट वगैरेंची पुष्कळ मदत केली; पण या युद्धांत पुढें त्याची सत्ता मुलुखदृष्ट्या व आर्थिकदृष्ट्या बरीच कमी झाली.

असुरः—या राज्याची सरहद्द अद्याप नक्की ठरलेली नाहीं, तरी साधारणपणें हेजाझ व येमेन यांच्यामध्यें हा मुलुख आहे व पूर्वेस नेज्दचें राज्य आहे. याचे उंच प्रदेश व सखल प्रदेश असे दोन भाग असून या दोन भागांतील लोकांत राजकीय व सामाजिक भेद फार तीव्र आहे. येथील लोक स्थायिक आहेत. कारण हा मुलुख शेतकीला सोयीचा असल्यामुळें भटकत हिंडण्याची जरूरी नाहीं. येथील बहुतेक लोक सुनी मुसुलमान व कांहीं वाहाबीपंथीहि आहेत. जागतिक युद्धापूर्वी या प्रांतावर एकछत्री सत्ता कोणाचीच नव्हती; कांहीं भागावर तुर्कांचा, कांहींवर मक्केच्या शेरीफचा, कांहींवर आबु अरिशच्या इद्रिसीचा व कांहींवर केवळ भटक्या लोकांचा अंमल होता; पण तुर्क सर्व प्रांतांवर अधिसत्ता सांगत असत. जागतिक युद्ध चालू असतां इद्रिसी सय्यद महंमद याची इच्छा तुर्की अंमल नष्ट करून स्वतःचें वर्चस्व सर्व प्रांतांवर स्थापण्याची फार असल्यामुळें त्यानें तुर्कांविरुद्ध लढण्याचें जाहीर करून एडनच्या ब्रिटिश रेसिडेंटबरोबर १९१५ मे. मध्यें करार केला व दोस्त राष्ट्रांपासून युद्धसामुग्रीची मदत मिळविली. तथापि त्याला स्वतःची सत्ता थोडीशी वाढवितां आली. येमेनच्या इमामाबरोबर त्याचें शत्रुत्व असल्यामुळें तिकडून हल्ला होण्याची त्याला भीति सतत होती. युद्धोत्तर कालांत (१९२१ मध्येंहि) या राज्याच्या सीमा नक्की ठरलेल्या नाहींत.

येमेनः—असुरप्रमाणेंच येथेंहि उंच व सखल प्रदेशांतील लोकांत धार्मिक व वांशिक मोठा तीव्र भेद आहे. उंच

प्रदेशांतील लोक शियापंथाचे असून तिहमकडील शफीपंथाचे आहेत. तसेंच राजकीय सत्ता कांहीं लोक तुर्कांची मानीत, तर कांहीं इमामाची मानीत.

इ.स.१९०४मध्यें यह्या इब्न महंमद सत्ताधीश झाल्यावर त्यानें तुर्कीसत्तेविरुद्ध बंड केलें. उभयपक्षीं बरीच वर्षे विरोध चालू असून अखेर १९१३ मध्यें तह झाला व बादशाही फर्मान निघून इमामाची असुरपासून एडनपर्यंतच्या सर्व उंच प्रदेशावर सत्ता मान्य करण्यांत आली. जागतिक युद्ध सुरू झाल्यावर १९१५ मध्यें त्यानें आपली सहानुभूति तुर्कांनां दाखविली; पण तो युद्धांत प्रत्यक्ष सामील झाला नाहीं. युद्ध समाप्तीनंतर १९१८ मध्यें ब्रिटिश हिंदी सैन्यानें होदीदा बंदरांत तळ दिला व इमामाबरोबर दोस्तीचा करार ठरविण्याची खटपट सुरू झाली; पण १९२१ पर्यंत या प्रयत्नांनां निश्चित स्वरूप कांहींच प्राप्त झालें नाहीं.

इ रा णी आ खा ता व री ल सं स्था नें.—हीं सर्व आतां ब्रिटिश नियंत्रणाखालीं आलीं असून त्यांच्या परराष्ट्रीय राजकारणावर ब्रिटिशांचा ताबा आहे. अन्तर्गत कारभाराची सत्ता मात्र त्यांनां ब्रिटिश सरकारनें दोस्ती कायम राखण्याच्या अटीवर दिली आहे. हीं संस्थानें ओमन, ट्रुशियल ओमन, एल काटर, बहरीन व कुवैत अशीं आहेत. १९२१ मध्यें ब्रिटिश नियंत्रणाखालचा अरबी प्रदेश व एडन यांचा कारभार वसाहतखात्याकडे दिला असून हेजाझसंबंधाची व्यवस्था मात्र परराष्ट्रीय राजकारणाच्या स्टेट सेक्रेटरीकडे ठेविल्याचें ब्रिटिश पार्लमेंटांत जाहीर करण्यांत आलें.

इ. स. १९२१पासून निरनिराळी अरब संस्थानें सुसंघटित ण्याची व त्यांचा संघ बनवून अरबस्तान पूर्ण स्वतंत्र करकरण्याची चळवळ चालू आहे. १९२१ आगष्ट मध्यें अमीर फैसूल याला इराकचा राजा या नात्यानें राज्याभिषेक करण्यांत आला.वाहाबी टोळीचा प्रमुख अमीर इब्न साऊद याला ब्रिटिश सरकार शांतता व सुव्यवस्था राखण्याबद्दल मदत म्हणून सालिना ६०,००० पौंड देतें; ह्याच १९२१ आगष्ट पासून मध्यवर्ती अरब संस्थान मेज्द याचा सुलतान म्हणून राज्य करीत असून त्यानें फैसूल राजाशीं दोस्ती ठेवण्याचें जाहीर केलें आहे. १९२२ डिसेंबरमध्यें मार्क्विस कर्झननें तुर्कस्तानच्या सत्तेखालून अरबांनां सोडवून स्वतंत्र करण्याची ब्रिटनची इच्छा असल्याचें जाहीर केलें. १९२३ फेब्रुवारी मध्यें अंगोरा सरकारनें हेजाझचा हुसेन राजा हा सर्व अरब राष्ट्रांचा मुख्य अधिपति असल्याचें जाहीर केलें, आणि हेजाझ, सीरिया, पॅलेस्टाइन व मेसापोटेमिया हीं स्वतंत्र असल्याचें कबूल केलें (१९२३.मार्च) प्रमुख अरब संस्थानांचे प्रतिनिधी लंडन येथें जमले, आणि त्यांनीं सीरिया, पॅलेस्टाइन, इराक, हेजाझ, येमेन, असुर, नेज्द व मस्कत या सर्वांचा मिळून संयुक्त संस्थानसंघ (ग्रेट अरब कान्फिडरेशन) बनविण्याची सूचना केली. ब्रिटननें ट्रान्स जार्डोनियाचें स्वातंत्र्य कबूल केलें, पण पॅलेस्टाइनचा अरबी मुलुखांत समावेश होत नाहीं असें जाहीर केलें. जून १९२३ मध्यें जाफा येथें पॅलेस्टाइनच्या अरब काँग्रेसनें आंग्लो–अरब तहांतील पॅलेस्ताइनसंबंधाचा करार अमान्य केला. आंग्लो–अरब तहानें अरबाचें स्वातंत्र्य मान्य करण्यांत आलें. सप्टेंबरमध्यें हेजाझच्या राजानें पॅलेस्टाईनमध्यें राष्ट्रीय सनदशीर सरकार स्थापण्याचें कबूल केलें. १९२३ सप्टेंबरमध्यें ट्रान्सजार्डिनियांत अमीर अबदल्लाविरुद्ध बंड झालें तें असुरच्या फौजेनें लवकरच मोडलें.

अरबस्तानांत गुलामांचा व्यापार अद्याप चालू आहेत तांबड्या समुद्राच्या कांठचे रानटी लोक पकडून ते मोठ्या किंमतींना विकले जातात.

**अरबीपाशा**—(सुमारें १८३९–१९११) हा इजिप्त मधील योद्धा व राज्यक्रांतिकारक पुढारी १८३९–किंवा १८४० मध्यें फेल्ला कुळांत जन्मला. सैन्यांत साधारण दर्जाची सक्तीची नोकरी केल्यावर वाढतां वाढतां तो १८६२ मध्यें एक सैन्याधिकारी बनला. व १८७५ त इस्माइलपाशाच्या आधिपत्याखालीं जी अबिसीनियन मोहीम झाली तींत तो होता. याच मोहिमेंत पैसे खाल्ल्याचा त्याच्यावर आरोप आला होता पण तो शाबीत झाला नाहीं, तथापि त्याला अर्ध्या पगारावर ठेविलें. या अवधींत इजिप्शियन सैन्याची तुर्की अधिकाऱ्यांपासून सुटका करण्याकरितां अलीरुबीनें स्थापलेल्या गुप्त कटांत तो सामील झाला. एलअझारच्या मशीदींत चाललेल्या व्याख्यानमालेंत भाग घेऊन उत्तम वक्ता अशी त्यानें प्रसिद्धी मिळविली. इ.स.१८७८ मध्यें नूबर रिव्हर्स विल्सन, आणि डी ब्लिगनिएरेस, यांच्या मंत्रीमंडळाविरुद्ध अराजकता माजविण्याच्या कामीं इस्माइलनें त्याला नेमिलें व मोबदला म्हणून आपल्या जनानखान्यांतील एक बायको, व एका तुकडीचें आधिपत्य त्याला अर्पण केलें. यामुळें गुप्त संघांतील त्याचें वजन वाढून यूरोपियन लोकां विरुद्ध त्या संघानें चळवळ चालविली. पुढील सर्व कृत्या-असंतोषी इजिप्शियनांचा पुढारी म्हणून अरबीचें नांव पुढें करण्यांत आलें होतें. पण वास्तविक पाहतां अलीरुबी आणि महमद समी यासारख्या वरचढ माणसाच्या हातातील तो केवळ बाहुलें व त्यांचें मुख बनला होता.इ.स.१८८१च्या फेब्रुवारी महिन्याच्या पहिल्या तारखेस अरबी आणि दोन इतर इजिप्शियन सेनाधिकारी यांनां लष्करी न्यायकोर्टापुढें ओढून आणिलें पण त्यांच्या सैनिकांनीं त्यांनां सोडविलें. यामुळें खेदीवाला आपल्या त्यावेळच्या युद्धमंत्र्याला पदच्युत करून त्या जागीं महंमूद समीला नेमावें लागलें.ता.८सप्टेंबर १८८१ या दिवशीं अरबीनें सैनिकांचा पुढाकार घेऊन खेदीवाला सैन्याची संख्या व पगार वाढविणें भाग पाडून शिवाय रियाजपाशा या मुख्य प्रधानाच्या जागीं सेरिफपाशा आणि शिष्ट लोकांचें एक सल्लागार मंडळ नेमणें भाग पाडिलें. इ.स.१८८२ च्या आरंभीं हा अरबी युद्धखात्याचा दुय्यम चिटणीस झाला तरी आपली कारस्थानें त्यानें सोडलीं नाहींत. बजेटावर मतें

देण्याचा हक्क शिष्ट सल्लागार मंडळानें जेव्हां मागितला तेव्हां इजिप्शियन जमावसुली खात्याची व्यवस्था ठेवण्याकरतां नेमलेल्या परकी नियामक अधिकाऱ्यांशीं तंटा होण्याचा प्रसंग उद्भवला. फेब्रुवारी महिन्यांत सेरीफ जाऊन महंमूद समी जेव्हां मुख्य दिवाण झाला तेव्हां अरबीपाशा युद्धमंत्री बनला. ब्रिटिश सरकारला घाबरून सोडण्याजोगी मुखत्यारी त्यानें लवकरच मिळविली. जूनच्या आरंभीं ब्रिटिश आणि फ्रेंच लढाऊ गलबतें अलेक्झँड्रियाला आलीं, व त्या शहरांत त्या महिन्याच्या अकराव्या तारखेस दंगा होऊन अनेक यूरोपियनांचे बळी पडले. तेव्हां अरबीनें मध्यें पडून शांतता केली पण आतां त्याचा कल उघडपणें यूरोपियनांविरुद्ध दिसला. अलेक्झँड्रिया येथील त्यानें चालविलेल्या किल्ल्यांचा बंदोबस्त ब्रिटिश आरमारला तोंड देण्याकरितां होता असें समजण्यांत येऊन, फ्रान्सची मदत नसतांना सुद्धां ब्रिटिश आरमारानें किल्ल्यावर तोफा डागल्या, आणि तेलेल केबीर येथें सर गारनेट वूल्सले यानें अरबींचा पराभव केला. अरबी केरोला पळाला; पण तेथें शरण आल्यावर बंड करण्याच्या गुन्ह्यावरून त्याची चौकशी चालविली. अरबीनें गुन्हा कबूल केल्यावर फांशीची शिक्षा रद्द करून सिलोनला हद्दपार करण्यांत आलें. महंमूद समी आणि इतर यांनां हीच शिक्षा देण्यांत आली. शिक्षा जन्मठेप होती तरी सुमारें वीस वर्षांनीं आपल्या अधिकारांत १९०१ सालच्या मे महिन्यांत खेदिवानें अरबीला इजिप्तला परत येण्याची परवानगी दिली. १८८१–१८८२ च्या चळवळींत अरबी हा खरा प्रोत्साहन देणारा नसून केवळ पुढें दिसणारा मनुष्य म्हणून होता. व ज्यांच्या हातांतलें बाहुलें होऊन तो राहिला होता त्यांच्यापेक्षां तो कमी हुषार असला तरी जास्त प्रामाणिक होता हा १९११ मध्यें मृत्यु पावला.

**अरबी समुद्र**—हिंदी–महासागराचा भाग. याला पूर्वेस हिंदुस्थानानें, उत्तरेस बलुचिस्तान आणि इराणचा दाक्षिणभाग यांनीं, पश्चिमेस अरबस्तानानें, आणि दक्षिणेस कन्याकुमारी व केप गार्डाफुइ यांमधील रेषेनें मर्यादीत केलें आहे. त्याच्या दोन शाखा आहेत. त्या नैर्ऋत्येला बाबेल मँडेबच्या सामुद्रधुनीच्या मार्फत तांबड्या समुद्राला मिळणारें एडनचें आखात' आणि वायव्येला इराणच्या आखाताला मिळणारें ओमानचें आखात या होत. वरील शाखांखेरीज खंबायतचें आखात आणि कच्छचें आखात हींहि आहेत. हिंदुस्थान आणि यूरोप यांच्यामधील प्रमुख रस्त्याचा भाग म्हणून अरबीसमुद्राला महत्त्व आहे. यांतील द्वीपें फार लहान व अप्रसिद्ध आहेत. यांपैकीं मुख्य म्हणजे सोकोत्रा आणि लखदीव बेटें होत.

**अरबेला**—हें अदियाबेन मधील एक प्राचीन शहर आहे. हें असुरियन व त्या पूर्वीच्या काळीं लहान मोठ्या झाब नद्यांच्यामध्यें असलेल्या प्रदेशाची राजधानी होतें. इशतारच्या संप्रदायाचें हें महत्त्वाचें ठिकाण होतें. जुन्या पुस्तकांत सिकं-दरनें डरायसचा पराभव इ. स. पूर्वी ३३१ त अरबेला येथें केला असें दिलें आहे. तरी पण ही लढाई अरबेलापासून ६० मैलांवर गौगामेला येथें झाली असावी. आधुनिक एरबिल अथवा अरबिल मोसल जिल्ह्यांत असून, मोसलकडून बगदादकडे जाण्याच्या रस्त्यावर ४० मैलांवर आहे.

इ. स. ११८४ त ह्या शहरांत अयूबाईट सुलतान सलादीननें आपलें ठाणें दिलें. १२३३ त हें शहर बगदादच्या खलीफांनां मृत्युपत्रद्वारें मिळालें. मोंगलांनीं १२३६ त व तैमूरनें १३९३त अरबेला लुटलें. नादीरशहानें १७३२ त हें शहर घेतलें. १४ व्या शतकांत ख्रिश्चन लोकांनां तेथून हांकून लाविलें. येथील लोकसंख्या २००० पासून ६००० पर्यंत असून बहुतेक कुर्द लोक आहेत.

पॅलेस्टाईन मधील दुसऱ्या अरबेलाचे अवशेष गॅलीलीच्या समुद्राच्या पश्चिम किनाऱ्याजवळ आहेत. वादी ह्मामच्या जवळील गुहांमुळें याची प्रसिद्धि आहे. अरबेलाच्या लोकांनीं सीरियाच्या डेमेट्रिअसच्या सेनापतीनें स्वारी केली असतां या गुहेचा आश्रय घेतला. त्याच मोठ्या गुहेंत हेराडच्या वेळेस लुटारूंची वस्ती होती.

**अरराज**—(बंगाल इलाखा. ) चंपारण जिल्ह्यांतील एका विभागाचें मुख्य ठिकाण. २६° ३४' उत्तर अक्षांश ८४° ४०' पूर्व रेखांश यांवर. लोकसंख्या ( १९०१ ) ११०७. गांवाच्या नैर्ऋत्येस सुमारें एक मैलावर एक उंच दगडी स्तंभ असून त्यावर अशोक लिपींत लेख खोदलेले आहेत. हा स्तंभ एकच दगडाचा असून तो ३६.५ फूट उंच आहे. व त्याचा व्यास पायथ्याशी ४१.८ इंच व टोंकाशीं ३७.६ इंच आहे.

**अरवंतघाट**—( मद्रास इलाखा. ) निलगिरी जिल्हा. कुन्नुर तालुका. उच्चुतलाई खेड्याची वाडी. ११° २२' उत्तर अ. ७६° ४५' पूर्व रे यांवर. निलगिरी पठारावरील एका खोऱ्यास या वाडीचें नांव मिळालें असून या ठिकाणीं बिन धुराची दारू तयार करण्याचा कारखाना सरकारनें काढला आहे. येथील यंत्रें विजेच्या साहाय्यानें चालतात व वीज तीन मैलांवर असलेल्या कातेरी नांवाचा धबधबा आहे त्या ठिकाणीं उत्पन्न करितात. यामुळें या खेड्यास बरेंच महत्त्व आलें आहे. या कारखान्याजवळूनच उटकमंडला जुना रस्ता गेला आहे.

**अरवली पर्वत**—राजपुताना व अजमीर-मेरवाड या भागांत ईशान्यदिशेस ३०० मैल लांबवर पसरलेल्या ह्या पर्वतओळी असून २४° ते २७° १०' उत्तर अक्षांश व ७२°ते ७५° पूर्व रेखांश यांच्या दरम्यान आहेत. सर्व पर्वत कडे व शिखरे यांनीं व्यापलेला असून रुंदी ६ पासून ६० मैलापर्यंत आहे. एक हजार ते तीन हजार फुटापर्यंत एकंदर उंची असून "माउन्ट अबू" उर्फ अबूचा पहाड हें ५६५३ फूट उंचीवरचें नैर्ऋत्येकडील एक अति उंच शिखर आहे.

विष्णुपुराणांतील 'पारिपात्र' आणि टॉलेमीनें उल्लेखिलेला 'अपोकोपी मांटे डेओरम पोना अपेलटी' डोंगर, हांच अरवली डोंगर होय असें विद्वानांनीं ठरविलें आहे. हा डोंगर राजपुतान्याचे दोन भाग करतो. याच्या उत्तरेकडील व पश्चिमेकडील प्रदेश रेताड आहे. राजपुतान्याचा सुमारें ३/५ भाग या डोंगरांच्या वायव्येस असून बाकीचा आग्नेयीस आहे.

ईशान्येकडून या डोंगराची तपासणी करीत गेल्यास जयपूर संस्थानाच्या उत्तरेस असलेल्या खेत्रीजवळ ( २८° उत्तर अ. आणि ७५°४७' पूर्व रे. ) हे डोंगर जास्त प्रामुख्यानें आढळतात. बबई नांवाच्या खेड्याजवळ याची समुद्रसपाटीपासून उंची २५९४ फूट आहे. या ठिकाणापासून त्यांना नैर्ऋत्य दिशेस वळण मिळालें असून खोली ( ३२१२ फूट ), रघुनाथगड ( ३४५० फूट ) व सीकर जमीनदारांतील हरसनाथ नांवाचा पवित्र डोंगर ( २९९८ फूट ) हे लागतात. अजमीर शहर ज्या तारागड किल्ल्यांच्या टप्प्यांत आहे तो किल्ला यांपैकींच एका डोंगरावर आहे. अजमीरहून सुमारें दहा मैलांवर या डोंगरांचा मागमूस दिसत नाहीं. तथापि बेवारच्या आसपास हेच डोंगर पुन्हां दिसू लागतात. या ठिकाणीं मेवाडचें पठार व मारवाड यांच्या दरम्यान ते पसरले आहेत.

अरवली डोंगराची आग्नेय दिशेकडील चढण डोंगराच्या माथ्यावर गेलें तरी मुळींच भासत नाहीं; परंतु पश्चिमेकडील उतार अतिशय उभा आहे. अजमीरच्या दक्षिणेकडील डोंगरांत जंगल साधारण असून आंत रानटी जनावरेंहि ( वाघ, अस्वल इत्यादि ) आढळतात. पश्चिमेकडील भागास पाऊस मिळण्याचा संभव असल्यामुळें या बाजूस पूर्वेकडील भागापेक्षां साहजिक जास्त जंगल आहे.

भूस्तरशास्त्रदृष्ट्या फार प्राचीन काळीं हे डोंगर अति उंच असावेत व त्या काळापासून त्यांचा पायथा भरत भरत हल्लीं त्याची उंची या स्थितीप्रत आली आहे. या डोंगरांत ग्रानाइट, नीस, क्वार्टझाइट्स यांसारखे खडक असून त्यांत प्राण्यांचे किंवा वनस्पतींचे अवशेष अद्यापि कोणास सांपडले नाहींत.

मेर नांवाचे रानटी लोक मूळचे या पहाडी मुलुखांतले होत. ब्रिटिश राजसत्ता प्रस्थापित होण्यापूर्वी म्हणजे इ. स. १८१८ सालापूर्वी हे मेरलोक रानटी स्थितींतच होते. पुढें संसर्गानें कालांतरानें या लोकांत बरीच सुधारणा होऊं लागली. सरकारानें यांची एक वेगळी "मारवाड पलटण" तयार केली व तिची गणना ब्रिटिश लष्करांत होऊं लागली. लॉर्ड किचनेर यांच्या १९०३ सालच्या योजनेप्रमाणें "पन्नासावें मारवाड पायदळ" तयार करण्यांत आलें. पर्वताच्या उत्तर बाजूकडील पाणी, कच्छच्या आखातास मिळणाऱ्या "लुनी" व साखीं या दोन नद्या वाहून नेतात. त्याचप्रमाणें दक्षिणेकडील पाणी ओढ्यांनीं व यमुना नदीस मिळणाऱ्या चंबळ नदीच्या द्वारें वाहून नेलें जातें.

**अरसीसिंह**—( इ. स. १७६१--१७७२ ) उदेपूरचा राणा अरसीसिंह उर्फ अरिसिंह हा दुसऱ्या राजसिंहाचा चुलता असून त्याच्या मागून वि. सं. १८१८(इ.स. १७६२) मध्यें गादीवर बसला. वि. सं.१८०८( इ. स. १७५२ ) मध्यें अंबरच्या माधवसिंहानें स्वतःस कांहीं हक्क नसतां मेवाडचा रामपुरा महाल होळकरास देऊन टाकला. ही एक बाब बगळली तर आतांपर्यंत मेवाडचा एक तसूभरहि मुलूख लोकांकडे गेला नव्हता. परंतु अरसीसिंहाच्या कारकीर्दीपासून मात्र मेवाडच्या राज्यास ओहोटी लागण्यास सुरुवात झाली. प्रथम, वि. सं. १८२० ( इ. स. १७६४)सालीं मल्हारराव होळकरानें बाजीरावानें बसविलेली खंडणी वसूल करण्याकरितां म्हणून उदेपूरवर स्वारी करून तेथील खजिन्यांतून ५१ लक्ष रुपये नेले. याच वर्षी मेवाडमध्यें मोठा दुष्काळ पडून धारण रुपयास पाऊणशेर झाली.

**फितुरी पक्षाचें बंड.**—यानंतर चार वर्षांनीं राज्यांत अंतःकलह माजून भाऊबंदीच्या लढाया सुरू झाल्या. या बंडाचें खरें कारण काय होतें तें कळत नाहीं. तथापि असें दिसतें कीं, अरसीसिंहानें आपल्या उद्दाम वर्तनानें आपल्या पदरचे साद्रीचा ठाकूर व देवगडाचा यशवंतसिंह चोंडावत यांचीं मनें दुखविल्यामुळें ते त्याच्याविरुद्ध उठले व लवकरच त्यांना राज्यांतील सूक्तावतादि दुसरे कित्येक ठाकूर येऊन मिळाले. या सर्वांनीं मिळून अरसीसिंहास पदच्युत करण्याचा निश्चय करून मागील राण्यास त्याच्या मृत्यूनंतर गोगुंडावाल्या राजकन्येपासून झालेला रत्नसिंह नांवाचा एक तोतया त्यांनीं उभा केला. रत्नसिंह हा राजसिंहाचा खरोखरच मुलगा होता किंवा नाहीं याबद्दल राज्यांत द्विधा मत होतें. तथापि या फितुरी पक्षानें रत्नसिंहासच मेवाडचा राणा असें जाहीर करून कमलमीर येथें त्यास गादीवर बसविलें. इतकेंच नव्हे तर त्यांनीं 'अरसीसिंहास पदच्युत केल्यास सवा कोट रुपये बक्षीस देऊं' अशी लालूच दाखवून शिंद्यालाहि आपल्या मदतीस बोलाविलें.

**उज्जनीची लढाई.**—या वेळीं कोट्याचा जालिमसिंह हा अरसीसिंहाच्या दरबारीं असून त्याजपाशीं त्याचें वजनहि बरेंच होतें. त्याच्याच सांगण्यावरून राण्यानें रघू पैगावाला व दौलामिया [?] या दोन मराठे सरदारांना आपल्या मदतीस बोलाविलें. शिवाय त्यानें पूर्वापारपासून पांचोलीकडे राज्याचा कारभार होता तो काढून अगरजी मेहता नांवाच्या एका इसमाकडे सोंपविला. राज्यांतील मुख्य सोळा सरदारांपैकीं फक्त पांचच राण्याच्या पक्षाकडे राहिले असल्यामुळें राण्याच्या पक्षाची स्थिति चिंताजनकच होती. म्हणून त्यानें महादजी शिंदे उज्जनीस होता त्याच्याकडे मदतीची याचना केली ( वि. सं. १८२४--इ. स. १७६८ ). पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. कारण, तोतयाच्या पक्षानें महादजीशीं

अगोदरच संधान बांधून त्याची मदत मिळवून ठेविली होती. इतकेंच नव्हे तर तो क्षिप्रातीरीं महादजीच्या छावणीशेजारी छावणी देऊनहि राहिला होता.तथापि अशा स्थितींतहि बिलकुल न कचरतां राण्याच्या सैन्यानें विरुद्ध पक्षाच्या संयुक्त छावणीवर हल्ला करून शत्रूच्या लोकांची दाणादाण केली व ते उज्जनीच्या दरवाज्यापर्यंत शत्रूचा पाठलाग करीत गेले. परंतु येथें राण्याचें सैन्य आपला जय झाला असें समजून लुटालूट करण्यांत गुंतलें असतां शत्रूस कुमक मिळून त्यानें राण्याच्या सैन्यावर उलट हल्ला केला. तेव्हां जी लढाई झाली तींत राण्याकडील साळुंब्रा, शहापुरा, बनेडा येथील मोठमोठे ठाकूर ठार झाले; स्वतः जालिमसिंहहि जखमी होऊन शत्रूच्या हातीं लागला. व राण्याच्या सैन्यास पराभव पावून उदेपूरला यावें लागलें.

उदेपूरचा वेढा.—आतां अरसीसिंहापाशीं उज्जनीच्या लढाईंत पडलेल्या साळुंब्रयाचा चुलता भीमसिंह व जयमल्लाचा वंशज बेदनोरचा राठोड ठाकूर हे दोघेच कायते नांव घेण्यासारखे सरदार राहिले होते. अशा स्थितींत मराठ्यांनीं चाल करून येऊन राजधानीस तीन बाजूंनीं वेढा घातला.पाश्चिम दिशेस मात्र तलाव असल्यामुळें त्या बाजूनें अरवलींतील राजनिष्ठ पहाडी लोकांकडून शहरांतील लोकांस धान्यादिकाचा पुरवठा होत राहिला.शहराचा बचाव सर्वस्वीं भाडोत्री सिंधी शिपायांच्या राजनिष्ठेवर अवलंबून होता. पण त्यांचें वर्तन तर दिवसानुदिवस इतकें उद्दामपणाचें होत चाललें होतें कीं त्यांची शेवटीं पगारासाठीं राण्याचा अंगरखा खेंचण्यापर्यंत मजल गेली. तेव्हां साळुंब्रयाच्या ठाकुरानें दहा वर्षांपूर्वी अमरचंद बडवा म्हणून कारभारी होता त्याच्या हातीं पुन्हां सूत्रें देण्याचा राण्यास सल्ला दिला. हा अमरचंद मोठा तापट स्वभावाचा माणूस होता. तथापि त्याच्या वजनामुळें मागील कारकीर्दींत कित्येक आपत्तींपासून राज्याचा बचाव झाला होता. सिंधी शिपायांचा मेवाडांत प्रवेश देखील त्यानें कारभारांतून अंग काढून घेतल्यावरच झाला. अरसीसिंहानें अमरचंदाला बोलावून कारभार हातीं घेण्याबद्दल विनंति केली तेव्हां त्यानें आपला लहान मोठा कोणताहि हुकूम राण्यानें फिरवूं नये अशी अट घातली. या अटीवर राण्याकडून कारभार हातीं पडतांच त्यानें जामदारखाना उघडून त्यांतील जडजवाहिरादिकांच्या साहाय्यानें शिपायांचा पगार चुकता केला व दारूगोळ्याची उत्तम बेगमी करून ठेवली. अशा रीतीनें सर्व प्रकारें तयारी झाल्यामुळें शहरांतील सैन्यानें सहा महिनेपर्यंत वेढा देऊन बसलेल्या लोकांस दाद दिली नाहीं. तोतयाच्या पक्षानें उदेपुराबाहेर मेवाडच्या बऱ्याच भागावर अंमल बसविला होता तरी त्याच्याकडून शिंद्यास कबूल केलेली रक्कम पटविली जाण्याच्या रंग दिसेना. म्हणून मराठे उदेपूरपाशीं विनाकारण दिवस घालवीत बसण्यापेक्षां सत्तर लाख रुपये घेऊन वेढा उठविण्यास व तोतयाचा पक्ष सोडण्यास तयार झाले परंतु तह-वर सही होते न होते तोंच शहरांतील प्रतिकूल परिस्थितीच्या बातम्या कानीं पडल्यामुळें शिंद्यानें आणखी वीस लाखांची मागणी केली. हें पाहून अमरचंदाच्या तळव्याची आग मस्तकास गेली. त्यानें लागलीच तहाच्या कागदाच्या चिंध्या करून त्या मराठ्यांकडे परत पाठविल्या,व सिंधी शिपायांपुढें हृदयस्पर्शी भाषण करून व त्यांच्यामध्यें „बक्षीसें वांटून त्यांचा पूर्णपणें पाठिंबा मिळविला. एवढेंच करून तो थांबला नाहीं; त्यानें खास आपल्या मेहुण्याकडून उदाहरण घालून देऊन शहरांतल्या सर्व पेवांतील धान्य बाजारांत आणविलें व अशी दवंडी पिटविली कीं कोणीहि शिपाई धान्य मागण्यास येतांच त्यास सहा महिन्याची धान्यसामुग्री देण्यांत यावी. जेथें पूर्वी रुपायास अच्छेर पाऊण शेर धान्य मिळत होतें तेथें आतां धान्यच धान्य झालेलें पाहून मराठे आश्चर्यचकित झाले, व त्यानंतर शहरांतील लोकांचा उत्साहहि वाढलेला दिसून आला तेव्हां त्यांनीं आपण होऊनच तहाचें बोलणें लाविलें. परंतु आतां अमरचंदानें ओढून धरलें, व 'तुम्ही मागील तह मोडल्यामुळें आम्हांस जेवढा खर्च लागला तेवढा आतां पूर्वीच्या रकमेंतून वजा झाला पाहिजे असें तो म्हणूं लागला. अशा रीतीनें त्यानें शिंद्याला केवळ ६३॥. लक्ष रुपयांवरच समाधान मानून स्वस्थ बसावयास लाविलें.

खंडणीसाठीं मुलूख तारण.—यांपैकीं ३३ लक्ष रुपये जडजवाहीर, चांदीसोन्याच्या वस्तू वगैरेच्या रूपानें तावडतोबच शिंद्याच्या स्वाधीन करण्यांत आलें. बाकीच्या रकमेकरितां जावद, जीरण, नीमच व मोरवण या महालांचा वसूल लावून देण्यांत आला व रक्कम फिटेपर्यंत त्या महालांत दोनहि सरकारकडून अधिकारी नेमण्यांत यावे असें ठरलें. या करारा प्रमाणें सं. १८२५ (इ. स. १७६९) पासून सं. १८३१ (इ. स. १७७५) पर्यंत कोणी कोणाच्या हक्कांत दखल दिली नाहीं. परंतु इ. स. १७७५ सालीं शिंदे मेवाडच्या अधिकाऱ्यांना हांकून आपणच ते महाल अन्यायानें बळकावून बसला. पुढें इ. स. १८१७ सालीं मेवाडचा इंग्रजांबरोबर तह झाला तेव्हां मेवाडच्या वकिलांनीं आमचे महाल शिंद्याकडून आम्हांस परत दिले जावे अशी अट घातली. पण या मागील व्यवहाराची माहिती नसल्यामुळें म्हणा किंवा इंग्रज त्यावेळीं शिंद्यास दुखवूं इच्छित नव्हते म्हणून म्हणा हे महाल त्यावेळीं देखील मेवाडच्या राण्यास परत मिळूं शकले नाहींत.

गोदवाड प्रांताची तातूट.—शिंद्यानें तोतयाचा पक्ष सोडतांच तीन मुख्य ठाकूर सोडून त्याच्या बाजूस असलेले बाकीचे सर्व ठाकूर एकामागून एक पुन्हां मेवाडच्या राण्याकडे आले; व कमलमीर खेरीज करून कबजांत असलेला मुलूखहि बहुतेक सर्व भराभर सोडविण्यांत आला. गोदवाड प्रांत कमलमीराजवळ असल्यामुळें त्याचें उत्पन्न मात्र तोतयाच्या हातीं लागत होतें. तसें तें लागूं नये म्हणून मेवाडच्या राण्यानें अजीतसिंह, जो मेवाडच्या राण्यांनीं जोध-

पूर वसविलें जाण्याच्या पूर्वी मंदोडच्या प्रतिहारापासून जिंकून घेतला होता व ज्याची उत्तर सरहद्द कायम करण्याकरितां जोधाच्या कारकीर्दीत अनेक चोंडावतांचें रक्त खर्ची पडलें होतें तो सुपीक प्रांत, जोधपूरच्या विजयसिंह राजाच्या स्वाधीन केला. या प्रांताच्या उत्पन्नांतून जोधपूरच्या राजानें मेवाडच्या राण्यास. ३००० लढवय्ये लोक पुरवावे असा करार होता. अशा रीतीनें नाच्या आंखडल्या जातांच राहिलेले तीन ठाकूरहि सं. १८३१ (इ. स. १७७५) मध्यें तोत यास सोडून राण्याकडे आले, व तोतयाच्या खुळाचा समूल नायनाट झाला.

खू न.—वि. सं. १८२८ (इ. स. १७७२) मध्यें अरसीसिंह अहेरियाच्या उत्सवानिमित्त बुंदीच्या राज्यांत शिकार खेळावयास गेला असतां त्याचा तेथें खून झाला. अरसीसिंह व बुंदीचा राजपुत्र हे दोघे एका डुकराच्या मागें लागले असतां बुंदीच्या राजपुत्रानें एकाएकीं अरसीसिंहाकडे वळून उरांत भाला खुपसून त्याचा प्राण घेतला. कोणी म्हणतात बुंदीच्या व मेवाडच्या राजांत सरहद्दीबद्दल कांहीं तंटा होता म्हणून हा खून झाला. या विश्वासघाताच्या कृत्याचा बुंदीचा राजा व सर्व हाडा लोक यांनीं तीव्र निषेधच केला आहे व स्वतः खुनी माणसासहि मागून आपल्या कृत्याचा पश्चाताप झाला.तेव्हां अरसीसिंहाच्या उद्दामपणाचा मेवाडच्या ठाकुरांस वीट आल्यानें त्यांनींच बुंदीच्या राजपुत्रास चिथवून आपल्या राण्याचा खून केला अशी जी दुसरी दंतकथा आहे तींत सत्यता असण्याचा संभव आहे. अरसीसिंहास हंमीर व भीमसिंह असे दोन पुत्र होते [ टॉडचें राजस्थान ].

**अरसुपल्ली**—कोचीनप्रांतातील एका जातीचें नांव. हे लोक तेलगु, किंवा कानडी आहेत हें निश्चितपणें माहीत नाहीं. अरसु किंवा राजपिंडे ही जात म्हैसूरच्या राजांची आप्तसंबंधी आहे. हे शेतकींत किंवा म्हैसूरच्या राजवाड्यांत नोकरीस आहेत. राजपिंडे यांचा धर्म शैव व वैष्णवहि आहे. यांचे उपाध्याय ब्राह्मण आणि लिंगायत वडेर असतात. अरसु (= राजा) हा पळ्ळी आणि परैयन तामिळ जातींचा एक पोटवर्ग आहे. उर्स हें अरसु याचें संकुचित रूप असावें. हें नांव म्हैसूर राजघराण्याच्या मंडळींत आढळतें; जसें:—कांतराज उर्स. [ सेन्सस रिपोर्ट—कोचीन; थर्स्टन ].

**अरसूर डोंगर**—(मुंबई इलाखा.) महीकांठा एजन्सींतील पर्वत. दांता गांवाच्या उत्तरेस सुमारें १८ मैलांवर, अरवली पर्वताच्या नैर्ऋत्य कोंपऱ्याशीं व सरस्वती नदीच्या उगमाशीं जें आंबा भवानीचें (आंबाजीचें) प्राचीन देऊळ आहे त्याच्यामुळें हा डोंगर प्रसिद्ध आहे. वलभीच्या काळांत इ. स. ७४६ सालीं हें जितकें प्रसिद्ध होतें तितकेंच हल्लीं प्रसिद्ध आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. श्रीकृष्णानें रुक्मिणीचें हरण याच ठिकाणीं केलें अशी कथा आहे (उमरावती पहा). दरवर्षी नवरात्रांत या ठिकाणीं मोठी जत्रा भरते.आठव्या माळेस दांताचा राणा पूजेस हजर असतो.देऊळ कधीं बांधलें याचा पत्ता लागत नाहीं. देवळाच्या कांहीं खांबावर सोळाव्या शतकांतील शिलालेख आहेत.अंबाभवानीच्या देवळाच्या आग्नेयीस चार मैलांवर कोटेश्वर महादेवाचें देऊळ आहे. भवानीच्या यात्रेस आलेले यात्रेकरू या देवाचें दर्शन घेण्यास येतात व सरस्वती नदींत स्नान करतात. ( बॉं. गॅ. पु. ५; अंबाभवानी पहा )

**अरहर-नवरगांव**—तहशील ब्रह्मपुरी; जिल्हा चांदा. ब्रह्मपुरीपासून दोन मैलांवर हें खेडें आहे. सुमारें ५० वर्षीं पूर्वी.हा गांव हल्लींचे मालगुझार दाजी राघव यांनीं २००० रुपयांस ( नागपुर नाणें ) विकत घेतला. येथील लोक सुखी आहेत. महारलोक देखील कर्जाऊ पैसे देण्याचा धंदा करतात. येथें शाळा आहे. लोकवस्ती २२३१ ( सन. १९०१ ).

**अरा** [१]—जशपूर संस्थानांतील याच नांवाच्या इलाखादाराचें गांव. हें जशपूर नगरच्या पूर्वेस दहा मैल आहे.इलाखादाराची एकंदर इस्टेट २८ गांवची आहे. इलाखादार 'रोतियां' जातीचा असून त्यास 'नायक' ही पदवी आहे. येथें एक प्राथमिक शाळा आहे.

[२]बंगाल प्रांतांतील शहाबाद जिल्ह्याचें मुख्य ठिकाण.इ.स. १८५७ सालच्या बंडाच्या वेळीं दिनापूरहून २००० शिपाई व कुवरसिंगाच्या हाताखालीं कांहीं खेड्यांतील लोक या गांवावर चाल करून आले. तेथील इंग्रजांचीं बायकामुलें अगोदरच बाहेर पाठवून दिलेलीं होतीं; व गांवांत फक्त थोडे इंग्रज व शीख शिपाई उरले होते; ते सर्व एका लहान घरांत जाऊन बंदोबस्तानें राहिले. त्यांनीं ८ दिवसपर्यंत आपला बचाव केल्यावर त्यांच्या मदतीला व्हिन्सेंट ऐयर हा सैन्य घेऊन आल्यामुळें कुवरसिंगास वेढा उठवून जावें लागलें.

येथें १८६५ त म्युनिसिपालिटी स्थापन झाली आहे. तिचें उत्पन्न ५५००० रु. व खर्च ४८००० होता. ह्या गांवाला सन नदीचें गाळलेलें ( फिल्टर्ड ) पाणी मिळतें.

**अराजकता**—प्राचीन काळापासून भरतखंडांत राजा व प्रजा यांमधील परस्परसंबंध विषयक तत्त्वें धर्मशास्त्रें पुराणें व नीतिग्रंथ प्रतिपादीत. त्यांत विचारवैचित्र्य होतेंच. पाश्चात्य देशांतील हॉब्स वगैरे राजकीय तत्त्ववेत्त्यांनीं प्रतिपादन केलेली राजा व प्रजा यांमधील कराराची कल्पना भारतांतील शांतिपर्वांत दिलेल्या मनूच्या गोष्टींत स्पष्टपणें व्यक्त होते. प्राचीन काळीं यदाकदाचित् कोणताहि राजा जुलुमी निघाला तरी त्याचा जुलूम कायद्याच्या रूपानें नसल्यामुळें कांहीं थोड्याच व्यक्तीस तो बाधक होत असून एकंदर राष्ट्रास बाधक होत नसे. त्यामुळें राजा जुलुमी असला तरी राजसत्तेखालीं असलेलें राज्य जेथें अराजकता माजली आहे अशा समाजापेक्षां नेहमीं अधिक बलवान् व सुखी असे. अराजकतेपासून उत्पन्न होणारे परिणाम महाभारतांत उत्तम वर्णन केलेले आहेत. "राजा धर्माचें मूळ आहे, अधर्मानें वागणाऱ्या लोकांस शिक्षा करून तो ताळ्यावर आणतो,

चंद्र सूर्य नसतील तर जग जसें अंधकारांत मग्न होईल, त्याप्रमाणें राजा नसल्यास लोक नाश पावतील. दुष्ट लोक बलात्कारानें दुसऱ्याचें द्रव्य, स्त्री, पुत्र वगैरे सर्व हरण करूं लागतील व द्रव्यसंपन्न लोकांनां प्रत्यही बंधन व वध भोगावा लागेल. कोणावरहि कोणाचा अधिकार चालणार नाहीं. व राजा रक्षण करण्यास असला म्हणजे लोक गृहांचीं द्वारें उघडीं टाकून सुद्धां निर्भयपणें झोंप घेतात इत्यादि." यामुळें प्रत्येक समाजाला शास्ता राजा असावा असा त्याकाळीं कटाक्ष होता; कारणः—

अथचेत् अभिवर्तेत राज्यार्थी बलवत्तरः ।
अराजकानि राष्ट्राणि हतवीर्याणि वा पुनः ।
प्रत्युद्गम्याभिपूज्यस्यात् एतदेव सुमंत्रितम् ।
नहि पापात्परतरं अस्ति किंचित् अराजकात् ।

अराजकापेक्षां परकीय राजाहि बरा, मग आपला जुलुमी राजा फारच बरा, अशी त्यावेळीं प्रवृत्ति होती. अराजकाच्या भीतीनेंच प्राचीन काळीं हिंदुस्थानांत राजसत्ता फार बलवत्तर झाली असावी असें वाटतें.

अ रा ज क ते ची ता त्वि क मी मां सा.—लोकराज्य हें अराजकता नव्हे. अराजकता म्हणजे सरकार या संस्थेचा अभाव. नियंत्रणाशिवाय कोणताहि समाज शक्य नाहीं. असें असतांहि "अराजकता" हें समाजशासनविषयक तत्त्व गेलीं शेंदीडशें वर्षें पुढें मांडलें जात आहे. अलीकडे समाजसत्तावाद्यांनीं अराजकता या शब्दाला चांगला अर्थ देऊन, राजा किंवा कोणत्याहि प्रकारचें सरकार ज्यांत नाहीं अशा प्रकारचा समाज बनवून अशा समाजाचें जीवित व योगक्षेम कसा चालवावा या संबंधाचा एक नवा सिद्धान्त किंवा तत्त्व पुढें मांडिलें आहे. अशा अराजक समाजांत शांतता व सुव्यवस्था कायद्यांच्या जोरावर किंवा अधिकाऱ्यांच्या हुकमतीनें चालवावयाची नसून सर्व गोष्टी समाजांतील निरनिराळ्या स्थानिक व धंदेवाईक अशा लोकांची अर्थोत्पादन व व्यय हीं अर्थशास्त्रीय कार्यें चालण्याकरतां, तसेंच अशा समाजांतील प्रत्येक सुसंस्कृत इसमाच्या निरनिराळ्या गरजा व आकांक्षा योग्य रीतीनें पुरविल्या जाण्याकरितां गरजांच्या व त्या पुरविणाऱ्या वर्गांच्या अन्योन्याश्रयावर किंवा निरनिराळे वर्ग किंवा संघ बनवून त्यांनीं एकमेकांशीं स्वतंत्र केलेल्या करारमदारांच्या आधारावर सर्व व्यवहार एकोप्यानें व सलोख्यानें चालवावयाचे असतात. अशा ऐच्छिक रीतीनें बनविलेले संघ मानवी समाजांतील सर्व कार्यक्षेत्रें हातीं घेऊन कार्यकर्ते बनल्यावर स्वतःचें कार्यक्षेत्र अधिक विस्तृत करून हल्लीं सरकारमार्फत जीं कार्यें होत असतात तींहि प्रत्येक संघ आपआपलीं करूं लागेल. अशा रीतीनें सर्व कार्यो-करतां लहान मोठे व कमी अधिक चिरस्थायी असे स्थानिक, प्रांतिक, राष्ट्रीय व सार्वराष्ट्रीय वर्ग (ग्रूप्स्) व संघ (फ्रेडरेशन्स्) तयार होऊन त्यांचें एक मोठें जाळें बनेल. अर्थोत्पादन, विनिमय, व्यय, परस्पर दळणवळण, आरोग्य विषयक सोयी, शिक्षण, आत्मसंरक्षण व देशसंरक्षण वगैरे सर्व कामें असे संघ स्वतःचीं स्वतःच करण्यास समर्थ होतील, इतकेंच नव्हे तर शास्त्रीय संशोधन, कलाकौशल्य, वाङ्मयात्मक कार्य, व इतर सर्व समाजाला आवश्यक असलेलीं कार्यें असले संघ बिनबोभाट पार पाडतील. शिवाय महत्त्वाची गोष्ट अशी कीं, वज्रलेप, कालत्रयींहि न बदलणारी अशी कोणतीहि गोष्ट, व्यवस्था किंवा नियम असावयाचा नाहीं. वाटेल त्या बाबतींत वाटेल तेव्हां फेरबदल करण्याची मोकळीक असणार, उलटपक्षीं सर्व सेंद्रिय सृष्टीमध्यें दिसून येतें त्याप्रमाणें, सर्व कार्यशक्ति व कार्यप्रेरक यांमध्यें समतोलपणा सतत घडून येणाऱ्या स्थित्यंतरामुळें अधिक सुलभपणें राखला जाईल, कारण पक्षपातानें कोणाला अडथळा करणारें किंवा कोणाचें अधिक संरक्षण करणारें असें सरकार म्हणून अस्तित्वांतच ठेवावयाचें नाहीं.

या तत्त्वाच्या पुरस्कर्त्यांचें असें म्हणणें आहे कीं, जर समाजाची रचना उपर्युक्त तत्त्वांनुसार केली तर कोणत्याहि माणसाची उत्पादक शक्ति भांडवलवाल्यांच्या हुकमतीमुळें नियंत्रित होण्याचें मुळींच कारण उरणार नाहीं. भांडवलवाल्यांनां सरकार पाठीराखें असतें, पण सरकारच नष्ट झाल्यामुळें भांडवलवालेहि जिवंत राहणार नाहींत. उपरितत्त्वनिबद्ध समाजांत कोणाहि व्यक्तीच्या ऐच्छिक व्यापारावर शिक्षेच्या भीतीचें दडपण उरणार नाहीं, किंवा कोणत्याहि अधिकारी इसमाचा अगर अतींद्रिय विभूतींचाहि (मेटॅफिजिकल एंटिटिज) सत्ताधिकार कोणावर चालावयाचा नाहीं; व त्यामुळें कोणालाहि उत्साहभंग व मानासिक गुलामगिरीचा त्रास होण्याचें कारण नाहीं. प्रत्येक व्यक्ति आपल्या समजुतीप्रमाणें कार्यें करीत राहील, व त्याची समजूत किंवा सदसद्विवेक बुद्धि स्वतःच्या व भोंवतालच्या परिस्थितीमुळें बनलेल्या नैतिक कल्पनांच्या आघातप्रत्याघातानें बनत जाईल. यामुळें प्रत्येक माणसामधील बौद्धिक, नैतिक, कलाविषयक शक्ति कसल्याहि प्रकारचा अडथळा सरकारकडून किंवा भांडवलवाल्याकडून न होतां पूर्ण वाढ पावूं शकतील.

अराजकसमाजवादी (अनार्किस्ट) यांनीं सुचविलेली उपरिनिर्दिष्ट समाजव्यवस्था सर थॉमस मूर या इंग्रज लेखकाच्या यूरोपिया नामक पुस्तकांतील योजनेप्रमाणें अव्यवहार्य नाहीं. तसेंच कांहीं थोडक्याशा गृहीत प्रमेयांपासून काढलेलें केवळ तर्कप्रधान अनुमान नाहीं, अशी त्यांची खात्री आहे. सदरहू योजना प्रस्तुत समाजांत अस्तित्वांत असलेल्या प्रवृत्तींवरूनच ठरविलेली आहे. समाजसत्तावादाचा पुरस्कार करणारे सुधारणावादी आज कित्येक असले तरी त्यांचें हें मत चिरकाल टिकणारें नाहीं. जीवनाला लागणाऱ्या आवश्यक वस्तूंचा सुलभपणें भरपूर पुरवठा करणारी आधुनिक यंत्र सामुग्री, स्वातंत्र्याच्या भावनेची मानवसमाजांतील वाढ, सर्व प्रकारच्या कार्यक्षेत्रांतील कार्यकर्त्यांमध्यें दिसून येणारी

स्वयंप्रेरणा व स्वतंत्र विचार, फार काय पण धार्मिकसंस्था व राजकीयसंस्था यांमध्येंहि अधिकाधिक फैलावत असलेलें स्वातंत्र्याचें वारें, या सर्व गोष्टींनीं अराजक समाजरचनेला अनुकूल अशी परिस्थिति हळू हळू पण निःसंशयपणें तयार होत चाललेली आहे.

अराजकसमाजवादी ( अनार्किस्ट्स ) हें एकंदर समाजसत्तावादी ( सोसिआलिस्टस ) पक्षाचें डाव्या बाजूचें म्हणजे अल्पसंख्याक अतएव कमकुवत असें अंग होतें. या सर्वांचीं अर्थशास्त्रीय मतें अर्थात् सारखींच आहेत. उदाहरणार्थ, दोघांच्याहि मतानें जमीनीची खासगी मालकी, व खासगी भांडवलाच्या जोरावर कारखाने चालवून जबर नफा मिळविण्याची परवानगी हीं दोन्हीं तत्त्वें न्यायीपणाच्या व उपयुक्ततेच्या दृष्टींनीं घातक आहेत. अलीकडील यांत्रिक सामुग्रीच्या साहाय्यानें अखिल समाजाचें जीवित पूर्ण सुखमय करण्याच्या मार्गांत हे दोन मोठे अडथळे आहेत. पण अराजक समाजसत्तावाद्यांचें असेंहि ह्मणणें आहे कीं, खाजगी जमीनदारी व खाजगी भांडवल पद्धति या दोहोंचें संरक्षण करून त्यांनां वर्षानुवर्ष जबर नफा मारण्यास सवलत देणारें मूळ सरकार होय; आणि ह्मणूनच खाजगी जमीनदारी व खाजगी भांडवलपद्धति यांचें उच्चाटन करण्याच्या प्रयत्नांबरोबरच सरकार ही संस्थाहि अजिवात नष्ट करण्याचे प्रयत्न केले पाहिजेत. सरकार, मग तें राजसत्ताक असो किंवा लोकसत्ताक असो, हेंच सर्व अनर्थांचें मूळ आहे सबब तेंच सर्वस्वीं नाहींसें झालें पाहिजे. [ समाजसत्तावाद पहा. ]

प्राचीन काळचा इतिहास पहा, किंवा अर्वाचीन काळचा पहा , मॅसिडोनियाचें साम्राज्य, रोमचें साम्राज्य, किंवा यूरोपांतील राज्यें यापैकीं कोणतेंहि सरकार पाहिलें तरी तें थोडक्याशा अधिकार नियुक्त इसमांचें बनलेलें असून त्यांच्या हातांत सर्व सत्ता एकवटलेली असते, व त्यांतील अल्पसंख्याक व्यक्तीच सत्तालोलुप असल्यामुळें जमीनदार, भांडवलवाले इत्यादि इतर हक्कदार अल्पसंख्याकांचा नाश करण्याचें काम सरकार नामक संस्थेच्या हातून होणें शक्य नाहीं; तसेंच सरकार नामक या संस्थेंतील अधिकाराधिष्ठित व्यक्तीहि आपल्या हातांतील हक्क व सत्ता सोडण्यास तयार होणार नाहींत. ह्मणून भांडवलवाले, जमीनदार इत्यादि हक्कदार वर्ग नष्ट करून त्यांच्या जमिनी, खाणी, रेल्वे, बँका, औद्योगिक संस्था सरकारच्या हातीं देऊन अगोदरच अनेक बाबतींतील शिक्षण धर्मखातें, देशसंरक्षक लष्करी खातें इत्यादि सरकारच्या हातीं असलेल्या सत्तेंत भर घालणें ह्मणजे लोकांवर जुलूम करण्याचें आणखी एक नवें यंत्रच तयार करण्याप्रमाणें आहे. सरकारी भांडवलव्यवस्था अमलांत आणणें म्हणजे नोकरशाही व भांडवलवाले या दोघांची सत्ता एकत्र करून सरकारच्या सत्तेंत अधिकाधिक भर घालून ती प्रजेला अधिकाधिक जाचक करण्यासारखें आहे. वास्तविक खरी सुधारणा सत्ता एकत्रित करण्यानें होणारी नसून अधिकाकाधिक अधिकारविभागणी केल्यानें, स्थानविषयक व कार्य विषयक वांटणी करून अनेकांच्या हातीं सत्ता दिल्यानें, प्रत्येक व्यक्तीला अधिकाधिक कार्यस्वातंत्र्य व स्वयंप्रेरणेला वाव दिल्यानें घडून येणार आहे.

बहुतेक समाजसत्तावाद्यांप्रमाणें अराजकसमाजवाद्यांनांहि ही गोष्ट मान्य आहे कीं, सृष्टींतील विकासासिद्धान्ताच्या कार्याप्रमाणेंच समाजांतहि नेहमीं विकसनकार्य हळू हळू चालू असतें, आणि मधून मधून मात्र क्रांतिकारक स्वरूपाच्या घडामोडी होऊन सुधारणेच्या कार्यांत एकदम मोठी भर पडत असते. अशा प्रकारच्या क्रांतिकारक गोष्टी घडण्याचा काल आतां उरलेला नाहीं असें त्यांनां वाटत नाहीं. मंदगतिक सुधारणेच्या कालामागून एकदम अतिवेगानें सुधारणा होण्याचे दिवस उगवणें अद्याप शक्य आहे, व अशा संधीचा फायदा घेणें सर्व सुधारणावाद्यांचें कर्तव्यच आहे. पण अशा संधीचा उपयोग सरकार नामक संस्थेची सत्ता अधिकाधिक वाढविण्याकडे न करतां ती कमी करण्याकडे केला पाहिजे; व त्याकरतां गांवानिहाय व प्रांतानिहाय कामकरी व संसारी लोकांचे संघ बनवून त्यांच्याकडे सर्व गोष्टी, व सत्ता विभागून दिली पाहिजे. अशा प्रकारचे संघ सर्व राष्ट्रांत व नंतर जगांतील एकंदर राष्ट्रांत तयार केले पाहिजेत.

अराजक समाजवाद्यांचीं मतें अशा प्रकारचीं असल्यामुळें प्रस्तुत अस्तित्वांत असलेल्या सरकार नामक संस्थेच्या कार्यांत भाग घेण्याचा किंवा तिच्या सत्तेंत अधिकाधिक भर घालण्याचा प्रयत्न करणें त्यांनां पसंत नाहीं. म्हणून पार्लमेंटसारख्या राज्यकारभारी संस्थेंत शिरून तेथें मजूरपक्षाचें प्राबल्य प्रस्थापित करण्याचा मार्ग ते आक्रमित नाहींत; किंवा मजूरवर्गास तसें करण्याचा उपदेश करीत नाहींत. सार्वराष्ट्रीय कामकरी वर्गाची परिषद ( इंटरनॅशनल वर्किंग मेन्स असोसिएशन ) १८६४–६६ स्थापन झाल्यापासून अराजक समाजवाद्यांनीं आपलीं मतें प्रत्यक्ष मजुरवर्गापुढे मांडण्याचा व मजुरांचे वर वर्णिलेल्या प्रकारचे संघ बनवून भांडवल वाल्यांचा नायनाट करण्याचा उद्योग सुरू केला आहे. पार्लमेंटसारख्या कायदेमंडळामार्फत कायदे करवून सुधारणा घडवून आणण्याच्या सनदशीर म्हणून गणला गेलेल्या मार्गावर त्यांचा विश्वासच नाहीं.

अ रा ज क स मा ज वा दी पं था च्या वा ढी चा इ ति हा स.—वर वर्णिलेल्या प्रकारचे सामाजिक संघ स्थापण्याची कल्पना व सरकार नामक राज्यकारभारकर्त्या संस्थेच्या मार्फत समाजाचें शासन करण्याची कल्पना या दोन्ही मानवजातीच्या मनांत पुरातनकालापासून अस्तित्वांत आहेत; आणि ऐतिहासिक काळांत कधीं पहिलीचें तर कधीं दुसरीचें अधिक प्राबल्य वाढल्याचें दिसून येतें. पहिल्या प्रकारच्या प्रवृत्तीमुळें हळूहळू कुळ, गोत्र, ग्राम, जाति, संघ व नगर असे समु-

दाय लोकांनीं स्वतःच बनविले, व त्याच्या बळावर परचक्रापासून व सत्ताधीशांच्या जुलमी वर्तनापासून स्वतःचें संरक्षण करण्याचा मार्ग काढला. ग्रीसमध्यें इ. स. पू. ४३० च्या सुमारास होऊन गेलेल्या ॲरिस्टिप्पस या सीरेनाईक पंथाच्या एका उत्पादकानें असें प्रतिपादन करण्यास सुरवात केली होती कीं, शहाण्या लोकांनीं आपलें स्वातंत्र्य गमावून सरकारचें नियंत्रण पत्करतां कामा नये; व साक्रेटीसच्या प्रश्नास उत्तर म्हणून त्यानें असें सांगितलें होतें कीं, तो स्वतः शास्ते किंवा शासित यापैकीं कोणत्याच वर्गांत मोडत नाहीं. तथापि ॲरिस्टिप्पसची ही प्रवृत्ति केवळ एपिक्यूरियन पंथाच्या अनुयायांनीं सामान्य जनसमूहाबरोबर ठेवलेल्या बेजबाबदार वर्तनाचा परिणाम होय. ग्रीसमधील अराजकसमाजवादी तत्त्वज्ञानाचा सर्वांत महत्त्वाचा पुरस्कर्ता क्रीटचा रहिवाशी व स्टोईक तत्त्वज्ञानाचा आद्यजनक झेनो हा होय. प्लेटोनें 'रिपब्लिक' ग्रंथांत जी राज्यकारभारपद्धति आदर्शभूत म्हणून पुढें मांडली तिला विरोध करून झेनोनें सरकाररहित अशा समाजरचनेविषयींची स्वतःची योजना पुढें मांडली. सरकारच्या नियंत्रणाऐवजीं प्रत्येक व्यक्तीवर स्वतःचें, नैतिक नियमांचें, नियंत्रण असावें, प्रत्येक व्यक्तीमध्यें स्वार्थबुद्धीबरोबर सहवासप्रियताहि नैसर्गिकच असल्यामुळें व्यक्तीची स्वयंनिर्मित नैतिक बंधनें केवळ स्वसंरक्षक न बनतां परार्थपोषकहि आपोआप बनतील. याप्रमाणें स्वतःच्या नैसर्गिक प्रेरणांप्रमाणें वागण्याची बुद्धि उत्पन्न झाल्याबरोबर ते सरकारी अमलाची सरहद्द सोडून पलीकडे स्वतंत्र संघ बनवून राहूं लागतील. अशा वसाहतींत त्यांनां न्यायकोर्टें, पोलीस, देवालयें, सार्वजनिक प्रार्थना, किंवा पैसानाणीं वगैरे गोष्टींची मुळींच जरूरी लागणार नाहीं. पैशाच्या ऐवजीं सर्व देवघेव केवळ देणग्यांच्या स्वरूपानें परस्परांत चालू राहील. झेनोचे स्वतःचे ग्रंथ आज उपलब्ध नाहींत, इतरांच्या ग्रंथांतून त्याच्या लेखनांतील उतारे म्हणून दिलेले आहेत. तथापि तेवढ्यावरून झेनोचीं व तत्कालीन लोकसमाजाची एतद्विषयक प्रवृत्ति स्पष्टपणें निदर्शनास येते.

मध्ययुगांत ९ व्या शतकाच्या सुमारास अनाबाप्टिस्ट लोकांपैकीं जोहन्स डेन्क याच्या हुसाईटस पैकीं चोजेकी याच्या आणि आल्बाचा बिशप मार्को गिरोलॅमो व्हिडा याच्या ग्रंथांत वर वर्णन केलेल्या प्रकारचींच मतें आढळतात.

**रूसो, डिडरो, गॉडविन, व प्रूधाँ यांची अराजकता.**—अठराव्या शतकांत फ्रेंच एन्सायक्लोपीडियाच्या कर्त्यांच्या डोक्यांत अशाच कल्पना खेळत होत्या ही गोष्ट रूसो व डिडेरॉट यांच्या स्वतंत्र ग्रंथांतील मजकुरावरून सहज सिद्ध होते. याच कल्पना पुढें फ्रेंच राज्यक्रांतीच्या वेळीं उघडपणें लोकांपुढें मांडल्या गेल्या. त्या वेळीं एका बाजूला जॅकोबिन लोक सर्व राजकीय सत्ता स्वतःच्या हातीं घेण्याकरतां प्रयत्न करीत होते; व उलट पक्षीं प्रत्येक प्रांतांतले लोक आपापले संघ बनवून न्यायखातें, लष्करखातें, दानधर्मखातें वगैरे सर्व गोष्टींची व्यवस्था स्वतःचे हातीं घेण्याचा उद्योग करीत होते, व अशा सुमारें ३६००० संघांमध्यें एकमेकांत पत्रव्यवहारहि सुरू झाला होता.

अराजकसमाजरचनेसंबंधाच्या राजकीय व अर्थशास्त्रीय कल्पना गॉडविननें १७९३ च्या सुमारास प्रथम व्यवस्थित पणें आपल्या ग्रंथाच्या द्वारें पुढें मांडल्या. त्यांत तो म्हणतो कीं, पूर्वीचे कायदे हे आपल्या पूर्वजांच्या शहाणपणाचे निदर्शक नसून ते त्यांनीं भित्रेपणा, मत्सर, महत्त्वाकांक्षा इत्यादि मनोविकारांनीं प्रेरित होऊन केलेले आहेत. कायदे व न्यायकोर्टें सर्व रद्द करून त्याऐवजीं सर्व भांडणतंटे निकालाकरतां चांगल्या विचारी माणसांकडे सोंपविल्यास योग्य न्याय तात्काळ मिळूं लागण्यास सुरवात होईल. सरकार समूळ नष्ट करावें; सरकार नामक संस्थेवांचून समाज उत्तम स्थितींत खास राहूं शकेल; समाजाचे लहान लहान व स्वयंशासित असे संघ बनवावे; मालमत्तेच्या बाबतींत खाजगी मालकी नष्ट करून समाईक मालकीचें तत्त्व सुरू करावें; अशा प्रकारचीं गॉडविनचीं मतें होतीं. परंतु त्यानें आपल्या राजकीय न्यायान्याय ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तींत मात्र हीं मतें भीतीमुळें स्पष्टपणें पुढें मांडलीं नव्हतीं.

पुढें १८४० मध्यें प्रूधाँनें प्रथम अराजकसमाज हें प्रत्यक्ष नांव देऊन आपले विचार पुढें मांडण्यास सुरवात केली. फ्रेंच राजक्रांतीच्या वेळीं १७ व्या लुईला राज्यावरून काढून टाकण्यानेंच केवळ ज्याचें समाधान होत नव्हतें अशा पक्षास जिराँडिस्ट नामक पक्षानें 'अराजक' (अनार्किस्ट) असें निंदाव्यंजक नांव देण्यास सुरवात केलीच होती. प्रूधाँनें सरकारविरहित असा समाज कसा बनवावा त्यासंबंधाच्या कल्पना उघडपणें पुढें मांडल्या. 'मालमत्ता म्हणजे चोरी' या सूत्रापासून आरंभ करतांच लोकांचें लक्ष त्याच्या मतांकडे वेधलें. तथापि समाईक मालकीच्या तत्त्वाचा तो पुरस्कर्ता नव्हता, तसेंच सर्व जमीनदार, कारखानदार, खाणीवाले, वगैरे धनिकांची मालमत्ता एकदम हरण करावी अशा मताचाहि तो नव्हता. त्यानें सुचविलेला मुख्य उपाय म्हणजे सावकारी व व्याजबट्टा हा खाजगी धंदा बंद करणें व भांडवल पुरविणारी एक राष्ट्रीय बँक स्थापणें हा होय. नागरिकांनीं सर्व व्यवहार आपसांत व बँकेच्या आर्थिक मदतीनें चालवावयाचे व तंटाभांडण मध्यस्थांनीं मिटवावयाचें; अशी सर्व संघांत व्यवस्था झाल्यावर सरकारची जरूर उरतच नाहीं, असें त्याचें म्हणणें होतें. निरनिराळ्या प्रकारच्या राज्यकारभारपद्धतिवर बारकाईनें केलेली टीका, व सर्व आर्थिक प्रश्नांचें सूक्ष्मज्ञान हे महत्त्वाचे गुण प्रूधाँच्या ग्रंथांत दिसून येतात. प्रूधाँच्या मताचे लोक त्याच्या पूर्वींच, इंग्लंडांत वुइल्यम थॉम्पसन व त्याचा अनुयायी जॉन ग्रे आणि अमेरिकेंत जोशिया वॉरेन, हे होऊन गेले होते. इंग्लंडांत ओवेननें अशा संघाचा प्रत्यक्ष प्रयोगहि केला होता. पण तो फसण्याचें कारण वैयक्तिक स्वातंत्र्याचा अभाव हें होतें, असें

प्रूढाँनें ठरवून वैयक्तिक स्वातंत्र्याचा पूर्णपणें पुरस्कार चालविला व स्वतः " इक्विटी स्टोअर " ( न्याय्य किंमतीच्या वस्तूंचें दुकान) काढलें. "इक्विटी व्हिलेज" व "इक्विटी हाऊस" अशा नांवाच्या दोन संस्थाहि अमेरिकेंत न्यू यॉर्क व बोस्टन येथें अनुक्रमें निघाल्या.

प्रूढाँच्या अर्थशास्त्रविषयक व विशेषतः सहकारी पेढ्या (म्यूचुअलबँकिंग) संबंधाच्या सूचना लवकरच मान्य होऊन त्या प्रत्यक्ष अमलांतहि येऊं लागल्या; परंतु त्याच्या अराजकविषयक मतांनां प्रत्यक्ष फ्रान्समध्येंहि फारसे अनुयायी मिळाले नाहींत. फ्रान्समध्यें फोरियर व सेंट सायमन या समाजसत्तावाद्यांच्या मतांचें अगोदरच बरेंच प्रस्थ वाढलेलें होतें. प्रूढाँच्या मतांनां जर्मनींत मात्र पुरस्कर्ते मिळून मोझेस हेस यानें १८४३ मध्यें, आणि कार्ल ग्रुन यानें १८४५ मध्यें अराजक समाजविषयक मतें प्रतिपादन करण्यास सुरुवातहि केली. नंतर स्टर्नरनें सरकारविरुद्ध व समाईक समाजसत्ताकपद्धतिविरुद्धहि उघडपणें बंडखोरपणाची भाषा वापरण्यास सुरुवात केली, इतकेंच नव्हे तर कोणत्याहि प्रकारचीं सामाजिक व नैतिक बंधनें व्यक्तीवर असूं नयेत, व्यक्तिमात्राला पूर्ण सत्ता व स्वातंत्र्य असावें, असें प्रतिपादन त्यानें सुरू केलें. अशा तऱ्हेच्या वैयक्तिक स्वातंत्र्ययुक्त अराजक समाजाचें पर्यवसान कसें व्हावयाचें तें स्टर्नरनंतर प्रो. बॉश यानें आपल्या ग्रंथांत दाखवून दिलें. प्रो. बॉशाचें म्हणणें आहे कीं, उच्च संस्कृतीचा उद्देश मनुष्यजातींतील सर्व व्यक्तींची उन्नति होण्याकरितां सर्व साधारण मार्ग व साधनें उपलब्ध करून देणें हा न ठेवतां जन्मतः उच्चगुणसंपन्न अशा कांहीं विशिष्ट व्यक्तींची पूर्णपणें वाढ होण्याकरितां इतर सामान्य व्यक्तींच्या सुखसोई व जरूर तर अस्तित्व यांची पर्वा न करताहि सोय करून देणें, हा असला पाहिजे. याप्रमाणें व्यक्तिस्वामित्वपद्धति ( इंडिव्हिज्युआलिटी ) च अखेर प्रस्थापित होणें इष्ट असून आजपर्यंतची मानवजातीची सुधारणा उच्चगुणयुक्त अशा थोड्याशा व्यक्तींच्या हातूनच होत आलेली आहे. बॉश प्रभृति विद्वानांचा व्यक्तिस्वामित्ववाद इतक्या थराला गेलेला आहे कीं, वैयक्तिक सुधारणा पूर्णत्वानें पोहोंचविण्याचें ध्येय साधणें कधींहि शक्य नाहीं, कारण इतर सामान्य जनसमाजाकडून सदरहू ध्येयाला अडथळा करणारी त्रासदायक, जुलमी अशी परिस्थिति पसरलेली असते, असें त्यांचें मत आहे. त्यामुळें ' सकलगुणालंकृत ' असा उच्च शिष्ट वर्ग कधींच तयार होणें शक्य नाहीं, तरी सामान्य वर्ग व उच्च वर्ग यांच्यामध्यें नेहमींच मोठें अंतर कायम राहणार यांत शंका नाहीं. सदरहू विचारसरणींतील वैयक्तिक उत्कर्षाच्या पूर्णत्वाची कल्पना पटण्यासारखी व उपयुक्त असली तरी या पंथाला कांहीं थोड्याशा विद्वान् व कलावान् वर्गाखेरीज इतर कोणीच अनुयायी मिळालेले नाहींत.

**सार्वराष्ट्रीय मजूर परिषदेचें अराजकपंथविषयक मत.**—१८४० मध्यें फ्रान्समध्यें रिपब्लिक देशांत पुन्हां बादशाही सत्ता सुरू झाली. त्यानंतर कांहीं काल समाजसत्तावाद्यांपैकीं निरनिराळ्या सर्व पोटवर्गांचें मतप्रचारात्मक कार्य बरेंचसें शिथिल झालें; कारण बादशाही सरकारनें समाजसत्तावादी पंथाच्या सर्व छापखान्यांची मुस्कटदाबी केली ती पुढें सुमारें वीस वर्षें तशीच कायम होती. तथापि या काळांतहि अराजक पंथाचीसुद्धां थोडीशी प्रगति झाली. १८६४ पासून समाजसत्ताक पंथाची चळवळ पुन्हां सुरू झाली. त्या सालीं लंडन येथें युनिव्हर्सल एक्झिबिशनच्या निमित्तानें आलेल्या फ्रेंच कामकरी वर्गापैकीं ( हे सर्व अन्योन्यसाहाय्यवादी होते ) कित्येक इसमांनीं रॉबर्ट ओवेन पंथी इंग्रजांच्या मदतीनें सार्वराष्ट्रीय मजूर परिषद स्थापन केली. या परिषदेची फार झपाट्यानें वाढ होऊन तिनें राजकीय पार्लमेंटांतील सत्ता हातीं घेण्याच्या मार्गाचा अवलंब न करतां एकदम परस्पर भांडवलवाल्यांशीं अर्थशास्त्रीय तत्त्वांनुसार भांडण सुरू केलें; व हें धो.ण १८७१ पर्यंत तसेंच चालू ठेवलें. फ्रँको-जर्मन युद्धानंतर सार्वराष्ट्रीय परिषदेच्या कार्याला फ्रान्समध्यें बंदी करण्यांत आली, त्या वेळीं जर्मनींत सर्वपुरुषमतदानाचा हक्क मिळालेला असल्यामुळें जर्मन कामकरी वर्गानें जर्मन साम्राज्याच्या पार्लमेंटच्या निवडणुकींत भाग घेण्याच्या उद्देशानें परिषदेचें वरील धोरण बदलण्याचा आग्रह धरला व आपला सोशल डेमोक्रॅटिक नांवाचा निराळा राजकीय पक्ष स्थापन केला. यामुळें सार्वराष्ट्रीय मजूरपरिषदेमध्यें फाटाफूट होऊन स्पॅनिश, इटालियन, बेल्जियन अशा निरनिराळ्या कामकरी संस्था स्थापन होऊन त्यांनीं आपला एक संघ ( फेडरल यूनियन ) बनवला. या संघामधूनच " आधुनिक अराजक समाज पंथ " वाढ पावला. या संघाचा बाकुनिन हा पुढारी बनला व त्यानें अनेक लेख, पत्रें व पुस्तकें लिहून अराजक तत्त्वांची वाढ केली. सरकार (स्टेट)ही संस्था समूळ नष्ट झाली पाहिजे; कारण, ती लोकांच्या धार्मिक समजुतींच्या पायावर उभारलेली असून सुधारणेच्या खालच्या पायरीची निदर्शक असते; तिच्यामुळें स्वातंत्र्य नष्ट होतें, असें त्यानें प्रतिपादन केलें. सार्वत्रिकमतदानपद्धतीनें केलेले कायदे सुद्धां अमान्य ठरवून प्रत्येक व्यक्तीला व प्रत्येक प्रांतिक संघाला पूर्ण स्वातंत्र्य असावें असें तो म्हणे. अर्थोत्पादनाचीं सर्व साधनें कामकरी संघाच्या मालकीचीं असावीं, व तयार झालेल्या वस्तू प्रत्येक संघानें आपापले नियम ठरवून त्याप्रमाणें वाटून घ्याव्या अशीं बाकुनिनचीं अर्थशास्त्रीय मतें होतीं.

पुढील कित्येक वर्षें उपर्युक्त स्पॅनिश, इटालियन, इत्यादि कामकरी संस्था, सार्व-राष्ट्रीय-मजूर-परिषदेच्या कांहीं शाखा, व जर्मन आणि अमेरिकन अराजक मंडळ्या याच अराजक पंथाच्या मुख्य व कार्यकारी संस्था होत्या. त्यांनीं राजकीय सत्ता हातीं घेण्याची बिलकुल खटपट न करतां कामकरी वर्गांचीच आपसांत दृढ मैत्री वाढवून संपाच्या द्वारें आपलें महत्त्व वाढविण्याचा मार्ग अवलंबिला.

कामाचे तास दररोज आठच असावे, वगैरे हक्काकरतां, व सैन्यांतील शिपायांची मनें लष्करी नोकरीपासून परावृत्त करण्याकरतां त्यांनीं चळवळी चालविल्या. त्यामुळें बऱ्याचशा यूरोपीय देशांत व युनैटेड स्टेट्समध्यें या पंथाच्या पुढाऱ्यांवर खटले होऊन त्यांनां शिक्षा झाल्या. त्यामुळें कामकरीवर्गांनीं अधिकाधिक अत्याचार केले व त्यामुळें खटले, दंड, शिक्षा यांचें प्रमाण वाढलें, व त्याचा सूड म्हणून अधिकारी लोकांवर अधिकाधिक अत्याचार होऊं लागले. त्यामुळें अत्याचार हेंच अराजकपंथाचें मुख्य कार्य असा सार्वत्रिक समज लोकांत पसरूं लागला. अर्थात् या पंथाच्या प्रवर्तकांनीं सदरहू आरोपाचें निराकरण सुरू केलें, व सरकारी दडपशाहीचा अत्याचार हा केवळ नैसर्गिक परिणाम आहे त्याचा अराजक पंथाच्या मूळ तत्त्वाशीं व धोरणाशीं कांहीं एक संबंध नाहीं, असें प्रतिपादन चालविलें.

यापुढें अराजक पंथाची वाढ कांहीं फ्रेंच तत्त्ववेत्ता प्रूढाँ याच्या तत्त्वानुसार, कांहीं ख्रिश्चन–अनार्किझम या लिओ टॉलस्टॉयच्या मतांच्या द्वारें, कांहीं अंशीं अराजक लेखकांच्या द्वारें, व मुख्यतः कम्यूनिस्ट–अनार्किझमच्या द्वारें चालू राहिली. प्रूढाँची परस्परसहाय्यक बँकांची कल्पना युनैटेड स्टेट्समध्यें फार अमलांत आली. व्यक्तिस्वामित्ववादी अराजक पंथाचा प्रसार अमेरिकेंत बेंजामिन आर. टकर या नांवाच्या विद्वानानें आपल्या लिबर्टी नामक पत्राच्या द्वारें फार केला. त्यानें प्रूढाँन व हर्बर्ट स्पेन्सर या दोघांच्या मतांचा एकत्रिक रीतीनें अवलंब केला. व्यक्तिस्वामित्व, समान स्वातंत्र्य, व पूर्ण समता या तिन्ही तत्त्वांचा पुरस्कार करून व्यक्तिशः मनुष्य स्वार्थी असला तरी सर्वजण आपल्या हक्कांनां जपूं लागले म्हणजे सर्व व्यवस्था न्याय्य व कायदेशीर अशीच होईल असें प्रूढाप्रमाणें त्याचें मत होतें. शिवाय स्पेन्सरच्या स्वसंरक्षणाच्या हक्काचा पुरस्कार करून तो असें प्रतिपादूं लागला कीं, एकाद्यानें हक्कांचें अतिक्रमण केल्यास त्याचा प्रतिकार करण्याचा संरक्षक हक्क प्रत्येकास आहे. म्हणून प्रत्येक व्यक्तीला व प्रत्येक संघाला आत्मसंरक्षण करण्याकरतां अपराध्याला देहांत प्रायश्चित्तापर्यंत योग्य ती शिक्षा करण्याचा हक्क आहे. तसेंच केलेले करार पाळण्याचे भाग पाडण्याकरतांहि अत्याचार करण्याचा हक्क आहे. याप्रमाणें संरक्षणाच्या कार्याकरतां म्हणून कोणत्याहि राजसत्तेला असलेले सर्व अधिकार नूतन समाजरचनेंतहि असावे, असा बी. आर. टकरच्या मतांचा निष्कर्ष निघतो.

व्यक्तिस्वामित्ववादी अराजक पंथाच्या प्रूढाँमती अनुयायांनां अमेरिकेंतील मजूरवर्गांत फारशी सहानुभूति मिळत नाहीं. व्यक्तिस्वामित्ववादाचा अंगीकार केल्यानें ही स्थिति केवळ व्यक्तिशः प्रयत्नानें साध्य होण्यासारखी नसल्यामुळें त्यांनां अराजकसमाजवादी पंथांतून फुटून निघून अभिमत अर्थशास्त्रपंथी उदारमतवाद्यांच्या गोटांत शिरावें लागतें, किंवा इपिक्युरियन पंथाची नैतिकबंधनशून्य समाजस्थिति पत्करावी लागते, किंवा स्टर्नर व निन्झचे यांचा श्रेष्ठ-मानव कोटी विषयक 'सुपरमॅनथिअरी' सिद्धांत तरी मान्य करावा लागतो. त्यामुळें अराजक पंथांतले बरेचसे लोक अनार्किस्टकम्युनिस्ट मतवादी बनले आहेत. यांत फ्रान्समधील एलिसी रेक्लुस, जीन ग्रेव्ह, सेबास्टियन फार, एमिली फौजेट यांचा, इटालीमधील एनरिको मॅलाटेस्टा व कॉव्हेली यांचा, स्पेनमधील आर. मेला, एल्. लॉरेंझो वगैरेंचा समावेश होतो. याशिवाय अराजक पंथाची दुसरी शाखा सिंडिकॅलिस्ट पंथ (पक्ष) नांवानें यूरोपांत अलीकडे महत्त्वास चढली असून राजकीय सत्ता हातीं न घेतां परस्पर भांडवलवाल्यांशीं प्रत्यक्ष सामना त्यांनीं सुरू केला आहे.

अनार्किस्ट–कम्युनिस्ट पंथाच्या विद्वान अनुयायांनीं पुढील उपयुक्त गोष्टी करण्याचा प्रयत्न चालविलेला आहे; भौतिक शास्त्रांतील शोधामुळें तयार झालेलें आधुनिक तत्त्वज्ञान व अराजकसमाजवाद यांचा तर्कशास्त्रदृष्ट्या निकट असलेला संबंध दाखवून देणें, हल्लीं समाजांत दिसून येणाऱ्या प्रवृत्तींचा अभ्यास करून अराजकसमाजपंथी मतांची शास्त्रीय पायावर उभारणी करणें, व या मताच्या पुढें विकास कसा होत जाणार याचें दिग्दर्शन करणें, आणि अराजकसमाजांतील नैतिक बंधनें योग्य तत्त्वांच्या आधारानें तयार करणें; कलेक्टिव्हिझम पेक्षां कम्युनिझम ग्राह्य होण्याचा संभव कसा अधिक आहे व त्यामुळें अखेर अनार्किस्ट–कम्युनिझमच सर्व सुधारलेल्या समाजांनां मान्य होण्याचा कसा संभव आहे, तसेंच कम्युनिझम व अनार्की हे दोन विकास दर्शक शब्द असून ते अन्योन्यपूरक आहेत म्हणजे त्यांतील एक तत्त्व मान्य केलें कीं दुसरें मान्य करावेंच लागतें, वगैरे गोष्टी सप्रमाण सिद्ध करून दाखविण्याचा क्रोपॉटकिनच्या लेखांचा उद्देश आहे. राजक्रांतीच्या काळांत एखाद्या मोठ्या शहरांतील रहिवाशाची संमति असल्यास तेथें कम्युनिझम तावडतोब अमलांत आणतां येईल असें क्रोपॉटकिनचें म्हणणें असून त्या योजनेबद्दल तो म्हणतो कीं, अशा शहरांतील प्रत्येक रहिवाशाला मध्यम वर्गांतील माणसांनां हल्लीं मिळते तितक्या प्रकारची राहण्याची जागा, खाण्याचे पदार्थ, व कपडेलत्ते इतक्या गोष्टी त्यांच्या अर्ध्या दिवसाच्या म्हणजे पांच तासांच्या कामाचा मोबदला म्हणून देण्यांत यावा आणि बाकी राहिलेल्या अर्ध्या दिवसाचें पांच तास काम त्यांनीं शिक्षणविषयक वाङ्मयविषयक किंवा शास्त्र, कला व शारिरिक व्यायामाचें यांपैकीं काम करणाऱ्या कोणत्याहि संस्थेंत काम केलें तरी चैनीच्या राहणीच्या इतर सर्व वस्तू सहज मिळूं शकतील. शेतकी व इतर औद्योगिक धंद्यांतील कामें बौद्धिक व्यवसायांच्या जोडीला कशीं जोडून देतां येतील, तेंहि क्रोपॉटकिननें विवेचन केलें आहे.

पंधराव्या व १६ व्या शतकांतील चोजेकी, डेन्क वगैरे कित्येक इसमांप्रमाणें सामान्य जनसमाजांत धार्मिकदृष्ट्या

चळवळ करणाऱ्या लीओ टॉलस्टॉय या रशियन देशभक्तानें प्रत्यक्ष अराजकसमाजवादी असें नांव धारण न करतां राजसत्ता व मालमत्तेवरील मालकी या दोन गोष्टींसंबंधानें अराजकसमाजपंथाचींच मतें स्वीकारलेलीं आहेत, आणि हीं मतें ख्रिस्तानें उपदेशिलेल्या गोष्टींतूनच व सामान्य तर्कशास्त्राच्या साहाय्यानें कशीं सिद्ध होतात तें दाखविलें आहे. चर्च ही धर्मोपदेशकांची संस्था, राजसत्ता ही संस्था (दिः स्टेट) व राजकीय कायदे व विशेषत-खासगी मालमत्तेविषयींचे कायदे यांच्यावर त्यानें आपलें सर्व बुद्धिसामर्थ्य खर्चून अत्यंत जोरदार टीका केली आहे. राजसत्ता ह्मणजे दुष्ट लोकांनीं पाशवी शक्तीच्या जोरावर जनतेवर चालविलेली जुलमी सत्ता होय. सुव्यवस्थित सरकार हे प्रत्यक्ष दरवडेखोरांपेक्षांहि फार अधिक भयावह होय. धर्मसत्ता, राजसत्ता व मालमत्तेची सांप्रतची वांटणी यासंबंधीं लोकांच्या मनांत असलेल्या कल्पना चुकीच्या आहेत, हें दाखवून देऊन ख्रिस्ताच्या उपदेशांतूनच अप्रतिकाराचें(नॉन रेझिस्टन्स) तत्त्व आणि कोणत्याहि कारणास्तव युद्ध होऊं नये हें तत्त्व कसें निष्पन्न होतें याचें विवेचन टॉलस्टॉयानें केलेलें आहे. तथापि टॉलस्टॉयच्या एकंदर लेखनांत सांप्रतच्या समाजांतील दोषांचें अवलोकन करून सुचणाऱ्या विचारांचा धार्मिकदृष्ट्या सुचणाऱ्या विचारांशीं त्यानें इतका उत्तम मेळ घालून दिलेला आहे कीं, त्याच्या ग्रंथांतील अराजकताविषयक विवेचन धार्मिक व अधार्मिक दोन्ही बुद्धींच्या लोकांना सारखेंच ग्राह्य वाटतें.

अराजकसमाजवाद्यांचे अत्याचार.—हा विषय पुरा करण्यापूर्वी "अराजकसमाजवादी" ह्मणजे मारामाऱ्या, खून करणारा इसम असा अर्थ सामान्य जनतेच्या मनांत कां वावरत असतो, त्या कारणांचा थोडासा खुलासा केला पाहिजे. वास्तविक अराजकसमाजपंथाच्या तत्त्ववेत्त्यांनां असल्या प्रकारचे अत्याचार बिलकूल संमत नाहींत. असें असतां सामान्य जनतेची वरील प्रकारची समजूत कां झालेली आहे, तें पुढील हकीगतीवरून दिसून येईल.

१८८२ ते १८८६ यांच्या दरम्यान फ्रान्समध्यें प्रिंस क्रोपाटकिन, लुई मायकेल व इतर कित्येकांना तुरुंगांत टाकण्यांत आलें. इंग्लंडमध्यें मॉस्ट या जर्मन अराजकसमाजवादी पुढाऱ्याला सेंट पीटर्सबर्ग येथें झालेल्या २ऱ्या अलेक्झांडरच्या खुनाचें समर्थन केल्याच्या आरोवरून १८ महिने सक्तमजुरीची शिक्षा देण्यांत आली. ती भोगल्यावर १८८६ च्या मे महिन्यांत मॉस्ट युनैटेड स्टेट्समध्यें जाऊन न्यूयॉर्क येथें स्वपक्षाचें पत्र काढूं लागला.

या काळांत युनैटेड स्टेटमध्यें अनार्किस्ट पक्षाच्या वार्षिक बैठकीहि बऱ्याच भरल्या, त्यांपैकीं १८७९ सालच्या अलेघनी शहरांत भरलेल्या सभेच्या वेळीं यपैंकांत अनत्याचारी व क्रांतिकारक असे दोन पक्ष उद्भवून क्रांतिकारकपक्ष फुटून निघाला व त्यानें शिकागो व बॉस्टन येथें आपल्या पक्षाचीं पत्रें काढलीं. १८८३ मध्यें पिट्सबर्ग येथें भरलेल्या सभेंत या पक्षाचा कार्यक्रम पुढीलप्रमाणें पुढें मांडला गेलाः—

(१) सांप्रत विशिष्ट वर्गाच्या हातांत असलेली सत्ता हरएक उपायांनीं ह्मणजे दयामाया न करतां जोरदार, क्रांतिकारक उपायांनीं, तसेच आंतरराष्ट्रीय चळवळींच्या मदतीनें समूळ नष्ट करावयाची.

(२) स्वतंत्र समाजाची स्थापना करून त्यांत अर्थोत्पादनाची व्यवस्था सहकारितेच्या तत्त्वानुसार करावयाची.

(३) समान किंमतीच्या वस्तूंचा विनिमय अर्थोत्पादनांत भाग घेणाऱ्या सर्व व्यक्तींनीं आपापसांत करावयाचा.

(४) स्त्री व पुरुष दोन्ही समाजाकरतां शास्त्रीय तत्त्वांच्या पायावर समान शिक्षणाचा कार्यक्रम आंखून तो अमलांत आणायाचा.

(५) स्त्रीपुरुष किंवा वंशजाति वगैरे भेद न करतां सर्वांना समसमान हक्क द्यावयाचे.

(६) निरनिराळे स्वतंत्र समाज, संघ व आंतरराष्ट्रीय संघ बनवून त्यांतील व्यक्तींनीं स्वतंत्रपणें करारमदार ठरवून सर्व सार्वजनिक व्यवहार चालवावयाचे.

हा कार्यक्रम व त्याबरोबर मजूरवर्गाला एक विनंतिपत्र १८८३ मध्यें शिकागो येथें प्रसिद्ध करण्यांत आलें व फ्रेंच, बोहेमियन, जर्मन व इंग्लिश अशा चार स्थानिक कमिट्या स्थापण्यांत आल्या. त्या एका कमिटीचा मुख्य ऑगस्ट स्पाईस हा होता, त्याला शिकागो येथील हेमार्केट प्रकरणांत भाग घेतल्याच्या आरोपावरून १८८७ मध्यें फांशीं देण्यांत आलें. तें प्रकरण असें कीं, दिवसाच्या कामाचे तास आठ असावे, अशी चळवळ करणारे मजूर व पोलीस यांच्या दरम्यान झालेल्या चकमकींत कांहीं मजूर मरण पावले. या गोष्टीचा निषेध करण्याकरितां सभा भरविण्यांत आली, ती पोलीसांनीं उधळून लावण्याचा प्रयत्न केला; तेव्हां पोलीसांवर एक बाँबगोळा टाकण्यांत आला, त्यानें कांहीं पोलीस मरून कित्येक जखमी झाले. या प्रकरणांत खटला होऊन स्पाईस इत्यादि चार जणांना फांशीं देण्यांत आलें. यानंतर बरेच अत्याचार झाले व ते सर्व क्रांतिकारक उपायांनीं सुधारणा घडवून आणण्याऱ्या पक्षाच्या शिकवणीमुळें झाले. १८९३ मध्यें फ्रान्समधील चेंबर ऑफ डेप्युटीज या नांवाच्या कायदेमंडळामध्यें व्हेलँट यानें एक बाँब टाकला. तेव्हां त्याजवर झालेल्या खटल्याच्या वेळीं जज्जानें व्हेलँटला गरीब निरपराधी स्त्रीपुरुषांचे प्राण घेण्याच्या कृत्याबद्दल खूप दोष दिला. त्यावर व्हेलँटनें उत्तर केलें कीं, "बुर्ज्वाझी लोकांच्या (मध्यम स्थितींतील फ्रेंच लोक) वर्गामध्यें कोणी निरपराधी इसम असणेंच शक्य नाहीं (सर्व स्त्रीपुरुष अपराधी गुन्हेगार अतएव शिक्षेस पात्र आहेत)." या उत्तरावरून या पक्षाच्या मतांची स्पष्ट कल्पना होते. १८९४ मध्येंहि फ्रान्समध्यें दोन ठिकाणीं अत्याचार झाले व त्यांतील एका

कृत्याबद्दल सहाजणांनां फांशीची शिक्षा झाली. त्याच साली लीयाँ येथें एका इटालियनानें फ्रेंच प्रजासत्ताक राज्याचा प्रेसिडेंट कार्नो याचा खून झाला. या कृत्यांचा 'अराजक-समाजी' मतांशीं संबंध असल्याचें सर्वसाधारण लोकांचें मत पडल्यामुळें १८९४ मध्यें युनैटेड स्टेट्सच्या कॉंग्रेसनें ( कायदेमंडळानें ) परकी अराजकपंथीयांना देशांत येण्याची बंदी करून देशांतील अराजक मतवाल्यांना हद्दपार करण्याचा कायदा पास केला; शिवाय रोममध्यें १८९८ मध्यें भरलेल्या आंतरराष्ट्रीय परिषदेला या अराजक मतवाद्यांचा बंदोबस्त करण्याचा उपाय योजण्याबद्दल विनंति केली. अराजकमतवाद्यांचे गुन्हे राजकीय न गणतां सामान्य समजून त्यांनां चौकशीकरितां निरनिराळ्या सरकारांनीं एकमेकांकडे परत द्यावें. या क्रांतिकारक पंथाच्या छापखान्यांनां बंदी करून या पक्षाच्या गुन्हेगारांचा तपास लावण्याच्या कामीं सर्व देशांतील पोलीसखात्यांनीं सहकारिता करावी, अशा सूचनाहि पुढें आल्या; पण नक्की धोरण जाहीर झालें नाहीं. उलट १९०० मध्यें ब्रुसेल्स येथें इंग्लंडच्या युवराजाचा खून करण्याचा सिपिडो नामक तरुणानें प्रयत्न केला; त्याची चौकशी होऊन सिपिडो दोषमुक्त ठरला, तेव्हां ब्रिटिश सरकारनें बेल्जियन सरकारला रागानें पत्रहि लिहिलें, त्याच साली इटालीच्या हंबर्ट राजाचा खून झाला, त्यामुळें इटालींतील अराजकपंथीयांबद्दल फार ओरड झाली. पुढें १९०१ सप्टेंबरमध्यें बफलो येथें युनैटेड स्टेटसचा प्रेसिडेंट मॅकाकिनले याचा झागोकनें खून केला. यापेक्षां भयंकर अत्याचार १९०६ मध्यें स्पेनच्या तरुण राजाराणीचा त्यांच्या विवाहदिनीं खून करण्याचा प्रयत्न हा होय.

हिंदुस्थानांतील अत्याचार.—अराजकतेची तात्त्विक मीमांसा करणारे ग्रंथ अर्वाचीन किंवा प्राचीन हिंदुस्थानांत मुळींच झाले नाहींत आणि अराजकतेच्या तत्त्वाचे अनुयायी हिंदुस्थानांत मुळींच नाहींत असें म्हटलें तरी चालेल. गेल्या वीस वर्षांत ज्या चळवळी हिंदुस्थानांत झाल्या त्यांपैकीं कांहींस अराजक चळवळी म्हणण्यांत येतें पण तें नांव सार्थ आहे, असें वाटत नाहीं. जेव्हां लार्ड सिडेनहॅमसारख्या कांहीं ब्रिटिश अधिकाऱ्यांस, ब्रिटिश राज्य अप्रिय होत आहे असें नसून जे ब्रिटिश राज्याविरुद्ध ते केवळ ब्रिटिश राज्याविरुद्ध नसून शासनसत्तेच्या विरुद्ध आहेत, असें लोकांस भासवावयाचें होतें तेव्हां त्या अत्याचाराच्या प्रयत्नांस अराजक चळवळी म्हणण्याचा त्यांनीं उपक्रम सुरू केला असावा असें वाटतें. खून करणें, ब्रिटिश राज्य उलथून पाडण्याचा प्रयत्न करणें, यांसारख्या क्रियांस नादान ठरविण्याच्या अनेक प्रयत्नांपैकीं त्यांस अराजक ठरविणें हा एक प्रयत्न होता असें वाटतें. या चळवळींस अराजक म्हणण्यापेक्षां अराजनिष्ठ चळवळी म्हणणें अधिक बरोबर होईल. रौलट सारख्या मंडळींनीं देखील या प्रकारास अराजक न म्हणतां क्रांतिध्येय म्हटलें आहे.

हिंदुस्थानांत सरकारी अधिकाऱ्यांचे खून व जाळपोळी करणाऱ्या इसमांचे गुप्त कट असल्याचा संशय ब्रिटिश सरकारला पुष्कळ वर्षें होता. अशा क्रांतिकारकांच्या चळवळींचा वृत्तांत लक्षांत घेऊन त्यांचा बंदोबस्त करण्याचे उपाय सुचविण्याकरितां रौलॅटसाहेबाच्या अध्यक्षतेखालीं एक कमेटी १९१७ मध्यें नेमण्यांत आली. तिनें रिपोर्टांत जे अत्याचार नमूद केलें आहेत ते येणें प्रमाणेः—

मुंबईइलाखा.—१८९७ सालीं पुण्यास भयंकर प्लेगाची साथ उद्भवली. तिला प्रतिबंधक उपाय म्हणून क्वारंटाइन सेग्रीगेशन, घरें तपासणें, दूषित घरें धुणें, कपडे जाळणें, आजारी इसमास तात्काळ इस्पितळांत पोहोंचविणें वगैरे कृत्यें गोऱ्या शिपायांच्या मदतीनें पुणें शहरांत होऊं लागलीं. या कामावरचा मुख्य अधिकारी प्लेग कमिशनर रँडसाहेब व दुसरा एक इंग्रज लेफ्टनंट आयर्स्ट यांचा खून २२ जून १८९७ रोजीं दामोदर चाफेकर व त्याचा भाऊ यांनीं पुणें- गणेशखिंड रस्त्यावर रात्रीं खून केला. त्यांच्या चौकशींत चाफेकर असोसियेशन ( गुप्त मंडळ ) असल्याचें सिद्ध झालें. यानंतर लवकरच श्यामजी कृष्णवर्मा नांवाच्या इसमानें ( काठेवाडांतील मूळ रहिवाशी ) लंडन येथें इंडिया होमरूल सोसायटी स्थापून स्वातंत्र्य व राष्ट्रीय एकी यांच्या कल्पना हिंदुस्थानांत पसरविण्याकरितां तयारी करणारांनां स्कॉलरशिपादि मदत करण्याचें जाहीर केलें. १९०५ च्या सुमारास महात्मा श्री अगम्यगुरु परमहंस यानें पुण्यांत एक सोसायटी काढण्याचा प्रयत्न केला, त्यांत विनायक दामोदर सावरकर हा प्रमुख होता, पण लवकरच तो इंग्लंडमध्यें गेला व कृष्णवर्माच्या सोसायटींत सामील झाला. विनायकचा भाऊ गणेश सावरकर यांनीं अभिनव भारत सोसायटी व मित्रमेळा अशा मंडळ्या काढल्या होत्या, १९०९ मध्यें कृष्णवर्मा याचा एक अनुयायी मदनलाल धिंग्रा यानें लंडन येथें कर्नल वायली पोलिटीकल ए. डी. सी. याचा खून केला. याच सुमारास गणेश सावरकरावर पीनल कोडांतील १२१ कलमाप्रमाणें राजाविरुद्ध युद्धास मदत केल्याचा खटला झाला. तेव्हां अभिनव भारत सोसायटीपैकीं एका कान्हेरे नांवाच्या इसमानें नाशिकच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट ( कलेक्टर ) जॅकसन यांचा २१ दिसेंबर १९०२ रोजीं नाशिक येथें थिएटरांत खून केला.

बंगाल. इतर प्रांत.—अराजकांच्या कटांचा बंगाल्यांत्यांतील उत्पादक बरेंद्रकुमारघोस ( अरविंद घोस याचा भाऊ ) याला पाश्चात्त्य देशांतील अराजक लोकांच्या चळवळीची माहिती होती, व तशी बंगाल्यांत करण्याचा त्याचा प्रयत्न १९०२ पासून चालू झाला. लॉर्ड कर्झननें केलेल्या बंगालच्या फाळणीमुळें लोकांत असंतोष पसरला. तेव्हांपासून खून व दरवडे यांची परंपरा सुरू झाली. १९०७ मध्यें लेफ्टनंट गव्हर्नरच्या आगगाडीवर बॉंब फेंकण्यांत आला पण दुखापत झाली नाहीं. त्याच सालीं

डाक्काचा डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट ॲलन याचा खून झाला. १९०८ मध्यें मुझफरपूरचा जज्ज किंग्जफर्ड यांच्याऐवजीं चुकून मिसेस व मिस केनेडी या दोन स्त्रिया मारल्या गेल्या. १९०९ मध्यें अलिपूर बाँब प्रकरणांतील पब्लिक प्रॉसिक्यूटरचा, व १९१० सालीं डेप्युटी सुपरिंटेंडेंट ऑफ पोलीस, याचा खून करण्यांत आला. कांहीं गुप्त कट पोलिसांनीं शोधून काढून त्यांतील इसमांवर खटले केले पण त्यांनीं अत्याचार न थांबता वाढतच गेले. खून व दरवडे मिळून १९११ सालीं १६ अत्याचार; १९१२ सालीं १४; १९१३ सालीं १६; १९१४ मध्यें १७; १९१५ मध्यें ३२; १९१६ मध्यें १२; १९१७ सालीं ९; याप्रमाणें अत्याचार सालोसाल चालू राहिले. दरवडे अर्थात् मोठाल्या श्रीमंत लोकांच्या घरावर पडत असत, व खून गोरे अधिकारी, पोलीस खात्यांतील नेटिव्ह लोक, पब्लिक प्रॉसिक्यूटर, सरकारतर्फेचे साक्षीदार वगैरे लोकांचे होत असत. त्यामुळें साक्षीदार मिळण्यास कठिण जाऊं लागलें, आणि खऱ्या गुन्हेगारांवरहि योग्य पुराव्याच्या अभावीं आरोपाची शाबिति करणें कठीण पडूं लागलें. अलीपूर, हावरा, डाका, बारीसाल, इतक्या ठिकाणच्या गुप्त कटांची चौकशी झाली. याच काळांत संयुक्त प्रांतांत बनारस येथील गुप्त कट, पंजाबांतील लाहोरचा गुप्त कट उघडकीस येऊन त्यांचें जाळें बहार ओरिसा, मध्यप्रांत मद्रास, ब्रह्मदेश वगैरे प्रांतांत पसरल्याचें आढळून आलें. तिनेवल्ली ( मद्रास ) येथील डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट ( कलेक्टर ) याचा वंची आय्यर याने १७ जून १९११ रोजीं खून केला.

ज र्म न क ट.—बर्नहार्डीनें आपल्या "जर्मनी ॲंड दी नेक्स्ट वॉर" (जर्मनी व पुढील युद्ध) नांवाच्या १९११ मध्यें प्रसिद्ध झालेल्या पुस्तकांत असें म्हटलें होतें कीं, हिंदुस्थानांतलि ब्रिटिश राज्यास बंगाली व मुसुलमान मिळून धोका आणतील. स. १९१७ मध्यें सॅनफ्रॅंसिस्को येथें झालेल्या खटल्यांत जर्मन-इंडियन कटाबद्दलची बरीच माहिती उघडकीस आली. कॅलिफोर्नियांत ( अमेरिकेंत ) घदर रेव्होल्युशनरी पार्टी १९१४ पूर्वींच स्थापन झाली होती, व त्या सालीं बर्लिन येथें "इंडियन नॅशनल पार्टी" चेंपकरामन पिले यानें स्थापली व तिला जर्मन जनरल स्टाफची मदत होती. हिंदुस्थानांत बंड उभारण्याची तयारी हिंदुस्थानची वायव्य सरहद्द, बॅंकॉक व बटेव्हिया येथून शांघाय येथील जर्मनीच्या कॉंसल जनरलच्या देखरेखीखालीं चालू होती व त्यांनां वॉशिंग्टन येथील जर्मन एम्बसीकडून हुकूम मिळत असत. १९१५ सालीं मव्हेरिक नांवाच्या बोटींतून ३००० बंदूका, दारूगोळ्याच्या ४०० पेट्या, आणि दोन लक्ष रुपये बंगाल्यांत पाठविण्याचें बटेव्हिया येथें ठरलें. परंतु सरकारला ती बातमी कळून त्याबद्दल बंदोबस्त करण्यांत आला. या प्रकरणांत कलकत्त्यास पोलिसांनीं कांहीं झडत्या घेतल्या, व कांहीं इसमांवर खटले करून शिक्षा देवविल्या. मव्हेरिक बोटीचा बेत फसल्यावर शांघाय येथील जर्मन कॉंसल-जनरलनें आणखी दोन बोटी बंदुका, पिस्तुलें व दारूगोळा भरून पाठविण्याचें ठरविलें. परंतु हें बेतहि सरकारला अगोदरच कळले, आणि शांघाय, शिकागो व सॅनफ्रॅंसिस्को येथें कांहीं इसम पकडून त्यांनां शिक्षा देण्यांत आल्या. व सर्व कट हाणून पाडण्यांत आले.

याप्रमाणें हकीकत १९१८ सालच्या सेडिशन कमिटीच्या रिपोर्टांत दिली आहे. त्यानंतर सत्याग्रहाची व असहकारितेची चळवळ सुरू झाली व गेल्या पांच सहा सालांत कांहीं अत्याचार झाले. (विभाग १ ला परिशिष्ट) त्यांत कोठेंहि अराजक समाजस्थापना हें ध्येय नसून ब्रिटिश सत्ता नष्ट करून स्वराज्य स्थापणें एवढाच हेतु निदर्शनास आला आहे. अनार्किस्टांचें भांडवलाविरुद्ध ध्येय बोलशेव्हिकांनीं घेतलें पण त्यांनीं शासनसंस्थेस सर्वसत्ताधीश केलें. बोलशेविक चळवळ ( पहा ) हिंदुस्थानांत आल्याचा निश्चित पुरावा नाहीं. ( ब्लिस )

**अरागो, डामिनिकस फ्रॅंस्वा जीन** (१७८६-१८५३) फ्रेंच पदार्थविज्ञानी याचा जन्म ता. २६ फेब्रुवारी १७८६ रोजीं पिरनीज पर्वताजवळ इस्टागेल नांवाच्या गांवीं झाला. त्याला लष्करी पेशाची आवड आहे असें पाहून त्याला लष्करी कॉलेजांत पाठविण्यांत आलें. तेथें उच्च शिल्पविद्यालयांत जावें या उद्देशानें यानें गणिताचा अभ्यास सुरू केला. सन १८०३ सालीं त्याचा त्या शाळेंत प्रवेश झाला; व तेथून तोफा चालविण्याच्या शास्त्राचें ज्ञान मिळवून बाहेर पडण्याचा त्यानें निश्चय केला. पुढें सन १८०४ सालीं डी ए. प्वाझांन या शास्त्रज्ञाच्या शिफारशीनें पॅरिसच्या वेधशाळेंत चिटणीसाच्या जागेवर त्याची नेमणूक झाली. तेथें त्याची लाप्लासबरोबर ओळख झाली; व पुढें लप्लासच्या ओळखीनें त्याची भूयाम्योत्तरा( किंवा रेखांशवृत्त )चें मापन करण्याच्या कमिशनवर नेमणूक झाली. या कामांत जे. बी. बिआट हा याचा जोडीदार होता. सन १८०६ सालीं या दोघांनीं पॅरिस शहर सोडलें व स्पेन देशांतील पर्वतावर एतत्संबंधीं पाहणी (सर्व्हे) करण्यास सुरुवात केली. त्या दोघांनीं फारमेन्टेराच्या अक्षांशनिश्चयाचें काम केल्यावर पुढें सर्व काम अरागोच्या अंगावर पडलें. तेव्हां त्याला फारमेन्टेरा आणि इव्हिका यांचा संबंध मेजोर्का ( बेटा ) बरोबर जोडून भूयाम्योत्तरासंबंधीची पहाणी पुरी करणें भाग पडलें.

त्या काळच्या फ्रान्समधील राजकीय उलाढालीनें स्पेन देशांतहि क्रांतिकारक चळवळी सुरू झाल्या, व त्या चळवळीच्या लाटा वरील बेटापर्यंत येऊन थडकल्या. त्या बेटावरील लोकांनां अरागोचा बळकट संशय येऊं लागला. त्याला एका टेंकडीवरून दुसऱ्या टेंकडीवर खूण देण्याकरितां आगटी पेटवून इशारत द्यावी लागत असे. खेडवळ लोकांस असें वाटूं लागलें कीं, या खुणा परकीय सैन्याकरितांच आहेत. त्यामुळें त्याला एका किल्ल्यांत अडकून पडावें लागलें. तेथें दीड दोन महिने बंदिवासांत काढून २८ जुलै

१८०८ रोजीं एका मच्छीमाऱ्याच्या बोटींतून त्यानें पळ काढला पण पुन्हां स्पॅनिश लोकांच्या हातीं तो सांपडला. पुढें फ्रेंच सैन्यानें त्याची मुक्तता केली.

अरागोनें आपले मागील पहाणीचे कागद जपून ठेविले होते त्यानें ते पॅरिस शहरांतल्या 'ब्युरो डी लांजिटयूड' नांवाच्या संस्थेकडे पाठवून दिले. शास्त्रीय शोधाकरतां त्यानें हें जे धाडस केलें त्याकरितां त्याला सन १८०९ सालीं 'अकॅडेमी ऑफ सायन्स' नांवाच्या संस्थेचा सभासद करून घेण्यांत आलें. तसेच त्याला उच्च शिल्पशाळेचा अध्यापक नेमण्यांत आलें याच सुमारास बादशहानें त्याची रायल आब्झरव्हेटरींत नेमणूक केली. याच वेधशाळेंत त्यानें इ. स. १८१२ पासून ते १८४५ पर्यंत आपला काळ घालविला. सन १८२१ सालीं त्याला रेखांशमंडळाचा ( ब्यूरो ऑफ लांजिटयूड ) सभासद करण्यांत आलें.

सन १८३० सालीं त्याला लोअरसीनचा एक डेप्युटी नेमण्यांत आलें. या संधीचा उपयोग करून फोटोग्राफी कलेचा संशोधक डेग्यूरेला बक्षीस देवविलें. नंतर लाप्लास आणि फर्माट यांच्या ग्रंथांचें प्रकाशन, क्लुनी येथलि पदार्थसंग्रहालय, तारायंत्र आणि रेल्वे यांची वाढ, सीन नदींतून जहाजें जाण्याची सोय व कारंजाच्या ( आर्टेसिअन विहिरी या सर्व गोष्टींकडे त्यानें लक्ष्य पुरविलें.

सन१८४८ च्या सुमारास लुई फिलिप हा पदच्युत झाला. त्यानंतर जी तात्पुरती शासनसंस्था स्थापन झाली तिला मदत करण्याकरितां त्यानें कांहीं काळपर्यंत आपली वेधशाळा सोडली. लष्करखातें आणि आरमारखातें यांच्या प्रधानकीच्या जागेवर त्याची नेमणूक झाली. त्यानें आरमार खात्यांत बरीच सुधारणा केली. सर्व प्रकारच्या राजकीय बाबतींतलि शपथविधि बंद केल व भांडवलवाल्यांच्य विरोधाकडे लक्ष्य न पुरवितां फ्रेंच वसाहतींतून गुलामांची पद्धत नामशेष केली.

पुढें इ. स. १८५२ सालीं लुइ नेपोलिअन याच्या कारकीर्दींत असें ठरविण्यांत आलें कीं, प्रत्येक सरकारी अंमलदारानें राजानिष्ठेची शपथ घ्यावी. परंतु आरागो यानें तशी शपथ घेण्याचें नाकारिलें व लागलाच वेधशाळेंतील आपल्या जागेचा राजिनामा राजाकडे पाठवून दिला. परंतु राजानें तो राजिनामा मंजूर केला नाहीं. पुढें लवकरच तारीख २ आक्टोबर १८५३ रोजीं तो पॅरिस येथें मरण पावला.

त्याचे शोधः—अरागो यानें विद्युच्छास्त्र आणि चुंबकशास्त्र या दोहोंत शोध लाविले आहेत आणि जे प्रयोग केले आहेत त्यामुळें त्याची प्रसिद्धी झाली आहे. त्यानें प्रकाशशास्त्रांतहि बरेच शोध लावले आहेत. अलोहमय द्रव्यावर चलचुंबकसूचि टांगली तर ज्या प्रमाणांत त्या द्रव्यापासून सूचीचें अंतर असेल त्या प्रमाणांत सूचीचें प्रकंपन कमजास्त होतें असें त्यानें सिद्ध करून दाखविलें. या शोधाबद्दल त्याला सन १८२५ सालीं रायल सोसायटीनें आपलें पदक बक्षिस दिलें. यानंतरचा त्याचा महत्त्वाचा शोध म्हटला म्हणजे ताम्रवर्तुलाच्या गतीनें चलचुंबकास प्राप्त होणारी गति हा होय. ध्रुवस्थ तेजोमंडला (आरोरा बोरिआलिस) चा आणि भूचुंबकत्वाचा संबंध आहे असें त्यानें दाखवून दिलें.

अरागो, फ्रेस्नेल आणि यंग या तिघांनीं प्रकाशाच्या आंदोलनाचा सिद्धान्त, गणित आणि प्रायोगिक पद्धत यांच्या सहाय्यानें प्रस्थापित केला. (विज्ञानेतिहास पा. ५३४) फ्रेस्नेल आणि अरागो या दोघांनीं प्रकाशाच्या ध्रुवीभवनाची गणितदृष्ट्या उपपत्ति लावून दिली. अरागो यानें ध्रुवीभूत–प्रकाशदर्शक ( पोलॅरिस्कोप ) नांवाचें यंत्र तयार केलें. शिरगोळ्याच्या स्फटिकाच्या अंगीं ध्रुवीभूत प्रकाशाचें वर्तुलाकृति भ्रमण करविण्याचा धर्म आहे असें त्यानेंच प्रथमतः शोधून काढलें.

**अरारिया**—बंगाल पुर्णीआ जिल्ह्यांतील वायव्येकडील विभाग नेपाळ सरहद्दीवर आहे.क्षेत्रफळ १०७७ चौरस मैल. २५°५६' ते २६°३५ उत्तर अक्षांश व ८७°३' ते ८७°४२' ते पूर्व रेखांश लोकसंख्या सुमारें चार लक्ष. यांत ६०० खेडीं आहेत. वसंतपूर, फोर्ब्सगंज' राणीगंज येथें मोठे बाजार भरतात व मदनपूर आणि चंद्रदिही येथें गुरांचे बाजार भरतात. वसंतपूर हें या विभागाचें मुख्य ठिकाण असून, येथून चार मैलांवर अरारिया खेडें आहे. या खेड्यावरूनच विभागाला हें नांव मिळालें.

**अरिसिंह**—लावण्यसिंह अगर लवणसिंह याचा मुलगा अरिसिंह, यानें आपला आश्रयदाता जैन मंत्री वस्तुपाल याच्या सन्मानार्थ "सुकृत संकीर्तन" नांवाचा ग्रंथ लिहिला, हा वस्तूपाल, धोलका राणा वीरधवल, आणि त्याचा मुलगा, वीसलदेव यांचा प्रधान होता." बालभारत," "काव्यकल्पलता" "काव्यकल्पलतापरिमल" आणि पद्मानंद "या ग्रंथांचा कर्ता. व जिनदत्तसूरीचा शिष्य, अमरपंडित, हा अरिसिंहाचा समकालीन होता. हा अमरचंद्राचा सहाध्यायी होता ( अमरचंद्रसूरि पहा. ) अरिसिंहानें, "कवितारहस्य" नांवाचे, अलंकारशास्त्रावरील छोटें पुस्तक लिहिलें; व अमरचंद्राला "काव्यकल्पकता" नांवाचें पुस्तक लिहिण्याच्या कामीं मदत केली असावी असें दिसतें.

**अरुचि**—शरीरांत कोणताहि रोगोद्भव झाला म्हणजे बहुतकरून अरुचि हें लक्षण उत्पन्न होतेंच. यासाठीं अरुचि उत्पन्न झाली असतां ती कशामुळें झाली हें रोग्यास कळत नसल्यास वैद्याकडून प्रकृति तपासावी. एखादे वेळीं कारण न सांपडल्यास क्षुधाप्रदीपनकरणारीं औषधें घेतल्यानें क्षुधा व पचन वाढून शक्ति वाढते तथापि हा मुख्य रोग नसून एखाद्या रोगाचें हें लक्षण आहे हें ध्यानांत ठेवावें व ज्या मूळ रोगामुळें अरुचि उत्पन्न झाली आहे त्यावर उपचार करावेत. तोंडास रुचि चांगली असते असेहि थोडे रोग आहेत, त्यांपैकीं मधुमेह आणि भस्मक रोग ( खा खा

सुटणें ) हीं उदाहरणें विशेष आढळतात. कांहीं प्रकारच्या अग्निमांद्य रोगांत जीभ स्वच्छ असून अरुचि नसते, इतकेंच नव्हे तर फक्त त्यावेळीं भूक लागून कांहीं थोडें खावयास त्यावेळीं न मिळाल्यास घेरी, चक्कर आल्याप्रमाणें होऊन मनास व शरीरास फार थकवा येतो. जठरांतील पचन बहुधां चांगलें होतें, परंतु कधीं कधीं करपट व आंबट ढेंकरा येतात. जठराची पोकळी बहुधां मोठी झालेली असते. या सर्व व्याधींत वैद्यकीय मताप्रमाणें योग्य उपचार करावेत.

नि दा न ( आयुर्वेदीय विवेचन ).—जीभ व हृदय यांत राहाणाऱ्या दोषापासून म्हणजे वात, पित्त, कफ,व सन्निपात यांपासून आणि मनाच्या संतापानें होणारी अशी एकंदर अरुचि पांच प्रकारची आहे. वातज अरुचींत तुरट, पित्तज अरुचींत कडूज कफज अरुचींत गुळमट, आणि सान्निपातिक अरुचींत वेचव तोंड होतें. शोक, क्रोध इत्यादि मनोविकारांपासून उत्पन्न होणाऱ्या अरुचींत त्यांच्या उत्पादक दोषांच्या अनुसार तोंडाची रुची होते.

अरोचक हा रोग इतर ग्रंथांत ( भोज, माधव ) तीन प्रकारचा आहे. अरुचि, अन्नानभिनंदन आणि भक्तद्वेष, या तीहींतहि थोडा फरक आहे तो असाः— भूक लागली असतां खाववत नाहीं ( रुचि नसल्यामुळें ), त्यास अरुचि म्हणतात. आवडत असलेला पदार्थहि नकोसा वाटतो. त्यामुळें खाववत नाहीं यास अन्नानभिनंदन म्हणतात.

अन्नाची आठवण झाली, किंवा अन्न पाहिलें तरी तिटकारा येतो त्यास भक्तद्वेष म्हणतात. या सर्वांत थोडा फरक आहे परंतु सर्वांचा अर्थ न रुचणें ( अरोचक ) असा होतो. म्हणून हे तिन्ही विकार अरोचक यांतच अंतर्भूत केले आहेत.

चि कि त्सा.—वातिक अरोचकावर बस्ती, पित्तजन्य अरोचकावर विरेचन, व कफजन्य अरोचकावर ओकारी ही चिकित्सा करावी. शमनरूप औषधांमध्यें औषधांच्या गुळण्या करणें, धुम्रपान, तोंड धुण्याचीं औषधें, व मनाला आवडणारें अन्नपान, हर्ष, आश्वासन, हे उपाय प्रामुख्यानें करावे.

आंबट कांजींत थोडें सैंधव घालून त्याच्या गुळण्या कराव्या, चिंच व मुगाचें कढण यांत दालचिनी, वेलदोडे व मिरें घालून त्याच्या गुळण्या कराव्या. एक भाग लिंबाचा रस व सहा भाग साखरेचें पाणी यांत लवंगा व काळीं मिरें घालून ( त्यांचें चूर्ण ) प्यावें. करंज्याच्या कोंवळ्या काड्यांनीं दांत घासावे. बावडिंमाचें चूर्ण एक तोळा व मध ४ तोळे एकत्र करून तोंडांत धरावें यानें असाध्य अरुचीहि जाते. खडीसाखर, सुंठ, मिरी, पिंपळी व पिकलेलें कवठ यांचें चूर्ण करून मधांत गोळी करावी व ती गोळी तोंडांत धरावी यानें अरुचि जाते. महाळुंगाचा गीर, सैंधव, व मध हीं तोंडांत ठेवून चघळून चघळून खावीं दोषानुरोधानें याबरोबर तूपहि घ्यावें. डाळिंबाची साल चावून चावून खावी. पारा, गंधक, अभ्रक, लेंडी पिंपळी, चिंच, मिरी व सैंधव हीं सर्व समभाग घेऊन गोळी करून ती तोंडांत धरावी.

दह्यावरची निवळी, मध, गूळ, व आंबट कांजी, हीं मडक्यांत घालून, तोंड बंद करून तीन दिवस धान्याच्या राशींत ठेवावें; याला चुक असें म्हणतात; हें तोंडांत धरलें असतां अरुचि जाते. काकडी, वेताचे कोंब, कोंवळा मुळा, वांगीं, शेवग्याच्या शेंगा, आंवा, डाळिंब, निंव, परवर, पादेलोण, दूध, तूप, ताडफळें, लसूण, सुरण, मनुका, द्राक्षें,कांजी, बोरें, श्रीखंड, दहीं, ताक व आलें यांचा उपयोग केला असतां अरुचि जाते.

स्नानादिकांनीं देहशुद्धी करणें हेंहि अरुचि घालवणारें आहे. यवानीखांडवचूर्ण, आमलक्यादिचूर्ण, यांचाहि उपयोग करावा(योगरत्नाकर).

**अरुण**—सूर्यसारथिरूपानें असणाऱ्या उपदेवें सूतसंस्कृतींतील हें नांव आहे. अरुण हें नांव अनेक पौराणिक व्यक्तींनां लाविलेलें आढळतें. कश्यपपुत्र जो सूर्यसारथी अरुण तोच सर्वांत प्रसिद्ध आहे. यांची आई विनता हिनें अंडें पक्व होण्यापूर्वीच फोडलें म्हणून तो पांगळा झाला. ( महाभारत व विष्णुपुराण )

**अरुणगिरीनाथ डिण्डिम**—हा कवि सार्वभौम म्हणून प्रसिद्ध होता. यानें 'सोमवल्ली योगानंद' नांवाचें प्रहसन लिहिलें. ( स्टेन कनो यांचा नाटकावरील ग्रंथ )

**अरुंतुद**—रसायनशास्त्रांत अरुंतुद = क १३ उ ९ व ॲक्रिडाइन हा एक उत्कर्ष ( हायड्रोकार्बन ) आहे, दगडी कोळशापासून डामरांत ३४०° श ते ३६०°श उष्ण मानावर शुष्कपात पावणारा जो भाग असतो त्यांत असणाऱ्या अशुद्ध कर्बसंकाशीन त्यांचा अरुंतुद असतो. याची घटना चक्रवलयेतर ( हिटरो सायक्लीकरिंग ) आहे. अशुद्धकर्बसंकाशीनचा भाग पातळ ग्रंथकाम्लाच्या द्रवाबरोबर हलविला म्हणजे अरुंतुद विद्राव्य होतो. याचे जें अम्ल गळण येतें त्यांत पालाशद्विक्रुमित घातलें म्हणजे अरुंतुद द्विक्रुमिताच्या रूपांत निपात पावतो. तो निपात गाळून धेऊन त्यावर अन्न ( अमोनिया ) ची क्रिया केली म्हणजे अरुंतुद असंयुक्त होतो याचे रंगहीन सूचिकाकार स्फटिक असतात, ते ११०° श उष्णमानावर वितळतात, हे स्फटिक शीघ्र उर्ध्वपात पावतात, व त्यापासून नाकास झोंबणारी वाफ निघते. द्विभानिल अमिन ( डायफेनिल अमिन ) व पुत्तिकाम्ल ( फार्मिक ॲसिड ) यांचें संयोगीकरण जशद हरिदाच्या सांनिध्यांत केलें म्हणजे अरुंतुद तयार होतो तो येणेंप्रमाणेंः—


द्विभानिल अमिन + पुत्तिकाम्ल
क६उ५.नउ.क६उ५ + कउप्रप्रउ } =


अरुंतुद + पाणी


क६उं.४न.कउःक६उ४ + २उ२प्र.

याशिवाय अरुंतुद कृत्रिम संयोगीकरणानें तयार करण्याच्या पुष्कळ रीति आहेत.

अरुंतुदाचा चामडीला-अंगाचे कातड्याला-स्पर्श झाला म्हणजे अतिशय खाज सुटते. अरुंतुद-क्षाराचे द्रव असतात त्यांस जांभळसर रंगाची झांक असते. (रंगकांति). पालाश परिमंगलितानें (पोट्यासि.यम परम्यांगनेटने) यावर प्राणिदी करणाची क्रिया केली म्हणजे अरुंतुदाम्ल क९उ५ व कप्रप्रउ) तयार होतें. अरुंतुदाचे जे समश्रेणी पद-घटनेचे पदार्थ आहेत त्यांच्यापासून आदिष्ट (सबस्टिट्युशन प्रॉडक्टस) होतात ते फार महत्त्वाचें रंग असतात.

भानिल अरुंतुदा (फेनिल-ॲक्रिडाइन) पासून सुवर्णनीलीन (क्रिसॲनिलाइन), कांतिभास्विन (फॉस्फाइन) अरुंतुद पीत वगैरे उत्तम रंग तयार होतात. सुवर्णनीलीनचे लाल रंगाचे क्षार असतात, त्यांच्या योगानें रेशीम व लोंकर यांवर पिवळा रंग चढतो. या क्षारांच्या द्रवास पिंवळसर हिरवी कांति असते. उदील फ्लाविन (बेंझोफ्लाविन) हा सुवर्णनीलीनचा समघटकच आहे. उदील फ्लाविनची पिवळ्या रंगाची पूड असते ती गरम पाण्यांत विद्रुत होते. हे व दुसरे अनेक रंग उदील प्रायोज्जिद (बेंझाल्डिहाईड) आणि अरुंतुद यांच्या संयोगीकरणापासून तयार होतात.

**अरुंधती**— १ स्वायंभु मन्वंतरांतील जो वसिष्ठ ऋषि, त्याची स्त्री, ही कर्दम प्रजापतीपासून देवहूतीस झालेल्या नऊ कन्यांतील एक होती.

२ चालू वैवस्वत मन्वंतरांतील जो मैत्रावरुणि वसिष्ठ ऋषि, त्याची स्त्री; ही कोणाची कन्या तें आढळत नाहीं, मात्र नारदाची भगिनी,इतकेंच आढळतें.हिला वसिष्ठापासून झालेला पुत्र, तोच शक्ति ऋषि (मत्स्य० अ० २००).

३ प्राचेतस दक्षाची कन्या, धर्मऋषीच्या दहा स्त्रियांतील एक, हिलाच ककुब अ० ककुभ असें नामांतर असे. हिला संकट ना० पुत्र, व कीकट पौत्र होता. (भाग ६ स्कं० अ. ६).

अरुंधतीची पावित्र्याबद्दल विशेष ख्याति आहे. तथापि तिलाहि मत्सर सुटला नव्हता. एकदां वसिष्ठ ऋषि सप्तर्षींच्या मध्यभागीं विराजमान झाले असतां अरुंधतीनें त्यांच्या आचरणाबद्दल शंका घेऊन त्यांचा मोठा अपमान केला. अरुंधती या किल्मिषानें हिरवीपिवळी झाली व पतीवर सक्त पहारा ठेवण्यासाठीं गुप्त वेषानें कधीं दृश्य तर कधीं अदृश्य अशा स्थितींत राहूं लागली (महाभारत १, २३३)

एके वेळीं बारा वर्षांचें अवर्षण पडलें असतां अरुंधती निराहार राहिली; सप्तर्षी मात्र वृत्त्यर्थ हिमालयाच्या अरण्यांत गेले. तेव्हां शंकरानें संतुष्ट होऊन तिला वर मागण्यास सांगितलें. तिनें, ज्या तीर्थाच्या कांठीं अतिथिवेषांत आलेल्या शंकरासाठीं बोरें शिजवीत ती बारा वर्षें निराहार बसली होती, त्या 'बदरपाचन' तीर्थाचें महात्म्य वाढविण्याविषयीं वर मागितला (म. भा. ९,४८).

अरुंधतीची योग्यता फार मोठी मानीत. तिच्यापासून उपदेश घेण्यास देव, ऋषी वगैरे सर्वच मोठे उत्सुक असत. एकदां देव, पितर व ऋषिगण यांच्या विनंतीवरून ती धर्मरहस्य सांगत आहे (म. भा. १३, १३०).

वैवाहिक सुखाचा आदर्श म्हणून वसिष्ठ अरुंधतीकडे बोट दाखवितात. आर्य लग्नविधींत अरुंधतीदर्शनाचा एक प्रसंग असतो. त्यावेळीं वरानें वधूस अरुंधती नक्षत्र दाखवून तूं अरुंधतीसारखी पतिनिष्ठ हो असें सांगावयाचें असतें.

**अरुंधतीदर्शनन्याय**—अरुंधती नक्षत्र हें इतकें सूक्ष्म आहे कीं, तें दाखवितांना जवळचा मोठा तारा आधीं दाखवून मग अरुंधती त्या शेजारीं पहाण्यास सांगतात. या कृतीला अरुंधतीदर्शनन्याय म्हणतात.

**अरे**—आर्य शब्दापासून या जातिवाचक शब्दाची उत्पत्ति दिसते. हे लोक मध्यप्रांत व त्रावणकोर या भागांतच आहेत. १९११ सालीं हिंदुस्थानांतील एकंदर २,४१२ अरे लोकांपैकीं २,२८९ मध्यप्रांत-वऱ्हाडांत व बाकीचे त्रावणकोर संस्थानांत आढळले.

मध्य प्रांतांतील अरे.—चांदा जिल्ह्यांतील शेतकी करणारा हा वर्ग असून यांची संख्या २००० पेक्षां जास्त आहे. मध्यप्रांतांत हे तेलंगणांतील आलेले कुणबी लोकाप्रमाणें राहणारे लोक आहेत. यांचीं कांहीं आडनावें कुणब्यांप्रमाणेंच आहेत. जसें खैरे, तिरेळे. इतरांचीं नांवें कायथ व खत्री अशीं आहेत. हे ब्राह्मण बनिया व कोमटी लोकांस जातींत घेतात. महाराष्ट्रांतून हे पूर्वी तेलंगणांत जाऊन तिकडून चांद्याकडे आले असावे.

तेलंगणांतील अरे.—तोवळ तालुक्याच्या दक्षिण भागांत हे लोक राहतात. ब्राह्मणांच्या सर्व धर्मविधींचें आचरण ते ब्राह्मणांच्या मदतीनें करतात परंतु ते ब्राह्मणांबरोबर अन्नोदक विधी करीत नाहींत. सुतक व वृद्धि यांचा काल १५ दिवस असतो. [सेन्सस रिपोर्ट, व हिरालालकास्ट ॲंड ट्राइब्स इन सी. पी.]

**अरेमाइक**—या भाषेंतील वाङ्मय उपलब्ध नाहीं. ही एक सेमिटिक भाषा होती. या भाषेमधील शब्द बायबलमध्यें पुष्कळसे आढळून येतात. बॅबिलोनिआ या देशांतहि ही भाषा बोलत असत. येशू ख्रिस्ताची हीच जन्मभाषा होती.

**अरेटिअम**—हें एट्रूरीया प्रांतांतील प्राचीन शहर. या शहरच्या नक्की जागेबद्दल वाद आहे. पण हें फ्लारेंशियाच्या आसपास ५० मैलांत होतें. नवीन शहराच्या भागांतून कितीतरी जुन्या एट्रुस्कन कबरी सांपडतात. नवीन शहरानजीक बरेच प्राचीन अवशेष सांपडतात. येथें अर्धवर्तुलाकृति रंगभूमीचे (ॲंफीथिएटर) अजून कांहीं अवशेष दिसतात. रोंममधून टारक्विनसनां हांकून दिल्यावर अरेटिअममध्यें त्यांस आश्रय मिळाला होता. ख्रिस्ती शकाच्या तिसऱ्या व चवथ्या शतकांत या शहरानें रोमशीं वैर होतें. हॅनिबालशीं झालेल्या युद्धप्रसंगीं ह्या शहरीं रोमन लोकांचा तळ होता. इ. स. पूर्वी २०५ मध्यें या शहरानें सीपिओला पुष्कळ धान्य, हत्यारादि

वस्तूंचा पुरवठा केला. अरेटिअमनें "सुल्ला विरुद्ध मेरीयस" या रोममधील वादवींत मेरियस याची बाजू घेतली. इ. स. पूर्वी ४९ या वर्षी सीझरनें हें शहर घेतलें. मिसीनस हा याच ठिकाणचा राहणारा होता. येथील जमीन फार सुपीक असून मातीच्या सुंदर भांड्यांबद्दल याची प्रसिद्धि असे.

अरैन—अरैनांत हिंदु, मुसुलमान, जैन व शिख आहेत. सर्वांत मुसुलमानांची संख्या जास्त आहे. १९११ च्या खानेसुमारींत एकंदर अरैन १०,०१,५९३. ( पैकीं ५,५४,५०१ पुरुष व ४४,७,०९२ स्त्रिया )होते. यांत १०,००,३६० मुसुलमान अरैन निघाले. पंजाब व काश्मीर येथें हे दिसतात; विशेषतः पंजाबांत बहुतेक अरैन आहेत असें म्हटल्यास चालेल. पं जा बां ती ल अ रै न.—पंजाबांत यांची संख्या १९११सालीं९,७७, ६०१ ( ५४११८९ पुरुष व ४३६,४१२ स्त्रिया ) भरली. ही शेतकरीजात कंभो ( कांबोज ) जातीपासून तयार झाली असून, यापैकीं कांहींजण अद्याप आपल्याला कंभोअरैन म्हणवितात. पतियाळा आणि कर्नाल येथें अजून हिंदु अरैन आहेत; व कंभो जातीमध्येंहि अरैन नांवाची एक पोट जात आहे हें नांव बहुधा रैन किंवा रहिन ( रहक–जमीन नांगरणारा ) वरून पडलें असावें. रोहतक, गुरगांव, सिमला, कांग्रा, झेलम, रावळपिंडी आणि अटक जिल्हे वगळून बाकीच्या प्रांतांत हे शेतकरी म्हणून जाहीर आहेत. ही जात धंद्यावरून झालेली असून यांच्यांत मुख्यांश म्हणजे बाटलेल्या कांबोज लोकांचा आहे. का श्मी रां तीं ल अ रै न–ह्या जातीची लोकसंख्या २०,६२१ असून हें लोक मुसुलमानी धर्माचे आहेत. संयुक्त प्रांतांतलि मुसुलमानी धर्माचे कच्छी या लोकांप्रमाणें हे लोक शेती करितात. ते सामान्यतः भाजीपाला व बाजारांत विकले जाणारे इतर बागेंतील पदार्थ यांची लागवड करितात. [ सेन्सस रिपोर्ट १९११–पंजाब व काश्मीर ]

अरोरा—१ हें मोडकळीला आलेलें गांव, सिंध प्रांतांत रोहरी तालुक्यांत आहे. येथें पूर्वी सिंधच्या राजाची राजधानी होती. सिंधू नदीच्या जुन्या प्रवाहाच्या काठीं हें गांव वसलेलें होतें. इ. स. ९६२ त धरणीकंपाच्या योगानें नदीचा प्रवाह बदलला जाऊन या गांवाचा नाश झाला. अवशिष्ट भागांत अलमगीरानें बांधिलेली एक मशीद व कालिका देवीची मूर्ति असलेली एक गुहा आहे. तेथें वार्षिक जत्रा भरते.

—२ एक जात. याची वस्ती वायव्य सरहद्दीचा प्रांत, पंजाब, काश्मीर इत्यादि ठिकाणीं आहे. १९११ सालीं यांची संख्या ७,४६,८३८ होती. त्यांपैकीं निवळ पंजाबांत ६,७३,६६५ अरोरा लोक आढळले. हिंदु, शीख जैन व मुसुलमान अशा चारहि धर्माचे लोक अरोरांत आहेत. पंजाबांतील अरोरा.—हे मुख्यतः हिंदु व शीख आहेत. यांच्यांत फक्त २८६ मुसुलमान आहेत. ते सर्व पंजाबभर पसरलेले आहेत. परंतु मुख्यत्वेंकरून ते रावळपिंडी, मुलतान, लहोर विभाग, फेरोजपूर जिल्हा आणि भावलपूर संस्थान तेथें आढळतात. त्यांचा परंपरागत धंदा व्यापार व सावकारी हा होय. परंतु कांहीं शेतीवरहि आपला उदरनिर्वाह करितात. यांचा सामाजिक दर्जा खत्री लोकांच्या प्रमाणें आहे. त्यांच्या चालीरितींवरून ते मूळचे खत्रीलोकच असावे असें मत कित्येक प्रतिपादितात. सिंध जिल्ह्याची प्राचीन राजधानी रोरी (सक्कर) शहर व त्याजवळ असलेल्या अरोरकोटाशीं या लोकांचा संबंध असावा. पंडित [ इ ति हा स]राधाप्रसाद यांनीं कार्तवीर्य अर्जुनाचा वंशज प्राचीन ओड्र राष्ट्रांस ओड्र याच्यामार्फत आरोरा व चंद्रवंशी रजपूत यांचा संबंध जोडण्याचा प्रयत्न केला आहे. त्यांच्या मताप्रमाणें "महाभारत ( २. ५१. ) व बृहत्संहिता या ग्रंथांवरून ओड्रदेश हा पंजाबच्या दक्षिणेस किंवा नैर्ऋत्येस असावा. परशुरामाच्या त्रासापासून सुटण्याकरितां क्षत्रिय लोक येथें पळून आले असावेत व या अज्ञातवासांत त्यांनीं यज्ञोपवीत टाकून देऊन कारागिरांचा धंदा उचलला असावा. ओड्र या शब्दाचा अपभ्रंश रोद्र व कालेंकरून रोर, किंवा अरोर अथवा रोरा किंवा अरोरा असा झाला असावा. महाभारतामध्यें ओड्र देशाचा उल्लेख आहे; व ओड्र ही जात शूद्रत्वाप्रत गेलेली क्षत्रियाची जात आहे असें मनुस्मृतींत ( १. ४३–४५ ) आहे. राधाप्रसाद यांची अरोरांस क्षत्रिय ठरविण्यासाठीं केलेली जुळवाजुळवी समाधानकारक नाहीं कांकीं प्राचीन राष्ट्रास ओड्र हा एकच शब्द नसून उड्र असाहि आहे. आणि त्यांचें स्थान पंजाब नसून अंगवंगाच्या आसपास असावें असें उल्लेखांवरून वाटतें उद्र याचा अर्थ कांहीं ग्रंथकार उरिया करतात. व मनुस्मृतीमध्यें कांहीं प्रतींत चोड्र या ऐवजीं चोड असा पाठभेद आहे. शिवाय एखादी जात एखाद्या पौराणिक व्यक्तीपासून काढणें हा निव्वळ भोळसरपणा आहे. पंडित राधाप्रसाद म्हणतातः—ती जात कांहीं काल फक्त पतित झाली होती. || सिंधचे लोहाणा व अरोरा हे बहुतकरून एकच आहेत. हे लोखंडाचें काम करीत असत, त्यांवरून त्यांच्या जातीस लोहाणा हें नांव पडलें असावें. नंतर ते लोक व्यापार करूं लागले व सिंधुनदाच्या बाजूनें अरोरकोटहून पंजाबांत पश्चिमेकडील प्रांतांत त्यांना किरार असें नांव आहे. किरार हा शब्द किरात शब्दाचा अपभ्रंश आहे आणि यावरून अरोरा लोकांचा किरात देशाशीं संबंध असावा. अरोराच्या पूर्वीचें हें नांव असावें. त्यांचे दक्षिणी अरोरा व उत्तरीय अरोरा हे विभाग बहुतकरून बुद्ध धर्माचा यांच्यावर झालेल्या परिणामामुळें झाले असावे असेंहि सांगण्यांत येतें. पण याला आधार काय आहे हें कळत नाहीं. मध्यप्रांतांतहि कांहीं अरोरा जातीचे लोक आहेत. त्यांचेंहि खत्री वर्गाशीं साम्य आहे; पण त्याच्यापेक्षां नीच दर्जात यांची गणना करतात. यांस मध्यप्रांतांत किराड म्हणतात.

हे लोक फार भित्रे आहेत; पण फार उद्योगी व श्रीमंत आहेत शेतकी करण्यांत तर हे फार प्रवीण आहेत. काश्मीरमधील अरोरांची सनातनी लोकसंख्या ३५२७, हिंदु, शीख, आर्यसमाजी मुसुलमानी धर्माचे लोक या जातींत सांपडतात. वैश्य लोकांप्रमाणें व्यापार व पैशाची देवघेव हे लोक करतात. खत्री जातीचीच ही एक शाखा आहे; परंतु या पोटजातीचे लोक आपल्या जातीला एक स्वतंत्र जात समजून खत्री लोकांप्रमाणें आपणहि क्षत्रियांचे वंशज आहों, असा अभिमान बाळगतात; पण क्षत्रियांना ही गोष्ट कबूल करीत नाहींत. "आरट्ट" या पंजाबांतील प्राचीन राष्ट्रवाचक शब्दाशीं अरोरा शब्दाचा संबंध असेल काय याचाहि विचार करावा असें आम्हीं सुचवितो. [सेन्सस रिपोर्ट-पंजाब रोझ-ग्लॉसरी; रसेल व हिरालाल-कास्ट्स ट्राइब्स इन सी. पी.]

**अर्क**–कोणत्याहि औषधीद्रव्याचा अर्क काढण्याच्या दोन मुख्य रीती आहेत. त्याचा काढा किंवा कषाय करून त्यांतील उपयुक्त द्रव्यें त्या द्रोत आणणें किंवा अलकोहालमध्यें (मद्यार्कांत) कांहीं वेळपर्यंत त्या पदार्थास ठेवून त्या रीतीनें त्यांतील अर्क किंवा सत्त्व काढणें. आपल्या आर्यवैद्यकाप्रमाणें कषाय काढण्याचे ५ प्रकार आहेत, ते खालीं दिल्याप्रमाणें:—

(१) कोणत्याहि ताज्या वनस्पति आणून त्याच वेळेस कुटून फडक्यांत गाळून त्या वनस्पतीचा जो रस निघतो, त्यास अंगरस म्हणतात. (२) औषधी कुटून त्या सर्व औषधींचा उपयोग करणें यास कल्क म्हणतात. (३) २ तोळे औषधी कुटून त्यांत ६ तोळे थंड पाणी घालून एक रात्रभर किंवा कांहीं तासपर्यंत ठेवल्यानंतर तें पाणी गाळून उपयोगांत आणणें यास हिम किंवा शीतकषाय म्हणतात. (४) उकळी फुटलेल्या ३ तोळे पाण्यांत १ तोळा औषधी टाकून १०-११ तासांनीं तें पाणी गाळून घेणें. व (५) ३२ तोळे पाण्यांत २ तोळे औषधी घालून तें पाणी उकळून १। तोळा राहिल्यावर घेणें. यास कषाय म्हणतात.

इंग्रजी पद्धतीप्रमाणें कोणत्याहि औषधी पदार्थाचे अर्क काढणें झाल्यास तो पदार्थ कांहीं दिवस शुद्ध मद्यार्कांत ठेवून नंतर गाळून घ्यावा म्हणजे पदार्थाचा अर्क होतो. उदाहरणार्थ पेपरमिंटाचा अर्क.—पेपरमिंटाचें तेल १ औंस किंवा त्याच्या कांड्या घेऊन ४ औंस शुद्ध केलेल्या मद्यार्कांत टाकाव्या व त्या मिश्रणास रंग येण्याकरितां १॥ ग्रेन कारमाईन पिंवळा रंग त्यांत मिळवावा म्हणजे रंगदार 'एसेन्स' बनतें. अर्वाचीन पद्धति "एन्सेस" या शब्दाखालीं सविस्तर दिली आहे कॉफीचा अर्क.—३ औंस उत्तम प्रकारची भाजलेल्या कॉफीची वस्त्रगाळ पूड घेऊन ९० डिग्री शुद्ध ३ पैंट मद्यार्कांत घालावी व एक आठवड्यापर्यंत बाटलीस घट्ट बूच मारून ठेवावें म्हणजे अर्क तयार होतो.

[गुलाबाचा अर्क.—गुलाबी अत्तर ७ ड्राम घेऊन १ ग्यालन मद्यार्कांत घालून ७-८ दिवसांनीं उपयोगांत आणावा. सुंठीचा अर्क.—१ पैंट शुद्ध मद्यार्कांत ५ औंस दळदार सुंठीची पूड टाकून एक आठवड्यानंतर गाळून मिश्रण बाटलींत भरून ठेवावें. दवण्याचा अर्क.—५ तोळे ओला किंवा वाळलेला दवणा घेऊन तो २० तोळे शुद्ध मद्यार्कांत १० दिवस भिजत ठेवून नंतर गाळावा. धण्याचा अर्क.—५ तोळे धणे घेऊन २० तोळे शुद्ध मद्यार्कांत ७ दिवस भिजत ठेवावें व नंतर गाळावें. केशराचा अर्क.—उत्तम केशर ४ औंस घेऊन ४ पैंट शुद्ध मद्यार्कांत ३ दिवस भिजत ठेवावें. नंतर त्यांत आणखी २ पैंट मद्यार्क घालून आणखी ३ दिवस भिजूं द्यावा व गाळून मजबूत बुचाच्या बाटलींत भरून ठेवावा. कापराचा अर्क.—शुद्ध मद्यार्क ८ औंस व कापूर १ औंस एका बंद केलेल्या बाटलींत ठेवावे म्हणजे अर्क तयार होतो. लिंबाचे सालीचा अर्क.—ताज्या खट्टया निंबाची पिंवळी साल १॥ पैंट घ्यावी व एक पैंट शुद्ध मद्यार्कांत ७ दिवस भिजत ठेवून टीपकागदांतून गाळून काढावी. हिंगाचा अर्क.—५ तोळे उत्तम हिंगाची पूड करून ती २५ तोळे शुद्ध मद्यार्कांत ८ दिवस भिजत ठेवावी म्हणजे हिंगाचा अर्क तयार होतो. वर लिहिल्याप्रमाणें वाटेल त्या वनस्पतींचे फुलाचे किंवा इतर सुगंधी द्रव्यांचे शुद्ध मद्यार्काचे साह्यानें अर्क काढतां येतात. [कलावैभव, खानापूर, शार्ङ्गधरादि वैद्यक ग्रंथ. सेनगुप्त–आयुर्वेदिक सिस्टिम ऑफ मेडिसिन अर्कप्रकाश.]

**अर्कप्रकाश**—अर्कप्रकाश अथवा अर्कचिकित्सा या नांवाचा एक ग्रंथ संस्कृतांत आहे आणि त्याचें कर्तृत्व लंकेश्वर रावणाकडे दिलें आहे.

**अर्कविवाह**–(रुईशीं लग्न) हा विवाह रुई नांवाच्या पवित्र मानलेल्या झाडाशीं लावतात. या झाडांत सूर्यदेवता निवास करते अशी समजूत आहे. ज्या पुरुषाच्या पहिल्या दोन बायका वारल्या असतील त्यानें तिसरी बायको केल्यास बायको किंवा नवरा कोणीतरी लागलीच मरतें अशी समजूत आहे. ही आपत्ति टाळण्याकरितां तिसरें लग्न रुईशी, सूर्याच्या कन्येशीं, लावावें व नंतर तिसरा विवाह करावा अशी समजूत आहे. हा रुईबरोबरचा विवाह घरांत लावतात, किंवा रुईच्या झाडाशेजारीं जाऊन लावतात. व तो शनवार किंवा रविवारीं हस्त नक्षत्र असेल अशा मुहूर्तावर लावतात, किंवा तिसऱ्या बायकोबरोबर विवाह करण्यापूर्वी कांहीं दिवस लावतात. रुईचें झाड, पानें, फुलें व फळें यांनीं युक्त असावें. सामान्य विवाहाप्रमाणें या रुईबरोबरच्या विवाहांतहि पुण्याहवाचन, नांदी श्राद्ध, मधुपर्क, नंतर कन्यादान वगैरे सर्व विधि करतात. हा काल्पनिक विवाह संपविण्यासाठीं

शेवटीं शांतिसूक्त म्हणतात व ब्राह्मणांना दक्षिणा व भोजन दिल्यावर समारंभ पुरा होतो. ( धर्मसिंधु परिच्छेद ३. )

**अर्काट, उत्तर.**—मद्रास इलाख्याच्या पूर्वेकडील जिल्हा. उत्तर अक्षांश १२° २०' ते १३° ५५' व पूर्व रेखांश ७८° १४' ते ७९° ५९'. क्षेत्रफळ सुमारें ७३८६ चौ. मैल. मुसुलमानांच्या अमदानींत हा अर्काट सुभ्याचा पालार नदीच्या उत्तरेकडील भाग होता व म्हणून त्याला हें नांव पडलें. हें अर्काट नांव "आरू काडु" ( सहा अरण्यें ) या तामील शब्दांचा अपभ्रंश होय. ह्या ठिकाणीं पुरातन काळीं सहा अरण्यें असून सहा ऋषी येथें राहत असत अशी समजूत आहे. हा मुलूख पुष्कळसा डोंगराळ आहे या प्रांतांत पालार व तिला मिळणाऱ्या चेयार आणि पायनी ह्या मुख्य नद्या आहेत. येथें उगवणारी झाडें व वनस्पती यांमध्यें विशेष असें कांहीं नाहीं. सह्याद्रीवर सांपडणारी बहुतेक झाडें येथील डोंगरांत आहेत. शिकारीचीं मोठीं जनावरें म्हणजे गवा व वाघ हीं होत. डोंगराळ मुलुखांत चित्ता हा सर्वत्र आढळतो. अस्वल, तरस, सांबर, भेकर, आणि रानडुकर हीं कांहीं ठिकाणीं सांपडतात. येथील हवा साधारणपणें निरोगी आहे,कारण ती फार कोरडी आहे. पावसाचें सरासरी मान वर्षास ३७ इंच आहे परंतु आंतल्या भागांत पाऊस सुमारें ४० इंच पडतो.

**इतिहास.**—अतिशय पुरातन काळापासून इ. स. ९०७ पर्यंत कांजीवरमच्या पल्लव राज्यांच्या ताब्यांत हा मुलूख होता. पुढें हा प्रांत चोलराजे, राष्ट्रकूट घराण्यांतील राजे व शेवटीं विजयानगरचे हिंदु राजे यांच्या ताब्यांत आला. तालिकोटच्या लढाईनंतर विजापूर व गोवळकोंडा येथील मुसुलमान बादशहांच्या ताब्यांतून तीं राज्यें जाऊन पुढें मोंगल सुभ्यापैकीं हा एक सुभा झाला पुढें शंभर वर्षें दक्षिणेतील युद्धांची ही एक रणभूमीच होऊन राहिली. इ. स. १७८१ मध्यें येथील नबाबानें कर्नाटकचा वसूल ईस्ट इंडिया कंपनीस दिल्यापासून हा प्रांत ब्रिटिशांच्या हातांत गेला व इ. स. १८०१ मध्यें याचा पूर्ण ताबा त्यांनां मिळाला. ( 'कर्नाटकचे नबाब ' पहा. )

**लोकवस्ती.**—येथील एकंदर लोकसंख्या ( १९२१ ) २०,५५,५९४ आहे; ती इ. स. १९११ मध्यें १९,६०,९६० होती व त्यांपैकीं १८,०१,३५५ हिंदू, १,१७,९०९ मुसुलमान आणि ३२,८२२ ख्रिश्चन होते. जैनांची संख्या ८,८२६ होती येथें १५२४५६३ लोक तामिल भाषा बोलणारे व ३२२८५९ तेलगु भाषा बोलणारे व ८४१० मराठी बोलणारे आढळले. तामिल लोकांतील विशेष ध्यानांत घेण्यासारख्या जाती म्हणजे पल्ली, परैयन्, वेल्लाळ, इसला, मोडी, पानसावन ह्या होत. तेलगु मुख्य जाती म्हणजे कापु, माल, बलिजा, व कम्मा ह्या होत. २३००० ख्रिस्त्यांपैकीं २२१०० एतद्देशीय आहेत. या प्रांतांत मोठमोठालीं मिशन्स आहेत.

**शेतकी.**—येथील जमीन काळी तांबूस आहे. पिकें—भात रागी, कम्बु, कुंस व आंबा; एके काळीं निळीची लागवड मोठ्या प्रमाणावर होत असे. परंतु सध्यां तसें नाहीं. येथील शेतकीचीं जनावरें मध्यम प्रतीचीं आहेत कुरुंब जातीची एक मेंढी आहे तिच्यावर लोकर पुष्कळ निघते. तिचा उपयोग घोंगड्या वगैरे करण्याकडे होतो. लागवडीस येणाऱ्या १३२७ चौ. मैल जमिनींतील ५९९ चौ. मैल जमीन पाटांच्या व विहीरींच्या पाण्यावर अवलंबून आहे. १२९१ चौ. मैलाचें जंगल आहे व इ. स. १९०२-०३ मध्यें त्यापासून रु. ५,३३००० उत्पन्न झालें.

**खनिज.**—इमारतीस उपयोगांत येणारा ग्रानाइट दगड सर्वत्र सांपडतो. कांहीं कांहीं ठिकाणीं अभ्रक मिळतो. कालहस्ती जमिनदारी ( पहा ) मध्यें तांब्याच्या खाणी आहेत. कनगुंडी जमीनदारीमध्यें सोन्याच्या खाणी आहेत.

**व्यापार व दळणवळण.**—शेतकीच्या खालोखाल कापड विणण्याचा धंदा चालतो. पण तयार होणारें कापड हलक्या दर्जाचें असतें. वेलोर (पहा)जेलमध्यें गालिचे चागले होतात पण हा धंदा बाहेर फारसा नाहीं. यूरोपियन तऱ्हेचीं हिरव्या रंगाचीं मातीचीं भांडीं गुडियात्तम् तालुक्यामध्यें करिगिरी येथें एका घरीं होतात. कालहस्ती येथें वांगड्या तयार होतात, व पुष्कळ ठिकाणीं कातडीं कमावण्याचे कारखाने आहेत.

येथून बाहेर जाणारा माल म्हणजे भात, कातडीं, शिंगें, एक प्रकारची साखर, हळद व दगड; व आयात मालः—सूत, मीठ, मिरच्या, तमाखू आणि अशुद्ध लोखंड व पितळ. नेआण करण्याच्या सोयी म्हणजे सदर्न मराठा रेल्वे व साऊथ इंडियन रेलवे व १४८३ मैल लांबीच्या सडका या आहेत.

**राज्यव्यवस्था.**—राज्यव्यवस्थेकरितां याचे चार भाग केले आहेत. वेलोर, राणीपेठ, आरणी (पहा)व चितूर. पहिले दोन कलेक्टरच्या व दुसरे दोन डेप्युटी कलेक्टरच्या देखरेखी खालीं आहेत. ६ मुनसफ कोर्टें आहेत.

कर्नाटकच्या नबाबांपूर्वी येथें जमिनधाऱ्याची पद्धत काय होती हें सांगतां येत नाहीं. इ. स. १८२२त रयतवारी पद्धत सुरू करण्यांत आली. कोरडवाहू जमीनीवर दर एकरा मागें सरकारसारा रु. १-४-२व पाण्याच्या जमीनीवर रु. ४-१५-२ आहे.

या प्रांतांत शिक्षणाचा प्रसार फार कमी आहे. शेंकडा ६ लोक फक्त वाचूं व लिहूं शकतात. तेलगू लोकांपेक्षां तामील लोक जास्त शिकलेले आहेत.

**अर्काट शहर.**—मद्रास इलाख्यांतील वालाजापेट तालुक्याचें मुख्य ठिकाण. हें राणीपेठ स्टेशनपासून दोन मैलांवर पालार नदीवर आहे. मद्रास रेल्वेच्या राणीपेठ शाखेवर हें स्टेशन आहे. पाऊस सरासरी ५० इंच पडतो. लोकसंख्या ११४५०. याचें महत्त्व फक्त इतिहासदृष्ट्या आहे. हें पूर्वी कर्नाटकच्या नबाबांचें राजधानीचें शहर होतें. त्यावेळीं या शहराभोंवतीं ५ मैल लांब व २४ ते १२ फूट रुंदीचा तट होता. या ठिकाणीं नबाब सादतउल्लाखानची कबर आहे.

गांवांत २०-२५ चांगल्या मशिदी आहेत. पूर्वीच्या किल्ल्याचा व राजवाड्याचा सध्यां कांहीं एक मागमूस राहिलेला नाहीं. चांदीचीं भांडीं, सोन्याचांदीची जर, हातमाग, कापड छपाई, आणि पितळकाम यासारखे मुख्य धंदे येथें चालतात.

इ ति हा स.—इ. स. १७१२ त मोंगल सेनापति सादत-उल्लाखान यानें म्हैसूरच्या मोहिमेवर असतांना अर्काट येथें आपला मुख्य तळ ठेविला होता. त्यानेंच प्रथम कर्नाटकची नबाबी, वंशपरंपरेनें आपणाकडे घेतली पुढें वीस वर्षेपर्यंत हें राजधानीचें ठिकाण होऊन राहिलें. पण १७४० मध्यें रघोजी भोसल्यांनें हा प्रांत जिंकला व सादतउल्लाखानाच्या मागून आलेला नबाब दोस्तअल्ली लढाईंत मारला गेला. पुढें कांहीं वर्षें अर्काट हें अनेकांच्या हातांतून गेलें. स. १७५१ सालीं एका इंग्लिश तुकडीनें येथील किल्ला सर केला. त्याच वर्षी क्लाईव्हनें थोड्या सैन्यानिशीं अर्काट जिंकलें ही गोष्ट हिंदुस्थानांतल्या ब्रिटिश अमदानींतल्या इतिहासांत चिर-स्मरणीय होऊन राहिली आहे. १७५८ त अर्काट फ्रेंचाकडे गेलें व तें १७६० मध्यें इंग्रजांनीं परत घेतलें. पुढें २० वर्षें इंग्रजांचा दोस्त नबाव महंमद याच्या ताब्यांत तें होतें पुढें म्हैसुर-युद्ध सुरु होऊन १७८०-८२ पर्यंत अर्काट हैदरकडे होतें. टिपूनें या शहराचा तट पाडून तें सोडून दिलें. १८०१ मध्यें कर्नाटक इंग्रजांनीं खालसा केलें तेव्हां अर्काटहि त्याच्याकडे गेलें.

**अर्काट दक्षिण.**—मद्रास इलाख्यांतील आग्नेयेकडील जिल्हा. उ. अ. ११°११' ते १२°३५' व पू. रे. ७८°३८' ते ८०° क्षेत्रफळ ५२१७ चौ. मैल. अर्काट शब्दाची उपपत्ति मागें उत्तर अर्काटमध्यें आलेलीच आहे. याच्या पूर्वेस बंगालचा उपसागर, दक्षिणेस तंजावर आणि त्रिचनापल्ली, पश्चिमेस सालेम व उत्तरेस उत्तरअर्काट व चिंगलपट्ट ह्या सीमा आहेत. या प्रांतांत कलरायन व जवादि या डोंगरांच्या रांगा मुख्य आहेत.

येथील सर्व नद्या पूर्ववाहिनी आहेत, पोनैयार ही सर्वांत मोठी आहे. जिंजी, गडिलम, व वेल्लार या दुसऱ्या नद्या आहेत. या प्रांतांत चंदनाचीं झाडें पुष्कळ आहे. डोंगराळ प्रदेशांत चित्ता, अस्वल, सांबर, भेकर,रानडुक्कर सांपडतात. तसेंच ससे, पाणकोंबडीं वगैरे पक्षी पुष्कळ आहेत. येथील समुद्रामध्यें पुष्कळ जातीचे मासे सांपडतात.

ह वा मा न.—हवा बरीच कोरडी असून आरोग्यकारक आहे. तरी पण कांहीं भागांत मलेरीया; तसेंच समुद्र किनाऱ्यावर "एलेफंटायसिस" हे रोग बरेच आहेत. आंतल्या भागापेक्षां समुद्र किनाऱ्यावर उष्णतामान कमी असतें. तेथें पाऊस सरासरी ५२ इंच पडतो. आपण जसजसें आंतल्या प्रदेशांत जावें तसतसें पावसाचें मान कमी कमी होत जातें. मध्यभागांत तें ४५ इंच असतें तर अगदीं आंत ३९ इंच आढळतें.

इ ति हा स.—उत्तर अर्काटच्या इतिहासाहून हा फारसा भिन्न नाहीं. हा प्रदेश चोल राजांचा असून पुढें तो कांची येथील पल्लव राजांच्या ताब्यांत गेला. नंतर इ. स. १४ व्या शतकाच्या अखेरीस तो विजयनगराच्या राज्यांत सामील केला गेला. तालिकोटच्या लढाईनंतर तो विजापूरकरांच्या हातांत जाऊन शिवाजी राजे यांनीं तो त्यापासून जिंकून घेतला. राजारामाच्या कारकीर्दींत मोंगलाच्या ताब्यांत गेला. इंग्लिशांचा या प्रांताशीं संबंध इ. स. १६७४ मध्यें आला. इ. स. १६८३ मध्यें कडलोर येथें त्यांनीं मराठ्यांच्या पासून सध्यांचा फोर्ट सेन्ट डेव्हिड व सभोंवतालचा प्रांत विकत घेतला. कर्नाटक व म्हैसूर युद्धांत याचा संबंध बराच आहे.

या प्रांतांत पुरातन काळच्या गुहा पुष्कळ आढळून येतात. राजारामाच्या कारकीर्दींत मराठी सैन्याचीं सूत्रें जेथून हलविलीं जात तो जिंजीचा प्रसिद्ध किल्ला याच प्रांतांत आहे.

लो क.—दक्षिण अर्काटमध्यें २७४५ गांवें व १० शहरें आहेत. याचे आठ तालुके पाडलेले आहेत. इ. स. १९२१ मध्यें येथील लोकसंख्या २३,२०,०८५ होती. कडलूर, चिंदंबरं तिरुवन्नामले हीं मुख्य शहरें आहेत. तेथें शेंकडा ९४ लोक हिंदु असून बाकीचे मुसलमान व ख्रिश्चन आहेत. यांत जैनांची संख्या सुमारें पाच हजार आहे. येथील लोक तामिळ भाषा बोलतात. या प्रांतांत तेलगू जातींचा भरणा बराच आहे पण तामिली लोकांचे संख्याधिक्य आहे. वन्नियां पल्ली आणि पराया जातीचे लोक हा तिकडील शेतकरी वर्ग आहे.

ज मी न व पि कें.—येथील दोन तृतयांश जमीन तांबडी असून बाकीची कापसाला योग्य अशी काळी आहे ५२१० चौ. मैल ज़मीन रयतेच्या ताब्यांत असून ३४९ चौ. मैल जमीनदाराची इनाम आहे. कंबु, वरगु, रागी हीं येथील मुख्य पिकें आहेत. भाजीपाला व फळफळावळ याची लागवड कडलूर, तिंडिवनं, विलुपुरं व चिंदबरं या तालुक्यांत पुष्कळ होते. उद्योगधंद्याच्या दृष्टीनें भुइमूग हें फार महत्त्वाचें पीक आहे. येथें पाटबंधारे पुष्कळ आहेत. त्यांतील पुष्कळ फार प्राचीन काळापासूनचे आहेत. चोळ राजे पाणी पुरवठ्यासंबंधानें फार दक्ष होते. इ. स. १९०३-४सालीं रयतवारी इनाम जमिनीपैकीं शेंकडा ३२ चौ. मैलाला पाणी पुरविण्यांत आलें. तेथें ८७ बंधारे २०५ कालवे व ३२४३ तळीं आहेत.

धं दे व व्या पा र.—या भागांत धातूंच्या खाणी म्हणण्यासारख्या मुळीच नाहींत. कांहीं भागांत लोखंड सांपडतें. तसेंच विशेष सांगण्यासारखे जिन्नसहि तयार होत नाहींत फक्त नेलिकुप्प येथें साखरेचे कारखाने एका इंग्लिश कंपनीनें चालविलेले आहेत. येथे पूर्वी नीळ पुष्कळ तयार होत असे. पण सध्यां व्यापारी चढाओढीनें तो धंदा अगदी बसला आहे. खेडेगावांतून मागावर सुती व लोकरी कापड विणले जातें.

या प्रांतांत कडाल्लूर व पोर्टोनोव्हो हीं दोन बंदरें आहेत. भुइमूग, पेंड, कातडीं, भात, हळद, तंबाकू चिरुट वगैरे माल

बाहेर देशीं जातो येथील भुइमूग फ्रान्स देशांत जवळ ६० लाख रुपयांचा जातो. आंतल्या देशांत वाहतुकीचें साधन "साउथ इंडियन रेलवे" आहे. तसेंच सडका वगैरे पुष्कळ असून चांगल्या आहेत. दर आठवड्यास ब्रिटिश नॅव्हिगेशन कंपनीची आगबोट कुडालोर बंदरांत येते.

रा ज्य व्य व स्था.—राज्यव्यवस्थेच्या सोईकरितां याचे चार भाग केले असून ते कलेक्टराच्या ताब्यांत असतात. त्याच्या हाताखालीं डेप्युटि कलेक्टर्स व प्रत्येक तालुक्याला एकेक मामलेदार असतो तसेंच प्रत्येक तालुक्याच्या मुख्य ठिकाणीं मुनसफ कोर्ट आहे. व प्रांताला एक सेशन्स कोर्ट व अपील कोर्ट आहे. मोठे गुन्हे फार थोडे घडतात. खून वगैरे तर क्वचित् होतात.

हिंदु राजे तसेंच मुसुलमान राजे यांच्या वेळीं जमीनधाऱ्याची काय पद्धत होती हें फारसें सांपडत नाहीं. पण नवाब महम्मदअल्लीचा कारभारी रायजी यानें जमिनींची मोजणी करून धारा ठरविला. त्याच्यावेळीं बागा विहिरी असलेल्या जमीनीचा धारा पैशाच्या रूपानें व बाकीचा पिकाच्या रूपानें द्यावा लागत असे. त्यावेळीं वसुली जमा मक्तयानें देण्यांत येत असे, व ही पद्धत इ. स. १८०१ पर्यंत ब्रिटिश अमदानींत सुद्धां चालू होती. ती इ. स. १८०६ मध्यें दुसरी मोजणी झाल्यावर बंद करण्यांत आली. इ. स. १९०३ मध्यें जमीनीचा वसूल ४९,५७,००० रुपये होता.

**अर्काटचे नवाब**—' कर्नाटकचे नवाब ' पहा.

**अर्कावती**—म्हैसूर प्रांतांतील कावेरी नदीला मिळणारी एक नदी. लां. १२० मै. ही नदी दुर्गामध्यें उगम पावून बंगलोर जिल्ह्यांतून वहाते. हिला मिळणाऱ्या नद्याः—पश्चिमेकडून कुमुद्वती व पूर्वेकडून वृषभावती. नदीच्या वरच्या प्रवाहांत मोठमोठे तलाव आहेत, त्यांपैकीं हे सरघट्ट नांवाचा जो तलाव आहे त्यांतून बंगलोर शहराला पाणी आणलें आहे. सावन दुर्गांच्या दक्षिणेस हिचा प्रवाह दऱ्याखोऱ्यांतून जात असल्यामुळें पाटबंधाऱ्याकरितां त्याचा उपयोग होत नाहीं. ( इं. गॅ. पु. ६.१९०८ ).

**अर्गास**—हें ग्रीसमधील फार प्राचीन आणि महत्त्वाचें शहर आहे. इजिप्त, लिसिया वगैरे परदेशांशीं अर्गासचें फार जुन्या काळापासून दळणवळण असे. अर्गालिसचा द्वीपकल्प, सीथेरा, एजीना, सीसीऑन वगैरे प्रदेशावर अर्गासचा अंमल होता. फीडॉन राजाचे अमदानींत तर सबंध पूर्व पेलॉपोनेसस अर्गासचे ताब्यांत आला.

इ. स. पूर्वी आठव्या शतकाच्या सुमारास मात्र अर्गासला फार वाईट ग्रह आले. कारण अर्गासचें अप्रतिहत स्वामित्वावर घाला घालण्यास स्पार्टा शहर चंग बांधून उभें राहिलें. शिवाय लासीडेमोनिआ येथील लोक तर अर्गासचे कट्टे शत्रु होते. त्यांच्याशीं झालेल्या लढाईंत अर्गासला हार खावी लागून सबंध सिन्युरीआ प्रांत गमावून बसावें लागलें आणि इ. स. पूर्वी ४९५ त टिरीन्सच्या पराभवानें तर अर्गासच्या प्रभुत्वाचा बोजवारा उडाला. इ. स. पूर्वी सुमारें ४७० व्या वर्षी अर्गास आणि स्पार्टा यांच्यांत फिरून वैर जुंपलें व ४६१ त अर्गासनें अथेन्सशीं संधि करून स्पार्टाला शह दिला व वैराग्नी तात्पुरता विझविला. अथेन्सच्या मध्यस्थीच्या असा एक महत्त्वाचा परिणाम झाला कीं, अल्पजनसत्तेला ' खो ' मिळून लोकसत्ता प्रस्थापिली गेली व ती सुमारें चाळीस वर्षेपर्यंत अव्याहतपणें टिकली.

स्पार्टाला हाणून पाडण्याकरितां जो ' कॉरिंथिअन संघ ' स्थापण्यांत आला, त्यांत अर्गास शहरानें प्रमुख भाग घेऊन कॉरिंथ हें शहर आपल्या राज्यास जोडलें. गेलेलें स्वामित्व पुन्हां मिळविण्याकरितां सत्तालोभी सरदारांनीं केलेलें बंड अर्गासयेथील लोकसभेनें मोडून बंडवाल्यांपैकीं १२०० लोकांना फांशीं दिलें असें सांगतात. स्पार्टन शत्रूंचा समूळ मोड करणें अशक्य झाल्यामुळें, अर्गासच्या लोकसभेनें मॅसिडोनच्या फिलिपची मदत मागितली व सिन्युरीआ प्रांत शत्रूपासून परत मिळविला. कोणत्याहि एका राष्ट्राला दुसऱ्याहून वरचढ होऊं देण्याची संधी देऊं नये, हें तत्त्व इतिहासांत परोपरी दृष्टीस पडतें. मॅसिडोनचा फिलीफ सर्व ग्रीस देश हाताखालीं घालून बसला हें पाहून फिलीपनें केलेल्या उपकाराला विसरून अर्गासनें कांहीं स्वाभिमानी राष्ट्रांशीं संगनमत करून फिलीपशी युद्ध पुकारलें. येवढेंच नव्हे तर प्रत्यक्ष आपले हाडवैरी जे स्पार्टन लोक त्यांच्याशीं सहकारिता करून एपिरसचा, राजा पिऱ्हस याच्यावर स्वारी केली. याचा परिणाम असा झाला कीं अर्गासचें स्वातंत्र्य जाऊन मॅसिडोनिआच्या ॲन्टीगोनस गोनाटसच्या जुलुमाला अर्गासला मुकाट्यानें नमावें लागलें.

यानंतर अर्गास हें रोमन साम्राज्याखालीं गेलें. इ. स. २६७ आणि ३९५ त गॉथ लोकांनीं हें शहर लुटलें. इ. स. १२४६ त पुन्हां अथेन्सच्या ताब्यांत गेलें. इ. स. १३९७ आणि १५०० या सालीं तुर्कांनीं सबंध लोकांची कत्तल केल्यामुळें, अल्बेनिआ येथील लोकांनीं येथें येऊन वस्ती केली. १८२५ त, इब्राहीम पाशानें या शहराची जाळून होळी केली. सांप्रत अर्गास शहरांत १०,००० लोकवस्ती असून सर्व शेतकरी लोकांची आहे.

फार प्राचीन काळीं अर्गास येथील लोकांची गायनकलेबद्दल फार ख्याती होती. या ठिकाणीं हेरॅक्युम या नांवाचें अतिशय विख्यात व सुंदर देवालय आहे. दंतकथेप्रमाणें हें देवालय फोरोनिअस यानें बांधलें व असें सांगतात कीं ट्रोजन हा युद्धास निघण्यापूर्वी अगामेमनॉन् यानें याच देवालयांत सर्व पुढाऱ्यांनां जमविलें होते ( ए. ब्रि. ).

**अर्घुन**—काश्मीरमधील एक जात. संख्या (१९११) १५१७ ( मुसलमानी ) मंगोलियन महावंशांतील ही एक मिश्र जात आहे. हिची उत्पत्ति लदाख प्रांतांतील स्त्रिया, यारकंद

व दुसरे मध्य आशियांतील कांहीं प्रदेश, काश्मीर व पंजाब यांतील मुसलमानी धर्माचे पुरुष, यांच्यापासून झाली आहे असें समजतात या जातीच्या लोकांचा नेहेमीचा धंदा व्यापाराचा आहे. [ खानेसुमारी १९११ पु. २० ]

**अर्जुन**—सोमवंशीय नहुषकुलोत्पन्न ययातिपुत्र जो पुरु, त्याच्या अजमीढ वंशांत जन्मलेल्या जन्हुराज कुलांतील शंतनूच्या पंडुनामक पौत्रापासून पृथा अथवा कुंती भार्येच्या ठायीं झालेल्या तीन पुत्रांतील कनिष्ठ; हा दुर्वास ऋषीच्या मंत्रप्रभावें करून कुंतीच्या उदरीं इंद्रांशानें जन्मला होता. (भार. आदि. अ. ११८–१२४ ) अर्जुनानें द्रोणाचार्यांजवळ शस्त्रास्त्रविद्या संपादन केली होती. कौरवांनीं पांडवनाशाकरितां केलेल्या लाक्षागृहांतून सुरक्षित बाहेर पडून द्रौपदीस्वयंवराकरितां विप्रवेषानें बंधूंसह चालला तों अंगारपर्ण गंधर्वाची मार्गांत गांठ पडली, अर्जुनाचें व त्याचें युद्ध झालें, त्यांत त्याचा पराजय झाल्यामुळें अर्जुनाशीं त्यानें सख्य केलें. नंतर तेथून बंधूंसहवर्तमान अर्जुन पांचालपुरास गेला व तेथें त्यानें मत्स्ययंत्राचा भेद करून द्रौपदीस वरिलें व सर्वजण इंद्रप्रस्थास राहिले. एकदां द्रौपदी व युधिष्ठिर यांचा एकांत पाहिल्यावरून अर्जुनास तीर्थयात्रेस जावें लागलें ( भार. आदि. अ. २१३ ). तीर्थयात्रा करीत फिरत असतां उलूपीशीं याचा समागम झाला. तसेंच यास चित्रांगदेनेंहि वरिलें. यापुढें द्वारकेस गेला असतां, याचा सुभद्रेशीं विवाह होऊन तीर्थयात्रा समाप्त होतांच इंद्रप्रस्थास परत आला.

अर्जुन इंद्रप्रस्थास आल्यावर खांडववनभक्षणार्थ मागण्यासाठीं ब्राह्मणवेषानें अग्नि त्याकडे आला. त्यापासून यास रथ व गांडीव धनुष्य यांचा लाभ होऊन यानें त्यास तें वन भक्षणार्थ दिलें ( भार. आदि. अ. २२४–२३४ ). तदनंतर युधिष्ठिरानें राजसूययज्ञ करण्याचा निश्चय केला; परंतु त्यास द्रव्य पाहिजे म्हणून त्यानें आपल्या चौघां भ्रात्यांस चारी दिशा जिंकून द्रव्य आणण्याची आज्ञा केली असतां हा उत्तर दिशा जिंकण्यास गेला.

राजसूययज्ञ समाप्त झाल्यावर पांडवांचें ऐश्वर्य दुर्योधनास सहन न होऊन त्यानें त्यांची सर्व संपत्ति द्यूतमिषानें हरण केली, व त्यांस वनवासास घालविलें ( भार. वन. अ. २ ). वनवास सरल्यावर अज्ञातवासाचा विचार झाला असतां, अर्जुन हा विराटगृहीं नटरूपानें प्रवेशला ( भार. विराट. अ. ११ ). यानें तेथें आपल्यास बृहन्नडा असें नांव स्वीकारलें होतें. पुढें कौरवांशीं साम न होतां युद्ध उपस्थित झालें असतां, यास स्वजनांस मारणें हा अधर्म आहे असें वाटून हा युद्ध करणें, जो क्षात्रधर्म तो टाकण्यास व भिक्षावृत्तीं उपजीवन करणें, हा ब्राह्मणधर्म स्वीकारण्यास उद्युक्त झाला, असें पाहून कृष्णानें तो याचा मोह, गीतेचा उपदेश करून घालवून यास युद्ध करण्याला उभें केलें ( भार. भीष्म. अ. २५–४२ ). ['गीता 'पहा.] पुढें यानें शिखंडीस निमित्तमात्र उभें करून भीष्मास रणभूमीवर पाडल्यावर द्रोणाचार्य युद्धास उभा राहिला. धृष्टद्युम्नाच्या हातून द्रोणाचार्य मरण पावल्यावर कर्ण युद्धास प्राप्त झाला. त्याशीं याचें मोठेंच युद्ध होऊन त्यास शेवटीं यानें मारिलें ( कुरुयुद्ध पहा ).

संपूर्ण कौरव नष्ट होऊन त्यांचें और्ध्वदेहिक झाल्यावर, युधिष्ठिरास राज्य प्राप्त झालें; परंतु त्यास गोत्रवधाचें पाप मला घडलेलें कसें निवृत्त होईल म्हणून शोक झाला. तेव्हां भीष्मानें त्यास बहुत प्रकारें नीति सांगून अश्वमेधाची आज्ञा केली व त्याचें समाधान केलें. पुढें युधिष्ठिरानें अश्वमेधाचा विचार करून यज्ञदीक्षा घेतली व भूमीवर श्यामकर्ण अश्व सोडिला तेसमयीं त्याच्या संरक्षणार्थ अर्जुन निघाला व एक वर्षानें सर्व दिशांकडील राजांना जिंकून परत आला. हा अश्वमेधाचा भाग जैमिनीनें आपल्या ग्रंथांत उत्तम प्रकारें वर्णिला आहे ( अश्वमेध पहा ) अर्जुनास द्रौपदीपासून झालेला श्रुतकीर्ति, उलूपीपासून इरावान्, चित्रांगदेपासून बभ्रुवाहन आणि सुभद्रेपासून अभिमन्यु असे चार पुत्र होते.

कृष्ण निजधामास गेल्यावर यानें द्वारकेस गमन केलें आणि अवशिष्ट कृष्णस्त्रिया व वज्र नामेंकरून त्याचा प्रपौत्र यांस समागमें घेऊन हस्तिनापुरास आल्यावर इंद्रप्रस्थाच्या राज्यावर वज्राची व हस्तिनापूरच्या राज्यावर परीक्षितीची स्थापना करून युधिष्ठिरादि बंधुसमागमें हा निजधामास गेला ( भार. स्वर्गारोहण. अ. ३ ). अर्जुनाचें चरित्र महाभारतादि ग्रंथांतून सविस्तर आलें असून ते सर्वश्रुत असल्यानें येथें थोडक्यांतच आटोपतें घेतलें आहे.

—२ कार्तवीर्य-सहस्रार्जुन, हैहय राजा, याकरितां ' कार्तवीर्य ' पहा.

**अर्जुनगड**—दमणजवळील एक किल्ला. याचा मराठ्यांच्या इतिहासांत दोन तीन ठिकाणीं संबंध आलेला दिसतो. रघुनाथरावास बारभाईंनीं काढून लावल्यानंतरच्या चाललेल्या युद्धांत शके १६९८ अधिक भाद्रपद शु॥ १२ च्या सुमारास अर्जुनगड किल्ला रघुनाथरावाच्या हातीं लागला व तेथून त्यानें गोवेकराशीं संधान बांधिलें. ( रा. खं. १२ १७४–१७५.११६–११७ ). १६९८ अधिक भाद्रपद वद्य ९ चें पत्र. दमणकर फिरंगियाचें सूत्र—सरकारांत हे दोन्ही किल्ले द्यावे, म्हणजे दोनशें गोरा व तीनशें पागडीवाला व आठ दहा तोफा लढाईचा सरंजाम देतो म्हणून आलें....परंतु आंगरेजाचा आम्हांस पक्का भरोसा...म्हणून किल्ले न दिल्हे" ( रा. खं. १५. १७७. ११८. ) पेशव्यांचें गायकवाडांकडे घेणें होतें त्याच्या हिशोबासाठीं खंडो मुकुंद सरकारांतून बडोद्यास जात होते त्यांच्या मार्गाचे विभागणीसंबंधांत अर्जुनगडाचें नांव आहे. १७२४ कार्तिक वद्य ८. अर्जुनगडवाल्यांनीं खंडोमुकुंद कल्याणाहून तेथें आल्यावर त्यास माणसें देऊन मांडवीस पोंचवावें, असा मजकूर सांपडतो ( रा. खं. १०. ६१६. ४६१. )

**अर्जुनमल्ल** –( १५८१–१६०६ ) पांचवा शीखगुरु. चवथा शीख गुरु रामदास यानें आपला वडील मुलगा पृथ्वीचंद हा संसारासक्त व आज्ञा न जुमानणारा असा दिसल्यावरून, व दुसरा मुलगा आळशीपणामुळें गुरुपदाला नालायक निघाल्यावरून, आपला तिसरा मुलगा अर्जुन यास वारस केलें. बापाच्या गादीचा वारस म्हणून गुरु अर्जुन डोक्याला बांधीत असलेलें पागोटें पृथ्वीचंद जेव्हां मागूं लागला, तेव्हां अर्जुनानें निमूटपणें त्याला तें दिलें. हें पाहून शीखांनीं पृथ्वीचंदाच्या या अरेरावीविरुद्ध बंड केलें. व अर्जुनाला आपला हक्क बजावून नांव जाऊं न देण्याविषयीं विनविलें. गुरु अर्जुनानेंच आदिग्रंथाची रचना केली (१६७४) व तींत आपले व आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या गुरूंचे लेख गोंविले. ( 'आदिग्रंथ' पहा ) या रचनेमुळें आपल्या देशांतील पूर्वीच्या देवतांचें उच्चाटण करून नवीन धर्म स्थापण्याचा त्यानें मोठा गुन्हा केला या आरोपावरून त्याला पकडण्यांत आलें होतें; पण परमतसहिष्णु अकबरानें त्याला दोषमुक्त केलें. अकबरानंतर जहांगीर गादीवर आल्यावर, त्याचा मुलगा खुश्रू याला पळून जाण्यास मदत केल्याचा आरोप ठेऊन अर्जुनाची संपत्ति जप्त करण्यांत आली. व त्याला मरेपर्यंत तुरुंगांत ठेविलें व तेथें त्याचे फार हाल केले. राजपुत्र खुश्रू मोठ्या संकटांत असतां व तरण तारण येथें अर्जुनापाशीं भिक्षा मागितल्यावरून गुरूस दया येऊन त्यानें त्याला पांच हजार रुपये दिले. हें जहांगीरला कळल्यावर व गुरूचें अभिमानाचें उत्तर ऐकल्यावर त्यानें त्याला दोन लाख रुपये दंड केला. पण फुटकी कवडीहि देण्याचें अर्जुनानें नाकारल्यावरून पांच दिवस त्याचे अमानुष हाल करून जंव घेतला ( जून १६०६ ), अशी व्हिन्सेंट स्मिथ माहिती देतो ( ऑक्सफर्ड हिस्टरी ऑफ इंडिया १९२०, ). तरवारीच्या जोराशिवाय आपला पंथ टिकणार नाहीं असें पाहून त्यानें आपला मुलगा हरगोविंद याला मरतांना सशस्त्र गादीवर बसण्याचा व शक्य तेवढें सैन्य ठेवण्याचा उपदेश केला. हा उपदेश अमलांत आल्यामुळें शीखांच्या इतिहासाला नवें वळण लागलें. आतांपर्यंत हा केवळ धार्मिक पंथ म्हणून गणला जाई व या पुढें मुसुलमानांचा कट्टा द्वेष्टा व रणशूर असा प्रमुख पंथ म्हणून पुढें आला. [ ए. ब्रि. ( शिखिझम ). सरदेसाई–मुसुलमानी रियासत. स्मिथ ऑक्स्फर्ड हिस्टरी ऑफ इंडिया ]

**अर्जुनसादडा**—या वृक्षास संस्कृतमध्यें अर्जुन हें नांव आहे. ऐनच्या झाडाप्रमाणें हेंहि झाड अरण्यांत सांपडतें. मराठींत यास सादडा असेंहि म्हणतात. पानें सुमारें ५ अंगुळें रुंद असून वीतभर लांब असतात. त्यास पांढरा सफेत डीक येतो. या झाडाची साल पांढुरकी असते. वाळल्यावरहि ह्या सालीचा रंग पांढराच राहतो. फुलेंहि पांढऱ्या रंगाचींच येतात. मध्य हिंदुस्थानांत आणि उत्तरेस अयोध्येपर्यंत त्याचप्रमाणें ब्रह्मदेश व सिलोन मध्यें नद्यांच्या व प्रवाहाच्या कांठीं हें झाड आढळतें. पंजाबांत हीं मुद्दाम लावलेलीं असतात. याचा पांढरा स्वच्छ डिंक उत्तर हिंदुस्थानांत औषधी म्हणून विकला जातो. याची साल तुरट असते. तिचा रंग देण्याकरितां कातडें कमावण्याकरितां, व औषधींकरितांहि उपयोग करतात हें लांकूड काम करण्यास जड असतें; परंतु खटारगाड्या, शेतीचीं अवजारें, घर बांधणें, वगैरे कामाला उपयोगी पडतें.या लांकडाच्या राखेंत चुन्याचें प्रमाण बरेंच असतें. याच्या अंतरसालीचा उपयोग औषधाचे कामीं होतो. विञ्चा अंगावर उतरल्यास अर्जुनसादडाची साल व पानें कुटून विंचा उतरल्याजागीं लेप करावा व्रण भरून येण्यास सादड्याच्या सालीच्या काढ्यानें व्रण धुवावा. म्हणजे तो लौकर भरून येऊन त्यांत कृमि वगैरे होत नाहींत. किंवा या झाडाच्या सालीचें चूर्ण व्रणांत भरावें म्हणजे साधे व्रण किंवा अग्निदग्धव्रण लौकर भरून येतात. याखेरीज पुष्कळ विकारावर हें झाड उपयोगी पडतें. ( पदे–वनौ. वॉट. )

**अर्जेनसुख**—जुनागड मधील ( काठेवाड ) एक खेडें. हें जुनागडच्या पूर्वेस २९ मैलांवर व अमरेळीच्या पश्चिमेस २१ मैलांवर वसलेलें आहे. लोकसंख्या ६८८ ( १८८१ ). भावनगर धोराजी रेल्वेचें खाखिआ स्टेशन येथून फक्त दोन मैलावर आहे ( मुं. गॅ. ८. १८८४ )

**अर्जुनी जमीनदारी**—तहशील साकोली,जिल्हा भंडारा. साकोली तहशिलीच्या पूर्वेस ही जमीनदारी आहे. हिचें क्षेत्रफळ १३८९० चौरस मैल असून त्यापैकीं अर्धा भाग जंगल आहे. ही इस्टेट देवगडच्या राजानें लुटारू लोकांचा पराभव करण्याच्या कामीं मदत केल्यावरून इनाम दिली आहे असें दिसतें. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं दोघां भावांतील भांडणामुळें ही इस्टेट विभागली गेली. तलवारशा याजकडे अर्जुनी व गंगारामकडे दुंडा गेली. पुढें गंगारामचा नातु चंदरशा हा लुटारू लोकांबरोबर कैदेंत पडल्यामुळें इस्टेट जप्त झाली. अर्जुनीचा हल्लींचा ( स. १९०८ ) जमीनदार रामलाल बापू राजगोंड आहे. जमीनदारींत कर्ज नाहीं. एकंदर १० खेडीं या जमीनदारींत आहेत.

इ. स. १९०६–०७ सालीं एकंदर २४०० एकर जमीन लागवडीखालीं होती. अर्जुनी येथें आठवड्याचा बाजार भरत असून शाळा व पोष्ट ऑफीस आहेत. या जमीनदारींतील देवपीली नांवाच्या गांवीं एक देऊळ आहे. त्या देवळावर दोन पांढऱ्या वाघांचा पहारा असतो असा समज आहे. ते वाघ प्रत्येक जमीनदाराच्या मृत्यूच्या वेळीं दृष्टीस पडतात असें म्हणतात. एकदां नागपूरच्या राजानें येथें नवेंगांवच्या तळ्याच्या तोडीचा एक तलाव बांधण्याचें मनांत आणलें; परंतु त्या वेळीं इतकीं मनुष्यें तेथें मेलीं कीं, राजानें तलावाचें काम बंद केलें; परंतु जो पैसा त्यास तलावाच्या कामीं लावावयाचा होता, तो पैसा त्यानें डोंगरांत गाडून टाकला व अजून तो तेथेंच आहे अशी गोष्ट सांगतात. इस्टे-

टीचें उत्पन्न ३१०० रुपये १३०० आहे [ भंडारा डि. गॅ. १९०८ ]

**अर्जेंटिना**—उर्फ अर्जेंटाइन रिपब्लिक, हें ब्रेझिलच्या खालोखाल महत्वाचें स्पानिश भाषा बोलणारें, लोकसत्ताक राष्ट्र आहे. या देशानें दक्षिण अमेरिकेच्या दक्षिण भागाचा बराच भाग व्यापला आहे त्याचा आकार पाचरी-सारखा असून दक्षिण अक्षांश २१°–५५' ते ५५°–२'–३०" व ५३° ते ७३°–१७'–३०" या रेखांशांत पसरला आहे. याची उत्तरदक्षिण लांबी २२८५ मैल व पूर्वपश्चिम रुंदी ९३० मैल आहे. याचें क्षेत्रफळ १०,८३,५९६ चौरस मैल आहे. याच्या उत्तरेस बोलिव्हिया व पाराग्वे, पूर्वेस पाराग्वे, ब्राझील, युराग्वे व अटलांटिक, पश्चिमेस चिली व दक्षिणेस अटलांठिक व चिली आहेत.

**सरहद्दी**–अर्जेंटिनाची शेजारच्या राज्यांशीं सरहद्दीसंबंधीं निरनिराळ्या वेळीं भांडणें झालीं.

**सामान्य वर्णन.**—अर्जेंटिनाचे तीन मोठे भाग पडतात. या रिपब्लिकच्या सबंध लांबीवर पसरलेले पश्चिमेकडील डोंगराळ प्रदेश व पठारें; मिल्को मायोपासून रिओ नीग्रो-पर्यंतचीं पूर्वेकडील मोठीं मैदानें; आणि पॅटॅगोनियाचीं ओसाड व रुक्ष माळरानें. डोंगराळ प्रदेशांतून विशेषतः ज्वालामुखी भागांतून सोनें, रुपें, कथील आणि तांबें यांचे दगड सांपडतात. पाऊस व उष्णमान यांचें प्रमाण उत्तर गोलार्धावरील याच अक्षांशांतल्यापेक्षां निराळें असतें; उदाहरणार्थ, दक्षिण पॅटॅगोनिया व टिएरोडेल फ्वेएगो यांचे अक्षांश लाब्राडोर इतकेच आहेत. तथापि हे दोन प्रांत विषुववृत्तीय प्रवाहामुळें बनलेले वस्तीला योग्य असे दक्षिण आहेत. तथापि पश्चिम यूरोपांतल्या याच अक्षांशांतील प्रदेशांपेक्षां येथें थंडी अधिक असते. पॅटॅगोनियाचा समुद्रकिनारा व डोंगरी भाग उष्ण व उत्तम हवेचे आहेत. विशेषतः अर्जेंटिनामधील उत्तरेकडची कॅटमार्कासारखीं उंच पठारें आरोग्यस्थानें म्हणून प्रसिद्ध आहेत.

यूरोपियन संस्कृतीच्या प्रवेशापासून अर्जेंटिनामध्यें नवीन वृक्षवनस्पती शिरल्या. त्यांपैकीं गहूं, बारली, ओट, व द्राक्षें, सफरचंद, वगैरे फळें होत. आस्ट्रेलियन युक्यालिपटस झाड येथें उगवूं लागलें आहे व यूरोपांतील खाण्याच्या धान्यांपासून देशास सांपत्तिकदृष्ट्या मोठा फायदा होत आहे.

टापिर व ग्वानाको हे प्राणी मूळचे होत. घोडे, गाढव, पुरें, शेळ्यामेंढ्या व डुकरें हीं यूरोपियनांबरोबर आलेलीं जनावरें होत. उत्तर व ईशान्य या बाजूंस बरेच प्राणी आहेत. प्यूमा नांवाचा सिंह, जॅगर नांवाचा वाघ व रानटी मांजराच्या एक दोन जाती या प्रदेशांतून पुष्कळशा आढळतात.

**नद्या व सरोवरें**—पाराग्वे, पाराना व युरग्वे या मोठ्या नद्या आहेत. पिल्कोमायो, बर्मेजो, सॅलॅडो, डेल नॉर्टे, कॅरकेरानाल या लाप्लाटा प्रणालींतीलच्या नद्या आहेत. प्रिमेरो, सेगुंडो, क्विंटो, लुजान या लहान नद्या आहेत. कॉरिंटिज, फेलिसिआनो, ग्वालेग्वे. ॲगुआपे. मिरिने या नद्या पाराना व युरुग्वे या नद्यांनां मिळतात. सॅलॅडो डेल सूड ही खाऱ्या पाण्याची नदी आहे. कोलोरॅडो व नीग्रो या मोठ्या व नाव्य नद्या आहेत. या देशांत असंख्य सरोवरें आहेत; परंतु यांपैकीं बरींच उथळ, लहान व खारट आहेत. बेबेडेरोव, पोरोंगोस हीं उथळ व खाऱ्या पाण्याचीं सरोवरें आहेत. मार चिकिटा हें मोठें खारें सरोवर आहे.

**बंदरें**—अर्जेंटिनाचा समुद्रकिनारा लांब असून चांगलीं बंदरें फार थोडीं आहेत मोठीं बंदरें ब्यूनॉस एरीझ व एन्सेनाडा हीं आहेत. उत्तम नैसर्गिक बंदर बॅहिया ब्लँका हें आहे. बॅहिया ब्लँकाच्या दक्षिणेस १०० मैलांवर सॅन ब्लासचा उपसागर आहे व ४२ व ४३ अक्षांशांत सॅन जोसे व न्युब्या हे उपसागर आहेत. प्युर्टो डेसीडो, सँटाकुझ, उशुआ, टेराडेल फ्वगो हीं लहान बंदरें आहेत. नदीवरील बंदरें कॉन्कॉर्डिया युरुग्वे नदीवर, सॅन निकोलस व कॅम्पाना पाराना नदीवर, सँटा फे सॅलॅडो नदीवर व ग्वालेग्वे याच नांवाच्या नदीवर आहेत.

**लोकसंख्या.**—या देशाची १९२० ची लोकसंख्या ८,५३,३४३ होती लोक स्पॅनिश भाषा कोर्डोवाचें विश्वविद्यालय जरी फार जुनें आहे तरी अर्जेन्टिनाच्या वाङ्मयांत मुळींच भर पडली नाहीं. ग्रेगोरिओ फ्युन्स (१७४९–१८३७) यानें ऐतिहासिक ग्रंथ लिहिले. प्रेसिडेंट सॅर्मिन्टोनें शास्त्रीय शिक्षण कोर्डोवाच्या विश्वविद्यालयांत सुरू केलें. वाङ्मयांत हा देश अझून मागासलेला आहे. ब्युनॉस एरीझ येथें कांहीं उत्कृष्ट दैनिकें प्रसिद्ध होतात.

**राजकीय विभाग व शहरें.**–या देशाचे राजकीय विभाग म्हटले म्हणजे एक फेडरल डिस्ट्रिक्ट, चौदा प्रांत व दहा परगणे होत. राजधानी ब्युनॉस एरीझ (१६६८०७२) असून इतर प्रसिद्ध शहरें रोझॅरिओ, ला प्लाटा, टुकुमॅन, कोर्डोवा, सँटाफे, मेंडोझा, पाराना, साल्टा, कॉरिन्टेस, चिव्हिलकॉय, ग्वालेग्वेचू, सॅन निकोलस, कॉन्कॉर्डिया, सॅनज्वान, रिओक्वार्टो, सॅनलुइ, बॅरॅकॅस, अलसुड हीं आहेत व त्यांची १९२० ची लोकसंख्या प्रत्येकीं सव्वादोन लाख ते अठ्ठावीस हजार यांच्या दरम्यान आहे.

**दळणवळणाचे मार्ग.**—अर्जेंटिनामधील रेल्वे १८५७ सालीं सुरू झाली व १९०६ मध्यें १२२७४ मैल रेल्वे झाली.

**शेतकी व खनिज द्रव्यें.**—१९१०–११ मध्यें ५,०३,२०,०९६ एकर जमीन लागवडाखालीं होती. १९१७-१८ मध्यें ६,१२,१८,६१३ एकर जमीन लागवडींत आली. येथील मुख्य पिकें गहूं, मका, ओट, जवस, बार्ली, द्राक्षें, कापूस, तमाकू, ऊंस, बटाटे वगैरे आहेत. कापसाची लागवड फार झपाट्यानें अलीकडे वाढली. १८९५ मध्यें ८७९ एकर, १९१४ मध्यें ३३०० एकर आणि १९१७-१८ मध्यें ११७७५, एकर जमीन लागवडीखालीं होती. सरकारनें या कामीं पुष्कळ

पैसा खर्चिला व युनैटेड स्टेट्स् मध्यें विद्यार्थी पाठवून या कामीं तज्ज्ञ बनवून आणले आहेत. १९२० मध्यें जवस व मका यांची आर्जेंटिना मधून निर्गत जगांतील कोणत्याहि देशापेक्षां अधिक झाली. गव्हाच्या निर्गतींत या देशाचा तिसरा नंबर लागतो. युनैटेड स्टेट्स व कानडा हे पहिले दोन नंबर होत. कृषिशास्त्राचें शिक्षण देण्याच्या सोयीहि १९१०–२० या काळांत पुष्कळ वाढल्या आहेत. सर्व महत्त्वाच्या शहरांत ट्राम्वे आहेत. १८९५ च्या खानेसुमारीवरून एकंदर ४९६ मैल ट्राम्वे होती. ब्युनॉस एरीझ मधील ट्राम्वे विजेनें चालवितात. १९२० सालीं रेल्वे रस्ता २१९१५ मैलांचा होता. १९०६ मध्यें ३४०८० मैल तारायंत्र होतें, यूरोप व संयुक्त संस्थानें यांशीं दळणवळण सुरू आहे. टपाल व तारखातें राष्ट्रीय सरकारच्या ताब्यांत आहे. जरी अर्जेंटिनाचा समुद्र किनारा विस्तृत आहे तरी या देशाच्या जहाजांची संख्या कमी आहे.

शे त की.—डरहॅम, हिअरफोर्ड वगैरे ठिकाणचीं जनावरें या देशांत आणून वाढविलीं गेलीं व त्याचें मांस देशाच्या उपयोगास पुरून बाकीचें बाहेर देशीं रवाना करण्यांत येत असे. येथें गहूं, इंडियनकॉर्न, साखर तंबाकू, ऑलिव्ह, एरंडेल, पीनट, कॅनरीसीड, जव, राय, फळें व भाज्या उत्पन्न होतात.

व्या पा र.—येथून मांस, मटन, कातडीं, लोंकर, गहूं व इंडियन कॉर्न बाहेर देशीं रवाना होतात; व खाण्याचे पदार्थ, दारू, कापड, कच्चामाल, लाकूड, व त्याचे पदार्थ, लोखंड, व त्याचे जिन्नस, कागद व पुठ्ठे, काच व मातीचीं भांडीं बाहेर देशाहून येतात. १९१८ सालीं आयात ९,९३,२५,९४३ पौंड व निर्यात् १५,९०,२१,१२० पौंड होती.

रा ज्य व्य व स्था.—सध्यांची राज्यव्यवस्था १८६० सप्टेंबर २५ पासूनची आहे. कायदे करण्याची सत्ता दोन सभांच्या ताब्यांत असते. सीनेट ३० मेंबरांची असते. हे मेंबर नऊ वर्षांकरितां निवडलेले असतात. व डेप्युटी लोकांच्या चेंबरमध्यें १२० मेंबर असतात. यांची निवडणूक चार वर्षांपुरती असते. सर्व कार्यकारी सत्ता प्रेसिडेंटच्या हातीं असते, प्रेसिडेंट अर्जेन्टिनाचा मूळ रहिवाशी असून रोमन कॅथॉलिक पंथाचा व तीस वर्षांहून कमी वयाचा नसला पाहिजे. त्याचें सालीना उत्पन्न निदान २००० असलें पाहिजे. प्रेसिडेंटची निवडणूक सहा वर्षांची असते. कॅबिनेट मध्यें निरनिराळ्या खात्यांचे मुख्य असे आठ मंत्री असतात. यांची नेमणूक प्रेसिडेंट करतो.

न्या य.—पांच वरिष्ठ न्यायाधिशांचें वरिष्ठ फेडरल कोर्ट, अटर्नी जनरल, चार अपीलकोर्टें व कित्येक कनिष्ठ व स्थानिक कोर्टें देतात.

सै न्य.—वीस व अठ्ठावीस वर्षांच्या दरम्यान प्रत्येक इसमास लष्करी नोकरी करणें सक्तीचें आहे. सैन्याचे (१) लाईन–यांत २०–२८ वर्षें वयाच्या नागरिकांस नोकरी करावी लागते, (२) नॅशनल गार्ड–यांत २८ ते ४० वर्षें वयाचे असतात (३) टेरिटोरियल–यांत ४० ते ४५ वर्षें वयाचे लोक असतात; हे तीन प्रकार आहेत. सॅन मार्टिन येथें लष्करी शाळा व राजधानींत ट्रेनिंग स्कूल आहे. १९२० सालीं सैन्यांत १७५१ अधिकारी व १८००० सैनिक होते; शिवाय रिझर्व सैन्य ३००००० होतें. १९१४ पर्यंत लष्करांत जर्मनीचें वजन विशेष असे. त्यानंतर तें कमी होऊन, ब्रिटिश, फ्रेंच, व अमेरिका यांचें अनुकरण सुरू झालें.

आ र मा र.—एकंदर ३२० आफीसर व ५००० ते ६००० शिपाई आहेत. ही नोकरी सार्वजनिक नाहीं. नॅशनल गार्डमधून दोन वर्षांकरितां लोक घेतात. शिवाय ४५० इसमांचें एक तोफखान्याचें पलटण आहे. ब्युनॉस एरीझ बंदराच्या उत्तरभागीं आरमारी तोफखाना आहे. बॅंदिया ब्लॅंका हें लष्करी बंदर आहे. ला प्लाटा येथें गोदी व टार्पेडोंचा तोफखाना आहे. झारेट येथें तोफखान्याचा डेपो व मार्टिन गार्सिया व डायमे या बेटांवर आरमारी डेपो आहेत. आरमारांत दोन ड्रेडनॉट, दोन प्रो–ड्रेडनॉट, चार चिलखतीं क्रूझरें, एक जुनें लाईट क्रूझर व सात डिस्ट्रॉयर्स इतकीं जहाजें १९२० सालीं होतीं. ड्रेडनॉटची गति २२०५ नॉटस आहे. आरमारांत ३१६ एक्झिक्युटिव्ह, ९७ इंजिनियर, २३ एलेक्ट्रिकल इंजिनियर व ५००० ते ६००० लढाऊ लोक होते.

शि क्ष ण–प्रा थ मि क.—प्राथमिक शिक्षण मोफत व ६ ते १४ वर्षें वयाच्या मुलांकरितां सक्तीचें आहे. दुय्यम प्रतीचें शिक्षण मोफत आहे परंतु तें सक्तीचें नाहीं. या शिक्षणाकरितां सरकारनें ३७ विद्यालयें स्थापन केलीं आहेत. शिवाय ३३ खाजगी कॉलेजें आहेत. शिक्षक तयार करण्याकरितां ७८ नॉर्मल स्कूल्स आहेत. उच्च प्रकारच्या व धंदे शिक्षणाकरितां ५ विश्वविद्यालयें आहेत. धंदेशिक्षणाच्या शाळा आहेत. दोन वेधशाळा व पदार्थसंग्रहालयें, तसेंच हवामान अंदाजण्याचें गृह हीं आहेत. एकंदर अर्जेंटिनामधील ५२० वर्तमानपत्रांपैकीं ४९३ स्पॅनिश भाषेंत, १४ इटालियन, ५ जर्मन व ५ इंग्रजी भाषेंतील आहेत.

ध र्म.—सरकार रोमन कॅथोलिक पंथ राष्ट्रीय धर्म समजतें पण इतर धर्मांस परवानगी आहे.

ज मा बं दी.—जकात व अबकारी या उत्पन्नाच्या मुख्य बाबी आहेत; व राष्ट्रीय कर्जाची फेड ही खर्चाची मुख्य बाब आहे. कागदी नाणें हा अंतरराष्ट्रीय कर्जाचा मुख्य भाग आहे व यामुळें देशाला फार त्रास झाला आहे. आर्जेंटिना सरकारचें उत्पन्न १९२० सालीं ३,९२,५५,७६४ पौंड व खर्च ३,९२,४५,७०६ पौंड होता. या सालच्या बजेटांत ३० लाख पौंड सैन्याकडे व २०,०४,६११ पौंड आरमाराकडे खर्च धरला होता.

इतिहास.—अर्जेंटिनामध्यें प्रथम जॉन डिआझ डिसोलिस याच्या आधिपत्याखालीं १५१६ मध्यें स्पॅनिशलोक आले नंतर १५२० मध्यें पोर्तुगीज खलाशी फर्डिनँड मॅगेलन आला. परंतु तो वसाहत न करतां परत गेला. नंतर स्पेन सरकारनें सेबॅस्टिअन केबट यास पाठविलें. तो १५२७ मध्यें प्लेट नदीला पोहोंचला व कार्योरानाल नदीच्या मुखावर त्यानें एक वसाहत स्थापली. दोन वर्षांनंतर तो परत आला. १५३५ मध्यें मेंडोझा प्लेटनदींत शिरला व येथें त्यानें सँटा मेरिया डि ब्युनॉस एरीझ ही वसाहत स्थापली व पारानावर कॉर्पस क्रिस्ती नांवाचा किल्ला बांधला. हा १५३७ मध्यें परत आला याच लोकांपैकीं इराला व त्याने सोबती यांनीं १५३६ मध्यें पहिली कायमची स्पॅनिश वसाहत स्थापली इलाच पुढें असन्शान नांव मिळालें. यानंतर चाळीस वर्षांनीं जॉन गॅरे आला व यानें ब्युनॉस एरीझच्या जागीं शहर वसविलें. १५६५ मध्यें टुकुमान व १५७३मध्यें कोर्डोवा हीं शहरें वसविण्यांत आलीं,

सतराव्या शतकाच्या सुरुवातीस बरेच साहसी प्रयत्न करून स्पॅनिश लोकांची प्लेट नदीवर वसाहत झाली.

यापुढें या वसाहतीची उत्तरोत्तर भरभराट होत गेली. कांहीं वर्षांनीं स्पेन देशांतून या वसाहतीवर एका गव्हर्नराची नेमणूक होऊं लागली. परंतु स्पेनचें एकंदर आपल्या वसाहतींसंबंधीं धोरण फारच कोत्या बुद्धीचे होतें त्यामुळें ब्युनॉस एरीझ वगैरे ठिकाणांहून अंतर्भागांशीं व्यापार करण्यास फारच गैरसोयी होऊं लागल्या व याचा परिणास चोरटा व्यापार वाढण्यांत झाला. पोर्तुगीजांनीं ब्युनॉस एरीझ समोर एक वसाहत स्थापून चोरटा व्यापार चालविला व इंग्रजांनींहि या बाबतींत त्यांस बरीच मदत केली. या वसाहतींनां गुलाम पुरविण्याचा मक्ताहि इंग्रजांकडेच होता. फ्रान्समध्यें जी राज्यक्रांति झाली त्या गडबडींत व नंतरच्या नेपोलियन-युद्धांत स्पेन गुंतला असतां इंग्रजांनीं दोनदां ब्युनॉस एरीझ काबीज करण्याचा प्रयत्न केला, पण दोनहि वेळां त्यांस पिटाळून लावण्यांत आलें. परंतु या गोष्टीमुळें वसाहतवाल्यांत आत्मविश्वास उत्पन्न होऊन स्वातंत्र्यलालसा जागृत झाली

अखेरीस १८१० मध्यें एक हजारबंद लोकांची सभा ब्युनॉस एरीझ येथें भरली व एक तात्पुरती जंटो स्थापण्यांत आली. कांहीं दिवस लोकपक्षामध्यें व राजकीय पक्षामध्यें लढा चालू होता व बरीच अव्यवस्था माजली होती. परंतु १८१६ मध्यें डेप्युटी लोकांची कॉंग्रेस भरली व डॉन मार्टिन प्वेरेडॉनला वरिष्ठ डिरेक्टर नेमण्यांत आले व रियो-डा प्लाटा हा संयुक्त प्रांत स्वतंत्र झाल्याचें जाहीर करण्यांत आलें. ब्युनॉस एरीझ हें राजधानीचें शहर बनविण्यांत आलें, परंतु बोलीव्हिया, पाराग्वे, उरुग्वे यांनीं ब्युनॉस एरीझ विरुद्ध बंडें केलीं व अखेरीस आपापलीं स्वतंत्र प्रजासत्ताक राज्यें बनविलीं.

ब्युनॉस एरीझ व चिली यांच्या संयुक्त सैन्यानें स्पॅनिश लोकांचा १८१८ मध्यें मैपू येथें पराभव केला. प्रजासत्ताक सैन्यानें अखेरचा जय अयाकुचा येथें १८२४ मध्यें मिळविला. स्पॅनिश सरकारनें या देशाचें स्वातंत्र्य १८४२ पर्यंत कबूल केलें नाहीं १८२५मध्यें संयुक्त प्रजासत्ताकांकरितां एक शासनघटना ठरविण्यांत आली व इंग्लंडनें या प्रजासत्ताक संस्थानास आपली मान्यता दिली.

१८२६ मध्यें बर्नार्डो रिव्हाडाव्हिया प्रेसिडेंट झाला. हा युनिटॅरियन्स पक्षाचा मुख्य होता. दुसरा पक्ष फेडरॅलिस्ट लोकांचा होता. याच्या कारकीर्दींत ब्राझिलशीं लढाई झाली;व प्रजासत्ताकांतील निरनिराळ्या संस्थानांतील बंधनें बळकट करण्यांत आलीं. परंतु या गोष्टीस सर्वत्र विरोध दिसून आला व रिव्हाडाव्हियानें राजीनामा दिला. फेडरॅलिस्ट पक्षाचा लोपेझ, त्याच्यामागून प्रेसिडेंट झाला परंतु लागलीच डोरेगो प्रेसिडेंट झाला. युनिटॅरियन्स पक्षाचा मुख्य जॉन डि लॅव्हले होता. त्यानें डोरेगोला हांकून लावलें व गोळी घालून ठार केलें. इ. स. १८२८ मध्यें सर्वत्र बंडाळी व यादवी चालू होती. डोरेगो नंतर फेडरॅलिस्ट पक्षाचा जॉन मॅन्युयल डि रोझास हा मुख्य बनला. यानें १८२९ मध्यें त्यानें लाव्हलेचा पराभव केला व ब्युनॉस एरीझचा ताबा घेतला; आणि पुढील तीन वर्षांत आपली सत्ता सर्वत्र स्थापन केली. यानें युनिटॅरियन पक्षाचा क्रूरपणें पाठलाग केला व याची कारकीर्द म्हणजे भीतीचें साम्राज्य बनलें. रोझासनें हळूहळू सर्व सत्ता बळकावली. नेहमीं याच्या कारकीर्दींत रक्तपात होत असत व हा अतिशय जुलमी बनला. अखेरीस उर्किझा यानें रोझासचा पाडाव १८५२ मध्यें केला.

उर्किझा यास १८५३ मध्यें प्रेसिडेंट निवडलें. शासनसंस्थेची घटना ठरविण्याकरितां प्रत्येक प्रांताचे सारखे प्रतिनिधी असलेली एक कॉंग्रेस भरविण्यांत आली. तिनें सान्टा फे येथें अधिवेशन भरविलें त्यामुळें ब्युनॉस एरीझ तींत सामील झालें नाहीं. तेव्हां उर्किझानें पराना हें राजधानीचें शहर केलें व ब्युनॉस एरीझला स्वतंत्र संस्थान म्हणून मान्य केलें. परंतु लवकरच संयुक्त पक्ष व ब्युनॉस एरीझ यांच्यामध्यें युद्ध होऊन ब्यूनॉस एरीझचा सेनापति मायटर याचा उर्किझानें पराजय केला व ब्यूनॉस एरीझ पुन्हां संघांत सामील झालें. तथापि लवकरच ब्यूनॉस एरीझ व इतर प्रांत यांच्यामध्यें वर्चस्वाबद्दल उघड लढाई जुंपली. मायटर व उर्किझा यांच्या हाताखालीं उभय पक्षाच्या सैन्यांची लढाई पुन्हां पॅव्हॉन येथें१८६१मध्यें झाली. मायटर जय झाला. त्याला प्रेसिडेंट निवडण्यांत आलें व यानें या लढ्याचा कायमचा व चांगला निकाल लाविला. १८५३ ची शासनघटना कायम ठेवण्यांत आली व ब्यूनॉस एरीझ हें संयुक्त संघाचें ( [illegible] ). कापसाची लागवड पुढें पाराग्वेशीं लढाई झा[illegible] १८९५ मध्यें ८७९ एकर, ब्राझील यांची दोस्ती झाली व १८७० मध्यें पाराग्वेच्या लोकांचा पूर्ण पराजय झाला. मध्यंतरीं अर्जेंटिनामध्यें बंड झालें

परंतु त्याचा मोड करण्यांत आला. १८६८ मध्यें मायटरची मुदत संपली व डॉ. डोमिंगो फॉस्टिनो प्रेसिडेंट झाला. याच्या कारकीर्दीत शिक्षणाची व देशांतील संपत्तीची बरीच वाढ झाली. ब्युनॉस एरीझची समृद्धि व लोकसंख्या वाढली. अर्जेंटिना व ब्राझील यांच्यामधील लढाई मायटरच्या मध्यस्थीनें मिटली.१८७० मध्यें एंट्रेरिऑसमध्यें लोपेझ जॉर्डन यानें बंड केलें तें प्रेसिडेंट सर्मीटोनें सैन्य पाठवून मोडलें. १८७४ च्या प्रेसिडेंटच्या निवडणुकीमुळें ब्युनॉस एरीझचे रहिवाशी ( पोर्टिनो ) व इतर प्रांतांतील लोक ( प्रॉव्हिन्सियल्स ) यांच्यामध्यें तंटा लागला. प्रॉव्हिन्सियल्सचा उमेदवार डॉ. निकोलस अव्हेलेनेडा याची निवडणुकीमध्यें जनरल मायटरवर सरशी झाली परंतु लोकांस निवडणुकींत लबाडी झाल्याचा संशय आला. जनरल मायटरनें या लढ्याचा निकाल शस्त्रांनीं लावावा असा निश्चय केला. परंतु नवीन अध्यक्षाच्या हाताखालील सरकारी सैन्यानें या बंडखोरांवर दोन जय मिळविले व जनरल मायटर व त्याचा साथीदार अॅरेनडोडो यांस शरण यावें लागलें. परंतु पुढील निवडणुकीच्या वेळीं हें भांडण पुन्हां डोकें वर काढूं लागलें. प्रेसिडेंटचें मत जनरल रोका प्रेसिडेंट निवडून येण्याबद्दल होईल तितकें वजन खर्च करण्याचें होतें व ब्युनॉस एरीझचे लोक यास अडथळा करणार होते. पोर्टिनोंनीं, ब्युनॉस एरीझच्या सशक्त लोकांना लष्करी शिक्षणांत तरबेज करून स्वयंसेवक तयार करण्याकरितां व प्रॉव्हिन्सियल लोकांचे बेत हाणून पाडण्याकरितां, सैन्य जमविण्याकरितां 'टिरो नॅशनल' नांवाची संस्था स्थापन केली.मध्यंतरी या स्वयंसेवक लोकांच्या नायकांनां प्रेसिडेंटनें बोलावून असली ड्रील वगैरे करण्याची मनाई केली. तेव्हां या लोकांनीं रस्त्यांतून मिरवणूकी काढल्या व अनेक सभा भरविल्या. प्रेसिडेंटनें घाबरून समेटाचें बोलणें लावलें परंतु त्याचा कांहीं एक परिणाम न होतां लढाई होणें अवश्य ठरलें.

१८८० मध्यें राष्ट्रीय व सरकारी पक्ष आणि बारा प्रांत एका पक्षाला झाले व ब्युनॉस एरीझ शहर, प्रांत व कोरींटीस प्रांत दुसऱ्या पक्षाला झाले. कांहीं झटापटी होऊन जनरल रोकाच्या अधिपत्याखालीं राष्ट्रीय सैन्यानें पोर्टिनोस लोकांचा पराजय करून त्यांनां शरण यावयास लावलें. त्यांच्या सर्व नायकांनां सरकारी नोकरींतून काढून टाकण्यांत आलें व त्यांच्या सत्तेचा मोड करण्यांत आला. जनरल रोकाला प्रेसिडेंट निवडण्यांत आलें व त्यानें १८८० मध्यें सत्ता धारण केली.

रोका प्रेसिडेंट.—याच्या कारकीर्दीतील मुख्य गोष्ट म्हटली म्हणजे ब्युनॉस एरीझ हें शहर राष्ट्रीय मालमत्ता आहे असें जाहीर करण्यांत आलें. ब्युनॉस एरीझ प्रांताची राजधानी लाप्लाटा येथें नेण्यांत आली. यामुळें पोर्टिनोस लोकांची सत्ता फारच कमी झाली.

या प्रेसिडेंटानें देशाची संपत्ति वाढविण्याचे उपाय योजिले व सर्व प्रांतांचें ब्युनॉस एरीझशीं दळणवळण खुलें करण्याकरितां रेल्वे सुरू केल्या. परंतु त्यानें दोन ढोबळ चुका केल्या त्या म्हणजे १८८५ मध्यें दोन वर्षेंपर्यंत नोटांची रोकड मिळणार नाहीं हा फायदा पास केला व आपला मेव्हणा केल्मन यास पुढील प्रेसिडेंट म्हणून उभें केलें.

केल्मन प्रेसिडेंट.—केल्मन अध्यक्ष झाल्यावरोबर जुन्या कोर्डोबा लीगचे सभासद बहुतेक सरकारी नोकरीवर चढले व या लोकांनीं लांचलुचपती वगैरे प्रकारांनीं आपली तुंबडी भरण्यास सुरुवात केली. हा जुलूम फारच वाढत चालला. याला प्रतिकार करण्याकरितां ' युनियन सिव्हिका ' नांवाची संस्था ब्युनॉस एरीझच्या नागरिकांनीं स्थापन केली. १८९० मध्यें युनियन सिव्हिकानें हत्यारें धारण केलीं. यांच्या मदतीस कांहीं पलटणें आलीं तेव्हां केल्मननें राजीनामा दिला, व कार्लस पेलग्रिनि हा प्रेसिडेंट झाला.

पेलेग्रिनी प्रेसिडेंट.—यावेळीं देशाची सांपत्तिक स्थिति फारच शोचनीय झाली होती परंतु पेलग्रिनीला याला कांहींच तोड काढतां आली नाहीं. त्याची मुदत १८९२ त संपली. डॉ. साएन्झ पेना प्रेसिडेंट निवडला गेला. यानें राज्यव्यवस्था सुधारण्याचा फार प्रयत्न केला परंतु हा कोणत्याहि एका पक्षाचा नसल्यामुळें कॉंग्रेसमध्यें मताधिक्य याच्या बाजूचें नव्हतें. त्याला कांग्रेसमध्यें एकसारखा विरोध होत असे. १८९३ मध्यें ब्युनॉस एरीझच्या लोकांनीं तेथील गव्हर्नराविरुद्ध बंड केलें परंतु विशेष लढाई न होतां त्याचा बंदोबस्त करण्यांत आला. सँटा फे मध्येंहि बंड झालें पण तें जनरल रोकानें मोडलें. पुढें १८९४ मध्यें कॉंग्रेसमधील विरोध इतक्या थरास पोंचला कीं, कांग्रेस बजेट मंजूर करीना. तेव्हां १८९५ मध्यें पेनानें आपल्या जागेचा राजीनामा दिला. व युरिबरु हा उपाध्यक्ष होता तो अध्यक्ष झाला.

युरिबरु प्रेसिडेंट.—या वेळीं चिलीच्या सरहद्दीविषयींचा लढा चालू होता व दोन्हीहि देशांचा लष्करी तयारी करण्यांत बराच पैसा खर्च झाला, असें असूनहि देशाची सांपत्तिक स्थिति सुधारण्याचे बाबतींत युरिबरुनें बरेंच काम केलें. १८९७ मध्यें ही स्थिति बरीच सुधारली व परकीय देशांत यानें आपल्या देशाची पत पुन्हा स्थापन केली.

रोका प्रेसिडेंट.—१८९८ मध्यें फिरून निवडणूक झाली. व चिलीशीं लढाई होण्याचा संभव असल्यामुळें जनरल रोकाला प्रेसिडेंट निवडण्यांत आलें. प्रेसिडेंट रोकानें चिलीच्या प्रेसिडेंटची मॅगेलन सामुद्रधुनीवर मुलाखत घेऊन या सरहद्दीच्या प्रश्नांचा निकाल लवाद नेमून लावण्याचें ठरविलें व युद्धाची तयारी बंद ठेवली. कांहीं सरहद्दीबद्दलचा तंटा युनायटेड स्टेटसकडे देण्यांत आला व कांहीं इंग्लंडच्या बादशहाकडे सोंपविण्यांत आला. युनायटेड स्टेट्सच्या प्रतिनिधीनें १८९९ मध्यें सरहद्दीसंबंधीं दिलेला निकाल उभय पक्षांनीं मान्य केला. १८९९ मध्यें रोकानें न्याय देण्याच्या

पद्धतींत, निवडणुकीच्या कायद्यांत व शिक्षणखात्यांत बऱ्याच सुधारणा सुचविल्या व त्या सर्व काँग्रेसमध्यें तावडतोब मंजूर करण्यांत आल्या. डॉलरची किंमत सरकारी रीतीनें ४४ सेंट सोनें कायम करण्यात आली व यामुळें कागदी डॉलरच्या नेहमीं बदलणाऱ्या किंमतीमुळें व्यापार व उद्योगधंदे याच्या होणाऱ्या नुकसानीस आळा पडला. १९०० मध्यें ब्राझिलच्या प्रेसिडेंटानें देशास मुलाखत दिली तेव्हां त्याचें फार स्नेहपूर्वक स्वागत करण्यात आलें. चिली व अर्जेंटिना याचेमधील वैर बहुतेक संपलेंच होतें. पॅटागोनियातील सरहद्दीसंबंधीं १९०२ मध्यें सातव्या एडवर्ड बादशहानें दिलेला निकाल उभय पक्षांनीं मान्य केला.

रोकाच्या दूरदर्शीपणामुळें अशा आणीबाणीच्या प्रसंगीं देशांत शांतता नांदली व अर्जेंटिना व चिलीमधील भांडणाचा कायमचा निकाल लागला. रोकाची मुदत १९०४ मध्यें संपली. याच्यामागून डॉ. मॅन्युएल क्विन्टाना प्रेसिडेंट झाला. हा फार मेहनती व प्रागतिक मनुष्य होता. यानें देशांतील दळणवळणाचे मार्ग खुले करण्याचा बराच यत्न केला. हा १९०६ मध्यें मेला व याच्या मागून उपाध्यक्ष डॉ. आल्कोर्टा हा प्रेसिडेंट झाला.

१९१० आक्टोबरमध्यें प्रेसिडेंट जोसे फिगुरो अल्कोर्टा याची कारकीर्द संपून रॉक साएन्झ पेना हा प्रेसिडेंट झाला. याचा बाप १८९२–९५ पर्यंत प्रेसिडेंट होता. व्हिक्टोरिनो डला प्लाझा हा व्हाइस प्रेसिडेंट झाला. या वेळच्या प्रधानमंडळांतील बरेचसे लोक परराष्ट्रांत वकील म्हणून काम केलेले होते. १९१४ मध्यें रॉक साएन्झा पेना मरण पावला व डी ला प्लाझा प्रेसिडेंट झाला. या सुमारास जागतिक युद्ध सुरू झालें. त्या वेळीं आर्जेन्टिनाच्या प्रेसिडेंटनें तटस्थ वृत्ति ठेविली. तथापि पुष्कळशा लोकांचा व अधिकाऱ्यांचा ओढा दोस्तराष्ट्रांकडे होता. १९१६ मध्यें प्रेसिडेंटची नवी निवडणूक झाली, व रॅडिकल पक्षाचा हिपॉलिटो इरिगोयेन प्रेसिडेंट निवडून आला. आर्जेन्टिनाच्या इतिहासांत रॅडिकल पक्ष अधिकारारूढ होण्याचा हा पहिलाच प्रसंग होता. या प्रेसिडेंटानें पूर्वी कोणत्याहि अधिकाराच्या जागीं काम केलेलें नव्हतें. तथापि या पक्षाचा कारभार लोकांनां पसंत पडला, आणि १९१९ च्या निवडणूकीमध्यें पुन्हां हा पक्ष अधिक बलिष्ठ होऊन अधिकारावर राहिला.

१९१७ मध्यें युनैटेडस्टेट्स जागतिक युद्धांत शिरलें, त्या वेळीं अमेरिकेंतील अनेक देशांतल्याप्रमाणें अर्जेंटिनांतहि लोकमत द्विधा झालें. जर्मनीविरुद्ध युद्धांत पडावें असें एका पक्षाचें मत पडलें, व दुसरा पक्ष तटस्थ वृत्तिच फायदेशीर होईल या मताचा होता. बहुजनसमाज दोस्त राष्ट्रांबद्दल सहानुभूतिपूर्ण होता. पण अर्जेंटिनाच्या प्रजेंत २६००० जर्मन व ४०००० जर्मनवंशीय होते. या लोकांची संघशक्तीनें काम करण्याचि पद्धति चांगली असल्यामुळें देशांत त्यांचें वजनहि पुष्कळ होतें. खुद्द प्रेसिडेंटची मजूर पक्षाला सहानुभूति असल्यामुळें याच सुमारास देशांत संप वगैरे बरेच झाले, व त्यामुळें जागतिक युद्धापेक्षा स्वदेशांतील गोष्टीकडेच लोकांचें लक्ष अधिक वेधलें. १९१७ सप्टेंबरमध्यें ब्यूनॉस एरीझच्या वृत्तपत्रांनीं ब्यूनॉस एरीझ येथील जर्मन मिनिस्टर कौंट लक्झबर्ग यानें जर्मन परराष्ट्रीय खात्याला केलेली पुढील तार प्रसिद्ध केली, ती " अर्जेंटिनाच्या जहाजासंबंधानें माझा सल्ला असा आहे कीं त्यांना परत जाण्यास भाग पाडावें किंवा कांहीं मागमूस लागणार नाहीं अशा रीतीनें बुडवून टाकावीं. " याप्रमाणें चार जहाजें जर्मनांनीं बुडविलीं होतीं. ही बातमी प्रसिद्ध होताच लोक फार प्रक्षुब्ध झाले व त्यांनीं एका मोठ्या जर्मन क्लबाचा नाश केला, तीन जर्मनपक्षीय वृत्तपत्रांच्या अफीसावर हल्ला केला, व कित्येक जर्मन दुकानांची बरीच नासधूस केली. अर्जेंटिनाच्या परराष्ट्रमंत्र्यानें लक्झबर्गला कळविलें कीं त्याचें वकील या नात्यानें वास्तव्य अर्जेंटिनाच्या सरकारला नापसंत आहे. याप्रमाणें सर्वत्र जर्मनाविरुद्ध खळबळ उडून गेली, व जर्मनी बरोबर संबंध ठेवूं नये, असें ठरावहि कायदे मंडळानें पास केले. इतकी धामधूम झाली तरी प्रेसिडेंटनें राष्ट्राची तटस्थ वृत्तिच कायम ठेविली. व जर्मन वकिलातहि कायम ठेविली. मात्र लक्झबर्गच्या जागीं कौंट डोनहॉफ वकील नेमला गेला. अर्जेंटिनांतील बरेचे स्वयंसेवक शिपाई दोस्ताच्या सैन्याला मिळाले, आणि दोस्ताच्या रेडक्रॉस व इतर रिलिफ फंडांना लोकांनीं पैशाची मदत पुष्कळ केली.

**अझेरूम**—अर्झरूम विलायत तुर्कस्तानच्या आर्मेनिया प्रांतांत असून, तींत तीन संजक आहेतः बयाझिद, अर्झरूम आणि अर्झिंगन. आर्मेनियन पठाराचा अति उंच भाग हींत आला असून, डोंगराळ प्रदेशहि बरेचसे आहेत. युफ्रेटीसच्या दोन्ही शाखांचेहि उगम याच विलायतेंत आहेत. हा मुलूख मुख्यतः शेतकीचा असून धंदे थोडेच आहेत. लोखंड, मीठ, गंधक आणि इतर खनिज पदार्थ येथें सांपडतात. कांहीं कोळशाच्या खाणीहि सुरू आहेत. बरेचसे लोक आर्मेनियन व कुर्द आहेत विलायतेचें क्षेत्रफळ सुमारें १९१८० चौ. मैल असून लोकसंख्या साडेसहा लक्ष आहे.

**श ह र.**—अर्झरूम हें शहर याच नांवाच्या विलायतेचें मुख्य ठिकाण आहे. हें लष्करी ठाणें आहे व येथील किल्ला लष्करी दृष्टीनें फार महत्त्वाचा समजला जातो. ह्या शहराच्या पूर्वेला डेव्हेबोयुन ('उंटाची मान') कडा आहे दक्षिणेस पलानडुकेन पर्वताची रांग असून त्यांतून पुष्कळ ओढ्यांचा उगम झाला आहे. ह्या ओढ्यांतूनच शहराला पाण्याचा पुरवठा होत असतो.

ह्या शहराभोंवती एक मातीचा तट आहे, जवळील टेंकड्यावर किल्ले आहेत. एकंदरींत शहराची तटबंदी मजबूत आहे. सध्यां जुन्या भिंती व अंतर्दुर्ग यांचा मागमूस देखील

नाहीं. कोटांतील शहराचा भाग अकुंचित असून, रस्ते अरुंद व घाणेरडे आहेत. शहराची लोकसंख्या सुमारें ऐंशीं हजार आहे; कुरदिस्तानाचा ब्रिटिश वकील येथें राहतो. इतर यूरोपियन राष्ट्रांचे वकील येथेंच असून शिवाय एक अमेरिकन मिशनची शाळा आहे. हें उंचवट्यावर असल्यामुळें येथें अतिशय कडक थंडी पडते.

या ठिकाणीं बऱ्याच सुंदर मशिदी व सार्वजनिक स्नानगृहें आहेत. सेलजुकांनीं बाराव्या शतकांत बांधलेली 'मद्रमा' इमारत, फारच सुंदर आहे. तिचा दरवाजा नकशीदार आहे. व तिला दोन मनोरे आहेत, त्यांना 'चिफ्टे मनोरे' म्हणतात. येथें पूर्वी उंटांवरून बराच व्यापार चालत असे. येथील पितळेचें काम प्रसिद्ध आहे. या ठिकाणीं कातडी कमाविलीं जातात व तुर्की बूट व जिनें तेथें तयार होतात.

या प्रांतांत गहूं, जव, डाळ व भाजीपाला उत्पन्न होतो. सुंदर इराणी गालिचे येथें मिळतात.

अर्झरूम हें फार जुनें शहर आहे. सेलजुकांनीं तें १२०१ सालीं सर केलें व १५१७ सालीं तुर्कांच्या सत्तेखालीं आलें. रशियन सेनापति पास्केविच यानें तें १८२९ सालीं घेतलें आड्रियानोपलचा तह होईपर्यंत तें रशियन लोकांच्या ताब्यांत होतें. १८७८ सालीं पुन्हां रशियनांनीं तें घेतलें परंतु बर्लिन तहानंतर तें तुर्कांच्या ताब्यांत आलें. शहराचा बराच भाग १८५९ मध्यें झालेल्या भूकंपामुळें नाश पावला. तसेंच १९०१ च्या सालच्या भूकंपामुळें बराच नाश झाला.

**आर्झिंजन**—अगर एरझिंजन हें आशियांतील तुर्कस्तानांत असून अर्झरूम विलायतेंतील एका संजकाचें मुख्य ठिकाण आहे. लष्करी दृष्टीनें याचें महत्त्व बरेंच आहे. शहर ३९०० फूट उंचीवर वसलेलें आहे. शहराभोंवतालीं फळबागा व फुलबागा बऱ्याच आहेत. शहराच्या पूर्वटोंकापासून पश्चिम टोंकाकडे जाणारा एक मोठा राजमार्ग आहे. बाकीचे रस्ते अरुंद व घाणेरडे आहेत सरकारी इमारती व हाजी इझत पाशाची मशीद यांच्याजवळून जाणारे रस्ते जरा चांगले आहेत व पहाण्यासारख्या याच इमारती आहेत. शिपायांच्या राहण्याच्या मुख्य चाळी, लष्करी हॉस्पिटल व कपड्याच्या वखारी ह्या वरटलूक येथ आहेत. शिपायांच्या जुन्या चाळी व लष्करी जोडे करण्याचे कारखाने या शहरांत आहेत. येथील लोकसंख्या १५००० असून तीपैकीं निम्मे लोक आर्मेनियन आहेत. येतील मुख्य उद्योगधंदे रेशीम व कापूस. यांसंबंधीं असून तांब्याचीं भांडींहि येथें तयार होतात. उन्हाळ्यांत येथील हवा उष्ण असते व हिंवाळ्यांत साधारण असते गहूं, फळें, द्राक्षें, आणि कापूस हीं येथें पिकतात, लोक गुरें व मेंढ्या पाळतात. पाणी मुबलक आहे. आसपास लोखंड सांपडतें, कांहीं गरम पाण्याचे झरे आहेत. रूमच्या सुलतानानें १२४३ सालीं मोंगल लोकांचा येथील मैदानावर पराभव केला. सेंट ग्रेगरीचा प्रसिद्ध मठ या शहरापासून ११ मैलांवर होता.

पूर्वी ज्या शहरांत अनैटीसचें देऊळ होतें, त्याच ठिकाणी सध्यांचें शहर आहे. अनैटिस ही प्राचीन आर्मेनियाची एक ग्रामदेवता होती. पशूंची अनाहित देवता हीच असावी असें कांहीं म्हणतात. सेंट ग्रेगरीच्या वेळेस चवथ्या शतकांत हें शहर एक महत्त्वाचें ठिकाण होतें. रोम्यानसचा १०७१ सालीं पराभव झाल्यानंतर हें शहर बायझनटाईन लोकांच्या हातून सेलजुकांच्या ताब्यांत गेलें व १२४३ सालीं मोंगल लोकांनीं घेतलें. मोंगलांच्या नंतर तार्तर व तार्तरांच्या मागून तुर्कोमन लोकांनीं हें शहर घेतलें, व सरतेशेवटी दुसऱ्या महमदशहानें १४७३ सालीं उसमानअली साम्राज्यांत या शहराचा समावेश केला. भूकंपानें १७८४ सालीं ह्या शहराचा बहुतेक नाश झाला.

**अर्डिया**—लॅटिअममध्यें रुटुली लोकांचें हें शहर दक्षिणकिनाऱ्याच्या नैर्ऋत्येस ३ मैल आणि व्हाया आर्डिआटिनाच्या बाजूनें रोमच्या दक्षिणेस २३ मैल आहे. ओडेसिअस आणि सर्सीच्या मुलानें किंवा परसीअसची आई डॅनी हिनें हें शहर वसाविलें असावें अशा आख्यायिका आहेत. हें टरक्विनसचें राजधानीचें शहर टॉरक्विनीअस सुपरबसनें जिंकलें होतें. इ. सनापूर्वी ५०९ सालीं कार्थेजशीं झालेल्या तहाप्रमाणें रोमच्या ताब्यांत गेल्यावर लवकरच हें लॅटिन संघास मिळालें. येथें असलेलें व्हीनसचें मंदीर सॅमनाइट लोकांनीं उध्वस्त केलें. १८६ सालीं हें मुख्य बंदीखान्याचें ठिकाण झालें. व्हाया आर्डिआटिना नांवाची सडक येथून थेट रोमपर्यंत गेलेली आहे. हें शहर दोन दऱ्यांमधील डोंगरसपाटीवर वसलेलें आहे याच्या भोंवती ६० फूट उंचीचे कडे आहेत.

**अर्थशास्त्र**—अर्थशास्त्र हा शब्द फार जुना आहे. या विषयावर संस्कृतमध्यें अनेक ग्रंथ आहेत. त्या सर्व ग्रंथांत चाणक्याचा ग्रंथ (कौटिल्यनीति) सुप्रसिद्ध आहे. हा ग्रंथ अलीकडेच सांपडला आणि त्याचा पद्धतशीर अभ्यास बराच झाला आहे, तरी अजून बराच व्हावयास पाहिजे आहे. राजाचें बलाबल मोजण्यासाठीं अर्थशास्त्राचा उपयोग असे आणि याचें महत्त्व इतकें मोठें मानलें जात असे कीं, धर्माच्या खालोखाल हा पुरुषार्थ आहे, असें प्राचीन पंडीत समजत असत.

**अर्वाचीन अर्थशास्त्राचें स्थूल स्वरूप.**—अलीकडे अर्थशास्त्र या शब्दाचा उपयोग "पोलीटिकल एकॉनमी" किंवा "एकानामिक्स". या शब्दांनीं यूरोपीयास जो बोध होतो आणि त्यांस जें ज्ञानक्षेत्र त्या शब्दांनीं दर्शविलें जातें, तें दर्शविण्यासाठीं लावतात. पाश्चात्यांनीं जी माहिती आणि जे सिद्धांत गोळा केले आहेत ते त्यांच्या विवेचनाच्या पद्धतींत न सांगतां येथें स्वतंत्रपणें व्यक्त केले आहेत. आणि संज्ञालक्षणजाल बरेंचसें टाकलें आहे. शब्दांच्या व्याख्या ग्रंथकारांच्या समजुतींप्रमाणें असतात आणि दुस

न्यास त्या व्याख्या कबूल नसतात आणि त्यामुळें भांडणें उत्पन्न होतात आणि तात्त्विक वादाचें वाङ्मय पुष्कळ वाढतें. तें कसें तें दाखवून शास्त्रांच्या संवर्धनाच्या ज्या पद्धति आहेत, त्याचें विवेचन अन्यत्र केलेंच आहे. ( विज्ञानेतिहास प्र. १ पहा. )

अर्थशास्त्र हा व्यावहारिक विषय असल्यामुळें याविषयीं जें वाङ्मय उत्पन्न होतें, त्यांत पुष्कळसें चालू आर्थिक प्रश्नांमुळें उत्पन्न होतें. ज्या ज्या वेळेस मनुष्यहिताचे जे प्रश्न असतात, त्यांसच प्राधान्य येतें असें नाहीं, तर लेखक ज्या वर्गाचा असेल त्या वर्गापुढें असलेल्या प्रश्नांस प्राधान्य येतें व त्यांवर ग्रंथ उत्पन्न होतात. या प्रकारच्या परिस्थितीमुळें नेहमीं अर्थशास्त्रीय वाङ्मयाच्या इतिहासाबरोबर त्या इतिहासाच्या स्पष्टीकरणार्थ तत्कालविषयक आर्थिक परिस्थितीचेंहि स्थूल विवेचन करावें लागतें. आर्थिक परिस्थिति वाङ्मयस्वरूपच निर्णीत करते असें नाहीं, तर त्या वाङ्मयांत व्यक्त होणाऱ्या मतांसहि कारण होते; मात्र विचारांस कारण केवळ परिस्थितीच होत नाहीं, वाङ्मयामध्यें जे विचार दृष्टीस पडतात त्यांमध्यें कांहीं अंशीं सातत्य किंवा परंपरा दृष्टीस पडते. अर्थशास्त्रीय वाङ्मयाचा इतिहास देतांना हें सातत्य स्पष्ट केलें पाहिजे. वाङ्मयांतील विषयांचें स्वरूप ठरविण्यास मुख्य कारण शासनसंस्था होय. अर्थशास्त्राविषयीं असें सांगतां येईल कीं, जोंपर्यंत राज्यकर्ते प्रजेचा व्यापार वाढविणें, देशांत निरनिराळे धंदे उत्पन्न करणें, देशाची उत्पादनशक्ति वृद्धिंगत करणें व या गोष्टी आपल्या करांचें उत्पन्न वाढविण्यास आवश्यक आहेत, हें समजून त्याप्रमाणें आपली राजनीति बनविण्याच्या प्रयत्नास लागले नाहींत, तोंपर्यंत अर्वाचीन प्रकारच्या अर्थशास्त्रास प्रारंभहि होत नाहीं. चाणक्याचें अर्थशास्त्र आणि जर्मन लोकांचें कामेराल शास्त्र हीं एकस्वरूपीच होतीं. हिंदुस्थानांतील राज्यकर्ते अनेक धंदे करीत, खाणी, शेतकी हीं सुद्धां करीत, व सावकारीहि करीत. ही राज्यपद्धति आपणांस चंद्रगुप्ताच्या काळीं जशी दिसते, तशीच अजूनहि दिसते. मुसुलमानी अमदानी व मराठेशाही व इंग्रजी यांत कांहीं थोडेबहूत फरक असतील; पण तत्त्वतः फारसे नाहींत. हिंदुस्थानाच्या राज्यकर्त्यांना स्वतः धंदा करण्याची जोंपर्यंत जरूर भासते तोंपर्यंत त्यांचें लक्ष देशाच्या उन्नतीकडे पूर्णपणें जाणार नाहीं. कारण हें सरकार उत्पन्नासाठीं पूर्णपणें करावर अवलंबून नाहीं. लोकांची प्रगति व्हावी आणि त्यांच्या नफ्यांतून आपण कर घ्यावा, या कल्पनेऐवजीं जमीनदारी करण्यांत सरकार गढलें आहे. यामुळें येथील सरकारी सावलीखालीं वाढलेलें वाङ्मय कामेराल पद्धतीचें आहे व खरें अर्थशास्त्रीय नाहीं. येथें अर्थशास्त्रीय वाङ्मय न वाढण्याचें कारण येथील लोकमतास सरकार अजूनहि फारसें जबाबदार नाहीं, आणि १९१९ पूर्वी तर लोकमताची किंमत सरकारी शासनपद्धतींत कांहीं एक नव्हती. फक्त सरकारी अधिकाऱ्यांवर गोळ्या झाडण्याकडे किंवा इंग्रजांवर बाँबगोळे फेंकण्यास उत्तेजन देण्याकडे एतद्देशीय लेखकवर्ग प्रवृत्त झाला तरच त्याच्याकडे लक्ष देण्याचें प्रयोजन येथील बेजबाबदार सरकारास असे. अशा स्थितींत देश्य अर्थशास्त्राची वाढ कशी होणार. इंग्लंडांतील किंवा यूरोपांतील अर्थशास्त्रावरील पुस्तकांचें वेदांताप्रमाणें अध्ययन करावें, अशीच परिस्थिति कालपर्यंत होती. देशी लोकांकडून अर्थशास्त्रविषयक वाङ्मय आतां कोठें सुरू होऊं लागलें आहे.

क्यामेराल शास्त्र आणि पोलिटिकल एकानमी यांमध्यें फरक हा आहे कीं, कामेराल शास्त्राचें ध्येय, शासनसंस्थेची दौलत वाढविणें हें होतें, आणि पोलिटिकल एकॉनमीचा हेतु शासनसंस्था श्रीमंत करण्याचा नसून शासनसंस्था हें ज्या राष्ट्राचें किंवा संस्थानचें यंत्र आहे तें राष्ट्र अथवा संस्थान श्रीमंत करण्याचा आहे. राजाची दौलत रुपये आणे पैनीं जशी सहज मोजतां येते, तशी सर्व राष्ट्राची मोजणें सोपें नाहीं आणि दोन राष्ट्रांमध्यें कोणतें राष्ट्र अधिक संपत्तिमान आहे हें पहाणें, हें दोन सरकारांतील कोणतें सरकार अधिक श्रीमंत आहे हें पहाण्यापेक्षां अधिक कठिण आहे. चाणक्यादिकांचें अर्थशास्त्र आणि अर्वाचीन अर्थशास्त्र यांमध्यें फरक हा आहे कीं, चाणक्याचें अर्थशास्त्र कामेराल शास्त्र होईल, तर अर्वाचीन अर्थशास्त्र पोलिटिकल एकॉनमी होय.

चाणक्याच्या काळांत जी अर्थशास्त्रीय प्रगति दिसत आहे तिचा प्रकर्ष पुढील काळांत झालेला दिसत नाहीं. मुसुलमानी स्वारीच्या निकट काळांत हिंदु राज्यामध्यें राजे लोकांचें शासनशास्त्र किती व्यापक होतें हें कळत नाहीं. दंडीच्या दशकुमारचरित्रांत शासनशास्त्रीय उल्लेख आहेत; पण राजे लोकांस अनुरूप अशा शास्त्रांचा विकास झालेला दिसत नाहीं. तो झाला असता तर देशवर्णनविषयक आणि इतिहासविषयक अनेक पुस्तकें अस्तित्वांत असतीं. कनिष्कादि राजांनीं सरकारी नाण्याचा प्रघात आणला आणि खासगी नाण्यांच्या ऐवजीं सरकारी नाणीं झालीं एवढा मात्र परकीय स्वाऱ्यांचा परिणाम झाला, असें म्हणतां येईल. राजे लोकांनीं खासगी धंदे करूं नयेत, यासारखें तत्त्व कल्हणाच्या राजतरंगिणींतून दिसून येतें. त्यानें शेतकी करणाऱ्या राजावर कडक टीका केली आहे. येथील सामाजिक आयुष्यक्रमामध्यें यूरोपांतील सर्फडमसारखीं घातुक व्यंगें नव्हतीं किंवा फ्रान्समधील गिल्ड पद्धतीसारखी पद्धति नव्हती; पण जातिभेद होताच आणि तो समाजांत प्रत्येकानें गुणकर्मांप्रमाणें स्थान पटकावावें, या योजनेस अपकर्षक होता. मुसुलमान राजांनीं येथें ज्या गोष्टी केल्या त्यांत आर्थिक महत्त्वाच्या म्हटल्या म्हणजे खड्या फौजा ठेवल्या आणि कांहीं अंशीं अधिक बलवान राजसत्ता उत्पन्न करून देशांतील आर्थिक आयुष्यक्रमास स्थैर्य उत्पन्न केलें असावें; पण त्यांची शहरें हिंदु राजांच्या शहरांपेक्षां श्रमविभागास किती अधिक उत्तेजन

देणारीं होतीं हें समजत नाहीं. गोंवळकोंडा हें मोठें भरभराटीचें शहर होतें असें म्हणतात; पण त्याच्या चतुःसीमा लक्षांत घेतल्या म्हणजे आजच्या हैदराबादेच्या एकचतुर्थांश तें असावें असें वाटतें. विजयानगर गोंवळकोंड्यापेक्षां कमी भरभराटलेलें नसावें.

मुसुलमानी, संपर्काचा देशाच्या आर्थिक स्थितीवर कांहींच परिणाम झाला नसणें अशक्य आहे. जेथें रस्ते नसतील तेथें अनेक ठिकाणीं मुसुलमान राजांनीं रस्ते बांधले ते लष्करी योजनेसाठीं असतील पण त्यांचा व्यापारावर परिणाम झाल्यावांचून राहिला नसेल. मुसुलमानांनीं ज्या वस्तूंचा प्रचार केला त्यांत कागद, व गुलाबासारखीं फुलें या येतील. पाश्चात्य संसर्गाचा परिणाम मात्र मुसुलमानी अमदानींत झाला असावा. पोर्तुगीजांमार्फत बऱ्याच नवीन गोष्टी देशांत आल्या. तंबाखु, मिरच्या रताळीं, बटाटे व मका हीं पिकें देशांत रुजलीं. म्हणजे पंधराव्या शतकाच्या अंताला जे भौगोलिक शोध झाले त्यांचा हिंदुस्थानाच्याहि आर्थिक आयुष्यावर परिणाम झाला. मुसुलमानी अमलाखालीं अनेक चैनीच्या व सुखाच्या गोष्टी देशांत प्रसृत झाल्या असतील. मेज, खुर्ची इत्यादि फारसी शब्द, घरांतील सोयीची व सुखाची कल्पना हिंदूंपेक्षां अधिक असावी असें दाखवितात. संस्कृतमध्यें वेदकालापासून आसंदी म्हणून एक आसनवाचक शब्द आहे. पण या आसंदीचा गृहांतून प्रवेश किती झाला असेल याची शंकाच आहे.

मुसुलमानी अमदानींत सौख्याच्या वस्तू पुष्कळ वाढल्या मराठेशाहींतील अर्थशास्त्र कसें काय होतें हें आज सांगतां येत नाहीं. शाहूच्या मृत्यूनंतर शासनसंस्था मोठ्या करामतीनें पेशव्यांनीं टिकविली ही गोष्ट खरी पण आर्थिक विकासाकडे त्यांचें लक्ष फारसें नव्हतें, किंवा तें देण्यास त्यांस अवकाशच नव्हता. युद्धोपयोगी चिजा देखील करण्याकडे फारसें लक्ष पेशव्यांनीं दिलें नाहीं. सर चार्लस मालेट यांनीं मराठे सरकारच्या अर्थशास्त्रावर अशी टीका केली आहे कीं, मराठे सरकाराचें अर्थशास्त्र म्हणजे कंजूषपणा. त्यामुळें कलाकौशल्याची वृद्धि झाली नाहीं. मुसुलमानांचें अर्थशास्त्र मराठ्यांच्या अर्थशास्त्रांपेक्षां उंच प्रतीचें होतें, ते खर्च करीत त्यामुळें उद्योगवृद्धि होई आणि त्यामुळें पुन्हां सरकारी तिजोरीस मिळकत होई. परंतु ब्राह्मणाच्या तिजोरींत गेलेला पैसा बाहेरच पडत नसे असें त्यांचें म्हणणें आहे.

पाश्चात्यांचा अर्थशास्त्रावर जो अभ्यास झाला आहे त्याचें सामान्य स्वरूप येणेंप्रमाणेः—

एका शासन सत्तेखालीं असणारीं राष्ट्रें हा त्यांचा इष्टवर्ग असून त्या राष्ट्रांचा उत्कर्ष कसा काय होईल त्यासंबंधानें त्यांनीं विचारपरंपरा निर्माण केली. संस्थानांच्या मुत्सद्यांनीं आपल्या प्रजेचा व्यापार वाढविण्यासाठीं, कलाकौशल्य वाढविण्यासाठीं किंवा इतर दुसऱ्या प्रकारची संपत्ति वाढविण्यासाठीं संस्थानांनीं काय करावें, कोणत्या कृत्याचे परिणाम काय होतील याविषयीं तात्त्विक विवेचन आणि शासनविषयक धोरण यांची संगति लावण्यासाठीं प्रयत्न केला आहे. जर्मन लोकांची 'नाशनल ओकोनमी' आणि इंग्रजांची पोलिटिकल एकॉनमी ह्या दोन विचारपद्धतींचें उद्दिष्ट हेंच आहे.

शास्त्राचें जें वर्धन होतें तें कांहीं व्यावहारिक कारणामुळें होत असतें; समाजांतील एकंदर क्रियांचा कार्यकारणभाव ओळखण्यासाठीं प्रवृत्ती होते, तिच्या मुळाशीं त्या ज्ञानाचा व्यवहारांत उपयोग हें प्रयोजन मोठें असतें. इष्ट वर्गाचें हित लक्षांत ठेवून त्याचें संवर्धन करण्यासाठीं मनुष्य पद्धतशीर विचार करूं लागतो आणि या प्रकारच्या प्रयत्नामुळें समाजांतील क्रियांचें पृथक्करण, वर्गीकरण, आणि अन्योन्याश्रय ह्यांचा आणि दोन निराळ्या परिस्थितींतील कार्यकारणभावाचा विचार होऊं लागतो. याप्रमाणें पाश्चात्य ग्रंथकारानें समाजांतील व्यवहारांचें पृथक्करण आणि निरनिराळ्या स्थितीसंबंधानें कार्यकरण याचा बराच अभ्यास केला आहे. त्याप्रमाणें त्यांनीं ज्या शास्त्रीय पद्धतीचा उपयोग करून आपल्या उत्कर्षाकरितां जीं धोरणें उपदेशिलीं तीं केवळ स्थानिक आणि विशिष्ट काळीं आणि परिस्थितींत उपयोगी पडावयाचीं. तथापि त्यावर जो अन्योन्याश्रयाचा तात्त्विक अभ्यास झाला तोच केवळ शास्त्राचा भाग होय. प्रकृत प्रश्नाला सोडून त्यांनीं शोधलेले कार्यकारणसंबंधाचें जें ज्ञान पैदा केलें आहे त्याचें एकीकरण केलें असतां तो समुच्चय फार मोठा व्हावयाचा नाहीं, व अभ्यासकाला तत्त्वें एकीकडे काढून ठेविलीं असतां उपयोगीं पडावयाचीं नाहींत. ज्याप्रमाणें एखाद्या कायदेपंडितास कायदा समजून सांगण्याकरितां तो विशिष्ट परिस्थितीशीं संबद्ध असाच घ्यावयाचा असतो, त्याप्रमाणेंच अर्थशास्त्राचे पाश्चात्यांचे नियम "केस लॉ" म्हणजे विशिष्टप्रसंगानुरूप झालेले नियम असे समजूनच घेतले पाहिजेत.

क्रियांच्या अन्योन्याश्रयांचे जे सिद्धांत प्रथम निघाले ते केवळ प्रवृत्तिदर्शकच असावयाचे. उदाहरणार्थ मागणी मोठी असली आणि पुरवठा कमी असला म्हणजे किंमत वाढते एवढेंच सांगणें झालें म्हणजे, केवळ आपणांस प्रवृत्तिच समजली. तथापि आपणांस या गोष्टीचें ज्ञान अधिक सूक्ष्म पाहिजे. पुरवठा पूर्वीच्या पाऊणपट झाला तर परिणाम दोन होणें शक्य आहे (१) किंमती वाढणें आणि (२) मागणीच कमी होणें. पुरवठा कमी झाला तर प्रथमच किंमती वाढतील. परंतु त्यामुळें मागणी अधिक नियमित होईल व त्यामुळें वस्तूची किंमत शेकडा $33\frac{1}{3}$ न वाढतां कमीच वाढणें शक्य आहे. तर असें खरोखर वाढतें किती हें बाजारांतील आंकडे खरोखरच घेऊन ठरवावें लागणार आणि अशा तऱ्हेचा अभ्यास वस्तुस्थितीचे आंकडे घेऊन करूं लागलें तर आपलें ज्ञान प्रवृत्तिविषयक न राहतां त्या

प्रवृत्तीचें परिमाण देखील समजेल तर या विषयाचें ज्ञान केवळ प्रवृत्तीचें करण्याऐवजीं परिणामात्मक करावें म्हणून अभ्यास अवश्य आहे. ज्ञान परिणामात्मक करण्यासाठीं आंकडेशास्त्राचा उपयोग पाश्चात्यांनीं केला आहे. (आंकडेशास्त्र पहा)

सर्व उद्यमास लागू पडणाऱ्या किंवा उपयोगी पडणाऱ्या ज्या गोष्टी समाजांत दिसून येतात अशा गोष्टी कोणत्या, असा विचार करून भांडवल, मजुरी, योजकाचे परिश्रम इत्यादि घटक त्यांनीं शोधून काढिले आहेत. आणि त्यांचें स्वरूप काय? त्यांचा परस्परांशीं संबंध काय? वस्तूला किंमत आणि महत्त्व जें येते तें कशामुळें येतें? याविषयीं त्यांच्यामध्यें तात्त्विक चर्चेचे देखील ग्रंथ झाले आहेत आणि या प्रकारच्या पृथक्करणांत व घटकांचा परस्पर संबंध लावण्यांत मतभेद किंवा विचारभेद दृष्टीस पडतात.या प्रकारच्या विवेचनास एकानामिक थिअरी असें म्हणतात. अर्थशास्त्रामध्यें जीं निरनिराळीं मतें आहेत किंवा विचारसंप्रदाय आहेत. त्या विचारभेदांच्या मूळाशीं एक तर विज्ञानरचनाविषयक मतभेद असेल किंवा इष्टवर्गमूलकभेद असेल. इष्टवर्गाहितसंबंधाचे मतभेद जेव्हां ज्या मानानें कमी कमी होतील तेव्हां तो केवळ शास्त्ररचनाविषयक व विज्ञानविषयक मतभेद होय. परंतु मतभेदाचें कारण आपल्या इष्टवर्गविषयक हिताची भावना जेव्हां असतें तेव्हां कांहीं वर्गविषयक विचारसंप्रदाय निर्माण होतात. त्या तऱ्हेचें विचारभेद मुख्यतः येणेंप्रमाणेः—

समाजसत्तावाद विरुद्ध व्यक्तिसत्तावाद. समाजामध्यें जें द्रव्य उत्पादन होतें त्या द्रव्योत्पादनाचा मोठा वांटा कोणी घ्यावा? तो मजुरांनी घ्यावा अगर भांडवलवाल्यांनीं घ्यावा? या तऱ्हेचा वाद उत्पन्न होऊन त्याचें परिणत स्वरूप समाजानें माल उत्पन्न करावा आणि परिश्रमाचा फायदा सर्व समाजाला द्यावा, अशा तऱ्हेची विचारमालिका सुरू होते ती विचारमालिका केवळ विज्ञानविषयक नाहीं. यांतील मतभेद हा समजुती गैरसमजुतीवर नाहीं तो इष्टवर्गहितभावनेवर रचला आहे. ज्या वादविवादांत विशेष भावनायुक्त विवेचन दृष्टीस पडतें, तें वाङ्मय इष्टवर्गविषयक हित साध्य करून घेण्याकरितां निर्माण झालेलें होय.

राष्ट्रीय अर्थशास्त्र आणि जागतिक अर्थशास्त्र असेहि भेद झाले आहेत. पहिलें अर्थशास्त्र म्हणतें कीं प्रत्येक राष्ट्राचें अर्थशास्त्र निराळें आणि जगाचें अर्थशास्त्र निराळें. कित्येक ग्रंथकार असें म्हणतात कीं, अर्थशास्त्र हें सर्व जगाला लागू पडणाऱ्या नियमांचें आहे, त्यांत राष्ट्राराष्ट्रांचा संबंध कांहीं नाहीं. एकाद्या राष्ट्रानें काय करावें यांची विचारमालिका ज्यांत असेल तें शास्त्र नाहीं. शास्त्र म्हटलें म्हणजे जागतिक सिद्धांताचें होय. ज्या वेळेस वाद उपस्थित होत. त्यावेळस वादाच्या प्रसंगीं परस्परविरुद्ध पक्षांत जीं भांडणें लागत असत त्यांचीं कारणें बरींचशीं संकीर्ण होतीं. शास्त्र हें नांव कोणच्या प्रकारच्या विचारमालिकेस द्यावें यासंबंधानें अनिश्चय हें एक कारण होतें व आपल्या आवडत्या परिश्रमास महत्त्व पावलेलें नांव द्यावें ही भावना अभ्यासकांत असतें हें दुसरें कारण होतें. तिसरें कारण असें कीं "सर्व जग हा एकच समाज आहे" आणि "अर्थशास्त्र जागतिक आहे" असें उदार मतानें प्रतिपादन करणें अत्यंत बलवान् व पुढें गेलेल्या समाजासच हितावह असतें; व त्या समाजांतील लोक विश्वव्यापी किंवा जगद्व्यापी तत्त्वज्ञानाच्या गप्पा करूं लागले म्हणजे उद्योगधंद्यांत मागें राहिलेल्या देशांतील तत्त्वज्ञांस असें वाटूं लागतें कीं, हे दुसऱ्यास खावून लठ्ठ बनलेले चोर जगद्‌बंधुत्वाचें पांडित्य करीत आहेत. आणि इतरांकडून आत्महित साधण्यासाठीं प्रयत्न बिघडविण्यासाठीं हें जागतिक तत्त्वज्ञानाचा आव घालीत आहेत. अशा तऱ्हेच्या आत्महित हेतुमूलकतेचा जेव्हां संशय उत्पन्न होतो तेव्हां विशिष्टविचारपद्धतीला शास्त्र म्हणून मान्यता मिळण्याचा संभव कमी होतो. अर्थशास्त्राच्या इतिहासांत जागतिक अर्थशास्त्र बोधणाऱ्या इंग्रज अर्थशास्त्रकारांच्या आणि त्यांचीं पुस्तकें वाचून पांडित्य करणाऱ्या शिक्षकांच्या आणि लेखकांच्या विरुद्ध अमेरिका व जर्मनी यथील शास्त्रज्ञांनीं स्वार्थमूलकतेचा आरोप करणारे आक्षेप काढले आहेत. तसल्याच प्रकारच्या आक्षेपांचा ध्वनि हिंदुस्थानांतहि गेल्या दशकापर्यंत निघत असे.

सध्यां अर्थशास्त्राचा अभ्यास अनेक तऱ्हेनें व अनेक क्षेत्रांत होत आहे. त्याचें सामान्य स्वरूप स्पष्ट करणें जरूर आहे. अर्थशास्त्राच्या अभ्यासाचें साहित्य जें सध्यांचा एकंदर मनुष्यसमाज, त्याची सांपत्तिक स्थिति, त्यांचा अन्योन्याश्रय, त्यांत प्रत्येक ठिकाणीं दृष्टीस पडणारे श्रमविभाग, मनुष्यमात्राच्या परिश्रमानें उत्पन्न झालेल्या द्रव्याचें मापन इत्यादि गोष्टींची माहिती हा खुर्चीवर बसणारा व ग्रंथ लिहिणारा शास्त्री मिळवीत नाहीं. या प्रकारचें साहित्य जमविणें हें कार्य सरकार अगर मोठमोठ्या संस्थांचें असतें. अर्थशास्त्राच्या पूर्वी जे ग्रंथ झाले त्यावेळीं ह्या साहित्याची अत्यंत अल्पता असे. सध्यां हें ज्ञान पुष्कळच वृद्धिंगत झालें आहे. अर्थशास्त्राचा अध्यापक केवळ या प्रकारच्या साहित्याचा अभ्यास करून आपला निर्णय काढीत असतो.

सर्व जग आर्थिकदृष्ट्या एक समाज आहे असें धरून त्याचा अभ्यास पद्धतशीर करण्याकडे अजून जितकें लागावें तितकें लक्ष लागलें नाहीं, आणि या विषयावर चांगले ग्रंथ झाले नाहींत. याचें कारण असें कीं, सर्व जगाबद्दल जबाबदार अशी सत्ता नाहीं, आणि त्यामुळें जगाचें आर्थिक धोरण ठरविलें जात नाहीं; असें आहे तरीहि जागतिक अर्थशास्त्रास जागा आहे. ज्याप्रमाणें ज्या एखाद्या भूभागांत स्थिर शासनसत्ता नसते तेथें देखील निरनिराळ्या व्यक्तींमध्यें आर्थिक क्रिया असतातच, आणि प्रत्येक मनुष्य आपापलें वर्तन ठर-

वितो आणि त्याच्यायोगानें स्पर्धेचे किंवा अंतर्गत अन्योन्याश्रयाचे नियम निघतातच. निरनिराळीं राष्ट्रें आपापलीं इतराशीं वागावयाची व्यवहारनीति ठरवितात. त्या राष्ट्रीय नीतिनियमांच्या व धोरणांच्या समुच्चयेंकरून जागतिक व्यवहारांतले कांहीं नियम उत्पन्न होतात. निरनिराळे देश हे कांहीं अंशीं जगाचे निरनिराळे अवयव आहेत आणि त्यांमध्यें अन्योन्याश्रय उत्पन्न झाला आहे. जगांतील स्पर्धा व अन्योन्याश्रय हीं अवगमिणें हें जागतिक अर्थशास्त्राचें कार्य होय. जागतिक अर्थशास्त्र तात्विक विचार सोडून जेव्हां कर्तव्यक्षेत्रांत उतरतें तेव्हां, आपल्या देशाव्यतिरिक्त इतर देशांची सुधारणा कशी करतां येईल इकडे तें लक्ष देतें. प्रत्येक देशांतील सरकारचें आर्थिक दृष्ट्या मोठें कार्य असतें. सरकार केवळ न्याय व संरक्षण एवढेंच करीत नसून शिक्षणाचें कार्य करतें. ज्या सुधारणांच्या योगानें देशाची समृद्धता वाढेल पण पैसे घालणाराला तावडतोब फायदा होणार नाहीं अशा गोष्टीहि सरकार करतें. नद्यांनां धरणें बांधून पाणी अडवणें आणि त्याचा शेतकीकडे उपयोग करणें व त्या शेतांवर पट्टी बाढवून धरणांचा खर्च वसूल करणें यांसारख्या गोष्टींस मोठमोठ्या रकमा खर्च कराव्या लागतात. ज्या सुधारणांनीं प्राप्ती कालांतरानें होईल अशा अन्य देशांत सुधारणा करण्याकडे एखाद्या देशाचें भांडवल खर्च होणें शक्य आहे काय? ज्याचा मला फायदा नाहीं त्याबद्दल मी खर्च कशाला करूं ही मनुष्याची वृत्ति असते तीच राष्ट्रांतहि असावयाचीच. परकीय देशांतील शिक्षणासाठीं लोक कितपत खर्च करतील या विषयीं देखील असें म्हटलें पाहिजे कीं, परक्या देशांत शिक्षणासाठीं पैसा खर्च करण्याची प्रवृत्ति थोडी थोडकी नाहीं. प्रत्यक्ष शिक्षणासाठीं जरी पैसा वेतानेंच खर्च केला जातो तरी ख्रिस्तीसंप्रदायाच्या प्रसाराच्या निमित्तानें पुष्कळच पैसा खर्च होतो.

निरनिराळ्या देशांतील मजूर, भांडवल आणि जमीन यांचा चढाओढीच्या तत्त्वानें उपयोग व्हावयास अडचणी अनेक आहेत. भांडवलवाले परक्या देशांत भांडवल फारसें घालूं इच्छीत नाहींत, आणि निरनिराळ्या देशांतील शासनसंस्था परक्या देशांतील भांडवल आपल्या देशांत येऊं देण्याविषयीं कांहीं अंशीं साशंक असतात. परक्या देशांतील भांडवल घेतलें आणि तें वेळेवर फेडतां आलें नाहीं म्हणजे तें पुष्कळदां स्वातंत्र्य नाशास कारण होतें असा दुर्बल देशांचा अनुभव आहे. भांडवलवाला वर्ग आपल्या सरकारचें राज्य जेथें असेल आणि त्यामुळें त्यास जेथें सुरक्षितता वाटेल अशा ठिकाणींच भांडवल पाठवूं इच्छितो. इतक्या अडचणी आहेत तरी देखील निरनिराळ्या देशांत परक्या देशांतील भांडवल थोडथोडकें आलें नाहीं. इंग्लंडांतील भांडवलानें वसाहती व हिंदुस्थान यांत आगगाड्या बांधल्या. हिंदुस्थानाचा बाहेर देशाशीं व्यापार करणाऱ्या जहाजें परक्या भांडवलाचींच आहेत. हिंदुस्थानांतील खाणी खणण्यास बरेंचसें भांडवल परकें आलें आहे आणि त्या भांडवलावर हिंदुस्थानाचा आर्थिक विकास झाला आहे. येथील गिरण्यांपैकीं देखील बऱ्याच गिरण्या परकी भांडवलावर चालल्या आहेत. हिंदुस्थान सरकारची जगांतील रोकडबाजारांत इभ्रत, दक्षिण अमेरिकेंतील अनेक स्वतंत्र राष्ट्रांहून अधिक आहे, आणि या देशानें बाहेरचा पैसा स्वतःच्या सुधारणेसाठीं ओढण्याचें कार्य हिंदुस्थाननें इंग्रजी नेतृत्वाखालीं चांगल्या तऱ्हेनें केलें आहे. भौतिक सुधारणेसाठीं एका देशांतील पैसा दुसऱ्या देशांत जातो तो व्याजाच्या आशेनें जातो. पण शिक्षणासाठीं पैसा जातो तो देखील अर्थशास्त्राचाच भाग होय. राष्ट्रांत दानशक्ति व्यवस्थित होऊन दानमहत्त्व ऊर्फ समाजव्यंगनिवारणमहत्त्व वाढत आहे त्याबरोबर दानसंस्था अतिराष्ट्रीयहि होत आहे, आणि सर्व जग मिळून एक समाज आहे ही कल्पनाहि त्याबरोबर वाढत आहे. हिंदुस्थानांत जेव्हां दुष्काळ पडला होता तेव्हां जगांतील सर्व राष्ट्रांनीं हिंदुस्थानसरकारास दुष्काळनिवारणार्थ कामें उघडण्यासाठीं वर्गणी पाठविली, आणि जपानामध्यें धरणीकंपानें टोकिओ, याकोहामा हीं शहरें १९२३ च्या उत्तर भागांत उध्वस्त झालीं तेव्हां सर्व जगानें मदत केली, व हिंदुस्थानानेंहि या बाबतींत माघार घेतली नाहीं. ज्या वेळेप या प्रकारचें कृत्य लोकांकडून होतें. त्या वेळेस तें दानस्वरूपी धार्मिक कृत्य म्हणून होतें हें खरें. पण ज्या राष्ट्राचा आपत्तींत असलेल्या राष्ट्रांशीं व्यवहारसंबंध अधिक असतो त्या राष्ट्रांकडून मदत अधिक होते ही गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे अतिराष्ट्रीय दानास देखील व्यवहारबुद्धि कारण होते असें म्हणावें लागेल.

जागतिक अर्थशास्त्रावर पद्धतशीर विवेचन होण्यास सुरुवात जरी झाली नाहीं तरी येत्या एक दोन दशकांत या दिशेनें हें शास्त्र बरेंच वृद्धिंगत होईल असा अजमास करण्यास जागा आहे.

अ र्थ शा स्त्रा चा इ ति हा स—याची मांडणी आपण येणेंप्रमाणें करूं. प्राचीन भारतीय अर्थशास्त्राकडे प्रथम लक्ष देऊन मग मराठ्यांच्या अर्थशास्त्राकडे लक्ष देऊं आणि यानंतर पाश्चात्यांच्या विकासाकडे लक्ष देऊं आणि त्यानंतर आतां तयार होत असलेल्या भारतीय अर्थशास्त्राकडे लक्ष देऊं.

सं स्कृ त ग्रं थ का रां चें अ र्थ शा स्त्र.—"अर्थशास्त्र" या नांवाखालीं भारतीय लोक व्यावहारिक जीविताशीं ज्यांचा संबंध पोंचतो अशा सर्व उपदेशपर ग्रंथांचा व शिकवणींचा समावेश करितात. व्यावहारिक जीवितांत कला, गृहव्यवस्था कारभार आणि मुख्यत्वेंकरून राजकारण यांचा अंतर्भाव होतो. अर्थशास्त्राची अति महत्त्वाची शाखा राजकारणाची असून, ती स्वतंत्र शास्त्रांत गणली जाते; तिला "नीतिशास्त्र" असें नांव आहे. राजाला सुद्धां कलारचना, आर्थिक स्थिति व कारभार यांचें ज्ञान अत्यवश्यक आहे व तें राजकारणाचें

एक अंग म्हणून गणलें जातें. तेव्हां कधीं अर्थशास्त्र व नीतिशास्त्र हीं नांवें समानार्थक योजिलीं जातात. प्राचीन भारतीय ग्रंथकारांनां राजसत्ताक पद्धतीखेरीज दुसरी शासनपद्धति देशांत असली तरी परिचित किंवा विचारार्ह नसल्यानें याला "राजनीति" असेंहि म्हणतात, आणि त्यांनीं शासनशास्त्राचें विवेचन राजनीति या दृष्टीनेंच केलें आहे व राजशासनाचें मुख्य साधन दंडबल असल्यानें याला "दंडनीति" असें दुसरें नांव आहे.

अर्थशास्त्राच्या प्रगतीचा संबंध आयुष्यांतील तीन प्राचीन जे हेतु त्यांशीं येतो. हे तीन हेतु पतंजलीला पूर्वीच अवगत होते [ पाणिनीवर महाभाष्य २,२, ३४ वार्तिक ९.] हिरण्यकेशी गृह्यसूत्रांत ( २. १९, ६ ) धर्म अर्थ आणि काम यांच्यावर चेतन धर्माचा आरोप केला आहे. या त्रिवर्गाचा लाभ करून घेणें हें यजमानाचें आद्य कर्तव्य आहे. असें विष्णु-स्मृतींत (५९, ३०) लिहिलें आहे. अश्वघोष यांतान हेतूंशीं परिचित होता व महाभारत, [ महाभारतांत, हेंच अर्थशास्त्र, धर्मशास्त्र व कामशास्त्र असल्याचें पुढील श्लोकांत म्हटलें आहे. अर्थशास्त्रमिदं प्रोक्तं धर्मशास्त्रमिदं महत् । कामशास्त्रमिदं प्रोक्तं व्यासेनामितबुद्धिना ॥ ( आदिपर्व. अ. २ श्लो. ३८४) मनुस्मृति आणि तंत्राख्यायिक यांतून तर या "त्रिवर्गाचा" नेहमीं उल्लेख येतो. तथापि त्रिवर्गाच्या प्रत्येक वर्गावर निरनिराळें शास्त्र कधींपासून अस्तित्वांत आलें याचा आम्हाला अदमास लागत नाहीं.

अथर्ववेदपरिशिष्टांतील चरणव्यूहांत अर्थशास्त्राला ऋग्वेदाचा उपवेद असें नांव दिलें आहे. सर्व विद्या-शास्त्रांमधील अतिप्रापंचिक सुद्धां वेदाशीं निगडित करण्याच्या ब्राह्मणी प्रयत्नांतील हा एक प्रयत्न म्हणतां येईल. भासाला अर्थशास्त्र [ प्रतिज्ञा यौगंधरायणामध्यें ( अं. २. श्लो. १३ ) व प्रतिमा नाटकांत याचा उल्लेख केला आहे ] माहिती होतें. राजकुमार सिद्धार्थ यानें अभ्यासलेल्या शास्त्रांमध्यें हें एक म्हणून ललितविस्तरांत [ प्रत लेफमन, पान. १५६. ] उल्लेखिलें आहे. महाभारतांत ( १२. ५८, १ पुढें ) बृहस्पति विशालाक्ष, उशनस्, सहस्राक्ष, महेंद्र, प्राचेतस, मनु, भरद्वाज व गौरशिरस या ऋषींनां राजशास्त्रप्रणेते असें म्हटलें आहे. हेच आचार्य कांहींसे धर्मशास्त्रांचे कर्ते दिसतात. यावरून आपणांला असें अनुमान काढतां येईल कीं, अर्थशास्त्र हें हळू हळू धर्मशास्त्रापासून निराळें झालें. अर्थशास्त्र म्हणून स्वतंत्र शास्त्र निघण्यापूर्वी याकोबी ( एस्. बी. ए. १९१२, पा. ८३८ पासून ) याला स्वतंत्र अर्थशास्त्राचें संप्रदाय असल्याविषयीं संशय येतो; तसेंच जाली [झेड् डी. एम्. जी. ६७, १९१३, पा. ९५ ], हिलेब्रॅन्ट ( झेड् डी एम् जी ६९,१९१५ पा. ३६० ) निरनिराळ्या शाखा गृहीत धरितो एकाच शाखेंतून राजधर्मशिक्षणांत हीं दोन शास्त्रें शिकविण्यांत येत. या दोन्ही शास्त्रांत नेहमीं कांहीं विषय सदृश असत. प्राचीन धर्मसूत्रांत [अपस्तंबीय धर्मसूत्र २. १०, २५-२६.] देखील अर्थशास्त्राच्या कक्षेंत येणारे विषय विवेचिलेलें असत. उदाहरणार्थ, शहरें आणि राजवाडे यांची रचना, अधिकाऱ्यांची नेमणूक, मुलकी आणि जकात पद्धती, व सैन्यव्यवस्था इ. तथापि या छंदोबद्ध धर्मसूत्रांतून अर्थशास्त्रासारखें एक स्वतंत्र शास्त्र या पूर्वीचें असावें असा ध्वनि निघतो. विष्णुस्मृतीच्या ३ व ४ प्रकरणांत असेंच निघतें. मनु. ७, १५५, याज्ञवल्क्य १, ३४४ इ; विष्णु ३, ३८ इ. या उताऱ्यांत अर्थशास्त्रांत रूढ असलेली परिभाषा कल्पिली आहे. याज्ञवल्क्य (२,२१) आणि नारद ( १. ३९ ) हे स्पष्टपणें पूर्वापार नियम म्हणून असें प्रतिपादतात कीं, धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र यांच्यांत विरोध उत्पन्न झाल्यास धर्मशास्त्र जास्त प्रमाणभूत मानावें. या दोन्ही शास्त्रांत विवेचिलेल्या नियमांत सुद्धां मुळांतच फरक दृष्टीस पडतात. अर्थशास्त्र खऱ्या वस्तुस्थितीला अनुसरतें तर धर्मशास्त्र पुष्कळवेळां केवळ ब्राह्मणेच्छेप्रमाणें नमुनेदार पण काल्पनिक स्थिति धरून चालतें. एका शास्त्राला जें विशेष महत्त्वाचें वाटतें तें दुसऱ्याला क्षुल्लक दिसून त्याच्याकडे त्याचा कानाडोळा होतो. उदाहरणार्थ, अर्थशास्त्रांत दैवी शिक्षा बाजूला ठेऊन कायद्याच्या अंमलबजावणींत यातना अंगिकारिली आहे, तर धर्मशास्त्रांत दैवी शिक्षेकडेच बोट दाखविलें आहे. तथापि या दोन्ही प्रकारच्या शिक्षा त्यावेळीं अस्तित्वांत असाव्यात [ जॉली. झेड्. डी. एस्. जी. ६७, पान ४९इ. ९४ इ. यांशीं तुलना करा.] या दोन शास्त्रांतील तत्त्वांत उघड उघड फरक दिसतो. धर्मशास्त्र श्रुतीवर आधारलेलीं कर्तव्यें शिकविण्याचा बाणा अगर बहाणा करतात; तर अर्थशास्त्र नीति व धर्म यांचा संबंध नसलेले [ "आत्मोन्नति व शत्रूचा पराजय या दोन गोष्टी म्हणजे सबंध नीति होय" माघ-शिशुपालवध २. ३०. ] कांहीं भौतिक सिद्धीच मार्ग दाखवितात. या कारणाकरितांच बौद्धसंप्रदायी अर्थशास्त्र मुळींच मानीत नाहींत. जातक मालेंत [९, १०; ३१. ५२इ.] अर्थाशीं जोंपर्यंत धर्माचा विरोध येत नाहीं, तोंपर्यंतच तो ग्राह्य असतो हा राजशास्त्राचा सिद्धांत खोडून काढून, नीतीला खोटें म्हटलें आहे.

अर्थ व नीति यासंबंधींचीं जुनीं वचनें सूत्ररूपानें, त्यांच्या शाखा व शास्त्रें अस्तित्वांत येण्यापूर्वी लोकांच्या तोंडीं असत. हीं सुप्रसिद्ध वचनें छंदोबद्ध असून राजधर्मासंबंधीं त्यांत विवेचन असे.

यामुळेंच महाभारतांतील अनेक उताऱ्यांतून धर्म व नीति यांसंबंधींचीं वचनें एकमेकांत मिश्र केलेलीं दिसतात. [ उदाह. ५ व्या पर्वांतील विदुराचीं भाषणें; विशेषतः ३३, ३६, ३७ आणि ३९ या अध्यायांतील. १२ व्या पर्वांत नीतिवचनें पुष्कळ आहेत; अध्याय ८० इ. ९३ इ. १०३ इ. ११२, ११४ इ. ११८ इ. १६८ पाहा ] महाभारतांतील अनेक भाग असे आहेत कीं त्यांनां खरोखरीच छोटीं नीतिशास्त्रें म्हणतां येईल. [या ठिकाणीं महाभारतांतील पर्व १ अ. १४० पाहावें, त्यांत कणिक धृतराष्ट्राला स्वशत्रूच्छेदाचा कसा निष्ठुरपणें